२२५७ ५२१/१९५८ ८/17.3.2000

# श्रीएकनाथ महाराजांच्या

# अभंगांची गाथा.




कै० रा. रा. तुकाराम तात्या

यांनीं

तत्त्वविवेचक ग्रंथप्रसारक मंडळीसाठीं तयार केली

ती

12562

६९
एकना
१२५६२

राजाराम तुकाराम

यांनीं

छापून प्रसिद्ध केली.

(या पुस्तकाची मालकी सन १८६७ च्या २५ व्या ॲक्टाप्रमाणें प्रसिद्ध करणारानें आपल्या स्वाधीन ठेविली आहे.)

सन १९०३ इसवी.

वाचावयास घरी नें [illegible] र नाही.

महाराष्ट्र साहित्य परिषद. पुणे. १

# सूचना.

आमचे तीर्थरूप कैलासवासी रा. रा. तुकाराम तात्या यांनीं आजपर्यंत महासाधु श्रीतुकाराम, निळोबा व नामदेव यांच्या गाथा छापून प्रसिद्ध केल्या. त्याचप्रमाणें श्रीज्ञानेश्वरमहाराजकृत भगवद्गीतेवरील टीकाही त्यांनीं छापून प्रसिद्ध केली, ती अशा हेतूनें कीं, अज्ञानी लोकांत या ग्रंथांचा प्रसार व्हावा; वडिलोपार्जित ज्या साधूक्ति त्यांचे संग्रहीत होऊन बसल्या आहेत त्या बहुधा अपभ्रष्ट अतएव अशुद्ध आहेत अशी त्यांचीच खात्री होऊं लागली, म्हणून त्या नाहींशा व्हाव्या; ज्यांनीं लोकोद्धारार्थ आपले देह आजन्म झिजविले त्या वरील साधुवरांचे ग्रंथ अजिबात अंधेरांत राहतात कीं काय अशी भीति वाटूं लागली, ती दूर व्हावी; आणि त्या अशुद्ध पाठांतरांपेक्षां शुद्ध रीतीनें छापिलेले ग्रंथच त्यांनां वाचावयाला मिळून त्यांचा जीर्णोद्धार व्हावा त्याबरोबर सदर्हु लोकांत वरील ग्रंथांचाही प्रसार व्हावा; इत्यादि, आमच्या तीर्थरूपांचे हेतु बरेच सिद्धीस गेले. आतां वरील गाथा इतरांनींही छापून प्रसिद्ध केलेल्या आढळतात. पण कालमानानें पाहतां त्यांचे प्रयत्न आमचे वडिलांचे प्रयत्नांनतर झालेले आहेत असें आढळून येईल. ते आजला हयात असते तर त्यांचे हातून आणखी किती तरी ग्रंथरत्नांचा उद्धार झाला असता! त्यांना आपल्या साधुवरांच्या अभंगवाणीचा असा कांहीं नादच लागला होता. म्हणून वरील ग्रंथ प्रसिद्ध होतांच त्यांनीं पैठणचे प्रख्यात साधु व महान् भगवद्भक्त श्रीएकनाथमहाराज यांचे अभंगांची गाथा प्रसिद्ध करण्याचें मनांत आणलें; व त्याप्रमाणें ते हयात असतां प्रस्तुत गाथेचे बरेच भाग छापून तयार झाले होते; परंतु दुर्दैवानें त्यांच्यावर मृत्यूचा अकस्मात् घाला पडल्यानें हें काम तसेंच अर्धें राहिलें. आणि पुत्रधर्मास अनुसरून आम्हीं यापूर्वीं कधींच तें तडीस न्यावयास पाहिजे होतें. परंतु या कामाचा आम्हांस अनुभव कमी, व शिवाय प्लेगसारख्या ठरलेल्या वार्षिक अडचणीमुळें हा ग्रंथ बाहेर पडण्यास बराच उशीर लागला याबद्दल वाईट वाटतें. परंतु या दिरंगाईबद्दल सर्व भाविक लोक आम्हांस क्षमा करतील अशी आशा आहे.

श्रीएकनाथमहाराजांचें चरित्र सर्वश्रुत आहेच. तथापि ज्या कोणास तें जाणण्याची इच्छा असेल त्यांनीं कै. वा. धोंडो बाळकृष्ण सहस्रबुद्धे, व प्रो. राजाराम रामकृष्ण भागवत यांनीं लिहिलेलीं व सर्वमान्य झालेलीं श्रीएकनाथमहाराजांचीं चरित्रें अवश्य पहावीं अशी आमची शिफारस आहे. तथापि कस्तूरीची परीक्षा करावयाला तिच्या आंगचा सुवासच जसा पुरे आहे त्या प्रमाणें श्रीएकनाथ-

महाराजांची योग्यता त्यांचे प्रकृत अभंगांचे गाथेवरून सहज होणार आहे. या शिवाय त्यांचे 'भावार्थरामायण,' 'भागवत' व 'रुक्मिणी स्वयंवर' हे ग्रंथ तर सुप्रसिद्धच आहेत. तेव्हां प्रत्यक्ष महिपतीनें ज्यांची थोरवी आपल्या रसाळ वाणीनें 'भक्तलीलामृत व 'भक्तविजयां' तून वर्णन केली आहे तेथें आमच्या लेखणीचा काय पाड? तथापि केशवकविकृत श्रीएकनाथस्वामींचें ओंवीबद्ध चरित्र आम्ही आपल्या वाचकांस या गाथेंत सादर केलें आहे. असो.

शेवटीं शक्य तेवढा प्रयत्न करून या साधुपुरुषाचे आम्हांला जितके अभंग मिळवितां आले तितके आम्ही मिळवून प्रस्तुत गाथा तयार केली आहे व विषयां-प्रमाणें त्यांचीं प्रकरणेंही पाडलीं आहेत.

अशा प्रकारचा हा आमचा प्रयत्न पहिलाच आहे. सबब गुणांचें सर्व यश आमच्या तीर्थरूपांस मिळून, हींत असलेल्या उणीवांची आम्हांस आमच्या वाचकां-कडून सूचनापूर्वक क्षमा होईल अशी आशा आहे.

मुंबई.
ता. १-११-१९०३.

राजाराम तुकाराम.

# भानुदासाचे अभंगांची

## अनुक्रमणिका.

# अभंगाची अनुक्रमणिका.




## अ.

महाराष्ट्र साहित्य परिषद पुणे ३१


म. 12562

# अभंगांची विषय अनुक्रमणिका

# श्री एकनाथस्वामीचें चरित्र.

## अध्याय पहिला.

श्रीगणेशायनमः ॥ श्रीसरस्वत्यैनमः ॥ श्रीगुरुभ्योनमः ॥ श्रीकृष्णायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ श्लोक ॥ अधिष्ठान वासी प्रतिष्ठान ग्रामीं । लिलाविग्रही जन्मला पुण्यभूमीं ॥ महाराज श्रीएकनाथाभिधानी । नमूं पादपद्मा जपूं नाम वाणी ॥ १ ॥ अगणित चरितातें कोण वर्णील वाणी । अघटित पुरुषार्था काय गाईल वाणी ॥ निजहित निजकाजा आवडी केशवाची । घडि घडि गुण गावे कीर्ति श्रीनाथजीची ॥ २ ॥ मुळीं जन्मला निर्गुणीं कर्म भूमीं । त्वरें मायबापा गति मोक्षधामीं ॥ प्रतीपाळ देहासिं तो ईश योजी । जनोद्धार व्हावा कलीं याचि काजीं ॥ ३ ॥ पितामह पितामही परम वृद्ध होतीं गृहीं । निमित्य प्रतिपाळणीं करित ईश्वरू प्रत्यही ॥ बहू सगुण साजिरें रुपचि देखुनीयां मुला । निरंतर वसे मनीं सुखचि थोर हो त्यांजला ॥४॥ दशा लेंकुराची अलौलीक दीसे । नसे मानवाच्या परी देव भासे ॥ सदा रामनामेंचि सारीत काळा । रुचे ना जया खेळ जे बाळलीला ॥ ५ ॥ क्रमें मुंजि त्या सहावे होत वर्षीं । पुराणीं अति प्रीति श्रीनाथजीसीं ॥ निघाल्या कथा भक्ति ज्ञानार्थ वार्ता । अती हर्षुनी भाव आणीत चित्ता ॥ ६ ॥ पुराणीक तेव्हां रिझे बाळकाची । स्थिती पाहुनी योग्यता नाथजीची ॥ मनीं थोर आश्चर्य वाटे तयाला । कसें ज्ञान हें या वयीं या मुलाला ॥ ७ ॥ ऐसेपरी ऐकतसे पुराणां । सिद्धांत वार्ताचि करीत प्रश्ना ॥ द्विजासिं आश्चर्य बहूत वाटे । ह्मणे मला यापरि ज्ञान कोठें ॥ ८ ॥ पोटार्थ कीं सांगतसे पुराणां । लौकीक स्त्री पुत्र गृहार्थ जाणा ॥ तुझ्या असी बुद्धि श्रीरामरावो । कृपाकटाक्षें मजलागिं देवो ॥ ९ ॥ श्रीनाथ उत्पन्न स्वयेंचि ज्ञाता । पाळी व्यवस्था जन संग्रहार्था ॥ चिंता करी सद्गुरु केविं भेटे । त्या वेगळें सौख्य मना न वाटे ॥ १० ॥ देवालयीं उद्धव देव वाणी । जनार्दना भेटुनि हर्ष मानी ॥ दत्तात्रयापासुनि बोध प्राप्ति । करीतसे देवगिरीसिं वस्ती ॥ ११ ॥ परिसुनि निजचित्तीं थोर आनंद झाला । नमन करुनि प्रीति शीघ्रतेसीं निघाला ॥ उदित सकळ भावें भेटिचें आर्त देहीं । न पुसत वडिलांतें सांडुनीयां स्वयें ही ॥ १२ ॥ प्रतिष्ठान क्षेत्राहुनी देवगीरी । क्रमी वीस कोसासि जाऊनि द्वारीं ॥ उभा पूर्ण वैराग्यचि ज्योतिमूर्ति । ह्मणे द्वारपाळांसि सांगा विनंति ॥ १३ ॥ अवस्था शिशू देखुनी बाह्य दीक्षा । समस्तां मनुष्यांसि तेव्हां उपेक्षा ॥ म्हणोनी तया नावरे वेध चित्तीं । जळें पूर्ण आर्द्र ते नेत्र होती ॥ १४ ॥ गुरुप्राप्तिचा वेध चित्तांत वाढे । तयासारिखें चिन्ह बाहेर

जोडे ॥ अवस्था मनीं नावरी आणि देही । गुरू भेटि कैं होय झाला विदेही ॥ १५ ॥ बाह्याकृती विठ्ठल द्वारपाळीं । पाहुनियां प्रेम नवीनव्हाळी ॥ जनार्दनासीं विदितार्थ केला । ऐकोनियां भाव मनीं निवाला ॥ १६ ॥ स्वयें ज्ञानदृष्टी विचारूनि पाहे । ह्मणे लाभ तो थोरसा दीसताहे ॥ त्वरें येउनी पाहिलें बाळकेंद्रा । उभा लाउनी नेत्र जो मौन्य मुद्रा ॥ १७ ॥ म्हणे आलों भेटी उघडुनि दिठी भेट मजला । असा या शब्दाचा ध्वनि परिसुनीयां उमजला ॥ पुढें देखे स्वामी जय जय वदोनी विनविता । नमी साष्टांगेंची करुनि करुणा सद्गुरुपिता ॥ १८ ॥ जनार्दनें ऊचलुनी मुलाला । आलिंगिलें पूर्ण सुखें निवाला ॥ श्रीदत्तरूपचि मनासि वाटे । आल्हाद तेव्हां हृदयांत दाटे ॥ १९ ॥ नाथासही हर्ष अपार झाला । स्वानंदबोधें हृदयीं निवाला ॥ जाला अभेदार्थ समग्र दृष्टी । वाटे सदोदीतचि ब्रह्म पुष्टी ॥ २० ॥ जो पूर्ण गुह्यार्थ जिवीं निजाचा । परस्परें होत प्रबोध साचा ॥ आलिंगनें हा नवलाव केला । वाचेसि हा अर्थ नयेचि बोला ॥ २१ ॥ पुढें फार उद्धार याचेनि हातें । जगाचा असें हें गमे सद्गुरूतें ॥ अती आदरें आणिलें मंदिरासीं । धरूनी करीं बाळ श्रीनाथजीसीं ॥ २२ ॥ पाहूनि आदर विशेष गुरुकृपेचा । वंदोनि पाय विनवी अति नम्र वाचा ॥ सेवेंत राहुं निरंतर पादसेवा । प्राप्ती घडे मज गुरु वर हाचि द्यावा ॥ २३ ॥ वदे सद्गुरू थोर पुण्यें करूनी । असी संगती प्राप्ति हें सत्य मानी ॥ तुझ्या सन्निधानीं जरी काळ कंठे । असें झालिया आमुचें भाग्य मोठें ॥२४॥ श्रीएकनाथ विबुधाभरणावतारी । हें सत्य संशय नसे बरव्या विचारीं ॥ हें सद्गुरूसि कळलें कवण्या प्रकारें । सेवा स्विकार करणें गमलें विचारें ॥ २५ ॥ या देह इंद्रिय जडासहि चालवीता । याहूनि कोण दुसरा प्रतिपाळकर्त्ता ॥ सेवा प्रकार पाहतां दुसरें नसे कीं । जो चित्स्वरूप हि नांदतसे विवेकीं * ॥ २६ ॥ हा एकनाथ जगदुद्धरणार्थ लीला । दावी स्वयें करुनि सेवन याचि खेळा ॥ जें श्रेष्ठ आचरण तें बरवें मनासी । लागेल देख अति उत्तम या जनासी ॥ २७ ॥ श्रीएकनाथ मग सद्गुरुसेवनातें । राहे निरंतर करी अति हर्ष चित्तें ॥ या नंतरे सुखकरीं बहुतें चरित्रें । दावील सज्जन बरीं परिसोत श्रोत्रें ॥ २८ ॥ मुक्ति वरील गुरुभक्ति अगाध ख्याती । लीलावतार नटनाढ्य विचित्र कीर्ति ॥ भावार्थ युक्त चरितें परिसावयासीं । विज्ञापना करित केशव श्रोतियांसीं ॥ २९ ॥ इति श्रीएकनाथचरित्रे श्रीगुरुदर्शनो नाम प्रथमोऽध्यायः ॥ प्रसंग १ ॥ श्रीदत्तात्रयार्पणमस्तु ॥ श्रीएकनाथार्पणमस्तु ॥

---

* सेवेची आवडी ॥ आराम नाहीं अर्ध घडी ॥ १ ॥ नित्य करितां गुरुसेवा ॥ प्रेम पडिभार होत जीवा ॥ २ ॥ आळस येवोंची सरला ॥ आराणुकेचा ठावो गेला ॥ ३ ॥ तहान विसरली जीवन ॥ भूक विसरली मिष्टान्न ॥ ४ ॥ जांभईसी वाव पुरता ॥ सवड नाहिंचि तत्वता ॥ ५ ॥ ऐसें सेवें गुतलें मन ॥ एकाजनार्दनी शरण ॥ ६ ॥

# अध्याय दुसरा.

॥ श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ ओव्या ॥ पूर्णावतार श्रीएकनाथ ॥ जगदोद्धारक अति पवित्र ॥ गुरुसेवा निजभावार्थ ॥ दावी प्रगटार्थ आचरोनी ॥ १ ॥ जें जें कृत्य भासे दिठी ॥ तें तें आपणची करीत उठी ॥ उंचनीच परिपाठी ॥ नाहीं जगजेठी स्वामिया ॥ २ ॥ सर्व जगीं आत्मदृष्टी ॥ ऐसी बोधाची निजपुष्टी ॥ त्याहि वरी गुरुसेवा उठी ॥ नवल कोटी हे निष्ठा ॥ ३ ॥ सायोज्य वरील निजदास ॥ हा अंगेंचि दावी सौरस ॥ अधिकाधिक उल्हास ॥ उपजे विशेष सेवेचा ॥ ४ ॥ सडासंमार्जन करावें ॥ धोत्रें धोवोनी आणावें ॥ शौच्यविधीसि जळ अर्पावें ॥ पूर्ण भावें निजनिष्ठा ॥ ५ ॥ विधि निषेध लौकीक पाहीं ॥ गुरुसेवा निश्चय हृदयीं ॥ सेवेसि सादर ठायीं ठायीं ॥ उबग कांहीं नयेची ॥ ६ ॥ शौच स्थळ शुद्धकर्ता ॥ एके दिनीं शीघ्र न येतां ॥ स्वयें आपणचि शुद्धता ॥ उल्हासतां पैं करी ॥ ७ ॥ करूनियां आराणुक ॥ पादसंवाहनालागीं देख ॥ सादर बैसे अवश्यक ॥ अति निःशंक निजनिष्ठा ॥ ८ ॥ जनार्दन आपुले मनीं ॥ ह्मणे या स्थितीचा कोणी ॥ नायकों न देखों नयनीं ॥ दुजाही जनीं पैं ऐसा ॥ ९ ॥ सद्गुरु कृपादृष्टी ॥ सदैवावरीं होत वृष्टी ॥ भुक्ति मुक्ति संतुष्टी ॥ विशेष पुष्टि परमार्था ॥ १० ॥ अहर्निशीं करितां सेवा ॥ धणी न पुरे ज्याचिया जिवा ॥ मास अयनें अब्दें तेव्हां ॥ क्रमिलीं केव्हां हें नेणें ॥ ११ ॥ सर्वस्वें सद्गुरुसेवा करितां ॥ धणी न पुरे एकनाथा ॥ ह्मणे मजविणें दुजे अनंता ॥ परिचर्येसीं तत्वतां विभागी न व्हावें ॥ १२ ॥ सर्व प्रकारें सर्व सेवा ॥ करूनि सद्गुरु अर्जावा ॥ सर्व करितां ही हाव जीवा ॥ न बनेचि तेव्हां पूर्णपणें ॥ १३ ॥ श्रीमंत सद्गुरु माझा ॥ बहुत सेवक असती काजा ॥ परि म्याचि सर्व करावी पूजा ॥ बरविया वोजा सद्भावें ॥ १४ ॥ सर्व सेवा फावली हाता ॥ भांडारगृहाची लेखकता ॥ करावी ऐसें आलें चित्ता ॥ तेंहि तत्वतां अंगिकारी ॥ १५ ॥ सावधपणाचे परिपाठीं ॥ जाऊं नेदी कांचवटी ॥ लेखन चातूर्यता मोठी ॥ सद्भाव पोटीं सेवेचा ॥ १६ ॥ लीलाविग्रहि भगवंत ॥ नाथाचें शोधक चित्त ॥ प्रगट व्हावया चूक पाडित ॥ हिशेबांत अधेल्याची ॥ १७ ॥ शोधितां बहुतां प्रकारीं ॥ चूक नाढळे झडकरी ॥ मंदादीप देवगृहाभीतरीं ॥ तेथें बैसोनि करी शोधातें ॥ १८ ॥ मनींचा निश्चय हाचि साचा ॥ अधेला न जावा श्रीगुरूचा ॥ म्हणोनि काया मनें वाचा ॥ एकाग्र साचा पैं जाला ॥ १९ ॥ अहर्निशीं जागरणीं ॥ चूक काढिली शोधुनी ॥ सद्गुरूनें हें जाणोनी ॥ अत्यंत मनीं संतोषला ॥ २० ॥ येऊनि नाथाजवळी ॥ कृपाहस्तें मुख कुरवाळी ॥ तुझी प्रज्ञा निजतत्व आकळी ॥

कळलें समूळीं शोधकत्वें ॥ २१ ॥ वय अल्प प्रज्ञा थोर ॥ तत्व शोधनें होसी तत्पर ॥ आह्मांस कळला हा निर्धार ॥ नाथें चरणीं शिर ठेविलें ॥ २२ ॥ म्हणे स्वामीचिया कृपापुष्टी ॥ तत्वरूप भासे सृष्टी ॥ न लगतां साधन आटाटी ॥ सहज भेटी परमार्थी ॥ २३ ॥ सद्गुरु ह्मणती भलारे भला ॥ त्वां सुखसिंधु उचंबळिला ॥ प्रपंच परमार्थ एक केला ॥ स्वभावें संचला अद्वैतें ॥ २४ ॥ यापरी सुख संवाद॥ करोनि भोगिती आनंद ॥ पुढील चरित्र यश विषद ॥ श्रोतीं अनुवाद परिसिजे ॥ २५ ॥ जनार्दनाचा नित्य नेम ॥ स्नानसंध्या अति उत्तम ॥ तयावरी आवडी परम ॥ निजधर्म तो ऐका ॥ २६ ॥ सिद्धराजा श्रीज्ञानदेव ॥ ज्ञानेश्वरी अमृतानुभव ॥ स्वानुभव वदला अपूर्व ॥ जनार्दना भाव त्या ग्रंथीं ॥ २७ ॥ तया पठणीं अति गोडी ॥ नित्य व्याख्यानीं आवडी ॥ यापरी लव निमिष घडी ॥ आन परवडी रुचेना ॥ २८ ॥ मौनें एकांत सदनीं ॥ सार्थ आवृत्ति करोनी ॥ मध्यान्हपर्यंत प्रतिदिनी ॥ नेमें करोनी असावें ॥ २९ ॥ तयावरी भोजन पंक्ती ॥ सह ब्राह्मण ब्रह्ममूर्त्ती ॥ सारोनि यथापद्धती ॥ राजदर्शनार्थ मग जावें ॥ ३० ॥ तेथील प्रधान कार्यभाग ॥ संपादीतसे सवेग ॥ सेवक होत यथा विभाग ॥ समस्त उपयोगा योग्य तें ॥ ३१ ॥ न्याय नीति यथा रिती ॥ शिष्टासीं मान्य पडे मती ॥ तैसी वर्तणुकीची गती ॥ सावध स्थिती सदां करी ॥ ३२ ॥ दक्षता देहीं अर्थी ॥ दावी लोक संग्रहार्थी ॥ यापरी प्रपंच परमार्थी ॥ अनहंकृती निजबोध ॥ ३३ ॥ अकस्मात कोणें एके दिनीं ॥ यजमानशत्रु दुष्ट शिरोमणी ॥ सेना समुदाय सज्जनी ॥ युद्धालागुनी पैं आला ॥ ३४ ॥ दूत येऊनि त्वरित ॥ रायासी जाणविती वृत्तांत ॥ शत्रु पहिल्याच प्रहरांत ॥ आला उन्मत्त भांडणा ॥ ३५ ॥ दूतांची ऐकोनि वाणी ॥ राजा विचारा लागुनी ॥ बोलाऊं पाठवी वेत्रपाणी ॥ तेच क्षणीं जनार्दना ॥ ३६ ॥ दूत येउनी गृहासी ॥ सन्मुख देखोनि नाथासी ॥ ह्मणे त्वरें जनार्दनपंतासी ॥ सांगोनि राजकार्यासी धाडावें ॥ ३७ ॥ तव जनार्दनपंत ध्यान नेमीं ॥ बैसले समाधिस्थ स्वाश्रमीं ॥ जाणोनि श्रीनाथस्वामी ॥ तेथेंचि नमी चरणातें ॥ ३८ ॥ राजकार्य अति त्वरित ॥ केलें पाहिजे निश्चित ॥ सद्गुरुसी उठवितां अनुचित ॥ अमर्यादा येथें होतसे ॥ ३९ ॥ ऐसें जाणोनि तत्वता ॥ जाला जनार्दन रूप धरिता ॥ जो अनंत ब्रह्मांडें रचिता ॥ त्या समर्था हें कार्य किती ॥ ४० ॥ करूनि वस्त्रें परिधाना ॥ शिबिका आणविली वहना ॥ वेत्रपाणी सवें जाणा ॥ राजभुवना चालिला ॥ ४१ ॥ भूप आणि समस्तजन ॥ प्रत्यक्ष देखती जनार्दन ॥ अंतर्बाह्य अभेद पूर्ण ॥ हेंही लक्षण दाविलें ॥ ४२ ॥ वर्तणुक पर्याय समस्त ॥ जनार्दनासारिखा होत ॥ भूपति स्वमुखें वृत्तांत ॥ युद्धसंकेत विचारी ॥ ४३ ॥ ऐकोनी प्रभुची

वाणी ॥ विनंति केली स्ववचनीं ॥ इतुक्या कार्यालागुनी ॥ चिंता मनीं न करावी ॥४४॥ आपुली प्रताप प्रौढी ॥ शत्रु जाईल देशधडी ॥ उभारेल यशाची गुडी ॥ सेना तांतडी सज्जविली ॥ ४५ ॥ राजनीति करूनि नमन ॥ पदरीं विडे घेऊन ॥ आश्वारूढ होऊन ॥ सहसैन्य निघाला ॥ ४६ ॥ निशाण त्राहटिल्या भेरी ॥ चालिले परसैन्यावरी मोहरी ॥ कैसी ऐश्वर्याची थोरी ॥ शत्रुसैन्यावरी भयकंप ॥ ४७ ॥ दोहीं सैन्या मेळ ॥ होतां उठिला हलकल्लोळ ॥ पाहूनि श्रीनाथ सबळ ॥ पर सैन्य केवळ त्रासलें ॥ ४८ ॥ अश्वारूढाचा साटोप ॥ पेलिती वीर अमूप ॥ सरला परसैन्यप्रताप ॥ पळती निजभूप टाकोनी ॥ ४९ ॥ सैन्य गेलें देशधडी ॥ शत्रुची सरली प्रौढी ॥ टाकून युद्ध परवडी ॥ बुद्धि धडफुडी तेणें केली ॥ ५० ॥ पाठऊनि प्रधान सेवक ॥ भेटीचा प्रेश केला देख ॥ शरणांगता परी एक ॥ निजसेवक मीं झालों ॥५१॥ श्रीनाथ दयाळू निश्चिती ॥ मान्य करोनियां विनंती ॥ भेट देवोनि कृपामूर्ती ॥ निजनगराप्रती आणिला ॥ ५२ ॥ यशाची गुडी उभऊन ॥ घेतलें राजदर्शन शत्रुशरणांगतासी सन्मान ॥ वस्त्रेंभूषणें देवविलीं ॥ ५३ ॥ आतां पुसोनि नृपतिसीं ॥ निरोप देऊनि सैनिकांसीं ॥ आपण श्रीगुरुदर्शनासीं ॥ अति वेगेसीं पातला ॥ ५४ ॥ यथापूर्व निजाचरण ॥ भजन सेवन नमन ॥ करूनि पंक्तीसीं भोजन ॥ विनीतपण स्वस्तता ॥ ५५ ॥ जाल्या वृत्तांताचें कथन ॥ स्वमुखें न करूनि जाण ॥ करीत श्रीगुरुसेवन ॥ अहंकर्तेपण तेथें नाहीं ॥ ५६ ॥ नैश्वर्य प्रपंचाची आसक्ती ॥ सहसा स्पर्शे ना चित्तीं ॥ तेथिल्या यशकीर्तिची स्थिती ॥ कैंची चित्तीं पूर्णाचिया ॥ ५७ ॥ जनार्दनपंत आपुल्यावृत्ती ॥ अनुदिनीं जाय ज्या रिती ॥ राजगृहीं तया स्थिती ॥ दर्शनाप्रती चालिला ॥ ५८ ॥ संतोषयुक्त सिंहासनीं ॥ बैसोनि राजा स्वस्थानीं ॥ जनार्दनयश आकर्णी ॥ मानी निजमनीं आश्चर्य ॥ ५९ ॥ महत्कार्य परी सहजांत ॥ जनार्दनें केलें त्वरित ॥ धन्य धन्य ह्मणती समस्त ॥ आश्चर्ययुक्त ते समयीं ॥ ६० ॥ तंव अकस्मात जनार्दनपंत ॥ येतां देखे नृपनाथ ॥ धन्य धन्य वाणी ह्मणत ॥ आनंदयुक्त ते काळीं ॥ ६१ ॥ सभेसी आलिया सभासद ॥ परस्परें बोलती शब्द ॥ शत्रुजयप्रताप अगाध ॥ यश विशद वर्णिती ॥ ६२ ॥ सभासदां अभ्युत्थान ॥ विनीत रीति करी नमन ॥ येरें नृपासी वंदून ॥ स्वस्थानीं आपण बैसला ॥ ६३ ॥ कृपायुक्त नृप आपण ॥ आदरें करीतसे प्रश्न ॥ भलें केलें शत्रुदमन ॥ हें कारण विचारी ॥ ६४ ॥ ऐकोनि राजयाची वाणी । जनार्दन आश्चर्य मानी मनीं ॥ ह्मणें हें नवल कैसेनी । कोण्या कारणीं कळावें ॥ ६५ ॥ राजप्रश्नाचें उत्तर ॥ द्यावया पडिला विचार ॥ सभाजन हा चमत्कार ॥ अपूर्वकार मानिती ॥६६॥ अति गजरें तेचि काळीं ॥ भाट पढती बिरुदावळी ॥ शत्रुजयाची नवाळी ॥ कानीं समूळीं ऐकिली ॥ ६७ ॥

या शब्दांचा विवेक ॥ करितां जाणवलें कौतुक ॥ ह्मणे एकनाथें सकळिक ॥ हें कार्य अवश्यक पैं केलें ॥ ६८ ॥ हा मानवी नव्हे जाण ॥ अवतार पूर्ण हें लक्षण ॥ जनीं जनार्दनचि प्रगटून ॥ सेवकपण अंगिकारी ॥ ६९ ॥ नवल लाघव केलें कैसें ॥ आपण येउनी मम वेषें ॥ महाकार्य सुलभसें ॥ साधूनि ऐसें पैं गेला ॥ ७० ॥ आतांचि प्रगट करितां गोष्टी ॥ योग्य न देखें निजदृष्टी ॥ कळिकाळातें हे राहटी ॥ गुप्त पोटीं राखावी ॥७१॥ पक्क बुद्धीचिया युक्ती ॥ समजाऊनियां नृपती ॥ ह्मणे आपुले प्रतापशक्ती ॥ हें कार्य किती नरवर्या ॥ ७२ ॥ राजदयेचीं वस्त्रें वंदून ॥ करूनिया परिधान ॥ आज्ञा घेऊन आपण ॥ स्वाश्रमा जाण पैं आले ॥ ७३ ॥ जाणोनि पूर्णावतार लक्षण ॥ एकनाथासीं स्वरूपेनें ॥ हृदयीं धरी कवळून ॥ आलिंगन पैं केलें ॥ ७४ ॥ हृदया हृदय एक होतां ॥ प्रेम नावरे उभयतां ॥ येरयेराची परिपूर्णता ॥ काय म्यां आतां वदावी ॥ ७५ ॥ येथिल्या बोधाची स्वादता ॥ विदित असेल हरि गुरुभक्तां ॥ हें सुख बोलीं बोलतां ॥ नये तत्वतां अल्पही ॥ ७६ ॥ तेथें इतराचें वक्तेपण ॥ बोलीं बोलतां न सरे जाण ॥ एकाजनार्दनाचे चरण ॥ मस्तकीं आपण वंदावे ॥ ७७ ॥ उभय वंदे श्रीमूर्ती ॥ खेवासि येतां निजात्मस्थिती ॥ विराली बाह्य भान स्फूर्ती ॥ त्रिपुटी निश्चिती मावळली ॥ ७८ ॥ यापरी स्वानंद स्थिती ॥ वर्तत असे उभय मूर्ती ॥ ब्रह्मानंदाची आवाप्ती ॥ नित्य तृप्ती संयोगें ॥ ७९ ॥ तंव पुढील कार्यार्थ आठवण ॥ गुरुसी जाणविली खूण ॥ करूनि प्रेमा शांतवन ॥ आलिंगन विसर्जिलें ॥ ८० ॥ नाथें माथा ठेऊनि पायीं ॥ अवस्था जिरऊनि देहीं ॥ सेवकवृत्ति लवलाहीं ॥ अनुसरे पाहीं कार्यासीं ॥ ८१ ॥ एकाजनार्दनाचे चरणीं ॥ शरण आलों भरंवसेनी ॥ ह्मणोनि चरित्र कथा वदनीं ॥ वंदे वाणी ते कृपा ॥ ८२ ॥ माझिया मनाचें निजमन ॥ बुद्धिची निजबुद्धि पूर्ण ॥ स्वयें एकनाथ आपण ॥ वक्ता वदन तोचि तो ॥ ८३ ॥ मीतूंपणाची बोळवण ॥ सहजचि झाली येथून ॥ ध्यावे गावे अवतारगुण ॥ इतुकेंचि जाण उरलें असे ॥ ८४ ॥ श्रीगुरुनाथचरण ॥ मस्तकीं वसे जी भूषण ॥ एकनाथींचें सनाथपण ॥ केशव शरण भावार्थें ॥ ८५ ॥ इतिश्रीएकनाथचरित्रेद्वितीयोध्यायः ॥ प्रसंग २ ॥ श्रीदत्तात्रयार्पणमस्तु ॥ श्रीजनार्दनार्पणमस्तु ॥

---

## अध्याय तिसरा.

श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ जय जय सद्गुरुसमर्था ॥ जय जय सद्गुरु परमार्था ॥ जय जय सद्गुरु निजस्वार्था ॥ श्रीएकनाथा तुज नमों ॥ १ ॥ पूर्व कथानुसंधान ॥ करूनि राज शत्रुदमन ॥ सद्गुरूनें आलिंगन ॥ देतां समाधान

अधिका अधिक ॥ २ ॥ पुढील कथेची संगती ॥ परिसावी सज्जन श्रोतीं ॥ जे कां परम पावन कीर्त्ती ॥ अति विश्रांतीदायक ॥ ३ ॥ स्वलेखन विश्रांती ॥ दिवस एक नेमी नृपती ॥ भृगुवारीं राजगृहाप्रती ॥ न यावें समस्तीं हें स्थापी ॥ ४ ॥ जनार्दनपंत त्या वासरीं ॥ अखंड जाती पर्वतशिखरीं ॥ सहस्त्र लिंग सरोवर परिसरीं ॥ नेम निर्धारीं अवश्यक ॥ ५ ॥ देवगिरीहून उत्तर दिशे ॥ पर्वत माथां सरोवर असे ॥ अती रमणीय दुजें तैसें ॥ अन्य नसे ह्या प्रांतीं ॥ ६ ॥ एकांत आणि विजन स्थान ॥ तेथेंचि दत्त आगमन ॥ जनार्दन कृपेस्तव आपण ॥ सगुण दर्शन देतसे ॥ ७ ॥ सगुण निर्गुण अभेदपणीं ॥ तैसी दत्तजनार्दन मिळणी ॥ सुखसंवाद ऐक्य-पणी ॥ परमार्थ खाणी उघडे पैं ॥ ८ ॥ चिद्विलास स्वानंद लीळा ॥ भोगिती निज सोहळा ॥ नित्य नवा अति आगळा ॥ प्रेमकळा विकाशतसे ॥ ९ ॥ एके दिनीं सद्गुरुचित्तां ॥ आलें कृपे सवें तत्वतां ॥ दत्तात्रया श्रीएकनाथा ॥ जाऊनि येकांता भेटवावें ॥ १० ॥ पूर्ण स्थितीचें वैभव ॥ एकनाथाचा ज्ञानगौरव ॥ श्रीदत्तासीं विदित सर्व ॥ व्हावा हा भाव कल्पिला ॥ ११ ॥ जातां पर्वत शिखरासीं ॥ सवें घेतलें श्रीनाथासीं ॥ येरें जाणूनि लाभासीं ॥ ऊल्हासेंसीं चालिला ॥ १२ ॥ अति-शय शुद्ध भावार्थ ॥ पाहूनि अधिकार समर्थ ॥ करीं धरूनि कृपायुक्त ॥ सवें नेत येकांता ॥ १३ ॥ बैसोनि सरोवर निकट वर्त्ती ॥ आठविली गुरुमूर्त्ति ॥ श्रीदत्त कृपाळू निश्चिती ॥ सहज स्थिती पातला ॥ १४ ॥ पाहावया नाथाची समता ॥ सर्वभूतीं अद्वयता ॥ शांतदांत निर्विकारता ॥ श्रीगुरुदत्ता अति प्रीती ॥ १५ ॥ अभिनव संपादी सोंग ॥ चर्म वेष्टित अंग ॥ भासे जेवीं फकीर मलंग ॥ हा माया-योग दाखवी ॥ १६ ॥ कामधेनु श्वानरूपी ॥ सवें असे सपाडसी ॥ श्रीदत्त निजस्वरूपीं ॥ सहज समाधीं प्रगटला ॥ १७ ॥ जनार्दनें अति संतोषोन ॥ चरणीं माथा ठेऊन ॥ वारंवार अभिवंदन ॥ प्रेमें संपूर्ण पैं केलें ॥ १८ ॥ श्रीदत्त कृपाळू पूर्ण ॥ निजभक्तांसीं ऊचलून ॥ साही भुजीं आलिंगून ॥ सुख समाधान पावले ॥ १९ ॥ मग बैसोनि सहजासनीं ॥ परस्परें बोलती वचनीं ॥ आनंद वृद्धी पावोनी ॥ नवल करणी आरंभिली ॥ २० ॥ काढूनि एक मृन्मय पात्र ॥ ठेवी जनार्दनापुढें स्वतंत्र ॥ ह्मणे शुनि दोहोनि सत्वर ॥ भरूनि क्षीर आणावें ॥ २१ ॥ आज्ञा वंदोनि मस्तकीं ॥ पात्र घेऊनि स्वहस्तकीं ॥ दुग्ध दोहिलें कौतुकीं ॥ निज-निष्टंकीं स्वनिष्ठे ॥ २२ ॥ पात्र भरूनियां क्षीरें ॥ पुढें ठेविलें अति सत्वरें ॥ झाळींतून भक्षें सुंदरें ॥ दत्तें निजकरें काढिलीं ॥ २३ ॥ भक्ष दुधाचा संयोग ॥ मृत्तिका पात्रीं केला सवेग ॥ सिद्ध भोजन प्रसंग ॥ मांडिला अभंग निजस्थिती ॥ २४ ॥ श्रीदत्त आणि जनार्दन ॥ अभेद भावना परिपूर्ण ॥ निःशंक एक पात्रीं

भोजन ॥ करिती आपण स्वानंदें ॥ २५ ॥ तेचि पात्रीं उभय मूर्त्ती ॥ हस्त मुख प्रक्षाळूनि आंचवती ॥ पाहावया श्रीनाथाची स्थिती ॥ श्रीदत्तप्रीती प्रगटले ॥ २६ ॥ यापरी श्रीदत्त जनार्दन ॥ ऐक्यत्वें आपुलें आचरण ॥ अभेद भावें परिपूर्ण ॥ दाविती लक्षण परस्परें ॥ २७ ॥ हा संपूर्ण चरितार्थ ॥ प्रत्यक्ष देखे श्रीनाथ ॥ ह्मणें धन्य हे समर्थ ॥ अति अद्भुत लीला यांची ॥ २८ ॥ तंव अकस्मात श्रीदत्त ॥ श्रीनाथातें अवलोकित हर्षयुक्त कृपान्वित ॥ पाचारीत जवळिके ॥ २९ ॥ पाहावया अधिकार अभेद ॥ हेचि कसवटी प्रसिद्ध ॥ परिक्षावया निजबोध ॥ बोलीं अनुवाद पै केला ॥३०॥ ह्मणें बाळा या पात्रातें ॥ सत्वर धोवोनि आणि येथें ॥ नाथ वंदोनि आज्ञेतें ॥ सरोवरातें पै आला ॥ ३१ ॥ श्रीनाथ स्वयें आपण ॥ ज्ञानदृष्टी विचारून ॥ ह्मणे हा प्रत्यक्ष भगवान ॥ वेष पालटून पैं आला ॥ ३२ ॥ संशय न धरूनि चित्तीं ॥ पात्रस्थ जळ प्राशी प्रीती ॥ ह्मणे हाचि प्रसाद हेचि भागीरथी ॥ येणेंचि अवाप्ति स्वानंदा ॥३३॥ परब्रह्म अवतरण ॥ एकनाथ स्वयें आपण ॥ त्यासी न कळे पदार्थ ऐसा कोण ॥ हृदय संपूर्ण काय न कळे ॥ ३४ ॥ मृन्मय पात्र धुवोनि यथास्थित ॥ श्रीदत्ता सन्निध ठेवित ॥ अंतरींचा अनन्य भावार्थ ॥ श्रीदत्त समर्थ जाणत ॥३५॥ नाथ करद्वय जोडून ॥ पुढें उभा विनीत जाण ॥ श्रीदत्त प्रसाद प्राशन ॥ जाणोनि पूर्ण संतोषला ॥३६॥ ज्ञानदृष्टि दत्तात्रय ॥ प्रसाद प्राशन अभिप्राय ॥ पाहूनि आनंद भरित हृदय ॥ होऊनि अभय वर वदे ॥ ३७ ॥ जनार्दनासीं बोले दत्त ॥ हा विठ्ठल अवतार मूर्तिमंत ॥ याचेनि प्रसादें जन बहुत ॥ भवसिंधु त्वरित तरतील ॥ ३८ ॥ याचेनि वाग्विलास ग्रंथें ॥ प्राणी पावतील भक्तिपंथातें ॥ वैराग्य ज्ञान होय पुरतें ॥ सायोज्य मुक्तीतें पावतील ॥ ३९ ॥ यावच्चंद्र दिवाकर ॥ याचा महिमा राहील स्थिर ॥ पद्बंधरचना कीर्त्तनपर ॥ होऊन जन अपार तरेल ॥ ४० ॥ पुढति ह्मणें हें नवल ॥ हा वयें दिसतसें बाळ ॥ परि अवतारचि केवळ ॥ हें प्रांजळ जाणावें ॥ ४१ ॥ उभयतांचें निजशेष ॥ सर्व प्राशूनि सम्यक ॥ उभा ठाकला सन्मुख ॥ ऐश्वर्य देख परिपूर्ण ॥ ४२ ॥ हा निजबोधें अतुर्बळी ॥ प्रगट दिसे येकाळीं ॥ धन्य धन्य जन्मला जे कुळीं ॥ वंशावळी सुपवित्र ॥ ४३ ॥ अद्भुत येथील परमार्था ॥ उद्धरील जडजीवां बहुतां ॥ लाऊनियां भक्तिपंथा ॥ स्वयेंहि तत्वता आचरेल ॥ ४४ ॥ ऐसि सांगतां गुह्य गोष्टी ॥ जनार्दना आनंद कोटी ॥ हर्ष न माय पोटीं ॥ बाह्य कृपादृष्टि सद्गुरूनी ॥ ४५ ॥ नाथाकडे पाहोन ॥ दत्तें दिधलें आलिंगन ॥ निजस्वरूप विराजमान ॥ प्रगट करोनि दाखविलें ॥ ४६ ॥ स्वप्रकाश आत्मलीळा ॥ आणि तेजाचा उमाळा ॥ निजतेजें सोज्वळा ॥ श्रीदत्त स्वलीळा प्रगटला ॥ ४७ ॥ स्वरूप सांवळें सुंदर ॥ राजीव नेत्र मनोहर ॥ श्रीमुख पूर्णचंद्राकार ॥ षड्भुजाकार साजिरें ॥ ४८ ॥

गळां विलसे ब्रह्मसूत्र ॥ जें का पवित्रा करी पवित्र ॥ ध्यान देखोनि विचित्र ॥ हर्ष-निर्भर श्रीनाथा ॥ ४९ ॥ श्वान वेषलोपोनि सत्वर ॥ कामधेनु होय साचार ॥ परम पुरुषाचा पार ॥ नकळे साचार ब्रह्मादिकां ॥ ५० ॥ जनार्दन एकनाथ आपण ॥ सां-ष्टांग करीत नमन ॥ श्रीदत्तें आशिर्वाद देऊन ॥ अदृश्य जाण पैं जाला ॥ ५१ ॥ दत्त जनार्दन श्रीनाथ ॥ येक चित्ररूपें भासत ॥ उद्धरावया जन कलिग्रस्त ॥ ब्रह्मचि येथें अवतरलें ॥ ५२ ॥ जाणोनि धर्माची ग्लानी ॥ तारावया जना लागुनी ॥ श्रीना-थ देह धरुनी ॥ अवतरले अवनीं दीनोद्धारा ॥ ५३ ॥ तयाचें चरित्र परम ॥ श्रव-णेंचि करी उपरम ॥ निदार्ळूनि भवभ्रम ॥ मंगळधाम प्रकाशी ॥ ५४ ॥ जालिया दत्तात्रय भेटी ॥ परमानंद न माय पोटीं ॥ जनार्दन एकनाथ जगजेठी ॥ निज संतुष्टीं चालिले ॥ ५५ ॥ येवोनियां निजभुवना ॥ आज्ञा देऊनि सेवकजना ॥ परस्परें आत्मखुणा ॥ स्व आचरणा आचरती ॥ ५६ ॥ श्रीएकनाथ चरणीं शरण ॥ रंकम-शक अति दीन ॥ अनन्य भावें केशव शरण ॥ चरित्र कथन गातसे ॥ ५७ ॥ इति-श्रीएकनाथचरित्रेतृतीयोध्यायः ॥ श्रीनाथार्पणमस्तु ॥

---

## अध्याय चवथा.

श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ पूर्वकथानुसंधान ॥ जालिया दत्ता-त्रय दर्शन ॥ श्रीएकनाथ हर्ष मानून ॥ गुरुशुश्रूषा करीतसे ॥ १ ॥ झालिया भेटीचा उल्हास ॥ जिवीं भोगीत सावकाश ॥ दत्तात्रयाचा विलास ॥ गुणप्रकाश वर्णिती ॥ २ ॥ श्रीनाथ निजसेवावृत्ति ॥ सादर होय पूर्व रीति ॥ तव जनार्दन निजचित्तीं ॥ दत्तवरदोक्ति आठविली ॥ ३ ॥ सेवा झाली निःसीम ॥ परि अप-रमित याचें प्रेम ॥ अणुमात्र चित्तीं नाहीं काम ॥ संसार संभ्रम जयासी ॥ ४ ॥ राहो सेवेचा प्रकार ॥ ऐसे योजनेचा करी विचार ॥ कांहीं अनुष्ठान सुखकर ॥ भगवत्पर करवावें ॥ ५ ॥ ह्मणे सखया एकनाथा ॥ सूर्य कुंडीं जाऊनि आतां ॥ अनुष्ठान करावें सर्वथा ॥ जें निजहिता उपयोगी ॥ ६ ॥ माध्यान्हपर्यंत नेमस्त ॥ श्रीकृष्ण ध्यान यथास्थित ॥ मौन एकाग्र करूनि चित्त ॥ अनुदिनीं निश्चित करावें ॥ ७ ॥ लोटलिया नेमकाळा ॥ अकल्पित आहार ते वेळां ॥ जो मिळेल सहज लीळा ॥ तो प्रेमळा स्वीकारी ॥ ८ ॥ कांहीं नवल वर्तलिया तेथें ॥ पुन्हा यावें मग येथें ॥ उपदेशून कर्तव्यार्थ ॥ पाठवीत त्या स्थाना ॥ ९ ॥ देवगिरी पृष्ठि प्रांतीं ॥ वायव्य दिशेप्रतीं ॥ शूळी भंजन पर्वतीं ॥ स्थान निश्चिती तें असे ॥ १० ॥ सुखें असोनियां तेथें ॥ करवी निज नेमातें ॥ वंदूनि श्रीगुरु आज्ञेतें ॥

समाधान चित्तें चालिला ॥ ११ ॥ माझ्या वियोगाची बाधा ॥ नसावी कीं पूर्ण बोधा ॥ परिक्षार्थ या छंदा ॥ लाविला धंदा नेमाचा ॥ १२ ॥ नाथ जाउनी त्या स्थाना ॥ उभय कुंडें पाहूनि नयना ॥ भूमिका तपारण्य जाणा ॥ मानूनि मनीं संतोषला ॥ १३ ॥ मार्कंडेय ऋषिस्थान ॥ तपारण्य पुरातन ॥ पावे चित्त समाधान ॥ वस्ती लागुनी निजनेमा ॥ १४ ॥ ब्राह्मी मुहूर्त करूनि स्नान ॥ पूर्वाभिमुख आसनीं बैसोन ॥ आनंदयुक्त एकाग्र मन ॥ श्रीकृष्ण ध्यान स्वयें करी ॥ १५ ॥ देहीं देहभान नाहीं ॥ विदेही ह्मणों तरी असे देही ॥ परी गुरु आज्ञेनें मनवाही ॥ ध्यान पाहीं करीतसे ॥ १६ ॥ तया पुण्य पुरुषा करितां ध्यान ॥ ध्यानीं तात्काळ प्रगटे कृष्ण ॥ मनें षोडशोपचार पूजन ॥ करितां बाह्य स्फुरण मावळलें ॥ १७ ॥ त्या पर्वतीं महा विखार ॥ भुजंग रहात ह्मेता थोर ॥ क्रोधयुक्त होवोनि फार ॥ नाथासमोर चालिला ॥ १८ ॥ येऊनि श्रीनाथाजवळीं ॥ उदर वेष्टुनी आंग कवळी ॥ अभ्यंतरीं अत्यंत नवाळी ॥ पावे ते काळीं महानाग ॥ १९ ॥ श्रीनाथ स्वयें चैतन्यघन ॥ सच्चित्सुखस्वरूपें विराजमान ॥ अंगस्पर्शें आनंद पूर्ण ॥ पावला आपण फणिराज ॥ २० ॥ अंतरींची दृढ वासना ॥ त्यागुनी प्रवर्तला सेवना ॥ श्रीनाथ मस्तकावरी फणा ॥ उभवुनी ऊष्णा निवारीत ॥ २१ ॥ ठेउनी पुच्छ नाभिस्थानीं ॥ संपूर्ण उदर वेष्टुनी ॥ पृष्ठावरुनी शिरस्थानीं ॥ छाया येउनी करीतसे ॥ २२ ॥ फणा काढून विस्तीर्ण ॥ छाया करीत संपूर्ण ॥ सर्व शरीर संरक्षण ॥ बाधा ऊष्ण निवारी ॥ २३ ॥ ध्यान विसर्जन चलन देहीं ॥ होतांचि सर्प लवलाही ॥ गुप्त होवोनियां पाहीं ॥ नकळत सोई तो राहे ॥ २४ ॥ त्या पर्वता तळीं कृषिकर्मा ॥ असे शूद्र एक धर्मात्मा ॥ तो अंगिकारी त्या नेमां ॥ त्या उपक्रमा अवधारा ॥ २५ ॥ पर्वता तळीं त्याचें शेत ॥ निकट होय निभ्रांत ॥ निरंतर शेतसंरक्षणार्थ ॥ तेथें येत तो शूद्र ॥ २६ ॥ पर्वतशिखरीं श्रीएक-नाथाशीं ॥ देखिलें कृषिवळें एके दिवशीं ॥ अत्यंत सुखावला मानसीं ॥ सेवा करावयासी बुद्धि उपजे ॥ २७ ॥ आपण येत पुढें शेतीं ॥ प्रतिदिनी निज कार्यार्थी ॥ आज्ञा केली स्त्रियेप्रती ॥ अति प्रीति निज निष्टा ॥ २८ ॥ गाई एकीचें दुग्ध ॥ दोहोनि स्वकरें शुद्ध ॥ वेगळें ठेववी प्रसिद्ध ॥ भाव अविरुद्धपूर्वक ॥ २९ ॥ भाकरी घेवो-निया ये शेतीं ॥ माध्यान्हीं स्त्रियेची हेरिती ॥ दुग्ध पात्र भरूनि हातीं ॥ पाटी वरुती मस्तकीं ॥ ३० ॥ दुरून देखतां स्त्रियेसी ॥ स्नान सारुनी दिननिशीं ॥ जवळी पावतां तियेसी ॥ हातींच्या दुग्धासी पैं घ्यावें ॥ ३१ ॥ आपण वेंघुनी पर्वतीं ॥ जाऊनि तया स्थानाप्रतीं ॥ असे अनुष्टान त्या प्रती ॥ दुग्ध प्राशनार्थ अर्पावें ॥ ३२ ॥ ते स्थानीं कोणी एक ॥ सदैव अनुष्ठाना येत अवश्यक ॥ त्या शूद्राचा हेतपूर्वक नेम

निष्टंक चालिला ॥ ३३ ॥ श्रीनाथ ध्यान विसर्जनांतीं ॥ वटवृक्षातळीं सहज स्थिती ॥ बैसला तंव शूद्र मूर्ती ॥ येउनी विनंति पैं केली ॥ ३४ ॥ नमन करूनिया चरणां ॥ ह्मणे दुग्ध आणिलें तव प्राशना ॥ तें स्वीकारोनि ब्राह्मणा ॥ जावया आज्ञा मज दीजे ॥ ३५ ॥ भावार्थ देखोनि शुद्ध ॥ नाथें प्राशिलें दुग्ध ॥ शूद्रें पावुनी आल्हाद ॥ पुसोनि प्रसिद्ध पैं गेला ॥ ३६ ॥ याची स्थिति दोन दिवस ॥ अनुष्ठानीं निज उल्हास ॥ देखोनियां सावकाश ॥ निशा दिवस क्रमी सुखें ॥ ३७ ॥ तृतीय दिवशीं त्याच रीती ॥ आरंभिली ध्यानस्थिती ॥ नवल वर्तलें तें श्रोतीं ॥ यथानिगुती ऐकावें ॥ ३८ ॥ शूद्र भार्या ते दिवशी ॥ उषःकाळीं जाणोनि अर्धनिशी ॥ उठोनिया स्वकार्यासी ॥ सडासंमार्जनासी पैं केलें ॥ ३९ ॥ दळणादि कृत्य समस्त ॥ करूनि बैसली निवांत ॥ म्हणे आपुल्या चित्तांत ॥ बहुधा रात असे कांहीं ॥ ४० ॥ झोंप न लागेचि नयनीं ॥ म्हणोनि रिघाली दोहनी ॥ अवेळ परि दुग्धथानीं ॥ जेवि प्रतिदिनी दोहित ॥ ४१ ॥ भिन्न पात्रीं दुग्ध ॥ वेगळें ताऊनियां शुद्ध ॥ पाक करावया प्रबुद्ध ॥ स्वयें सिद्ध पैं झाली ॥ ४२ ॥ अरुणोदय ते काळीं ॥ पाकक्रिया करीत बाळी ॥ शूद्र उठोनियां न्याहाळी ॥ तों अंशुमाळी उगवला ॥ ४३ ॥ शौचविधि मुखमार्जन ॥ करूनी शेता जाय आपण ॥ कार्य भाग तेथील वर्तन ॥ करी संपूर्ण यथास्थित ॥ ४४ ॥ ह्मणे भार्या विचारून ॥ शीतल होईल हें अन्न ॥ अवेळ परि आपण ॥ जावें उष्ण घेउनी ॥ ४५ ॥ एक प्रहर दिवस येतां ॥ शूद्रस्त्री चालली शेता ॥ नित्य समय आजि नसतां ॥ सवेग त्वतां हे आली ॥ ४६ ॥ शूद्र नित्य नेमा स्थिती ॥ जाऊनियां नदीप्रती ॥ स्नान करूनि स्वपद्धती ॥ तया स्थानाप्रती चालिला ॥ ४७ ॥ अवेळे पातला तेथ ॥ तंव दृष्टि देखिलें विपरीत ॥ घाबरलें तयाचें चित्त ॥ विव्हळीत पैं झाला ॥ ४८ ॥ ब्राह्मणशिरीं फणा अद्भुत ॥ काढूनि नाग छाया करीत ॥ केव्हां डंखील हा नकळत ॥ झाला दुःखित तो शूद्र ॥ ४९ ॥ ब्राह्मणा डंखील काळ ॥ हे चिंता अति प्रबळ ॥ कैसें करील गोपाळ ॥ होत तळमळ जीवासी ॥ ५० ॥ ह्मणोनी शंख ते काळीं ॥ महा शब्द केला जवळीं ॥ तो प्रवेशतां कर्ण बिळीं ॥ ध्यान समूळीं भंगलें ॥ ५१ ॥ शरीर होतां चलन ॥ सर्पही उतरे आपण ॥ स्वस्थानासीं जाऊन ॥ सुखसंपन्न राहिला ॥ ५२ ॥ शूद्रें विनविला श्रीनाथ ॥ भुजंग वृत्तांत समस्त ॥ ह्मणे मोठा चुकला अनर्थ ॥ थोर सुकृत तुमचें पैं ॥ ५३ ॥ ते काळीं श्रीनाथमुखें ॥ अभंग निघे सकौतुकें ॥ ऐकोनी शूद्र स्वस्तकें ॥ नमीत सुखें चरणासी ॥ ५४ ॥ ॥ अभंग ॥ आज्ञा डंखावया आला काळ ॥ तो काळचि जाला कृपाळ ॥ १ ॥ भली वोळखी जाली आतां ॥ चित्त मीनलेंसें चिता ॥ २ ॥ एकाजनार्दनाचे पायीं ॥ जीण्या मरणा सौरसु नाहीं ॥ ३ ॥ ओवी ॥ तेचि समयीं दिव्य तेज ॥ प्रगटे आपोआप सहज ॥ श्रीकृष्ण मूर्ति तेजः-

पुंज ॥ महाभुज निजशोभा ॥ ५५ ॥ शंख पद्म गदा चक्र ॥ आयुधांकित चारी कर ॥ स्वरूप अति लावण्य मनोहर ॥ सुखकर निजदासां ॥ ५६ ॥ कांसे मिरवे सोनसळा ॥ आपाद शोभे वनमाळा ॥ कटीं किंकिणी तेजाळा ॥ कौस्तुभ गळां लखलखित ॥५७॥ माथां मुगूट मनोहर ॥ श्रवणीं कुंडलें मकराकार ॥ सांवळी तनु सकुमार ॥ शोभा अपार शोभत ॥ ५८ ॥ अंगीं चंदनाची उटी ॥ तिलक पिंवळा लल्लाटीं ॥ तुळसीमाळा मिरवे कंठीं ॥ विराजे गोमटी श्रीमूर्ती ॥ ५९ ॥ सजल पूर्ण दोन्ही नयन ॥ प्रेम सर्वांगीं संपूर्ण ॥ श्रीनाथासी अवलोकून ॥ दे आलिंगन अति प्रीती ॥६०॥ उचलूनियां चहूं करीं ॥ एकनाथासी हृदयीं धरी ॥ कुरवाळीत नानापरी ॥ सुख अंतरीं दाटलें ॥ ६१ ॥ सुखासीं उथळलें सुख ॥ विश्रांतीसी परम हरिख ॥ ऐसिया परी सकौतुक ॥ जालें देख ते काळीं ॥ ६२ ॥ येरयेरांची सुख स्थिती ॥ काय वर्णील अल्पमती ॥ सर्व भावें चरणाप्रती ॥ शरण निश्चिती असावें ॥ ६३ ॥ शूद्रासीं पडिलें ठक ॥ तटस्थ ठेला क्षण एक ॥ ह्मणें उद्धरलों मी निष्टंक ॥ भावपूर्वक बोलिला ॥ ६४ ॥ साष्टांग घाली दंडवत ॥ ह्मणें झालों कृतकृत्य ॥ ब्राह्मण कृपेस्तव येथ ॥ हाही अनाथ तारिला ॥ ६५ ॥ वारंवार करी नमना ॥ अति भावें प्रदक्षिणा ॥ करितां हर्ष न माय मना ॥ प्रेमळपणा पातला ॥ ६६ ॥ अनेक जन्म पुण्यार्जित ॥ त्याचें फळ आजि प्राप्त ॥ कृष्णदर्शन मज होत ॥ ब्राह्मण समर्थ गुरुमूर्त्ती ॥ ६७ ॥ श्रीनाथ स्वयें आपण ॥ मूळींच कृष्णरूपी अभिन्न ॥ साष्टांग दंडवत घालून ॥ नमी चरण श्रीकृष्णाचे ॥ ६८ ॥ एवं लीला दावोनि हरी ॥ अदृश्य झाला त्वरेंकरी ॥ शूद्र आपुले अंतरीं ॥ नवल करी आश्चर्या ॥ ६९ ॥ वंदूनि एकनाथचरण ॥ ह्मणें दुग्ध करावें प्राशन ॥ तुझ्या तपाचें कारण ॥ माझें उद्धरण पैं जालें ॥ ७० ॥ तूं स्वयें ब्रह्ममूर्ति पूर्ण ॥ हे पावली मज खूण ॥ तुझ्या चरणां आलों शरण ॥ कृपा परिपूर्ण असों द्यावी ॥ ७१ ॥ अश्वासुनी शरणांगत ॥ कृपेनें दुग्ध स्वीकारित ॥ स्वस्थाना जावें निश्चित ॥ आज्ञा करीत तयासीं ॥ ७२ ॥ येरें प्रदक्षिणा नमन ॥ पुनः पुन्हा करुनी जाण ॥ स्वयें केलें प्रयाण ॥ परि सुलीन भावार्थी ॥ ७३ ॥ दर्शन देऊन कृष्णमूर्त्ती ॥ अदृश्य जाली निजस्थिती ॥ शरणागत शूद्राप्रती ॥ स्वस्थानासीं धाडिलें ॥ ७४ ॥ माध्यान्हकाळींचें उष्ण ॥ वटछायेसीं टाकून ॥ आज्ञा श्रीगुरु आठऊन ॥ करी प्रयाण गुरुपासी ॥ ७५ ॥ देवगिरीं गुरु मंदिरा ॥ पावोनि नमिलें गुरुवरा ॥ पुनःपुन्हा करी नमस्कारा ॥ सन्मुख पुढांरा उभा राहे ॥ ७६ ॥ पाहुनी श्रीनाथजीसी ॥ जनार्दनें परमोल्हासी ॥ हृदयीं आलिंगी त्वरेसीं ॥ वृत्तांत्तासीं पूसिलें ॥ ७७ ॥ नाथें माथा ठेवोनि चरणीं ॥ ह्मणे काय वाणू आज्ञेची करणी ॥ जालिया विलासा-

वर्णी ॥ निराभिमानी गुरुस्तवन ॥ ७८ ॥ माथा तुकोनी जनार्दनें ॥ जाणोनि कार्यसिद्धी तेणें ॥ विचारुनी निजमनें ॥ काय वचन बोलिला ॥ ७९ ॥ भाव पोटींचा असे भिन्न ॥ सेवेचा आतां उपयोग कोण ॥ लक्षितां याचें लक्षण ॥ पूर्णपणें निजस्थिती ॥ ८० ॥ मुक्तिवरील गुरुभक्ती ॥ जे अवताराची ऐश्वर्य ख्याती ॥ तैसीच हेही निज रीती ॥ आचरोनि स्थिती दाविली ॥ ८१ ॥ आतां विसर्जावें हें व्रत ॥ योजावा आणीक पंथ ॥ जिवींचा हाचि मनोरथ ॥ परि अनुवादत युक्तीनें ॥ ८२ ॥ ह्मणे एका तीर्थाचा सोहळा ॥ देखिला तुवां निजडोळां ॥ ऐसीच भगवंताची लीळा ॥ तीर्थी सकळां हो पाहावें ॥ ८३ ॥ प्रस्तुत आवडी आह्मासी ॥ चालावें महा स्थानासी ॥ पंचवटी आणी त्रिंबकासी ॥ करूनि यात्रेसी पैं यावें ॥ ८४ ॥ सुचना आणि मनोगतां ॥ कळों सरलें एकनाथा ॥ चरणीं ठेविला माथा ॥ मौनेच तत्वता राहिला ॥ ८५ ॥ अभिनवचरित्रें देहधारी ॥ श्रीनाथ भवगजकेसरी ॥ केशवें जाणोनि थोरी ॥ पाउलें शिरीं वंदिलीं ॥ ८६ ॥ पुढील कथानुसंधान ॥ पंचवटीचें प्रयाण ॥ जनार्दन श्रीनाथ आपण ॥ करी वर्तन तें ऐका ॥ ८७ ॥ इतिश्रीएकनाथचरित्रेनाथश्रीकृष्णदर्शनोनामचतुर्थोध्यायः ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ श्रीरामचंद्रार्पणमस्तु ॥

---

## अध्याय पांचवा.

श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ आतां जनार्दन गुरुमूर्ती ॥ सर्वेच लावावें यात्रेप्रती ॥ श्रीनाथासी अति प्रीती ॥ उल्हास चित्तीं हा मोठा ॥ १ ॥ यात्रे न्यावयाचिये काजा ॥ विनंति केली गुरुराजा ॥ आज्ञा पावली अति वोजा ॥ निजस्वार्थ गुजालागुनी ॥ २ ॥ जनार्दनें पाहून सुमुहूर्त ॥ प्रयाण आरंभिलें त्वरित ॥ सेवकजन अगत्यागत्य ॥ स्वयें योजित समागमें ॥ ३ ॥ एक अश्व निज वहनीं ॥ दुसरा वोपीनाथासनी ॥ येरें आज्ञा वंदुनी ॥ वहनी बैसोनी चालिले ॥ ४ ॥ मार्गीं चालतां पंथ ॥ निजगुज आलोंच क्रमित ॥ जेथें रमे निजचित्त ॥ तेथेंच उतरते पेणया ॥५॥ जेथें जाती उभय मूर्त्ती ॥ तेथें आत्मत्वेंचि पाहती ॥ परि आवडी बहुत चित्तीं ॥ विशेष रीति हरिप्रियांची ॥ ६ ॥ एवं जातां सुखसमाधानी ॥ पावन होतसे अवनी ॥ चंद्रमाभट्ट वसे ज्या स्थानीं ॥ एके दिनीं तेथें आले ॥ ७ ॥ आश्रम देखोनि सुशीळ ॥ ब्राह्मण तेजस्वी सोज्वळ ॥ उतरावयाचिही वेळ ॥ जाणून निर्मळ राहिला ॥ ८ ॥ ब्राह्मण तपोनिष्ठ परम ॥ स्नानसंध्या अति उत्तम ॥ करोनि सायंकाळींचा होम ॥ जपसंभ्रम सारिला ॥ ९ ॥ कर्मउपासना जप ॥ यथास्थित देखोनि तप ॥ मनींभाविती

हा निःपाप ॥ अधिकारी स्वरूपसाधक ॥ १० ॥ निशी लोटली या प्रहर ॥ चतुःश्लोकीचा विचार ॥ करीतसे निरंतर ॥ अतिएकाग्र तल्लीनता ॥ ११ ॥ आरंभितांच पठण ॥ उभयमूर्त्ती सुखसंपन्न ॥ आसनींहुनी उठोन ॥ त्या संनिधानी बैसले ॥१२॥ आदरें देखोनि ब्राह्मण ॥ सार्थ करी व्याख्यान ॥ उभयतीं माथा तुकोन ॥ ह्मणती धन्य धन्य तव निष्ठा ॥ १३ ॥ परस्परें निजगुज गोष्टी ॥ बोलताती निज आवडी ॥ ब्राह्मण अति तांतडी ॥ पातली उडी नमावया ॥ १४ ॥ परस्परें नमनादर ॥ आलिंगन पुरस्कार ॥ होतांचि आत्मविचार ॥ ब्राह्मण तत्पर परमार्थी ॥ १५ ॥ अष्टही सात्विक भाव ॥ निर्माण झाले अति अपूर्व ॥ स्वेदरोमांच शरीर सर्व ॥ नयनोद्भवपूर चालिले ॥ १६ ॥ ब्रह्मरूप उभय मूर्त्ती ॥ अंतरीं आली हे प्रचिती ॥ धरावी यांची संगती ॥ निजहितार्थीं आपुल्या ॥ १७ ॥ यांसही उल्हास चित्तीं ॥ नवल या ब्राह्मणाची स्थिती ॥ प्रेमा शांतऊन वचनोक्ती ॥ भला भला ह्मणती निज मुखें ॥१८॥ येरें सद्भाव स्थिती ॥ नमिलें उभयतां मूर्त्ती ॥ पावोनि आनंदावाप्ती ॥ रात्र निश्चिती क्रमियेली ॥ १९ ॥ प्रातःकाळीं अति प्रीती ॥ करून विनीत विनंती ॥ ह्मणे भोजन करोनि श्रीमंतीं ॥ निजपंक्ती पावनकीजे ॥ २० ॥ देखोनि भावार्थाची थोरी ॥ जनार्दन अंगिकारी ॥ भोजनसमयीं परस्परीं ॥ निजउत्तरीं बोलती ॥ २१ ॥ तयाच्या व्याख्यानाची स्थिती ॥ मानली जनार्दनपंताप्रती ॥ तेथील रहस्य निजप्रीती ॥ अपूर्व रीती वाढेल ॥२२॥ श्रीनाथासी आपण ॥ आज्ञा करी जनार्दन ॥ मूळ भागवत चतुःश्लोकी जाण ॥ त्याची टीका करीं बापा ॥ २३ ॥ श्रीहरिब्रह्मयाचें ज्ञान ॥ जें परमार्थीं निज भूषण ॥ तुझिया मुखें हें व्याख्यान ॥ व्हावें कथन हें वाटे ॥ २४ ॥ सद्गुरुमुखींची हे आज्ञा ॥ अतिशय मानली सर्वज्ञा ॥ ब्राह्मणही पावोनि संज्ञा ॥ विनवी प्रज्ञा मतीनें ॥ २५ ॥ तें पुरातन इतिहास कथन ॥ व्यासा जेणें समाधान ॥ नारद उपदेश होऊन ॥ स्वयें भागवत संपूर्ण वदलासे ॥ २६ ॥ मूळ बीजाचे चतुःश्लोक ॥ ब्रह्मज्ञान निजनिष्टंक ॥ यांचा प्रगटर्थ येथून देख ॥ सविस्तर सम्यक् होईल ॥२७॥ यापरि चर्चा भोजनकाळीं ॥ सद्गुरु आज्ञा प्रतिपाळी ॥ भोजनांतीं बद्धांजुळी ॥ पुस्तकार्थ चाळी स्वहातें ॥ २८ ॥ तंव त्या ब्राह्मणाचा भाव ॥ यांचे संगतीची मनीं हाव ॥ ह्मणे सहपुस्तक स्वयंमेव ॥ सेवक सर्वस्वी मी तुमचा ॥ २९ ॥ तुमच्या संगतीचें सुख ॥ इच्छाभोक्तृत्वीं अवश्यक ॥ यात्रेसीं समागमें निःशंक ॥ येत सेवक निजहिता ॥ ३० ॥ भावार्था मीनला भाव ॥ हें सद्गुरुकृपावैभव ॥ परमार्थीं अति अपूर्व ॥ होय लाघव सदैवा ॥ ३१ ॥ तांबूलादि सुमन चंदन ॥ यथोचित करोनि अर्पण ॥ सिद्ध करोनि वहन ॥ पुढांरा गमन पैं केलें ॥ ३२ ॥ पावोनि पंचवटी गंगातीर ॥ तिघेही आनंदें निर्भर ॥ श्रीनाथें स्वयें सुंदर ॥ टीका सुंदर पैं केली ॥ ३३ ॥ सद्गुरु

आणि तो ब्राह्मण ॥ प्रत्यही करिती ग्रंथ पठण ॥ अवलोकितां तयांचें ज्ञान ॥ सुखसपन्न पैं होती ॥ ३४ ॥ ब्राह्मण ह्मणे निजमनीं ॥ धन्य धन्य याची वाणी ॥ ब्रह्मसुखाची निजखाणी ॥ चिद्रत्न भूषणीं सुशोभित ॥ ३५ ॥ वय पाहतां लेंकुरपण ॥ परि निजात्मज्ञानें परिपूर्ण ॥ जगदोद्धारालागीं भगवान ॥ स्वयें आपण अवतरला ॥ ३६ ॥ हे उभयतां गुरुशिष्यमूर्त्ती ॥ मानवी नव्हेति निश्चिती ॥ अवतार पुरुषाचिया रिती ॥ निजस्थिति शोभत ॥ ३७ ॥ पूर्ववई बाळ भाषित ॥ अध्यात्मज्ञानाचें सारामृत ॥ कथिलसे परमार्थ ॥ अति समर्थ नाथ हा ॥ ३८ ॥एवं राहोनि पंचवटीं ॥ रामाश्रम गोदातटीं ॥ सद्गुरुसंन्निध ब्राह्मण निकटीं ॥ टीका महाराष्ट्रीं सहज केली ॥ ३९ ॥ जालिया ग्रंथपठण समाप्ती ॥ परमानंद सद्गुरुमूर्त्ती ॥ संतोषाचिया निजस्थिती ॥ वरदोक्ति पैं वदला ॥ ४० ॥ तुझेनि मुखें श्रीभागवत ॥ वक्ता जाला यथास्थित ॥ हृदयीं धरोनि श्रीनाथ ॥ कृपायुक्त आलिंगिलें ॥ ४१ ॥ आदरें तया पुस्तका ॥ ब्राह्मणें वंदोनि मस्तका ॥ प्रत्यही पाठ करी देखा ॥ अति नेटका भावार्थ ॥ ४२ ॥ नाथें जयजयकारवाणी ॥ माथा ठेविला सद्गुरुचरणीं ॥ ब्राह्मणासही नमुनी ॥ निराभिमानी स्वस्थ राहे ॥ ४३ ॥ यापरी चतुःश्लोकी टीका ॥ प्रथमचि हे ग्रंथपीठिका ॥ आरंभ झाला अति नेटका ॥ ज्ञानदीपिका स्वप्रकाशे ॥४४॥ तेथोनि पुढारी गमन ॥ श्रीत्र्यंबकेश्वर निजदर्शन ॥ संपादुनी यात्रा प्रकरण ॥ गंगा स्नानें यथारिती ॥ ४५ ॥ तिन्ही मूर्त्ती सुप्रसन्न ॥ स्वच्छंदें करितां क्रीडण ॥ तेथील समस्त ब्राह्मण ॥ आदिकरोनि सकळांसीं ॥ ४६ ॥ पाहून परमार्थ वर्तणुक ॥ नानापरीचे करिती तर्क ॥ यांची स्थिति अलौकिक ॥ स्वरूप निष्टंक कळेना ॥ ४७ ॥ तीर्थीं ब्राह्मण संतर्पण ॥ करोनिया अन्नदान ॥ निघाले तिघेही ब्राह्मण सज्जन ॥ पुनरागमन स्वस्थाना ॥ ४८ ॥ चंद्रमा भट्टाचिया ग्रामा ॥ कृपें पावले विश्रामा ॥ राहोनि ब्राह्मणोत्तमा ॥ स्वआश्रमा निघाले ॥ ४९ ॥ त्याब्राह्मणाची स्थिती ॥ यांचे संगतीची प्रिती ॥ पुढें वर्तली कैसी गती ॥ सुनिश्चिती अवधारा ॥ ५० ॥ देहगेह कुटुंबाची ॥ ब्राह्मणा जिवीं आली अरुची ॥ सर्वही त्यागोनि क्रमेंची ॥ आला स्वयेंची देवगिरी ॥ ५१ ॥ कितेक दिवस क्रमिल्या अंतीं ॥ तो पावला विदेह स्थिती ॥ लौकिकाविगळी रीती ॥ नांवही निश्चिती पालटलें ॥ ५२ ॥ चंद्रमाभट्ट विदेही झाला ॥ म्हणंती तयाशीं चांद बोधला ॥ ग्रासोनि भेद अभेदाला ॥ सिद्ध जाला निजरूपीं ॥ ५३ ॥ कितेक दिवस विदेहस्थिती ॥ राहोनि समाधि ध्यावि हे चित्तीं ॥ प्रारब्धाचि ये गती ॥ जनार्दनाप्रती पूसत ॥ ५४ ॥ राज्य देखोनि यवनाचें ॥ मनोगत उठिलें समाधीचें ॥ त्याच रीती समाधि रचनेचें ॥ स्थान साचें करविलें ॥ ५५ ॥ समाधि संपादून आपण ॥ बुझाविले

दोघेही जण ॥ ब्राह्मण आणी यवन ॥ वाद संपूर्ण खंडिला ॥ ५६ ॥ तयाचें समाधिस्थान ॥ अति सिद्ध चमत्कार लक्षण ॥ अद्यापि देवगिरीसी जाण ॥ सर्वही जन मानिती ॥ ५७ ॥ असे हे तयाची ख्याती ॥ परिपूर्णावतार श्रीनाथमूर्ती ॥ जनार्दन सद्गुरुसंगती ॥ स्वस्थळा प्रती पातले ॥ ५८ ॥ आतां पुढील निरोपण ॥ सद्गुरु आज्ञानुसारें जाण ॥ करीत उत्तर तीर्थागमन ॥ तें कथन अवधारा ॥ ५९ ॥ सद्गुरु एकोबाचे रंक ॥ दीन मश्यक मी एक ॥ परि करवी कथाकौतुक ॥ कृपापूर्वक स्वामिराजा ॥ ६० ॥ शास्त्राभ्यास अक्षर एक ॥ नयेचि केवळ मी मूर्ख ॥ परि नेणों हे कैसे लेख ॥ वदनींहुन निघताती ॥ ६१ ॥ सदोष निर्दोष कविता रीती ॥ अथवा पाहों नये व्युत्पत्ती ॥ क्षमा-करोनि अपराध संतीं ॥ कृपा निश्चिती करावी ॥ ६२ ॥ श्रीनाथपूर्णावतार ॥ चरित्र जें अति पवित्र ॥ तें परिसावें सादर ॥ करा उद्धार दीनाचा ॥ ६३ ॥ अनाथ आणी मूर्ख ॥ पदरीं पडलिया अवश्यक ॥ तयाचें उणें पुरे याची देख ॥ चिंता सकळिक समर्था ॥ ६४ ॥ यापरि मज बाळकाची ॥ वल्गना अति मूर्खत्वाची ॥ नसतां मति कवितेची ॥ हाव धिटिवेंची पैं केली ॥ ६५ ॥ परि नवल कृपालाघव स्वामी ॥ तेचि मान्य करावें तुह्मी ॥ निजजिव्हाळा तुझे नामीं ॥ अंतर्यामीं जालासि तूं ॥ ६६ ॥ आतां असो हा परिहार ॥ तुझिया सत्तें चाले शरीर ॥ तेथें कर्तृत्वाचा अहंकार ॥ कैचा थोर जीवासीं ॥ ६७ ॥ चरित्र सर्व तुझी सत्ता ॥ यावदनीं तूंचि वक्ता ॥ न्यून पूर्ण विशेषता ॥ सर्व कर्त्ता तूंचि तूं ॥ ६८ ॥ माझिया मनाचें मन ॥ जीवाचें निज जीवन ॥ बुद्धिची बुद्धी जाग ॥ चैतन्यघन स्वामिराजा ॥ ६९ ॥ तोचि तूं सद्गुरुनाथा ॥ कृपाळू श्रीएकनाथा ॥ चतुःश्लोकी पुरातन कथा ॥ टीकार्थ ग्रंथा वदलासी ॥ ७० ॥ त्यानंतरें निज भुवनीं ॥ सद्गुरु जनार्दन येउनी ॥ वक्तृत्वीं परिपूर्णता जाणोनी ॥ विचार मनीं आदरिला ॥ ७१ ॥ तंव आठवलें वरदान ॥ दत्तात्रय कृपावचन ॥ याचेनि योगें जग पावन ॥ उद्धरण जडजीवां ॥ ७२ ॥ परि देहींची पूर्वावस्था ॥ येकाळींची कोण योग्यता ॥ तें विचारूं निजहिता ॥ त्याचि पंथा नेमावें ॥ ७३ ॥ याचेनि पायें पावन आवनी ॥ होईल हें आलें मनीं ॥ यास्तव निरोप तीर्थाटणीं ॥ दक्षिणोत्तरे पैं द्यावा ॥ ७४ ॥ स्नानसंध्या आणि भोजन ॥ उत्तम दिव्यान्न करवून ॥ नाथपथीं सारऊन ॥ नेलें आपण एकांता ॥ ७५ ॥ नाथासी आलिंगुनि प्रीतीं ॥ बैसउनी निकटवर्त्ती ॥ बुझावोनी वचनोक्ती ॥ उत्तमा रीति विचारिलें ॥ ७६ ॥ संतोषलों तुझिया निष्ठा ॥ प्रपंचपरमार्थ अतिद्रष्टा ॥ साधिले उभयपक्ष उत्कृष्टा ॥ अधिकारी मोठा तूं होसी ॥ ७७ ॥ आतां कांहीं एक निज प्रतिती ॥ तेचि सांगतों शास्त्ररीती ॥ परिसोनी निजचित्तीं ॥ त्याच रिती अंगिकारी ॥ ७८ ॥ नाथें माथा ठेवोनि पायीं ॥ विनविलें आपुलें सोई ॥

तुझी आज्ञा प्रमाण पाहीं ॥ येथें याचिदेहीं निजनिष्ठा ॥ ७९ ॥ सर्व शास्त्र तुझें वचन ॥ अनुष्ठान नामस्मरण ॥ सर्वेंद्रियीं उपासना ॥ तुझें ध्यान निरंतर ॥ ८० ॥ सर्व पदार्थीं तुझीच दृष्टी ॥ देखतसें सकळ सृष्टी ॥ परमाणुमाजीं राहटी ॥ तुझी जगजेठी भासत ॥ ८१ ॥ मजमाजीं माझें मींपण ॥ तूंचि येथें जनार्दन ॥ तुज वेगळें निरीक्षण ॥ न दिसे जाण गुरुवर्या ॥ ८२ ॥ आतां असेल जें मनीं ॥ ते आज्ञा मान्य मजलागुनी ॥ इतुकी करोनि विनवणी ॥ कर जोडुनी राहिला ॥ ८३ ॥ समर्याद अति नम्रता ॥ ऐकोनि उत्तरीं परिपूर्णता ॥ गुरूसीं आनंदावस्था ॥ चौगुणी चित्ता सुखोद्भव ॥ ८४ ॥ त्या सुखाची निजस्थिती ॥ बोलतां जिव्हा दुखंड होती ॥ मग शेषें प्रीति एकांती ॥ अंग निद्रेप्रति वोपिलें ॥ ८५ ॥ चहूं मुखें बोलका ज्ञानी ॥ ब्रह्म्यासमान नसे कोणी ॥ परि तोही ठकला वत्सा हरणीं ॥ लाजोनि मनीं राहिला ॥ ८६ ॥ तेथें प्राकृताची वाणी ॥ कायसी वर्णील गाणीं ॥ निवांत माथा ठेवोनि चरणीं ॥ शरण अनुदिनीं असावें ॥ ८७ ॥ जेवीं व्यालियेचा कळवळा ॥ व्यालीच भोगी सुखसोहळा ॥ तेवीं येथिच्या सुखाची कळा ॥ अनुभवलीळा अनुभवीया ॥ ८८ ॥ जनार्दन श्रीनाथ गोष्टी ॥ मज ना कळे बोधकसवटी ॥ परि जीवें पायीं दिधली मिठी ॥ तेथेंही उठी ध्वनी मात्र ॥ ८९ ॥ ज्यासि या सुखश्रवणीं चाड ॥ श्रीभागवतीं असे निवाड ॥ श्रीमुखींहूनि अति गोड ॥ केला प्रौढ प्रतापें ॥ ९० ॥ एवं गुरोपासन श्लोक टीका ॥ तो अर्थ आकर्णी नेटका ॥ येथें विस्तार करितां अधिका ॥ वाढेल देखा ग्रंथची ॥ ९१ ॥ आणि त्या निरोपणाची गुढी ॥ कोणाही न साधे प्रौढी ॥ सूर्या पुढें तेज परवडी ॥ खद्योतसम पाडी जैसें ॥ ९२ ॥ असो हा विस्तार आतां ॥ जनार्दनासीं आल्हाद चित्ता ॥ झाला तें परिपूर्णता ॥ श्रीनाथ तत्वतां हें जाणें ॥ ९३ ॥ परस्परें निजगुज ॥ येरयेरां योग्य सहज ॥ ऐसिया प्रेमाचें बीज ॥ श्रीचरणरज स्वामीचा ॥ ९४ ॥ ऐकोनि एकनाथाचा भाव ॥ जनार्दन ह्मणे अपूर्व ॥ तुझ्या बोलाचा अभिप्राव ॥ अति नवलाव आह्मांसीं ॥ ९५ ॥ प्रस्तुत तुवा आतां ॥ पाहोनियावें सर्व तीर्था ॥ बद्रिकाश्रमादिकरोनि समस्तां ॥ उत्तरप्रांतां निघावें ॥ ९६ ॥ घेवोनि बदरिनारायण दर्शन ॥ तेथोनि करावें पुनरागमन ॥ दक्षिण मानस संपादून ॥ इतुकें साधोनि पैं यावें ॥ ९७ ॥ नकरोनि आग्रह विचार ॥ तीर्थक्षेत्र समग्र ॥ बद्रिकाश्रम आणि रामेश्वर ॥ नेम प्रकार तीर्थाचा ॥ ९८ ॥ कोठें त्रिरात्र कोठें पंचरात्र ॥ राहावें वस्तीसीं सुक्षेत्र ॥ कोणी भेटलीया भगवत्पर ॥ विशेष आदर असावा ॥ ९९ ॥ तुझिया योगक्षेमाची चिंता ॥ सर्व असे श्रीअनंता ॥ जो भाव तुझिया चित्ता ॥ तो संरक्षिता तुजसवें ॥ १०० ॥ ऐकोनि सद्गुरुची वाणी ॥ दोन अवस्था जाल्या मनीं ॥ संतोष खेद आश्रु नयनीं ॥ प्रेमळपणीं चालिले ॥ १ ॥ चिद्विलासतीर्थक्षेत्र महिमा ॥ पाहोनि पाविजे विश्रामा ॥

कोणे क्षेत्रीं कोण गरिमा ॥ आत्मया रामाची असे ॥ २ ॥ पाहावया हे दिठी ॥ आल्हाद दाटला पोटीं ॥ सद्गुरुवियोग सगुण भेटी ॥ अवस्था उठी अनुरागें ॥ ३ ॥ ऐसिया अति काकुळती ॥ पाय धरोनि दोहीं हातीं ॥ क्षणक्षणा पुढतापुढती ॥ दर्शनी श्रीमूर्ती न्याहळी ॥ ४ ॥ वारंवार लागोनि चरणा ॥ करिता होय प्रदक्षिणा ॥ मनीं जनार्दनाच्या करुणा ॥ आश्रुनयना त्याचि पाही ॥ ५ ॥ ऐसे दोघे प्रेमभरित ॥ कंठ जाले सद्गदीत ॥ सुखसमुद्रीं बुड्या देत ॥ चिद्रत्न मुक्त भोगिती ॥ ६ ॥ ये प्रेमाची जाति कैसी ॥ विसरले आठवणेसीं ॥ गुरुभक्तीनि ऐक्यतेसीं ॥ प्रेमसुखासी भोगिती ॥ ७ ॥ तंव आठवलें जनार्दना ॥ ह्मणे हें भलें नव्हे जाणा ॥ आतांची जैं ऐक्य लक्षणा ॥ पुढिल्या कारणा चुकावें ॥ ८ ॥ ह्मणोनियां प्रेमापोटीं ॥ जिरवोनियां पूर्ण दृष्टी ॥ श्रीनाथाची निजपृष्ठी ॥ करें थापटी आपुलिया ॥ ९ ॥ शिरवेष्टन कोचिकी ॥ स्वशिरीं होती नेटकी ॥ नाथाचिया निजमस्तकीं ॥ कृपा आलोकिक ठेविली ॥ ११० ॥ प्रसाद येतांच शिरीं ॥ नाथ अति उल्हासें करी ॥ चरण नमी अत्यादरीं ॥ ते अवरीं अति निष्ठा ॥ ११ ॥ आज्ञा वंदोनि आतां ॥ प्रयाण करितों गुरुनाथा ॥ पुन्हा दर्शनलाभ अवस्था ॥ या मनोरथा पुरवावें ॥ १२ ॥ अवश्य म्हणोनी जनार्दन ॥ जावया निरोप दे आपण ॥ पुढती नमन पुढती गमन ॥ नाथें गुरुचरण वंदिले ॥ १३ ॥ निजरूपीं प्रेमा संपूर्ण ॥ यथास्थित ठेवोनि जाण ॥ नाथ करी शीघ्र गमन ॥ जयजनार्दन म्हणोनी ॥ १४ ॥ उभयतांचें जेथें ऐक्यपण ॥ वियोग तेथें नाहीं जाण ॥ एकाजनार्दनाचे चरण ॥ केशव शरण निजभावें ॥ १५ ॥ भावासी कारण भक्ति ॥ भक्तीचा उल्हाससत्संगती ॥ तेचि निष्ठा नामकीर्ती ॥ केशवा पढियंती गुरुनिष्ठा ॥ १६ ॥ श्रीनाथाचें तीर्थाटण ॥ स्थळें स्थळें अवलोकन ॥ पुढें होईल निरोपण ॥ तें संपूर्ण परिसावें ॥ ११७ ॥ इतिश्रीएकनाथचरित्रेपंचमोध्यायः ॥

---

## अध्याय सहावा.

श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ जयजय श्रीएकनाथा ॥ आवडी पायां नमितों माथां ॥ तुझें चरित्र आठवितां ॥ निजसुख दाता तूं होसी ॥ १ ॥ गुरु आज्ञा तीर्थाटणा ॥ गेलिया मागें जनार्दना ॥ आठव तुझा क्षणक्षणा ॥ होतसे परिपूर्णा अतिप्रीती ॥ २ ॥ येरीकडे प्रतिष्ठानी ॥ आजा आजी होतीं दोन्ही ॥ तीं पडलीं अति धुंडणी ॥ नाथालागुनी न देखतां ॥ ३ ॥ म्हणती बाळ सगुणमूर्ती ॥ काय जाली त्याची गती ॥ कोठें गेला टाकून अंतीं ॥ मूर्च्छित पडती

भूमीवरी ॥ ४ ॥ मायबापाचा नसतां लळा ॥ सुखें होतास वेल्हाळा ॥ आजपर्यंत आम्हा जवळां ॥ आतां या कपाळा काय जालें ॥ ५ ॥ आम्हा अंधाची तूं काठी ॥ तुझा भरंवसा होता पोटीं ॥ ते हे उफराटी गोष्टी ॥ जालों करंटीं पैं आम्हीं ॥ ६ ॥ अगाये बाळा राजसा ॥ कोठें गेलासी पाडसा ॥ आमुची कां करिशी निराशा ॥ ये सरिसा धांवोनी ॥ ७ ॥ आक्रंदोनी मारिती हांका ॥ शोषला कंठ करितां शोका ॥ वक्षस्थळ पीटिती देखा ॥ धांव बाळका म्हणोनी ॥ ८ ॥ शोध घेतांचि नगरीं ॥ पुसताती घरोघरीं ॥ आमुचें बाळ कोणी तरी ॥ आपुले नेत्रीं देखिलें सांगा ॥ ९ ॥ कोठेंही न लागे शोध ॥ होय तेणें अधिक खेद ॥ येऊन गंगातिरीं प्रसिद्ध ॥ अति आक्रंद करिताती ॥ १० ॥ बुडाला तुझिया जळांत ॥ किंवा काय जाली गत ॥ कोणें नेला चाळवीत ॥ तुज विदित तें सांग पैं ॥ ११ ॥ म्हणोनि गंगेसी साष्टांग ॥ नमस्कार घालिती सवेग ॥ वेडीं होवोनी लगबग ॥ पुसती काग पक्षियां ॥ १२ ॥ नाथ कोठें गेला माझा ॥ हा शकुन सांग पैं वोजा ॥ ऐसीं आकांतीं समाजीं ॥ पडलीं आजा आणि आजी ॥ १३ ॥ जन मिळोनी बहुत ॥ पुसती काय जाला वृत्तांत ॥ एकोबा न दिसे हे मात ॥ ऐकोनि आकांत तयां तेंही ॥१४॥ त्याचे सद्गुण सुलक्षणें ॥ सकळहीं आठऊनी मनें ॥ ह्मणती बाळ कोडीसवाणें ॥ नेलें कोणें चाळवोनी ॥ १५ ॥ आमुचें समस्तांच्या नयना ॥ चिंता लागली सकळ जना ॥ आठवोनी तयाच्या गुणा ॥ आश्चर्य मना करिताती ॥ १६ ॥ तंव विवेकी पुरुष कितेक ॥ येऊनि तयां जवळिक ॥ ह्मणती शोध न कळतां देख ॥ शोक सहसा करूंनये ॥१७॥ ऐसीये रीति बुझावून ॥ करीं धरोनि दोघेजण ॥ आश्रमा आणोनि जाण ॥ शोध लक्षण जाणती ॥ १८ ॥ तुमचे बोल अति शुद्ध ॥ त्यांसीं न स्पर्शे विरुद्ध ॥ डोहीं बुडे किंवा प्रमाद ॥ होय हा शब्द न घडे पैं ॥ १९ ॥ तया संतांचरणीं चाड ॥ पुराण श्रवण लागे गोड ॥ सत्पुरुषदर्शनीं आवड ॥ ऐसें कोड तयाचें ॥ २० ॥ ह्मणोनि तर्क येतसे मना ॥ यास्तव तोचि जाणा ॥ कोठें गेला असेल श्रवणा ॥ सत्कथा पुराणालागुनी ॥२१॥ हा शोध करावा पुरता ॥ शोक करणें हे मूर्खता ॥ शांतऊन तयां उभयतां ॥ ह्मणती आह्मी तत्वता धुंडितों ॥ २२ ॥ ऐसें आश्वासोनि तयांप्रती ॥ सर्व गेले शोधार्थी ॥ तंव तो पुराणीक स्वकार्यार्थी ॥ अन्यदेशाप्रती पैं गेला ॥ २३ ॥ येऊन त्याचिया घरासी ॥ पुसती घरच्या मनुष्यांसीं ॥ ते ह्मणती हें कांहीं आह्मासीं ॥ सत्यतेसीं प्राप्त नसे ॥२४॥ तयाचा करून विवेक ॥ तर्कें ह्मणती ते लोक ॥ विद्यार्थी करून बाळक ॥ नेला अवश्यक समागमें ॥ २५ ॥ येऊन सांगती वृद्धांसीं ॥ चिंता न करावी मानसीं ॥ तुमचा बाळ अध्ययनासी ॥ अवश्यतेसी पैं गेला ॥ २६ ॥ पुराणिक येईल जेव्हां ॥ तोही समागमें

तेव्हां येईलसा भरंवसा जिवा ॥ असों द्यावा निश्चिती ॥ २७ ॥ ऐसें सांगून तयांप्रती ॥ स्वआश्रमा गेले महामती ॥ शोक शांतऊन चित्तीं ॥ चिंता करिती उभयतां ॥ २८ ॥ चित्तीं चिंतितां तो बाळ ॥ अहर्निशी अति विव्हळ ॥ यासीं लोटला कितेक काळ ॥ परि प्राप्त वेळ नयेची ॥ २९ ॥ तीं वृद्धें अति अशक्त ॥ चालावयाचें नाहीं सामर्थ्य ॥ दूर देश दूर पंथ ॥ ह्मणोनि तटस्थ निजदुःखें ॥ ३० ॥ पदरीं द्रव्य कवडी नसे ॥ मनुष्य जाईल कोण कैसें ॥ चिंतातुर निजमानसें ॥ पडले ऐसें संकट ॥ ३१ ॥ लक्षितीं पुराणिकाची वाट ॥ कधीं येईल तो भट ॥ आह्मासीं पाडून संकट ॥ कैसा तो घट पैं गेला ॥ ३२ ॥ कृष्णा कान्हा कमलनयना ॥ धांवपाव मधुसूदना ॥ आमुचीया बाळा सगुणा ॥ भेटवी नारायणा आणोनी ॥ ३३ ॥ होणारासारखी करणी ॥ घड- वीतसे चक्रपाणी ॥ पुराणिक यजमान दोन्ही ॥ कठकाठणीं पैं गेले ॥ ३४ ॥ त्यासी लोटलीं वर्षें जाण ॥ ह्मणोनि वृद्धें करिती रूदन ॥ येऊन ब्राह्मणाच्या सदना ॥ नाना वचना जल्पती ॥ ३५ ॥ फिरल्या कटकाची वार्ता ॥ ऐकविती तयां उभयतां ॥ कांहींएक उणी चिंता ॥ होत आतां पैं झाली ॥ ३६ ॥ येरीकडे तो ब्राह्मण ॥ यजमान संनिध पुराण ॥ करीत असतां निरोपण ॥ घरींहून पत्र आलें ॥ ३७ ॥ ऐकोनि चिंता जाली तया ॥ ह्मणे कैसें वर्तलें देवराया ॥ नसता अभिश्राप आलिया ॥ कोण्या उपाया करावें ॥ ३८ ॥ पुराण करून समाप्त ॥ जावया निरोप घेत ॥ सांगोनी सकळ वृत्तांत ॥ विचारीत निजमनीं ॥ ३९ ॥ यजमानें देऊन दक्षणा ॥ मार्गस्थ केलें त्या ब्राह्मणा ॥ मार्गीं चिंताक्रांत जाणा ॥ अभिशाप संरक्षणा चिंतित ॥ ॥ ४० ॥ तंव आठवली पूर्ण खूण ॥ जनार्दना जवळी जाऊन ॥ बाळकाचा शोध घेऊन ॥ पुढें कारण विचारूं ॥ ४१ ॥ येऊन देवगिरीसी ॥ भेटला जनार्दन पंतासीं ॥ शोधिलें सकळ चिन्हासीं ॥ जन वृत्तांतासीं जाणउनी ॥ ४२ ॥ हांसोनी बोले जना- र्दन ॥ ऐसि या बाळा भय कोण ॥ तो असे सुखसंपन्न ॥ तीर्थाटण करीतसे ॥ ४३ ॥ येथें राहून कितेकवर्ष ॥ सेवेनें मज केलें संतोष ॥ गमनासी जाले षड्मास ॥ संपादून यात्रेस येतसे ॥ ४४ ॥ ऐकोनि जनार्दनाची गोष्टी ॥ निश्चित जालें निजपोटीं ॥ तथूनियां उठाउठी ॥ सवेग नेटी चालिला ॥ ४५ ॥ अधीं येऊन उभय वृद्धांसीं ॥ भेटोनि कथिलें वृत्तांतासी ॥ तुमचा बाळ स्वच्छंदेसीं ॥ गेला देवगिरीसीं परमार्था ॥ ॥ ४६ ॥ तेथून करावया तीर्थाटण ॥ गेला असे तो सज्ञान ॥ चिंता न करावी आपण ॥ स्वस्थ मन असावें ॥ ४७ ॥ येथें मजकडे अभिश्राप ॥ आला हे केवढें पाप ॥ पत्र पावतांचि संताप ॥ जाला कंप सर्वांगीं ॥ ४८ ॥ यास्तव तयाचा शोध ॥ घेऊन आलों एवंविध ॥ मजकडे नाहीं शब्द ॥ निरापराध असें पहा ॥ ४९ ॥ ऐकोनि कुशळ वर्तमान ॥ धरिती ब्राह्मणाचे चरण ॥ असुवें गाळती लोचन ॥ केव्हां

दर्शन होईल सांगा ॥ ५० ॥ ब्राह्मण ह्मणे तुह्मी उभयतां ॥ जाऊन भेटा जनार्दन-पंता ॥ सविस्तर त्याचिया वृत्तांता ॥ स्वमुखें तत्वता पुसावें ॥ ५१ ॥ ब्राह्मणें पुसोनि तयांसीं ॥ सुखें जाय त्वद्गृहासीं ॥ उभयतीं सवेगेसीं ॥ प्रयाण देवगिरीसीं पैं केलें ॥ ॥ ५२ ॥ जनार्दनपंता जाण ॥ जाऊन भेटलीं आपण ॥ येरें परमप्रीति अश्वासून ॥ सविस्तर कथन सांगीतलें ॥ ५३ ॥ तया उभयतांचा आदर ॥ बहुत करून प्रीतीकर ॥ ह्मणे धन्य धन्य साचार ॥ नाथ अवतार तुमचे वंशीं ॥ ५४ ॥ कितेक दिवस उभयतांसीं ॥ राहवोनी सन्मानेसीं ॥ द्रव्यवस्त्रें देऊन त्यांसीं ॥ संतोषेसीं बोळविलें ॥ ५५ ॥ तिहीं होऊन सुखसंपन्न ॥ अति नम्रता विज्ञापन ॥ करून ह्मणती बाळ आगमन ॥ येऊन दर्शन देईल कीं ॥ ५६ ॥ कारुण्यमूर्त्ती जनार्दन ॥ करून तयांचें समाधान ॥ हस्ताक्षर पत्र लिहून ॥ दिधलें आपण तयांसीं ॥ ५७ ॥ त्या पत्राचा भाव इतुका ॥ पहतांचि हे पत्रिका ॥ सांडून तीर्थाचा आंवाका ॥ प्रतिष्ठानींच देखा राहावें ॥ ५८ ॥ उभयतांसीं ह्मणे तत्वता ॥ पत्र घेऊन आतां ॥ स्वग्रामीं निश्चिततता ॥ ॥ जाऊन स्वस्थता राहावें ॥ ५९ ॥ थोडियाचे मासांत ॥ नाथ येईल त्वरित शोधांत राहून निश्चित ॥ दिवसरात्र क्रमावें ॥ ६० ॥ ऐसें बोधोनी तयां निगुती ॥ निरोप देत त्यांप्रती ॥ पावोनि परम विश्रांती ॥ निजस्थळाप्रती चालिलीं ॥ ६१ ॥ येऊन स्वग्रामस्वाश्रमां ॥ सावध राहून शोध नेमा ॥ जनार्दनाचा थोर महिमा ॥ वर्णिती सीमा भलेपण ॥ ६२ ॥ होईल बाळ आगमन ॥ जनार्दनाचें अभयवचन ॥ स्वहस्तींचें पत्र लिहून ॥ ठेविती जतन उभयतां ॥ ६३ ॥ पुढील अध्यायीं निरोपण ॥ तीर्थक्षेत्र अवलोकून ॥ श्रीनाथाचें पुनरागमन ॥ प्रतिष्ठानीं दर्शन वडिलांसीं ॥ ६४ ॥ ऐका जनार्दन कृपावैभव ॥ चरित्रकथनाचें लाघव ॥ पाहून अति अपूर्व ॥ उद्धरे केशव आठवितां ॥ ६५ ॥ इतिश्रीएकनाथचरित्रेषष्ठमोध्यायः ॥ श्रीरामार्पणमस्तु श्रीएकनाथार्पणमस्तु ॥ श्रीजनार्दनार्पणमस्तु ॥

---

## अध्याय सातवा.

श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ संतोषेसीं मातापिता ॥ जेवीं बाळा बोलविती तत्वता ॥ तेवीं हे चरित्रकथा ॥ बोलवी तत्वता स्वामिराज ॥ १ ॥ जेवीं खांबसूत्रीं सूत्रधारी ॥ बाहुल्या नाचवी स्वेच्छाकारी ॥ तेवीं श्रीएकनाथ सूत्रीं ॥ बोलवी वैखरी निजकथा ॥ २ ॥ तो स्वयें पूर्णावतार ॥ लीला दावी परमार्थपर ॥ नाना चारित्रें जगदोद्धार ॥ करी साचार गुरुकृपा ॥ ३ ॥ अंगीं असोनि परिपूर्णता ॥ अंगिकारिलें अटण तीर्थां ॥ गुरुआज्ञा प्रतिपाद्यता ॥ लोकसंग्रहार्था मर्यादा पाळी ॥ ४ ॥ स्वच्छंदें

साचार क्रमित पंथ ॥ अंतरीं जो सुनिश्चित ॥ अक्रियत्वें पाऊल न हालत ॥ स्वयें जात निजबोधें ॥ ५ ॥ मुखीं गुरुनामस्मरण ॥ मनीं जनार्दनाचें ध्यान ॥ सर्वेंद्रियीं समाधान ॥ स्वयें स्वतंत्र निजरूपीं ॥ ६ ॥ जनार्दन ध्यानीं वदनीं ॥ जनार्दनचि देखे नयनीं ॥ चालतां पाऊल अवनी ॥ जनार्दनपणीं अभिन्न ॥ ७ ॥ ऐसिया परी क्रमीत पंथ ॥ जेथें रमे मनोगत ॥ तेथेंचि वस्ती घडत ॥ निशी क्रमीत ते स्थानीं ॥ ८ ॥ पूर्णा पयोष्णी-तापी ॥ नर्मदा आणि चर्मण्वती ॥ स्नानें करून यथारिती ॥ सुखसंविती जातसे ॥ ९ ॥ आवंति नगरीं महाकाळेश्वर ॥ ज्योतिर्लिंग स्थान थोर ॥ इतरही मध्यें सूक्ष्मक्षेत्र ॥ पवित्रकर अवलोकी ॥ १० ॥ गोकुळ मथुरा वृंदावन ॥ पाहून श्रीकृष्णक्रीडास्थान ॥ भक्तिउत्कर्ष वर्तन ॥ देखोनि समाधान निजस्थिती ॥ ११ ॥ श्रीकृष्णगोपाळमूर्ती ॥ भजनीं पूजनीं निश्चिती ॥ तेथिल्या जनाची भक्ती ॥ अति प्रीती देखिली ॥ १२ ॥ रासक्रीडादि नाना छंद ॥ गीतानृत्य घोष अगाध ॥ गाताति आनंदे ॥ हा तपसिद्ध सुखस्थिती ॥ १३ ॥ तेथील उत्साह पाहोनि नयनीं ॥ विशेष सुख झालें मनीं ॥ ह्मणे धन्य कृष्णावतारकरणी ॥ उघडी खणी प्रेमाची ॥ १४ ॥ धन्य धन्य येथींचे जन ॥ धन्य धन्य वृंदावन ॥ धन्य धन्य वृक्षपाषाण ॥ श्रीकृष्णचरण स्पर्श ज्यां ॥ १५ ॥ उल्हास मानून चित्तीं ॥ कितेक दिवस तेथें वस्ती ॥ करोनियां निजस्थीती ॥ श्रीनाथमूर्ती राहिली ॥ १६ ॥ श्रीकृष्णजानार्दन अभिन्न ॥ ऐसिया बोधें जो संपन्न ॥ सबाह्य अंतर परिपूर्ण ॥ आनंद चिद्घन कोंदला ॥ १७ ॥ गुरुआज्ञा नेम निगुती ॥ आठवली निजमती ॥ विशेष राहतां प्रगटेल कीर्ती ॥ गमन निश्चिती करी पुढें ॥ १८ ॥ तेथून निघतां पुढारी ॥ प्रयागक्षेत्रींची थोरी ॥ परिसोनियां निर्धारी ॥ लीला करीत चालिला ॥ १९ ॥ जातां प्रयागपंथीं ॥ लाहान थोर क्षेत्रकीर्ती ॥ यथानुक्रमें जे पद्धती ॥ तया रीती वर्ततसे ॥ २० ॥ कोठें एकरात्र कोठें त्रिरात्र ॥ क्रमोनि अवलोकीत क्षेत्र ॥ ज्याचेनिदर्शनें पवित्र ॥ होइजे धरा पावन ॥ २१ ॥ यापरी प्रयागस्थान ॥ स्वयें पावला संगम ॥ त्रिवेणी माधव दर्शन ॥ हें महिमान लक्षिलें ॥ २२ ॥ पंचरात्र क्रमून तेथ ॥ पुढें गमन आरंभित ॥ काशिक्षेत्राचें मनोगत ॥ धरोनि क्रमित मार्गासी ॥ २३ ॥ मुक्तक्षेत्र वाराणशी ॥ स्मरतांचि पाप तापनाशी ॥ हे पुराणीं आख्या ऐशी ॥ त्यास्थानासीं पैं आला ॥ २४ ॥ करून मनकर्णिकास्नान ॥ घेऊन विश्वेश्वरदर्शन ॥ भैरवकाळिकास्थान ॥ अवलोकन करीतसे ॥ २५ ॥ प्रगट करूं नये आपणां ॥ हे गुरूची प्रमाण आज्ञा ॥ गुप्तची करून तीर्थाटणा ॥ सकळ देवस्थानां पाहातसे ॥ २६ ॥ प्रगट न करितां आपणां ॥ अवलोकिलें तेथिल्या स्थाना ॥ महिमा पाहतां जाणा ॥ मनीं भावना भाविली ॥ २७ ॥ जनार्दन कृपा निजप्राप्ती ॥ प्रगट व्हावें याचि युक्ती ॥ मागुतें न येथें पुनरावृत्ती ॥ होईल निश्चिती आगमन ॥ २८ ॥

आतां अटण मात्र गुप्तगती ॥ गुरुआज्ञा नेमस्थिती ॥ म्हणोनि रिघावें नेमस्थितीं ॥ पुढिल्या स्थळाप्रती नेमस्त ॥ २९ ॥ सारून मनकर्णिकास्नान ॥ घेऊन विश्वनाथाचें दर्शन ॥ समस्त क्षेत्र सव्य घेऊन ॥ पुढें गमन पैं केलें ॥ ३० ॥ अयोध्याक्षेत्र शरयूतिरीं ॥ जे पावन भूमि रामावतारीं ॥ अवलोकुनियां नेत्रीं ॥ समस्त धरित्री तीर्थादिकां ॥ ३१॥ गयेसी जाऊन आपण ॥ घेतलें विष्णुदर्शन ॥ करून तेथील विधान ॥ ब्रह्मभावना पूर्ण निजस्थिती ॥ ३२ ॥ सर्वोपचारें एकमन ॥ कृष्णीं जरी होय अर्पण ॥ कोटी पित्रु श्राद्धें आणि तर्पण ॥ उद्धरण होय पूर्वजां ॥ ३३ ॥ अश्वमेधयागादि कोटी ॥ घडलीं हो तये सृष्टीं ॥ रामनाम जया वाग्पुटीं ॥ सरिसाटी नव्हे तीतें ॥ ३४ ॥ जाचिये नामाची हे थोरी ॥ तो स्वयेंचि होऊन देहधारी ॥ विचरतसे महीवरीं ॥ अगाध थोरी तयाची ॥ ३५ ॥ तो स्वयें श्रीनाथ आपण ॥ स्वेच्छा करीतसे अटन ॥ तयाचेनि चरणस्पर्शें जाण ॥ अति पावन मेदिनी ॥ ३६ ॥ तेथें कर्माकर्म विधिकल्पना ॥ संशय नाहीं परिपूर्णा ॥ जयाचें नाम आलिया वदनां ॥ नव्हे गणना पुण्याची ॥ ३७ ॥ ज्याचिया नामाचें महिमान ॥ स्वयें सदाशिव आपण ॥ पायवाणी माथा वंदून ॥ करी स्मरण अहर्निशीं ॥ ३८ ॥ व्यासें वर्णितां महिमान ॥ तृप्ति न ध्यायेचि मन ॥ एवढी प्राप्ती अति गहन ॥ तो स्वयें आपण अवतरला ॥ ॥ ३९ ॥ तेथें कर्म कळा जड स्थिती ॥ केवि बाधी अवतार मूर्ती ॥ असोत ह्या संदेहयुक्ती ॥ जडाचिये मती सौरस ॥ ४० ॥ पूर्णावतार श्रीनाथ ॥ स्वलीळा स्वयें विचरत ॥ पाहोनि गयेतें आचरित ॥ पुढें जात निजइच्छा ॥ ४१ ॥ पुष्करादि समस्त तीर्थं ॥ पापनिर्दळणीं समर्थें ॥ जनाचीं दवडून दोष दुरितें ॥ संतपद रजांतें वांच्छिती ॥ ४२ ॥ दोषसंसर्गाचा मेळा ॥ तया जवळीं होय गोळा ॥ तया दंडावया कलिमळा ॥ वाटडोळां पाहती ॥ ४३ ॥ गजवजोनि संग्रह पापी ॥ रात्रंदिवस तपती तपीं ॥ आवडी दर्शना सत्स्वरूपीं ॥ व्हावें निष्पापी ह्मणोनियां ॥ ४४ ॥ तयाची कृपा जनार्दना ॥ म्हणोनि धाडिलें तीर्थाटणा ॥ गुरुआज्ञा परिपूर्णा ॥ घडे जाणा याचिलागीं ॥ ४५ ॥ श्रीनाथ यावरीं आपण ॥ इच्छी बदरिकाश्रम दर्शन ॥ जेथें नरनारायण अवतार पूर्ण ॥ एकची जाण दोंरूपीं ॥ ४६ ॥ तेथील भक्तिविलाससुख ॥ ये काळीं ही अवश्यक ॥ पाहावयालागीं देख ॥ संतोषपूर्वक चालिला ॥ ४७ ॥ भागीरथी ओघ तुटुन ॥ पर्वतीं कडा अति गहन ॥ पडला तेणें मार्ग रोधून ॥ तेंचि स्थान गमनासीं ॥४८॥ तेथिची गति जाली कठीण ॥ मार्ग सिंकियावरून ॥ मुखीं रामपदीं ध्यान ॥ करून गमन मार्गस्थां ॥ ४९ ॥ तेथें अणुमात्र पाऊल चुकतां ॥ स्वयें मुकिजे जीवितां ॥ पाहून तेथिंची अवस्था ॥ आनंद चित्तां दाटला ॥ ५० ॥ स्वरूपप्राप्तीचा उपाय ॥ हें साधन

येस्थळीं आहे ॥ तेथून उतरोनि लवलाहें ॥ बदरी पाहे पैं जावें ॥ ५१ ॥ यापरी तो घाट ॥ उतरोनि अतिउद्भट ॥ लक्षोनि बदरिकाश्रम वाट ॥ झडझडाट चालिले ॥ ५२ ॥ जाऊन बद्रिकाश्रमनिकटीं ॥ पाहोनि तें स्थान दृष्टीं ॥ नारायण ऐश्वर्य गोमटी ॥ देखतां पोटीं संतोषला ॥ ५३ ॥ घरोघरीं भक्तिसौरस ॥ नामस्मरणाचा उल्हास ॥ अहर्निशी सावकाश ॥ वर्णिती यश नारायणाचें ॥ ५४ ॥ श्रीनारायण पूर्णावतार ॥ चरित्र जें अतिपवित्र ॥ सर्वदा घोष गजर ॥ करिती निरंतर निजनिष्ठा ॥ ५५ ॥ भक्तिउत्कर्षलीळा ॥ नाथ देखतांचि डोळां ॥ आनंदाश्रु प्रेमकळा ॥ सुखाचा सोहळा होतसे ॥ ५६ ॥ श्रीकृष्ण बोधें उद्धवासीं ॥ वास्तव्य जालें होतें तयांसीं ॥ त्याचि स्थिति याजनासीं ॥ देखोनि आचरणासीं लागली ॥ ५७ ॥ आधींच पूर्णावतार समर्थ ॥ श्रीनारायण असे जेथ ॥ नारद सनकादिक तेथें ॥ सदैव येत दर्शना ॥ ५८ ॥ त्याहीवरी उद्धव आपण ॥ श्रीकृष्णकृपा निपुण ॥ पावोनियां ब्रह्मज्ञान ॥ येथें येऊन राहिला ॥ ५९ ॥ तयाची लोकसंग्रहस्थिती ॥ आचरला सद्गुरुभक्ती ॥ वैराग्ययुक्त नामकीर्ती ॥ प्रकाशली निश्चिती तयांनीं ॥ ६० ॥ त्याच रीति तेथील जन ॥ भक्तीसीं वोपिला प्राण ॥ अहर्निशीं श्रवण पुराण ॥ करी कीर्तन अनुरागें ॥ ६१ ॥ लक्षून तेथींच्या लक्षणा ॥ नाथासीं आल्हाद चौगुणा ॥ घेऊन नारायणदर्शना ॥ आपआपणां अतिप्रीती ॥ ६२ ॥ नारायण तोचि श्रीनाथ ॥ मुळींचा बोध यथास्थित ॥ आपुलेचि सुखभोगार्थ ॥ देवभक्त होत निजआवडी ॥ ६३ ॥ नचुकोनि मुळींच्या खुणा ॥ भक्तिसुख विलास नाना ॥ दाऊन येवढा महिमा ॥ दीनोद्धारा अवतरसी ॥ ६४ ॥ श्रीनाथ आणि नारायण ॥ स्वरूप एकनामे भिन्न ॥ जनीं जनार्दन परिपूर्ण ॥ आवडी जाण भोगिती ॥ ६५ ॥ यापरी तेथील स्थिती ॥ पाहून पावला विश्रांती ॥ धन्य धन्य हरिभक्ती ॥ ह्मणोनि वस्ती उतरला ॥ ६६ ॥ नित्य आनंदाची वृद्धी ॥ होत सुखाची समृद्धी ॥ विशेष आदराची बुद्धी ॥ स्वयें प्रसिद्धी दाविली ॥ ६७ ॥ तेथिल्या वस्तीचा उल्हास ॥ नाथासी जाला बहुवस ॥ सद्गुरु आज्ञासौरस ॥ आठवण नेमास नेमिलें ॥ ६८ ॥ जनार्दनाचें दर्शन ॥ मागुते न पाहावी मूर्ती सगुण ॥ हे आठवली निज आठवण ॥ ह्मणोनि पुनरागमन योजिलें ॥ ६९ ॥ यापरि तेथील महिमा ॥ पाहोनि परमार्थरूप गरिमा ॥ आत्मत्वें शांतउनी प्रेमा ॥ झाली सीमा आठवणीची ॥ ७० ॥ वंदूनि नारायण चरणां ॥ करूनियां प्रदक्षिणा ॥ आतां येथून पुनरागमना ॥ द्वारावती स्थाना नेमिलें ॥ ७१ ॥ नारायणाची निजस्थिती ॥ तेथील भगवद्भक्तीची रीती ॥ अतिशय आवडली चित्तीं ॥ त्याचि मार्गाप्रती आठवे ॥ ७२ ॥ यापरि कंठून पंथ ॥ श्रीनाथ द्वारकेसी येत ॥ गोमतीसी पाहुनि चित्त ॥ रमलें सुनिश्चित ते ठाईं ॥ ७३ ॥ द्वारकेची पाहून शोभा ॥ दृष्टी

न परते ऐसी प्रभा ॥ नयनी नयना निघती शोभा ॥ अतिवल्लभा जीवासीं ॥ ७४ ॥ पाहोनियां तें स्थान ॥ अतिशय जालें समाधान ॥ जेथें श्रीकृष्ण स्वयें आपण ॥ सच्चिद्घन विराजला ॥ ७५ ॥ श्रीकृष्ण अवतारकीर्ती ॥ जेथूनि प्रगटे त्रिजगतीं ॥ तेथिल्या आरचणाची स्थिती ॥ अभिनव भक्ति जनाची ॥ ७६ ॥ सकळां श्रीकृष्ण प्रतीति ॥ गिरा हरिगुण गजरें गाती ॥ नामस्मरण अहोरातीं ॥ आन भोगिती भक्तीचा ॥७७॥ देवालयीं घवघवीत ॥ श्रीकृष्णमूर्त्ती विराजत ॥ श्रीनाथ येऊनि तेथ ॥ दर्शन घेत निजरूपीं ॥७८॥ कृष्ण गेलिया निजधामां ॥ अद्भुत तेथील महिमा ॥ जनासि नामीं अति प्रेमा ॥ वृत्ति निष्कर्मा वर्त्तती ॥७९॥ सुखावले निजचित्तें ॥ कीर्तनीं गाती श्रीहरीतें ॥ नरनारी मिळोनि समस्तें ॥ त्रिकाळ दर्शनातें पैं घेती ॥ ८० ॥ सहजचिये निजगती ॥ अखंड परमार्थपर वर्त्तती ॥ देही असोनि विदेहस्थिती ॥ गाती नाचती अतिरंगें ॥ ८१ ॥ ऐसिया अतिप्रीती ॥ आरत्या घेवोनियां ह्मतीं ॥ पाहोनि श्रीकृष्णमूर्त्ती ॥ वोंवाळिती निजप्रेमें ॥ ८२ ॥ टाळविणा मृदंगभेरी ॥ वाजऊन अतिगजरीं ॥ सर्वेचि गाती मधुरस्वरीं ॥ प्रेम पडिभारीं डुल्लती ॥ ८३ ॥ कीर्तनीं गाती कृष्णयश ॥ पवाडे वर्णिती सावकाश ॥ नाना चरित्रें विलास ॥ श्रीकृष्ण परेश संतोषविती ॥ ८४ ॥ तेथींची देखून मात ॥ श्रीनाथासीं हर्ष अद्भुत ॥ ह्मणें धन्य क्षेत्राचें वृत्त ॥ जनसमस्त परमार्थी ॥ ८५ ॥ श्रीकृष्णभक्तीचा भाव ॥ येथें विशेष अपूर्व ॥ धन्यधन्य सर्व जीव ॥ भक्तीचा गौरव जयांचा ॥ ८६ ॥ आनंदली निजस्थिती ॥ वसोन तेथील वस्ती ॥ जिवीं मानून तेथील रीती ॥ विशेष राती क्रमियेल्या ॥ ८७ ॥ उत्तर मानसयात्रा ॥ पाहिलें सर्व तीर्थक्षेत्रां ॥ आतां जावयाच्या विचारा ॥ निजअंतरा आणिलें ॥ ८८ ॥ तेथून आतां पुनरागमन ॥ अवश्य करावें आपण ॥ आठऊनि सद्गुरुखूण ॥ केलें गमन दक्षिणे ॥ ८९ ॥ मार्गीं तीर्थक्षेत्र भेटत ॥ क्रमें तेंही अवलोकित ॥ क्रीडाकौतुक विचरत ॥ दक्षिणपंथ आक्रमी ॥ ९० ॥ गुर्जरदेशीं जुनाटगड ॥ क्रमून मार्ग अवघड ॥ दृष्टी पाहून तेथींचें कोड ॥ येत प्रौढ प्रतापी ॥ ९१ ॥ दक्षिणमानस अटण ॥ मुख्य स्थान प्रतिष्ठान ॥ आणि जन्मभूमी पवित्रपूर्ण ॥ पाहावया मन उदित जालें ॥ ९२ ॥ आक्रमूनि उत्तराटणा ॥ श्रीनाथ आले प्रतिष्ठाना ॥ येथून अवतारचरित्र नाना ॥ दाखऊनि जनां उद्धरी ॥ ९३ ॥ तीं पवित्र कथाचरित्रें ॥ श्रीनाथकृपासूत्रें ॥ चाळकत्वें केशववक्त्रें ॥ वदवील साचार तें ऐका ॥ ९४ ॥ नाथ येऊनि गंगातिरीं ॥ देखूनि समुदाय नरनारी ॥ वोळखी पुरेल ह्मणोनि दुरी ॥ उतरे पिंपळेश्वरीं एकांती ॥ ९५ ॥ सारूनि स्नानादि बाह्यधर्म ॥ आचरोनि संध्यास्वकर्म ॥ माध्यान्हीं करोनि प्रवेशग्राम ॥ यथानुक्रमें निष्कामीं ॥ ९६ ॥ सहजावस्थेचिया अटणीं ॥ यदृच्छा मिळे जें भोजनीं ॥ तें सुखें स्विकारोनी ॥ निजसमाधानी वर्त्तत ॥ ९७ ॥ घड गोड पदार्थ

आशा ॥ सहसा नाहीं पूर्णपुरुषा ॥ दावी विदेह कैवल्यदशा ॥ सदा निराशा मानसीं ॥ ९८ ॥ ग्रामांतरीं सहजावस्था ॥ जात असतां श्रीनाथा ॥ वृद्धें आजा आजी उभयतां ॥ तये संधितत्वतां भेटलीं ॥ ९९ ॥ पाहूनि श्रीनाथासीं ॥ प्रौढी आली देहासीं ॥ होय नव्हे संदेहासीं ॥ पुसावयासी उदीत ॥ १०० ॥ नाथ जातां शिघ्रगती ॥ धांवूनियां जवळीं येती ॥ नाम पुसतां तयाप्रती ॥ मौनस्थिति राहिला ॥ १ ॥ तंव उभयतांचें मन ॥ निःसंदेह आली खूण ॥ लक्षोनियां तयाचें वदन ॥ असुवें नयन पूर्ण झाले ॥ २ ॥ ह्मणती बापा एकनाथा ॥ कां न बोलसी आतां ॥ कठोर केलें निजचित्ता ॥ माया तत्वतां सांडिली ॥ ३ ॥ आह्मां वृद्धां अनाथांसीं ॥ दुःखी टाकूनी तं गेलासी ॥ आजि दैवें सांपडलासी ॥ कां रुसलासी विसांविया ॥ ४ ॥ आयकोनी मायिक जल्पवाणी ॥ त्या उभयतांची अति ग्लानी ॥ नाथ निजरूप अनुसंधानी ॥ सहसा मनीं नये मोह ॥ ५ ॥ कैशा परी उमजेल आतां ॥ ऐसी उभयतां चिंता ॥ पत्र देऊनि तत्वता ॥ पाहावें अर्था बोलती ॥ ६ ॥ घेऊनि जनार्दनाचें नांव ॥ पत्र काढिलें स्वयमेव ॥ पाहूनि गुरुहस्ताक्षर अपूर्व ॥ आला सद्भाव वंदनार्था ॥ ७ ॥ हातीं घेऊनि पत्रिका ॥ स्वयें वंदिली निजमस्तका ॥ वाचितांची भावपूर्वका ॥ सर्व अवांका राहिला ॥ ८ ॥ गुरुआज्ञा नेमस्त ॥ या उभयतांचें रक्षूनि चित्त ॥ तेथेंचि राहावें स्वस्थ ॥ परिपूर्ण व्रत याचेनी ॥ ९ ॥ परिसोनि गुरु आज्ञार्था ॥ उभयतांचें चरणीं माथा ॥ ठेऊनि तेथेंची स्वस्थता ॥ बैसला तत्वता निजनिष्ठा ॥ ११० ॥ संपऊनि तीर्थाटण ॥ तेथेंचि बैसला धरूनि मौन ॥ अंगीं ऐश्वर्याचें लक्षण ॥ न डळमळी मन सर्वथा ॥ ११ ॥ द्वंद्व बाधा शीतउष्ण ॥ नबाधी तया भूकताहान ॥ सहज समाधि लक्षण ॥ हें पूर्णपण तयाचें ॥ १२ ॥ यापरी श्रीनाथमूर्ती ॥ गुरु आज्ञेचिये स्थिती ॥ उभय वृद्ध समाधानार्थी ॥ निजनिश्चिती राहिला ॥ १३ ॥ पुढील चरित्र अनुसंधान ॥ वसऊन क्षेत्र प्रतिष्ठान ॥ जेंजें होय जन उद्धरण ॥ तें निरोपण परिसावें ॥ १४ ॥ वायूचा संचार होतां ॥ धुमारा धुमों लागे तत्वतां ॥ नव्हे त्याची स्वतंत्रता ॥ तेवीं वदनीं वक्ता श्रीगुरु ॥ १५ ॥ परतंत्रता वैखरी ॥ वदों लागे या अक्षरीं ॥ गुरुकृपा काय न करी ॥ मूर्खही परी बोलवीत ॥ १६ ॥ शिळातरती सागरीं ॥ रामनामीं अगाध थोरी ॥ तेथें बोलावया वैखरी ॥ कायपरी नवलाव ॥ १७ ॥ मुकें होय वाचाळ ॥ गुरुकृपेचें ऐसें बळ ॥ श्रीनाथऐश्वर्य सकळ ॥ होय विव्हळ निजबोध ॥ १८ ॥ एकनाथकृपापुष्टी ॥ नवल या महाराष्ट्रगोष्टी ॥ चरित्रकथा पवित्र सृष्टी ॥ करवी वाग्पुटी केशव ॥ १९ ॥ इतिश्रीएकनाथचरित्रेनाथप्रतिष्ठानआगमनोनामसप्तमोध्यायः ॥ श्रीएकनाथार्पणमस्तु ॥ श्रीजनार्दनार्पणमस्तु ॥

---

# अध्याय आठवा.

श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ नमन श्रीगुरुचरणा ॥ जेणें मनपूर्णकामना ॥ आचरलासी चरित्रें नाना ॥ तीं या वदनें वदविसी ॥ १ ॥ गाइलेच गुण गातां ॥ धणी न पुरेचि तत्वता ॥ श्रीकृष्णकृपेची लाघवता ॥ किती आतां वदावी ॥ २ ॥ तोचि तूं परिपूर्णस्थिती ॥ बैसलासी दृढव्रतीं ॥ जनार्दनकृपा निजसंविती ॥ स्वानंदचित्तीं अभिनव ॥ ३ ॥ आजा आणि आजी दोन्ही ॥ वैराग्य दृढता लक्षुनी ॥ स्वयें आश्चर्य करिती मनीं ॥ ह्मणती काय निदानीं दैवींयाच्या ॥ ४ ॥ आह्मीं तंव मुळीं निर्दैव ॥ याचिये आशे धरून जीव ॥ राहिलों आतां अभिनव ॥ धरिली हांव पैं येणें ॥ ५ ॥ याची आणि आमुची चिंता ॥ सर्वस्वें आतां पंढरिनाथा ॥ ऐसे शांतऊनि चित्ता ॥ धैर्यें तत्वतां राहिलीं ॥ ६ ॥ गुरूचें पत्र पावलें जेथें ॥ तेथेंचि बैसे आज्ञांकित ॥ गुरुब्रह्मअभेदत्व ॥ स्वयें दावित निजस्थिती ॥ ७ ॥ यापरि श्रीएकनाथ ॥ मौनेंचि बैसला स्वस्थ ॥ मनीं भावना भावित ॥ जन निश्चित जनार्दन ॥ ८ ॥ गुप्त तोचि प्रगट जनीं ॥ वार्ता जाली कर्णोपकर्णी ॥ जन येऊन पाहती नयनीं ॥ आश्चर्य मनीं मानिती ॥ ९ ॥ पूर्ववयीं ऐसी स्थिती ॥ ह्मणती भगवत्कृपेची प्राप्ती ॥ जाली असे सुनिश्चिती ॥ वैराग्यवृत्ति अभंग ॥ १० ॥ निवासस्थान आणि आहारार्थ ॥ जन विनविती जे समर्थ ॥ निजस्थिति मौनस्थानार्थ ॥ देखोनि समस्त विचारिती ॥ ११ ॥ देव सूत्रधारी लाघवी एक ॥ सकळांतरीं हा प्रेरक ॥ परस्परें भावपूर्वक ॥ बोलती एकमेकांसीं ॥ १२ ॥ हा तंव गुरु आज्ञांकित ॥ येथेंचि बैसलें चित्त ॥ भगवंताचें मनोगत ॥ जाणोनि त्वरित करा ॥ १३ ॥ येचि स्थळीं कांहीं छाया ॥ सांप्रतची करूनियां ॥ उष्ण न बाधी योगिराया ॥ त्या उपाया योजावें ॥ १४ ॥ आहारालागिं यासीं ॥ येथेंचि पाठवावें अन्नासी ॥ करूनि ऐसिया विचारासीं ॥ शीघ्रतेसीं योजिलें ॥ १५ ॥ ऐसियापरी कितेक दिवस ॥ मौनस्थ राहिला महा पुरुष ॥ जनासी त्याचा अतिउल्हास ॥ नित्य दर्शनास पैं येती ॥ १६ ॥ भाविक सात्विक साधकजन ॥ येऊन घालती लोटांगण ॥ मनींचा भावार्थ पूर्ण ॥ कांहीं वचन पैं बोले ॥ १७ ॥ सदैव श्रीनाथ आपण ॥ मनींचि आठवी जनार्दन ॥ अंतरीं भरलें स्वरूप पूर्ण ॥ तें उचंबळोन वाचे निघे ॥ १८ ॥ श्रीजनार्दन नामस्मरण ॥ सहज निघे मुखांतून ॥ परिसोन श्रोतेसज्जन ॥ पावती सुख अंतरीं ॥ १९ ॥ गुरुभक्तीची परिपूर्णता ॥ प्राप्ति आली याचिया हाता ॥ ते स्थिति आणि सत्पुरुषता ॥ वर्णिती सर्वथा भावार्थी ॥ २० ॥ भाव जडला श्रीनाथासी ॥ प्रीती वाढतसे अहर्निशीं ॥ विचारून येरयेरासी ॥ कामवाडियासी लाविती

॥ २१ ॥ जेथेंचि बैसला निजवृत्ती ॥ तेथेंचि आश्रमासी करिती ॥ शीघ्रकाळें यथापद्धती ॥ वाडा निश्चिती पैं जाला ॥ २२ ॥ आजी आणि चक्रपाणी ॥ तेथेंचि राहिला संनिधानी ॥ अन्नसंस्था भाविकजनीं ॥ भावें करोनी पैं केली ॥ २३ ॥ येथवरी पाहोनि भाव ॥ तयाच्या उद्धारीं लाघव ॥ कीर्तन एकादशीस अपूर्व ॥ स्वयमेव आरंभिलें ॥ २४ ॥ धृपद धरावया आपण ॥ श्रीकृष्ण होऊनि ब्राह्मण॥ आला अति प्रीति करोन ॥ सेवेलागून नाथाच्या ॥ २५ ॥ अंगें नाथाचें कीर्तन ॥ त्यावरी साहित्य करी कृष्ण ॥ तेथील ऐकतां श्रवण ॥ समाधी संपूर्ण श्रोतियां ॥ २६ ॥ लोटले कित्येक दिवस ॥ पुढें आला श्रावण मास ॥ वद्य अष्टमी कृष्णजयंतीस ॥ उत्साहास नेमिलें ॥ २७ ॥ घरोघरीं तेंचि कथन ॥ ह्मणती धन्य त्याचें सत्पुरुषपण ॥ कीर्तनीं होत समाधिस्थ मन ॥ ऐसें कीर्तन दुजें नाहीं ॥ २८ ॥ यापरी लोकसंग्रहता ॥ होय ऐसी हे वार्ता ॥ ब्राह्मणमुखें जनार्दनपंता ॥ आली तत्वतां देवगिरीसीं ॥ २९ ॥ ज्ञानवैराग्य भक्तियुक्त ॥ स्वयें आचरोनी देखलावित ॥ ऐकोनि जनमुखींची मात ॥ आनंदे चित्त सद्गुरूचें ॥ ३० ॥ उत्तरमानस अटण ॥ जालें तयाचें संपूर्ण ॥ पत्राप्रमाणें राहून ॥ यापरी जन उद्धरी ॥ ३१ ॥ तयासी पाहावया दिठी ॥ हेत जनार्दनाचे पोटीं ॥ एकवेळ तेथील राहटी ॥ घेऊन भेटी पाहावी ॥ ३२ ॥ कृष्णजयंती उत्साहासी ॥ तेथेंचि करावें प्रतिवर्षीं ॥ प्रयाण करून सत्वरेसी ॥ प्रतिष्ठानासी पावला ॥ ३३ ॥ सर्व साहित्य राजसंपत्ती ॥ सवें घेऊन सद्गुरुमूर्त्ती ॥ पावले नाथद्वाराप्रती ॥ नवल देखती निजनयनें ॥ ३४ ॥ हातीं त्रिशूळ लखलखित ॥ श्रीदत्तात्रयमूर्त्तिमंत ॥ स्वयें काष्टधर होत ॥ द्वारसंरक्षीत नाथाचें ॥ ३५ ॥ देखोनि चमत्कार मनीं ॥ ह्मणे कैसी हो अघटित करणी ॥ साष्टांगें नमस्कारुनी ॥ कर जोडुनी राहिला ॥ ३६ ॥ कंठ झाला सद्गदित ॥ नेत्रीं प्रेमाचा पूर येत ॥ स्फुरण मावळलें जेथिच्या तेथ ॥ अति तटस्थ चित्तवृत्ती ॥ ३७ ॥ त्द्दयीं कवळुनी जनार्दना ॥ श्रीदत्त करी सावधान ॥ एकनाथ अधिकारलक्षण ॥ करीत वर्णन निजमुखें ॥ ३८ ॥ हा पूर्णावतार जगदीश ॥ धर्मसंस्थापन उद्देश ॥ घेऊनियां मनुष्य वेष ॥ भक्तिमहिमेस वाढवी ॥ ३९ ॥ द्वार संरक्षण याचें ॥ नवल नव्हे हें तयाचें ॥ पाहूनि कनिष्ठ सेवेचें ॥ आर्त मनीचें माझिया ॥ ४० ॥ या याश्चर्याची विव्हळता ॥ त्वां न अणावी चित्ता ॥ शांतउनी निजभक्ता ॥ ह्मणे सुचनार्थी जातसों ॥ ४१ ॥ श्रीदत्त लाघवी पूर्ण ॥ धरूनियां मनुष्यपण ॥ श्रीनाथासीं निवेदन ॥ जनार्दन आगमन पैं केलें ॥ ४२ ॥ शब्द ऐकतांचि कानीं ॥ थोर आल्हाद झाला मनीं ॥ त्वरित येऊन लोटांगणीं ॥ लागला चरणीं दंडप्राय ॥ ४३ ॥ सद्गुरुनें अतिप्रीती ॥ उचलोनि दोहीं हातीं ॥ आलिंगुनी सुखस्थिती ॥ धन्य ह्मणती निजमुखें ॥ ४४ ॥ दत्तज-

नार्दन श्रीनाथ ॥ एकचिपरी त्रिविध भासत ॥ संपादुनी अवतारकृत्य ॥ जनीं विचरे स्वलीळा ॥ ४५ ॥ यापरी सद्गुरुमूर्ती ॥ आणोनि मंदिरा अतीथी ॥ बैसउनी आसनाप्रती ॥ कुशळ एकांतीं निवेदिलें ॥ ४६ ॥ सद्गुरु उपचाराची कोड ॥ अतिशय जीवीं वाढ ॥ सेवेची करी ऐसी चाड ॥ प्रेमें गोड निजभक्ती ॥ ४७ ॥ कृष्णजयंती उत्साहास ॥ साहित्य केलें होतें तेथ ॥ त्याहिमाजी अतिकृतार्थ ॥ सद्गुरु समर्थ आलिया ॥ ४८ ॥ आज्ञा पुसोनि त्वरित ॥ नवरात्रासीं आरंभित ॥ येथें कीर्तन घोष अद्भुत ॥ कीर्तनीं गात सप्रेमें ॥ ४९ ॥ सद्गुरुसवें संपत्ती ॥ उत्साहानिमित्य जे होती ॥ तेही आपुले साहित्याप्रती ॥ अनुदिनीं सारिती महोत्सवीं ॥ ५० ॥ जनार्दना बैसऊन आसनीं ॥ आपण उभा राहे कीर्तनीं ॥ भक्तिउत्कर्ष गाऊन गाणीं ॥ निरोपण वाणि हरिचरित्रां ॥ ५१ ॥ ज्याचें यश गाइजे कीर्तनीं ॥ तो स्वयें आपण चक्रपाणी ॥ श्रीनाथाचें धृपद धरोनी ॥ साहित्यालागुनी उभा राहे ॥ ५२ ॥ अप्रगट करोनि देवपण ॥ वेष धरोनि ब्राह्मण ॥ कीर्तन साह्यालागीं जाण ॥ उभा राहोन करीतसे ॥ ५३ ॥ उभयतां मूर्त्ति अनुपम ॥ कीर्तन करिती मनोरम श्रवणें जनासीं उपरम ॥ जडे वृत्ति निःसीम परमार्थीं ॥ ५४ ॥ नाथासी पुसे जनार्दन ॥ धृपद्या कीर्तनीं अति निपुण ॥ हा कोठील कोण कैसेन ॥ आला हे खूण सांगावी ॥ ५५ ॥ याचिये गुणासमान कोणीं ॥ दुजा न देखों ये मेदिनीं ॥ मधुर गायन ऐकतां श्रवणीं ॥ जाय लाजोन समाधी ॥ ५६ ॥ ऐसियापरी सुलक्षण रत्न ॥ कैसेनि प्राप्त तुजलागुन ॥ राहतें ग्राम वसतें स्थान ॥ नामाभिधान पुसावें ॥ ५७ ॥ ऐकोनि सद्गुरूची वाणी ॥ श्रीनाथ तयालागुनी ॥ विचारीत मधुरवाणी ॥ कोण कोठुनी आलासी ॥ ५८ ॥ येरू ह्मणे मीं अनाथ ॥ राहतें स्थान नाहीं नेमस्त ॥ निस्पृह अवस्था फिरत ॥ अकस्मात येथें आलों ॥ ५९ ॥ पाहोनि येथील आचार रीत ॥ मज संतोष जाला बहुत ॥ कीर्तनीं गावया हर्षयुक्त ॥ आवडी अद्भुत मजलागीं ॥ ६० ॥ देहनाम विठ्ठल ह्मणती ॥ कुळ तरी ब्राह्मण याती ॥ आवडी धरून तव संगती ॥ कथा कीर्त्ती अनुवादां ॥ ६१ ॥ ऐकोनि तयाचा वृत्तांत ॥ जनार्दन आनंदभरित ॥ ह्मणे तुझिया साह्यार्थ ॥ भगवंत धाडी पैं यासी ॥ ६१ ॥ यापरी उत्साहजन्माष्टमी ॥ होत उल्हास संभ्रमीं ॥ अति उत्कर्ष हरिच्या नामीं ॥ प्रतिपाद्य धर्मीं अतिश्रेष्ठ ॥ ६३ ॥ निपजउनी उत्तम अन्न ॥ दोन सप्तकें संतर्पण ॥ तृप्ति पावोनी ब्राह्मण ॥ सुखसंपन्न पैं झाले ॥ ६४ ॥ गोपाळकाला आणि ललित ॥ विठ्ठल साह्य श्रीनाथ ॥ करितां अतिउल्हास तेथ ॥ रस अद्भुत मजला ॥ ६५ ॥ श्रवणें जनार्दनासी सुख ॥ उसळलें अधिकाधिक ॥ श्रोते भावार्थी जनलोक ॥ होती एकमुख तेकाळीं ॥ ६६ ॥ सांडूनि गृहकृत्य व्यापार ॥ कथेसी येती निरंतर ॥ श्रवणीं बैसोनि सादर

आल्हादकर पैं होती ॥ ६७ ॥ ब्रह्मानंदाचा गोंधळ ॥ सोंग संपादणी गोपाळ ॥ होऊनि खेळती खेळ ॥ लाघव नवल नाथाचें ॥ ६८ ॥ ऐसिया ब्रह्मसुकाळीं काळा ॥ अपूर्वहूनि अपूर्व झाला ॥ विमानीं सुरवरांचा मेळा ॥ पाहाती लीळा नाथाची ॥ ६९ ॥ त्या सुखाची सुखप्राप्ती ॥ दुर्लभ ब्रह्मादिकांप्रती ॥ नाथकृपा मानवी भोगिती ॥ दैववाणि ती स्वर्गस्थ ॥ ७० ॥ कलियुगीं नरदेहप्राप्ती ॥ अति दुर्लभ भगवद्भक्ती ॥ धन्य धन्य सत्संगती ॥ देव वांच्छिती मृत्युलोक ॥ ७१ ॥ ऐसिया सुखाचा सोहळा ॥ जनार्दनें पाहूनि डोळां ॥ मनोधर्मीं अतिनिवाला ॥ प्रीतिं आलिंगिला नाथ पैं ॥ ७२ ॥ ललित करूनि समाप्ती ॥ जनार्दन पुसे जावयाप्रती ॥ तंव उभय वृद्धें विचारिती ॥ करावी विनंति जनार्दना ॥ ७३ ॥ नाथाचें व्हावें लग्न ॥ कळवळा वृद्धांसीं पूर्ण ॥ धरूनि जनार्दनाचे चरण ॥ विनीत वचनें बोलती ॥ ७४ ॥ अहो सद्गुरु दयाळा ॥ तुझिया कृपें हे लीळा ॥ परमार्थाचा सोहळा ॥ अति आगळा पाहिला ॥ ७५ ॥ आतां आमुचा मनोरथ ॥ पुरवावया तूं समर्थ ॥ नाथें लग्न करावें हा अर्थ ॥ निश्चितार्थ तव आज्ञा ॥ ७६ ॥ तुझें वचन उल्लंघून ॥ नाथ न करी अणुप्रमाण ॥ यालागीं कृपा करून ॥ नाथासी आपण आज्ञा कीजे ॥ ७७ ॥ ह्मणोनि धरीत चरण ॥ तंव कृपें आकळिला जनार्दन ॥ नाथासी बोलाऊन आपण ॥ युक्तीनें वचन प्रतिपादी ॥ ७८ ॥ म्हणे श्रीनाथा अतिसुबुद्धी ॥ येथें राहिलें पाहिजे सविधी ॥ गृहस्थाश्रम यथाविधी ॥ करूनि त्रिशुद्धि वर्तावें ॥ ७९ ॥ विना आश्रय आश्रमाचा ॥ लौकीक विरुद्ध पडेल साचा ॥ यालागीं यावचनाचा ॥ भाव वडिलांचा मनीं आणी ॥ ८० ॥ याउभयतांच्या अंगिकारा ॥ केलें पाहिजे अतिसत्वरा ॥ कोणेविशीं आग्रह बरा ॥ नाहीं अधिकारा तुझिया ॥ ८१ ॥ होणार न चुके प्रमाणीं ॥ यालागीं नाथ राहिला मौनी ॥ जैसें ठेवील चक्रपाणी ॥ काय हानी त्यामाजीं ॥ ८२ ॥ देहाच्या माथां प्रारब्ध ॥ देह तंव स्वप्न प्रसिद्ध ॥ तेथिंचा हर्षविषाद ॥ मज संबंध काय याचा ॥ ८३ ॥ इतुकें राहिलें आतां ॥ आज्ञांकित असावें गुरुनाथा ॥ जनार्दनें तुकोन माथा ॥ म्हणे पूर्वावस्था जाणवली ॥ ८४ ॥ अतिहर्ष मानूनि मनीं ॥ पूर्ण झाली मनीं शिराणी ॥ जनार्दन पुसे निरोपालागुनी ॥ जावया स्वस्थानीं आपुल्या ॥ ८५ ॥ ह्मणे पाहून तुझी लीळा ॥ सुखें झालों अति आगळा ॥ याच रीति क्रमून काळा ॥ प्रेमकळा रक्षावी ॥ ८६ ॥ नाथें माथा ठेऊन चरणीं ॥ ह्मणे हे समस्त कृपेची करणी ॥ वियोगबाधा येथुनी ॥ सहसा मनीं न यावी ॥ ८७ ॥ निज निजरूप ऐक्यता ॥ न भंगो कदांही आतां ॥ ऐसा वर असावा तत्वता ॥ ते निजात्मता सदोदित ॥ ८८ ॥ अवश्य ह्मणोनि जनार्दन ॥ कृपाकर मस्तकीं ठेऊन ॥ सर्वांसी पुसोनि आपण ॥ स्वस्थाना जाण पैं गेला ॥ ८९ ॥ मार्गीं विचार करी मनीं ॥ ह्मणे अघटित हे अवतारकरणी ॥ श्रीदत्त द्वारपाळ होउनी ॥ तिष्ठे अनुदिनी सेवेसी

॥ ९० ॥ ऐसिया पूर्णतेचा हर्ष ॥ जनार्दना मनीं विशेष ॥ देखोनि कृतकार्य विलास ॥ खनेमास नेमिलें ॥ ९१ ॥ प्रगट होती देहाकृती ॥ ते जाऊन देवगिरीप्रती ॥ गुप्त जाहला निजस्थितीं ॥ स्वलीळागति हे त्याची ॥ ९२ ॥ ऐकोनियां हा वृत्तांत ॥ जन समस्त आश्चर्य करित ॥ प्रभुही होऊन विस्मित ॥ प्रताप वर्णीत जनार्दनाचा ॥ ९३ ॥ येरीकडे प्रतिष्ठानीं ॥ समस्त जन बोलती वचनीं ॥ गुरुशिष्य उभयतां जनीं ॥ दुर्लभपणीं देखिजे ॥ ९४ ॥ याचिया ऐसा परमार्थ ॥ कोठेंही नसेल हा अर्थ ॥ धन्य धन्य हे समर्थ ॥ चरित्र अद्भुत पैं यांचें ॥ ९५ ॥ येथून श्रीनाथ अवतारकीर्ती ॥ प्रगट होत भाविकांप्रती ॥ पुढील चरित्र उत्कर्ष भक्ती ॥ करील निश्चिती जाणावें ॥ ९६ ॥ केशव जिवीं अतिकोड ॥ निरोपण व्हावें अतिगोड ॥ श्रवणें श्रोतियांची चाड ॥ सरे हा निवाड पैं व्हावा ॥ ९७ ॥ या विनंतीचें आर्त ॥ पुरवावया अतिसमर्थ ॥ तंव संत ह्मणती हा अर्थ ॥ श्रीएकनाथ बोलवीत ॥ ९८ ॥ तुझिया बुद्धीचा प्रेरक ॥ एकनाथची असे देख ॥ ह्मणोनी कथेचें कौतुक ॥ सुखदायक होतसे ॥ ९९ ॥ संतवचन ऐकोनि कानीं ॥ केशव संतोषला मनीं ॥ कायावाचा मनींहोनी ॥ शरण एकपणीं एकनाथा ॥ १०० ॥ पुढील कथानुसंधान ॥ श्रीनाथाचें होईल लग्न ॥ तो सोहळा संपूर्ण ॥ कीजे श्रवण श्रोतेजनीं ॥ १०१ ॥ इतिश्रीएकनाथचरित्रेजन्माष्टमीउत्साहवर्णनंनामअष्टमोध्यायः ॥ श्रीरामचंद्रार्पणमस्तु ॥ श्रीएकनाथार्पणमस्तु ॥

---

12562

## अध्याय नववा.

श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ आठऊनि सद्गुरुपायां ॥ विनंति करीतसे श्रोतियां ॥ एकाग्र मन बैसोनियां ॥ पवित्र चरित्रा या ऐकिजे ॥ १ ॥ नसतां संस्कृत प्राकृत मूळ ॥ चरित्रें होतीं हीं समूळ ॥ येथें सद्गुरुकृपा प्रांजळ ॥ होय विव्हळ हा बोध ॥ २ ॥ चरित्राचें नसतां बोध मनन ॥ आठवितां श्रीचरण ॥ स्वयेंचि जीवीं प्रगटोन ॥ करवी लेखन निजसत्ता ॥ ३ ॥ जेवीं सूत्रधाराचिया सत्ता ॥ पुतळ्या नाचती परतंत्रता ॥ तेविं हे जाणावी कथा ॥ वदनीं वदविता श्रीनाथ ॥ ४ ॥ जनार्दन गेलिया निजधामा ॥ भाविकजन भावसीमा ॥ लग्नसिद्धीचिया नेमा ॥ उदित उत्तमा रितीते ॥ ५ ॥ वृद्धांसी ह्मणती न करा चिंता ॥ श्रीहरि साह्य असतां ॥ लग्नमासतिथी येतां ॥ मनोरथ आतां पुरतील ॥ ६ ॥ नाथ करील अंगिकार ॥ हाचि संदेह होता थोर ॥ गुरुआज्ञेचें उत्तर ॥ सुखकर आलें सर्वांसीं ॥ ७ ॥ निराभिमान निर्विकारस्थिती ॥ श्रीनाथासी सद्गुरुभक्ती ॥ गुरुवाक्य तुल्यश्रुति ॥ सहज चित्तीं निश्चय ॥ ८ ॥

आह्मा अज्ञान जनाप्रती ॥ विनंति न करवे नाथाप्रती ॥ चरण धरावे दृढ चित्तीं ॥ हेचि विश्रांति आह्मासी ॥ ९ ॥ नाथऐश्वर्य तेज उपमा ॥ दुजी न देखों हे प्रतिमा ॥ तुमच्या भाग्या नाहीं सीमा ॥ जो हा महिमा देखतसां ॥ १० ॥ यापरी नाथाचें संगती ॥ भाविकें अंति भावार्थी ॥ नित्य नवी वाढऊन भक्ती ॥ उद्धरती जडजीव ॥ ११ ॥ एकादशी हरिजागरीं ॥ गीत नृत्याचिये गजरीं ॥ जें सुख भोगिती अंतरीं ॥ तें या वैखरी न बोलवे ॥ १२ ॥ त्या सुखाची स्वादुता ॥ जाणती एकचि आतां ॥ जिहीं हरि गुरुभक्ति अवंचकता ॥ प्राण तत्वताही अर्पिलासे ॥ १३ ॥ तयासींच या आनंदाची ॥ गोडी मिळतसे साची ॥ तें सुख बोलीं बोलावयाची ॥ योग्यता कैंची इतरांसीं ॥ १४ ॥ गुरुभक्ताचिये चरणीं ॥ शरण असावें अनुदिनीं ॥ संगतीं त्यांचीच धरुनी ॥ निजस्तवनीं वाणावें ॥ १५ ॥ ऐसी निजानंदपरवडी ॥ भोगिती नाथाचे संवगडी ॥ ऋणानुबंधाचिया जोडी ॥ लग्न घडी हो पातली ॥ १६ ॥ कोणी ब्राह्मण सदाचारी ॥ उपवर वधु कन्या घरीं ॥ तिच्या लग्नाची जिव्हारी ॥ चिंता करी दिननिशीं ॥ १७ ॥ ब्रह्मसूत्र प्रमाणीं ॥ तयासी आज्ञा होय स्वप्नीं ॥ हे कन्या हो प्रतिष्ठानीं ॥ अर्पिजे सेवनी नाथाच्या ॥ १८ ॥ स्वप्न विवंचना करित चित्तीं ॥ प्रतिष्ठाना येऊन ब्रह्ममूर्ती ॥ पाहून नाथाची निजस्थिती ॥ अति विश्रांती वाटली ॥ १९ ॥ सर्वागुणीं परिपूर्णता ॥ आली तयाचिया चित्तां ॥ ह्मणें धन्य जन्मली दुहिता ॥ ऐसिया कांता लाधेल ॥ २० ॥ भाविकजन समुदाया ॥ आणि उभयतां वडिलां तया ॥ विचारून स्वअभिप्राया ॥ वधु अंगिकार कीजे ह्मणें ॥ २१ ॥ धरिले वृद्धांचे चरण ॥ परम ग्लानी बोले वचन ॥ घटितार्थ पाहतां विवंचून ॥ घटित संपूर्ण उतरलें ॥ २२ ॥ आलें सर्वांचिया मना ॥ मान्य करून ब्राह्मण वचना ॥ नेमून मास दिवस लग्ना ॥ सुपारी जाणा अर्पिली ॥ २३ ॥ गंगातिरीं येचिस्थानीं ॥ लग्नाचा नेम नेमुनी ॥ स्वगृहीं सांगे जाउनी ॥ भार्येलागुनी वृत्तांत ॥ २४ ॥ सर्व साहित्य सहपरिवारी ॥ जावें आपण गंगातिरीं ॥ साळंकृत कंन्यादानपरी ॥ करून निर्धारीये यावें ॥ २५ ॥ यथाशक्ति साहित्यासी ॥ करवीतसे अतिउल्हासी ॥ येरीकडे प्रतिष्ठानासी ॥ उभयवृद्धांसी आठवलें ॥ २६ ॥ आपुले कुळींचे नारीपुरुष ॥ समस्त आणावे विवाहास ॥ विचारूनि भाविकांस ॥ मूळ तयांसी धाडिलें ॥ २७ ॥ प्रतिष्ठानाहुनी अग्निकोनीं ॥ विजापूर देशस्थानीं ॥ तेथून सतरा योजनीं ॥ तये अवनी वस्ती तयां ॥ २८ ॥ समस्त संज्ञा ग्राम धाम ॥ पत्रीं लिहून अनुक्रम ॥ मनुष्य शाहाणे परम ॥ धाडिले नेम करूनियां ॥ २९ ॥ सवेग लग्न समयासी ॥ घेऊन यावें सर्वांसी ॥ तेणें जाऊन त्वरेसी ॥ कुंकुमांकित पत्रासी दीधलें ॥ ३० ॥ पत्रार्थ परिसोनि समस्तीं ॥ उल्हास मानिला चित्तीं ॥ जावयालागीं विचारिती ॥ भ्रातृपुत्रांप्रती नाथाच्या

॥ ३१ ॥ उद्धव अतिशय सुबुद्धी ॥ जावयाची करून सिद्धी ॥ मांगल्यकार्य यथाविधी ॥ ह्मणे लहानप्रबुद्धीं मिळावें ॥ ३२ ॥ उद्धवादि कुटुंब समस्त ॥ प्रयाण करून त्वरित ॥ प्रतिष्ठानीं येऊन आर्तभूत ॥ स्वयें भेटत एकमेकां ॥ ३३ ॥ श्रीनाथाची स्वरूपस्थिती ॥ पाहून चमत्कार वाटला चित्तीं ॥ ते काळीं उद्धवें अतिप्रीती ॥ साष्टांग प्रणिपात वंदिलें ॥ ३४ ॥ आनंदाश्रु आले नेत्रां ॥ सर्वेंचि बाष्प येत गात्रां ॥ नावरे प्रेमपवित्रा ॥ सत्पात्रा उद्धवा ॥ ३५ ॥ श्रीनाथें अतिप्रीती ॥ आलिंगिलें तया प्रती ॥ ह्मणे धन्य आमुची कुळकीर्ती ॥ तुझी मूर्त्ति जन्मली ॥ ३६ ॥ भानुदास कुळदीपकें ॥ पूर्वीं देव गोंविला भाकें ॥ तत्प्रसादपूर्वकें ॥ तुज देखें निजदृष्टी ॥ ३७ ॥ अपार सुखकारी निश्चिती ॥ सखा जोडला सांगाती ॥ पुढील कार्य जाणोनि निजमती ॥ शांतविली जाति प्रेमाची ॥ ३८ ॥ प्रपंचवी ज्या परमार्थ ॥ ऐसा अवतार हा समर्थ ॥ जगदोद्धारार्थ येथ ॥ स्वयें आचरत स्वनिष्ठां ॥ ३९ ॥ कुळगोत गोडी प्रसिद्धा ॥ तेणें आल्हाद उभयतां वृद्धां ॥ आलिंगुनी लहान प्रबुद्धा ॥ कुशळ संवादा पैं केलें ॥ ४० ॥ सारून स्नानभोजन पंक्ती ॥ होऊन सुख निर्भर चित्तीं ॥ लग्नसाहित्य आयिती ॥ नेमनिगुती नेमिले ॥ ४१ ॥ सर्व भांडारसाहित्य ॥ नाथप्रतापें उद्धव करित ॥ जन भाविक जे समस्त ॥ उद्धवा मानित अतिनिष्ठा ॥ ४२ ॥ येरीकडे तो ब्राह्मण ॥ सहपरिवारें वधु घेऊन ॥ साहित्य करून संपूर्ण ॥ मांडिलें लग्न अतिनिष्ठा ॥ ४३ ॥ प्रतिष्ठा करून यथाविधी ॥ उभय मंडपीं देवकसिद्धी ॥ अन्नपाक कुशळबुद्धी ॥ नारी प्रबुद्धि पैं करिती ॥ ४४ ॥ भोजन आणि दक्षणा ॥ यथा शक्ति देती ब्राह्मणां ॥ त्या नंतरें लग्नविधाना ॥ मेळवून जाणा करीतसे ॥ ४५ ॥ नाथाचिया लग्नाप्रती ॥ सर्व लोकां अतिप्रीती ॥ सकळसहित्य संपत्ती ॥ यथा पद्धति होतसे ॥ ४६ ॥ घेऊन सर्वें गृहस्थ ब्राह्मण ॥ वरासीं मूळ निघे आपण ॥ मंगळवाद्य घोषगर्जना ॥ करीत जाणा पैं आला ॥ ४७ ॥ पाटिया भरूनि रुखवतीं ॥ मंगळवाणें घेऊनि हातीं ॥ नारी सौभाग्यपंक्ती ॥ मिरवत येती वरगृहीं ॥ ४८ ॥ यापूर्वीं वधुवरांसीं ॥ हळदी लावून यथाविधीसीं ॥ करविलें मंगळस्नानासीं ॥ उभयपक्षीं सावधता ॥ ४९ ॥ वरासीं पुजून यथा रीती ॥ वस्त्रेंभूषणें नेसविती ॥ अश्वारूढ श्रीनाथमूर्ती ॥ मिरवत येती लग्नार्था ॥ ५० ॥ वर आणोन मंडपांत ॥ गृहद्वारीं मुदें वोवाळित ॥ बोहल्या निकट श्रीनाथ ॥ आणून बैसवित उल्हासें ॥ ५१ ॥ आंत्रपट ब्राह्मणांसी ॥ वेगीं सावध करा त्यासी ॥ सावधान ह्मणती जोशी ॥ एकाग्रतेसीं बैसावें ॥ ५२ ॥ लग्नघडी भरतां पूर्ण ॥ ह्मणती करा हरिचिंतन ॥ अति सावधान सावधान ॥ ह्मणोनि लग्न लाविती ॥ ५३ ॥ वाजंत्र्याचा मंगळघोष ॥ होऊं लागला अति विशेष ॥ ऐक्य केलें प्रकृतिपुरुषास ॥ हा उल्हास निजलग्नीं ॥ ५४ ॥ नाथ अक्षता स्वकरीं ॥

ठेविल्या वधूच्या माथ्यावरी ॥ येरिही ते अवसरीं॥ हात माथ्यावरी नेवों पाहे ॥५५॥ नाथाचिया निजमाथां ॥ हात न पुरेचि तत्वता ॥ मग लाजूनियां निजहिता ॥ लल्लाटीं अक्षता पैं घाली ॥ ५६ ॥ सारून लाजा होमविधान ॥ करीं बांधिलें कर-कंकण ॥ वधुवरांचें निजलग्न ॥ पाणिग्रहण पैं जालें ॥ ५७ ॥ ज्येष्ठश्रेष्ठ सोयरीं-यांचें ॥ वऱ्हाडी वऱ्हाडणी पूजेचें ॥ साहित्य करून सर्वांचें ॥ बोलविलें साचे निज-मंडपां ॥ ५८ ॥ यावरी ब्राह्मणासीं ॥ भूरिदान दक्षणेसीं ॥ वांटुनी ऐक्यसमरसी ॥ संतर्पणासी पैं केलें ॥ ५९ ॥ दुसरे दिवसीं सोहळा ॥ सोयरी यांचा निजमेळा ॥ व्याहिविहिणी आदि सकळां ॥ सुन्मुखाला प्रार्थिलें ॥ ६० ॥ भोजन प्रसंग सुन्मुख ॥ यथा रीति एकैक ॥ पाहून वधुवरांचें कौतुक ॥ निजमंडपां देख पैं आले ॥ ६१ ॥ तिसरे दिवशीं तेलवण ॥ यथाविधि वरपूजन ॥ सर्वांसीं देऊनि भोजन ॥ सुखसंपन्न राहिले ॥ ६२ ॥ चवथे दिवसीं साडे ॥ ऐरणी विस्तार पुढें ॥ समस्त गौरवुनी कोडें ॥ अति नावाडें यथास्थित ॥ ६३ ॥ घेंडा नाचवुन यथास्थितीं ॥ वधुवरां निजमंड-पाप्रतीं ॥ वाद्येंगजरें मिरवती ॥ अति प्रीति सकळिकां ॥ ६४ ॥ गृहप्रवेश लक्ष्मीपूजन ॥ यथाविधि संपादून ॥ रमायुक्तनाथ आपण ॥ सुखसंपन्न निजस्थिती ॥ ६५ ॥ यापरी प्रकृति पुरुष ॥ ऐक्यतेचा जो विलास ॥ दावूनि लोक संग्रहास ॥ स्वसंतोष निजरूपीं ॥ ६६ ॥ जन बोलती समस्त ॥ श्रीनाथ जाला गृहस्थ ॥ सोंग संपादणी यथास्थित ॥ स्वयें वर्त्तत निजबुद्धी ॥ ६७ ॥ यापरी लग्नसोहळा ॥ ब्राह्मणें करून ते वेळां ॥ पु-सोनि सोइरांसकळां ॥ आपण गेला स्वस्थाना ॥ ६८ ॥ आतां नाथाश्रमीं सकळिक ॥ सुखसंपन्न असती लोक ॥ उभयतां वडिलें कौतुक ॥ पाहूनि देख आनंदलीं ॥ ६९ ॥ गौरवून कुटुंबासीं ॥ बोळविलें लाहानथोरांसी ॥ तंव उद्धवाचे निजमानसीं ॥ हेत राहावयासी नाथचरणीं ॥ ७० ॥ सारून समस्त लग्नकार्या ॥ स्वयें वंदिलें श्रीनाथ-वर्या ॥ सेवा घडावी या उपाया ॥ विनवी लवलाह्या अति प्रीती ॥ ७१ ॥ अति नम्रता एकांतीं ॥ नाथासी केली विनंती ॥ म्यां राहावें सेवेप्रतीं ॥ हा निजमनीं उल्हास ॥७२॥ परमार्थी जयाची आस्था ॥ ऐसें जाणवलें श्रीनाथा ॥ ह्मणे धन्य उद्धवभा-ग्यवंता ॥ सुखें स्वस्थता असावें ॥ ७३ ॥ सर्वकाळीं सर्व समयीं ॥ सेवेसी सादर असे पाहीं ॥ सोडून प्रपंचाची सोयी ॥ परमार्थ उपायीं प्रवर्तला ॥ ७४ ॥ जयाचा जैसा भाव ॥ तैसाचि त्या होय देव ॥ वडिलांसीं सांगूनि अभिप्राव ॥ कुटुंबी सर्व बोळविले ॥ ७५ ॥ यापरी तो उद्धव ॥ स्वहितीं ठेवूनि निजभाव ॥ श्रीनाथ सेवा सुखानुभव ॥ राहिला उत्साह धरूनियां ॥ ७६ ॥ श्रीकृष्ण उद्धवाची प्रीती ॥ त्यांचिया उभयमूर्त्तीं ॥ संशय न मानूनि श्रोतीं ॥ कथा निश्चिती परिसावी ॥ ७७ ॥ षड्गुणैश्वर्य-संपन्न ॥ श्रीनाथ अंगीं निजभूषण ॥ परि ये अवतारीं अपूर्व चिन्ह ॥ परमार्थ परिपूर्ण

प्रगटला ॥ ७८ ॥ परमार्थ परचरित्रें पवित्र ॥ जेणें पावन होती श्रोत्र ॥ येथून आतां विचित्र ॥ लीलाचरित्र अवधारा ॥ ७९ ॥ उभयतां वडिलांची दृष्टी ॥ कृतकृत्य मानिती पोटीं ॥ श्रीनाथाची लग्नराहटी ॥ हर्षोनि गोष्टी सांगती ॥ ८० ॥ यापरी कित्येक मास ॥ उल्हासें क्रमिती सावकाश ॥ नातसून गिरिजाबाईस ॥ सांगती रीत संसारां ॥ ८१ ॥ सावधान गिरिजाबाई ॥ सत्वरचि लागली सोई ॥ सगुणसुलक्षण पाहून तीही ॥ सुख नवाई मानिती ॥ ८२ ॥ उभयतां पावोनि सुख ॥ क्रमिती काळ कितेक ॥ क्रमें देह मरणात्मक ॥ असे अवश्यक हें न चुके ॥ ८३ ॥ काळें देहासीं पावलें मरण ॥ उभयतांचें जालें अवसान ॥ निजरूपीं समावून ॥ गेलीं आपण निज-धामां ॥ ८४ ॥ गिरिजाबाईसह श्रीनाथ ॥ संसारची करून परमार्थ ॥ उद्धवसखा जवळीं परमार्थ ॥ साम्राज्य करीत प्रतिष्ठानीं ॥ ८५ ॥ श्रीनाथ कृपेचें पोसणें ॥ द्वारीं येऊन बैसले सुनें ॥ गुरु गुरु बोलोनि वदनें ॥ केशव ऐकपणें विनवीत ॥ ८६ ॥ श्रीनाथचरित्र कथा ॥ अवधान देऊन श्रोता ॥ परिसून येथींची अवस्था ॥ निजस्वार्था पावावें ॥ ८७ ॥ इतिश्री नवमोध्यायः ॥

---

## अध्याय दहावा.

श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ श्रीनाथ निज कृपादृष्टी ॥ मतीसीं होतसे निजपुष्टी ॥ तेणेंच करवित गोष्टी ॥ चरित्रें सृष्टि पावनार्था ॥ १ ॥ उद्धव सदैवाचिया दैवां ॥ श्रीनाथाची घडे सेवा ॥ आश्रमधर्म नित्योत्सवा ॥ होत बरवा निरवाहो ॥ २ ॥ अहोरात्रीं श्रीनाथ ॥ देहीं आचरे परमार्थ ॥ साधक उद्धव समर्थ ॥ साधव अर्थ निजस्वार्था ॥ ३ ॥ कथाकीर्तन नामगजर ॥ करिताती निरंतर ॥ विठ्ठल धृपद धरी सुंदर ॥ साहित्यकर जेथींचे ॥ ४ ॥ तया सुखाची मर्यादा ॥ कोणां वर्णवे त्या आनंदा ॥ भाविक विसरले संसारधंदा ॥ तेथींच्या स्वार्था जाणोनी ॥ ५ ॥ अनुभविक वेद्य-गोडी ॥ वर्णितां जिव्हा होत थोडी ॥ तेथींची साकल्य परवडी ॥ कोण्या पडिपाडीं वर्णावी ॥ ६ ॥ चढत्या पाउलीं वाढत्या प्रीती ॥ उद्धवासी अंतरभक्ती ॥ तें देखोनि नाथ सुखावे चित्तीं ॥ धन्य त्रिजगतीं तो एक ॥ ७ ॥ भानुदास पुजेप्रती ॥ श्रीविठ्ठलाची सानिमूर्ती ॥ तेचि देवार्चन यथा पद्धती ॥ सद्दढभक्ती पैं असे ॥ ८ ॥ आरंभून सदां-वृत ॥ समयीं आलिया अतिथि अभ्यागत ॥ भोजन द्यावें निश्चित ॥ यथास्थित यथा काळीं ॥ ९ ॥ सर्व साहित्य गृहस्थित ॥ उद्धव आपण स्वयें करित ॥ सावधान यथो-चित ॥ व्रत निश्चित चालवी ॥ १० ॥ आहे नाहीं हे चिंता ॥ नाहीं नाथासी अणु-मात्रता ॥ सर्व आपणचि कर्त्ता ॥ हे दक्षता तयाची ॥ ११ ॥ इतुकेंहि करूनि

आपण ॥ निराभिमानत्वें वर्तन ॥ अनुद्विग्नसुखसंपन्न ॥ करी सेवन नाथाचें ॥ १२ ॥ निशीसमयीं एकांतकाळीं ॥ बैसोनि श्रीनाथाजवळी ॥ परमार्थाची उकळी ॥ मृदुमंजुळीं बोलत ॥ १३ ॥ नाथऐश्वर्याची स्थिती ॥ कृपा व्हावी मज प्रीती ॥ सद्भावें अति भावार्थी ॥ ह्मणोनि परमार्थीं हे आस्ता ॥ १४ ॥ ऐसा हा उभयपक्ष ॥ सांभाळित उद्धव दक्ष ॥ अंतरवृत्तीचा देव साक्ष ॥ तोचि प्रत्यक्ष देवलीळा ॥ १५ ॥ सद्गुरुजनार्दन निजस्थिती ॥ स्वइच्छा लोपोनि देहंकृती ॥ निजधामा गेलियाची वदंती ॥ नाथाप्रति पैं आली ॥ १६ ॥ जनार्दनाची सर्वगतता ॥ संपूर्ण प्रतित श्रीनाथा ॥ शोकमोहादि वियोगवार्त्ता ॥ नाहीं सर्वथा किमपिही ॥ १७ ॥ मरे गुरु रडे चेला ॥ घरोवरीं बोध वहिला ॥ अभिनव याचा जिव्हाळा ॥ सर्व संचला गुरु देखें ॥ १८ ॥ नाथ निजगुज एकांतीं ॥ बोलतसे उद्धवाप्रती ॥ षष्ठीच्या महोत्सवार्थी ॥ साहित्य निश्चिती करावें ॥ १९ ॥ उद्धव करीत विज्ञापना ॥ षष्ठि कोणाचिया खुणा ॥ कृपा करोनियां जाणा ॥ बोधावें मना माझिया ॥ २० ॥ ह्मणोनि घाली लोटांगण ॥ मस्तकीं वंदिलें श्रीचरण ॥ षष्ठीचें साकल्यनिरोपण ॥ स्वमुखें आपण सांगावें॥२१॥ नाथें जाणोनि अत्यादर ॥ षष्ठीचा निजगुज प्रकार ॥ तोचि आतां सविस्तर ॥ परिसा साचार ह्मणीतलें ॥ २२ ॥ वद्य षष्ठि फाल्गुन मास ॥ श्रीजनार्दन जन्मदिवस ॥ दत्तात्रय दर्शन विलास ॥ प्राप्त त्यास तेचि दिनी ॥ २३ ॥ आह्मासीं जनार्दनाची भेटी ॥ जाली तेव्हां हेचि षष्ठी ॥ त्याचियोगें अभिनव दृष्टी ॥ सर्व सृष्टि अद्वयत्वें ॥ २४ ॥ श्रीजनार्दन स्वच्छंद गती ॥ येचिदिनी देहाकृती ॥ लोपोनियां सुखस्थिती ॥ निजधामाप्रति पैं गेला ॥२५॥ चारी पर्व निश्चित ॥ उत्साह करणें निश्चित ॥ जाणोनियां यथास्थित ॥ करावें उचित साहित्या ॥ २६ ॥ पांचवें पर्व येचि दिनीं ॥ होता पुढें देखसी नयनीं ॥ षष्ठि पंचपर्व श्रेणी ॥ विख्यात जनीं भावार्थियां ॥ २७ ॥ ऐकोनि श्रीनाथ वाणी ॥ येरें मांथा ठेविला चरणीं ॥ श्रीआज्ञा अंगिकारोनी ॥ करवी अनुदिनीं साहित्या ॥ २८ ॥ साहित्य जालें यथोक्त ॥ नाथाशीं उद्धव निवेदित ॥ तोही दिवस जाला प्राप्त ॥ उत्साह होत अतिथोर ॥२९॥ आडकाठी भोजनासी ॥ कोणांसी नसे ते दिवसीं ॥ यज्ञोपवीत मात्र सर्वांसीं ॥ आवंतिले द्विजांसी समस्तां ॥ ३० ॥ टाळविणामृदंग भेरी ॥ दिंडी आणोनि गंगातीरीं ॥ नामस्मरण गिरागजरीं ॥ मिळोनि नरनारी करिताती ॥ ३१ ॥ मध्यान्हपर्यंत गजर ॥ कीर्तनाचा महा थोर ॥ वैष्णव मेळवूनि समग्र ॥ हर्षनिर्भर गाताती ॥ ३२ ॥ त्यानंतरें वाडियांत ॥ येऊन समुदायसहित ॥ ब्राह्मणपूजन यथास्थित ॥ सांग निश्चित आरंभिलें ॥ ३३ ॥ प्रक्षाळिती ब्राह्मणचरण ॥ ल्लाटीं लाविती चंदन ॥ सर्वांगीं उटी चर्चून ॥ घाली सुमनमाळा गळां ॥३४॥ धूपदीप निरांजन ॥ पात्रें मांडूनि वाढिती अन्न ॥ ऐशा परि

संतर्पण ॥ दक्षणा देऊन पैं केलें ॥ ३५ ॥ संपलिया भोजनपंक्ती ॥ कीर्तन संभ्रम अति प्रीती ॥ नाथ स्वयें आपण करिती ॥ बैसून मूर्त्ति साधूंच्या ॥ ३६ ॥ कथा समाप्त जालिया आरती ॥ भेटती एकमेकांप्रती ॥ लोकसंग्रहार्थ स्थिती ॥ आचरोनि रीति दाविती लोकां ॥ ३७ ॥ गोपाळकाला अष्टमीसीं ॥ नगराबाहेर प्रदेशीं ॥ गंगातीरीं जनसमुदायेसीं ॥ जावोनि सावकाशीं पैं केला ॥ ३८ ॥ एवं सर्व उत्साहा साहित्य ॥ उद्धवें केलें यथास्थित ॥ त्या प्रसंगें रीण होत ॥ रुपये सात शतसंख्या ॥ ३९ ॥ एवं औदार्य आणि कीर्त्ती ॥ प्रगट जाली लोकांप्रती ॥ पुढें काय जालें तें श्रोतीं ॥ ऐकिजे प्रीति निवांत ॥ ४० ॥ उत्साह कार्यार्थ जाण ॥ उद्धवें सातशतें रुपये रीण ॥ घेऊन त्याचा रोखा लेहून ॥ नाथ नांवें आपण दिधला ॥ ४१ ॥ द्यावया केले नेमाप्रती ॥ रुपये नातुडती हातीं ॥ व्यवहारीयानें उद्धवाप्रती ॥ सूचना निश्चिती पैं केली ॥ ४२ ॥ उद्धव ह्मणे ये काळीं ॥ रुपये नाहींत हातातळीं ॥ कोठून आलिया जवळीं ॥ तेचि काळीं पावतील ॥ ४३ ॥ सावकार विचारी चित्तीं ॥ येथें नित्य संतर्पणें होती ॥ ऐसिया रीति रुपये हातीं ॥ कैसे निगुती राहतील ॥ ४४ ॥ हा व्यवहार नव्हे भला ॥ निकरें नाथाजवळीं आला ॥ रुपये द्यावे ह्मणोनि बोलिला ॥ शपथें केला निग्रहो ॥ ४५ ॥ रुपये दिध-ल्यावांचून ॥ आपण न घ्यावें अन्न ॥ ऐसें निजमुखें बोलोन ॥ गृहा आपण पैं गेला ॥ ४६ ॥ नाथ ह्मणे व्यवहार रिती ॥ तैसीच आचरावी स्थिती ॥ विषम न मानूनि चित्तीं ॥ स्वयें सारिती निजनेमा ॥ ४७ ॥ नित्य जैसी ब्राह्मणपूजा ॥ त्याच रीति अति वोजा ॥ नैवेद्य करोनि अधोक्षजा ॥ सारिलें काजा संतर्पण ॥ ४८ ॥ व्यव-हारियाचे नेमें आपण ॥ सहसा न घ्यावें अन्न ॥ सहज स्थिति समाधान ॥ सुखसंपन्न राहिला ॥ ४९ ॥ उद्धव आणि गिरिजाबाई ॥ त्याच रीति स्वनिश्चयीं ॥ सुखें विचरती स्वगेहीं ॥ उपोषित तेही तैसींच ॥ ५० ॥ शांतिक्षमाधैर्यस्थिती ॥ त्याही वरी उत्कर्ष भक्ती ॥ द्वंद्वसहिष्णता सहनशक्ति ॥ भूषणें शोभती नाथासीं ॥ ५१ ॥ अंगीं ऐश्वर्याचें बळ ॥ परि निजचित्तीं जो निर्मळ ॥ क्षुधेतृषेची हळहळ ॥ नाहीं निर्मळ निजरूपा ॥ ५२ ॥ सहज समाधानाचे स्थिती ॥ दिवस क्रमिल्या जाली राती ॥ भक्तवत्सल कमलापती ॥ चरित्र करिती तें ऐका ॥ ५३ ॥ धरूनि उद्धवाचा वेष ॥ मध्यरात्रीं सावकाश ॥ येऊन सावकार गृहास ॥ ह्मणे कवाडास उघडावें ॥ ५४ ॥ हाकेवरीं हाक मारित ॥ तंव सावकार जाला जागृत ॥ कोण ह्मणोनियां पुसत ॥ उद्धव सांगत निजनामां ॥ ५५ ॥ कपाट उघडोनि त्यासीं ॥ आणितां झाला स्वस्थ-कांसीं ॥ एवढ्या रातीं यावेळेसीं ॥ कां आलासी निवेदी ह्मणे ॥ ५६ ॥ येरू ह्मणें द्रव्य तुमचें ॥ घेऊनि आलों असें साचें ॥ मुदल आणि वाढीचें ॥ घेऊनि पत्र दीजे ॥ ५७ ॥

येरू ह्मणे एवढे रातीं ॥ पारखीं केवि पाहूं नेत्रीं ॥ दुकानीं असे वहिपत्री ॥ पाहिजे मांत्रि हिशेबा ॥ ५८ ॥ येरू बोलिला उत्तर ॥ तुमचा तो हाचि विचार ॥ तरी शपथेचा हा निर्धार ॥ नाथासीं प्रकार कां ऐसा ॥ ५९ ॥ तुमचें शपथें नाथासीं ॥ उपोषण घडलें दिवानिशीं ॥ आतां टाळाटाळी कां ऐशी ॥ हें उचितासीं अयोग्य ॥ ६० ॥ नाथाचें ऐकतां उपोषण ॥ गजबजिलें तयाचें मन ॥ प्रदीप्त दीप करून ॥ दुकान आपण उघडिलें ॥ ६१ ॥ हिशोब पाहून वहिसी ॥ मोजितां झाला द्रव्यासी ॥ तितुकेंचि गणित तयासीं ॥ पाहून आश्चर्यासीं मानिलें ॥ ६२ ॥ एक शिक्का रुपये जाण ॥ पाहून विस्मित त्याचें मन ॥ रोखा उद्धवासी देऊन ॥ निवांत आपण बैसला ॥ ६३ ॥ श्रीकृष्णें इतुकी लीळा ॥ करूनियां तया काळां ॥ रोखा ठेविला नाथाजवळां ॥ पोथींत डोळां देखावया ॥ ६४ ॥ व्यवहारी लाजोनि मनीं ॥ ह्मणे आजीची अनुचित करणीं ॥ हरिभक्तां उपोषण पाडोनी ॥ मी येऊनि जेविलों ॥ ६५ ॥ त्राहे त्राहे ह्मणोनि वाणीं ॥ विव्हळ जाला अंतःकरणीं ॥ उठीबैसी करीत शयनीं ॥ निद्रा नयनीं नयेची ॥ ६६ ॥ एवं निशी लोटली सबळ ॥ प्राप्त होतांचि उषःकाळ ॥ शौच मुखमार्जन सकळ ॥ सारूनि वेळ निरीक्षित ॥ ६७ ॥ सूर्योदय होतां प्राप्त ॥ नाथ मंदिरा ये त्वरित ॥ साष्टांग करून प्रणिपात ॥ ग्लानि करीत अपराधी मीं ॥ ६८ ॥ ह्मणे नष्ट अधम मीं एक ॥ मजपासून घडली चूक ॥ तुह्मास उपोषित ठेवून देख ॥ अविवेकी मूर्ख मीं गेलों ॥ ६९ ॥ तुह्मा ऐशा साधूप्रती ॥ क्षोभविलें म्यां दुर्मती ॥ ह्मणोनि करितसें ग्लांती ॥ विस्मय चित्तीं नाथाचिया ॥ ७० ॥ नाथ ह्मणे व्यवहार रीती ॥ ऐसीच आहे सुनिश्चिती ॥ मनीं मानावया खंती ॥ अयुक्त निश्चिती येकाळीं ॥ ७१ ॥ एतदर्थीं शास्त्रप्रमाण ॥ रिणवाई तो सुतकीपूर्ण ॥ त्या निवृत्तीस्तव हें वचन ॥ तंव मुखें जनार्दन उपदेशी ॥ ७२ ॥ त्वां न करोनि चिंता ॥ सुखें जावें गृहा आतां ॥ द्रव्य फिटल्या उपोषणव्रता ॥ पारणें त्वतां होईल ॥ ७३ ॥ श्रीनाथाची हे वाणी ॥ ऐकोनि आश्चर्य करी मनीं ॥ उद्धवा निकट जावोनी ॥ चरण नमुनी बोलिला ॥ ७४ ॥ नाथासीं आपुला वृत्तांत ॥ द्रव्य पावलें हें नसे भ्रम ॥ निवेदून उपोषणमुक्त ॥ अति त्वरित करावें ॥ ७५ ॥ उद्धव ह्मणें तयाप्रती ॥ द्रव्य दिधल्यावीण विनंती ॥ लटिकें भाषण मज हातीं ॥ पाप निश्चिती कां करता ॥ ७६ ॥ येरू ह्मणे आपुले हातें ॥ द्रव्य मोजून दिधलें मातें ॥ अर्धरात्रीं त्वरितें ॥ पत्र तुझें तूतें दिधलें ॥ ७७ ॥ आतां नवल हे गोष्टी ॥ नित्रतसे तुझिया वोटीं ॥ आधींच अभाग्य मीं सृष्टी ॥ ऐसी राहटी आचरलों ॥ ७८ ॥ आतां अपराध करोनि क्षमा ॥ जिवीं दाटला त्याचा प्रेमा ॥ मुखें ह्मणे हे रामा ॥ केविं अधमा तारिसी ॥७९॥ देखोनि त्याची अवस्था ॥ उद्धवासी हो आश्चर्यता ॥ ह्मणें अध-

टित बोलतो वार्ता ॥ काय आतां करावें ॥ ८० ॥ ह्मणोनि आला नाथाजवळी ॥ विनवूं पाहे बद्धांजुळी ॥ तंव नाथ सहज तेवेळीं ॥ पुस्तक न्याहाळी नित्य नेमा ॥८१॥ तंव रोखा आला हातांसीं ॥ वाचून पाहतां तयासीं ॥ ह्मणें हें कार्य ह्रषिकेशी ॥ केलें अवश्यतेसीं लाघव ॥ ८२ ॥ उद्धवें जंव करावी विनंती ॥ तंव नाथें पत्र दिधलें हातीं ॥ हर्ष विषाद नये चित्तीं ॥ देखिली स्थिति उद्धवें ॥ ८३ ॥ धन्यधन्य ह्मणे चित्तीं ॥ चमत्कार आला मतीं ॥ नाथाचिये सहज स्थिति ॥ बोधें निश्चिती तारिलों ॥ ८४ ॥ सावकारही ते काळीं ॥ अनुताप बोध गंगाजळीं ॥ विस्मय करून प्रेममेळीं ॥ चरणकमळीं लागला ॥ ८५ ॥ श्रीनाथ सहज विलासी ॥ आश्चर्य जालें उभयतांसी ॥ उद्धरलों ह्मणती चरणापासी ॥ सुखोद्गारेंसी वर्णिती ॥ ८६ ॥ यापरि हे लीला विचित्र ॥ जालें नवलाव चरित्र ॥ तें पाहून तयाचें नेत्र ॥ परमपवित्र पैं जालें ॥ ८७ ॥ श्रीनाथ निजस्थिति पूर्ण ॥ कमलानाथें फेडिलें रिण ॥ उद्धवासी निजसमाधान ॥ केला पावन द्रव्यार्थी ॥ ८८ ॥ दीनोद्धारी श्रीनाथ ॥ सखा सद्गुरु समर्थ ॥ सेवकाचें मनोरथ ॥ परमार्थ युक्त पुरवीतसे ॥ ८९ ॥ कथाकीर्तनाचा उत्कर्ष ॥ विठ्ठल धृपद धरी साहित्यास ॥ एक तप या आचरणास ॥ लोकसंग्रहास पैं जालें ॥ ९० ॥ यावरी जें आचरण ॥ तयाचें होईल निरोपण ॥ श्रोतीं द्यावें अवधान ॥ हे विज्ञापन केशवाचें ॥ ९१ ॥ इतिश्रीएकनाथचरित्रेदशमोध्यायः ॥

---

## अध्याय अकरावा.

श्रीरामसमर्थ ॥ नमन श्रीगुरु पायां ॥ जेणें जालों कृतकार्या ॥ देहबुद्धि समूळ माया ॥ जाय विलया तत्प्रसादें ॥ १ ॥ उद्धवनाथ ऐश्वर्यबोध ॥ लाहोनि पावला आनंद ॥ पुढील कथानुवाद ॥ श्रोतीं विषद परिसावा ॥ २ ॥ विठ्ठलरूपें ब्राह्मण ॥ धृपदधारी होता जाण ॥ गुप्त नाथसंगीं राहुन ॥ ऐकत पुराण पैं होता ॥ ३ ॥ प्रगट करावया नाथमहिमा ॥ लीलाविग्रही मेघश्यामा ॥ आवडी जाली पुरुषोत्तमा ॥ मनोरमा गोविंदा ॥ ४ ॥ कोणी एक हरिभक्त ॥ धरूनियां दृढव्रत ॥ पंढरीस बैसला नेमस्त ॥ दर्शन इच्छित विठ्ठलाचें ॥ ५ ॥ कृपाद्रवोनि श्रीहरी ॥ स्वप्नीं त्यासीं बोध करी ॥ प्रतिष्ठानीं नाथमंदिरीं ॥ ममदर्शनें अंतरीं सुखी होई ॥ ६ ॥ मी नाथाच्या कीर्तनीं ॥ टाळधारी होउनी ॥ सुखावोनि अनुदिनीं ॥ समाधानी पैं असें ॥ ७ ॥ ऐसा पाहोनि चमत्कार ॥ हर्ष जाला निर्भर ॥ प्रयाण करुनी सत्वर ॥ पावला घर नाथाचें ॥ ८ ॥ धृपदधारी ब्राह्मण ॥ देखें चतुर्भुज दैदीप्यमान ॥ हर्षें वोसंडुनी पूर्ण ॥ वंदिले चरण साष्टांगीं ॥ ९ ॥ आणिकही भक्त सज्ञान ॥ पावोनि

वाहेखूण ॥ सुखें होऊनि परिपूर्ण ॥ नाथमहिमा वर्णिती ॥ १० ॥ प्रगट होतां चमत्कार ॥ प्रवर्त्तला जयजयकार ॥ नाथमहिमा हो अपार ॥ लहानथोर वर्णिती ॥ ११ ॥ प्रेमादरें उद्धवासीं ॥ परमार्थीं आस्था होय ऐसी ॥ अहर्निशीं निजउल्हासीं ॥ श्रीमुखें श्रवणासी ऐकावया ॥ १२ ॥ पाहोनि तयाचा अधिकार ॥ आरंभिलें पुराणपवित्र ॥ श्रीभागवत आदि चरित्र ॥ परमार्थ पर सुखकारी ॥ १३ ॥ उद्धवमिसें जगदोद्धार ॥ श्रवणें पावन भाविक नर ॥ स्त्री शूद्रादि भोळीं अपार ॥ श्रवणीं सादर पैं झालीं ॥ १४ ॥ तंव विठ्ठलनाम गवसणीं ॥ रूपें धरिलीं तें लोपोनी ॥ पुराण श्रवणालागुनी ॥ स्वयें चक्रपाणी पैं आला ॥ १५ ॥ घेऊनि नाथाचें दर्शन ॥ ह्मणे ऐकोनि तुझे गुण ॥ दुरी पंथ कंठून जाण ॥ द्वारकेहुनी आलों असें ॥ १६ ॥ तुझिया संगती परमार्था ॥ श्रीमुखें श्रवणाचि आस्था ॥ धरूनि आलों निजस्वार्था ॥ कृपा समर्था करावी ॥१७॥ नाथें आलिंगुनी तयाप्रती ॥ कुशळ विचारुनी प्रीती ॥ पाक करूनि यथास्थिती ॥ सुखसंविती रहा ह्मणे ॥ १८ ॥ विदित करावें आपुलें नांव ॥ येरु ह्मणे मीं केशव ॥ परमार्थीं धरूनि भाव ॥ सेवेचा उत्साह निजमानसीं ॥ १९ ॥ स्नानसंध्या भोजन ॥ पंक्तीसीं सारूनि आपण ॥ हर्षयुक्त समाधान ॥ करित श्रवण पुराणाचें ॥ २० ॥ आधींच श्रीनाथाची वाणी ॥ त्याहिमाजीं भक्त चुडामणी ॥ उद्धव अधिकार रत्न आकर्णी ॥ सावधपणीं अत्यादरें ॥ २१ ॥ त्याहिवरी अत्यद्भुत ॥ प्रश्नवेत्ता लक्ष्मीकांत ॥ केशवनामें येउनी बुंथ ॥ सुख भोगित निजस्थिती ॥ २२ ॥ भाविक नरनारी समस्त ॥ श्रवणेंची समाधिस्थ होत ॥ भक्तसमुदाय बहुत ॥ नित्य येत अतिप्रीती ॥ २३ ॥ भक्तिज्ञान वैराग्ययुक्त ॥ व्याख्यानीं रस अद्भुत ॥ नित्य नूतन गोडी उपजत ॥ प्रेम वोसंडत श्रवणार्थियां ॥ २४ ॥ लाचावलें सुखें चित्त ॥ नित्य आनंद भोगित ॥ उत्कर्ष वाढला भक्तिपंथ ॥ नामगजर होत घरोघरीं ॥ २५ ॥ कृष्णविष्णुहरिगोविंद ॥ त्यामाजीं नाथप्रबंध ॥ गायनाचा निजछंद ॥ घरोंघरीं प्रसिद्ध पैं जाला ॥ २६ ॥ हरिनामस्मरण बहुवस ॥ नित्य करीत सावकाश ॥ कर्मधर्म प्रवृत्ति विशेष विलास ॥ सहज निरास होतसे ॥ २७ ॥ जंव जंव श्रवणीं पुरे कोड ॥ तंव तंव अधिक खवळे चाड ॥ एक भक्तीची जीवीं गोड ॥ सुखसुखाड घरोंघरीं ॥ २८ ॥ संपलिया पुराण श्रवण ॥ करितााति तयाचें मनन ॥ यापरि सुखसंपन्न ॥ दीनोद्धारण होतसे ॥ २९ ॥ याहिवरी सदावर्त ॥ समई जो ये अतित ॥ भोजन द्यावें यावत्तृप्त ॥ न विचारित कुळायाती ॥ ३० ॥ प्रतिष्ठान महाक्षेत्र ॥ काशी समान अतिपवित्र ॥ दक्षिणदेशीं महिमा थोर ॥ पावन अग्रहार शिष्टांचें ॥ ३१ ॥ सदाचारसंपन्न सुशीळ ॥ प्रवृत्ति धर्मीं अति कुशळ ॥ पूर्व-

मीमांसा व्याख्या अति कुशळ ॥ जाणोनि सकळ आचरती ॥ ३२ ॥ श्रीनाथाचें आचरण ॥ भक्तिज्ञानवैराग्य निपुण ॥ लोक प्रपंच रीतीसीं भिन्न ॥ प्रवृत्तीसीं कारण पैं नोहे ॥ ३३ ॥ अंतरीं तो मानविती ॥ बाह्यरोषातें दाविती ॥ प्रगटावया ऐश्वर्य-कीर्ती ॥ विरुद्ध करिती भावार्थी ॥३४॥ द्विजांचा कोपप्रकार ॥ परि नाथाचा जय-जयकार ॥ पूर्वीं दुर्वासविश्वामित्र ॥ जेवि अंबऋषि हरिश्चंद्र दृष्टांत ॥ ३५ ॥ द्विज ह्मणती हा एकनाथ ॥ कोठून प्रगटला येथ ॥ याचेनि योगें लोक समस्त ॥ भगवद्भक्त पैं जाले ॥ ३६ ॥ प्रपंच रीति सांडिली बहुती ॥ विचरती आत्मस्थिती ॥ आमुच्या गोष्टी न मानिती ॥ लोकीं प्रवृत्ति बुडाली ॥ ३७ ॥ घरोघरीं भक्ति उत्कर्ष ॥ रामना-माचा थोर घोष ॥ कीर्तनाचा अति उल्हास ॥ विषयीं उदास बहु जाले ॥ ३८ ॥ एकनाथ दिसे भला ॥ परि येणें संसार बुडविला ॥ निवृत्ति पर गृहस्थाला ॥ करूं लागला निजछंदें ॥ ३९ ॥ आयुःकाम पुत्रकाम ॥ तेणें व्रताचा संभ्रम ॥ जालिया आमुचा योग क्षेम ॥ चाले तो नेमची राहिला ॥ ४० ॥ कैंचा कोठील एकनाथ ॥ उगाचि आला पैं येथ ॥ भोळे मूर्ख लोक समस्त ॥ मोहिले देख पैं यानें ॥ ४१ ॥ ठकवूं आला ये वस्तीं ॥ हे तंव बरी न दिसे गती ॥ ह्मणोनि पैशुनीं वर्त्तती ॥ भिक्षु-कयाती समस्त पैं ॥ ४२ ॥ मिळोनियां पांच पंचवीस ॥ बैसोनि रिकामें चावडीस ॥ ह्मणती करोनि विचारास ॥ एखाद्या पैशुन्यास शोधावें ॥ ४३ ॥ अहो धोंड-भट्ट कोंडभट्ट ॥ वेगीं यावें शामभट्ट ॥ पाचारून गणेशभट्ट ॥ विचार निकट करा म्हणती ॥ ४४ ॥ तुमचे आमचे यजमान ॥ केवळ अज्ञान होउन ॥ संसार सोय सोडून ॥ महाराष्ट्र पुराण ऐकती ॥ ४५ ॥ स्नानसंध्येची अधिक आस्था ॥ जाली त्यांची हे अवस्था ॥ सांडून तुमची संस्था ॥ कर्म अन्यथा मांडिलें ॥ ४६ ॥ नेणों तया एकनाथें ॥ चेटक काय केलें यांतें ॥ रात्रंदिवस त्याचें मतें ॥ नुसत्या नामातें घोंकिती ॥ ४७ ॥ आह्मी वेदशास्त्रसंपन्न ॥ आम्हां न पुसती यजमान ॥ सर्वस्वें एकनाथास मानून ॥ रामकृष्ण म्हणोन नाचती ॥ ४८ ॥ सांडूनियां लोकलाज ॥ कीर्तनीं नाचती निर्लज्ज ॥ किती सांगावें हें चोज ॥ कांहीं उमज धरितीचना ॥ ४९ ॥ डोळे झांक करितां आतां ॥ प्रवृत्तिमार्ग बुडेल तत्वतां ॥ यालागीं करून ऐक्यता ॥ याचि पंथा मोडावें ॥ ५० ॥ श्रीनाथाचें छळण ॥ करूं लागले ब्राह्मण ॥ अन्याय नसतां आरोपण ॥ नाथगृहीं भोजन वर्जिती ॥ ५१ ॥ उद्धवासीं करिती वार्ता ॥ आह्मी भोजन न करूं सर्वथा ॥ येरें निवेदितां श्रीनाथा ॥ विकल्प चित्ता नुपजेची ॥ ५२ ॥ नाथ बोले आपण ॥ ब्राह्मण आज्ञा प्रतिपाळण ॥ करितां सर्वांचें कल्याण ॥ तेंचि प्रमाण पैं आह्मां ॥ ५३ ॥ ह्मणती व्यय द्रव्यासीं ॥ करितां शुद्धता तुह्मासीं ॥ नाथ ह्मणे पुण्यराशी ॥ येणेंचि आह्मासीं संग्रह ॥ ५४ ॥

जैसें सांगती द्विजवर ॥ नाथ तदर्थीं तत्पर ॥ ब्राह्मण वचना अव्हेर ॥ मनीं साचार नयेची ॥ ५५ ॥ परि ब्राह्मण अधिकची ॥ छळणा करिती तैसीची ॥ अंतरीं वस्ति दयेची ॥ तयां कैंचि द्विजवरां ॥ ५६ ॥ ब्राह्मणाचा समुदाय ॥ आलिया दाविती नाथालय ॥ याचक मात्र कथिती सोय ॥ नाथ सदय फार आहे ॥ ५७ ॥ न पाहाती काळवेळ ॥ भलते काळीं याचकमेळ ॥ छळों धाडिती नाथाजवळ ॥ दाता केवळ ह्मणोनियां ॥ ५८ ॥ एके दिनीं वर्षाकाळीं ॥ पर्जन्याची अति वृष्टि जाली ॥ सप्तरात्र वांकडी लागली ॥ गृहीं अवघि चिडाणी ॥ ५९ ॥ इंधन न मिळे कोरडें ॥ अन्न असतां उपवास घडे ॥ सकळ लोकांसीं सांकडें ॥ भोजनाचा पडे महाघोर ॥ ६० ॥ ऐसिये समयीं मध्यरात्रीं ॥ चौघे ब्राह्मण अगांतुक येती ॥ क्षुधेनें करिती काकुळती ॥ विप्र धाडिती नाथालयीं ॥६१॥ याचक येउन द्वाराप्रती ॥ एकनाथ नावें गर्जती ॥ नाथ उद्धवा उठविती ॥ द्वारीं बोभाती कवण पाहे ॥ ६२ ॥ तंव अगांतुक चवघेजण ॥ भुकेलों ह्मणती द्यावें अन्न ॥ कळवळिलें नाथाचें मन ॥ द्यावें भोजन उद्धवा ह्मणे ॥ ६३ ॥ येरू ह्मणे आहे अन्न ॥ परि पाहिजे इंधन ॥ नाथ ह्मणे-हें सदन ॥ काष्ठें संपूर्ण घडलेंसे ॥ ६४ ॥ काष्ठें माळवदाचीं ॥ उशिरां निघतील साचीं ॥ नाथ ह्मणे मंचकाचीं ॥ आहेत सहजची मोकळीं ॥ ६५ ॥ त्वरें नवार उकलुन ॥ मंचक गातें इंधन ॥ करून कराविलें अन्न ॥ दिधलें भोजन ब्राह्मणां ॥ ॥ ६६ ॥ तृप्त होवोनि भूदेव ॥ वर्णिती नाथाचें गौरव ॥ ऐकोनि विप्र समस्त सर्व ॥ हात डोलउनी वाखाणिती ॥६७॥ ऐसें अनेक प्रकारें छळण ॥ करितां श्रीनाथ अनुद्विग्न ॥ ज्यासीं सर्वभूतीं भगवत्भावन ॥ ब्राह्मणपूर्ण ब्रह्ममूर्ती ॥ ६८ ॥ जेथवरी द्विजांची शक्ति ॥ छळ करितां न चुकती ॥ शांति क्षमा दया स्थिती ॥ विशेष शोभती नाथांगीं ॥ ६९ ॥ तंव पावली पितृतिथी ॥ नाथगृहीं वार्षिक रिती ॥ तेथें वर्तली जी स्थिती ॥ सावधान श्रोतीं ऐकावी ॥ ७० ॥ श्राद्धतिथीच्या दिवसीं ॥ आवंतिलें ब्राह्मण पुरोहितासीं ॥ करून पाक निष्पत्तीसीं ॥ स्वयें पुराण आरंभिलें ॥७१॥ पुराण श्रवण यारिती ॥ उद्धव आणि केशवमूर्ती ॥ भाविकजन समस्तीं ॥ प्रश्नोत्तर परिसिले ॥ ७२ ॥ पुराण समाप्तिसमयीं ॥ श्रीनाथ पाईं डोईं ॥ सकळिकीं ठेवून पाहीं ॥ गेले लवलाहीं स्वाश्रमां ॥ ७३ ॥ उद्धवें वंदून पदारविंदा ॥ सांभाळित आश्रमधंदा ॥ मुखीं स्मरण हरिगोविंदा ॥ सावध सदां निजकाजीं ॥ ७४ ॥ पाकसिद्धि होतांची जाण ॥ बोलाविले पुरोहित ब्राह्मण ॥ नाथासीं विनंति करून ॥ आरंभिलें विधान श्राद्धाचें ॥ ७५ ॥ ब्राह्मण गंगास्नाना जात ॥ तंव ते समई अकस्मात ॥ देवत्रय मूर्तिमंत ॥ वेष धरून येत मलंगांचा ॥ ७६ ॥ मुखें ह्मणती आह्मी क्षुधित ॥ भोजन घालावें त्वरित ॥ एकक्षण न राहावें येथ ॥ तूं अति समर्थ दातृत्वें

॥ ७७ ॥ नाथाचिया निजबुद्धीं ॥ विषमता स्पर्श नाहीं कधीं ॥ सर्वभूतीं आत्मत्वत्रिशुद्धी ॥ सहज समाधि निजबोधें ॥ ७८ ॥ पात्रें मांडून त्वरित ॥ अन्न वाढिलें यथोचित ॥ भोजन करून अतितृप्त ॥ निजरूप दावित नाथातें ॥ ७९ ॥ नाथें नमस्कारुनी चरण ॥ ह्मणे आजि मी धन्य धन्य ॥ पुन्हा मलंग होऊन ॥ चालिले फिरून निजधामा ॥ ८० ॥ ब्राह्मण येतां अंगणांत ॥ त्यांसीं पाहून ढेंकर देत ॥ अपुलें भाषें आशिर्वाद देत ॥ धन्य ह्मणत नाथासीं ॥ ८१ ॥ क्रोधीत होऊन अंतरीं ॥ बाहेर सर्वांग थरारी ॥ ब्राह्मण बोलती ते अवसरीं ॥ तेंचि चतुरीं परिसावें ॥ ८२ ॥ ह्मणती श्राद्ध जालें संपूर्ण ॥ तृप्त जाले पितरगण ॥ आतां आमुचें प्रयोजन ॥ काय कारण बैसावया ॥ ८३ ॥ मग उठोनियां समस्त ॥ मुखें निर्भत्सना वदत ॥ श्राद्धीं म्लेंच्छ जेवित ॥ धन्य सुकृत वडिलांचें ॥ ८४ ॥ परिसोनि त्यांची क्षोभवाणी ॥ नाथें प्रणिपात करुनी ॥ ह्मणे क्षुधित जाणोनि करणी ॥ मजपासोनी घडली पैं ॥ ८५ ॥ स्थळ सारवून यथातथ्य ॥ पुन्हा पाक करवी जेत ॥ तुह्मी न कोपावें येथ ॥ करावें सनाथ मजलागीं ॥ ८६ ॥ तुह्मीं ब्राह्मण ब्रह्ममूर्त्ती ॥ प्रसन्न व्हावें मजप्रती ॥ अपराध क्षमाकीजे संतीं ॥ श्राद्ध निश्चिती करावें ॥ ८७ ॥ ब्राह्मण ह्मणती भ्रष्टाकार ॥ तुमचा ऐसा प्रकार ॥ आमुचेनि न करवे साचार ॥ यथेष्टाचार करां पैं ॥ ८८ ॥ वार्ता ऐकोनि इतर ॥ आदिधर्मादि करी भूसुर ॥ करीत मनीं विचार ॥ भला अवसर फावला ॥ ८९ ॥ उपाध्यासी म्हणती समस्त ॥ तुमचे यजमान मोठे अधित ॥ अपूर्व आचार आचरत ॥ म्लेंच्छ आणीत श्राद्धार्थी ॥ ९० ॥ ऐसा व्यंगोक्ति छळ ॥ करूं सरले विप्रसकळ ॥ तंव नाथ मनीं अचंचळा ॥ शांति अचळ पाहिली ॥ ९१ ॥ तंव उपाध्याय म्हणती एकनाथासी ॥ बहिष्कार घालावयासी ॥ धर्माधिकारि सह मंडळीसीं ॥ आले यांसीं प्रार्थावें ॥ ९२ ॥ नाथ नमस्कारि सकळां ॥ प्रार्थितसे वेळोवेळां ॥ कृपा करोनियां सकळां ॥ श्राद्धवेळा रक्षावी ॥ ९३ ॥ ब्राह्मण तो अविवेकयुक्ती ॥ बोलों लागले उपहासयुक्ती ॥ तुमच्या पुण्याचिया शक्ती ॥ पितर येती स्वर्गस्थ ॥ ९४ ॥ त्यासींच द्यावें भोजन ॥ आमुचेनि न करवे विधान ॥ नाथ म्हणे तुमचें वचन ॥ पाषाणीं महिमान देवत्व प्रगटे ॥ ९५ ॥ तेथें स्वर्गस्थ पितर येऊन ॥ श्राद्धीं जेवितां नवल कोण ॥ ब्रह्मरूप तुम्ही आपण ॥ सर्वासि कारण तुमची आज्ञा ॥ ९६ ॥ ऐकोनि ऐसिया वचना ॥ परस्परें बोलती खुणा ॥ परिक्षा पाहूंया ज्ञाना ॥ कीं वल्गना व्यर्थची ॥ ९७ ॥ आमुचेनि न करवे श्राद्ध ॥ बोलतों हें एवंविध ॥ पूर्वज येतील प्रसिद्ध ॥ तरीच ब्रह्मविद् जेविती ॥९८॥ नाथ म्हणे हें सामर्थ्य ॥ अवघें तुमचे चरणीं तथ्य ॥ येथें कैंचा पुरुषार्थ ॥ तुम्ही

समर्थ ब्रह्ममूर्ती ॥ ९९ ॥ म्हणती लापनिका पुरे आतां ॥ ज्ञान कळेल तत्वता ॥ पूर्वज येथें न येतां ॥ प्रायश्चित्ता भोगाल ॥ १०० ॥ म्हणोनि बैसले निवांत ॥ छळवादी विप्र समस्त ॥ तंव नाथें विनीत ॥ केला प्रणिपात सर्वांसीं ॥ १ ॥ मांडवोनि तीन पाट ॥ अनुक्रमें बैसावा शिष्ट ॥ नामें उच्चारोनि स्पष्ट ॥ बोलावीत प्रगट विप्रांसीं ॥ २ ॥ गगनपंथें तिन्ही मूर्ती ॥ येऊन स्वस्थानीं बैसती ॥ पाहतांचि ब्राह्मण समस्तीं ॥ माना हालविती ते काळीं ॥ ३ ॥ गळां विराजत ब्रह्मसूत्रें ॥ शुद्ध नेसोनियां धोत्रें ॥ हातीं सुवर्णाचीं पवित्रें ॥ मुखीं वेदमंत्र पढताती ॥ ४ ॥ तेजस्वी दैदीप्यमान ॥ ब्रह्मस्थिति परिपूर्ण ॥ नाथें करून वंदन ॥ सुखसंपन्न निजस्थिती ॥ ५ ॥ चारी वेद मुखोद्गत ॥ पठण करूनि दावित ॥ विप्र आश्चर्य मानित ॥ अति अद्भुत हे करणी ॥ ६ ॥ विप्रांचें खुंटलें छळण ॥ बैसले निवांत होउन ॥ श्रीनाथस्वयें कृपाघन ॥ बोले वचन अमृतवृष्टी ॥ ७ ॥ अहो ब्राह्मण ब्रह्ममूर्ती ॥ तुम्ही वंद्य वरिष्ठ त्रिजगतीं ॥ तुमच्या कृपावरदोक्तीं ॥ पूर्वज येती या लोकीं ॥ ८ ॥ तुम्हांस माझें लोटांगण ॥ व्हावें आतां सुप्रसन्न ॥ अंगिकारून दयाळूपण ॥ श्राद्धसंतर्पण करावें ॥ ९ ॥ पूर्वपाक निषिद्धता ॥ करूनि करविला मागुता ॥ अपराध क्षमून दयावंता ॥ यावें आतां निजासनीं ॥ ११० ॥ ब्राह्मण अभिमानरहित ॥ कांहीं उत्तर न देत ॥ मौनेच उठोनि येत ॥ जे श्राद्धार्थ निमंत्रिले ॥ ११ ॥ धर्माधिकारी सह मंडळी ॥ उगेचि उठोनि ते काळीं ॥ जाऊन आपुल्या स्वस्थळीं ॥ चिंतार्णवजळीं पडियेले ॥ १२ ॥ म्हणती आतां धिग् जीवित ॥ कर्म जालें विपरित ॥ न जाणों हें नाथमत्त ॥ अलौकिक कृत्य दाविलें ॥ १३ ॥ परंतु आजिची जे राहटी ॥ अपूर्वता दाऊन दिठी ॥ परिणामीं यशाची कोटी ॥ गेली शेवटीं नाथाकडे ॥ १४ ॥ यापरि विप्र समस्त ॥ श्रीनाथाचें यश वर्णित ॥ परि माया दुस्तर हा वचनार्थ ॥ सत्य होत या लोकीं ॥ १५ ॥ येरीकडे नाथाश्रमांप्रती ॥ सहब्राह्मण पितरमूर्ती ॥ श्राद्धसंतर्पण यथास्थिती ॥ करूनि सारिती भोजना ॥ १६ ॥ यावत्तृप्ति यथाविधी ॥ परिपूर्णता श्राद्धविधी ॥ देऊनि तांबूल दक्षिणावंदी ॥ नाथ त्रिशुद्धि पितरांसीं ॥ १७ ॥ उपाध्याय इतर विप्र ॥ कौतुक पाहती समग्र ॥ तंव अदृश्य जाले पितर ॥ महिमा अपार नाथाचा ॥ १८ ॥ हे अघटित चारित्र करणी ॥ जालीयाचा उत्कर्ष मनीं ॥ अणुमात्राहि नाथालागुनी ॥ अंतःकरणीं स्मरेना ॥ १९ ॥ येवढी ऐश्वर्याची सीमा ॥ परि ब्राह्मणभक्तीचा प्रेमा ॥ चढत्या आवडी उत्तमा ॥ देखिला महिमा वरिष्ठ ॥ २० ॥ एका जनार्दन चरणीं ॥ केशव शरण अनुदिनीं ॥ तयाची जे आर्षवाणी ॥ संतसज्जनीं परिसीजे ॥ १२१ ॥ इतिश्रीएकनाथचरित्रेनाथश्राद्धस्वर्गस्थपितरागमनोनाम एकादशोध्यायः ॥ श्रीएकनाथार्पणमस्तु ॥

---

# अध्याय बारावा.

श्रीगणेशायनमः॥ श्रीरामसमर्थ॥ नमन सद्गुरुचरणां॥तेणें परिपूर्ण मनकामना॥ विसर पडला मीतूंपणा ॥ गुणनिर्गुणातीत स्थिती ॥ १ ॥ चरण नमनाची स्थिती ॥ एवढी हे अलभ्यप्राप्ती ॥ त्यातुझी स्वरूपसुखसंविती ॥ केविं वाचेप्रती बोलवे ॥ २ ॥ मौन तुझें मुख्य नांव ॥ कांहीं न करणें पूजा अपूर्व ॥ जिवीं धरणें तुझा भाव ॥ हा नवलाव भक्तीचा ॥ ३ ॥ भक्ति प्राधान्य चरित्रासी ॥ जनहिता आचरलासी ॥ भानुदासकुळीं अवतरलासी ॥ घेऊन आलासी परमार्था ॥ ४ ॥ नानाशास्त्रें पाखांड ॥ प्रवृत्तीचें कर्मबंड ॥ तयाचें ठेंचावें तोंड ॥ भजन प्रचंड प्रतापें ॥ ५ ॥ यालागीं मानवीतनु अलंकृत ॥ लीला दाविसी प्रतिष्ठानांत ॥ चरित्रावरीं चरित्र होत ॥ स्वयें वर्त्तत निजस्थिती ॥ ६ ॥ श्रीनाथ सहजगती ॥ भाळ्यांभोळ्यां बोध व्हावयाप्रती॥ सरळ आणि निजस्थिती ॥ व्याख्यानरीति स्वयें करी ॥ ७॥ जेथिल्या वक्तृत्वाची थोरी ॥ स्वयें श्रोता होऊन हरी ॥ उद्धवासह राहून घरीं ॥ नित्य करी श्रवणासीं ॥ ८ ॥ भाविकजनाचा भावार्थ ॥ नित्य नूतन अधिक होत ॥ भिक्षुकमंडळीसीं न साहत ॥ ह्मणती विपरित पैं जालें ॥ ९ ॥ पूर्वापार कुळाचारी ॥ आमुचे आज्ञेंत नरनारी ॥ नाथप्रताप नामगजरीं ॥ अवघीच थोरी बुडाली ॥ १० ॥ विप्र मानूनि खंति ॥ नित्य पैशून्यची धुंडिती ॥ ह्मणोनि कवितेसीं वर्णिती ॥ नाथाप्रती कृष्णदासाच्या ॥ ११ ॥ कृष्णदास देवीभक्त ॥ उपसनायोगें प्रतिष्ठानांत ॥ आवडीनें कविता करित ॥ रामायण वदत युद्धकांड ॥ १२ ॥ ह्मणती कृष्णदास महाज्ञानी ॥ अपूर्व दिसे त्याची वाणी ॥ नाथ निजस्थिति समाधानी ॥ वैषम्य मनीं नयेची ॥ १३ ॥ भगवंताच्या सकळमूर्ती ॥ ऐसीच निजबोधस्थिती ॥ अनुमात्र विषमवदंती ॥ नये चित्तीं नाथाचिया ॥ १४ ॥ स्पर्धा असूया तिरस्कार ॥ प्रवृत्तिमंत जे कां नर ॥ त्यांच्या अंतरीं हें बिढार ॥ ह्मणोनि हा विचार विप्रांचा ॥ १५ ॥ परिपूर्ण निजबोधरूप ॥ स्वयें सच्चिदानंद स्वरूप ॥ नाथऐश्वर्य अमूप ॥ चैतन्यदीप निजतेजें ॥ १६ ॥ भक्तिउत्कर्ष निजस्थिती ॥ नाथाची ऐश्वर्यसंपत्ती ॥ भोळींभाविकें विशेष प्रीती ॥ अधिकाचि येती निजहिता ॥ १७ ॥ दिवसा पुराण श्रवण ॥ रात्रीं होय हरिकीर्तन ॥ सदावर्त निजाचरण ॥ दीनोद्धारण सर्वांपरी ॥ ॥ १८ ॥ प्रौढबुद्धी कृष्णदास ॥ करित असतां रामायणास ॥ आयुष्यभानु अस्तमानास ॥ जातां दिवस पातला ॥ १९॥ युद्धकांड नव्हतां पूर्ण ॥ प्रयाणकाळ जाणून ॥ श्रीनाथ सेवेंत येऊन ॥ केलें निवेदन वृत्तांता ॥ २० ॥ अंगी उपासनेचें बळ ॥ ह्मणोन पूर्वीं सुचला समयकाळ ॥ अनिवार देखोनी काळचक्र ॥ बुद्धिकुशळ तेणें

केली ॥ २१ ॥ जालिया अध्यायाची पोथी ॥ आपण घेऊन महामती ॥ नाथा-
चिया दर्शनाप्रती ॥ भावार्थस्थिति पैं आला ॥ २२ ॥ नाथें देखतां दृष्टी ॥ सवेग
सामोरा येत भेटी ॥ कृष्णदासें निजललाटीं ॥ वंदिलें उठाउठीं पाऊल ॥ २३ ॥
परस्परें आलिंगून ॥ होतांचि पावला समाधान ॥ श्रीनाथें निकट बैसऊन ॥ कुशळ
संपूर्ण पूसिलें ॥ २४ ॥ पुस्तक ठेऊनियां पुढें ॥ साकल्यवृत्तांत निवाडे ॥ सांगता
झाला निजतोंडें ॥ निदान रोकडें निवेदिलें ॥ २५ ॥ अपूर्ण राहिला ग्रंथ ॥
याचिया निजसिध्यर्थ ॥ वासना मनींची बहुत ॥ जे हा समाप्त पैं व्हावा ॥ २६ ॥
आम्ही काळाज्ञानेंमेसीं ॥ जातसों परलोकासीं ॥ स्वामी समर्थ या ग्रंथासीं ॥
अवश्यतेसीं पूर्ण कीजे ॥ २७ ॥ म्हणोनि धरिले चरण ॥ पुस्तक केलें अर्पण ॥
श्रीनाथ कृपाळू पूर्ण ॥ अवलोकन करिताती ॥ २८ ॥ अवलोकितां वक्तृत्व ॥
कल्पना चातुर्यअद्भुत ॥ कुशळता लोकरंजनार्थ ॥ विशेष सुभाषित दृष्टांतीं ॥ २९ ॥
हांसोनि बोलती तयाप्रती ॥ अपूर्व हे चातुर्य युक्ती ॥ तुमच्या वक्तृत्वाची गती ॥
शोभा निगुती पावेल ॥ ३० ॥ आरंभिला मतिकुशळ ॥ तुम्हीच कीजे ग्रंथ
सकळ ॥ येरू विनवी काळवेळ ॥ राहिली जवळ न चुकेची ॥ ३१ ॥ नाथ
म्हणती तयासी किती ॥ दिवस पाहिजे समाप्ती ॥ येरें निरीक्षितां संख्येप्रती ॥
अकरा दिवस रातींहें पाहे ॥ ३२ ॥ नाथासि म्हणे हा पूर्ण ॥ अकरा
दिवसांचें लेखन ॥ नाथ म्हणती वचन ॥ काळासी आपण निरोधावें ॥ ३३ ॥
अकरा दिवसांनंतर ॥ यावयाचा नेम निर्धार ॥ काळासी राहवोनि साचार ॥ व्हावें
तत्पर लेखना ॥ ३४ ॥ ऐकोनि श्रीनाथवाणी ॥ कृष्णदास लागला चरणीं ॥ म्हणे
काळ आमुचेनी ॥ राहील हे करणी अघटित ॥ ३५ ॥ तुमची आज्ञा समर्थ ॥
काळ मानील यथार्थ ॥ इतुकेन मीं कृतकृत्य ॥ कृपाकृतार्थ मज कीजे ॥ ३६ ॥
दीनदयाळ श्रीनाथ ॥ कृष्णदासातें अश्वासित ॥ संकोच न करितां येथ ॥ राहोनि
ग्रंथ संपवीजे ॥ ३७ ॥ तुमची आज्ञा काळासीं ॥ मान्य पडेल अवश्यतेसी ॥ सुखें
राहोनि अकरा दिवसीं ॥ कीजे समाप्तिसी ग्रंथाचिया ॥ ३८ ॥ अभय ऐकोनि
यथार्थ ॥ ऐश्वर्य जाणोनि समर्थ ॥ अभिवंदोनि श्रीनाथ ॥ आरंभीत लेखना ॥ ३९॥
तंव पातली काळवेळ ॥ कृष्णदास झाला विव्हळ ॥ नाथें येऊनि जवळ ॥ करतळ
स्पर्शिले ॥ ४० ॥ सर्वांगी फिरवी हात ॥ काळ पराक्रम न चले तेथ ॥ होऊनियां
सावचित्त ॥ आसनीं स्वस्थ बैसला ॥ ४१ ॥ खुंटली काळाची शक्ती ॥ सावधान
झाली मती ॥ वदता होय ग्रंथोक्ती ॥ म्हणे धन्य ख्याती नाथाची ॥ ४२ ॥ अघ-
टित परमाद्भुत ॥ चारित्र झालें कळिकाळांत ॥ हेर विप्रांचा हा वृत्तांत ॥ पाहोनि
तटस्थ ते काळीं ॥ ४३ ॥ सवेग जाऊन त्वरित ॥ धर्माधिकारि आदि समस्त

त्यांसी निवेदिली हे मात ॥ ऐकोनि विस्मित ते झाले ॥ ४४ ॥ मनीं करिती संकल्प ॥ बारावे दिवसीं पाहूं प्रताप ॥ सत्य किं वाग्जल्प ॥ दिवस समीप तो असे ॥ ४५ ॥ प्रवृत्तीचिया उपपत्ती ॥ विप्रांची छळावया मती ॥ ईश्वरमायेची दुर्धर गती ॥ नकळे निश्चिती कोणासीं ॥ ४६ ॥ यापरि ब्राह्मण समस्त ॥ अधिकची विषम मानित ॥ जंव उत्कर्ष देखत ॥ विशेष करिती छळणासी ॥ ४७ ॥ एवं क्रमिल्या अकरा दिवस ॥ समाप्ति त्या ग्रंथास ॥ करूनियां कृष्णदास ॥ अति उल्हास पावला ॥ ४८ ॥ निरउनि ग्रंथासी ॥ पुसता झाला आज्ञेसी ॥ स्वामिप्रसादें वासनेसी ॥ तृप्ततेसी पावलों ॥ ४९ ॥ कृपाकर ठेवोनि माथां ॥ परलोकीं बोळवीजे आतां ॥ काळआक्रमाची बाधकता ॥ नव्हे सर्वथा तुझ्या कृपें ॥ ५० ॥ म्हणोनि घातलें लोटांगणा ॥ तीन करोनि प्रदक्षिणा ॥ नाथें अश्वासूनि तया निपुणां ॥ सुखें निर्वाणा निरोपिलें ॥ ५१ ॥ देहाचिया गवसणीस ॥ सोडितां नव्हे कासावीस ॥ नाथकृपे कृष्णदास ॥ पूर्णपदास पावला ॥ ५२ ॥ अघटित चरित्रकथा ॥ पाहतांचि विप्र समस्त ॥ अतिशय आश्चर्य मानित ॥ म्हणती आतां काय कीजे ॥ ५३ ॥ यापरि अकरा दिवस ॥ निधनी रक्षिला कृष्णदास ॥ काळावरीं आज्ञाविलास ॥ पाहोनि उल्हास भाविकां ॥ ५४ ॥ जगदोद्धारी अवतार ॥ बोलती सर्व नारीनर ॥ घरोघरीं नामगजर ॥ भाविक तत्पर भक्तीसीं ॥ ५५ ॥ नाथद्वारींचा रंक एक ॥ केशव दीन मशक ॥ चरणीं ठेऊन मस्तक ॥ गाय निशंक चरित्रासीं ॥ ५६ ॥ इतिश्रीएकनाथचरित्रेद्वादशोध्यायः ॥

---

## अध्याय तेरावा.

श्रीगणेशायनमः ॥ जगद्गुरुपूर्णावतार ॥ श्रीनाथपरमेश्वर ॥ जयाचें चरित्र-चमत्कार ॥ पवित्रकर सर्वार्थी ॥ १ ॥ कर्णाटक प्रांताप्रतीं ॥ कोणीएक ग्रामीं वस्ती ॥ गृहस्थ व्यापारी संसारस्थिती ॥ संतती संपत्ती सहकरी ॥ २ ॥ तेणें आवडीनें विठ्ठलमूर्त्ती ॥ अपूर्व प्रतिमेची ख्याती ॥ यथास्थित ध्यानें अतिप्रीती ॥ निर्मूनि गृहाप्रती आणिली ॥ ३ ॥ प्रतिष्ठा करावी उत्साहेंसी ॥ स्थापावया निजपूजेसी ॥ मुहूर्त पाहून उत्तम दिवसीं ॥ साहित्यासी करवीतसे ॥ ४ ॥ साहित्य व्हावें जंव संपूर्ण ॥ तंव त्यासीं झालें स्वप्न ॥ येथें न करिजे मसस्थापन ॥ आज्ञे प्रमाण पैं कीजे ॥ ५ ॥ गंगातिरीं प्रतिष्ठान ॥ तेथें एकनाथ असे जाण ॥ शीघ्र जाऊनि आपण ॥ मूर्त्ति अर्पण कीजे तया ॥ ६ ॥ तेथेंचि व्हावी प्रतिष्ठा ॥ हे माझी निजउत्कंठा ॥ येथें

आग्रह करितां कष्टा ॥ अतिउत्कृष्टा भोगिसी ॥ ७ ॥ आज्ञानि ग्रहवचन ॥ गृहस्थें पाहतांचि स्वप्न ॥ गजबजित झालें मन ॥ घाबरूनि उठिला त्वरें ॥ ८ ॥ मनीं होऊनि साशंक ॥ विचारीं स्वप्नविवेक ॥ नयनीं निद्रा न लागे देख ॥ निश्चय एक न करवे ॥ ९ ॥ तंव झाला उषःकाळ ॥ पुरोहितादि विप्रकुळ ॥ विवेकवंतबुद्धिकुशळ ॥ बोलावी सकळ विचारा ॥ १० ॥ म्हणे अघटित स्वप्नवाणी ॥ काय कीजे हें विचारुनी ॥ स्पष्ट सांगिजे आम्हालागुनी ॥ जेणें सुख मनीं उद्बोधे ॥ ११ ॥ सकळ बुद्धिमंत नर ॥ करिती स्वप्नाचा विचार ॥ म्हणती दोन दिवस धरा धीर ॥ राहावें एकाग्र मानसें ॥ १२ ॥ जरी मागुतेन ऐसें स्वप्न ॥ होईल तरी यथार्थ खूण ॥ विचारूनि मग आपण ॥ कर्तव्य कारण पैं कीजे ॥ १३ ॥ बुद्धि मानली हृदयकमळीं ॥ तंव दुसरेहीं निशिंकाळीं ॥ तेंचि स्वप्न उषःकाळीं ॥ पाहोनि तेवेळीं ऊठिला ॥ १४ ॥ विस्मय पावोनि मनांत ॥ सकळां तेंचि निवेदित ॥ तिसरे दिवसीं ही होत ॥ आज्ञा निश्चित तेंचि पैं ॥ १५ ॥ समस्त म्हणती नवलकळा ॥ विठ्ठलाची न कळे लीळा ॥ भक्तभावाचा भुकेला ॥ प्रेमजिव्हाळा आवडे ॥ १६ ॥ म्हणती आतां त्वरा करीं ॥ विठ्ठलमूर्त्ति गंगातिरीं ॥ जाऊनि एकनाथ मंदिरीं ॥ निजनिर्धारीं अर्पावी ॥ १७ ॥ अनायासें सत्पुरुषदर्शन ॥ आणि घडेल गंगास्नान ॥ तेथिल्या भक्तीचें महिमान ॥ देखती लोचन धन्यत्व हें ॥ १८ ॥ उद्विग्न परि भयचित्ता ॥ आज्ञेप्रमाणें न करितां ॥ कोटी अनर्थ वाजती माथां ॥ यास्तव आतां निघावें ॥ १९ ॥ विलंब न करितां गृहस्थ ॥ प्रतिमेसह त्वरित ॥ निघोनि पंथ आक्रमित ॥ क्रमें पावत प्रतिष्ठाना ॥ २० ॥ माध्यान्ही गंगातिरीं ॥ येऊनियां सहपरिवारीं ॥ स्नानसंध्या सर्वसारी ॥ नेम निर्धारी आपुला ॥ २१ ॥ तंव गंगातिरींचे ब्राह्मण ॥ लगबगां येती धाउन ॥ गृहस्थ समर्थ देखोन ॥ वह्या संपूर्ण पाहती ॥ २२ ॥ यजमान निघो आमुचा ॥ ऐसा भाव सकळांचा ॥ तंव गृहस्थ बोले निजवाचा ॥ एकनाथ कोण कोणाचा येथें ॥ २३ ॥ तयाचे भेटीस्तव आपण ॥ आलों दुरी पंथ क्रमून ॥ आपुलें साकल्य वर्त्तमान ॥ स्वप्न संपूर्ण सांगितलें ॥ २४ ॥ तिहीं ऐकतां वचन ॥ अधिकचि असह्य जालें मन ॥ म्हणती येथें मोहिजन ॥ दुरिचेही जाण दर्शना येती ॥ २५ ॥ हा यजमान निघेल आमुचा ॥ परि लाहाना होईल त्याचा ॥ दक्षिणार्थ बोलती वाचा ॥ तो आमुचा यजमान ॥ २६ ॥ गृहस्थासी भेटिचें आर्त ॥ केव्हां भेटेल श्रीनाथ ॥ यथाशक्ति दक्षिणा देत ॥ विप्र समस्त राहउनी ॥ २७ ॥ नाथाचिया वाड्यासी ॥ पावला अतित्वरेसी ॥ दुरूनि पाहतां नाथासी ॥ हर्ष तयासी वोसंडला ॥ २८ ॥ स्तंभपृष्ठी निजासनीं ॥ नाथ विराजे सिंहासनीं ॥ आर्तभूत गृहस्थ देखोनी ॥ भाव मनीं जाणिला ॥ २९ ॥ याचिये आगमनसिद्धी ॥

अपूर्व लाभाची वृद्धी ॥ होईल ऐसें निजबुद्धी ॥ जाणूनि चित्तीं परमार्थ ॥ ३० ॥ उठूनियां आसनींहून ॥ त्यासी दिधलें आलिंगन ॥ ह्मणती दुरी पंथ क्रमून ॥ जालें आगमन भेटीसीं ॥ ३१ ॥ पुसोनि सर्व कुशळ ॥ राहावया दिधलें स्थळ ॥ तंव गृहस्थ स्वमुखें सकळ ॥ वृत्तांत प्रांजळ निवेदी ॥ ३२ ॥ आवडीचिया अति युक्ती ॥ विठ्ठल प्रतिमा करविली निगुती ॥ स्थापना करावया आयती ॥ उत्साहार्थी होत पैं ॥ ३३ ॥ तो त्रिरात्र एकाचि वाणी ॥ आज्ञा होत मजस्वप्नीं ॥ जे हे मूर्त्ति प्रतिष्ठानीं ॥ स्वामीलागुनी अर्पावी ॥ ३४ ॥ तुवांही जाऊन आपण ॥ घ्यावें नाथाचें दर्शन ॥ तेथेंचा उत्साह करून ॥ मूर्त्ति स्थापन करावी ॥ ३५ ॥ निवेदूनि हा वृत्तांत ॥ श्रीमूर्त्ति पुढें ठेवित ॥ जन पाहती समस्त ॥ नाथ वंदित मस्तकीं ॥ ३६ ॥ ठाणठकार लक्षण ॥ अति उत्तम विठ्ठलध्यान ॥ पाहतां श्रीनाथाचें मन ॥ अति समाधान पावलें ॥ ३७ ॥ नवल देवाची लीळा भोगावया भक्तिसोहळा ॥ श्रीनाथसंगतीचा जिव्हाळा ॥ अतिआगळा देवासी ॥ ३८ ॥ उद्धव पाहे मूर्त्तीचें ध्यान ॥ तंव वेधित जालें त्याचें मन ॥ अतिभावार्थी सकळ जन ॥ ह्मणती धन्य हरिलीळा ॥ ३९ ॥ अति आदरें गृहस्थांसी ॥ भेटविलें समस्तांसीं ॥ उद्धवें प्रतिदिवसीं ॥ तयारी उत्साहाची करविली ॥ ४० ॥ मूर्त्तिप्रतिष्ठार्थ मुहूर्त ॥ पाहून समारंभ करवित ॥ उपाध्ये बोलाउनी समस्त ॥ आमंत्रवित ब्राह्मणां ॥ ४१ ॥ नित्य पुराण कीर्तन ॥ नाथमुखें होतां श्रवण ॥ गृहस्थांचें पालटलें चिन्ह ॥ भावार्थ निपुण हो लागे ॥ ४२ ॥ ह्मणे ऐसें पुराण कीर्तन ॥ कोठें नायकिलें आपण ॥ श्रीनाथाचें महिमान ॥ नित्य नूतन दिसताहे ॥ ४३ ॥ समारंभ उत्साहदिवसीं ॥ अभिषेक विधीसीं ॥ स्वहस्तें ब्राह्मण सान्निधानेसीं ॥ नाथ ते दिवसीं करवीतसे ॥ ४४ ॥ षोडशोपचारीं पूजन ॥ मंत्रतंत्राचें विधान ॥ यथास्थित सारून ॥ प्रतिमेसी वसन नेसाविलें ॥ ४५ ॥ गंध पुष्प अक्षता ॥ अलंकार करूनि माथां ॥ सुमनमाळा सुशोभिता ॥ आपाद घातल्या तये वेळीं ॥ ४६ ॥ स्थापूनि मूर्त्ति सिंहासनीं ॥ धूपदीप निरांजनीं ॥ निजकरें ओवाळुनी ॥ नैवेद्य घालुनी विस्तारिले ॥ ४७ ॥ दिव्यान्न परवडी समस्त ॥ ताटीं वाढोनि यथोक्त ॥ पक्वान्नें घृतपाचित ॥ शाखाबहुत साजिऱ्या ॥ ४८ ॥ उपाध्यादि भिक्षुक ॥ भाविकजन अनेक ॥ तो गृहस्थही कौतुक ॥ पाहात सकळिक सादरें ॥ ४९ ॥ नैवेद्य समर्पी ते काळीं ॥ नवनीत घेउनी करतळीं ॥ नेऊन मूर्त्तीच्या मुखाजवळीं ॥ काय तेवेळीं पैं केलें ॥ ५० ॥ नाथ म्हणती तये वेळा ॥ या काळींचा सुखसोहळा ॥ भक्षूनि नवनीतगोळा ॥ देवलीळा प्रगटावी ॥ ५१ ॥ आपुल्या आवडी करुनी ॥ तूं आलासि ये स्थानीं ॥ तरी भक्षूनियां लोणीं ॥ निजा-

सर्नीं बैसावें ॥ ५२ ॥ ऐकोनि श्रीनाथाचें वचन ॥ मूर्ति होऊनि हास्यवदन ॥ बाहेर जीभ काढून ॥ करतळ चाटून भक्षिलें ॥ ५३ ॥ तंव जयजयकार ध्वनी ॥ थोर गजर जाला गगनीं ॥ ऐकतांचि सकळ जनीं ॥ हर्ष मानुनी नाचती ॥ ५४ ॥ पिटूनियां टाळिया टाळी ॥ गर्जना मांडिली सकळीं ॥ गृहस्थ आणि भिक्षुक मंडळी ॥ तटस्थ ते काळीं बैसले ॥ ५५ ॥ गृहस्थ म्हणें धन्य लीळा ॥ विठ्ठलें ऐश्वर्य दाविलें डोळां ॥ श्रीनाथाची प्रेमकळा ॥ नवल जिव्हाळा देखिला ॥ ५६ ॥ नाथ निजस्थिति निश्चळ ॥ एकवृत्तिं सर्व काळ ॥ त्या रीति हेही वेळ ॥ अचंचळ निजरूपीं ॥ ५७ ॥ उत्तर निरांजन आरती ॥ सर्वेंचि केली अतिप्रीती ॥ पुष्पांजुळी मंत्रपद्धती ॥ पायीं अर्पिती देवाचिया ॥ ५८ ॥ प्रदक्षिणा दंडवत ॥ स्तोत्रपठणें देव स्तवित ॥ पूजा करोनि समाप्त ॥ मूर्ति ध्यानांत आणिली ॥ ५९ ॥ सर्वेंचि ब्राह्मण पूजन ॥ करूनि केलें संतर्पण ॥ यावत्तृप्त भोजन ॥ दिव्यपक्वान्न समयुक्त ॥ ६० ॥ आदरें सन्मान विप्रांसी ॥ करून अर्पिलें दक्षिणेसी ॥ नमन करुनी साष्टांगेसी ॥ पृथुकाकारेंसीं गौरविलें ॥ ६१ ॥ त्यानंतरें आपण ॥ गृहस्थ आणि भक्तजन ॥ करून एकपंक्ति भोजन ॥ सुखसमाधान पावती ॥ ६२ ॥ रात्रीं कीर्तनाचा गजर ॥ अतिशय जयजयकार ॥ यापरि आनंद अपार ॥ भोगिती साचार निजजन ॥ ६३ ॥ तंव गृहस्थाचिया पोटीं ॥ आठवली निजहित गोष्टी ॥ ह्मणें धन्य भाग्य सृष्टी ॥ नाथ दृष्टीं देखिला ॥ ६४ ॥ याचिया चरणस्पर्शें ॥ आश्रम पवित्र होय ऐसें ॥ विचारोनि निजमानसें ॥ अति उल्हासें विनवित ॥ ६५ ॥ ऐसीच रुक्मिणीप्रतिमा ॥ योग्य करवितों युग्मा ॥ लग्नोदेशें ममाश्रमा ॥ यावें या नेमा कृपा कीजे ॥ ६६ ॥ म्हणोनि घातलें दंडवत ॥ नेत्रीं प्रेम वोसंडत ॥ मुखें श्रीनाथ म्हणत ॥ सद्गदित पैं जाला ॥ ६७ ॥ सद्भाव निर्माण होतां ॥ ऐसि व्हावी अवस्था ॥ कृपा उपजली नाथा ॥ उठवी तत्वता स्वहस्तें ॥ ६८ ॥ म्हणे जैसें देवाचें मनोगत ॥ तैसीच प्रेरणा करित ॥ जाऊनियां अति त्वरित ॥ लग्नसाहित्य करावें ॥ ६९ ॥ आम्ही देवासवें जाण ॥ अवश्य येतों आपण ॥ ऐसा निश्चय करोन ॥ गृहस्थ गौरवून बोळविला ॥ ७० ॥ म्हणें सहसमुदाय परिवार ॥ लग्नासी आणावें समग्र ॥ वाटखर्ची द्रव्य अपार ॥ नेमून साचार दिधलें ॥ ७१ ॥ हा अवघा विचार बुद्धी ॥ उद्धवाकडे प्रतिपादी ॥ इतुकें नेमुनी त्रिशुद्धी ॥ कार्यसिद्धि मानिली ॥ ७२ ॥ सहपरिवार आपण ॥ नाथासीं करूनि नमन ॥ गृहस्थें अति सुखोन ॥ केलें प्रयाण स्वदेशा ॥ ७३ ॥ त्वरें पावेन स्वस्थाना ॥ आधीं प्रतिमा करवून जाणा ॥ ठाण ध्यान सुलक्षणा ॥ विठ्ठल ध्यानासमयुक्त ॥ ७४ ॥ तदनंतरें आइति सिद्धी ॥ करवीतसे यथाविधी ॥ सावधान

करून बुद्धी ॥ वर्ते त्रिशुद्धि आदरार्थ ॥ ७५ ॥ येरीकडे प्रतिष्ठानीं ॥ उद्धवें नाथ आज्ञेकरुनी ॥ भाविकें सात्विकें मेळउनी ॥ अपूर्व करणी मांडिली ॥ ७६ ॥ हीन दीन पंगू पायी ॥ आंधळे खुळे असती देहीं ॥ तयांसी अवंतून लवलाही ॥ नेमिले पाही वऱ्हाडी ॥ ७७ ॥ गौरवूनि वस्त्राभरणीं ॥ गाडिया केल्या वाहनी ॥ भाविकजन नरनारी मिळोनी ॥ वऱ्हाडालागोनि चालिले ॥ ७८ ॥ शिबिकेसी बैसवुनी देव ॥ आधीं श्रीनाथ उद्धव ॥ सवें वाजंत्री समुदाव ॥ वऱ्हाड अपूर्व निघालें ॥ ७९ ॥ नगर नागरिक जन ॥ पाहती कौतुक संपूर्ण ॥ देव नवरा होऊन ॥ करावया लग्न जातसे ॥ ८० ॥ सवें उपाध्याचा मेळा ॥ चालिले पाहावया सोहळा ॥ गिरजाबाई ते वेळां ॥ रथीं वेल्हाळा बैसविली ॥ ८१ ॥ वाजंत्रें वाद्यांच्या गजरीं ॥ निशाण त्राहटिती भेरी ॥ मिरवीत जाती नरनारी ॥ सहपरिवारीं लग्नासी ॥ ८२ ॥ आश्चर्य वाटलें सकळां ॥ म्हणती हा लग्न सोहळा ॥ धन्य जे पाहती डोळां ॥ वर्णिती लीला नाथाची ॥ ८३ ॥ वऱ्हाड चालिलें गजरें ॥ आक्रमित पंथ सत्वरें ॥ मुखें गर्जती जयजयकारें ॥ नामोच्चारें निजनेहटी ॥ ८४ ॥ सोयरियांचें नगर नेहटीं ॥ पावोनि करिताती गोष्टी ॥ धन्य नाथऐश्वर्य कोटी ॥ परमार्थ सृष्टि रचियेली ॥ ८५ ॥ वऱ्हाडाचें आगमन ॥ गृहस्थासी जालें श्रवण ॥ उल्हास मानून पूर्ण ॥ नगरजन मेळविले ॥ ८६ ॥ वाजंत्री निशाण भेरी ॥ वाजती मंगळतुरी ॥ सहपरिवारें अतिगजरीं ॥ आला पुढारी भेटीसी ॥ ८७ ॥ येऊन वंदिलें श्रीनाथा ॥ समस्त भेटविले अति आस्थां ॥ आनंद न माय चित्तां ॥ उल्हासतां बोलत ॥ ८८ ॥ धन्य भाग्य येथिच्या जनां ॥ जे पाहती श्रीचरणां ॥ यांचिया पुण्याची गणना ॥ आमुचेनि जाणा न बोलवे ॥ ८९ ॥ वराचिया पूजनासी ॥ उंच वस्त्रें भूषणांसी ॥ अर्पून यथा विधानासी ॥ जानवशासीं आणिलें ॥ ९० ॥ यथाविधि साळंकृत ॥ विठ्ठलरुक्मिणी विवाह करित ॥ जन म्हणती धन्य भावार्थ ॥ कौतुक अद्भुत देखिलें ॥ ९१ ॥ लग्न सोहळा चारी दिवस ॥ सारून सावकाश ॥ श्रीनाथ सन्मानविशेष ॥ भाग्य सार्थकांस पैं केलें ॥ ९२ ॥ रुक्मिणीसहित विठ्ठल ॥ या रीति आम्हां नवल ॥ वऱ्हाडी बोलताती बोल ॥ देताती डोल सुखाचे ॥ ९३ ॥ तेथील समारंभ सुखस्थिती ॥ जालिया निरोप मागती ॥ तंव समस्तांचे मनोगतीं ॥ कीर्त्तन निश्चिती ऐकावें ॥ ९४ ॥ व्हावयालागीं जगदोद्धार ॥ श्रीनाथ घेत अवतार ॥ त्यांची विनंति गिरा मधुर ॥ ऐकोनि सादर मानिली ॥ ९५ ॥ कीर्तनगजरीं ब्रह्मानंद ॥ सकळांसी देउनी आनंद ॥ गृहस्थासीं पुसोनि प्रसिद्ध ॥ चालिले स्वानंदें निजस्थिती ॥ ९६ ॥ गृहस्थ आणि नगरजन ॥ बोळवित येती संपूर्ण ॥ अश्रुधारा गाळती लोचन ॥ जा हें वचन न बोलवे ॥ ९७ ॥ लाघवी श्रीनाथमूर्ती ॥ दर्शनेंचि भाविकें तरती ॥ धन्य जे संगति

धरिती ॥ हे भाग्यसंपत्ति दुर्लभ ॥ ९८ ॥ कंठ जाले सद्गदित ॥ धांवोनि चरणीं लागत ॥ क्षणक्षणां अवलोकित ॥ गुंतलें चित्त तयाचें ॥ ९९ ॥ नाथें आलिंगुनी समस्तां ॥ म्हणे कृपा असों द्यावी आतां ॥ पत्रद्वारें परामृषता ॥ स्मरण चित्ता असावें ॥ १०० ॥ सत्वर पाऊनि गमन ॥ तैसेच वऱ्हाडीही संपूर्ण ॥ एकमेकांसी पुसोन ॥ स्वयें प्रयाण आरंभिलें ॥ १ ॥ नाथासी जातां निजपंथा ॥ गृहस्थ आणि लोकां- समस्तां ॥ अवस्था जाली चित्ता ॥ बोली बोलतां ते नये ॥ २ ॥ सदैव आठवून गोष्टी ॥ ह्मणती अपूर्व पाहिलें दृष्टीं ॥ शांति क्षमा दया पोटीं ॥ ऐसा सृष्टीं दुजा नाहीं ॥ ३ ॥ येरीकडे श्रीनाथ ॥ क्रमें आक्रमून पंथ ॥ श्रीविठ्ठल रुक्मिणीकांत ॥ सहित येत प्रतिष्ठानां ॥ ४ ॥ नगर नागरिक जन ॥ करूं पातले दर्शन ॥ हातीं आरत्या घेऊन ॥ देवासी जाण वोंवाळिती ॥ ५ ॥ वाद्यांचिया अति गजरीं ॥ मिर- वताती परिवारीं ॥ रुक्मिणीवल्लभ श्रीहरी ॥ वाडियाभीतरीं आणिलें ॥ ६ ॥ दुसरे दिवशीं संतर्पण ॥ समस्तांसी दिधलें भोजन ॥ वऱ्हाडी गौरवून जाण ॥ स्वस्थानासी धाडिलें ॥ ७ ॥ यापरि विठ्ठलमूर्त्ती ॥ सहदंपत्य निजात्म रूयाती ॥ श्रीनाथ आश्रमीं बसती ॥ षड्गुणसंपत्ति ऐश्वर्या ॥ ८ ॥ नाथ स्वयें चित्तीं विचारी ॥ श्रीविठ्ठल रुक्मिणी आलीं घरीं ॥ याचि यात्रा पंढरपुरीं ॥ यावया करी हें लाघव ॥ ९ ॥ पुढील कथानुसंधान ॥ श्रीनाथ पंढरीदर्शन ॥ भानुदास चरित्रवर्णन ॥ प्रसंगें करून होईल ॥ १० ॥ रसाळ निरोपण गोड ॥ श्रवणेंच पुरतसे कोड ॥ केशव संताचें लडिवाड ॥ भक्ति आवड तेंचि वदवी ॥ ११ ॥ इतिश्रीएकनाथचरित्रे- त्रयोदशोध्यायः ॥

---

## अध्याय चवदावा.

श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ सकळदेव चूडामणी ॥ विठ्ठल आला निजभुवनीं ॥ नाथ निजस्थिति समाधानी ॥ उद्धवालागुनी आज्ञापी ॥ १ ॥ पंढरिनाथ आपण ॥ स्वयें गेला लाघव करुन ॥ याचें कार्य हें संपूर्ण ॥ पंढरी अवलोकन करावें ॥ २ ॥ यालागीं आम्ही आतां ॥ पंढरीसी जातों तत्वतां ॥ येथील निजनेम- व्रता ॥ यथास्थितां आचरावें ॥ ३ ॥ उद्धव स्वयें स्वबुद्धी ॥ केलिये आज्ञेची सिद्धी ॥ समागमें न्यावया साहित्यविधी ॥ आइती शुद्धि साधिली ॥ ४ ॥ दिंडीपताका भेरी ॥ टाळविणा मृदंग गजरीं ॥ सेवकजन परिवारीं ॥ सिद्ध करी यात्रेसी ॥ ५ ॥ पांडुरंग यात्रा परम ॥ अवश्य पाहिजे संभ्रम ॥ मुहूर्त्त पाहुनी उत्तम ॥ केला नेम प्रयाणीं ॥ ६ ॥ कर जोडोनी विनंती ॥ करिता होय नाथाप्रती ॥ यात्रे जावयाची

आइती ॥ साहित्यसंपत्ति सिद्ध जाली ॥ ७ ॥ मुहूर्तकाळीं प्रयाण ॥ कीर्तन करितची आपण ॥ श्रीनाथ स्वयें ब्रह्म पूर्ण ॥ यात्रेसी गमन मांडिलें ॥ ८ ॥ क्षणक्षणां हरिकथा ॥ पदोपदीं नाम गातां ॥ समागमीं या समस्तां ॥ आनंद चित्ता न समाये ॥ ९ ॥ प्रतिष्ठानीं यथारिती ॥ सदां व्रत कीर्तन प्रीतीं ॥ उद्धव चालती यथास्थिती ॥ सादर सद्भक्ति निजनिष्ठा ॥ १० ॥ येरीकडे पंढरीस ॥ यात्रेचा अति सौरस ॥ जन मिळाले बहुवस ॥ पाहती विलास देवाचा ॥ ११ ॥ पंढरीचे भगवज्जन ॥ ज्यांसीं विठ्ठलची परिपूर्ण ॥ अहर्निशीं अनुसंधान ॥ कथाकीर्तन प्रिय त्यांसीं ॥ १२ ॥ संत महानुभावभक्त ॥ तयांसी विठ्ठल सुचवित ॥ प्रतिष्ठानाहूनि एकनाथ ॥ येतात येथें भेटीसी ॥ १३ ॥ भानुदास कुळप्रकाश ॥ अवतार हा पूर्णांश ॥ मत्स्वरूप धरून नरवेश ॥ जगदोद्धारास प्रगटला ॥ १४ ॥ तुम्ही समस्त भक्तजन ॥ करितची हरिकीर्त्तन ॥ सामोरें जाऊनि संपूर्ण ॥ अति सन्मान त्यासी द्यावा ॥ १५ ॥ चतुर्दशीचें कीर्तन ॥ महाद्वारीं नेऊन ॥ नाथवाणीचें श्रवण ॥ समस्तीं बैसोन ऐकावें ॥ १६ ॥ प्रांजळ आज्ञा समस्तांसीं ॥ जाली तयां आश्चर्यासी ॥ परस्परें क्षाववासी ॥ निवेदनासी पै करिती ॥ १७ ॥ मिळोनि समस्त भक्तजन ॥ महाद्वारीं आले आपण ॥ तंव अकस्मात वाद्यगर्जना ॥ भेरी निशाण ऐकती ॥ १८ ॥ दुरूनि न्याहळिती वाट ॥ तंव कीर्त्तनीं घोष उद्भट ॥ भीमा परतिरा निकट ॥ पाहिले स्पष्ट समुदायेसी ॥ १९ ॥ जयाची सुचना पंढरिनाथ ॥ करितोचि हा समर्थ ॥ आला देखोनि श्रीनाथ ॥ चालती समस्त सामोरे ॥ २० ॥ नाथासी सन्मुख भीमातिरीं ॥ येऊनि गर्जती जयजयकारीं ॥ नौका पाठऊन लवकरी ॥ सहपरिवारीं आणिलें ॥ २१ ॥ सकळ भक्त दंडवत ॥ साष्टांग नाथासी वंदित ॥ स्वयें नाथही तद्वत ॥ सकळां नमीत अति प्रीती ॥ २२ ॥ परस्परें आलिंगन ॥ होतांचि जालें समाधान ॥ करीत कथा हरिकीर्त्तन ॥ राउळा जाण आणिलें ॥ २३ ॥ गरुडपारीं साष्टांग ॥ द्वादश नमस्कार सांग ॥ नमुनी नमिला पांडुरंग ॥ जो अंतरंग निजदासां ॥ २४ ॥ येऊनि प्रासादां भीतरीं ॥ विठ्ठल मूर्त्ति अति गोजिरी ॥ नयनीं देखतांचि ते अवसरी ॥ निजअंतरीं प्रकाशली ॥ २५ ॥ विटेवरी समचरण ॥ घनःशाम राजीवलोचन ॥ हृदयीं श्रीवत्सभूषण ॥ कर जंघीं शोभती ॥ २६ ॥ मुखचंद्राची निज शोभा ॥ पाहतां नयनीं निघती जिभा ॥ शशिसूर्य तेज प्रभा ॥ या स्वयंभा लेशाची ॥ २७ ॥ ठाणठकार सुंदर ॥ लावण्य गुणरत्नाकर ॥ अतिशयेसी मनोहर ॥ देखतांचि नेत्र निवताती ॥ २८ ॥ असो देखोनि श्रीकांत ॥ नाथ मस्तक पायीं ठेवित ॥ अति आवडी आलिंगित ॥ प्रेम अद्भुत निजनिष्ठा ॥ २९ ॥ भक्त पाहति सकळ ॥ तंव उभयतांचे नेत्रीं जळ ॥ नाथ विठ्ठलमेळ ॥

अद्वैत सुकाळ माजला ॥ ३० ॥ येरयेरांची निजस्थिती ॥ आत्मैक्य सुखसंपत्ती ॥ काय वर्णील अल्प मती ॥ आवडी चित्तीं दृढ वसो ॥ ३१ ॥ हेंचि मागावें श्रीनाथा ॥ अविट प्रेम गुण गातां ॥ संतसंगें गोडी चित्ता ॥ द्यावी आस्था परमार्थी ॥ ३२ ॥ जिवीं मुक्तिकोड ॥ अथवा संपत्तीची आवड ॥ सहसा नुपजो चाड ॥ हाचि निवाड असावा ॥ ३३ ॥ सर्व भूतिं तुझें स्वरूप ॥ हृदयीं शुद्ध चित्स्वरूप ॥ तुटोत संकल्प विकल्प ॥ होईं सकृप यालागीं ॥ ३४ ॥ परिसुनी तयाची वाणी ॥ प्रगटाचि अंतरविधानीं ॥ कृपा करूनि निजवचनीं ॥ संतोष मनीं देतसे ॥ ३५ ॥ हृदयीं श्रीनाथचरण ॥ तेथेंचि आवडी अविछिन्न ॥ शरण असोनि नमन ॥ अनुद्विग्न निजभावें ॥ ३६ ॥ कथेंत हे आडकथा ॥ ऐसें न मानावें श्रोतां ॥ नाथ विठ्ठल ऐक्यता ॥ परिसोनि चित्ता विरालों ॥ ३७ ॥ कल्पनेंत नसतां विचार ॥ विसरोनि मागितला वर ॥ जाणोनि निज निर्धार ॥ जल्पलों साचार वाणीसी ॥ ३८ ॥ अपराध क्षमूनि आतां ॥ ऐकिजे श्रोतीं मूळ कथा ॥ नाथविठ्ठल प्रेमावस्था ॥ शांतविती हिता भक्तांच्या ॥ ३९ ॥ असतां निजस्थिति अभिन्न ॥ विठ्ठलीं राखोनि देवपण ॥ आलिंगनींहुनि भिन्न ॥ जाला आपण श्रीनाथ ॥ ४० ॥ भक्तजन परिवारीं ॥ नेऊनि उतरविलें बिडारीं ॥ भांडारी अर्पुनि सामुग्री ॥ अति उपचारी सादर ॥ ४१ ॥ स्नानसंध्या पंक्तीभोजन ॥ जालियावरी भक्तजन ॥ करिते जाले संभाषण ॥ नाथमहिमान विठ्ठलाज्ञा ॥ ४२ ॥ चतुर्दशीचें कीर्तन ॥ महाद्वारीं कीजे आपण ॥ हें पांडुरंग आज्ञावचन ॥ प्रतिपाळण करावें ॥ ४३ ॥ कैसी आज्ञातीचें कारण ॥ सविस्तर सांगावें निरोपण ॥ ऐकतांचि श्रीनाथ प्रश्न ॥ चरित्र प्राचीन वर्णिती ॥ ४४ ॥ पूर्वी कोण्हेकाळीं येथ ॥ चरित्र जालें अत्यद्भुत ॥ तें परिसावया श्रीनाथ ॥ देत चित्त सादरत्वें ॥ ४५ ॥ विद्यानगरीं राज्यप्राप्ती ॥ रामराजा भक्त मूर्ती ॥ अति भावार्थी विठ्ठल भक्तीं ॥ केली ख्याति नवलाव ॥ ४६ ॥ प्रार्थुनि पांडुरंगासीं ॥ ह्मणें चलावें मम नगरासी ॥ धरणें बैसोनि दिवानिशीं ॥ करी उपवासासी सत्पात्र ॥ ४७ ॥ देव चित्ताचा कोंवळा ॥ आज्ञापिलें तयावेळां ॥ एके दिनीं आणि सोंवळा ॥ नेसी प्रेमळा तरीच घडे ॥ ४८ ॥ या दोन नेमा विरहित ॥ माझें येणें न घडे निश्चित ॥ रायें ऐकोनिया मात ॥ पडिला विचारार्थ यदर्थी ॥ ४९ ॥ बोलावूनि सुबुद्धि प्रधान ॥ सांगे कोडें देववचन ॥ प्रधानें विचारोनि मना ॥ म्हणे विज्ञापना अवधारीं ॥ ५० ॥ देवें घालूनि कोडें प्रबळ ॥ पाहतसे तुझ्या भक्तीचें बळ ॥ येथें बुद्धि एकचि प्रांजळ ॥ ते निश्चळ परिसावी ॥ ५१ ॥ स्वराज्य देशांतील समस्त ॥ लहान थोर विप्र येथ ॥ आणवूनि सुनिश्चित ॥ विनीत व्रत विचारावें

॥ ५२ ॥ आलिया समस्तांच्या मना ॥ पंढरिहून स्वस्थाना ॥ पर्यंत तया ब्राह्मणां ॥ सोंवळेंचि जाणा उभे कीजे ॥ ५३ ॥ हातोहातीं देवासी ॥ देवोनियां सावकाशी ॥ अविश्रम एक्या दिवशीं ॥ स्वस्थानासी पैं न्यावें ॥ ५४ ॥ कुशळ बुद्धि ऐकोनि कानीं ॥ राजा संतोषला मनीं ॥ त्वरें आज्ञापत्र देउनी ॥ दूतां लागुनी पाठविलें ॥ ५५ ॥ आपुल्या राज्यांतील ब्राह्मण ॥ समस्त लहान थोर आणुन ॥ अविनित मृदु प्रश्न ॥ हें कार्य आपण निवेदिलें ॥ ५६ ॥ राजआज्ञा आणि परमार्थ ॥ समस्त हे अंगिकारित ॥ दिवस एक नेमुनी त्वरित ॥ पंथीं राहवीत ग्रामांतरीं ॥ ५७ ॥ पंढरिहून स्थानपर्यंत ॥ अन्नोदक संस्था यथास्थित ॥ गांवोगांवीं करवी नृपनाथ ॥ अति विनीत द्विजभक्ती ॥ ५८ ॥ नेमले दिवशीं ब्राह्मण ॥ स्वस्थळीं करूनि स्नान ॥ मार्गावरी हो येऊन ॥ सोंवळेंच जाण उभे ठाकती ॥ ५९ ॥ राजा प्रधान पादचारी ॥ पंढरी प्रासादा भीतरीं ॥ येऊनि साष्टांग नमस्कारी ॥ विनंति करी देवासी ॥ ६० ॥ आज्ञेप्रमाणें निश्चिती ॥ सोंवळें ब्राह्मण उभे असती ॥ कृपा करोन शीघ्र गती ॥ चलावें म्हणती विठ्ठला ॥ ६१ ॥ विनवोनियां ऐशा रिती ॥ ब्राह्मणांसी ह्मणे नृपती ॥ देवासी उचला हातोहातीं ॥ स्वस्थानाप्रती पाववा ॥ ६२ ॥ आग्रह करितां देव ॥ ब्राह्मणांसी उचले स्वयंमेव ॥ हातोहातीं ब्राह्मण सर्व ॥ नेती नवलाव कौतुकें ॥ ६३ ॥ श्रम न होतां कोणासी ॥ देव नेऊन एक्या दिवशीं ॥ पावविला त्या स्थानासी ॥ निज नेमेसीं उचलोनी ॥ ६४ ॥ राजा येऊनि आपण ॥ रत्न-जडित सिंहासन ॥ प्रासादें निजकरें मांडून ॥ वरीं स्थापना करी देवा ॥ ६५ ॥ नानावस्त्रें अलंकार ॥ सुवर्ण रत्नमय विचित्र ॥ गळां नवरत्नाचे हार ॥ शोभा अपार पैं केली ॥ ६६ ॥ षोडशोपचारी पूजा ॥ सुगंध द्रव्य अति वोजा ॥ पूजोनियां अधोक्षजा ॥ वाजंत्रबाजा गजरेसी ॥ ६७ ॥ समस्त ब्राह्मण संतर्पण ॥ यथाविधीं अति दिव्यान्न ॥ देऊनि तयां भोजन ॥ वस्त्र गौरवून अति प्रीती ॥ ६८ ॥ भिक्षुकांसी दक्षिणा दान ॥ देऊनि तोषविलें ब्राह्मण ॥ आशिर्वाद मुखें गर्जोन ॥ नृपतीसी पुसोन पैं गेले ॥ ६९ ॥ देव प्रासाद बळकट ॥ तीन पोंवळ्यासह कपाट ॥ कड्या कुलपें घनदाट ॥ केली खटपट दृढतेची ॥ ७० ॥ पूजेसीं नेमिले ब्राह्मण ॥ त्यांचा निर्वाह सहकुटुंब जाण ॥ कोणासीं न वाटे शीण ॥ तेचि संभावना करीतसे ॥ ७१ ॥ त्रिकाळीं पूजा नेमस्त ॥ साहित्य अति यथोक्त ॥ राजाही त्रिकाळ दर्शन घेत ॥ अति विनीत भक्तीसीं ॥ ७२ ॥ यापरि भाग्यविलास ॥ देव भोगी सावकाश ॥ येरीकडे पंढरीस ॥ यात्रा दिवस पैं आला ॥ ७३ ॥ वार्षिक यात्रेची यापरी ॥ यात्रा दाटली नरनारी ॥ सत्पुरुष मंडळी स्वनिर्धारीं ॥

आले पंढरी तें ऐका ॥ ७४ ॥ नामदेव अति आवडता ॥ लडिवाळ देवाचा तत्वतां ॥ निवृत्ति ज्ञान सोपाननाथा ॥ देवही माथा वंदीतसे ॥ ७५ ॥ सांवतामाळी कुंभार गोरा ॥ या भक्तांच्या मुख्य धुरा ॥ चोखामेळा अति शूद्रा ॥ संगें ढोरा वोढी देव ॥ ७६ ॥ ज्ञानी विसोबा खेचर ॥ नामदेवाचा गुरु साचार ॥ भानुदास अति प्रियकर ॥ आवडता फार देवाचा ॥ ७७ ॥ नामदेवाचे चौघे पुत्र ॥ आणिकही लहान थोर ॥ यात्रेसी मिळाले अपार ॥ करीत जयजयकार नामाचा ॥ ७८ ॥ तंव देव नेलियाची वार्ता ॥ बडवे सांगती उद्विग्नता ॥ निस्तेज पंढरी देखता ॥ सर्वांसी चिंता पैं जाली ॥ ७९ ॥ बडवे म्हणती संतांप्रतीं ॥ तुम्हासारिख्या थोर मूर्ती ॥ असतां देव कळा हातीं ॥ हे ख्याति राजयाची ॥ ८० ॥ तंव निवृत्ति श्रीज्ञानदेव ॥ म्हणती नवल जालें अपूर्व ॥ धन्य नृपतीचें लाघव ॥ कैवारें देव पैं नेला ॥ ८१ ॥ नामा अथवा भानुदास ॥ अवश्य आणितील देवास ॥ बोलावूनियां उभयतांस ॥ या विचारास योजावें ॥ ८२ ॥ एक विचारें समस्त ॥ त्या उभयतां बोलावित ॥ देव आणिला पाहिजे त्वरित ॥ भक्तिभावार्थ प्रतापें ॥ ८३ ॥ तंव भानुदासें समस्तांसी ॥ वंदोनि अति उल्हासी ॥ म्हणे आज्ञाप्रतापें यशरासी ॥ घेऊनि देवासी येतसों ॥ ८४ ॥ मानलें सकळांच्या चित्तीं ॥ सन्मानूनि निरोप देती ॥ सव्य घेऊनि संतमूर्ती ॥ शीघ्र गति चालिला ॥ ८५ ॥ संत आणि यात्रा समस्त ॥ निवांत होऊनि वाट पाहात ॥ भानुदास नृप नगरांत ॥ पावोनि राहात दुकानीं ॥ ८६ ॥ तेथील पाहिला वृत्तांत ॥ तंव देवासी अर्गळा बहुत ॥ कोणी नवा प्राणी तेथ ॥ आज्ञेविरहित जाऊं नपवे ॥ ८७ ॥ देव पडला बंदिखानीं ॥ भानुदास विव्हळ मनीं ॥ कार्य साधे कैसेनी ॥ आठवी मनीं विठ्ठल ॥ ८८ ॥ ऐशा परी चिंताक्रांत ॥ होता लोटली अर्ध रात्र ॥ भानुदास जंव लक्षित ॥ निवळ एकांत दिसतसे ॥ ८९ ॥ निद्रिस्थ जालें सकळ जन ॥ आतां पाहावा करूनि प्रयत्न ॥ दुकानींहूनि उठोन ॥ देवद्वारीं जाण पातला ॥ ९० ॥ कपाटासी लावितां हात ॥ तंव तें सहज मुक्त होत ॥ प्रवेश करुनी आंत ॥ मागुती लोटित कपाटां ॥ ९१ ॥ याचिपरी दुसरी पोवळी ॥ कपाटां उघडी ते काळीं ॥ मुख्य प्रासादा जवळीं ॥ येऊन न्याहाळी कपाटा ॥ ९२ ॥ तंव लखलखाट तेजदीप्ती ॥ सुवर्ण वुटी भिंती शोभती ॥ कवाडेंही तेचि स्थिती ॥ देदीप्य दिसती डोळियां ॥ ९३ ॥ भानुदासें स्पर्शितां हात ॥ मुख्य कपाट मुक्त होत ॥ हर्षयुक्त आनंद चित्त ॥ स्वयें जात भीतरीं ॥ ९४ ॥ कर्पूर दीपिका चहूं कोनीं ॥ लखलखाट उजेड नयनीं ॥ रत्नजडित सिंहासनीं ॥ देव चूडामणी विठ्ठल ॥ ९५ ॥ देखतांचि श्रीमूर्ती ॥ थोर आनंद जाला चित्तीं ॥ क्षुधे तृषेची खंती ॥ हरपोनी विश्रांति

पावला ॥ ९६ ॥ पांडुरंगें अतितांतडी ॥ घातली सिंहासनाहुनी उडी ॥ भानुदास अति आवडी ॥ हृदयीं परवडी कवळिला ॥ ९७ ॥ बहुकाळें भेटतां बाळा ॥ मातेसी जैसा कळवळा ॥ अश्रुधारा स्त्रवती डोळां ॥ देव कोंवळा चित्ताचा ॥ ९८ ॥ भानुदासा पडलें ठक ॥ तटस्थ ठेला क्षण एक ॥ देवें थापटूनि देख ॥ आलिंगूनि कौतुक पैं केलें ॥ ९९ ॥ सावध भानुदास होतां ॥ पायांवरी ठेवोनि माथा ॥ स्फुंदस्फुंदोनी आक्रंदतां ॥ प्रेमावस्था नावरे ॥ १०० ॥ कुरवाळोनी स्वहस्तें ॥ सुख अर्पी तयातें ॥ ह्मणें आवरोनि प्रेमातें ॥ गुजहितातें बोलावें ॥ १ ॥ प्रेमावस्था जिरवोनि पोटीं ॥ सांगों लागे गुजगोष्टी ॥ कार्य होतें जें पोटीं ॥ अभंग ओंठीं निघतसे ॥ २ ॥ ॥ अभंग ॥ चंद्रभागा तिरीं उभा विटेवरी ॥ विठो राज्य करी पंढरीये ॥ १ ॥ रिद्धि सिद्धि वोळंगती परिवार ॥ न लाहती अवसर ब्रह्मादिक ॥ २ ॥ सांडूनि तितुके व्यर्थ वांझ केले ॥ कवणे चाळवीले काडीया ॥ ३ ॥ शंख भेरी मृदंग वाजती काहळा ॥ उपेवड राउळा होतअसे ॥ ४ ॥ चांपेल मार्जन सुगंध चर्चून ॥ भीमरा चंदन वाट पाहे ॥ ५ ॥ रंभा तिलोत्तमा उर्वशी मेनीका ॥ कामिनी आणिका येती सेवे ॥ ६ ॥ कनकाचे पर्यंकीं रत्नाचे दीपक ॥ देखोनि श्रीमुख वोवाळिती ॥ ७ ॥ रखुमाई आई ते जाली उदास ॥ कैसें पुंडलिकास मौन पडलें ॥ ८ ॥ भक्त भागवत सकळ पारुशले ॥ निःशब्दें ते ठेले तुजवीणें ॥ ९ ॥ धन्य पंढरपूर विश्वाचें माहेर ॥ धन्य भीमातीर वाळुवंट ॥ १० ॥ भानुदास ह्मणे चाल आह्मासवें ॥ वाचा ऋणदेवें आठवावें ॥ ११ ॥ ओवी ॥ यापरी भांडूनि देवासी ॥ तेचि काळीं साधी कार्यासी ॥ भाकें गोंविलें विठ्ठलासी ॥ ह्मणे येतों संगेसी पैं तुझ्या ॥ ३ ॥ आणीक देत वरदान ॥ तुझे वंशीं अवतरण ॥ मीस्वयें करीन आपण ॥ करीत जन उद्धार ॥ ४ ॥ आश्वासूनि भानुदास ॥ ह्मणे स्वस्थ जावें बिऱ्हाडास ॥ उदईक होईल विलास ॥ तो सावकाश लक्षावा ॥ ५ ॥ आवडीच्या सौरसीं ॥ निज कंठींच्या माळेसी ॥ प्रसाद भानुदासासी ॥ घालून गळ्यासी बोळविलें ॥ ६ ॥ पुष्प तुळसी हारातें ॥ रत्नमाळा गळां येत ॥ भानुदासा नसे विदित ॥ स्वयें जात निजानंदें ॥ ७ ॥ उरली रात्र क्रमिल्यावरी ॥ उषःकाळीं नदी तिरीं ॥ विणा घालूनि खांद्यावरीं ॥ स्वानंदें करी कीर्तन ॥ ८ ॥ येरीकडे कांकड आरती ॥ करावया बडवे येती ॥ निर्माल्य विसर्जितां माळेप्रती ॥ गळां न देखती देवाच्या ॥ ९ ॥ देवाचा नवरत्न हार ॥ चोरी गेला हें उत्तर ॥ राजा ऐकोनि चिंतातुर ॥ होऊनि सत्वर बोलिला ॥ ११० ॥ समस्त सेवकजनीं आतां ॥ शोध कीजे अति सत्वरता ॥ रत्नहार घ्यावा तत्वतां ॥ तरीच सेवकता उपयोगी ॥ ११ ॥ ऐकतां निग्रह राजवाणी ॥ सेवक निघाले गवेषणी ॥ नगरीं आणि बाह्य स्थानीं ॥ धांवले

सत्वर सज्जुनी हत्यारें ॥ १२ ॥ तव नदीतिरीं भानुदास ॥ हरिभजनीं अति उल्हास ॥ सुखें बैसला सावकाश ॥ गळां माळेस पाहिलें ॥ १३ ॥ संतोषमानुनी सेवकजन ॥ रत्नमाळा घेती हिरोन ॥ चोराचें समूळ लक्षण ॥ केलें निवेदन भूपतीसी ॥ १४ ॥ अविवेक बुद्धि राजयासी ॥ कांहीं न पुसतां शोधासी ॥ सुळीं द्यावें चोरासी ॥ या आज्ञेसी बोलिला ॥ १५ ॥ ईश्वरमायेचें कैवाड ॥ म्हणोनि बुद्धि जाली जड ॥ जिवीं संपत्तीची चाड ॥ म्हणोनि हे द्वाड जल्पला ॥ १६ ॥ सुळीं द्यावया चोर ॥ भानुदासासी धरिती हेर ॥ येरू मनीं निर्विकार ॥ शंका अणुमात्र न करीच ॥ १७ ॥ सुळा जवळीं नेऊन त्यासी ॥ म्हणती आठवावें देवासी ॥ ते काळीं अभंगासी ॥ अति उल्हासीं बोलिले ॥ १८ ॥ अभंग ॥ आकाशवरी पडों पाहे ॥ ब्रह्मगोळ भंगा जाय ॥ वडवानळ त्रिभुवन खाय ॥ तरि मी तुझीच वाट पाहें विठोबा ॥ १ ॥ आणिकाचा न करीं पांगिला ॥ नामधारक तुझाची अंकेला ॥ ध्रु० ॥ सप्तहि सागर समरस होती ॥ तैं हे विरोनि जाय क्षिती ॥ पंचमहाभूतें प्रळय पावती ॥ तैं तूंचि सांगाती विठोबा ॥ २ ॥ भलतेंसें जड पडो भारी ॥ परि नाम न सांडी न टळे निर्धारी ॥ पतिव्रता जेंवि प्राणेश्वरी ॥ देवा भानुदास म्हणें निर्धारी गा विठोबा ॥ ३ ॥ ओवी ॥ अभंग ऐकतां सकळां ॥ पल्लव फुटला तया शूळा ॥ देखतांचि नवललीळा ॥ केलें नृपाळा निवेदन ॥ १९ ॥ ऐकोनि दूतांची वाणी ॥ राजा आश्चर्य करी मनीं ॥ म्हणे ऐसी अघटित करणी ॥ भक्तावांचोनि कोणाची ॥ १२० ॥ चोर नव्हे तो पूर्णभक्त ॥ आतां व्हावें शरणांगत ॥ पुसोनि त्याचें मनोगत ॥ पुरवूं आर्त पैं त्याचें ॥ २१ ॥ उठोनि सत्वर निजगती ॥ अनवाणी धांवे नृपती ॥ अनुतापयुक्त काकुळती ॥ येऊन करीत दंडवत ॥ २२ ॥ कोण कोठील स्वामिराया ॥ कोठोनि आलासी या ठायां ॥ अचाट दाविली हे क्रिया ॥ कोणे कार्या कारणें ॥ २३ ॥ मीं तव अपराधी पतित ॥ येवढें आचरलों दुरित ॥ दीनदयाळू तुह्मी संत ॥ शरणांगत मीं आलों ॥ २४ ॥ भानुदास माझें नाम ॥ पंढरीहून आलों आपण ॥ देवदर्शना भाव धरून ॥ केल्या हें चिन्ह प्रगटलें ॥ २५ ॥ पंढरीस न्यावा देव ॥ हा माझा पूर्वभाव ॥ थोरथोर महानुभाव ॥ यात्रा सर्व मिळाली ॥ २६ ॥ समस्तीं मज आज्ञापून ॥ पाठवावयाचें हेंच कारण ॥ ऐकतांचि नृपति प्राण ॥ देहांतून जाऊं पाहे ॥ २७ ॥ विव्हळित झालें मन ॥ आक्रंदें करी रूदन ॥ व्यर्थ श्रम झाले भाउन ॥ अति उद्विग्न पैं जाला ॥ २८ ॥ भानुदासासी लोटांगण ॥ घालूनि करुणा विज्ञापन ॥ ह्मणें इतुकी गोष्टी करूनि भिन्न ॥ सर्व राज्य देईन हें ॥ २९ ॥ भानुदास ऐकोनि वाणी ॥ म्हणति हे देवाची करणी ॥ कैंचें सामर्थ्य कल्पना

मनीं ॥ मजलागुनी न करवे ॥ १३० ॥ जैसें देवाचें मनोगत ॥ तैसीच वर्त्तणुक होत ॥ इतुकें बोलोनि निवांत ॥ तंव राजा विनवित मागुती ॥ ३१ ॥ घालूनि लोटांगण ॥ घ्यावें आतां देवदर्शन ॥ प्रासादीं सन्मानें नेऊन ॥ मूर्त्तीचें ध्यान पाहताती ॥ ३२ ॥ म्लान वदन कळाहीन ॥ जळें वाहती लोचन ॥ स्वयें देखोनि दुश्चिन्ह ॥ मूर्च्छित जाण पडियेला ॥ ३३ ॥ म्हणे कटकटा उफराटें ॥ अदृष्ट झालें पैं खोटें ॥ देव रुसला हें मोठें ॥ दुःखें फुटे जिव्हार ॥ ३४ ॥ ऐसिये अवस्थे आंत ॥ शब्द ऐके अकस्मात ॥ मज ठेवितां निग्रह येथ ॥ पावसी अनर्थ रोकडा ॥ ३५ ॥ मनीं म्हणे येकाळीं देव ॥ निजस्थाना जावया स्वयमेव ॥ इतुकें रचितसे लाघव ॥ फिरलें दैव पैं माझें ॥ ३६ ॥ निश्चय देखोनी देवाचा ॥ राजा बोलतसे वाचा ॥ सोंवळ्यानें आणिला साचा ॥ तैसाचि न्यावयाचा असे नेम ॥ ३७ ॥ परिसोनि राजयाचें वचन ॥ भानुदास बोलतसे खूण ॥ आठवून वाचाऋण ॥ व्हावें लहान ये काळीं ॥ ३८ ॥ आपण करूनि स्नान ॥ नेसूनि सोंवळें वसन ॥ देवासन्निध होऊन ॥ उचलित जाण निज करें ॥ ३९ ॥ तंव विती प्रमाण मूर्त्ती ॥ झाली ते काळीं आकृती ॥ नवल देखतसे नृपती ॥ आश्चर्य चित्तीं चमत्कारला ॥ १४० ॥ भावें धन्य भानुदास ॥ सकळ पाहती हा विलास ॥ खांदीं वाहून देवास ॥ नमून नृपतीस चालिला ॥ ४१ ॥ कोठें न राहून स्थीर ॥ अहर्निशीं निरंतर ॥ पंथ क्रमूनि सत्वर ॥ गोपाळपुर पावला ॥ ४२ ॥ हर्षें निर्भर निजमानस ॥ देखोनिया पंढरीस ॥ लोटांगण सावकाश ॥ घालीत उल्हास हृदयकमळीं ॥ ४३ ॥ देव लाघवी विचित्र ॥ कैसें केलें चरित्र ॥ भानुदास भक्त पवित्र ॥ येत सत्वर पंढरिये ॥ ४४ ॥ प्रसन्न वदन पाहून त्यासी ॥ अति उल्हास सर्वत्रांसी ॥ ज्ञानेश्वरादि महंतांसी ॥ लोटांगणेसी वंदिलें ॥ ४५ ॥ जालिया वृत्तांताचें कथन ॥ समस्त संतांसीं देखून ॥ केलें तेणें धन्य धन्य ॥ वंदोनि आलिंगन दिधलें ॥ ४६ ॥ जयजयकाराची ध्वनी ॥ नाद न माये गगनीं ॥ मंगळवाद्यें मिरवुनी ॥ विठ्ठल स्वस्थानीं स्थापिला ॥ ४७ ॥ तोचि हा पंढरिनाथ ॥ अद्यापि उभा असे समर्थ ॥ स्वामीचा प्रपितामह येथ ॥ स्वकरें स्थापित देवासी ॥ ४८ ॥ हा इतिहास पुरातन ॥ श्रीनाथासी निवेदुन ॥ समस्तीं वंदुनी चरण ॥ वाणितां महिमान निजमुखें ॥ ४९ ॥ आतां चतुर्दशीचें कीर्त्तन ॥ श्रीवदनीचें निरोपण ॥ श्रवणें करावें पावन ॥ आज्ञा वचन देवाचें ॥ १५० ॥ येथुनी चतुर्दशीचे दिवशीं ॥ कथा समर्थाची या नेमास ॥ पांडुरंगाचा विलास ॥ मान्य सर्वांस पैं जाला ॥ ५१ ॥ नाथें आलिंगुनी समस्तां ॥ ह्मणे धन्य धन्य तुमची आस्था ॥ यदिवसाचिया वृत्तांता ॥ साकल्य

आचरितां ऐकविलें ॥ ९२ ॥ प्रसंगें आमुच्या पूर्वज्यांचें ॥ वर्तमान होतें साचें ॥ ऐकवूनि प्रेम तयाचें ॥ केलें मनाचें समाधान ॥ ९३ ॥ यावरि जो जो तुमचा भाव ॥ तो तो पुरवील सर्व देव ॥ तुमच्या रूपें मीं सदैव ॥ ऐकिलें लाघव देवाचें ॥ ९४ ॥ सर्वांसीं देऊन सन्मान ॥ गरुड पारीं येउन ॥ चतुर्दशीचें कीर्त्तन ॥ नाथें आपण पैं केलें ॥ ९५ ॥ संत महानुभाव श्रोते ॥ श्रवणीं एकाग्र चित्तें ॥ तटस्थ होऊनि सुखातें ॥ ब्रह्मानंदातें अनुभविती ॥ ९६ ॥ ब्रह्मरूप काया कीर्त्तनीं ॥ महिमान शोभे ऐसी वाणी ॥ ऐकोनियां संतजनीं ॥ चोज मनीं करिताती ॥ ९७ ॥ नवल वक्तृत्वाची थोरी ॥ चित्तासी येऊनि समाधि वरी ॥ सुख समुद्राची लहरी ॥ निघती बरीं शब्दरत्नें ॥ ९८ ॥ चढते वाढते आवडी ॥ अधिकची फावत गोडी ॥ सर्व याची जाली वेडी ॥ दैवी परवडी भोगिती ॥ ९९ ॥ यापरी जगदोद्धार ॥ कीर्त्तनीं देवाचा गजर ॥ होत परि निर्विकार ॥ दशा अणुमात्र तुचंबळे ॥ १६० ॥ यापरि मात्र महोत्सव ॥ करूनि गौरविले देव ॥ ते काळींचें लीलालाघव ॥ जाला नवलाव पंढरी ॥ ६१ ॥ करूनि यात्रा परिपूर्ण ॥ देवभक्तांसी पुसोन ॥ श्रीनाथ पुनरागमन ॥ करून स्वस्थान पावले ॥ ६२ ॥ यरिकडे पंढपुरीं ॥ श्रीनाथाची निजथोरी ॥ वर्णिताती घरोघरीं ॥ नरनारी भावार्थें ॥ ६३ ॥ प्रतिष्ठानीं पावतां श्रीनाथ ॥ उद्धव भक्तराज समर्थ ॥ भाविक जन समवेत ॥ सामोरा येत दर्शना ॥ ६४ ॥ साष्टांगें वंदुनी चरण ॥ सकळ करिती आलिंगन ॥ नामोच्चारें करिती कीर्त्तन ॥ वाडियांत येऊनि बैसले ॥ ६५ ॥ पुढील निरोपण संगती ॥ अवधान दीजे निजसंती ॥ तेणें चरित्र निरोपणें मती ॥ उल्हासयुक्ति वाढतसे ॥ ६६ ॥ श्रीनाथ चरण पादुका ॥ हृदयीं त्याचि निजमस्तका ॥ तेणेंचि केशवा आवांका ॥ उपजला निका भावार्थ हा ॥ १६७ ॥ इतिश्रीएकनाथचरित्रेभानुदासचरित्रयात्रापरिपूर्णनामचतुर्दशोध्यायः ॥ १४ ॥ श्रीरामार्पणमस्तु ॥

---

## अध्याय पंधरावा.

श्रीगणेशायनमः ॥ जगद्गुरु श्रीएकनाथ ॥ मायबाप शिरीं समर्थ ॥ वदवितसे चरित्रग्रंथ ॥ युक्त परमार्थ परिसावा ॥ १ ॥ पंढरीहून प्रतिष्ठानासी ॥ पावोनि परमोल्हासीं ॥ पुराण कीर्त्तन सदावृत्तासी ॥ चालवी नेमासी यथोक्त ॥ २ ॥ संन्यासी परमहंस विख्यात ॥ समस्तांसी लोटांगण करित ॥ आत्मस्थिति निर्धारांत ॥

१५। काव्य

असे वर्त्तत ते काळीं ॥ ३ ॥ श्रीनाथचरणीं अति प्रीती ॥ वर्त्तावें स्वनिष्ठा भक्ती ॥ लौकिकीं त्यासी ह्मणती ॥ विदेहा निश्चिती पिसाट ॥ ४ ॥ भूतमात्रीं नमन ॥ भेटल्या घाली लोटांगण ॥ यास्तव हें अभिधान ॥ दंडवत जाण ह्मणताती ॥ ५ ॥ यापरी स्वच्छंद गती ॥ स्वानंद भोगी अहोरातीं ॥ जन त्यातें पिसाट मानिती ॥ उफराटि रिती जगाची ॥ ६ ॥ नित्य श्रीनाथ दर्शन ॥ करीतसे नियमें करून ॥ मानसीं आलिया श्रवण ॥ बैसोनि पुराण परिसावें ॥ ७ ॥ एके दिवशीं स्नानासी ॥ जात असतां गंगातिरासी ॥ लोटांगण भेटल्यासी ॥ निज वर्त्तणुकेसी करीतसे ॥ ८ ॥ मेलें गाढव पडिलें क्षिती ॥ देखोनि विप्र उपहासिती ॥ दंडवत त्यासी तेव्हां ह्मणती ॥ लोटांगण घालविती गाढवा ॥ ९ ॥ मानूनि विप्रांचें वचन ॥ सुखें घातलें लोटांगण ॥ तंव ते ह्मणती अवघे जण ॥ मृतासीं नमन कैशा परी ॥ १० ॥ यासी करूनि जिवंत ॥ सुखें घालावें दंडवत ॥ तरीच तुमचें आचरित ॥ खरें निश्चित पैं मानूं ॥ ११ ॥ समस्त वेष्टूनि त्यातें ॥ छळूं पाहती पुरतें ॥ येरें थापटितां मृतगर्धभातें ॥ सजीवता त्यातें पातली ॥ १२ ॥ तयाचा देखुनी चमत्कार ॥ आश्चर्य मानिती लहान थोर ॥ सर्वभूतीं भगवत्पर ॥ त्यासी फार हें नव्हे ॥ १३ ॥ येऊनियां वाडियाप्रती ॥ नाथासी वृत्तांत सांगती ॥ दंडवत त्यांची शिष्टाई मिरविती ॥ नाना उपरति कौतुकें ॥ १४ ॥ कळिकाळ प्रबळ काळीं ॥ ऐसें करूं नये विचार शिळीं ॥ नाथ उठोनि ते वेळीं ॥ तयां जवळीं पैं आले ॥ १५ ॥ पाहती समुदाय अचाट ॥ लोकांचा भोवता थाट ॥ तयाचे कर्तृत्वाचा बोभाट ॥ बोलती अचाट परस्परें ॥ १६ ॥ श्रीनाथ ह्मणे हे राहटी ॥ घडली असे गोष्टी खोटी ॥ यासी पुढें अनर्थ कोटी ॥ राहतां सृष्टीं घडतील ॥ १७ ॥ जयाचें मरेल मनुष्य ॥ तो येईल उठवावयास ॥ लौकिक होईल बहुवस ॥ पडेल अपभ्रंश मग यासी ॥ १८ ॥ यवन नेऊन यासीं ॥ ठेवितील कारागृहासीं ॥ विचारून ऐसें मानसीं ॥ हातीं धरुनी तयासी ॥ गंगातिरासी पैं नेलें ॥ १९ ॥ कोणासी न होतां श्रवण ॥ त्यासी सांगती हीत वचन ॥ अनुचित घडलें आचरण ॥ कळिकाळ दारुण ये काळीं ॥ २० ॥ यासी आतां उपाय कोण ॥ पुसोनि धरिले नाथ चरण ॥ करूनि तयाचें शांतवन ॥ हित वचन सांगती ॥ २१ ॥ या देहीं लोकीं राहतां ॥ घात होईल निजस्वार्था ॥ उचित एकची आतां ॥ समाधि तत्वतां पैं घ्यावी ॥ २२ ॥ सबुद्धि ऐकतां त्यासी ॥ उचितार्थ आला चित्तासी ॥ ह्मणें येचि समयीं याचि दिवशीं ॥ समाधीसी बसतों ॥ २३ ॥ चित्तीं जाणोनि हित ॥ बोलावुनी कामाठी त्वरित ॥ गंगातिरीं स्थळ करवित ॥ समाधिस्थ बैसावया ॥ २४ ॥ श्रीनाथ सन्निधानेसी ॥

बैसतां जाला समाधीसी ॥ स्वच्छंदें त्यागी देहासी ॥ घटस्था दीपासी जेवीं लय ॥ २५ ॥ दंडवत त्यासी ऐसी सिद्धी ॥ असतां दिधली समाधी ॥ कोण मतें ऐसिया विधी ॥ ते प्रसिद्धि पाहों आतां ॥ २६ ॥ आधींच असाह्य ब्राह्मणासी ॥ निमित्य देखोनि वादासी ॥ मेळवूनि समस्तांसी ॥ पिंपळेश्वरासी पैं आले ॥ २७ ॥ नाथासी पुसती छळून ॥ कोणे ग्रंथीं असे लेखन ॥ तें आतां आणून ॥ वाद खंडण करावें ॥ २८ ॥ पंडित वैदिक इतर ॥ शास्त्रज्ञ बोलके जे नर ॥ मिळोनि विप्र समग्र ॥ वाद तत्पर पैं जाले ॥ २९ ॥ आह्मां न दावाल वचन ॥ तरी हे हत्या तुह्मांलागुन ॥ आणि अविधि केलें आचरण ॥ बहिष्कार पूर्ण तुह्मासी ॥ ३० ॥ नाना परीच्या वल्गना ॥ मनीं आलें त्या वचना ॥ छळ बुद्धि कल्पना ॥ करिती नाना नाथाप्रतीं ॥ ३१ ॥ निश्चयाचा मेरु अचळ ॥ श्रीनाथ मनीं निश्चळ ॥ प्रसन्न श्रीमुखकमळ ॥ बुद्धि अविकळ निजस्थिती ॥ ३२ ॥ करूनि ब्राह्मणां नमन ॥ मृदु विनित बोले वचन ॥ तुह्मी समर्थ ब्राह्मण ॥ मूर्ख दीन मीं एक ॥ ३३ ॥ शास्त्र पाठ अथवा श्रवण ॥ सहसा नाहीं केलें आपण ॥ येथें या विधीचें वचन ॥ विदित कोठुन असावें ॥ ३४ ॥ ऐसिया मूर्खासी पुनीत ॥ करावया तुमचें चरण-तीर्थ ॥ यालागीं आचरित ॥ करावें निश्चित लागतसें ॥ ३५ ॥ वरुणतीर्थ सर्व विधी ॥ भावना आमुची त्रिशुद्धी ॥ येणेंचि कृतकृत्य बुद्धी ॥ कार्यसिद्धि पैं माझी ॥ ३६ ॥ विप्र ह्मणती समस्त ॥ ऐसिया बोलें नव्हे हित ॥ प्रस्तुत घडेल जें दुरित ॥ तें निर्मुक्त पैं कीजे ॥ ३७ ॥ छळछळूनि बोलती वचन ॥ केव्हडें याचें धैर्य पूर्ण ॥ परमहंसासी पुरून ॥ निश्चित आपण बैसला ॥ ३८ ॥ वेदशास्त्रीं नसतां गती ॥ उगेंचि वर्तावें उद्धतीं ॥ वाढवूनियां महंती ॥ नाडिलें निश्चिती जगातें ॥ ३९ ॥ नुसत्या नामाचा पाठ ॥ सांगोनि करविला बोभाट ॥ लोक केलेरे कर्मभ्रष्ट ॥ ब्राह्मण्य स्पष्ट बुडविलें ॥ ४० ॥ एक ह्मणती अहो ऐका ॥ परमहंस पुरितां आंवाका ॥ उपजला जैं विवेका ॥ तुमचानिका पुरुषार्थ ॥ ४१ ॥ ऐसें तुमचें पूर्णपण ॥ तरी आतां दावा हें करून ॥ पाषाण नंदीकडून ॥ करवा भक्षण कडबाडें ॥ ४२ ॥ पूर्वींही ऐसा येथ ॥ ज्ञानेश्वर देखिला समर्थ ॥ पशुमुखें दशग्रंथ ॥ वेद बोलवीत सामर्थ्यें ॥ ४३ ॥ तेव्हां त्याचीनि मुक्तता ॥ येथें झाली हे वार्ता ॥ श्रेष्ठमुखें विदित कथा ॥ आह्मां समस्तां पैं झाली ॥ ४४ ॥ तुमचें जरी खरें ज्ञान ॥ तरी पाहूं आतां महिमान ॥ कडबा पेंढी आणून ॥ नाथापुढें ब्राह्मण ठेविती ॥ ४५ ॥ अनिवार ब्राह्मणाची स्थिती ॥ वारंवार छळ करिती ॥ भगवंताचे मनोगती ॥ नाथकीर्त्ति याचियोगें ॥ ४६ ॥ ज्ञानेश्वर अवतार चरित्र ॥ आपुलें जाणोनि विचित्र ॥ धाले ऐकोनियां श्रोत्र ॥ लाघव पवित्र

पूर्वीचें ॥ ४७ ॥ मनींचा झाला विचार ॥ तेथें जावयाचा निर्धार ॥ वक्तृत्व भाष्याचा विचार ॥ व्हावा साचार प्रसिद्ध ॥ ४८ ॥ प्रस्तुत येथें ब्राह्मणा ॥ संतोष द्यावयास्तव जाणा ॥ नमूनि त्यांचिया चरणा ॥ काय वचना बोलत ॥ ४९ ॥ पूर्वीं वशिष्ठ वचनासाठीं ॥ सूर्यमंडळीं तपली छाटी ॥ तुमची आज्ञा ये सृष्टी ॥ वंद्य वरिष्टीं पैं केली ॥ ५० ॥ कडबा भक्षितां नंदी ॥ देवही आज्ञा तुमची वंदी ॥ ऐसें भासतसे बुद्धी ॥ सामर्थ्य सिद्धि तुमची पैं ॥ ५१ ॥ वचनें विनवून ब्राह्मण ॥ नंदी समीप येऊन ॥ श्रीनाथ बोलती वचन ॥ होत श्रवण विप्रांसीं ॥ ५२ ॥ प्रतिमेसी ये देवपण ॥ ऐसें ब्राह्मणांचें वचन ॥ तुवांही कृपा करून ॥ हें महिमान राखावें ॥ ५३ ॥ कडबा घेऊनियां करीं ॥ श्रीनाथ झडकरी॥ जीभ काढून बाहेरी ॥ वोढून मुखांतरीं भक्षिला ॥ ५४ ॥ ब्राह्मण पाहती समस्त ॥ तंव तो नंदी अति त्वरित ॥ चरण चाली धांवोनि येत ॥ गंगाडोहांत घाली उडी ॥ ५५ ॥ नवल चरित्र अद्भुत ॥ देखोनि विप्र करी विस्मित ॥ श्रीनाथ ब्राह्मण वंदित ॥ बोध अद्वैत निज स्थिती ॥ ५६ ॥ करूनिया बद्धांजुळी ॥ विनवीत वचन मवाळी ॥ कृपा करावी सकळीं ॥ मीं चरणकमळीं शरणांगत ॥ ५७ ॥ अनाक्रोश क्षमाशीळ ॥ श्रीनाथ निजबुद्धि निर्मळ ॥ धैर्य सामर्थ्य प्रबळ ॥ ब्राह्मण सकळ पाहती ॥ ५८ ॥ ह्मणती विपरित होत करणी ॥ अघटित वडे ये मेदिनी ॥ नाथ अजिंक छळणीं ॥ देव करणी ऐसीच ॥ ५९ ॥ शास्त्र वैदिक लौकिक ॥ त्या वेगळीच हे वर्त्तणुक ॥ त्याचा शोध अवश्यक ॥ नकरवे साम्यक कोणाचेनी ॥ ६० ॥ बहिष्कार मुक्त वचन ॥ बोलून चालिले ब्राह्मण ॥ समस्तांसी नमस्कारून ॥ केलें गंगास्नान श्रीनाथें ॥ ६१ ॥ चारित्रावरी चरित्र ॥ अवतार लीला विचित्र ॥ परिसोनि श्रोतियांचें श्रोत्र ॥ होती पवित्र पावन ॥ ६२ ॥ भावार्थ कारण भक्ती ॥ केशवाची अति प्रीती ॥ श्रीनाथ ऐश्वर्य स्थिती ॥ वदनीं उमटती अक्षरें ॥ ६३ ॥ इतिश्रीएकनाथचरित्रेविप्रगर्वहरणोनामपंचदशोध्यायः ॥ श्रीनाथार्पणमस्तु ॥

---

## अध्याय सोळावा.

श्रीगणेशायनमः ॥ रम्य चरित्र नाथस्थिती ॥ लीलाविग्रह पूर्ण मूर्त्ती ॥ नमन करूनि चरणाप्रती ॥ गावया मति उल्हासे ॥ १ ॥ ब्राह्मणांचा आग्रह वाद ॥ लीलाविनोद खुंटला शब्द ॥ श्रीनाथ प्रताप अगाध ॥ भाव अविरुद्ध निजस्थिती ॥ २ ॥ आश्रमा येऊनि आपण ॥ ह्मणती ज्ञानेश्वराचें स्थान ॥ पाहावया

आवडी पूर्ण ॥ ऐसें वचन निघालें ॥ ३ ॥ जावयाची सिद्धता ॥ उद्धवें केली तत्वता ॥ पाहूनिया सुमुहूर्ता ॥ विनंति श्रीनाथा पैं केली ॥ ४ ॥ समागमें समुदाय बहुत ॥ भाविक जन येऊं इच्छित ॥ तयांचें जैसें मनोगत ॥ तैसीच होत वर्त्तणुक ॥ ५ ॥ जगदोद्धारी अवतार ॥ श्रीनाथ कृपासागर ॥ विषमत्वाचा प्रकार ॥ नाहीं अणुमात्र निजस्थिती ॥ ६ ॥ आवडी धरूनि चित्तीं ॥ जे यात्रा करूं इच्छिती ॥ त्यांचा मनोभंग निश्चिती ॥ नहो हे उक्ति नाथाची ॥ ७ ॥ यात्रा सहसमुदायेसी ॥ निघाले करीत कीर्त्तनासी ॥ पावोनि इंद्रायणी तिरासी ॥ जयजयकारेसी गर्जती ॥ ८ ॥ ते काळीं तयांप्रती ॥ विशेष कैंची सुखवस्ती ॥ उध्वस्थ पाहूनि क्षिती ॥ भय मनीं समस्तांच्या ॥ ९ ॥ झाडी अतिशय दाट ॥ जावया स्पष्ट नाहीं वाट ॥ वनीं श्वापदांचा बोभाट ॥ किलकिलाट ऐकती ॥ १० ॥ निर्बुजले यात्राजन ॥ नाथें पाहून ऐसें चिन्ह ॥ तयाचें करून समाधान ॥ राहविले संपूर्ण नदीतिरीं ॥ ११ ॥ समस्तांसी ह्मणे नाथ ॥ तुम्ही असा येथें स्वस्थ ॥ समाधिस्थान शोधार्थ ॥ जाऊनि त्वरित येतसें ॥ १२ ॥ झाडींत रिघोन आपण ॥ शोधीतसे समाधिस्थान ॥ तंव वृक्ष सुंदर अजान ॥ देखिला दुरून पैं डोळां ॥ १३ ॥ अजान वृक्ष परिसरी ॥ जनमुखें श्रवण हे थोरी ॥ म्हणोनि निश्चय अंतरीं ॥ समाधि निर्धारी येथेंचि पैं ॥ १४ ॥ अजानवृक्षासन्निध अद्भुत ॥ देखिले वृक्ष असंख्यात ॥ ठाइठाईं वारुळें दिसत ॥ नव्हे सिद्धांत मुख्य स्थळाचा ॥ १५ ॥ बाह्य रिती गवेषण ॥ करितां झाला अस्तमान ॥ श्रीनाथासी नाहीं भान ॥ कैंचा अभिमान देहस्थितीचा ॥ १६ ॥ तेंचि स्थळीं स्वस्थ चित्तवृत्ती ॥ श्रीनाथ राहे आत्मस्थिती ॥ श्रीज्ञानेश्वर कृपामूर्त्ती ॥ प्रगटोन देती दर्शनीं ॥ १७ ॥ परस्परें निज ऐक्यता ॥ मुळींच आहे उभयतां ॥ परि लोकसंग्रहार्थ नटनाट्यता ॥ लीला विग्रहता भिन्नत्व ॥ १८ ॥ परस्परें सुख गोष्टी ॥ अभेद भेद निज दृष्टी ॥ होत असतां निज वृष्टी ॥ आनंद सृष्टीं न समाय ॥ १९ ॥ श्रीनाथ म्हणती आपण ॥ समाधीचें मुख्य स्थान ॥ पाहवयालागीं मन ॥ इच्छित पूर्ण हे निष्ठा ॥ २० ॥ ज्ञानेश्वर कृपा मूर्त्ति ॥ नाथासी धरूनि हातीं ॥ मुख्य स्थान समाधिप्रती ॥ नाथासी दाविती पैं डोळां ॥ २१ ॥ होय न होय समाधिस्थळ ॥ जनासी विकल्प राहील ॥ त्यालागीं लोक सकळ ॥ मानिती आढळ प्रांजळ ते ॥ २२ ॥ अजानवृक्षाची मुळी ॥ आली असे मस्तकाजवळी ॥ ते काढून वेगळी ॥ समाधि प्रांजळ करावी ॥ २३ ॥ म्हाळसाग्रामीं गीतार्थ ॥ माहाराष्ट्र वाणीचा ग्रंथ ॥ जाला तो हा काळपर्यंत ॥ शब्द अशुद्ध होत पाठांतरीं ॥ २४ ॥ अवलोकून तेथील अर्थ ॥ शोधिला पाहिजे तो ग्रंथ ॥ ऐकोनि दोन्ही कार्यार्थ ॥ होत

श्रीनाथ सुखाचा ॥ २५ ॥ एवं त्रिरात्र तीन दिवस ॥ लोटले सुखसंवादास ॥ येरीकडे समस्तांस ॥ चिंता विशेष वाढली ॥ २६ ॥ श्रीनाथ स्वयें आपण ॥ धुंडावया समाधिस्थान ॥ झाडींत गेलियावरी जन ॥ अति उद्विग्न बैसले ॥ २७ ॥ भक्षावया न मिळे अन्न ॥ क्षुधित यात्रा संपूर्ण ॥ श्रीज्ञानेश्वर दयाळु पूर्ण ॥ वाणी आपण स्वयें जाला ॥ २८ ॥ तंव लिंगाईत कानडावाणी ॥ अकस्मात तेथें प्रगटोनी ॥ पाल अति विस्तारोनी ॥ दुकान घालून बैसला ॥ २९ ॥ सर्वांनीं देखतां डोळां ॥ स्वयें आले तया जवळां ॥ ह्मणति उध्वस्थ वस्तिया काळां ॥ मांडियेलें दुकान ॥ ३० ॥ वाणी ह्मणे समस्तांसी ॥ पाहून समुदाय यात्रेसी ॥ आलों सामग्री द्यावयासी ॥ विकरा व्हावयासी निज हितां ॥ ३१ ॥ ऐकोनि त्याची वाणी ॥ जनासी संतोष जाला मनीं ॥ सामग्री घ्यावी द्रव्य देउनी ॥ बोलती वचनीं परस्परें ॥ ३२ ॥ येरू ह्मणे माझी रिती ॥ आधीं ऐकावी समस्तीं ॥ मान्य करोनि विनंती ॥ त्याचि पद्धती वर्तावें ॥ ३३ ॥ आजिपासोन शेवटवरी ॥ घ्यावी तुह्मी सर्व सामग्री ॥ एकदांचि निजनिर्धारीं ॥ द्रव्य करीं मज द्यावें ॥ ३४ ॥ जो जो पदार्थ अपेक्षित ॥ तो तो नेईजे समस्त ॥ तुमचा श्रेष्ठ जंव ये येथ ॥ तोंवरी निश्चित राहावें ॥ ३५ ॥ आश्वासूनि यात्रा समस्त ॥ जें इच्छि तें सर्वदां देत ॥ भांडीं आणि इतर पदार्थ ॥ स्वयें अर्पित आपणची ॥ ३६ ॥ त्रिरात्र तीन दिवस ॥ यात्रेचा केला परामृष ॥ नाथ दर्शनाची सर्वांस ॥ जिवीं आस पैं जाली ॥ ३७ ॥ निजस्थिति चौथे दिनीं ॥ नाथ आले तये स्थानीं ॥ सकळीं देखोनी नयनीं ॥ लोटांगणीं वंदिलें ॥ ३८ ॥ त्रिरात्र तीन दिवस ॥ उपोषण घडलें नाथास ॥ ह्मणोनि समस्त कासाविस ॥ करवीत स्नानास सत्वर ॥ ३९ ॥ नाथ निजस्थिति तृप्त ॥ जनासी कैंचें हें विदित ॥ लोकांसारिखेही वर्तत ॥ करीं आचरित तैसेंची ॥ ४० ॥ स्नान संध्या यथा विधी ॥ करून मांडिला भोजनविधी ॥ समस्त पुसती शुद्धी ॥ ठिकाण समाधि आतुडली कीं ॥ ४१ ॥ हो ह्मणोनि श्रीनाथ ॥ समस्तांसी सांगती अर्थ ॥ वृक्ष मुळीनें ग्रस्थित ॥ कंठप्रांत रुंधला ॥ ४२ ॥ ह्मणोनि जातसों मागुती ॥ तुह्मी यावें समस्तीं ॥ मुळी काढिजे अति युक्ति ॥ सावधान रीति पाहोनी ॥ ४३ ॥ भोजनांतीं सहपरिवारीं ॥ प्रवेशती झाडी भीतरीं ॥ जेथें समाधिची थोरी ॥ त्यापरि सरी पैं आले ॥ ४४ ॥ कुदळी घेऊनि हातीं ॥ भूमि शोधितां अति युक्ती ॥ तेचि मुळी आली हातीं ॥ तें समस्तीं पाहिलें ॥ ४५ ॥ नाथाचिया कृपा प्राप्ती ॥ तेजःपुंज दिव्य स्थिती ॥ देखिली ज्ञानेश्वराची मस्तकाकृती ॥ मुळी अति युक्ति काढिली ॥ ४६ ॥ कंठासी सह्यग्रता ॥ ते मुळी काढूनि तत्वता ॥ पाहोनि स्वरूप यथास्थितां ॥ आनंद चित्तां पैं जाला ॥ ४७ ॥ समस्तीं करून दंडवत ॥ करिते जाले प्रणिपात ॥ जयजयकारें गर्जत ॥ गात नाचत सप्रेमें ॥ ४८ ॥

जयजयकार गिरा गजरीं ॥ नाद कोंदला अंबरीं ॥ ते काळीं सर्व सुरवरी ॥ पुष्पवृष्टि पैं केली ॥ ४९ ॥ नारदादि सनकादिक ॥ पाहूं पातले हें कौतुक ॥ श्रीनाथची देखे एक ॥ इतरां अनोळख ते दृष्टी ॥ ५० ॥ भाविक जन मिळोन ॥ नीट करिती समाधिस्थान ॥ जेणें जगाचें उद्धरण ॥ दर्शनें स्मरणें होतसे ॥ ५१ ॥ अभिनव सर्व प्रकारीं ॥ नाथ कृपा हो प्रगट वरी ॥ परस्परें अति गजरी ॥ बोले वैखरी जन यात्रा ॥ ५२ ॥ यापरी प्रगट स्थान ॥ श्रीनाथ प्रसादें करून ॥ यात्रा होत सुख-संपन्न ॥ भाविक जन उद्धार हा ॥ ५३ ॥ नदीतिरीं उर्वरित लोक ॥ त्यांसीही आतां अवश्यक ॥ दर्शन व्हावें यालागीं देख ॥ एकमेक अनुवादती ॥ ५४ ॥ श्रीनाथें आपण ॥ सवें घेउनी समस्त जन ॥ नदीतिरीं पुनरागमन ॥ केलें जाण ते समयीं ॥ ५५ ॥ राहिलीया समस्तजनां ॥ पाठवीत समाधिस्थाना ॥ करू-नियां अभिवंदना ॥ घेउनी दर्शना पैं येती ॥ ५६ ॥ यापरि आनंदयुक्त ॥ सप्त दिवस आणि रात्र ॥ क्रमूनि यात्रा समस्त ॥ सामुग्री घेत वाणियाची ॥ ५७ ॥ यावरी विसर्जन दिवस ॥ ह्मणोनि पातले समाधीस ॥ दर्शन वंदन सावकाश ॥ घेत निरोपास निजनिष्ठा ॥ ५८ ॥ तेथूनि यावें आपण ॥ हिशेब पाहून संपूर्ण ॥ द्रव्य आणि भांडीं देऊन ॥ वाणियास पुसोन निघावें ॥ ५९ ॥ तंव तो वाणी नव्हे संसारी ॥ भक्तकाज कैंवारी ॥ दाउनि इतुकी थोरी ॥ अदृश्य लौकरी तो जाला ॥ ६० ॥ यात्रा जन येउनी पाहात ॥ वाणी न देखती दुकानासहित ॥ अघटित जाणोनी वृत्तांत ॥ निवेदन करित श्रीनाथा ॥ ६१ ॥ नाथ ह्मणे लीळा विचित्र ॥ नकळे देवाचें चरित्र ॥ तुमचें आचरण पवित्र ॥ ह्मणोन हा प्रकार घडलासे ॥ ६२ ॥ भांडीं नेऊनि समाधीसी ॥ अर्पूनि यावें त्वरेसीं ॥ आतां येथें स्थिर-तेसी ॥ राहणें तुह्मासी अनुचित्त ॥ ६३ ॥ श्रीनाथ आज्ञा प्रमाण ॥ भांडीं समाधीपासीं ठेऊन ॥ करिते जाले प्रयाण ॥ नामगर्जना जयशब्दें ॥ ६४ ॥ श्रीनाथकृपा हे लीला ॥ या देहीं याचि डोळां ॥ भोगूनि सुखसोहळा ॥ वेळोवेळां आठवीत ॥ ६५ ॥ श्रीनाथ ऐश्वर्य गोष्टी ॥ नामगर्जना करित होटीं ॥ पदोपदीं भक्त जगजेठी ॥ जयजयकारें सृष्टि उद्धरती ॥ ६६ ॥ यापरि क्रमून मार्गासी ॥ श्रीनाथ संगें आनंदेसी ॥ पुनरागमन स्वस्थळासी ॥ गंगातिरासी पैं आले ॥ ६७ ॥ यात्रेसह श्रीनाथ ॥ आलियाचा हा वृत्तांत ॥ उद्धवें ऐकोनि त्वरित ॥ सामोरा येत धांवोनी ॥ ६८ ॥ नगरनागरीक जन ॥ पातले करूं दर्शन ॥ सकळांसी समाधान ॥ होय आलिंगन नाथाचें ॥ ६९ ॥ टाळ विणा मृदंग भेरी ॥ वाद्यें वाजती नाना परी ॥ कीर्तनाचा निज-गजरी ॥ वाड्याभीतरीं पावले ॥ ७० ॥ यात्रा करूनि भाविकांसी ॥ निरोप दिधला

सर्वांसी ॥ समस्तीं वंदोनि नाथासी ॥ स्वगृहासी पैं गेले ॥ ७१ ॥ तेथील वृत्तांत कथन ॥ परस्परें करिती निवेदन ॥ श्रीनाथाचें महिमान ॥ अवतार प्रमाण बोलती ॥ ७२ ॥ यावरी श्रीनाथ आपण ॥ ज्ञानेश्वरी ग्रंथ शोधून ॥ तेंचि आरंभिलें पुराण ॥ श्रोता सावधान उद्धव ॥ ७३ ॥ द्वारकेची केशव मूर्ती ॥ श्रवणीं सादर अहोरातीं ॥ प्रश्नपूर्वक यथा रिती ॥ कौतुकें भोगिती आनंदा ॥ ७४ ॥ आळंदि प्रांतीचा अधिकारी ॥ या चरित्राची ऐकोनि थोरी ॥ वस्ती वसऊनि अळंकापुरीं ॥ ग्रामस्थ अधिकारी स्थापिला ॥ ७५ ॥ यात्रेसी प्रारंभ येथून ॥ उत्तरोत्तरीं विशेष जाण ॥ प्रगट अवतार विंदान ॥ जनालागून उद्धारा ॥ ७६ ॥ श्रीनाथ शोध परिपाठी ॥ ज्ञानेश्वरी प्रगट सृष्टी ॥ येथील वक्तृत्वाची पुष्टी ॥ आह्माच दृष्टि न कळे पैं ॥ ७७ ॥ नाथ ज्ञानेश्वरी भेटी ॥ अनुपम चरित्र सृष्टी ॥ केशवाचिया वाग्पुटीं ॥ अमृतवृष्टि नाथकृपें ॥ ७८ ॥ पुढील कथा गहन ॥ अद्वैत बोध परिपूर्ण ॥ प्रगट दावील वर्त्तन ॥ तें निरोपण अवधारा ॥ ७९ ॥ इतिश्रीएकनाथचरित्रे नाथज्ञानेश्वरयात्रापरिपूर्णनामषोडशोध्यायः ॥ श्रीनाथार्पणमस्तु ॥

---

## अध्याय सतरावा.

श्रीरामसमर्थ ॥ श्रीनाथऐश्वर्यमहिमा ॥ कोण योजावी यासी उपमा ॥ अघटित चरित्र महिमा ॥ वर्णनिसीमा नुलंघवे ॥ १ ॥ एक एक चरित्र श्रवण ॥ आवडी करील जो आपण ॥ कलिकल्मष दहन ॥ होऊनि पावन पैं होती ॥ २ ॥ बोल हे नव्हेति परिपाठीं ॥ प्रत्यय आणुनी वदलों होटीं ॥ श्रीनाथकृपा निजदृष्टी ॥ पात्र ये सृष्टी होइजे ॥ ३ ॥ या चरित्राची गोडी ॥ जिवीं बैसलिया आवडी ॥ तैं अविद्या जाय देशधडी ॥ सद्विद्या रोकडी प्रगटे पैं ॥ ४ ॥ श्रीनाथाचें वरदान ॥ सत्य सत्य हें मानून ॥ होऊनिया सावधान ॥ पुढील निरोपण परिसावें ॥ ५ ॥ करूनि ज्ञानेश्वरीचा शोध ॥ पुराण होतसे प्रसिद्ध ॥ नाथमुखें तेथिंचा बोध ॥ परिसतां अगाध सुख श्रोत्यां ॥ ६ ॥ द्वारकेची केशवमूर्त्ति ॥ श्रवणीं सादर निजप्रीतीं ॥ एक तप लोटलें या रिती ॥ सुखसंविति नाथाश्रमीं ॥ ७ ॥ पुढें सेवेचें आर्त्त ॥ जीवीं आलें तया बहुत ॥ ह्मणोनि नाथासी निरोप मागत ॥ जावया निश्चित निजस्थाना ॥ ८ ॥ अति आवडी करूनि नमन ॥ मधुरागिरा बोले वचन ॥ या संगतीचें महिमान ॥ सुखसंपन्न मीं झालों ॥ ९ ॥ एक तप तव संगती ॥ सुख भोगिलें अहोरात्रीं ॥ आतां जातों

स्वदेशाप्रती ॥ कृपा निश्चिती असों दीजे ॥ १० ॥ भावयुक्त अत्यादर ॥ देऊनि बोळविला विप्र ॥ पुढील वर्तणुक प्रकार ॥ श्रोतीं सादर परिसावा ॥ ११ ॥ श्रीनाथसंगें उद्धव ॥ भक्तीचा पुतळाचि स्वयंमेव ॥ नित्य नूतन बोधानुभव ॥ भोगी सद्भाव वाढऊनी ॥ १२ ॥ सर्वसाहित्य करितां सेवा ॥ अधिकची उल्हास वाटे जिवा ॥ धन्य धन्य त्याचिया भावा ॥ अवतार लाघवा पाहतसे ॥ १३ ॥ नाथ आसनासन्मुख ॥ बैसोनी भोगी श्रवणसुख ॥ ते काळींचा आनंद देख ॥ भोक्ता एक उद्धवची ॥ १४ ॥ माध्यान्हीं संतर्पणसमयीं ॥ सेवेसी सादर ठाईं ठाईं ॥ ब्राह्मण पूजासाहित्यही ॥ स्वहस्तेंचि पाहीं करावें ॥ १५ ॥ कीर्त्तनकाळीं अनुदिनीं ॥ उभा राहे धृपद धरोनी ॥ नाथकृत प्रबंध गाणीं ॥ स्वर देऊनि गातसे ॥ १६ ॥ पाठ प्रबंध इतिहास ॥ नाथ वाणीचा अति सौरस ॥ आठऊनि अहर्निस ॥ कीर्त्तनीं उल्हास गावया ॥ १७ ॥ श्रीनाथकृपा सत्पात्र ॥ सांठवण उद्धवचि स्वतंत्र ॥ भक्ति ज्ञान वैराग्यपर ॥ आचार पवित्र तो एक ॥ १८ ॥ नाथचरित्र नवल एक ॥ श्रोतीं परिसावें कौतुक ॥ कोणी अंतरनिष्ठ अनामिक ॥ ज्ञान परिपाक स्थितीचा ॥ १९ ॥ भार्येसह प्रतिष्ठानीं ॥ राहत होता एक कोनीं ॥ आवडी उपजली त्याचे मनीं ॥ भेटी लागुनी नाथाचिया ॥ २० ॥ नाथ जातां गंगास्नाना ॥ वाटेसी येऊन घेत दर्शना ॥ नमूनिया श्रीचरणा ॥ समीप जाणा तो आला ॥ २१ ॥ श्रीनाथ सुखस्थिती ॥ बोलों लागले तया प्रती ॥ या वर्त्तणुकेची वदंती ॥ विप्रांप्रती पैं कळली ॥ २२ ॥ येऊनि पाहती नयनीं ॥ उभयतां सन्निध बोलती वाणी ॥ सुखसंवाद शिरोमणी ॥ आत्मज्ञानीं फेडिती ॥ २३ ॥ तंव जवळी येऊनि ब्राह्मण ॥ बोलते जाले हें वचन ॥ अनामिकासी ज्ञान भाषण ॥ दुराचरण पैं घडलें ॥ २४ ॥ नाथ ह्मणती ब्रह्ममूर्त्ती ॥ तुह्मासारिखी हेहि आकृती ॥ कोणे लक्षणें याप्रती ॥ अनामिक निश्चित जाणतसां ॥ २५ ॥ याचें अनामिकपणाचें ज्ञान ॥ मज तव न दिसे ओळखण ॥ दिसतो आत्मवें परिपूर्ण ॥ सर्वांसमान सारिखा ॥ २६ ॥ त्याच्या अनामिकपणाचें लक्षण ॥ कोणतें द्यावें निवडून ॥ ऐकोनी क्षोभले ब्राह्मण ॥ प्रतिवचन बोलती ॥ २७ ॥ जळो हें ऐसें ज्ञान ॥ भ्रष्टाकार जाला पूर्ण ॥ प्रत्यक्ष अनामिकासी ज्ञानपण ॥ आमुचेनी जाण न करवे ॥ २८ ॥ कोपले देखोनी ब्राह्मण ॥ नाथ घालीत लोटांगण ॥ हा अपराध क्षमा करून ॥ समाधानें आपण राहवें ॥ २९ ॥ परस्परें बोलती वचन ॥ दुराचारही आचरोन ॥ ब्राह्मणांसी करी लोटांगण ॥ धन्य लक्षण देखतसों ॥ ३० ॥ अनामिक संभाषण प्रायश्चित्त ॥ अवश्य द्यावें त्वरित ॥ कोणी तरी कृतकृत्य ॥ व्हावें निश्चित पैं आजी ॥ ३१ ॥ नाथासी ह्मणती हो ब्राह्मण ॥ अंत्यज सन्निध

सचैल स्नान ॥ करून प्रायश्चित्त विधान ॥ शुद्ध आपण पैं व्हावें ॥ ३२ ॥
नाथासी नाहीं आग्रह वृत्ती ॥ अवश्य म्हणोनि स्नाना जाती ॥ ब्राह्मण पंचगव्य
आणिती ॥ नाथासी देती अनुलेपन ॥ ३३ ॥ मंत्र उच्चारून आपण ॥ नाथा-
हातीं करविलें स्नान ॥ जी अति श्लाघोन ॥ करित वल्गना परस्परें ॥ ३४ ॥
अनामिकासी नाथसंवाद ॥ परिसोन जाला आनंद ॥ नाथस्थितीचा अनुवाद ॥
भार्येसीं विशद सांगितला ॥ ३५ ॥ भार्या म्हणे सत्पुरुष सेवा ॥ नीच याति
कैंची मंद दैवां ॥ आवडी उपजली जिवा ॥ आणूनि पूजावा अति प्रीती ॥ ३६ ॥
तो उंच शिष्ट ब्राह्मण ॥ आम्ही अंत्यज हीन जन ॥ या अनुतापें करून ॥
करी रुदन अधोमुखें ॥ ३७ ॥ जाणोनि तिचा भावार्थ ॥ अनामिक संबोखित ॥
उंच निंच नेणे समर्थ ॥ ऐसा श्रीनाथ समबुद्धी ॥ ३८ ॥ भरंवसा आहे मज-
प्रती ॥ अवश्य येईल घराप्रती ॥ चिंता न करून आयिती ॥ येथ प्रीति सिद्ध
कीजे ॥ ३९ ॥ ऐकोन भ्रतारवचन ॥ संतोषयुक्त तिचें मन ॥ बैसली होती
उद्विग्न ॥ सवेंचि मुखप्रसन्न जालें ॥ ४० ॥ जिवाचीया काकुळती ॥ भोज-
नाची केली आइती ॥ उपचार साहित्य प्रीती ॥ पूजेसी आणिती भावार्थें ॥ ४१ ॥
साहित्य करून सकळ ॥ भ्रतारास म्हणे प्रेमळ ॥ नाथ आलिया आमचें
कुळ ॥ उद्धरे सकळ ऐसें कीजे ॥ ४२ ॥ तिच्या देखोनि भावार्था ॥ जाऊन
वंदित श्रीनाथा ॥ संशय नाणूनि चित्ता ॥ जिवींच्या गुह्यार्था निरोपिलें ॥ ४३ ॥
प्रगट घालूनि दंडवत ॥ भोजना यावें मुखें बोलत ॥ लीलाविग्रही अवश्य
म्हणत ॥ समस्त ऐकत हे वाणी ॥ ४४ ॥ विप्र हेर जे पाळिती ॥ जिवीं साशं-
कित होती ॥ इतर लोकही गुजबुजती ॥ आजी म्हणती विपरित हें ॥ ४५ ॥
मान्य विनंतीचा हर्ष ॥ अनामिकासी अति उत्कर्ष ॥ जाऊनियां सावकाश ॥ पाक-
क्रियेस करवित ॥ ४६ ॥ सडा संमार्जन रांगोळी ॥ करित सिद्धता स्वस्थळीं ॥ हे वार्त्ता
ब्राह्मण सकळी ॥ ऐकोनि तेचि वेळीं उठावले ॥ ४७ ॥ मेळऊन सभा सकळ ॥ करूं
लागले कोल्हाळ ॥ बरी सांपडली आजी वेळ ॥ जिंकूं अमंगळ आचरणीं ॥ ४८ ॥
समस्त सांडूनि गृहकार्या ॥ प्रवर्त्तले येथिंच्या उपाया ॥ स्थळोंस्थळीं दंडूनिया ॥
करूं अपायां नाथाच्या ॥ ४९ ॥ नाथाच्या द्वारापासून ॥ अनामिक गृहापर्यंत
जाण ॥ ठाईं ठाईं ब्राह्मण ॥ मार्ग रोधून राहिले ॥ ५० ॥ विचार केला बळकट ॥
आधीं न कीजे बोभाट ॥ पात्रावरी बैसतां स्पष्ट ॥ धरूनि यथेष्ट गांजावा ॥ ५१ ॥
अभिमानाची सबळता ॥ म्हणोनि वारंवार भ्रांति चित्ता ॥ पूर्ण ऐश्वर्याची
सत्ता ॥ नराहे स्थीरता मानसीं ॥ ५२ ॥ नाथ निजस्थिति वर्तोन ॥ स्नानसंध्या
नित्यनेम सारून ॥ आरंभिलें पुराण श्रवण ॥ हर्ष संपन्न अति प्रीतीं ॥ ५३ ॥

माध्यान्हिक गंगेसी ॥ जाऊन सारिलें नेमासी ॥ तेथून येउनी आसनासी ॥ समधान-तेसीं बैसले ॥ ५४ ॥ उद्धव आपुल्या निजगती ॥ संतर्पण सेवेप्रतीं ॥ नित्य आचरे ज्या रितीं ॥ तैशा पद्धती सावध ॥ ५५ ॥ सर्व साहित्य सिद्धपाक ॥ जालिया तो अनामिक ॥ येऊन नाथा सन्मुख ॥ विनवी मस्तक लवउनी ॥ ५६ ॥ नाथ आज्ञापी तयासी ॥ जाऊनि मांडावें पात्रांसी ॥ घेऊन ब्राह्मण तीर्थासी ॥ शीघ्रतेसी येतसों ॥ ५७ ॥ येरें करून वंदन ॥ चालिला वेगें करून ॥ आपाआपणांत ब्राह्मण ॥ म्हणती सावधान असावें ॥ ५८ ॥ अंत्यज जंव ये घरासीं ॥ तंव देखिलें श्रीनाथासी ॥ आगमन जालें त्वरेसी ॥ म्हणोनि मानसीं आनंदला ॥ ५९ ॥ भार्येसी म्हणे श्रीनाथ ॥ कृपा करोन आला समर्थ ॥ आतां असेल जो मनोरथ ॥ तोचि अर्थ पैं कीजे ॥ ६० ॥ नाथ आगमन होतां श्रवण ॥ मरतयासीं अमृत-पान ॥ ऐशापरी संतोषून ॥ येऊन चरण वंदिले ॥ ६१ ॥ पाट मांडूनि आसनीं ॥ बैसवी नाथालागुनी ॥ गंध पुष्प माळा घालुनी ॥ भावें करुनी पूजिला ॥ ६२ ॥ पात्र मांडून विस्तीर्ण ॥ वाढूं लागली वरी अन्न ॥ तंव ते पाळती ब्राह्मण ॥ म्हणती कोण येथें आला ॥ ६३ ॥ वाड्याजवळिल्या ब्राह्मणां ॥ येऊन सांगती वर्तमाना ॥ स्वस्थ कां बैसलेती जाणा ॥ तो भोजना बैसूं पाहे ॥ ६४ ॥ चोज ऐकोन सकळ ॥ उठले ते उतावेळ ॥ आणि श्रीनाथ प्रांजळ ॥ देखतां विप्रकुळ विस्मित ॥ ६५ ॥ ते काळीं लगबगित ॥ अंत्यज गृहीं धांवत येत ॥ तैसाचि श्रीनाथ पाहत ॥ पूजान्वित बैसला ॥ ६६ ॥ तेथें पाहती जैसा ॥ येथेंही तोचि तैसा ॥ वारंवार धांवतां क्लेशा ॥ शीण मानसां-प्रती तया ॥ ६७ ॥ प्रातःकाळापासून ॥ तीन प्रहरपर्यंत जाण ॥ धांवतां कष्टले ब्राह्मण ॥ हिंपुटी होऊन बैसले ॥ ६८ ॥ सारिखें स्वरूप दोहीं स्थळीं ॥ ब्राह्मणीं पाहिलें सकळीं ॥ श्रमी होऊन ते वेळीं ॥ कर कपाळीं पीटिती ॥ ६९ ॥ परस्परें बोलती शब्द ॥ कैसा जाला हा विनोद ॥ केवि जाणवेल हा बोध ॥ कोण अगाध हें महत्व ॥ ७० ॥ एक ह्मणती हा कौटाळ ॥ दुजा ह्मणे हा व्यर्थ बोल ॥ दृष्टिबंधन ऐसा खेळ ॥ साबरी प्रबळ विद्या दिसे ॥ ७१ ॥ भूतचेष्टा ह्मणती एक ॥ वेताळ प्रसन्न असेल देख ॥ तयाचें हें कौतुक ॥ अवश्यक मानावें ॥ ७२ ॥ नाना परीचे कुतर्क ॥ जल्पना जल्पती अनेक ॥ अभिमानें जाले मूर्ख ॥ शुद्ध विवेक नये बुद्धी ॥ ७३ ॥ येरीकडे श्रीनाथासी ॥ पूजोनियां भावा-र्थेसी ॥ पात्रावरी अन्नासी ॥ अति उल्हासीं वाढिलें ॥ ७४ ॥ निकट बैसोनि उभयतां ॥ जेवितां विनविती नाथा ॥ धन्य धन्य तूं समर्था ॥ आम्हा अनाथां उद्धरिलें ॥ ७५ ॥ भावासारिखा देव ॥ कां बिरुदाचें जें वैभव ॥ आम्हासी

दाविला नवलाव ॥ उद्धरिले जीव निजकृपा ॥ ७६ ॥ भावयुक्त करुणा शब्द ॥ ऐकून त्यांचा अनुवाद ॥ नाथ ह्मणे तुम्हीं शुद्ध ॥ ह्मणोनि हा बोध पाहतसां ॥ ॥ ७७ ॥ तुमची आवडी निःसीम ॥ ह्मणोनि आचरलों हें कर्म ॥ संतोषला मनोधर्म ॥ प्रेमसंभ्रम पाहोनी ॥ ७८ ॥ सुखसंवाद बोलत बोला ॥ यावत्तृप्ति जेवितां झाला ॥ ढेंकर देऊनियां धाला ॥ तेथेंची आंचवला संसारा ॥ ७९ ॥ तांबूल सपरिकर ॥ येळा लवंगादि मिश्र ॥ देवोनियां भावोपचारें ॥ वंदिती साचार सद्भावें ॥ ८० ॥ वारंवार प्रदक्षिणा ॥ करूनि करिती नमना ॥ धन्य तयांची हे भावना ॥ वंदोनि चरणा बोळविले ॥ ८१ ॥ विप्रादि षड्गुणयुता ॥ व्यासवाणी श्लोक संमता ॥ तो सिद्धांत जाला आतां ॥ कृपांकितां नाथाचिया ॥ ८२ ॥ इकडेही वाडियांत ॥ ब्राह्मण पूजा नित्याचरित ॥ तें सारून समस्त ॥ नाथही जेवित प्रसादासी ॥ ८३ ॥ समस्तांसी पडलें ठक ॥ नवल देखिलें कौतुक ॥ हर्ष मानुनी भाविक ॥ गर्जती निःशंक जयशब्दें ॥ ८४ ॥ यापरि लीला विचित्र ॥ श्रीनाथाचें हें चरित्र ॥ वाणी वदवोनियां श्रोत्र ॥ होती पवित्र ऐकतांची ॥ ८५ ॥ जैसा भाव तैसा देव ॥ हा केशवाचा अनुभव ॥ श्रीनाथ कृपेचा नवलाव ॥ नकळे लाघव अभिमानियां ॥ ८६ ॥ वंदो निंदो कोणी आतां ॥ आम्हांसी वंद्य उभयतां ॥ श्रीनाथ कृपादृष्टि समस्तां ॥ प्रसाद हाता पैं आला ॥ ८७ ॥ इतिश्रीएकनाथचरित्रे अंत्यजगृहेभोजनग्राह्यंनामसप्तदशोऽध्याय: ॥

---

12562

## अध्याय अठरावा.

श्रीरामसमर्थ ॥ नमन स्वामिचरणा ॥ एक वेळ घडलिया जाणां ॥ देऊनि सकळ कल्याणा ॥ निरसी अभिमाना जीवबुद्धी ॥ १ ॥ नवल नमनाचें विंदान ॥ एवढें देखों महिमान ॥ त्या तुझें कृपावलोकन ॥ जालिया परिपूर्ण निजबोध ॥ २ ॥ तेथिल्या भाग्याची मर्यादा ॥ केविं आतुडेल अनुवादा ॥ श्रुति लाजोनि बोलती शब्दा ॥ नेति नेति कदा नेणवे ॥ ३ ॥ तेथें आम्ही पामरें प्राकृत ॥ केविं अनुवादों वाग्वादातें ॥ ते अघटित तुझी मात ॥ शब्दातीत निजवस्तु ॥ ४ ॥ सगुण लीला विचित्र ॥ आचरलासी जें जें चरित्र ॥ जगदोद्धारी अति पवित्र ॥ स्तुतिस्तोत्र वदों सुखें ॥ ५ ॥ श्रीनाथ निजात्म स्थिती ॥ समाधान बुद्धि सहन शक्ती ॥ निरंतर आनंद वृत्ती ॥ आचरे भक्ति निजहिता ॥ ६ ॥ कोणा भाविक गृहस्थास ॥ दैवयोगें जडला परिस ॥ भाग्यप्राप्ति विलास ॥ तद्योगें सावकाश भोगितो ॥ ७ ॥ यापरि लोटला कितेक काळ ॥

प्रवृत्ति आचरणीं तो कुशळ ॥ स्नानसंध्या करूनि सुशील ॥ अति सोज्वळ बाह्य दीक्षा ॥ ८ ॥ प्रारब्धयोगें स्त्रीपुत्रादिक ॥ परि ग्रहनिमित्यें सकळिक ॥ तेणें जाला बहुत शोक ॥ अंतरीं देख तयाच्या ॥ ९ ॥ भाग्यविलास न मानी चित्ता ॥ अहोरात्र करी चिंता ॥ ह्मणे घर बरें नव्हे आतां ॥ कोण्या तीर्था तरी जावें ॥ १० ॥ बुद्धि निर्माण जाली त्यासी ॥ करूनि यावें महा यात्रेसी ॥ ठेवावया परिसासी ॥ विश्वास त्यासी पुरेना ॥ ११ ॥ ह्मणोनि पडला विचारांत ॥ यात्रा व्हावया निश्चित ॥ शोधित सर्वांचें आचरित ॥ आली मनांत हे बुद्धी ॥ १२ ॥ श्रीनाथाची परमार्थ स्थिती ॥ मानली तयाचिये मतीं ॥ विश्वास दृढ धरूनि चित्तीं ॥ आला रात्रीं किर्तनासी ॥ १३ ॥ ऐकतांची कीर्तनासी ॥ पुष्टि जाली विश्वासासी ॥ उल्हास युक्त मानसीं ॥ एकांतासी पाहातसे ॥ १४ ॥ आरति जालीया लोक ॥ नमूनि गेले सकळिक ॥ ग्रहस्थ बैसला हा एक ॥ कार्यविवेक साधावया ॥ १५ ॥ सर्व गेलिया एकांतीं ॥ श्रीनाथासी विनित रीती ॥ वंदूनि चरणाप्रती ॥ बोले अति प्रीति मनाचिया ॥ १६ ॥ महा यात्रेचा हेत ॥ जावयालागीं आर्त बहुत ॥ येविषयींचें मनोगत ॥ कृपा इच्छित स्वामीची ॥ १७ ॥ अमोल्य वस्तु मजपासी ॥ संरक्षणीं चिंता मानसीं ॥ मान्य केलिया विनंतीसी ॥ स्वामिपासीं ठेवितसें ॥ १८ ॥ जैसा ज्याचा भावार्थ ॥ तेंचि संरक्षुनी नाथ ॥ पुरवितसे मनोरथ ॥ लाऊनि परमार्थमार्गासी ॥ १९ ॥ महा यात्रेचें प्रयाण ॥ प्रवृत्ति उत्तम कारण ॥ अधिकार तयाचा वोळखून ॥ बोलिला प्रमाण स्वामि माझा ॥ २० ॥ महा यात्रा उत्तमविधी ॥ धरिली तुवां शुद्धबुद्धी ॥ येणेंचि तुझी अर्थ शुद्धी ॥ व्ययत्रिशुद्धि बरवा हा ॥ २१ ॥ अमोल्य वस्तु रक्षणार्थ ॥ विश्वास मानील जेथें चित्त ॥ ठेवूनि तेथें निश्चित ॥ होऊनि स्वस्थ पैं जावें ॥ २२ ॥ अभय श्रीनाथ वचन ॥ ऐकोनि संतोषलें मन ॥ परिस स्वामिकरीं देऊन ॥ केलें नमन निजमस्तकें ॥ २३ ॥ नाथ ह्मणती हा पाषाण ॥ अमोल्यत्वें काय लक्षण ॥ परिसयाचें अभिधान ॥ दे प्रतिवचन गृहस्थ पैं ॥ २४ ॥ याचिया स्पर्शासंगतीं ॥ सुवर्ण होय लोह व्यक्ती ॥ प्रगट न करितां वंदती ॥ रक्षण यथास्थिति असावें ॥ २५ ॥ ऐशिया पदार्थाचें कोड ॥ संसारिकाशीच असे गोड ॥ प्राप्तपुरुषाची चाड ॥ हा निवाड घडों नशके ॥ २६ ॥ जगीं प्रगट ब्रह्मदावी ॥ नाथ ऐश्वर्या हे पदवी ॥ परिसाचें कोडें जिवीं ॥ उपजे केवीं निजस्थितीं ॥ २७ ॥ देवाचिया सिंहासना ॥ खालतें ठेवून त्या पाषाणा ॥ निरोप दिधला प्रयाणा ॥ वंदोनि चरण जाय तो ॥ २८ ॥ करूनिया सर्व सिद्धता ॥ ग्रहस्थ गेला उत्तर पंथा ॥ यात्रा करूनि मागुता ॥ वर्षांतीं येता पैं जाला ॥ २९ ॥ तंव इकडे परिसाचें भान ॥ मनीं नाहीं आठवण ॥ देवनिर्माल्य विसर्जन ॥





प्रत्यहीं संपूर्ण न होय ॥ ३० ॥ सिंहासन तळस्थानीं ॥ निर्माल्य देती टाकुनी ॥ एकादशी पंधरावे दिनी ॥ टाकिती तेथुनी गंगाजळीं ॥ ३१ ॥ यापरि पाठरीति निर्माल्यासी ॥ परिस टाकिला गंगेसी ॥ हें वर्तमान कोणासी ॥ श्रुत इतरासी नव्हेची ॥ ३२ ॥ परिसाची तो हे गती ॥ गृहस्थ स्मरे अहोरातीं ॥ पुढें वर्तलें तें श्रोतीं ॥ निश्चित मतीं परिसावें ॥ ३३ ॥ यात्रा जालियाचें विधान ॥ गृहस्थें करून संपूर्ण ॥ परिसाचा हेत धरून ॥ श्रीनाथदर्शन करूं आला ॥ ॥ ३४ ॥ साष्टांगें केलें नमन ॥ नाथें दिधलें आलिंगन ॥ मनीं भाव हा पूर्ण ॥ न मागतां आणून देतील ॥ ३५ ॥ जेथें लोभाची वस्ती ॥ तेथेंचि प्राप्त होय खंती ॥ तयाचें भान नाथाप्रती ॥ अणुमात्र चित्तीं पैं नाहीं ॥ ३६ ॥ कुशळबुद्धि गृहस्थ ॥ मनीं कल्पना भावित ॥ प्रथम दर्शन आजि होत ॥ उगेंचि स्वस्थ असावें ॥ ३७ ॥ उदईक न मागतां परिस ॥ जरी सहज ये हातास ॥ तरी कार्य गेलें सिद्धीस ॥ भरंवसा चित्तीं दृढ करी ॥ ३८ ॥ मौनेंचि करूनि वंदन ॥ स्वगृहा गेला आपण ॥ परि उद्विग्न जालें मन ॥ सहसा समाधान होईना ॥ ३९ ॥ केव्हां होईल अस्त-मान ॥ रात्र कैसी कंठेल पूर्ण ॥ उषःकाळींच आपण ॥ नाथदर्शन पैं घ्यावें ॥ ४० ॥ ऐसी तळमळ मनासी ॥ जालिया लोटली दिवानिशी ॥ उषःकाळीं मुख-मार्जनासी ॥ सारूनि वाडियासी पैं आला ॥ ४१ ॥ नाथासी करून नमन ॥ जवळीं बैसला हो आपण ॥ वर्तमान निवेदन ॥ करी परि उद्विग्न मन त्याचें ॥ ॥ ४२ ॥ नाथही निजस्थिती ॥ सर्व वृत्तांत कुशळ प्रती ॥ पुसोनियां यथा रिती ॥ अनुमोदित उत्तमत्वा ॥ ४३ ॥ परि परिस न्यावा हे वाणी ॥ न निघता चिंता मनीं ॥ विशेष गृहस्थालागुनी ॥ अंतःकरणीं कासावीस ॥ ४४ ॥ ह्मणे भीड सांडूनि सकळ ॥ मागावया अति प्रांजळ ॥ एकांत समय हे वेळ ॥ न सांपडे काळ पुन्हा ऐसा ॥ ४५ ॥ ह्मणे आपुल्या प्रसादें यात्राविधी ॥ यथास्थित जाली सिद्धी ॥ परिस द्यावा कृपानिधी ॥ परमार्थ बुद्धि दयार्णवा ॥ ४६ ॥ भाव धरूनि विश्वासा ॥ सर्वस्वें तुझा भरंवसा ॥ ह्मणोनि जाला धिंवसा ॥ माझ्या परिसा मज द्यावें ॥ ४७ ॥ ऐकोनि त्याचें वचन ॥ नाथासी जाली आठवण ॥ कोठें ठेविला हे खूण ॥ त्यासी आपण विचारीत ॥ ४८ ॥ तो म्हणे स्वामीच्या हातीं ॥ म्याहि दिधला अति निगुतीं ॥ स्वामि देव-ग्रहाप्रती ॥ नेऊनि ठेविती हें कृत्य ॥ ४९ ॥ ऐसें ऐकतां वचन ॥ नाथासी पावली खूण ॥ देवगृहांत जाऊन ॥ केलें शोधन ते स्थळीं ॥ ५० ॥ गृहस्थही निजकार्यार्थी ॥ येऊन देवगृहाप्रती ॥ परिसाचिया काकुळती ॥ आस्था चित्तीं धरूनियां ॥ ५१ ॥ ठेविल्या स्थळीं परिस ॥ न

सांपडतां हातास ॥ गृहस्थ जाला कासावीस ॥ करी रूदनास अधोमुखें ॥ ५२ ॥ नाथ परमार्थी जाणोन ॥ परिस केला स्वाधीन ॥ आतांहि शोध लक्षण ॥ सुचलें चिन्ह अभिलाषाचें ॥ ५३ ॥ अर्थ व्यवहार संबंध ॥ अवश्य घडवी विरोध ॥ यास्तवाचि याचा निषेध ॥ सत्शास्त्रें बोध हा मिथ्या ॥ ५४ ॥ श्रीनाथ परमार्थ स्थिती ॥ गृहस्थासी विकल्प चित्तीं ॥ प्राकृत परमार्थ मिरविती ॥ पूर्ण स्थिति हें आश्चर्य ॥ ५५ ॥ षड्गुणैश्वर्य संपन्न ॥ श्रीनाथ अवतार पूर्ण ॥ विषय तेंची भूषण ॥ हें लक्षण निजस्थिती ॥ ५६ ॥ परिस हरपला हे चिंता ॥ नाथासी नाहीं अणुमात्रता ॥ गृहस्थाची विव्हळता ॥ कळली चित्ता नाथाचिया ॥ ५७ ॥ आश्वासूनि तयासी ॥ काय बोलती वचनासी ॥ आणिका स्थळीं परिसासी ॥ पाहून तुम्हासी देतसों ॥ ५८ ॥ ऐसेंही केल्या शांतवन ॥ त्यासी न पडे समाधान ॥ संकल्पित विकल्पित मन ॥ धैर्यपण त्या नाहीं ॥ ५९ ॥ नाथ जातां गंगास्नाना ॥ तोही सवें गेला जाणा ॥ वारंवार मागत्या खूणा ॥ त्या अनुसंधाना करीतसे ॥ ६० ॥ नाथ कृपाळु परिपूर्ण ॥ त्याचें पाहून विव्हळपण ॥ कैसें केलें विंदान ॥ तें निरोपण अवधारा ॥ ६१ ॥ स्नानार्थ बुडी गंगाजळीं ॥ देतां वाळू घेत अंजुळीं ॥ गृहस्थ बोलाऊन जवळी ॥ काय ते वेळीं पैं केलें ॥ ६२ ॥ मोठेमोठे खडे पाषाण ॥ हातीं घेतले निवडून ॥ आपुला परिस वोळखून ॥ घे म्हणोन निघे वाणी ॥ ६३ ॥ खिशामध्यें लोह गोळ ॥ बहुत होते तया जवळ ॥ ऐकोनि वाणी प्रांजळ ॥ अति उतावेळ काढिले ॥ ६४ ॥ उचलून एक पाषाण ॥ लोहासी पाहे घांसून ॥ तंव तो होय सुवर्ण ॥ पाहून मन आनंदलें ॥ ६५ ॥ नाथ हस्तीं जे पाषाण ॥ तितुके पाहिले लाऊन ॥ सकळ परिस पाहून ॥ घ्यावा कोण हें उमजेना ॥ ६६ ॥ लोभें पडली तया गुंती ॥ ह्मणोनि भ्रांत जाली मती ॥ अवघे घ्यावे हे चित्तीं ॥ लोभें वस्ती दृढ केली ॥ ६७ ॥ तंव नाथ ह्मणती सत्वरी ॥ परिस वोळखून घ्यावा करीं ॥ स्नानसंध्येचे अवसरीं ॥ विलंब न करीं सज्ञाना ॥ ६८ ॥ ऐकोनि श्रीनाथवाणी ॥ ह्मणे एकचि घ्यावा उचलोनी ॥ जिवीं कृतकृत्य मानुनी ॥ एकची त्यांतुनी घेतला ॥ ६९ ॥ इतर जे कां पाषाण ॥ त्या स्थळीं जळीं टाकून ॥ नाथें करूनि स्नान बाहेरी आपण निघाले ॥ ७० ॥ नाना परिच्या कल्पना ॥ गृहस्थ करीतसे मना ॥ ह्मणे नाथ बहुत शाहाणा ॥ देखिला नयना आपुल्या ॥ ७१ ॥ ऐसी वस्त ठेवितां घरीं ॥ ज्यासी कळे तो अभिलाष धरी ॥ अथवा करूनियां चोरी ॥ नेईल खरी या लागीं ॥ ७२ ॥ गंगेचिया पोटीं ठेवितां ॥ न लागे कोणाच्या हातां ॥ यास्तव येथें निक्षेपितां ॥ केली तत्वता पक्कबुद्धी ॥ ७३ ॥ परी एकची नवल थोरी ॥ पाहिली आपुले नेत्रीं ॥ बहुत परिस कैशा परी ॥ लाधले करीं कोठोनी ॥ ७४ ॥ असो आपुलें तों सरलें काज ॥

आतां कासया कीजे चोज ॥ परी मनीं वाटली लाज ॥ व्यर्थ गजबज हलकेपणीं ॥ ७५ ॥ नाथासि पुसोनि अति प्रीती ॥ गृहस्थ गेला गृहाप्रती ॥ परि अणुमात्र श्लाध्यता वृत्तीं ॥ नाहीं चित्तीं नाथाचिया ॥ ७६ ॥ षड्गुण ऐश्वर्य आणि शांती ॥ श्रीनाथासीच साजती ॥ इतरही पूर्णता मिरवती ॥ परिऐसी स्थिति दुर्लभ तयां ॥ ७७ ॥ माझीच आवडी प्रमाण ॥ हे कल्पना कल्पिल जन ॥ यदर्थीं हें वर्णन ॥ घडलें जाण ह्मणेल कोणी ॥ ७८ ॥ अभक्तपणें वल्गना मुखें ॥ करितील तरी करोत सुखें ॥ संत साधुही आत्मविवेकें ॥ शोधुनि निकें पाहावें ॥ ७९ ॥ ऐसिया स्थितीचा परमार्थ ॥ जाला अथवा होईल येथ ॥ हा अतिशय दुर्लभ अर्थ ॥ एक समर्थ नाथ माझा ॥ ८० ॥ संत चरणींचें लडिवाड ॥ केशवासी हेंचि कोड ॥ चरित्र गावयाची चाड ॥ हाचि सुरवाड निजचित्तीं ॥ ८१ ॥ इतिश्रीएकनाथ-चरित्रेगृहस्थपरिसअर्पणंनाम अष्टादशोध्यायः ॥

---

## अध्याय एकोणिसावा.

श्रीरामसमर्थ ॥ कृपाळु श्रीएकनाथ ॥ वंद्य वरिष्ट अतिसमर्थ ॥ श्रेष्ठांसी मान्य परमार्थ ॥ कर्त्ता सनाथ अनाथासी ॥ १ ॥ जयाचि सहज राहटी ॥ होते उपदेशकोटी ॥ तयातें जपतां होटीं ॥ निर्दाळी उठाउठी भवभय ॥ २ ॥ पूर्णब्रह्म अवतार ॥ भाविकांसी साक्षात्कार ॥ लीलाचरित्रें अपार ॥ पाहती चमत्कार निजजन ॥ ३ ॥ तो स्वयें सहजगती गृहस्थाश्रम यथारीती ॥ आचरोनि अनहं-कृती ॥ न कर्तृत्वप्रतीति अनुस्यूत ॥ ४ ॥ सदावर्त संतर्पण ॥ नित्य ब्राह्मण पूजन ॥ षोडशोपचारें करून ॥ यथोक्त भोजन सन्मानें ॥ ५ ॥ नित्य हें अनुष्ठान ॥ प्रातःकाळीं करूनि स्नान ॥ नित्यनेम सारून ॥ पुराणपठण प्रीय सदां ॥ ६ ॥ माध्यान्हि गंगातिरीं ॥ ब्रह्मयज्ञादि सर्व करी ॥ ब्राह्मणपूजा तदनंतरी ॥ ब्रह्मभाव अंतरीं बोधठसा ॥ ७ ॥ ब्राह्मणतीर्थ प्राशन ॥ केलियावरी आपण ॥ करावें युक्त भोजन ॥ तीन प्रहर वर्त्तन यापरी ॥ ८ ॥ त्यानंतरें निजासनीं ॥ बैसोनियां समाधानीं ॥ ग्रंथटीका काव्यवदनीं ॥ स्रवे वाणि अमृतवृष्टी ॥ ९ ॥ संध्याकाळीं संध्यावंदन ॥ करूनि करावें हरिकीर्त्तन ॥ एवं नित्य अनुष्ठान ॥ जगदोद्धारण जग-हितां ॥ १० ॥ आरती जालिया पाहीं ॥ शेषरात्र उरलिया ही ॥ आसनींच कांहीं बाहीं ॥ निद्रेसीही मान दीजे ॥ ११ ॥ पंचपंच उषःकाळ ॥ एकांत भजनवेळ ॥ होतांचि प्रातःकाळ ॥ सारी निर्मळ स्नानातें ॥ १२ ॥ अहोरात्र परमार्थ ॥ आचरे लोकसंग्रहार्थ ॥ ऐसा श्रीनाथ समर्थ ॥ क्षणहि व्यर्थ जावों नेदी ॥ १३ ॥ पूर्णब्रह्म कृपामूर्त्ति ॥ सेवेचा भाव धरूनि चित्तीं ॥ ब्राह्मण वेषें सेवेप्रती ॥

नाथसाह्यार्थीं पावला ॥ १४ ॥ वाडियांत येउनी आपण ॥ घेतलें श्रीनाथदर्शन ॥ अभिवंदूनि चरण ॥ काय वचन बोलिला ॥ १५ ॥ कीर्तिश्रवणें श्रवण ॥ तृप्त होती पावन ॥ देखतां तुझें दर्शन ॥ सुखावले लोचन ये समयीं ॥ १६ ॥ सेवावृत्ति जीविकावर्तण ॥ अखंड माझें आचरण ॥ तुझें ऐकोनि महिमान ॥ आलों ठाकून याचिलागीं ॥ १७ ॥ तुझिये सेवेची आवडी ॥ जीविं धरूनि आलों गोडी ॥ जिविका चालेल रोकडी ॥ हे सांकडी फेडावी ॥ १८ ॥ काय कुटुंब कोठील वस्ती ॥ देहनाम कोण शाखा कोणती ॥ नाथपुसे तयाप्रती ॥ समूळ निश्चिती सांगावें ॥ १९ ॥ कुटुंब माझें मीचि सकळ ॥ एकाकि निस्पृह केवळ ॥ ऋग्वेदशाखा ब्राह्मणकुळ ॥ वस्तिस्थळ एक नसे ॥ २० ॥ जेथें प्रसन्न होय चित्त ॥ तेथेंचि वस्ति मज घडत ॥ देहनाम कृष्ण म्हणत ॥ श्रीखंडया उक्त कार्याविशें ॥ २१ ॥ संचितार्थ लोभ नसे मनीं ॥ संगति भली पाहूनी ॥ निष्कपट सेवा करूनी ॥ असेन संतोषें ॥ २२ ॥ वेतन न घे हें वृत्त ॥ पहिलेपासुनी निश्चित ॥ अन्नमात्र उदरापूर्त ॥ वासना निर्वाहें होत संतोषा ॥ २३ ॥ इतुकेनि मीं कृतकृत्य ॥ सेवा करावी हा हेत ॥ श्रीखंड्या निजवृत्त ॥ सांगेन लागत कार्यातें ॥ २४ ॥ कावडीनें गंगाजळ ॥ आणूनि पात्रीं निर्मळ ॥ मृन्मयपात्रीं केवळ ॥ करी शीतळ प्राशना ॥ २५ ॥ स्नानादि क्रिया करणी ॥ आणूनि भरी रांजणीं ॥ तैसाची सडा संमार्जनी ॥ सावधपणीं वर्त्ततसे ॥ २६ ॥ ब्राह्मणपूजेचें गंध ॥ सहयुक्त द्रव्यसुगंध ॥ उगाळून अति शुद्ध ॥ ठेवी सिद्ध करोनिया ॥ २७ ॥ उच्छिष्ट पत्रावळी काढी ॥ येथें तया आवडी गाढी ॥ हें कार्य अति तांतडीं ॥ सारी परवडी निष्ठेचिया ॥ २८ ॥ धोत्रें धुवावीं सोज्वळ ॥ अणुमात्र त्यांत नसे मळ ॥ ऐसियापरि सुशीळ ॥ क्रमी काळवेळ सेवावृत्ती ॥ २९ ॥ नीचकार्य जें जें कांहीं ॥ तेथेंहि सादर ठाईठाईं ॥ ब्राह्मण भोजनाचे समयीं ॥ सावधान पाहीं तिष्ठत ॥ ३० ॥ नाथपंक्तीसी आपण ॥ बैसे लक्षूनि नीचस्थान ॥ यापरी नित्यभोजन ॥ जठरतर्पण करीतसे ॥ ३१ ॥ अतिनिष्ठा तप सेवा ॥ करितां बारा वर्षें केव्हां ॥ लोटलीं याचें भान जीवां ॥ नाहीं सद्भावा निजवृत्ती ॥ ३२ ॥ तंव कोणी एक ब्राह्मण ॥ तापसी तपसंपन्न ॥ कृष्णदर्शनीं भाव धरून ॥ करी अनुष्ठान द्वारकेसी ॥ ३३ ॥ बारा वर्षें परिपूर्ण ॥ तप केलें एकाग्र मन ॥ तंव त्यासीं जालें स्वप्न ॥ येथें दर्शन न घडे तुज ॥ ३४ ॥ प्रतिष्ठान गंगातीरीं ॥ श्रीएकनाथाचे घरीं ॥ जाऊन राहिलों निर्धारीं ॥ सेवा करीं यथासुखें ॥ ३५ ॥ कृष्ण श्रीखंड्या अभिधान ॥ तेथेंचि माझें असे जाण ॥ तुवां तेथें जाऊन ॥ घ्यावें दर्शन नाथाचें

॥ ३६ ॥ तेथें तुझी कार्यसिद्धी ॥ अवश्य होईल त्रिशुद्धी ॥ हें गुह्य स्वप्न संधी ॥ सांगे प्रसिद्धि द्विजातें ॥ ३७ ॥ ब्राह्मणें होऊनि सावधान ॥ करी स्वप्नाचें विवरण ॥ म्हणे धन्य हें महिमान ॥ घ्यावें दर्शन नाथाचें ॥ ३८ ॥ कृष्ण नामस्मरण ॥ दर्शनीं प्रेम धरूनि पूर्ण ॥ तेथून निघोनी ब्राह्मण ॥ आला आपण गंगातीरां ॥ ३९ ॥ म्हणे आतां घेऊं दर्शन ॥ मग करावें गंगास्नान ॥ प्रेम जिवीं दाटलें पूर्ण ॥ केलें वंदन गंगाजळा ॥ ४० ॥ तेकाळीं श्रीखंड्या कृष्ण ॥ गंगेसी भरूनि जीवन ॥ खांदी कावडी घे आपण ॥ देखिला ब्राह्मण दर्शनार्थी ॥ ४१ ॥ मनीं म्हणे हा ब्राह्मण ॥ माझिया सेवेसी आलें विघ्न ॥ अंतरीं होऊनि उद्विग्न ॥ जाय आपण सवेगतां ॥ ४२ ॥ कावडी उतरोनि त्वरित ॥ जाऊन देवगृहांत ॥ पूजेचें गंध उगाळित ॥ आनंदयुक्त निजकरीं ॥ ४३ ॥ तंव तो तपस्वी ब्राह्मण ॥ वाडियांत येतां आपण ॥ श्रीनाथें देखतां दुरून ॥ वोळखिलें चिन्ह तयाचें ॥ ४४ ॥ आसनाखालतीं उडी ॥ घालूनियां हात जोडी ॥ नमूनियां अति तांतडी ॥ आदर आवडी करीतसे ॥ ४५ ॥ बैसऊन आसनस्थ ॥ कुशळ पुसिलें समस्त ॥ ब्राह्मण निजमनोगत ॥ स्वयें सांगत निजनिष्ठा ॥ ४६ ॥ यालागीं येथें आगमन ॥ आधीं करावें कृष्णदर्शन ॥ हेंचि कुशल कल्याण ॥ असो संपूर्ण पैं माझें ॥ ४७ ॥ गोमतीतिरीं द्वारकेस ॥ तप केलें वर्षें द्वादश ॥ त्यानंतरें या नेमास ॥ आज्ञाप्रेष पैं जैसा ॥ ४८ ॥ प्रतिष्ठानीं एकनाथ ॥ भक्तराज अतिसमर्थ ॥ तेथें तुझा मनोरथ ॥ दर्शनें सनाथ होशील ॥ ४९ ॥ ह्मणोनि येथें घडलें येणें ॥ कृपाळूपणें अर्थ पुरवणें ॥ तयाचें सार्थक होय जेणें ॥ तेंचि करणें समर्थांनीं ॥ ५० ॥ नाथ ह्मणे कृष्णावीण ॥ एकही नदिसे रिकामें स्थान ॥ कृष्णची भरला पूर्ण ॥ मुख्य दर्शन या नांव ॥ ५१ ॥ ब्राह्मण ह्मणे ब्रह्मज्ञान ॥ येणें नव्हे समाधान ॥ कृष्ण श्रीखंड्या अभिधान ॥ असे कोण तुमचे घरीं ॥ ५२ ॥ मजला भेटीचा संकेत ॥ खूण सांगितली हे मात ॥ त्यासी आणउनी त्वरित ॥ पुरविजे आर्त पैं माझी ॥ ५३ ॥ इतुकें बोलोनि ब्राह्मण ॥ धरिले नाथाचे चरण ॥ प्रेमजळें गळती लोचन ॥ करी रूदन अट्टहासें ॥ ५४ ॥ नाथ सांगती उद्धवासी ॥ वेगीं पाचारीं श्रीखंड्यासी ॥ जेणें याचिया अवस्थेसी ॥ या अधिकारासी आणिलें ॥ ५५ ॥ देवगृहांत निजास्थिती ॥ गंध उगाळीत अतिप्रीती ॥ ऐकोन नाथाची उक्ती ॥ स्वयें कृष्णाकृति प्रगटावी ॥ ५६ ॥ चतुर्भुज सकुमार ॥ शामतनु अति सुंदर ॥ कांसे कसिला पीतांबर ॥ गळां हार वैजयंती ॥ ५७ ॥ चंदनें माखले हात ॥ तैसाचि येऊन त्वरित ॥ देवगृहद्वारा आंत ॥ लावण्य अद्भुत देखिला ॥ ५८ ॥ ब्राह्मणें देखतां दर्शन ॥ अष्टांगें निवाला संपूर्ण ॥ करूनि साष्टांग नमन ॥ ह्मणे

सार्थकाचरण तप माझें ॥ ५९ ॥ राजीवलोचन श्रीकृष्ण ॥ गंभीरगिरा बोले वचन ॥ श्रीनाथसंगती आपण ॥ सुखसंपन्न पैं होतों ॥ ६० ॥ आतां जातों द्वारकेसी ॥ कृपा असावी मानसीं ॥ तुझिया सेवेच्या सुखासी ॥ स्वानंदेसी भोगिलें ॥ ६१ ॥ तीन तपें तीन वेळा ॥ भोगिला सेवेचा सोहळा ॥ पुढेंही हेत उरला ॥ उल्हास हृत्कमळा माझिया ॥ ६२ ॥ नाथ नमी चरणासी ॥ तुजविण चाळक कोण देहासी ॥ प्रतिपाळिशी अहर्निशीं ॥ हृदयस्थ होसी स्वलीळा ॥ ६३ ॥ श्रीनाथा तुझी संगती ॥ विशेष मज मानली होती ॥ ऐसें बोलोनि श्रीपती ॥ अदृश्यमूर्ती पैं केली ॥ ६४ ॥ ब्राह्मणासी समाधान ॥ यापरी जालें दर्शन ॥ सेवा केलियाचें लक्षण ॥ स्वयें प्रगटोन दाविलें ॥ ६५ ॥ नाथ वंदीत ब्राह्मणां ॥ म्हणे धन्यत्व तुझिया आचरणा ॥ देव प्रगट दाविला नयना ॥ दुर्लभ दर्शना सुरनरां जो ॥ ६६ ॥ ब्राह्मणें घातलें दंडवत ॥ ह्मणे जालों कृतकृत्य ॥ तूं परब्रह्म मूर्तिमंत ॥ हा बोध निश्चित पैं जाला ॥ ६७ ॥ महिमा ऐश्वर्यकोटी ॥ पाहिला तुझ्या कृपादृष्टी ॥ धन्य तूं अवतार ये सृष्टीं ॥ दर्शनें तुष्टी मज जाली ॥ ६८ ॥ नाथें राहावोनि त्यासी ॥ सन्मानें भोजन पंक्तिसीं ॥ प्रसादरूप भावेसी ॥ जेवितां त्यासी सुख जालें ॥ ६९ ॥ श्रीनाथाचिया राउळीं ॥ पडला परमार्थ सुकाळीं ॥ श्रवण कीर्तन निजमेळीं ॥ भक्तीची नवाळी भोगित ॥ ७० ॥ परमाद्भुत हे लीळा ॥ भोगोनियां सुखसोहळा ॥ जिवीं अति संतोषला ॥ बोधीं पावला परमार्थ ॥ ७१ ॥ यापरी कितेक दिवस ॥ पाहोनि भक्तिविलास ॥ सावकाशें निरोपास ॥ घेऊनि स्वस्थानास पैं गेला ॥ ७२ ॥ परब्रह्म मूर्तिमंत ॥ साकारला एकनाथ ॥ केशवाचा निज भावार्थ ॥ पुरवी मनोरथ चरणनिष्ठा ॥ ७३ ॥ इतिश्री एकनाथचरित्रे तपस्विश्रीकृष्णदर्शनोनामएकोनविंशतिमोध्यायः ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

---

## अध्याय विसावा.

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीराम समर्थ ॥ श्रीसद्गुरु एकनाथ ॥ स्वयें आचरोनी परमार्थ ॥ पूर्ण ऐश्वर्य समर्थ ॥ पुरवी मनोरथ भाविकांचे ॥ १ ॥ निशासमयीं एक दिवशीं ॥ कीर्तन होतां अति उल्हासी ॥ चोर चोरी करावयासी ॥ धरूनि मानसीं बैसले ॥ २ ॥ अर्धरात्रीं आरती ॥ जालिया कीर्तनसमाप्ती ॥ समस्त लोक नमूनि जाती ॥ चोर गुप्तगती राहिले ॥३॥ वाडियांतील सकळ जन ॥ निद्रिस्थ जाले देखून ॥ चोर चोरीस्तव जाण ॥ अंतरगृहीं आपण प्रवेशती ॥ ४ ॥ तंव नेत्रांसी न दिसे कांहीं ॥ अंध जाले सकळही ॥ हातासी न लागतां कांहीं ॥ चिंताडोहीं पडियेले ॥ ५ ॥ चोरी न लागे हातासी ॥ मनीं जाले कासाविसी ॥ विचार नसुचे तयांसी ॥ उद्विग्नतेसी राहिले ॥

॥ ६ ॥ कांहीं पदार्थ न दिसे डोळां ॥ म्हणती हे देवाची लीळा ॥ तयां पश्चात्ताप जाला ॥ आला त्यां कंटाळा मानसीं ॥ ७ ॥ विवेक करिती अंतरीं ॥ हा महापुरुष हे निर्धारीं ॥ आम्ही पतित दुराचारी ॥ करूं चोरी येथें आलों ॥ ८ ॥ यालागीं जालों आंधळे ॥ देवाचे निजलीळें ॥ ऐसिया अनुतापमेळें ॥ स्वकर्मा तेवेळे निंदिती ॥ ९ ॥ मुरडोनि माघारे पाहती ॥ तंव श्रीएकनाथ डोळां देखती ॥ आसनीं विराजमान मूर्ती ॥ सहजस्थिती बैसलासे ॥ १० ॥ धांवोन लागले चरणां ॥ नवल जालें त्यांचिया मना ॥ मुखें बोलती करुणा ॥ धन्य महिमान पाहिलें ॥ ११ ॥ अधिकार पाहतां अज्ञान ॥ परि नाथदर्शनाचें महिमान ॥ चोरांसही भावना निर्माण ॥ होऊनि शरण पैं आले ॥ १२ ॥ ऐकोनि शरणांगतांची वाणी ॥ नाथ कृपाळू कळवळुनी ॥ अति आदरें आलिंगुनी ॥ काय वचनें बोलती ॥ १३ ॥ तुम्ही समस्त येवढे रात्रीं ॥ किमर्थ करुणा करिता अती ॥ ज्या श्रमाचें कारण चित्तीं ॥ तें यथाप्रीति निवेदावें ॥ १४ ॥ गंभीरगिरा वचन ॥ ऐकोनि ते चौघेजण ॥ स्वयें आपुलें वर्त्तमान ॥ यथार्थ वचन बोलती ॥ १५ ॥ आमुची जीविकावृत्ति चोरी ॥ तोचि भाव धरूनि अंतरीं ॥ स्वामीच्या आश्रमा आल्यावरी ॥ जाली हेपरी ऐकिजे ॥ १६ ॥ चोरीसाठीं गृहा आंत ॥ जातां नेत्र अंध होत ॥ कांहींच न दिसे तेथ ॥ तेव्हां जालें चित्त कासाविस ॥ १७ ॥ लीळा देखोनि ऐसी ॥ विवेक उपजला मानसीं ॥ पश्चात्ताप चित्तासी ॥ म्हणोनि आम्हांसी हे दशा ॥ १८ ॥ पश्चात्तापासी कारण ॥ होतांचि पाहिलें फिरोन ॥ तंव पाहिलें स्वामिदर्शन ॥ देखते नयन पैं जाले ॥ १९ ॥ तुझें रूप देखतां डोळां ॥ चोरीचा आला कंटाळा ॥ तिकडील सांडून चाळा ॥ चरणकमळा वंदिलें ॥ २० ॥ आपुल्या कर्माची लाज ॥ धरूनि शरण आलों तुज ॥ आमुच्या उद्धाराचें काज ॥ तुझे चरणरज वंदावे ॥ २१ ॥ आम्ही अधम निंद्य वृत्ती ॥ कैंचा विवेक आमुचे मती ॥ तुझिया दर्शनें उपरती ॥ जालों निश्चिती कृतार्थ ॥ २२ ॥ ऐकोनि तयांची वाणी ॥ नाथ म्हणे निजमनीं ॥ हे जाती विमुख होउनी ॥ अनुचित करणी न करावी ॥ २३ ॥ त्यांसी धरूनियां हातीं ॥ नेलें भांडारगृहाप्रती ॥ द्रव्यादि पदार्थ जाती ॥ त्यांसी निश्चिती दाखविले ॥ २४ ॥ शंका न धरून चित्ता ॥ मानेल तें घ्यावें आतां ॥ विन्मुख न जावें सर्वथा ॥ येणें माझिया चित्ता संतोष ॥ २५ ॥ तुम्हांसी आचरतां स्वकर्म ॥ सहसा नव्हे हा अधर्म ॥ शांति क्षमा दया परम ॥ हा निजधर्म पैं आम्हां ॥ २६ ॥ चोरांनीं ऐकतां ही गोष्टी ॥ विशेष अनुताप तयां पोटीं ॥ म्हणती धन्यधन्य हा सृष्टीं ॥ भाग्यें दृष्टि देखिला ॥ २७ ॥ अनुतापें चालिलें प्रेम ॥ तेणेंचि मनीं निष्काम ॥ वासनेचा उपरम ॥ सहज हें वर्म लाधलें ॥ २८ ॥ नाथासी विनविती सकळ ॥ डोळां होतें भ्रांतिपटळ ॥ तें जाउनी जालें निर्मळ ॥

तेव्हां चरणकमळ देखिले ॥ २९ ॥ हात ठेऊनि आमुचे माथां ॥ कृपा करावी श्रीनाथा ॥ तुझिया प्रसादें भवव्यथा ॥ नासे या अनाथां भरंवसा ॥ ३० ॥ नाथ कृपाळू दीनांचा ॥ भाव देखूनि साचा ॥ प्रसादपाक सिद्धीचा ॥ नेमीं आदराचा विचार ॥ ३१ ॥ तयाचें करून शांतवन ॥ ह्मणे ऐका इतुकें वचन ॥ अन्न प्रसाद घेऊन ॥ सुखें आपण मग जावें ॥ ३२ ॥ विन्मुख जातां तुह्मासी ॥ अनुचितपण आश्रमधर्मासी ॥ हें न घडावयासी ॥ भोजनासी अंगिकारा ॥ ३३ ॥ चोर सुखावोनि चित्तीं ॥ महाप्रसाद लाभाची प्राप्ती ॥ जाणोनी स्वस्थ बैसती ॥ जेऊं ह्मणती प्रीतीनें ॥ ३४ ॥ उद्धव आणि गिरिजाबाई ॥ जागृत करूनि लवलाही ॥ पाकसिद्धि अन्नें पाहीं ॥ त्याचि समयीं करविली ॥ ३५ ॥ पात्रीं वाढूनियां अन्न ॥ सकळां घातलें भोजन ॥ विशेष करूनि सन्मान ॥ सुखसमाधन होय जेणें ॥ ३६ ॥ तांबूल देऊनि परिकर ॥ जैसा सोयरीयाचा आदर ॥ तयापरी पुरस्कर ॥ अति सत्कार आत्मत्वें केला ॥ ३७ ॥ प्रसाद पावतां पोटीं ॥ पावले सुखाचिया कोटी ॥ आनंदमय अवघि सृष्टी ॥ नाथ कृपादृष्टि निवाले ॥ ३८ ॥ स्वामीसी करून प्रदक्षिणा ॥ साष्टांगीं लागले चरणा ॥ उद्धरलों उद्धरलों या वचना ॥ बोलोनि करुणा भाकिती ॥ ३९ ॥ आह्मी पतित तुह्मी पावन ॥ सत्य केला हा निजपण ॥ आह्मी दुराचरणी जन ॥ विवेकसंपन्न त्वां केलें ॥ ४० ॥ अगाध तुझें कृपाळूपण ॥ पाहूनि द्रवलें आमुचें मन ॥ घडलें चरणा वंदन ॥ भवभय दारुण निरसलें ॥ ४१ ॥ काया वाचा आणि मनें ॥ तुझ्या पाईं आलों शरण ॥ मुखीं तुझें नामस्मरण ॥ जिवीं ध्यान चरणांचें ॥ ४२ ॥ भाव जाणोनि जिवींचा ॥ श्रीनाथ बोलती वाचा ॥ भावासारिखा फळाचा ॥ बोधसाचा होईल ॥ ४३ ॥ अश्वासुनी कृपावचनीं ॥ बोळविले तयांलागुनी ॥ अभिनव हे अवतारकरणी ॥ विस्मय मनीं या स्थितीचा ॥ ४४ ॥ अणुमात्र विषमता ॥ कोठें ही स्पर्श नव्हे चित्ता ॥ चोरांसी अनुभवदाता ॥ औदार्यता पूर्णत्वाची ॥ ४५ ॥ ऐसें एकेक महिमान ॥ काय वाणूं थोरपण ॥ श्रीनाथचरणीं शरण ॥ तेणेंचि कल्याण केशवाचें ॥ ४६ ॥ इतिश्रीएकनाथचरित्रेतस्करउद्धरणंनामविंशतीमोऽध्यायः ॥ २० ॥

---

## अध्याय एकविसावा.

श्रीरामसमर्थ ॥ चरणकमळीं श्रीनाथा ॥ सद्भावें ठेवितां माथा ॥ बुद्धीसी बोधसंपन्नता ॥ हे अगाधता लाभप्राप्ती ॥ १ ॥ ऐसी चरणीं औदार्यशक्ती ॥ मग प्रत्यक्ष तुझि स्वरूपभक्ती ॥ घडलिया जो लाभप्राप्ती ॥ ते निजस्थिति न बोलवे ॥ २ ॥ याचिलागीं तुझि भक्ती ॥ कीजे धरूनि सत्संगती ॥ अहर्निशी नामकीर्त्ती ॥ सुखसंविति भोगावया ॥ ३ ॥ सगुण चरित्र महिमान ॥ दिनोद्धारार्थ आचरण ॥ आचर-

लासि करूनि विंदान ॥ प्रीतीनें श्रवण करावें हें ॥४॥ कोणी अनामिक जिविकार्थी ॥ चोरी कर्म करित वृत्ती ॥ तों एक दिनी दैवगती ॥ सांपडला हातीं हकिमाच्या ॥ ५ ॥ त्यासी करूनि शासन ॥ कारागृहीं अति बंधन ॥ पाईं शृंखळा घालून ॥ ठेविलें जाण अति यत्नें ॥ ६ ॥ कित्येक वर्षें उपवासी ॥ अन्न न मिळे भक्षावयासी ॥ ऐशापरी अति क्लेशी ॥ केश डोईशी वाढले ॥ ७ ॥ विकळ जाला सर्व गात्रीं ॥ प्राण राहिले नेत्रीं ॥ हे अवस्था त्याची सर्वत्रीं ॥ ते अवसरीं पाहताती ॥ ८ ॥ म्हणती शृंखळा बंधन आतां ॥ यासी करणें हें वृथा ॥ काढून अर्गळा समस्ता ॥ अंगणीं तत्वता आणिला ॥ ९ ॥ मोकळाची अंगणांत ॥ कित्येक दिवस असे लोळत ॥ रक्षपाळ ही उपेक्षित ॥ जावया असक्त ह्मणउनी ॥ १० ॥ ऐसिया परि एक रात्रीं ॥ विचार सुचला तयाप्रती ॥ मुक्त असतां या रिती ॥ वृथा दुःखावर्त्ति कां पडलों ॥ ११ ॥ मज येथून जातां आतां ॥ कोणी न देखे वारिता ॥ येथें राहणें आत्मघाता ॥ प्राणासि तत्वतां मुकावें ॥ १२ ॥ निशीसमईं ऐसें स्फुरण ॥ जालें जरि अशक्त-पण ॥ जावया पाहे उठोन ॥ न होय चलन देहासीं ॥ १३ ॥ तंव ऐसिया दुःखसमयीं ॥ देवासी आठवी लवलाहीं ॥ म्हणे मीं तो परम अन्यायी ॥ भलत्या उपायीं रक्षावें ॥ १४ ॥ तंव एकाएकीं अकस्मात ॥ हरिनामगजर अद्भुत ॥ कीर्त्तनध्वनि ऐकत ॥ मनीं विचारित हितबुद्धी ॥ १५ ॥ गडबडित खरडत ॥ हळुहळु जावें तेथ ॥ कथेसी ऐकावया चित्त ॥ आवडी धरित अंतरीं ॥ १६ ॥ हांव धरुनी मनांत ॥ तैसाचि गडबडित ॥ हळुहळु खुरडत ॥ सोई येत ध्वनीचिया ॥ १७ ॥ भोगाचा सरला दिवस ॥ तेणेंचि स्फुरण मनास ॥ तैसाचि करूनि सायास ॥ आला कीर्त्तनास ऐकावया ॥ १८ ॥ टाळ मृदंग नाद ध्वनी ॥ ऐकतांचि कीर्त्तन कानीं ॥ तेथील लक्ष धरुनी ॥ श्रमें करूनि पावला ॥ १९ ॥ नाथाचें मुक्तद्वार ॥ कीर्तन काळीं निरंतर ॥ आंत येउनी सादर ॥ श्रवणीं तत्पर पडिलाची ॥ २० ॥ कोणासी न होय विटाळ ॥ अंगणीं पाहून स्थळ ॥ अचेतना परि केवळ ॥ क्रमित वेळ कीर्तनीं ॥ २१ ॥ जिवीं धरूनि आवडी ॥ कीर्त्तनाची अति गोडी ॥ प्राप्ति लाभाची वडी ॥ पातली रोकडी उत्तम दशा ॥ २२ ॥ जाल्या आरती समाप्त ॥ लोक जाती समस्त ॥ हा पडिला होता अचेष्टित ॥ कोणी न देखत पैं यासीं ॥ २३ ॥ वाड्यांतील ही माणसें ॥ निद्रिस्थ जालीं सावकाश ॥ श्रीएकनाथ स्वसंतोषें ॥ आसनीं बैसे सहज-स्थितीं ॥ २४ ॥ तंव दृष्टि अकस्मात ॥ देखिलें तया प्रेतवत ॥ पूर्ण कारुण्य कृपायुक्त ॥ ये त्वरित तयाजवळी ॥ २५ ॥ प्राण देखोनी शरिरीं ॥ बोलता जाला कृपाकरी ॥ काय अपेक्षा जिव्हारीं ॥ ते ये अवसरीं सांगावें

॥ २६ ॥ स्पष्ट बोलतां वाणी ॥ शब्द नुमटे तया वदनीं ॥ हातें संज्ञा भोजनीं ॥ इच्छा अन्नीं सुचविली ॥ २७ ॥ दीनदयाळ करुणाकर ॥ श्रीनाथ माझा निरंतर ॥ घरांत जाउनी सत्वर ॥ उठवी लवकर निजकांता ॥ २८ ॥ नाथासी देखोनि नयनीं ॥ मस्तक ठेविला चरणीं ॥ आज्ञा पुसे मृदु वचनीं ॥ तंव सुचवोनी पाक करवी ॥ २९ ॥ अवस्था विकळ उपयुक्त ॥ क्षिप्रा दोन तीन करवित ॥ सेवया बोट वेगहले आंत ॥ दुग्धमिश्रित परिपाक ॥ ३० ॥ शर्करा आणि घृत ॥ स्वयेंचि घेवोनि त्वरित ॥ उभयतां अंगणांत ॥ पात्रीं ठेवित तयापुढें ॥ ३१ ॥ कितेक काळ उपोषित ॥ म्हणोनि लघुआहार परिमित ॥ करवुनि केला स्वस्थ ॥ होऊनि तृप्त संतोषला ॥ ३२ ॥ अन्नमय बोलती प्राण ॥ येकाळीं तेंचि प्रमाण ॥ मग त्याचें पालटलें चिन्ह ॥ कांहीं सावधान पैं जाला ॥ ३३ ॥ उदकही यथा किंचित ॥ तया प्राशवी श्रीनाथ ॥ तेणें जाला सावध चित्त ॥ समाधान मानित अंतरीं ॥ ३४ ॥ शब्द निघावयाची शक्ति ॥ देखोनि विनवी नाथाप्रती ॥ मरत्या वांचविलें निश्चिती ॥ कृपामूर्त्ति दयाळु वा ॥ ३५ ॥ आपुला वृत्तांत केला निवेदन ॥ सत्य साकल्य लक्षण ॥ ऐकोनि दीनवचन ॥ दिलें अश्वासन श्रीनाथें ॥ ३६ ॥ त्यासीं योग्य जें प्रावर्ण ॥ तेंचि तयासी देऊन ॥ निद्रा करऊन समाधान ॥ अचिंत मनें राहा म्हणे ॥ ३७ ॥ जोंवरी शक्ति पुष्टता ॥ शरिरीं ये दक्षता ॥ तोंवरी स्वस्थ चित्ता ॥ करूनि आतां असावें ॥ ३८ ॥ सांगोनि पाठविलें अधिकाऱ्यासी ॥ तेंचि मान्य जालें त्यासी ॥ कीर्ति लोकीं जाली ऐशी ॥ नाथें दीनाशीं संरक्षिलें ॥ ३९ ॥ सर्व धर्माचिये माथा ॥ दयेची प्रतिपाद्य वरिष्ठता ॥ तेंचि लक्षण श्रीनाथा ॥ अवतार समर्था सहजस्थिती ॥ ४० ॥ यापरी दीन संरक्षण ॥ करूनि दावित आचरण ॥ पुढेंही जालें निरोपण ॥ तें महिमान परिसावें ॥ ४१ ॥ दीन परामृषीं लोटली निशी ॥ स्नानसंध्या पुराणासी ॥ सारूनि दुसरे दिवशीं ॥ माध्यान्ही गंगेसी स्वयें जात ॥ ४२ ॥ नगरबाह्य प्रदेशीं ॥ अश्वत्थ वृक्ष विशाळतेसी ॥ जातां गंगेचे वाटेसी ॥ जावया नाथासी तो मार्ग ॥ ४३ ॥ वृक्षाखालूनि जातां नाथ ॥ डाहळी कडाडूनि अकस्मात ॥ भूमीवरी पडली तेथ ॥ उभा श्रीनाथ देखतसे ॥ ४४ ॥ तंव दीर्घ विक्राळ ब्राह्मण ॥ नाथासन्मुख येऊन ॥ करूनि साष्टांग नमन ॥ बोले वचन करुणारिती ॥ ४५ ॥ नाथ पुसती तयाप्रती ॥ कोण कोठील काय चित्तीं ॥ किमर्थ करितोसी ग्लांती ॥ हा अभिप्राय निश्चिती कळवावा ॥ ४६ ॥ तो ह्मणे माझा वृत्तांत ॥ सांगतों ऐका निवांत ॥ ब्रह्मराक्षस मीं निवांत ॥ येथें राहत शत वर्षें ॥ ४७ ॥ आजि माझें सरलें पाप ॥ प्रत्यक्ष पाहिला ब्रह्मरूप ॥ उद्धारसमय परि अल्प ॥ कांहीं संकल्प राहिलासे ॥ ४८ ॥ तुझिया कृपाप्रसादें

आतां ॥ येथून माझी होय मुक्तता ॥ तें अभय दिधलें पाहिजे नाथा ॥ मागेन स्वार्था आपुलीया ॥ ४९ ॥ पतितपावन अवतार ॥ हें बिरुद तुझें साचार ॥ केला विनंतीचा अंगिकार ॥ करूनि वर मज देई ॥ ५० ॥ ऐकोनि तयाची ग्लानी ॥ नाथ म्हणे जे इच्छा मनीं ॥ सुखें सांगें स्ववचनी ॥ फेडील शिराणी देव तुझी ॥ ५१ ॥ पापें प्राप्त मज हे योनी ॥ तुझ्या कृपा कटाक्षें करुनी ॥ जरी पुण्य वेचिशी मजलागुनी ॥ तरीच येथुनी मीं सुटें ॥ ५२ ॥ पापपुण्याची वार्ता ॥ मज तंव न दिसे सर्वथा ॥ कोणतें पुण्य द्यावें आतां ॥ तूंचि तत्वतां स्पष्ट वदें ॥ ५३ ॥ तो ह्मणे आजिपर्यंत ॥ ब्राह्मण संतर्पण घडलें येथ ॥ तें अथवा रात्रीं जेववित ॥ दीन पतित अंत्यज जो ॥ ५४ ॥ या दोहींमधून एक ॥ संकल्प करूनि उदक ॥ माझे हातीं घालिसी देख ॥ तरी निःशंक उद्धरेन ॥ ५५ ॥ ऐकोनि तयाचें वचन ॥ संतोषयुक्त नाथ आपण ॥ द्यावें उदक हें ह्मणून ॥ द्यावया उदारपण देखिलें ॥ ५६ ॥ विचारून ब्रह्मराक्षस ॥ मागतसे रात्रीच्या पुण्यास ॥ नाथें करून संकल्पास ॥ घातलें उदक सत्या करीं ॥ ५७ ॥ उदक पडतांचि हातीं ॥ त्याच क्षणीं पावला मुक्ती ॥ हे दयेची पुण्य संपत्ती ॥ राक्षस उद्धरती संकल्पमात्रें ॥ ५८ ॥ ब्रह्मराक्षस उद्धरण ॥ हें ऐश्वर्य दयेचें चिन्ह ॥ श्रीनाथाचें सहजपण ॥ करित पावन जगातें ॥ ५९ ॥ माध्यान्हिक गंगेसी ॥ लक्ष्मीतीर्था नित्यासी ॥ सारून येत आश्रमासी ॥ स्वच्छंदेसीं निजस्थिती ॥ ६० ॥ यापरी दीन अंत्यजासी ॥ अन्न देतसे अहर्निशी ॥ शरिरीं यथां शक्तिशी ॥ वंदोनि नाथासी पैं गेला ॥ ६१ ॥ दयेचें येवढें महिमान ॥ अंगें दाविलें आचरून ॥ श्रीनाथचरणीं शरण ॥ केशव दीन निजभावें ॥ ६२ ॥ दयाळु कृपाळुपूर्ण ॥ श्रीनाथ माझा परिपूर्ण ॥ पुढील रसाळ निरोपण ॥ श्रोते विचक्षण परिसोत ॥ ६३ ॥ इतिश्रीएकनाथचरित्रेतस्करसंरक्षणंब्रह्मराक्षसउद्धरणंनामएकविंशतिमोध्यायः ॥

---

## अध्याय बाविसावा.

श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ समर्थ स्वामिराज माझा ॥ अवतरला परमार्थ काजा ॥ भाविकांचिया समाजा ॥ उद्धरित पैं जा हरिकीर्तनें ॥ १ ॥ काव्य-रचना अळंकृत ॥ संस्कृतावरी टीका करित ॥ कोण कोण प्रसिद्ध ग्रंथ ॥ नामें समस्त परिसीजे ॥ २ ॥ गुरु आज्ञा निज नेम ॥ प्रथम चतुःश्लोकी उत्तम ॥ कठिण परि बोध सुगम ॥ टीका अनुपम जाली होती ॥ ३ ॥ त्यानंतरें प्रतिष्ठानीं ॥ अभंग आणि लीळा वर्णी ॥ अभिनव साहित्य कीर्त्तनीं ॥ संख्या लेखनीं नकरवे पैं ॥ ४ ॥ हस्तामलकाची टीका ॥ शुकाष्टक बोध नेटका ॥ त्यानंतरें स्वात्मसुखा ॥ वर्णिला निका परमार्थ ॥ ५ ॥ संत महानुभाव श्रोते ॥ ऐकोनि तेथिंच्या अर्थातें ॥

लांचावले निजचित्तें ॥ विनविती नाथातें आवडीनें ॥ ६ ॥ तयावरी उपाय टीका ॥ श्रीवाणीचा बोध निका ॥ श्रवणीं उद्धार भाविकां ॥ कीजे नेटका महाराष्ट्र ॥ ७ ॥ पुराणीं श्रेष्ठ भागवत ॥ त्याहिमाजी उद्धवगीत ॥ भक्ति उत्कर्ष अद्भुत ॥ वैराग्ययुक्त निजज्ञान ॥ ८ ॥ भुकेला भावाचा देव ॥ रक्षी तयाचा मनोभाव ॥ श्रीभागवतीं नवलाव ॥ टीका अपूर्व आरंभिली ॥ ९ ॥ थोड्याच दिवशीं अध्यायी दोन ॥ टीका केली असे लेखन ॥ नवल वर्त्तलें विंदान ॥ श्रोतीं श्रवण तें कीजे ॥ १० ॥ कोणी भाविक गृहस्थ ॥ नाथचरणीं तयाचा भावार्थ ॥ करावया वाराणसी तीर्थ ॥ सिद्ध होत जावयासी ॥ ११ ॥ त्या दोन अध्यायांची टीका ॥ जिवीं गोड लागली देखा ॥ लिहून प्रति पुस्तका ॥ नित्य त्याचि श्लोकां वाची स्वयें ॥ १२ ॥ स्नानसंध्या नित्य कर्म ॥ सारूनि सुशीळ परम ॥ त्यावरी निष्ठा तयाचा नेम ॥ भावार्थ निःसीम तया पठणीं ॥ १३ ॥ श्रीनाथ आज्ञा घेऊन ॥ सुमुहूर्त्तें केलें प्रयाण ॥ वाराणसीसी जाऊन ॥ केलें विधान तीर्थाचें ॥ १४ ॥ एके दिवसी मणिकार्णिकेसी ॥ स्नान करून सहजेसीं ॥ त्रिपुंड्र द्वारावती तिलकासी ॥ आणि सर्वांगासी पैं केलें ॥ १५ ॥ विस्तीर्ण घालूनि आसन ॥ बैसे मांडुनी वीरासन ॥ श्रीभागवत अध्यायपठण ॥ भावें करून करी ॥ १६ ॥ षड्शास्त्रें संपन्न येती ॥ त्या घाटीं मठाधिपती ॥ त्याचे दोघे ब्राह्मण विद्यार्थी ॥ अध्यायन शिकती शास्त्रातें ॥ १७ ॥ ते दोघे तया अवसरीं ॥ स्नानासी जातां गंगातिरीं ॥ यातें देखोनि नेत्रीं ॥ पंडित हा अंतरीं मानिला ॥ १८ ॥ त्रिपुंड भव्य ललाटीं ॥ तुळसी रुद्राक्ष माळा कंठीं ॥ विस्तीर्ण आसन परिपाठीं ॥ पंडितकोटि भाविला ॥ १९ ॥ येऊनियां तया वेळीं ॥ समर्यादें बैसले तया जवळी ॥ गीर्वाण भाषा मृदुमंजुळी ॥ पुसती त्या काळीं गृहस्थासी ॥ २० ॥ कोण कोठील पंडित ॥ देहनाम कीजे विदित ॥ अवलोकितें शास्त्रकृत्य ॥ करावें निश्चित आम्हासी ॥ २१ ॥ येरु ह्मणे मीं गृहस्थ ॥ प्रतिष्ठानीहून आलों देख ॥ पुस्तक हें श्रीभागवत ॥ उद्धव गीत एकादश ॥ २२ ॥ सुवाच्य करावें पठण ॥ बोलिले विद्यार्थि ब्राह्मण ॥ गृहस्थ वाची प्रीति कनरू ॥ महाराष्ट्र जाणून क्षोभले ॥ २३ ॥ महाराष्ट्र भाषा लाघव ॥ अपूर्व दिसे येथीचें गौरव ॥ ऐकतांचि जन सर्व ॥ भक्तिभाव धरिती येथें ॥ २४ ॥ गीर्वाण वाणीचा अव्हेर ॥ येणें होईल सत्वर ॥ या टीकेनें हा विचार ॥ आज्ञा साचार भासतसे ॥ २५ ॥ म्हणती श्रीभागवत वेदांत सार ॥ त्यावरी टीका महाराष्ट्र ॥ हा दोष महा थोर ॥ स्वामीसी हा प्रकार जाणवावा ॥ २६ ॥ एक विद्यार्थी सत्वर ॥ उठोनि गेला क्रोधपर ॥ येथील वर्तमान सविस्तर ॥ गुरूसी समग्र निवेदिलें ॥ २७ ॥ एक गृहस्थ महा कपटी ॥ गंगातिरीं देखें दृष्टी ॥ त्याची अन्याय राहटी ॥ पाषांड गोष्टी देखिल्या

॥२८॥ श्रीभागवत उद्धव गीत ॥ वेदांतसार मथित ॥ त्याची महाराष्ट्र टीका वाचित ॥ ऐकोन येत कंटाळा ॥ २९ ॥ त्यासी करावें शासन ॥ यदर्थीं पाहिजे आज्ञा-वचन ॥ म्हणोनि आलों धांवोन ॥ एक तेथें राखण बैसला ॥ ३० ॥ ऐकोनि शिष्याची वाणी ॥ स्वामिही क्षोभला मनीं ॥ त्यासी आणविलें पाचारुनी ॥ शोधा शिक्षासनीं योग्य कीं नाहीं ॥ ३१ ॥ आणिकही पांच सात ॥ त्या सवें विद्यार्थी धाडित ॥ गृहस्थाजवळी येऊन बोलत ॥ गुरु पाचारित तुजलागीं ॥ ३२ ॥ गृहस्थासी सुटला कंप ॥ मनीं आठविला संकल्प ॥ परि एकनाथ नामजप ॥ तेणेंचि निष्कंप चालिला ॥ ३३ ॥ मठांत स्वामीचें दर्शन ॥ देखतां गृहस्थ करी वंदन ॥ स्वामि पुसती वर्त्तमान ॥ हें दुराचरण तुझेंची ॥ ३४ ॥ श्री-भागवत महाराष्ट्र ॥ हा कोण जल्पला कोठें ॥ पाषांडमत हें खोटें ॥ शासन मोठें यदर्थीचें ॥ ३५ ॥ तूंचि अथवा अन्य कोणी ॥ जल्पलासी हे वाणी ॥ सत्वर हें निवेदुनी ॥ तैशाची शासनीं अर्ह व्हावें ॥ ३६ ॥ गृहस्थ घाबरला चित्तीं ॥ म्हणे मीं तंव मूढमती ॥ सांगतां श्रीनाथ ख्याती ॥ मज मारिती कीं काय ॥ ३७ ॥ संकल्पविकल्पित मन ॥ कांहीं न बोले वचन ॥ जाणोनि तयाचें मूढपण ॥ सन्यासी आपण बोलिला ॥ ३८ ॥ हें तंव केवळ अज्ञान ॥ याचें येथें नदिसे दूषण ॥ याचा कर्त्ता दुजा कोण ॥ तें पुसोनी जाऊं दीजे ॥ ३९ ॥ विद्यार्थी म्हणती तयासी ॥ या ग्रंथकर्त्याच्या नामासी ॥ आणि त्याचें वास्तव्य कोणेदेशीं ॥ साकल्यतेसीं सांगावें ॥ ४० ॥ इतुकेन तुझा अन्याय ॥ चुकेल शासन हा नव-लाव ॥ स्वामिकृपा गौरव ॥ क्षमा सर्व पैं करिती ॥ ४१ ॥ ऐकोनियां आश्वासन ॥ कांहीं एक समाधान ॥ होऊनियां बोलिला वचन ॥ सावधान रीतीचें ॥ ४२ ॥ श्रीएकनाथ विख्यात नाम ॥ प्रतिष्ठान क्षेत्र राहतें धाम ॥ तो वरिष्ठ पूज्य परम ॥ करी निःसीम भगवद्भक्ती ॥ ४३ ॥ जडासीं व्हावया बोध ॥ भक्ति ज्ञान वैराग्य सिद्ध ॥ अंगीं आचरोनि प्रसिद्ध ॥ प्राणि जडमुग्ध तारीतसे ॥ ४४ ॥ त्याचे संगति प्रतापें करी ॥ जनासी देख लागली बरी ॥ हरिकीर्तन नामगजरीं ॥ भक्तीची थोरी विस्तारली ॥ ४५ ॥ त्याचिया वाणीचा हा ग्रंथ ॥ होतसे प्रतिष्ठानांत ॥ दोन अध्याय जाले सांप्रत ॥ लिहून आणित पठणार्था ॥ ४६ ॥ सत्य हें वर्त्तमान ॥ तेंचि करीतसे निवेदन ॥ नकरितां कांहीं शासन ॥ अध्याय त्याज-वळून घेतले ॥ ४७ ॥ पत्र लिहून प्रतिष्ठानां ॥ दोघे विद्यार्थी पाठविले जाणा ॥ आधीं तेथीच्या ब्राह्मणां ॥ शिक्षार्थ आज्ञा लिहिली असे ॥ ४८ ॥ तेथें ब्राह्मण अति समर्थ ॥ असोनि हा येवढा अनर्थ ॥ होत असतां किमर्थ ॥ उच्छेद न होत अन्यायाचा ॥ ४९ ॥ नसतां सामर्थ्य तुह्मांसी ॥ जो करी काव्य महाराष्ट्रासीं ॥

त्यासी आमुच्या भेटीसी ॥ निर्भयतेसीं पाठविजे ॥ ५० ॥ कोण पाषांड कैसें मत ॥ हा शोध पाहून समस्त ॥ याचा विचार करोनि तथ्य ॥ मोडावें निश्चित पाषांड हें ॥ ५१ ॥ तुमचें नायके वचन ॥ इकडे येतां आपण ॥ त्यासी बहिष्कृत करोन ॥ वेगळें भिन्न टाकावें ॥ ५२ ॥ तयासीही आज्ञापत्र ॥ वेगळें असे स्वतंत्र ॥ त्यासी देऊन सत्वर ॥ मार्गस्थ तत्पर पैं कीजे ॥ ५३ ॥ यदर्थीं विद्यार्थियांसी ॥ निर्भिड बोलावयासी ॥ आज्ञापिलें निश्चयेसीं ॥ याचिया साह्यासीं असावें ॥ ५४ ॥ यापरि वाराणसीहुन ॥ सहपत्रें दोघे जण ॥ प्रतिष्ठानीं येऊन ॥ धर्माधिकाऱ्या जाण भेटले ॥ ५५ ॥ तिहीं परिसतां पत्रार्थ ॥ जीवीं जाले अति हर्षित ॥ ह्मणती आतां मनोरथ ॥ पुरविलें समस्त जगदीशें ॥ ५६ ॥ समस्त पाचारून ब्राह्मण ॥ विद्यार्थियासीं भेटविलें जाण ॥ येथील वृत्तांत सारांश पूर्ण ॥ निवेदन पैं केला ॥ ५७ ॥ आह्मासी प्रभु यजमान ॥ तें तंव समस्त तया आधिन ॥ ह्मणोनि हें मत उपटून ॥ नव्हे आमुचेन यास्तव ॥ ५८ ॥ आपुल्या मतें ब्राह्मणीं ॥ शास्त्रमतें शोध करुनी ॥ छळिलें नाना प्रयत्नीं ॥ परि तो प्राणि न जिंकवे ॥ ५९ ॥ वारणासी क्षेत्र समर्थ ॥ तेथें निवडणें समस्त ॥ होऊनि याचा अकर्तव्यार्थ ॥ जातील व्यर्थ कळाकुसरी ॥ ६० ॥ काया वाचा आणि चित्त ॥ साह्य आह्मा तुह्मा समस्त ॥ सुखें त्यासी त्वरित ॥ न्यावें तेथें गुरुआज्ञा ॥ ६१ ॥ घेऊन समस्तांचें वचन ॥ विद्यार्थी दोघे ब्राह्मण ॥ करूनि चालिले आंगवण ॥ ध्यावया दर्शन नाथाचें ॥ ६२ ॥ इकडील ग्रंथलेखन ॥ कोठपर्यंत आलें संपूर्ण ॥ तें आतां करावें श्रवण ॥ श्रोते विचक्षण श्रवणार्थीं ॥ ६३ ॥ जनक आर्षभ सुखसंवाद ॥ पंचमोध्यायीं बोल विशद ॥ टीका वोविया प्रबंध ॥ संपला शुद्ध अर्थान्वय ॥ ६४ ॥ नाथ निज समाधानीं ॥ बैसलासे सहजासनीं ॥ उद्धव आणि भाविक जनीं ॥ परिवेष्टित सदनीं शोभती ॥ ६५ ॥ तंव वाराणसीचे ब्राह्मण ॥ उभयतां बलाढ्य संपन्न ॥ सन्मुख वाडियांत येतां जाण ॥ श्रीनाथें आपण पाहिलें ॥ ६६ ॥ असनावरोनि उठोन ॥ सामोरा जावोनी आपण ॥ तयांसी केलें नमन ॥ आणि आलिंगन अतिनिष्ठा ॥ ६७ ॥ हातीं धरून तयांसी ॥ आसनीं अति आदरेसी ॥ बैसवून सावकाशीं ॥ सन्मानेसी विचारित ॥ ६८ ॥ कोठून आलांती ब्राह्मणां ॥ दुरी पंथ समचिन्हा ॥ दिसतसे तुमच्या वदना ॥ कीजे भोजना आधीं आतां ॥ ६९ ॥ तयांचे मनीं होता कोप ॥ गुरुआज्ञेचाही साटोप ॥ श्रीनाथाचें पाहतां स्वरूप ॥ निर्विकल्प जाले मनीं ॥ ७० ॥ उद्धत करावी वल्गना ॥ हेत होता त्यांच्या मना ॥ समस्त ब्राह्मणीं अनुमोदना ॥ दिधलें जल्पना अट्टातट्टा ॥ ७१ ॥ मनींच विराले सकळ ॥ ऐसें श्रीदर्शनाचें फळ ॥ विवेकयुक्त आणि मवाळ ॥ बोलती केवळ

नम्रतेनें ॥ ७२ ॥ वाराणसी क्षेत्राहून ॥ समर्थ संन्यासी शास्त्रसंपन्न ॥ गुरुआज्ञा प्रमाण करुन ॥ आलों आपण येथेंची ॥ ७३ ॥ तुम्हासही तेथील लेखन ॥ पत्र आहे तें प्रमाण ॥ केलिया आम्ही भोजन ॥ सुखें करून करूं आतां ॥ ७४ ॥ मित इतुकें भाषण ॥ आणि केलें पत्र अर्पण ॥ श्रीनाथें मस्तकीं वंदून ॥ वाचिलें आपण मर्यादा ॥ ७५ ॥ तेथील अर्थ कळला मना ॥ धन्य ह्मणे आजिच्या दिनां ॥ विश्वेश्वरें निजदर्शनां ॥ पाचारिलें जाणा कृपेस्तव ॥ ७६ ॥ याहून कोण लाभ थोर ॥ तेथें जावया निर्धार ॥ उल्हासयुक्त उत्तर ॥ ऐकिलें साचार नाथवाणीं ॥ ७७ ॥ ब्राह्मण ह्मणती निजमनीं ॥ हा तंव असे समाधानी ॥ कदापि विषम अंतःकरणीं ॥ नाहीं ह्मणोनी विस्मित ॥ ७८ ॥ त्यांचाही सकळ कोप शांत ॥ होऊनि बैसले निवांत ॥ तेथील ब्राह्मण हेर गुप्त ॥ जाणवीत मात समस्तांसीं ॥ ७९ ॥ वाराणसीचे ब्राह्मण ॥ तेथें करूं गेले आंगवण ॥ परि नाथाचें केलें दर्शन ॥ गेलें हरपोन तें भान ॥ ८० ॥ नवल नाथाचें विंदान ॥ काय भूसुरकींविद्या कोण ॥ जो तो होय सुलीन ॥ अभिमानभग्न होउनी ॥ ८१ ॥ असो आतां श्रीनाथ ॥ परिसोनी पत्राचा अर्थ ॥ उल्हासयुक्त बोले समर्थ ॥ जाला निश्चितार्थ जावयाचा ॥ ८२ ॥ ब्राह्मणांसी कर जोडून ॥ विनवी श्रीनाथ आपण ॥ सत्वर करवुनी स्नान ॥ घातलें भोजन यथारुची ॥ ८३ ॥ जावयालागीं उद्धवासी ॥ आज्ञापिलें अति उल्हासीं ॥ येथिल्या व्रतनिर्वाहासी ॥ निजरीतीसीं चालवावें ॥ ८४ ॥ एकाकीं श्रीनाथ ॥ चालिला एकाग्रवीर समर्थ ॥ केशवाचा मनोरथ ॥ कृतकृतार्थ नामस्मरणें ॥ ८५ ॥ इतिश्रीएकनाथचरित्रेनाथवाराणसीगमनंनामद्वाविंशतिमोध्यायः ॥

---

## अध्याय तेविसावा.

श्रीराम समर्थ ॥ ॐनमो श्रीएकनाथा ॥ विश्वव्यापका तूं समर्था ॥ अर्थ स्वार्थ परमार्था ॥ भक्तिभावार्था पाळिसी ॥ १ ॥ तुझिया बोधाची हातवटी ॥ अतर्क्य तर्कें ना कसवटी ॥ तुझें महिमान लक्षितां दृष्टीं ॥ अनुपम्य सृष्टिऐश्वर्य ॥ २ ॥ चोरासी विवकसंपन्न ॥ करूनि दिधलें समाधान ॥ ब्रह्मराक्षस उद्धरण ॥ हें अघटितपण आचरणीं ॥ ३ ॥ नेणोनि तुझी स्वरूपस्थिती ॥ जे जे मत्तें छळूं येती ॥ तुझिया ऐश्वर्याची ख्याती ॥ तेचि होती भूषणें ॥ ४ ॥ पूर्णावतार सत्पुरुष ॥ तूं साक्षात् जगदीश ॥ अवतारोन परमार्थ प्रकाश ॥ प्रकाशिला विशेष जगदोद्धार ॥ ५ ॥ परमार्थासी पुष्टी ॥ तुझीं चरित्रें अति गोमटीं ॥ ऐश्वर्य पूर्ण लीळा सृष्टीं ॥ दाविलीं दृष्टि जगासीं ॥ ६ ॥ ऐसा परमार्थ तुझा विशेषीं ॥ तुज बोलाविलें वाराणसी ॥ अभिमानग्रस्त प्राणियासी ॥ कृपासौरसी तारिसी तूं ॥ ७ ॥ याचिलागीं तूं

आपण ॥ वाराणसीचें प्रयाण ॥ करितोसी त्वरेंकरून ॥ जगदोद्धारण व्हावयास ॥ ८ ॥ न घेतां साह्य सांगात ॥ एकलाची अति त्वरित ॥ विद्यार्थी मुन्हाळियां सहित ॥ स्वयें मार्गस्थ जालासी ॥ ९ ॥ उद्धवें दोघे ब्राह्मण ॥ सेवार्थ पाठविले मागून ॥ पंच्याध्यायीं टीका लेखन ॥ पुस्तक संपूर्ण समागमें ॥ १० ॥ सत्वर आक्रमुनी पंथ ॥ पावले वाराणसीसी स्वस्थ ॥ देखोनि मणिकर्णिका तीर्थ ॥ हर्ष अद्भुत वाटला ॥ ११ ॥ पुढें गेले विद्यार्थी ॥ तंव ते दिवसीं तो यती ॥ सहपरिवार भिक्षार्थी ॥ तीन शत यति समवेत ॥ १२ ॥ विद्यार्थिही लवकरी ॥ पुढीसी ग्रहस्थाचे घरीं ॥ गेले होते ते अवसरीं ॥ जाऊन करी निवेदन ॥ १३ ॥ वंदूनि गुरु संन्यासी ॥ बडिवार बोले वचनेसी ॥ स्वामि कृपाप्रतापेसी ॥ आणिले दर्शनासी स्वसत्तां ॥ १४ ॥ मठानिकट गंगातिरीं ॥ बैसऊनि आज्ञे करी ॥ सुचनार्थ झडकरी ॥ पातलों निर्धारीं दर्शनासी ॥ १५ ॥ विद्यार्थियांची ऐकोनि गोष्टी ॥ तो संन्यासी महा हटी ॥ शास्त्रज्ञतेचें बळ पोटीं ॥ काय वाग्पुटीं बोलिला ॥ १६ ॥ त्यासीं नेऊन मठांत ॥ बैसविजे हें निरोपित ॥ संन्यासी येऊनि तीन शत ॥ शासनयुक्त ते करिती ॥ १७ ॥ स्वामिआज्ञे तो ब्राह्मण ॥ नाथासी मठीं नेऊन ॥ म्हणे येथें बैसोनि आपण ॥ होईल तें अवलोकन करावें ॥ १८ ॥ येरीकडे समस्त संन्यासी ॥ त्यांसी गुरु आज्ञा करिती ऐसी ॥ तुह्मी जाऊनि निजमठासी ॥ सांगतों त्याकार्यासी पैं कीजे ॥ १९ ॥ प्रतिष्ठानीहूनि स्वसत्ते ॥ जो अन्याई आणिला येथें ॥ पांच पांच दंड त्यातें ॥ शासनातें करावें ॥ २० ॥ इतुकें झोडूनि वांचला ॥ तरी आपण येतों परामर्षाला ॥ यारीति निश्चयो केला ॥ तयेवेळां परिक्षूं पैं ॥ २१॥ गुरु आज्ञेवरी यती ॥ येऊनियां मठाप्रतीं ॥ परस्परें विचार बोलती ॥ शासनपद्धति अयुक्त हे ॥ २२॥ न करितां शोध संपूर्ण ॥ त्याच्या ज्ञानाचें काय लक्षण ॥ कळलें नसतां कोपून ॥ करविलें शासन अन्याय हा ॥ २३ ॥ गुरुआज्ञा उल्लंघन ॥ करितां दोषाई आपण ॥ यदर्थीं हें प्रमाण ॥ ऐका वचन नियमाचें ॥ २४ ॥ एकएक जाऊनि आपण ॥ निरिक्षूं तयाचें लक्षण ॥ योग्य अयोग्य पाहून ॥ तैसेंच शासन करावें ॥ २५ ॥ पाषांडवाद किंवा तत्वार्थ ॥ हा समूळ न कळतां अर्थ ॥ शासन करणें हें व्यर्थ ॥ ब्रह्महत्या अनर्थ होईल ॥ २६ ॥ जनीं जनार्दन एक ॥ हे स्थिति निजनिष्टंक ॥ संन्यासिया उपजला विवेक ॥ पुढील कौतुक अवधारा ॥ २७ ॥ एकएक संन्यासी येऊन ॥ करी श्रीनाथदर्शन ॥ तंव चतुर्भुज श्रीकृष्ण ॥ मूर्त्ति नयनीं पाहती ॥ २८ ॥ दर्शनें सद्भाव चित्ता ॥ येऊन करिती दंडवता ॥ वंदूनि अति नम्रता ॥ तटस्थता पाहताती ॥ २९ ॥ एकेक संन्यासी आपण ॥ करावया येत शासन ॥ होतांचि श्री

दर्शन ॥ सद्भावें नमन करितातीं ॥ ३० ॥ तेवेळीं तीन शत यती ॥ नमून तटस्थ उभे ठाकती ॥ विद्यार्थि येऊनि स्वामीप्रती ॥ नवल सांगती विपरीत ॥ ३१ ॥ अहो गुरु स्वामि समर्था ॥ सन्यासी धाडिले वृथां ॥ तेचि वंदिती एकनाथा ॥ चरणीं माथा ठेउनी ॥३२॥ स्वामि आज्ञा मोडून ॥ विपरित ऐसें दुराचरण ॥ आह्मां न पाहवे ह्मणोन ॥ आलों धांवोन सांगावया ॥ ३३ ॥ ऐकोन विपरित मात ॥ उद्विग्न यति अभिमानग्रस्त ॥ संल्कप विकल्प मनांत ॥ शंका अत्यंत पैं जाली॥३४॥ अभिमान बळ समस्त ॥ खुंटलें ह्मणोनी विचारित ॥ कैसें करावें प्रस्तुत ॥ मनीं विवरित यथाबुद्धी ॥ ३५ ॥ बहुधा कांहीं चेटक ॥ असेल हा केला तर्क ॥ आचार्य स्वामीचा विवेक ॥ जाली सूचक बुद्धी तया ॥ ३६ ॥ बौधमत खंडणार्थ ॥ श्रीशंकराचार्य समर्थ ॥ वादार्थ युक्ति पंथ ॥ नेमी येथ तैसें कीजे ॥ ३७ ॥ कैसी वाणी कोण स्थिती ॥ आधीं ऐकीजे त्याची युक्ति ॥ तदनंतरें वादी निश्चितीं ॥ जिंकूं त्यांप्रतीं शास्त्रबळें ॥ ३८ ॥ ऐसा बुद्धिनिश्चय करून ॥ विद्यार्थियांसीं बोले वचन ॥ प्रत्यक्ष त्याचें दर्शन ॥ न होय तें लक्षण सांगत ॥ ३९ ॥ पडद्याआडून त्यासी ॥ केलें पाहिजे भाषणासी ॥ पाषांडी चेटकीयांसी ॥ निजयुक्तीशीं जिणावया ॥ ४० ॥ तुवां जाऊनि त्वरित ॥ ऐसेंच कीजे आचरित ॥ गुरुआज्ञेचा संकेत ॥ तसाचि टाकित आड पडदा ॥ ४१ ॥ तेकाळीं मुख्य सन्यासी ॥ केवळ अभिमानाची रासी ॥ वादबळ धरूनि मानसीं ॥ आला मठासीं जिंकावया ॥ ४२ ॥ सिंहासनीं बैसोन ॥ पाहे यति शिष्यांचें लक्षण ॥ तव ते विदेही होऊन ॥ तटस्थ संपूर्ण पैं उभे ॥ ४३ ॥ तयाची देखोनि हे स्थिती ॥ विस्मित जाला मुख्य यती ॥ श्रीनाथ ऐश्वर्यख्याती ॥ उद्धरलों बोलती समस्त ॥ ४४ ॥ ज्यालागीं तप सायास ॥ निरंतर करिती अभ्यास ॥ प्राप्ति वाद्याअभिमानियांस ॥ कैंचि जे दुर्लभ देवादिकां ॥ ४५ ॥ तो परब्रह्म साकारमूर्ती ॥ नवल पाहिल्याची ख्याती ॥ श्रीएकनाथ एकनाथ ह्मणती ॥ आनंद चित्तीं विस्मरेना ॥ ४६ ॥ मुख्य संन्यासी ह्मणे ते वेळां ॥ ह्मणें नवल देखिली हे लीळा ॥ कोण स्वरूप कैसी कळा ॥ परिक्षून मग डोळां पाहावा ॥ ४७ ॥ आसन घालुनी निकट ॥ आड तितुकाचि अंत्रपाठ ॥ ह्मणे तुझें परिक्षावया कपट ॥ आलों वरिष्ठ मीं येथें ॥ ४८ ॥ अभिमानयुक्त यतिवचन ॥ परि नाथासी नाठवे विषमपण ॥ सहजची सुखसंपन्न ॥ शांति निपुण निघे वाणी ॥ ४९ ॥ अहो स्वामि श्रीसमर्था ॥ तुमचे चरणीं माझा माथा ॥ कृपा करोनियां अनाथा ॥ कीजे मनोरथा परिपूर्ण ॥ ५० ॥ इतुका दूरपंथ क्रमून ॥ बोलाविलें दर्शनालागून ॥ मध्यें अंत्रपाट आणून ॥ विषमपण किमर्थ मनीं ॥ ५१ ॥ अन्याय भासला असेल चित्तीं ॥ तो क्षमा कीजे कृपामूर्ती ॥ दीनाची ऐकिजे विनंती ॥

अल्पमति मीं अनिग्रही ॥ ५२ ॥ नाहीं वेदशास्त्रसंपन्न ॥ कवितेचा नसे अभिमान ॥ समर्थीं न मानितां कोण ॥ उपेग लक्षण ग्रंथाचें ॥ ५३ ॥ प्रत्यक्ष नारायणमूर्त्ती ॥ ज्ञान संपन्नता विख्याती ॥ तुझा न मानतां युक्ती ॥ व्यर्थ श्रम निश्चिती कायसे ॥ ५४ ॥ संकल्पविकल्पाचें शून्य ॥ गुरुकृपा निवांत मन ॥ या काव्याचा अभिमान ॥ या देहीं जाण पैं नसे ॥ ५५ ॥ कृपा करूनि करुणानिधी ॥ शांतऊनि कोपबुद्धी ॥ दर्शन देऊन प्रसिद्धी ॥ अनाथ त्रिशुद्धि तारावा ॥ ५६ ॥ पंचमोध्यायीं लेखन ॥ इतुकें जालें टीका व्याख्यान ॥ शास्त्रविवेकें दूषण ॥ लागल्या कोण उपयोग याचा ॥ ५७ ॥ जितुकें झालें टीका लेखन ॥ व्याख्यानीं लागतां दूषण ॥ करावें जळीं निमग्न ॥ मणिकर्णिकार्पण सहजची ॥ ५८ ॥ संन्यासियांचें मनींचा कोप ॥ संकल्प विकल्प होतें पाप ॥ श्रीनाथवाणी अमृतरूप ॥ प्रवेशतां अल्पतें शमलें ॥ ५९ ॥ हृदयीं न्याय सद्विवेक ॥ उजळला अधिकार हेचि येक ॥ त्याच्या समाधानाचा परिपाक ॥ अरुणोदय ज्ञानार्क प्रकाशक हा ॥ ६० ॥ तेकाळीं समस्त संन्यासी ॥ विनंति बोध श्रीगुरुसी ॥ सांगताती सप्रेमेसी ॥ आश्चर्यासी नाथाचिया ॥ ६१ ॥ परब्रह्म परंजोती ॥ सच्चिदानंद ज्यातें म्हणती ॥ वेदांतगर्भ श्रुतिसंमती ॥ अद्वैत स्थिति. प्रतिपाद्य ॥ ६२ ॥ जे निर्गुण निर्विकार ॥ निःप्रपंच निरोपचार ॥ मायातीत निजसाचार ॥ श्रुतिनिर्धार नेतिनेती ॥ ६३ ॥ तें हें साकार ब्रह्ममूर्त्ती ॥ प्रत्यक्ष आली मठाप्रती ॥ आतां कायसी येथें भ्रांती ॥ अंत्रपाट निश्चिती काढिजे ॥ ६४ ॥ हा मानवी नव्हे निर्धारीं ॥ लीलाविग्रहें धनुर्धारी ॥ सत्य सत्य हे वैखरी ॥ विनंति मान्य करी आमुची ॥ ६५ ॥ सत्य जनीं जनार्दन ॥ ऐसें ऐकोनिया वचन ॥ द्रवलें सन्यासियांचें मन ॥ शुद्ध अंतःकरण सत्ववृत्ती ॥ ॥ ६६ ॥ या भूमिके येतां वृत्ती ॥ पडदा काढवितां यती ॥ पाहे तंव श्रीकृष्णमूर्ती ॥ बैसलीसे ववघवीत ॥ ६७ ॥ नेत्रीं देखतांचि त्यातें ॥ अष्ट सात्विकभाव भरतें ॥ अंतःकरणीं वोसंडत ॥ तेणें देहभानातें विसरला ॥ ६८ ॥ न धरत न स्मरत ॥ साष्टांग केला प्रणिपात ॥ मुखें त्राहें त्राहें म्हणत ॥ मीं पतित पतित निघे वाणी ॥ ६९ ॥ लीला ऐश्वर्याची ख्याती ॥ तीतें सांवरूनि निश्चिती ॥ श्रीएकनाथ कृपामूर्त्ती ॥ उठवी निश्चिती दोहीं हातें ॥ ७० ॥ चरणावरी माथा ठेऊन ॥ ह्मणे ॐनमो नारायण ॥ अनुचित विपरिताचरण ॥ ऐसें आपण न करावें ॥ ७१ ॥ चतुर्थाश्रम शिरोमणी ॥ हें प्रतिपाद्य शास्त्र पुराणीं ॥ विपरित वर्त्तणुक शिष्टांनीं ॥ न आणिजे मनीं संकोच हा ॥ ७२ ॥ लीलाचरित्र चमत्कार ॥ आणि शास्त्रप्रतिपाद्य उत्तर ॥ एकोनि आनंद निर्भर ॥ सन्यासी सत्वर उमजला ॥ ७३ ॥ प्रेमावस्था शांतऊन ॥

आसनीं बैसला सुखसंपन्न ॥ एक श्लोक टीका व्याख्यान ॥ ऐकतांचि मन निवालें ॥ ॥ ७४ ॥ पूजाभिमान शास्त्राभिमान ॥ ह्मणें हेंचि येथें दृढबंधन ॥ नकळे साधूचें महिमान ॥ क्षमा संपूर्ण पैं कीजे ॥ ७५ ॥ परस्परें सुखविश्रांति ॥ श्रीनाथ ऐश्वर्य संपत्ति ॥ पाहूनियां मग यती ॥ निवाला चित्तीं निजबोधें ॥ ७६ ॥ समग्र सन्यासियां सहित ॥ विचारून एकचित्त ॥ सत्कारें नाथासीं ठेवित ॥ आपुले मठांत अतिप्रीतीं ॥ ७७ ॥ समस्तांचें मनोगत ॥ हेटिका समाप्तिपर्यंत ॥ यांसीं राहवूनि येथ ॥ लेखनग्रंथ समूळकीजे ॥ ७८ ॥ रम्यकथा परमार्थ पूर्ण ॥ श्रीनाथ ऐश्वर्य निपुण ॥ त्याचे चरणीं नित्यशरण ॥ केशव दीन निजभावें ॥ ७९ ॥ इतिश्रीएकनाथचरित्रेसन्यासी-अभिमानहरणोनामत्रिविंशतिमोऽध्यायः ॥ श्रीनाथार्पणमस्तु ॥

---

## अध्याय चोविसावा.

श्रीरामसमर्थ ॥ परब्रह्म मूर्तिमंत ॥ श्रीनाथअवतार विख्यात ॥ शरणांगतां मुखें बोलवित ॥ हेंहि सांप्रत नवलची ॥ १ ॥ मूढ मूर्ख मतिहीन ॥ कांहीं नसतां शास्त्राध्ययन ॥ ग्रंथाचेंही अवलोकन ॥ कधीं पठण न घडे ऐसा ॥ २ ॥ सर्वोपरि अयोग्यता ॥ शिष्टांसही मान्य नसतां ॥ श्रीनाथनाम वोकितां ॥ येणेंचि आतां साह्य जालों ॥ ३ ॥ तप व्रत धर्म दान ॥ नाहीं केलें सदाचरण ॥ एक आवडीमात्र धरून ॥ करीत स्मरण नामाचें ॥ ४ ॥ इतुकेन माझा भावार्थ ॥ सिद्धि पाववी सद्गुरुनाथ ॥ ऐसा कृपाळु समर्थ ॥ पुरवी मनोरथ भाविकांचे ॥ ५ ॥ संन्याशासी आनंद बोध ॥ श्रीनाथप्रताप अगाध ॥ विवेक उपजला शुद्ध ॥ भाव अविरुद्ध तेकाळीं ॥ ६ ॥ विनंति करूनि बहुत ॥ मठींच राहविला श्रीनाथ ॥ टीका समाप्तीपर्यंत ॥ अपेक्षित स्वहितार्थी ॥ ७ ॥ नित्य होय जितुकी टीका ॥ तेचि पुराण यथासुखा ॥ व्याख्यानहि पाहूनि देखा ॥ अर्थ नेटका मनीं माने ॥ ८ ॥ शास्त्रव्युत्पत्ति व्याख्यान ॥ तितुका अर्थ परिपूर्ण ॥ भक्ति प्रेम विशेष वर्णन ॥ परिसोनि निमग्न निजानंदीं ॥ ९ ॥ सदां सर्वदां सुखसंवाद ॥ हें श्रवण हेंचि बोध ॥ अहर्निशीं भोगिती आनंद ॥ ब्रह्मानंद निजगोडी ॥ १० ॥ ऐसियापरि षण्मास वरी ॥ होत परमार्थाची उजरी ॥ श्रीनाथ अवतार थोरी ॥ वाराणसिपुरीं प्रगटली ॥ ११ ॥ ग्रंथजालिया संपूर्ण ॥ यतीसी थोर समाधान ॥ समस्तासी ह्मणें पूजन ॥ कीजे विधान उत्साहाचें ॥ १२ ॥ संन्यासी शास्त्रसंपन्न ॥ मान्यता आणि वरिष्ठज्ञान ॥ वाराणसीचे पंडित संपूर्ण ॥ होते स्वाधीन शास्त्रार्थी ॥ १३ ॥ श्रीनाथाचें आगमन ॥ आदरें मठीं ठेविलें जाण ॥ महाराष्ट्र भागवत श्रवण ॥ पंडितीं ऐकोनि विस्मय तयां ॥ १४ ॥ असह्य जालें

त्यांसी ॥ विशेष न येती मठासीं ॥ किंबहुना निंदास्पदासीं ॥ परस्परेसीं अनुवादती ॥ ॥ १५ ॥ हरिमायेची अनावरशक्ती ॥ पंडितां अभिमान भ्रांती ॥ ह्मणती या क्षेत्रीं पाषांड रिती ॥ अयोग्य निश्चिति अन्याय हा ॥ १६ ॥ तंव करूनि उत्साह संकल्प ॥ पंडितांसीं पाठविला निरोप ॥ त्यांसी तो मनीं विकल्प ॥ बोलती आरोप निग्रह ॥ १७ ॥ स्वामी भुलोनियां त्याचे मता ॥ अनुसरले शास्त्र अवहिता ॥ आह्मासही उत्साह कृत्या ॥ बोलाविलें आतां नवल पाहा ॥ १८ ॥ समस्तांहीं करूनि मत्त ॥ विद्यार्थिया उत्तर सांगत ॥ समर्थ अन्याय प्रतिपादित ॥ हें तों अयुक्त सर्वां यती ॥ १९ ॥ संन्यासियाचें भय चित्तीं ॥ सर्वेचि विचार करिती ॥ ह्मणति एक वेळ समस्तीं ॥ जावें मठाप्रति समुदायेसीं ॥ २० ॥ निर्भिड परिछिन्न ॥ स्वामीसी कीजे विज्ञापन ॥ आह्मीं असतां शास्त्र संपन्न ॥ अयोग्याचरण कैसें हें ॥ ॥ २१ ॥ नानायुक्ति प्रयुक्ती ॥ स्वामीसी समजाऊं न्यायरिती ॥ तयाच्या महाराष्ट्र ग्रंथाप्रती ॥ बुडवावें निश्चिती गंगाजळीं ॥ २२ ॥ दृढकरोनियां विचार ॥ समस्तांचा जाला निर्धार ॥ थोरथोर पंडित अपार ॥ शास्त्रज्ञ चतुर मिळाले पैं ॥ ॥ २३ ॥ श्रीनाथ ऐश्वर्य अनुभव ॥ नेणोनी आत्मगुण गौरव ॥ धरूनि शास्त्राभिमान हाव ॥ मठासी ते सर्व पावले ॥ २४ ॥ संन्याशासी करूनि नमन ॥ एकांतीं करिती विज्ञापन ॥ स्वामि तुह्मी सर्वज्ञ ॥ असतां वर्त्तन हें कैसें ॥ ॥ २५ ॥ नीचवाणीचें श्रवण ॥ शास्त्रविदित असे दूषण ॥ तेंचि आदरें संस्थापन ॥ अनर्थलक्षण हें होय ॥ २६ ॥ सर्वांसीं मान्य स्वामि वरिष्ट ॥ केविं प्रतिपादां अन्याय स्पष्ट ॥ येथूनि हो पाहे आचारभ्रष्ट ॥ ह्मणोनि कष्टतसों ॥२७॥ या संगाचा परिणाम ॥ विचारितां केवळ अधर्म ॥ उच्छेद व्हावा हें उत्तम ॥ आह्मांसी परम हे चिंत्तां ॥ २८ ॥ मान्य करुनी विनंती ॥ आज्ञापिजे कृपामूर्त्ती ॥ उच्छेदिलिया मताप्रतीं ॥ पावों विश्रांति सकळ आम्ही ॥ २९ ॥ ह्मणोनि घालितों लोटांगण ॥ मोडावें हें निंद्याचरण ॥ इतुकेन या क्षेत्राचा मान ॥ संरक्षण कीजे स्वामी ॥ ३० ॥ ऐकोनि पंडित आग्रहासी ॥ काय बोलिला संन्यासी ॥ तें ऐकिजे सावधानतेसीं ॥ निज निश्चयासीं धरुनी ॥ ३१ ॥ नेणोनि सत्पुरुष महिमान ॥ पूर्वी तुह्मासारिखे आपण ॥ आग्रहें केलें उद्धत वर्त्तन ॥ परी अभिमानभग्न पैं जालों ॥ ३२ ॥ तयाचें ऐश्वर्य आणि शांती ॥ उपमा न देखों त्रिजगतीं ॥ कृतनिश्चय आमुच्या मतीं ॥ तो निश्चिती पूर्णावतार ॥ ३३ ॥ तुह्मासी भ्रांति अभिमान ॥ तयांचें करूं इच्छिता छळण ॥ हें समूळ अप्रमाण ॥ सहसा अनुमोदन नदेववे ॥ ३४ ॥ ऐकोनि संन्याशाची वाणी ॥ पंडित क्षोभले निजमनीं ॥ बळेंचि ग्रंथ उचलुनी ॥ मठांतूनि निघाले ॥ ३५ ॥ श्रीनाथ निजस्थिति संपन्न ॥ अणुमात्र डळमळी ना मन ॥ सहज समाधि लक्षण ॥

यति अवलोकुन विस्मय करी ॥ ३६ ॥ तंव ते पंडित समस्त ॥ पुस्तक बुडवावया नेत ॥ संन्याशासी चिंता अद्भुत ॥ ह्मणें हें विपरित वोढवलें ॥ ३७ ॥ परि धींवसाही धरी मन ॥ ह्मणे यासी साह्य देव आपण ॥ कांहीं भाव रचून ॥ पंडितांचा अभिमान हरील ॥ ३८ ॥ अभिमान सबळ पोटीं ॥ समस्त मणिकर्णिकां तटीं ॥ येऊनियां महाहटी ॥ झुगारती नेटीं गंगाजळीं ॥ ३९ ॥ ते काळीं भागीरथी ॥ दोन्ही हात करी वरुती ॥ चुडे कंकणें रत्नदीप्ती ॥ शोभा शोभती सौभाग्य ॥ ४० ॥ श्रीनाथ कृपा ग्रंथासी ॥ वरी चढले आदरेंसी ॥ समस्त पाहती कौतुकासी ॥ अघटित पंडितांसी वाटलें ॥ ४१ ॥ देखोनि ऐसें विंदान ॥ संन्यासी आला धावोन ॥ उडी घालोनि आपण ॥ पुस्तक वंदोन घे मस्तकीं ॥ ४२ ॥ भागीरथी करस्पर्श ॥ नेत्रासीं लावी सावकाश ॥ मुखीं गर्जे श्रीनाथयश ॥ अतिउल्हास जाहला ॥ ४३ ॥ प्रेमाचा जिवीं आला पूर ॥ तेणेंची लोचनीं वाहे नीर ॥ श्रीनाथनामाचा गजर ॥ जयजयकार वदे स्वयें ॥ ४४ ॥ समस्त शिष्य परिवार ॥ धावोनि आले सत्वर ॥ नमनाचा अति आदर ॥ केला सुखकर ग्रंथराज ॥ ४५ ॥ सन्यासी सुखावोनी चित्तीं ॥ ह्मणे पंडित मूढमती ॥ आतां तरी दवडून भ्रांती ॥ शरण निश्चिति रिघा वेगीं ॥ ४६ ॥ कुबुद्धि सांडून सर्वथां आदरें नमारे श्रीनाथा ॥ गौरऊनियां महाग्रंथा ॥ नमुनी माथा वंदिजे ॥ ४७ ॥ तंव अधोवदनें चिंतायुक्त ॥ कांहीं न बोलती पंडित ॥ परि संन्यासी अज्ञांकित ॥ होउनी वर्तत तेकाळीं ॥ ४८ ॥ सद्भाव भक्तिसी कारण ॥ अनेक जन्म सुकृताचरण ॥ असलिया भाव निर्माण ॥ संतासीं वंदन वडे प्रीतीं ॥ ४९ ॥ जैसा जयाचा भाव ॥ तैसाचि तयासीं जोडे देव ॥ पंडितांसीं केवळ अहंभाव ॥ हें भाग्य दैवत यां कैंचें ॥ ५० ॥ परि चमत्कारें समस्त ॥ बाह्यदृष्टि जाले विनीत ॥ नाथासी येउनी भेटत ॥ नमन करीत यथारिती ॥ ५१ ॥ प्रेमभरें सद्गदीत ॥ सन्यासी घेउनी भागवत ॥ येतां देखोनियां नाथ ॥ सामोरा येत वंदनासीं ॥ ५२ ॥ विदेहस्थ निजस्थिती ॥ नाथस्वरूपीं ये काय मती ॥ सामोरा येत देखोनि यती ॥ अर्पि शिष्यांहातीं पुस्तकांसी ॥ ५३ ॥ नधर नस्मरत ॥ स्वयेंचि घाली दंडवत ॥ प्रेम देखोनि अद्भुत ॥ नाथ बोलत हरिहरी ॥ ५४ ॥ पूज्य वरिष्ट तुम्ही नारायण ॥ विपरित न करावें वर्तन ॥ नाथें वंदून यतिचरण ॥ आसनीं आणून बैसविलें ॥ ५५ ॥ यति म्हणें जळो हे लाज ॥ मोठेपणाचें मरो भोज ॥ तुझिया कृपा आमुचे काज ॥ येणेंचि सहज कृतकृत्यता ॥ ५६ ॥ यापरि तो संन्यासी ॥ हर्षयुक्त उत्साहासी ॥ नवल आदर उत्कर्षासी ॥ नेम निश्चयासी तें ऐका ॥ ५७ ॥ जीवित याच्या अति कोडें ॥ हस्तिवरी करूनि आरुढ ॥ नाथासी मिरवावें हें चाड ॥ साहित्य कैवाड आणविलें ॥ ५८ ॥ हस्ति आंबारी सहित ॥ तैसींच

वाद्यें समस्त ॥ नळे हवाया चंद्रजोत ॥ विशेष आणवित समारंभा ॥ ५९ ॥ बुका सुमनाचे हार ॥ नानापरीचे श्रृंगार ॥ पूजाद्रव्य षोडशोपचार ॥ आले अपार पूजेसाठीं ॥ ६० ॥ सर्व करूनि सिद्धता ॥ पंडितांसी म्हणे आतां ॥ श्रीनाथासी प्रार्थून तत्वतां ॥ पूजा उल्हासा पैं कीजे ॥ ६१ ॥ यति संकोचें पंडित ॥ नाथाची प्रार्थना करित ॥ नाथ म्हणे हें अनुचित ॥ तुम्ही समस्त मज पूज्य ॥ ६२ ॥ संन्याशासी आवडी बहुत ॥ परि नाथ म्हणे हें अयुक्त ॥ विचारून केला सिद्धांत ॥ पुस्तक पूजित अति निष्ठा ॥ ६३ ॥ ज्याचेनि प्रसादें हे सिद्धी ॥ कृतकार्य केलें अविरोध बुद्धी ॥ त्यासी पूजि यथा विधी ॥ इतुकेन त्रिशुद्धि कल्याण ॥ ६४ ॥ पूजोनि षोडशोपचारीं ॥ आरती करोनि गजरीं ॥ गजपृष्ठावरी आंबारी ॥ ठेविलें भीतरीं निजगौरवें ॥ ६५ ॥ वाद्यें वाजती नानापरी ॥ संन्यासी सहपरिवारीं ॥ पंडित घेउनी बराबरीं ॥ मिरवत गजरीं चालिले ॥ ६६ ॥ श्रीनाथाचा धरूनि हात ॥ संन्यासी चाले हर्षयुक्त ॥ पुढें वैष्णव रंगीं नाचत ॥ कीर्तन करित चालती ॥ ६७ ॥ हर्षें बुका उधळिती ॥ जयजयकारें भक्त गर्जती ॥ निशाण भेरी नाद उठती ॥ जन पाहती कौतुकासी ॥ ६८ ॥ रात्रीं हवाया चंद्रजोती ॥ पदोपदीं नळे सोडिती ॥ नरनारी सोहळा पाहती ॥ अपूर्व मानिती उत्साह ॥ ॥ ६९ ॥ सप्तरात्र आणि दिवस ॥ यापरि मिरविती पुस्तकास ॥ त्या प्रसंगीं पंडितांस ॥ एकेक दिवस नेमिला ॥ ७० ॥ निवडूनि द्रव्यवान पंडित ॥ संन्यासी त्यासी आज्ञापित ॥ एक दिवस उत्साहकृत्य ॥ भोजनादि समस्त साहित्य जें ॥ ७१ ॥ सहयात्रा मिरवून लोक ॥ भोजन द्यावें आवश्यक ॥ मिरवून साहित्य पूर्वक ॥ करावें देख एक एकानीं ॥ ७२ ॥ ज्या प्रति ज्याचें वर ॥ तेणें होऊन तत्पर ॥ पाकसिद्धि साहित्य प्रकार ॥ सेवेसी सादर पैं व्हावें ॥ ७३ ॥ संन्याशाचिये आज्ञेसीं ॥ ना न ह्मणवे कोणासीं ॥ त्याच रीति प्रतिदिवशीं ॥ सर्व साहित्यासी करिताती ॥ ७४ ॥ समग्र वाराणसीक्षेत्रीं ॥ सात दिवस आणि रात्री ॥ मिरवणुकेसी सर्वत्रीं ॥ कौतुक नेत्रीं पाहिलें ॥ ७५ ॥ प्रपंच परमार्थ अभिन्न ॥ यापरि हें जनलक्षण ॥ प्रगट दाखवून विंदान ॥ केलें पावन जनलोकां ॥ ७६ ॥ आठवे दिवशीं अति प्रीती ॥ सहयात्रा मठासीं येती ॥ चारी दिवस यथा पद्धती ॥ उत्साह करिती गजरानें ॥ ७७ ॥ नाथवाणीच्या कीर्तना ॥ श्रवण करविलें पंडितजनां ॥ संन्याशासी सद्भावना ॥ धन्य ज्ञाना तयाचिया ॥ ७८ ॥ अभिमान जन प्राणी ॥ नाना परीच्या कल्पना मनीं ॥ ह्मणोनि उपायीं प्रवर्त्तोनीं ॥ कीर्तन श्रवणीं बैसविले ॥ ७९ ॥ श्रीनाथवाणी निरोपण ॥ ब्रह्मानुभव बोध निपुण ॥ ऐकोनियां पंडितजन ॥ निवांत श्रवण करिताती ॥ ८० ॥ पूर्ण बोध भक्तियुक्त ॥ श्रवण परिसोन

त्याचें चित्त ॥ समाधींत अति तटस्थ ॥ कल्पना युक्त बैसले ते ॥ ८१ ॥ श्रवणसमाधि सुख ॥ पावोनि मानिती एक ॥ ह्मणती नकळे देवाचें कौतुक ॥ इतुका विवेक कथाश्रवणीं ॥ ८२ ॥ कथा उदंड करिती ॥ परि नाथाची बोधशक्ती ॥ अपूर्व वक्तृत्वाची जाती ॥ ऐके तो निश्चिती होय धन्य ॥ ८३ ॥ सत्संगति सत्श्रवण ॥ काय वर्णू महिमान ॥ महाभिमानी पंडित जन ॥ त्याचें लक्षण पालटलें ॥ ८४ ॥ या पूर्णभावें भगवद्भक्त ॥ संत चरणीं जो अनुरक्त ॥ त्याचे स्थितीचि निजमात ॥ न बोलवे तया वाणी ॥ ८५ ॥ चारी दिवस उत्साव ॥ अहर्निशीं अति अपूर्व ॥ विशेष श्रवणीं सद्भाव ॥ हा नवलाव संन्याशाचा ॥८६॥ उत्साह समाप्ति अंतीं ॥ संन्यासी पुसे पंडिताप्रतीं॥ या श्रीभागवताच्या प्रती ॥ अवलोकनार्थीं कराव्या ॥ ८७ ॥ अभिमान गलित होऊन ॥ पंडित बोलती वचन ॥ भगवंत साह्य आपण ॥ त्यासी दूषण कोण लावी ॥ ८८ ॥ न कळतां अमर्यादा घडली ॥ ते पाहिजे क्षमा केली ॥ ऐकोनी पंडितांची बोली ॥ करुणा आली श्रीनाथा ॥ ८९ ॥ समस्तांसी आलिंगन ॥ परस्परें करिती नमन ॥ पंडितांसी सन्मानून ॥ बोळविती जाण उल्हासें ॥ ९० ॥ यापरि श्रीभागवत ख्याती ॥ चरित्र विस्तारे जगतीं ॥ त्याच्या करवून प्रती ॥ नित्य यति अवलोकित ॥ ९१ ॥ एक अध्याय एकासी ॥ नेमून लेहविलें ग्रंथासी ॥ लेखन अवकाश द्वादशीं ॥ नाथ रुक्मिणी स्वयंवरासी वर्णिती ॥ ९२ ॥ पंचाध्यायीं प्रतिष्ठानीं ॥ टीका वदली होती वाणी ॥ सर्व ग्रंथ काशिस्थानीं ॥ ख्याति करोनि संपविला ॥ ९३ ॥ रुक्मिणी स्वयंवर वर्णन ॥ तेथेंचि जालें संपूर्ण ॥ संन्याशासी विश्रांति पूर्ण ॥ नाथ संघटणें सुखप्राप्ती ॥ ९४ ॥ महा क्षेत्र वाराणसी ॥ चरित्र श्रुत जालें सर्वांसी ॥ जाणोनि पूर्ण ऐश्वर्यासी ॥ वाणिती कीर्ति नाथाची ॥ ९५ ॥ इतुकें दाऊन विंदान ॥ श्रीनाथ निजशांतिनिपुण ॥ अणुमात्र स्वल्प थोरपण ॥ अंगीं आपण स्पर्शों नेदी ॥ ९६ ॥ सुलीन वृत्ति समस्तांसी ॥ पुसोनिया निरोपासी ॥ वंदोनिया संन्याशासी ॥ पुसे प्रतिष्ठानासी जावया ॥ ९७ ॥ विरुद्ध भाव परिहार ॥ पूर्वील नकळत प्रकार ॥ यदर्थीं मधुर उत्तर ॥ बोले आदर संन्यासियासीं ॥ ९८ ॥ समान स्थिति संपन्न ॥ नाथासी कैंचें विषमपण ॥ संन्याशासी समाधान ॥ वदे प्रतिवचन निज स्थिती ॥ ९९ ॥ संन्यासी आनंदयुक्त ॥ गौरवूनि नाथा बोळवित ॥ यापरि चरित्र अद्भुत ॥ जालें निश्चित काशीपुरीं ॥ १०० ॥ ऐश्वर्यैंसी यशविस्तार ॥ प्रगटलें अवतार चरित्र ॥ श्रीनाथ चरणीं किंकर ॥ केशव सादर ठेवी माथां ॥१०१॥

इतिश्रीएकनाथचरित्रेश्रीभागवतटीकापरिपूर्णनाथप्रतिष्ठानगमनंनामचतुर्विंशोध्यायः ॥

---

## अध्याय पंचविसावा.

श्रीगणेशायनमः ॥ नमन श्रीनाथपायां ॥ अति आवडी घडलिया ॥ सर्व संदेह भ्रांति लया ॥ जाऊनि सुखिया पैं केलें ॥ १ ॥ काशीहुनी स्वदेशासीं ॥ क्रमुनी येतसे पंथासीं ॥ दासोपंत भेटी सहजेसीं ॥ ऋणानुबंधेसी योजिली ॥ २ ॥ श्रीनाथाची परमार्थ ख्याती ॥ पूर्वीं विश्वतोमुखीं श्रवण होती ॥ काशीहून आगमन वंदिती ॥ ऐकोनि चित्तीं संतोषला ॥ ३ ॥ तयासी पाहावें हा हेत ॥ नाथासी होता बहुत ॥ ये काळीं अकस्मात् ॥ वाटेंत येतसेऽस्थान ॥ ४ ॥ दत्तात्रय उपासना ॥ तीस वर्षें वेध मनां ॥ कडकडीत वैराग्य लक्षणा ॥ त्यांचिया आचरणां ऐकिलें ॥ ५ ॥ विदेह स्थिति वर्त्तन ॥ खडकावरी करितां शयन ॥ श्रवणपातिं घासून ॥ छिद्रें संपूर्ण पैं जालीं ॥ ६ ॥ देहदुःखाचें भान ॥ नसे ऐसा वेध जाण पूर्ण ॥ तीसा वर्षांतिं दर्शन ॥ श्रीदत्तें आपण कृपा केली ॥ ७ ॥ कार्यसिद्धि जालिया स्थिती ॥ समाधान युक्त वृत्ती ॥ श्रीदत्तात्रयाची भक्ती ॥ आचरे प्रीति अतिनिष्ठां ॥ ८ ॥ परम गुरु श्रीदत्त ॥ तयाचे भजनीं असे निरत ॥ भाग्यसंपत्ति भोगित चित्त ॥ भक्तीसी असक्त निरंतर ॥ ॥ ९ ॥ ऐसें जाणोनि लक्षण ॥ श्रीनाथ सहज स्थिति पूर्ण ॥ तयाचे भेटीसी आपण ॥ लीला आगमन पैं केलें ॥ १० ॥ ऐकोनियां दासोपंत ॥ सामोरा येउनी त्वरित ॥ दर्शन घेउनी निश्चित ॥ आलिंगित अति प्रीतीं ॥ ११ ॥ श्रीनाथ सहज-स्थिती ॥ नमुनी आलिंगन देती ॥ सुखासीं सुख उचंबळले चित्तीं ॥ कुशळ विचारिती परस्परें ॥ १२ ॥ आदरें करुनी घरासीं ॥ आणिलें श्रीएकनाथासी ॥ कितेक दिवस पुरस्करेसी ॥ पाहुणेरासी पैं केलें ॥ १३ ॥ कीर्तन श्रवण सुख विलास ॥ करूनि वाढविला उल्हास ॥ परमार्थाचा निज सौरस ॥ अहर्निशीं अनुभविला ॥ १४ ॥ श्रीनाथ स्थिति परिपूर्ण ॥ देखोनि पावला समाधान ॥ बाह्यदृष्टि सामान्यपण ॥ कल्पित मन दासोपंताचें ॥ १५ ॥ निरोप मागते समई जाण ॥ दासोपंत म्हणे आपण ॥ कांहीं वहनें आणि द्रव्य देउन ॥ कीजे गमन सुखस्थितीं ॥ १६ ॥ जाणोनि कल्पनायुक्त भाव ॥ म्हणे किमर्थ उपरोध गौरव ॥ मार्ग भयाचा अभिप्राव ॥ नव्हे निर्वाह जाणविलें ॥ १७ ॥ कृपा असावी चित्तीं ॥ इतुकी आमुची विनंती ॥ समाधान पडे त्या युक्ती ॥ पुसोनि निश्चिती चालिला ॥ १८ ॥ दासोपंत बोळवित ॥ स्वयें पायीं चालत ॥ ते काळीं सहजांत ॥ श्रीनाथ बोलत हे वाणी ॥ १९ ॥ जन्माष्टमी उत्साहासी ॥ एक वेळ अवश्यतेसी ॥ येऊनिया प्रतिष्ठानासी ॥ सनाथ सर्वांसी करावें ॥ २० ॥ अंगिकारून वचन ॥ परस्परें केलें नमन ॥ श्रीनाथासी बोळवून ॥ गेला आपण स्वाश्रमा ॥ २१ ॥

श्रीनाथ निज स्थिती ॥ गमन करी यथारिती ॥ अनुक्रमें स्वस्थानाप्रती ॥ येत निश्चिती गंगातिरा ॥ २२ ॥ काशीहून आगमन ॥ श्रीनाथ आला ऐकोन ॥ उद्धवें समारंभ करून ॥ जाय आपण सामोरा ॥ २३ ॥ दिंडी पताका भेरी ॥ मृदंग वीणा टाळ झल्लरी ॥ भाविक जन परिवारीं ॥ येत गजरें भेटीसी ॥ २४ ॥ हरिनाम गिरा गजरीं ॥ छंद बंद नानापरी ॥ गात नाचत सुखें करी ॥ सुख अंतरीं नाथाचें ॥ २५ ॥ दुरूनि श्रीनाथदर्शन ॥ होतांचि आनंदलें मन ॥ तेथून साष्टांग नमन ॥ उद्धव आपण करीत आला ॥ २६ ॥ श्रीनाथपायीं मस्तक ॥ अति आवडी घडी एक ॥ ठेवूनि निष्ठापूर्वक ॥ प्रदक्षिणा देख करी तेव्हां ॥ २७ ॥ हृदयीं श्रीनाथाचें प्रेम ॥ मुखीं श्रीनाथाचें नाम ॥ श्रीनाथ सेवा संभ्रम ॥ इंद्रियां विश्राम आलिंगनीं ॥ २८ ॥ श्रीनाथें अति प्रीतीं ॥ आलिंगिलें तया प्रतीं ॥ तेविंच भाविक समस्तीं ॥ साष्टांगीं नमिती श्रीनाथा ॥ २९ ॥ सकळांसीं आलिंगून ॥ गंगाजळ माथां वंदन ॥ स्मरोन सद्गुरु जनार्दन ॥ करीत कीर्त्तन चालती ॥ ३० ॥ नगरनागरिक जन ॥ वेऊं पातलें दर्शन ॥ जो भेटे त्यासी आलिंगन ॥ देत आपण चालती ॥ ३१ ॥ कीर्त्तनाचा निज गजर ॥ वाद्यध्वनि जयजयकार ॥ करित पावलें मंदिर ॥ निजासनीं स्थीर पैं जाला ॥ ३२ ॥ अवर्षणीं वर्षला घन ॥ तैसें श्रीनाथ पुनरागमन ॥ संतोषयुक्त भाविक जन ॥ पाहती दर्शन सावकाश ॥ ३३ ॥ तेथील विजयानंद वार्त्ता ॥ ब्राह्मणकार्यार्थीं मुखें समस्ता ॥ महा हर्ष श्रवणें चित्ता ॥ प्रफुल्लता अति जाली ॥ ३४ ॥ निज स्थिति परिपूर्ण ॥ अक्षोभ्य समुद्र जीवन ॥ चढ वोहट अधिक न्यून ॥ कधींही आपण नव्हे जैसा ॥ ३५ ॥ तैसीच श्रीनाथाची स्थिती ॥ निर्विकार निज शांती ॥ नढळे नचळे कल्पांतीं ॥ सहजवृत्ति समाधान ॥ ३६ ॥ कीर्त्तन आणि पुराण ॥ यथा पद्धति संतर्पण ॥ उद्धवाचेंही वर्त्तमान ॥ परिसोनि मन सुखावलें ॥ ३७ ॥ श्रीनाथ आलियाचें सुख ॥ उद्धवासी हर्ष अधिक ॥ यथापूर्वक होऊनि सेवक ॥ तिष्ठे जवळीक परिचर्या ॥ ३८ ॥ पुराण कीर्त्तन श्रवण ॥ पहिलें जैसें महिमान ॥ तया रीति आरंभऊन ॥ सुखसंपन्न श्रवणादरें ॥ ३९ ॥ यापरि लोटले दोन मास ॥ कृष्णजयंतीचे येतां दिवस ॥ उत्साहकृत्य साहित्यास ॥ करित सौरस सावधानें ॥ ४० ॥ सर्व साहित्य यथास्थित ॥ करोनि नवरात्र आरंभित ॥ कीर्त्तन गजरें सदोदित ॥ आनंदें होत महोत्साव ॥ ४१ ॥ तंव दासोपंत निज नेमेसी ॥ सह वैभव संपत्तीसी ॥ येऊनियां प्रतिष्ठानासी ॥ दर्शनासीं पैं येती ॥ ४२ ॥ श्रीनाथ द्वारापासीं ॥ येऊनियां शीघ्रतेसीं ॥ शिबिकेंतून उतरतां दृष्टीसी ॥ देखिलें श्रीदत्तां ॥ ४३ ॥ हातीं धरूनि त्रिशूळ ॥ उभा द्वारीं द्वारपाळ ॥ दासोपंत येऊनि जवळ ॥ चरणकमळ वंदिले

॥ ४४ ॥ ह्मणे नवल हें अघटित लीला ॥ भाग्यें देखिलासी डोळां ॥ लगबग किमर्थ कृपाळा ॥ हे निजकळा सांगावी ॥ ४५ ॥ श्रीएकनाथाची सेवा ॥ परम-भाग्य असेल दैवा ॥ तरीच घडेल या भावा ॥ सूचवी लाघवा श्रीदत्त ॥ ४६ ॥ द्वारींचें द्वारपाळपण ॥ इतुकाची अधिकार सांभाळून ॥ हे परिचर्या संरक्षून ॥ करा-वया सावधान अहर्निशीं ॥ ४७ ॥ ऐकतांचि श्रीदत्ताची गोष्टी ॥ दासोपंत विराला पोटीं ॥ सद्गदित होऊनि कंठीं ॥ धन्य हे सृष्टि म्हणे नाथ ॥ ४८ ॥ आमुचें पूज्य दैवत ॥ सेवकापरी येथें वर्तत ॥ पूर्णावतार नेणत ॥ मीं सा-मान्य भावित स्वकल्पना ॥ ४९ ॥ दत्तवाणीचा निजबोध ॥ कल्पनेचा छेद-ला कंद ॥ श्रीनाथ ऐश्वर्य अगाध ॥ भाव शुद्ध पैं जाला ॥ ५० ॥ श्रीदत्तासीं वंदन ॥ करून विनवित आपण ॥ श्रीनाथाचें दर्शन ॥ कैसेंनि जाण होईल ॥ ५१ ॥ विदित आगमन नाथासीं ॥ करूनि येतों विनंतीसी ॥ ऐसें सांगोन भक्तांसी ॥ जाउनी त्वरेसीं जाणविलें ॥ ५२ ॥ उद्धवासहित श्रीनाथ ॥ सर्वेंचि सामोरा येत ॥ देखत दृष्टि दासोपंत ॥ पडे दंडवत सप्रेमें ॥ ५३ ॥ नाथें येऊनि त्वरित ॥ आदरें उठविला दासोपंत ॥ परस्परें प्रणिपात ॥ आणि आलिंगित निज प्रीती ॥ ५४ ॥ करूनियां साष्टांगनमन ॥ उद्धवही भेटे आपण ॥ नाथें हातीं धरून ॥ वाडियांत आणून बैसविलें ॥ ५५ ॥ परिवार जन समस्त ॥ सह शिबिका घोडे उतरवित ॥ उद्धव परामर्षी यथोचित ॥ सावधानें अर्पित साहित्या ॥ ५६ ॥ नित्य परमार्थीं विलास ॥ कीर्त्तन श्रवणें संतोष ॥ क्रमूनि नवरात्रास ॥ उत्साहास अवलोकिलें ॥ ५७ ॥ गोपाळकाला ललित ॥ नाथवाणि रस अद्भुत ॥ परिसुनी दासोपंत ॥ आनंदें डुल्लत सप्रेमें ॥ ५८ ॥ म्हणे धन्य ऐश्वर्य अद्भुत ॥ श्रीनाथ पूर्णावतार समर्थ ॥ कल्पना सामान्य होता करित ॥ न मानोनी अर्थ अल्पमती ॥ ५९ ॥ ते समूळ भ्रांति आतां ॥ जाऊनि सुखी जालों दत्ता ॥ सत्पुरुषाचा पार तत्वता ॥ भाग्य लक्षितां अनुपम्य ॥ ६० ॥ समाप्ति महोत्सव पाहून ॥ आनंदलें दिगंबराचें मन ॥ त्या नंतर निरोप घेऊन ॥ जाय आपण स्वस्थाना ॥ ६१ ॥ निर्विकल्प निराभिमान स्थिती ॥ परिपूर्ण ऐश्वर्य संपत्ती ॥ श्रीएकनाथ परब्रह्म मूर्त्ती ॥ भाव निश्चिती केशवाचा ॥ ६२ ॥ पुढील कथेची संगती ॥ निर्विकार निज शांती ॥ दीनदयाळ कृपास्थिती ॥ परिसीजे संतीं निरोपण ॥ ६३ ॥ इतिश्रीएकनाथचरित्रेजन्माष्टमीउत्साहोनामपंचविंशतिमोध्यायः ॥ श्रीरामकृष्णहरे ॥ श्रीरामायनमः ॥

---

# अध्याय सविसावा.

श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ नामें सच्चिदानंद रूपा ॥ स्वप्रकाश शुद्ध-स्वरूपा ॥ मायागुण प्रकाश दीपा ॥ परम प्रतापा गुरुवर्या ॥ १ ॥ तुझिया नामाची आवडी ॥ संसार केला देशोधडी ॥ त्या तुझी स्वरूप गोडी ॥ पुरवी कोडी मनोरथा ॥ २ ॥ ऐसा तूं समर्थ अति कृपाळ ॥ भक्त भाविकांसी अति दयाळ ॥ अतर्क तर्केंना तुझा खेळ ॥ केला सुकाळ परमार्थाचा ॥ ३ ॥ सहज स्थिति लीला विचित्र ॥ पुण्य पावन परम पवित्र ॥ आचरलासी जें जें चरित्र ॥ परमार्थपर निज दीक्षा ॥ ४ ॥ भावें अथवा द्वेषें करी ॥ केवीं नेणतां संगति धरी ॥ उद्धवा सहज वर्त्तें जरी ॥ उद्धरी निर्धारीं निजकृपा ॥ ५ ॥ दत्तात्रय भक्त दासोपंत ॥ ऐश्वर्य देखोन अद्भुत ॥ जिवीं जाला कल्पनातीत ॥ गेला आठवित महिमान ॥ ६ ॥ भावें उद्धरिलें भाविकजन ॥ द्वेषें पाहती विप्र महिमान ॥ नेणतां सन्यासी पंडित जन ॥ केलें पावन काशीपुरीं ॥ ७ ॥ ऐश्वर्यमहिमा वर्णूं किती ॥ श्रीकृष्ण परब्रह्म मूर्त्ती ॥ नीच सेवकाची रिती ॥ तिष्ठे सेवे-प्रति अहर्निशीं ॥ ८ ॥ श्रीदत्त परम गुरू ॥ वंद्य वसिष्ठ केवळ ईश्वरू ॥ द्वारपाळत्व अंगिकारू ॥ करूनि सादरूं परिचर्या ॥ ९ ॥ ये अवतारींच महिमान ॥ लक्षितां अनुपम्य जाण ॥ पांडवांमध्यें अर्जुन ॥ एक्या गुणें गौण मज वाटे ॥ १० ॥ परस्परें नरनारायण ॥ दुष्ट निर्दळणीं अवतरून ॥ दाविलेंसें विंदान ॥ आश्चर्य कोण विशेषता ॥ ११ ॥ निष्काम नैराश्य स्थिती ॥ कांहीं इच्छा नसतां चित्तीं ॥ क्षमा शिळणी शांती ॥ वरी निजभक्ति आचरण ॥ १२ ॥ इहीं लक्षणीं स्वभावतां ॥ वर्तत असतां श्रीनाथा ॥ जळ कावडीनें वाहता ॥ लाज चित्ता नये देवा ॥ १३ ॥ उच्छिष्ट पात्रें ब्राह्मणांचीं ॥ काढितां नव्हे संकोची ॥ नेणों कैसी भीड नाथाची ॥ हें वर्म त्यासींच ठाउकें ॥ १४ ॥ ऐसा पूर्ण ऐश्वर्य संपन्न ॥ करूं जातां गंगा-स्नान ॥ ग्रामद्वारीं येतां जाण ॥ जालें वर्त्तमान तें ऐका ॥ १५ ॥ कोणी प्राणि उन्मत्त ॥ तमाखु भक्षूनि सहजांत ॥ भूमीवरी पिक टाकित ॥ तंव अकस्मात् जात श्रीनाथ ॥ १६ ॥ तों थुंकतां पिक निकरी ॥ पडिला नाथाचें आंगावरी ॥ तयाची शंका तिळभरी ॥ नाथा अंतरीं पैं नये ॥ १७ ॥ आम्हीं वंद्य वरिष्ठ ब्राह्मण ॥ तो नीच याति वर्णहीन ॥ आंगावरी थुंकल्याहि अभिमान ॥ अणुप्रमाण नयेची ॥ १८ ॥ येथवरी निराभिमान ॥ श्रीनाथ स्थितीचें लक्षण ॥ जाऊन केलें गंगा-स्नान ॥ जैसें आचरण नित्याचें ॥ १९ ॥ जिवीं तयाची आली करुणा ॥ त्यासी शुद्ध कीजे या भावना ॥ जाऊनि त्याचिये सदना ॥ करिती नमना अत्यादरें ॥ २० ॥ ब्राह्मणें केलें नमन ॥ म्हणोनि घाबरलें तयाचें मन ॥ तंव

श्रीनाथ बोलती वचन ॥ अपराध संपूर्ण क्षमावा ॥ २१ ॥ स्वभावें तुम्ही स्वस्थानी ॥ थुंकत असतां अनुदिनी ॥ आलों त्या मार्गें करुनी ॥ पिक म्हणोनी आंगीं पडे ॥ २२ ॥ विचारोनि करितों गमन ॥ तरी तुम्हासी नलगे तें दूषण ॥ पाहतां विवेकें करून ॥ हा अन्याय संपूर्ण पैं माझा ॥ २३ ॥ तुम्हासी करावया विनंती ॥ आलों असें अति प्रीती ॥ ऐकोनि श्रीनाथ वंदती ॥ चांडाळ चित्तीं पैं द्रवला ॥ २४ ॥ नेत्रीं आले अश्रुपात ॥ स्फुंदस्फुंदें आक्रंदत ॥ म्हणे मीं अनाथ पतित ॥ थोर दुरित आचरलों ॥ २५ ॥ तूं साक्षात् पूज्यमूर्त्ती ॥ त्या मीं अति उद्धत वृत्ति ॥ नेणतां थुकलों निश्चितीं ॥ पापें निर्गती होय कैसी ॥ २६ ॥ म्हणोनि घातलें लोटांगण ॥ सद्भाव जाला निर्माण ॥ क्षणक्षणां वंदी चरण ॥ जाला सुलीन सर्वांपरीं ॥ २७ ॥ तयाचें शुद्ध जालें मन ॥ दीनदयाळ नाथ आपण ॥ त्यासीं कवळुनी दे आलिंगन ॥ करी शांतवन अनुतापां ॥ २८ ॥ खेद सांडूनियां आतां ॥ करावें स्वस्थ निज चित्तां ॥ तुझिया पापाची बाधकता ॥ नाहीं तत्त्वता जाणावें ॥ २९ ॥ चित्तीं येतांचि अनुताप ॥ सर्व भस्म जालें पाप ॥ हृदयीं उजळला भावार्थ दीप ॥ तेणेंचि सरूप देव जाला ॥ ३० ॥ श्रीनाथें आलिंगितां त्यासीं ॥ विसरला सर्व शोकासीं ॥ अत्यंत उल्हासला मानसीं ॥ होतांचि चरणासीं लागला ॥ ३१ ॥ करुणावचनें स्तुती ॥ स्तवितां जाला नाथ कीर्त्ती ॥ ह्मणे धन्य धन्य ब्रह्ममूर्त्ती ॥ अभिनव शांति पैं तुझी ॥ ३२ ॥ मजसारिख्या दुष्टासीं ॥ तारिलें कृपा सौरसीं ॥ काय वाणूं थोरपणासीं ॥ महिमा ऐसी नदेखों हे ॥ ३३ ॥ कृपा करोनि श्रीनाथा ॥ हात ठेवीं माझिया माथां ॥ वाढवा माझिया भावार्था ॥ या मनोरथा पुरवावें ॥ ३४ ॥ शुद्ध देखोनि भावार्थ ॥ मस्तकीं हात ठेवी श्रीनाथ ॥ इतुका साधोनि कार्यार्थ ॥ आला समर्थ स्वाश्रमा ॥ ३५ ॥ अघटित बोधकसवटी ॥ देखिली हे हातवटी ॥ ऐसा सत्पुरुष सृष्टीं ॥ अन्य दृष्टि कोण दुजा ॥ ३६ ॥ शरणांगतासीं बोधूं ॥ करिताती ऐकिले साधु ॥ अपराधियासीं उद्बोधूं ॥ बुद्धि विरुद्ध नसे कोठें ॥ ३७ ॥ विवेक दृष्टि विचारितां ॥ या अवताराची परिपूर्णता ॥ सर्वांपरी वरिष्ठता ॥ मानिली चित्ता मानतसे ॥ ३८ ॥ कोणें एके दिवसी ॥ नाथ गेले गंगेसीं ॥ स्नानसंध्या करून गृहासी ॥ चालिले स्वच्छंदेसीं सहजावस्था ॥ ३९ ॥ मार्गीं येतां अकस्मात ॥ अनामिक स्त्री गंगेसीं जात ॥ पाणी आणावया त्वरित ॥ गेली धांवत तांतडी ॥ ४० ॥ मागें लेंकरूं आलें रडत ॥ तिसीं नसे हें कृप्त ॥ येऊन पडिलें वाळूंत ॥ अति संतप्त उष्ण कीर्णें ॥ ४१ ॥ पाय पोळतां तळमळी ॥ नाथें देखिलें त्या वेळीं ॥ धांवत येऊन जवळीं ॥ हस्तकमळीं उचलिलें ॥ ४२ ॥ खांद्यावरीं बैसवून ॥ त्यासीं पुसती आलासि कोठून ॥ हातें घर दावी दुरून ॥ चाले लक्षून त्या खुणें ॥ ४३ ॥ गृह

देखतां सत्वर ॥ बाळक ह्मणे माझें घर ॥ नाथ उतरी धरूनि कर ॥ अनामिकाचें पोर जाणवलें ॥ ४४ ॥ जाऊनियां गंगेसी ॥ स्नान केलें सहवस्त्रेसीं ॥ तेथून आले स्वाश्रमासीं ॥ नित्य नेमासी प्रवर्तले ॥४५॥ हें कोणासी नव्हे कुप्त ॥ त्यावरी कित्येक दिवस होत ॥ भगवंताचें मनोगत ॥ नाथचरित्र प्रगट व्हावें ॥ ४६ ॥ कोणी एक ब्राह्मण ॥ शरीरीं कुष्ट ह्मणोन ॥ करावया अनुष्ठान ॥ आला आपण त्रिंबकासी ॥ ४७ ॥ दुरीं व्हावा रोग ॥ ह्मणोनि केला गृहत्याग ॥ तपश्चर्या यथा सांग ॥ आचरे अनुराग युक्त ते ॥ ४८ ॥ त्र्यंबकेश्वराचे मनीं ॥ चिंतन करी अनुदिनीं ॥ वाचे नाम प्रदक्षिणा चरणीं ॥ उपोषित राहुनी करी सेवा ॥ ४९ ॥ आहार फळमूळ सेवन ॥ नित्य हें जठर तर्पण ॥ केव्हां पावेल नंदिवाहन ॥ रोगनिर्सन हो ह्मणे ॥ ५० ॥ एक तप तपसायास ॥ करितां शरीर जालें कृश ॥ प्रसन्न होऊन भवानिशी ॥ दावी स्वप्नास निशीमाजीं ॥ ५१ ॥ श्रीएकनाथ प्रतिष्ठानीं ॥ वसतसे समर्थ ज्ञानी ॥ तुवां तेथें जाउनी ॥ चरण नमुनी वंदावें ॥ ५२ ॥ अनामिक पोर खांद्यावरी ॥ घेतलें पोळतां वाळुभीतरीं ॥ तें पुण्य येतां तंव करीं ॥ कुष्ट दुरी होईल ॥ ५३ ॥ ऐसा पावतां चमत्कार ॥ हर्षें जाला निर्भर ॥ वंदोनिया त्र्यंबकेश्वर ॥ चालिला सत्वर प्रतिष्ठाना ॥ ५४ ॥ कित्येक दिवस मार्ग क्रमुनी ॥ आला श्रीनाथ भुवनीं ॥ पावन होऊनि दर्शनीं ॥ मस्तक चरणीं ठेविला ॥ ५५ ॥ बहुत देखोनि आर्तभूत ॥ आलिंगूनि अश्वासित ॥ येरें साकल्य वृत्तांत ॥ निवेदिला समस्त नाथासी ॥ ५६ ॥ अनामिक पोर संरक्षण ॥ तें पुण्य द्याल कृपा करून ॥ माझा कुष्टरोग हरण॥ अवश्य करून होईल ॥ ५७ ॥ नाथ ह्मणें मज आठव ॥ नाहीं केव्हां पुण्योद्भव ॥ जाला सर्वही त्र्यंबकदेव ॥ जाणें भाव अंतरींचा ॥ ५८ ॥ तथापि तूं जनार्दनरूप ॥ हाचि माझा कृतसंकल्प ॥ मज नलगे पुण्यपाप ॥ हा सर्वकल्प माइक ॥ ५९ ॥ पुण्य इच्छा तुझिया मना ॥ आणि श्रीत्र्यंबकेश्वराची आज्ञा ॥ आजन्म कृतपुण्य नाना ॥ तुजलागीं सूज्ञा देतसे ॥ ६० ॥ येरु ह्मणे पुण्य तुमचें ॥ मज ध्यावया सामर्थ्य कैंचें ॥ पुण्य द्यावें अनामिक पोराचें ॥ तेणें आमची कार्यसिद्धी ॥ ६१ ॥ नाथ ह्मणे या पुण्याचा ॥ साक्ष त्र्यंबकेश्वर साचा ॥ संकल्प सोडिला तयाचा ॥ येरु दैवाचा अंजळी पसरी ॥ ६२ ॥ नाथ कृतसंकल्प जळ ॥ आंगासी लावितां तात्काळ ॥ कुष्टरोग गेला समूळ ॥ लोक सकळ पाहती ॥ ६३ ॥ तपस्वी संतोषला मनीं ॥ नाथा नमी लोटांगणीं ॥ ह्मणे अघटित हे करणी ॥ कोण वर्णीं प्रतापां ॥ ६४ ॥ तपस्वी गेला आज्ञा घेउन ॥ जयजयकारें गर्जती जन ॥ नाथचरित्र अगाधपूर्ण ॥ दीनोद्धारण कलियुगीं ॥ ६५ ॥ आवडी बैसतां दृढचरणीं ॥ पुरली परमार्थ शिराणी ॥ सीण नलगे इतर साधनीं ॥ प्रतित मनीं सत्य जाली ॥ ६६ ॥ श्रीएक-

नाथ नामस्मरण ॥ हेंचि माझें अनुष्ठान ॥ कर्माधर्मांची उजवण ॥ केशव शरण चरणींचा ॥ ६७ ॥ इतिश्रीएकनाथचरित्रे ब्राह्मणकुष्टनिरसनं नाम षड्विंशतीमोध्यायः ॥ श्रीकृष्णपरमात्मनेनमः ॥ राम ॥

---

## अध्याय सत्ताविसावा.

श्रीरामसमर्थ ॥ ॐ नमोश्रीसद्गुरू॥ तुझिये कृपेचा लाहुनी वरू ॥ तरलों हा भवसागरू ॥ नौका निर्धारु नाम तुझें ॥ १ ॥ अघटित तुझा बोध महिमा ॥ विवेकसंपन्न केलें अधमा ॥ तुझिया कारुण्याचि सीमा ॥ नाहीं उपमा योजावया ॥ २ ॥ निज स्थिति सांगतां पुराण ॥ श्रीगंगा येत करूं श्रवण ॥ दिव्यालंकार भूषण ॥ सह अलंकारून दिव्यदेही ॥ ३ ॥ नित्य पुराणकाळीं येऊन ॥ एके कोनीं बैसे आपण ॥ संपूर्ण ऐकावें श्रवण ॥ एकाग्र मन निज स्थिती ॥ ४ ॥ श्रीनाथ दृष्टि समोर ॥ नव यौवना सकुमार ॥ येऊनि बैसे निरंतर ॥ अत्यादर श्रवणार्थी ॥ ५ ॥ लावण्य सुंदर स्त्रीरूप ॥ कित्येक जनाला विकल्प ॥ देहबुद्धि मति अल्प ॥ विपरीत कल्प जल्पती ॥ ६ ॥ कोण कोठिल हे सुंदर ॥ इच्या शोधाचा विचार ॥ परस्परें नारीनर ॥ पैशुन्य कारण पाहूं इच्छीती ॥ ७ ॥ कित्येक दिवस तिचिया श्रवणा ॥ लोटल्यावरी हे भावना ॥ लोकांसीं जाली कल्पना ॥ कुतर्क नाना करिताती ॥ ८ ॥ परमार्थी स्त्री संगती ॥ याचि लागीं निंदिली संतीं ॥ पूर्ण प्राप्ति निजबोधस्थिती ॥ तेथें उठती विकल्प नाना ॥ ९ ॥ इतरांचा परमार्थ किती ॥ कोण मानी तयाचि स्थिती ॥ यालागीं स्त्रियांची संगती ॥ बाधक निश्चिती साधकां ॥ १० ॥ स्त्री आणि दुसरें धन ॥ दोन्ही पतनें हें दारुण॥ परमार्थिया घातक पूर्ण॥ संगति जाण पैं यांचि ॥ ११ ॥ ज्यासीं कनक कांता त्याग॥ मनींहूनि घडला होय चांग ॥ त्य.चाचि परमार्थ सांग ॥ असे अव्यंग यालागीं॥ १२ ॥ स्त्रीपुरुष भावना अभेद ॥ श्रीनाथ दृष्टि पूर्णबोध ॥ श्रीगंगेचा भावशुद्ध ॥ श्रवणीं अविरुद्ध सादर ॥१३ ॥ जनासी विकल्प गहन ॥ संशयीं पडलें मन ॥ एके दिवसीं जाल्या श्रवण ॥ जालें विंदान तें ऐका ॥ १४ ॥ पुराण संपल्या यथारीती ॥ नाथासीं वंदूनि समस्त जाती ॥ दोन चार अल्प मती ॥ शोधार्थ राहती गंगेच्या ॥ १५॥ कोणतें घर हें कोठुनी ॥ येथें येतसे अनुदिनीं ॥ आजि या शोधा लागुनी ॥ पाहूं ठिकाणीं कोणाचि हे ॥ १६ ॥ तंव गंगा यथावृत्तीं ॥ नाथासी वंदुनी प्रीती ॥ जात असतां निजगती ॥ विकल्पिही जाती मागें तिच्या ॥ १७ ॥ तंव ते जाऊनि गंगेंत॥ निजरूपीं जाली गुप्त ॥ ऐसें देखोनि ते समस्त ॥ नवल करीत आश्चर्य ॥ १८ ॥ जिवीं लागली तळमळ॥ ह्मणती अभागी

आह्मीं सकळ ॥ अल्प मती उतावेळ ॥ विकल्पें केवळ नाडिलों ॥ १९ ॥ श्रीनाथ समर्थ स्थिती ॥ श्रीगंगा हे सुनिश्चिती ॥ श्रवणासी येतां यथा प्रीती ॥ आह्मासी भ्रांति हे व्यर्थ ॥ २० ॥ विकल्पाभिमान निरसन ॥ होऊनि जाले ते उद्विग्न ॥ तेथूनि स्वाश्रमा जाउन ॥ अनुतापें आठवुनी तरफडती ॥ २१ ॥ मनीं आणिती कल्पना ॥ उदइक जाऊनि पुराणां ॥ तेही आलिया श्रवणां ॥ शरण चरणां पैं जावें ॥ २२ ॥ दुसरे दिवसीं पुराणासी ॥ गंगा नयेचि श्रवणासी ॥ नाथासी कळलें मानसीं ॥ तेंचि अनायासें निघे वाणी ॥ २३ ॥ आजि आमुचा श्रोता श्रवणा ॥ नयावयाच्या कारणा ॥ बहुधा कांहीं विकल्प कोणा ॥ उपेक्षा जाणा ह्मणोनि केली ॥ २४ ॥ इतुकें ऐकतां वचन ॥ विकल्प कर्ते समस्त जन ॥ मनीं अनुताप पावून ॥ वंदिती चरण नाथाचे ॥ २५ ॥ आह्मासीं नकळतां महिमान ॥ तिच्या शोधास्तव गेलों आपण ॥ तंव ते गंगेंत गुप्त होऊन ॥ जाली आपण गंगारूप ॥ २६ ॥ आह्मी अज्ञान मूढमती ॥ तूं साक्षात् ईश्वर मूर्त्ती ॥ दुष्ट बुद्धी दुरात्मे निश्चिती ॥ आजि आह्माप्रति निश्चय हा ॥ २७ ॥ नकळतां वर्त्तलों दुष्ट कर्मी ॥ हा अपराध कीजे क्षमा ॥ तुझ्या निजस्थितीची सीमा ॥ नकळे आह्मां पामरां ॥ २८ ॥ शुद्धभावें युक्त करुणा ॥ परिसोनियां त्यांचिया वचना ॥ श्रीनाथ देत समाधाना ॥ ह्मणे होणार जाणार तेंचि होतें ॥ २९ ॥ धन्य तुमचे लोचन ॥ प्रगट चरित्र अवलोकन ॥ पाहिलें नवल महिमान ॥ म्हणोनि पावन सकळ तुम्ही ॥ ३० ॥ खेद आवरूनि सकळ ॥ व्हावें आतां सुनिश्चळ ॥ हरिभजनीं भजन शीळ ॥ असावें केवळ निजनिष्ठ ॥ ३१ ॥ कांहीं न करितां चिंता ॥ स्वस्थ करावें निजचित्ता ॥ सांडोनि विकल्पाची वार्ता ॥ हरि स्मरतां सुखी व्हावें ॥ ३२ ॥ यापरि शांतवुनी त्याचें मन ॥ श्रीनाथा निजस्थिति समाधान ॥ श्रीभागवत कथा पुराण ॥ आरंभी आपण नित्यापरीं ॥ ३३ ॥ श्रीनाथाचिया शेजारीं ॥ एक गृहस्थ सहपरिवारीं ॥ राहात असतां जन्मवरी ॥ कधींही वाड्याभीतरीं नयेची ॥ ३४ ॥ पुराण श्रवण कीर्त्तन ॥ ऐकोनि जन होय पावन ॥ परि तो शेजारी आपण ॥ कांहीं ढुंकोन पाहिना ॥ ३५ ॥ प्रपंच असक्तता दृढ ॥ म्हणोन अंतर जैसें दगड ॥ पुराण कीर्त्तन गोड ॥ नलगे जड वृत्तीसी ॥ ३६ ॥ ऐसा तो तमोवृत्ति मंद ॥ विषयी निमग्न विषयांध ॥ सन्मार्गीं जैसा मैंद ॥ आचरण शुद्ध पैं नाहीं ॥ ३७ ॥ तयाची देखोन स्थिती ॥ नाथाशीं करुणा आली चित्तीं ॥ शेजारीं असोनि अधोगती ॥ जाय हें अति अनुचित ॥ ३८ ॥ एके दिवशीं तो गृहस्थ ॥ जातां देखोनि अकस्मात ॥ अति आदरें पाचारित ॥ स्वमुखें श्रीनाथ मधुरोक्ती ॥ ३९ ॥ त्यासी बैसवुनी जवळ ॥ वर्त्तमान पुसती कुशळ ॥ कोण वृत्ति क्रमितां काळ ॥ हें सकळ विचारिलें ॥ ४० ॥ तो म्हणे उदीम वृत्ती ॥

सेवा करोन फिरतों क्षितीं ॥ धन्याची चाकरी अहोरात्रीं ॥ करितों प्रीति उदरार्थ ॥ ४१ ॥ त्यानें नेमिलें जें वेतन ॥ तेणें जीविका वर्त्तन ॥ ऐशापरी काळ क्रमून ॥ अवघें आपणा निवेदिलें ॥ ४२ ॥ आचरण काय कैसें शीळ ॥ शोधितां कळलें हें सकळ ॥ स्नान मात्र एक वेळ ॥ करीत केवळ भोजनार्थ ॥ ४३ ॥ संध्या आणि मंत्रजप ॥ कधींही नकरी निर्विकल्प ॥ दोन वेळे भोजनीं संकल्प ॥ इतुकेनी सुखरूप तो सदां ॥ ४४ ॥ त्यांचा शोधोनि अधिकार ॥ तदनुरूप उपदेश सार ॥ युक्तीनें बोलतसे उत्तर ॥ अति चतुर परमार्थी ॥ ४५ ॥ ह्मणे दोन घटिका अवकाश ॥ करूनि गौरविजे आम्हांस ॥ इतुक्या कृपेचा कृपा लेश ॥ कीजे अवश्य प्रतिदिनीं ॥ ४६ ॥ एक पळ रिकामपण ॥ अवकाश नसे मजलागून ॥ तेथें दोन घटिका कोठून ॥ येथें येउनी बैसावया ॥ ४७ ॥ प्रपंच पक्षी एकमुख ॥ परमार्थीं केवळ विमुख ॥ त्याचिया अधिकाराचा विवेक ॥ करून कौतुक बोलती ॥ ४८ ॥ येथुन यजमान गृहासी ॥ जात असतां प्रति दिवशीं ॥ मार्गी तो कार्य तुह्मासी ॥ नसतां अवकाशासी ते घडी ॥ ४९ ॥ तितुका क्षण आह्मासी दान ॥ अवश्य दीजे कृपा करून ॥ तुह्मांपासून धनमान ॥ नं इच्छित मन सत्य जाणा ॥ ॥ ५० ॥ श्रीनाथकृपेचें फळ ॥ तेच्चिकाळीं मन निर्मळ ॥ तेणेचि अंतरीं सोज्वळ ॥ जाला विव्हळ विवेक तया ॥ ५१ ॥ ह्मणे मम उद्धारकरुणा ॥ या समर्थाचिया आली मना ॥ अनुसरोनि श्रीनाथ चरणा ॥ ह्मणें कराल आज्ञा ते मान्य ॥ ५२ ॥ श्रीनाथ कृपाळू आपण ॥ पाहूनि अधिकार लक्षण ॥ विष्णुसहस्त्र नामांतून ॥ एक श्लोक लिहून उपदेशिती ॥ ५३ ॥ इतुका पाठ कीजे मार्गीं ॥ जातां येतां नित्य वेगीं ॥ मुखोद्गति आह्मांलागीं ॥ ऐकविजे त्यालागीं नेमिलें ॥ ५४ ॥ या रीति तो गृहस्थ ॥ बोधोनियां कृपा करीत ॥ नित्य पाठ मुखोद्गत ॥ एक श्लोक करीत नेमीं ॥ ५५ ॥ संपूर्ण सहस्त्र नामासी ॥ पाठ करविलें तयासी ॥ कांहीं पालट मानसीं ॥ आवडी जिवासी वाटली ॥ ५६ ॥ त्याच्चिया मुखें घडघडाट ॥ श्रीनाथें करविला पाठ ॥ उच्चार वाणीचा स्पष्ट ॥ ऐकून संतुष्ट स्वयें जाला ॥ ५७ ॥ भला भला अनुमोदून ॥ वाढविला तयाचा मान ॥ देखोनियां समाधान ॥ नेमिलें पठण नित्य वृत्ति ॥ ५८ ॥ मार्गीं याचें आवर्त्तन ॥ आतां करितां असे दूषण ॥ यास्तव हें नेमवचन ॥ ऐकिजे आपण ह्मणे नाथ ॥ ५९ ॥ जेव्हां येतसा घरासी ॥ काढून पादरक्षेसी ॥ स्नान करूनि वस्त्रासी ॥ परिधान करावयासी अवकाश ॥ ६० ॥ ते समईं पाठ संपूर्ण ॥ करूनि कीजे भोजन ॥ गृहस्थें मानिलें संतोषेन ॥ केलें वंदन नाथासी ॥ ६१ ॥ तैं पासून तो गृहस्थ ॥ नित्य येऊन वाडियांत ॥ वंदुनिया श्रीनाथ ॥ पुढें जात स्वकार्यासी ॥ ॥ ६२ ॥ माध्यान्हीं यावें घरासी ॥ ठेवून पादरक्षासी ॥ करूनियां आचमनासी ॥

आरंभी पाठासी सहस्रनामा ॥ ६३ ॥ स्नान आणि नेसतां धोत्रें ॥ मुखीं तोचि पाठ पवित्र ॥ संध्या आणि गायत्रीमंत्र ॥ हेंचि स्तोत्रपाठ त्यासी ॥ ६४ ॥ यापरी किंतेक काळ ॥ हाचि पाठ त्याचा सरळ ॥ पातलीया मरणवेळ ॥ जालें नवल तें ऐका ॥ ॥ ६५ ॥ व्यथा नवज्वर त्यासी ॥ प्राप्त जाली दैववसी ॥ देहभावना नाहीं त्यासी ॥ नित्यनेमासी भुलला तो ॥ ६६ ॥ अवस्था देखोनि कठिण ॥ प्रायश्चित्त देती ब्राह्मण ॥ मोरीवरी घालितां स्नान ॥ त्यासी स्फुरण चालिलें ॥ ६७ ॥ पूर्वसंस्कार आवृत्ती ॥ तोचि पाठ त्याचि रीती ॥ घडघडाटें करूनि समाप्ती ॥ मरण निश्चिती पावला ॥ ६८ ॥ यमदूतां पराभवून ॥ विष्णुदूतीं त्याचा प्राण ॥ लिंगदेह अंगुष्ट-प्रमाण ॥ नेला काढून निजसत्ता ॥ ६९ ॥ अंतीमति सायुज्य गती ॥ ऐसीजे हे व-दंती ॥ खरी करून लोकांप्रती ॥ दाविली निश्चिती बोलोनी ॥ ७० ॥ श्रीनाथकृपा प्रसाद युक्ती ॥ पतित परी पावन अंतीं ॥ होऊनि विष्णुलोकाप्रती ॥ गेला निश्चितीं नामोच्चारें ॥ ७१ ॥ पूर्वाचरण पाप संचिती ॥ सहस्रनामोच्चारें भस्म होती ॥ श्रीनाथकृपें पतिताप्रती ॥ नेलें निश्चिती विष्णुलोका ॥ ७२ ॥ श्रीनाथ कृपा-दृष्टी ॥ जयावरीं होय अल्पवृष्टी ॥ तयाचें येणें वैकुंठी ॥ नामासाठीं पैं जालें ॥ ७३ ॥ या स्वरूप सायोज्यता अनुभव ॥ या भोगें जो कां सदैव ॥ श्रीभागवतवाणी सद्भाव ॥ त्याचें वैभव कोण वर्णी ॥ ७४ ॥ नाम आठवितां एकनाथ ॥ नामीं प्रगट होय समर्थ ॥ केशवाचा निजभावार्थ ॥ हाचि मनोरथ पुरवीतसे ॥ ७५ ॥ इतिश्रीएकनाथचरित्रेपतितउद्धारोनामसप्तविंशतिमोऽध्यायः ॥

---

## अध्याय अठ्ठाविसावा.

श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ ॐनमो श्रीएकनाथा ॥ भावार्थें पायीं ठेवितों माथा ॥ भजनीं प्रगट होसी समर्था ॥ तोषोनि भक्तिपंथा लाविसी स्वयें ॥ १ ॥ उदार आणि रसाळपण ॥ तुजचि शोभे निजभूषण ॥ होऊनि भक्ताधीन ॥ निजस्वरूप जाण त्यांदे सी ॥ २ ॥ तुझी अगाध ऐश्वर्यथोरी ॥ अतिशय जो दुराचारी ॥ त्यासी वंदुनी शिरीं ॥ नेला आज्ञे करीं विष्णुलोका ॥ ३ ॥ तुझिया बोधाचें महिमान ॥ कोणासी तर्केना लक्षण ॥ नवल तुझें प्रसन्नपण ॥ निरसे अभिमान समूळेंसी ॥ ४ ॥ जडजीवांचा उद्धार ॥ करावया हा अवतार ॥ स्वलीळा धरूनि शरीर ॥ तारिले अपार दीनजन ॥ ५ ॥ तुझिया अवताराची कीर्त्ती ॥ ऐश्वर्येसी निजशांती ॥ ज्ञान-वैराग्येसी भक्ती ॥ आचरोनि स्थिति दाविली अंगें ॥ ६ ॥ अवतारचरित्र दीनो-द्धार ॥ विशेष धर्मस्थापन प्रकार ॥ नानापाषांडें मतांतर ॥ मोडिलीं अपार हरिभजनें

॥ ७ ॥ स्वलीळा अवतारसमाप्ती ॥ करावया भाव आला चित्तीं ॥ स्वकुळीं प्रतिपाद्य ज्ञानभक्ती ॥ स्थापावया निश्चिती निजबोधें ॥ ८ ॥ ऐसा पोटींचा भाव ॥ तेचिया योजनेचें लाघव ॥ निजधामा स्वयमेव ॥ जावों इच्छी ॥ ९ ॥ तें लीलाचरित्र अद्भुत ॥ परिसावें श्रोतीं एकचित्त ॥ वंशोत्पत्ति-आचरित ॥ हाही वृत्तांत श्रुत असे ॥ १० ॥ श्रीनाथकृपेसी सत्पात्र ॥ गिरिजाबाई सुक्षेत्र ॥ प्रसवली ते एक पुत्र ॥ कन्या विचित्र पैं दोघी ॥ ११ ॥ पुत्राभिधान ठेविलें हरी ॥ गोदूबाई जेष्ठ कुमारी ॥ चित्तोत्पत्ति प्रतिष्ठानपुरीं ॥ त्याचे घरीं ते अर्पिली ॥ १२ ॥ कनिष्ठ गंगाबाई ॥ कर्नाटकाप्रती दिधली विवाही ॥ पुंड निजपुत्रप्राप्ति पाही ॥ हरिभक्ति तेही विशेष करी ॥ १३ ॥ असो तयांचें वर्णन ॥ प्रस्तुत त्याचा उपयोग कोण ॥ पुत्राचें चरित्र कथन ॥ वर्त्तलें वर्त्तमान ऐकिजे ॥ १४ ॥ पुत्र शुद्ध संपन्न ॥ मुंज विवाह जालिया आपण ॥ अतिशय संस्कृत अध्ययन ॥ करूनि निपुण पंडित झाला ॥ १५ ॥ षड्शास्त्र संपन्नता ॥ अध्ययन आलिया हाता ॥ व्युत्पत्ति अभिमान चित्ता ॥ अनावर अहंता देहीं आली ॥ १६ ॥ श्रीनाथ महाराष्ट्र व्याख्यान ॥ आणि जगदोद्धार हरिकीर्त्तन ॥ त्यासी परमार्थीं अनावड पूर्ण ॥ गेला त्रासोन वाराणसी ॥ १७ ॥ त्यासी पुत्र झाले तीन ॥ त्यांत कनिष्ठ राघोबा आपण ॥ बाळत्वींच सद्बुद्धि लक्षण ॥ श्रीनाथ चरण सेविले ॥ १८ ॥ पित्याची माया सांडुनी ॥ येथेंचि राहिला बाळपणीं ॥ सहभार्या दोघे पुत्र घेउनी ॥ पुत्र अभिमानी गेला काशी ॥ १९ ॥ पांडित्य विद्या निपुण ॥ तेथें तयाचा झाला मान ॥ स्वयें वाडा बांधोन ॥ सहकुटुंब आपण राहिला ॥ २० ॥ श्रीनाथ म्हणे अभिमानग्रस्थ ॥ पुत्र राहतां उद्धत ॥ सद्भक्ति स्थापन राजपंथ ॥ होईल युक्त संशयार्थ ॥ २१ ॥ घरींच राहतां बंड ॥ लोक आचरती पाषांड ॥ अनाचार जगीं उदंड ॥ होईल प्रपंचपाप पृथ्वी ॥ २२ ॥ म्हणोनी पुत्रासी होय बोध ॥ तो उपाय कीजे शुद्ध ॥ येणें अवतार कार्यसिद्ध ॥ वाढेल अविरुद्ध भाव त्याचा ॥ २३ ॥ स्वयेंचि जाउनी वाराणसी ॥ आणावें हरिपंडितासी ॥ राहतां निजसहवासी ॥ सहज अनायासें होईल बोध ॥ २४ ॥ उद्धवासी सांगोन संकेत ॥ श्रीनाथ प्रयाण करित ॥ क्रमूनि मार्ग त्वरित ॥ स्वलीळा जात वाराणसी ॥ २५ ॥ पुढें पाठवूनि ब्राह्मणा ॥ पुत्रासी जाणविली सूचना ॥ ऐकोनि पितृआगमना ॥ उल्हास मना पैं जाला ॥ २६ ॥ अति आदरें पुढारा ॥ जाऊनि केलें नमस्कारा ॥ आलिंगुनी निजपुत्रा ॥ आले घरा अति प्रीती ॥ २७ ॥ पितृसेवा समर्याद ॥ करितां जिवासी आल्हाद ॥ तयाचा भाव अविरुद्ध ॥ आदर प्रसिद्ध करी नित्य ॥ २८ ॥ कित्येक दिवस तेथें वस्ती ॥ राहूनि श्रीनाथ निजस्थिती ॥ पाहूनि त्याची

पितृभक्ती ॥ वाटली विश्रांति श्रीनाथा ॥ २९ ॥ एके दिवशीं निज स्थिती ॥ सहज विचाराची युक्ती ॥ एकांतीं पुत्राप्रती ॥ येऊनि निश्चिती बोलिले ॥ ३० ॥ तुझिया संगतीचें कोड ॥ जिवीं उपजली चाड ॥ तुजवीण तेथें न लागे गोड ॥ सर्वस्वीं जोड तूंचि एक ॥ ३१ ॥ तुझिया भेटीसीं चित्त ॥ अतिशयेसीं जालें उत्कंठित ॥ याचि-लागीं पातलों येथ ॥ आमुचें मनोगत हेंचि आतां ॥ ३२ ॥ देहीं उतरावयाची प्राप्ती ॥ आतां वियोग न होय अंतीं ॥ उरलें आयुष्य तुझ्या संगतीं ॥ स्वानंद स्थिति क्रमावें ॥ ३३ ॥ तेथील सर्व अधिष्ठान ॥ चालवूनि सांभाळावें आपण ॥ हें आमुचें सत्य वचन ॥ अंगिकारून चालावें ॥ ३४ ॥ तेथील वाडा अधिष्ठान ॥ उभयतां पुत्रांचे स्वाधीन ॥ जालिया येथील संरक्षण ॥ योग्य विचक्षणा करितील ॥ ३५ ॥ ऐकोनि श्रीनाथवाणी ॥ पुत्रें माथां ठेविला चरणीं ॥ सेवा घडावी या प्राक्तनीं ॥ माझिये मनीं उत्साह ॥ ३६ ॥ परि दोन गोष्टींची विनंती ॥ मान्य पडलिया मती ॥ तेथें यावें हें चित्तीं ॥ आस्था प्रीति मज असे ॥ ३७ ॥ ऐकोनि त्याचें वचन ॥ श्रीनाथ बोलती सुखावोन ॥ दोन गोष्टी त्या कोण ॥ तें श्रवण करवीजे ॥ ३८ ॥ पुत्र ह्मणे स्वामिनाथा ॥ देणें कठिण नसे सर्वथा ॥ पुराण न सांगिजे महाराष्ट्र ग्रंथा ॥ आणि परान्न आतां वर्जावें ॥ ३९ ॥ आपण वंद्य वरिष्ठ ब्राह्मण ॥ आणि पंडित मी निपुण ॥ माझेंचि ऐकिजे श्रवण ॥ स्वगृहींच भोजन नेमावें ॥ ४० ॥ इतुकियाचा अंगिकार ॥ कृपा करून दीजे वर ॥ वरकड आज्ञा तत्पर ॥ राहावें निरंतर नेम माझा ॥ ४१ ॥ श्रीनाथाचिये सहज स्थिती ॥ नाहीं आग्रहाची जाती ॥ ऐकोनि पुत्र निग्रहोक्ती ॥ अवश्य ह्मणती निजमुखें ॥ ४२ ॥ विद्याभिमान जात्याभिमान ॥ परमार्थीं हें दृढबंधन ॥ याचें व्हावया निरसन ॥ मनोगत रक्षून चालतसे ॥ ४३ ॥ आपुले विनंति स्वाधीन ॥ श्रीनाथ जाला देखोन ॥ सत्वरींच केलें प्रयाण ॥ जावया आपण प्रतिष्ठाना ॥ ४४ ॥ सहपुत्र श्रीनाथ ॥ प्रतिष्ठानीं पैं येत ॥ नेमयुक्त आचरित ॥ पुराण ऐकत संस्कृताचें ॥ ४५ ॥ विसर्जिलें परान्न भोजन ॥ जाणोनी ऐसें वर्त्तमान ॥ संत साधु भाविकजन ॥ स्वयें उद्विग्न हो सरले ॥ ४६ ॥ आदरें न येती श्रवणा ॥ भावार्थ सहजची जाला उणा ॥ परमार्थीं विघ्न देखोनि जाणा ॥ केली योजना श्रीहरीनें ॥ ४७ ॥ प्रतिष्ठानीं भिक्षावृत्ती ॥ म्हातारी एक अनाथ होती ॥ तिणें पूर्वीं असतां संपत्ती ॥ सहस्रभोजनाचा चित्तीं संकल्प केला ॥ ४८ ॥ पुढें काळवशें आलें दरिद्र ॥ तिचे चित्तीं खेद थोर ॥ सहस्रभोजन प्रकार ॥ केवीं साचार घडेल ॥ ४९ ॥ कोणी एक ब्राह्मण श्रेष्ठ ॥ त्यासीं निवेदिला वृत्तांत स्पष्ट ॥ तो म्हणे जेवितां ब्रह्मनिष्ठ ॥ अनंत ब्रह्मवृंद वरिष्ठ जेविले ॥ ५० ॥ प्रस्तुत इहीं लक्षणीं समर्थ ॥ परिपूर्ण श्रीएकनाथ ॥ त्यासी भोजन देतां यथार्थ ॥ तृप्त मनोरथ पूर्ण होय ॥ ५१ ॥ ऐकतां ब्राह्मण वचनोक्ती ॥ निश्चय पूर्ण जडला

वृत्ती ॥ सद्भाव आला तिच्या चित्तीं ॥ नाथ स्वहस्तीं जेववीजे ॥ ५२ ॥ जपोनियां षण्मास ॥ सिद्ध केलें साहित्यास ॥ वडे पापड वळवटास ॥ यथावकाश पैं केलें ॥ ५३ ॥ पाकसामुग्री संपूर्ण ॥ जालिया सुखावलें मन ॥ पुराणसमयीं येऊन ॥ धरिले चरण नाथाचे ॥ ५४ ॥ म्हणे मी अनाथ भिकारी ॥ विनंति माझी मान्य करी ॥ तुझ्या कृपें मी संसारीं ॥ उद्धरें निर्धारी भाव माझा ॥ ५५ ॥ बहुत दिवस धरूनि हेत ॥ भिक्षा मागोन सामोग्री करित ॥ भोजना यावें हा मनोरथ ॥ पुरवोनि सनाथ मज कीजे ॥५६॥ ऐकोनि अनाथ भाववाणी ॥ श्रीनाथ कळवळिला मनीं ॥ म्हणे पुत्रासी मृदु वचनीं ॥ ऐकिजे ग्लानी पैं इची ॥ ५७ ॥ ऐसियाची स्वामीस करुणा ॥ म्हणोनि गोंवोनि घेतलें वचना ॥ तें आठवूनियां मना ॥ वर्तणुक आचरणा आचरावें ॥ ५८ ॥ सद्भाव आणि अभिमान ॥ जाणोनी उभयतांचें मन ॥ दोहीं पक्षीं उद्धरण ॥ होय तें जाण नेमिलें ॥ ५९ ॥ पुत्रासी म्हणे श्रीनाथ ॥ इचा पूर्ण होय भावार्थ ॥ तुजसी केला नेम व्यर्थ ॥ न होय तो अर्थ ऐकिजे ॥ ६० ॥ स्वहस्तें तुवां करोनि पाक ॥ उभयतां जेविल्या हे भाविक ॥ संतोष पावेल अवश्यक ॥ उत्तम विवेक दोहीं पक्षीं ॥ ६१ ॥ ऐकतां श्रीनाथ वचन ॥ उल्हास न पावे तयाचें मन ॥ संकोचास्तव जाण ॥ अवश्य बोलोनी राहिला ॥ ६२ ॥ पुराण संपवूनि त्वरित ॥ गृहांत गेला हरिपंडित ॥ वृद्धा आपुला वृत्तांत ॥ नाथासी जाणवीत निजगुज ॥ ६३ ॥ षण्मास करूनियां कष्ट ॥ आवडीनें केलें वळवट ॥ त्याचें सार्थक न दिसे शेवट ॥ ह्मणोनि कटकट करी ग्लानी ॥६४॥ जैसा ज्याचा भावो ॥ तैसा त्यासी देवो ॥ ह्मातारीसी शांतवुनी पाहाहो ॥ सांगे अभिप्रावो श्रीनाथ ॥ ६५ ॥ स्वस्थ चित्तें जाउनी घरीं ॥ जे जे पदार्थ कर्त्तव्य अंतरीं ॥ ते स्वहस्तें सुखें सिद्ध करी ॥ चिंता न करी निजमनीं ॥ ॥ ६६ ॥ पुत्र जो करील पाक अन्न ॥ दोहीं पात्रीं घेईल वाढून ॥ पंचप्राणाहुती घेतल्या जाण ॥ तूंही आणून स्वयें वाढीं ॥ ६७ ॥ आमुच्या पात्रीं सर्व परवडी ॥ सुखें आणूनिया वाढीं ॥ जेणें पुरे तुझी आवडी ॥ तेचि गोडी पैं आह्मा ॥ ६८ ॥ ऐकोनि श्रीनाथमुखशब्द ॥ म्हातारीसी अति आल्हाद ॥ वंदूनि श्रीनाथपादारविंद ॥ बोले प्रबुद्ध तेकाळीं ॥ ६९ ॥ पाकार्थ आज्ञापी पुत्रासी ॥ मीही समागमें जाईन घरासी ॥ बोलावूनि हरिपंडितासी ॥ ह्मणती पाकासी स्वयें जावें ॥ ७० ॥ ह्मातारी वंदी चरण ॥ ह्मणे चलावें कृपा करोन ॥ हरिपंडित आपण ॥ पाकसिध्यर्थ जाण स्वयें गेला ॥ ७१ ॥ बैसावया आसन ॥ अति आल्हादें वोपून ॥ गंगाजळ करूनि उष्ण ॥ करविलें स्नान तयासी ॥ ७२ ॥ सर्व सामुग्री यथास्थित ॥ पाकार्थ तया वोपित ॥ जो जो पदार्थ तया आवडत ॥ तेंचि देत साहित्य तया ॥ ७३ ॥

सर्व उपसाहित्या आइती ॥ तयाचि करूनि निश्चिती ॥ म्हातारी स्वयंपाकाप्रती ॥ निघे भावार्थी निष्ठा ॥ ७४ ॥ सर्व वळवटाच्या क्षिरी ॥ सिद्ध केल्या नानापरी ॥ वडे पापड अरुवारी ॥ अति कुसरी पैं केले ॥ ७५ ॥ श्रीनाथें गंगास्नान ॥ माध्यान्हिक सर्व सारोन ॥ तेथूनि वाडियांत येऊन ॥ पुजोनि ब्राह्मण जेवविले ॥ ७६ ॥ देवब्राह्मणांचीं तीर्थें ॥ स्वीकारून अति आर्तें ॥ स्वयें म्हातारीच्या गृहातें ॥ आले त्वरित भोजनासी ॥ ७७ ॥ इकडेही सर्व निष्पत्ती ॥ जालिया हरिपंडितीं ॥ वैश्वदेव करूनि स्वहस्तीं ॥ अन्न वाढिती दोहीं पात्रीं ॥ ७८ ॥ घृत शर्करादि पदार्थ ॥ सर्व एकदांचि वाढून घेत ॥ म्हातारीस पुसोन नाथ ॥ स्वयें करीत आपोशना ॥७९॥ तैसाचि हरिपंडित जाण ॥ करूनियां आपोशन ॥ उभयतां प्राणाहुती घेऊन ॥ करीत भोजन यथाप्रीती ॥ ८० ॥ तंव म्हातारीनेंही आपण ॥ सर्व पदार्थ आणून ॥ श्रीनाथाचे पात्रीं वाढून ॥ कर जोडून उभी असे ॥८१॥ अंगिकारिलें तिच्या पाका ॥ म्हणोनि पुत्रासी प्राप्त शंका ॥ जीवीं कोपाग्नीचा भडका ॥ उठिला देखा तेकाळीं ॥ ॥ ८२ ॥ नेत्र जाले आरक्त ॥ रागें म्हातारीकडे पाहत ॥ तंव तिचें भावार्थीं गुंतलें चित्त ॥ हात जोडित प्रार्थनेसी ॥ ८३ ॥ नाथ निजस्थिति समाधानीं ॥ भोजन करी प्रीति करोनि ॥ हरिपंडित निजमनीं ॥ विवेक धरुनी सांवरी कोप ॥८४॥ क्रोधोन्मत्त गज उठिला जिवीं ॥ परि विवेकांकुश तो सांवरी ॥ अमर्यादा सहसा न करावी ॥ ऐसिया भावीं निवांत जाला ॥ ८५ ॥ यापरि समाधानीं ॥ तृप्ति पावोनि भोजनीं ॥ उत्तरापोषन घेउनी ॥ उठिले आंचवणी उभयतां ॥ ८६ ॥ म्हातारीसी म्हणे नाथ ॥ तुवां सोवळें बसावें स्वस्थ ॥ पात्रें काढावया सुचवित ॥ पुत्रासी संकेत तेकाळीं ॥ ८७ ॥ पितृआज्ञा प्रतिपाळक ॥ यदर्थीं तया होतां विवेक ॥ पात्रें काढावया देख ॥ न मानी दुःख वचनाचें ॥ ८८ ॥ हरिपंडित आंचवून ॥ तुळसीदळ मुखशुद्धि घेऊन ॥ पात्रें काढावया लागून ॥ आला आपण लवलाहें ॥ ८९ ॥ उचली श्रीनाथाचें पात्र ॥ तंव दुसरें खालतें देखे पात्र ॥ तेंही उचलिलें लवकर ॥ आणीक साचार पाहिलें ॥ ९० ॥ तेंही काढिलें तांतडी ॥ तंव तळीं आणीक परवडी ॥ तेंही लगबगें काढी ॥ दुणी तेवढीं तैसींच तेथें ॥ ९१ ॥ पात्रा खालतें पात्र ॥ कौतुक पाहिलें विचित्र ॥ काढितां संख्या सहस्र ॥ भागलें शरीर पुत्राचें ॥ ९२ ॥ म्हातारी कौतुक पाहे नयनीं ॥ कोठून आलीं पात्रें भरणीं ॥ उभयतां आश्चर्य पावलीं मनीं ॥ पात्रें पुरवणी मांडिलीं ॥ ९३ ॥ पात्रें न सरतीं काढितां ॥ हरिपंडितासी जाली चिंता ॥ नकळे सत्पुरुष परपारता ॥ चरणीं माथा मग ठेवी ॥ ९४ ॥ सर्व अभिमान निर्दळण ॥ कृपाप्रसादें जालें जाण ॥ आतां पायीं आलों शरण ॥ तूं परब्रह्म आपण मूर्तिमंत ॥ ९५ ॥ तुझें नेणोनि महिमान । स्थापूनि

राहिलों ज्ञानाभिमान ॥ तुझें ऐश्वर्य परिपूर्ण ॥ पाहूनि मन मुरालें ॥ ९६ ॥ तुझ्या ठाईं मनुष्यबुद्धी ॥ कृपणभाव होतां आधीं ॥ त्याची जाली अवधी ॥ कृपानिधि श्रीनाथा ॥ ९७ ॥ लाघव आंवरून आतां ॥ पात्रें पूर्ण होत ताता ॥ कृपा करावी स्वामिनाथा ॥ चरणीं माथा ठेविला ॥ ९८ ॥ पुत्रासी पावला बुद्धिबोध ॥ तेणें नाथासी आल्हाद ॥ लीला आज्ञापुनी प्रसिद्ध ॥ अभिमानछेद पैं केला ॥ ९९ ॥ मग ह्मणे सख्या हरी ॥ आतां पात्र उचलोनि करी ॥ काढूनियां झडकरी ॥ सुखें घरीं चालावें ॥ १०० ॥ पात्रें काढितां आज्ञा प्रमाण ॥ सर्व सरलीं परिपूर्ण ॥ पुत्र निःसंशय होऊन ॥ वंदी चरण नाथाचे ॥ १ ॥ म्हातारीचा भाव पूर्ण ॥ सहस्र ब्राह्मण भोजन ॥ पुत्रासी स्वस्वरूपज्ञान ॥ होऊनि समाधान दिधलें ॥ २ ॥ खरें ब्राह्मणवचन ॥ तिघेंही जालीं सुखसंपन्न ॥ श्रीएकनाथ ब्रह्मपूर्ण ॥ निश्चय जाण ठसावला ॥ ३ ॥ नाथासहवर्तमान ॥ तेथूनि वाडियांत येऊन ॥ करूनि साष्टांग नमन ॥ विनंति आपण करी हरी ॥ ४ ॥ मी अपराधी परी ॥ स्वामी आतां क्षमा करी ॥ पुराण कीर्त्तन पूर्व प्रकारीं ॥ अंगिकारी स्वामिया ॥ ५ ॥ तुझिया वाणीचें श्रवण ॥ हेंचि जडजीवां उद्धरण ॥ त्यासी आड आलों होतो विघ्न ॥ हें अपराधलक्षण क्षमा कीजे ॥ ६ ॥ यापरी हरिपंडित ॥ होऊनियां अति विरक्त ॥ अनुदिनीं श्रीनाथसेवा करित ॥ भावार्थयुक्त अतिप्रीती ॥ ७ ॥ श्रीनाथ स्वयें पूर्णा स्थिती ॥ पुराण कीर्त्तन आरंभिती ॥ जनासी येणें विश्रांती ॥ विशेषभक्ती विस्तारिती ॥ ८ ॥ जगदोद्धारी श्रीनाथ ॥ पूर्णावतार अतिसमर्थ ॥ तयाचे चरणीं भावार्थ ॥ दृढनिश्चितार्थ केशवाचा ॥ १०९ ॥ इतिश्रीएकनाथचरित्रे अष्टाविंशतितमोध्यायः ॥ श्रीनाथार्पणमस्तु ॥

---

## अध्याय एकोणतिसावा.

श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ ॐ नमो श्रीएकनाथा ॥ भावार्थें तुझ्या चरणीं माथा ॥ ठेवितां नासे भवव्यथा ॥ झेंपावे परमार्थी बुद्धि जेणें ॥ १ ॥ पुत्राची जाऊन भ्रांती ॥ चित्तासी जाली उपरती ॥ श्रीनाथासी करून विनंती ॥ पुराण यथारिती आरंभिलें ॥ २ ॥ श्रीनाथमुखें श्रवण ॥ आपण करी भाव धरून ॥ चित्तासी होय समाधान ॥ ह्मणे धन्य महिमान हरिभक्ती ॥ ३ ॥ सकळ भावार्थी जन ॥ श्रवण करिती सुखावोन ॥ तैसेंचि रात्रीं कीर्त्तन ॥ श्रवणें पावन जग होय ॥ ४ ॥ ऐसिया आनंद सुकाळीं ॥ जनासी नित्य दिवाळी ॥ वैष्णवांच्या निजमेळीं ॥ नामकल्लोळीं गर्जती ॥ ५ ॥ श्रीराम जानकीपती ॥ त्यासी आवड उपजली चित्तीं ॥

श्रीनाथाची परमख्याती ॥ पाहोन येती भेटीसी ॥ ६ ॥ श्रीनाथाची एकांतीं ॥ भेटी घेऊन अतिप्रीती ॥ सुखावोनि निजचित्तीं ॥ ह्मणे मागणें निश्चिती एक असे ॥ ७ ॥ अवतारचरित्र रामकीर्त्ती ॥ तुझिया मुखें हे ग्रंथोक्ती ॥ व्हावया लागीं यथास्थिती ॥ आलों निश्चितीं भेटीसी ॥ ८ ॥ ऐकोनि श्रीरामवचन ॥ नाथ करी विज्ञापन ॥ सर्वोपरी आज्ञा प्रमाण ॥ पर्यवसान समीप असे ॥ ९ ॥ तुझें चरित्र महाथोर ॥ सप्तकांड अति विस्तार ॥ कैसेनि जाईल पार ॥ हा विचार असे आतां ॥ १० ॥ श्रीनाथ विवेकवचन ॥ श्रीरामचंद्रें परिसोन ॥ ह्मणे यदर्थीचें प्रमाण ॥ नेम लक्षण ऐकावें ॥ ११ ॥ नित्य नेम संध्या स्नान ॥ सर्वांची आतां बोळवण ॥ अहर्निशीं रामायण ॥ करावें वचन मानुनी ॥ १२ ॥ ज्यालागीं तपाचरण ॥ योग याग त्याग ध्यान ॥ करितांही नाना साधन ॥ दुर्लभपण तत्प्राप्ती ॥ १३ ॥ तों स्वयें श्रीराममूर्त्ती ॥ प्रगट भेटूनि करी विनंती ॥ श्रीरामायण यथोक्ती ॥ करवी प्रीती पुरस्कर ॥ १४ ॥ ज्याचीं चरित्रें गाइजे कीर्त्ती ॥ तो स्वयें रघुपती ॥ रामायण करावया प्रीती ॥ नानायुक्ती वदे स्वयें ॥ १५ ॥ रामायण करावयासाठीं ॥ श्रीरामाची प्रीति मोठी ॥ देखोनि श्रीनाथ पोटीं ॥ पावला संतुष्टी स्वानंदें ॥ १६ ॥ श्रीराममनोगत संरक्षण ॥ मुख्यत्वें आह्मां हें प्रमाण ॥ तो स्वयें ह्मणे रामायण ॥ कीजे महिमान भाग्य धन्य ॥ १७ ॥ श्रीरामासी अभिवंदन ॥ करूनि ह्मणे आज्ञा प्रमाण ॥ तूं साह्य असतां आपण ॥ सहज रामायण प्रगटेल पैं ॥ १८ ॥ पुराण कीर्त्तन अनुष्ठान ॥ सर्व आतां रामायण ॥ लाहोनि श्रीरामवरदान ॥ आरंभिलें जाण सुमुहूर्त्तें ॥ १९ ॥ तंव घटिका पळपळ ॥ रामायण वदावें सर्वकाळ ॥ या वेगळें अळुमाळ ॥ रिकामी वेळ नजाय ॥ २० ॥ श्रीरामें नित्य आपण ॥ येऊन द्यावें दर्शन ॥ जालिया ग्रंथाचें लेखन ॥ अवलोकनें सुखी होत ॥ २१ ॥ यापरि उत्कंठा ग्रंथाची ॥ श्रीरामासी जाली साची ॥ श्रीनाथही तैसाची ॥ अविश्रमें रची निरंतर ॥ २२ ॥ बाळकांड श्रीरामजन्म ॥ कौसल्या डोहळ्याचे संभ्रम ॥ परमार्थ बोलिला निःसीम ॥ अद्भुत प्रेम रामभक्तीं ॥ २३ ॥ विश्वामित्र यागविधी ॥ रामप्रतापें गेला सिद्धी ॥ ताटिका सुबाहु वधीं ॥ बाळत्वीं प्रसिद्धि दाविली ॥ २४ ॥ स्वयंवरी हरकोदंड ॥ रामें उचलितां प्रचंड ॥ रावणाचें काळें तोंड ॥ व्यर्थ बंड जालें त्याचें ॥ २५ ॥ सहबंधु चौघे जण ॥ मिथुळेसी लग्न करून ॥ जानकीचें पाणिग्रहण ॥ रामें आपण पैं केलें ॥ २६ ॥ सवेंचि अयोध्येसी येतां ॥ मार्गीं परशराम अवचितां ॥ कोपें युद्धासी येतां ॥ जिंकिला तत्वतां समर्यादें ॥ २७ ॥ यापरि बाळकांडरचना ॥ संपविलें चरित्रकथना ॥ अयोध्याकांड पितृवचना ॥ मानूनि गमना नेमिलें जाण ॥ २८ ॥ वसिष्ठ सद्गुरु संमत ॥ राज्याभिषेक रामा नेमित ॥ देवीं

ऐकोनि हे मात ॥ केलें विपरित स्वहितार्थी ॥ २९ ॥ राज्याभिषेक होतां रामा ॥ येथेंचि गुंतेल राज्यधर्मा ॥ रावण बंदिखानीं आह्मां ॥ सुटका केवीं घडावी ॥ ३० ॥ मंथरा अंतरीं संचारून ॥ विकल्पें कैकईसी बोधून॥ श्रीरामासी अभिषेचन ॥ तेथेंचि विघ्न करविलें ॥ ३१ ॥ राजा कैकईभाकेसी ॥ पूर्वी गुंतला होता वचनासी ॥ तेणेंचि या समयासी ॥ ह्मणे वनवासी राम धाडा ॥ ३२ ॥ पितृवचन प्रतिपाळून ॥ राम करी वनप्रयाण ॥ सवें सीता लक्षुमण ॥ सेवे लागून पैं येती ॥ ३३ ॥ रामविरहें राजा जाण ॥ शोकेंचि जाला गतप्राण ॥ ऐकतांचि भरतशत्रुघ्न ॥ पाहती दुश्चिन्ह स्वप्न दृष्टी ॥ ३४ ॥ अयोध्येहून प्रधान ॥ मूळ आला देखोन ॥ स्वयें भरतशत्रुघ्न ॥ आले आपण अयोध्ये ॥ ३५ ॥ श्रीराम वनप्रयाण ॥ तेणेंचि राजा गतप्राण ॥ ऐकतांचि भरतशत्रुघ्न ॥ पडिले मूर्च्छापन्न मेदिनीं ॥ ३६ ॥ कैकयी शांतवितां त्यासी ॥ करूं ह्मणे तिच्या वधासी ॥ रामसेवेसी हे विवसी ॥ जाली आह्मासी ह्मणोनि ॥ ३७ ॥ वसिष्ठ सद्गुरुसमर्थ ॥ नानापरी त्यासी बोधित ॥ परि रामावेगळें राज्य येथें ॥ न अंगिकारित सद्बंधु ॥ ३८ ॥ सहमाता आणि सैन्य ॥ घेऊं पातले श्रीरामदर्शन ॥ भरत श्रीराम अभिन्न ॥ जालें आलिंगन परस्परें ॥ ३९ ॥ भरतासीं सांगून न्यायरीती ॥ समस्तां धाडिलें अयोध्येप्रती ॥ अयोध्याकांडाची समाप्ती ॥ केली निश्चिती यापरी ॥ ४० ॥ चित्रकूट पर्वताहून ॥ पुढें केलें वनप्रयाण ॥ श्रीराम सीता लक्षुमण ॥ तिघेजण वनवासी ॥ ४१ ॥ सकुमार चरणचाली ॥ चालतां मागें राहिली ॥ विराधदैत्यें तेवेळीं ॥ नेली जनकबाळी चोरुनी ॥ ॥ ४२ ॥ श्रीरामासी होतां श्रुत ॥ एकेंचि बाणें त्याचा निःपात ॥ करूनि जानकीसी रक्षित ॥ अहोरात्र सावधानें ॥ ४३ ॥ कबंधातें उद्धारून ॥ अगस्तीचें घेतलें दर्शन ॥ तयाचे विचारें करून ॥ केलें गमन पुढारां ॥ ४४ ॥ अनुसूया पतिव्रता ॥ अत्रिऋषीची जे कांता ॥ त्या आश्रमीं असतां सीता ॥ विश्रामता पावली ॥ ४५ ॥ करूनि शबरी पावन ॥ पंचवटीसी तिघेजण ॥ श्रीराम सीता लक्षुमण ॥ येऊनि जाण राहिले ॥ ४६ ॥ शूर्पणखेचा सुत ॥ ते वनीं अनुष्ठान करित ॥ स्वर्गीहून खड्ग उतरत ॥ जालें प्राप्त लक्ष्मणा ॥ ४७ ॥ वाहो पाहों गेला जाळी ॥ तंव दैत्यशिर भूमंडळीं ॥ पडिलें देखोनि तळीं ॥ जाणवी तेवेळीं श्रीरामा ॥ ४८ ॥ राक्षस वधासी मुहूर्त ॥ जाला आरंभ हा संकेत॥ करूनि जानकीसी रक्षित ॥ सावधान निश्चित असावें ॥ ४९ ॥ शूर्पणखा कपटवेशी ॥ वरूं आली लक्ष्मणासी ॥ नाक कान घेऊनि तिसी ॥ रामाज्ञेनें सोडिलें ॥५०॥ त्रिशिरा खर दूषण ॥ चौदासहस्त्र राक्षसगण ॥ येकल्या रामें वधून॥ दिधलें जनस्थान ब्राह्मणां ॥ ५१ ॥ शूर्पणखा हा वृत्तांत ॥ रावणासी सकळ निवे-

दित ॥ मायामृग मारीच येत ॥ रावण कपटी नेत जानकीसी ॥ ५२ ॥ सीतेची करावया सोडवण ॥ जटायु रावण युद्धदारुण ॥ कपटें पक्ष त्याचे छेदून ॥ गेला रावण सीतेसहित ॥ ५३ ॥ सीतेचिया काकुळती ॥ दंडकारण्य समूळ क्षिती ॥ वृक्ष वल्ली पाषाणजाती ॥ उद्धरी रघुपती आलिंगनें ॥ ५४ ॥ अकस्मात जटायु दर्शन ॥ करून तयासी पावन ॥ ऋषिमुखपर्वतीं येऊन ॥ सुग्रीवादि जाण भेटले ॥ ५५ ॥ श्रीराम हनुमंत भेटी ॥ युद्धपरीक्षा पाहतां हटीं ॥ श्रीरामप्रताप जगजेठी ॥ पाहोन पोटीं संतोषला ॥ ५६ ॥ माता अंजनी आज्ञा समर्थ ॥ हनुमंतें वंदिला रघुनाथ ॥ अरण्यकांड येथें समाप्त ॥ इतुका अर्थ ग्रंथोक्तीं ॥ ५७ ॥ सुग्रीव सखा मित्र जोडी ॥ त्याची साह्यें केली प्रौढी ॥ वाळी वधून कैवाडी ॥ राज्य परवडी सुग्रीवा ॥ ५८ ॥ साह्य करूनि शरणागताचें ॥ राज्यवैभव किष्किंधेचें ॥ अंगद सौजन्य साचें ॥ दिधलें त्याचें त्यासीच ॥ ५९ ॥ सुग्रीवचि साह्य संपूर्ण ॥ प्रतापेंकरून रघुनंदन ॥ जुत्पति वानर मेळऊन ॥ सुग्रीव आपण पैं आला ॥ ६० ॥ सीतेचिया शोधासाठीं ॥ वानर धाडिले दिग्पटीं ॥ दशदिशा वानर थाटीं ॥ गेले उठाउठी शोधार्थ ॥ ६१ ॥ हनुमंत प्रताप बळी ॥ अंगदादि वानर समेळीं ॥ राममुद्रा घेऊनि जवळी ॥ समुद्रपाळीं पावला ॥ ६२ ॥ अंगदादि वानरसेना ॥ समुद्रतिरीं ठेऊनि जाणा ॥ येकलाचि करूनि उड्डाणा ॥ गेला अंगवणा हनुमंत ॥ ६३ ॥ किष्किंदाकांड समाप्त ॥ यापरीं संपऊनि नाथ ॥ सुंदरकांडाचें मथित ॥ वर्णिलें अद्भुत भक्तिप्रेमें ॥ ६४ ॥ लंकेसी जाऊन हनुमंत ॥ अन्याय केले बहुत ॥ नानापरी लंकानाथ ॥ गांजिला अद्भुत प्रतापें ॥ ६५ ॥ बिभीषणाचें मंदिरीं ॥ श्रीरामभक्तिची थोरी ॥ पाहून सुखावे अंतरीं ॥ हनुमंत करी आश्चर्य ॥ ६६ ॥ राक्षसाचिया समुदायांत ॥ इतुकाचि पाहिला रामभक्त ॥ तेणेंचि हनुमंताचें चित्त ॥ जालें सुखभरित स्वानंदें ॥ ६७ ॥ तेथून रावणमंदिरासी ॥ येऊन बैसला गुप्तवेशीं ॥ मंदोदरी देखोनि सेजेसीं ॥ मारावया त्यासी सरसावला ॥ ६८ ॥ मंदोदरि विवेकगोष्टी ॥ सांगे रावणाचें कर्णपुटीं ॥ जैंपासून सीता गोरटी ॥ आणिली हटीं तुह्मी येथें ॥ ६९ ॥ तैंपासून लंके आंत ॥ उत्पात येती बहुत ॥ तिसी सोडावें हें उचित ॥ ह्मणोनि विनवीत रावणा ॥ ७० ॥ ऐकोनि विवेकवचन ॥ हनुमंतासी कळली खूण ॥ सीता नव्हे हे आपण ॥ परि उत्तमवचन बोलिली ॥ ७१ ॥ तंव बोलाऊन क्रूरराक्षसी ॥ रावण सांगें तियेसी ॥ जाऊन अशोकवनासीं ॥ जानकीसी छळ कीजे ॥ ७२ ॥ तुमचें छळण भयंकरी ॥ तेआपणची मजवरी ॥ ऐसें करूनि लवकरी ॥ यावें येथवरी सांगावया ॥ ७३ ॥ रावणवचन ऐकून ॥ त्रिजटादि राक्षसी जाण ॥ तेथूनि करितां गमन ॥ हनुमान आपण चालिला ॥ ७४ ॥

तिचिया शुद्धिलागीं येथ ॥ कष्टत होतों अद्भुत ॥ ते अनायासें भेटेल तेथें ॥ ह्मणोन जात गुप्तगती ॥ ७५ ॥ तंव अशोकवनीं सीतासती ॥ वैराग्यलक्षणीं आकृती ॥ अंतरीं स्मरत हो रघुपती ॥ अकृत्रिम भक्ती निजप्रेमा ॥७६॥ बैसोनियां अधोवदन ॥ अहर्निशि श्रीरामध्यान ॥ मुखें श्रीरामनामस्मरण ॥ तेणेंचि जीवन पैं तिचें ॥ ७७ ॥ गुप्तवेषें हनुमंत ॥ वृक्षावरी येऊनि बैसत ॥ पाहूनि तिचा वृत्तांत ॥ अति मानवत सुलक्षणी ॥ ७८ ॥ त्रिजटा रावणाची भगिनी ॥ येऊनि लागली सीतेच्या चरणीं ॥ ह्मणे सखे सुंदरे मायबहिणी ॥ रावणें मजलागुनी धाडिलें ॥ ७९ ॥ तुझें देखतां दर्शन ॥ विसरलें भूक तहान ॥ तुवां वश्य व्हावें आपण ॥ हा भाव पूर्ण रावणाचा ॥ ८० ॥ रावणासीं सन्निपात ॥ तुझिया स्वरूपवेधें प्राप्त ॥ हितवाक्य शिकवितां बहुत ॥ नाइके प्रस्तुत हें असो ॥ ८१ ॥ परिमज येकाळीं थोर ॥ रावणाचा घडला उपकार ॥ तुझें दर्शन पवित्रकर ॥ जालें साचार हें धन्य ॥ ८२ ॥ श्रीरामप्रिया जानकी ॥ भेटे तो धन्य त्रिलोकीं ॥ रामानुभवें तूं एकी ॥ पाहिलीसिकीं याडोळां ॥ ८३ ॥ यापरि स्तऊनि सीतेतें ॥ राक्षसी गेल्या स्वपंथें ॥ तेकाळीं जानकीतें ॥ देखिलें हनुमंतें दीनवदन ॥ ८४ ॥ रामविरहें शोकाकुळीत ॥ गुण आठऊन आक्रंदत ॥ सवेंचि पडतां मूर्च्छीत ॥ मानिलें विपरित हनुमंतें ॥ ८५ ॥ मुद्रा रामनामांकीत ॥ हनुमंत सीतेकडे टाकित ॥ देखोनी तिचें चित्त ॥ आला मानीत श्रीराम ॥ ८६ ॥ मुद्रेसी आळवी नानापरी ॥ श्रीरामभक्त कैवारी ॥ कोठें आला हें झडकरी ॥ बोले बरी मायबहिणी ॥ ८७ ॥ मुद्रा नबोले जाणून ॥ जानकी पडली विव्हळून ॥ हनुमंतें प्रगटोनी आपण ॥ वंदिले चरण सीतेचे ॥ ८८ ॥ तिचें करुनी समाधान ॥ घेउनी आज्ञावचन ॥ अशोकवन विध्वंसून ॥ फळें संपूर्ण भक्षिलीं ॥ ८९ ॥ ऐंशीसहस्त्र वनकर ॥ अखया रावणाचा कुमर ॥ मारिले राक्षस अपार ॥ जाळिलें नगर लंकापुर ॥ ९० ॥ सभेसी गांजून रावण ॥ थोर केला अपमान ॥ सीतेचें करूनि समाधान ॥ ब्रह्मपत्र लीहून घेतलें ॥ ९१ ॥ एकेचि उड्डाणें तेथून ॥ पावला वानराचें सैन्य ॥ तेथूनि श्रीरामदर्शन ॥ घ्यावया आपण पैं आला ॥ ९२ ॥ वंदूनि रघुकुळटिळका ॥ सवेग दिधली पत्रिका ॥ हनुमंताचा प्रताप देखा ॥ सीताशुद्धि अवांका सविस्तर ॥ ९३ ॥ समूळ ऐकतां वृत्तांत ॥ हर्षलें समस्तांचें चित्त ॥ समुद्रतिरा येउनी त्वरित ॥ बांधला सेतु शिळाशिखरीं ॥ ९४ ॥ सुंदरकांड संपूर्ण ॥ येथवर जालें कथन ॥ आतां युद्धकांड दारुण ॥ आरंभिलें वर्णन ॥ ९५ ॥ श्रीनाथें बिभिषणदर्शन ॥ आला ऐकोन रघुनंदन ॥ त्यासीं भेटी देउनी सन्मान ॥ रक्षिला आरंभीं आपण श्रीरामें ॥ ९६ ॥ वानरसैन्य समस्त ॥ समुद्र उल्लंघून त्वरित ॥ लंका वेढून उतरत ॥ रावणा निवेदित शुकसारण ॥ ९७ ॥ शिष्टाई करावी राजनीती ॥

अंगदासी धाडी रघुपती ॥ तेणें जाऊनि सभेप्रती ॥ केली विनंति रावणासी ॥ ९८ ॥ अंगद प्रतापिया गाढा ॥ निःशंक बैसला रावणा पुढा ॥ देखोनि रावण जाला वेडा ॥ बोलतां फुडा शब्द नफुटे ॥ ९९ ॥ मतिमूढ आणि हट्टी ॥ सहसा नसोडी सीतागोरटी ॥ रावणातें करूनि हिंपुटी ॥ अंगद जगजेठी परतला ॥ १०० ॥ युद्ध करूनि दारुण ॥ अपार निवटिलें राक्षस सैन्य ॥ सुग्रीवें जाऊनि आपण ॥ धुमसिला रावण निजबळें ॥ १ ॥ युद्धासीं जो जो येत राक्षस ॥ वानर निवटिती तयास ॥ कुंभकर्णासी तेव्हां लंकेश ॥ धाडी युद्धास तेवेळीं ॥ २ ॥ सुग्रीव कुंभकर्ण रण ॥ अतिशय जालें दारुण ॥ त्याचें नाक कान छेदुन ॥ सुग्रीव विजयी आपण पैं जाला ॥ ३ ॥ श्रीरामप्रताप अगाध ॥ केला कुंभकर्णाचा वध ॥ अविचारें करूनि प्रसिद्ध ॥ इंद्रजीत युद्ध करूं आला ॥ ४ ॥ यापरि युद्धकांड वर्णन ॥ चव्वेताळीस अध्ये पूर्ण ॥ श्रीनाथ करी आपण ॥ तंव समय निर्वाण पैं आला ॥ ५ ॥ संत महानुभाव समस्त ॥ त्यांसीं पुसे श्रीनाथ ॥ निजधाम प्रयाण मुहूर्त ॥ आजि नेमस्त जातसों ॥ ६ ॥ ऐकोनि श्रीनाथ वाणी ॥समस्त येती लोटांगणी ॥ करिते जाले विनवणी ॥ प्रेमळपणीं निजभक्तां ॥ ७ ॥ कृष्णदास निधन वेळा ॥ अकरा दिवस थांबवूनि काळा ॥ युद्धकांड संपवूनि सकळा ॥ ऐश्वर्य प्रबळा दाविलें ॥ ८ ॥ अहो स्वामीजी दयाळा ॥ कृपा करोनियां राहावी काळा ॥ हें रामचरित्र अवलीला ॥ वर्णिजे कृपाळा संपूर्ण ॥ ९ ॥ देहीं असावी देहबुद्धी ॥ तें जाल्या कवितेची हर्षसिद्धी ॥ श्रीनाथ नैराश्य आधीं ॥ लौकिकविधि नावडे पैं ॥ ११० ॥ म्हणे काळासीं करावी निग्रहता ॥ आणि पूर्ण कीजे हे कविता ॥ यांत लाभ विशेषता ॥ नव्हे उचिता हें कर्म ॥ ११ ॥ रामचरित्र श्रवण आर्ती ॥ तुह्मासीं आवड असेल चित्तीं ॥ तरी युद्धकांडाची उक्ती ॥ करीउ समाप्ति गावोबा ॥ १२ ॥ पुढील अध्यायीं निरोपण ॥ आधीं गावोबाचें लक्षण ॥ संपूर्ण ऐकिजे विवर्ण ॥ लाहोन वरदान वदला ग्रंथ ॥ १३ ॥ स्वलीला श्रीएकनाथ ॥ अवतार होईल समाप्त ॥ निर्वाण काळचरित ॥ अति अद्भुत ऐकिजे ॥ १४ ॥ श्रोते संत महामती ॥ श्रवणीं जयां अति प्रीती ॥ यालागीं माझी विनंती ॥ केशव यदर्थीं निवेदित ॥ ११५ ॥ इतिश्रीएकनाथचरित्रे रामायणवर्णनंनामएकोनत्रिंशतिमोध्यायः ॥ श्रीनाथार्पणमस्तु ॥

---

## अध्याय तिसावा.

श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ पूर्णावतार श्रीएकनाथ ॥ ऐश्वर्यें जो समर्थ ॥ मूढ मुकी मुखें ग्रंथ ॥ वदवी यथार्थ रामायण ॥ १ ॥ मूढ मुका कोठील कोण ॥ पुसाल त्याचें वर्त्तमान ॥ याअधिकाराचें कारण ॥ समूळ श्रवण करावें ॥ २ ॥

गंगातीरीं खेडें एक ॥ ब्राह्मण कुळकर्णी वृत्तिक ॥ दुर्बळ असे संसारिक ॥ संतानें अधिकें जन्मलीं ॥ ३ ॥ अवघ्यां शेवटींयाचें जनन ॥ जालें दैवयोगें करून ॥ गावोबा हें अभिधान ॥ तया लागून ठेविलें ॥ ४ ॥ वाणी स्तब्ध मूढमती ॥ सदैव खेळावया प्रीती ॥ मुंजसंस्कार यथा रिती ॥ केला निश्चिती तयासी ॥ ५ ॥ गायत्रीचें उच्चारण ॥ कधींही नवदे वदन ॥ संध्या कैंची मतिहीन ॥ निरंतर खेळून क्रमीकाळ ॥ ६ ॥ आहारालागीं मातेप्रती ॥ रडून मागे मूढमती ॥ पुरणपोळीची तया प्रीती ॥ भक्षणार्थी नित्य मागे ॥ ७ ॥ मातापित्यासी उबग मनीं ॥ घड न बोलती कोणी वचनीं ॥ जाणोनि तो अवलक्षणीं ॥ नित्य हेळसुनी धिःकारित ॥ ८ ॥ यापरि त्याची अनावड ॥ ह्मणती जाला नाहीं का दगड ॥ खावया मागे घडगोड ॥ ऐसा का जड जन्मला ॥ ९ ॥ एके दिवसीं मातेप्रती ॥ संज्ञा पुरणपोळीची प्रीती ॥ मागें करूनियां ग्लांती ॥ येत काकुळती भोजनार्थ ॥ १० ॥ हेळसुनी मारितां माता ॥ पुरणपोळी कैंचि आतां ॥ ह्मणोनि दवडिला परता ॥ परि तो तत्वतां नजाय ॥ ११ ॥ पुरणपोळी दे ह्मणून ॥ गडबडित घाली लोळण ॥ मातेचें कळवळलें मन ॥ कायवचन बोलिली ॥ १२ ॥ प्रतिष्ठानीं एकनाथ ॥ नांदतसे अति समर्थ ॥ तुवां जावोनि तेथ ॥ राहावें निश्चित त्याचे घरीं ॥ १३ ॥ पुरणपोळी मिष्टान्न ॥ नित्य होतसे निमार्ण ॥ आलिया देतसे भोजन ॥ तुवांहि जाऊन भक्षावें ॥ १४ ॥ ऐकोन मिष्टान्नभोजन ॥ गावबा अति संतोषोन ॥ मातेच्या पायां लागून ॥ गेला आपण प्रतिष्ठाना ॥ १५ ॥ एकनाथाचें अंतरीं स्मरण ॥ भोजनास्तव घोकीत जाण ॥ स्वयें वाडियांत येऊन ॥ स्तब्ध आपण उभा ठेला ॥ १६ ॥ बाळ आणि आर्तभूत ॥ तटस्थ उभा अंगणांत ॥ श्रीनाथ तया विचारित ॥ काय हेत तो बोलें ॥ १७ ॥ तयाचिये मागें मागें ॥ मातापातली सवेगें ॥ पूर्णपोळीलागीं अनुरागें ॥ हा आला ऐसें सांगे नाथासी ॥ १८ ॥ आह्मी करंटीं दुर्बळ ॥ आमचे पोटीचा हा बाळ ॥ मूढ मूर्ख केवळ ॥ असे अमंगळ सर्वांपरी ॥ १९ ॥ स्वामीच्या घरीं मिष्टान्न ॥ नित्य जेवितातीं ब्राह्मण ॥ हें ऐकोनियां वचन ॥ आला धांवून भोजनार्थी ॥ २० ॥ समूळ ऐकोनि वृत्तांत ॥ कृपेनें द्रवलें नाथाचें चित्त ॥ ह्मणे सुखें राहोनि येथ ॥ भोजनीं तृप्त पैं होई ॥ २१ ॥ तयासीं धरूनि हातीं ॥ नेलें पाकगृहा प्रती ॥ गिरिजाबाईस येकांतीं ॥ नेम निगुती सांगितला ॥ २२ ॥ या मुलाचें सांगोपन ॥ अपत्या परी भोजन ॥ नित्य परामर्षीं सावधान ॥ आज्ञा वचन नेमियेलें ॥ २३ ॥ जेव्हां इच्छील भोजन ॥ तेव्हां वोपावें मिष्टान्न ॥ आज्ञा करूनि प्रमाण ॥ करी पाळण तयाचें ॥ २४ ॥ यथेच्छ मिळालें भोजन ॥ तेणें तो पावे समाधान ॥ त्रिदीसीं मुलांसीं खेळून ॥ क्रमी जाण दिवसातें ॥ २५ ॥ रात्रीं वाडियांत येऊन ॥ वस्त्रें प्रावणें मागून ॥ घरांत करितसे शयन ॥ यापरि

वर्त्तन पैं त्याचें ॥ २६ ॥ नाथासी करुणा आली मनीं ॥ ह्मणे कांहीं तरी यालागुनी ॥ लावावें भगवत्साधनीं ॥ उद्धरे प्राणी तें योजी ॥ २७ ॥ तयासी देऊनियां सुख ॥ बोलावयाचें कौतुक ॥ त्याचिया छंदानुसारें देख ॥ योजिती विवेक अधिकारा ॥२८॥ जवळीं बोलावुनी त्यासीं ॥ बैसवुनी आदरेसीं ॥ काहीं उच्चार वाणीसीं ॥ नामस्मरणासी सांगतसे ॥ २९ ॥ एकनाथ चारी अक्षरीं ॥ उच्चार निवे वैखरी ॥ मातेचें वचन निर्धारीं ॥ घोकितां अंतरीं दृढावलें ॥ ३० ॥ तितुकेंचि नामोच्चारण ॥ वैखरी वदे संपूर्ण ॥ अन्य कांहीं संध्यास्नान ॥ नेणें आपण गावोबा तो ॥ ३१ ॥ तेंचि प्रतिपाद्य करुनी नाम ॥ तोचि उपाय योजिला सुगम ॥ जयाचि संख्यानेम संभ्रम ॥ नेमिला उपरम चित्तासी त्या ॥ ३२ ॥ सुतळीच्या माळा अमूप ॥ तयासी करावयालागीं जप ॥ दिधल्या करूनि सांक्षेपें ॥ होऊनि सकृप श्रीनाथ ॥ ३३ ॥ श्रीनाथकृपा प्रसन्न ॥ तेणेंचि त्याचें लक्षण ॥ पालट धरूनियां मन ॥ लागे अनुसंधान स्मरणाचें ॥ ३४ ॥ जीवीं लागली स्मरणगोडी ॥ तेणेंचि स्वरूपीं आवडी ॥ बाळलीळा पूर्णपरवडी ॥ जाली अनावडी खेळण्याची ॥ ३५ ॥ श्रीनाथ सान्निधान ॥ करावया उदित मन ॥ बैसोनी करित श्रवण ॥ श्रीरामायण नाथवाणी ॥ ३६ ॥ एकनाथ नामस्मरण ॥ हेंचि त्याचें अनुष्ठान ॥ तेणेंचि त्याचें अंतःकरण ॥ शुद्ध होऊन उजळलें ॥ ३७ ॥ परमार्थ श्रवणीं सादर ॥ मन होतसे एकाग्र ॥ तयाचा अंतर्भाव साचार ॥ असे अगोचर नाथासी ॥ ३८ ॥ संत श्रोते साधुजन ॥ तयाचें मनोगत हें पूर्ण ॥ समग्र वदावें रामायण ॥ मग निर्याण पैं कीजे ॥ ३९ ॥ भावार्थ रक्षावया त्याचा ॥ श्रीनाथ कोंवळा कृपेचा ॥ तेणेंचि वदली हे वाचा ॥ कांड समाप्तीचा प्रकार ॥ ४० ॥ युद्धकांडाची समाप्ती ॥ गावोबा करील यथास्थिती ॥ हे ऐकोनिया युक्ती ॥ सकळ करिती आश्चर्य ॥ ४१ ॥ मूढ मूर्ख अज्ञान ॥ कैसेन वदेल रामायण ॥ संशयी सर्वांचें मन ॥ कळली खूण नाथासी ॥ ४२ ॥ समस्त करिती कौतुक ॥ पाचारूनि गावोबा निःशंक ॥ पद्महस्तें त्याचा मस्तक ॥ स्पर्शिला देख तेकाळीं ॥ ४३ ॥ हातीचिया लेखणीसी ॥ कृपाप्रसाद दीधला त्यासी ॥ ह्मणे पुढें युद्धकांडासी ॥ वदोनि समाप्तीसी न्यावा ग्रंथ ॥ ४४ ॥ तयानें वंदोनी श्रीचरण ॥ स्वयेंचि वदतसे रामायण ॥ स्वहस्तें करूनि लेखन ॥ केला संपूर्ण एक अध्याय ॥ ४५ ॥ श्रीनाथ देखतां वाणी ॥ ऐकोनियां श्रोते जनीं ॥ अघटित श्रीनाथकरणी ॥ वारंवार मनीं आठवीत ॥ ४६ ॥ यापरि श्रीनाथ आपण ॥ मूर्खमुखें रामायण ॥ वदविता जाला संपूर्ण ॥ पाहिलें महिमान संतजनीं ॥ ४७ ॥ अवतारसमाप्ति चरित्र ॥ कीर्ति करूनियां पवित्र ॥ मूढ मूर्खाचें वक्त्र ॥ बोलवी बोलवी विचित्र ग्रंथकथा ॥ ४८ ॥ यापरि पुसोनि समस्तांसी ॥ तनु त्यागिली स्वइच्छेसी ॥

हे वार्ता सकळिकांसी ॥ कळली परस्परेंसी ग्रामस्था ॥ ४९ ॥ सकळ समुदाय जनलोक ॥ धांवोनि येती एकेक ॥ श्रीनाथनिर्वाण अवलोक ॥ करिती देख तेकाळीं ॥ ५० ॥ जैसा निरंतर दिव्यदेही ॥ निर्वाणींही तैसाचि पाही ॥ हें आश्चर्य सकळही ॥ नवल तिहीं मानिलें ॥ ५१ ॥ कोणीं विरुद्धवादी ॥ उपहासयुक्त बोलती शब्दीं ॥ थोर जाली होती प्रसिद्धी ॥ परि मरणसिद्धि सारखीच ॥ ५२ ॥ जैसेंच मरे सकळजन ॥ तैसेंचि याचें ही अवसान ॥ सत्पुरुषाचें लक्षण ॥ काय महिमान विशेषी ॥ ५३ ॥ यापरि जनाची वाणी ॥ कळली श्रीनाथालागोनी ॥ जनीं जनार्दन या वचनीं ॥ बोलती मनीं भाव आला ॥ ५४ ॥ सद्गुरुभक्तीचें महिमान ॥ तेथें हें ऐसें मरण ॥ अयोग्य म्हणोनी जनार्दन ॥ जनमुखें आपण स्वयें वंदे ॥ ५५ ॥ ऐसा भाव आलिया चित्ता ॥ स्वलीळा उठिला अवचिता ॥ आश्चर्य जना समस्तां ॥ मानला तत्वतां नवलाव ॥ ५६ ॥ नाथाचा परतला प्राण ॥ देखोनि आनंदले जन ॥ सर्वही घेउनी दर्शन ॥ करिताती नमन साष्टांगीं ॥ ५७ ॥ विरुद्ध वादी विकल्पि जन ॥ त्यांसीही वाटलें समाधान ॥ तेकाळीं उपरम पावोन ॥ वंदिती चरण नाथाचे ॥ ५८ ॥ धन्य धन्य तूं समर्थ ॥ आमुचे पूर्ण जाले मनोरथ ॥ मानवी नव्हेसी निश्चितार्थ ॥ श्रीएकनाथ पूर्णब्रह्म ॥ ५९ ॥ जगदोद्धारी अवतार ॥ सकळांसी मानला साचार ॥ जयजयकाराचा गजर ॥ नारी नर गर्जती ॥ ६० ॥ निर्वाणकाळ स्वानंदस्थिती ॥ जनीं प्रगटली ऐसी ख्याती ॥ संत सनकादिकांची पंक्ती ॥ गगनींहून पाहती महिमान ॥ ६१ ॥ श्रीनाथ स्वानंदस्थिती ॥ स्वलीळा बैसोन स्वेच्छागती ॥ काय बोलिला जनाप्रती ॥ तेंचि श्रोतीं परिसावें ॥ ६२ ॥ सद्गुरु जनार्दन जनीं ॥ प्रत्यक्ष तुझा पाहतो नयनीं ॥ देवें मानूनि तुमची वाणी ॥ अभिनव करणी दाविली हे ॥ ६३ ॥ भगवज्जनाचें मरण ॥ केवीं होय सकळांसमान ॥ म्हणोनि येवढें महिमान ॥ देवें आपण प्रगटविलें ॥ ६४ ॥ ऐसें बोलोन समस्तांसी ॥ आज्ञापिलें उद्धवासी ॥ दिंडी समारंभ सिद्धीसी ॥ कीजे त्वरेसी येकाळीं ॥ ६५ ॥ पुत्र मित्र इतरजन ॥ सर्वांसी आज्ञा प्रमाण ॥ श्रीनाथाचें निजधाम गमन ॥ स्वलीळा संपूर्ण श्रुतजना गौरव ॥ ६६ ॥ ऐकोन नवल वर्त्तमान ॥ समस्त ग्रामस्थ जे जन ॥ लहान थोर मिळोन ॥ श्रीनाथदर्शन घेवों आले ॥ ६७ ॥ गंगातिरीं दो चौ कोसीं ॥ जनलोक ग्रामवासी ॥ पाहों पातले सत्वरेसी ॥ नाथदर्शनासी सकळिक ॥ ६८ ॥ बिदोबिदीं गंगातिरीं ॥ ठाईठाईं नरनारी ॥ श्रीनाथस्तुति परस्परी ॥ करिती निरा गजरीं सप्रेमें ॥ ६९ ॥ सकळजनांच्या वृत्ती ॥ नाथस्वरूपीं एकाग्रमती ॥ भाविकजन विलाप करिती ॥ गुंतली प्रीति नाथरूपीं ॥ ७० ॥ यापरी सुखसंपन्न ॥ श्रीनाथाचे निजगुण ॥ आठऊनि समस्त जन ॥ करिती

स्तवन अतिप्रीती ॥ ७१ ॥ श्रीनाथ अवतार पूर्ण ॥ मानवी नव्हे नव्हे आपण ॥ ऐसें बोलती सकळ जन ॥ जनीं जनार्दन सत्यवाणी ॥ ७२ ॥ थोरथोर महाजन ॥ समारंभसाहित्य घेऊन ॥ निर्वाणकाळींचें दर्शन ॥ प्रेमें संपूर्ण पाहती ॥ ७३ ॥ वारंवार नमिती चरण ॥ पुढतापुढती अवलोकन ॥ पुढती हें सगुण दर्शन ॥ दुर्लभ जाणून पाहती ॥ ७४ ॥ सकळ दिंडी सिद्धता ॥ पताकांची शोभा पाहतां ॥ सगुण स्वरूप वियोगव्यथा ॥ न बाधी चित्ता तयांचिया ॥ ७५ ॥ श्रीनाथ परब्रह्ममूर्त्ती ॥ सगुण निर्गुण अभेद प्राप्ती ॥ केशवासी निजचित्तीं ॥ येकत्वें प्रीति नाथचरणीं ॥ ॥ ७६ ॥ इतिश्रीएकनाथचरित्रे गावोबाशिष्यचरित्रकथनोनामत्रिंशतिमोध्यायः ॥

---

## अध्याय एकतिसावा.

श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ ॐनमो श्रीएकनाथा ॥ अद्वया अव्यया अच्युता ॥ गुणीं निर्गुणत्वें वर्तता ॥ नाहीं ममता तुज देहीं ॥ १ ॥ तुझें ऐश्वर्य अघटित ॥ बाळपणीं वैराग्य अद्भुत ॥ देहचि जनार्दन रूप होत ॥ हे विख्यात कीर्ति तुझी ॥ २ ॥ कृष्णदासाचिये अवसानीं ॥ काळासीं तुवां आज्ञापुनी ॥ अकरा दिवस वांचवुनी ॥ अभिनव करणी पैं केली ॥ ३ ॥ अवतार चरित्रें पावन ॥ विशेष जगदोद्धारण ॥ अंग सद्भक्ति आचरुन ॥ धर्म स्थापन पैं केला ॥ ४ ॥ स्वलीला निजधाम प्रयाण ॥ करूं इच्छिसी आपण ॥ निजजना लावूनि ध्यान ॥ सगुणपण आवरिसी ॥ ५ ॥ सिद्धता जाली दिंडीची ॥ विनंति ऐकून उद्धवाची ॥ आसनीहूनि अंगेंची ॥ उठिला वेगेंचि सवेग ॥ ६ ॥ गंगाजळ आणोनि आपण ॥ स्वहस्तेंचि केलें स्नान ॥ द्वारावती तिलक चर्चून ॥ केलें परिधान धूतवस्त्र ॥ ७ ॥ स्कंदीं वाहूनिया वीणा ॥ आरंभिलें हरिकीर्त्तना ॥ हरिनामस्मरण गर्जना ॥ करवीं जना सकळां मुखें ॥ ८ ॥ हरिजन समुदायेसी ॥ करित चालती कीर्त्तनासी ॥ पदोपदीं पूजनासी ॥ करितां जनासीं प्रेम दाटे ॥ ९ ॥ सुमनें तुळसीमाळा कंठीं ॥ जन घालिती महा दाटी ॥ स्वर्गींहूनि पुष्पवृष्टी ॥ होत दृष्टि देखती ॥ १० ॥ बुका उधळित चहूंकडोनी ॥ जनासी प्रेम नावरे मनीं ॥ पुढतपुढती अवलोकुनी ॥ पाहती नयनीं नाथासीं ॥ ११ ॥ आतां दुर्लभ सगुण भेटी ॥ गुण आठवितां बाष्प दाटी ॥ शब्द नुमटे स्पष्ट कंठीं ॥ आक्रंदोनि उठती जन तेव्हां ॥ १२ ॥ श्रीनाथ स्थिति प्रकार ॥ निर्ममो निरहंकार ॥ निजधामा गमन आल्हादपर ॥ करित गजर हरिनामाचा ॥ १३ ॥ तेकाळीं जनाची प्रीती ॥ आरत्या पदोपदीं ओंवाळिती ॥ सुमन तुळसीमाळा हातीं ॥ घालोनि वंदिती चरणातें ॥ १४ ॥ सप्रेमें पाहतां वदन ॥ असुवें गळतीं लोचन ॥ पुढती आह्मांसी दर्शन ॥ दुर्लभ ह्मणोन निरिक्षिती ॥ १५ ॥ श्रीनाथ निजधाम गमन ॥ तेणें समाधिस्थ सकळ

जन ॥ देहगेहाची आठवण ॥ नाहीं भान संसारींचें ॥ १६ ॥ श्रीनाथ स्वरूप चित्तीं ॥ अंतर्बाह्य तेंचि क्षितीं ॥ सद्भावें ऐसी स्थिती ॥ जडली प्रीति नाथचरणीं ॥ १७ ॥ सनकादि मुनिपंक्ती ॥ सुरवर विमानीं दाटती ॥ श्रीनाथाची निर्वाण स्थिती ॥ पाहून वर्षती सुमनवृष्टी ॥ १८ ॥ हरिनाम गिरा गजरी ॥ वैष्णव गाती मधुर स्वरीं ॥ यापरी जनपरिवारी ॥ चालती हारी जनांच्या ॥ १९ ॥ पदोपदीं नामकीर्ती ॥ स्वमुखें नाथ वर्णिती ॥ तो आनंद त्रिजगतीं ॥ दुर्लभ सद्भक्ति उत्साव ॥ २० ॥ वाद्यें वाजती नाना परी ॥ टाळ मृदंग शंख भेरी ॥ नाद नसमाये अंबरीं ॥ ऐशा परी चालती ॥ २१ ॥ श्रीनाथ गुणाची आठवण ॥ तेंचि वर्णन तेंचि श्रवण ॥ नाथदर्शन अवलोकन ॥ वारंवार निरिक्षून चालिलें ॥ २२ ॥ पुढतपुढती वंदन ॥ पुढती देती आलिंगन ॥ ऐसिया आवडी करून ॥ मिरवत आपण जातसे ॥ २३ ॥ नगरप्रांताहून नाथ ॥ गंगातिरीं पायीं चालत ॥ जातसे आनंदभरित ॥ जन समस्त परिवारी ॥ २४ ॥ लक्ष्मीतीर्थ वाळुवंटीं ॥ जनासीं बैसवूनि थाटी ॥ नरनारी मिळाली कोटी ॥ अतिशय दाटी पैं जाली ॥ २५ ॥ सकळ बैसवूनि निवांत ॥ स्वयें कीर्तन आरंभित ॥ अवसान समय रस अद्भुत ॥ प्रेम वोसंडत सकळ जनां ॥ २६ ॥ श्रीनाथ कीर्तनाची गोडी ॥ श्रवणीं श्रोतियां आवडी ॥ भक्तिरहस्य परवडी ॥ चवी गाढी लाधलीसे ॥ २७ ॥ संतजनां अति प्रीती ॥ अत्यादरें एकाग्र चित्तीं ॥ नाथकीर्तन श्रवण करिती ॥ माथे डोलविती निजानंदें ॥ २८ ॥ ते काळीं विद्वज्जन ॥ श्रीनाथासी करिती प्रश्न ॥ पुन्हा ऐसा अवतार पूर्ण ॥ कधीं अवतरण होईल क्षिती ॥ २९ ॥ ऐकोनि त्याचें वचन ॥ श्रीनाथ कृपाळू पूर्ण ॥ अभंग बोलिले आपण ॥ केलें समाधान सकळांचें ॥ ३० ॥ अभंग ॥ आह्मी कां संसारा न येणें ॥ करोनियां हरिभक्ती ॥ रामनाम कीर्ती ॥ जड जीव उद्धरणें ॥ धृ० ॥ साच असतां तरी ॥ धाक धरितां चित्तीं ॥ भव विभव प्राप्ती ॥ समूळ मिथ्या ॥ १ ॥ जैं धर्माची वाट मोडे ॥ अधर्माची शीग चढे ॥ तैं आह्मां येणें पडे ॥ संसारास्थिती ॥ २ ॥ नाना मतें पाषांड ॥ कर्मठायीं अति बंड ॥ तयाचें ठेंचावें तोंड ॥ हरिभजनें ॥ ३ ॥ जे जे लीला विचित्र ॥ तें तें माझें चरित्र ॥ देवभक्त एकत्र ॥ भेद नाहीं ॥ ४ ॥ जो जो अवतार हरि धरी ॥ तो तो मीच अवधारीं ॥ हरि नाम गजरीं ॥ जगदोद्धारा ॥ ५ ॥ सर्वभूतीं भगवद्भावो ॥ भक्तीचा निर्वाहो ॥ धर्माचा आहंभावो ॥ वाढवणें ॥ ६ ॥ सर्वभूतीं भगवद्भक्ती ॥ प्रतिपादवी वेदोक्ती ॥ हेंचि एक निश्चिती ॥ करणें आह्मां ॥ ७ ॥ लीलाविग्रही भगवंत ॥ तया ह्मणती नित्य मुक्त ॥ आह्मी काय तेथें ॥ वेगळे असो ॥ ८ ॥ विश्वरूप सृष्टी ॥ अर्जुना दाविली दिठी ॥ भिन्न भेदाची गोष्टी ॥ बोलों नये ॥ ९ ॥ वत्सा हरणीचें चरित्र ॥ वत्सें गोंवळें स्वयें स्वतंत्र ॥ पावे पायतणें कटिसूत्र ॥ आपण जाला ॥ १० ॥ एका-

जनार्दनीं विश्वरूप गोविंद ॥ भेद धरितो निंद्यहि अति निंद्य ॥ ११ ॥ ओवी ॥ निर्वाण काळीचा अभंग ॥ यथास्थित अक्षरें अभंग ॥ अर्थ व्याख्यान अति सांग ॥ सांगितला प्रसंग भविष्याचा ॥ ३१ ॥ निजात्मस्थिति परिपूर्ण ॥ निजांगें दाविलीं आचरून ॥ तेंचि प्रतिपाद्य बोलून ॥ अभंग संपूर्ण पैं केला ॥ ३२ ॥ या अभंगाचा अर्थ ॥ सावधानता एकाग्र चित्त ॥ परिसोनि संत महंत ॥ जाले निभ्रांत निजमती ॥ ॥ ३३ ॥ नाथस्वरूप चैतन्य घन ॥ लीला विग्रहें अवतरोन ॥ केलें जगाचें उद्धरण ॥ निश्चय पूर्ण मानिला ॥ ३४ ॥ पूर्णावतार सत्पुरुषपण ॥ भगवंतचि असे आपण ॥ या अवताराचें महिमान ॥ वरिष्ठता पूर्ण दाविली ॥ ३५ ॥ संत सज्जन भाविक जन ॥ श्रीनाथ स्थिति परिपूर्ण ॥ अनुभवा आली हें जाणून ॥ करिती वंदन सप्रेमें ॥ ३६ ॥ श्रीनाथ चरणीं समस्त ॥ साष्टांग घालिती दंडवत ॥ निर्वाणकाळ यापरि होत ॥ उत्साहकृत्य यात्रा जेवीं ॥ ३७ ॥ श्रीनाथही आपण ॥ सकळां करितसे नमन ॥ कृपा असों द्या संपूर्ण ॥ बोलिले वचन शेवटीचें ॥ ३८ ॥ आतां आरतीचें श्रवण ॥ निवांत ऐकिजे सकळजन ॥ ऐकोन आज्ञावचन ॥ एकाग्र मन पैं जालें ॥ ३९ ॥ समाप्तीची आरती ॥ समस्त जन श्रवण करिती ॥ निर्वाण काळ वक्तृत्वस्थिती ॥ ऐकिजे श्रोतीं ते वाणी ॥ ४० ॥ आरती ॥ अवलोकितां जन दिसे जनार्दन ॥ भिन्नाभिन्न कैसें दावी अभिन्न ॥ अनेक एकत्वें दिसे परिपूर्ण ॥ ठकली मनबुद्धि कैंचे गुणागुण ॥ १ ॥ जयदेव जयदेव जय जनार्दना ॥ परमार्थें आरती अभिन्नभावना ॥ धृ० ॥ ज्योतीच्याही ज्योति उजळूनियां दिप्ती ॥ तेणें तेजें केली सतेज आरती ॥ पाहतां पाहणेंपण पाहावया स्थिती ॥ नुरेचि वेगळें देह आणि दीप्ती ॥ २ ॥ उजळीतें उजळ उजळाव्या लागीं ॥ वेगळेपण कैंचे नुरेची भांगीं ॥ अंगें अर्पियेलें अंगीच्या अंगीं ॥ जीव शिव गेले हरपोनी वेगीं ॥ ३ ॥ पाठीना पोटीं अवघा निघोट ॥ सर्वांगें देखणा सर्वां वरिष्ठ ॥ इष्ट अनानिष्ट गुप्त ना प्रगट ॥ अहं सोहं दोनी भरियेला घोट ॥ ४ ॥ सर्वदां दिसे परि नकळे मना ॥ जें जें दिसे तें तें दर्शन जाणा ॥ अभाव भावेंसी हरली भावना ॥ अभिन्न आरती एका जनार्दना ॥ ५ ॥ ओव्या ॥ आरती ऐकतां संपूर्ण ॥ समाधि स्थिति निजलक्षण ॥ संत सज्जना विश्रांति कारण ॥ जालें समाधान जीव शिवा ॥ ४१ ॥ सकळांसी पुसोनि नाथ ॥ तनु त्यागें प्रवर्ते समर्थ ॥ गंगाजळीं नाभीपर्यंत ॥ स्वलीळा सोडित देहासी ॥ ४२ ॥ आपुली जे निजात्म स्थिती ॥ प्रतिपाद्य करूनि सद्भक्ती ॥ भक्तध्यानीं स्थापूनि कीर्त्ती ॥ गेला निजधामाप्रती ॥ निजात्मयोगें ॥ ४३ ॥ देहादि संमंधाची प्राप्ती ॥ ज्ञात्यासी नाहीं आसक्ती ॥ तेचि दाऊनि लोकांप्रती ॥ गेला निश्चिती निजधामा ॥ ४४ ॥ श्रीनाथाचें निजधामगमन ॥ स्वलीळा गेला देह टाकून ॥ अतर्क्य अवतार लक्षण ॥

पाहिलें महिमान येकाळीं ॥ ४५ ॥ पुत्र मित्र भाविक जन ॥ त्यांच्या विलापाचें लक्षण ॥ वर्णावयाचें कारण ॥ वृत्तीसी जाण नयेची ॥ ४६ ॥ उद्धवादि अभेद-भक्त ॥ नाथ निजकृपा बोध प्राप्त ॥ सगुण वियोगें ज्याचें चित्त ॥ बाधा निश्चिती नपवे पैं ॥ ४७ ॥ अवतारसमाप्ति निर्वाण ॥ पाहूनियां ब्राह्मण ॥ देहसंस्कार विधि पूर्ण ॥ करविती दहन देहाचें ॥ ४८ ॥ यथाविधि संस्कार ॥ पुत्राकरीं कर-विती विप्र ॥ बाह्यधर्म लौकीक प्रकार ॥ केला साचार शास्त्ररिती ॥ ४९ ॥ पर-मार्थलीला विचित्र ॥ दाउनी अद्भुत चरित्र ॥ सद्भक्तिमार्ग पवित्र ॥ स्थापिला स्वतंत्र जगदोद्धारा ॥ ५० ॥ ऐसी करुनी ख्याती ॥ स्वेच्छा स्वानंद स्थिती ॥ श्रीएकनाथ परंज्योती ॥ गेला निजधामाप्रति स्वलीला ॥ ५१ ॥ षड्गुणैश्वर्य संपन्न ॥ दाऊनि अवतार पूर्णपण ॥ भक्ति वैराग्य ज्ञान निपुण ॥ यश परिपूर्ण विस्तारिलें ॥ ५२ ॥ ज्यांसी श्रीनाथाचें ध्यान ॥ ज्यांसी श्रीएकनाथ स्मरण ॥ ज्यांसीं घडलें चरण वंदन ॥ तेही धन्य निजस्थिती ॥ ५३ ॥ ज्यांसी मैत्री श्रीनाथासी ॥ श्रीनाथाचे सहवासी ॥ श्रीनाथ निकटवासी ॥ ते ते आह्मासी परमवंद्य ॥ ५४ ॥ ज्यांसीं श्रीनाथाचें प्रेम ॥ ज्यांसीं श्रीनाथाचें दर्शन नेम ॥ श्रीनाथचि ज्यांचें कर्म ॥ ते ते परमपूज्य आह्मां ॥ ५५ ॥ भाव असो नसो मनीं ॥ परि ज्यांसी दर्शन अनु-दिनी ॥ ते ते जाण सर्व प्राणी ॥ पावनपणीं वंद्य आह्मां ॥ ५६ ॥ श्रीनाथ निजात्म स्थिती ॥ सद्गुरु कृपा ज्यांसी प्राप्ती ॥ ते वंद्य गुरुमूर्त्ति ॥ भाव निश्चिती हा माझा ॥ ॥५७॥ जेथें जेथें श्रीनाथ कीर्त्ती ॥ आदरें जे गुण वर्णिती ॥ ते ते गुरुत्वें आह्मा प्रती ॥ वंद्य होत निजभावें ॥ ५८ ॥ यापरी समस्त जन ॥ श्रीनाथदर्शनें पावन ॥ त्यांसीं माझें लोटांगण ॥ हें विनवणें केशवाचें ॥ ५९ ॥ यावरीं जन समस्त ॥ निर्वाण चरित्र परमाद्भुत ॥ पाहूनियां आद्यंत ॥ गुण वर्णित सप्रेमें ॥ ६० ॥ पदोपदीं यश विस्तार ॥ बोलताती नारी नर ॥ स्वलीला समाप्ति अवतार ॥ पावन चरित्र पैं केलें ॥ ॥ ६१ ॥ यापरी गुण आठवितां ॥ सप्रेमें करिती अश्रुपाता ॥ श्रीनाथ सद्भाव चित्ता ॥ दुजी वार्ता नावडे वें ॥६२॥ नर नारी समस्त जन ॥ स्वगृहालागीं जाऊन ॥ श्रीनाथ चरित्र वर्णन ॥ अनुदिनीं आपण आठविती ॥ ६३ ॥ दुसरे दिवसीं पुत्रासहित ॥ देहदहन-स्थळीं समस्त ॥ अस्थि गोळा करावया येत ॥ पाहती अद्भुत नवलावो ॥ ६४ ॥ कृष्ण-तुळसी रोपासी ॥ मध्यें एक पिंपळासी ॥ इतुकें देखतां त्यासी ॥ नवल आश्चर्यासी वर्णिती ॥ ६५ ॥ भस्म आणि अस्थि पाहतां ॥ तुळसी रोंप जालें तत्वतां ॥ चैतन्य स्वरूप निज सत्ता ॥ हेही पूर्णता दाविली ॥ ६६ ॥ मिळोनि समस्त विद्वज्जन ॥ ह्मणती हें पूर्ण महिमान ॥ अवतार समाप्तीवरी आपण ॥ आस्तिकपण प्रतिपादिलें ॥ ॥ ६७ ॥ श्रीनाथाचें निर्वाण ॥ सहसा कल्पूं नये मरण ॥ याचिलागीं सभा परिपूर्ण ॥

दाविलें विंदान देहदृष्टी ॥ ६८ ॥ जनासी भजन पूजन ॥ करावयालागीं जाण ॥ भावार्थ सद्भक्ति स्थापन ॥ केलें आपण श्रीनाथें ॥ ६९ ॥ जगदोद्धारालागीं नाथ ॥ अवतरला होता समर्थ ॥ अवतार समाप्तीवरी हा अर्थ ॥ भाविकांचे मनोरथ पुरवील कीं ॥ ७० ॥ ऐसियापरी प्रतिपाद्यता ॥ जाणोनीं श्रीनाथ सत्ता ॥ समाधि वृंदावन तत्वता ॥ पूर्ण ऐश्वर्यता स्थापिलें ॥ ७१ ॥ कृष्णतुळसी रोंपाकृती ॥ निर्वाणा वरील निजस्थिती ॥ अश्वत्थ निजरूप विभूती ॥ प्रगट मूर्त्ति स्वयें असे ॥ ७२ ॥ समाधि सिद्ध करून ॥ उत्साह करिती भक्तजन ॥ अद्यापिवरी महिमान ॥ उत्कर्ष जाण पैं असे ॥ ७३ ॥ पादुकांचें स्थापन ॥ समाधिवरी असे जाण ॥ भावार्थें घडलिया नमन ॥ भक्तीचें लक्षण प्रगटे देहीं ॥ ७४ ॥ ज्यांसी परमार्थाची चाड ॥ साचार देवाची आवड ॥ तिहीं अन्य उपासना काबाड ॥ त्यजूनि दृढभावार्थ कीजे ॥ ७५ ॥ सद्भाव धरूनि चित्तीं ॥ श्रीपादुका जे वंदिती ॥ त्यांचे मनोरथ पूर्ण होती ॥ अधिकारें प्राप्ति सद्भक्ती ॥ ७६ ॥ वाचा रमण शब्द फोल ॥ सहसा न मानिजे हे बोल ॥ श्रीनाथ कृपा पतित अढळ ॥ जालिया केवळ उद्धार येती ॥ ७७ ॥ आमुचा सर्व उपाय ॥ श्रीएकनाथाचे धरिले पाय ॥ तेणेंचि परमार्थाची सोय ॥ गुरुकृपा होय निजप्राप्ती ॥ ७८ ॥ केवळ मूर्ख मंद-मती ॥ कांहींच नेणें शास्त्ररीती ॥ ऐसिया मज अधमाप्रती ॥ कृपा प्राप्ति वक्तृत्वें ॥ ७९ ॥ हेंचि आश्चर्य वाटे मनीं ॥ मी तो मूर्ख शिरोमणी ॥ अकस्मात् फुटली वाणी ॥ नवल करणी गुरुकृपेची ॥ ८० ॥ विवेक दृष्टी विचारितां ॥ मी येथें नव्हे कविकर्त्ता ॥ प्रगटूनि श्रीनाथ सत्ता ॥ होय वर्णिता स्वयें तोची ॥ ८१ ॥ माझे पदरींची वाणी ॥ नव्हे ऐसें मानी ॥ श्रीनाथ वक्ता वदनीं ॥ श्रोताहि जनीं स्वयें तोची ॥ ८२ ॥ मजमाजी जें मीपण ॥ श्रीएकनाथ स्वयें आपण ॥ त्याची कृपा परिपूर्ण ॥ हेंचि वचन तयाचेंची ॥ ८३ ॥ देहाचें संरक्षण ॥ त्याचिया सत्ता होय चळण ॥ मीतूंपणाची बोळवण ॥ कृपा संपूर्ण तेणें केली ॥ ८४ ॥ नवल कृपेचें विंदान ॥ दवडूनि माझें मीपण ॥ त्याहीवरी निजभजन ॥ न करितां जाण स्वयें करवी ॥ ८५ ॥ मनासीं लावूनि छंद ॥ स्वचरित्राचे प्रबंध ॥ स्वलीला वदवीतसे शब्द ॥ प्रताप अगाध सत्तेचा ॥ ८६ ॥ यापरि श्रीएकनाथ ॥ तृप्त करी मनोरथ ॥ अनाथासी सनाथ ॥ करोनि मनोरथ पुरवी सदां ॥ ८७ ॥ माझे पुरवावे मनोरथ ॥ तंव तेचि जाले एकनाथ ॥ नाथें केलें नित्य तृप्त ॥ सद्भावार्थ प्रसाद त्याचा ॥ ८८ ॥ भावार्थाची निजखूण ॥ तोचि प्रतिपाळी आपण ॥ ऐसें त्याचें कृपाळू-पण ॥ केशव शरण सर्वस्वेंसीं ॥ ८९ ॥ श्रीनाथ चरित्र वर्णन ॥ त्याचिया सत्ता जालें संपूर्ण ॥ केशवाचें समाधान ॥ चरणा शरण निजस्थिती ॥ ९० ॥ इतिश्रीए-

कनाथचरित्रे नाथनिजधामगमनोनामएकत्रिंशतिमोध्यायः ॥ ३१ ॥ शके १७१४ परिधाविनामसंवत्सरेउत्तरायणेमाघशुक्ल १३ इंदुवासरेक्षेत्रपंचवटीश्रीसीतारामचरणसन्निधानेसंपूर्ण ॥ श्रीरामार्पणमस्तु ॥ श्रीनाथार्पणमस्तु ॥

---

## एकनाथ स्तुति.

### अभंग.

शरण शरण शरण एकनाथा । चरणीं माथा ठेविला ॥ १ ॥
नका पाहूं गुण दोष । झालों दास पायांचा ॥ २ ॥
आतां मज उपेक्षितां । नाहीं सत्ता आपुली ॥ ३ ॥
तुका ह्मणे भागवत । केलें श्रुत सर्वांसी ॥ ४ ॥

### मोरोपंतांच्या आर्या.

श्रीभागवत वरानें केलें यश शुद्ध एकनाथानें ॥
येणें प्रमुदित झाला साधु जसा बाळ सेवितां थानें ॥ १ ॥
भूत दया संसारीं एकोपंतास निरुपमा घडली ॥
जडली अंगासीच क्षांति सदा शांति तो गळां पडली ॥ २ ॥
एकोबाची सेवा आवडली फार केशवा देवा ॥
रोमांचित तनु झाल्या गंगा कृष्णा कलिंदजा रेवा ॥ ३ ॥
अत्यद्भुत यश हारिचें जेवि तसें एकनाथ पंताचें ॥
तें तें साचें जें जें वर्णितसे चरितवृंद संताचें ॥ ४ ॥
भूताराधन यज्ञीं समदर्शी एक परम हार मला ॥
द्रवुनि ह्मणे पित्रान्नें भोज्य जगन्निंद्य परम हा रमला ॥ ५ ॥
एकोपंत जनार्दन पंताचें भजनही असीम करी ॥
याची मति गुरुचरणीं भक्षीं घालीत मिठी असि मकरी ॥ ६ ॥
कथिती एकोबाच्या चरणाची अद्भुताचि बा शुचिता ॥
रक्षी बाळ सतीच्या तनुतें भस्म करूनि आशु चिता ॥ ७ ॥
श्रीज्ञानेश्वर भेटे एकोबाला तसाच अत्रिज गा ॥
हे किति दास्य करी प्रभु ज्याहुनि आधार अन्य न त्रिजगा ॥ ८ ॥
ग्रंथ श्रीभागवत श्रीरामायण करी सुविस्तर ते ॥
जरि न रचिता तयानिधि केवळ जडजीव तरी कसे तरते ॥ ९ ॥
विश्वेश्वर अविमुक्तीं विठ्ठल पंढरपुरीं प्रतिष्ठानीं ॥
प्रभु एकनाथ वरिला सर्व महित देवत प्रतिष्ठानी ॥ १० ॥

संत ह्मणति आठवती विघ्नि ह्मणे आठवे अळंदीन ॥
पाहुनि वृंदावन ते तैसे हे हि ह्मणे अळंदीन ॥ ११ ॥
ज्या पैठणांत षष्ठी तो संसारीं कधीं नव्हे कष्टी ॥
हे स्वस्थाना नेते रक्षुनि अंधाबळा जसी यष्टी ॥ १२ ॥
भक्तांसि नाथ जैसा विश्वाचा मायबाप हर पावे ॥
साक्षाद्भगवान् हा कीं या भजता सर्व ताप हरपावे ॥ १३ ॥
प्रभुभक्त प्रभुरूप स्पष्ट ह्मणुनि एकनाथ हा भावें ॥
स्तविला भक्तमयूरें कीं येणें सर्व इष्ट लाभावें ॥ १४ ॥

---

## मुक्तेश्वरकृत
# श्रीएकनाथाचें चरित्र.

श्रीगुरुभ्योनमः ॥ ॐन्नमोजी विश्वंभरू ॥ तो देव दत्तात्रय जगद्गुरू ॥ जनार्दना अभयंकरू ॥ कटाक्षेशीं वाणला ॥ १ ॥ त्याचे चरणीं एकनाथें ॥ सुमन ठेविलें पुरुषार्थें ॥ सेवा आरंभिली भावार्थें ॥ जनी जनार्दन ह्मणवुनी ॥ २ ॥ एका जनार्दनाचा महिमा ॥ गूढार्थ वाटे पुराणागमा ॥ शम दम करुणेची सीमा ॥ पूर्ण गरिमा वाढली ॥ ३ ॥ जो स्वयें जगद्गुरू ॥ नेणें विधीचा अवतारू ॥ किंवा ऐसे परीचे हरिहरू ॥ धरिती अवतारु भक्तीलागीं ॥ ४ ॥ गंगातीर अति पावन ॥ विख्यात जगीं प्रतिष्ठान ॥ तेथें एकनाथ राहून ॥ ब्राह्मण पूजन करीतसे ॥ ५ ॥ पूर्ण गुरु भक्तीचा सागर ॥ भक्तीनें तोषविला रमावर ॥ सदा बसवी त्याचें घर ॥ गोदातीर अति पावन ॥ ६ ॥ अवलंबिलें सदावर्त ॥ समयीं आलिया अभ्यागत ॥ भोजन देऊन इच्छातृप्त ॥ पूजा करी मनोभावें ॥ ७ ॥ ऐसी जाणोनी तयाची स्थिती ॥ रमारमणें मांडिली ख्याती ॥ ब्राह्मण वेगें श्रीपती ॥ द्वारकेहुनी पातले ॥ ८ ॥ भक्त साह्यार्थी धाविन्नला ॥ येउनी अंगणीं उभा ठेला ॥ एकनाथें दृष्टीं देखिला ॥ सकृप जाला तत्काळ ॥ ९ ॥ ब्राह्मण बोले मंजुळ वचन ॥ दर्शनें तृप्त जालों तुमचेन ॥ कांहीं काळ सेवा करीन ॥ तुमची स्वामि आदरें ॥ १० ॥ ऐक बापा एकनाथा ॥ तुझीया सेवेसी रहावें आतां ॥ ऐसी आवडी आहे चित्ता ॥ अनुग्रह आतां मज कीजे ॥ ११ ॥ मज नलगे सर्वथा वेतन ॥ उदरापुरतें पाहिजे अन्न ॥ वस्त्रें द्यावीं जीर्ण जीर्ण ॥ सेवा करीन निशीदिनीं ॥ १२ ॥ मग एकनाथ बोलिले ॥ नाम सांगिजे आपुलें ॥ परिग्रह काय पुसियलें ॥ येणें जालें कोठोनी ॥ १३ ॥ येरू ह्मणे जी ऐका ॥ माझा परिग्रह मी चि इतुका ॥ कृष्णनाम ऐसें देखा ॥ आहे ठाउका जनासी ॥ १४ ॥ ऐसें बोलोनि तये वेळां ॥ श्रीहरिसेवेसी लागला ॥

कावडी भरुनी गंगाजळा ॥ आपण आंगें पैं आणी ॥ १५ ॥ जीवन वाहे जग-ज्जीवन ॥ संपूर्ण भरी रांजण ॥ ब्राह्मणालागीं सुचंदन ॥ उगाळुनी ठेवीतसे ॥ १६ ॥ धोत्रें पात्रें धूतसे पाही ॥ सेवेसी सादर सर्वांठायीं ॥ देवपूजेचे समईं ॥ समीप लव-लाहीं तिष्ठत ॥ १७ ॥ ऐसा तत्पर सर्वांठायीं ॥ अंग चोरूं नेणें कांहीं ॥ देह धर्माची वार्ता नाहीं ॥ आनंद पाही सर्वदां ॥ १८ ॥ ऐसें द्वादश वर्षेंपर्यंत ॥ अव-लंबे सेवा करित ॥ भक्तसाहाकारी भगवंत ॥ राहटत असे निशीदिनीं ॥ १९ ॥ येरीकडे द्वारकेसी ॥ ब्राह्मण आला सद्भावेंसी ॥ तप आचरावें सायासी ॥ ह्मणोनी पाहे सिद्धस्थान ॥ २० ॥ कृष्णकृपेची आनंदलहरी ॥ मोक्षसिद्धि वैकुंठास दुसरी ॥ नगर रचिलें गोमतीतिरीं ॥ अति उत्तम द्वारका ॥ २१ ॥ गोमतीतिरीं तुळसी-वन ॥ श्रीवृक्षातळीं घालुनी आसन ॥ सुमनीं पुजुनी श्रीचरण ॥ मनीं ध्यान कृष्णाचें ॥ २२ ॥ अहार नेम अनुष्ठान ॥ मुखें स्मरे कृष्णकृष्ण ॥ हरि छंदें परिपूर्ण ॥ निजध्यास ब्राह्मणा ॥ २३ ॥ एकाग्र करूनियां मन ॥ आणी सीत उष्ण साहून ॥ हृदयीं धरितां भगवान ॥ जगज्जीवन कळवळीला ॥ २४ ॥ ऐसें द्वादश वर्षेंपर्यंत ॥ भावें भजतां भगवंत ॥ प्रसन्न होऊनी स्वप्नांत ॥ मात सांगे ब्राह्मणां ॥ २५ ॥ तूं जया-लागीं तप करिसी ॥ तो येथें नाहीं द्वारकेशी ॥ प्रतिष्ठानीं सुखवासी ॥ भक्तापायीं राहिला ॥ २६ ॥ प्रतिष्ठानीं एकनाथ ॥ अवतार स्वयें मूर्तिमंत ॥ त्याचे घरीं मी निभ्रांत ॥ सेवेलागी तिष्ठलों ॥ २७ ॥ नामें श्रीखंड्याकृष्ण ॥ सांगीतली निजखूण ॥ जागृत होउनी ब्राह्मण ॥ स्वप्न क्षणक्षणा आठवी ॥ २८ ॥ नवल देखिलें स्वप्नांत ॥ कैसा भक्त एकनाथ ॥ मनीं होतसे विस्मित ॥ श्रीभगवंत करी सेवा ॥ २९ ॥ उठोनी बैसे आसनीं ॥ कृष्ण कृष्ण गर्जे वाणी ॥ आनंद न समाये गगनीं ॥ जाला मनीं विस्मित ॥ ३० ॥ धन्य धन्य एकनाथ ॥ सर्वां भूतीं भगवंत ॥ ऐसें आचरता रमा कांत ॥ सुखावलों ते ठायीं ॥ ३१ ॥ ह्मणवून चालिला त्वरेन ॥ केव्हां पाहीन पैठण ॥ केव्हां देखेन एकाजनार्दन ॥ तातडी मोठी दर्शनाची ॥ ३२ ॥ मार्गीं चालिला अतित्वरा ॥ सवेग पावला गंगातीरा ॥ तंव कावडी घेउनी सामोरा ॥ देखिल सोयरा जगाचा ॥ ३३ ॥ तापसी पाहे न्याहाळून ॥ जीवना आला जगज्जीवन ॥ अज्ञान योगें जालें दर्शन ॥ समाधान तापसा ॥ ३४ ॥ देवें तापसासी देखिलें ॥ याचें आगमन नव्हे भलें ॥ येथुनी गमन पाहिजे केलें ॥ प्रगट करील तापसी ॥ ॥ ३५ ॥ तंव ब्राह्मण तापसी ॥ पुसता जाला आदरेंसी ॥ काय नाम जी तुम्हासी ॥ एकनाथासी जाणतां ॥ ३६ ॥ देव ह्मणे तापसी ॥ मोठा अनुष्ठानी आलासी ॥ शोधोनि पाहें नगरासी ॥ ह्मणोनी कावडेसी चालिला ॥ ३७ ॥ ऐसें ऐकोनी वचन ॥ आधीं घेऊं कृष्णदर्शन ॥ मग करूं गंगास्नान ॥ ह्मणोनी वंदन

पैं केलें ॥ ३८ ॥ अहोजी तपोनिधि ब्राह्मणा ॥ बसा करूं द्या पूजना ॥ येरु ह्मणे नाहीं करुणा ॥ श्रीकृष्णदर्शन मज करीं ॥ ३९ ॥ अंगणीं येतांची तापसी ॥ एकनाथें देखिलें त्यासी ॥ मग उठोनी आदरेंसी ॥ नमन तयासी पैं केलें ॥ ४० ॥ मी आलों द्वारकेहुनी ॥ गोमती संगमीं अनुष्ठानी ॥ मनीं आवडी धरुनी ॥ कृष्ण भेटवी लवकरी ॥ ४१ ॥ अरे या विश्वामाजी पाही ॥ विश्वीविश्वामाजी भेद नाहीं ॥ विश्वामाजी असे तोही ॥ जोकां विश्व आपणची ॥ ४२ ॥ तेथें वेगळे-पणें कैचा ॥ भेद कल्पिसी दर्शनाचा ॥ दर्शन दृष्टा मावळे ठायींचा ॥ मग दृश्याचा विचार करी ॥ ४३ ॥ तापसी बोलतसे पाही ॥ हें आत्मज्ञान सांगसी काई ॥ आवडी धरूनियां जीवीं ॥ आलों पाही या ठाया ॥ ४४ ॥ प्रत्यक्ष होईल दर्शन ॥ स्वप्नीं सांगितली हे खूण ॥ कृष्ण श्रीखंड्या जाण कवण ॥ आहे तुमच्या घरीं ॥ ४५ ॥ वेगीं करी दर्शन ॥ नाहीं तरी त्यजीन प्राण ॥ ऐसें वचन ऐकोनि निर्वाण ॥ ब्राह्मण आसनीं बैसविला ॥ ४६ ॥ एकनाथ ह्मणती शिष्यासी ॥ वेगीं पाचारा कृष्णासी ॥ आतां भरूनी कावडीसी ॥ गंगा जळासी आणिलें ॥ ४७ ॥ पहा असेल देवघरीं ॥ किंवा पाकशाळेभीतरीं ॥ अथवा उपरी वरी ॥ चारी स्थळें शोधावीं ॥४८॥ शिष्य पाहती त्वरित ॥ तव अदृश्य जाला जेथचा तेथ ॥ ऐसें जाणोनी एकनाथ ॥ अळापीत कृष्णासी ॥ ४९ ॥ जयजयाजी जगज्जीवना ॥ जग व्यापका जनार्दना ॥ जगपाळका जननयना ॥ जग तारणा सद्गुरू ॥ ५० ॥ कृष्णा कान्हा कमळनयना ॥ वासुदेवा मधुसूदना ॥ धावें पावें मनमोहना ॥ तपोनिधि तिष्ठतसे ॥ ५१ ॥ विश्वव्यापका अनंता ॥ दिना-नाथा कृपावंता ॥ करुणाघना भगवंता ॥ धांव पाव ये काळीं ॥ ५२ ॥ श्रीवत्सलांछना वनमाळी ॥ ब्रीद आपुलें सांभाळी ॥ तूंच वत्सातें न्याहाळी ॥ करुणा द्विजावरी करावी ॥ ५३ ॥ तूं तरी करुणेचा सागर ॥ नांदसी हृदयीं निरंतर ॥ तापसी तुझ्या दर्शनातूर ॥ होऊनि आंगणीं तिष्ठतसे ॥ ५४ ॥ तूं जरी न देशील दर्शन ॥ तापसी त्यजील आपुला प्राण ॥ हें शरीरही त्या कारण ॥ मी त्यजीन निर्धारें ॥ ५५ ॥ सत्वर यावें जगन्नाथा ॥ भक्त जनासी तूं मातापिता ॥ तापसासी दर्शन देई आतां ॥ गुणातीता गुणालया ॥ ५६ ॥ आजी गेलासी कवण्या ठाया ॥ ब्राह्मण बैसला जीव द्यावया ॥ दर्शन न होतां काया ॥ जाईल विलया जाण पां ॥ ५७ ॥ ऐकोनी एकाजनार्दनाची वाणी ॥ हृदयीं द्रवला चक्रपाणी ॥ दोन्ही कर माखिले सुचंदनी ॥ देवघरांतूनी निघाला ॥ ५८ ॥ कंठ सद्गदित सजल नयन ॥ श्रीकृष्ण बोले मंजूळ वचन ॥ हा तापसी आला कोठून ॥ मज येणें प्रगट केलें ॥ ५९ ॥ दर्शन जालें ब्राह्मणा ॥ जयजयकारें करी गर्जना ॥

हर्षें बोले स्वामि श्रीकृष्णा ॥ सनाथ तुझेनी मी जालों ॥ ६० ॥ पुरला मनींचा मनोरथ ॥ दर्शनें जालों कृतकृत्य ॥ दृढ चरणीं ठेवुनी भावार्थ ॥ स्वानंदसुख ओसंडलों ॥ ६१ ॥ समाधि लागली एकनाथा ॥ पतीतपावन अनाथ-नाथा ॥ ध्याना आणुनी आत्मस्था ॥ स्वानंदसुखें सेवित ॥ ६२ ॥ तंव बोले हृषी-केशी ॥ येउनी तुझ्या आश्रमासी ॥ जाली द्वादश वर्षांशी ॥ होतों विश्रांतीसी जाणपां ॥ ६३ ॥ पुरला नाहीं मनींचा सोस ॥ तुजपासी असावें सावकाश ॥ ऐसें बोलोनी जगन्निवास ॥ अदृश्य जाला तत्काळ ॥ ६४ ॥ समाधि उतरोनी एक-नाथ ॥ आधीं वंदिला अभ्यागत ॥ तुझेनी मी कृतकृतार्थ ॥ मोठा समर्थ तूं तपस्वी ॥ ६५ ॥ ऐसा देवभक्ताचा सोहळा ॥ नरनारी पाहतां डोळां ॥ आश्चर्य करी वेळोवेळां ॥ देवही सकळ स्वर्गींचे ॥ ६६ ॥ भक्तिभावार्थें विकिला ॥ दास्य कामीं विनटला ॥ ऐसी अपार प्रेमकळा ॥ कमळापतीची ॥ ६७ ॥ अंतरीं आणि दिगां-तरी ॥ व्यापकपणें रक्षी हरी ॥ भक्तसाहाकारी मुरारी ॥ रक्षी सर्वकाळीं ॥ ६८ ॥ ऐसें ऐकोनी ते समर्थीं ॥ तापसी बोलतसे काई ॥ तारिलें तारिलें निश्चयीं ॥ श्रीकृष्ण पाय दाखविले ॥ ६९ ॥ काय वानूं महिमान ॥ ऐसें न देखों ब्रह्मज्ञान ॥ सनाथ तुझेनी पैठण ॥ गंगातीर देखिलें ॥ ७० ॥ माझेनी नवर्णवे महिमान ॥ तूं स्वयें अव-तार संपूर्ण ॥ पूर्वपुण्य फळ साचें जाण ॥ ह्मणोनी श्रीचरण देखीले ॥ ७१ ॥ तापसी आणि एकनाथ ॥ हर्षानादें संवादत ॥ परस्परें सुधाब्धींत ॥ जाणोनी मार्जन करिताती ॥ ७२ ॥ ऐसा देव भक्ताचा संभ्रम ॥ आपण आठवी पुरुषोत्तम ॥ जनी-जनार्दन ह्मणवुनी नेम ॥ सेवा करिती निजभावें ॥ ७३ ॥ पुजूनियां अभ्यागत ॥ भोजन देउनी केला तृप्त ॥ जाणें हाची भगवंत ॥ ह्मणोनी प्रार्थना करितसे ॥ ॥ ७४ ॥ काया वाचा धन मनें ॥ श्रीसहीत तुमची जाणें ॥ कृपा करावी जगज्जी-वनें ॥ मज दीनावरी समर्थें ॥ ७५ ॥ तंव द्विज बोले मंजुळ वचन ॥ जन्मवरी न विसरे तुमचे चरण ॥ आज्ञा घेउनी ब्राह्मण ॥ जाता झाला संतोषें ॥ ७६ ॥ कर्ताभोक्ता जनार्दन ॥ सर्वदा ज्याचें अंतःकरण ॥ त्याचें कोड पुरवी श्रीकृष्ण ॥ नानारूपें करूनी ॥ ७७ ॥ कृष्ण चरित्र अतिगहन ॥ निगमाही नकळे महिमान ॥ द्वापारींचें महिमान ॥ कलियुगीं दावितसे ॥ ७८ ॥ सगुणीं आवड गोपिकांची ॥ निर्गुणीं अव्यक्त तो देवांची ॥ करोनी भेटी दोघांची ॥ समान पावलें ॥ ७९ ॥ हेही पाहतां तैसीच गोष्टी ॥ एकाजनार्दन ब्राह्मण भेटी ॥ करूनिया जगजेठी ॥ चरित्र करी भक्ताचें ॥ ८० ॥ उच्छिष्टें काढिलीं धर्माघरीं ॥ हें प्रसिद्ध पुराणांतरीं ॥ येथ पाहतां तेच परी ॥ एकनाथावरीं भगवंत ॥ ८१ ॥ कृष्णकृपाक्ष तारूं ॥ भक्त भावार्थाचा दृढ दोरू ॥ धरुनी तरती संसारू ॥ अती प्रेमळ भक्तीचे ॥ ८२ ॥

नकळे नकळे हरि चारित्र ॥ भावार्थाचा परम मित्र ॥ जीवीं जाउनी तारक मंत्र ॥ उद्धरिले महानुभाव ॥ ८३ ॥ एका जनार्दनी स्वार्थ ॥ मुक्तेश्वराचा मुख्य परमार्थ ॥ धरुनी मूळचें सूत्र ॥ लिळाविश्वंभर ह्मणविलें ॥ ८४ ॥ मुक्तेश्वरीं कथिली कथा ॥ वदतां धरूनि भावार्था ॥ ते पावती पुण्य पुरुषार्था ॥ यशस्वी होती तिहीं लोकीं ॥ ॥ ८५ ॥ ऐसी हे कथा परमपावन ॥ वाढविलें भक्ताचें महिमान ॥ धन्य धन्य एकजनार्दन ॥ आपली महिमा आपण दावी ॥ ८६ ॥ चरित्र देखोनी मुक्तेश्वर ॥ बोलिले देव भक्ताचा विचार ॥ सर्वही लीला विश्वंभर ॥ त्याचा पार तो जाणें ॥८७॥

॥ श्रीखंड्याकृष्णाख्यान संपूर्ण ॥

---

## ॥ आरत्या एकनाथाच्या ॥

आरती एकनाथा ॥ महाराजा समर्था ॥ त्रीभुवनीं तूंची थोर ॥ जगद्गुरु जगन्नाथा ॥ धृ० ॥ एकनाथनामसार ॥ वेदशास्त्राचें गूज ॥ संसारदुःखवासें ॥ माहामात्राचें बीज ॥ एकनाथ नाम घेतां ॥ सुख वाटतें चित्ता ॥ आनंद गोपाळदासा ॥ धणी न पुरे गातां ॥ २ ॥ आरती एकनाथा ॥

वोवाळु जगद्गुरु एकनाथा स्वामि एकनाथा । करिसी सनाथ स्मरणेंची अनाथा ॥ धृ० ॥ अहंधूप जाळुनी सोहं तेजें वोवाळूं । नित्यानंदें तप्त जळें प्रेमें प्रक्षाळूं ॥ १ ॥ मुखशुद्धि बुद्धि चिद्रत्न हे दक्षणा । फिरोनिया जेथिली तेथें हे प्रदक्षणा ॥ २ ॥ ठाकुर्दासपण दंडवत नमन । करितां अभय पूर्ण बाणें उन्मन ॥ ३ ॥

अज अव्यय चिद्घन तो तूं निर्गुण ॥ इच्छा लीलेस्तव दाविलें सगुण ॥ एकाजनार्दन हें धरिलें नाम ॥ गोदातीरीं वास पूर्ण प्रतिष्ठान ॥ १ ॥ जयदेव जयदेव जय एकनाथा ॥ नाम रूपातीता अखंड अद्वैता ॥ तेथें आरति करावया कैंची योग्यता॥ तुजवीण अणुभरी ठावो नाहीं रिता ॥ धृ० ॥ भक्ति ज्ञान वैराग्य पूर्ण आत्मत्व ॥ या लागी व्याख्यान केलें श्रीभागवत ॥ करतळामळ करूनि सुखी केले संत ॥ तो हा श्रीएकनाथ वर्ते जनाआंत ॥ २ ॥ गुरुत्वें तुझें नाम घेतां संपूर्ण ॥ जीव शीव तात्काळ जाय मिळोन ॥ देह होय विदेह प्रताप गहन अवधूत ॥ नित्यत्वें ध्याय तुजलागून ॥ ३ ॥ जय एकनाथा जय एकनाथा ॥ अद्वयानंद बोध परिपूर्ण ॥ ज्याचेनि स्वस्वरूप सुखदाता ॥ ४ ॥

भवसागर हा अतिदुस्तर जाणुनी शरण आलों ॥ कृपाकटाक्षें हस्त ठेऊनि परपार उतरलों ॥ १ ॥ एक नाम हा ब्रह्म संकेत होऊनि तोचि अवतरला ॥ मंदमति अति मूढ जीवां थोर उपकारु केला ॥ २ ॥ जन वन हें समसमान ऐसा निश्चय झाला ॥ गुरु प्रसादें मीपण जाऊनि विठ्ठल तन्मय ठेला ॥ ३ ॥

---

# भानुदासाचें* चरित्र.

12562

प्रसिद्ध जे एकनाथस्वामि त्यांचा हा पुरुष पणजा होता. हा जातीचा देशस्थ आश्वलायन ब्राह्मण पैठणास राहत असे. असें सांगतात कीं, हा सुमारें दहा वर्षांचा झाल्यावर याचा बाप अध्ययन संबंधानें रागें भरला त्यावरून हा तळघरांत जो लपला तो सात दिवसपर्यंत बाहेरच आला नाहीं. बापानें याचा शोध गांवांत पुष्कळ केला परंतु ठिकाण लागला नाहीं. इकडे तळघरांत असें झालें कीं, यास एक दिवस अगदीं खडखडीत उपास पडला. त्या वरून दुसऱ्या दिवशीं एका ब्राह्मणानें यास पिण्यासाठीं दूध नेऊन तेथें दिलें. तें यानें पिऊन त्यास पुसलें आपण कोण? व येथें कसे आलां? दुसरें मीं येथेंच लपलों हें आपणांस कसें कळलें? ब्राह्मण ह्मणाला मी विश्वचक्षु सूर्य आहें. तुझ्या बापानें माझें आराधन उत्तम रीतीनें बहुत काळपर्यंत केल्यावरून माझ्या प्रसन्नतेनें तूं त्यास झालास. तुझें नांव भानुदास हें त्याचकारणामुळें आहे असें समज. त्यावरून यानें ब्राह्मणास नमस्कार करून ह्मटलें. मला विद्या यावी अशी मजवर कृपा व्हावी, ह्मणजे मी बापास भेटेन. ब्राह्मण ह्मणाला तुला विद्या येईल. काळजी करूं नको. आतां इतकेंच कर कीं, तूं येथें आणखी पांच दिवस राहा. व साहाव्या दिवशीं बापास भेट या पांच दिवसांत तुला असेंच दररोज दूध मिळेल इतकें बोलून ब्राह्मण अदृश्य झाला.

ब्राह्मणानें सांगितल्याप्रमाणें हा पांच दिवसपर्यंत तळघरांत होता. व साहावे दिवशीं बाहेर येऊन बापास भेटला, तसेंच तेथें ब्राह्मण आला व तो अमुक अमुक बोलला इत्यादि त्यानें त्यास सर्व कळविलें. त्यावरून बाप संतुष्ट होऊन त्यानें त्यास आलिंगन दिलें. आणि अध्ययनाविषयीं आतां यास बोलण्याची गरज नाहीं असें समजून पूर्ववत् क्रम चालविला. पुढें याचें लग्न झालें व चक्रपाणि नांवाचा यास एक पुत्र झाला. कांहीं दिवसांनीं याचा बाप मरण पावला. त्यामुळें प्रपंच चालविणें याच्या अंगावर पडलें ह्मणून यानें चाटीपणाचा ( कापडविकण्याचा ) धंदा चालविला व त्यांत मिळेल त्यावर कुटुंबाचा निर्वाह करूं लागला.

वर असें लिहिलें आहे कीं, हा चाटीपणाचा धंदा करीत असे. तो असा होता कीं, गांवोगांवीं जे सोमवार, मंगळवार इत्यादि नामसंकेताचे पेंठबाजार भरतात

* भरतखंडाच्या अर्वाचिन कोशामधील उतारा.

तेथें तेथें यानें त्या त्या वारीं घोड्यावर कापडाचें दिंड लादून जावें. व कापडविक्री होईल ती करून परत यावें. यास त्या व्यापारांत बराच पैसा मिळाला. कारण याचा व्यापार सचोटीचा होता. परंतु ही गोष्ट याच्या सांथ्यांस न सहन होऊन त्यानीं एकदां असें केलें कीं, बाजार आटपून सर्वजण रात्रीं बिऱ्हाडीं परत आल्यावर हा एकेठिकाणीं गांवांत कीर्तन ऐकण्यास गेला असें पाहून, याचें घोडें दूर नेऊन सोडून दिलें. व कापडाचें दिंड एका खांचेंत फेंकून देऊन पुनः सर्वांनीं येऊन निद्रा केली. या गोष्टीस सुमारें चार घटिका लोटतात न लोटतात तों चोर आले. व त्यांनीं या सर्वांस हाण मार करून त्यांचीं कापडांचीं दिंडें दरोबस्त नेलीं. मग काय! एकेकास नेसावयाचें एकेक वस्त्र मात्र शिल्लक राहिलें. पुढें पाहांटची प्रहर रात्र राहत्ये तों हा कीर्तनाहून परत येऊं लागला. व वाटेंत याचें घोडें यास सांपडलें तें यानें परत आणिलें. पुढें बिऱ्हाडीं येऊन पाहूं लागला तों साथ्यांची अशी दशा झाली आहे. मग यानें सर्वांचें समाधान केलें. व त्यानींही आपली दुष्ट कृति प्रांजलपणें यास कळविली. पुढें उजाडतांच सर्वांनीं याचें दिंड खांचेंत फेकिलेलें आहे तसेंच आहेसें पाहून याचें यास तें आणून दिलें. त्यावरून यानें तें कापड सर्वांस सारखें वाटून देऊन तो घरीं आला. व त्या दिवसापासून तो व्यापारच यानें सोडून दिला.

पुढें यानें आपला सर्व काळ भगवद्भजनांत घालविण्याचा क्रम ठेविला. त्यांत याची इतकी ख्याती झाली कीं, त्या वेळच्या साधुमंडळींत याची गणना प्रमुखत्वानें झाली. ती अशी कीं, अनागोंदीच्या किरीटी रामराजानें पंढरीहून पांडुरंगाची मूर्ति आपल्या शहरास नेलेली कोणाच्यानें आणवली नाहीं. ती यानें परत आणिली. ही गोष्ट शके १४३६ मध्यें घडली. हाच शक एका ग्रंथांत १४८६ लिहिलेला एकनाथ चरित्रांशीं जमत नाहीं. झणून तो चुकीचा आहे.


महाराष्ट्र साहित्य परिषद. पुणे.

# भानुदासकृत अभंग.

॥ १ ॥ परदेशीची वस्तु पंढरीस आली ॥ ते दैवें फावली पुंडलीका ॥ १ ॥ देतां घेतां लाभ बहुतासी झाला ॥ विसावा जोडला पांडुरंग ॥ २ ॥ न करितां सायास वस्तूची आयती ॥ वैष्णवीं बहुतीं वेटाळली ॥ ३ ॥ भानुदास स्वामि कृपेचा सागरू ॥ विठ्ठल कल्पतरु वोळला आह्मां ॥ ४ ॥

॥ २ ॥ त्रिविध तापहारी विश्वाचें माहेर ॥ धन्य गंगातीर तिहीं लोकीं ॥ १ ॥ चाला उचलतां पाउली टाकुनी साऊली ॥ गौतमी माउली निववील ॥ धृ० ॥ भानुदासस्वामि सेवका सुलभ ॥ रुक्मिणीवल्लभ विठ्ठलरावो ॥ २ ॥

॥ ३ ॥ जगज्योति प्रकाशला नवचंद्रु सांवळा । देतसे जिव्हाळा गोपिकांसी ॥ १ ॥ वेणुनादीं देखियेला । नवरंग दादुलागे बाईये ॥ धृ० ॥ भानुदास स्वामि सेवका सुलभू ॥ रुक्मिणीवल्लभु विठ्ठल देवो ॥ २ ॥

॥ ४ ॥ माणीकांचें तारूं चंद्रभागे आलें ॥ भूषण तें झालें सनकादिकां ॥ १ ॥ पंढर वो पुरी नाळीयाची खाणी ॥ नवलाव साजणी देखीयला ॥ २ ॥ अवघीया देखावया न्यावया पुरला ॥ उभाची उरला आगरी हा ॥ ३ ॥ भानुदास ह्मणे नीळीय चोखडा ॥ सजड अजडा जीवन्मुद्रा ॥ ४ ॥

॥ ५ ॥ अनादि परब्रह्म जें कां परमधाम ॥ ते हे मूर्ती मेघःशाम विटेवरी ॥ १ ॥ जे दुर्लभ तिहीं लोकां नकळे ब्रह्मादिकां ॥ तपें पुंडलीका जोडलासे ॥ २ ॥ जयातें पाहातां श्रुति परतल्या नेतीनेती ॥ ते हे परब्रह्म मूर्ति विटेवरी ॥ ३ ॥ वेदा मौन्य पडे श्रुतीसी सांकडें ॥ वर्णिता कुवाडें पुराणासीं ॥ ४ ॥ ज्ञानीयांचें ज्ञान जें मुनिजनाचें ध्यान ॥ तें हें परब्रह्म निधान विटेवरी ॥ ५ ॥ पुंडलिकाचेनि तपें जोडला हा ठेवा ॥ भानुदास देवा सेवा मागे ॥ ६ ॥

॥ ६ ॥ माझी बुद्धि पालटावी ॥ तुझे चरणीं लागावी ॥ १ ॥ तुझे चरणीं माझा भावो ॥ सदा निरंतर राहो ॥ २ ॥ तुझे नामीं मज विश्वास ॥

हृदयीं असो तुझा वास ॥ ३ ॥ स्वामि हृदयस्था मुरारी ॥ राहो माझिये अंतरीं ॥ ४ ॥ भानु ह्मणे गा राघवा ॥ देई तुझी चरणसेवा ॥ ५ ॥

॥ ७ ॥ धन्य चंद्रभागातीर ॥ स्नान करिती ऋषेश्वर ॥ १ ॥ धन्य धन्य चंद्रभागा ॥ मधिं पुंडलीक उभा ॥ २ ॥ धन्य पद्माळ्याचें पाळीं ॥ गाई चारिल्या गोपाळीं ॥ ३ ॥ धन्य धन्य वेणुनाद ॥ क्रीडा करितो गोविंद ॥ ४ ॥ धन्य धन्य हें नगर ॥ भूवैकुंठ पंढरपूर ॥ ५ ॥ धन्य पंढरीचा वास ॥ देवा विनवी भानुदास ॥ ६ ॥

॥ ८ ॥ पंढरीचें सुख पाहतां अलोलीक ॥ वैकुंठनायक उभा जेथें ॥ १ ॥ देवां जें दुर्लभ भक्तांसी सुलभ ॥ रुक्मिणी वल्लभ उभा विटे ॥ २ ॥ वैष्णवांचा मेळ करिती गदाखेळ ॥ सांमाजीं गोपाळ सप्रेमें नाचे ॥ ३ ॥ जिकडे पाहे तिकडे होय ब्रह्मानंद ॥ भानुदास आनंदें गात असे ॥ ४ ॥

॥ ९ ॥ पंढरीचें सुख पुंडलिकासीं जालें ॥ तेणेंही वांटिलें भक्तां लागीं ॥ १ ॥ भुक्ति मुक्ति वरदान दिधलें ॥ तें नाहीं ठेविलें आपणापासी ॥ २ ॥ चंद्रभागेतीरी आश्रम पुंडलीकाचा ॥ तो विसावा तीर्थांचा तीर्थराव ॥ ३ ॥ येकें गुप्तरूप ह्मणोनी मौनची धरिलें ॥ येकीं चोहटा उभें केलें परब्रह्म ॥ ४ ॥ कटीं कर विराजीत उभा असे निवांत ॥ समचरण शोभत ध्यानमुद्रे ॥ ५ ॥ समदृष्टि साजिरी कमळनयन वरी ॥ पीतांबरधारी शामप्रभा ॥ ६ ॥ ऐसा बरवया बरवट उभा असे नीट ॥ मस्तकीं मुगुट तेजःपुंज ॥ ७ ॥ भक्तिज्ञान वैराग्य दिधलें भजना ॥ वैकुंठीचा राणा भाग्यवंतू ॥ ८ ॥ ऐसा सुखाचा सागरु विठ्ठल कल्पतरू ॥ पुंडलिक थोरू भक्तराज ॥ ९ ॥ भानुदासस्वामि तपें पूर्ण जाला ॥ तो भक्तजना जाला मायबाप ॥ १० ॥

॥ १० ॥ ज्योतीरूप जनीं वर्तता सगुणीं ॥ ब्रह्म पहातां लोचनीं गुरुकृपा ॥ १ ॥ गुरुकृपा होय ब्रह्मींची संभूती ॥ शास्त्राची व्युत्पत्ति कामा नये ॥ २ ॥ देह अहं बुद्धि नासी आत्मसिद्धी ॥ जाणपणें बोधी अंतराय ॥ ३ ॥ स्वतः सिद्धि भेटी करी अटाअटी ॥ साधनाच्या कोटी गुरुविणें ॥ ४ ॥ सद्गुरुवचन न लागतांची क्षण ॥ भानुदासा पूर्ण निज बुद्धी ॥ ५ ॥

॥ ११ ॥ ऐक साजणी हो बाई ॥ तुह्मा एव्हढें थोर नाहीं ॥ भाव केला घरजावई ॥ खावयाला खीर सेवाई ॥ प्रपंच केला गोड सगळा

गे ॥ ज्ञान फुगडीवर संबलागे ॥ प्रेम हातीचा गट गे ॥ सुंदर पहातां आलगट गे ॥ १ ॥ फुगडी फु फु फु फु फुगडी गे ॥ तुह्मी आह्मी खेळूं दोघी गे ॥ धृ० ॥ शांति सोइरी सखी माझी तिची संगत बरी गाजी ॥ तिचा हात धरतां गेले माजी ॥ मोह ममताची इतबाजी ॥ फुगडी खेळतां हात शिणला ॥ अंतरिंचा द्वैतभाव गेला ॥ हृदयीं प्रगटला ज्ञानदीप गे ॥ गेली अज्ञानाची झोंप गे ॥ २ ॥ दया क्षमा माझी बहिण ॥ तिसी म्यां धरिलें कवळून ॥ फुगडी खेळतां आला शीण ॥ गरगर भंवडी गेली जीरोन ॥ ऐसी फुगडी मी खेळलें गे ॥ परब्रह्म सुख अंगविलें गे ॥ भानुदास ह्मणे रंगले गे ॥ ३ ॥

॥ १२ ॥ मोहन मेरोरे साइया ॥ धृ० ॥ जमुनाके तट धेनु चरावत ॥ राखतहै गैया ॥ १ ॥ मोरपत्र शिरीं छत्र सुहावे ॥ गोपी धरत बहिया ॥२॥ भानुदास प्रभू भगतनको वत्सल ॥ करत छत्र छाईया ॥ ३ ॥

॥ १३ ॥ दुजें पाहूं जातां कांहीं नये हाता ॥ शीणसी तत्वतां साध्य-नाहीं ॥ १ ॥ तुझा तूंचि मागें परतोनियां पाहे ॥ तुझा तूजपासीं आहे भूलूं नको ॥ २ ॥ भुलसी तरी मायाभ्रम तुज जाहाला ॥ फिरसी वेळो-वेळां चौऱ्यांशीं घरें ॥ ३ ॥ चौऱ्यांशीं आवर्तनें होतील गा तुज ॥ सांगतसे गुज जीवीं धरा ॥ ४ ॥ भानुदास ह्मणे सद्गुरु करणें ॥ पुरवील तुमचें पण निश्चयेसी ॥ ५ ॥

॥ १४ ॥ ऐसीयासी कृपा करावी त्वरित ॥ पुरवी मनोरथ सर्व माझे ॥ १ ॥ काकुळती कवणा येऊं तुजविण ॥ दुःख निवारण कोण करी ॥ २ ॥ त्रैलोक्य पालन करिसी सर्वकाळ ॥ साहुनी आगळें हेंचि काय ॥ ३ ॥ तुझीया पायाचा मजला आधार ॥ कैंवि तूं निष्ठुर जाहलासी ॥ ४ ॥ आमुचे अन्याय न धरावे चित्तीं ॥ सर्व कृपामूर्ति पोटीं घाली ॥ ५ ॥ कर्म धर्म माझें उत्तम आचरण ॥ नपाहें पावन करीं मज ॥ ६ ॥ भानुदास ह्मणे कृपेचें पोसणें ॥ परी नारायणें सांभाळावें ॥ ७ ॥

॥ १५ ॥ देवा कोठवरी अंत पहातोसी ॥ प्राण कंठापाशीं ठेवियेला ॥ १ ॥ पळमात्र चित्ता नाहीं समाधान ॥ चिंतेनें व्यापून घेतलेंसे ॥ २ ॥ नानापरिचें दुःख येवोनी आदळत ॥ शोकें व्याकुळ चित्त होत असे ॥ ३ ॥ यासी तो उपाय नकळेचि मज ॥ शरण आलों तुज देवराया ॥ ४ ॥ इच्छा पुरवुनी सुखरूप ठेवी ॥ भानुदास पायीं ठाव मागे ॥ ५ ॥

॥ १६ ॥ मज निरविलें कोणाचिये हातीं ॥ वैकुंठीं श्रीपति राहिलासी ॥ १ ॥ कोणी नाहीं मज ठाऊक तुजला ॥ संकटाचा घाला कैसा केला ॥ २ ॥ दुरी टाकुनीया केलेंसे निष्ठुर ॥ दुःखानें बेजार केलें मज ॥ ३ ॥ काय राग आला तुझिया मनांत ॥ तयामुळें शोकांत पाडीयेलें ॥ ४ ॥ अन्यायाची राशी देहचि सगळा ॥ हा राग गोपाळा न मानावा ॥ ५ ॥ क्षमा करीं माझे सर्व अपराध ॥ न धरावा भेद कांहीं देवा ॥ ६ ॥ भानुदास ह्मणे अंगिकार त्वरित ॥ करुनी आनंदांत ठेवा पायीं ॥ ७ ॥

॥ १७ ॥ कोठवरी धावा करूं तुझा देवा ॥ श्रम झाले जीवा फार माझ्या ॥ १ ॥ आझुनीया कां गा नयेसी त्वरित ॥ दुःखानें बहुत आकळिलों ॥ २ ॥ कंठ रोधियेला श्वासावरी श्वास ॥ घालुनी नेत्रास नीर वाहे ॥ ३ ॥ दाही दिशा मज वाटती उदास ॥ झाला कासाविस प्राण माझा ॥ ४ ॥ हीन कर्म माझें फुटकें अदृष्ट ॥ ह्मणवोनी संकट ऐसें झालें ॥ ५ ॥ भानुदास ह्मणे पाहतां चरण ॥ तळमळ जाण शांत झाली ॥ ६ ॥

॥ १८ ॥ अगा पंढरिनाथा ऐसें काय केलें ॥ मज उपेक्षिलें अनाथासी ॥ १ ॥ त्रैलोक्याचे ठाई मज नसे कोणी ॥ ऐसें चक्रपाणी ठावें तुज ॥ २ ॥ कोणाचे आधारें असावें म्यां येथें ॥ जन्मविलें व्यर्थ कां गा मज ॥ ३ ॥ आह्मासी क्लेशांत बहु पाडियेलें ॥ काय हाता आलें तुझ्या देवा ॥ ४ ॥ आमुच्या मनींचे आर्त करितां पूर्ण ॥ भानुदास ह्मणे जाण दुजा कोण ॥ ५ ॥

॥ १९ ॥ तुह्मी कराल तें काय एक नोहे ॥ ब्रह्मांड अवघें हें उभाराल ॥ १ ॥ तुझिया सत्तेनें सकळांचा प्राण ॥ चालतसे जाण ब्रह्मांड हें ॥ २ ॥ तुझीया सामर्थ्या नाहीं अंतपार ॥ तेथें मी किंकर काय जाणें ॥ ३ ॥ सर्व अपराधी शरण मी पतित ॥ उपेक्षा त्वां मातें न करावी ॥ ४ ॥ भानुदास ह्मणे पुरवा मनोरथ ॥ तुह्मी अनाथनाथ पांडुरंगा ॥ ५ ॥

॥ २० ॥ चंचळ हें मन नावरे माझ्यानें ॥ कामाच्या व्यसनें पीडीतसे ॥ १ ॥ अविवेकाचें बळ झालें असे फार ॥ धावती षड्विकार सैरांवैरां ॥ २ ॥ विवेकाची शक्ति होउनीया क्षीण ॥ सत्कर्मासी हीन बुद्धि झाली ॥ ३ ॥ चित्ताचा चालक अगा सूत्रधारी ॥ भानुदासा हरि कृपा करी ॥ ४ ॥

॥ २१ ॥ अधोगती आह्मीं जावें पंढरिनाथा ॥ ऐसें तुझ्या चित्तीं आलें काय ॥ १ ॥ पडिलों पदरीं अन्यायी मी दीन ॥ नेई सांभाळू कैसें

॥ ५७ ॥ अनन्य आवरी उदक निर्मळ ॥ वासना सोज्वळ नम्रपणें ॥ ॥ १ ॥ प्रक्षाळिलें पाय वाही एक माथा ॥ हृदईं प्रीति धरितां प्रेम लाभ ॥ २ ॥ घेउनीया तीर्थ इंद्रियें तों धालीं ॥ सकळ निवालीं जनार्दनीं ॥ ३ ॥

॥ ५८ ॥ चोहों देहांची क्रिया ॥ अर्घ्यें दिलीं दत्तात्रेया ॥ १ ॥ जे जे कर्म धर्म ॥ शुद्ध सबळ अनुक्रम ॥ २ ॥ इंद्रिय क्रिया जात ॥ कांहीं उचित अनुचित ॥ ३ ॥ आत्मा माझा देवदत्त ॥ एका जनार्दनीं स्वस्थ ॥ ४ ॥

॥ ५९ ॥ संचित क्रियमाण ॥ केलें सर्वांचें आचमन ॥ १ ॥ प्रारब्ध शेष उरलें यथा ॥ तेणें ध्याऊं सद्‌गुरु दत्ता ॥ २ ॥ झालें सकळ मंगळ ॥ एका जनार्दनीं फळ ॥ ३ ॥

॥ ६० ॥ साती भागीरथी सत्रावीची धार ॥ सुभक्ति ते मकर समर्पिलीं ॥ १ ॥ अर्पीयलें स्नान झालें समाधान ॥ मनाचें उन्मन होउनीया ॥ २ ॥ चित्त हें शीतळ गेली तळमळ ॥ पाहिलें निढळ अमूर्तासी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं केला जयजयकार ॥ अत्रीवरद थोर तिहीं लोकीं ॥ ४ ॥

॥ ६१ ॥ वर्णावर्ण नाहीं ॥ हेंचि प्रावर्ण त्याचे ठाईं ॥ १ ॥ पराभक्तीच्या पालवी ॥ जिवो अज्ञाना मालवी ॥ २ ॥ करा करा जन्मोद्धार ॥ हरिभक्तीचा बडीवार ॥ ३ ॥ एका जनार्दनीं बोध ॥ दत्तापाईं तो स्वानंद ॥ ४ ॥

॥ ६२ ॥ सकळ देवांचा जनिता ॥ त्रिगुण सत्ता चाळविता ॥ १ ॥ शरण जातां त्याच्या पायां ॥ सर्व हारपली माया ॥ २ ॥ भेदाभेद निवारिले ॥ सर्व स्वरूप कोंदलें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शिवें ॥ जिवपणा मुकलों जीवें ॥ ४ ॥

॥ ६३ ॥ गंध ग्रहण घ्राणता ॥ त्रिपुटी मांडिली सर्वथा ॥ १ ॥ सुबुद्धि सुगंध चंदन ॥ केलें दत्तात्रया अर्पण ॥ २ ॥ शांति क्षमा अक्षता ॥ तिलक रेखिला तत्वता ॥ ३ ॥ एका जनार्दन ॥ करुनी साष्टांगें नमन ॥ ४ ॥

॥ ६४ ॥ सहस्रदल कमलाकार ॥ कंठीं अर्पियले हार ॥ १ ॥ सोळा बारा आठरा चार ॥ माथां वाहूं पुष्प भार ॥ २ ॥ एका जनार्दनीं अळीकुळ ॥ दत्तचरणाब्ज निर्मळ ॥ ३ ॥

॥ ६५ ॥ आत्मज्ञान वैश्वानरीं ॥ धूप जाळिला सरोभरीं ॥ १ ॥ तेणें मातला परिमळ ॥ पिंड ब्रह्मांडीं सकळ ॥ २ ॥ वासाचा निजवास ॥ एका जनार्दनीं सुवास ॥ ३ ॥

॥ ६६ ॥ ज्ञानदीपिका उजळली ॥ नाहीं चिंतेची काजळी ॥ १ ॥ ओवाळिला देवदत्त ॥ प्रेमें आनंदभरीत ॥ २ ॥ दिव्य चांदणें अतीत ॥ तेज कोंदलें अद्भुत ॥ ३ ॥ भेदाभेद मावळले ॥ सर्व विकार गळाले ॥ ४ ॥ एका मिळवी जनार्दन ॥ तेजीं मिळाला आपण ॥ ५ ॥

॥ ६७ ॥ अहं ममता घारी पुरी ॥ समूळ साधली दूरी ॥ १ ॥ चतुर्विध केलीं ताटें ॥ मानी शरण गोमटें ॥ २ ॥ मन पवन समर्पिलें ॥ भोग्य भोक्तृत्व हारपलें ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं भोजन ॥ तृप्त झालें त्रिभुवन ॥ ४ ॥

॥ ६८ ॥ नाम मंगळामंगळ ॥ झालें जन्माचें सफळ ॥ १ ॥ दत्त जीवींचें जीवन ॥ दत्त कारणाकारण ॥ २ ॥ अनुसूयात्मजा पाही ॥ देहभाव उरला नाहीं ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं दर्शन ॥ चित्त झालें समाधान ॥ ४ ॥

॥ ६९ ॥ नाम निजभावें समर्थ ॥ जेथें नाम तेथें दत्त ॥ १ ॥ वाचें ह्मणतां देव दत्त ॥ दत्त करी गुणातीत ॥ २ ॥ दत्तनामाचा सोहळा ॥ धाक पडे कळिकाळा ॥ ३ ॥ दत्तनामाचा निज छंद ॥ नामीं प्रगटे परमानंद ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं दत्त ॥ सबाह्य स्वानंदें भरीत ॥ ५ ॥

॥ ७० ॥ दत्त सबाह्य अंतरीं ॥ दत्तात्रेय चराचरीं ॥ १ ॥ दत्तात्रयें माझें मन ॥ हरोनी नेलें मीतूंपण ॥ २ ॥ मुळीं सिंहाद्री पर्वतीं ॥ दत्तात्रेयें केली वस्ती ॥ ३ ॥ भक्तामनीं केला वास ॥ एकाजनार्दनीं विश्वास ॥ ४ ॥

॥ ७१ ॥ मुळीं नाहीं गुण ह्मणूनि निर्गुण ॥ ब्रह्म परिपूर्ण गुरुनाथ ॥ १ ॥ ज्याचे गुण गातां वेद मौनावला ॥ शेष वेडावला झाला शय्या ॥ २ ॥ ब्रह्मादिक ज्याचे झाले आज्ञाधार ॥ मानव पामर कोण पुढें ॥ ३ ॥ तोचि कृष्णातीरीं वसे औदुंबरीं ॥ दासा कृपा करी सर्वकाळ ॥ ४ ॥ राव रंक याती वर्ण असती चारी ॥ भाविका अंतरीं वसे सदां ॥ ५ ॥ स्मरतां धावे ऐसें वेद बोभाइला ॥ आपुल्या ब्रीदाला रक्षितसे ॥ ६ ॥ जया चित्तीं ठेवा कल्याण असावें ॥ गुरूसी रिघावें

शरण तेणें ॥ ७ ॥ ऐशी वेद वाणी ऐकूनिया कानीं ॥ जनार्दना मनीं निश्चयो झाला ॥ ८ ॥

॥ ७२ ॥ जो निर्गुण निराभास ॥ जेथून उद्भव शबल ब्रह्मास ॥ आदिनारायण ह्मणती ज्यास ॥ तो आदिगुरु सर्वांस ॥ १ ॥ तयाचा ब्रह्मा अनुगृहीत ॥ ब्रह्मा अत्रीस उपदेशीत ॥ अत्रीपाद प्रसादीत ॥ श्रीदत्तात्रेय अवधूत ॥ २ ॥ दत्तात्रेय परंपरा ॥ सहस्रार्जन यदु दुसरा ॥ जनार्दन शिष्य तिसरा ॥ केला कलीयुगीं खरा ॥ ३ ॥ जनार्दन कृपेस्तव जाण ॥ समूळ निरसलें भवबंधन ॥ एका जनार्दना शरण ॥ झाली परंपरा संपूर्ण ॥ ४ ॥

॥ ७३ ॥ मछिंद्रानें मंत्र गोरक्षासी दिला ॥ गोरक्ष बोळला गहिनीराजा ॥ १ ॥ गहिनीनें खूण निवृत्ती दिधली ॥ पूर्ण कृपा केली ज्ञानराजा ॥ २ ॥ ज्ञानदेवें बोध जगासी पैं केला ॥ एका जनार्दनीं धाला पूर्णबोधें ॥ ३ ॥

---

## आपले गुरूची स्तुति.

॥ ७४ ॥ श्रीपांडुरंग सद्गुरु हे स्वामी ॥ तया पदपद्मीं नमन माझें ॥ ॥ १ ॥ गजानन मूर्ति सद्गुरु समर्थ ॥ देई मज स्वार्थ निज पदीं ॥ २ ॥ नेत मजलागीं गुरु निजधामीं ॥ वसे अंतर्यामीं सर्वकाळीं ॥ ३ ॥ शाम सुंदर मूर्ति सद्गुरु दयाळ ॥ भक्त प्रतिपाळ गुरुराव ॥ ४ ॥ यम नियम मज करविती सद्गुरू ॥ सर्वस्वें आधारु मज त्यांचा ॥ ५ ॥ नरनारायण रूप हा सद्गुरू ॥ उतरी भवपारु क्षणमात्रें ॥ ६ ॥ मस्तक तयाच्या पायीं हा ठेवावा ॥ नित्य तो पहावा हृदयामाजीं ॥ ७ ॥ ॐकार प्रणव सद्गुरु स्वरूप ॥ मिळे आपोआप अंतर्यामीं ॥ ८ ॥ नका विसरूं त्या सद्गुरु दयाळा ॥ दासाचा कळवळा तया लागीं ॥ ९ ॥ मस्त होऊं नका तारुण्याच्या भरें ॥ करावी या करें सद्गुरुसेवा ॥ १० ॥ सिद्धि रिद्धि तुह्मी मनीं त्या न आणा ॥ भजावा तो राणा सद्गुरुराव ॥ ११ ॥ धंदा नका करूं आणिक तयाविण ॥ तन्नाम श्रवण दृढ करा ॥ १२ ॥ पावन होतसे सद्गुरूच्या कृपें ॥ निरसती पापें सकळही ॥ १३ ॥ आशा हे त्यागावी पासूनिया मना ॥ सद्गुरु चरणा तेव्हां भेटी ॥ १४ ॥ इह लोकीं सुख सद्गुरु देणार ॥ मना सर्वभार तेथें ठेवी ॥ १५ ॥ ईशान स्वरूपीं

सद्गुरु प्रत्यक्ष ॥ देत ज्ञान अक्षय दासालागीं ॥ १६ ॥ उपकार त्यांचे अनंत अपार ॥ भवसिंधु पार त्यांचे योगें ॥ १७ ॥ उदास जो झाला देहाचिये ठायीं ॥ तयालागीं पायीं ठाव देई ॥ १८ ॥ ऋषि सिद्ध मुनि ज्यालागीं भजती ॥ वसे आत्मस्थिति सर्वकाळ ॥ १९ ॥ ऋण हें फेडावें जन्ममरणाचें ॥ साधन हें साचें नाम धरा ॥ २० ॥ लुब्ध होऊं नका विषयाच्या स्वादा ॥ पावाल आपदा नाना परी ॥ २१ ॥ लुसलुसित कोंवळीं बिल्व तुळशीं पत्रें ॥ वहावीं पवित्रें चरणांवरी ॥ २२ ॥ एक दोन तीन चार पांच सहा ॥ सांडूनिया रहा गुरुपायीं ॥ २३ ॥ ऐहिक हें सुख तुच्छ नाशिवंत ॥ सेवावा अनंत सद्गुरुराव ॥ २४ ॥ ओवी नाममाळा वृत्ति तंतुमाजी ॥ इंद्रिय समाजी गुरु वसे ॥ २५ ॥ औदार्य गुरूचें अनिवार जगीं ॥ मना पाया लागीं दृढ धरी ॥ २६ ॥ अंकीं मजलागीं गुरु बैसविती ॥ उपदेश देती ब्रह्मज्ञान ॥ २७ ॥ अहा काय सांगूं सद्गुरूची कीर्त्ती ॥ परब्रह्म मूर्ति गुरुराव ॥ २८ ॥ कल्पना त्यागावी तेव्हां ब्रह्म प्राप्ती ॥ चुके यातायाती आपोआप ॥ २९ ॥ खटपट करिसी प्रपंचाचेविशीं ॥ भजे तूं गुरूसी तैशा परी ॥ ३० ॥ गर्व अभिमान मनीं नको धरूं ॥ तुजसी आधारू सद्गुरुराज ॥ ३१ ॥ घटिका दिस मास अयन संवत्सर ॥ गुरु विश्वंभर भजे बापा ॥ ३२ ॥ ॐकार स्वरूप गुरुमहाराज ॥ मूर्ति हे सहज हृदयीं लक्षी ॥ ३३ ॥ चमत्कार माझ्या सद्गुरुरायाचा ॥ दासा स्वानंदाचा लाभ होय ॥ ३४ ॥ छत्तीस तत्त्वांचें शरीर हें साचें ॥ कांहीं अनुभवाचें पावलक्ष ॥ ३५ ॥ जवनिका माया समूळ नुरवी ॥ प्रेम हें पुरवी सद्गुरु पायीं ॥ ३६ ॥ झरा हा सुखाचा सद्गुरूच्या पायीं ॥ मना तूं अक्षयीं राही तेथें ॥ ३७ ॥ ॐकार वर्णात्मक सद्गुरु पांडुरंग ॥ अक्षय अभंग सर्वसाक्षी ॥ ३८ ॥ टणत्कार करा विरागाच्या योगें ॥ सद्गुरूच्या संगें ब्रह्म प्राप्ती ॥ ३९ ॥ ठकूं नका तुम्ही माया विद्या योगें ॥ चरणीं करा जागें वृत्तीसी या ॥ ४० ॥ डमरु त्रिशूल सद्गुरूच्या हातीं ॥ दासासी रक्षिती सर्वकाळ ॥ ४१ ॥ ढवळूं तूं नको विषयाच्या ठायीं ॥ वृत्ति स्थिर पायीं सदां करी ॥ ४२ ॥ नकार तिरे घाटीं भेदावला नसे ॥ सद्गुरु हा असे ऐक्यें तैसा ॥ ४३ ॥ तदाकार मन करा सद्गुरु रूपीं ॥ सच्चित्स्वरूपी तुम्ही व्हाल ॥ ४४ ॥ थरथर कांपा सद्गुरु समीप ॥ ब्रह्मीं आपोआप प्राप्त व्हाल ॥४५॥ दया शांति क्षमा सद्गुरूसी मागा ॥ सद्गुरूच्या वागा आज्ञे ऐसें ॥४६॥ धरा भाव तुम्हीं सद्गुरूच्या पायीं ॥ ब्रह्म-

पर ठायीं गति जेणें ॥ ४७ ॥ नमस्कार करा तुह्मीं सद्गुरूसी ॥ तेणें निज पदासी प्राप्त व्हाल ॥ ४८ ॥ पहावें नयनीं सद्गुरु रायाला ॥ तेणें आनंदाला अनुभवावें ॥ ४९ ॥ फजिती ही तुह्मी नका करूं आतां ॥ वेगीं सद्गुरुनाथा शरण जा ॥ ५० ॥ बरवें जन हो तुह्मासी सांगतों ॥ तुह्मी चित्तीं ध्या तो सद्गुरुरावो ॥ ५१ ॥ भरवा मानसीं सद्गुरु दयाळ ॥ पद हें पावाल परब्रह्म ॥ ५२ ॥ मरणें जन्मणें सत्वर निवारा ॥ वृत्ति हे आवरा विषयांतुनी ॥ ५३ ॥ यमाच्या हातींचें सोडवील तुह्मा ॥ भजा आत्मारामा या गुरुराया ॥ ५४ ॥ रमवा हें चित्त सद्गुरूच्या ध्यानीं ॥ पहा जनीं वनीं सद्गुरुराव ॥ ५५ ॥ लगाम हा देणें अश्वासी ज्यापरी ॥ वृत्ति स्थिर करी गुरु ध्यान ॥ ५६ ॥ वमनवत हे विषय त्यागावे ॥ ब्रह्म अनुभवावें गुरुकृपें ॥ ५७ ॥ शम दम श्रद्धा उपरम तितिक्षा ॥ सातवी अपेक्षा सद्गुरुपायीं ॥ ५८ ॥ षकार स्वरूप सद्गुरु नारायण ॥ गुण हे श्रवण त्याचे करा ॥ ५९ ॥ समाधि साधनी वृत्ति स्थिर करा ॥ दृढ चरण धरा सद्गुरूचे ॥ ६० ॥ हवाशिर स्थान एकांत पहावें ॥ ध्यान हें धरावें सद्गुरूचें ॥ ६१ ॥ लववावी वृत्ति सद्गुरुचरणीं ॥ ते पायापासुनी सोडूं नये ॥ ६२ ॥ क्षमा शस्त्र हातीं गुरुकृपें धरा ॥ काम क्रोध करा शांत जना ॥ ६३ ॥ ज्ञप्ति हे आकळे सद्गुरु प्रसादें ॥ वर्ताल स्वानंदें सर्वकाळ ॥ ६४ ॥ एकाजनार्दनीं गुरु पदीं लीन ॥ ब्रह्म परिपूर्ण अनुभविलें ॥ ६५ ॥

॥ ७५ ॥ ॐकार स्वरूपा गुरो दीनानाथा ॥ पावशी अनाथा तुज नमो ॥ १ ॥ नमो मायबापा सद्गुरो दयाळा ॥ निरसी भक्तवत्सला माया मोह ॥ २ ॥ मोह जाळीं मी बा गुंतलोंसे स्वामी ॥ वसणें अंतर्यामीं सच्चिद्रूपा ॥ ३ ॥ सच्चिद्घन माझा गुरु महाराज ॥ करी सर्व काज लघु गुरू ॥ ४ ॥ गुरु मजलागीं परमामृत पाजी ॥ इंद्रिय समाजीं गुरु रती ॥ ५ ॥ रति मजलागीं अन्याची पैं नाहीं ॥ सद्गुरूच्या पायीं प्राण वेंची ॥ ६ ॥ वेंचावी हे काया सद्गुरु सेवेसी ॥ वसावा मानसीं तो श्रीगुरू ॥ ७ ॥ श्रीगुरु जयाच्या वसतील मनीं ॥ तया जनीं वनीं पांडुरंग ॥ ८ ॥ पांडुरंग माझा आनंद सागर ॥ मजशीं आधार नाहीं दूजा ॥ ९ ॥ दूजा भाव माझा हरपला कृपें ॥ होऊनि तद्रूप चित्त रंगे ॥ १० ॥ रंगे मन माझें सद्गुरु स्वरूपीं ॥ नाश आपोआपी भव गदा ॥ ११ ॥ गदा शंख चक्र घेऊनियां करीं ॥ सद्गुरु निवारी महा मद ॥ १२ ॥ मदें

मातलीया देव कैसा भेटे ॥ परमार्थ विटे होय हानी ॥ १३ ॥ हानि या सारखी अन्य नाहीं जगीं ॥ मना तूं निवेगीं सांडी राग ॥ १४ ॥ राग द्वेष जंव असती अंतरीं ॥ काय वनांतरीं जाऊनिया ॥ १५ ॥ जाउनी एकांतीं बैसावें मानवा ॥ चित्त स्थिर तेव्हां होईल यत्नें ॥ १६ ॥ यत्नें करूनिया साधावी समाधी ॥ सकळ उपाधि निरसी प्रभू ॥ १७ ॥ प्रभुराज माझा स्वामि गुरु देव ॥ दिला अनुभव शुद्ध भूमी ॥ १८ ॥ भूमि शुद्ध केली पेरी ज्ञान बीज ॥ परब्रह्मीं सहज मज नेलें ॥ १९ ॥ नेलें गुरुरायें मज निरंजनीं ॥ ज्या श्रुति लाजूनि ह्मणे नइती ॥ २० ॥ इति कर्तव्यता सरलीसे दासा ॥ नाश तो सहसा गुणा तिघा ॥ २१ ॥ तिघा देहांतुनी सोडविलें मला ॥ गुरूंनीं हा केला उपकार ॥ २२ ॥ उपकार गुरूचा झालासे अपार ॥ मजसी आधार सद्गुरु पदीं ॥ २३ ॥ पदीं स्थिर वृत्ति जया मानवाची ॥ तयासी भवाची भ्रांति नाहीं ॥ २४ ॥ नाहीं मजलागीं द्वैत तें राहिलें ॥ ब्रह्म तें उरलें एक मज ॥ २५ ॥ मज माझ्या गुरुवीण नाहीं प्रिय ॥ अनुभव आत्मीय वर्णूं काय ॥ २६ ॥ काय वर्णू माझ्या सद्गुरु रायासी ॥ मज सर्वस्वेंसी यजमान ॥ २७ ॥ यजमान माझा सद्गुरु पांडुरंग ॥ अर्पिलें सर्वांग तयालागीं ॥ २८ ॥ तयाच्या चरणीं देह हा ठेविला ॥ जनार्दनीं धाला एकनाथ ॥ २९ ॥

॥ ७६ ॥ ॐ नमोजी जनार्दना ॥ नाहीं भाव अथवा भावना ॥ देखोनी मीतूंपणा ॥ नमन श्रीचरणा सद्गुरुराया ॥ १ ॥ जयाचेनी कृपापात्रें ॥ देह न देखिती देहांगें ॥ संसार टवाळ वेगें ॥ केलें वावगें भवस्वप्न ॥ २॥ जयाचेनी कृपाकटाक्षें ॥ अलक्ष लक्षेविण लक्षें॥ साक्षी विसरली साक्षें ॥ निजपक्षें गुरुत्वें ॥ ३ ॥ तेणें जीवेवीण जीवविलें ॥ मृत्यूनें मरणची मारिलें ॥ दृष्टि देउनी दाखविलें ॥ देखणें केलें सर्वांग ॥ ४ ॥ देह देहींच विदेह केलें ॥ सेखीं विदेहपण तेंही नेलें ॥ नेलेंपणही हरपलें ॥ उरीं उरलें उर्वरीत ॥ ५ ॥ अभाव भावेंसीं गेला ॥ संदेह संदेहेसी निमाला ॥ विस्मय विस्मयीसीं बुडाला ॥ वेडावला स्वानंद ॥ ६ ॥ तेथें आवडी होय भक्त ॥ तंव देवची भक्तपणा आंत ॥ मग भज्य भजनाचा अंत ॥ दावी प्रांत स्वलीला ॥ ७ ॥ नमन नमनेसीं नेलें ॥ नमितें नेणों काय झालें ॥ नम्यचीं अंगीं घडलें ॥ घडलें मोडलें मोडोनी ॥ ८ ॥ दृष्यद्रष्टा जाण ॥ दोहिसीं एकची मरण ॥ दर्शनही झालें क्षीण ॥ देखतेपण गिळोनी ॥ ९ ॥ आतां देवोची अवघा ॥ येथें भक्त नये भक्त भावा ॥ तंव देवही मुकला देवा ॥ देवभावा विसरोनी

॥ १० ॥ देव देवपणें दाटला ॥ भक्त भक्तपणें आटला ॥ दोहींचाही अंत आला ॥ अभेदें झाला अनंत ॥ ११ ॥ अत्याग त्यागेसी विराला ॥ अभोग भोगेसी उडाला ॥ अयोग योगासी उडाला ॥ योग्यतेचा गेला अहंभावो ॥ ॥ १२ ॥ ऐसियावरी अधिक सोस ॥ सायुज्यामाजीं होतसे दास ॥ तेथील सुखाचा सौरस ॥ अति अविनाश अगोचर ॥ १३ ॥ शिवें शिवची यजिजे॥ हें ऐसिये अवस्थेसी साजे ॥ एऱ्हवीं बोलबोलिजे ॥ तरी न पविजे निज भजन ॥ १४ ॥ ये अभिन्न सुखें सेवे आंत ॥ नारद आनंदें नाचत गात ॥ शुक सनकादिक समस्त ॥ झाले निजभक्त येणें सुखें ॥ १५ ॥ सागरीं भरे भरतें ॥ तें भरितें भरी तरीयातें ॥ तैसें देवेंची देवपणें येथें ॥ केलें मातें निजभक्त ॥ १६ ॥ सागर सरितां जीवन एक ॥ तरी मिळणीं जना दिसे अधिक ॥ तैसें एकपणेंची देख ॥ भजनसुख उल्हासे ॥ १७ ॥ वामसव्य दोन्ही भाग ॥ परि दोनांवीं एकची अंग ॥ तैसा देवभक्त विभाग ॥ देवपणीं सांग आभासे ॥ १८ ॥ तेंवि आपलेपणाचें मानें ॥ भक्त केले जनार्दनें ॥ परी कायावाचामनें ॥ वर्तवीजे तेणें सर्वार्थी ॥ १९ ॥

॥ ७७ ॥ ॐकार स्वरूपा सद्गुरु समर्था ॥ अनाथाच्या नाथा तुज नमो ॥ १ ॥ नमो मायबापा गुरु कृपाघना ॥ तोडी या बंधना माया मोहा ॥ २ ॥ मोहो जाळ माझें कोण निरशील ॥ तुजविण दयाळा सद्गु-रुराया ॥ ३ ॥ सद्गुरुराया माझा आनंदसागर ॥ त्रैलोक्या आधार गुरु-राव ॥ ४ ॥ गुरुराव स्वामि असे स्वयंप्रकाश ॥ ज्या पुढें उदास चंद्र रवी ॥ ५ ॥ रवि शशि अग्नि नेणती ज्या रूपा ॥ स्वप्रकाश रूपा नेणें देव ॥ ६ ॥ वेदा पडलें मौन शास्त्रें वेडावलीं ॥ वाचा हे निमाली ते श्रीगुरु ॥ ७ ॥ श्रीगुरु जयासी पाहे कृपादृष्टी ॥ तयासी हे सृष्टि पांडु-रंग ॥ ८ ॥ पांडुरंग माझा दीनाचा मायबाप ॥ नासी सर्व पाप भाव दूजा ॥ ९ ॥ दुजेपणा ठाव नाहीं जया रूपीं ॥ तेथें आपोआपीं मन रंगे ॥ १० ॥ रंगे चित्त माझें सद्गुरुचरणीं ॥ स्वरूप निर्वाणीं होय गती ॥ ११ ॥ गति अधोगति दोनिया नासती ॥ सद्गुरूची मूर्ति ध्यातो मनीं ॥ १२ ॥ मनीं वसे ज्याच्या सद्गुरु दयाळ ॥ तयासी सकळ सिद्धि हातीं ॥ १३ ॥ हातीं मोक्ष परि नावड सा ठायीं ॥ सद्गुरूच्या पायीं बुद्धि राहे ॥ १४ ॥ राहे गुरुगृहीं सदां सर्वकाळ ॥ परब्रह्मीं केवळ होय जागा ॥ १५ ॥ जागा शिष्य चित्त सद्गुरु वसती ॥ केली असे स्थिति यम दमीं ॥ १६ ॥ यमादिकीं चित्त जयाचें निर्मळ ॥ तेथें तो गोपाळ वसे प्रभू

॥ १७ ॥ प्रभुराज माझा स्वामी गुरुराव ॥ देतो मज भाव शुद्ध भुमी ॥ १८ ॥ भूमि शुद्ध करी ज्ञानबीज पेरी ॥ अद्वैत हें धरी मी तूं नेणें ॥ १९ ॥ नेणें मी तूं कांहीं द्वैताद्वैत भाव ॥ एक स्वयंमेव आत्म इती ॥ २० ॥ इति कर्तव्यता हीच दासालागीं ॥ माया गुण संगीं नाश तिचा ॥ २१ ॥ तिचा नाश करणें हाचि एक थोरू ॥ करिती सद्गुरु उपकार ॥ २२ ॥ उपकारा साच्या नोहे उतराई ॥ ठेवि जीवा पायीं थोडा पहा ॥ २३ ॥ पहा गुरुरायें ब्रह्म दाखविलें ॥ अखंड स्मरविलें मज नाम ॥ २४ ॥ नाम निरामय अज अविनाशी ॥ प्रिय तें मानसीं सदां मज ॥ २५ ॥ मज लागीं माझी सद्गुरु माउली ॥ करी कृपा साउली वर्णूं काय ॥ २६ ॥ काय वर्णूं माझ्या सद्गुरु दयाळा ॥ बहुत कळवळा दासा यया ॥ २७ ॥ या दासा मनीं सद्गुरूचें ध्यान ॥ झालासे तल्लीन गुरुपायीं ॥ २८ ॥ एकाजनार्दनीं गुरु परब्रह्म ॥ तयाचें पैं नाम सदां मुखीं ॥ २९ ॥

॥ ७८ ॥ नमूं जाय जंव गुरुत्वा ॥ तंव त्रैलोक्य आलें गुरुत्वा ॥ १ ॥ आतां नमना नुरेची गुरू ॥ गुरुत्वा आला संसारू ॥ २ ॥ वंद्यत्वें नमूं गुरु-भेदें ॥ तंव त्रैलोक्य गुरुत्वें नांदें ॥ ३ ॥ गुरु वांचुनी न दिसे कांहीं ॥ तंव सान थोर अवयवें गुरु पाही ॥ ४ ॥ थोर गुरुत्वा आलें गौरव ॥ तरी गुरु नामें नेघे अहंभाव ॥ ५ ॥ एका जनार्दनाच्या पायीं ॥ नमूं गेलों तों गुरु शिष्य नाहीं ॥ ६ ॥

॥ ७९ ॥ वेद तो आम्हा जनार्दन ॥ शास्त्र तें आम्हा जनार्दन ॥ पुराण जनार्दन ॥ सर्व भावें ॥ १ ॥ सुख जनार्दन दुःख जनार्दन ॥ कर्म धर्म जनार्दन ॥ सर्व भावें ॥ ध्रु० ॥ योग जनार्दन याग जनार्दन ॥ पुण्य आणि पाप तेंही जनार्दन ॥ २ ॥ यापरि सर्वस्व अर्पी जनार्दन ॥ एका-जनार्दनीं साधे भजन ॥ ३ ॥

॥ ८० ॥ सर्व भावें दास झालों मी उदास ॥ तोडिला मायापाश जनार्दनें ॥ १ ॥ माझें मज दावियलें माझें मज दावियलें ॥ उघडें अनु-भविलें परब्रह्म ॥ २ ॥ रविबिंबापरि प्रकाश तो केला ॥ अंधकार पळविला काम क्रोध ॥ ३ ॥ बांधलों होतों माया ममतेच्या पाशीं ॥ तोडिलें वेगेंसीं कृपा दृष्टी ॥ ४ ॥ एका जनार्दनीं उघडा बोध दिला ॥ तोचि ठसावला हृदयामाजीं ॥ ५ ॥

तरी ॥ २ ॥ मज अनाथाची परिसावी विनंती ॥ भानुदास स्तुति करीतसे ॥ ३ ॥

॥ २२ ॥ चंद्रभागे तीरीं उभा विटेवरी ॥ विठ्ठल राज्य करी पंढरीये ॥ ॥ १ ॥ ऋद्धि सिद्धि धृति वोळंगती परिवार ॥ न साहाती अवसर ब्रह्मादिकां ॥ २ ॥ सांडोनी तितुलें यथा बीजें केलें ॥ कवणें चाळविलें कानडीयासी ॥ ३ ॥ उष्णोदक मार्जन सुगंध चर्चन ॥ भीवरा चंद्रभागा पाट वाहे ॥ ४ ॥ रंभा तिलोत्तमा उर्वशी मेनिका ॥ कामारी आणिका येती सर्वे ॥ ५ ॥ कनकाचे परयेळीं रत्नाचे दीपक ॥ सुंदर श्रीमुख वोवाळिती ॥ ६ ॥ संत भागवत सकळ पारुपले ॥ निःशब्द होउनी ठेले तुजविण ॥ ७ ॥ रुक्माबाई जालीसे उदास ॥ पुंडलीकाच्या जिवास पडिलें मौन ॥ ८ ॥ येसी तरी येई पंढरीच्या राया ॥ अगा कृपावर्या पांडुरंगा ॥ ९ ॥ धन्य पंढरपुर विश्रांति माहेर ॥ धन्य भीमातीर वाळूवंट ॥ १० ॥ भानुदास ह्मणे चला आह्मा सर्वे ॥ वाचा ऋण देवें आठवावें ॥ ११ ॥

॥ २३ ॥ जैसा उपनिषदाचा गाभा ॥ तैसा विटेवरी उभा ॥ अंगींचिया दिव्यप्रभा ॥ धवळलें विश्व ॥ १ ॥ उगवती या सुरज्या ॥ नवरत्नें बांधूं पूजा ॥ मुगुटीं भाव पैं दुजा ॥ उपमा नाहीं ॥ २ ॥ दोन्ही कर कटीं ॥ पीतांबर माळगांठीं ॥ माळ वैजंयती कंठीं ॥ कौस्तुभ झळके ॥ ३ ॥ कल्पद्रूम छत्राकार ॥ तळीं त्रिभंगीं बिढार ॥ मुरली वाजवी मधुर ॥ श्रुति अनुरागें ॥ ४ ॥ वेणुचेनी गोडपणें ॥ पवन पांगुळला तेणें ॥ तोही निवे येक गुणें ॥ अमृतधारीं ॥ ५ ॥ अहो लेणियाचें लेणें ॥ नाद सुखासी पैं उणें ॥ विश्व बोधिलें येणें ॥ गोपाळ वेषें ॥ ६ ॥ पुंडलिकाचेनी भावें ॥ श्रीविठ्ठल येणें नांवें ॥ भानुदास ह्मणे दैवें ॥ जोडलें आह्मां ॥ ७ ॥

॥ २४ ॥ शंखचक्रगदाधरू ॥ कासे सुरंग पीतांबरू ॥ चरणीं ब्रीदाचा तोडरू ॥ असुरावरी काढीतसे ॥ १ ॥ बरवा बरवा केशीराज ॥ गरुड वाहन चतुर्भुज ॥ कंठीं कौस्तुभ झळके वीज ॥ मेघःशाम देखोनी ॥ २ ॥ करी सृष्टीची रचना ॥ नाभीं जन्म चतुरानना ॥ जग हें वाखाणी मदना ॥ तें लेंकरू तयाचें ॥ ३ ॥ कमळा विलासली पायीं ॥ आर्त तुळशीचे ठाईं ॥ ब्रह्मादिकां अवसरु नाहीं ॥ तो यशोदे वोसंगा ॥ ४ ॥ उपमा द्यावी कवणे अंगा ॥ चरणीं जन्मली पै गंगा ॥ सोळा सहस्र रामा संभोगा ॥ नित्य

नपुरती कामिनी ॥ ५ ॥ अधिष्ठान गोदातीरीं ॥ ऋद्धि सिद्धि तिष्ठती द्वारीं ॥ भानुदास पूजा करी ॥ वाक्पुष्पें अनुपम्य ॥ ६ ॥

॥ २५ ॥ धन्य धन्य हें नगर ॥ भूवैकुंठ पंढरपुर ॥ १ ॥ धन्य धन्य चंद्रभागा ॥ मध्यें पुंडलीक उभा ॥ २ ॥ धन्य धन्य वेणुनाद ॥ क्रीडा करितो गोविंद ॥ ३ ॥ धन्य पद्माळ्याची पाळी ॥ गाई चारी वनमाळी ॥ ४ ॥ धन्य पंढरीचा वास ॥ देवा गाय भानुदास ॥ ५ ॥

॥ २६ ॥ क्षीरसागरीं जें सुख ऐकिजे ॥ तें या वैष्णवा मंदिरीं देखिजे ॥ १ ॥ धन्य धन्य तें वैष्णव मंदिर ॥ जेथें नामघोष होय निरंतर ॥ २ ॥ दिंडी पताका तुळशी वृंदावनें ॥ मन निवताहे नामसंकीर्तनें ॥ ३ ॥ ज्याच्या दरुशनें पाप ताप जाय ॥ भानुदास तयासी गीतीं गाय ॥ ४ ॥

॥ २७ ॥ जैं आकाश वर पडो पाहे ॥ ब्रह्मगोळ भंगा जाये ॥ वडवानळ त्रिभुवन खाय ॥ तरी तुझीच वास पाहे गा विठोबा ॥ १ ॥ नकरी आणिकाचा पांगिला ॥ नामधारक तुझाची अंकिला ॥ ध्रु० ॥ सप्तसागर येकवट होती ॥ जैं हे विरुनी जाय क्षिती ॥ पंच महाभूतें प्रळय पावती ॥ परी मी तुझाची सांगाती गा विठोबा ॥ २ ॥ भलतैसें वर पडो भारी ॥ नाम न संडों नटळो निर्धारीं ॥ जैसी पतिव्रता प्राणेश्वरी ॥ विनवी भानुदास ह्मणे आधारीं गा विठोबा ॥ ३ ॥

॥ २८ ॥ इहीं श्रवणीं तुझें गुण नाम ऐकेन ॥ इहीं चरणीं तीर्थपंथें चालेन ॥ नाशीवंत देह कवणीये काजा ॥ ऐसी प्रेम भक्ति देई सहजा ॥ १ ॥ अखंड तुझें नाम उच्चारी ॥ तेणें संसारा होय उजरी ॥ ध्रु० ॥ शालिग्राम तीर्थें करीन आंघोळी ॥ हरिदासाचे चरणरज लावीन कपाळीं ॥ कंठ मंडित तुळशीमाळीं ॥ तन मन प्राण तुमतें वोवाळीं ॥ २ ॥ उदरव्यथेलागी मी न करी धंदा ॥ उच्चिष्ट प्रसादें हरावी हे क्षुधा ॥ आपली स्तुति आणि पराचिया निंदा ॥ हे दोन्ही आतळों नेदी गोविंदा ॥ ३ ॥ सर्वां भूतीं रामा नूतेंचि देखें ॥ तुझेनी प्रसादें सदा संतोषें ॥ देवा भानुदास मागे इतुकें ॥ चाड नाहीं आह्मा वैकुंठलोकीं ॥ ४ ॥

॥ २९ ॥ ये संसारीं बहुता वाटा ॥ सिद्धा साधका सुभटा ॥ दीप देहींचा गोमटा ॥ तंवची ठाका सुपंथू ॥ १ ॥ मग आयुष्याच्या अस्तमानीं ॥ पडलीया काळाच्या वदनीं ॥ तेवेळे न राखे माय राणी ॥ वडवा जंखिणी

प्राणीया ॥ २ ॥ मार्गू सांपडला निगुती ॥ ध्रुव प्रल्हाद परीक्षिती ॥ वाटा हातीं आह्मीं तयाचे सांगाती ॥ भावें भक्ति अनुसरलों ॥ ३ ॥ लहाना आणि सहाना ॥ इडा पिंगळा सुषुम्ना ॥ पवनपंथें योगी जाणा ॥ ब्रह्म स्थाना न्यावया ॥ ४ ॥ तेथें सप्त धातूंची आटणी ॥ या नांव बोलिजे कुंडलणी ॥ ती तंव असाध्य काहाणी ॥ तुह्मीं त्या पंथें नव जावें ॥ ५ ॥ येक यज्ञाचेनी बळें ॥ इच्छी स्वर्गाचीं फळें ॥ दिवस चारी सोहळे ॥ पुरती इंद्रियांचे ॥ ६ ॥ तप वेंचलीया पुढती ॥ मागुती मृत्युलोकीं लोटिती ॥ तेथें आहे पुनरावृत्ती ॥ तुह्मीं त्या पंथें नव जावें ॥ ७ ॥ नाना बळिदानें देती ॥ गळा वोखदें बांधिती ॥ क्रूर दैवतें पूजिती ॥ ते काय पुरविती इच्छिलें ॥ ८ ॥ तैसा नव्हे लक्ष्मीपती ॥ त्याची कोण्ही नकरिती भक्ती ॥ मूढ सिंतरले नेणों किती ॥ तया होय गति यमपंथू ॥ ९ ॥ तीर्थें तीर्थें प्रदक्षणा ॥ क्षमा नाहीं अंतःकरणा ॥ कोप आलिया उगाणा ॥ होय केलिया पुण्याचा ॥ १० ॥ तैसींच प्रतिज्ञा मतें ॥ गर्वें वाहावलीं बहुतें ॥ तुह्मीं नवजावें तया पंथें ॥ साधुसंगती अनुसरा ॥ ११ ॥ हरिश्चंद्र सूर्यवंशीं ॥ तेणें ठाकिली हो काशी ॥ अर्थ दिधला महंतासी ॥ स्त्री पुत्रासी विकुनी ॥ १२ ॥ तैसेंच बळी बिभीषण ॥ हनुमंत उद्धव अक्रूर जाण ॥ रुक्मांगद सुलक्षण ॥ येणेंची पंथें उद्धरले ॥ १३ ॥ मेघ वर्षती धारा प्रबळा ॥ तेणें वाहती नदी नद वोहळा ॥ त्या मीनलीया सिंधुजळा ॥ अगाधपण पावती ॥ १४ ॥ तैसीही विद्या पाहाहो ॥ श्रीगुरुचरणीं प्रेमभावो ॥ भानुदास ह्मणे हा उपावो ॥ संसार वावो निस्तरेल ॥ १५ ॥

॥ ३० ॥ गुढीयेसी सांगूं आले ॥ कंस चाणूर मर्दिले ॥ १ ॥ हर्षें नाचताती भोजें ॥ जिंकीयेले यादवराजें ॥ २ ॥ गुढी आली वृंदावना ॥ मथुरा दिली उग्रसेना ॥ ३ ॥ जाला त्रिभुवनीं उल्हास ॥ ललीत गाय भानुदास ॥ ४ ॥

॥ ३१ ॥ गाई गोप विप्राचार संध्या वंदन ॥ अपूज्य लिंगा पूजन साधुदर्शन ॥ १ ॥ जयजय सुशब्द बोलती जन ॥ कोटि युगें राज्य करी रघुनंदन ॥ २ ॥ भरत शत्रुघ्न जवळी लक्ष्मण ॥ शौर्य विद्या साजे रघुनंदन ॥ ३ ॥ कौसल्या सुमित्रा वोवाळिती रामातें ॥ देवा भानुदास गुण गातसे तेथें ॥ ४ ॥

॥ ३२ ॥ न मागतां कांहीं नकरितां सेवा ॥ आलासी गा देवा पंढरीये ॥ १ ॥ तूंगा मायबाप विश्वासी तारक ॥ तुवां पुंडलीक सुखी

केला ॥ २ ॥ चारितां गोधनें आलासी बा पाईं ॥ पुंडलीक कांहीं न बोलेची ॥ ३ ॥ चिन्मयाचा दीप साक्षित्वासी आला ॥ भानुदास त्याला नाम जालें ॥ ४ ॥

॥ ३३ ॥ सांडोनी तिवुकें यथा बीज केलें ॥ कैसें चाळविलें कानडीयानें ॥ १ ॥ रखुमाई आइती जालीसे उदास ॥ पुंडलीका कैसें पडिलें मौन ॥ २ ॥ कनकाचे तार्टी रत्नाचे दीपक ॥ सुंदर श्रीमुख वोवाळिती ॥ ३ ॥ भानुदास ह्मणे चला मज सवें ॥ वाचा ऋण देवें सांभाळावें ॥ ४ ॥

॥ ३४ ॥ रायें कंठमाळ देवासी घातली ॥ देवें ती दीधली भानुदासा ॥ १ ॥ कोणी नेली माळ करिती याचा शोध ॥ देखिली प्रसिद्ध याचे गळां ॥ २ ॥ राजदूतीं नेला ह्मणती गा हा चोर ॥ रायानें विचार नाहीं केला ॥ ३ ॥ शूळीं द्यावयासीं भानुदास नेला ॥ तेणें आठविला पांडुरंग ॥ ४ ॥

॥ ३५ ॥ कोरडीया काष्ठीं अंकुर फुटले ॥ येणें येथें जालें विठोबाचें ॥ १ ॥ समर्थाचा आह्मीं धरिला आधार ॥ तरीच सत्वर आला येथें ॥ २ ॥ माझीये संकटीं आलासी धाउनी ॥ भानुदास चरणीं लागतसे ॥ ३ ॥

॥ ३६ ॥ उद्भवला ॐकार त्रिमातृके सहित ॥ अर्धमातृके परतें प्रणवबीज ॥ १ ॥ मायामहत्तत्व जाले तीन्ही गुण ॥ चौदेहांची खूण वोळखावी ॥ २ ॥ अंतःकरणीं जाला तत्त्वांचा प्रसव ॥ पंचतत्त्वें सर्व रूपा आलीं ॥ ३ ॥ पांचही गुण जाले पंचवीस ॥ परी भानुदास वेगळाची ॥ ४ ॥

॥ ३७ ॥ षड्विकार आणि सप्त चक्रावळी ॥ अष्ट भिन्न जाली प्रकृति ते ॥ १ ॥ नव नाडी रचना दश इंद्रियांची ॥ अकराव्या मनाची गति तूंची ॥ २ ॥ विषय इंद्रिय वासना उत्पत्ती ॥ तुज माजी येती जाती सर्व ॥ ३ ॥ चिन्मयाचा दीप साक्षित्वासी आला ॥ भानुदास त्याला नाम जालें ॥ ४ ॥

॥ ३८ ॥ वाचा आणि अवस्था भोग अभिमानी ॥ पुरुषार्थ खाणी चारी मुख्य ॥ १ ॥ किटक भ्रमर जंगम स्थावरत्व ॥ भरलें महत्तत्व कोंदा-

टोनी ॥ २ ॥ चेतविता याला कोण आहे येथें ॥ अहं सोहं भाते लाउ-नीया ॥ ३ ॥ फुंकितो तो कोण आणिक दुसरा ॥ वर्म गुरुपुत्रा कळेची तें ॥ ४ ॥ सृष्टीचा उभारा केला तो संकल्प ॥ भानुदास दीप प्रज्वाळिला ॥ ५ ॥

॥ ३९ ॥ तुज पासाव सर्व परी तूं नोहेसी ॥ ऐसें आपणासी बुझे बापा ॥ १ ॥ कर्तृत्व करुनी आहे तो निराळा ॥ परब्रह्म निर्मळा मळ नाहीं ॥ २ ॥ देहाचीये ऐसी करुनी निराशा ॥ स्वस्वरूपीं ठसा ठस-लासी ॥ ३ ॥ चिन्मय रूप मूळ ॐकार बीज ॥ भानुदासीं निज लाधलें तें ॥ ४ ॥

॥ ४० ॥ जाडीचें घोंगडें येव्हढीयेराती ॥ कानींचीं कुंडलें करी जगा ज्योती ॥ १ ॥ वोळखिला वोळखिला खूणा ॥ वोळखिला माय पंढरी-चा राणा ॥ २ ॥ होय नहोय ऐसा संशय गमला ॥ निर्धारितां विश्वव्या-पक देखिला ॥ ३ ॥ हृदय मंदिरीं दाटोनी धरावा ॥ ही खूण सांगे भानु-दास देवा ॥ ४ ॥

॥ ४१ ॥ तुज पाहूं जातां नये कांहीं हातां ॥ अससी तत्त्वतां साध्य नाहीं ॥ १ ॥ तुझा तूंची मागें परतोनी पाहे ॥ तुजपाशीं आहे भुलूं नको ॥ २ ॥ पिंडीं तें ब्रह्मांडीं बोलताती वेद ॥ होई तूं सावध भुलूं नको ॥ ३ ॥ भुललीया माया श्रम तुज झाला ॥ फिरसी वेळोवेळां चौऱ्या-शीं ॥ ४ ॥ चौऱ्याशी आवर्तनें होती गा तुज ॥ सांगतसे गूज जीवीं धरा ॥ ५ ॥ भानुदास ह्मणे सद्गुरु करणें ॥ पूर्वील तुमचें पेणें निश्च-येसीं ॥ ६ ॥

॥ ४२ ॥ अवतारादीक जाले कर्मभूमीं आले ॥ विश्व जनीं देखिले आपुले डोळां ॥ १ ॥ देखिल्या स्वरूप उद्धरे काय जन ॥ तें काय ह्मणोन सांगों स्वामी ॥ २ ॥ उद्धरत काय नाहीं आत्मज्ञान ॥ देखिलें तें जाण सर्व वाव ॥ ३ ॥ वाव ह्मणों तरी कोंदलें स्वरूप ॥ लावलीया माप मोज-वेना ॥ ४ ॥ देखत देखत वेडावले जन ॥ रूप डोळेवीण पाहूं जाती ॥ ५ ॥ भानुदास ह्मणे सद्गुरूच्या लाभें ॥ आहेचि तें उभें विटे-वरी ॥ ६ ॥

॥ ४३ ॥ उठी तात मात भये प्रातरजनीसो तीमीर गई ॥ मीलत बाल सकल ग्वाल सुंदर कान्हाई ॥ १ ॥ जागो गोपाललाल जागो

गोविंदलाल ॥ जननी बल जाई ॥ २ ॥ संगी सब फीरत बयन तुम बीन नही छुट तदयन ॥ तेजो शयन कमलनयन सुंदर मुखराई ॥ ३ ॥ मुख तीपट दुर किजो जननीकु हर्ष दीजो ॥ दधी खीर मांगलीजो खीर खांड मीठाई ॥ ४ ॥ जमत जमत शामराम सुंदर मुख सदाराम ॥ थाथी किछुट कछु भानुदास पाई ॥ ५ ॥

॥ ४४ ॥ जमुनाके तट धेनु चरावत ॥ राखत हये गइया ॥ १ ॥ मोहन मेरा सांइया ॥ ध्रु० ॥ मोरपत्र सिरीं छत्र सुहावे ॥ गोपीधरत बहीया ॥ २ ॥ भानुदास प्रभु भगतनको बत्छल ॥ करत छत्र छाइया ॥ ३ ॥

॥ ४५ ॥ वृंदावनीं वेणु कवणाचा माय वाजे ॥ तेणें नादें गोवर्धनु गाजे ॥ पुच्छ पसरुनी मयोर विराजे ॥ मज पाहातां भासती यादवराजे ॥ १ ॥ तृण चारा चरूं विसरलीं ॥ पक्षी कुळें निवांत-राहिलीं ॥ गाई व्याघ्र येकेठाईं जालीं ॥ वैरभाव समूळ विसरलीं ॥ २ ॥ यमुना जळ स्थिर स्थिर वाहे ॥ रवी मंडळ चालतां स्तब्ध होये ॥ शेष कूर्म वराहा चकित राहे ॥ बाळा स्तन देऊं विसरली माये ॥ ३ ॥ ध्वनि मंजुळ मंजुळ उमटती ॥ वांकी रुणझुण रुणझुण वाजती ॥ देव विमानीं बैसोनी स्तुति गाती ॥ भानुदासा पावली प्रेमभक्ती ॥ ४ ॥

॥ ४६ ॥ अवघ्या सोडीयेल्या मोटा ॥ आजीचा दहींकाला गोमटा ॥ १ ॥ घ्यारे घ्यारे दहीं भात ॥ आह्मा देतो पंढरिनाथ ॥ २ ॥ मुदा घेउनीया करीं ॥ पेंदा वांटितो शिदोरी ॥ ३ ॥ भानुदास गीतीं गात ॥ प्रसाद देतो पंढरिनाथ ॥ ४ ॥

॥ ४७ ॥ वंदूं भानुदास आतां ॥ जो का पितामहाचा पिता ॥ जयाचा वंश भगवंता ॥ जाला सर्वथा प्रियकर ॥ १ ॥ जेणें बाळपणीं आराधिला भानू ॥ स्वयें जाला चिद्भानू ॥ जिंकुनी मानाभिमानू ॥ भगवत् पावनू स्वयें जाला ॥ २ ॥ जयाची पदबंध व्युत्पत्ती ॥ पाहूं आली श्रीविठ्ठलमूर्ती ॥ कानींचीं कुंडलें ढाळ देती ॥ रातोत्पलाचीये परी ॥ ३ ॥ या भानुदासाचा चक्रपाणी ॥ तयाचा सूतही सुलक्षणी ॥ त्यासी सूर्य नाम ठेउनी ॥ निजीं निज भानुदास ठेला ॥ ४ ॥ तया सूर्यप्रभाप्रतापकिरणीं ॥ मातें प्रसवली रुक्मिणी ॥ यालागी रुक्माई जननी ॥ आह्मा लागोनी साचार ॥ ५ ॥

ते हे ग्रंथारंभ कळा ॥ वंदिली पूर्वज माळा ॥ धन्य निज भाग्याची लीळा ॥ आले वैष्णवकुळा भानुदास ॥ ६ ॥

---

# एकनाथकृत अभंग.

## मंगलाचरण.

॥ ४८ ॥ श्रीविठ्ठल ॥ नमन माझें गजवदना ॥ सर्व भावें धरी चरणा ॥ १ ॥ जो हा गौरीहरबाळ ॥ भक्ता लागी तो दयाळ ॥ २ ॥ विघ्नें निवारी क्षणांत ॥ लंबोदर एकदंत ॥ ३ ॥ त्याचें स्मरण करी जो सदा ॥ तया देई परमानंदा ॥ ४ ॥ एकाजनार्दना शरण ॥ सद्गुरु तोचि गजानन ॥ ५ ॥

॥ ४९ ॥ प्रथम नाटारंभीं आनंदकदंब ॥ आरंभीं हेरंब वंदियला ॥धृ०॥ जय आरंभ हेरंबा ॥ परमानंदें रंगीं नाचे निजशोभा ॥ १ ॥ नाना अवतार वेषें दावी तूं गमके ॥ रंगीं रंग मूर्ति नाचे निजसुखें ॥ २ ॥ अभय वरद हस्तें मुसावला रंगू ॥ जीवशीव मयोगु एक झाले ॥ ३ ॥ उपरमल्या श्रुति निगम नेति नेती ॥ रंगीं स्वानंद मूर्ति डुल्लतसे ॥ ४ ॥ एकाजनार्दनी विकट विनायक ॥ रंगीं तुष्टला देत स्वानंद मोदक ॥ ५ ॥

॥ ५० ॥ सुखाचें मस्तक हरिखाचें तोंड ॥ आनंदाची सोंड झेलीतसे ॥ १ ॥ जयगणनाथा जयगणनाथा ॥ सहज निजसत्ता नाच तूं अद्वैत ॥ धृ० ॥ सच्चिद आनंद स्वानंदाचें दोंद ॥ मिरवे नागबंध बोधाचार ॥ २ ॥ नर-कुंजर रूपें अद्वैत एक ॥ एकपणें कौतुक नृत्याचें ॥ ३ ॥ रंगीं मुसावला हरिख स्वानंद मोदक ॥ देत विनायक निजभक्ता ॥ ४ ॥ सिद्धविनायक सिद्धीचा उपरमू ॥ एकाजनार्दनी हेरंब परब्रह्मु ॥ ५ ॥

॥ ५१ ॥ अर्पूनियां देवा भावाचे मोदक ॥ भावें विनायक पूजा करूं ॥१॥ देखिलें गजमुख हरलें जन्मदुःख ॥ गेली तहानभूक मायाजाळ ॥ २ ॥ चित्त दुर्वादळ अर्पुनी चरणीं ॥ गेले हारपुनी कायावाचामन ॥ ३ ॥ एका जनार्दनीं विकट विनायक ॥ स्मरणेंची पातक नाशीतसे ॥ ४ ॥

॥ ५२ ॥ सारासार कथा वाग्देवता ॥ अक्षरीं अक्षरता वदवी स्वयें ॥१॥ जय सारजे जय सारजे ॥ जय सारजे निज सार जें निजरूप ॥ धृ० ॥

मुक्त मोतियें सेवी अहर्निशी ॥ तये परम हंसीं आरुढ ॥ २ ॥ स्वरवर्ण वीणा वेदार्थ पोथी ॥ स्वानंदें सरस्वती वदवी स्वयें ॥ ३ ॥ शुद्ध शुक्लवास चिदानंदे कास ॥ रंगी सावकाश वागेश्वरी ॥ ४ ॥ सकळारंभीं निजा सहजीं सहजा ॥ एका जनार्दनी एकत्वें सारजा ॥ ५ ॥

॥ ५३ ॥ मर्दुनी शंखासुरा हातें वागविसी कलीवरा ॥ तेवीं निवटोनी अहंकारा माझ्या वागविशी शरीरा ॥ १ ॥ येथें नवल नव्हे पहा हो ॥ माझा देहची वागवी देवो ॥ २ ॥ शंख वाजविशी नाना स्वरा ॥ तें तंव न बाधीं शंखासुरा ॥ ३ ॥ तैसी चेतउनी माझी गिरा ॥ बोली बोलविता तूं खरा ॥ ४ ॥ कर्म कार्य कर्तव्यता ॥ माझेंनि नांवें तूंचि आतां ॥ ५ ॥ एका जनार्दनीं निजात्मता ॥ कर्म करून नित्य अकर्ता ॥ ६ ॥

॥ ५४ ॥ जन्मा आलों मीं संसारीं ॥ सखी मानिली अंतुरी ॥ निंद केली द्विजवरीं ॥ कैसा सद्गुरु जोडेल ॥ १ ॥ नाहीं पूजिलें गुरुवरा ॥ नाहीं नमिलें द्विजवरां ॥ नाहीं केलें भजन सारां ॥ कैचा भव हा आटेल ॥ २ ॥ जालों परधर्मीं रत ॥ अधर्म करितां वाटे हित ॥ जन्म मरणाची खंत ॥ कैसी आतां वाटेल ॥ ३ ॥ संसारीं मीं दुखावलों ॥ त्रिविध तापें मीं पोळलों दुःखी होउनीया आलों ॥ औंदुबरीं या ठाया ॥ ४ ॥ आंकलखोप कृष्णातिरीं ॥ गुरु वसती औदुंबरीं ॥ भक्तवत्सला तारी तारी ॥ ह्मणउनी चरण वंदिले ॥ ५ ॥ जनार्दन पापरासी ॥ करुनी आलों तुजपाशीं ॥ तारिसील या भरंवसीं ॥ धरणें घेतलें दारांत ॥ ६ ॥

---

आपले परम गुरूची स्तुति.

॥ ५५ ॥ केलें आव्हाहन ॥ जेथें नाहीं विसर्जन ॥ १ ॥ भरला ओतप्रोत ॥ स्वामी माझा देव दत्त ॥ २ ॥ गातां येत नाहीं ॥ पूर्ण सुलीनता पाहीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं खूण ॥ विश्वीं भरला परिपूर्ण ॥ ४ ॥

॥ ५६ ॥ सहज सुखासनीं अनसूया नंदन ॥ पाहतां हें ध्यान वृत्ति निवे ॥ १ ॥ बालोन्मत्त पिशाच त्रिविध अवस्था धरी ॥ आपण निराकारी सोहं भावें ॥ २ ॥ कारण प्रकृति न घेची तो माथा ॥ चिदानंद सत्ता विलसतसे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं ह्रदयीं आसन ॥ अखंडीत ध्यान निज तत्वीं ॥ ४ ॥

परिषद. पुणे.

॥ ८१ ॥ सांपडलों होतों भ्रमाचिया जाळीं ॥ माया मोह कल्लोळीं भ्रमत होतों ॥ १ ॥ परि जनार्दनें केलासें मोकळा ॥ दवडुनी अवकळा आशा तृष्णा ॥ २ ॥ मिनाचिये परि तळमळ संसारीं ॥ माझें माझें भोंवरीं दृढ धरीत ॥ ३ ॥ तें परतें करुनी केलेंसें सरतें ॥ आपणा परौतें जाऊं नेदी ॥ ४ ॥ जनार्दनाचा एका लडीवाळ तान्हा ॥ पाजी प्रेम पान्हा जनार्दन ॥ ५ ॥

॥ ८२ ॥ मोकळें तें मन ठेविलें बांधोनी ॥ जनार्दन चरणीं सर्व भावें ॥ १ ॥ स्थिर मति जाली वार्ता तीही गेली ॥ द्वैताची फिटली सर्व सत्ता ॥ २ ॥ मोह आशाबद्ध कर्मा निवारलों ॥ पावन तो जालों संत चरणीं ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं धन्य संत सेवा ॥ उगविला गोवा गुंती सर्व ॥ ४ ॥

॥ ८३ ॥ धन्य धन्य सद्गुरुराणा ॥ दाखविलें ब्रह्म भुवना ॥ १ ॥ उपकार केला जगीं ॥ पावन जालों आह्मी वेगीं ॥ २ ॥ पंढरी पाहतां ॥ समाधान झालें चित्ता ॥ ३ ॥ विटेवरी सम चरण ॥ एका जनार्दनीं निज खूण ॥ ४ ॥

॥ ८४ ॥ स्वरूप मंदिरीं होतें मी एकली ॥ माया सांज वेळ अविद्येचे विळीं ॥ माझें तुझें चालतां पाउलीं ॥ मोहो भुजंगें धरिली करांगुळी ॥ १ ॥ लोभ सर्प डंखला करूं काय ॥ स्वार्थ संपत्तीनें जड झाला पाय ॥ आशा लहरीं तापला माझा देह ॥ तृप्तिवारा घाली वो गुरुमाय ॥ २ ॥ भजन गूळ तो मज कडू झाला ॥ विषयनिंब बहु गोडिये आला ॥ वित्त हानि गळां झेंडू आला ॥ असत्य अशुद्धाच्या येताती गरळा वो ॥ ३ ॥ कामिनी कामाची डोळां आली पीतता ॥ रस स्तुति निंदा काळे झाले दांत ॥ विकल्प वासनेच्या मुंग्या धांवत ॥ स्त्रीपुत्र लोभें पडली भ्रांत ॥ ४ ॥ मीपणाची थोर आली भुली ॥ मी येथें कोण बोलवी मोडली ॥ अहं विवेकें काया जड झाली ॥ सद्गुरु गारुडी बोलवा माउली ॥ ५ ॥ गुरु गारुडी आला धांवुनी ॥ बोध वैराग्याचें पाजिलें पाणी ॥ विवेक अंजन घातलें नयनीं ॥ सोहं शब्द वाजवी नामध्वनी ॥ ६ ॥ मिथ्या भूतमय अवघि स्थिती ॥ अभय स्वरूपीं लाविली विभुती ॥ उतरला सर्प निवारली भ्रांती ॥ एका जनार्दनीं आलीसे प्रचिती ॥ ७ ॥

॥ ८५ ॥ आमुचिये कुळीं दैवत सद्गुरु ॥ आह्मांसी आधारु पांडुरंग ॥ १ ॥ सद्गुरु आमुची माता सद्गुरु तो पिता ॥ सद्गुरु तो भ्राता आह्मा लागीं ॥ २ ॥ इष्टमित्र बंधु सज्जन सोयरे ॥ नाहीं पैं दुसरें गुरुविण ॥ ३ ॥ सद्गुरु आचार सद्गुरु विचार ॥ सद्गुरुचि सार साधनांचें ॥ ४ ॥ सद्गुरुची क्षेत्र सद्गुरु तो धर्म ॥ गुरु गुह्य वर्म आह्मा लागीं ॥५॥ सद्गुरु तो यम सद्गुरु नियम ॥ सद्गुरु प्राणायाम आह्मां लागीं ॥६॥ सद्गुरु तो सुख सद्गुरु तो मोक्ष ॥ सद्गुरु प्रत्यक्ष परब्रह्म ॥ ७ ॥ सद्गुरुचें ध्यान अखंड हृदयीं ॥ सद्गुरुच्या पायीं वृत्ति सदा ॥ ८ ॥ सद्गुरुचें नाम नित्य आह्मा मुखीं ॥ गुणातीत सुखीं सद्गुरु राज ॥ ९ ॥ एका जनार्दनीं गुरुरूपीं दृष्टी ॥ दिसे सर्व सृष्टि परब्रह्म ॥ १० ॥

॥ ८६ ॥ अवघेंचि त्रैलोक्य आनंदाचें आतां ॥ चरणीं जगन्नाथा चित्त ठेलें ॥ १ ॥ माय जगन्नाथ बाप जगन्नाथ ॥ अनाथाचा नाथ जनार्दन ॥ २ ॥ एका जनार्दनीं एकपणें उभा ॥ चैतन्याची शोभा शोभलीसे ॥ ३ ॥

॥ ८७ ॥ कोटि कंदर्पांच्या श्रेणी ॥ कुर्वंडीत जनार्दनी ॥ १ ॥ बरवा जनार्दन जनीं ॥ पहातां तनु मन भुलवणी ॥ २ ॥ नयन लाचावले दोन्ही ॥ आन न दिसे त्रिभुवनीं ॥ ३ ॥ शंकरासी झाला गोड ॥ काय इतरांचा पाड ॥ ४ ॥ रूपा भाळला कंदर्प ॥ तेणें कृष्णा केला बाप ॥ ५ ॥ रमा रमणीये सर्वांसीं ॥ झाली चरणाची दासी ॥ ६ ॥ सनकादिक अति विरक्त ॥ तेही हरि पदीं आसक्त ॥ ७ ॥ जनीं जनार्दन नेटका ॥ एकाएकीं चरणीं देखा ॥ ८ ॥

॥ ८८ ॥ दीनाचा दयाळ ॥ जया दासाची कळवळ ॥ १ ॥ तो हा सद्गुरु दयाळ ॥ पायीं ठेवियलें भाळ ॥ २ ॥ न विचारी कुळ याती ॥ शुची चांडाळ निश्चिती ॥ ३ ॥ एका जनार्दनीं भावें ॥ एक वेळ त्यासी गावें ॥ ४ ॥

॥ ८९ ॥ स्वजनीं जनार्दन विजनीं जनार्दन ॥ जीव तो जनार्दन जीवनकळा ॥ १ ॥ जनक जनार्दन जननी जनार्दन ॥ जन तो जनार्दन होउनी ठेला ॥ २ ॥ भाव जनार्दन स्वभाव जनार्दन ॥ देव जनार्दन जेथें

तेथें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं आकळे जनार्दन ॥ एका जनार्दन निश्चळ तेथें ॥ ४ ॥

॥ ९० ॥ जन्मोजन्मींचें संचित ॥ गुरु पायीं जडलें चित्त ॥ १ ॥ तें तो सोडिल्या न सुटे ॥ प्रेम तंतु तो न तुटे ॥ २ ॥ दुःखें आदळलीं वरपडा ॥ पाय न सोडी हा धडा ॥ ३ ॥ देह गेला तरी जावो ॥ गुरु चरणीं दृढ भावो ॥ ४ ॥ वरी पडोत पाषाण ॥ परि न सोडी गुरु चरण ॥ ५ ॥ एका जनार्दनीं निर्धार ॥ तेथें प्रगटे विश्वंभर ॥ ६ ॥

॥ ९१ ॥ न सोडींरे मना गुरु जनार्दना ॥ संसार बंधना सोडविलें ॥ ॥ १ ॥ संसार अजगर झोंबला विखार ॥ धन्वंतरी थोर जनार्दन ॥ २ ॥ जनार्दना ऐसी माउली परियेसी ॥ बहु कष्टें सायासीं जोडियेली ॥ ३ ॥ जनार्दनें रंक तारियेला एका ॥ संसारीं हा सखा जनार्दन ॥ ४ ॥

॥ ९२ ॥ श्रीगुरुकृपें दत्त वोळखिला ॥ हृदय डोल्हाऱ्यावरी बैसविला ॥ अभेद पूर्ण चांदवा तेथें दिला ॥ शुद्ध भक्तीनें दत्त पूजियेला ॥ १ ॥ दत्त चरणीं मज लागलीसे गोडी ॥ भवभयाची तुटोनी गेली बेडी ॥ ध्रु० ॥ सोहं गुढी तेथें उभारिली ॥ मंत्र उपदेशें देह बुद्धि गेली ॥ पूर्ण निवृत्ति प्रवृत्ति ही धाली ॥ सहज पूर्णानंद पूर्णता आली ॥ २ ॥ जिकडे पाहे तिकडे चक्रपाणी ॥ बोलावयाची राहिली शिराणी ॥ जनीं वनीं एकात्मता खाणी ॥ एका जनार्दनीं रंगलीसे वाणी ॥ ३ ॥

॥ ९३ ॥ आतां जय न कैशा परी ॥ संसारा नोहे उरी ॥ १ ॥ सद्गुरु वचन मंत्र अरणी ॥ तेथोनी प्रगटला निर्धूम अग्नी ॥ २ ॥ सकळीं सकळांच्या मुखें ॥ अर्पीतसे यज्ञ पुरुषें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं यज्ञें अर्पी ॥ अर्पी त्यामाजीं समर्पी ॥ ४ ॥

॥ ९४ ॥ तारिलें वो येणें श्रीसद्गुरु नायकें ॥ बोधाचिये कासे लाउनी कवतुकें ॥ १ ॥ या भवसागरीं झालासी तूं तारूं ॥ परतोनिया पाहो कैंचा मायापुरू ॥ २ ॥ एकाजनार्दनीं कडिये ॥ संचला प्रपंच लाऊनि थडिये ॥ ३ ॥

॥ ९५ ॥ खांब सूत्राची बाहुली ॥ सूत्रा आधीन उगली ॥ १ ॥ माझें मीपण नाहीं स्वतंत्र ॥ क्रियाकर्म तें परतंत्र ॥ २ ॥ बाहुलिये नाहीं

स्वतंत्रता ॥ तैसा नव्हे कर्मकर्ता ॥ ३ ॥ एका एकपणाचें सूत्र ॥ जनार्दन पायीं स्वतंत्र ॥ ४ ॥

॥ ९६ ॥ एका जनार्दनाचे लग्न सिद्धीसी ॥ घटिकार्थ तें पहावया मिनले चवदा भुवनाचे ज्योतिषी ॥ १ ॥ योग तोही एक तीथ तीही एक ॥ राशि तेही एक नक्षत्र तेंही एक ॥ सद्गुरु चरणीं एका एक तोही झाला ॥ २ ॥ वर्ष तेंही एक मास तोही एक ॥ पारा योग पहातां एका एक झाले ॥ ३ ॥ घटिका तेही एक पळ तेंही एक ॥ शोधितां सूक्ष्म एका एकचि झालें ॥ ४ ॥ पाहतां जनीं जनार्दनीं झाली एक नाडी ॥ ह्मणवोनी एका जनार्दनीं उभाविली गुढी ॥ ५ ॥

॥ ९७ ॥ माथा ठेवोनी पाव ॥ माझा देहींच केला देव ॥ १ ॥ नवलाव पायाचा मी केला ॥ माझा देहींचा देवपणा नेला ॥ २ ॥ पाय पराक्रम पंचानन ॥ पायीं निसरला देह अभिमान ॥ ३ ॥ पायीं देहासी पाहे ठावो ॥ पायीं देहचि केला वावो ॥ ४ ॥ नवल पायाचा हा भावो ॥ पायीं नुरेचि देहीं देवो ॥ ५ ॥ एका जनार्दनाच्या पायीं ॥ देह विदेह दोन्ही नाहीं ॥ ६ ॥

॥ ९८ ॥ भजतां भजन एक जनार्दन ॥ ब्रह्म परिपूर्ण सर्वें एक ॥ १ ॥ सांडुनी वासना भजतां भजन ॥ ब्रह्म परिपूर्ण सर्व एक ॥ २ ॥ विषय वासना त्यागितां संपूर्ण ॥ ब्रह्म तें संपूर्ण सर्व एक ॥ ३ ॥ एका जनार्दनीं एकत्व भाव ॥ तेथें नांदे देव संदेह नाहीं ॥ ४ ॥

॥ ९९ ॥ नेणें मंत्र तंत्र बीजाचा पसारा ॥ जनार्दन सोईरा घडला मज ॥ १ ॥ भक्ति ज्ञान विरक्ति नेणें पैं सर्वथा ॥ मोह ममता चिंता कांहीं नेणें ॥ २ ॥ योग याग कसवटी कांहीं नेणों आटी ॥ सर्व देखों दृष्टि जनार्दन ॥ ३ ॥ काया वाचा मन ठेविलें चरणीं ॥ एका जनार्दनीं सर्व भावें ॥ ४ ॥

॥ १०० ॥ जय जय वो जनार्दन ॥ विश्व व्यापक संपूर्ण वो ॥ सगुण अगुण त्रिगुण पूर्ण पूर्णानंद घन वो ॥ १ ॥ ब्रह्मा विष्णु रुद्र निर्माण तुजपासुनी वो ॥ गुणत्रय उभय वनीं तूंचि पंचक अंतःकरणीं वो ॥ भूतां व्यापुनी पंचक प्राण दश इंद्रिय करणीं वो ॥ पंचक विषय स्थानें पंच विषयांचे स्वामिनी वो ॥ २ ॥ स्थूळ लिंग कारण चौथें महा कारण वो ॥

जागृती स्वप्न सुषुप्ति तुर्या उन्मनी हे स्थान वो ॥ नेत्र कंठ हृदय मूर्ध्नि-या प्रमाण वो ॥ विश्व तैजस प्राज्ञ प्रत्यगात्मा तूं संपूर्ण वो ॥ ३ ॥ स्थूळ प्रविविक्त सुख चौथें आनंदा भास वो ॥ पिंड ब्रह्मांड आणिक तूं ॐका-राचें सुख वो ॥ त्वंपद तत्पद आणिक असि पद तें तूं एकवो ॥ ४ ॥ आजी पंचका कारण षड्‌चक्राचें भेदन वो ॥ मंत्र तंत्र स्थानीं अनावराचें आवरण वो ॥ नसोनी एकपणीं एका एकीं जनार्दन वो ॥ ५ ॥

॥ १०१ ॥ जनार्दनीं शोभित जन ॥ जनार्दनें साचार ज्ञान ॥ जना-र्दनें आकळे मन ॥ ध्याता ध्येय ध्यान जनार्दन ॥ १ ॥ जनार्दनु मुख-कमळीं ॥ जनार्दनु नयनीं न्याहाळी ॥ हृदयकमळीं जनार्दनू ॥ २ ॥ जनार्दनें बोलिला वेदू ॥ जनार्दनें बुद्धीसी बोधू ॥ जनार्दनें तोडिला भेदू ॥ परमानंदु जनार्दनू ॥ ३ ॥ जनार्दनें ज्ञानदृष्टी ॥ जनार्दनें पावन सृष्टी ॥ जनार्दनें संतुष्ट पुष्टी ॥ निज भावें भेटी जनार्दनें ॥ ४ ॥ सर्व ज्ञान डोळसू ॥ जनार्दन स्वयंप्रकाशू ॥ जनार्दन देहबुद्धि निराशू ॥ परमहंसु जनार्दनू ॥ ५ ॥ जनार्दनें अज्ञान भंग ॥ जनार्दनें नित्य नवा रंग ॥ जनार्दनें वैष्णव संग ॥ वोडवे रंग जनार्दनें ॥ ६ ॥ जनार्दनें सुख होय सुखा ॥ जनार्दन पाठीराखा ॥ जनार्दनें तारिला एका ॥ आह्मा निजसखा जनार्दन ॥ ७ ॥

॥ १०२ ॥ आह्मा जप जनार्दन तप जनार्दन ॥ स्वरूप जनार्दन जनीं वनीं ॥ १ ॥ आह्मा कर्म जनार्दन धर्म जनार्दन ॥ ब्रह्म जनार्दन जन सहित ॥ २ ॥ आह्मा योग जनार्दन याग जनार्दन ॥ भोग जनार्दन अहर्निशीं ॥ ३ ॥ आह्मा ध्येय जनार्दन ध्यान जनार्दन ॥ एका जनार्दन ज्ञानरूप ॥ ४ ॥

॥ १०३ ॥ म्यां गुरु केला म्यां गुरु केला ॥ सर्व बोध तेणें मज दिला ॥ १ ॥ घालूनिया भक्ति अंजन ॥ दावियेलें विट्ठल निधान ॥ ॥ २ ॥ कान फुंकुनी निगुती ॥ दिधले संताचिये हातीं ॥ ३ ॥ एकजना-र्दनीं गुरु वरा ॥ तेणें दाविलें परात्परा ॥ ४ ॥

॥ १०४ ॥ जनार्दनें कृपा केली ॥ वृत्ति ब्रह्मकार झाली ॥ १ ॥ धन्य धन्य जनार्दन ॥ तया पायीं मम वंदन ॥ २ ॥ मन मनपणा हरपलें ॥ तन्मय होऊनिया ठेलें ॥ ३ ॥ चित्त चिंतना विसरलें ॥ चैतन्य रूप होउनी ठेलें ॥ ४ ॥ निश्चय रूप जे कां बुद्धि ॥ परब्रह्म तें निरवधी ॥ ५ ॥

अहंपणें अहंभाव ॥ तोही झाला देवाधिदेव ॥ ६ ॥ श्रोत्रेंद्रिय ग्राह्य शब्द ॥ होउनी राहिला निःशब्द ॥ ७ ॥ त्वगिंद्रिय स्पर्श ॥ तो पैं जाहला परेश ॥ ८ ॥ नेत्रें पाहती रूपातें ॥ तें पैं परब्रह्म आतें ॥ ९ ॥ जिव्हा सेवितसे रस ॥ तें हें ब्रह्म स्वयंप्रकाश ॥ १० ॥ घ्राण सेवितसे गंध ॥ तें हें परात्पर निर्द्वंद्व ॥ ११ ॥ वाणी उच्चारी वचन ॥ तें हें परब्रह्म जाण ॥ १२ ॥ गमन करिताती पाद ॥ तें हें ब्रह्म परम पद ॥ १३ ॥ पाणींद्रियें घेणें ॥ तेंचि ब्रह्म परिपूर्ण ॥ १४ ॥ गुह्येंद्रियाचा आनंद ॥ तो हा झाला परमानंद ॥ १५ ॥ जे जे क्रिया घडे अंगीं ॥ ते ते ब्रह्मरूप जगीं ॥ १६ ॥ पंचप्राण ते अमुप ॥ परब्रह्माचें स्वरूप ॥ १७ ॥ स्थूल सूक्ष्म ते कारण ॥ सकल ब्रह्म परिपूर्ण ॥ १८ ॥ महा कारण प्रकृती ॥ परब्रह्माची आकृती ॥ १९ ॥ अन्नमय कोश ॥ परब्रह्माचा विकाश ॥ २० ॥ कोश तोही प्राणमय ॥ दिसे प्रत्यक्ष चिन्मय ॥ २१ ॥ मनोमय कोश जाण ॥ परात्परा परिपूर्ण ॥ २२ ॥ कोश विज्ञान पहावा ॥ द्रष्ट दृश्यातींत अघवा ॥ २३ ॥ कोश जाणावा आनंद ॥ तो हा केवळ परमानंद ॥ २४ ॥ समष्टि व्यष्ट्यात्मक जग ॥ तें हें परब्रह्म अभंग ॥ २५ ॥ जनार्दन जन वन ॥ जनार्दन निरंजन ॥ २६ ॥ एका जनार्दनीं भाव ॥ एकनाथ झाला देव ॥ २७॥

॥ १०५ ॥ जनार्दन माय जनार्दन बाप ॥ जनार्दन ताप निवारिती ॥ ॥ १ ॥ जनार्दन बंधु जनार्दन भगिनी ॥ जनार्दन निर्वाणी मजलागीं ॥ ॥ २ ॥ जनार्दन सखा जनार्दन चुलता ॥ जनार्दन तत्वता प्राण माझा ॥ ॥ ३ ॥ जनार्दन सुहृद जनार्दन मित्र ॥ पवित्रापवित्र जनार्दन ॥ ४ ॥ जनार्दन जन जनार्दन विजन ॥ माझें तन मन जनार्दन ॥ ५ ॥ जनार्दन ऐश्वर्य जनार्दन धन ॥ मज निरंजन जनार्दन ॥ ६ ॥ जनार्दन जीव जनार्दन भाव ॥ जनार्दन शिव मजलागीं ॥ ७ ॥ जनार्दन पिंड जनार्दन ब्रह्मांड ॥ जनार्दन अखंड परब्रह्म ॥ ८ ॥ एका जनार्दनीं वृत्ति होय लीन ॥ झालासे तल्लीन परब्रह्मीं ॥ ९ ॥

॥ १०६ ॥ ध्येय ध्याता ध्यान ॥ अवघा माझा जनार्दन ॥ १ ॥ आसन शयन मुद्रा जाण ॥ अवघा माझा जनार्दन ॥ २ ॥ जप तप यज्ञ यागपण ॥ अवघा माझा जनार्दन ॥ ३ ॥ भुक्ति मुक्ति स्थावर जाण ॥ अवघा माझा जनार्दन ॥ ४ ॥ एकाएकीं वेगळा जाण ॥ अवघा भरला जनार्दन ॥ ५ ॥

॥ १०७ ॥ गेलों गुरुलागीं शरण ॥ माझें हारपलें मी तूंपण ॥ १ ॥ द्वैत भाव गेला देशोधडी ॥ बोध दिला मज संवगडी ॥ २ ॥ मंत्र सांगे त्रिअक्षर ॥ परात्पर निज घर ॥ ३ ॥ जपतां मंत्र लागलें ध्यान ॥ सहज खुटलें मी तूंपण ॥ ४ ॥ एका जनार्दनीं समाधी ॥ सहज तुटली उपाधी ॥ ५ ॥

॥ १०८ ॥ उपाधीच्या नांवें घातियेलें शून्य ॥ आणिका दैन्यवाणें काय बोलूं ॥ १ ॥ टाकूनियां संग धरियेला देव ॥ आतां तो उपाव दुजा नाहीं ॥ २ ॥ सर्व वैभव सत्ता तयाचे पदरीं ॥ जालों अधिकारी आह्मीं बळें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं तोडियेला संग ॥ जालों आह्मी निःसंग हरि-भजनीं ॥ ४ ॥

॥ १०९ ॥ काया वाचा मनें ॥ कृपाळू दीना कारणें ॥ १ ॥ ऐसा समर्थ तो कोण ॥ माझ्या जनार्दना वांचुन ॥ २ ॥ माझें मज दाख-विलें ॥ उघड वाचें बोलविलें ॥ ३ ॥ जनीं जनार्दन ॥ एका तयासी शरण ॥ ४ ॥

॥ ११० ॥ शिष्यापासून सेवा घेणें ॥ हें तों लक्षण अधमाचें ॥ १ ॥ ऐसे असती गुरु बहू ॥ नव्हेची साहूं भार त्यांचा ॥ २ ॥ एकपणें समानता ॥ गुरु शिष्य उरता उपदेश ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शरण ॥ गुरु माझा जनार्दन ॥ ४ ॥

॥ १११ ॥ उघड दाखविलें देवा ॥ नाहीं सेवा घेतली ॥ १ ॥ ऐसी प्रेमाची माउली ॥ जगीं व्यापक व्यापली ॥ २ ॥ नाहीं घालीत भार कांहीं ॥ आठव देहीं रामकृष्ण ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शरण ॥ मन माझें नेलें चोरून ॥ ४ ॥

॥ ११२ ॥ मज करूं दिली नाहीं सेवा ॥ दाविलें देवा देहींच ॥ १ ॥ जग व्यापक जनार्दन ॥ सदा वसे परिपूर्ण ॥ २ ॥ भिन्न भिन्न नाहीं मनीं ॥ भरलासे जनीं वनीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शरण ॥ सर्वांठायीं व्यापक जाण ॥ ४ ॥

॥ ११३ ॥ व्यापक हा जनार्दन ॥ जगचीं भरला संपूर्ण ॥ १ ॥ मागें पुढें आहे उभा ॥ काय वाणूं त्याची शोभा ॥ २ ॥ भरुनी उरला ॥

सर्वांठायीं तो संचला ॥ ३ ॥ शरण एका जनार्दनीं ॥ व्यापक तो जनीं वनीं ॥ ४ ॥

॥ ११४ ॥ येव्हढें जया कृपेचें करणें ॥ रंक मिरवती राज्यपणें ॥ १ ॥ तो हा कल्पतरु गुरु जनार्दनू ॥ छेदी देहाभिमानु भवकंदू ॥ २ ॥ कृपेचे वोरसें धांवे कामधेनू ॥ तैसा माझा मनु वेधिलासे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं तयावांचुनी कांहीं ॥ दुजें पहाणें नाहीं मनामाजीं ॥ ४ ॥

॥ ११५ ॥ दत्तराया करूं प्रथम नमन ॥ द्वितीय चरणा सद्गुरुच्या ॥ १ सद्गुरुच्या चरणा करावा प्रणाम ॥ मुखीं नित्य नाम सदा जप ॥ २ ॥ नित्य जपा वाचें गुरुराजस्वामी ॥ तेणें सुखधामीं प्राप्त व्हाल ॥ ३ ॥ प्राप्त व्हाल तुम्हीं आत्यंतिक सुखा ॥ जेथें जन्म दुःखा पार नाहीं ॥ ४॥ पार नाहीं वेदां शास्त्रें मौनावलीं ॥ पुराणें तीं झालीं मौन रूप ॥ ५ ॥ मौन रूप शेष ब्रह्मा आणि इंद्र ॥ सूर्य अग्नि चंद्रा अंत नाहीं ॥ ६ ॥ अंत नाहीं त्याचा अनंत स्वरूप ॥ अनिर्वाच्य रूप सद्गुरूचें ॥ ७॥ सद्गुरूचें रूप तें स्वयंप्रकाश ॥ हृदयीं जो प्रकाश सद्गुरूचा ॥ ८ ॥ सद्गुरूचा प्रेमा माझीया अंतरीं ॥ अनुभव साक्षात्कारीं झाला असे ॥ ९ ॥ झाला असे अनुभव अपरोक्ष ॥ शास्त्रीं जे विवक्षा केली असे ॥ १० ॥ केली असे स्तुति संत महानुभावी ॥ सद्गुरु वदवी मज लागीं ॥ ११ ॥ मजलागीं त्यांनीं दिली असे वाचा ॥ उपकार तयांचा काय वानूं ॥ १२ ॥ काय वानूं माझ्या सद्गुरु दयाळा ॥ बहुत कळवळा ज्यासी माझा ॥ १३ ॥ ज्यासी माझा प्राण अर्पण मीं केला ॥ देह हा विकिला सर्वस्वें मीं ॥ १४ ॥ सर्वस्वें मी वसें सद्गुरुचे पायीं ॥ अन्य प्रिय नाहीं मज लागीं ॥ १५ ॥ मज लागीं दया केली गुरुरायें ॥ हृदयीं ते पाय धरीयेले ॥ १६ ॥ धरीयेलीं जीवीं पाऊलें कोंवळीं ॥ कंठीं एकावळी नाम माळा ॥ १७ ॥ नाम माळा कंठीं शोभे ही साजिरी ॥ हृदयीं गोजिरी गुरुमूर्ती ॥ १८ ॥ गुरुमूर्ति वसे ज्याचे हृदयकमळीं ॥ तया चंद्रमौळी मागें पुढें ॥ १९ ॥ मागेंपुढें उभा राहे तो रक्षित ॥ कांहींच आघात येवों नेदी ॥ २० ॥ येवों नेदी कदा कल्पनेची बाधा ॥ आणिक आपदा शिष्यालागीं ॥ २१ ॥ शिष्यालागीं गुरु करिताती बोध ॥ स्वरूप स्वानंद देती तया ॥ २२ ॥ देती तया गुरु अनुपम सुख ॥ स्वानंद कौतुक त्यासी लाभे ॥ २३ ॥ त्यासी लाभे आत्मा सर्व अंतर्यामी ॥ चिन्मय सुख धामीं पहूडे

तो ॥ २४ ॥ पहूडे तो न ये कदा काळीं देहा ॥ तोचि निःसंदेहा पावलासे ॥ २५ ॥ पावलासे ब्रह्म अखंड परात्पर ॥ सारासार विचार करोनियां ॥ २६ ॥ करोनियां जेणें नित्य स्नान संध्या ॥ दोषांची ते बाधा वारीयेली ॥ २७ ॥ वारीयेली जेणें चित्त विक्षेपता ॥ करोनि उपास्यता सगुण मूर्ति ॥ २८ ॥ सगुण मूर्तिसी न ह्मणावें माईक ॥ शास्त्र आत्यंतिक सांगतसे ॥ २९ ॥ सांगतसे शास्त्र देवध्यान करा ॥ विक्षेप तो वारा चित्ताचा पैं ॥ ३० ॥ चित्ताचा गेलीया विक्षेप सकळ ॥ आवरण केवळ राहिलेंसे ॥ ३१ ॥ राहिलेंसे जया स्वरूपावरण ॥ त्याचें निवारण ज्ञानें होय ॥ ३२ ॥ ज्ञानें होय परी ज्ञान प्राप्तीलागीं ॥ साधनें तीं अंगीं विवेकादी ॥ ३३ ॥ विवेक वैराग्य शमादी ते षट्क ॥ चौथी ते देख मुमुक्षुता ॥ ३४ ॥ मुमुक्षुतेपुढें श्रवण मनन ॥ निज तें ध्यासन पाहिजे कीं ॥ ३५ ॥ पाहिजे कीं तत्त्व पदार्थ शोधन ॥ साधनें हीं जाण अंतरंग ॥ ३६ ॥ अंतरंग साधनें करावीं परमार्था ॥ त्यागावीं सर्वथा बहिरंगें ॥ ३७ ॥ बहिरंग साधनें होय स्वर्ग प्राप्ती ॥ निष्कामीं होती चित्तशुद्धी ॥ ३८ ॥ चित्तशुद्धि झाल्या अंतरंगा अधिकार ॥ विवेक निर्धार सांगतसों ॥ ३९ ॥ सांगतसों आतां विवेकाचें तथ्य ॥ ब्रह्म हेंची सत्य जगन्मिथ्या ॥ ४० ॥ मिथ्या माया कार्य जगत प्रकार ॥ ब्रह्म हेंचि सार विवेक हा ॥ ४१ ॥ विवेक हा स्मरा अनुभव करा ॥ वैराग्य अवधारा एक चित्तें ॥ ४२ ॥ एक चित्तें करा वैराग्य श्रवण ॥ तेणें समाधान स्वरूपीं होय ॥ ४३ ॥ स्वरूपीं होय स्थिति वैराग्याच्या योगें ॥ अन्न विष संगें सेवूं नये ॥ ४४ ॥ सेवूं नये विषय वमनाचे परी ॥ वीट तो अंतरीं सदा असो ॥ ४५ ॥ सदा असो प्रीति परमार्थालागी ॥ विषयविरागी याचें नांव ॥ ४६ ॥ याचें नांव शम मनाचा निग्रहो ॥ विषयीं आग्रहो चित्ता नाहीं ॥ ४७ ॥ चित्ता नाहीं कधीं विषयाची स्फूर्ती ॥ अंतरीं हे वृत्ति झाली असे ॥ ४८ ॥ झाली असे सर्व इंद्रियां स्थिरता ॥ दम हें तत्वतां ह्मणती त्या ॥ ४९ ॥ ह्मणती त्या उपरम स्वधर्मासी ॥ त्यागावें विधींसी सर्वस्वेंची ॥ ५० ॥ सर्वस्वेंचि शीत उष्णातें साहणें ॥ तितिक्षा ह्मणणें तयालागीं ॥ ५१ ॥ तयालागीं श्रद्धा ह्मणताती जनीं ॥ सद्गुरु वचनीं विश्वास तो ॥ ५२ ॥ विश्वास असावा वेदांतांचे ठायीं ॥ सद्गुरूचे पायीं लीन व्हावें ॥ ५३ ॥ लीन व्हावें चित्त सद्‍गुरु वचनीं ॥ तोचि समाधाना प्राप्त झाला ॥ ५४ ॥ प्राप्त झाला प्राणी मुमुक्षुतेलागीं ॥ प्रपंच संसर्गीं विटला तो

॥ ५५ ॥ विटला संसारा आणि घर दारां ॥ पुत्र परिवारा मिथ्या मानी ॥ ५६ ॥ मिथ्या मानी सर्व प्रपंच वैभव ॥ विषयांचें नांव नावडे ज्यासी ॥ ५७ ॥ नावडे ज्यासी इष्ट मित्र ते सोयरे ॥ परमार्थीं वेहवरे चित्त ज्याचें ॥ ५८ ॥ चित्त ज्याचें झालें प्रपंचीं विरक्त ॥ त्याचे मनीं आर्त सद्गुरु भेटी ॥ ५९ ॥ सद्गुरु भेटी व्हावी ऐसें ज्याचे मनीं ॥ तो सर्वां लागूनि विचारीत ॥ ६० ॥ विचारीत मला सद्गुरु कैं भेटती ॥ रात्रंदिवस चित्तीं दुजें नाहीं ॥ ६१ ॥ दुजें नाहीं तया आणिक जगांत ॥ सद्गुरु सर्वत्र दिसतसे ॥ ६२ ॥ दिसतसे गुरु आसनीं शयनीं ॥ आणिक भोजनीं गुरु दिसे ॥ ६३ ॥ गुरु दिसे जागृतीं स्वप्न आणि सुषुप्ती ॥ आनंद नेणती गुरुवीण ॥ ६४ ॥ गुरुवीण जनीं न दिसे ज्या अन्य ॥ चित्त होय धन्य गुरु भेटी ॥ ६५ ॥ गुरु भेटी होतां चित्त स्थिर होय ॥ तळमळ जाय मनाची ते ॥ ६६ ॥ मनाची ते शांति होतां पाय धरी ॥ दंडवत करी वेळोवेळां ॥ ६७ ॥ वेळोवेळां गुरुसी करी नमस्कार ॥ जोडोनिया कर उभा राहे ॥ ६८ ॥ जोडोनिया हात पुढें गुरुरायां ॥ बोलत सखया तारा स्वामी ॥ ६९ ॥ तारा स्वामि मज भवाचे सागरीं ॥ व्हावें कर्णधारी मजलागीं ॥ ७० ॥ मजलागीं गुरो तुमचा आधार ॥ ओस चराचर तुह्माविण ॥ ७१ ॥ तुह्माविण सखा मज नाहीं कोणी ॥ वाटतें चरणीं घालूं मिठी ॥ ७२ ॥ घालूं मिठी पायां सद्गुरु समर्था ॥ तेणें निज स्वार्था पावसील ॥ ७३ ॥ पावसील सुखा सद्गुरु माउली ॥ ती मज गावली शिष्य वत्सा ॥ ७४ ॥ शिष्य वत्सालागीं पाजी ज्ञान दुग्ध ॥ तेणें देह शुद्ध होय त्याचा ॥ ७५ ॥ देह त्याचा केला ब्रह्म हा गुरुनें ॥ काया वाचा मनें चरण धरी ॥ ७६ ॥ चरण धरीतसे शिष्य वेळोवेळां ॥ माझा कळवळा असो तुह्मां ॥ ७७ ॥ तुह्मांवीण मज कोण हो तारील ॥ दीन उद्धरेल कैसा परी ॥ ७८ ॥ कैशा परी मज होईल सुटका ॥ प्रपंच लटिका वाटे केव्हां ॥ ७९ ॥ केव्हां वाटे मज जगत हें मिथ्या ॥ ब्रह्माचें सत्यत्व केव्हां पावे ॥ ८० ॥ केव्हां पावे मज स्वरूपाची शांति ॥ तें मज निश्चिती सांगा स्वामी ॥ ८१ ॥ सांगा स्वामि मज कृपा हो करुनी ॥ शिष्य विनवणी करी ऐशी ॥ ८२ ॥ करी ऐशी दया मज गुरुराया ॥ लागतसे पायां शिष्यराज ॥ ८३ ॥ शिष्यराजा झाली अष्टभाव प्राप्ति ॥ सद्गुरूनीं हातीं धरीयेला ॥ ८४ ॥ धरीयेला करीं नेला एकांतांत ॥ अंकीं बैसवीत सद्गुरुराव ॥ ८५ ॥ सद्गुरुराव त्यासी बोलती सा क्षणीं ॥ लागली

उन्मनी तयालागीं ॥ ८६ ॥ तयालागीं नाहीं देहाचा आठव ॥ स्थूल सूक्ष्म भाव मावळले ॥ ८७ ॥ मावळले चारी देह चारी अवस्था ॥ शिष्य तो तत्वतां ब्रह्म झाला ॥ ८८ ॥ ब्रह्म झाला त्याचा देह आत्म स्थिती ॥ द्वैताद्वैत प्रतीति नाहीं जया ॥ ८९ ॥ नाहीं जया सुख दुःखाची भावना ॥ समूळ वासना निरसली ॥ ९० ॥ निरसली त्याची अहंकार कल्पना ॥ सुखदुःख यातना नाहीं तया ॥ ९१ ॥ नाहीं तया जीव शिव भेदाभेद ॥ समूळ हे वाद मिथ्या झाले ॥९२॥ मिथ्या झाले ज्ञान ज्ञेय आणि ज्ञाता ॥ भोग्य भोग भोक्ता मावळला ॥ ९३ ॥ मावळला तेव्हां द्वैत प्रपंच ॥ एक ब्रह्म साच अनुभविलें ॥ ९४ ॥ अनुभविलें तेणें अनुभव वेडावला ॥ विचार निमाला जिये ठायीं ॥ ९५ ॥ जिये ठायीं गति नाहीं षट् प्रमाणां ॥ साधन लक्षणां ठाव कैचा ॥ ९६ ॥ ठाव कैचा तेथें परादिकां वाचां ॥ जेथें त्या शब्दाचा लाग नाहीं ॥ ९७ ॥ लाग नाहीं तेथें उपपत्ति युक्ती ॥ अपरोक्ष प्रतीति लया गेली ॥ ९८ ॥ लया गेली तया स्थानीं मज ठेविलें ॥ सद्गुरु दयाळें दीनानाथें ॥ ९९ ॥ दीनानाथें तया ठायीं निजविलें ॥ नवजाती वर्णिले गुण तया ॥ १०० ॥ एकाजनार्दन गुरुपायीं लीन ॥ ब्रह्म परिपूर्ण अनुभविलें ॥ १०१ ॥

॥ ११६ ॥ नमो सद्गुरुराया दीनाच्या वत्सला ॥ पावावें दासाला ब्रीद तुझें ॥ १ ॥ ब्रीद तुझें जगीं पतित पावन ॥ भक्तासी रक्षणें सर्व काळीं ॥ २ ॥ सर्व काळीं भक्त आठविती तूज ॥ ब्रीदाची ते लाज धरणें लागे ॥ ३ ॥ धरणें लागे तुज भक्ताचा अभिमान ॥ आश्रय त्या कोण तुझ्याविणें ॥ ४ ॥ तुझ्याविणें त्यासी नाहीं कोणी सखा ॥ संसार पारिखा वाटे त्यासी ॥ ५ ॥ वाटे त्यासी माझा आधार सद्गुरु ॥ इच्छा मी कां करूं आणिकाची ॥ ६ ॥ आणिकाची इच्छा कासया करावी ॥ प्रपंचीं ते गोवी जेणें होय ॥ ७ ॥ जेणें होय प्राण्या जन्म मरण दुःख ॥ तया आत्मसुख भेट नाहीं ॥ ८ ॥ भेट नाहीं जया आत्मापरमात्म्याची ॥ हानी नरदेहाची केली त्याणें ॥ ९ ॥ केली तेणें जरी जप तपें फार ॥ नाहीं त्या आधार गुरुविना ॥ १० ॥ गुरुविना प्राण्या नव्हेचि सद्गती ॥ ऐसें वेदश्रुति बोलताती ॥ ११ ॥ बोलताती सिद्ध साधु महानुभाव ॥ गुरुविण वाव सत्कर्में तीं ॥ १२ ॥ सत्कर्में ती वार चित्त शुद्ध करा ॥ तेणें पाय धरा सद्गुरूचे ॥ १३ ॥ सद्गुरूचे पाय जयासी लाधले ॥ तेणें निरसिलें प्रपंचासी ॥ १४ ॥ प्रपंचासी बाध केला गुरुदासें ॥ चरणीं

विश्वास ठेवोनियां ॥ १५ ॥ ठेवोनियां जीव सद्गुरूचे पायीं ॥ प्रपंच व्यवसायीं वागतसे ॥ १६ ॥ वागतसे जनीं परि तो विजनीं ॥ भेद भाव मनीं नाहीं जया ॥ १७ ॥ नाहीं जया चित्तीं आणिक वासना ॥ सद्गुरु वचना विश्वासला ॥ १८ ॥ विश्वासला मनें सद्गुरु चरणीं ॥ प्रेम अन्य स्थानीं नाहीं ज्याचें ॥ १९ ॥ नाहीं ज्याचें तन मन आणि धन ॥ गुरुसी अर्पण केलें असे ॥ २० ॥ केलें असे जेणें निष्काम तें कर्म ॥ चित्तशुद्धिवर्म हाता आलें ॥ २१ ॥ हातां आलें जया चित्ताचें तें स्थैर्य ॥ सद्गुरु आचार्य भेटले सा ॥ २२ ॥ भेटले सा मायबाप सद्गुरुराव ॥ दयासिंधु नांव असे ज्यासी ॥ २३ ॥ असे ज्यासी सर्व श्रुति अध्ययन ॥ ब्रह्मपरायण अहर्निशीं ॥ २४ ॥ अहर्निशीं चित्त ब्रह्मींचि रंगलें ॥ विषय उरलें नाहीं जया ॥ २५ ॥ नाहीं जया काम क्रोधाची भावना ॥ आणिक वासना नानापरी ॥ २६ ॥ नानापरी जग जरी देखियेलें ॥ ब्रह्म हें भरलें ओतप्रोत ॥ २७ ॥ ओतप्रोत आत्मा स्वरूप जयासी ॥ तयासी द्वंद्वासी भेटी कैंची ॥ २८ ॥ भेटी कैसी तया सुख दुःख द्वंद्वा ॥ लोभ मोह आपदा नाहीं त्यासी ॥ २९ ॥ नाहीं त्यासी मनीं द्वैताद्वैत नांव ॥ आत्मस्थिति भाव सर्व जगीं ॥ ३० ॥ सर्व जगीं दिसे ब्रह्मरूप ज्यासी ॥ उपमा तयासी काय देऊं ॥ ३१ ॥ काय देऊं जगीं नसे त्यासमान ॥ स्वयंप्रकाशमान सद्गुरुराज ॥ ३२ ॥ सद्गुरुराजानें केली मज कृपा ॥ ब्रह्मानंद सोपा केला मज ॥ ३३ ॥ केला मजवर उपकार गुरूनें ॥ तयासी उत्तीर्ण काय होऊं ॥ ३४ ॥ काय होऊं उतराई गुरुराया ॥ मस्तक हा पायां सदा असो ॥ ३५ ॥ सदा असो माझे अंतरीं वसती ॥ अखंड प्रेम प्रीति गुरुरूपीं ॥ ३६ ॥ गुरुरूपीं मज आत्यंतिक सुख ॥ अवलोकी मुख सर्वकाळ ॥ ३७ ॥ सर्वकाळ मुखीं सद्गुरूचें नाम ॥ आणिक तें काम नाहीं मज ॥ ३८ ॥ नाहीं मज प्रिय सद्गुरूवांचूनी ॥ दृढ निश्चय मनीं केला असे ॥ ३९ ॥ केला असे प्राणसखा सद्गुरुराजा ॥ मन साची पूजा सदा करी ॥ ४० ॥ सदा करी मन सद्गुरुअर्चन ॥ तेणें समाधान होय त्यासी ॥ ४१ ॥ होय त्यासी सुख मुखें वर्णवेना ॥ षड्विध प्रमाणां लाग नाहीं ॥ ४२ ॥ लाग नाहीं जेथें अग्नि चंद्र सूर्या ॥ कारण सा कार्या नाश जेथें ॥ ४३ ॥ नाश जेथें असे सकळ ब्रह्मांडा ॥ त्या सुखा अखंडा काय वानूं ॥ ४४ ॥ काय वानूं जेथें श्रुति मौनावल्या ॥ प्रमा त्या पावल्या लया जेथें ॥ ४५ ॥ लय जेथें असे सर्व कल्पनांचा ॥

तेथें इंद्रियांचा काय पाड ॥ ४६ ॥ काय पाड असे अंतर इंद्रियां ॥ चारी देह वाया झाले जेथें ॥ ४७ ॥ झाले जेथें लीन मन इंद्रिय प्राण ॥ त्या सुखा वर्णन कैसें होय ॥ ४८ ॥ कैसें होय वक्ता वाच्य आणि वचन ॥ त्रिपुटी हे क्षीण जया ठायीं ॥ ४९ ॥ जया ठायीं वसती तेहतीस कोटी देव ॥ तें सुख वैभव काय सांगूं ॥ ५० ॥ काय सांगूं मज मुखें वर्णवेना ॥ तेणें मीतूंपणा मावळला ॥ ५१ ॥ मावळला आतां जगदांधकार ॥ समूळ संसार पारुषला ॥ ५२ ॥ पारुषला मज सकळ द्वैत भाव ॥ दिसे भावाभाव ब्रह्मरूप ॥ ५३ ॥ ब्रह्मरूप जग व्यष्टि हें समष्टी ॥ भासे कृपादृष्टी सद्गुरूच्या ॥ ५४ ॥ सद्गुरूच्या कृपें हरपे जीव शिव ॥ ब्रह्म एकमेव अद्वितीय ॥ ५५ ॥ अद्वितीय ब्रह्म प्रत्यक्ष हें दिसे ॥ दृष्टि समरसें तदाकार ॥ ५६ ॥ तदाकार झाला सकळ हा देह ॥ राहे तो संदेह कैशापरी ॥ ५७ ॥ कैशापरी राहे द्वैताची भावना ॥ विपरीत असंभावना निवर्तल्या ॥ ५८ ॥ निवर्तल्या जेथें शास्त्रांचीया मती ॥ मनादिपक पंक्ति मावळली ॥ ५९ ॥ मावळली मज द्वैताद्वैत क्लृप्ति ॥ सुखें सहज स्थिति भोगितसों ॥ ६० ॥ भोगितसों आह्मीं सुखें परमानंद ॥ कोटि हे आनंद वसती जेथें ॥ ६१ ॥ वसती जेथें सिद्ध महानुभाव संत ॥ असें तें अनंत ब्रह्मसुख ॥ ६२ ॥ ब्रह्मसुख झालें सहज जयासी ॥ तयाच्या भाग्यासी पार नाहीं ॥ ६३ ॥ पार नाहीं तया सुखा प्राप्त झाला ॥ संदेह तो झाला चिदानंद ॥ ६४ ॥ चिदानंद नित्य अज निरामय ॥ निर्विकार सबाह्य एकरूप ॥ ६५ ॥ एकरूप ब्रह्म उपाधिरहित ॥ तेथें तो वसत भाग्यवंत ॥ ६६ ॥ भाग्यवंत ऐसा असे गुरुदास ॥ देहासी उदास सर्वकाळ ॥ ६७ ॥ सर्वकाळीं करी सत्क्रिया भजन ॥ आणिक उपासन सद्गुरूचें ॥ ६८ ॥ सद्गुरूचें पादतीर्थ सदा सेवी ॥ प्रपंचीं त्या गोवी कैशी होय ॥ ६९ ॥ कैशी होय गुरुभक्ता अधोगति ॥ लागला सत्पथीं गुरुकृपें ॥ ७० ॥ गुरुकृपें ज्यासी सत्पथ पावला ॥ जीव सुखावला ब्रह्मसुखें ॥ ७१ ॥ ब्रह्मसुखें झालों मी सदा संपन्न ॥ ब्रह्म परिपूर्ण अनुभविलें ॥ ७२ ॥ अनुभविलें ब्रह्म अंतर सबाह्य ॥ जग ब्रह्ममय झालें दिसे ॥ ७३ ॥ झाले दिसे ब्रह्म चतुर्दश लोक ॥ शुद्धाशुद्ध विवेक नाहीं जेथें ॥ ७४ ॥ नाहीं जेथें द्वैताद्वैत जे उपाधि ॥ ते सुखीं समाधि दासा झाली ॥ ७५ ॥ दासा झाली निद्रा शून्य सारूनिया ॥ वृत्ति पावलीया ब्रह्मसुखा ॥ ७६ ॥ ब्रह्मसुखा पावे ज्याचें अंतःकरण ॥ सर्व काळीं

जाण ब्रह्मरूप ॥ ७७ ॥ ब्रह्मरूप झालें जयाचें तें अंग ॥ तया नित्य संग सज्जनाचा ॥ ७८ ॥ सज्जनाचा संग जयासी पैं होय ॥ तया उणें काय निज सुखा ॥ ७९ ॥ निज सुखा प्राप्त झाला संतसंगें ॥ तयाचीं सर्वांगें ब्रह्म झालीं ॥ ८० ॥ ब्रह्म झालें त्याचें काया वाचा मन ॥ साध्य आणि साधन सर्व ब्रह्म ॥ ८१ ॥ सर्व ब्रह्मा वीण नाहीं ज्यासी अनुभव ॥ ऐसा त्याचा भाव एकविध ॥ ८२ ॥ एकविध भाव जयाचिया मनीं ॥ त्यासी चक्रपाणि अंकिलासे ॥ ८३ ॥ अंकिलासे देव तया सद्गुरुकृपें ॥ अहंकार पापें सोडियेलें ॥ ८४ ॥ सोडियेलें त्यासी कामादि षड्विकारीं ॥ वस्ति त्या अंतरीं देवें केली ॥ ८५ ॥ देवें केलीं त्यांसी आपुलीं अंकीत ॥ तोचि त्यांचें हित सत्य जाणे ॥ ८६ ॥ सत्य जाणे एक सद्गुरु दयाळ ॥ चरणकमळ त्याचें ध्यावें ॥ ८७ ॥ त्याचे ध्यावे चरण सदा सर्वकाळ ॥ प्रपंच सकळ सांडूनियां ॥ ८८ ॥ सांडूनियां ह्मणजे मिथ्या हा पहावा ॥ सद्गुरु करावा पाठीराखा ॥ ८९ ॥ पाठीराखा होय सद्गुरु जयासी ॥ कळिकाळ त्यासी बाधती ना ॥ ९० ॥ बाधती ना त्यासी मुक्ति रिद्धि सिद्धि ॥ ज्याची सदा बुद्धि सद्गुरुपायीं ॥ ९१ ॥ सद्गुरुपायीं ज्याचें चित्त स्थिर झालें ॥ तयासी जोडलें मोक्षपद ॥ ९२ ॥ मोक्षपद त्याची इच्छा तें करीत ॥ भक्ताचे मनांत गुरुपद ॥ ९३ ॥ गुरुपदयोगें मुक्ति तुच्छ त्यासी ॥ त्याचिया म.नसीं गुरु वसे ॥ ९४ ॥ गुरु वसे मनीं सदा सर्वकाळ ॥ तुटली हळहळ प्रपंचाची ॥ ९५ ॥ प्रपंचाची चिंता गुरुदासा नसे ॥ योग क्षेम असे गुरु हातीं ॥ ९६ ॥ गुरुहातीं असे सर्व त्याचें काम ॥ दासा मुखीं नाम गुरु गुरु ॥ ९७ ॥ गुरु गुरु जप अज्ञाननाशक ॥ भवसिंधुतारक गुरुनाम ॥ ९८ ॥ गुरुनामासम आणिक नाहीं मंत्र ॥ सांगताती शास्त्रें महानुभाव ॥ ९९ ॥ एकाजनार्दन गुरुपदीं मस्तक ॥ ठेवुनी सम्यक ब्रह्म झाला ॥ १०० ॥

॥ ११७ ॥ आगम निगम शोधिता तुझी प्राप्ति होय न होय ॥ मनाचा संदेह न तुटे तेथें आयुष्य व्यर्थ जाय रे ॥ १ ॥ माझ्या जीवींच्या जिवना जय जनार्दना तूं माझा क्षणएक अनुभव राहे रे ॥ तुझ्या नामीं होकां निर्वाहो ॥ धृ० ॥ अबद्ध वेद पढतां अवश्य पावे निषेध ॥ अबद्ध नाम ह्मणतां श्रोते वक्ते होती शुद्ध ॥ २ ॥ अबद्ध मंत्र जपतां चळले उठाउठी ॥ अबद्ध नाम ऐकतां तरले कोट्यान कोटी ॥ ३ ॥ वर्णाश्रम धर्म चाळितां देही देहांतर भोगी ॥ कर्माभिमान न तुटे कर्मयोगी तो भव रोगी हो ॥ ४ ॥

पाई सर्वदां ॥ ३ ॥ नलगे भुक्ति आणि मुक्ती ॥ संत संगती मज गोड ॥ ४ ॥ त्याचें वेड माझे मनीं ॥ शरण एका जनार्दनीं ॥ ५ ॥

॥ २५० ॥ जयजयजी देवाधिदेवा ॥ पंढरिरावा श्रीविठ्ठला ॥ १ ॥ येउनीया हृदईं वसा ॥ मागणें सहसा दुजें नाहीं ॥ २ ॥ भुक्तिमुक्ति नको कांहीं ॥ लिगाड तेंही मज आतां ॥ ३ ॥ भाळीभोळी घ्यावी सेवा ॥ हीच देवा विनवणी ॥ ४ ॥ एका जनार्दनीं तुमचा दास ॥ त्याची आस पाया पैं ॥ ५ ॥

॥ २५१ ॥ द्वारकेभीतरीं ॥ कामधेनु घरोघरीं ॥ १ ॥ कैशी बरवेपणाची शोभा ॥ पहातां नयना निघती जिभा ॥ २ ॥ घरोघरीं आनंद सदां ॥ रामकृष्ण वाचे गोविंदा ॥ ३ ॥ ऐशीद्वारके परी ॥ एका शरण श्रीहरी ॥ ४ ॥

---

## भक्त वाच्छल्य.

॥ २५२ ॥ गाण्याचें कीर्तन वाखाणिलें ॥ जाणीवेचें ज्ञान तें जाणिवेनें खादलें ॥ १ ॥ भवार्णव हा अवघा उभारी ॥ तो कळे जाणिवेवरी ॥ २ ॥ पंडिताचा बोध विध्वंसी वाद ॥ तापसाचें तप निर्दाळी क्रोध ॥ ३ ॥ योगियाचा योग नाडियेला सिद्धी ॥ अभिमान नाडी सज्ञानबुद्धी ॥ ४ ॥ कर्माकर्म नाडी वर्णाश्रम ॥ संबंधीं विषम विकल्प करी ॥ ५ ॥ एका जनार्दनीं भगवत्कृपा पूर्ण ॥ निरभिमानें चरण धरियेले ॥ ६ ॥

॥ २५३ ॥ वैष्णवा घरीं देव सुखावला ॥ बाहीर नवजे दवडोनी घातिला ॥ १ ॥ देव ह्मणे माझें पुरतसे कोड ॥ संगती गोड या वैष्णवांची ॥ २ ॥ जरि देव नेउनी घातिला दुरी ॥ परतोनी पाहे तंव घरा भीतरीं ॥ ३ ॥ कीर्तनाची देवा आवडी मोठी ॥ एका जनार्दनीं पडली मिठी ॥ ४ ॥

॥ २५४ ॥ राम भावाचा भुकेला ॥ सांडोनी दुर्योधन सदनाला ॥ ॥ १ ॥ विदुर गृहा प्रति गेला ॥ विश्रांति तेथें पावला ॥ २ ॥ शबरीचीं फळें भक्षी ॥ क्षीरनिधी शयन साक्षी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं निश्चय ऐसा ॥ देव भक्ताधीन सहसा ॥ ४ ॥

॥ २५५ ॥ भावें घातली कास देव झाला दास ॥ सोशी गर्भवास भाविकांचे ॥ १ ॥ भावचि कारण भावचि कारण ॥ या परतें साधन आणिक

नाहीं ॥ २ ॥ भावाचेनि बळें जीवपण बोवळें ॥ मन हें सोंवळें ब्रह्मसाम्य ॥ ३ ॥ एका जनार्दनीं भावचि कारण ॥ सच्चिदानंदावरी खूण दाविली ते ॥ ४ ॥

॥ २५६ ॥ नामरूप मज आणिलें जिहीं ॥ त्यांची या उपकारा नोहे उतराई ॥ १ ॥ भक्ताचे उपकार कशानें फेडी ॥ यालागीं त्याचें उच्छिष्ट काढी ॥ २ ॥ भक्ताचेनी पालटें येतो गर्भवासा ॥ उपकार उतराई नोहे कैसा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं उतराई नोहे ॥ यालागीं भक्तासी न विसंबे जीवें ॥ ४ ॥

॥ २५७ ॥ स्तंभ फोडीत कटकट ॥ दाढा व्यंकट विकट ॥ उद्भट विर विकट ॥ नर केसरी ॥ १ ॥ जिव्हा लळलळित लटलट ॥ घुरघुरीत कंठ ॥ स्वासें नासापुट उतट ॥ पिंगट जटाजूट दाट ॥ २ ॥ बाण सणसणाट ॥ वज्र दणदणाट ॥ नखें तिखें तिखट बोट ॥ रागें फोडी पोट ॥ ३ ॥ हात तट सुभट भट ॥ नेत्र गरगराट ॥ चंद्रसूर्यगरगराटरे ॥ ४ ॥ शब्द कटकट ॥ साधनीं कष्ट फुकट ॥ एका जनार्दनीं नामें वैकुंठ पीठ रे ॥ ५ ॥

॥ २५८ ॥ दीनाची या काजा ॥ धांवे वैकुंठींचा राजा ॥ १ ॥ तो हा हरि विटेवरी ॥ सम कर धरुनी करीं ॥ २ ॥ भक्ता पुंडलीका पाहे ॥ उभारुनी दृढ बाहे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शरण ॥ विठ्ठल नाम पतीत पावन ॥ ४ ॥

॥ २५९ ॥ पतीत पावन नाम श्रीविठ्ठलाचें ॥ आणीक मी त्याचें नेणें कांहीं ॥ १ ॥ पतीत पावन नाम वदे वाणी ॥ विठ्ठला वांचुनी कांहीं नेणें ॥ २ ॥ पतीत पावन नामें तारिली गणिका ॥ अजामेळ देखा सरता केला ॥ ३ ॥ पतीत पावन नाम जनीं वनीं ॥ एका जनार्दनीं नाम वाचे ॥ ४ ॥

॥ २६० ॥ गणिका नेली मोक्षपदा ॥ रामनाम वदे एकदां ॥ १ ॥ धन्य नामाचा महिमा ॥ वदतां शेषा उपरमा ॥ २ ॥ ध्यानीं ध्यातो शूळपाणी ॥ रामनाम निशी दिनीं ॥ ३ ॥ रामनाम तें दोन अक्षर ॥ एका जनार्दनीं निर्धार ॥ ४ ॥

॥ २६१ ॥ भोळा देव भोळा देव ॥ उंच नीच नेणे भाव ॥ १ ॥ चोखीयाच्या मागें धांवे ॥ शेले कबिराचे विणावे ॥ २ ॥ खुरपूं लागे सांवत्यासी ॥ उणें येवों नेदी कोणासी ॥ ३ ॥ विष पिणें धाउनी जाणें ॥

भाविकाची भाजी खाणें ॥ ४ ॥ कण्याची तो आवडी मोठी ॥ एका जनार्दनीं लाळ घोटी ॥ ५ ॥

॥ २६२ ॥ साचपणें देवा शरण पैं जाती ॥ तया वैकुंठपती विसरेना ॥ १ ॥ जैसीं कन्या दूरदेशीं येकटी ॥ रात्रंदिवस संकटीं घोकी मायबाप ॥ ३ ॥ पतिव्रतेचें सर्व मन पतिपायीं ॥ तैसा देव ठाईं तिष्ठतसे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं मज हा अनुभव ॥ जनार्दनें देव दाखविला ॥४ ॥

॥ २६३ ॥ होतां द्वारपाळ लाज वाटे थोरी ॥ न साहे भिकारी जाला हरी ॥ १ ॥ बळीचा तो द्वारी सारथी पार्थाचा ॥ गोसावी आमुचा वेद वाणी ॥ २ ॥ गर्भ न साहती यातायाती जना ॥ एका जनार्दना शरण वेगें ॥ ३ ॥

॥ २६४ ॥ अंबऋषि राया पडिले सायास ॥ सोसी गर्भवास स्वयें देव ॥ १ ॥ उच्छिष्टही खातां प्रायश्चित्त असे ॥ गोपाळांचे ग्रास खाय हरी ॥ २ ॥ एका जनार्दनीं भक्ताचा अंकीत ॥ ह्मणोनी तिष्ठत विटेवरी ॥ ३ ॥

॥ २६५ ॥ दयेचें धाम नेघे कोणचाही श्रम ॥ हरि वर्णी सप्रेम दृढ निजभावें ॥ १ ॥ प्रसन्न होउनी दीनातें पहातो ॥ आवडी उद्धरितो भाविकासी ॥२॥ एका जनार्दनीं भक्तिसी भुलला ॥ ह्मणोनी वेडावला भक्तामागें ॥ ३ ॥

॥ २६६ ॥ ऐशी आवडी मिनली सुखा ॥ देव उभा भक्तद्वारीं देखा ॥ १ ॥ धन्यधन्य पुंडलिका ॥ उभें केलें वैकुंठनायका ॥ २ ॥ युगें अठ्ठाविस नीट ॥ उभा विटे करीं धरुनीया कट ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शरण जाऊं ॥ काया वाचा मनें सासी ध्याऊं ॥ ४ ॥

॥ २६७ ॥ कैसा पुंडलीका उभा केला ॥ वैकुंठाहुनी भक्तीं चाळविला ॥ १ ॥ नेणों रे कैसें बोळलें ॥ अधीन केलें आपुलीया ॥ २ ॥ दर्शन मात्रें प्राणिया उद्धार ॥ ऐशी कीर्ति चराचर ॥ ३ ॥ एका जनार्दनीं ह्मणे पुंडलीका ॥ भक्तशिरोमणी तूंची देखा ॥ ४ ॥

॥ २६८ ॥ विश्व पाळिताहे हरी ॥ दासा केवीं तो अव्हेरी ॥ १ ॥ नवमास गर्भवास ॥ नाहीं भागला आह्मास ॥ २ ॥ बाळपणीं वांचविलें ॥ स्तनीं दुग्ध तें निर्मिलें ॥ ३ ॥ कीटक पाषाणांत वसे ॥ त्याचे मुखीं चारा असे ॥ ४ ॥ धरा धरा हा विश्वास ॥ एका जनार्दनीं त्याचा दास ॥ ५ ॥

॥ २६९ ॥ देव भक्त एके ठायीं ॥ संतमेळ तया गांवीं ॥ १ ॥ ते हे जाणा पंढरपूर ॥ देव उभा विटेवर ॥ २ ॥ भक्त येती लोटांगणीं ॥ देव पुरवी मनोरथ मनीं ॥ ३ ॥ धांवे सामोरा तयासी ॥ आलिंगून क्षेम पुसी ॥ ४ ॥ ऐशी आवडी मानी मोठी ॥ एका जनार्दनीं घाली मिठी ॥ ५ ॥

॥ २७० ॥ मिठी घालुनीया भक्ता ॥ ह्मणे शिणलेती आतां ॥ १ ॥ धांवे चुरावया चरण ॥ ऐसा लाघवी आपण ॥ २ ॥ योगीयासी भेटी नाहीं ॥ तो आवडीनें कवळी बाहीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं भोळा ॥ भक्ता आलिंगी सांवळा ॥ ४ ॥

॥ २७१ ॥ देखोनीया देवभक्त ॥ सनकादिक आनंदत ॥ १ ॥ ह्मणती जावें पंढरपुरा ॥ पाहूं दीनाचा सोइरा ॥ २ ॥ आनंदें सनकादिक ॥ पाहूं येती तेथें देख ॥ ३ ॥ विठ्ठलचरणीं ॥ शरण एका जनार्दनीं ॥ ४ ॥

॥ २७२ ॥ पूजी माझीया भक्तातें ॥ तेणें संतोष होत मातें ॥ १ ॥ भक्त माझा मी भक्ताचा ॥ ऐसी परंपरा साचा ॥ २ ॥ देव भक्तपण ॥ वेगळीक नाहीं जाण ॥ ३ ॥ भक्त जेवतांची धालों ॥ एका जनार्दनीं लाधलों ॥ ४ ॥

॥ २७३ ॥ बैसोनीयां हाटवटी ॥ सांगे गोष्टी लौकीक ॥ १ ॥ तैसें नव्हे भक्तपण ॥ घातला दुकान पसारा ॥ २ ॥ वर्माचें तें पाठांतर ॥ केला भार बहुतची ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सार ॥ भुंके फार खर जैसा ॥ ४ ॥

॥ २७४ ॥ सर्व कर्म मदर्पण ॥ करितां मन शुद्ध होय ॥ १ ॥ न्यून तें चढतें जाण ॥ करी संपूर्ण मी येक ॥ २ ॥ माझ्या ठाई ठेउनी मन ॥ करी कीर्तन आवडी ॥ ३ ॥ मन ठेउनी माझे ठाई ॥ वसो कोठें भलते ठाई ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं मन ॥ करा मजची अर्पण ॥ ५ ॥

॥ २७५ ॥ माझा भक्त मज अंतरीं ॥ मी सदा बाहेरी तिष्ठतसें ॥ १ ॥ ऐशी परस्परें खूण ॥ जाणती तें ब्रह्मज्ञान ॥ २ ॥ माझी सायुज्यता मुक्ती ॥ घेउनी बळें मीच होती ॥ ३ ॥ सायुज्यापरीस भक्ति गोड ॥ एकाजनार्दनीं धरती चाड ॥ ४ ॥

॥ २७६ ॥ उतरावया धरा भार ॥ धरी अवतार कृपाळू ॥ १ ॥ पाळीतसे भक्तलळा ॥ नोहे वेगळा वेगळीक ॥ २ ॥ जया आवडे जें

कांहीं ॥ देतां न ह्मणे थोडें कांहीं ॥ ३ ॥ पुरवी इच्छा जैसी आहे ॥ मच्छ कच्छ तयासाठीं होय ॥ ४ ॥ ऐसा कृपेचा कोंवळा ॥ एकाजनार्दनीं पाहूं डोळा ॥ ५ ॥

॥ २७७ ॥ भक्तालागीं अणुमात्र व्यथा ॥ ते न साहवे भगवंता ॥ १ ॥ करुनी सर्वांगाचा वोढा ॥ निवारीतसे भक्त पीडा ॥ २ ॥ होउनी भक्ताचा अंकितू ॥ सारथीपणें तो करितू ॥ ३ ॥ प्रल्हादासी दुःख मोठें ॥ होतांची काष्टीं प्रगटे ॥ ४ ॥ ऐसा अंकित चक्रपाणी ॥ एका शरण जनार्दनीं ॥ ५ ॥

॥ २७८ ॥ भक्ति भावार्थें अर्पिलें ॥ देवें आपणापाशीं ठेविलें ॥ १ ॥ नेदी कोणाचीये हातीं ॥ भक्तांवांचुनी निश्चितीं ॥ २ ॥ जुनाट जुगादीचें ॥ ठेवणें होतें तें संताचें ॥ ३ ॥ पुंडलीकें करुनी वाद ॥ ठेवणें केलें तें प्रसिद्ध ॥ ४ ॥ नेदी ह्मणोनी उभा केला ॥ एकाजनार्दनीं अबोला ॥ ५ ॥

॥ २७९ ॥ अंकीत भक्ताचा ॥ नीच काम करी साचा ॥ १ ॥ काढी धर्मा घरीं ॥ उचिष्टपात्रें निर्धारीं ॥ २ ॥ कुब्जेसी रतला ॥ एकाजनार्दनीं भला ॥ ३ ॥

॥ २८० ॥ शरणांगता नुपेक्षी हरी ॥ ऐसी चराचरीं कीर्ति ज्याची ॥ १ ॥ बिभीषणें नमस्कार केला ॥ राज्यधर केला श्रीरामें ॥ २ ॥ उपमन्या दुधाचा पै छंद ॥ क्षीरसागर गोविंद त्या देत ॥ ३ ॥ ध्रुव बैसविला अढळपदीं ॥ गणिका बैसली मोक्षपदीं ॥ ४ ॥ ऐसी कृपेची साउली ॥ एकाजनार्दनीं माउली ॥ ५ ॥

॥ २८१ ॥ ज्याची प्रतिज्ञा निर्धारी ॥ देवा हरि आणियेलें ॥ १ ॥ तो हा शांतनूचा रावो ॥ भीष्म देवो संग्रामीं ॥ २ ॥ शस्त्र न धरी ऐसा बोल ॥ साचा केला संग्रामीं ॥ ३ ॥ विकळ पडतांची अर्जुन ॥ धरिलें सुदर्शन हस्तकीं ॥ ४ ॥ ऐसा कृपेचा कळवळा ॥ एकाजनार्दनीं पाळी लळा ॥ ५ ॥

॥ २८२ ॥ आह्मां सकळां देखतां ॥ पुरवी लळे तो सर्वथा ॥ १ ॥ जें जें मागावें तयासी ॥ तें तें देतो निजभक्तासी ॥ २ ॥ नमने अंकिताचा शीण ॥ राहे द्वारपाळ होऊन ॥ ३ ॥ घोडें धुतलें रणांगणीं ॥ एका शरण जनार्दनीं ॥ ४ ॥

॥ २८३ ॥ अंकित अंकिला ॥ देव भक्ताचा पैं जाला ॥ १ ॥ पहा पुंडलीकासाठीं ॥ उभा असे वाळुवंटीं ॥ २ ॥ युगें अठ्ठावीस जालीं ॥ न बैसे अद्यापि तो खालीं ॥ ३ ॥ न बैसेची उभा असे ॥ एकाजनार्दनीं भक्ति पिसें ॥ ४ ॥

॥ २८४ ॥ प्रत्यक्ष पाहारे जाऊन ॥ विटेवरी ठेविले चरण ॥ १ ॥ रूप सुंदर गोजिरें ॥ कानीं कुंडलें मकराकारें ॥ २ ॥ पुढें शोभे चंद्रभागा ॥ मध्यें पुंडलीक उभा ॥ ३ ॥ ऐसें उत्तम हें स्थळ ॥ भोळ्या भाविकां निर्मळ ॥ ४ ॥ तया ठायीं भेद नुरे ॥ एकाजनार्दनीं झुरे ॥ ५ ॥

॥ २८५ ॥ वेदीं जैसा वर्णिला ॥ तैसा विटेवरी देखिला ॥ १ ॥ पुराणें सांगती ज्या गोष्टी ॥ तो विटेवरी जगजेठी ॥ २ ॥ शास्त्रें वेवादती पाही ॥ तोची विटे सम पायीं ॥ ३ ॥ नकळे अकळ अगमा ॥ निगमाही न कळे सीमा ॥ ४ ॥ जाला अंकित आपण ॥ एकाजनार्दनीं शरण ॥ ५ ॥

॥ २८६ ॥ भक्त अर्पितां सुमनमाळा ॥ घाली आवडीनें गळां ॥ १ ॥ ऐसा आवडीचा भुकाळू ॥ श्रीविठ्ठलु दीनदयाळू ॥ २ ॥ भक्तें भावार्थें अर्पितां ॥ तें आवडे पंढरिनाथा ॥ ३ ॥ भक्तासाठीं विटेवर ॥ सम पद कटीं कर ॥ ४ ॥ ऐशी कृपेची कोंवळी ॥ एकाजनार्दनी माउली ॥ ५ ॥

॥ २८७ ॥ जे जे वेळे जें जें लागे ॥ तें न मागतां पुरवी वेगें ॥ १ ॥ ऐसा भक्ताचा अंकित ॥ राहे द्वारीं पैं तिष्ठत ॥ २ ॥ आवडी गौळियाची मोठी ॥ गायी राखी जगजेठी ॥ ३ ॥ भक्ति भावार्थें भुकेला ॥ एकाजनार्दनीं विकला ॥ ४ ॥

॥ २८८ ॥ आधीं देव पाठीं भक्त ॥ ऐसें मागें आलें चालत ॥ १ ॥ हेंही बोलणेंची वाव ॥ भक्ता आधीं कैचा देव ॥ २ ॥ भक्त शिरोमणी भावाचा ॥ देव लंपट जाला साचा ॥ ३ ॥ भक्तासाठीं अवतार ॥ ऐसा आहे निर्धार ॥ ४ ॥ वडील भक्त धाकुला देव ॥ एकाजनार्दनीं नाहीं संदेह ॥ ५ ॥

॥ २८९ ॥ भक्तावांचुनी देव ॥ कैचें रूप कैचें नांव ॥ १ ॥ भक्तीं धरुनि आवडी ॥ देवा लाविलीसे गोडी ॥ २ ॥ भक्तावांचुनी पुसे कोण ॥

देवा नाहीं महिमान ॥ ३ ॥ भक्तीं करुनि निर्धार ॥ देवा धरविला अवतार ॥ ४ ॥ उभयतां नोहे तुटी ॥ एकाजनार्दनीं मिठी ॥ ५ ॥

---

## देवभक्तांचें ऐक्य.

॥ २९० ॥ नावडे वैकुंठ शेषशयन ॥ वैष्णव संतजन आवडले ॥ १ ॥ रमा ह्मणे कैसी नवल परी ॥ देव भुलले वैष्णवा घरीं ॥ धृ० ॥ जो नातुडे ध्यानीं समाधि साधनीं ॥ तो स्वानंदे कीर्तनीं नाचतसे ॥ २ ॥ जो यज्ञावदानीं कांहीं नेघे माये ॥ तो द्वादशीं क्षीराब्धि उभउभ्या खाये ॥ ३ ॥ लक्ष्मी ह्मणे देव आंतुडे कवणें बुद्धी ॥ वैष्णवांची सेवा करावी त्रिशुद्धी ॥ ४ ॥ वैष्णवा घरीं लक्ष्मी कामारी ॥ एकाजनार्दनीं देव दास्यत्व करी ॥ ५ ॥

॥ २९१ ॥ भक्तें नामगुणें मुक्ति आणिले उणें ॥ दासाचेनी स्मरणें देव भेटे ॥ १ ॥ प्रल्हाद नारद पाराशर पुंडलिक ॥ व्यास अंबऋषि आत्मनिष्ठ ॥ धृ० ॥ शुक महाभागवत निजभावें स्मरत ॥ समाधान चित्त सहजीं पावें ॥ २ ॥ शौनक भीष्म देव अर्जुन महाभाव ॥ दालभ्य रुक्मांगद भगवद्भजनीं भाव ॥ ३ ॥ वशिष्ठ याज्ञवल्की बिभीषणादि भक्त ॥ एका जनार्दनीं भक्त नामस्मरत ॥ ४ ॥

॥ २९२ ॥ बळी बिभीषण रावण ॥ सस सौरा भीष्मदेव ॥ प्रल्हाद नारद ध्रुव ॥ हे हरीचे भक्त ॥ १ ॥ हें वैष्णवांचे षट्क ॥ देहबुद्धि दाहक ॥ पठणेची पाठक ॥ मुक्त झाले ॥ धृ० ॥ अहिल्या द्रौपदी ॥ सीता तारा मंदोदरी ॥ स्मरतां पांचही नारी ॥ पाप पळे ॥ २ ॥ ऐसी जपतां नामाची ओळी ॥ महा दोषा होय होळी ॥ पतिव्रता जवळी ॥ परम पुरुष ॥ ३ ॥ स्कंद वैनतासुत ॥ भीमसेन हनुमंत ॥ बळीराम नामें घात ॥ क्षुधादिका ॥ ४ ॥ यांचें नाम घेतलीया पाठीं ॥ क्षुधा नलगे पोटीं ॥ तृप्त होय पुष्टी ॥ परमानंदें ॥ ५ ॥ कुमार नारद देख ॥ भीष्म मारुति श्रीशुक ॥ निष्ठकनैष्ठिक्य ॥ ब्रह्मचारी ॥ ६ ॥ यांचें ऐकतांची नाम ॥ विरोन जाय काम ॥ मन होय निष्काम ॥ हरिच्या रूपीं ॥ ७ ॥ हरिहर हरिद्र ॥ सत्वमूर्ती हरिश्चंद्र ॥ याही नामें बाळिभद्र ॥ मरण मारी ॥ ८ ॥ इही नामीं नामस्मरण ॥ विसरासी ये मरण ॥ नाठवणा आठवण ॥ वरोनी ठेली ॥ ९ ॥ महेंद्र महाविष्णू ॥ द्रौपद दंडपाणी ॥ आदिसाच्या स्मरणीं ॥ शांतिसुख ॥ १० ॥

ऐसी जपतां नामाची विधी ॥ आनंद होय आनंदी ॥ सहजी सहज पदीं॥ समाधान हें ॥ ११ ॥ हें वैष्णवाचें षट्क ॥ नामीं पांची पंचक ॥ एका-जनार्दनीं अति सुख ॥ इहीं नामीं ॥ १२ ॥

॥ २९३ ॥ ज्याचेनी नामें तरीजे हें ॥ आश्चर्य मानूं किती ॥ त्याच्या दासाचेनी स्मरणें ॥ चरणा शरण ये मुक्ती ॥ १ ॥ ह्मणोनि दासातें स्मरावें ॥ दास्य दासाचें करावें ॥ हरिभक्ताचें जन्मकर्म ॥ अखंड वाचें वदावें ॥ धृ० ॥ भक्त प्रतापाची गोठी ॥ रविमंडळीं तपे छाटी ॥ शेषाबाहेर काढुनी ॥ दर्भाआड धरिली सृष्टी ॥ २ ॥ दासाची अगाध शैली ॥ समुद्र भरियेला चुळी ॥ तेही साधु तें मानिती ॥ वंदीती चरण रज-धुळी ॥ ३ ॥ भक्त भजनीं देखोनि थोरी ॥ देवा आवड पैं भारी ॥ जैसे बाळक शृंगारिल्या ॥ माता निवतसे अंतरी ॥ ४ ॥ एका जनार्दनीं निर्वाहो ॥ संत चरणीं ठेवा भाव ॥ हाचि एक उपाव ॥ साधू सेवेनें भुलला ॥ ५ ॥

॥ २९४ ॥ ज्याचेनि तिर्थां तिर्थपण ॥ तो हृदयीं केला सांठवण ॥ १ ॥ नवल माहिमा हरिदासासी ॥ तिर्थें उपजवितो त्याचे कुसी ॥ १ ॥ काशी मरणें होय मुक्ती ॥ तें न मरतां वचनें प्राप्ती ॥ २ ॥ एका जनार्दन कृपा दृष्टी ॥ सकल तीर्थें वोळंगती भेटी ॥ ३ ॥

॥ २९५ ॥ जें सुख संत सज्जनाचे पायीं ॥ तें सुख नाहीं आणिके ठायीं ॥ १ ॥ तुकितां या सुखाचेनि तुकें ॥ वैकुंठही होय फिकें ॥ धृ० ॥ पाहूं जातां लोकीं तिहीं ॥ ऐसें न दिसे आणिके ठायीं ॥ २ ॥ नवल या सुखाची गोडी ॥ हरिहर ब्रह्मा घालिती उडी ॥ ३ ॥ क्षीर सागर सांडोनि पायीं ॥ अंगें धांवे शेषशायी ॥ ४ ॥ एका जनार्दनी झाली भेटी ॥ सुख संतोषा पडली मिठी ॥ ५ ॥

॥ २९६ ॥ पेंठ पिकली संताची ॥ अवघीं स्वरूपें मुदलाचीं ॥ १ ॥ उकळ करा लवडसवडी ॥ मुदल देतो घडोघडीं ॥ धृ० ॥ द्वैताची दाटणी सोडी ॥ वासनेचें वासन फोडी ॥ २ ॥ आळस करितां सरेल सांत ॥ मग पडला विचारांत ॥ ३ ॥ आखीलें गुरुनामाचें ॥ स्थापिलें सुरंग भक्तीचें ॥ ४ ॥ अंगळु मंगळु नंदभाषा ॥ द्वैत दलाल निवटील घसा ॥ ५ ॥ आंत बाहेरीं एकची सुत ॥ मुदल देतां सुखी होत ॥ ६ ॥ एका जनार्दनी एकची भेटी ॥ सरीसी संसारा होईल साटी ॥ ७ ॥

॥ २९७ ॥ धरणें दासाचा अभिमान ॥ हें व्रत परम प्रमाण ॥ धृ० ॥ शांति सतीचे वल्लभ जेकां ॥ पांडव माझे प्राण ॥ १ ॥ धरणें० ॥ तनय तुझे असुरी प्रीय मानुनी ॥ धर्म भाग करितील मान ॥ २ ॥ यास्तव एक जनार्दन साक्षी ॥ मी षड्गुण भगवान ॥ ३ ॥

॥ २९८ ॥ या संतांचा कुतरा झालों ॥ ब्रह्मरसासी सोकलों ॥ १ ॥ भुंकत भुंकत गेलों ॥ ज्ञाननाथासवें बैसलों ॥ २ ॥ भुंकत भुंकत निकें ॥ ज्ञान सर्वत्र विवेकें ॥३॥ एकाजनार्दनी कुतरा ॥ दांत पाडून केला बोचरा॥४॥

॥ २९९ ॥ भक्त जनांसी कृपाळ परब्रह्म साकारलें ॥ गोपिकासी क्रीडा करी अद्वैत आकारलें ॥ १ ॥ तो हा भक्तिलागी देखा देव भुली भूलला ॥ आणि एक कृष्ण तोहा मज मिनला ॥ २ ॥ सनकादिकांचा जो हंस प्ऱ्हाद नरहरी ॥ भक्ति लांचावला कृष्ण गौळ्याघरीं लोणी चोरी ॥ ३ ॥ अनेक भक्तां लागी अनेक झाला कृष्ण ॥ एका जनार्दनीं कृपा अखंड ब्रह्म पूर्ण ॥ ४ ॥

॥ ३०० ॥ जैं धर्माची वाट मोडे ॥ अधर्माची सीग चढे ॥ तैं आह्मा येणें घडे ॥ संसार स्थिती ॥ १ ॥ नाना मतें आणि पाखांडें ॥ कर्मठता अति बंडें ॥ त्यांचीं ठेंचावीं तोंडें ॥ हरिभजनें करूनियां ॥ २ ॥ जें जें हरिलिला चरित्र ॥ तें तें माझेंचि स्वतंत्र ॥ देव भक्त एकत्र ॥ भेद नाहीं दोघांतें ॥ ३ ॥ जो जो अवतार धरी ॥ तो तो मीच अवधारी ॥ हरिनामें करितों गजरी ॥ जगदोद्धारा कारणें ॥ ४ ॥ सर्वा भूतीं भगवद्भावो ॥ हा भक्तीचा निज निर्वाहो ॥ धर्माचा अनुग्रहो ॥ वाढवावा यालागीं ॥ ५ ॥ सर्व भूतीं दया शांती ॥ प्रतिपाळावी वेदोक्ती ॥ हेंचि एक निश्चिती ॥ करणें आह्मा लागतें ॥ ६ ॥ लीलाविग्रही भगवंत ॥ तया ह्मणती नित्य मुक्त ॥ आह्मी एक तेथ ॥ वेगळेचि असों पां ॥ ७ ॥ विश्वरूपीं सृष्टी ॥ अर्जुनातें दावी दिठी ॥ भिन्न भेदाची गोष्टी ॥ बोलों नये सर्वथा ॥ ८ ॥ वत्सा हरणीचें चरित्र ॥ वत्स गोंवळे स्वतंत्र ॥ पांवे पायतन कटीसूत्र ॥ आपणचि जाहला ॥ ९ ॥ एका जनार्दनी ॥ विश्वरूप गोविंद मानी ॥ भेद धरि जो मनीं ॥ निंद्याहुनी तो निंद्य ॥ १० ॥

॥ ३०१ ॥ भक्ताची भीड गाढी ॥ त्याचीं उचिष्टें पै काढी ॥ दांति धरूनिया वागोरे ॥ त्यांची धूतसे घोडीं ॥ १ ॥ आधी साधूसी भजावें ॥

भजल्या ऐसे आहे फळ ॥ संताचेनि वचनें ॥ देव भेटतो घननीळ ॥ धृ० ॥ देवाची प्रीति कैसी ॥ भक्त चरणरज वांछी ॥ पाय हाणीतला छातीसी ॥ लेणें मिळवितो अंगासीं ॥ २ ॥ देव भीडसारु कैसा ॥ खांदी वाहिलें दुर्वासा ॥ खाचेनि बोले खजिल्या रानी ॥ भक्तालागीं ऐसा पीसा ॥ ३ ॥ भक्त संकटाचें काज ॥ देखोनि धांवे चतुर्भुज ॥ दाहाही गर्भवास सोसी ॥ सांडोनि अजत्वाची लाज ॥ ४ ॥ भक्त वचन सान मोठें ॥ देव मानी नेटे पाटें ॥ अवहान मंत्रमात्रें ॥ पाषाण प्रतिमें प्रगटे ॥ ५ ॥ भक्त बळीयामाजी बळी ॥ त्रिविक्रमातें आकळी ॥ देव द्वारपाळ केला ॥ ऐसी साधूची नवाळी ॥ ६ ॥ साधु सेवनी निजभावो ॥ तोचि ज्ञानाचा निर्वाहो ॥ एकाजनार्दन ह्मणे ॥ संत वचनें विकला देवो ॥ ७ ॥

॥ ३०२ ॥ देवपण मज आणियेलें जेहीं ॥ साचिया उपकारा नव्हे उतराई ॥ १ ॥ भक्ताचे उपकार कैसेनि फेडी ॥ यालागी साचि उच्छिष्टें काढी ॥ २ ॥ भक्ताचेनि पालटे येतो गर्भवासा ॥ उपकारा उतराई तरि नव्हे कैसा ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं उतराई नव्हे ॥ या लागी भक्तातें न विसंबे जीवेंभावें ॥ ४ ॥

॥ ३०३ ॥ वैष्णवा घरीं देव सुखावला ॥ बाहेरी नवचे दवडोनि घातला ॥ १ ॥ देव ह्मणे माझे पुरतसे कोड ॥ संगती हे वैष्णवाची जोड ॥ २ ॥ जरी नेउनी घातला दुरी ॥ परतुनि पाहे तव घरा भीतरी ॥ ३ ॥ कीर्तनाची देवा आवडी मोठी ॥ एकाजनार्दनीं घातली मीठि ॥ ४ ॥

॥ ३०४ ॥ देवासी कांहीं देखणे नसे ॥ जेथें तेथें उघडाचि दिसे ॥ १ ॥ देव निलाजिरा देव ॥ निलाजिरा पहा तुह्मी ॥ धृ० ॥ लाजेसी जेथें नाहीं ठाव ॥ पांढरा डुकर झाला देव ॥ २ ॥ एकाजनार्दनीं एकल्या काज ॥ भक्ताची तेणें नेली लाज ॥ ३ ॥

॥ ३०५ ॥ देवा भक्ता दोही पडीपाडु नाहीं ॥ लटिकें केशवा पाहसी कायीं ॥ १ ॥ कोण थोर कोण थोर ॥ कोण थोर विचारी पां ॥ धृ० ॥ राम टके केले हारपणें दाम ॥ आह्मा अखंड घरीं राम नाम ॥ २ ॥ षड्गुण संपन्न तुझी स्थिती ॥ चौदावें रत्न माझ्या हातीं ॥ ३ ॥ आमुची भीक ह्मणसी कुडी ॥ वामन वेषें कां घेतली गोडी ॥ ४ ॥ तुजलागी गरुड वाहन ॥ तुझेनी अंगें माझें गमन ॥ ५ ॥ तुजलागी वैकुंठ मंदीर ॥ चरणरजीं माझें

घर ॥६॥ असंत प्रलई वैकुंठ मोडे ॥ चरण रजें कळिकाळ उडे ॥७॥ काईसी बिरदें खटाटोप ॥ माझेंनि तुज नांव रूप ॥ ८ ॥ त्रैलोक्य अवघें तुझ्या उदरीं ॥ त्या तुझा मी सगळा घोट भरी ॥ ९ ॥ यापरी भक्त ह्मणतां अधिक ॥ धांवोनिया देवें धरिलें मुख ॥ १० ॥ एकाजनार्दनीं अभिन्न झालें ॥ पोटीं रिघोनी देवें आपणासम केलें ॥ ११ ॥

॥ ३०६ ॥ माणुसपणाचा नाहीं त्या भावो ॥ सिंह सूकर कैसा झाला देवो ॥ १ ॥ देव नी माणुस देव नि माणुस ॥ देव नि माणुस जाणतेनो ॥ धृ० ॥ केविलवा झाला भिकारी ॥ भींक मागों गेला बळीच्या द्वारीं ॥ ३ ॥ माणुसपण नाहीं त्या साचे ॥ गोपिकामाझारी नागवा नाचे ॥ ३ ॥ गोवळा माझारी उभउंभ्या खाये ॥ माणुसपण त्या कोठें आहे ॥ ४ ॥ एकाजनार्दनें आपुलेसें केलें ॥ थितें माणुस हातींचें नेलें ॥ ५ ॥

॥ ३०७ ॥ जय गोविंदा परमानंदा ऐक माझे बोल ॥ निर्गुणरूप असतां तुझें कांहींच नव्हे मोल ॥ मग तूं माया धरुनी हातीं जाहलासी सबल ॥ नसतें देवपण अंगीं आणुनी चाळविसी केवळ ॥ १ ॥ ऐसा लाघवी तूं रामा ॥ नको चाळवूं आह्मां ॥ धृ० ॥ नसतां तुज मज भेद देवा लटिकें जीवपण देसी ॥ आपुले ठायीं थोरपण आणुनी आमुची सेवा घेसी ॥ नसती अविद्या पाठी लावुनी संसारीं गोविसी ॥ नाना कर्मे केलीं ह्मणोनी आह्मां दंडीसी ॥ २ ॥ मातें भावें भजिजे ऐसा उपदेश करिसी ॥ आपुल्या भक्ता तारिन ह्मणोनी प्रताप बोलसी ॥ निंदक दुर्जन अभक्त त्यांतें नर्कीं घालिसी ॥ आपुल्या कार्या लागुनी दुसरीयातें कां पीडिसी ॥ ३ ॥ आपुली महिमा वाढो ह्मणोनी आह्मां भक्त केलें । लक्ष चौऱ्याशी योनी देउनी संसारीं गोविलें ॥ भावें तुज न भजों ह्मणोनी आकस आरंभिलें ॥ आतां देवा वैरता तुज मज नव्हे भलें ॥ ४ ॥ ऐसें तुज मज वैर ह्मणोनी गुरुसी शरण गेलों ॥ देवभक्तपण कोण्या कर्मे पुसों लागलों ॥ सद्गुरु ह्मणती सर्वही मायिक निश्चयें तुजप्रती बोलों ॥ सेव्यसेवकता येकचि अवघे गोष्टीसी पावलों ॥ ५ ॥ आतां सद्गुरु वचनें करून गिळीन देवपण ॥ भक्तपणावर तुझेनि रागें घालिन पाषाण ॥ जीव शिव ऐक्य करुनी मी सुखें राहिन ॥ नाम रूप तुज मज आहे यातें निर्दाळीन ॥ ६ ॥ ऐसे भक्त बोल ऐकुनी थोर वाटे चिंता ॥ विवेक बळें करुनी माझें उडविलें देवपण

आतां ॥ यालागीं भिणें भक्त जनासी ऐक्य करुनी तत्त्वतां ॥ एका जनार्दनीं दर्शन द्यावें त्वरिता ॥ ७ ॥

॥ ३०८ ॥ वेव्हाराच्या ठायीं ॥ तुझें नचले कांहीं ॥ मी तूं दोघे पाही ॥ सरिसे तेथें ॥ १ ॥ ठेविलें बुडविसी ॥ शेखीं जाबही न देसी ॥ ऐकोन नायकसी ॥ गहिंसपणें ॥ २ ॥ खवळलों तरी जाण ॥ गिळी मीतूंपण ॥ तेथें देवपण ॥ उडवीन तुझें ॥ ३ ॥ जो सांगे पांचां पाशीं ॥ त्याचें तोंड तूं धरिसी ॥ ठकडा कैसा होसी ॥ ह्मणे एका जनार्दन ॥ ४ ॥

॥ ३०९ ॥ जिहीं जाणितलें वर्मासी ॥ त्याचें दास्य करसी ॥ गर्भवास सोशिसी ॥ त्यांचेसाठी ॥ १ ॥ घर कुटुंब ना अभावो ॥ गांव ना तुज ठावो ॥ सोळाठ तूं पाहाहो ॥ लागला जगीं ॥ २ ॥ बहुतांचें ठेवणें ॥ बुडविलें येणें ॥ शेखीं जीव घेणें ॥ मागत्यासी ॥ ३ ॥ मायबापेंवीण ॥ वाढला हा जाण ॥ शरणएकाजनार्दन जाती गोतपणें ॥ ४ ॥

॥ ३१० ॥ लटकीयाची आण ॥ लटिकेंचि प्रमाण ॥ ऐसीयासी कोण ॥ विश्वासेल ॥ १ ॥ मागता बळें बळी ॥ उदकीं देत चळी ॥ अतीशय तळमळी ॥ मीन जैसा ॥ २ ॥ मागतां मांसामासा ॥ मुरडूं धांवे घसा ॥ डावेनी हातें कैसा ॥ शंख करी ॥ ३ ॥ अतीशय कृपण ॥ शरणएकाजनार्दन ॥ बाळा दे स्तनपान ॥ पिलीं पोसी ॥ ४ ॥

॥ ३११ ॥ मागतां देखोनी दीठी ॥ हात पाय घालुनी पोटीं ॥ पर्वत पडिल्या पाठीं ॥ देणें नाहीं ॥ १ ॥ मागतां न देसी ॥ दांतीं भोये धरिसी ॥ पांढरा डुकर होसी ॥ तेणें कर्मे ॥ २ ॥ ठेवणें न देतां ॥ जावो नेदी सर्वथा ॥ बळीचीया ऐसा आतां ॥ बांधीन पायीं ॥ ३ ॥ मागत निज निर्धारी ॥ खांबा माजी तूं गुरगुरी ॥ तिखट नखें बोंच करी ॥ क्रोधें करुनी ॥ ४ ॥ एका जनार्दनीं त्यातें ॥ मागत्याच्या बापातें ॥ फाडोनी आंतें ॥ ठेविलें निश्चितें देणें नाहीं ॥ ५ ॥

॥ ३१२ ॥ मागतां कवतुक ॥ दीन होउनी रंक ॥ दारोदारीं भीक ॥ मागों धांवे ॥ १ ॥ मग ते करी काय ॥ पाठीं देउनी पाय ॥ रसातळीं पाहे ॥ घालूं धांवे ॥ २ ॥ मागों जातां पुढें ॥ मायेचें काढी मढें ॥ उकसाबुकसी रडे ॥ माये माये ह्मणोनी ॥ ३ ॥ फरश घेउनी करी ॥ ज्यातें त्यातें

मारी ॥ रक्तें रक्त उरी ॥ परी देणें नाहीं ॥ ४ ॥ मागतां रोकडें ॥ एकाजनार्दनीं सांकडें ॥ मेळवोनी माकडें ॥ पाठी लागे ॥ ५ ॥

॥ ३१३ ॥ ज्यासी दहा शिरें माथा ॥ विस हातीं घेतां ॥ नेदुनी सर्वथा ॥ जीवें मारी ॥ १ ॥ गांठी द्यावया नाहीं ॥ आतां करील कोई ॥ ह्मणोनी राखी गाई ॥ गवळीयांच्या ॥ २ ॥ तेथेंही न संडी परी ॥ दही दूध चोरी ॥ भोगिल्या परनारी ॥ मूळ माइके ॥ ३ ॥ बुद्धी बोध ठेला ॥ एकाजनार्दनीं अबोला ॥ कांहीं न बोले बोला ॥ ठेवणें गह्र करुनी ठेला ॥ ४ ॥

॥ ३१४ ॥ मागतां पैं कैवाडें ॥ लुंची लागे मुंडे ॥ नागवा होउनी पुढें ॥ उभा ठाके ॥ १ ॥ मागतां फाडोवाडें ॥ धांउनीया घोडा चढे ॥ खर्ग घेऊनी वाडें ॥ करी मारामारी ॥ २ ॥ कलंकी होउनी पुढें ॥ ऋणामाजी बुडे ॥ कलीच्या अंतीं घडे ॥ कर्म ऐसें ॥ ३ ॥ मागतां दाटोदाटी ॥ नवल त्याची गोठी ॥ लाविली लंगोटी ॥ एकाजनार्दनी नारदासी ॥ ४ ॥

॥ ३१५ ॥ सनकादिक वेडे ॥ शुक नागवें उघडें ॥ भुलविलें रोकडें ॥ जड भरतासी ॥ १ ॥ पुंडलीकें जगजेठी ॥ उभा केला वाळुवंटीं ॥ अद्यापि पैं तुटी ॥ धरणें त्याचें ॥ २ ॥ कटावर ठेउनी हात ॥ उभा असे तिष्ठत ॥ घेतलें तें निश्चित ॥ देणें नाहीं ॥३॥ धरणें न मागतां पूर्ण ॥ उडवी माणुसपण ॥ जीवा जीवपण ॥ उरों नेदी ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं ॥ एकपणाच्या वाणी ॥ आपणा देउनी ॥ देवो समूळ खत फाडी ॥ ५ ॥

॥ ३१६ ॥ भोगें चेतविसील नाना दुःखें ॥ तो तूं भोगचि भोगसील सुखें ॥ १ ॥ मीपण कैचें काय ॥ हानी लाभ तुझा तूंचि पाहे ॥ २ ॥ भोग जैं आले वाड वाड ॥ तुझें आंख अंग आह्मा आड ॥ ३ ॥ एका जनार्दनीं एक वर्म ॥ माझेनी नांवें तूंचि भोगी कर्म ॥ ४ ॥

---

## सलगीचींवचनें.

॥ ३१७ ॥ वैष्णव वीरीं केली ख्याती ॥ जीवें धरिला वैकुंठपती ॥ १ ॥ धरिलारे वैकुंठपती ॥ आंगें राखती भाववळें ॥ धृ० ॥ निजधैर्याची बैसलीं मेटें ॥ पारखें कोठें येवों शके ॥२॥ देवाचा देव राखतां अंगें ॥

हरिनामाचें घालिती जागे ॥ ३ ॥ लक्ष्मी ह्मणे मी होईन दासी ॥ जीवें सोडा या माझ्या देवासी ॥४॥ लक्ष्मी ऐसीया आज्ञा दिधलीया कोडी ॥ देव न सोडूं पळ पाव घडी ॥५॥ देव ह्मणे तुह्मां देईनगा मुक्ती ॥ वोवाळुनि परां सांडिती परती ॥ ६ ॥ सर्व देईन राखा मज जीवें ॥ एकाजनार्दनु नोसंडी जीवेंभावें ॥ ७ ॥

॥ ३१८ ॥ एकादशी देवा नैवेद्य व्हावा ॥ भक्त तो मरावा उपवासी ॥ निराहारी राहोनी जागरणा जागलें ॥ जीवें मरुनिया ऐसें त्या केलें ॥ १ ॥ देव पोटपोसा खातुसे बळें ॥ ज्याचें खाय त्याचें करी वाटोळें ॥ धृ० ॥ श्रीयाळाच्या घरां भोजना गेला ॥ पोटीचा खादला बाळ साचा ॥ प्रसन्न होऊनि देवें काय केलें तेथें ॥ न येतीया वाटा लाविले त्यातें ॥ २ ॥ कपोतियाचें देवें घेऊनिया मिस ॥ भक्ताचे पालटा तुकीयलें मांस ॥ येव्हढीया निर्वाणा देव संतोषले ॥ अवघीया नगराचें निसंतान केलें ॥ ३ ॥ सामास ब्राह्मणें वेंचियले कण ॥ त्याचिया पारण्या देवो अतीत आपण ॥ चारी भाग देवें आपणचि नेलें ॥ त्याच्या संसाराचें आपोषण केलें ॥ ४ ॥ विश्वासुनी देव ह्मणे ह्मणाल आप ॥ प्र्हादाचा येणें खादला बाप ॥ दान देऊनि भावार्थें बळी ॥ सकुटुंबें देवें घातला पाताळीं ॥ ५ ॥ खावया न मिळे देवें मांडिली बुद्धी ॥ आवडत्या भक्तांची मेळविली मांदी ॥ लळे देउनी देव भक्तांते पाळी ॥ विश्वासलीं मग सगळेंची गिळी ॥ ६ ॥ यापरी देवाचें पोट न धाय ॥ आपले अवयव आपण खाय ॥ एकाजनार्दनें एक पण सुख ॥ त्यातें देखोनि देव विसरे तहान भूक ॥ ७ ॥

॥ ३१९ ॥ भोळे बाळें ठकविसी ॥ ते न चाले आह्मापासी ॥ १ ॥ गर्व धरीसी नामाचा ॥ सोहं सोहं गर्जे वाचा ॥ २ ॥ आशा तृष्णा तुह्मापासी ॥ आह्मी अखंड उदासी ॥ ३ ॥ येणें बळेची तत्वता ॥ शून्यनिर्शून्य सांडिली व्यथा ॥ ४ ॥ जना निजबोध स्वानंद पूर्ण ॥ ह्मणे एकाजनार्दन ॥५॥

---

## मनाचा संकल्प.

॥ ३२० ॥ नवजों योगाचीया वाटा ॥ न चढों आगम निगम ताठा ॥ न लागों जप माळा खटपटा ॥ आत्मनिष्ठा होउनी असों ॥ १ ॥ विठ्ठल उघडा विराजित ॥ सबाह्याभ्यंतर नांदत ॥ २ ॥ कर्में करूनी नव्हों

कर्मठा ॥ निष्कर्माच्या न लागों झटा ॥ संत रज आमुचा वांटा ॥ मुक्ति फुकटा तेणें लाभे ॥ ३ ॥ न करूं दुस्तर तीं तपें ॥ न पढों अध्यात्म खरपें ॥ एकाजनार्दनीं कृपें ॥ आत्मसुख अमुप विचरिजे ॥ ४ ॥

॥ ३२१ ॥ कोटि जन्म आह्मी करूं हरिकथा ॥ कर्मकांड माथां धरूनिया ॥ १ ॥ ऐहिकादि कर्मे करुनि सर्वदा ॥ भजो जी गोविंदा निरंतर ॥ २ ॥ यजन याजन करुनी अग्निहोत्र ॥ पुजोनी पवित्र द्विजवर ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं कर्म ब्रह्म एक ॥ वेदांतीं विवेक बोलियेला ॥ ४ ॥

॥ ३२२ ॥ माहेरींची वास पाहीन मी डोळा ॥ संताचा पैं मेळा येतां देखें ॥ १ ॥ घालुनी दंडवत लागेन मी पायीं ॥ जीव हा उतराई करुनी सांडी ॥ २ ॥ कुर्वंडीन काया तयावरून भावें ॥ जीवें वोवाळावें जीवलगा ॥ ३ ॥ आषाढी कार्तिकी प्रेमें करिती वारी॥ तयांची मी थोरी काय वानूं ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं धन्य ते दैवाचे ॥ निरंतर वाचे विठ्ठलनाम ॥ ५ ॥

॥ ३२३ ॥ नेणें साधन पसारा ॥ व्रता तपाच्या निर्धारा ॥ १ ॥ आवडी गाऊं तुझें नाम ॥ तेणें पुरती सर्व काम ॥ २ ॥ आणीक नकरूं चावटी ॥ आगम निगम आटाआटी ॥ ३ ॥ न करी साधन कांहीं ॥ एकाजनार्दनीं पाही ॥ ४ ॥

॥ ३२४ ॥ जन्मांतर सुखें घेऊं ॥ श्रीविठ्ठल नाम आठवूं ॥ १ ॥ नाहीं साचें आह्मा कोडें ॥ विठ्ठल उभा मागें पुढें ॥ २ ॥ कळिकाळाचें भय तें किती ॥ पाय यमधर्म वंदिती ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं सिद्धी ॥ नामें तुटती उपाधी ॥ ४ ॥

॥ ३२५ ॥ कोणासवें आमुचें काय काज ॥ सर्व पंढरिराज कैवारी ॥ १ ॥ उभा राहे मागें पुढें ॥ निवारी सांकडें भक्ताचें ॥ २ ॥ आघात घात निवारी ॥ पीतांबरीं करी छाया ॥ ३ ॥ ऐसा अनुभव मज यात्रा ॥ धांवे रावा पंढरीच्या ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं भाव ॥ धरलिया धांवे देव ॥ ५ ॥

॥ ३२६ ॥ संपत्ति संतती मजला नावडे ॥ स्वरूप आवडे तुझें देवा ॥ ॥ १ ॥ तुझ्या रूपीं सुख माझीया लोचना ॥ आणिक नारायणा न पाहती ॥ २ ॥ हस्त इच्छिताती तुज भेटावया ॥ सेवा ही कराया सर्व काळ ॥ ३ ॥ चित्त जडलें पायीं सदा सर्वकाळ ॥ राहिली तळमळ तयाची

ते ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं तुझें नाम मुखीं ॥ नको आणिका सुखीं गोऊं मज ॥ ५ ॥

॥ ३२७ ॥ देव भक्त उभे दोन्ही एके ठायीं ॥ चला जाऊं पायीं तया गांवा ॥ १ ॥ आवडीचा हेत पुरेल मनाचा ॥ उच्चारिता वाचा विठ्ठलनाम ॥ २ ॥ करुनीया स्नान पुंडलिकाची भेटी ॥ नाचूं वाळूवंटीं वाहूं टाळी ॥ ३ ॥ जाऊं महाद्वारीं पाहूं तो सांवळा ॥ वोवाळूं गोपाळा निंबलोण ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं मनोरथ पुरे ॥ वासना ते नुरे मागें कांहीं ॥ ५ ॥

॥ ३२८ ॥ भक्त देव एके ठायीं ते आवडी ॥ घेउनीया गुडी जाऊं तेथें ॥ १ ॥ पाहूं चरणकमळ वोवाळूं श्रीमुख ॥ होईल तेणें सुख चौदेहांसी ॥ २ ॥ संतांचे ते भार गाती नाचताती ॥ आनंदें डुलती विठ्ठल वाचें ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं आनंदसोहळा ॥ पाहोनी घालो डोळां डोळीयाचा ॥ ४ ॥

॥ ३२९ ॥ परेसी न कळे पार ॥ पश्यंतीसी निर्धार ॥ मध्यमा तो स्थिर ॥ वैखरीये ॥ १ ॥ चहु वाचा कुंठित ॥ ऐसें नाम समर्थ ॥ आह्मी गाऊं सदोदीत ॥ सोपें नाम ॥ २ ॥ ऋद्धि सिद्धि धांवे पायीं ॥ मुक्तीसी तों अवसर नाहीं ॥ भुक्तीचा तो उपाय कांहीं ॥ हरिदास ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं भाव ॥ भावेंचि तुष्टे देव ॥ आणीक नको उपाव ॥ नाम स्मरे ॥ ४ ॥

॥ ३३० ॥ सब सुख हमे सागा ॥ राम मिठा लागा ॥ १ ॥ हम तो भये राजारामके सिपाई ॥ दील घोडा डागा ॥ २ ॥ घर बैठे हम करत चाकरी ॥ कबु न पाउ नागा ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं यंवकर बोले ॥ पावत सुख मागा ॥

॥ ३३१ ॥ पावलारे भव गज पंचानन ॥ निरसुनीया जन जाला जनार्दन ॥ १ ॥ नाभी नाभी नाभी ना भीसी काह्या ॥ नाथिला संसार लटकी ही माया ॥ २ ॥ वचनाचेनी घाये संशय तोडिले ॥ अनेकत्व मोडुनी एकत्व जोडिलें ॥ ३ ॥ वांझेचा पुत्र कळिकाळाचा वैरी ॥ एकाजनार्दनीं संसार तोडरीं ॥ ४ ॥

॥ ३३२ ॥ देह जाईल तरी जावो राहील तरी राहो ॥ दोराचिया सर्पा जीणें मरणें ना वावो ॥ १ ॥ आह्मी जिताचि मेलों जिताचि मेलों ॥ मरोनीया जालों जीवेंविण ॥ २ ॥ मृगजळाचें जळ भरलें असतां नाहीं ॥ आटलीया तेथें कोरडें होईल काई ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं जगचि जनार्दन ॥ जीणें मरणें तेथें सहज चैतन्यघन ॥ ४ ॥

॥ ३३३ ॥ धवधवीत वैकुंठनाथ ॥ भक्त वत्सल शोभत ॥ १ ॥ तयाचे पायीं माझें मन ॥ राहो वृत्तिसह जडोन ॥ २ ॥ नेणे आणिक दुजा छंद ॥ वाचें आठवीन गोविंद ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं कटीं कर ॥ उभा चंद्रभागे तीर ॥ ४ ॥

॥ ३३४ ॥ नाम तारक सांगडी ॥ तेणें उतरूं पैल थडी ॥ १ ॥ रामनाम जप सोपा ॥ तेणें नेणों पुण्य पापा ॥ २ ॥ सर्व साधनांचें सार ॥ भवसिंधूसी उतार ॥ ३ ॥ ऐसा नामाचा प्रताप ॥ एका जनार्दनीं नित्य जप ॥ ४ ॥

॥ ३३५ ॥ संत सज्जन जिवलग माझे ॥ त्यांचे चरण चुरीन वोजे ॥ १ ॥ त्यांचे संगें सुख मना होय ॥ आनंदी आनंद पहातां होय ॥ २ ॥ त्यांचें पिसें मजलागी मोठें ॥ ऐसें भाविक केवीं भेटे ॥ ३ ॥ त्यांचे नामाची घेऊं धणी ॥ तयां जाऊं लोटांगणी ॥ ४ ॥ तयां शेजार करितां बरा ॥ चुके जन्ममरण फेरा ॥ ५ ॥ तया जीव करूं कुवंडी पाहीं ॥ एकाजनार्दनीं लागतसे पायीं ॥ ६ ॥

॥ ३३६ ॥ विठ्ठल ह्मणतां विठ्ठलची होसी ॥ संदेह येविषयीं धरूं नको ॥ १ ॥ सागरीं उठती नाना पैं तरंग ॥ सिंधु तो अभंग विठ्ठल एक ॥ २ ॥ तैसें मन करी द्वैत न धरी ॥ सर्व चराचरीं विठ्ठल एक ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं विठ्ठलावांचुनी ॥ दुजा नेणों कोणी स्वप्नीं आह्मी ॥ ४ ॥

॥ ३३७ ॥ आह्मासी तो पुरे विठ्ठलची एक ॥ वाउगाची देख दुजा न मनी ॥ १ ॥ ध्यानीं धरूं विठ्ठल करूं तयाचें कीर्तन ॥ आणिक चिंतन नाहीं दुजें ॥ २ ॥ ध्येय ध्याता ध्यान खुंटला पैं शब्द ॥ विठ्ठल उद्बोध सुख आह्मां ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं विठ्ठल भरला ॥ रिता ठाव उरला कोठें सांगा ॥ ४ ॥

॥ ३३८ ॥ सायासाचा श्रम न करूं पसारा ॥ विठ्ठलची बरा वाचे गातां ॥ १ ॥ गोडपणें मिठी पडलीसे जीवा ॥ काया मनें हेवा दुजा नाहीं ॥ २ ॥ या विठ्ठला परतें न करी साधन ॥ देखेन समचरण विटेवरी ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं विठ्ठलाची भेटी ॥ सरलीसे तुटी गर्भवास ॥ ४ ॥

॥ ३३९ ॥ पळ पळ आयुष्य खातसे काळ ॥ कांरे होसी सबळ पोसणा तूं ॥ १ ॥ वाढविसी देह काळाचें भातुकें ॥ कांरे तुज कौतुकें सुख वाटे ॥ २ ॥ नामस्मरण करितां लाजसी पामरा ॥ भोगिसी अघोरा यमदंडा ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं सांगतसे हित ॥ कांरे न घ्या त्वरित हरि-नाम ॥ ४ ॥

॥ ३४० ॥ अंगीं जया पूर्ण शांती ॥ वाचा रामनाम वदती ॥ अनु-सरले चित्तवृत्ती ॥ संतचरणीं सर्वदां ॥ १ ॥ घडो तयांचा मज संग ॥ जन्ममरणाचा फिटतसे पांग ॥ आधिव्याधि निरसे सांग ॥ घडतां संग वैष्णवांचा ॥ २ ॥ जें दुर्लभ तिहीं लोका ॥ आह्मां सांपडलें फुका ॥ एकाजनार्दनीं घोका ॥ नाम त्याचें आवडीं ॥ ३ ॥

॥ ३४१ ॥ सोइरे धाइरे आह्मां संतजन ॥ तयाविण चिंतन आन नाहीं ॥ १ ॥ हाचि माझा भाव हीच माझी भक्ती ॥ आणिक विश्रांति दुजी नाहीं ॥ २ ॥ हेंचि माझें कर्म हाचि माझा धर्म ॥ वाउगाची श्रम न करीं दुजा ॥ ३ ॥ हेंचि माझें ज्ञान हेंचि माझें विज्ञान ॥ संता-वीण शरण न जाय कोणा ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं हा माझा निश्चय ॥ वंदीन मी पाय सर्वभावें ॥ ५ ॥

॥ ३४२ ॥ भुक्ति मुक्ति कारणें तुज न घाली सांकडें ॥ संतासी रोकडें शरण जाऊं ॥ १ ॥ हाचि माझा नेम उपासना भक्ती ॥ आणिक विश्रांति मज नाहीं ॥ २ ॥ एकाजनार्दनीं सेवेवांचून ॥ आन नेणें जाण दुजें कांहीं ॥ ३ ॥

॥ ३४३ ॥ गर्भवासा भीति ते अंधळे जन ॥ मुक्तीसी कारण नाहीं आह्मां ॥ १ ॥ गर्भवास झालीया संतसेवा घडती ॥ मुक्त जालीया न कळे भगवद्भक्ती ॥ २ ॥ आह्मी सुखें गर्भवास घेऊं देखा ॥ मुक्तीचिया मस्तका पाय देऊं ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं गर्भवास सोसूं ॥ संताचा सौरसू हातीं लागे ॥ ४ ॥

॥ ३४४ ॥ आह्मासी तो मुख्य संतसेवा प्रमाण ॥ विठ्ठल कीर्तन वाचें गाऊं ॥ १ ॥ दजें नेणों स्वप्नीं विठ्ठलावांचुनी ॥ जनीं वनीं निरंजनीं देखों हेंची ॥ २ ॥ संताचिया पायीं मस्तक ठेवून ॥ आवडी चरण विठ्ठलाच्या ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं जनार्दन एकपणीं ॥ विठ्ठलावांचुनी दुजें नेणों ॥ ४ ॥

॥ ३४५ ॥ गाऊं तरी एक विठ्ठलचि गाऊं ॥ ध्याऊं तरी एक विठ्ठलचि ध्याऊं ॥ १॥ पाहूं तरी एक विठ्ठलचि पाहूं ॥ आणिका न गोऊं वासना ही ॥ २ ॥ आठऊं तो एक विठ्ठल आठऊं ॥ आणिक न साठऊं हृदयामाजी ॥ ३ ॥ विठ्ठलावांचुनी मनीं नाहीं आन ॥ सर्वभावें प्रमाण विठ्ठल मज ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं जडला जिव्हारीं ॥ विठ्ठल चराचरीं व्यापूनि ठेला ॥ ५ ॥

॥ ३४६ ॥ नलगे भुक्ति मुक्ति नलगे स्वर्गवास ॥ नको वैकुंठवास देवराया ॥ १ ॥ नलगे योगयाग अष्टांग साधन ॥ नचुके बंधन येणें कांहीं ॥ २ ॥ नलगे इष्ट मित्र सोईरे संबंध ॥ नको ही उपाधि पाठी लावूं ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं चुकवोनी पाल्हाळे ॥ करी मज मोकळें गुरुराया ॥ ४ ॥

॥ ३४७ ॥ असत्याचा शब्द नको वाचे माझे ॥ आणिक होको ओझें भलतैसें ॥ १ ॥ परी संतरज वंदीन मी माथां ॥ असत्य सर्वथा नोहे वाणी ॥ २ ॥ अणुमात्र रज डोळा न साहे ॥ कैसा खुपताहे जन दृष्टी ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं असत्याची वाणी ॥ तोचि पापखाणी दुष्टबुद्धी ॥ ४ ॥

॥ ३४८ ॥ एकविध भाव संताच्या चरणीं ॥ घेईन पायवणी धणीवरी ॥ १ ॥ आनंदें चरण धरीन आवडी ॥ हीच माझी जोडी सर्व जाणा ॥ २ ॥ उतराई तयाच्या नोहे उपकारा ॥ धाडिती माहेरा निजाचीया ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं घडतां साचा संग ॥ जन्ममरण पांग तुटे मग ॥ ४ ॥

॥ ३४९ ॥ मनासी निर्धार केलासे देखा ॥ संतसंगसुखा आतुडलों ॥ १ ॥ इच्छिलें पावलों इच्छिलें पावलों ॥ इच्छिलें पावलों संतसंग ॥ २ ॥ एकाजनार्दनीं सांगात तयाचा ॥ अनुभवें अनुभवाचा बोध लाहे ॥ ३ ॥

॥ ३५० ॥ भजन भावें गाऊं भजन भावें ध्याऊं ॥ भजन भावें पाहूं विठोबासी ॥ १ ॥ भजन तें सोपें भजन तें सोपें ॥ हरतील पापें जन्मांतरिंचीं ॥ २ ॥ घालूं तुळशीमाळा गोपीचंदन ललाटीं ॥ देखतां हिंपुटी यम पळे ॥ ३ ॥ सांडुनीया आशा झालों वारकरी ॥ एकाजनार्दनीं पंढरी पाहूं डोळां ॥ ४ ॥

॥ ३५१ ॥ सुखें सेऊं ब्रह्मानंदा ॥ गाऊं रामनाम सदा ॥ नोहे मग बाधा ॥ काळ दूत यमाची ॥ १ ॥ करूं वासुदेवस्मरण ॥ तेणें तुटे रे बंधन ॥ खंडेल कर्माचें विदान ॥ वासुदेव जपतांची ॥ २ ॥ तीर्थयात्रे सुखें जाऊं ॥ वाचे विठ्ठलनाम घेऊं ॥ संता संगें सेऊं ॥ वासुदेव धणीवरी ॥ ३ ॥ लोभ ममता दवडूं आशा ॥ उदर व्यथेचा वोळसा ॥ न करूं आणिक सायासा ॥ वासुदेवा वांचुनी ॥ ४ ॥ मुख्य वर्माचें हें वर्म ॥ येणें साधे सकळ धर्म ॥ एकाजनार्दनीं नाम ॥ वासुदेव आवडी ॥ ५ ॥

॥ ३५२ ॥ गायन तें सोपें गाऊं ॥ वाचें ध्याऊं विठ्ठल ॥ १ ॥ तेणें सर्व होय सिद्धी ॥ तुटे उपाधि जन्म जरा ॥ २ ॥ साधनाचा न करूं श्रम ॥ गाऊं नाम आवडीं ॥ ३ ॥ शुकादिक रंगले रंगीं ॥ त्याचि मार्गीं आह्मी जाऊं ॥ ४ ॥ एकाजनार्दनी धणीवरी ॥ उच्चारूं हरि संतसंगें ॥ ५ ॥

॥ ३५३ ॥ तान मान सर्वथा ॥ तें भजन न माने चित्ता ॥ १ ॥ वेडें वांकुडें तुमचें नाम ॥ गाईन सदोदित प्रेम ॥ २ ॥ वाचा करुनी सोंवळी ॥ उच्चारीन नामावळी ॥ ३ ॥ नाम तारक हें जनीं ॥ व्यास बोलिले पुराणीं ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं जप ॥ सुलभ आह्मां विठ्ठल देख ॥ ५ ॥

॥ ३५४ ॥ वाहुनीया हातीं टाळ ॥ करूं भजन प्रेमळ ॥ १ ॥ विठ्ठल विठ्ठल वाचे वदूं ॥ दुजा नाहीं आह्मा छंदू ॥ २ ॥ जाऊं पंढरीस नेमें ॥ संतासंगें अनुक्रमें ॥ ३ ॥ पुंडलिक चंद्रभागा ॥ दर्शनें जाय पाप भंगा ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं स्नान ॥ पातकें पळती रानोरान ॥ ५ ॥

॥ ३५५ ॥ बहुतांच्या मत्ता ॥ आह्मी न लागूं सर्वथा ॥ १ ॥ धरूं संताचा सांगात ॥ तेणें होय आमुचें हित ॥ २ ॥ जाऊं पंढ-

रीसी ॥ नाम गाऊं अहर्निशीं ॥ ३ ॥ करूं हाचि नित्य नेम ॥ आणिक नको निजधाम ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं नाम ॥ गाऊं आवडीनें राम ॥ ५ ॥

॥ ३५६ ॥ माझीया जीवीं आवडे ॥ संत समागम रोकडे ॥ १ ॥ हेंचि द्यावें कृपादान ॥ कृपाळु तूं नारायण ॥ २ ॥ एकाजनार्दनीं ह्मणवी दास ॥ त्याची पुरवावी आस ॥ ३ ॥

॥ ३५७ ॥ आह्मा विधिनिषेधाचें नाहीं पैं कारण ॥ नाम मुखीं स्मरण गोविंदाचें ॥ १ ॥ घडेल तें घडो जोडेल तें जोडो ॥ आह्मी तों न सोडों रामकृष्ण ॥ २ ॥ शरीर पतन घडे अनायासें ॥ काय तें सायासें जतनेची ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं श्रीरामा वांचुनी ॥ दुजा छंद मनीं हा न वाहे ॥ ४ ॥

॥ ३५८ ॥ गाढवा संगतीं सुकाळ लाथांचा ॥ श्रम जाणिवेचा वायां जाय ॥ १ ॥ आह्मांसी तों एक प्रेमाचें कारण ॥ नामाचें चिंतन विठोबाच्या ॥ २ ॥ एकाजनार्दनीं आवडी हे माझी ॥ संत चरण पूजी सर्वकाळ ॥ ३ ॥

॥ ३५९ ॥ माझी मुख्य उपासना ॥ लागेन चरणा संताच्या ॥ १ ॥ भांडवल तें हेंचि देख ॥ भक्तियुक्त उपासना ॥ २ ॥ मन वसो संतापायीं ॥ आर्त ठायीं कीर्तनीं ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं ॥ विनवणी करीतसे ॥ ४ ॥

॥ ३६० ॥ वादविवाद अतिवाद ॥ नावडे कोणाचाही संबंध ॥ १ ॥ बोल एक आह्मा बोलणें ॥ वाचे विठ्ठलची ह्मणे ॥ २ ॥ आणिकाची चाड चित्तीं ॥ नाहीं नाहीं गा त्रिजगतीं ॥ ३ ॥ शरण एकाजनार्दनीं ॥ विठ्ठल भरलासे व्यापुनी ॥ ४ ॥

॥ ३६१ ॥ तुझ्या चरणा परतें ॥ शरण जाऊं आणिकातें ॥ १ ॥ काया वाचा आणि मन ॥ रिघालों शरण तुजची ॥ २ ॥ निवारूनि भवताप ॥ त्रिविध तापें तो संताप ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं चित्तें ॥ शरण आला न करा परतें ॥ ४ ॥

॥ ३६२ ॥ श्रीगुरूचें नाम मात्र ॥ तेंचि आह्मां वेदशास्त्र ॥ १ ॥ श्रीगुरूचें चरण तीर्थ ॥ सकळां तीर्थां करी पवित्र ॥ २ ॥ श्रीगुरूचा उपदेश ॥ एकाजनार्दनीं तो रस ॥ ३ ॥

॥ ३६३ ॥ अवघे देवा तुज समान ॥ मज नाहीं भिन्नाभिन्न ॥ १ ॥ नाम वाचे सदां गाऊं ॥ आवडी ध्याऊं विठ्ठल ॥ २ ॥ वारंवार संतसंग ॥ कीर्तन रंग उल्हास ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं सार ॥ विठ्ठल उच्चार करूं आह्मी ॥ ४ ॥

॥ ३६४ ॥ एक भाव दुजा न राहो मनीं ॥ श्रीरंगावांचुनी दुजें नाहीं ॥ १ ॥ मनासी तो छंद आदर आवड ॥ नामामृत चाड गोविंदाची ॥ २ ॥ एकाजनार्दनीं नाम वाचे गाऊं ॥ आणिक न ध्याऊं दुजें कांहीं ॥ ३ ॥

॥ ३६५ ॥ रामकृष्ण नाम ॥ कथा करूं कीर्तन ॥ १ ॥ हाचि आह्मा मंत्र ॥ सोपा दिसे सर्वत्र ॥ २ ॥ संताचे संगतीं ॥ मुखीं नामामृत तृप्ती ॥ ३ ॥ वसो कीर्तनीं सदां ॥ माझी मति गोविंदा ॥ ४ ॥ जनार्दनाचा एका ॥ ह्मणे माझी कींव भाका ॥ ५ ॥

॥ ३६६ ॥ मूळ नक्षत्रीं लागला मुळा ॥ घोंट भरियेला देह जन्मकाळा ॥ १ ॥ मुळी काय कामा येसी खोटा ॥ पोषण कटकटा घाला वेगीं ॥ धृ० ॥ मुळी लागोनियां केली पैं शांती ॥ नांवा रूपा नये बुडविली जाती ॥ २ ॥ माया ह्मणे मज नव्हे लहाना ॥ एकाजनार्दनीं केला पोषणा ॥ ३ ॥

॥ ३६७ ॥ जन कां निंदीना निंदीना ॥ तसेंच निंदूं द्याना ॥ धृ० ॥ निंदक करिती निंदा ॥ निंदिती हरळी शिंपी कुंदा ॥ १ ॥ काय चाड जनासी ॥ रतलों सद्गुरुच्या चरणांशी ॥ २ ॥ संत समागमें झालों धीट ॥ गुरुपद जिंकिलें वैकुंठ ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं भावें ॥ आह्मी कोणासी भांडावें ॥ ४ ॥

॥ ३६८ ॥ नाम संकीर्तन ॥ हेंचि माझें संध्यास्नान ॥ १ ॥ तुमचे पायाचा साक्षेप ॥ हाचि माझा कालक्षेप ॥ २ ॥ तुमचे पायाचें वंदन ॥ हेंचि माझें अनुष्ठान ॥ ३ ॥ तुमचे पायापाशीं निद्रा ॥ हेंचि माझी प्रेममुद्रा ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं सार ॥ ब्रह्मरूप पहा संसार ॥ ५ ॥

॥ ३६९ ॥ हरिनामें हरि निकट ॥ त्याचे चरणीं मी होईन विनट ॥ १ ॥ आले नाचत गर्जत हरिनामीं ॥ शरण जाईन ते माझे स्वामी ॥ २ ॥ दृश्य देखोनी लुटिती हरिसी ॥ चरण झाडीन तयाचे केशी ॥ ३ ॥

हरिवांचून न पहाती आन ते ॥ कुरवंडी तया जीविते ॥ ४ ॥ हरिनामें सबाह्य पिकला ॥ डोळे वोडाविन तयाच्या पाउला ॥ ५ ॥ उधळे वैष्णव रजरेणू ॥ तया मस्तक देईन वोवाळुनू ॥ ६ ॥ अहं सोहं सांडुनी एक झाले ॥ त्यासी सर्वस्व देउन आपुले ॥ ७ ॥ एक पाहतां दिसती समान ॥ निर्धारितां अवघे जनार्दन ॥ ८ ॥

---

# मनास बोध.

॥ ३७० ॥ मना सांडी विषय खोडी ॥ लावी विठ्ठलेशी गोडी ॥ १ ॥ आणिक नलगे साधन ॥ एकलें मन करी उन्मन ॥ २ ॥ विठ्ठल विठ्ठल सांवळा ॥ पाहे पाहे उघडा डोळा ॥ ३ ॥ एकाजनार्दना शरण ॥ मनचि होय विठ्ठल पूर्ण ॥ ४ ॥

॥ ३७१ ॥ तापलिया तापें शिणलिया मार्गीं ॥ पोहे ठाकी वेगीं कृष्णकथा ॥ १ ॥ कृष्णकथा गंगा सांवळें उदक ॥ मना बुडी देकां वोल्हावसी ॥ २ ॥ वोल्हावलें मन इंद्रियां टवटवी ॥ गोपिराज जीवीं सांठविलें ॥ ३ ॥ सांठविलें जीवीं जाणायाची खुणा ॥ जरी होय करुणा सर्वां भूतीं ॥ ४ ॥ सर्वां भूतीं राम दृष्टीचें देखणें ॥ नाहीं दुजें पेणें आड वस्ती ॥ ५ ॥ आड वस्ती नाहीं एकाजनार्दनीं ॥ श्रीरामावांचुनी आन नेणें ॥ ६ ॥

॥ ३७२ ॥ कलिमाजी संत जाले ॥ टिळाटोपी लाविती भले ॥ १ ॥ नाहीं वर्माचें साधन ॥ नकळे हृदयीं आत्मज्ञान ॥ २ ॥ सदा सर्वदा गुरगुरी ॥ द्वेष सर्वदा ते करी ॥ ३ ॥ भजनीं नाहीं चाड ॥ सदा विषयीं कबाड ॥ ४ ॥ ऐसिया संताचा सांगात ॥ नको मजसी आदि अंत ॥ ५ ॥ भोळियाच्या पायीं ॥ एकाजनार्दनीं ठाव देई ॥ ६ ॥

॥ ३७३ ॥ भक्त करुणाकर दीनाचा वत्सल ॥ उभा श्रीविठ्ठल विटेवरी ॥ १ ॥ मना जाय तेथें मना जाय तेथें ॥ मना जाय तेथें पंढरीये ॥ २ ॥ पुरतील काम निवारेल गुंती ॥ आहे ती विश्रांती संतसंगें ॥ ३ ॥ आषाढी कार्तिकी सोहळा आनंद ॥ मिळालासे वृंद वैष्णवांचा ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं आनंदी आनंद ॥ तेणें परमानंद डुल्लतसे ॥ ५ ॥

॥ ३७४ ॥ तुज सांगतसें मना ॥ पाहे पंढरीचा राणा ॥ १ ॥ नको दुजा छंद कांहीं ॥ राहे विठ्ठलाचे पायीं ॥ २ ॥ विषयीक वासना ॥ सोडी सोडी सत्य जाणा ॥ ३ ॥ जेणें घडे सर्व सांग ॥ फिटे संसाराचा पांग ॥ ४ ॥ ह्मणे जनार्दनाचा एका ॥ सुलभ उपाव नेटका ॥ ५ ॥

॥ ३७५ ॥ मना निश्चय तूं करी ॥ ह्मणे जाईन पंढरी ॥ १ ॥ नेम धर्म हाचि माझा ॥ पंढरीवांचुनी नाहीं दुजा ॥ २ ॥ सर्व तीर्थांचें माहेर ॥ विटे उभा कटीं कर ॥ ३ ॥ आवडीनें धरा भाव ॥ एकाजनार्दनीं भेटे देव ॥ ४ ॥

॥ ३७६ ॥ वाउगाची सोस करितोसी तूं मना ॥ चिंती तूं चरणा विठोबाच्या ॥ १ ॥ अविनाश सुख देईल सर्वदां ॥ वाचें वदा सदां रामनाम ॥ १ ॥ तारिले पातकी पावन कलियुगीं ॥ नामनौका जगीं तारावया ॥ ३ ॥ भवसिंधु पार रामनाम सार ॥ न करीं विचार दुजा कांहीं ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं घ्यावा अनुभव ॥ प्रत्यक्ष पाहा देव वीटेवरी ॥ ५ ॥

॥ ३७७ ॥ करी कांहीं मना एक विचारणा ॥ संताच्या चरणा न विसंवे ॥ १ ॥ तयाचा मी दास कामारी दुर्बळ ॥ तेचि माझें सकळ हित करती ॥ २ ॥ देउनी प्रेम पान्हा लडीवाळपणें ॥ कृपेचें पोसणें तुमचें मी ॥ ३ ॥ जनार्दनाचा एका तुमचा तो दास ॥ तयासी उदास धरूं नये ॥ ४ ॥

॥ ३७८ ॥ माळियाचे वंशीं सांवता जन्मला ॥ पावन तो केला वंश त्याचा ॥ १ ॥ त्यासवें हरि खुरपूं लागे अंगें ॥ धांउनी त्याच्या मागें काम करी ॥ २ ॥ पितांबर कास खोवोनी माघारी ॥ सर्व काम करी निज अंगें ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं सांवता तो धन्य ॥ तयाचें महिमान न कळे कांहीं ॥ ४ ॥

॥ ३७९ ॥ दामाजीचा भाव पाहुनी श्रीहरी ॥ अनामिक निर्धारी स्वयें झाला ॥ १ ॥ घेउनीया द्रव्य निघाला तो हरी ॥ जोहार जोहार करी बादशहातें ॥ २ ॥ द्रव्य देउनीया रसीद घेतली ॥ भक्ताची माउली विठाबाई ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं भक्ताचियासाठीं ॥ धांवे पाठोपाठीं भक्ताचीया ॥ ४ ॥

॥ ३८० ॥ चोखियाची भक्ति कैसी ॥ प्रेमें आवड देवासी ॥ १ ॥ ढोरें वोढी त्याचे घरीं ॥ नीच काम सर्व करी ॥ २ ॥ त्याचें स्त्रीचें बाळंतपण ॥ स्वयें करी जनार्दन ॥ ३ ॥ ऐसी आवड भक्ताची देखा ॥ देव भुलले तया सुखा ॥ ४ ॥ नीच याती न मनीं कांहीं ॥ एकाजनार्दनीं भुलला पाही ॥ ५ ॥

॥ ३८१ ॥ संताचा महिमा ॥ नाहीं द्यावया उपमा ॥ १ ॥ मज तारिलें तारिलें ॥ भवजळीं उद्धरिलें ॥ २ ॥ पावन केलें संतीं ॥ अवघी निरसली गुंती ॥ ३ ॥ संत चरण वंदीन माथा ॥ एकाजनार्दनीं तत्वतां ॥ ४ ॥

॥ ३८२ ॥ तुह्मी संतजन ॥ माझें ऐका हो वचन ॥ १ ॥ करा कृपा मजवरी ॥ एकदां दाखवा तो हरी ॥ २ ॥ आहे तुमचे हातीं ॥ ह्मणोनी येतों काकुळती ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं ह्मणे थारा ॥ संतीं द्यावा मज पामरा ॥ ४ ॥

॥ ३८३ ॥ मना तूं एक करी ॥ वाचें आठवी श्रीहरी ॥ १ ॥ आणिक न करी साधन ॥ वाचें ह्मणे नारायण ॥ ३ ॥ तेणें जीवा सोडवण ॥ शरण एका जनार्दन ॥ ४ ॥

॥ ३८४ ॥ मना ऐक एक मात ॥ धरी हरिनामीं हेत ॥ १ ॥ तेणें चुकती बंधन ॥ वाचे ह्मणे नारायण ॥ २ ॥ नारायण नाम ॥ तेणें सर्व होय काम ॥ ३ ॥ दृढ धरी भाव ॥ न करी आणिक उपाव ॥ ४ ॥ उपाव न करी कांहीं ॥ शरण देवासी तूं जाई ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं मन ॥ करी देवासी अर्पण ॥ ६ ॥

॥ ३८५ ॥ मना तूं ऐक माझी मात ॥ श्रीविठ्ठलीं न धरी कां रे हेत ॥ १ ॥ कांहीं पडतां जड भारी ॥ वाचें ह्मणे विठ्ठल हरी ॥ २ ॥ तुजही खूण निर्वाणीं ॥ शरण एकाजनार्दनीं ॥ ३ ॥

॥ ३८६ ॥ निवांतपणें मना चिंती तूं चरणा ॥ आणिक कल्पना न करी कांहीं ॥ १ ॥ चिंती पा विठ्ठल काया वाचा मनें ॥ संसार बंधन तुटेल तेणें ॥ २ ॥ संसाराची वार्ता नुरेचि पा कांहीं ॥ आणिक प्रवाहीं पडूं नको ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं विठ्ठल नामीं छंद ॥ मना तूं गोविंद आठवी कां रे ॥ ४ ॥

॥ ३८७ ॥ आठवी गोविंद वेळोवेळां वाचें ॥ तेणें या देहाचें सार्थक

होय ॥ १ ॥ विठ्ठल विठ्ठल मनीं निरंतर साचा ॥ काया मनें वाचा छंद साचा ॥ २ ॥ त्याविण आणिक दैवत पैं नाहीं ॥ आणिके प्रवाहीं गुंतूं नको ॥ ३ ॥ सर्व सुखाचा विठ्ठल सांगाती ॥ एकाजनार्दनीं भ्रांति काढी काढीं ॥ ४ ॥

॥ ३८८ ॥ काढी काढी भ्रांति देहाची सर्वथा ॥ प्रपंचाची चिंता नको तुज ॥ १ ॥ सर्व भावें शरण विठ्ठलासी जाई ॥ ठायींचाचि ठायीं निवारील ॥ २ ॥ देह गेह माझें ह्मणणें हें दुजें ॥ सर्व विठ्ठलराजीं समर्पी तूं ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं करी आठवण ॥ चिंती तूं पावन परब्रह्म ॥ ४ ॥

॥ ३८९ ॥ परब्रह्म मूर्ति विठ्ठल विटेवरी ॥ चंद्रभागे तीरीं उभा असे ॥ १ ॥ तयाचे चरण आठवी वेळोवेळां ॥ सर्व सुख सोहळा पावशील ॥२॥ अविनाश सुख देईल निश्चयें ॥ करी पा लवलाहे लाहो साचा ॥ ३ ॥ श्रीविठ्ठल चरणीं शरण तूं जाई ॥ एकाजनार्दनीं पाही अनन्य भावें ॥ ४ ॥

॥ ३९० ॥ आणिकाची आस नको करूं मना ॥ चिंती तूं चरणा विठोबाच्या ॥ १ ॥ वाचें नाम गाये वाचें नाम गाये ॥ वाचें नाम गाये विठोबाचें ॥ २ ॥ कर कटीं उभा चंद्रभागे तटीं ॥ पुंडलिकापाठीं धरुनी ध्यान ॥३॥ ठेविले चरण दोन्ही विटेवरी ॥ वाट पाहे हरि भाविकाची ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं उभारुनी बाह्या ॥ आलंगित आहे भाळे भोळे ॥ ५ ॥

॥ ३९१ ॥ आलिंगना लागी उतावेळ मन ॥ देखेन चरण विठोबाचे ॥ १ ॥ मना समाधान मना समाधान ॥ राहे मना समाधान विठ्ठल पायीं ॥ २ ॥ देखिलीया मूर्ति सांवळी सगुण ॥ मग नाहीं बंधन मना तुज ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं मन आवरिलें ॥ दृढ तें ठेविलें विठ्ठलपायीं ॥ ४ ॥

॥ ३९२ ॥ मना नको नको हिंडो दारोदारीं ॥ कष्ट झाले भारी येतां जातां ॥ १ ॥ कल्पना सोडोनी संतासंगें राहे ॥ सर्व सुख आहे त्यांचे पायीं ॥ २ ॥ ज्याचिया दर्शनें शोक मोह जळे ॥ पाप ताप पळे काळ भय ॥ ३ ॥ जवळींच दिसे भावितां भावितां ॥ एकाजनार्दनीं ध्याता सुख मोठें ॥ ४ ॥

॥ ३९३ ॥ आणिक साधनीं नको गुंतूं मना ॥ धरी या चरणा विठोबाच्या ॥ १ ॥ वाउगा बोभाट कासया खटपट ॥ पंढरीची वाट

सोपी बहू ॥ २ ॥ एकाजनार्दनीं काया वाचा मनें ॥ सतत रहाणें संतापायीं ॥ ३ ॥

॥ ३९४ ॥ अचुक साधन कष्ट नाहीं कांहीं ॥ वाचें विठ्ठल रखुमाई ह्मणे सुखें ॥ १ ॥ जन्म मरणाच्या तुटतील खेपा ॥ सोपा होय बापा मार्ग तुज ॥ २ ॥ बहुत मार्ग बहुत साधन ॥ परि वाचा जाण सीण दुर्गम तें ॥३॥ एकाजनार्दनीं कष्ट ना सायास ॥ ह्मणा वाचें विठ्ठलास जीवेंभावें ॥ ४ ॥

॥ ३९५ ॥ ज्या पदीं जें निरूपण ॥ तेंचि हृदयीं ध्यान ॥ तेथें सहजचि स्थिर राहे मनरे ॥ कीर्तन देखोनि कळिकाळ ॥ तोषला समाधि समाधान रे ॥ १ ॥ कीर्तनें सिद्धि कीर्तनें सिद्धी ॥ कीर्तनें समान बुद्धी ॥ कीर्तनें विनटले नारद ॥ प्रल्हाद द्वंद्वामाजी रे ॥ २ ॥ कीर्तनीं सद्भाव अखंड अहर्निशीं ॥ पावन रिघे त्याचे देशीं ॥ निज नामीं निःपाप अंतर देखोनी ॥ देव तिष्ठे जयापाशीं ॥ ३ ॥ हरिनाम कीर्तनें अभिमान निरसे ॥ आणि श्रेष्ठ आहे काज रे ॥ कलिमाजी कीर्तन श्रेष्ठ पैं ॥ साधन साच न मनी ज्याचें मन रे ॥ ४ ॥ नामासी विन्मुख जन्म त्याचें दुःख कैंचि होय समाधान रे ॥ कीर्तनाचेनि पंथें लाजविलीं तीर्थें ॥ जप तपासी केलें मुक्त ॥ वैकुंठचि तेथें केलें रे ॥ ५ ॥ व्रता तपा तीर्था न भेटे पहा हो ॥ तो कीर्तनीं सांपडे वासुदेवो रे ॥ एकाजनार्दनीं कीर्तनीं भावें ॥ श्रोता वक्ता ऐसें लाहावें रे ॥ गर्जत मी वैकुंठासी जावें निशाणा लाउनी रे ॥ ६ ॥

॥ ३९६ ॥ शून्य शून्य शून्य विपरितें पाहे पाहे रे मन ॥ शून्य शून्यत्वीं नाहीं शून्य निरशून्या पाहि रे मना ॥ लक्ष लक्षुनि परेते पाही लक्षालक्ष जेथें नाहीं रे मना ॥ १ ॥ एका जनार्दनीं शून्य मातू नाहीं ॥ नाहीं सहजपणा आंतू ॥ २ ॥

॥ ३९७ ॥ सानु सानु सानु सुक्ष्म होवोनी ॥ भिन्नत्व देहीं नराहे वासने ॥ सोळा कळाचे बिंब ॥ हें शोधोनी जीवाचें जीवन पाहे वासने ॥ १ ॥ नरोहरी घरीं वासने नरोहरी घरीं वासने अवघे समान करी वासने ॥ पाठमोरी होवोनी क्षण एक ॥ काढोनी पुढील पाय वासने पाहत पाहता ठक जे पडिले ॥ सांगते ऐकते विरोनी जाय वासने ॥ २ ॥ धिग धिग धिग धिग ते झाले ॥ जिवत्व वेगळे राहे वासने ॥ एकाजनार्दन एकपण ॥ तेहि न साहे वासने ॥ ३ ॥

॥ ३९८ ॥ जाणीव फेडा जाणीव फेडा ॥ जाणीवेनें वेड लावियेलें ॥ १ ॥ नेणत्याच्या घरा जाणते आले ॥ जाणत्यानें नेणते घेऊन गेले ॥२॥ जाणीव नेणीव नेणें मी कांहीं ॥ एकाजनार्दनीं लागला हरिपायीं ॥ ३ ॥

---

## दश अवतारांची स्तुति.

॥ ३९९ ॥ मच्छरूपीं होतासी जैसा ॥ तो तूं कूर्म झालासी कैसा ॥ अगा जगदीशा ॥ धरणीधरा ॥ १ ॥ यासी पहावो अकळ विंदाणी ॥ नभ धरणी भूतीं दुजा नाहीं ॥ धृ० ॥ नरु आणि एकू हरी ॥ अद्वैत माझारीं ॥ कुब्ज ब्रह्मचारी ॥ ब्रह्मांड सहित ॥ २ ॥ गाई ब्राह्मणाचा कैवारी ॥ कृपा फरश धरी ॥ जड तरले सागरीं ॥ याचेनि प्रतापें पाषाण ॥ ३ ॥ आठवा आठवा तुह्मी ॥ जो निःकाम कामना कामीं ॥ बुद्धि बोधें-वीण आह्मी ॥ बौद्ध ह्मणो ॥ ४ ॥ देहबुद्धीचा कलंक अंगा ॥ ह्मणोनि देखिजे जगा ॥ भजा कलंकी श्रीरंगा ॥ तुह्मी विदेह भावें ॥ ५ ॥ ऐसा दशधा अवतार ॥ अवतरला श्रीधर ॥ पाहतां चराचर ॥ अवतार याचे ॥ ६ ॥ एकाजनार्दना शरण ॥ त्याची कृपा परिपूर्ण ॥ त्याही वरील खूण ॥ बोलों नेदी ॥ ७ ॥

॥ ४०० ॥ भवसागर मंथन काळ ॥ तेथें थोर उठिले हलाहल ॥ १ ॥ शिव शिव शिव शिव ॥ राखे सकळ जीव ॥ २ ॥ आह्मी तुझेंचि पैं सर्व ॥ करि बोधाची कणव ॥ ३ ॥ देवें हलाहल धरिलें कंठीं ॥ केली अमृतासी साठी ॥ ४ ॥ एकाजनार्दनी साह्य झाला ॥ सागर मंथुनीया गेला ॥ ५ ॥

॥ ४०१ ॥ अक्षराचें खरें नाणें ॥ तोचि एक पुरवूं जाणें ॥ १ ॥ आमुचा भांडारी हा कान्हा ॥ लागेल तें पुरवील जाणा ॥ धृ० ॥ धातु विरहित सोनटका ॥ पुरुउनी तो नेटका ॥ २ ॥ एका ऐसें अवघें नाणें ॥ टांकसाळ पाडूं जाणें ॥ ३ ॥ अवघें अरूपाचें रूप ॥ नयनीं भागवी अमुप ॥ ४ ॥ नभीं गाळीव जें गोडी ॥ सोलुनीया आह्मा वाढी ॥ ५ ॥ नादा भुलवितो नादू ॥ श्रवणीं वागवी विशदू ॥ ६ ॥ सौरभ्या न येता वासू ॥ घ्राणा पुरवी आसमासू ॥ ७ ॥ करूनि अकर्त्याच्या ठायीं ॥ ठकारा करणें तेंचि पाही ॥ ८ ॥ स्पर्शास्पर्शणें जें ऐसें ॥ अंबर धाडुनि दे देशें ॥ ९ ॥

विद्या निरसिते अतपत्र ॥ शिरीं तन्मयाचें छत्र ॥ १० ॥ अनुभव स्वानंदाचि चंवरे ॥ ढळताती सहजाकारें ॥ ११ ॥ मोडेल अविद्येचा कांटा ॥ ह्मणोनि पुढें तो दिवटा ॥ १२ ॥ सोहं हरळ रुपती पायीं ॥ नेत घडिया ठायीं ठायीं ॥ १३ ॥ नवल कैसी हे आवडी ॥ जीवें जीवा कुरंवडी ॥ १४ ॥ एकाजनार्दनीं एक ॥ आवडी गिळियला लोक ॥ १५ ॥

॥ ४०२ ॥ भोग्य भोक्ता आणि भोजन ॥ ज्ञेय ज्ञाता निज ज्ञान ॥ दृश्य द्रष्टा हरपली ॥ नाठवे मीतूंपण ॥ १ ॥ हरि तुझें लागलें ध्यान ॥ ध्येय ध्याता ध्यान क्षीण ॥ मनें मन उन्मन ॥ धृ० ॥ जन वन आणि विजन ॥ एकाएक जनार्दन ॥ एकी एक ह्मणते नाहीं ॥ ब्रह्मी ब्रह्मरे परिपूर्ण ॥ २ ॥

॥ ४०३ ॥ वेदान् उद्धरते ॥ मीन रूपेण जगन्निवहते ॥ कच्छ रूपेण भूगोल ते ॥ पृथ्वी चक्रमुद्रि भ्रामंते ॥ १ ॥ ऊर्ध्व धारयंते ॥ हिरण्याक्ष दैत्य शोधियंते ॥ दंतावरी पृथ्वी धारयंते ॥ वराहरूपेण दैत्य मारियंते ॥ २ ॥ दैत्य प्रल्हाद छळयंते ॥ स्तंभीं प्रगट रूपंते ॥ हिरण्यकशिपु विदारयंते ॥ नृसिंहरूपेण ते ॥ ३ ॥ बळी दैत्य छलयंते ॥ क्षत्र निक्षत्र कुर्वंते ॥ त्रिपाद पृथ्वी दान मागंते ॥ वामन रूपेण दारंते ॥ ४ ॥ क्षत्रिय कुल नाशो कुर्वंते ॥ जमदग्नी रेणुका उद्धरंते ॥ सहस्र अर्जुन दैत्य मारियंते ॥ निःक्षत्रिय पृथ्वी कुर्वंते ॥ परशुराम रूपेण ॥ ५ ॥ पौलस्ती रावण जयंते ॥ सीता रत्न चोरियंते ॥ राम रूपेण लंका हालायंते ॥ रावण सहकूल वधीयंते ॥ ६ ॥ द्वापारीं कलह कलहयंते ॥ शिशुपाल वक्रदंत कंसंते ॥ विध्वंसी रामभद्र रूपंते ॥ करुणादया वृंद मातें ॥ ७ ॥ म्लेंच्छ नित्यज्यान्मूर्च्छयंते ॥ विश्व बोधरूपेण ते ॥ नाशयते कलीरूपेण ते ॥ एकाजनार्दन तया कृपें वर्णिते ॥ ८ ॥

॥ ४०४ ॥ मेसको मैराळे तूं मसणीचे आई ॥ धांव पाव वेगीं माझें नमन तुझे पायीं ॥ १ ॥ पंढरीचा हनुमा यातें कोण कोड घाली ॥ जाळियेली लंका येणें तोंडें केलीं काळी ॥ २ ॥ दोंदील गण्या यातें पाचारुनी काई ॥ उंदरावर बैसोनि केव्हां धांवेल आई ॥ ३ ॥ कैलासीचा शंभू बाई आवडेना मला ॥ लागला भिल्लिणीपाठीं कोठें पाहूं त्याला ॥ ४ ॥ लक्ष्मीचा वर खोटा आवडेना आह्मा ॥ धरियेली माव तेणें मारियेला मामा ॥ ५ ॥ एक शेला एक मेला एक सिंदीचा घडा ॥ घेऊनिया आई आमुचे उकली

तूं कोडा ॥ ६ ॥ इतुकें घेउनी आई पाव तूं आह्मासी ॥ एकाजनार्दनीं विनवितो तुसी ॥ ७ ॥

॥ ४०५ ॥ धर्माची वाट मोडे ॥ अधर्माची शीग चढे ॥ तैं आह्मा येणें घडे ॥ संसारस्थिती ॥ १ ॥ आह्मा कां संसारा येणें ॥ हरिभक्ति नामस्मरणें ॥ जड जीव उद्धरणें ॥ नामस्मरणें करुनी ॥ २ ॥ सर्व कर्म ब्रह्म स्थिती ॥ प्रतिपादाव्या वेदोक्ती ॥ हेंचि एक निश्चिती ॥ करणें आह्मा ॥ ३ ॥ नाना मतें पाखांड ॥ कर्मठता अति बंड ॥ तयाचें ठेंचणें तोंड ॥ हरिभजनें ॥ ४ ॥ विश्वरूप सृष्टी ॥ अर्जुना दाविली दृष्टी ॥ भिन्न भेदाची गोष्टी ॥ बोलूं नये ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं ॥ धरिती भेद मनीं ॥ दुरावले येथुनी निंदक जाण ॥ ६ ॥

॥ ४०६ ॥ संतांच्या विभूति जगासी उपदेश ॥ देताती सौरस सर्वभावें ॥ १ ॥ परिसाचे परी करिती उपकार ॥ कामधेनु कल्पतरुवर त्यासी वंद्य ॥ २ ॥ एकाजनार्दनीं सर्वांमाजी श्रेष्ठ ॥ संत ते वरिष्ठ वंदूं आह्मी ॥ ३ ॥

---

## संतांची स्तुति.

॥ ४०७ ॥ स्मरतां निवृत्ति पावलों विश्रांती ॥ संसाराची शांति झाली माझ्या ॥ १ ॥ नमितां ज्ञानदेवा पावलों विसावा ॥ अंतरीचा हेवा विसरलों ॥ २ ॥ सुखाचा निधान तो माझा सोपान ॥ विश्रांतीचें स्थान मुक्ताबाई ॥ ३ ॥ चांगदेव माझा आनंदाचा तारू ॥ सुखाचा सागरू वटेश्वर ॥ ४ ॥ सुखाचा सागर विसोबा खेचर ॥ नरहरि सोनार प्राण माझा ॥ ५ ॥ आठवितां नामा पावलों विश्रामा ॥ मोक्षमार्गीं आह्मा वाट झाली ॥ ६ ॥ परिसा भागवत जीवा आवडता ॥ गोरा आणि सांवता सखे माझे ॥ ७ ॥ जनजसवंत सुरदास संत ॥ नित्य प्रणिपात वैष्णवांसी ॥ ८ ॥ वंदूं भानुदास वैष्णवाचे कुळीं ॥ ज्यासी वनमाळी मागेंपुढें ॥ ९ ॥ बाळपणीं जेणें भानु आराधिला ॥ वंश निरविला देवराया ॥ १० ॥ धन्य त्याचा वंश धन्य त्याचें कुळ ॥ परब्रह्म केवळ त्याचे वंशीं ॥ ११ ॥ एकाजनार्दनीं संताचें स्तवन ॥ जनीं जनार्दन नमियेला ॥ १२ ॥

॥ ४०८ ॥ निवृत्ति शोभे मुक्ताकार ॥ ज्ञान सोपान वटेश्वर ॥ १ ॥

विठ्ठल पंढरीचे राणे ॥ त्याले भक्तांचीं भूषणें ॥ २ ॥ खेचर विसा जगमित्र नागा ॥ कुंडलें जोडा विठोबा जोगा ॥ ३ ॥ बाहु शोभे बाहुवट ॥ गोरा सांवता दिग्पाट ॥ ४ ॥ कंठीं जाणा एकविंद ॥ तो हा जोगा परमानंद ॥ ५ ॥ गळा शोभे वैजयंती ॥ तिसी मुक्ताई ह्मणती ॥ ६ ॥ अखंड शोभे माझ्या बापा ॥ पदकीं शोभे नामा शिंपा ॥ ७ ॥ कटिसूत्र कटावरी ॥ तो हा सोनार नरहरी ॥ ८ ॥ कासे कसिला पीतांबर ॥ तो हा जाणावा कबीर ॥ ९ ॥ जानु जघन सरळ ॥ तेही कान्हुपात्र विशाळ ॥ १० ॥ दंतपंक्तीचा झळाळ ॥ तो हा कन्हया रसाळ ॥ ११ ॥ चरणींच्या क्षुद्र घंटा ॥ नामयाचा नारा विठा ॥ १२ ॥ वाम चरणीं तोडर ॥ परसा रुळतो किंकर ॥ १३ ॥ चरणीं वीट निर्मळ ॥ तो हा जाला चोखामेळ ॥ ॥ १४ ॥ चरणा तळील ऊर्ध्व रेखा ॥ जाला जनार्दन एका ॥ १५ ॥

॥ ४०९ ॥ संतासी जो निंदी देवासी जो वंदी ॥ तो नर आपदीं आपदा पावे ॥ १ ॥ देवासी जो निंदी संतासी जो वंदी ॥ तो नर गोविंदीं सरता होय ॥ २ ॥ कृष्णा कंस द्वेषी नारदा सन्मानी ॥ सायुज्य सदनीं पदवी पावे ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं गूज सांगे कानीं ॥ रहा अनुदिनीं संत संगें ॥ ४ ॥

॥ ४१० ॥ भाविक हे संत कृपेचे सागर ॥ उतरती पार भवनदी ॥ ॥ १ ॥ तयांचिया नामें तरताती दोषी ॥ नासती त्या राशी पातकांच्या ॥ २ ॥ दयेचें भांडार शांतीचें घर ॥ एकाजनार्दनीं माहेर भाविकाचें ॥ ३ ॥

॥ ४११ ॥ संतांचा महिमा देवचि जाणें ॥ देवाची गोडी संतांसी पुसणें ॥ १ ॥ ऐसी आवडी एकमेका ॥ परस्परें नोहे सुटिका ॥ २ ॥ बहुत रंग उदक एक ॥ या परि देव संत दोन्ही देख ॥ ३ ॥ संताविण देवा न कंठे घडी ॥ उभयतां गोडी एक असे ॥ ४ ॥ मागेंपुढें न हो कोण्ही ॥ शरण एका जनार्दनीं ॥ ५ ॥

॥ ४१२ ॥ पंढरिये देव आला ॥ संत भारें तो वेष्टिला ॥ १ ॥ गुळासवें गोडी जैसी ॥ देवासंगें दाटी तैसी ॥ २ ॥ झालें दोघां एक चित्त ॥ ह्मणोनी उभाची तिष्ठत ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं भाव ॥ संतापायीं ठेविला जीव ॥ ४ ॥

॥ ४१३ ॥ देव संत दोन्ही एकचि मेळ ॥ गदारोळ कीर्तनीं ॥ १ ॥ ती हे त्रिवेणी पंढरी ॥ आहे भीवरेचे तीरीं ॥ २ ॥ येती वारकरी ॥ आनंदें नाचती गजरीं ॥ ३ ॥ ह्मणे जनार्दनाचा एका ॥ पुंडलिकें दाखविला निका ॥ ४ ॥

॥ ४१४ ॥ संत केवळ घातकी पाही ॥ परी तयासी पातक नाहीं ॥ ॥ १ ॥ निज बोधाचे करुनी फांसे ॥ दोघे गोंसावी मारिले कैसे ॥ २ ॥ अति खाणोरिया कर्म करी ॥ दिवसां जाळिले गांव चारी ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं घातकी मोठे ॥ त्यांसी अंतक केवीं भेटे ॥ ४ ॥

॥ ४१५ ॥ नामधारकासी नाहीं वर्णावर्ण ॥ लोखंड प्रमाण नाना जाती ॥ १ ॥ शस्त्रें आणि गोळे भलता प्रकार ॥ परिसासी संस्कार होय हेम ॥ २ ॥ पर्जन्य वर्षतां जल वाहावटे ॥ तें सम सगटे मिळे गंगेसी ॥ ॥ ३ ॥ सर्व तेही जाय गंगाची होउनी ॥ तैसा नाना प्राणी नाहीं नामीं ॥ ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं नाम तें पावन ॥ जप तप ध्यान न करी कांहीं ॥५॥

॥ ४१६ ॥ संत चरण रज वंदुनी तत्वतां ॥ सायुज्य मुक्ति माथां पाय देऊं ॥ १ ॥ थोरीव थोरीव संतांची थोरीव ॥ आणिक वैभव कांहीं नेणें ॥ २ ॥ संतांपरतें दैवत नाहीं जया चित्तीं ॥ तोचि एक पूर्ण स्थिति ब्रह्मज्ञानी ॥ ३ ॥ संत तेचि देव जयांची वासना ॥ एकाजनार्दनीं भावना नाहीं दुजी ॥ ४ ॥

॥ ४१७ ॥ दैवताचें अंगीं असतां विपरीत ॥ परी संत कृपा त्वरित करिती जगीं ॥ १ ॥ जैसी भक्ति देखती तैसे ते पावती ॥ परी संताची गति विचित्रची ॥ २ ॥ वादक निंदक भेदक न पाहाती ॥ एकरूप चिंती मन ज्याचें ॥ ३ ॥ भक्ति केल्या देव तुष्टे सर्वकाळ ॥ न करितां खळ ह्मणवी येरा ॥ ४ ॥ संताचे तो ठायीं ही भावना नाहीं ॥ एकाजनार्दनीं पायीं विनटला ॥ ५ ॥

॥ ४१८ ॥ कर्म उपासना नकळे जयासी ॥ तेणें या संतांसी शरण जावें ॥ १ ॥ सर्व कर्म भावें विठ्ठल नामा गावें ॥ जाणिवे नेणिवेचे हावें पडूं नये ॥ २ ॥ अभिमान झटा वेदाचा पसारा ॥ शास्त्राचा तो थारा वहातां अंगीं ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं सर्व कर्म पाही ॥ विठ्ठल ह्मणतां देहीं घडतसे ॥ ४ ॥

॥ ४१९ ॥ धन्य धन्य तें शरीर ॥ जेथें कथा निरंतर ॥ १ ॥ गुण गाती भगवंताचे ॥ तेचि जाणावे दैवाचे ॥ २ ॥ स्वयें बोलिले जगज्जीवन ॥ थोर कलियुगीं कीर्तन ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं भले ॥ हरिभक्तीनें उद्धरिले ॥ ४ ॥

॥ ४२० ॥ संता वांचोनीया सुख कोठें नाहीं ॥ अमृत त्याचें पायीं नित्य वसे ॥ १ ॥ संताचे संगतीं होय मोक्षप्राप्ती ॥ नको पा संगति दुर्जनाची ॥ २ ॥ दुर्जनाचे संगें दुःख प्राप्त होय ॥ तेथें कैची सोय तरावया ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं हेंचि सत्य साचा ॥ नको अभक्ताचा संग देवा ॥ ४ ॥

॥ ४२१ ॥ ऐसे जे धाले पूर्ण निमाले ॥ ते नाहीं आले परतोनीया ॥ १ ॥ घडीनें घडी चढतसे गोडी ॥ अखंड आवडी संतपायीं ॥ २ ॥ सांडोनीया काम स्मरे रामनाम ॥ अंतरीं तें प्रेम धरुनीया ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं रंगले नामीं ॥ तया वंदूं आह्मीं सर्वभावें ॥ ४ ॥

॥ ४२२ ॥ ज्ञानदेव चतुराक्षरी जप हा करी तूं सर्वज्ञा ॥ ज्ञानाज्ञानाविरहित ब्रह्मप्राप्तीची संज्ञा ॥ ज्ञाता ज्ञेय निजांग होय ऐसी प्रतिज्ञा ॥ ज्ञानाग्नीनें पापें जळती हीच ज्याची आज्ञा ॥ १ ॥ ज्ञानदेव ज्ञानदेव ह्मणतां ज्ञानदेव देतो ॥ वासुदेवचि होतो अखंड वदनीं वदे तो ॥ ध्रु० ॥ नररूपें विष्णु अवतरला हा भगवान ॥ नदी वापी कूप पहातां उदक नोहे भिन्न ॥ नवल हेंचि पशु ह्मैसी करी वेदाध्ययन ॥ नमन करुनी सद्भावें जपतां होय विज्ञान ॥ २ ॥ देवाधिदेव भगवान भक्ताप्रति वर दे ॥ देत वर ब्रह्मांडीं ब्रह्मानंद वो कोंदे ॥ देशिकराज दयानिधि अलकापुरीं जो नांदे ॥ देशभाषा ज्ञानदेवी गीता ग्रंथ वदे ॥ ३ ॥ वक्ते श्रोते ग्रंथपठनें पावती समभाव ॥ वर्णूं जातां अगणित महिमा होतो जीव शिव ॥ वंदुनी अनन्य एकाजनार्दनीं धरी भाव ॥ वर्षती निर्जर ज्ञानदेव नामें पुष्पांचा वर्षाव ॥ ४ ॥

॥ ४२३ ॥ कैवल्याचा पुतळा ॥ प्रगटला भूतळां ॥ चैतन्याचा जिव्हाळा ॥ ज्ञानोबा माझा ॥ १ ॥ ज्ञानियाचा शिरोमणी ॥ वंद्य जो का पूज्य स्थानीं ॥ सकळांसी शिरोमणी ॥ ज्ञा० ॥ २ ॥ चालविली जड भिंती ॥ हरली चांगयाची भ्रांती ॥ मोक्षमार्गींचा संगाती ॥ ज्ञा० ॥ ३ ॥ रेड्यामुखीं वेद बोलविला ॥ गर्व द्विजांचा हरविला ॥ शांतिबिंब प्रगटला ॥ ज्ञा०

॥ ४ ॥ गुरुसेवेलागी जाण ॥ शरण एका जनार्दन ॥ चैतन्याचें जीवन ॥ ज्ञा० ॥ ५ ॥

॥ ४२४ ॥ अजान वृक्षाचीं पानें जाण ॥ जो भक्षून करील अनुष्ठान ॥ त्यासी सद्यः होईल ज्ञान ॥ तेथें संशय नाहीं ॥ १ ॥ ज्ञानेश्वरी तीन सप्तकें ॥ जो श्रवण करील विवेकें ॥ तो होय ज्ञानी अधिकें ॥ येथें संशय नाहीं ॥ २ ॥ मनकर्णिका भागिरथी ॥ इंद्रायणीचें स्नान करिती ॥ ते मोक्षपदासी जाती ॥ येथें संशय नाहीं ॥ ३ ॥ अश्वस्थ सिद्धेश्वर ॥ समाधीसी करी नमस्कार ॥ तो पावे मोक्ष पै सार ॥ येथें संशय नाहीं ॥ ४ ॥ येथींचे वृक्ष पाषाण ॥ ते अवघे देव जाण ॥ ह्मणे एकाजनार्दन ॥ येथें संशय नाहीं ॥ ५ ॥

॥ ४२५ ॥ पूर्वीं जो प्रल्हाद तोचि जाणा अंगद ॥ तोचि उद्धव प्रसिद्ध कृष्णावतारीं ॥ १ ॥ कलीमाजीं जाणा नामदेव ह्मणती ॥ लडीवाळ श्रीपति लळा पाळी ॥ २ ॥ तीर्थ यात्रा सर्व केलासे उद्धार ॥ सर्व त्याचा भार चालविला ॥ ३ ॥ लडीवाळ नामा विठ्ठलचरणीं ॥ एकाजनार्दनीं नमन त्यातें ॥ ४ ॥

॥ ४२६ ॥ जन्मकाळीं देवें प्रतिज्ञा पै केली ॥ शतकोटी लिहिली काव्य रचना ॥ १ ॥ चौदा जणीं त्याचें काव्य तें केलें ॥ निरभिमानें वंदिले संत जन ॥ २ ॥ लाडका तो नामा समाधि महाद्वारीं ॥ समदृष्टी हरीवरी त्याची ॥ ३ ॥ पाळोनीया लळा समाधी ठेविला ॥ एकाजनार्दनीं झाला आनंदमय ॥ ४ ॥

॥ ४२७ ॥ लडिवाळ नामा विठोबाचा दास ॥ तयाचे चरणांस दंडवत ॥ १ ॥ भक्त शिरोमणी लाडका डिंगर ॥ आवडता फार विठोबाचा ॥ २ ॥ कवित्व करुनी तारिले सकळ ॥ निरभिमानी निर्मळ सदोदीत ॥ ३ ॥ नामावांचुनि कांहीं नेणे तो नामा ॥ तयाचा तो प्रेमा पांडुरंगीं ॥ ४ ॥ ऐसीया संतासी नमन माझें भावें ॥ एकाजनार्दनीं जावें वोवाळूनी ॥ ५ ॥

॥ ४२८ ॥ कुलाल वंशांत गोरा तो कुंभार ॥ कीर्ति चराचर भरियेलें ॥ १ ॥ प्रतिज्ञा करुनी करकमळ जोडी ॥ भाजनें हीं घडी श्रीविठ्ठल

॥ २ ॥ नाम निरंतर वदतसे वाचें ॥ प्रेम मी तयाचें काय वानूं ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं भक्ताचा कैवारी ॥ भाजनें तीं करी घरीं त्याच्या ॥ ४ ॥

॥ ४२९ ॥ संताचीया माथा चरणावरी माझा ॥ देहीं भाव दुजा नाहीं नाहीं ॥ १ ॥ नामाचें चिंतन करती सर्व काळ ॥ ते माझे केवळ मायबाप ॥ २ ॥ मायबाप ह्मणों तरी लाजिरवाणें ॥ चुकविलें पेणें संतजनीं ॥ ३ ॥ ज्या ज्या जन्मा यावें मायबाप दोन्ही ॥ परी संतजन निर्वाणीं मिळतीना ॥ ४ ॥ येची देहीं डोळा संतासी देखिलें ॥ एका-जनार्दनीं वंदिले चरण त्यांचे ॥ ५ ॥

॥ ४३० ॥ संत भेटीचा आनंदू ॥ सुखसागर परमानंदू ॥ गातां नुरेचि भेदू ॥ नाम स्मरणें ॥ १ ॥ कैवल्याचे अधिकारी ॥ मोक्ष राबे त्यांचे घरीं ॥ सिद्धि रिद्धि कामारी ॥ कोण त्या पुसे ॥ २ ॥ भुक्ति आणि मुक्ती ॥ सदां तिष्ठे अहोरात्री ॥ कैवल्य पदें येती ॥ सामोरीं तयासी ॥ ३ ॥ नाम गाती जे आनंदे ॥ हृदयीं नाहीं दुजा भेद ॥ एकाजनार्दनीं छंद ॥ तयांचा मज ॥ ४ ॥

॥ ४३१ ॥ संत सुखसागरीं ॥ बुडी दिधली निर्धारीं ॥ भवदुःख हरी ॥ संतनामें ॥ १ ॥ ऐसा संतांचा महिमा ॥ नाहीं द्यावया उपमा ॥ ब्रह्मसुख धामा ॥ पुढें नाचे ॥ २ ॥ बोलती तें वचन साचें ॥ नाहीं बोलणें असत्याचें ॥ नामीं प्रेम जयाचें ॥ जोडोनी ठेलें ॥ ३ ॥ कृपावंत संत ॥ दीन तारिले त्वरित ॥ एकाजनार्दनीं मात ॥ श्रवण मज झाली ॥ ४ ॥

॥ ४३२ ॥ ऐकोनी संत कीर्ती ॥ मना झालीसे विश्रांती ॥ नाहीं पुनरा-वृत्ती ॥ जन्मांची तया ॥ १ ॥ धन्य संत जन ॥ मज केलें वो पावन ॥ विश्रांतीचें स्थान ॥ हृदयीं माझ्या ठसाविलें ॥ २ ॥ बहु जाचलों संसारें ॥ बहु जन्म केले फेरे ॥ ते चुकविले सारे ॥ आजी कृपा करुनी ॥ ३ ॥ शरण एकाजनार्दन ॥ माझें हरिलें मीपण ॥ तुह्मीं कृपा करून ॥ अभय वर दिधला ॥ ४ ॥

॥ ४३३ ॥ देउनीया अभयदान ॥ संतीं केलें मज पावन ॥ निरसोनी भवबंधन ॥ तारिलें मज ॥ १ ॥ ऐसा संत समागम ॥ नाहीं आणीक विश्राम ॥ योगीयाचें धाम ॥ कुंठित पैं जालें ॥ २ ॥ आणीक एक वर्म ॥

मुख्य इंद्रियाचा धर्म ॥ मन ठेउनी विश्राम ॥ नाम चिंतन करावें ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं जाण ॥ संत आमुचें निजध्यान ॥ काया वाचा मन ॥ दृढ पायीं ॥ ४ ॥

॥ ४३४ ॥ संतवचनें साधे मुक्ती ॥ संतवचनें ब्रह्मस्थिती ॥ कर्माकर्माची शांती ॥ संतवचनें ॥ १ ॥ संतवचनें याग ॥ संतवचनें सांग योग ॥ संतवचनें अनुराग ॥ घडतां संग संताचा ॥ २ ॥ संतवचनें ब्रह्मप्राप्ती ॥ संतवचनें सायुज्यमुक्ती ॥ ब्रह्मादिपदें येती ॥ संतवचनें सामोर ॥ ३ ॥ संतवचनें सर्व सिद्धी ॥ संतवचनें समाधी ॥ संतवचनें उपाधी ॥ एकाजनार्दनीं तुटतसे ॥ ४ ॥

॥ ४३५ ॥ संतवचनें देव जोडे ॥ सायुज्यमुक्ति पायां पडे ॥ संतवचनीं सांकडें ॥ नुरेचि कांहीं ॥ १ ॥ धन्य धन्य संतसंग ॥ उभा तेथें श्रीरंग ॥ लक्ष्मी सहित अभंग ॥ तिष्ठे सदां ॥ २ ॥ संतवचनें कर्म झडे ॥ संतवचनें मोक्ष जोडे ॥ संतवचनीं तीर्थ घडे ॥ धन्य संग संतांचा ॥ ३ ॥ संतवचनें तुटे उपाधी ॥ संतवचनें सरे आधिव्याधी ॥ संतवचनें भवनदी ॥ प्राणी तरती ॥ ४ ॥ संतवचनीं धरा भाव ॥ तेणें सर्व निरसे भव ॥ एकाजनार्दनीं देव ॥ प्रत्यक्ष भेटे ॥ ५ ॥

॥ ४३६ ॥ संतासी आवडे तो देवाचाही देव ॥ कळीकाळाचें भेव पायातळीं ॥ १ ॥ आणिकाची चाड नसेचि वासना ॥ संताचीया चरणा वांचुनीया ॥ २ ॥ ऐसें ज्याचें प्रेम ऐशी ज्याची भक्ती ॥ एकाजनार्दनीं मुक्ति तेथें रावे ॥ ३ ॥

॥ ४३७ ॥ देवाचे सोईरे संत ते जाणावे ॥ यापरतें जीवें नाठवी कोणा ॥ १ ॥ पडतां संकट आठवितसे संता ॥ त्याहुनी वारिता नाहीं दुजा ॥ २ ॥ ह्मणोनी घरटी फिरे तया गांवीं ॥ सुदर्शनादि मिरवी आयुधें हातीं ॥ ३ ॥ लाडीके डिंगर वैष्णव ते साचे ॥ एकाजनार्दनीं त्यांचे वंदी पाय ॥ ४ ॥

॥ ४३८ ॥ अणुरेणूपासोनि सबाह्य भरला ॥ भरुनी उरला संतांपुढें ॥ १ ॥ उघडाची दिसे सर्वां ठाईं वसे ॥ मागणेंचि नसे दुजें कांहीं ॥ २ ॥ कर ठेउनी कटीं तिष्ठत राहणें ॥ वास ते पहाणें मागेल कांहीं ॥ ३ ॥ चंद्रभागातीर पुंडलीका समोर ॥ एकाजनार्दनीं हरिहर उभे रहाताती ॥ ४ ॥

॥ ४३९ ॥ संतपोटीं देव वसे ॥ देवापोटीं संत असे ॥ १ ॥ ऐसा परस्परें मेळा ॥ देव संताचा अंकिला ॥ २ ॥ संताठायीं देव तिष्ठे ॥ देव तेथें संत वसे ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं संत ॥ देव तयाचा अंकित ॥ ४ ॥

॥ ४४० ॥ अंकिला देव संतद्वारीं ॥ भिक्षा मागतो निर्धारी ॥ १ ॥ मज द्याहो प्रेमभिक्षा ॥ देव बोले तया प्रत्यक्षा ॥ २ ॥ नाम गाणें हेंची दक्ष ॥ एकाजनार्दनीं प्रत्यक्ष ॥ ३ ॥

॥ ४४१ ॥ धन्य धन्य कीर्तन जगीं ॥ संत तेची सभागी ॥ १ ॥ गाती कीर्तनीं उल्हास ॥ सदा प्रेमें हरिदास ॥ २ ॥ नाहीं आणिक चिंतन ॥ करती आदरें कीर्तन ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं शरण ॥ झालों कीर्तनीं पावन ॥ ४ ॥

॥ ४४२ ॥ जयाचेनी चरणें तीर्था तीर्थपण ॥ तो हृदयीं केला सांठवण ॥ १ ॥ नवल महिमा हरिदासाची ॥ तीर्थें उपजती त्याचे कुशी ॥ २ ॥ काशीं मरणें होय मुक्ती ॥ येथें वचनें मरतां होय मुक्ती ॥ ३ ॥ एकाजनार्दनाचे भेटीं ॥ सकळ तीर्थें वोळंगती दिठीं ॥ ४ ॥

---

# निवृत्तिमहाराजांची स्तुति.

॥ ४४३ ॥ गोरक्षनाथें उपदेश केला ॥ ब्रह्मरूप झाला गहिनीनाथा ॥ १ ॥ गहिनीनें निवृत्तीनाथासी ॥ उपदेश त्यासी आत्मबोध ॥ २ ॥ निवृत्तीनाथानें ज्ञानदेवा पाही ॥ एकाजनार्दनीं तेंही बोधीयेलें ॥ ३ ॥

॥ ४४४ ॥ ज्ञानदेवें उपदेश करुनीया पाही ॥ सोपान मुक्ताई बोधियेलीं ॥ १ ॥ मुक्ताईनें बोध खेचरासी केला ॥ तेणें नामीयाला बोधियेलें ॥ २ ॥ नाम्याचें कुटुंब चांगा वटेश्वर ॥ एकाजनार्दनीं विस्तार मुक्ताईचा ॥ ३ ॥

॥ ४४५ ॥ ज्ञानराजें बोध केला सत्यबाळा ॥ रेडा बोलविला प्रतिष्ठानीं ॥ १ ॥ भोजलिंग ज्याची समाधि आळंदीं ॥ ज्ञानराज बोधी तिघां जणां ॥ २ ॥ सत्यबाळें बोध गैबीराया केला ॥ स्वयें ब्रह्म झाला सिद्धरूप ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं ऐसी परंपरा ॥ दाविली निर्धारा कथुनीया ॥ ४ ॥

॥ ४४६ ॥ धन्य धन्य निवृत्ति देवा ॥ काय महिमा वर्णावा ॥ १ ॥ शिव अवतार तूंचि धरून ॥ केलें त्रैलोक्य पावन ॥ २ ॥ समाधि त्र्यंबक शिखरीं ॥ मागें शोभे ब्रह्मगिरी ॥ ३ ॥ निवृत्तिनाथाचे चरणीं ॥ शरण एकाजनार्दनीं ॥ ४ ॥

॥ ४४७ ॥ समाधि निवृत्ति ह्मणतां ॥ हरे संसाराची व्यथा ॥ १ ॥ दृष्टीं पहातां निवृत्तिनाथ ॥ काळ भय नाहीं तेथ ॥ २ ॥ समाधि पहातांचि डोळा ॥ काय सांगूं तो सोहळा ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं शरण ॥ समाधि पहातांचि जाण ॥ ४ ॥

॥ ४४८ ॥ निवृत्ति निवृत्ती ॥ ह्मणतां पाप नुरे चित्तीं ॥ १ ॥ निवृत्ति निवृत्ति नाम घेतां ॥ जन्म सार्थक तत्वतां ॥ २ ॥ निवृत्ति निवृत्ती ॥ संसाराची होय शांती ॥ ३ ॥ निवृत्ति नामाचा निज छंद ॥ एकाजनार्दनीं आनंद ॥ ४ ॥

॥ ४४९ ॥ धन्य आजी डोळा ॥ स्वामि निवृत्ति देखिला ॥ १ ॥ कुशावर्तीं करूं स्नान ॥ घेऊं निवृत्तिदर्शन ॥ २ ॥ प्रदक्षिणा ब्रह्मगिरी ॥ चौऱ्यांशीची चुकली फेरी ॥ ३ ॥ गंगाद्वारीं स्नान करतां ॥ हरे जन्ममरण व्यथा ॥ ४ ॥ ऐसीं तीन अक्षरें ॥ एकाजनार्दन स्मरे ॥ ५ ॥

॥ ४५० ॥ निवृत्तिनाथ तीन अक्षरें ॥ सदा जप करी निर्धारें ॥ १ ॥ पूर्वज उद्धरती साचार ॥ वेदशास्त्रीं हा निर्धार ॥ २ ॥ पुनरपि जन्माची ॥ वार्ता नाहीं नाहीं साची ॥ ३ ॥ अनुभव धरा वेगीं चित्तीं ॥ एकाजनार्दन करी विनंती ॥ ४ ॥

॥ ४५१ ॥ नाम जपतां निवृत्ती ॥ नयेची तो पुनरावृत्ती ॥ १ ॥ ऐसा अनुभव जीवा ॥ चराचरीं सर्व देवा ॥ २ ॥ एकाजनार्दनीं शरण ॥ निवृत्ति ह्मणतां पावन ॥ ३ ॥

॥ ४५२ ॥ धन्य स्वामि माझा निवृत्ती ॥ जडलासे चित्तवृत्तीं ॥ १ ॥ अखंडित वाचें ॥ नाम निवृत्ति हेंचि साचें ॥ २ ॥ नामें पावन निवृत्ती ॥ धन्य धन्य तो निवृत्ती ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं वाचें ॥ नाम श्रीनिवृत्तीचें ॥ ४ ॥

॥ ४५३ ॥ आजी धन्य दिन झाला ॥ स्वामी निवृत्ति भेटला ॥ १ ॥ जन्म जरा मरण व्याधि ॥ अवघी तुटली उपाधि ॥ २ ॥ मन इंद्रियां

सहित ॥ पायीं जडियलें चित्त ॥ ३ ॥ समूळ अहंकार गेला ॥ निवृत्तिनाथ पहातां डोळा ॥ ४ ॥ एका विनवी जनार्दन ॥ निवृत्ति नामें झालों पावन ॥ ५ ॥

॥ ४५४ ॥ विश्वाचा तो गुरू ॥ स्वामि निवृत्ति दातारू ॥ १ ॥ आदिनाथापासून ॥ परंपरा आली जाण ॥ २ ॥ ज्ञानदेवा ज्ञान दिलें ॥ चांगदेवातें बोधिलें ॥ ३ ॥ तोचि बोध माझे मनीं ॥ राहो एकाजनार्दनीं ॥ ४ ॥

॥ ४५५ ॥ केला उपकार जगीं तारियले सर्व ॥ निवृत्ति गुरु माझा जीव उद्धरिले सर्व ॥ १ ॥ काया वाचा मनें शरण निवृत्ति पायीं ॥ देहभावें मीतूंपणा उरलाची नाहीं ॥ २ ॥ ऐसा श्रीनिवृत्ति ज्ञानदेवें धरिला चित्तीं ॥ चांगया प्रेम दिधलें गुरु वोळखिला चित्तीं ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं शरण निवृत्तीप्रती ॥ संसारा नुरेचि उरी निवृत्ति ह्मणतां चित्तीं ॥ ४ ॥

॥ ४५६ ॥ सदोदित मन निवृत्तीचे पायीं ॥ मना आणिक ठायीं जाऊं नको ॥ १ ॥ जप तप कांहीं न करी साधन ॥ तुटेल बंधन निवृत्तिनामें ॥ २ ॥ तीर्थ व्रत चाड न धरी अहंकार ॥ नामाचा उच्चार निवृत्ति करी ॥ ३ ॥ तीर्थाचें हें तीर्थ निवृत्ति माहेर ॥ एकाजनार्दनीं निर्धार निवृत्तिपायीं ॥ ४ ॥

॥ ४५७ ॥ नाम निवृत्ति धन्य तो निवृत्ती ॥ देह निवृत्ति पहातां डोळां ॥ १ ॥ संसार निवृत्ति सारासार निवृत्ती ॥ वेद निवृत्ति नाम गातां ॥ २ ॥ शास्त्र निवृत्ति पुराणें निवृत्ती ॥ अंतर्बाह्य कीर्ति निवृत्तीची ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं पहातांचि निवृत्ती ॥ होय सर्व शांति निवृत्ति नामें ॥ ४ ॥

॥ ४५८ ॥ प्रपंच परमार्थ करी कां रे सुखाचा ॥ निरंतर वाचा निवृत्ति नाम ॥ १ ॥ तुटेल बंधन खुंटेल पतन ॥ निवृत्ति नाम जाण जपताची ॥ २ ॥ योग यागादिक नलगे तीं साधनें ॥ निवृत्ति नामें पेणें वैकुंठींचें ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं न करी साधन ॥ निवृत्ति ह्मणतां जाण सर्व जोडे ॥ ४ ॥

॥ ४५९ ॥ साधन कासया श्रम ते करावे ॥ निवृत्तिनाम गावें सदोदित ॥ १ ॥ तीर्थ यात्रा कांहीं नाम मुखें गाई ॥ निवृत्तिनामें डोहीं बुडी देका ॥ २ ॥ एकाजनार्दनीं निवृत्ति नाम सार ॥ करी रे उच्चार वेळोवेळां ॥ ३ ॥

॥ ४६० ॥ उच्चार नामाचा करी पा साचारें ॥ आळस निर्धारें टाकून देई ॥ १ ॥ तें नाम सोपें निवृत्तीचें जाण ॥ काया वाचा मन जप करी

॥ २ ॥ यातना तें कांहीं न पडे व्यसन ॥ नाम उच्चारण निवृत्तीचें ॥ ३ ॥ निवृत्ति नामाचा लागलीया छंद ॥ तुटे भवबंध नामें तीची ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं निवृत्तिनाम धणी ॥ गाईन मी वाणी सदोदित ॥ ५ ॥

॥ ४६१ ॥ काळा तो अभ्यास कासया करणें ॥ निवृत्तिनाम घेणें धणीवरी ॥ १ ॥ धणीवरी नाम घेई पा अंतरीं ॥ निवृत्ति बाह्यात्कारीं होईल तुझी ॥ २ ॥ व्यर्थ खटपट न करी पसार ॥ निवृत्तिनामें साचार जप करी ॥ ३ ॥ गुज गुह्य तुज सांगतों मना ॥ निवृत्तिनाम जाणा हृदयीं धरी ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं निवृत्तिनाम वाचे ॥ संसाराचें साचें सार्थक झालें ॥ ५ ॥

॥ ४६२ ॥ माझ्या मना तूं करी पा विचार ॥ नाम निरंतर निवृत्ति जपे ॥ १ ॥ जपतां नामावळी आळस न करी ॥ कोटी जन्म फेरी चुके तेणें ॥ २ ॥ सुखरूप तूं होसील साचार ॥ गर्भाचा उद्धार खुंटे साचा ॥ ३ ॥ एकाजनार्दन सांगे निर्धार ॥ निवृत्ति उच्चार नाम करी ॥ ४ ॥

॥ ४६३ ॥ अहं सोहं कोहं सांडोनीया देई ॥ निवृत्तीचे पायीं बुद्धी देकां ॥ १ ॥ अकार उकार मकार निर्धार ॥ सर्व चराचर निवृत्ति रूप ॥ २ ॥ स्थूल सूक्ष्म कारण महाकारण ॥ तें निवृत्तिनाम जाण सत्य होय ॥ ३ ॥ शुद्ध बुद्ध नाम निवृत्तीचें वाचें ॥ एकाजनार्दनीं साचे स्मरे मनीं ॥ ४ ॥

---

## ज्ञानदेव महाराजांची स्तुति.

॥ २६४ ॥ तीन अक्षरें निवृत्ती ॥ जो जप करी अहोरात्रीं ॥ तया सायुज्यता मुक्ती ॥ ब्रह्म स्थिति सर्व काळ ॥ १ ॥ चार अक्षरें ज्ञानदेव ॥ जो जप करी धरील भाव ॥ तया ब्रह्मपदीं ठाव ॥ ऐसें देवाधिदेव बोलिले ॥ २ ॥ सोपान हीं तीन अक्षरें ॥ जो जप करील निर्धारें ॥ तयास ब्रह्म साक्षात्कारें ॥ होय सत्वर जाणिजे ॥ ३ ॥ मुक्ताबाई चतुर्थदा ॥ जो जप करील सदां ॥ तो जाईल मोक्षपदा ॥ सायुज्य संपदा पावेल ॥ ४ ॥ ऐसी हीं चौदा अक्षरें ॥ जो ऐके कर्णविवरें ॥ कीं उच्चारी मुखद्वारें ॥ तया ज्ञानेश्वर प्रत्यक्ष भेटे ॥ ५ ॥ एका जनार्दनी प्रेम ॥ जो जप करील धरील नेम ॥ तयास पुन्हां नाहीं जन्म ॥ ऐसें पुरुषोत्तम बोलिले ॥ ६ ॥

॥ ४६५ ॥ ॐनमो ज्ञानेश्वरा ॥ करुणाकरा दयाळा ॥ १ ॥ तुमचा अनुग्रह लाधलों ॥ पावन झालों चराचरीं ॥ २ ॥ मी कळाकुसरी कांहींच नेणें ॥ बोलतों वचनें भाविका ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं तुमचा दास ॥ त्याची आस पुरवावी ॥ ४ ॥

॥ ४६६ ॥ तुमचीया नामस्मरणीं ॥ मति लागो निशीदिनीं ॥ १ ॥ आठव तो मज द्यावा ॥ दुजा हेवा मी नेणें ॥ २ ॥ वारंवार नाम कीर्ती ॥ आठवीन श्रीपति दयाळा ॥ ३ ॥ एकाजनार्दना आपुला ॥ पाहिजे सांभाळिला मायबापा ॥ ४ ॥

॥ ४६७ ॥ सदा वसे अंगीं शांती ॥ चारी मुक्ति दासी होती ॥ १ ॥ तेची सखे हरीचे दास ॥ सदा सोंवळे उदास ॥ २ ॥ काम क्रोधाची वार्ता ॥ अंगीं नाहीं पैं सर्वथा ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं निष्काम ॥ सदा परिपूर्ण मंगळधाम ॥ ४ ॥

॥ ४६८ ॥ श्रीज्ञानदेवें येउनी स्वप्नांत ॥ सांगितली मात मजलागी ॥ १ ॥ दिव्य तेजःपुंज मदनाचा पुतळा ॥ परब्रह्म केवळ बोलतसे ॥ २ ॥ आजान वृक्षाची मुळी कंठास लागली ॥ येऊनि आळंदी स्थळीं काढ वेगी ॥ ३ ॥ ऐसें स्वप्न होतां आलों अलकापुरीं ॥ तंव नदीमाझारीं देखिलें द्वार ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं पूर्व पुण्य फळलें ॥ श्रीगुरु भेटले ज्ञानेश्वर ॥ ५ ॥

॥ ४६९ ॥ झाले ज्ञानदेव वाणी ॥ आले सामुग्री घेउनी ॥ १ ॥ पर्वकाळ द्वादशी ॥ दिली सामुग्री आह्मासी ॥ २ ॥ ज्ञानदेवाच्या चरणीं ॥ शरण एकाजनार्दनी ॥ ३ ॥

॥ ४७० ॥ विनंति माझी परिसावी ॥ कृपा दीनावर करावी ॥ १ ॥ नित्य नवा नामघोष ॥ आठव द्यावा सावकाश ॥ २ ॥ नामावांचुनी कांहीं दुजें ॥ मना आणिक नको माझे ॥ ३ ॥ एका विनंति करी ॥ जनार्दना कृपा करी ॥ ४ ॥

॥ ४७१ ॥ माझी ऐकावी विनंती ॥ ज्ञानदेवा श्रेष्ठ मूर्ती ॥ १ ॥ तुह्मी बैसोनी अंतरीं ॥ मज जागवा निर्धारीं ॥ २ ॥ तुह्मीं सत्ताधारी ॥ प्रपंच करावा बोहरी ॥ ३ ॥ श्रेष्ठा ज्ञानदेवा ॥ एकाजनार्दनीं आठवा ॥ ४ ॥

॥ ४७२ ॥ अहो दयाळे ज्ञानाबाई ॥ आर्त माझें तुझ्या पायीं ॥ १ ॥ इंद्रायणीचे तटीं ॥ ज्ञानाबाई वो गोमटी ॥ २ ॥ सकळ मेळा हो सिद्धांचा ॥ ज्ञानाबाई अनुग्रहाचा ॥ ३ ॥ पूर्व पश्चिम देवस्थान ॥ मध्यें ज्ञानाबाई आपण ॥ ४ ॥ ऐशी ज्ञानाबाई ध्याऊं ॥ एकाजनार्दनीं शरण जाऊं ॥ ५ ॥

॥ ४७३ ॥ सर्व सुखाची लहरी ॥ ज्ञानाबाई अलंकापुरीं ॥ १ ॥ शिव पीठ हें जुनाट ॥ ज्ञानाबाई तेथें मुगुट ॥ २ ॥ वेद शास्त्र देती ग्वाही ॥ ह्मणती ज्ञानाबाई आई ॥ ३ ॥ ज्ञानाबाईचे चरणीं ॥ शरण एका-जनार्दनीं ॥ ४ ॥

॥ ४७४ ॥ संतांचा महिमा वर्णावा वितीं ॥ अलक्ष लक्ष मूर्ति ज्ञानोबा तो ॥ १ ॥ अर्जुना संकट पडतां जड भारी ॥ गीता सांगे हरि कुरुक्षेत्रीं ॥ २ ॥ तोचि अवतार धरी अलंकापुरीं ॥ ज्ञानाबाई सुंदरी तारावया ॥ ३ ॥ गीता शोधोनीया अर्थ तो काढिला ॥ ग्रंथ तो निर्मिला ज्ञानेश्वरी ॥ ४ ॥ जगाचा उद्धार ज्ञानाबाई नामें ॥ साधन हें आणिक नेमें न करी कांहीं ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं ज्ञानाबाई नाम ॥ पावेन निजधाम संतांचें तें ॥ ६ ॥

॥ ४७५ ॥ समाधि घेतली आळंदीं ॥ भोंवतीं शोभे सिद्ध मांदी ॥ १ ॥ सन्मुख पुढें अजान वृक्ष ॥ देव येती तेथें साक्ष ॥ २ ॥ कीर्तन गजरीं ॥ नाम घोष चराचरीं ॥ ३ ॥ ऐसा सोहळा आनंद ॥ एकाजनार्दनीं नाहीं भेद ॥ ४ ॥

॥ ४७६ ॥ नमो ज्ञानदेवो नमो ज्ञानराजा ॥ नमो ज्ञानसिंधु सखा पूर्ण माझा ॥ मती मंद ते ज्ञान दाता दिनासी ॥ नमस्कार साष्टांग ज्ञानेश्वरासी ॥ १ ॥ सदा ज्ञान बुद्धि सदोदित ध्याला ॥ स्वयें ईश्वरू ज्ञानतत्वें निमाला ॥ परब्रह्मरूपीं असे वास ज्यासी ॥ नमस्कार० ॥ २ ॥ मती मंद अज्ञान मूढां जनाला ॥ गितासार निरोपिली हो तयाला ॥ भयाचे पुरीं तारिसी पापि-राशी ॥ नमस्कार० ॥ ३ ॥ सदा अंतरीं ज्ञान ध्याता जयाचें ॥ महादोष अज्ञान गेले तयाचे ॥ अभि अंतरीं सूख असंत त्यासी ॥ नमस्कार० ॥ ४ ॥ कसा योगि अद्भुत विद्यूत देही ॥ महा माया नातुडे त्यासी पाही ॥ जया आठवा हो महापुण्यराशी ॥ नमस्कार० ॥ ५ ॥ कसा भला हो असंत हो

ज्ञानराजा ॥ अहंभाव नाहीं असा स्वामि माझा ॥ करूं प्रार्थना त्या महाराजयासी ॥ नमस्कार० ॥ ६ ॥ कथा कार्तिकी कारणें ज्ञान देवीं ॥ विठोराज येती महा महोत्साहीं ॥ असा ज्ञानराजा महा पुण्यराशी ॥ नमस्कार० ॥ ॥ ७ ॥ अलंकापुरी पुण्य भूमी पवित्र ॥ तिथें नांदतो ज्ञानराजा सुपात्र ॥ असा भक्त हा काय वर्णूं तयासी ॥ नमस्कार० ॥ ८ ॥ विठो पंढरीनाथ देवा सहीत ॥ जयाचे समाधीस आले त्वरीत ॥ विवेकें सदा सूख असंत त्यासी ॥ नमस्कार० ॥ ९ ॥ जनीं होय जनार्दनीं मुक्त होतां ॥ जयाचेनि नामें चढे ब्रह्मपंथा ॥ सदा तो स्मरे त्या महा राजयासी ॥ नमस्कार साष्टांग ज्ञानेश्वरासी ॥ १० ॥

---

## सोपानदेव महाराजांची स्तुति.

॥ ४७७ ॥ नमो अगणितगुणा देवाधिदेवा ॥ माझ्या सोपानदेवा नमन तुज ॥ १ ॥ संवत्सर ग्राम कऱ्हातटीं उत्तम ॥ पुण्य पावन नाम सोपान देव ॥ २ ॥ जग तारावया हरि लीला केली ॥ प्रसिद्ध ती जाली सोपानदेवा ॥ ३ ॥ तुमचा प्रसाद द्यावा माझे हातीं ॥ एकाजनार्दनीं विनंति करीतसे ॥ ४ ॥

॥ ४७८ ॥ सोपानदेव नाम पावन परम ॥ आणिक उत्तम जप नाहीं ॥ १ ॥ माझ्या मना तूं करी कांरे लाहो ॥ सोपानदेव ध्यावो हृदयामाजीं ॥ २ ॥ ब्रह्मा अवतार नाम हें सोपान ॥ केलेसे पावन चराचर ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं सोपानाच्या पायीं ॥ ठेवितसे डोई काया वाचा ॥ ४ ॥

॥ ४७९ ॥ मन माझें लागो सोपान चरणीं ॥ मस्तक हें धणीं पायांवरी ॥ १ ॥ सोपान सोपान जपेन हें नाम ॥ अन्य न करी नेम दुजा कांहीं ॥ २ ॥ वारी पा सांकडें प्रपंच कवाड ॥ घालुनीया आड नामशस्त्र ॥ ३ ॥ जीवींच्या जीवना माझीया सोपाना ॥ एकाजनार्दना अभय द्यावें ॥ ४ ॥

॥ ४८० ॥ मति माझी लागो सोपानचरणीं ॥ रात्रंदिवस चिंतनीं जप सदां ॥ १ ॥ आणिक न करी कांहीं दुजा नेम धर्म ॥ सर्व सोपें वर्म सोपानदेव ॥ २ ॥ वेद शास्त्रें भांडती ज्यालागी कोडें ॥ तें असे उघडें संवत्सरग्रामीं ॥ ३ ॥ प्रत्यक्ष विष्णुमूर्ति श्रीविठ्ठलदेव ॥ समाधीचा गौरव करी

तसे ॥ ४ ॥ करुनी सोहळा समाधी बैसविला ॥ एकाजनार्दनीं राहिला पुढें मागें ॥ ५ ॥

॥ ४८१ ॥ आनंद समाधि संत भक्त देव ॥ करिती उत्सव संवत्सरीं ॥ ॥ १ ॥ गरुड हनुमंत भक्त ते मिळाले ॥ जयजयकार केले सुरवरीं ॥ २ ॥ पुष्पांचा वर्षाव विमानांची दाटी ॥ सोपानदेव भेटी येती देव ॥ ३ ॥ तो सुखसोहळा वर्णावया पार ॥ नोहेचि निर्धार माझी मती ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं सोपान चरणीं ॥ मस्तक ठेवुनी निवांत राही ॥ ५ ॥

॥ ४८२ ॥ देव आणि भक्त करिती जयजयकार ॥ नामघोषें अंबर गर्जतसे ॥ १ ॥ आनंदें वैष्णव हरिकथा करिती ॥ गाती नाचताती प्रेमछंदें ॥ २ ॥ नारद तुंबर भक्त पुंडलीक ॥ वैष्णव आणिक नाम गाती ॥ ३ ॥ सोपान आनंदें समाधीं बैसला ॥ एका जनार्दनीं केला जयजयकार ॥ ४ ॥

---

# मुक्ताबाई महाराजांची स्तुति.

॥ ४८३ ॥ जगत्रय जननी मुक्ताबाई माते ॥ कृपा करी वरदहस्तें मजवरी ॥ १ ॥ आदिनाथें अनुग्रह नाथासी दिधला ॥ नाथें हस्त ठेविला मस्तकीं तुमच्या ॥ २ ॥ बाळलीला केली जगीं ख्याति मिरवली ॥ चांगयाची हरली चौसष्ट कळा ॥ ३ ॥ कळा पासष्टावी ज्ञानदेवें दाविली ॥ चांगयाची विराली अहं ममता ॥ ४ ॥ चांगदेव शरण कायावाचा मनें ॥ एकाजनार्दनीं ह्मणे तैशा परी ॥ ५ ॥

॥ ४८४ ॥ नाथाचे आश्रमीं समाधि रहित ॥ मुक्तता मुक्त नाम तुह्मां ॥ ॥ १ ॥ महाकल्पवरी चिरंजीव शरीर ॥ कीर्ति चराचर त्रिभुवनीं ॥ २ ॥ आनंदें समाधि सदां ती उघडी ॥ नामस्मरण घडोघडी मुखोद्गत ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं तुमचें नाम गोड ॥ त्रैलोक्यीं उघड नामकीर्ती ॥ ४ ॥

॥ ४८५ ॥ योगियाचें ध्यान पै विश्रांती ॥ आदिशक्ति ह्मणती तुह्मालागीं ॥ १ ॥ नित्य मुक्त तुह्मी सर्व जीवां बंध ॥ अकार उकार मकार भेद मावळला ॥ २ ॥ अहं सोहं कोहं तुमचा प्रकार ॥ वेद शास्त्र सार तुह्मी जाणा ॥ ३ ॥ अनुग्रह कृपेचा मजलागीं तो द्यावा ॥ एकाजनार्दनीं करावा कृपापात्र ॥ ४ ॥

॥ ४८६ ॥ मुक्तपणें मुक्त श्रेष्ठपणें श्रेष्ठ ॥ सर्वत्रीं वरिष्ठ आदि शक्ती ॥ ॥ १ ॥ जगाच्या उद्धारा तुमचा अवतार ॥ पावन हे साचार मूढ जन ॥ २ ॥ अज्ञानासी बोध सज्ञानाची शुद्धी ॥ तोडिली उपाधि सर्वत्रांची ॥ ३ ॥ लडीवाळ तान्हें एकाजनार्दनें ॥ कृपा असों देणें मजवरी ॥ ४ ॥

॥ ४८७ ॥ त्र्यंबक शिखरीं जीवन्मुक्त तुह्मी ॥ नाथाचे ते धामीं गुप्तरूप ॥ १ ॥ सर्वकाळ विठ्ठल विठ्ठल पैं वाचें ॥ सार्थक देहाचें येणें करुनी ॥ २ ॥ अखंड नामोच्चार समाधि सोहळा ॥ आणिक नये डोळां आड कांहीं ॥ ३ ॥ एकाजनार्दन ह्मणावा आपुला ॥ आसनीं शयनीं त्याला विसरूं नका ॥ ४ ॥

॥ ४८८ ॥ ब्रह्मांडभरी कीर्ति संतांचा महिमा ॥ वर्णावया आह्मा मति थोडी ॥ १ ॥ एकमुखें वानूं चतुरानना शीण ॥ सहस्रमुखें गुण वानितां नये ॥ २ ॥ एकाजनार्दनीं वर्णीन पवाडे ॥ उभा वाडेंकोडें पंढरीये ॥ ३ ॥

---

## गुरूची मानस पूजा.

॥ ४८९ ॥ मनोभाव जाणोनी माझा ॥ सगुण रूप धरिलें वोजा ॥ पाहुणा सद्गुरुराया ॥ आला वो माय ॥ १ ॥ प्रथम अंतःकरण जाण ॥ चित्त शुद्ध आणि मन ॥ चोखाळोनी आसन ॥ स्वामीसी केलें ॥ २ ॥ अनन्य आवडीचें जळ ॥ प्रक्षाळिलें चरण कमळ ॥ वासना हें समूळ ॥ चंदन लाविलें ॥ ३ ॥ अहं जाळीयला धूप ॥ सद्भाव उजळिला दीप ॥ पंचप्राण हे अमुप ॥ नैवद्य केला ॥ ४ ॥ रज तम सांडोनि दोन्ही ॥ विडा दिला सत्वगुणी ॥ स्वानुभवें रंगोनी ॥ सुरंग दावी ॥ ५ ॥ एका-जनार्दनीं पूजा ॥ देव भक्त नाहीं दुजा ॥ अवघाची सद्गुरु तुजा । होवोनि ठेला ॥ ६ ॥

---

## वैष्णवांची स्तुति.

॥ ४९० ॥ हरिनामाचा ऐकोनि गजर ॥ पातकाचे भार पळालेरे ॥ १ ॥ आले आलेरे वीर वैष्णव गाढे ॥ राम नाम पुढें ब्रीद त्यांचें ॥ ध्रु० ॥ नामें दाटुगे वैष्णव गाढे ॥ यम तयांपुढें हात जोडी ॥ २ ॥ रामनामें रंगीं देताती आरोळी ॥ पातकाची होळी स्वयें झाली ॥ ३ ॥ नामाचेनी

बळें लोटले ते पुढें ॥ प्रणवाचे कडे चढिन्नलें ॥ ४ ॥ वैष्णव वीरी आपुला अंगोवांगी ॥ वैकुंठासी लागीं लावियेली ॥ ५ ॥ टाळ घोळ मुखीं नामाचे ते घोष ॥ पळाले यमदूत घेउनी धाक ॥ ६ ॥ एकाजनार्दनीं रामनाम-घोष ॥ त्रैलोक्याचे दोष निर्दाळीले ॥ ७ ॥

॥ ४९१ ॥ नाम गर्जती उद्धट ॥ वैष्णव एकुलता एकट ॥ १ ॥ यम ह्मणे चला चला ॥ आला वैष्णवांचा घाला ॥ २ ॥ शंख चक्र ज्या हत्यार ॥ तो धरिला चक्रधर ॥ ३ ॥ जो पाताळीं घालूं गेला ॥ तोचि द्वारपाळ केला ॥ ४ ॥ भेणें भरला दाहि दिशा ॥ तरी आकळिला कैसा ॥ ५ ॥ वैष्णव जाणोनी माधाडे ॥ मेरुमशकीं सरिसे धेंडे ॥ ६ ॥ आतुर्बळी आतां लाग ॥ मुंगी पोटीं काढीत माग ॥ ७ ॥ माग काढिला निगुती ॥ मग धरिला सर्व-भूतीं ॥ ८ ॥ दूत ह्मणती धरिल्या वाटा ॥ धरुनीयां नेती वैकुंठा ॥ ९ ॥ जो न माये लोकीं तिहीं ॥ त्याचा घोट भरिला इहीं ॥ १० ॥ रोमरंध्रीं ब्रह्म घोळे ॥ तो गिळी लावुनी डोळे ॥ ११ ॥ अखंड लावुनी अनुसंधान ॥ केलें यमपाश छेदन ॥ १२ ॥ वैष्णव नामाचा घोक ॥ ओस पडला यम-लोक ॥ १३ ॥ वैष्णव नामाचा धाक ॥ भेणें बुजिला कुंभपाक ॥ १४ ॥ यम पळतां न फुटे वाट ॥ महाभूतांचे बुजिले घाट ॥ १५ ॥ एकाजनार्दनीं नाम ॥ वैष्णवा शरण रिघे यम ॥ १६ ॥

॥ ४९२ ॥ शस्त्रें न तुटे प्रल्हाद ॥ वाचे घेतलासे छंद ॥ १ ॥ ह्मणे हरि गोविंद हरी ॥ ध्यान लागलें अंतरीं ॥ २ ॥ हरि गोविंद स्मरतां सुख ॥ विष घेतां न मनीं दुःख ॥ ३ ॥ हरि गोविंद भरला अंगीं ॥ प्रल्हाद न पोळे सर्वांगीं ॥ ४ ॥ हरि गोविंद झाला खांब ॥ खांबीं प्रगटला स्वयंभ ॥ ५ ॥ एकाएकीं जनार्दनीं ॥ हरि गोविंद ध्यानीं मनीं ॥ ६ ॥

॥ ४९३ ॥ तुह्मी पावाल पंढरिशीं ॥ निरोप सांगावा सखयासी ॥ मी तंव आहे पायापाशीं ॥ भेटि अखंड अहर्निशीं ॥ १ ॥ तरी म्यां कोठुनी जी यावें ॥ परतोनी कोठें जावें ॥ ध्रु० ॥ तुमच्या उच्छिष्टाचें शेष ॥ सांडा तेथें माझें सुख ॥ तुह्मा माघारिल रंक ॥ श्वान सुकर मज लेखा ॥ २ ॥ तुमची झाडतां रंगणी ॥ तें मी झालों केरसुणी ॥ तुमचे दासिचाही चरणीं ॥ डिंगर होउनी लुंठतसे ॥ ३ ॥ तुमचें चरणतीर्थ पडे ॥ तेथें नित्य वाडें

कोडें ॥ लडिवाळ तुमचे कडे ॥ मागेंपुढें मज पहा ॥ ४ ॥ संतचरणींच्या पादुका ॥ जनार्दनीं झाला एका ॥ चुकवावया भव कंटका ॥ सज्जन देखा वागविती ॥ ५ ॥

॥ ४९४ ॥ सर्वांगीं सुवास परी तो उगला न राहे ॥ सभोंवते तरुवर चंदन करिताचि जाये ॥ १ ॥ धणी धाय परी त्याची भूक न धाये ॥ सागरीं भरितें परी सरिता न समाये ॥ २ ॥ वैरागरमणी पूर्ण तेजाचा होय ॥ भेटले हरळ हिरे करितचि जाय ॥ ३ ॥ एका जनार्दनीं पूर्ण झालास निज ॥ आपणासारिखें परी सा करितसे दुजें ॥ ४ ॥

॥ ४९५ ॥ पांडवाचे गृहीं जाण ॥ असंख्य जेविले ब्राह्मण ॥ धर्माचें विस्मित मन ॥ संख्ये लागी ॥ १ ॥ तें कळलें वैकुंठा ॥ निर्मिली तेव्हां घंटा ॥ तेव्हां ते गर्जे देखा ॥ संख्यानाद ॥ २ ॥ तेथें व्यासदेवाचा सुत ॥ शुकदेव अवधूत ॥ ब्राह्मण शेष व्हावें प्राप्त ॥ ह्मणोनी येता जाहला ॥ ३ ॥ रात्र समयीं सुखी येकीं ॥ शीत घातलें मुखीं ॥ घंटानाद सकळीकीं ॥ ऐकिला कानीं ॥ ४ ॥ कृष्ण पाहे ध्यानीं ॥ शुकदेव आणिला धुंडोनी ॥ पूजा नमस्कार करुनी ॥ गेलासे वना ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं जाण धर्में केला प्रश्न ॥ तोचि सखा श्रीकृष्ण सांगतसे ॥ ६ ॥

॥ ४९६ ॥ ऐसी शांति ज्यासी आहे ॥ त्याचे घरीं देव राहे ॥ १ ॥ हा तो अनुभव मनीं ॥ पहा प्रत्यक्ष पुराणीं ॥ २ ॥ धर्मा घरीं वसे ॥ अर्जुनाचे रथीं बैसे ॥ ३ ॥ अंकीत दासाचा होय ॥ एकाजनार्दनीं देव ॥ ४ ॥

॥ ४९७ ॥ कायीक वाचीक मानसीक ॥ सदा वसे राम एक ॥ १ ॥ तो नर अथवा नारी ॥ हो कां पतीत दुराचारी ॥ २ ॥ सदा वसे राम ध्यानीं ॥ आणीक कांहीं नाहीं मनीं ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं मनीं ॥ राम पाहे मनीं ध्यानीं ॥ ४ ॥

॥ ४९८ ॥ अज्ञानी विश्वासें साधुसी वंदी ॥ ज्ञानीया तो सदा तया निंदी ॥ १ ॥ ऐशी उभयतांची क्रिया ॥ पहातां चर्या येकची ॥ २ ॥ वंदूं निंदूं कोणी ऐसा एक भाव ॥ तेथें तो देव वसे सदा ॥ ३ ॥ ज्ञान अज्ञानाचा निवाडा होय ॥ एका शरण जनार्दनीं जाय ॥ ४ ॥

॥ ४९९ ॥ स्वप्नीं दिसे सर्वेचि नासे ॥ तैसें काल्पनिक जग भासे

॥ १ ॥ मुळींच मिथ्या मृगजळ ॥ त्यामाजीं नसे शीतळ जळ ॥ २ ॥ पिंपळावरुनी मार्गु आहे ॥ ऐकोनी वृक्षा वेंघों जाये ॥ ३ ॥ ऐसे अभागी पामर ॥ नकळे तयांसी विचार ॥ ४ ॥ ह्मणोनी शरण जनार्दनीं ॥ एका जनार्दनीं एकपणीं ॥ ५ ॥

॥ ५०० ॥ नवल रोग पडिपाडू ॥ गोड परमार्थ झाला कडू ॥ १ ॥ विषय व्याधीचा उफाडा ॥ हरिकथेचा घ्यावा काढा ॥ २ ॥ ऐसा रोग देखोनी गाढा ॥ एकाजनार्दन धांवे पुढा ॥ ३ ॥

---

## सगुण स्वरूप.

॥ ५०१ ॥ साधितां साधन योगी शिणताती ॥ तेथें तुझी मति काय बापा ॥ १ ॥ उलट पालट न करी गोल्हाट ॥ आहे तोचि नीट पाहे बापा ॥ २ ॥ पंचाग्नी साधन धूम्रपान यज्ञ ॥ आहे तो संपूर्ण उभा बापा ॥ ३ ॥ साधन खटपट वाउगा बोभाट ॥ एकाजनार्दनीं नीट उभा बापा ॥ ४ ॥

॥ ५०२ ॥ अष्टांग योग साधिती साधनीं ॥ तो हरि कीर्तनीं नाचे बापा ॥ १ ॥ यज्ञादिकीं अवदान नेघे वो माये ॥ तो उभा राहुनी क्षीराप्रती खाये ॥ २ ॥ पवन कोंडोनी योगी जाती निराकारीं ॥ तो हरि धर्माघरीं पाणी वाहे ॥ ३ ॥ सनक सनंदन जया ध्याताती आवडी ॥ तो अर्जुनाचीं घोडीं धुतो हरी ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं भक्ताचा अंकीत ॥ ह्मणोनी तिष्ठत विटेवरी ॥ ५ ॥

॥ ५०३ ॥ अनंताचे गुण अनंत अपार ॥ न कळेचि पार श्रुतिशास्त्रा ॥ १ ॥ तो हा महाराज विटेवरी उभा ॥ लावण्याचा गाभा शोभतसे ॥ २ ॥ कटीवरी कर ठेवी जगजेठी ॥ पाहे कृपादृष्टि भक्ताकडे ॥ ३ ॥ पुंडलीकाचे तेजें जोडलासे ठेवा ॥ एकाजनार्दनीं सेवा देई देवा ॥ ४ ॥

॥ ५०४ ॥ ॐकार स्वरूप सद्गुरु असंग ॥ अक्षय अभंग पांडुरंग ॥ १ ॥ नसे ज्याचे ठायीं द्वैताद्वैत भाव ॥ ब्रह्म स्वयमेव पांडुरंग ॥ २ ॥ मस्तक हें माझें तयाचे चरणीं ॥ असे जनीं वनीं पांडुरंग ॥ ३ ॥ सदसद्भाव हे नसती ज्याचे ठायीं ॥ नित्य तो मी गाई पांडुरंग ॥ ४ ॥ गुरुराज माझा दीनाचा दयाळ ॥ तोडी मायाजाळ पांडुरंग ॥ ५ ॥ रवि शशी दीप्ति जेणें प्रका-

शती ॥ तो हा तेजमूर्ति पांडुरंग ॥ ६ ॥ वेद जयालागीं नित्य वाखाणिती ॥ तो हा वेदमूर्ति पांडुरंग ॥ ७ ॥ श्रीमान हा माझा सद्गुरु समर्थ ॥ देई मोक्ष स्वार्थ पांडुरंग ॥ ८ ॥ पांचा भूतांची जो करितो झाडणी ॥ तो हा ज्ञान-खाणी पांडुरंग ॥ ९ ॥ डुरकणी देई मोहपंचानन ॥ करी त्या हनन पांडु-रंग ॥ १० ॥ रंगे चित्त माझें तयाच्या स्वरूपीं ॥ असे आपआपीं पांडुरंग ॥ ११ ॥ गर्व अभिमान सोडावा समूळ ॥ भेटे तो दयाळ पांडुरंग ॥ १२ ॥ महामाया एके क्षणांत निरसी ॥ सुखाचीं पैं राशी पांडुरंग ॥ १३ ॥ हाव ही धरी जो सद्गुरुपायाची ॥ इच्छा पुरवी त्याची पांडुरंग ॥ १४ ॥ राजा त्रैलोक्याचा गुरुराज स्वामी ॥ वसे अंतर्यामीं पांडुरंग ॥ १५ ॥ जाया पुत्र धन तयासी अर्पील ॥ सर्वस्वें रक्षील पांडुरंग ॥ १६ ॥ यमाची जाचणी तयासी चुकली ॥ गुरुमूर्ति भेटली पांडुरंग ॥ १७ ॥ प्रभा हे जयाची पस-रली जनीं ॥ चिद्रूपाची खाणी पांडुरंग ॥ १८ ॥ भूतळीं या नसे दुजा कोणी ऐसा ॥ भक्ताचा कोवसा पांडुरंग ॥ १९ ॥ नेई भक्तासी जो आपल्या समीप ॥ तो हा मायबाप पांडुरंग ॥ २० ॥ इतिकर्तव्यता हीच दासा लागी ॥ सेवावा हा जगीं पांडुरंग ॥ २१ ॥ तिकडी सांखळी त्रिगुणांची तोडी ॥ भवांतूनि काढी पांडुरंग ॥ २२ ॥ उपमा तयासी काय देऊं आतां ॥ सकळार्थ दाता पांडुरंग ॥ २३ ॥ परोपकारालागीं अवतार केला ॥ आनं-दाचा झेला पांडुरंग ॥ २४ ॥ नाम हें तयाचें जन्ममरण वारी ॥ भक्ता साहाकारी पांडुरंग ॥ २५ ॥ मन हें जडलें तयाचिया पदीं ॥ उतरी भवनदी पांडुरंग ॥ २६ ॥ काया वाचा मनें स्वरूपीं रहावें ॥ नाम आठवावें पांडु-रंग ॥ २७ ॥ यम नियम साधी साधन अष्टांग ॥ होईल सर्वांग पांडुरंग ॥ २८ ॥ एकाजनार्दनीं देह हारपला ॥ होउनी राहिला पांडुरंग ॥ २९ ॥

॥ ५०५ ॥ शाम सुरेख मनोहर भेक ॥ नैन बीन देख स्वरूप दिखावे ॥ १ ॥ लावण्य गुण कान्हा चैतन्यको भान ॥ चित्त समाधान अती प्रेम सुखावे ॥ २ ॥ सज्जन रतीरंग मुनीजन भृंग ॥ स्वसुखमय अंग अमीत गुण गावे ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं चिदानंदघन ॥ सगुण निर्गुण समान दिखावे ॥ ४ ॥

॥ ५०६ ॥ भिल्लणी बाळा वनीं वेंचितां फळा ॥ देखिला राम रावो ठक पडिलें डोळा ॥ १ ॥ गोडणी सोहं मार्गीं गीतीं गाती रामा ॥ आनंदें

नाचती दृष्टी देखोनी रामा ॥ २ ॥ देखोनी राम रावो कैसा जाला भावो ॥ सेवितां कंदमुळें आम्हा दिसतो देव ॥ ३ ॥ सफळिता तरुवरीं साचें राम आभासे ॥ पहा जनीं वनीं अवघा रामचि दिसे ॥ ४ ॥ चारा हरवेठी बोरां भरुनीया पाटी ॥ फळामाजीं फळ राम सफळीत दृष्टी ॥ ५ ॥ आसनीं शयनीं आम्हा आणीक बोधू ॥ एकाजनार्दनीं गोड लाविला वेधू ॥ ६ ॥

॥ ५०७ ॥ देह निशा क्रमोनी मी तंव आलीये ॥ इहीं वैष्णवीं आणिले पंढरीये ॥ १ ॥ बाई येवो मज ध्यान लागलें पंढरीचें ॥ तें तंव जाग्रतीं स्वप्नीं नवचे ॥ २ ॥ नयन नाचती सुखाचा हा गोंधळू ॥ साचे सन्मुख देखोनी श्रीविठ्ठलू ॥ ३ ॥ आनंदु आसमाय होती मना पोटीं ॥ नवल वाळभीं विठ्ठलीं झाली भेटी ॥ ४ ॥ मी आन न देखें वो नाइकें कर्णीं ॥ ठसा ठसावला अभिन्नपणीं वो ॥ ५ ॥ जनीं नसतां संचारु झाला देखा ॥ एकाजनार्दनीं धरिला येकीयेका वो ॥ ६ ॥

॥ ५०८ ॥ सन्मुख देखोनीया भेटी धांवा ॥ तंव दश दिशा उचलल्या खेवा ॥ १ ॥ आतां नवल भेटी दैव ॥ पुढें आलिंगितां सर्वांगीं खेव ॥ २ ॥ आलिंगनीं गगन लोपे ॥ खेव देतां गगन हारपे ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं भेटी भावो ॥ जिण्या मरण्या नुरेचि ठावो ॥ ४ ॥

॥ ५०९ ॥ पहातां पहातां वेधलें मन ॥ जालें उन्मन समाधिस्था ॥ १ ॥ ऐसा परब्रह्म पुतळा देखिलासे डोळा ॥ पाहिला सांवळा डोळेभरी ॥ २ ॥ तनु मन वेधलें तयाचे चरणीं ॥ शरण एका एकपणें जनार्दनीं ॥ ३ ॥

॥ ५१० ॥ आजी नवल झालें वो माये ॥ पाहण्या पाहणें दृष्टि धाये ॥ १ ॥ ऐसा लाघवी सुखकर मूर्ती ॥ संतसंगें जाली मज विश्रांती ॥ २ ॥ योगीश्वर जया चिंतिती ॥ सनकादिक जया ध्याती ॥ ३ ॥ योगसाधनें नातुडे जो माये ॥ एकाजनार्दनीं कीर्तनीं नाचतु आहे ॥ ४ ॥

॥ ५११ ॥ सद्गदीत कंठ बाष्प पैं दाटत ॥ जया भेटीलागीं हृदय फुटत ॥ १ ॥ तो देखिला वो तो देखिला ॥ सबाह्य अभ्यंतरीं व्यापुनिया राहिला ॥ २ ॥ सबराभरीत भरूनी पंढरीये उभा ॥ सभोंवतीं दाटी संतांची शोभा ॥ ३ ॥ ऐसा लावण्य पुतळा देखिला दृष्टी ॥ एकाजनार्दनीं सुख न समाये सृष्टी ॥ ४ ॥

॥ ५१२ ॥ आजी नीळवर्ण कुसुम सम ॥ देखला मेघश्याम विटेवरी ॥ १ ॥ असती कुसुम रंग रंगला श्रीरंग ॥ भोंवता शोभे संग संतजन ॥ २ ॥ नीळिमा भासत तो रंग दिसत ॥ शामांकित शोभत विठ्ठल देव ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं नीळवर्ण रूपडें ॥ पाहतां चहूंकडे कोंदाटलें ॥ ४ ॥

॥ ५१३ ॥ जंघन प्रमाण दावीत श्रीअनंत ॥ यारे यारे ह्मणत भेटावया ॥ १ ॥ आवडीची धणी घ्यारे प्रेमभावें ॥ संतचरणा द्यावें आलिंगन ॥ २ ॥ कट धरुनी करीं समची पाउलीं ॥ उभा वनमाळी भक्तासाठीं ॥ ३ ॥ जीवींचें जीवन मनाचें मोहन ॥ सगुण हें ध्यान भक्तिकाजा ॥ ४ ॥ रूपाचें रूपस निर्गुणा वेगळें ॥ पहातां तो संतमेळे उभा असे ॥ ५ ॥ विटे नीट उभा आनंदाचा कंद ॥ पाहतां परमानंद सुख वाटे ॥ ६ ॥ एकाजनार्दनीं भक्ताचिया काजा ॥ उभारुनी भुजा वाट पाहे ॥ ७ ॥

॥ ५१४ ॥ सोहं सोहं यापरतें प्रमाण ॥ जंघन सघन विटेवरी ॥ १ ॥ भीवरासंगम पुंडलीक दृष्टी ॥ सम कर कटी उभा हरी ॥ २ ॥ वेदाचें जन्मस्थान विश्रांती पैं मूर्ति ॥ त्रैलोक्यकीर्ति विजयध्वज ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं पुराणांसी वाड ॥ पुरवितसे कोड भाविकांचें ॥ ४ ॥

॥ ५१५ ॥ नेणतीयासी नेणता तो सान ॥ जाणतीया जाणपण धरुनि ठेला ॥ १ ॥ योगीयांचें मांदुस सज्जनांचें स्थळ ॥ श्रम तो केवळ पाहतां जाय ॥ २ ॥ जाणते नेणते येती बरवे परी ॥ दरुशनें उद्धरी जड जीव ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं सगुण निर्गुण ॥ जाणता नेणता सर्व आपणचि जाण ॥ ४ ॥

॥ ५१६ ॥ अकार उकार मकारां परता सर्वेश्वर ॥ कटी धरुनी कर उभा विटे ॥ १ ॥ नीरा भीवरा संगम पुंडलीक मुनी ॥ नारद वेणु नाद ऐसें स्थळ लक्षुनी ॥ २ ॥ योगीया हृदयींचें ठेवणें गोमटें ॥ जोडलें उद्धटें पुंडलीका ॥ ३ ॥ आषाढी कार्तिकी आनंद सोहळा ॥ संतांचा मेळा घनवट ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं जनार्दन एकपणीं ॥ त्रैलोक्याचा धनी विटेवरी ॥ ५ ॥

॥ ५१७ ॥ सुखें सुख सोज्वळ पाहतां दृष्टी ॥ आनंदी आनंदमय तेणें सृष्टी ॥ १ ॥ देखिला देखिला वैष्णवांचा रावो ॥ देवादि देवो श्रीविठ्ठल ॥ २ ॥ गोपाळ गजरीं नाचती आनंदें ॥ लीलाविनोदें प्रेमरसें ॥ ३ ॥

भावाचा अंकित उगा राहे उभा ॥ धन्य त्यासी शोभा काय वानूं ॥ ४ ॥ पाहतां पाहतां मन धालें सृष्टी ॥ जनार्दनाचा एका परमानंदें पोटी ॥ ५ ॥

॥ ५१८ ॥ सलील कमलदलाक्ष राजीवलोचनू ॥ परे परता पाहतां निवे आमुचें मनू ॥ १ ॥ कान्हया परम गोजरी कान्हया परम गोजरीया ॥ धृ० ॥ तनु मन वेधलें चित्त विगुंतलें ॥ पाहतां पाहतां मना समाधान झालें ॥ २ ॥ ऐसा कमलगर्भींचा कंदु उभा परमानंदू ॥ एकाजनार्दनीं वेधू मज लागे माय ॥ ३ ॥

॥ ५१९ ॥ कमलदलाक्ष गोपी जीवन लक्ष ॥ तो अलक्षा न बैसे लक्ष तो देखिला वो ॥ १ ॥ मन मृग आमुचा वेधोनि गेला ॥ पाहतांचि डोळा श्रीकृष्ण ॥ २ ॥ सहजची आवडी पाहतां समदृष्टी ॥ वेधोनी गेली सृष्टि पाहतां गे माय ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं परात्पर शोभला ॥ तेणें मज वेधें वेध लाविला गे माय ॥ ४ ॥

॥ ५२० ॥ आगमीं निगमीं पाहतां तो सुगमी ॥ वेदादिकां दुर्लभ आम्हा तो सुगमी ॥ १ ॥ नवचे वाचे बोल बोला तो वेगळा ॥ व्यापुनी ब्रह्मांडीं आहे तो उगला ॥ २ ॥ सार मथित काढोनी चैतन्य गाभा ॥ पाहतां दिसे त्याची अनुपम्य शोभा ॥ ३ ॥ सांकडें नव्हे भेटी जातां लव-लाहे ॥ उभारुनी बाह्या आलिंगिलाहे ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं सर्व सारांचें सार ॥ उभा विटेवर परब्रह्मनिर्धार ॥ ५ ॥

॥ ५२१ ॥ सर्वसुखाची उघडली खाणी ॥ श्रीमुख नयनीं पहातांची ॥ १ ॥ मोक्षसुख आम्हा नलगे गा देवा ॥ विश्रांतीसी ठेवा आणिकासी ॥ २ ॥ धन सुख मज कासया हे पोटी ॥ पाहिजे लंगोटी सर्व भावें ॥ ३ ॥ स्त्रीसुख संसार कासया वेरझार ॥ नको हा पसारा मज देवा ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं नाशिवंत सुख ॥ पहातां तुझें मुख इच्छा पुरती ॥ ५ ॥

॥ ५२२ ॥ खंडण मुंडण दंडण करुनी ध्याती रूप ॥ तें आम्हां सोपें झालें वर्णितां चिद्रूप ॥ १ ॥ तो देखिलावो देखिला वो ॥ पहातां पहाणें विसरून गेलें ठक पडलें सकळां त्रो ॥ २ ॥ नेति नेति शब्द भुलल्या वेडा-वल्या श्रुती ॥ आगमनिगमा न कळे चोज चित्तीं ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं सकळ ब्रह्म शोभा ॥ अनुपम्य उभा कर्दळीचा गाभा ॥ ४ ॥

॥ ५२३ ॥ गगनामाजीं तैसें शोभे तारांगण ॥ तैसा विटेवरी शोभे सम चरण ॥ १ ॥ देखतांचि मनां समाधाय ॥ आनंदी आनंद होय ध्यातां जया ॥ २ ॥ चतुर्भुज शंख चक्र ते शोभती ॥ गळां वैजयंती मिरवे शोभा ॥ ३ ॥ कासे पितांबर मेखळा झळाळ ॥ एकाजनार्दनीं भाळ पायावरी ॥ ४ ॥

॥ ५२४ ॥ घनश्याम मूर्ती नीळ वर्ण गाभा ॥ कैवल्याची शोभा शोभे बहू ॥ १ ॥ कस्तुरी मळवट चंदनाची उटी ॥ बाहुवटे कंठीं गोरेपणें ॥ २ ॥ एकाजनार्दनीं चरणींची शोभा ॥ अनुपम्य उभा भीमातटीं ॥ ३ ॥

॥ ५२५ ॥ आनंद अद्वय नित्य निरामय ॥ सांवळा भासताहे मजलागी ॥ १ ॥ वेधु तयाचा माझिया जीवा ॥ काया वाचा मनें भावा लागलासे ॥ २ ॥ वेधलेंसें मन झालें उन्मन ॥ देखतां चरण गोड वाटे ॥ ३ ॥ पहातां पहातां पारुषला जीव ॥ एकाजनार्दनीं देव कळों आला ॥ ४ ॥

॥ ५२६ ॥ धरितां श्रीहरीचें ध्यान ॥ समासी समाधान ॥ १ ॥ तो सोपा आह्मांलागीं ॥ उघडा पहा धन्य जगीं ॥ २ ॥ कीर्तनीं नाचतो भक्तामागें ॥ मन वेधिलें या श्रीरंगें ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं सुखाचि भेटी ॥ झालिया होय जन्म मरण तुटी ॥ ४ ॥

॥ ५२७ ॥ निर्गुणाची प्राप्ति सगुणाचे योगें ॥ वरी भक्ति अंगें दृढ-भाव ॥ १ ॥ नलगे ध्यान मौढी योग याग तपें ॥ ज्ञानाचिया बापें हाता नये ॥ २ ॥ पाहिजे समता सर्वां भूतीं भाव ॥ मुंगी आणि राव सारखेची ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं हेचि हातवटी ॥ देवा तुझी भेटी तरीच होय ॥ ४ ॥

॥ ५२८ ॥ अनन्य शरण विठोबासी निघाले ॥ ते जीवन्मुक्त झाले याचि देहीं ॥ १ ॥ देहीं याचि देवो विटेवरी पाहे ॥ सबाह्य उभा आहे कर कटीं ॥ २ ॥ कर कटीं उभा लावण्याचा गाभा ॥ श्रीमुखाची शोभा काय वानूं ॥ ३ ॥ कोटी रवि तेज वोवाळावें चरणीं ॥ एकाजनार्दनीं धन्य तोची ॥ ४ ॥

॥ ५२९ ॥ श्रीमुख साजिरें कुंडलें शोभती ॥ शंख चक्र हातीं पद्म गदा ॥ १ ॥ पीतांबर कासे वैजयंती कंठीं ॥ टिळक ललाटीं चंदनाचा ॥ २ ॥ मुगुट कुंडलें झळके पाटोळा ॥ घननीळ सांवळा विटेवरी ॥ ३ ॥ श्रीवत्सलांछन हृदयीं भूषण ॥ एकाजनार्दन तृप्त झाला ॥ ४ ॥

॥ ५३० ॥ शाम सुंदर मूर्ति विटेवरी साजिरी ॥ पाउलें गोजिरी कोंवळीं तीं ॥ १ ॥ ध्वज वज्रांकुश चिन्हें मिरवती ॥ कटी धरिले कर अनुपम्य शोभती ॥ २ ॥ ऐसा देखिला देव विठ्ठलू माये ॥ एकाजनार्दनीं सासी गाये ॥ ३ ॥

॥ ५३१ ॥ कर कटावरी वैजयंती माळा ॥ तो हरि डोळां देखियेला ॥ १ ॥ रूप सांवळें शोभे विटेवरी ॥ तो हरि डोळेभरी देखियेला ॥ २ ॥ एकाजनार्दनीं पहातां रूपडें ॥ त्रिभुवन थोकडें दिसतसे ॥ ३ ॥

॥ ५३२ ॥ उभा विटेवरी कट धरुनीया करीं ॥ पीतांबर साजिरी बुंथी शोभे॥ १॥ विठोबा विठोबा नामाचा हा छंद ॥ मन तें उब्दोध जडो पायीं ॥ २ ॥ त्रिअक्षर हें नाम जप हा परम ॥ तो मंगळधाम विठ्ठल माझा ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं विठ्ठल कानडा ॥ देखिला उघडा विटेवरी ॥ ४ ॥

॥ ५३३ ॥ उघडा विठ्ठल विटेवरी उभा ॥ अनुपम्य शोभा दिसतसे ॥ १ ॥ विटेवरी पाय जोडियेले सम ॥ तेंचि माझें धाम हृदयीं राहो ॥ २ ॥ एकाजनार्दनीं विठ्ठल सांवळा ॥ देखियेला डोळां विटेवरी ॥ ३ ॥

॥ ५३४ ॥ कानडा विठ्ठल कानडा विठ्ठल ॥ कानडा विठ्ठल विटेवरी ॥ १ ॥ कानडा विठ्ठल नामें बरवा ॥ कानडा विठ्ठल हृदयीं ध्यावा ॥ २ ॥ कानडा विठ्ठल रूपें सांवळा ॥ कानडा विठ्ठल पाहिला डोळा ॥ ३ ॥ कानडा विठ्ठल चंद्रभागेतटीं ॥ कानडा विठ्ठल पहावा उठाउठीं ॥ ४ ॥ कानडा विठ्ठल कानडा बोले ॥ कानड्या विठ्ठलें मन वेधियेलें ॥ ५ ॥ वेधियेलें मन कानडीयानें माझें ॥ एकाजनार्दनीं दुजें नाठवेची ॥ ६ ॥

॥ ५३५ ॥ नाठवेची दुजें कानड्यावांचुनी ॥ कानडा तो मनीं ध्यानीं वसे ॥ १ ॥ कानडा कानडा विठ्ठल कानडा ॥ कानडा कानडा विठ्ठल कानडा ॥ २ ॥ कानडीयाचा वेध मनीं तो कानडा ॥ कानडाची कानडा विठ्ठल माझा ॥ ३ ॥ एकपणें उभा कानडा विठ्ठल ॥ एकाजनार्दनीं नवल कानड्याचें ॥ ४ ॥

॥ ५३६ ॥ तीर्थ कानडें देव कानडे ॥ क्षेत्र कानडे पंढरीये ॥ १ ॥ विठ्ठल कानडें भक्त हें कानडें ॥ पुंडलीकें उघडें उभें केलें ॥ २ ॥ कानडीया देवा चाळविलें भक्तें ॥ कवतुकें तयातें उभें केलें ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं भक्ताचिया चाडा ॥ विठ्ठल कानडा विटेवरी ॥ ४ ॥

॥ ५३७ ॥ साक्षात्कार होतां ॥ साच बद्धता नुरे तत्वतां ॥ १ ॥ माझा होतां अनुभव ॥ कल्पनेसी नुरे ठाव ॥ २ ॥ माझे देखतां चरण ॥ संसारचि नुरे जाण ॥ ३ ॥ माझी भक्ति करितां ॥ दोष नुरेचि सर्वथा ॥ ४ ॥ सर्वा ठायीं मी वसें ॥ एकाजनार्दनीं भेद नसे ॥ ५ ॥

॥ ५३८ ॥ दुजेपणें पाहे तरी देवाचे चरण ॥ आणि तें नर्तन वैष्णवांचें ॥ १ ॥ कीर्तनीं नाचती हरिदास प्रेमें ॥ दुजेपणा नेमें हारुनी जाय ॥ २ ॥ एकाजनार्दनीं दुजेपणा टाकुनी ॥ वासुदेवचरणीं लीन होई ॥ ३ ॥

॥ ५३९ ॥ नेणतिया ठायीं पाहूं जाय देवा ॥ तों अवघेया केशवा व्यापियेलें ॥ १ ॥ नेणतपण गेलें जाणतपण हरपलें ॥ एकचि उरलें नाम साचें ॥ २ ॥ पहाता पहाणें पडियेलें ठक ॥ अवघाचि हरिख वोसंडला ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं पडियेलें ठक ॥ जाणतां नेणतां सर्वा भूतीं देख ॥ ४ ॥

॥ ५४० ॥ भूतमात्रा आकृति एकचि मूर्ती ॥ अवघा अंतर्गति व्यापुनी ठेला ॥ १ ॥ जळीं काष्ठीं स्थावर जंगम ॥ अवघा आत्माराम पूर्णपणें ॥ २ ॥ सायंप्रातर्मध्यान्ह नाहीं अस्तमान ॥ आणिक कारण नोहे दुजें ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं सबाह्य भरला ॥ भरुनी उरला पंढरीये ॥ ४ ॥

॥ ५४१ ॥ ध्यानाचें ध्यान ज्ञानाचें ज्ञान ॥ ते समचरण विटेवरी ॥ १ ॥ भावाचा तो भाव देवाचा तो देव ॥ वैकुंठींचा राव विटेवरी ॥ २ ॥ कामाचा तो काम योगीया विश्राम ॥ धामाचा तो धाम विटेवरी ॥ ३ ॥ वैराग्याचें वैराग्य मुक्ताचें माहेर ॥ तो देव सर्वेश्वर विटेवरी ॥ ४ ॥ भोळीयाचा भोळा ज्ञानीयाचा डोळा ॥ एकाजनार्दनीं सोहळा विटेवरी ॥ ५ ॥

॥ ५४२ ॥ योगीयाचा योग साधन तें चांग ॥ तो हा पांडुरंग विटेवरी ॥ १ ॥ मुमुक्षु संपदा ज्ञानीयाचा बांधा ॥ तो पांडुरंग बोधा विटेवरी ॥ २ ॥ सच्चिदानंदघन अमूर्त मधुसूदन ॥ एकजनार्दन विटेवरीं ॥ ३ ॥

॥ ५४३ ॥ जगासी भुलवणा भाविकाचें मन ॥ तो जनार्दन विटेवरी ॥ १ ॥ कामारी कामारी ऋद्धि सिद्धि घरीं ॥ तो परमात्मा श्रीहरि विटेवरी ॥ २ ॥ सनक सनंदन संपुष्टीं ध्याती ॥ ती अंतर्ज्योती विटेवरी ॥ ३ ॥ सांवळें सगुण विगुणाचें गुण ॥ एकजनार्दन विटेवरी ॥ ४ ॥

॥ ५४४ ॥ परब्रह्म पुतळा कौस्तुभ गळा ॥ वैजयंती माळा कंठीं

शोभे ॥१॥ शंख चक्र गदा पद्म शोभे करीं ॥ पीतांबरधारी चतुर्भुज ॥२॥ कटीं कडदोरा वाळे वांक्या पायीं ॥ सुंदर रूप कान्हाई शोभतसे ॥ ३ ॥ लेणीयाचें लेणें भूषण साजिरें ॥ एकाजनार्दनीं गोजिरे चरण दोन्ही ॥ ४ ॥

॥ ५४५ ॥ काया ही पंढरी आत्मा हा विठ्ठल ॥ नांदतो केवळ पांडुरंग ॥ १ ॥ भाव भक्ति भीमा उदक तें वाहे ॥ बरवा शोभताहे पांडुरंग ॥ २ ॥ दया शान्ति क्षमा हेंचि वाळुवंट ॥ मिळालासे थाट वैष्णवांचा ॥ ३ ॥ ज्ञान ध्यान पूजा विवेक आनंद ॥ हाची वेणुनाद शोभतसे ॥ ४ ॥ दश इंद्रियांचा एकमेळा केला ॥ ऐसा गोपालकाला होत असे ॥ ५ ॥ देहीं देखिली पंढरी जनीं वनीं ॥ एकाजनार्दनीं वारी करी ॥ ६ ॥

॥ ५४६ ॥ योगी ध्याती जया चिंतिती मानसीं ॥ तो हृषीकेशी पंढरीये ॥ १ ॥ जाऊं लवलाहें पाहुं पैं चरण ॥ क्षेम आलिंगन देऊं सुखें ॥ २ ॥ एकाजनार्दनीं पाहातां रूपडें ॥ ब्रह्म फाडोवाडें विटेवरी ॥ ३ ॥

॥ ५४७ ॥ नमाये ध्यानीं योगीया चिंतनीं ॥ नाचतो कीर्तनीं संतापुढें ॥ १ ॥ डोळियाची धणी फिटली पारणी ॥ उभा तो सज्जनीं पंढरीये ॥ २ ॥ एकाजनार्दनीं देखियेला डोळां ॥ परब्रह्म पुतळा बाईये वो ॥ ३ ॥

॥ ५४८ ॥ मन माझें वेधलें मन माझें वेधलें ॥ पहातां भलें सच्चिदानंद ॥ १ ॥ आनंदीं आनंद मनासी पैं झाला ॥ देखिला सांवळा पांडुरंग ॥ २ ॥ एकाजनार्दनीं उघडाची देखिला ॥ आनंद तो झाला मनीं माझ्या ॥ ३ ॥

॥ ५४९ ॥ सर्व देशीं सर्व जीवीं तो हरी ॥ सर्वांठायीं सर्व भावें सर्व मुरारी ॥ १ ॥ सर्व गांवीं सर्व रूपीं भरुनी उरला ॥ सर्वव्यापक सर्व भूतीं तो व्यापला ॥ २ ॥ सर्व आदि सर्व अंतीं सर्वीं सर्व भावो ॥ एकाजनार्दनीं देखा देवाधिदेवो ॥ ३ ॥

॥ ५५० ॥ मूर्ति चतुर्भुज वेल्हाळ ॥ शंख चक्र गदा कमळ ॥ १ ॥ मुगुट शोभे कटीं मेखळा ॥ कासे मिरवे सोनसळा ॥ २ ॥ कौस्तुभ वैजयंती माळ ॥ आकर्ण नयन विशाळ भाळ ॥ ३ ॥ ऐसा सुंदर सांवळा ॥ एकाजनार्दनीं पाहे डोळां ॥ ४ ॥

॥ ५५१ ॥ ज्ञान अभिमान विश्वामित्रा ॥ रंभे मागें झाला कुत्रा ॥ १ ॥ ज्ञानाभिमान दुर्वासासी ॥ ह्मणोनी शापी अंबऋषी ॥ २ ॥ ज्ञानाभिमान

ब्रह्मीयासी ॥ ह्मणोनी चोरिलें गाई वत्सांसी ॥ ३ ॥ ज्ञानाभिमान नको देवा ॥ एकाजनार्दनीं देई सेवा ॥ ४ ॥

॥ ५५२ ॥ चतुर्भुज साजिरी शोभा ॥ चिन्मात्र साकार गाभा ॥ १ ॥ शंख चक्र गदा कमळ ॥ कासे पीतांबर सोज्वळ ॥ २ ॥ मुगुट कुंडलें मेखळा ॥ श्रीवत्स शोभे वक्षस्थळां ॥ ३ ॥ निर्गुण सगुण ऐसें ठाण ॥ एकाजनार्दनीं ध्यान ॥ ४ ॥

॥ ५५३ ॥ अश्वीं अश्वाकार गजीं गजाकार ॥ मज देही निराकार तोचि जाला ॥ १ ॥ नकळे कवणा अनुभवाच्या खुणीं ॥ सद्गुरु वांचोनी जाणा बोध नव्हे ॥ २ ॥ अश्वीं अश्वाकार असे पैं गवला ॥ माझिया कपाळा निराकार ॥ ३ ॥ तें कपाळ खुंटलें आसते देह आटले ॥ तें संधि भेटलें आत्मबिंब ॥ ४ ॥ देह आत्मबिंब कीं आत्मबिंब देह शोभा ॥ आकाशीच्या कुंभा तैसें झालें ॥ ५ ॥ एकाजनार्दना शरण त्याची कृपा परिपूर्ण ॥ निर्गुणि सगुण कोंदलासे ॥ ६ ॥

॥ ५५४ ॥ भक्त रागेला तवके ॥ देव फोडूनि केले कुटके ॥ धृ० ॥ कटकट मूर्ति मागुती घडा ॥ मेण लाउनि कुटके जडा ॥ १ ॥ जो न तुटे न जळे कधींही न मोडे ॥ त्या देवाचे केले तुकडे ॥ २ ॥ रांडवा ह्मणती आगे आई ॥ कैसा देव फोडिला पाही ॥ ३ ॥ देवो सर्वांगीं झाला सांग ॥ परी नाकचि नाहीं चांग ॥ ४ ॥ करणीयेचा देव फुटला ॥ तंव भक्ताचा भावो तुटला ॥ ५ ॥ शेंदुरें माखुनि ठेविला धोंडा ॥ आड पडति पोरें रांडा ॥ ६ ॥ एकाजनार्दनु भेटे ॥ मूर्ति फुटल्या देवो न फुटे ॥ ७ ॥

॥ ५५५ ॥ कृश सुंदरपण शरीरधर्म जाण ॥ आत्मा तो आपण साक्षी याचा ॥ १ ॥ अंध मुक बधिर इंद्रियांचे धर्म ॥ त्याहुनी आत्माराम वेगळाची ॥ २ ॥ क्षुधा तृषा जाण विभागीती प्राण ॥ आत्मा तो आपण साक्षी यांचा ॥ ३ ॥ सुख दुःख संयोग मनाचा प्रसंग ॥ त्याहुनी श्रीरंग वेगळाची ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं देहासी संबंध ॥ धराया भेद ठाव नाहीं ॥ ५ ॥

॥ ५५६ ॥ विषय केवळ बंधन ॥ ऐसें बोलती सज्ञान ॥ परि त्या विषयाचें अवसान ॥ नकळे कोणा ॥ १ ॥ विषयाचें गोडपण ॥ गोडचि

ब्रह्मपूर्ण ॥ इंद्रिया भोक्तेपण ॥ चैतन्य स्थिती ॥ २ ॥ विषयां विषयस्थिती ॥ चैतन्या चैतन्यशक्ती ॥ येऱ्ही इंद्रियें जाती ॥ थोटाउनी ॥ ३ ॥ इंद्रियाचें चळण ॥ परब्रह्म पूर्ण ॥ विषय गोडपण ॥ परमानंदें ॥ ४ ॥ प्रेत देहाचे ठाई ॥ इंद्रीयें असती पाही ॥ चेतनेवीण नाहीं ॥ चळण तया ॥ ५ ॥ चेतना चैतन्य पूर्ण ॥ निश्चयेसी जाण ॥ इंद्रियें सचेतन ॥ चिदानंदें ॥ ६ ॥ इंद्रियें केवळ जडें ॥ त्यासी विषय सुख केवी घडे ॥ ते चेतना चैतन्य पाडें ॥ भोगिती भोगू ॥ ७ ॥ इंद्रियाचें चळण ॥ केवळ चैतन्य जाण ॥ एकाजनार्दनीं विषयो ॥ चैतन्य घन ॥ ८ ॥

॥ ५५७ ॥ होता भूताचें वर्तन ॥ पृथ्वी अखंड दंडायमान ॥ भूतीं विषयपण ॥ नेणें धरा ॥ १ ॥ जीवन सकळां जीवन सकळां जीवनीं ॥ निजांगें निववी भूत भेद पदवी जीवनीं नाहीं ॥ धृ० ॥ भूतीं भेद अभेद ॥ तूंचि कां मानिसी भेद ॥ भेदें परमानंद ॥ नाहीं केला ॥ ३ ॥ भेदाचें भेदभान ॥ तेंचि तुझें अज्ञान ॥ अभेदीं ब्रह्मज्ञान ॥ सहजें नांदे ॥ ४ ॥ सूर्याचें निज तेज ॥ सर्वत्र सम सहज ॥ भूत भेदाचें अवेवज ॥ तेंही नाहीं ॥ ५ ॥ प्राण सर्वत्र सम ॥ कदा नव्हे विषम ॥ भेदाचें रूप नाम ॥ वायु नेणें ॥ ६ ॥ आकाश चराचरीं ॥ सम सबाह्य अंतरीं ॥ भूत भेदाची हे परी ॥ गगनीं नाहीं ॥ ७ ॥ देहो पांचभूतिक जाण ॥ तोही समसमान ॥ एकाजनार्दन ॥ मिथ्या भेदभान ॥ ८ ॥

॥ ५५८ ॥ एकला एक रवी ॥ उगवे गांवो गांवीं ॥ तेवी वस्तु जाणावी ॥ सकळ भूतीं ॥ धृ० ॥ मृत्तिकेचि गोकुळें केलीं ॥ नानाकारी पूजिलीं ॥ परि मृत्तिका ते संचली ॥ सकळ रूपीं ॥ १ ॥ निर्गुण निज चोखट ॥ तुज पाशीं प्रगट ॥ हृदयीं साक्षी स्पष्ट ॥ नित्य नांदे ॥ २ ॥ इंद्रियाची निज गती ॥ तेणेंचि चाले स्थिती ॥ सकळा गवाक्षां दिप्ती ॥ दीपें जेवी ॥ ३ ॥ सहज स्वयें आकाश ॥ तेंचि घटीं घटाकाश ॥ तरी नभीं नभ सावकाश ॥ जैसें तैसें ॥ ४ ॥ भूतभौतिक कर्म ॥ ठेवितां रूप नाम ॥ अरूप अनाम कैसें ॥ स्वयें सिद्ध ॥ ५ ॥ घटीं उदक पूर्ण भरलें ॥ तेणें घटाकाशनव्हें बोले ॥ तेवीं कर्मीं ब्रह्म संचलें ॥ अलिप्तपणें ॥ ६ ॥ घटें घटफूटे ॥ तेथें आकाश न फुटे ॥ देहकर्म आटे ॥ परि ब्रह्म न पालटे ॥ ७ ॥ रवि थील्लर प्रकाशीं सप्रभ ॥ तंव प्रभो दावी प्रतिबिंब ॥ सेखी थिल्लरी नाहीं प्रतिबिंब ॥ तैसा आत्मा ह्मणती देहीं ॥ ८ ॥ देही ना तो विदेही ॥ जन्ममरण पाही ॥

घृतांत घृताचे कण जेवी ॥ घृतेसी अभिन्न ॥ ९ ॥ जनीं जनार्दन तेवीं पाहे ॥ एकाजनार्दनीं एकपणें आहे ॥ अहमात्मा तेथें मूळ उपाधी ॥ समूळ मिथ्या ॥ १० ॥

॥ ५५९ ॥ जन्मा पूर्वीं जन चैतन्यमात्र ॥ जन्म पावल्या तो चिन्मात्र ॥ नाहीं नाम कर्म वर्ण गोत्र ॥ त्यासी वेद लावी कर्मतंत्र ॥ १ ॥ कैसें उपाय येती अपाय ॥ निज कल्पनातें तुझी माया ॥ धृ० ॥ ह्मणती घटाकाश मठाकाश ॥ परि ते अवघें एक आकाश ॥ तेवी जीवशीवनामीं विलास ॥ शेखीं अवघा पूर्ण परेश ॥ २ ॥ जागृति स्वप्न सुषुप्तीचा द्रष्टा ॥ तो मी देह ह्मणे कटकटा ॥ मृगजळीच्या बुडविती लाटा ॥ नावें घालुनि काढा पर तटा ॥ ३ ॥ तुझे मायेचें लक्षण ॥ निज कल्पना ते माया जाण ॥ जो निर्विकल्प संपूर्ण ॥ तोचि ब्रह्मीं ब्रह्म परिपूर्ण ॥ ४ ॥ देही ह्मणसी मी कोण ॥ तें मीपणचि ब्रह्म पूर्ण ॥ तेथें न रीघे अनुसंधान ॥ एका जनार्दना निज शरण ॥ ५ ॥

॥ ५६० ॥ देह तेंचि देव कर्म तेंचि ब्रह्म ध्यान धारणा हे मुख्य माईक ॥ थिजलें विघुरलें घृतीं घृतपणें सगुण निर्गुण दोन्ही एक ॥ धृ० ॥ शिव शिव शिव सहजीं सहज तूं देव ॥ प्राप्ती उपावो तोचि अपाव मुक्तिते अमुक्ति ॥ १ ॥ साधन तें बंधन अहमात्मा हाही उपाधी ॥ चळण तें चैतन्य जल्प तोचि जप बाधी ॥ २ ॥ विषय ते सहज समाधी ॥ जन जनार्दन हे दोन्ही वावो ॥ एकाजनार्दनीं ऐक्य ह्मणो तरी ॥ मुळींच भिन्नत्वासी नाहीं ठावो ॥ ३ ॥

॥ ५६१ ॥ अमृता परीस स्वादू ॥ गगनाहूनी मृदू ॥ रुपेंविण आनंदू ॥ दावियेला ॥ १ ॥ निर्गुण वेध कैसा लावियेला ॥ धृ० ॥ रविहुनि सोज्वळ चंद्रापरीस शितळ ॥ तेणें मज केवळ ॥ वेधियेलें ॥२॥ एका जनार्दना शरण ॥ त्याची कृपा परिपूर्ण ॥ काया वाचा मन ॥ तेणें बांधियेलें ॥ ३ ॥

॥ ५६२ ॥ ॐनमः श्रीराम सकळ ॥ निर्विकल्प निर्मळ ॥ देहारहित केवळ ॥ गुणातीत ॥ १ ॥ देशकाळ स्वभावा ॥ वेगळा तूं निरवयवा ॥ अखंड अघवा ॥ समान विषमीं ॥ २ ॥ योगपीठीचिया पिठा ॥ विभ्राजमान गोमटा ॥ भक्त कृपेचा वसौटा ॥ शोभे सुंदर राम ॥ ३ ॥ केवी पाहो यासी अंतीं ॥ पाहातीये दिठी ॥ देखतांची मिठी ॥ जडोनी ठेली ॥ ४ ॥ मागील नांव लोपे ॥ पुढील धांव टाके ॥ वांचा पारुषे ॥ वेव्हार सिद्धी ॥ ५ ॥

आपुलिया किळा ॥ विराजतु स्वयें लिळा ॥ अहं सोहं वेगळा ॥ प्रत्यक्ष रामु ॥ ६ ॥ अनुपम्य चरण पंकज ॥ शोभे सायुज्याचा ध्वज ॥ ऊर्ध्व रेखा सहज ॥ दावी ऊर्ध्व गतीतें ॥ ७ ॥ वज्रांकुश दोन्ही ॥ भक्त आह्मा लागुनी ॥ विपक्षीं अंकुशें ओढुनी ॥ वज्रें छेदी दासांचीं ॥ ८ ॥ अनंत सूर्याचीं किरणें ॥ जैसीं मिरवती पाळपणें ॥ त्यातें आणुनिया उणें ॥ सुरंगतळे ॥ ९ ॥ जैशा नभाचीया कळिका ॥ तैसी शोभा अंगोळिका ॥ घोटियाची वरवंका ॥ दृष्टीनु पडे ॥ १० ॥ बहुता विजुची प्रभा ॥ तैसी कळावियाची शोभा ॥ जानु चक्रीं उभा ॥ सूर्योलपे ॥ ११ ॥ पीतांबराची मालगटी ॥ चिदरत्न कटीसूत्र कटीं ॥ अनुहात क्षुद्र घंटी ॥ गर्जती दिशा ॥ १२ ॥ अनंत ब्रह्मांडा सांटोवा ॥ कीं विश्रांति सकळ जिवा ॥ ह्मणोनी दामोदर या नांवा ॥ आख्या झाली ॥ १३ ॥ तरी उदर तेंचि दामोदर ॥ गुण त्रिवळी सुंदर ॥ ब्रह्मांडाची मनोहर ॥ रोम रेखा ॥ १४ ॥ नाभी सखोल निर्मळ ॥ रजरंगे रातोत्पल ॥ सृष्टिकर्त्याची केवळ ॥ जेथ जन्मस्थान ॥ १५ ॥ हृदयीं संत जिव्हाळा सांग ॥ कीं रंगलें अंतरंग ॥ विप्रपादें दक्षिणांग ॥ मिरवी आपुलियाचा महिमा ॥ १६ ॥ सर्वांचे अंतरीं राम ॥ तो स्वयें विराजे मेघश्याम ॥ त्याची या हृदयींचा विश्राम ॥ जाणती योगी ॥ १७ ॥ मुनीजना कंठी ध्यानीं ॥ तैसा कंठीं कौस्तुभमणी ॥ मुक्तमणी तोचि बोलुनी ॥ एकावळी मुक्तांची ॥ १८ ॥ अष्टपत्री निर्मळ ॥ अंतरीं विकासीत कमळ ॥ तेंचि देखा सरळ ॥ कंठीं अम्लान माळा ॥ १९ ॥ अनन्य गतिची त्या वृत्ती ॥ तैसी रुळे वैजयंती ॥ पुंजाळल्या शोभती ॥ त्यावरी तुळसी माळा ॥ २० ॥ सत्यावरणाहुनि उदंड ॥ अति दीर्घ बाहुदंड ॥ तन्मयाचें कोदंड ॥ मिरवे सदा ॥ २१ ॥ दुजा करी निर्वाण ॥ चहु पुरुषार्थाचे बाण ॥ देह अहंकृति रावण ॥ निर्दळीत ॥ २२ ॥ जो काम क्रोधादिक दशवक्त्र ॥ वासना भुजा विचित्र ॥ तो निवटीला न लगता नेत्र ॥ देह त्रिकुटवासी ॥ २३ ॥ भक्ति वैराग्याचीं सुघटें ॥ कर्णी कुंडले उत्कटें ॥ तेज प्रकाशें उफराटें ॥ अंतरीं ज्याचें ॥ २४ ॥ आनंद विश्रांति आले ॥ कीं निवोनि सुख मुराले ॥ तेंचि साचे शोभले ॥ वदनबिंब निमासुरें ॥ २५ ॥ सा आनंद सागरींचे तरंग ॥ तैसे दशन सुरंग ॥ उभय अधरीं योग ॥ जीवात्मा जैसे ॥ २६ ॥ एकनिष्ठता मुनिवरा ॥ जैसा अनवछिन्न तैलधारा ॥ तैसे नासिक सुंदरा ॥ शोभे मुखकमळा ॥ २७ ॥ समूळ चैतन्याचें आळें ॥ तैसे विशाळ डोळे ॥ मनोगत सकळ एके काळें ॥ देखणें जें ॥ २८ ॥ श्रवणांत दीर्घता ॥ द्वैतदृष्टि सर्वथा ॥ नये

पै पाहता ॥ स्वभावो ज्याचा ॥ २९ ॥ नवल तेथीचें निरीक्षण ॥ कामासी करित कामान्य ॥ डोळया डोळे मोहन ॥ करूनि ठेला ॥ ३० ॥ गगनोदरीं देखा ॥ तैशा भवया सुरेखा ॥ या वदनेंदुचिया पीयूषा ॥ आर्त चकोर सेविती ॥ ३१ ॥ जैसें अधिष्ठान निज निर्मळ ॥ तैसें विस्तीर्ण कपाळ ॥ अखंड न खंडे त्रिकाळ ॥ तेंचि त्रिवळी लल्लाटीं ॥ ३२ ॥ संकल्पमृग वधिला लोभी ॥ काढिला सोहं मृगनाभी ॥ तोहि अर्पिला पद्मनाभीं ॥ त्रिपुंड्र भाळीं ॥ ३३ ॥ गजेंद्र दंताची भक्तफणी ॥ स्वभावें मस्तकीं धरुनी ॥ तया कुरळ केंश विचरुनी ॥ वीर गुंठीस विलासें ॥ ३४ ॥ तयावरी शुभ्र मनाची सुमनें ॥ गुंफोनी अनुसंधानें ॥ नभ निशानी ये ठेंगणें ॥ मस्तकीं बांधती ॥ ३५ ॥ वानू मुगुटाचा महिमा ॥ तरी तेथें न रिघे उपमा ॥ ऐसें देखोनी रघूत्तमा ॥ तटस्थ पडे ॥ ३६ ॥ ऐसी सकुमार सुंदर प्रतिमा ॥ देखुनि रामरूपीं रमा ॥ धांवियेली सकामा ॥ निष्कामा भोगूं ॥ ३७ ॥ रत्नी मिरवे कीळ ॥ कापुरीं परीमळ ॥ तैसी रामरूपीं केवळ ॥ शोभे शक्ती ॥ ३८ ॥ ते मूळ माया नेटकी ॥ सगुण झाली जानकी ॥ सस्मित अवलोकी ॥ आत्मारामू ॥ ३९ ॥ जैशा ओंकारीं मातृका ॥ तैसे तिन्ही बंधु देखा ॥ सच्चिद आनंद व्यापका ॥ जावळे जैसे ॥ ४० ॥ भवशत्रु घाती तो शत्रुघ्न ॥ आज्ञा पाळी तो लक्ष्मण ॥ भरत आनंद पूर्ण ॥ आत्मारामीं ॥ ४१ ॥ अनुभवाचा निगडा ॥ वज्र देही हनुमान गाढा ॥ सदा सन्मुख चहुकडां ॥ उभा असे ॥ ४२ ॥ सर्वां करीत रामनिरीक्षण ॥ करूनि अनन्यगति शरण ॥ तोचि बिभिषण जाण ॥ शरणागत पैं गा ॥ ४३ ॥ पहिलें त्वंपद वावो ॥ केला तत्पद लंकेचा रावो ॥ असि पदीं निर्वाहो ॥ अचळ स्थापनाचार्य ॥ ४४ ॥ ऐसें तत्पदीं त्वंपद मिळे ॥ स्मरण असि पदीं मावळे ॥ केलें अद्वितीय घननीळें ॥ आत्मे निरामें ॥ ४५ ॥ ऐसा सगुण निर्गुण अभेदू ॥ नांदताहे प्रसिद्धू ॥ तेथें धांवताही बोधू ॥ पांगुळाला ठाके ॥ ४६ ॥ जनार्दन चरणरजें ॥ सेवितां फिटलें भ्रांतीचें ओझें ॥ ह्मणोनी स्वानंदाची भोजें ॥ नाचती वाणी ॥ ४७ ॥ भानुदास कुळवल्ली ॥ परतोनी अधिष्ठाना वेली गेली ॥ एका जनार्दन फळीं ॥ फळला राम ॥ ४८ ॥

॥ ५६३ ॥ बरी ओळखी झाली आतां ॥ चित्त जडलें अच्युता ॥ १ ॥ आह्मा डंखूं आला काळ ॥ काळ झालासे कृपाळ ॥ २ ॥ नियमानियम सांडोनी दोन्ही ॥ आह्मी रत हरिकीर्तनीं ॥ ३ ॥ सर्वाभूतीं भगवद्भाव ॥

भूतमात्रीं असे देव ॥ ४ ॥ एका जनार्दनाचे पायीं ॥ द्वैत भावचि उरला नाहीं ॥ ५ ॥

॥ ५६४ ॥ येथुनी पाहे तेथवरी ॥ तंव तंव अवघा दिसे हरी ॥ १ ॥ आतां जाउनी कोठें पाहूं ॥ जेथें पाहूं तेथें देवू ॥ २ ॥ गिरीकपाटीं कंदरीं ॥ जिकडे पाहे तिकडे हरी ॥ ३ ॥ एका बैसला निरंजनी ॥ जनार्दन दिसे जनीं वनीं ॥ ४ ॥

॥ ५६५ ॥ निरसोनीया द्वैत ह्मणताती अद्वैत ॥ त्याहुनी अतीत स्वरूप तुझें ॥ १ ॥ जो अलक्षालक्ष परेचे पार ॥ जेथें वेदशास्त्रें मौनवलीं फार ॥ धृ० ॥ गिळूनी अज्ञान निखिल ह्मणती ज्ञान ॥ या उभयाहूनी भिन्न स्वरूप तुझें ॥ २ ॥ सच्चिदानंद प्रतिपादिती वेद ॥ त्याहुनी अगाध स्वरूप तुझें ॥ ३ ॥ निरसुनीया कर्म ह्मणती परब्रह्म ॥ त्याहुनी उत्तम स्वरूप तुझें ॥ ४ ॥ माया आणि ममत्व निरसुनी शुद्ध सत्व ॥ त्या सत्वाचें निजतत्व स्वरूप तुझें ॥ ५ ॥ पद आणि पिंड अभिन्न अखंड ॥ त्याहुनी उदंड स्व० ॥ ६ ॥ शुद्ध आणि सबळ ह्मणती केवळ ॥ त्याहुनी निर्मळ स्व० ॥ ७ ॥ ब्रह्म स्फुरे स्फुरण स्फुर्तीचें कारण ॥ त्या वरते जाण स्व० ॥ ८ ॥ एका जनार्दनीं एकपणातीत ॥ चित्ताचें अचित्त स्वरूप तुझें ॥ ९ ॥

॥ ५६६ ॥ लप लप लप ठायीं ॥ लपावया ठाव कोठेंची नाहीं ॥ १ ॥ कसी खेळो लपंडाइरे ॥ कान्हया कसी खेळों लपंडाइ रे ॥ धृ० ॥ सांदी कोंदी लपुनी बैसे ॥ जेथें लपे तेथें देखणा दीसे ॥ २ ॥ एका जनार्दनीं एकपणें लपाला ॥ कळीकाळा न कळत ठेला ॥ ३ ॥

॥ ५६७ ॥ अंगीं लागतें परी आढळेना ॥ जगीं बिंबलें परी दिसेना ॥ १ ॥ चित्त दुश्चित पाहीं ॥ आपो आप पडे ठायीं ॥ धृ० ॥ स्त्रवदे तों परी भेटेना ॥ नित्य चाखतों परी घोटेना ॥ २ ॥ नित्य सेवितों परि जाणेना ॥ एका जनार्दना विण बाणेना ॥ ३ ॥

॥ ५६८ ॥ पाहतां कंदर्पाच्या बापा ॥ आह्मीं नेणो पुण्यपापा ॥ १ ॥ केचें पाप कैचें पुण्य ॥ देह नामीं पडिलें शून्य ॥ धृ० ॥ शून्य ह्मणता विदुलें ॥ सहज विश्वाकार झालें ॥ २ ॥ ऐका शून्याचा विस्तार ॥ जनार्दनीं गगनाकार ॥ ३ ॥

॥ ५६९ ॥ मन हे भागया बोध सरवर चारा ॥ चरते चरते देखी नंद सुंदरा ॥ १ ॥ एकबार देखों नयनसुंही यामें पेटी ॥ देहबुद्धि जातसे अंतरें छोडते नहीं छुटी ॥ धृ० ॥ जिन्ने देखीया वोही देखणा आपेंआप बिसरा ॥ परदा च्यारो रह गया बोलना नहीं ठारा ॥ २ ॥ शब्द द्वैत वाहां यही सुखा कोण जाने ॥ एका जनार्दनीं दरयामें तरंग होके रहाने ॥ ३ ॥

॥ ५७० ॥ कल्पना अविद्या तेणें झाला जीव ॥ मायोपाधी शीव बोलीजे तो ॥ १ ॥ जीव शीव दोन्ही हरिरूप तरंग ॥ सिंधु तो अभंग नेणे हरी ॥ २ ॥ जें जें दृष्टि दिसे तें तें हरिरूप ॥ तयावीण ठाव देख रीता कोठें ॥ ३ ॥ वैकुंठ कैलासीं तीर्थ क्षेत्रीं देव ॥ अनंतासी अंत पाहतां नाहीं ॥ ४ ॥ आदि मध्य अंतीं अवघा हरि एक ॥ एकचि अनेक एक हरीं ॥ ५ ॥

॥ ५७१ ॥ ब्रह्मीं स्फुरे तें स्फुरण शुद्ध सत्वाचें लक्षण ॥ तूं तो लक्षीं लक्षातीत परिपूर्ण रे ॥ १ ॥ कान्हा सच्चिदानंद शब्द आरुतारे ॥ त्याही परता तूं निजानंदूरे ॥ धृ० ॥ जेथें नाहीं गुणागुण कार्यासी कारण ॥ तूं तो गुणी गुणातीत परिपूर्ण रे ॥ २ ॥ एकाएकी जनार्दनीं भेद भाष्य वचनीं ॥ तूं तो शब्दासी गिळोनी राहिलासरे ॥ ३ ॥

॥ ५७२ ॥ हम कांहां जाईगे परदेश बाबा ॥ आसनी भोजनी शयनी गमनी सबाह्य पूर्ण परेश बाबा ॥ धृ० ॥ बद्धता छुटी मुक्त भये ज्ञानसें अज्ञान बाबा ॥ बंध मुक्त दुवहु मिथ्या ब्रह्म सनातन बाबा ॥ १ ॥ जीवही शीव शीवही जीव नही भिन्न भेद बाबा ॥ एका जनार्दनीं एकरूप सहज स्वानंद-कंद है बाबा ॥ २ ॥

॥ ५७३ ॥ परेश महादेव सर्वें सर्वत्र सर्वदां एकीं ॥ एक महेश महादेव ॥ धृ० ॥ मन बुद्धि चित्त अहंकार ॥ या माजीं कोण ज्ञान सुख महादेव ॥ अहं ममता सांडणें हें ज्ञाता ज्ञान विशेष महादेव ॥ १ ॥ श्रवण नयन घ्राण रसना या माजीं कोण ज्ञान प्रमाण महादेव ॥ इंद्रिया आतित आपण देखिजे हें ज्ञानकारण महादेव ॥ २ ॥ जन वन जीवन निरंजन या माजीं कवणा करूं भजन महादेव ॥ एका जनार्दनू जन तो भजकां मोक्ष दाता महादेव ॥ ३ ॥

॥ ५७४ ॥ किबले खुदा खडे ॥ बाजे रोख क्या खाली पडे ॥ धृ० ॥ जीधर देखु तिधर धनी ॥ निमाज किधर है करनी ॥ १ ॥ अल्ला कहु तो तीर पैसे ॥ खोल देखु तो बाहेर दिसे ॥ २ ॥ एका जनार्दनका बंदा ॥ अस्मान जमीं भऱ्या खुदा ॥ ३ ॥

॥ ५७५ ॥ चिवटीम्यानें खडा खुदा ॥ किस्से कहु न्हना बडा ॥ १ ॥ न्हना बडा नाहीं कोई ॥ जिधर देखु उधर वोही ॥ २ ॥ राईके हजार हिस्से ॥ तिस म्यानें अल्ला बसे ॥ ३ ॥ एका जनार्दनका बंदा ॥ दिन रात भरा खुदा ॥ ४ ॥

॥ ५७६ ॥ मशिद कहे खुदा घर ॥ मस्जिदकु मोईन कर ॥ १ ॥ जिधर देखु तिधर भऱ्या ॥ मस्जिदकु मोईन कऱ्या ॥ २ ॥ मकाम्याने खुदा सही ॥ बाकी जागा कही नही ॥ ३ ॥ मस्जिद खुदावो भुतखाना ॥ मका खदावो मयखाना ॥ ४ ॥ मौजुद भऱ्या मौजुद भऱ्या ॥ मौजुद कहे कोण उबऱ्या ॥ ५ ॥ एका जनार्दनका बंदा ॥ बाहेरी भीतरी भरा खुदा ॥ ६ ॥

॥ ५७७ ॥ ज्यावर जीव न्याहाले ॥ वो केऊ चीप सिफत खोले ॥ धृ० ॥ बोले जबाकी जबानी खुदा ॥ बोलण हारा मौजुदा ॥ १ ॥ अकलम्यानें जिभां खोले ॥ आपनी सिफत आपही बोले ॥ २ ॥ एका जनार्दनका बोले ॥ सब जिभा अल्लाथी चले ॥ ३ ॥

॥ ५७८ ॥ दोन्हो आख्यां उसके चशमक ॥ देखण हारा आपे खालीक ॥ धृ० ॥ नजरकी नजर खुदा ॥ पेखनहारा नही जुदा ॥ १ ॥ चीवटीथीं हरन जवर बसे ॥ सब कुच अल्लाथी दिसे ॥ २ ॥ एका जनार्दनका बंदा ॥ हर नजर दिखलावे खुदा ॥ ३ ॥

॥ ५७९ ॥ उदो ना अस्तु ज्याचीये गांवीं तो असे देहीं कर्मे करवी ॥ जगाचा कर्त्ता होऊनीया अकर्त्ता लपाला प्रपंचु दावी ॥ धृ० ॥ देखतांची विरणें कीं मरता मरणें ऐसें नेणों काय करवी रया ॥ १ ॥ नेती नेती तेथें श्रुति परतल्या कपर्दीसी नेणवे व्यक्ती ॥ तो मौनाचेनी मायें आमूपची मोविताकीं सर्वांग देखणें होती रया ॥ २ ॥ भावाभाव ठेले सोहं निमाले विश्वची आपेंआप ॥ तेथें अनुभवी आनंदली सुखासी पडली ते जाणती रूप ॥ ३ ॥ पीतामहाचा पिता भानुदास तत्वता ॥ साची कृपा परिपूर्ण एका जनार्दनावर्ता अरे रया ॥ ४ ॥

॥ ५८० ॥ गुरुका मुंडा बडा गुंडा चुपकी करे बात ॥ सुननवाले बहिरे बावा दिनकी करे रात ॥ १ ॥ सोही एक मुंडा ॥ जिन्ने आपरूप धुंडा ॥ धृ० ॥ आपनी आपनी राह चले दिलकुं करे पाक ॥ तनका मन सटोना तो मोहमें पडो खाक ॥ २ ॥ खलक भ्यानें भरिया खुदा नहि दुःख कोय ॥ एका जनार्दनका बंदा जनम मरण खोय ॥ ३ ॥

॥ ५८१ ॥ स्वर्ग मृत्यु हो पाताळें ॥ नव्हती तीन्ही ताळें ॥ तैंवो अलक्ष अपरंपार होता निजध्यानीं ॥ तेणें मांडिली बाई चोळीची वेतणी ॥ १ ॥ काया चोळीवो चोळीवो अति रंग साजिरी ॥ हंस मयूरें शोभती भुजांवरी ॥ साही चक्रेंवो चोळीचे भीतरीं ॥ बावन जवदानें बहातर कंगोरे वरी ॥ धृ० ॥ कापड मोजिलें गजानें औट हात भरियलें ॥ कातर घातली ठायींची मग नाहीं उरियलें ॥ मर मर शिंपीया चोरट्या असील तें चोरिलें ॥ काया चोळीवो० ॥ २ ॥ सोहं सुईनें शिवीयलें गुण दोऱ्या भीतरी ॥ नव तुकड्यांची हे चोळी पांच फडकीं वरी ॥ सप्त फुलांची हे चोळी दोन बिरडीं वरीं ॥ काया चोळीवो० ॥ ३ ॥ चोळी निपजली नव मासां ती अंगीं घातली ॥ अंगें घालतां दाटली कोंपरीं फाटली ॥ मर मर शिंपीया चोरट्या पुरती नाहीं केली ॥ काया चोळीवो० ॥ ४ ॥ कापड रंगीयलें श्रीरंगें ॥ चोळी शिविली अंतरंगें ॥ एका जनार्दनें बिरडें घातलें अंगें ॥ काया चोळीवो चोळीवो० ॥ ५ ॥

॥ ५८२ ॥ कैंची मायारे नाथिली ॥ हे तंव जाण भ्रांति भुली ॥ १ ॥ पाहे पाहे चहूं कडा ॥ विठ्ठल विठ्ठल रोकडा ॥ २ ॥ आपण आंत बाहेर पाहे ॥ विठ्ठल देखोनि उगाचि राहे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं कारण ॥ विठ्ठल विठ्ठल परिपूर्ण ॥ ४ ॥

॥ ५८३ ॥ व्यर्थ वाचाळाचे बोल। बोलों नका ह्मणा विठ्ठल ॥ १ ॥ विठ्ठल विठ्ठल नेटका ॥ ह्मणतां मुक्ति होय फुका ॥ २ ॥ सांडी परापवाद खोडी ॥ घे पा विठ्ठल स्मरणीं गोडी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं साचे ॥ विठ्ठल विठ्ठल ह्मणतां वाचे ॥ ४ ॥

॥ ५८४ ॥ ब्रह्म कैसें वेडावलें गे बाइये ॥ धृ० ॥ निर्गुण होतें सगुणा आलें ॥ त्रिभुवन उद्धरिलें बाइये ॥ १ ॥ घेउनी वसुदेवें गोकुळा नेलें ॥

यशोदेनें खेळविलें गे बाइये ॥ २ ॥ एका एकपण तेंही नेलें ॥ जनी जनार्दन केलें गे बाइये ॥ ३ ॥

॥ ५८५ ॥ तंतु वस्त्र दोन्ही एक ॥ तैसा जगासी व्यापक ॥ १ ॥ मीतूंपण ऐसी परी ॥ जैसें लवण सागरीं ॥ २ ॥ दोहीं माजीं एक जाणा ॥ बाप पंढरीचा राणा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं कृपा ॥ जगीं भ्रांत कैंची बापा ॥ ४ ॥

॥ ५८६ ॥ काय सांगावें कवणा ॥ आपुलें आपण कां नेणा ॥ १ ॥ काशी जाताती उदंडें ॥ त्यांचीं पाठमोरीं तोंडें ॥ २ ॥ मन वासनेसी गोविलें ॥ स्नाना रितें धेंड नेलें ॥ ३ ॥ देह जाउनी तीर्थी बुडे ॥ मन तैसेंचि कोरडें ॥ ४ ॥ आंत मद्य आहे भरलें ॥ वरीवरी भांडें तें धुतलें ॥ ५ ॥ मनीं वासनेच्या जटा ॥ देह मुंडी तो करंटा ॥ ६ ॥ सवें चोरांचा सांगात ॥ केंवि चालवेल वाट ॥ ७ ॥ मनीं भरलें आहे पाप ॥ वरीवरी घेतला ताप ॥ ८ ॥ मुलामायाचे ताप ॥ राजद्वारीं या संताप ॥ ९ ॥ मनीं नाहीं शुद्ध मती ॥ कास्यादिका एक रीती ॥ १० ॥ एका जनार्दनीं चित्त ॥ तीर्थें होती तें सत्य ॥ ११ ॥

॥ ५८७ ॥ जेथें मनाची जाणीव विरे ॥ मन समूळ वितळोनी मुरे ॥ माया प्रपंच कांहीं नुरे ॥ ज्ञानाज्ञान जे ठायीं सरे ॥ १ ॥ तीं गतेंचि ब्रह्म केवळ ॥ निघोंट नितळ निर्मळ ॥ अभिन्न अखंड अढळ ॥ परिपूर्ण सकळीं सकळ ॥ धृ० ॥ जेथें बुद्धीचें न चले कांहीं ॥ चित्ता चेतवी परी रूप नाहीं ॥ रूप अरूप नेणें चाड कांहीं ॥ अनायासें खेळे सर्वां ठायीं ॥ २ ॥ जें कां दृष्टादृष्टि वेष्टित ॥ दृश्य दर्शना जे जाणत ॥ दृश्य दर्शनीं जे निभ्रांत ॥ असे सोज्वळपणें देखत ॥ ३ ॥ जें कां गगनीं परिपूर्ण ॥ असे निरंतर गगन ग्रासून ॥ दश गगनाचा देह धरी जाण ॥ एका जनार्दनीं सहज खूण ॥ ४ ॥

॥ ५८८ ॥ ओळखा नयनीं श्रीविठ्ठलपद दानी ॥ धृ० ॥ अर्ध मात्रेवरी उभा नीट हरी ॥ सुंदर रूप सोज्वल साजणी ॥ १ ॥ चरणतळीं सत्रावी समुळीं ॥ चंद्रायणी निज निश्चळ पाणी ॥ २ ॥ अनुहात गजरें निश्चित मनीं ॥ टाळ मृदंग विणीयाच्या ध्वनी ॥ ३ ॥ एक जनार्दन अद्वय लोचनीं ॥ मध्वनाथ लोळे त्याच्या चरणीं ॥ ४ ॥

॥ ५८९ ॥ ब्रह्म सनातनरे ॥ विटेवरी ब्रह्म सनातनरे ॥ धृ० ॥ पूर्ण परायण चिन्मय चित्सुख ॥ चिद्घन पावन रे ॥ १ ॥ संत शुकादिक वर्णिती साधक ॥ ते ही शुकानन रे ॥ २ ॥ धाम सुखप्रती काम ॥ पीता सीवराम सुतारण रे ॥ ३ ॥ सुरवर किंनर नारद तुंबर ॥ गाति निरंतर रे ॥ ४ ॥ श्रीवत्सलांछन हृदई विलासन ॥ दीनदयाकर रे ॥ ५ ॥ एक जनार्दन प्रभु मनमोहन ॥ चारीत गोधन रे ॥ ६ ॥

॥ ५९० ॥ पार्थ ह्मणे श्रीअनंता रूप दाखवी गा मज आतां ॥ हरि ह्मणे रूप विशाळ माझें भिसील रे पाहतां ॥ धृ० ॥ कृष्ण मूर्ति गेल्या हारपुनी मुकुट लागले गगनीं ॥ कोटी सूर्यांची प्रभा फांकली अर्जुन विस्मय करी मनीं ॥ १ ॥ अठरा भार वनस्पतीची लेखणी मूढमती ॥ लिहितां पृथ्वी आटली काय वर्णू तुमच्या कीर्ती ॥ २ ॥ समुद्र भरुनी शाई गा आतां मी वर्णू कायी ॥ सहा चार अठरा. भांडत गेले नाहीं चवघांची गोई ॥ ३ ॥ सरस्वती सिणली लिहितांना सूर कोंदले गातांना ॥ तुमच्या अंगींची चैतन्य माया भुललों स्वरूप पाहतांना ॥ ४ ॥ काना नव्हे मात्रा गा मात्रा नव्हे काना ॥ चळेना ढळेना कांहीं तुटेना फुटेना ॥ ५ ॥ एका जनार्दनीं वाचा संचित ठाव कैंचा सांठा ॥ साधु संत खुणा जाणती मोक्ष-पदाच्या वाटा ॥ ६ ॥

॥ ५९१ ॥ मृगजळाच्या ठायीं कीं जळचि नाहीं ॥ यापरि माया समूळीं मिथ्या पाहीं ॥ १ ॥ माया नाहीं नाहीं जगचि ब्रह्म पाही ॥ सर्वें-द्रियांठायीं ज्ञान नांदे ॥ धृ० ॥ दोराचे सर्प त्यजिताची मेले ॥ तैसी मायेची बद्धता तुझी तुझेनि बोले ॥ २ ॥ एका जनार्दनीं माया चैतन्य घन ॥ बद्ध मुक्त दोन्हीं समूळ मिथ्या जाण ॥ ३ ॥

॥ ५९२ ॥ एकतो पंगु एकतो आंधळा ॥ दोहींचा मांडिला घराचार ॥ १ ॥ एक ज्ञानघन जाणता अवघे ॥ एक तो स्वभावें अविद्यकू ॥ २ ॥ वित्त गोत माझें हें शरीर ॥ एक निर्विकार साक्ष याचा ॥ ३ ॥ एक चिदाकाशीं करूनिया वास ॥ एकाचा रहिवास देहा-माजीं ॥ ४ ॥ शिवाचेनि सूत्रें चळतसे जीव ॥ दोहींचाही ठाव जनार्दनीं ॥ ५ ॥ एका जनार्दनीं जीव शीव गुरू ॥ केलासे निवाडू जनार्दनें ॥ ६ ॥

॥ ५९३ ॥ वस्तुवीण रिता नाहीं ठावो ॥ तेथें अज्ञानासी कैंचा

वावो ॥ १ ॥ आतां बोलावें तें काय ॥ बोल बोलविता बोली आहे ॥ २ ॥ बोली बोलाचें निजरूप ॥ बोलती तुका ज्ञानस्वरूप ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं शब्दज्ञान ॥ शब्दरूपें चैतन्यघन ॥ ४ ॥

॥ ५९४ ॥ धांवोनी धरूं ह्मणसी तंव तें महाशून्य ॥ नाहीं ह्मणसी तेथें जाईल सांडून ॥ १ ॥ या परि सातें करी कां जतन ॥ जीवाचिया जीवा समाधान ॥ २ ॥ जीविचिया जीवीं ठेविलें धरून ॥ एकाजनार्दनीं या परि शरण ॥ ३ ॥

॥ ५९५ ॥ तुझें नाम लटिकें रूप लटिकें ॥ कर्म लटिकें करितसें ॥ १ ॥ दृष्टि लटिकी भेटी लटिकी ॥ गोष्टी लटिकी सांगतसें ॥ २ ॥ एकाजनार्दनीं एका ॥ नामरूपीं अवघा लटिका ॥ ३ ॥

॥ ५९६ ॥ ब्रह्मीं नाहीं कर्म नाहीं उपासना ॥ नाहीं ध्येय ध्याना ठाव जेथें ॥ १ ॥ जाणीव नेणीव भगवंतीं नाहीं ॥ विज्ञान जें तेंहि लया जाय ॥ २ ॥ नामरूपा ठाव नाहीं जयाठायीं ॥ ज्ञेय ज्ञाता तेंहि नाहीं जेथें ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं आहे एकरूप ॥ सहज स्वरूप नित्य शुद्ध ॥ ४ ॥

॥ ५९७ ॥ बोली जें तें नव्हे ॥ बोलणें तेंही तो आहे ॥ बोला आंतु बाहेर पाहे ॥ पाहतां कवण आहे ॥ १ ॥ हरि हरि हरि हरी ॥ अहं सोहं नुरेचि उरी ॥ आत्मा एक चराचरीं ॥ एकपण नाहीं निर्धारीं ॥ २ ॥ दृश्य तो जाला नाहीं ॥ दृश्यमात्रें सातेंच पाही ॥ आहे नाहीं ऐसें जें कांहीं ॥ प्रकाशे त्याच्याच ठायीं ॥ ३ ॥ एकपणें पाहे अनेक ॥ अनेकीं आहे एक ॥ एक ना नव्हे आणिक ॥ एका जनार्दनीं तोचि देख ॥ ४ ॥

॥ ५९८ ॥ निरसुनी ज्ञान ह्मणविती विज्ञान ॥ त्याहुनी अभिन्न स्वरूप माझें ॥ १ ॥ पिंड आणि ब्रह्मांड ह्मणीजे अखंड ॥ याहुनी उदंड स्वरूप माझें ॥ २ ॥ माया आणि ममत्व शोधुनी शुद्धसत्व ॥ सत्वाचें निजसत्व स्वरूप माझें ॥ ३ ॥ सत् आणि चित् ह्मणती आनंद ॥ याहुनी अभेद स्वरूप माझें ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं एकपणातीत ॥ चित्ताचें अचित्त स्वरूप माझें ॥ ५ ॥

॥ ५९९ ॥ आत्मा केवळ एकला एक ॥ तेथें सुखदुःख कैचें ॥ १ ॥ आत्मा सुखदुःखा वेगळा ॥ हें तों न कळे कळा तयाची ॥ २ ॥ ह्मणे जनार्दनाचा एका ॥ आत्मा देखा सर्व घटीं ॥ ३ ॥

॥ ६०० ॥ परमात्मा एकला एक ॥ एकपणें तोचि अनेक ॥ १ ॥ तेथें जाति विजाति नाहीं देखा ॥ महा सुखा सुख पात्र ॥ २ ॥ ह्मणे जनार्दनाचा एका ॥ आत्मा सारिखा सर्व देहीं ॥ ३ ॥

॥ ६०१ ॥ मृगजळ जेथें नसे ॥ तेथें वसे कोरडें ॥ १ ॥ ऐसा घ्यावा अनुभव ॥ पदोपदीं भाव जीवासी ॥ २ ॥ जें दिसें तें नासे ॥ ऐसें असे सर्वत्र ॥ ३ ॥ या परि जाणावें मिथ्यापण ॥ शरण एकाजनार्दन ॥ ४ ॥

॥ ६०२ ॥ नग घडतां सोनें साचें ॥ न घडतां सोनेंपण नवचें ॥ १ ॥ मेघा पूर्वीं शुद्ध गगन ॥ मेघ सबाह्य गगनीं जाण ॥ २ ॥ कुल्लाळ जें भांडें घडीत ॥ त्यासी मृत्तिका नित्य व्याप्त ॥ ३ ॥ सागरीं जे जे उपजे लहरी ॥ तैसा व्यापक श्रीहरी ॥ ४ ॥ जन तोचि जनार्दन ॥ एकाजनार्दनीं व्यापक पूर्ण ॥ ५ ॥

॥ ६०३ ॥ निरालंब सहज माय पहातां कैसें ॥ सबाह्य अभ्यंतर व्यापुनी पूर्ण अखंड दिसे ॥ १ ॥ लक्षीं वो अलक्ष पहातां देहीं देह न दिसे ॥ निर्गुण गुणासी आलें अवघें ब्रह्मचि दिसे ॥ २ ॥ ऐसा हा व्यापकू हरि आहे सर्वां ठायीं ॥ ज्ञानांजन लेउनी पाहे देहींच्या देहीं ॥ ३ ॥ पिंड ब्रह्मांड व्यापुनी अतित कैसा ॥ आदि अंत ज्याचा नकळे श्रुति मुरडल्या कैशा ॥ ४ ॥ नेतिनेति शब्द बोलती हरि अगाध ऐसा ॥ ह्मणवोनी गुरुमुखें दृढ विश्वास धरी ऐसा ॥ ५ ॥ प्रसिद्ध आत्मा देखोनी विरालें मन ॥ मनचि उन्मन झालें तेथें कैचें ज्ञान ॥ ६ ॥ ज्ञान ध्यान हेंही नकळे अवघा जनार्दन ॥ एकाजनार्दनीं शरण काया वाचा मनें जाण ॥ ७ ॥

---

## करुणा.

॥ ६०४ ॥ धांव रे धांव आतां दीनवत्सला रामा ॥ संसार संग गोष्टी मी गुंतलों कामा ॥ १ ॥ तारुण्य अभिमानें अंगीं भरला ताठा ॥ विषय संपत्तीचा मज फुटला फांटा ॥ २ ॥ विषय भोगितांना देह पोसलें माझें ॥ स्वहित आठवेना ध्यान चुकलों मी तुझें ॥ ३ ॥ विषयां मोकलिलों तुज शरण मी आलों ॥ एकाजनार्दनीं पायीं लीन मी झालों ॥ ४ ॥

॥ ६०५ ॥ ब्रीदावळी करी आपुली जतन ॥ आलों मी शरण जना-

र्दना ॥ १ ॥ राखी माझी लाज पतित पतित ॥ तुझा मुद्रांकित रंक एक ॥ २ ॥ काम क्रोध लोभ दंभ अहंकार ॥ हे देहीं अनिवार सोसवेना ॥ ३ ॥ आशा मनशा माया सखीया सांगातिणी ॥ करिती गवसणी सदा जीवा ॥ ४ ॥ चित्त वित्त आशा लागलीसे पाठीं ॥ इहीं जीवें साटीं केली मज ॥ ५ ॥ जनार्दना शरण अनन्य पैं एका ॥ काये वाचे देखा चरणीं विनटला ॥ ६ ॥

॥ ६०६ ॥ भक्ति प्रेमाविण ज्ञान नको देवा ॥ अभिमान नित्य नवा तयामाजी ॥ १ ॥ प्रेमसुख देई प्रेमसुख देई ॥ प्रेमेंविण नाहीं समाधान ॥ २ ॥ रांडवेनें जेविं शृंगारु केला ॥ प्रेमेंविण झाला ज्ञानी तैसा ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं प्रेम अति गोड ॥ अनुभवीं सुरवाड जाणतील ॥ ४ ॥

॥ ६०७ ॥ माझी वासनेची दृढ जाळी ॥ आंत विषयाची गुळपोळी ॥ आह्मा धाडिसी बोधाचे पाळीं ॥ कशी गांठ केलीरे कान्होबा ॥ धृ० ॥ सोडी तूं आपुली खोडी ॥ कान्होबा सोडी तूं आपुली खोडी ॥ १ ॥ माझा सुस्वराचा वेणू ॥ त्याचा नाद नेला चुरुनू ॥ शब्दानुशब्द वाजे घुणघुणू ॥ चारी वाटा राहिल्या खुंटुनी ॥ २ ॥ माझ्या अकरा गाई ॥ तुज पाठविल्या भाई ॥ त्याचें दुभतें केलें काई ॥ तुझी संगत पुरे भाई ॥ ३ ॥ माझी चित्तांत बैस चौघडी ॥ नेली वनमाळी देह घोंगडी ॥ आह्मी सबाह्य नागवीं उघडीं ॥ तुझ्या संगतीची कोण गोडीरे ॥ ४ ॥ वेधीं वेधिलें आमुचें मन ॥ नेलें जीवपण चोरुन ॥ एका शरण जनार्दन ॥ सुखें खेळूं समाधानरे ॥ ५ ॥

॥ ६०८ ॥ अनाथाचा नाथ दीनाचा दयाळ ॥ ह्मणवोनी सांभाळ करी माझा ॥ १ ॥ तुज ऐसा देव नाहीं त्रिभुवनीं ॥ ह्मणवोनी चरणीं विनटलों ॥ २ ॥ बापा जनार्दना कृपा करी दान ॥ सांभाळी वचन आपुलें तें ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं भेटी देई देवा ॥ संता पायीं भावा मिठी पडों ॥ ४ ॥

॥ ६०९ ॥ तुजविण आह्मां कोण आहे देवा ॥ धांव यादवरावा मायबापा ॥ १ ॥ पडिलोंसे डोहीं प्रपंच आवर्तीं ॥ कोण करी शांति तुजविण ॥ २ ॥ जन्ममरणाचा पडिलासे फेरा ॥ सोडवी दातारा मायबापा ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं धांवे लवलाही ॥ येवोनिया हृदयीं ठाव देई ॥ ४ ॥

॥ ६१० ॥ कैंचे आह्मां यातीकुळ ॥ कैंचे आह्मी धर्मशीळ ॥ १ ॥ तुझे नामीं अनुसरलों ॥ तीही लोकीं सरते झालों ॥ २ ॥ कैंची क्रिया कैंचें कर्म ॥ कैंचा वर्णाश्रमधर्म ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं यातीकुळ ॥ अवघा व्यापक विठ्ठल ॥ ४ ॥

॥ ६११ ॥ धांव नारायणा ॥ माझ्या दुःखाच्या निरसना ॥ १ ॥ संसारें मी कष्टलों ॥ तुजलागीं शरण आलों ॥ २ ॥ कोण सोडवील आतां ॥ तुजविण जी अनंता ॥ ३ ॥ तूंचि मायबाप ॥ निवारीसी सर्व ताप ॥ ४ ॥ एकाजनार्दन पाय ॥ धरूनियां चित्तीं राहे ॥ ५ ॥

॥ ६१२ ॥ आह्मी दीन तूं दीनानाथ ॥ तीही लोकीं तुझी मात ॥ १ ॥ आह्मीं पतित तूं पावन ॥ ऐसें साजे नामाभिधान ॥ २ ॥ आह्मी अनाथ तूं कैवारी ॥ ऐसी तुझी आहे थोरी ॥ ३ ॥ आह्मी दीन तूं वत्सल ॥ ऐकिला तो ऐसा बोल ॥ ४ ॥ नको धरूं दुजें आतां ॥ कृपाळू तूं दीनानाथा ॥ ५ ॥ एका शरण जनार्दनीं ॥ ऐसें चालत आलें दुरुनी ॥ ६ ॥

॥ ६१३ ॥ देव तुष्टला मग देघे ॥ तुजवांचुनी कांहीं नेघे ॥ १ ॥ देवा इतुली कृपा करी ॥ जो मी तुझा घोट भरी ॥ २ ॥ आणिक कांहीं मागेन जरी ॥ तरी मज दंडावें हरी ॥ ३ ॥ वैकुंठ देईरे एक ॥ तो तंव फोडीव फटका ॥ ४ ॥ क्षीर सागर शेष शयन ॥ इतुकें न दे चाळवण ॥ ५ ॥ सोहं पद विसावून ॥ देतां घेतां लाजीरवाणें ॥ ६ ॥ एकाजनार्दनीं तुष्टला ॥ सकल सर्वांगीं घोटला ॥ ७ ॥

॥ ६१४ ॥ सर्वां भूतीं तुझें रूप ॥ हृदयीं सिद्धची स्वरूप ॥ १ ॥ इतुकें देई अधोक्षजा ॥ नाहीं तरी घोट भरीन तुझा ॥ २ ॥ सकळांहुनी करी सान ॥ सकळिकीं समसमान ॥ ३ ॥ सदा द्यावा संतसंग ॥ अखंड कीर्तनीं अनुराग ॥ ४ ॥ निःशेष दवडोनिया स्वार्थ ॥ अवघा करी परमार्थ ॥ ५ ॥ एका जनार्दनीं मागे ॥ नाहीं तरी घालीन अंगें ॥ ६ ॥

॥ ६१५ ॥ द्रोणी अस्त्रा हातीं ॥ उत्तरा पीडितां सती ॥ गर्भीं राखिला परीक्षिती ॥ तैसा पावे श्रीपती ॥ १ ॥ वेगीं ये कां श्रीहरी ॥ धांव पाव मुरारी ॥ चक्र घेउनीया करीं ॥ भवभय निवारी ॥ २ ॥ इंद्र वरुषे शिळाधारीं ॥

गोकुळ पीडितां भारी ॥ राखिलें गोवर्धनधारी ॥ तैसा पावे झडकरी ॥ ३ ॥ दुर्वास द्वादशी ॥ छळूं आला अंबऋषी ॥ चक्रें पळवोनी त्यासी ॥ दहा गर्भवास सोसिले ॥ ४ ॥ सभेंत वस्त्रहरण ॥ पतिव्रता मरण ॥ द्रौपदीलज्जा रक्षण ॥ अंबर झाला श्रीकृष्ण ॥ ५ ॥ पांडव लाक्ष्याजोहरीं ॥ धडाग्नि पोळतां भारी ॥ साहीजणी चिंतितां हरी ॥ काढिलें विवर द्वारीं ॥ ६ ॥ देखोनी गुरुगोत ॥ रणांगणीं भ्याला पार्थ ॥ त्यासी सांगुनी गीतार्थ ॥ संग्रामीं केला तुवां मुक्त ॥ ७ ॥ एकाजनार्दनीं दत्त ॥ साह्य झाला सतत ॥ मोहो भवभय जेथ ॥ तेथें केला नित्य मुक्त ॥ ८ ॥

॥ ६१६ ॥ गांजितां प्रल्हादू ॥ तुझा घेतला छंदू ॥ त्याचा निरसिला बाधू ॥ तैसा पावे तूं संनिधू ॥ १ ॥ वेगीं येवो मुकुंदा ॥ धांवे पावे गोविंदा ॥ करीं घेऊनिया गदा ॥ छेदी सकाम बाधा ॥ २ ॥ दावाग्नि गोपाळ ॥ वेढिले सकळ ॥ ते त्वां गिळियेले ज्वाळ ॥ तैसा पावे तात्काळ ॥ ३ ॥ गरुडा सांडोनी मागें ॥ उडी घातली श्रीरंगें ॥ गज उद्धरिला अंगें ॥ तैसा पावे लागवेगें ॥ ४ ॥ दुर्वास भोजनीं ॥ आला रात्रीं मध्यानीं ॥ धर्म शापाची बाधणी ॥ निरसिली भेटी देउनी ॥ ५ ॥ भवभय अद्भुत ॥ नामस्मरणें निरसें सत्य ॥ एकाजनार्दनीं प्रतित ॥ आह्मां नाम-स्मरण ॥ ६ ॥

॥ ६१७ ॥ देखिला अवचित्ता डोळा सुखाचा सागरू ॥ मनबुद्धि हारपली झाले एकाकारू ॥ न दिसे काया माया कृष्णीं लागला मोहरू ॥ १ ॥ अद्वय आनंदारे अद्वया आनंदारे ॥ वेधियेल्या कामिनी अद्वया आनंदारे ॥ धृ० ॥ खुंटले येणें जाणें घर सासुर ॥ नाठवे आपपर वेधियेलें जी सुंदर ॥ आतें सबाह्य व्यापिलें कृष्ण परात्पर नागरवो ॥ २ ॥ सावजीं कळलें आतां लाधलें निर्गुणा ॥ एकाजनार्दनीं कृपा केली परिपूर्णा ॥ गगनीं गिळियेलें येणें उरी नुरेचि आपणा ॥ ३ ॥

॥ ६१८ ॥ एवढा पुरवा मनींचा छंद ॥ वाचे गोविंद आठवूं द्या ॥ १ ॥ मग मी तुमच्या न सोडी पाया ॥ करीन काया कुर्वंडी ॥ २ ॥ वारंवार क्षणक्षण ॥ संत चरणा वंदीन ॥ ३ ॥ दुजा नको कांहीं हेत ॥ एकाजनार्दनीं मागत ॥ ४ ॥

॥ ६१९ ॥ माझें मन राहो तुझे पाई ॥ वास पंढरीचा देई ॥ १ ॥ जन्म देशी भलते परी ॥ वाचें राम विठ्ठलहरी ॥ २ ॥ जन्मासीं या भिणें ॥ हें तों आह्मां लाजिरवाणें ॥ ३ ॥ मोक्ष मुक्तीतें देवा ॥ नको गोऊं तया ठाया ॥ ४ ॥ ह्मणे जनार्दनीं एका ॥ संत संग द्यावा निका ॥ ५ ॥

॥ ६२० ॥ आह्मीं मागतों फुकाचें ॥ तुह्मां देतां काय वेचें ॥ १ ॥ संत संग देई देवा ॥ दुजा नको कांहीं गोवा ॥ २ ॥ पंढरीसीं ठाव द्यावा॥ हेंचि मागतसे देवा ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं मागत ॥ एवढा पुरवा मनीचा हेत ॥ ४ ॥

॥ ६२१ ॥ तुमचें देणें तुमचें देणें ॥ नको वैकुंठ हें पेणें ॥ १ ॥ नाना मतें मतांतर ॥ अंतर गोऊं तेथें ॥ २ ॥ पेणें ठेवा पंढरीसीं ॥ अहर्निशीं नाम गाऊं ॥ ३ ॥ भाळे भोळे येती संत ॥ बोलूं मात तयासी ॥ ४ ॥ चरण रस वंदीन साचें ॥ एकाजनार्दनीं ह्मणे त्याचें ॥ ५ ॥

॥ ६२२ ॥ ऐकेगा हृषिकेशी ॥ जाणोनी तूं विश्वासी ॥ निज गुह्य तुजपाशीं ॥ ठेवणें दिधलें ॥ १ ॥ आज्ञा चाळवोनी विषयासी ॥ थितें बुडवूं पाहासी ॥ क्रियानष्ट होसी ॥ तूंचि एक ॥ २ ॥ आमचें आह्मां देतां ॥ तुज कां नये चित्ता ॥ लाजसी तत्त्वतां ॥ भक्ति घेसी ॥ ३ ॥ नेतां पंचापाशीं ॥ भलें नव्हे हृषिकेशी ॥ मजसी समान होसी ॥ एकाजनार्दनीं ॥ ४ ॥

॥ ६२३ ॥ सत्वर पावगो मला ॥ भवानी आई रोडगा वाहिन तुला ॥ १ ॥ सासरा माझा गांवीं गेला ॥ तिकडेच खपवी त्याला ॥ २ ॥ सासु माझी जाच करती ॥ लवकर नीर्दाळी तिला ॥ ३ ॥ जाऊ माझी फडफड बोलती ॥ बोडकी करग तिला ॥ ४ ॥ नणदेचें पोर किरकिर करितें ॥ खरूज होऊं दे त्याला ॥ ५ ॥ दादला मारून आहुति देईन ॥ मोकळी करगे मला ॥ ६ ॥ एकाजनार्दनीं सगळेंचि जाऊं दे ॥ एकटीच राहूं दे मला ॥ ७ ॥

॥ ६२४ ॥ देवा माझें मन लागो तुझे चरणीं ॥ संसार व्यसनीं पडों नेदी ॥ १ ॥ नामस्मरण घडो संतसमागम ॥ वाउगाची भ्रम नको देवा ॥ २ ॥ पायीं तीर्थयात्रा मुखीं रामनाम ॥ हाचि माझा नेम सिद्धि नेई

॥ ३ ॥ आणिक मागणें नाहीं नाहीं देवा ॥ एकाजनार्दनीं सेवा दृढ देईं ॥ ४ ॥ ॥

॥ ६२५ ॥ तुमच्या सेवेचा महिमा ॥ मज नकळे पुरुषोत्तमा ॥ १ ॥ पूजा करणें कवणें रीतीं ॥ नेणें जपमाळ हातीं ॥ २ ॥ स्नानसंध्या नकळे कांहीं ॥ मन असो तुझे पायीं ॥ ३ ॥ तुह्मा मागणें इतुकें ॥ एकाजनार्दनीं द्यावें कौतुकें ॥ ४ ॥

॥ ६२६ ॥ मागणें हेंचि माझें देवा ॥ दुजेपण दुरी ठेवा ॥ १ ॥ मी तूं ऐसी नको उरी ॥ जनार्दना कृपा करी ॥ २ ॥ रंक मी एक दीन ॥ माझें करावें स्मरण ॥ ३ ॥ नीच सेवा मज द्यावी ॥ एकाजनार्दनीं आस पुरवावी ॥ ४ ॥

॥ ६२७ ॥ पायीं जडलें माझें मन ॥ चित्त झालें समाधान ॥ १ ॥ तुमच्या नामाचा महिमा ॥ आजी पावन केलें आह्मा ॥ २ ॥ करुणा केली तुह्मीं ॥ लावियेलें आपुले नामीं ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं पूर्ण कृपा ॥ तेणें मार्ग झाला सोपा ॥ ४ ॥

॥ ६२८ ॥ संसार कूपीं हरि पडियलों श्रीहरी लाहुनी पैं शरीर ॥ एक पिसें लागे कांहीं एक न करवे पंचभूतिक विकार ॥ सुष्ट दुष्ट कर्में करितां हें शिणलें मळ मूत्र दोष जर्जर ॥ ऐसिया जीवातें उद्धरसी ह्मणोनी ब्रीद साजे रघुवीर ॥ १ ॥ यालागीं रामचंद्रा रामचंद्रा ॥ हृदयीं धरली नाममुद्रा ॥ धृ० ॥ आशा तृष्णा दोन्ही स्नेहाळ नागिणी काम क्रोध हे विखार ॥ त्यांचिया संगतीं विषय वृद्धि झाली लहरी दुःख दरिद्र ॥ इंगळाचे शेजे अंथुरितां वरी तिडकिया आरुवार ॥ ऐसा हा संसार जाणोनी दुस्तर ठाकियेलें तुझें द्वार ॥ २ ॥ कौळीकें रूप कपटीं धरियेलें तें त्वां साचार केलें ॥ साभिमान्या देव गुरु चक्रवर्ती त्रिभुवनीं यश थोरलें ॥ पांखरुवाचिया लोभा कारणें गणिकेसी कैवल्य दिधलें ॥ दंभ प्रपंच वोळंगतां जीव तया तूं सायुज्य देसी आपुलें ॥ ३ ॥ श्रीवत्स ब्राह्मणें हालासी पापरा आतां तूं तें पद मिरविसी दातारा ॥ चरण स्पर्शें त्वां अहिल्या उद्धरली विस्मयो थोर सुरनरा ॥ जे गति देवकिये तैसीच पूतने विश्राम एक वो वरा ॥ तुझें मुद्रांकित न भीये कळिकाळा तूं

स्वामी सारंगधरा ॥ ४ ॥ वनीं सिंहाचें भय दाखविलें अजा ते बैसविली गजस्कंधीं ॥ परमपुरुषा तुझें नाम उच्चारितां वोळंगताती ऋद्धिसिद्धी ॥ उपमन्या आरतें क्षीरसिंधु दिधला एवढी प्रसन्न बुद्धी ॥ न गणितां रावणु शरणांगतु केला लंका निरोपिली आधीं ॥ ५ ॥ नर सुर किन्नर पन्नग यक्ष त्रासियले संसारें ॥ जाणोनी शुकदेव गर्भी स्थिरावला भयभीत बोले उत्तरें ॥ जननीयेच्या कष्टा निष्कृती व्हावया उपदेश केला दातारें ॥ जीवन्मुक्त शुकमुनी जनावरिष्ठ जपतांची ध्यानीं दोन अक्षरें ॥ ६ ॥ ऐसा सहस्र मुखें वर्णितां नातुडसी गा देवा धांडोळितां सिद्ध पंथ ॥ जगद्बंधु दीनानाथ समुद्धरण द्रौपदीचा वेळाईत ॥ सुदामीयाच्या दो मुष्टी पोह्याकारणें स्नेहें पसरीसी हात ॥ एका जनार्दनीं जवळी बोलाउनी उच्छिष्ट प्रसाद देत ॥ ७ ॥

॥ ६२९ ॥ पुरवा माझी एवढी आस ॥ करा निजदास संताचा ॥ १ ॥ इच्छा पुरवा मनींचा हेतू ॥ सभाग्य संत दाखवा ॥ २ ॥ आणिक मागणें तें नाहीं ॥ दुजा देहीं आठव नको ॥ ३ ॥ घालीन लोळणी ॥ संत चरणा निशिदिनीं ॥ ४ ॥ परलोकींचें तारूं ॥ एका निर्धारु जनार्दनीं ॥ ५ ॥

॥ ६३० ॥ संसारीं परजनीं बुडतों महा डोहीं ॥ सोडविण्या येई गुरुराया ॥ १ ॥ गुरुराया धांवे लवडसवडीं ॥ जाती एक घडी युगा ऐशी ॥ २ ॥ माझी चित्तवृत्ति अज्ञान हे गाय ॥ एका जनार्दनीं पाय दावी डोळा ॥ ३ ॥

॥ ६३१ ॥ पंचाननें मज घेतिलें वेढुन ॥ नेताती काढून प्राण माझे ॥ १ ॥ गजेंद्रा कारणें त्वां घातली उडी ॥ तैसा लवडसवडीं धांवे देवा ॥ २ ॥ तुजवांचून मज नाहीं आधार ॥ एका जनार्दनीं पार उतरीं देवा ॥ ३ ॥

॥ ६३२ ॥ देहतापें तापलों भारी ॥ संताघरीं मागतसें ॥ १ ॥ मज द्या कांहीं जीवन ॥ जेणें जीवाचें समाधान ॥ २ ॥ एका जनार्दना सर्वें ॥ सुख सागराची घातली पोहे ॥ ३ ॥

॥ ६३३ ॥ दासा दुःख झालें फार ॥ वेगीं करा प्रतिकार ॥ १ ॥ सुख मानिलें संसारीं ॥ दासा दुःख झालें भारी ॥ २ ॥ सोडुनिया मी

स्वधर्म ॥ आचरलों नीच कर्म ॥ ३ ॥ सेवा केली नीचयाती ॥ द्रव्य लोभें घाताघातीं ॥ ४ ॥ अन्नग्रास न जाय मुखीं ॥ पश्चात्ताप झाला शेखीं ॥ ५ ॥ पुण्यस्थान मी पावलों ॥ गुरुचरणीं विश्रामलों ॥ ६ ॥ स्वामी विनंति अवधारा ॥ दीनबंधो करुणा करा ॥ ७ ॥ कर जोडुनीया शीर ॥ ठेविलें पायावर ॥ ८ ॥ जन्मनाम जनार्दन ॥ मुखीं गुरु अभिधान ॥ ९ ॥

॥ ६३४ ॥ गुंतलों प्रपंचीं सोडवीगा देवा ॥ देई तुझी सेवा जीवेंभावें ॥ १ ॥ नलगे धन मात पुत्रदारा वित्त ॥ सदा पायीं चित्त जडोनी राहो ॥ २ ॥ वैष्णवांचा दास कामारी निःशेष ॥ हेंचि पुरवी आस दुजें नको ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं करीत विनंती ॥ मागणें श्रीपति हेंचि द्यावें ॥ ४ ॥

॥ ६३५ ॥ मागणें तें आम्ही मागूं देवा ॥ देई हेवा कीर्तनीं ॥ १ ॥ दुजा हेत नाहीं मनीं ॥ कीर्तना वांचुनी तुमचिया ॥ २ ॥ प्रेमें हरिदास नाचत ॥ कीर्तन होत गजरीं ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं कीर्तन ॥ पावन होती चराचर जाण ॥ ४ ॥

॥ ६३६ ॥ वरपांग सोंग नको माळामुदी ॥ ठाव संतपदीं देई देवा ॥ १ ॥ प्रेम भाव देई प्रेम भाव देई ॥ मागणें दुजें नाहीं आणिक तें ॥ २ ॥ नाममुखीं सदा संताचा सांगात ॥ प्रेम हृदयांत विठोबाचें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं माझा हा निर्धार ॥ जन्माची वेरझार तोडी देवा ॥ ४ ॥

॥ ६३७ ॥ उपमन्यु प्रल्हाद तारिले आळीके ॥ मी तुझें लाडकें सानपणें ॥ १ ॥ नेणतीयासी धांवसी तूं त्वरा ॥ शाहणें वेरझारा मरताती ॥ २ ॥ एका जनार्दनीं शरण एकपणीं ॥ नेणतां जाणतां चरणीं तुझे देवा ॥ ३ ॥

॥ ६३८ ॥ करावें पूजन मुखीं नामस्मरण ॥ अनुदिनीं ध्यान संत सेवा ॥ १ ॥ आणिक नलगे यातायाती कांहीं ॥ वाचे विठाबाई वदे कां रे ॥ २ ॥ एकाजनार्दनीं संताचे सांगात ॥ त्याचें वचनें मात कळों येत ॥ ३ ॥

॥ ६३९ ॥ धांवे धांवे श्रीहरी ॥ निवारी संसार बोहरी ॥ १ ॥ आडलियाचा विसावा ॥ धांवे पावे तूं केशवा ॥ २ ॥ तूं दीन दयाळ हरी ॥ आपुले आम्हा जतन करी ॥ ३ ॥ अंकित भक्ताचा ॥ ऐसी बोले वेदवाचा ॥ ४ ॥ एकाएकीं जनार्दनीं ॥ आठ सहस्र बोले वाणी ॥ ५ ॥

॥ ६४० ॥ तुझिया कृपेचें पोसणें मी दीन ॥ करी तूं जतन जनार्दना ॥ १ ॥ अंकित मी दास काया मनें वाचा ॥ हेलावा कृपेचा करी देवा ॥ २ ॥ कदा नुपेक्षिसी आलिया शरण ॥ हें मागोनी महिमान चालत आलें ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं कृपेचा वोरस ॥ करी जगदीश मजवरी ॥ ४ ॥

॥ ६४१ ॥ निकट असतांची देव ॥ नेणती ते अहंभाव ॥ १ ॥ ऐसे व्यापलें मूढपणें ॥ विसरले जनार्दन ॥ २ ॥ सात्र जैसा सर्व युक्ती ॥ तयातें मुमुक्षु वदती ॥ ३ ॥ ऐसा ज्ञानियाचा भाव ॥ तया देवपण दिसे वाव ॥ ४ ॥ ज्ञान विज्ञान नको देवा ॥ मज चरणा जवळीं ठेवा ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं वाणी ॥ दुजी नको अंतःकरणीं ॥ ६ ॥

॥ ६४२ ॥ मज तो आणिक नाहीं चाड ॥ एवढी जोड पायांची ॥ १ ॥ वास द्यावा पंढरीचा ॥ सदां संताचा समागम ॥ २ ॥ कीर्तनीं नाचेन महाद्वारीं ॥ गरुडपारीं कान धरुनी ॥ ३ ॥ ऐसें लडिवाळ तान्हें ॥ एकाजनार्दनाचें पोसणें ॥ ४ ॥

॥ ६४३ ॥ माझें देई मजलागुन ॥ ह्मणोनी दृढ धरिले चरण ॥ १ ॥ भक्तीचें ऋण देवा ॥ देई माझें मज केशवा ॥ २ ॥ माझें देतां जड काई ॥ अभिलाष धरीन पाई ॥ ३ ॥ एका अभिलाषें फावला ॥ एकाजनार्दनीं उभा केला ॥ ४ ॥

॥ ६४४ ॥ आमुच्या निज सुखधामा ॥ तुझे चरण पुरुषोत्तमा ॥ १ ॥ आह्मावरी कृपा करा ॥ उद्धरा दातारा दीनासी ॥ २ ॥ देऊनिया नामकीर्ती ॥ वसवा मूर्ति हृदयीं ॥ ३ ॥ एका शरण जनार्दनीं ॥ ठाव मागतसे चरणीं ॥ ४ ॥

॥ ६४५ ॥ मज तों अधिकार नाहीं ॥ शरण आलों तुझे पायीं ॥ १ ॥ तुह्मीं पशुगजातें उद्धरिलें ॥ गणिके तारिलें कुंटणीसी ॥ २ ॥ ऐशी शरणांगता माउली ॥ एकाजनार्दनाची साउली ॥ ३ ॥

॥ ६४६ ॥ कृपाळू माधव तूं मुरारी ॥ अच्युता अनंता श्रीहरी ॥ १ ॥ तुह्मीं तारिलें अहिल्येसी ॥ उद्धरिलें अजामेळासी ॥ २ ॥ महा दोषांची दोष श्रेणी ॥ ती तारिली कुंटणी ॥ ३ ॥ रामनाम जपे अनुदिनीं ॥ शरण एकाजनार्दनीं ॥ ४ ॥

॥ ६४७ ॥ जय रामा रामा रामा सच्चिदानंदा रामा ॥ भवसिंधु तारका ऐके मेघश्यामा ॥ अनंत कोटीधीशा अनुपम्य महिमा ॥ अहं सोहं दोन्ही नासी हेंची मागतसे तुह्मां ॥ १ ॥ तुज सगुण जरी ध्याऊं तरी परमीत होसी ॥ तुज निर्गुण जरी ध्याऊं तरी लक्षा न रीघसी ॥ वेद-पुरुषा शरण रीघों जरी श्रुति अभ्यासी ॥ तरी तूं नभाचाही साक्षी शब्दें केवी आतुडसी ॥ धृ० ॥ जरी कर्मची आचरूं मनीं धरुनी दृढ भाव ॥ विधिनिषेध तयांचे माथां वाजे घाव ॥ अष्टांग योग साधन जरी वायूसी झुंज घेऊं ॥ तेथें बहुसाल अंतराय तयाचा येतो भेवूं ॥ २ ॥ घेउनीयां जपमाळा आमुपा गणूं पाहे ॥ तेथें पापीण हे निद्रा घाला घालोनीया जाये ॥ एकाजनार्दनीं साध्य साधकां न करीसी ॥ सांडी मांडीं नलगे कांहीं अवघा राम होसी ॥ ३ ॥

॥ ६४८ ॥ मागणें तें एक आह्मां प्रती द्यावें । निरंतर यावें जागरणा ॥ १ ॥ या हरिदासांचा संग बरवा । आनंदें राघवा गाऊं गीतीं ॥ २ ॥ जो न लाभे तीर्थदानीं । तो हरिकीर्तनीं तिष्ठतसे ॥ ३ ॥ एकाजनार्दनाचा ह्मणे । कृपा करणें जागरणा ॥ ४ ॥

॥ ६४९ ॥ कधीं भेटेल रघुपति मजला सांगबा मारुती ॥ धृ० ॥ मी अपराधी शब्द शरानें दुःखीत उन्मीळापती ॥ कीं मला सांगबा० ॥ १ ॥ साधु छळलें माझें मज फळलें ॥ वनीं राक्षससंगती ॥ २ ॥ दीन जनार्दन आश्रय तुझा ॥ सज्जन जन जाणती ॥ ३ ॥

॥ ६५० ॥ स्वामि तोषला ह्मणे माग वेगें । देवा तुजवांचुनी आन नेघे ॥ १ ॥ देवा इतुकी कृपा करी । मी तुमचा घोट भरीं ॥ २ ॥ आणीक कांहीं मागें जरी । तरी दवडुनी घाला दुरी ॥ ३ ॥ वैकुंठ घे घेरे नेटका । तो तंव फोडीव कुटका ॥ ४ ॥ क्षीरसागर शेषशयन । कां चाळवी इतुकें देऊन ॥ ५ ॥ सोहं पदींचे विसवणें । देतां घेतां लाजिरवाणें ॥ ६ ॥ एका-जनार्दनीं तुष्टला । सगळा सर्वांगीं घोटला ॥ ७ ॥

॥ ६५१ ॥ तुजकन्हें कछु मांगणा बडा गुन्हा मेरा ॥ सब गुन्हों बकसकरणा तेरा नाम है सारा ॥ १ ॥ अल्ला जो कोई तुझे न मांगे सोही प्यारा तुझकू ॥ कछुं न मांगु तेरी जीकिर जीवावे मुजकूं ॥ धृ० ॥ मेरे

धणीका दिदार जिणें देखा भाई ॥ उसका देखणा देखतें नजर गवाई ॥ २ ॥ वोही देखणा देखते वली हर समई ॥ + + + + ॥ ३ ॥ एकाजनार्दनके रासकी रहय बंदा ॥ उसकी बंदगी करते बहकिया धंदा ॥ ४ ॥

॥ ६५२ ॥ सुटला ह्मणे तो बांधला होता ॥ मुक्त ह्मणे त्याचे आंगीं बद्धता ॥ १ ॥ बद्धता नाहीं मुक्तता काई ॥ भ्रांति दोहीं ठाई झळंबतसे ॥ धृ० ॥ स्वप्नीचेनी सुखें सुखावो बैसे ॥ स्वप्नीं जागा झाला स्वप्नीची दिसे ॥ २ ॥ एकाजनार्दनीं एकपणा तुटी ॥ बद्धमोक्ष तेथें वार्ताही तुठी ॥ ३ ॥

॥ ६५३ ॥ अगा तुझी लीला आकळ कैसेनि कळे ॥ ब्रह्मा भुंगी धरूनि तुझें स्वरूप सांवळें ॥ १ ॥ तुज कैसें भजावें आपणा कांई देखावें ॥ तुज माजी राहोनी तुज कैसे सेवावें ॥ धृ० ॥ अगा तूं देवो आह्मां ह्मणसी मानवी ॥ हेम अळंकारीं वेगळें पाहावें केवीं ॥ २ ॥ एकाजनार्दन सबाह्य अंतरनादें ॥ मी तूंपणें लटिकीं स्वप्नें जेवीं जागृती बोधें ॥ ३ ॥

॥ ६५४ ॥ देवा विती एवढें पोट ॥ जगीं याचाची बोभाट ॥ भरितां न भरे दुर्घट ॥ जना कष्ट याचेनी ॥ १ ॥ पाठी लागलेंसे पोट ॥ सैरा धांवतें सुनाट ॥ स्थिति विसरलों वाट ॥ मार्ग दावी विठ्ठला ॥ धृ० ॥ या पोटाची चिंता आधीं ॥ देवधर्म पडिला सांधी ॥ पोटें पालटिली बुद्धी ॥ कैंचि शुद्धि तरावया ॥ २ ॥ कर्में करूनि षोडशी ॥ देहो जाळिला चितेसी ॥ ऐसें निष्कर्म संन्यासी ॥ ते पुडीसी मागती ॥ ३ ॥ पोटा भेणें पळाले ॥ वना नागवें पैं गेले ॥ तेही झाडा झोंबिन्नले ॥ फळें फुलें खावया ॥ ४ ॥ पोटाचे काय सांगे ॥ महेंद्र माणुसातें मागे ॥ कोणी भज तूं कां यज्ञांगे ॥ वेदू सांगे विप्रासी ॥ ५ ॥ पोटें पीडियेला काळू ॥ खाय पशु पक्षी चांडाळू ॥ इतुकें खावोनी भुकाळू ॥ प्रळय काळू पाहातसे ॥ ६ ॥ पोटें केलें उफराटें ॥ पोटासाठीं देव भेटे ॥ बैसणें सांडोनि वैकुंठे ॥ भजनी तिष्ठे तृप्तीसी ॥ ७ ॥ पोट देवाचे न धाये ॥ आपण सृजी आपण खाये ॥ खातां न धरी ममता भये ॥ अवघे खाये निपटुनी ॥ ८ ॥ विठ्ठली भानुदास भावें ॥ पोट भरा येणें देवें ॥ एकाजनार्दनाच्या नांवें ॥ क्षुधा जाय कल्पांत ॥ ९ ॥

॥ ६५५ ॥ लंकाबंदी पडले देव ॥ सुटका चिंतिताती सर्व ॥ १ ॥

रामा रामा रामा दशकंठनिकंदन रामा ॥ भवबंधविमोचना तारी कृपा करी हो मेघश्यामा ॥ धृ० ॥ वेगीं बांधोनी सत्याचा सेतू ॥ करी अधर्मा रावणाचा घातू ॥ २ ॥ थोर पसारत वासना भुजा ॥ तुज वांचुनी छेदिता नाहीं दुजा ॥ ३ ॥ अहं गर्वित रावणू ॥ छेदी सोडुनी कृपेचा बाणू ॥ ४ ॥ त्रिगुण लंका हे जाळुनी ॥ सीता प्रकृति सोडवी निजपत्नी ॥ ५ ॥ अखंड लाउनी अनुसंधान ॥ तोडी देहबुद्धि बंधन ॥ ६ ॥ अनन्य शरण जनार्दना एका ॥ त्यासी राज्य करुनी दिधले देखा ॥ ७ ॥

॥ ६५६ ॥ श्याम सनेही राग बिराग ॥ शरन मैं तुमकों बारन बार ॥ १ ॥ येतो क्षणक्षण व्यर्थ न जाय ॥ तेरे गुणानुवाद निस मैं ध्याय ॥ २ ॥ तेरे सिफत तुमसें गाय ॥ निरापेक्ष मेवे खाय अनुहन दमामें लाय ॥ ३ ॥ दोन्ही नयन मिलाय ॥ बैरागबिन नही पाय ॥ ४ ॥ चैतन्य तेज संत अखिया ॥ सच्चिद सुख तेरो मुखया ॥ ५ ॥ कुंडल मकराकार नित्य निर्विकार ॥ श्रवणे श्रवण निज सुखसार ॥ ६ ॥ निरापेक्ष नासीक शोभन ॥ प्राणे प्राण समाधान ॥ ७ ॥ अभाळ भाळ अती विशाळ ॥ बोध सुगंध शोभे चंदन और माळ ॥ ८ ॥ अजानु बाहु मुरली बजावे सार ॥ देह गेह गोपी बिसऱ्या तो नयनो नयन न मार ॥ ९ ॥ पीत पितांबर बिजली विसरी ते अस्तमान ॥ चरणीं वांकीं अंदु तोडरु गर्जे होय दुशमन हयरान ॥ १० ॥ आनंद मुरती सुरते जीवडा बली बली हार ॥ तेरो बिरह बिरहातुरही बिसऱ्या हमे संसार ॥ ११ ॥ एका जनार्दन नित्य आशक नाम पढे आर दास ॥ जीवना मरना माफ किया तो राखिया पायेनपास ॥ १२ ॥

॥ ६५७ ॥ तूंचि त्राता तूं विता ॥ तूं जननी तूं पिता ॥ जग तूं जगदीश तूं ॥ तूंचि माया मोहनी तूं ॥ १ ॥ जीव तूं जीवन तूं शिव तूं निजस्वामिया ॥ चित्त तूं चैतन्य तूं हे तूं चिदात्मया ॥ २ ॥ विषय तूं निर्विषय ॥ विषयीं विषय विषयीं तूंचि तूं ॥ बद्ध तूं मुक्त तूं ॥ बद्ध मुक्तातीत तूं ॥ ३ ॥ देही तूं विदेही तूं ॥ जें जें पाहे तें तेंही तूं ॥ जन तूं वन तूं ॥ एकाजनार्दनीं तूं ॥ ४ ॥

॥ ६५८ ॥ तें मन निष्ठुर कां केलें ॥ जें पूर्ण दयेनें भरलें ॥ धृ० ॥ गजेंद्राचे हाके सरसें ॥ धांऊनिया आलें ॥ ते मन० ॥ १ ॥ प्रल्हादाच्या भावार्थासी ॥ स्तंभीं गुरगुरलें ॥ तें मन० ॥ २ ॥ पांचाळीच्या करुणा वचनें ॥

कळवळुनी आलें ॥ तें मन० ॥ ३ ॥ एकाजनार्दन पूर्ण कृपेनें ॥ निशिदिनीं पदीं रमलें ॥ तें मन० ॥ ४ ॥

---

## विरहणी.

॥ ६५९ ॥ कसा मला टाकुनी गेला राम ॥ धृ० ॥ रामाविण जीव व्याकुळ होतो ॥ सुचत नाहीं काम ॥ १ ॥ रामाविण मज चैन पडेना ॥ नाहीं जिवासी आराम ॥ २ ॥ एकाजनार्दनीं पाहुनी डोळा ॥ स्वरूप तुझें घनःशाम ॥ ३ ॥

॥ ६६० ॥ बोला बोल विरहिणी बोले ॥ गगनीं चांदणें शुद्ध शोभलें ॥ त्यामाजीं घनसांवळा खेळे ॥ कर्मदशें वियोग झाला बळें ॥ १ ॥ दावागे दावागे कृष्णवदन ॥ विरहाचें दुःख दारुण ॥ कोण्या कर्में जालें खंडन ॥ कांहो यदुनंदन न बोले ॥ २ ॥ विरहतापें तापलें भारी ॥ कोण आतां दुजा निवारी ॥ श्रीगुरु भेटला झडकरी ॥ एकाजनार्दनीं दाविला श्रीहरी ॥ ३ ॥

॥ ६६१ ॥ विराहिणी विरहा विरहित बोले ॥ कां वो पूर्व कर्म आड ठेलें ॥ वाचें न येती नाम सांवळें ॥ तया विरहा मन माझें वेधलें ॥ १ ॥ ऐशा परी बोलती गोपी बाळा ॥ कोठें गेला नेणों सांवळा ॥ पहातां पहातां ठकविलें गोपाळां ॥ ऐसा याचा विरह लागला ॥ २ ॥ नेणों कांहीं कर्म आड ठेलें ॥ वियोग वियोगाचें वर्म ऐसें जालें ॥ एकाजनार्दनीं कौतुक बोले ॥ ऐशा दुःखा विरहिणी बोले ॥ ३ ॥

॥ ६६२ ॥ कोण्या वियोगें गुंतला कवणें हातीं ॥ परा पश्यंती मध्यमा जया ध्यातीं ॥ श्रुतिशास्त्र जया भांडती ॥ तो कां हो रुसला श्रीपती ॥ १ ॥ येई येई कान्हा देई आलिंगन ॥ भेटी देउनी पुरवी मनाचे मनोरथ ॥ विरह विरहा करी समाधान ॥ दावी तूं आपुले चरण ॥ २ ॥ येथें अपराध आमुचा नाहीं ॥ खेळ सर्व तुझा पाही ॥ एकाजनार्दनीं नवल काई ॥ एकदा येउनी भेटी देई ॥ ३ ॥

॥ ६६३ ॥ आशा मनिषाचा विरह लागला ॥ तेणें सांवळा दुरी ठेला ॥ जवळीं असोनी बोलती अबला ॥ कवणें गुणें कान्हु रुसला ॥ १ ॥

धांवे धांवे कान्हाई नंदनंदना ॥ पुरवी तूं आमुची वासना ॥ आणिक नको दुजी कल्पना ॥ विरह निवारी देई दर्शना ॥ २ ॥ छंदें छंदें विरहिणी बोले ॥ कां वो बोलण्या अबोलणें झालें ॥ एकाजनार्दनीं ऐसें केलें ॥ नंदनंदना चित्त गुंतलें ॥ ३ ॥

॥ ६६४ ॥ काम क्रोध वैरी हे खळ ॥ लोभ अहंकार आशा बरळ ॥ कर्म बळीवंत लागलें सबळ ॥ तेणें वेधिलें आमुतें निखळ ॥ १ ॥ नको नको वियोग हरी ॥ येई येई तूं झडकरी ॥ आह्मां भेटे नको धरूं दुरी ॥ वियोग झाला तो आवरी ॥ २ ॥ तुझिया भेटीचें आर्त मनीं ॥ या कारणें विरह बोलणें वाणीं ॥ एका शरण जनार्दनीं ॥ वियोग गेला पहातां समचरणीं ॥ ३ ॥

॥ ६६५ ॥ समचरणीं मन माझें वेधलें ॥ तें वेगळें होता विरह बोलें ॥ हर्षामर्षा चित्त उन्मन ठेलें ॥ ह्मणोनी विरहिणी विरह बोले ॥ १ ॥ सावळिया कान्हया नको जाऊं दुरीं ॥ राहे परे परता परतोनी हरी ॥ पश्यंती मध्यमा मारुनी वैखरी ॥ चारी वाचा तटस्थ झाल्या हरी ॥ २ ॥ तुझ्या वियोगाचा न व्हावा संग ॥ अखंड नामीं असो अनुसंधान ॥ शरण एकाजनार्दन ॥ काया वाचा मनें जाणोन ॥ ३ ॥

॥ ६६६ ॥ नको नको दूर देशीं ॥ आह्मां ठेवी चरणापाशीं ॥ मग या विरहा कोण पुसी ॥ ऐसी इच्छा देई आह्मांसी ॥ १ ॥ पुरे पुरे संसारविरह छंद ॥ तेणें तूं अंतरसी गोविंद ॥ द्वैताचा नको देऊं बाध ॥ हृदयीं प्रगटोनी दावी बोध ॥ २ ॥ विरह हरी सत्वर देवराया ॥ परे परता प्रगटोनी दावी पाया ॥ दुजें मागणें आणिक नाहीं काह्मा ॥ एका जनार्दनीं शरण तुझिया पाया ॥ ३ ॥

॥ ६६७ ॥ जन्म जन्मांतरीं विरहिणी ॥ होती दुश्चित अंतःकरणीं ॥ दुःख सोशिलें होतें मागील जन्मीं ॥ ये खेपें निरसलें स्थूळ कारणीं ॥ १ ॥ येउनी भेटो देहीं देहातीत ॥ तयाचा विरह मज लागीं होत ॥ मना समूळ मन पहात ॥ तो भेटला गोपिनाथ ॥ २ ॥ दुःख फिटलें सुख झालें थोर ॥ हर्षें आनंदें आनंद तुषार ॥ एकाजनार्दनीं भेटला परात्पर ॥ तेणें संसार विरह गेला निर्धार ॥ ३ ॥

॥ ६६८ ॥ मागें विरह बहुताशीं झाला ॥ संसार श्रम वांया केला ॥

क्षणभरी विश्रांति नाहीं मला॥ तो सद्गुरु जीव भेटला ॥ १ ॥ आतां विरहाची सरली गोठी ॥ डोळेभरी पाहिला जगजेठी ॥ जाउनी चरणीं घालावी मिठी ॥ विरह गेला समूळ दृष्टी ॥ २ ॥ एकाजनार्दनीं पहातां आनंदलें ॥ जन्म जन्मांतरींचें दुःख फिटलें ॥ विरहाविरहें हर खुंटले ॥ काया वाचा मनें वेधलें वो ॥ ३ ॥

॥ ६६९ ॥ वेधला जीव माझा भेटवा श्रीरंग ॥ सर्व सांडीयेला मोह ममता संग ॥ जिवीं जिवलग झाला अनंग॥ भेटवा भेटवा मज श्रीरंग॥ १ ॥ ऐशी विरहिणी बोले बोली ॥ कां रे हरि तूं सांडी केली ॥ धृ० ॥ समभाग तुज पहावया ॥ मन आमुचें गुंतलें देवराया ॥ तूं तंव मध्यें घालिसी माया ॥ नको आतां विरह पाया ॥ २ ॥ आमुचा विरह कोण निवारी ॥ विरहिणी बोले ऐशिया परी ॥ एकाजनार्दनीं विनवी श्रीहरी ॥ जन्ममरणाचा विरह निवारी ॥ ३ ॥

॥ ६७० ॥ बहुत जन्में विरहें पीडली ॥ नेणों कैशी स्थिर राहिली ॥ मन आशा गोविंदी वेधली ॥ तो मध्यमा वैखरीये गुंतली वो ॥ १ ॥ चारी वाचा परता सांवळा ॥ विरहिणीसी छंद साचा लागला ॥ चौ परता कोठें गुंतला ॥ तें नेणों आह्मीं अबला वो ॥२॥ विरह जाईल कैशापरी ॥ पूर्वपुण्य सुकृत पदरीं ॥ एकाजनार्दनीं भेटेल हरी ॥ तैं विरह नोहे निर्धारीं वो ॥ ३ ॥

॥ ६७१ ॥ ऐशी निर्धारें विरहिणी करी ॥ परे परता देखेन श्रीहरी ॥ मन पवन साधन न करी ॥ संत संग घडलिया धन्य संसारीं ॥ १ ॥ धन्य धन्य संत महिमा ॥ विरह गेला पावलें सुख धामा ॥ धृ० ॥ नाम विरहित विरह तो कोण ॥ विषयविरह थुंकीन मी जाण ॥ नामावांचुनी तेणें साधन ॥ तो विरह न व्हावा पूर्ण ॥ २ ॥ एकाजनार्दनीं सत्य वचन ॥ विरहा विरह गेला मुळीहून ॥ नाम जपतां स्थिर जालें मन ॥ विरह गेला त्यागुन ॥ ३ ॥

॥ ६७२ ॥ विषय विरह गुंतेल संसारीं ॥ तया जन्म जन्मांतरीं फेरी ॥ कोणी न सोडवी निर्धारीं ॥ या लागी न गुंता संसारीं ॥ १ ॥ मज सोडवा तुह्मी संतजन ॥ या विषय विरहा पासोन ॥ धृ० ॥ क्षणिक विषय संसार ॥ भरला दिसे भव सागर ॥ यांतुनी उतरी पैल पार ॥ संत संग मिळालिया

माहेर ॥ २ ॥ यांसी शरण गेलिया वांचुनी ॥ संत संग न जोडे त्रिभुवनीं ॥ शरण एकाभावें जनार्दनीं ॥ विरह गेला समूळ निरसोनी ॥ ३ ॥

॥ ६७३ ॥ युगायुगीं पीडिली विरहिणी ॥ नाठवी ध्यानीं मनीं चक्रपाणी ॥ ह्मणोनी वियोगाची जांचणी ॥ तो भेटला संत संग साजणी ॥ १ ॥ विरह गेला सुख झालें अपार ॥ जन्मोजन्मींची तुटली वेरझार वो ॥ धृ० ॥ घडतां संत संग विश्रांती ॥ तुटली माया पडळ भ्रांती ॥ भव संसार याची जाली शांती ॥ संत महिमा वर्णावा किती ॥ २ ॥ महिमा वर्णितां विरहा फिटलें ॥ एकाजनार्दनीं तया भेटलें ॥ सुख अनुभवें अंतरीं दाटलें ॥ विरहाचें बीज भाजिलें वो ॥ ३ ॥

॥ ६७४ ॥ अनुतापें विरहिणी बैसे ॥ कां वो कर्म बलिवंत दिसे ॥ संग विवर्जित मज झालें ऐसें ॥ कोणे योगें भेटी नसे ॥ १ ॥ मज भेटवा संत संगती ॥ तेणें निवारेल सर्व भ्रांती ॥ धृ० ॥ विरहें बहुत पीडिली बाळा ॥ कोण शांतवी तया अवला ॥ श्रीरंग वेध जीवीं लागला ॥ तया भेटलिया सुख होईल जिवाला ॥ २ ॥ नेणें आप परावें दुजें कांहीं ॥ विरहें विरह जडला हृदयीं ॥ कोण सोडवी गुरु मज देहीं ॥ या विरहा अंतपार नाहीं ॥ ३ ॥ ऐसा विरह करितां दुःख ॥ दैवयोगें घडलें संत सुख ॥ तापत्रय विरह गेला देख ॥ सुखें सुख अपार झालें देख ॥ ४ ॥ संत संगें निरसे विरह ॥ पावन देह झाला विदेह ॥ एकाजनार्दनीं आनंद पाहे ॥ विरह निरसला सुख झालें गे माय ॥ ५ ॥

॥ ६७५ ॥ भिन्न माध्यानीं रात्रीं नारी ॥ विरह करी बैसोनि अंतरीं ॥ केधवा भेटेल श्रीहरी ॥ तों नवल झालें अंतरीं वो ॥ १ ॥ अवचित घडला संत संग ॥ विरहाचा झाला भंग ॥ तुटोनी गेला द्वैत संग ॥ फिटला जन्म मरणाचा पांग वो ॥ २ ॥ एकाजनार्दनीं संत संग ॥ फिटला संसाराचा राग ॥ विरह गेला देहत्याग ॥ सुखें सुख झालें अनुराग वो ॥ ३ ॥

॥ ६७६ ॥ येई वो श्रीरंगा कान्हाबाई ॥ विरहाचें दुःख दाटलें हृदयीं ॥ कोण सोडवील यांतून पाही ॥ दैवयोगें सांपडला सगुण देहीं ॥ १ ॥ सगुण निर्गुण याचा वेध ॥ वेधें वेधलें मन झालें सद्गद ॥ वाचा कुंठित हरपला बोध ॥ नेणें आणिक परमानंद ॥ २ ॥ अस्थिरीं स्थिर मति

झाली ॥ वृत्ति विरक्ति हारपली ॥ समाधि उन्मनी स्थिरावली ॥ ऐशी विरहाची मति ठेली वो ॥ ३ ॥ संगविवर्जित मन झालें ॥ काया वाचा मन चित्त ठेलें ॥ एकाजनार्दनीं ऐसें केलें ॥ विरह दुःख निरसिलें वो ॥ ४ ॥

॥ ६७७ ॥ रात्रंदिवस मन रंगलें ॥ हरिचरणीं चित्त जडलें ॥ विरहाचें दुःख फिटलें ॥ धन्य झालें संसारीं ॥ १ ॥ विरह गेला सुख झालें वो माय ॥ पुढतोपुढती आनंद न समाय ॥ धृ०॥ संतसंग घडला धन्य आजी ॥ मोह ममता तुटली माझी ॥ भ्रांति फिटोनी गेली सहजीं ॥ विरह गेला सुख झालें आजी ॥ २ ॥ धन्य संत संगती ॥ अवघी झाली विश्रांती ॥ एकाजनार्दनीं चित्तीं ॥ विरह भ्रांती निरसली वो ॥ ३ ॥

॥ ६७८ ॥ जातीं कुळ सांडिलें आह्मी वेगीं ॥ माया माहेर त्यजिलें तुज लागीं ॥ अंग समर्पिलें अंगींचें अंगीं ॥ देखी रतलासी दासीं कुबजे लागोनी ॥ १ ॥ सरसर निर्गुणा तूं अगुणाचा हरी ॥ जवळी असतां कैसा झालासी दुरी ॥ चित्त विटतें चिंतितां निरंतरीं ॥ मन मावळलें न दिसे दृश्याकारी ॥ २ ॥ एक ह्मणती गे चला मांडूं रासू ॥ झणी उगवेल मायामय दिवसू ॥ दैवें जोडला गे कृष्ण राजहंसू ॥ शोध निज तत्त्व सांडुनी आळसू ॥ ३ ॥ तुजसाठीं त्यजिला देहसंग ॥ तुजविण विटला विषय भोग ॥ जळो तुझा उपदेश सांगसी योग ॥ आह्मां देई सप्रेम संभोग ॥ ४ ॥ एक ह्मणती गे सांडा शब्द आटी ॥ शब्दें नातुरे कोरड्या ज्ञानगोष्टी ॥ आजिचा सुदीन झाल्या कृष्णभेटी ॥ हरुषें निर्भर स्वानंदें भरली सृष्टी ॥ ५ ॥ एक ह्मणती गे सांडा शब्दज्ञान ॥ देहीं जोडिलें कायसें आतां ध्यान ॥ भज भज काय झालें भजन ॥ गेली त्रिपुटी मिथ्या मोक्ष बंधन ॥ ६ ॥ गोपी मंडळी मिळाली कृष्णापासीं ॥ जैशा रश्मी मिळाल्या रविबिंबासी ॥ कृष्ण भोगितां नाठवे दिननिशीं ॥ एकाजनार्दनीं ऐकतां सप्रेमेंसी ॥ ७ ॥

॥ ६७९ ॥ कवन गुन मानस विमोही ॥ दस्यान देखत बेधि ॥ कबरी बंध काहेन बांधे ॥ कवण सुंदरें लिन्ही बुद्धि ॥ १ ॥ कवण संताप संतावे सहेली दिनरात ॥ काहेन जाणें काहेमौन न बोली बुद्धि संतावे द्वैत ॥ न भावे निश्चळ काहेनिवांता गुणातित ॥ अगुणी पर पुरुषु तीनमे राहारिया चित्त ॥ २ ॥ जे भोग भोगणें जाउ बहिणी आगुणीते मोह पैसे ॥ ते कारण मयनी कर्म भयिली एकाजनार्दनु दिसे ॥ ३ ॥

॥ ६८० ॥ स्थिररे माधव विचारु धरी ॥ आह्मी परापर नारीरे ॥ धृ० ॥ वासना वास अलक्ष लक्षुनी ॥ देहाची करिसी चोरीरे ॥ १ ॥ आकंठ मग्न सुनिरी निरी घनसांवळा देखोनी तिरी ॥ येथुनी निघतां लाज मोठी विनोदु न करी हरी ॥ २ ॥ लाज सांडुनी न धरा चरण तंव मी नव्हे प्रसन्न ॥ एकाजनार्दनी निःशंक झाल्या जाणोनी जीविची खुण ॥ ३ ॥

॥ ६८१ ॥ पगरे पगये बली बली जाऊं ॥ गोविंद जे घर ल्यावेंरे ॥ १ ॥ जन्म जन्मको बैरी अक्रुर ॥ स्मरतें देह संतावेंरे ॥ धृ० ॥ आजि कवने परी रही आवेंरे ॥ गोपी और नभावेंरे ॥ २ ॥ शामसुंदर बजावत बेनू ॥ स्मरते जिऊं जिवावेंरे ॥ ३ ॥ जीव मोहन करी गयो कान्हा ॥ दृश्य मात्र भयो हरीरे ॥ ४ ॥ गोकुलमाही और न दिसे ॥ कृष्ण स्वरूप नरनारीरे ॥ ५ ॥ ऐसी देखत देखत रयनी बीनसी ॥ दृश्या चकित भया नयनारे ॥ ६ ॥ चिदानंदीय आनंद पाईये ॥ स्मरते एका जनार्दनरे ॥ ७ ॥

॥ ६८२ ॥ देह गेह कर्म सारुनी ॥ सेजे पहुडलें निज समाधानी ॥ कृष्ण वेणुगीत पडे श्रवणीं ॥ वृत्ति उचलली भेटीलागुनी ॥ १ ॥ जीवीं लागले हरीचें ध्यान ॥ कांहीं केलिया न राहे मन ॥ प्रेम पडी भरे येतें स्फुंदन ॥ हरिचरणीं तों वेधलें मन ॥ २ ॥ लाज सांडूनिया जालीयें निर्लज्ज ॥ सासु सासऱ्यासी नाहीं काज ॥ माया माहेर सांडिलें सहज ॥ हरि चरणीं तों वेधलें निज ॥ ३ ॥ चिदाकाशीचें स्वच्छ चांदणें ॥ कृष्ण पूर्ण चंद्र प्रभा पूर्णपणें ॥ ध्याता ध्यान खुंटलें तेणें गुणें ॥ एकाजनार्दनीं सहजपणें ॥ ४ ॥

॥ ६८३ ॥ कृष्ण मीने आरत गोपी ॥ जमुना न्हावत पैठीहो ॥ स्नान करते आन भई ॥ स्वयें कृष्णु होये उठी हो ॥ १ ॥ हय हय जमुना यह का किन्हा ॥ स्त्रिपुरुष भाव खुधोरे ॥ जात पीत वस्त्र हमही कृष्ण ॥ भय अंग संग सबही झुठ्यारे ॥ २ ॥ अंग तेही कान्हा संग तेही कान्हा ॥ रंग भोगतेही कान्हरे ॥ विविध भोगविषय तेही कान्हा ॥ सबाह्य अभ्यंतर कृष्णरूप भई चीत भयो चैतन्यरे ॥ ३ ॥ बहुरी घरमे कैसी जाऊं ॥ मारग कृष्ण स्वरूप ॥ निज पति पुतय गयीया बछवा ॥ सबही भय ब्रह्मरूप ॥ ४ ॥ मथुरा जाऊं तो विपरित भान ॥ सो मथुराही दिसे चैतन्य ॥ आब जावा बहु मार्ग खुंटे ॥ निजरूपें स्वानंदघन ॥ ५ ॥ अंग संग बिन

नित निजानंद ॥ पग पग परमानंदरे ॥ एकाजनार्दनीं येक रूप भई ॥ त्रैलोक्य आनंदकंदरे ॥ ६ ॥

॥ ६८४ ॥ देखी मुख भया सुख ॥ विसऱ्या सबही दुःखरे माधव ॥ १ ॥ भुलीरे ग्वाल मैं तेरो नादों तेरे बोधों ॥ तेरे छंदो तेरे बोधोरे ॥ २ ॥ मनसा शून्य गमागम ॥ एकापायी जो जनार्दन ॥ ३ ॥

॥ ६८५ ॥ अरे भाई दरखणियां ॥ जोवा गोपी निखऱ्यारे ॥ तीहा तजीयतो शकट मे परिवार ॥ १ ॥ मा दंडू बाजेरे वेणु सुहावणो ॥ कांहीं कांहीं गायी येतो शामजीनो ॥ रास मऱ्हाटा करिया ॥ २ ॥ अरे भाई घररे ॥ मंदिर मनथें विसऱ्यारे ॥ विसऱ्या तो गोखळ गामी ॥ ३ ॥ अरे भाई सेखामेखा सहजे मिलीयोरे ॥ सबही लोकडाऱ्यांनो आंतर जामीरे ॥ + + + + ॥ ४ ॥

॥ ६८६ ॥ अरे भाई रास रमवा गोपी बिखऱ्यारे ॥ तिहा जोवाने काज जगनाथ ॥ धृ० ॥ वासली वाजेरे प्रेम सरागिणी ॥ १ ॥ कांहीं कांहीं ध्याई येतो शामजीनो भावरे ॥ कांहीं कांहीं गायी येतो शामजीनो नामरे ॥ २ ॥ अरे भाई जनार्दनी एका मिलीयोरे ॥ एकपण तो तिहां न समायेरे ॥ ३ ॥

॥ ६८७ ॥ द्वैत वाडा दुहावा करुनी ॥ कीं गगनकुंभ पूर्ण भरिला ॥ सायुज्य मथुरे स्वगृहा येतां ॥ कीं भक्तीमाजी भेटला ॥ धृ० ॥ मागा बहु खेपा केलिया ॥ तै कृष्णें डोळा चुकविला ॥ जाती कुळ माझें बुडविलें ॥ वो येणें अगुणी परपुरुष आमु लागें मायें ॥ १ ॥ पातला गे माये काय करूं आतां ॥ केवी मी आलिये येथें ॥ मागा सरों नये पुढें रिघो नये ॥ ठकलिये पडलिये तटस्थ आतां ॥ २ ॥ नांवरूप माझें बुडविलें वो येणें ॥ घराचार शून्य समस्त ॥ सन्मुख पाहतां विस्मय होत ॥ कीं तो उलंघवेना हृदयस्थ ॥ ३ ॥ माझारि इये कडे ॥ विचारू तोही बुडे ॥ देहाचें पुरलेंपणें ॥ विदेही होऊनियां जावो पाहे तंव ॥ गगन गिळियलें येणें गे माय ॥ ४ ॥ नेत्र लावी तंव अंतरीं दिसे ॥ उघडितां लाजा सळवी जगाचिये दृष्टी ॥ देखणा देखतां ॥ आंवळांसी हा चालवी ॥ पितामहाचा पिता ॥ भानुदासु तत्वता ॥ त्याणें या उगविलीया गोपिकांही वऱ्होनिया निश्चळ ॥ एका जनार्दनु अनुभवी गे माये ॥ ५ ॥

॥ ६८८ ॥ प्रेम सिदोरी घेऊनी माथां ॥ पाहातिसें तया कांता ॥ तंव तो भेटला अवचिता ॥ नंदा गोरुवें राखा ॥ १ ॥ तेणें वेधिलें मानस ॥ काय सांगो सखीये ॥ आप परुतीये पारुषली ॥ काया माया द्वैतातित ॥ आपणची समस्त ॥ सबाह्य नांदत विश्व भोगुनी कैसा ॥ २ ॥ निर्धारु जंव पाहे ॥ तंव तो गोवळू नव्हें माये ॥ नभ व्यापुनी कोंदला आहे ॥ सकळा माजी ॥ एका जनार्दना शरण ॥ कैचा पडिपाडू ॥ प्रेम भोगितां सुखाडू ॥ कृष्ण ऐक्य जालें ॥ ३ ॥

॥ ६८९ ॥ सुंदर परिसोनी पाहों गेलीये ॥ तंव सौंदर्या भरिला धोंदू ॥ पाहतां पाहणेंपणें उरो नेदीचिया ॥ देखणेंपणाचा शेवटु रे या ॥ धृ० ॥ सुंदर पाहतां अवघड भारी ॥ नवल सुंदराची परी ॥ वेगळेंपणें कैसा दरुशन नेदी ॥ मा देखणेंपणा कैची उरी रे या ॥ १ ॥ सौंदर्य पाहतां सौंदर्य नेलें शेखीं अंगाचाही अभावो ॥ ज्ञाता ज्ञान ज्ञेय ज्ञेयी हारपलें पाहाणेंपणा कैचा ठावो रे या ॥ २ ॥ एका जनार्दनी ॥ सौंदर्या लाधोनी ॥ सुंदरी विगुंतलें मन ॥ आपुलेंपणें तेथें उरोंच नेदी ॥ नामरूपा घातलें शून्य रे या ॥ ३ ॥

॥ ६९० ॥ गोकुळीं एकी वृद्धा ॥ सुन राखें सदा ॥ ह्मणोनी गोविंदा ॥ रातसी झने ॥ धृ० ॥ येणें गोकुळ विटाळिलें ॥ एकाकार केलें ॥ ऱ्यां असे चुकविलें ॥ आपुलें कुळ ॥ १ ॥ येरी ह्मणे मनीं ॥ ईते काळु नेणी ॥ कृष्णसुखा धणी ॥ घेऊं नेदी ॥ २ ॥ तिचें आसावले नयन ॥ उताविळ मन ॥ लोटत स्फुंदन ॥ कामासी ॥ ३ ॥ सर विकट त्याची खोडी ॥ रातलीया आवडी ॥ विषय भोगी गोडी ॥ आपुली लावी ॥ ४ ॥ नवल याची गती ॥ नाहीं दिवस राती ॥ लोकांतु येकांती ॥ भोगीतुसे ॥ ५ ॥ अगे हा मोकाटू नलजे ॥ यासी नाहीं दुजें ॥ भोगितां माझें तुझें ॥ उरो नेदी ॥ ६ ॥ कृष्णरूपा विरहिणी ॥ म्हणतां हे कामिनी ॥ सुखासी वैरिणी ॥ आड येते ॥ ७ ॥ तिशी धरितां न धरे धिरा ॥ कांपतसें थरथरा ॥ नयनीं लोटती धारा ॥ प्रेम भावें ॥ ८ ॥ येरी असुवें देखोनी डोळां ॥ ह्मणे घेतला चाळा ॥ रातली या गोवळा ॥ भले नव्हें तुज ॥ ९ ॥ ऐसा दोहींचा अनुवादू ॥ करिताती वेवादू ॥ अंतरीं गोविंदू ॥ परिसतां हे ॥ १० ॥ गुणाचें धोंगतें ॥ घेउनी उभा तेथें ॥ तया दोघी तयातें ॥ न देखती ॥ ११ ॥ ऱ्यां गोकुळ उद्धरावें ॥ घेतलें स्वभावें ॥ मग इहीं राहावें ॥ वेगळें कैंवी

॥ १२ ॥ ऐसें विचारुनी जिवीं ॥ तो विश्व लाघवी ॥ प्रकटला स्वभावीं ॥ स्वयंसिद्ध ॥ १३ ॥ दोघीसी अलक्षिता ॥ नाहीं देखीला येता ॥ रिघाला अवचिता ॥ नेणों कैसें ॥ १४ ॥ घालुनी डोळे डोळां ॥ खुणाविली ते बाळा ॥ ते ह्मणे सांवळा ॥ कैसेनी आलागे ॥ १५ ॥ तेथें सेव्य सेवकपणीं ॥ फेडुनिया गवसणी ॥ तया दोघा मिळणी ॥ दोही विण ॥ १६ ॥ साखरेची गोडी ॥ साखरेसी उघडी ॥ यापरी आवडी ॥ येकी झाली ॥ १७ ॥ एकपणें कांहीं ॥ पहाते पहाणें नाहीं ॥ स्वानंदुची ठायीं ॥ मुसावला ॥ १८ ॥ तेथें न दिसे कृष्णभोज ॥ नाहीं शेज बाज ॥ सुखची सहज ॥ सुखरूपें ॥ १९ ॥ नाहीं सन्मुख पाठिमोरें ॥ विचारें वृत्ति विरें ॥ स्वरूप एकसरें ॥ स्वरूपपणें ॥ २० ॥ वृद्ध वृद्धें बोधु जाला ॥ घेती असे सांचला ॥ ह्मणे नाहीं कीं आला ॥ कान्हया येथें ॥ २१ ॥ हळुची येउनी भीतरीं ॥ पाहातीसें अंतरीं ॥ दोघें सेजेवरी ॥ एक सुख ॥ २२ ॥ देखोनीया दिठी ॥ धांवोनी घातली मिठी ॥ ह्मणे तुझी गोठी ॥ यशोदे सांगो ॥ २३ ॥ आह्मा जाती वेगळें केलें ॥ कुळ आकुळीं ठेलें ॥ नांवरूप गेलें ॥ तुझेनी संगें ॥ २४ ॥ धरुनी अहंबळें ॥ नेवो नंदा जवळें ॥ तंव तेजची सांवळें ॥ दाही दिशा ॥ २५ ॥ ह्मणे अगे माये ॥ गोकुळा जालें काये ॥ माझी मजची पाहे ॥ शुद्धि नाहीं ॥ २६ ॥ याचेनी उजियेडे ॥ न दिसे मागें पुढें ॥ पाहत पाहत वेडे ॥ केलें मज ॥ २७ ॥ कटकटारें डिंगारा ॥ उरों नेदिसी संसारा ॥ एरव्ही करिते डांगोरा ॥ तुझा जगामाजी ॥ २८ ॥ धरुनी भावाचेनी नेटें ॥ वोढी भजन वाटे ॥ पुढें यशोदा भेटे ॥ तेणें रूपें ॥ २९ ॥ कृष्णसुखाचा आनंदू ॥ तोची देखें नंदू ॥ ह्मणतीसे गोविंदू ॥ धरिला म्यां ॥ ३० ॥ आरुतें वो करी त्यातें ॥ पाहों दे आमुतें ॥ लपतुसें दृश्यातें ॥ आड करुनी ॥ ३१ ॥ तेथें केला चमत्कारू ॥ वृद्धेचा कुमरू ॥ भाजेचा भ्रतारू ॥ होउनी ठेला ॥ ३२ ॥ कृष्ण प्रीतीकर ॥ पाहती नारीनर ॥ तेथें मायेसी मरमर ॥ होती असे ॥ ३३ ॥ येरी ह्मणे तुह्मा आलासे कवळू ॥ ह्मणा माझा बाळू ॥ प्रत्यक्ष गोपाळू ॥ निरुते पाहा ॥ ३४ ॥ तो पितामहाचा पिता ॥ सुभानु जाला आतां ॥ कृष्णावांचुनी कथा ॥ करूं नेदी ॥ ३५ ॥ एका जनार्दनीं ॥ बुझाविल्या दोन्ही ॥ गोकुळ अवघेनी ॥ कृष्ण एकू ॥ ३६ ॥

॥ ६९१ ॥ हरि माझ्या मंदिरीं कधीं तरी याल ॥ धृ० ॥ येतां जातां रोखोनी पहातां ॥ वाईट तुमची चाल ॥ १ ॥ मंचकीं शेज पुष्पांची केली ॥

परिमळू सुगंधी घ्याल ॥ २ ॥ एका जनार्दनीं पूर्ण कृपेनें ॥ मोक्ष पदासी न्याल ॥ ३ ॥

॥ ६९२ ॥ रमणी चिमणी मूर्ति हरीची ॥ केव्हां पाहीन बरी गोजिरी ॥ धृ० ॥ चौशून्याच्या झळके माथां ॥ झग मग झग मग ज्योत तिची ॥ १ ॥ जीव दशामय अंगुष्ट प्रमाण ॥ त्यावरी ओतिली मूस तिची ॥ २ ॥ जनी जनार्दन विश्व व्यापुनी ॥ जननी ती एकनाथाची ॥ ३ ॥

॥ ६९३ ॥ मशी बोलकीं रे गिरिधारी ॥ नट नाटक मोठा हरी ॥ धृ० ॥ कृष्णा गुज गुज गोकुळीं उठली ॥ तुझी माझी संगत तुटली ॥ १ ॥ तुझ्या भुललें मंजुळ बोला ॥ तुझ्या पायीं जीव अर्पण केला ॥ २ ॥ राधे घडी घडी भरूं नको रागें ॥ एवढा क्रोध सांडी मागें ॥ ३ ॥ कृष्णा काय करूं दैवाला ॥ कोण्या सवतीनें घातच केला ॥ ४ ॥ मन मिळालें ऐसें मना ॥ एका भुललें जनार्दना ॥ ५ ॥

॥ ६९४ ॥ लोभ हरीचा लटिका गे । बाई लाउनी गेला चुटका गे ॥ धृ० ॥ ऐसें जरी मज ठाऊक असतें । जाउनी धरितें पटका गे ॥ १ ॥ कंस वधावया मथुरेसी गेला । आतां कैची सुटका गे ॥ २ ॥ शहाणा उद्धव घेउनी आला । कागदाचा कुटका गे ॥ ३ ॥ एकनाथ प्रभु अंतरयामीं । भाव धरा तुह्मी निका गे ॥ ४ ॥

॥ ६९५ ॥ बरी नव्हे कृष्ण संगती ॥ सखे बुडविले स्वयें सांगाती ॥ धृ० ॥ कृष्ण देखतांचि गेलें ज्ञान ॥ तेणें बुडविलें सर्व महिमान ॥ १ ॥ मायेचा करविला वधू ॥ स्वयें बुडविले शमदमादिक बंधू ॥ २ ॥ एकाजनार्दनीं ख्याती ॥ ज्ञान अज्ञान दोन्ही जाती ॥ ३ ॥

---

## नामस्मरणबोध.

॥ ६९६॥ ज्ञान वैराग्य कावडी खांदीं ॥ शांति जीवन तयामधीं ॥ १ ॥ शिवनाम तुह्मी घ्यारे ॥ शिवस्मरणीं तुह्मी रहारे ॥ २ ॥ हरिहर कावड घेतली खांदीं ॥ भोंवतीं गर्जती संत मांदी ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं कावड बरी ॥ भक्ति फरारा तयावरी ॥ ४ ॥

॥ ६९७ ॥ करितां हरि कथा श्रवण ॥ स्वेद रोमांच नये दारुण ॥ रुका

वेंचितां प्राण ॥ जाऊं पाहे ॥ १ ॥ द्रव्य दारा लोभ अंतरीं ॥ हरिकथा वरी वरी ॥ बीज अग्नी माझारी ॥ विरुढे कैसें ॥ २ ॥ टाळी लावुनीयां जाण ॥ दृढ घालिती आसन ॥ अंतरीं तों ध्यान ॥ वल्लभेचें ॥ ३ ॥ धन लोभाचा वोणवा ॥ तेणें जाळिलें जीवभावा ॥ हरिकथेचा करी हेवा ॥ लोका रुढी ॥ ४ ॥ धनलोभीं आसक्तता ॥ हरिकथा करी वृथा ॥ तयासी तो परमार्थ तत्त्वतां ॥ न घडे जाणा ॥ ५ ॥ एकलीच कांता ॥ नाश करी परमार्था ॥ तेथें धन लोभ येतां ॥ अनर्थचि होय ॥ ६ ॥ एकाजनार्दनीं ॥ काम क्रोध लोभ तिन्ही ॥ द्रव्य दारा त्यजोनी ॥ नित्य तो मुक्त ॥ ७ ॥

॥ ६९८ ॥ संत संगें अंतरंगें नाम बोलावें ॥ कीर्तन रंगीं देवा सन्निध सुखें डोलावें ॥ १ ॥ सगुण चरित्रें परम पवित्रें सादर वर्णावीं ॥ निराभिमानें सज्जन वृंदें आधीं वंदावीं ॥ २ ॥ भक्ति ज्ञानाविरहित गोष्टी इतरा न कराव्या ॥ मनोभावें वैराग्याच्या युक्ति जोडाव्या ॥ ३ ॥ जेणें हृदयीं सत्वर मूर्ति ठसावे हरीची ॥ ऐशी कीर्तन मर्यादा आहे या संता घरची ॥ ४ ॥ श्रवण मननें अद्वैत भजनें वाजवी कर टाळी ॥ एका जनार्दनीं मुक्ति झाली तत्काळीं ॥ ५ ॥

॥ ६९९ ॥ आयुष्य जातें पळ पळ तुजला कैसें कळेना ॥ दो दिवसांची तनु हे साची आलासी रे पाहुणा ॥ १ ॥ चौसष्ट घडी यां माजीं रात्र गेली समजेना ॥ आयुष्य खातो काळ तुह्मी राम कां रे ह्मणाना ॥ २ ॥ नरदेह पांचांचा आणिलासे उसना ॥ कांहीं स्वहित करी व्यर्थ कां रे वल्गना ॥ ३ ॥ राम दृढ धरशील तरी तुटेल यातना ॥ भ्रांति माया काढी नको पडूं बंधना ॥ ४ ॥ वाल्मीक तरला उलट्या नामस्मरणा ॥ एका जनार्दनीं ह्मणे जाई साधुदर्शना ॥ ५ ॥

॥ ७०० ॥ जीवामाजीं घालुनी जीव ॥ परिसा अर्थ तो गौरव ॥ १ ॥ तैं सिद्धि पावे कार्य सर्व ॥ भव विभव निवारे ॥ २ ॥ व्यापक तो सर्व देशीं ॥ भरुनी उरला सर्व साक्षी ॥ ३ ॥ राम व्यापकु सर्व देशी ॥ ऐशी कल्पना जयासी ॥ ४ ॥ जळीं स्थळीं राम भरला ॥ एका जनार्दनीं देखिला ॥ ५ ॥

॥ ७०१ ॥ मन करुनीया सावध ॥ वाचें स्मरे तूं गोविंद ॥ १ ॥ तेणें साधे सर्व काज ॥ सकळ साधनांचें निज ॥ २ ॥ मन धरी एक मुष्टी ॥

वाचें जपे नाम गोष्टी ॥ ३ ॥ मन धांवे भलतीकडे ॥ साधन वांया जाय कोडें ॥ ४ ॥ मन आवरुनी साधन ॥ तेणें पावसी निज खूण ॥ ५ ॥ खुण संतावांचूनी ॥ एका जनार्दनीं ध्यानीं ॥ ६ ॥

॥ ७०२ ॥ संसारीं आलीया प्राणी ॥ तया यमाची जाचणी ॥ अंतीं तयासी निर्वाणीं ॥ कोणी नाहीं ॥ १ ॥ करी नामाचें स्मरण ॥ तेणें तुटेल बंधन ॥ काया वाचा मनें जाण ॥ संता शरण जाई ॥ २ ॥ नासती पापें होय होळी ॥ विठ्ठल नामें वाजवी टाळी ॥ कळीकाळ पाया तळीं ॥ वैष्णवा सांगातें ॥ ३ ॥ भाव धरी बळकट ॥ आशापाश तोडी नीट ॥ रामनाम जपे स्पष्ट ॥ यातना ते चुकती ॥ ४ ॥ सोस करीं नामाचा ॥ आणीक शीण उगाचि साचा ॥ एकाजनार्दनीं ह्मणे वाचा ॥ राम नाम गाये ॥ ५ ॥

॥ ७०३ ॥ दुस्तर सायास न करी ॥ वाचें ह्मणे हरि हरी ॥ वैकुंठ पायरी ॥ सोपी तेणें ॥ १ ॥ तें नाम विठोबाचें ॥ सुलभ वदे कां रे वाचें ॥ अनंत जन्मांचे ॥ दोष जाती ॥ २ ॥ प्रचीत पाहे अर्ध क्षण ॥ नाम उच्चारी रे जाण ॥ तेणें तुटे भवबंधन ॥ यमदूताचें ॥ ३ ॥ नाम घेतां उठाउठी ॥ पातकाच्या पळती थाटी ॥ पूर्वज उद्धरती कोटी ॥ बेताळीसा सहित ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं प्रेम ॥ गाई तूं विठ्ठल नाम ॥ आणीक सोपें वर्म ॥ नाहीं नाहीं ॥ ५ ॥

॥ ७०४ ॥ भाव धरी कां रे साचा ॥ उच्चार करी नामाचा ॥ पंथ विठोबाचा ॥ दृढ धरी ॥ १ ॥ विठ्ठल विठ्ठल वाचें ॥ वदे कांरे तूं साचें ॥ दोष जातील जन्माचे ॥ संदेह नाहीं ॥ २ ॥ आळस न करी क्षणभरी ॥ वाचें उच्चारी श्रीहरी ॥ यम यातना बोहरी ॥ तेणें होय ॥ ३ ॥ भक्ति दृढ धरी नामीं ॥ पडूं नको वाउगा श्रमीं ॥ विठोबाचे नामीं ॥ विश्वास धरी ॥ ४ ॥ पतीत पावन ॥ नाम हें सत्य वचन ॥ एकाजनार्दनीं चरण ॥ दृढ धरी ॥ ५ ॥

॥ ७०५ ॥ नेम धरी विठ्ठल नामीं ॥ पडूं नको वाउगा भ्रमीं ॥ सांगतसे गृहस्थाश्रमीं ॥ साधन सोपें ॥ १ ॥ करी नामस्मरण ॥ वाचें ह्मणे नारायण ॥ चुकेल पतन ॥ यातायाती ॥ २ ॥ इह लोक परलोक ॥ धन्य होती सकळीक ॥ उभय कुळ पावन देख ॥ नाम स्मरतां ॥ ३ ॥ कळी-

माजीं सोपें वर्म ॥ उच्चारी तूं श्रीराम ॥ आणीक नको श्रम ॥ वाउगाची ॥ ४ ॥ जाउनी पाहे तूं पंढरी ॥ उभा असे विटेवरी ॥ एकाजनार्दनीं धरी ॥ चरण साचे ॥ ५ ॥

॥ ७०६ ॥ संसारसागरीं बुडालिया प्राणी ॥ करी सोडवण कोण त्याची ॥ १ ॥ अविद्यादि पंच क्लेश हे तरंग ॥ बुडालें सर्वांग प्राणियाचें ॥ २ ॥ भ्रमाच्या आवर्तामाजीं सांपडला ॥ सोडवी तयाला कोण आतां ॥ ३ ॥ स्त्रिया पुत्र आप्त बंधु हे सोयरे ॥ ओढिताती सारे मत्स्य यासीं ॥ ४ ॥ प्रचंड या कामें पसरिलें जाळें ॥ त्या माजी गुंतले प्राणी जात ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं उच्चारील नाम ॥ सुखाचा आराम प्राप्त होय ॥ ६ ॥

॥ ७०७ ॥ सुखें संसार हा करी ॥ वाचें उच्चारावा हरी ॥ १ ॥ दुःखरूप हा संसार ॥ रामनामें सुख साचार ॥ २ ॥ रामनामाचें स्मरण ॥ नाश पावे जन्म मरण ॥ ३ ॥ जयापाशीं नाम असे ॥ नारायण तेथें वसे ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं नाम ॥ संसार हा परब्रह्म ॥ ५ ॥

॥ ७०८ ॥ आयुष्याच्या अंतीं ॥ राम ह्मणतां वक्त्रीं ॥ ते नर सेविती मुक्ती ॥ संदेह नाहीं ॥ १ ॥ हात पाय सिद्ध आहे ॥ तंव तूं तीर्थां जाय ॥ तीर्थांचें मूळ पाहे ॥ राम जप ॥ २ ॥ नको जपमाळा कांहीं ॥ उगाच बैस एके ठाईं ॥ हृदयीं दृढ ध्याईं ॥ रामनाम ॥ ३ ॥ ऐसा घेई पां उपदेश ॥ नको करूं वाउगा सोस ॥ तेणें होय नाना क्लेश ॥ जन्म यातना ॥ ४ ॥ हेंचि तुज सोपें वर्म ॥ येणें तुटे कर्माकर्म ॥ एकाजनार्दनीं श्रम ॥ सर्व नासे ॥ ५ ॥

॥ ७०९ ॥ राजाला आळस संन्याशा सायास ॥ विधवेसी विलास विटंबना ॥ १ ॥ व्याघ्रासी शांतता गाईसी उग्रता ॥ वेश्येसी हरिकथा विटंबना ॥ २ ॥ दानेंविण पाणी घ्राणेंविण घाणी ॥ नामेंविण वाणी विटंबना ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं भाव भक्तिविना ॥ पुण्य केलें नाना विटंबना ॥ ४ ॥

॥ ७१० ॥ न लागे कांहीं यासी मोल ॥ वेंचितां बोल फुकाचे ॥ १ ॥ विठ्ठल विठ्ठल वदा वाचें ॥ नोहे आणिकाचें कारण ॥ २ ॥ नाचा प्रेमें वाळुवंटीं ॥ घाला मिठी संतासी ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं उभा ॥ विठ्ठल शोभा अनुपम्य ॥ ४ ॥

॥ ७११ ॥ आशा धरुनी आलों येथवरी ॥ पाहतां पंढरी पावन झालों ॥ १ ॥ आलीया जन्माचें सुफळ झालें काज ॥ दृष्टी गरुडध्वज पाहतांची ॥ २ ॥ एकाजनार्दनीं पावलों विश्रांती ॥ पाहतां विठ्ठल-मूर्ति भीमातटीं ॥ ३ ॥

॥ ७१२ ॥ सदा सुरवर सुख तें इच्छिती ॥ ऐसा लक्ष्मीपती कांरे न भजा ॥ १ ॥ सोइरा धाइरा आन दुजा नाहीं ॥ गुरु पिता पाही हाचि बंधू ॥ २ ॥ सज्जन सांगाती आन नाहीं आह्मा ॥ एकाजनार्दनीं प्रेमा वसे देहीं ॥ ३ ॥

॥ ७१३ ॥ स्वहित हित विचारीं मानसीं ॥ कांरे नागविसी देहासी या ॥ १ ॥ सावधान होई पाहे पां पंढरी ॥ धरी तूं अंतरीं संतसंग ॥ २ ॥ नको पडूं फेरीं चौऱ्यायशी आवृत्ती ॥ गाय तूं कीर्ति वैष्णवांची ॥ ३ ॥ तरले बहुत तरती भरंवसा ॥ विश्वास हा बापा धरी ऐसा ॥ ४ ॥ सुगम सोपा चुकती जेणें खेपा ॥ एकाजनार्दनीं जपा विठ्ठलनाम ॥ ५ ॥

॥ ७१४ ॥ संसार ह्मणसी माझा ॥ कांरे गुंतसी वोजा ॥ १ ॥ राहे अलिप्त संसारीं ॥ अंतरीं धरूनियां हरी ॥ २ ॥ तेणें चुकती बंधनें ॥ पावन करिती संतजन ॥ ३ ॥ त्रैलोक्यीं ज्याचा शिक्का ॥ एकाजनार्दनीं नाम घोका ॥ ४ ॥

॥ ७१५ ॥ त्राहित त्राहित त्राहित ॥ विठ्ठल देव तो त्राहित ॥ १ ॥ वेदवचनें निर्धार ॥ नाम तारक हें सार ॥ २ ॥ तारक तारक श्रेष्ठ ॥ पुराणीं हा बोभाट ॥ ३ ॥ ह्मणे जनार्दनाचा एका ॥ नाम तारक हें देखा ॥ ४ ॥

॥ ७१६ ॥ भवभय नाशक रामनाम तारक ॥ शंकर राजा सुख जाणतसे ॥ १ ॥ योग याग नको आणिक साधनें ॥ नामा परतें पेणें आणिक नाहीं ॥ २ ॥ कलीमाजीं श्रेष्ठ रामनाम निज ॥ यापरतें बीज आणिक नाहीं ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं नाम तारक थोर ॥ तुटे येरझार रामनामें ॥ ४ ॥

॥ ७१७ ॥ उत्तम साधन रामनाम जाण ॥ या परतें निधान आणिक नाहीं ॥ १ ॥ नलगे समाधि रामनाम घेतां ॥ उघडा जप तत्त्वतां सोपा राम ॥ २ ॥ नलगे विरक्ति नाम मंत्र तंत्र ॥ रामनाम पवित्र जप सोपा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सोपें रामनामध्यान ॥ पवित्र पावन रामनाम ॥ ४ ॥

॥ ७१८ ॥ सकळ सुख रामनामीं आहे ॥ परमामृत ध्याये रामनाम ॥ १ ॥ नामें न घडे कर्म नामें होय निष्कर्म ॥ नाम परब्रह्म सार नाम ॥ २ ॥ नामें होय मुक्ति नामें होय भुक्ती ॥ नामें स्वर्ग प्राप्ति जपतीया ॥ ३ ॥ नामें होय बोध नामें जाय बाध ॥ एकाजनार्दनीं छंद नाम गातां ॥ ४ ॥

॥ ७१९ ॥ काळानें ग्रासिलें सावधान व्हारे ॥ सोडवण करारे हरि-नामें ॥ १ ॥ आयुष्य सरलीया कोण पां सांगाती ॥ पुढें हो फजिती यमदंड ॥ २ ॥ उपाय तो सोपा नामाचा गजर ॥ न करी विचार आन कांहीं ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं कांरे तूं आंधळा ॥ देखतोसी डोळां सुख दुःख ॥ ४ ॥

॥ ७२० ॥ अवघे सुखाचे सांगाती ॥ दुःख देखतां पळती ॥ १ ॥ सुख देखोनी ह्मणती माझें ॥ दुःख देखतां पळती वोजें ॥ २ ॥ या परी अवघें लटिकें देख ॥ एका जनार्दनीं पाहे सुख ॥ ३ ॥

॥ ७२१ ॥ अखंडित वाचें ॥ विठ्ठल विठ्ठल वदे साचें ॥ १ ॥ तेणें चुकती बंधनें ॥ कर्माकर्मीं नाहीं पतनें ॥ २ ॥ सदां विठ्ठल ध्यानीं मनीं ॥ तोचि पुण्य पावन जनीं ॥ ३ ॥ जननी पवित्र तयाची हांव ॥ एकाजना-र्दनीं धन्य सुख ॥ ४ ॥

॥ ७२२ ॥ शिणसी कां रे वायां ॥ वाचे वदे पंढरिराया ॥ १ ॥ मग तुज नाहीं रे बंधन ॥ पारुषे पा कर्माकर्म ॥ २ ॥ कर्म धर्म न करी तूं सोस ॥ अवघा विठ्ठलचि देख ॥ ३ ॥ नको करूं कुंथाकुंथी ॥ तेणें होतसे फजिती ॥ ४ ॥ अनुभव घेई देखा ॥ एका जनार्दनीं सुखा ॥ ५ ॥

॥ ७२३ ॥ रडती रांडा पोरें नाशिवंतासाठीं ॥ केवढी आटाआटी जिवीं होसी ॥ १ ॥ कुडीसी मरण नकळेचि जाण ॥ आत्मा अविनाश परि-पूर्ण स्वयंज्योती ॥ २ ॥ एकाजनार्दनीं नाथिलाचि भास ॥ विठ्ठल नामें सौरस न घे कोणी ॥ ३ ॥

॥ ७२४ ॥ गत तें आयुष्य गत तें धन ॥ गत दृश्यमान पदार्थ तो ॥ १ ॥ गत तें अंबर गत तो पवन ॥ गत तें हवन गत होय ॥ २ ॥ एकाज-नार्दनीं अगत तें नाम ॥ ह्मणोनी विश्राम योगीयांसी ॥ ३ ॥

॥ ७२५ ॥ जें जें दिसे तें तें नासे ॥ अवघें वोसे जायाचें ॥ १ ॥ नाशिवंत सर्व काया ॥ भेणें उपाया करा कांहीं ॥ २ ॥ पदार्थमात्र जात असें ॥ कांहीं नसे आन दुजें ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं सर्व वाव ॥ धरा भाव विठ्ठलीं ॥ ४ ॥

॥ ७२६ ॥ जाणत्या नेणत्या हाचि उपदेश ॥ विठ्ठल वाचें जप सुखें करा ॥ १ ॥ न करा साधन वाउगाची शीण ॥ विठ्ठलरूपीं मन निमग्न राहों ॥ २ ॥ भलतिया परी विठ्ठलासी गाय ॥ सुखा उणें काय तुजला आहे ॥ ३ ॥ जन्ममरण तुटे आधिव्याधी ॥ विठ्ठल नामें सिद्धि पायां लागे ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं जपतां विठ्ठल ॥ नलगे तया मोल धन कांहीं ॥ ५ ॥

॥ ७२७ ॥ धन वित्त आशा धरुनी स्मरती ॥ तेही मुक्त होती विठ्ठलनामें ॥ १ ॥ प्रपंच परमार्थ धरूनिया हावा ॥ गाती विठ्ठल देवा आवडीनें ॥ २ ॥ तरती तरले हाचि भरंवसा ॥ एकाजनार्दनीं ठसा विठ्ठलनाम ॥ ३ ॥

॥ ७२८ ॥ विठ्ठलासी गाय विठ्ठलासी ध्याय ॥ विठ्ठलासी पाहे वेळोवेळां ॥ १ ॥ विठ्ठल विसावा सोडवण जीवां ॥ ह्मणोनि त्याच्या गांवां जावें आधीं ॥ २ ॥ विठ्ठला वांचुनी सोयरा जिवलग ॥ विठ्ठलची मार्ग जपा आधीं ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं विठ्ठला वांचोनी ॥ दुजा नेणे स्वप्नीं संग कांहीं ॥ ४ ॥

॥ ७२९ ॥ नरदेहीं आयुष्य शत तें प्रमाण ॥ अर्धरात्र जाण जाय मध्यें ॥ १ ॥ बाळत्व तारुण्य जरामय जाणा ॥ संपलें गणना होती त्याची ॥ २ ॥ एका जनार्दनीं राहिले भजन ॥ सवेंचि मरण पावला वेगीं ॥ ३ ॥

॥ ७३० ॥ अल्प आयुष्य नरदेहीं जाण ॥ कांहीं तरी भजन करी वाचें ॥ १ ॥ जाणार जाणार नरदेह जाणार ॥ न चुके येरझार जन्ममृत्यू ॥ २ ॥ करी सर्व धंदा आठवी गोविंदा ॥ वाया तूं आपदा नको घेऊं ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं पंढरी पाहून ॥ तेथें करी मन ठेवणें देखा ॥ ४ ॥

॥ ७३१ ॥ जन्म मरण कोडें निवारी हा संग ॥ भजे पांडुरंग आधीं आधीं ॥ १ ॥ वांयाची पसारा नाथिलाची सारा ॥ कां रे चुकसी पामरा भजनासी ॥ २ ॥ एकविध भाव भक्ति करी भोळी ॥ तेणें कुळींची मुळी

हातीं लागे ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं संतांचा सेवक ॥ तयाचा मग धाक ब्रह्मादिकां ॥ ४ ॥

॥ ७३२ ॥ सोपा मंत्र वाचें हरि हरि ह्मणा ॥ तुटेल बंधन यमाचिया ॥ १ ॥ न करी आळस हाचि उपदेश ॥ येणें सावकाश तरती जगीं ॥ २ ॥ कलीमाजी सोपें रामनामध्यान ॥ या परतें साधन आन नाहीं ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं न करी आळस ॥ रामनामघोष मुखें करी ॥ ४ ॥

॥ ७३३ ॥ जगीं तो व्यापक भरुनी उरला ॥ शरण तूं तयाला जाय वेगीं ॥ १ ॥ उघडा मंत्र जाण वदे नारायण ॥ नोहे तुज विघ्न यमदूत ॥ २ ॥ अखंड वाचेसी उच्चार नामाचा ॥ तेणें कळिकाळाचा धाक नाहीं ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं संतसेवेविण ॥ आणीक साधन नाहीं दुजें ॥ ४ ॥

॥ ७३४ ॥ चरणीं ठेउनी माथां संतांसी पुसावें ॥ उगेचि ऐकावें हरिकीर्तन ॥ १ ॥ कलीमाजीं श्रेष्ठ कलीमाजीं श्रेष्ठ ॥ कीर्तन बोभाटें पळती दोष ॥ २ ॥ नलगे नाना युक्ति व्युत्पत्तीचें वर्म ॥ हरीचें कीर्तन सोपें बहू ॥ ३ ॥ योग यागादिक नोहे यथासांग ॥ तेणें होय भंग सर्व कर्मा ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं धरुनी विश्वास ॥ जाई तूं संतास शरण सुखें ॥ ५ ॥

॥ ७३५ ॥ असोनी संसारीं आपदा ॥ वाचें वदे विठ्ठल सदा ॥ १ ॥ नाहीं मानसीं तळमळ ॥ सदा शांत गंगाजळ ॥ २ ॥ असोनीया अकिंचन ॥ जयाची वृत्ति समाधान ॥ ३ ॥ एका जनार्दनीं ऐसे थोडे ॥ लक्षामध्यें एक निवडे ॥ ४ ॥

॥ ७३६ ॥ चिंतातुर मन नसावें कदा काळीं ॥ हृदईं नामावळी जप करी ॥ १ ॥ श्री अनंत माधवा गोविंदा ॥ हाची जप सदा चित्तांमाजी ॥ २ ॥ वारंवार चिंतावीं देवाचीं पाउलें ॥ तेणें जन्मजाळें उकलेल ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं आलासे प्रत्यय ॥ सर्व भावें गाय नाम साचें ॥ ४ ॥

॥ ७३७ ॥ काळ आलारे जवळी ॥ वाचें जपे नामावळी ॥ १ ॥ अंतकाळीं जाण ॥ तुज होईल बंधन ॥ २ ॥ नको गुंतूं संसारा ॥ चुकवी जन्म मरण फेरा ॥ ३ ॥ कोणी कोणाचे न सांगाती ॥ अवघे सुखाचेच होती ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं शरण ॥ काया वाचा मनें जाण ॥ ५ ॥

॥ ७३८ ॥ ऐका ऐका वचन माझें ॥ तुह्मी वदा विठ्ठल वाचें ॥ १ ॥ नाम परतें साधन नाहीं ॥ वेद शास्त्रें देती ग्वाही ॥ २ ॥ चार वेद सहा शास्त्र ॥ अवघा नामाचा पसर ॥ ३ ॥ अठरा पुराणांचे पोटीं ॥ नामेंविण नाहीं गोष्टी ॥ ४ ॥ नामें तारिले पातकी ॥ मुक्त जाले इह लोकीं ॥ ५ ॥ अजामेळ तारिला ॥ वाला कोळी ऋषि केला ॥ ६ ॥ गणिका नेली निज पदां ॥ रामनाम वदे एकदा ॥ ७ ॥ ऐसी नामाची ती थोरी ॥ पूतना तारिली निर्धारीं ॥ ८ ॥ आवडीनें नाम गाय ॥ एका जनार्दनीं वंदी पाय ॥ ९ ॥

॥ ७३९ ॥ नामपाठ करा नामपाठ करा ॥ चौऱ्याशीचा फेरा चुकवा जगीं ॥ १ ॥ नामपाठ गाये नामपाठ गाये ॥ पुनरपि नये संसारासी ॥ ॥ २ ॥ एकाजनार्दनाचा नामपाठ गाय ॥ आनंदीं आनंद होय तया लागीं ॥ ३ ॥

॥ ७४० ॥ नामपाठ गाय संताचे संगतीं ॥ नाहीं पुनरावृत्ति तया मग ॥ १ ॥ नामपाठ गाय सर्व भावें मनीं ॥ चुकेल आयणी गर्भवास ॥ २ ॥ जनार्दनाचा एका नामपाठ गाय ॥ जनार्दन पाहे जनीं वनीं ॥ ३ ॥

॥ ७४१ ॥ नामपाठ सार सर्वांमाजी श्रेष्ठ ॥ जो गाये तो वरिष्ठ कलियुगीं ॥ १ ॥ चुकेल यातना नाना गर्भवास ॥ भय आणि त्रास नव्हे मनीं ॥ २ ॥ जनार्दनाचा एका नामपाठ भावें ॥ आदरें गात आहे सदोदित ॥ ३ ॥

॥ ७४२ ॥ नामपाठ गाये सदोदित मनीं ॥ यमाची जाचणी नोहे तया ॥ १ ॥ नामपाठ भावें आदरें जो गाये ॥ सर्व सुख पाहे तया होय ॥ २ ॥ जनार्दनाचा एका नामीं धरी आवडी ॥ सर्व भावें जोडी नामपाठ ॥ ३ ॥

॥ ७४३ ॥ नामपाठ सार वेदाचें तें मूळ ॥ शास्त्राचें तें फळ नामपाठ ॥ १ ॥ योग यागविधि नलगे खटपट ॥ नामपाठें स्पष्ट सर्व कार्य ॥ २ ॥ जनार्दनाचा एका नाम पाठ घोकी ॥ गुढी तिहीं लोकीं उभारली ॥ ३ ॥

॥ ७४४ ॥ नामपाठ ब्रह्म उघड बोले वाचा ॥ वेदांतीं तो साचा निर्णय असे ॥ १ ॥ नामपाठ भाव भक्ति ते कारण ॥ आणिक साधन नाहीं दुजें ॥ २ ॥ जनार्दनाचा एका गाये तो आवडीं ॥ तोडियेली बेडी संसाराची ॥ ३ ॥

॥ ७४५ ॥ नामपाठकीर्ति सर्वांत वरिष्ठ ॥ नको साधन कष्ट आणिक कांहीं ॥ १ ॥ नामपाठमाला हृदयीं ध्याई भावें ॥ उगेचि जपावें मौन्य रूप ॥ २ ॥ जनार्दनाचा एका नाम गाय फुका ॥ साधन तिहीं लोका वरिष्ठ तें ॥ ३ ॥

॥ ७४६ ॥ नामपाठ कलीमाजीं सोपें वर्म ॥ साधन तो श्रम न करी वायां ॥ १ ॥ नामपाठ गाय नामपाठ गाय ॥ वायां तूं न जाय खटपटीं ॥ २ ॥ जनार्दनाचा एका नाम गाये ॥ जनार्दना पाहे काया वाचां ॥ ३ ॥

॥ ७४७ ॥ नामपाठ श्रेष्ठ नामपाठ श्रेष्ठ ॥ पावे तो वैकुंठ कली-माजी ॥ १ ॥ नामपाठें गेले नामपाठें गेले ॥ जड जीव उद्धरिले नामपाठें ॥ २ ॥ जनार्दनाचा एका आणिक नेणे वर्म ॥ सोपें होय कर्म नाम-पाठें ॥ ३ ॥

॥ ७४८ ॥ नाम पाठ सदा एकांतीं जो करी ॥ भुक्ति मुक्ति चारी घरीं साच्या ॥ १ ॥ नलगे साधन व्युत्पति पसारा ॥ नामपाठ बरा संत संगें ॥ २ ॥ जनार्दनाचा एका नामपाठें निका ॥ तारिलें जड लोकां नामपाठें ॥ ३ ॥

॥ ७४९ ॥ नामपाठ अंडज जारज स्वेदज ॥ उद्भिज देख चार योनी ॥ १ ॥ नामपाठ प्रेम गाय तूं आवडी ॥ तुटेल सांकडी कर्मधर्म ॥ २ ॥ जनार्दनाचा एका नामपाठीं निका ॥ तोडीयेली शाखा द्वैताचि ते ॥ ३ ॥

॥ ७५० ॥ नामपाठ जया नाहीं पैं सर्वथा ॥ तयासी तत्त्वतां यम-दंड ॥ १ ॥ मारिती ताडिती यमाचे ते दूत ॥ नामपाठीं चित्त कांरे नेणे ॥ २ ॥ जनार्दनाचा एका सांगे सर्व लोकां ॥ नामपाठ घोका आळसू नका ॥ ३ ॥

॥ ७५१ ॥ नामपाठ वर्म सोपें आहे जाण ॥ चित्तीं नारायणा नाम-पाठें ॥ १ ॥ अष्टांग योग साधनें वरिष्ठ ॥ नामपाठेंवीण कष्ट होती जना ॥ २ ॥ जनार्दनाचा एका करी विनवणी ॥ नामपाठ निर्वाणीं शस्त्र आहे ॥ ३ ॥

॥ ७५२ ॥ नामपाठ युक्ति जगीं सोपी जाण ॥ ह्मणोनी नारायणा आठवावें ॥ १ ॥ नामपाठ सोपा नामपाठ सोपा ॥ जन्म मरण खेपा दूर

होती ॥ २ ॥ जनार्दनाचा एका आवडीनें गाये ॥ नाशिवंत पाहे शरीर आहे ॥ ३ ॥

॥ ७५३ ॥ नामपाठ गाय धन्य तो संसारीं ॥ काय त्याची थोरी वानूं जगीं ॥ १ ॥ तयाचे चरणीं माझा दंडवत ॥ नामपाठ गात सर्वभावें ॥ २ ॥ जनार्दनाचा एका नामपाठ भावें ॥ अखंड गात आहे जीवें भावें ॥ ३ ॥

॥ ७५४ ॥ नामपाठ गाय सदा नामपाठ गाय ॥ धन्य त्याची माय त्रिभुवनीं ॥ १ ॥ ब्रह्मादि वंदिती शिवादिक ध्याती ॥ नामपाठकीर्ति मुखीं गातां ॥ २ ॥ एकाजनार्दनीं साराचें हें सार ॥ नामपाठ निर्धार केला जगीं ॥ ३ ॥

॥ ७५५ ॥ नामपाठसत्ता सर्वां वरिष्ठता ॥ यमधर्म माथां वंदी पाय ॥ १ ॥ ऐसा नामपाठ भक्तियुक्त गाय ॥ पुनरपि नये संसारासी ॥ २ ॥ जनार्दनाचा एका सांगतसे फुका ॥ नामपाठ घोका जीवें भावें ॥ ३ ॥

॥ ७५६ ॥ नामपाठ जगीं सोपें तें साधन ॥ ह्मणोनी वर्तन वैष्णव ॥ १ ॥ आनंदें नाचती टाळी वाजविती ॥ नामपाठ गाती सर्व भावें ॥ २ ॥ जनार्दनाचा एका भुलला नामपाठीं ॥ ह्मणोनी वैकुंठीं घर केलें ॥ ३ ॥

॥ ७५७ ॥ नामपाठ सोपा हरावया पापें ॥ आणिक संकल्प न करी दुजा ॥ १ ॥ नामपाठें सिद्धि नामपाठें सिद्धी ॥ तुटेल उपाधि नामपाठें ॥ २ ॥ जनार्दनाचा एका गात नाचत ॥ नामपाठ करीत सर्व काळ ॥ ३ ॥

॥ ७५८ ॥ नामपाठ करितां काळ वेळ नाहीं ॥ उच्चारुनी पाही सर्व काळ ॥ १ ॥ सर्वभावें नामपाठ तूं गाय ॥ आणिक न करी काय साधन तें ॥ २ ॥ जनार्दनाचा एका भुलला नामपाठीं ॥ आणिक न करी गोष्टी नामावीण ॥ ३ ॥

॥ ७५९ ॥ नामपाठ सोपा भोळ्या भाविकांसी ॥ मतवादी यांसी न रुचे नाम ॥ १ ॥ नवज्वरिता दुग्ध प्राण जाय तत्त्वतां ॥ अभाविका सर्वथा गाती तेंची ॥ २ ॥ जनार्दनाचा एका सांगे प्रेमभावें ॥ आदरें तो गावा नामपाठ ॥ ३ ॥

॥ ७६० ॥ गाये नामपाठ न करी आळस ॥ हातां येईल सौरस इच्छिलें तें ॥ १ ॥ न करी आळस आलीया संसारीं ॥ नामपाठ निरंतरी गाये सदा ॥ २ ॥ जनार्दनाचा एका प्रेमें विनटला ॥ नामपाठें झाला कृतकृत्य ॥ ३ ॥

॥ ७६१ ॥ नामपाठ करितां जाईल पैं चिंता ॥ मोक्षसायुज्यता हातां येई ॥ १ ॥ ह्मणोनी सोपें वर्म सांगतसे तुज ॥ नामपाठ गुज जपे सदा ॥ २ ॥ जनार्दनाचा एका कुर्वंडी करुनी ॥ लोळत चरणीं संताचीया ॥ ३ ॥

॥ ७६२ ॥ नामपाठें होय शुद्ध तें शरीर ॥ आणिक विचार न करी कांहीं ॥ १ ॥ नामपाठ भोळे नामपाठ भोळे ॥ शंकर तो लोळे स्मशानीं तो ॥ २ ॥ जनार्दनाचा एका प्रचीत घेऊनीं ॥ नामपाठ वदनीं जपतसे ॥ ३ ॥

॥ ७६३ ॥ नामपाठ जपे भोळा महादेव ॥ देवादि देव वंदी तया ॥ १ ॥ विष तें अमृत नामपाठें जालें ॥ दैन्य दुःख गेलें नाम जपतां ॥ २ ॥ जनार्दनाचा एका उभारुनी बाह्या ॥ नामपाठ गाय सर्व काळ ॥ ३ ॥

॥ ७६४ ॥ शास्त्रवेत्ते ज्ञानी नामपाठ गाती ॥ तेणें तयां विश्रांति सर्व काळ ॥ १ ॥ पुराणें वदती नामपाठकीर्ती ॥ व्यासादिकीं निश्चिती नेम केला ॥ २ ॥ जनार्दनाचा एका सांगतसे गुज ॥ नामपाठ निज जपे जना ॥ ३ ॥

॥ ७६५ ॥ नामपाठ करुनि वाल्हा तो तरला ॥ अधिकारी झाला रामनामें ॥ १ ॥ शतकोटी कवित्व रामायण केलें ॥ जडजीव उद्धरिले तिहीं लोकीं ॥ २ ॥ जनार्दनाचा एका बोलतसे वाणी ॥ नामपाठ अमृत संजीवनी घ्यारे भावें ॥ ३ ॥

॥ ७६६ ॥ नामपाठें गणिका नेली मोक्षपदां ॥ नामपाठें प्रल्हादा सुख झालें ॥ १ ॥ नामपाठें ध्रुव अढळपदीं बैसे ॥ नारद नाचतसे नामपाठें ॥ २ ॥ जनार्दनाचा एका सांगे अनुभव ॥ नामपाठ सर्व जपा आधीं ॥ ३ ॥

॥ ७६७ ॥ नामपाठें नक्र तारिला निर्धारें ॥ गजेंद्र उद्धरे नामपाठें ॥ १ ॥ तरले तरले नामेंचि तरले ॥ वैकुंठासी नेले नामपाठें ॥ २ ॥ जनार्दनाचा एका जोडोनीयां हात ॥ नामपाठ गात संतापुढें ॥ ३ ॥

॥ ७६८ ॥ नामपाठें तारिले पतित उद्धरिले ॥ धावणें तें केलें पांडवांचें ॥ १ ॥ पडतां संकटीं नामपाठ गाय ॥ द्रौपदी ती माय तारियेली ॥ २ ॥ जनार्दनाचा एका सांगतसे लोकां ॥ नामपाठ फुका जपा आधीं ॥ ३ ॥

॥ ७६९ ॥ नामपाठें तरला चोखा तो महार ॥ भावें सर्वेश्वर स्थापीतया ॥ १ ॥ नामपाठ करुनी कीर्ति केली जगीं ॥ उपमा ते अंगीं वाढविली ॥ २ ॥ जनार्दनाचा एका वर्णितो संतासी ॥ नित्य नामपाठासी अनुसरला ॥ ३ ॥

॥ ७७० ॥ नामपाठें गोरा कुंभार तरला ॥ उद्धार तो झाला पूर्वजांचा ॥ १ ॥ नामपाठ कीर्ति गाताती वैष्णव ॥ धन्य तो अपूर्व नाम वंदी ॥ २ ॥ जनार्दनाचा एका एकांत चरण ॥ नामपाठ संकीर्तन करा वेगीं ॥ ३ ॥

॥ ७७१ ॥ नामपाठ प्रेमें सांवता तो गाये ॥ हृदयकमळीं बाहे नारायणा ॥ १ ॥ नामपाठ निका नामपाठ निका ॥ खुर्पू लागे देखा देव त्यासी ॥ २ ॥ जनार्दनाचा एका ऐकोनीया बोल ॥ सांगत नवल संतापुढें ॥ ३ ॥

॥ ७७२ ॥ नामपाठें नामा शिंपी तो तरला ॥ तयाची देवाला आवड मोठी ॥ १ ॥ जाउनी जेवणें उच्छिष्ट भक्षणें ॥ नामपाठें देणें इच्छिलें तें ॥ २ ॥ जनार्दनाचा एका सद्गदीत होय ॥ नामपाठ गाय आवडीनें ॥ ३ ॥

॥ ७७३ ॥ नामपाठें जनाबाई बरोबरी ॥ दळी कांडी हरि शेणी वेची ॥ १ ॥ भक्ताचें सकळ कार्य तें करणें ॥ नये ऐसें उणें करी काम ॥ २ ॥ जनार्दनाचा एका आवड पाहुनी ॥ नाचतो कीर्तनीं नाम गाय ॥ ३ ॥

॥ ७७४ ॥ नामपाठें आपण होय अनामिक ॥ नामपाठें देव न ह्मणे कांहीं ॥ २ ॥ उंच नीच ज्ञाती न करी विचार ॥ नामपाठें निर्धार ऐसा ज्याचा ॥ २ ॥ जनार्दनाचा एका सर्व भावें देखा ॥ नामपाठ निका गात असे ॥ ३ ॥

॥ ७७५ ॥ नामपाठ भक्ति हनुमंतें केली ॥ सेवा रुजु झाली देवा तेणें ॥ १ ॥ नामपाठें शक्ति अद्भुत हे अंगीं ॥ धन्य झाला जगीं कपि-

नाथ ॥ २ ॥ जनार्दनाचा एका सेवोनी आदरें ॥ नामपाठ स्मरे सर्व काळ ॥ ३ ॥

॥ ७७६ ॥ नामपाठें निवृत्ति पावला विश्रांती ॥ नामपाठें शांति कर्माकर्मी ॥ १ ॥ ह्मणोनी प्रेमभावें नामपाठ गावे ॥ आलिंगन द्यावें संतचरणा ॥ २ ॥ जनार्दनाचा एका चिंती नामपाठ ॥ मोक्षमार्गवाट सोपी जगा ॥ ३ ॥

॥ ७७७ ॥ नामपाठें सोपान समबुद्धि झाला ॥ विश्रांति पावला संवत्सरीं ॥ १ ॥ मुख्य ब्रह्मा तो नामपाठ वंदी ॥ इतर तरणें उपाधि पासोनीया ॥ २ ॥ जनार्दनाचा एका कांहीं नेणे देखा ॥ नामपाठें सुखा सुख झालें ॥ ३ ॥

॥ ७७८ ॥ नामपाठें ज्ञानीयाची भिंत वोढी ॥ भाविकां तातडी देव धांवे ॥ १ ॥ बोलविला रेडा केलेंसें कवित्व ॥ नामपाठें मुक्त केले जन ॥ २ ॥ जनार्दनाचा एका लागतो चरणीं ॥ जावें वोवाळोनी जन्मोजन्मीं ॥ ३ ॥

॥ ७७९ ॥ नामपाठें मुक्त मुक्ताई पैं झाली ॥ हृदयीं आटली नामपाठें ॥ १ ॥ देहादेह सर्व निरसिले चारी ॥ नामपाठ वरी मुक्त झाले ॥ २ ॥ जनार्दनाचा एका बोले करुणावचनीं ॥ नामपाठ ह्मणी विसरूं नका ॥ ३ ॥

॥ ७८० ॥ नामपाठें सर्व मुक्तत्व साधिती ॥ नामपाठें विरक्ति हाता येत ॥ १ ॥ नामपाठें उद्धव उरला तरला ॥ नामपाठें झाला शापमुक्त ॥ २ ॥ जनार्दनाचा एका बोले लडिवाळ ॥ नामपाठ काळ काळाचाही ॥ ३ ॥

॥ ७८१ ॥ नामपाठें अक्रूर सर्व ब्रह्मरूप ॥ भेदाभेद संकल्प मावळले ॥ १ ॥ वंदी रज माथां घाली लोटांगण ॥ द्वैताचें बंधन तुटोनी गेलें ॥ २ ॥ जनार्दनाचा एका नामपाठें मुक्त ॥ जालासे सतत संतचरणीं ॥ ३ ॥

॥ ७८२ ॥ नामपाठें बिभीषण सर्वांत वरिष्ठ ॥ वंश तो स्पष्ट देशोधडी ॥ १ ॥ जाउनी शरण चिरंजीव झाला ॥ नामपाठें धाला कल्पवरी ॥ २ ॥ जनार्दनाचा एका मिरवी बडीवार ॥ नामपाठ सार युगायुगीं ॥ ३ ॥

॥ ७८३ ॥ नामपाठें भीष्में कामातें जिंकिलें ॥ सार्थक पैं केलें विहिताचें ॥ १ ॥ आदरें आवडी नामपाठ गाय ॥ सर्वांवरी होय सत्ता त्याची ॥ २ ॥ जनार्दनाचा एका होउनी शरण ॥ घाली लोटांगण संतचरणीं ॥ ३ ॥

॥ ७८४ ॥ नामपाठ मच्छिंद्र गोरक्षातें बोधी ॥ तोडिली उपाधि चौदेहांची ॥ १ ॥ नामपाठें मोक्षमार्ग तो सर्वदा ॥ वाचें गातां बाधा नोहे कांहीं ॥ २ ॥ जनार्दनाचा एका द्वैता विरहित ॥ नामपाठ गात सर्व भावें ॥ ३ ॥

॥ ७८५ ॥ नामपाठें गोरक्ष बोळला गहिनी ॥ दाविली उन्मनी सर्वकाळ ॥ १ ॥ समाधि आसन सैरा ते बोल ॥ नामपाठ मोल अभ्यासिलें ॥ २ ॥ जनार्दनाचा एका नेणे तो उन्मनी ॥ सदा संतचरणीं मिठी घाली ॥ ३ ॥

॥ ७८६ ॥ नामपाठें गहिनी निवृत्ति बोळला ॥ उघड तो केला परब्रह्म ॥ १ ॥ नामपाठ ब्रह्म नामपाठ ब्रह्म ॥ आणिक नेणें सर्व नामेंविण ॥ २ ॥ जनार्दनाचा एका सेवेसी नटला ॥ नामपाठें केला जनार्दन ॥ ३ ॥

॥ ७८७ ॥ नामपाठें निवृत्ति ज्ञानदेवा उपदेशी ॥ अहं सोऽहं कोऽहं साक्षी केले ॥ १ ॥ तिन्ही परता बोध तयासी बोधिला ॥ नामपाठें झाला शांतरूप ॥ २ ॥ जनार्दनाचा एका गमोनी मनासी ॥ लागतो चरणासी जनार्दना ॥ ६ ॥

॥ ७८८ ॥ नामपाठें अहं सोऽहं कोऽहं खादलें ॥ परब्रह्म लक्षिलें नामपाठें ॥ १ ॥ अहंअहंपण सोऽहंसोऽहंपण ॥ नाम हेंचि खूण नामपाठ ॥ २ ॥ जनार्दनाचा एका कोऽहंपणा वेगळा ॥ जनार्दनें कुर्वाळिला अभयदानीं ॥ ३ ॥

॥ ७८९ ॥ नामपाठें गुण झाले पैं त्रिगुण ॥ अनाम लक्षण नामपाठें ॥ १ ॥ सैर सैराटां धांवे जे वाटा ॥ तयाच्या चेष्टा न चलती तेथें ॥ २ ॥ जनार्दनाचा एका एकपणें बोधिला ॥ जनार्दन बोळला काम धेनू ॥ ३ ॥

॥ ७९० ॥ नामपाठें क्रिया नामपाठें कर्म ॥ नामपाठें वर्म हाता येत ॥ १ ॥ तो हा सोपा योग नामपाठ वाचें ॥ न करी सायासाचें वर्म

कांहीं ॥ २ ॥ जनार्दनाचा एका भक्तीसी भुलला ॥ मोकळा मार्ग केला नामपाठें ॥ ३ ॥

॥ ७९१ ॥ नामपाठ गीता नामपाठ गीता ॥ नामपाठ गीता गाय सदा ॥ १ ॥ हाचि बोध सोपा अर्जुना उपदेश ॥ नामपाठें क्लेश सर्व गेले ॥ २ ॥ जनार्दनाचा एका वाचे गाय गीता ॥ हरपली चिंता जन्म-मरण ॥ ३ ॥

॥ ७९२ ॥ नामपाठें गीता ज्ञानेश्वरी होय ॥ स्मरे तूं निर्भय ज्ञान-देवी ॥ १ ॥ नामपाठें सोपें अक्षरें तीं उच्चार ॥ ज्ञानेश्वरी उच्चार करी वाचें ॥ २ ॥ जनार्दनाचा एका ज्ञानेश्वरी ध्याय ॥ तेणें मुक्त होय युगा-युगीं ॥ ३ ॥

॥ ७९३ ॥ नामपाठ ज्ञानदेवीं नामपाठ तूं करी ॥ चुके वेरझारी चौऱ्यांशीची ॥ १ ॥ ऐसें वर्म सोपें सांगों जगा गुज ॥ ज्ञानेश्वरी निजीं जपों आधीं ॥ २ ॥ जनार्दनाचा एका चरणीं विनटला ॥ धन्य धन्य झाला ज्ञानदेवीं ॥ ३ ॥

॥ ७९४ ॥ नामपाठें वर्म वेदांचें तें कळे ॥ नामपाठबळें शास्त्र-बोध ॥ १ ॥ या दोहींचें वर्म ज्ञानदेवीं जाणा ॥ जपे कां रे जना हृदयीं सदा ॥ २ ॥ जनार्दनाचा एका विनीत होउनी ॥ आठवितो मनीं ज्ञान-देवा ॥ ३ ॥

॥ ७९५ ॥ नामपाठें संदेह सर्व हा जाईल ॥ नामपाठ गाईल प्रेमभावें ॥ १ ॥ नामपाठ सोपा नामपाठ सोपा ॥ अहर्निशीं बापा जप करी ॥ २ ॥ जनार्दनाचा एका ठेउनी विश्वास ॥ नामपाठ निजध्यास करी सदा ॥ ३ ॥

॥ ७९६ ॥ नामपाठ साधन याहुनी आहे कोण ॥ कासयासी पेणें स्वर्गवास ॥ १ ॥ जन्म देई देवा जन्म देई देवा ॥ गाईन मी देवा नाम-पाठ ॥ २ ॥ जनार्दनाचा एका बोलतसे वाणी ॥ नामपाठें जनीं जनार्दन ॥ ३ ॥

॥ ७९७ ॥ नामपाठयुक्ति भाविका प्रतीती ॥ लोभीया विरक्ति नामपाठें ॥ १ ॥ नामपाठें याग नामपाठें योग ॥ नामपाठें भोग सरे आधी ॥ २ ॥ जनार्दनाचा एका भोगातीत झाला ॥ ह्मणोनी बोळला जनार्दन ॥ ३ ॥

॥ ७९८ ॥ नामपाठें मोक्ष पाविजे तत्त्वतां ॥ आणिक तें आतां साधन नाहीं ॥ १ ॥ नामपाठ सार नामपाठ सार ॥ न करी विचार आणिक दुजा ॥ २ ॥ जनार्दनाचा एका नामपाठ गाये ॥ आदरें नाचताहे संतापुढें ॥ ३ ॥

॥ ७९९ ॥ नामपाठें संत पावले विसावा ॥ आणिक नाहीं हेवा दुजा कांहीं ॥ १ ॥ नामपाठें सिद्धि येईल हाता ॥ मोक्षमार्ग तत्त्वतां नामपाठें ॥ २ ॥ जनार्दनाचा एका नामपाठें तरला ॥ उद्धार तो केला जड जीवा ॥ ३ ॥

॥ ८०० ॥ नामपाठें युक्ति साधन समाप्ती ॥ नोहे दुजी प्रीति नामपाठें ॥ १ ॥ आणिक खटपट कासया बोभाट ॥ नामपाठ वाट वैकुंठाची ॥ २ ॥ जनार्दनाचा एका नामपाठें रंगला ॥ आनंदें वहिला नाचतसे ॥ ३ ॥

॥ ८०१ ॥ नामपाठ मंत्र सर्वांत पैं श्रेष्ठ ॥ तेणें तें वैकुंठ सरतें केलें ॥ १ ॥ नामपाठें साधे साधन तत्वता ॥ मोक्ष सायुज्यता हाता लागे ॥ ॥ २ ॥ जनार्दनाचा एका प्रेमें नाम गाय ॥ उभारुनी बाह्या सांगतसे ॥ ३ ॥

॥ ८०२ ॥ नामपाठ करितां आनंद मानसीं ॥ योग याग राशी पायां लागे ॥ १ ॥ आनंदें आवडी नामपाठ गाये ॥ उभा तारिताहे बाह्य जना ॥ २ ॥ जनार्दनाचा एका सांगे जगाप्रती ॥ नामपाठें विश्रांति होईल जना ॥ ३ ॥

॥ ८०३ ॥ नामपाठ पसारा घेरे मुखें सदा ॥ कलिकाळाची बाधा तुज नोहे ॥ १ ॥ नाम तें सोपें नाम तें सोपें ॥ नाम तें सोपें विठ्ठलाचें ॥ २ ॥ जनार्दनाचा एका नामपाठ वाणी ॥ कीर्ति त्रिभुवनीं नामपाठें ॥ ३ ॥

॥ ८०४ ॥ नामपाठ कसवटी अखंड ज्याचे मुखीं ॥ तोचि झाला सुखी इहीं जनीं ॥ १ ॥ नामपाठ धन्य नामपाठ धन्य ॥ नामपाठ धन्य कलीमाजी ॥ २ ॥ जनार्दनाचा एका नामपाठें मिरवला ॥ श्रीरंग वरला नामपाठें ॥ ३ ॥

॥ ८०५ ॥ नामपाठें ज्ञान नामपाठें ध्यान ॥ नामपाठें मन स्थिर होय ॥ १ ॥ जगांत हें सार नामपाठ भक्ती ॥ आणिक विश्रांति नाहीं

नाहीं ॥ २ ॥ जनार्दनाचा एका अखंड नाम गाये ॥ हर्षे नाचताहे प्रेमरंगीं ॥ ३ ॥

॥ ८०६ ॥ नामाचेनी पाठें जाती पैं वैकुंठीं ॥ आणिक खटपटीं न तरती ॥ १ ॥ आठवा नामपाठ आठवा नामपाठ ॥ वाउगा बोभाट करूं नका ॥ २ ॥ जनार्दनाचा एका नामपाठें तरला ॥ जनार्दन जोडला गुरु मज ॥ ३ ॥

॥ ८०७ ॥ संसार पाल्हाळ सांगती परिकर ॥ नामपाठ सार सिद्धवरी ॥ १ ॥ न करी आळस नामपाठ गातां ॥ तुटे भवचिंता नाना व्याधी ॥ २ ॥ जनार्दनाचा एका जनार्दन चरणीं ॥ भासे जनीं वनीं जनार्दन ॥ ३ ॥

॥ ८०८ ॥ नामपाठ नित्य एक नेमें गाय ॥ हरिकृपा होय तयावरी ॥ १ ॥ अंतरीं बाहेरीं रक्षी नारायण ॥ आलीया विघ्न निवारी साचें ॥ २ ॥ जनार्दनाचा एका प्रचीत घेउनी ॥ गात असे वाणीं नामपाठ ॥ ३ ॥

॥ ८०९ ॥ नामपाठ गंगा नामपाठ गंगा ॥ दोष जाती भंगा नामपाठें ॥ १ ॥ नामपाठ सरिता सागरसंगम ॥ देव भक्त नाम तिन्ही वोघ ॥ २ ॥ जनार्दनाचा एका करितो मार्जन ॥ त्रिवेणीचें स्नान पुण्य जोडे ॥ ३ ॥

॥ ८१० ॥ नामपाठ गंगा सागर तें तीर्थ ॥ पवित्रापवित्र नामपाठ ॥ १ ॥ पर्वकाळ संतसमागम जाणा ॥ नामपाठ स्नाना आदरेंसी ॥ २ ॥ जनार्दनाचा एका काया वाचा मनें ॥ विनटला चरणीं जनार्दना ॥ ३ ॥

॥ ८११ ॥ नामपाठ श्रेष्ठ तीर्थाचें तें तीर्थ ॥ वदे तूं चितारहित सर्व काळ ॥ १ ॥ काळाचें तें काळ नामपाठ गाते ॥ काळ हा तयातें नमस्कारी ॥ २ ॥ जनार्दनाचा एका काळा बांधी चरणीं ॥ ह्मणोनी जनार्दनीं विनटला ॥ ३ ॥

॥ ८१२ ॥ नामपाठ यश कीर्ति नामपाठें ॥ तो जाय वैकुंठा हेळामात्रें ॥ १॥ न करीरे जना आळस मानसीं ॥ नामपाठ अहर्निशीं जपे सदा ॥ २ ॥ जनार्दनाचा एका सांगतों आदरें ॥ नामपाठ स्मरे वेळोवेळां ॥ ३ ॥

॥ ८१३ ॥ आणिक साधन नाहीं नाहीं जगीं ॥ नामपाठ वेगीं गाय जना ॥ १ ॥ तुटती बंधनें खुंटेल पतन ॥ नामपाठ खुण वैकुंठाची ॥ २ ॥ जनार्दनाचा एका नामपाठें रंगला ॥ भोळ्या भाविकाला नामपाठ ॥ ३ ॥

॥ ८१४ ॥ चंचळ तें मन मुष्टिमाजी धरी ॥ नामपाठ हरि गाये सदा ॥ २ ॥ जोडेल सर्व सिद्धि तुटेल उपाधी ॥ नामपाठ आधीं भावें गाय ॥ १ ॥ जनार्दनाचा एका निश्चयें करुनी ॥ नामपाठ निर्वाणीं जपतसे ॥ ३ ॥

॥ ८१५ ॥ नामपाठ स्नान नामपाठ दान ॥ नामपाठ ध्यान जनार्दन ॥ १ ॥ नामपाठ संध्या नामपाठ कर्म ॥ नामपाठें धर्म सर्व जोडे ॥ ॥ २ ॥ जनार्दनाचा एका करी नामपाठ ॥ आणिक नाहीं श्रेष्ठ नामेंविण ॥ ३ ॥

॥ ८१६ ॥ नामपाठ केशव वदा नित्य वाचे ॥ सार्थक देहाचें सहजासहज ॥ १ ॥ आठवी केशव आठवी केशव ॥ ठेवी तूं भाव केशवचरणीं ॥ २ ॥ जनार्दनाचा एका केशवीं विनटला ॥ प्रेमें तो दाटला हृदयामाजीं ॥ ३ ॥

॥ ८१७ ॥ नामपाठ नारायण वदे सर्वकाळ ॥ काळाचा तो काळ नारायण ॥ १ ॥ नारायण गाय नारायण ध्याय ॥ नारायण पाहे सर्वां ठायीं ॥ २ ॥ जनार्दनाचा एका नारायणीं प्रेम ॥ आणिक नाहीं नेम दुजा कांहीं ॥ ३ ॥

॥ ८१८ ॥ नामपाठ माधव सदा तूं उच्चारी ॥ माधव अंतरीं धरुनी राहे ॥ १ ॥ माधवा माधवा आठवी यादवा ॥ आणिक धांवाधांव करूं नको ॥ २ ॥ जनार्दनाचा एका माधवीं मुराला ॥ वसंत तयाला जनार्दन ॥ ३ ॥

॥ ८१९ ॥ नामपाठ गोविंद हाचि लागो छंद ॥ न करी भेदाभेद हृदयामाजीं ॥ १ ॥ गोविंदनाम गाय गोविंदनाम गाय ॥ गोविंदनाम गाय हृदयीं सदा ॥ २ ॥ जनार्दनाचा एका हृदयीं ध्याये सचिता ॥ गोविंद गीतीं गातां सुख जोडे ॥ ३ ॥

॥ ८२० ॥ विष्णुनामपाठ करी वेळोवेळा ॥ पाहे तूं सांवळा विष्णु सखा ॥ १ ॥ विष्णुनाम गाय अंतरीं सर्वदा ॥ तुटे जन्म जरा बाधा येणें नामें ॥ २ ॥ जनार्दनाचा एका विष्णुरूप देखा ॥ जनार्दन सखा एक रूप ॥ ३ ॥

॥ ८२१ ॥ नामपाठें मधुसूदन वाचे ॥ अनंत जन्मांचे दोष जाती ॥ १ ॥ मधुनामें जैसा मक्षिकेशी वेधू ॥ तैसा तूं बोधू धरी देहीं ॥ २ ॥ जनार्दनाचा एका मधुर बोले वाणी ॥ मधुसूदन चरणीं देउनी दिठी ॥ ३ ॥

॥ ८२२ ॥ नामपाठ त्रिविक्रम वदे तूं रे वाचे ॥ अनंत जन्मांचे दोष जाती ॥ १ ॥ बळीये द्वारीं त्रिविक्रम उभा ॥ नामपाठें उभा तुज पुढें ॥ ॥ २ ॥ जनार्दनाचा एका त्रिविक्रमीं वंदी ॥ साधन उपाधि नेणे आन ॥ ३ ॥

॥ ८२३ ॥ नामपाठें वामन अक्षरें तीं तीन ॥ आणिक योग साधन आन नाहीं ॥ १ ॥ वदे तूं वामन वदे तूं वामन ॥ विषय वमन करुनी सांडी ॥ २ ॥ जनार्दनाचा एका नसे तो पारखा ॥ वामन तेणें सखा जोडियेला ॥ ३ ॥

॥ ८२४ ॥ नाम तें सार श्रीधराचें वाचे ॥ कोटी जन्मांचे दोष जाती ॥ १ ॥ जपे तूं आवडी धरुनीया गोडी ॥ युगाऐसी घडी करुनीया ॥ २ ॥ जनार्दनीं एका श्रीधर निजसखा ॥ नोहे तो पारखा जनार्दनीं ॥ ३ ॥

॥ ८२५ ॥ नाम हृषीकेश गाये सावकाश ॥ धरुनी उदास देह आशा ॥ १ ॥ जाईल जाईल देह नाशीवंत ॥ नाम तें शाश्वत हृषीकेश ॥ २ ॥ जनार्दनाचा एका नाम गाय सदा ॥ पंचभूत बाधा तेणें नोहे ॥ ३ ॥

॥ ८२६ ॥ नाम तें सोपें पद्मनाभ पाठ ॥ करी तूं बोभाट दिवसनिशीं ॥ १ ॥ चौसष्ट घडीयां माजी जपे नामावळी ॥ कळीकाळ टाळी मारूं न शके ॥ २ ॥ जनार्दनाचा एका नामीं तो निर्भय ॥ कळीकाळ वंदी पाय जन्मोजन्मीं ॥ ३ ॥

॥ ८२७ ॥ दामोदर गावा दामोदर पहावा ॥ दामोदर राखावा हृदयामाजी ॥ १ ॥ गोपीराजीं ध्यान दामोदरीं मन ॥ चुकलें बंधन नाम घेतां

॥ २ ॥ जनार्दनाचा एका दामोदरीं मिनला ॥ कृतकृत्य झाला उभय लोकीं ॥ ३ ॥

॥ ८२८ ॥ नाम तें सोपें संकर्षण जपे ॥ आणिक संकल्पें धरूं नको ॥ १ ॥ धरितां संकल्प नाशीवंत बापा ॥ नामजप सोपा मंत्रमार्ग ॥ २ ॥ जनार्दनाचा एका बोले लडीवाळ ॥ जनार्दन कृपाळ जगीं तोची ॥ ३ ॥

॥ ८२९ ॥ वासुदेवनाम प्रातःकाळीं वाचें ॥ धन्य जन्म त्याचें सुफळ सदां ॥ १ ॥-वहातां टाळी मुखीं नाम सार ॥ वासुदेव उच्चार करी आधीं ॥ २ ॥ जनार्दनाचा एका एकपणें देखा ॥ जनार्दन सखा जोडियेला ॥ ३ ॥

॥ ८३० ॥ नामजप वाचा प्रद्युम्न साचा ॥ न करी नामाचा आळस कदा ॥ १ ॥ संसार यातना जाती पा निर्धारें ॥ नाम निरंतर जपे आधीं ॥ २ ॥ जनार्दनाचा एका त्रैलोक्याचा सखा ॥ झाली पूर्ण कृपा जनार्दन ॥ ३ ॥

॥ ८३१ ॥ नाम अनिरुद्ध जगीं तें प्रसिद्ध ॥ अहं सोऽहं बोध गिळोनी गाय ॥ १ ॥ अहंकार सांडी नाम मुखें मांडी ॥ साधन देशधडी करुनी जपे ॥ २ ॥ जनार्दनाचा एका साधन सारुनी ॥ जनार्दनचरणीं विनटला ॥ ३ ॥

॥ ८३२ ॥ नाम पुरुषोत्तम घेई तूं आवडी ॥ यातना कल्पकोडी नाहीं तुज ॥ १ ॥ नाम हें आठवी नाम हें आठवी ॥ हृदयीं सांठवी पुरुषोत्तम ॥ २ ॥ जनार्दनाचा एका पारखी नेटका ॥ पुरुषोत्तम सखा जोडिलासे ॥ ३ ॥

॥ ८३३ ॥ नाम तूं अधोक्षज घेई सर्वकाळ ॥ महाकाळाचा काळ अधोक्षज ॥ १ ॥ नामीं धरुनी प्रीति आठवी सर्वदा ॥ नाहीं तुज बाधा जन्मोजन्मीं ॥ २ ॥ जनार्दनाचा एका प्रेमें विनटला ॥ आपुलासा केला जनार्दन ॥ ३ ॥

॥ ८३४ ॥ नाम नारसिंह नाम नारसिंह ॥ भक्तासी तो सम सर्वकाळ ॥ १ ॥ जपे तो प्रऱ्हाद आवडी तें नाम ॥ पावला सर्वोत्तम तया-

लागीं ॥ २ ॥ जनार्दनाचा एका रूप तें पाहुनी ॥ नारसिंह चरणीं मिठी घाली ॥ ३ ॥

॥ ८३५ ॥ वदे तूं अच्युत सर्वकाळ सदा ॥ मायापाशबंध तुटोनी जाय ॥ १ ॥ करी कांरे नेम धरी कांरे प्रेम ॥ अच्युताचें नाम वदे सदा ॥ २ ॥ जनार्दनाचा एका अच्युत पैं झाला ॥ सप्रेमें रंगला प्रेमरंगीं ॥ ३ ॥

॥ ८३६ ॥ नाम जनार्दन रूप जनार्दन ॥ ध्यान जनार्दन सर्व मज ॥ १ ॥ माय जनार्दन बाप जनार्दन ॥ जन जनार्दन सर्व मज ॥ २ ॥ जनार्दनाचा एका जनार्दन देखा ॥ जनीं वनीं सखा जनार्दन ॥ ३ ॥

॥ ८३७ ॥ नाम उपेंद्र सर्व देवांचा तो इंद्र ॥ शुभकाळ वक्त्र जप सदा ॥ १ ॥ तें नाम सोपें जपे कांरे वाचें ॥ अहर्निशीं साचें नाम जप ॥ २ ॥ जनार्दनाचा एका एक भावें नटला ॥ हृदयीं सांठविला जनार्दन ॥ ३ ॥

॥ ८३८ ॥ नाम हरि हरि संसार तो हरी ॥ सबाह्य अभ्यंतरीं हरि माझा ॥ १ ॥ हरिनाम जपे हरिनाम जपे ॥ तें वर्म सोपें हरि जपे ॥ २ ॥ जनार्दनाचा एका हरि चरणीं देखा ॥ सुखा सुखसुखा अनुभवला ॥ ३ ॥

॥ ८३९ ॥ नाम श्रीकृष्ण उद्धवें साधिलें ॥ चोविस नामें झालें जपपर्व ॥ १ ॥ आठवा श्रीकृष्ण आठवा श्रीकृष्ण ॥ आठवा श्रीकृष्ण वेळोवेळां ॥ २ ॥ जनार्दनाचा एका श्रीकृष्ण निजसखा ॥ जनार्दनें देखा दावियेला ॥ ३ ॥

॥ ८४० ॥ नामपाठ विठ्ठल पंचविसावा वाचें ॥ सार्थक जन्माचें झालें झालें ॥ १ ॥ विठ्ठल विठ्ठल वदतां वो वाचें ॥ सार्थक जन्माचें झालें साचें ॥ २ ॥ जनार्दनाचा एका नामपाठ गाये ॥ विठ्ठल विठ्ठल ध्याये वेळोवेळां ॥ ३ ॥

॥ ८४१ ॥ झाला नामपाठ झाला नामपाठ ॥ मोक्षमार्ग वाट सोपी झाली ॥ १ ॥ आवडी आदरें नामपाठ गाये ॥ हरिकृपा होय तयावरी ॥ २ ॥ जनार्दनाचा एका नामपाठें निका ॥ तोडीयेली शाखा अद्वैताची ॥ ३ ॥

॥ ८४२ ॥ बोल बोलतां वाचें ॥ नाम आठवी विठ्ठलाचें ॥ १ ॥ व्यर्थ बोलणें चावटी ॥ वांचुनी नको नामा ओंटीं ॥ २ ॥ नाम हें परमामृत ॥ नामें पावन तिन्ही लोक ॥ ३ ॥ नाम सोपें भूमंडळीं ॥ महापापां होय होळी ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं शरण ॥ नाम पतितपावन ॥ ५ ॥

॥ ८४३ ॥ लेंकुरें खेळती वो साचें ॥ माय बाप प्रेमें नाचे ॥ १ ॥ तैसा हेत पांडुरंगीं ॥ धरितां उणें काय जगीं ॥ २ ॥ जैसा जैसा छंद साचा ॥ पुरवणें लागे साचा ॥ ३ ॥ एकाजनार्दनाचें बाळ ॥ कौतुकें खेळतसे खेळ ॥ ४ ॥

॥ ८४४ ॥ खेळ मांडिला वो खेळ मांडिला वो ॥ या संसाराचा खेळ मांडिला वो ॥ १ ॥ पंच प्राणांचे गडी वांटिले ॥ तेथें जीव शिव नाम ठेविलें वो ॥ २ ॥ एकाजनार्दनीं खेळ मांडिला ॥ शाहणा तो येथें नाहीं गुंतला वो ॥ ३ ॥

॥ ८४५ ॥ शुकादिक योगी रंगले श्रीरंगीं ॥ नाम पवित्र जगीं जपा आधीं ॥ १ ॥ साधनें साधितां कष्ट होती जीवा ॥ नाम सोपें सर्वां गोड गातां ॥ २ ॥ परंपरा नाम वाचें तें सुगम ॥ सनकादिक श्रम न करिती ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं नाम तें पावन ॥ वाचें उच्चारितां जाण श्रम हरे ॥ ४ ॥

॥ ८४६ ॥ योग याग तप व्रतें आचरतां ॥ नाम सोपें गातां सर्व जोडे ॥ १ ॥ पाहोनीया प्रचीत नाम घे अनंत ॥ तुटे नाना घात जपे नाम ॥ २ ॥ एका जनार्दनीं नामाचा महिमा ॥ वर्णितां उपरमा शेष आला ॥ ३ ॥

॥ ८४७ ॥ नामस्मरण अहो जना ॥ तेणें तुटे भवबंधना ॥ येची देहीं येचि काळीं ॥ भजीजे रे नाम जाणा ॥ १ ॥ ध्रुव अजामेळ गणिका ॥ नाममात्रें तारिले देखा ॥ आणिकही भक्त देखा ॥ मोक्ष पावले नामें एका ॥ २ ॥ जो जो कोणी प्रेमें भजतां ॥ पाविजेल सायुज्यता ॥ ऐसी भाक घेरे आतां ॥ जप तप नाम स्मरतां ॥ ३ ॥ दीनबंधु दयासिंधू ॥ जेणें केला परमानंदू ॥ + + + + ॥ एका जनार्दनीं नित्यानंदू ॥ ४ ॥

॥ ८४८ ॥ कलियुगा माजीं थोर झाले पाषांड ॥ पोटासाठीं संत

झाले उदंड ॥ १ ॥ नाहीं विश्वास संत दया मानसीं ॥ बोलती वांयाविण सौरस अवघा उपहासी ॥ २ ॥ वेदपठण शास्त्रसंभाषण पुराण मत ॥ अवघे बोधोनी ठेविती बोलती वाचाळ मत्त ॥ ३ ॥ देवभजन संतपूजन तीर्थमहिमा न कळे मूढा ॥ ऐसे कलियुगीं झाले जाणत जाणत दगडा ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं काया वाचा राम जपा ॥ सोपें हें साधन तेणें नोहे पुण्य पापा ॥ ५ ॥

॥ ८४९ ॥ अष्टही प्रहर करिसी संसाराचा धंदा ॥ कांरे त्या गोविंदा स्मरसी ना ॥ १ ॥ अंतकाळीं कोण सोडवील तूंतें ॥ कांरे स्वहितातें विसरलासी ॥ २ ॥ यमाची यातना न चुके बंधन ॥ सोडवील कोण तुजलागीं ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं गुंतलासी वांया ॥ भजे यादवराया विसरूं नको ॥ ४ ॥

॥ ८५० ॥ वांयाची सोस संसारकामाचा ॥ रामनामीं वाचा रंगो कांरे ॥ १ ॥ या परती जीवा सोडवण नाहीं ॥ वेदशास्त्रीं पाही भाष्य असे ॥ २ ॥ पुराणें डांगोरा पिटिती नामाचा ॥ तें तूं कांरे वाचा न वदसी ॥ ३ ॥ सायास साधनें नलगे आणीक ॥ एकाजनार्दनीं ऐक्य मन करी ॥ ४ ॥

॥ ८५१ ॥ येवढा मंत्र सोपा सांडोनी सायासीं ॥ कांरे प्रपंचासी गुंतुनी पडसी ॥ १ ॥ वाचें ब्रह्मज्ञान गोष्टी ते बोल ॥ अंतरींचे फोल सर्व वांया ॥ २ ॥ वृंदावनाचे परी वरवर रेखा ॥ तैसे पढतमूर्खा वेदगोष्टी ॥ ॥ ३ ॥ एका जनार्दनीं प्रपंच टाकुनी ॥ परमार्थसाधनीं रिघे वहिला ॥ ४ ॥

॥ ८५२ ॥ अशाश्वत देह काळाचें भातुकें ॥ पंचप्राण कौतुकें खेळ तेथें ॥ १ ॥ जीव शिव दोन्ही मध्य बैसाकार ॥ व्यापारीं व्यापार सर्व त्याचा ॥ २ ॥ जीव गुंतलासे विषयाचे वोढी ॥ शिव जाणे गोडी आत्मस्वरूप ॥ ३ ॥ ऐसा हा खेळ अनादि पसर ॥ एकाजनार्दनीं निर्धार नाम जपा ॥ ४ ॥

॥ ८५३ ॥ जन्म मरणाची चूकवा रे खेपा ॥ यासी तों सोपा राममंत्र ॥ १ ॥ वेळोवेळां वाचे उच्चारावें नाम ॥ तेणें निष्काम प्राणी होय ॥ २ ॥ सायास नाहीं अनायासें वर्म ॥ वाचें रामनाम आठवावें ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं नामाविण कांहीं ॥ आणिक थोर नाहीं कलीमाजी ॥ ४ ॥

॥ ८५४ ॥ नोहे सायास रामनामीं ॥ संसारासी गुंते प्राणी ॥ १ ॥ आठवी वाचे रामनाम ॥ संसार नुरेची श्रम ॥ २ ॥ नको करूं वांया श्रम ॥ वाचें ह्मणे राम राम ॥ ३ ॥ आवडीनें नाम घोका ॥ ह्मणे जनार्दनाचा एका ॥ ४ ॥

॥ ८५५ ॥ आह्मीं योग साधियेला ॥ भांग भुरका तो आणिला ॥ १ ॥ योग न कळे तया मूढा ॥ साधन काय तें दगडा ॥ २ ॥ अंत काळा बाहेर काळा ॥ नाम नाहीं अमंगळा ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं ते पामर ॥ साधन साधिती ते खर ॥ ४ ॥

॥ ८५६ ॥ साधन तें साधा वाचें ॥ नाम म्हणा गोविंदाचें ॥ १ ॥ तेणें तुटेल बंधन ॥ वाचें गातां रामकृष्ण ॥ २ ॥ नामा सरसी वाजे टाळी ॥ महापापा होय होळी ॥ ३ ॥ हा तो पुराणीं निश्चय ॥ नाम निशिदिनीं गाय ॥ ४ ॥ आवडीनें नाम गाय ॥ एकाजनार्दनीं वंदी पाय ॥ ५ ॥

॥ ८५७ ॥ आली आषाढी जाये पंढरीसी ॥ चित्त पायापाशीं विठोबाच्या ॥ १ ॥ वैष्णव गर्जती नामामृत सार ॥ फुटतसे पाझर कामक्रोधा ॥ २ ॥ एकाजनार्दनीं धरुनी विश्वास ॥ जाये पंढरीसी होय संताचा दास ॥ ३ ॥

॥ ८५८ ॥ वासुदेवस्मरणें तुटती जन्ममरण व्याधी ॥ अहं सोऽहं कोऽहं मूळ ह्या सांडी उपाधी ॥ १ ॥ रामकृष्ण वासुदेव गोपाळ वाचें आठवा ॥ जन्म जरा तुटे वाचें आठवितां सांठवा ॥ २ ॥ चिपळ्या टाळ घुळघुळा शब्दनादें ॥ तेणें ब्रह्मानंद हृदयीं आठवण नांदे ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं वासुदेव चिंतितां ॥ यमकाळदूत पळती नाम ऐकतां ॥ ४ ॥

॥ ८५९ ॥ लज्जा अभिमान टाकुनी परता ॥ परमार्थ सरता करी कां रे ॥ १ ॥ वादक निंदक भेदक ऐसे त्रिविध ॥ याचा टाकुनी भेद भजन करी ॥ २ ॥ एकाजनार्दनीं त्रिविधा परता ॥ होउनी परमार्था हित करी ॥ ३ ॥

॥ ८६० ॥ जया परमार्थीं चाड ॥ तेणें सांडावें लिगाड ॥ धरुनी भजनासी चाड ॥ निस नेम आदरें ॥ १ ॥ सांडी मांडी परती टाकी ॥ वासुदेवनाम घोकी ॥ मोक्ष येईल सुखी ॥ नाम स्मरतां आदरें ॥ २ ॥

रामकृष्ण वासुदेव ॥ धरी हाचि दृढ भाव ॥ आणिकाचा हेवा ॥ दुरी करी आदरें ॥ ३ ॥ घाली संतासी आसन ॥ पूजा करी काया वाचा मनें ॥ एकाजनार्दनीं जाण ॥ इच्छिलें तें पुरवी ॥ ४ ॥

॥ ८६१ ॥ घालीं देवावरी भार ॥ आणिक न करी विचार ॥ योग क्षेम निर्धार ॥ चालवील तुझा ॥ १ ॥ वाचें गाय नामावळी ॥ वासुदेवीं वाहे टाळी ॥ प्रेमाचे कल्लोळीं ॥ नित्यानंदें सर्वथा ॥ २ ॥ सोस घेई कां रे वाचें ॥ रामकृष्ण वदतां साचें ॥ धरणें उठतें यमाचें ॥ निःसंदेह ॥ ३ ॥ शरण एका जनार्दनी ॥ करी रामनामध्वनी ॥ कैवल्याच्या दानी ॥ रक्षी तुज निर्धारें ॥ ४ ॥

॥ ८६२ ॥ तूं ह्मणशील बा हें माझें माझें ॥ वांया वाहासी वाउगें ओझें ॥ १ ॥ सोडी दे टाकुनी परता येई ॥ रामनाम वाचें सदा गाई ॥ २ ॥ नामची जाण सत्य सार ॥ वांया कां वाहाशील भार ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं नाम सार ॥ वेदशास्त्रीं हा निर्धार ॥ ४ ॥

॥ ८६३ ॥ धन दारा पुत्र अपत्य हें ह्मणसी माझें ॥ परी हें काळाचें खाजें जाणे बापा ॥ १ ॥ गंगेलागीं पूर अवचित आला ॥ लोटोनीया गेला मागुती जैसा ॥ २ ॥ तैसा याचा विश्वास न धरी तूं मनीं ॥ यमाची जांचणी तुजसी होय ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं सोडोनी देई संग ॥ नाम तूं अभंग हरीचें वदे ॥ ४ ॥

॥ ८६४ ॥ येणें पंथें बहुत तरले निश्चितीं ॥ आवडी जे गाती विठोबासी ॥ १ ॥ तारक हा मंत्र सोपा पैं सर्वांसी ॥ उच्चारितां अहर्निशीं सर्वसिद्ध ॥ २ ॥ पापा प्रायश्चित्त कलियुगीं नाम ॥ आणिक सोपें वर्म संत सेवा ॥ ३ ॥ नलगे दंडन मुंडन ते आटी ॥ नाम घेतां होटीं सर्व जोडे ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं संतासी शरण ॥ चुके जन्ममरण नाना पीडा ॥ ५ ॥

॥ ८६५ ॥ उघडा हा मंत्र विठ्ठल वदे वाचे ॥ अनंता जन्मांचे दोष जाती ॥ १ ॥ न करी आळस आलीया संसारीं ॥ वदे निरंतरीं विठ्ठलनाम ॥ २ ॥ साधती साधन तुटती बंधन ॥ विठ्ठलनाम जाण जप करी ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं आसनीं शयनीं ॥ विठ्ठल निशिदिनीं जप करी ॥ ४ ॥

॥ ८६६ ॥ धांवूं नको सैरा कर्माचीया पाठी ॥ तेणें होय दृष्टि उफ-

राटी ॥ १ ॥ शुद्ध अशुद्धाच्या न पडे वेवादा ॥ वाचें ह्मणे सदा नारायण ॥ २ ॥ एकाजनार्दनीं ब्रह्मार्पण कर्म ॥ तेणें अवघे धर्म जोडतील ॥ ३ ॥

॥ ८६७ ॥ जाणोनिया वेडा होसी कां गव्हारा ॥ भजे तूं पामरा श्रीविठ्ठला ॥ १ ॥ नकोरे साधन व्युत्पत्तीचा भार ॥ चुकवी वेरझार विठ्ठलनामें ॥ २ ॥ एकाजनार्दनीं विठ्ठलावांचुनी ॥ सोडविता कोणी नाहीं दुजा ॥ ३ ॥

॥ ८६८ ॥ विधि निषेध कवणेपरी ॥ कार्याकारण ते परी ॥ १ ॥ नाम जपतां सादर ॥ विधि निषेध पळे दूर ॥ २ ॥ व्रत करा एकादशी ॥ कंठीं मिरवा तुळशी ॥ ३ ॥ करा घोष हरिकथा ॥ विधि निषेध वंदील माथा ॥ ४ ॥ एकपणें जनार्दनें ॥ एका विधि निषेध नेणे ॥ ५ ॥

॥ ८६९ ॥ काय जाणों विधी ॥ निषधाचे ते बुद्धी ॥ १ ॥ आह्मी गाऊं नाम मुखें ॥ नाचूं सुखें कीर्तनीं ॥ २ ॥ न पडों भलतीया भरीं ॥ वाचें ह्मणा हरिहरी ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं शरण ॥ विधि निषेध गेला पूर्ण ॥ ४ ॥

॥ ८७० ॥ बुडालीया जळीं धांवतसे कोण ॥ तैसे प्राणी जन बुडताती ॥ १ ॥ संसार हा डोहो दुस्तर पारखा ॥ सांगड ती देखा रामनाम ॥ २ ॥ एकाजनार्दनीं संताचा आधार ॥ उतरूं पैलपार भवडोहीं ॥ ३ ॥

॥ ८७१ ॥ कष्ट न करितां योग जरी साधे ॥ श्रम ते उपाधि वाउगी कांबा ॥ १ ॥ नाम तें सोपें श्रम नाहीं कांहीं ॥ उच्चारितां पाही सर्व जोडे ॥ २ ॥ एकाजनार्दनीं नका योग याग ॥ ह्मणावा श्रीरंग वाचें सदा ॥ ३ ॥

॥ ८७२ ॥ उगम संगम प्रवाह गती ॥ ऐशी त्रिविध देहस्थिती ॥ १ ॥ बालत्व तारुण्य वृद्धत्व ॥ ऐसें देहाचें त्रिविधत्व ॥ २ ॥ जरा मरण नाश पावे ॥ ऐसा देह व्यर्थ जाये ॥ ३ ॥ ऐसीयाचा भरंवसा ॥ एकाजनार्दनीं ठसा ॥ ४ ॥

॥ ८७३ ॥ साधकासी साधतां ज्ञान ॥ तंव आडवें येत मायाविघ्न ॥ १ ॥ ह्मणोनी करा हरिचिंतन ॥ तेणें तुटे भवबंधन ॥ २ ॥ सांडी सांडी थोरपण ॥ व्हावें लीन कीर्तनीं ॥ ३ ॥ शरण एकाजनार्दनीं ॥ सांडा अभिमान संत जनीं ॥ ४ ॥

॥ ८७४ ॥ अभिमान नका धरूं पोटीं ॥ होय अर्थासवें तुटी ॥ १ ॥ ह्मणोनी स्मरा राम राम ॥ तेणें पावाल निजधाम ॥ २ ॥ विहित करा आपुलें कांहीं ॥ आठवा वाचें राम देहीं ॥ ३ ॥ काकुलती येतां जना ॥ शरण एकाजनार्दना ॥ ४ ॥

॥ ८७५ ॥ वोखद घेतलीया पाठीं ॥ तेणें रोगा होय तुटी ॥ १ ॥ पथ्य साचार साचार ॥ नामीं धरा निर्धार ॥ २ ॥ वोखदासी कारण पथ्य ॥ भव रोगीया रामनामें मुक्त ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं करा ॥ श्रीराम राम उच्चारा ॥ ४ ॥

॥ ८७६ ॥ मागें बहुतां गुणा आलें ॥ रामनाम रसायन चांगलें ॥ १ ॥ बहुतीं सेविलें आदरें ॥ तेणें तरले भवसागर ॥ २ ॥ शुकें उतरिलें निगुती ॥ दिधलें असे परीक्षिती ॥ ३ ॥ सेवितां आरोग्य झाला ॥ एकाजनार्दनीं ह्मणे भला ॥ ४ ॥

॥ ८७७ ॥ नित्य ध्यातां हरीचे चरण ॥ करी भक्तदुःखहरण ॥ १ ॥ चरणरज पवित्रता ॥ सदा ध्यावेंचि माथां ॥ २ ॥ लागला पाषाणा चरण ॥ ती स्त्रीच झाली पावन ॥ ३ ॥ ऐसें चरणीचें मान ॥ शरण एका-जनार्दन ॥ ४ ॥

॥ ८७८ ॥ अवचट मुखीं ह्मणता राम ॥ सर्व दुरितें होती भस्म ॥ १ ॥ नामापुढें पाप राहे ॥ ऐसा कोण वदताहे ॥ २ ॥ घडतां पातकांच्या राशी ॥ तोही नेला वैकुंठासी ॥ ३ ॥ भाविकांसी वर्म सोपें ॥ राम मुखें जपावें ॥ ४ ॥ जनीं वनीं निरंजनीं ॥ शरण एकाजनार्दनीं ॥ ५ ॥

॥ ८७९ ॥ ज्ञान ध्यान वर्म शाब्दिक कवित्व ॥ हें तो न कळे अर्थ मूढा-प्रती ॥ १ ॥ राम सुखें गावा राम सुखें गावा ॥ वाचें आठवावा कृष्ण सदा ॥ २ ॥ एकाजनार्दनीं रामकृष्ण मनीं ॥ भजा आसनीं शयनीं सर्व-काळ ॥ ३ ॥

॥ ८८० ॥ भावें करावें भजन ॥ भावें करा नामस्मरण ॥ १ ॥ भावें जावें पंढरीसी ॥ भावें नाहावें भीमरथीसी ॥ २ ॥ भावें करा प्रदक्षिणा ॥ भावें करा जागरणा ॥ ३ ॥ भावें व्रत एकादशी ॥ शरण एकाजनार्द-नासी ॥ ४ ॥

॥ ८८१ ॥ जग राम राम ह्मणे ॥ तया कां न येती विमानें ॥ १ ॥ नवल स्मरणाची ठेव ॥ नामीं नाहीं अनुभव ॥ २ ॥ नष्ट गणिका राम ह्मणे ॥ तिसी वैकुंठींचें पेणें ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं ध्यात ॥ राम पाहे ध्याना आंत ॥ ४ ॥

॥ ८८२ ॥ नाम घेतां हे वैखरी ॥ चित्त धांवे विषयावरी ॥ १ ॥ कैसें होताहे स्मरण ॥ स्मरणा माजीं विस्मरण ॥ २ ॥ नाम रूपा नव्हता मेळ ॥ नुसता वाचेचा गोंधळ ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं छंद ॥ बोलामाजी परमानंद ॥ ४ ॥

॥ ८८३ ॥ रुक्मांगदा कारणें एकादशीचा छंद ॥ तेणें परमानंद प्रगटला ॥ १ ॥ अंबऋषी कारणें द्वादशीचा छंद ॥ तेणें परमानंद प्रगटला ॥ २ ॥ प्रल्हादाकारणें हरिनामाचा छंद ॥ तेणें परमानंद प्रगटला ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं एकविधा छंद ॥ तेणें परमानंद प्रगटला ॥ ४ ॥

॥ ८८४ ॥ पाहूं गेलीये हरिजागरा ॥ नयन लाचावले नंदकुमरा ॥ १ ॥ कान्हयारे मनमोहना ॥ देहगेहाची तुटली वासना ॥ २ ॥ आदरें आवडीं ऐकतां नाम ॥ नाममात्रें झालों निष्काम ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं हरिकीर्तन ॥ समाधीसी तेथें समाधान ॥ ४ ॥

॥ ८८५ ॥ जन्म कर्म अवघें व्यर्थ ॥ ज्ञाते विवेकीं घेती अर्थ ॥ १ ॥ हरि हाची धर्म मुख्य ॥ रामकृष्ण उच्चारी मुख ॥ २ ॥ दिन जाऊं नेदी वाउगा जाण ॥ काळाचें जनन राम कृष्ण ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं जन्म कर्म धर्म ॥ ब्रह्मार्पण वर्म हेंचि खरें ॥ ४ ॥

॥ ८८६ ॥ विचारितां तुज नामचि नसे ॥ नामरूपीं तुझें स्वरूपचि भासे ॥ १ ॥ नामीं अनामता पावुनी पठण ॥ या परी स्मरीजे या नामस्मरण ॥ २ ॥ गर्जतां नामीं जो जो शब्द उठी ॥ शब्दांनीं शब्दें पडतसे मिठी ॥ ३ ॥ एकाजनार्दन नित्य स्मरे नाम ॥ नामरूप स्वयें झाला आत्माराम ॥ ४ ॥

॥ ८८७ ॥ हरिस्मरणीं सावध व्हावें ॥ स्वहित आपुलें विचारावें ॥ १ ॥ तरला प्रल्हाद आणि धुरू ॥ उपमन्या क्षीरसागरू ॥ २ ॥ एकाजनार्दनीं छंद ॥ अवघा भरला श्रीगोविंद ॥ ३ ॥

॥ ८८८ ॥ गोड साखरसें गोड साखरसें ॥ रामनामरसें चवी आली ॥ धृ० ॥ देंठींचें फळ देंठीं पीकें ॥ रान तोडितां चवी चाखे ॥ गोड०

॥ १ ॥ न फोडी न तोडी सगळेंचि सेवी ॥ ब्रह्मादिका तो वाकुल्या दावी ॥ गोड० ॥ २ ॥ एकाजनार्दनीं घेतली गोडी ॥ जीव गेल्या तरी न मी सोडी ॥ गोड० ॥ ३ ॥

॥ ८८९ ॥ सांडी परापवाद खोडी ॥ घेई विठ्ठल स्वरूपीं गोडी ॥ १ ॥ व्यर्थ टवाळाचे बोल ॥ बोलूं नका ह्मणा विठ्ठल ॥ २ ॥ विठ्ठल विठ्ठल नेटका ॥ भावें ह्मणतां ब्रह्म फुका ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं साचें ॥ विठ्ठल विठ्ठल ह्मणतां वाचें ॥ ४ ॥

---

## भक्तीविषयीं बोध.

॥ ८९० ॥ अभाग्य न भजती भगवंतीं ॥ त्यांसी पृथ्वी असे जडत्व देती ॥ जळें दिधली त्या अधोगती ॥ तेजें दिधली सा संतापवृत्ती ॥ १ ॥ ऐशा कैसेनी भेटे भगवंतू ॥ नरदेहीं मुकले निजस्वार्थू ॥ जन्ममरणांचे भोगिती आवर्तू ॥ त्यांसी विमुख होय हृदयस्थू ॥ धृ० ॥ वायूनें दिधलें सा चंचळत्व ॥ नभें दिधलें सा भावशून्यत्व ॥ महत्तत्त्वें हरिलें निजसत्त्व ॥ मायें दिधलें सा ममत्व ॥ ३ ॥ सभाग्य भावें भजती भगवंतीं ॥ त्यांसी पृथ्वी देतसे निजशांती ॥ जळें दिधली मधुर रसवृत्ती ॥ तेजें दिधली निज तेजप्रभादीप्ती ॥ ४ ॥ ऐशा सहजें प्रसन्न होय देवो ॥ जेणें भूतांचा पालटे देहभावो ॥ निजीं निजाचा वाढे निर्वाहो ॥ जनीं विजनीं अखंड ब्रह्मभावो ॥ ५ ॥ वायु उपरमें दे निश्चळत्व ॥ नभें दिधलें सा अलिप्तत्व ॥ महत्तत्त्वें दिधलें शोधित सत्त्व ॥ मायें दिधलें सद्विद्या परम तत्त्व ॥ ६ ॥ एकाजनार्दनीं निज भक्ती ॥ तैं अलभ्य लाभु होय प्राप्ती ॥ भूतें महाभूतें प्रसन्न होती ॥ तेणें न भंगे ब्रह्मस्थिती ॥ ७ ॥

॥ ८९१ ॥ हरिनाम स्मरतों ह्मणोनी आचरसी दोष ॥ श्रवण स्मरण भक्ति तेणें पडली वोस ॥ १ ॥ हरि नामाचेनी बळें करसी अधर्म ॥ देवाचेनी तुमचें शुद्ध नोहे कर्म ॥ २ ॥ दुर्वासाचेनी कोपें अंबऋषीस शाप ॥ देवाचे चक्रें त्या दिधला संताप ॥ ३ ॥ सत्यव्रती धर्म सद्यज्ञनिष्ठ ॥ असत्य वचनीं त्याचा झडला अंगुष्ठ ॥ ४ ॥ निष्पाप मांडव्य शुळीं वाइला ॥ इतुकियास्तव यम दासीपुत्र केला ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं संत सोईनें चाले ॥ सद्गुरुवचनें सबाह्य शुद्ध झालें ॥ ६ ॥

॥ ८९२ ॥ धन मान बळें नाठविसी देवा ॥ अंतकाळीं तेव्हां कोण

आहे ॥ १ ॥ यमाचे ते दंड बैसतील माथां ॥ मग तुज रक्षिता कोण आहे ॥ १ ॥ माता पिता बंधु सोइरे धाइरे ॥ जोंवरी इंद्रियें चालताती ॥ ३ ॥ सर्वस्व कामिनी ह्मणविसी कांता ॥ तीही केश देतां रडूं लागे ॥ ४ ॥ एका-जनार्दनीं जाताची शरण ॥ स्वप्नीं जन्म मरण नाहीं नाहीं ॥ ५ ॥

॥ ८९३ ॥ संतजनाची मिळाली मिळवणी ॥ रामनामाची भरली भरणी ॥ १ ॥ रामनाम सेवा हा राम सांठवा ॥ परमानंदाचा लाभ झाला जीवा ॥ २ ॥ कीर्तनाचें तारूं लाधलें ॥ रामनाम केणें सवंगलें ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं रामनाम सेवा ॥ परमानंदाचा लाभ झाला जीवा ॥ ४ ॥

॥ ८९४ ॥ भक्ति नाहीं नामीं तो चांडाळ पतित ॥ तोची जाणावा कुत्सित नष्ट येथें ॥ १ ॥ प्रपंचकर्दमीं बुडोनीया ठेले ॥ संताविण उगले फजीत होती ॥ २ ॥ पुत्र मित्र कांता मानुनी भरंवसा ॥ याचा मोह फांसा जन्मवरी ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं अंतीं आहे कोण ॥ न कळे संताविण निश्चयेंसी ॥ ४ ॥

॥ ८९५ ॥ बधिर जालें पैं श्रवण ॥ झाले दंत उन्मळण ॥ १ ॥ अजूनी काय धरिसी माया ॥ गेलीं इंद्रियें विलया ॥ २ ॥ नाकीं श्लेष्माचा खल्लाळ ॥ तोंडावाटे पडे लाळ ॥ ३ ॥ टर फुस वाजे गुदद्वार ॥ चरणीं सांडिला व्यापार ॥ ४ ॥ वृषण आलें गुडघ्यावरी ॥ शिश्न लोंबे पीठ चाचरी ॥ ५ ॥ कफ वात पैं सुटला ॥ शरीर कांपे चळचळा ॥ ६ ॥ लहान थोर ते हांसती ॥ फे फे वांकुल्या दाविती ॥ ७ ॥ वागतां चाचपडे भिंती ॥ पोरें बाऊ ह्मणोनी पळती ॥ ८ ॥ भार्या केलीरे आवडी ॥ ती तुजवर बोटें मोडी ॥ ९ ॥ स्त्रीये पाहिजे पुरुषभोग ॥ तुज लागला खोकला रोग ॥ १० ॥ तुज जाणे निरयाकडे ॥ ती काजळ कुंका रडे ॥ ११ ॥ प्राण आला डोळियासी ॥ कैसा स्वार्थ न संडिसी ॥ १२ ॥ आंगण झालें रे विदेश ॥ किती करिसी विषयसोस ॥ १३ ॥ आप्त ह्मणती कां मरेना ॥ पालटु झाला याचिया चिन्हा ॥ १४ ॥ एकाजनार्दनीं निष्काम ॥ भजा भजा रे परब्रह्म ॥ १५ ॥

॥ ८९६ ॥ अगाध चरणाचें महिमान ॥ वाणितां वेदां पडिलें मौन्य

॥ १ ॥ पुराणें वर्णितां भागलीं ॥ सहा शास्त्रें वेडावलीं ॥ २ ॥ तें पुंडलीकाचे लोभें ॥ एकाजनार्दनीं विटे उभें ॥ ३ ॥

॥ ८९७ ॥ वचनमात्रासाठीं ॥ प्रगटला कोरडे काष्ठीं ॥ १ ॥ ऐसी कृपालु माउली ॥ भक्तासाठीं धांव घाली ॥ २ ॥ कृपेचा कोंवळा ॥ राखे भक्ताचा तो लळा ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं डोळा ॥ पहा विठ्ठल सांवळा ॥ ४ ॥

॥ ८९८ ॥ साखरेची गोडी साखर सांडुनी उभी उघडी ॥ तैसें आयुष्य जोडिलें जोडी नरदेहा ॥ १ ॥ मोतीयाचें आवदानें घालितातीं अंगीं ॥ भोगावया लागीं विषयसुख ॥ २ ॥ गेलें गेलें बापा हित हातोहातीं ॥ पुढें आली राती काळवंखी ॥ ३ ॥ आयुष्याच्या शेवटीं सुखाची या गोष्टी ॥ काळानळा पोटीं पडसील बापा ॥ ४ ॥ सोलीव सुकृत भरूनिया मापा ॥ विषयासाठीं पाहेपा लावितोसी ॥ ५ ॥ अमृत जोडोनी सायासीं गळीं कां लावितोसी ॥ घालुनी मत्स्यासी कवण काज ॥ ६ ॥ मिनली चिंतामणीची शिळा घोटिव चौबळा ॥ कांरे नेउनी पायातळा रचितोसी ॥ ७ ॥ तेथें जें जें कांहीं चिंतिसी तें अधिकचीं पावसी ॥ नरकाची चौपासी वाढविली ॥ ८ ॥ कल्पतरु देखोनी डोळा उभा राहुनी तया तळा ॥ ह्मणसी मरमर निर्फळा काय करूं ॥ ९ ॥ तेथें मरमर उच्चारिलें मरणची अधिक झालें ॥ तुझिया कल्पना केलें वैर तुज ॥ १० ॥ येवोनी ये जनीं जन्म उत्तम योनी ॥ कांरे भजन नारायणीं चुकलासी ॥ ११ ॥ जंववरी आयुष्य आहे तंववरी हिताची सोये ॥ एकाजनार्दनीं शरण जाये एकपणें ॥ १२ ॥

॥ ८९९ ॥ फुल झडे तंव फळ पोसे ॥ तया पाठी तेंही नासे ॥ १ ॥ एक मागें एक पुढें ॥ मरण विसरलें बापुडें ॥ २ ॥ शेजारी निमाले कोणाचे खांदीं ॥ लपों गेला सापें खादली मांदी ॥ ३ ॥ मरण ऐकतां परता पळे ॥ पळे तोही मसणीं जळे ॥ ४ ॥ प्रेत देखोनीं वोझ्याच्या जाती ॥ वोझें ह्मणती तेही मरती ॥ ५ ॥ मरण ह्मणतां थूं थूं ह्मणती ॥ थुंकते तोंडें मसणीं जळती ॥ ६ ॥ पळेना चळे तोचि सांपडे ॥ जाणतां जाणतां होताती वेडे ॥ ७ ॥ एकाजनार्दनीं शरण ॥ काळ वेळ तेथें न रिघे मरण ॥ ८ ॥

॥ ९०० ॥ एकाची माहेरा नाथिली ॥ हे तंव जाण भ्रांति बोली ॥ ॥ १ ॥ विठ्ठल विठ्ठल रोकडा ॥ विठ्ठल पाहे चहूं कडा ॥ २ ॥ आपण आंत बाहेरीं पाहे ॥ विठ्ठल देखोनी उगाची राहे ॥ ३ ॥ एकाजनार्दना शरण ॥ विठ्ठल विठ्ठल परिपूर्ण ॥ ४ ॥

॥ ९०१ ॥ व्यापुनीयां भरला देव ॥ रिता ठाव कोठें पा ॥ १ ॥ तयाचें करारे चिंतन ॥ मग तुह्मा न पडे न्यून ॥ २ ॥ वाचें वदा विठ्ठल साचा ॥ सोइरा साचा अंतकाळीं ॥ ३ ॥ मागें पुढें उभा असे ॥ एकाजनार्दनीं दिसे ॥ ४ ॥

॥ ९०२ ॥ विषयीं होउनी उदास ॥ सांडा संसाराची आस ॥ १ ॥ तरीच पावाल चरण ॥ संत सेवा घडेल जाण ॥ २ ॥ होऊन उदासवृत्ती ॥ भजन करा दिनरातीं ॥ ३ ॥ ऐसी आवड धरा मनीं ॥ शरण एकाजनार्दनीं ॥ ४ ॥

॥ ९०३ ॥ मातेचा आठव बाळावरी स्नेहो ॥ तैसा धरा देवो मनीं सदा ॥ १ ॥ बाळा पाहुनीयां माता संतोषत ॥ तैसा धरा हेत देवावरी ॥ २ ॥ बोबडें सावडें असोच तें बाळ ॥ तैसी धरा कळवळ देवावरी ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं देव धरा मनीं ॥ आसनीं शयनीं विसरूं नका ॥ ४ ॥

॥ ९०४ ॥ वत्सालागीं गोप धाउनी वोरसे ॥ तैसें असो पिसें देवा ठाईं ॥ १ ॥ पाडसा चुकली हरीण पाहे वास ॥ तैसी धरा आस देवा ठाईं ॥ २ ॥ मातेलागीं चुके बाळ एकुलतें ॥ तैसें देवापरतें न धरा मनीं ॥ ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं देव करा सखा ॥ प्रपंच पारिखा सहज तेणें ॥ ४ ॥

॥ ९०५ ॥ जरा पावली निज संधी ॥ अनिवार येती आधिव्याधी ॥ १ ॥ पायीं पडतसे वेंगडी ॥ अंधारीं धरणें लागे कांठी ॥ २ ॥ डोळां चिपडें तोंडा लाळ ॥ नाका येत शेंबूड वोंगळ ॥ ३ ॥ चुंबन देतां पोराप्रती ॥ बाऊ ह्मणोनी पोरें पळती ॥ ४ ॥ ऐशी दशा येईल अंगा ॥ एकाजनार्दनीं शरण रिगा ॥ ५ ॥

॥ ९०६ ॥ डोळा फोडोनी काजळ ल्याला ॥ नाक कापुन शिमगा खेळला ॥ १ ॥ वेंचितां धन लक्ष कोटी ॥ आयुष्य क्षणचि नोहे भेटी ॥

॥ २ ॥ मिथ्या बागुलाचा भेवो ॥ बाळें सत्य मानिती पहाहो ॥ ३ ॥ ऐसें मिथ्या नको मनीं ॥ एका शरण जनार्दनीं ॥ ४ ॥

॥ ९०७ ॥ नित्य नूतन दीप ज्वाळा ॥ होती जाती देखती डोळा ॥ ॥ १ ॥ जागृती आणि देखती स्वप्न ॥ दोहीं देखतां भिन्न भिन्न ॥ २ ॥ भिन्नपणें नका पाहूं ॥ एकाजनार्दनीं पाहूं ॥ ३ ॥

॥ ९०८ ॥ मजुर राउळाचें घृत नेतां ॥ तो तुरंगीं चढे मनोरथा ॥ ॥ १ ॥ सबळ वारुवांचें उड्डाण ॥ ह्मणोनी उडों जात आपण ॥ २ ॥ बळें उडाला माझा घोडा ॥ परी स्मरण नाहीं धगडा ॥ ३ ॥ उडी सरसी घागरी पडे ॥ एकाजनार्दनीं पाहुनी रडे ॥ ४ ॥

॥ ९०९ ॥ ऐसें लागलीया ध्यान ॥ अंतकाळीं ठसावें मन ॥ १ ॥ ह्मणोनि भोगक्षयें जाण ॥ मागील देहाचें अनुसंधान ॥ २ ॥ मागील सांडी रे दगडा ॥ कां घालिसी पाय खोडा ॥ ३ ॥ भुलोनी जाऊं नको वायां ॥ एकाजनार्दनीं लागे पायां ॥ ४ ॥

॥ ९१० ॥ घटामाजी घालिजे अमृत ॥ अथवा घालिजे खात मूत ॥ ॥ १ ॥ घट घाई करितां चूर ॥ आकाशासी नुमटे चीर ॥ २ ॥ घट फोडोनी केला नाश ॥ आकाश तैसेंची अविनाश ॥ ३ ॥ तेवी देह नश्वर जाण ॥ एकाजनार्दनीं परिपूर्ण ॥ ४ ॥

॥ ९११ ॥ एक ह्मणती आत्मा सगुण ॥ एक ह्मणताती निर्गुण ॥ ॥ १ ॥ एक प्रतिपादिती भेद ॥ एक प्रतिपादितसे अभेद ॥ २ ॥ एक ह्मणती मिथ्या भूत ॥ प्रत्यक्ष दिसत जो येथें ॥ ३ ॥ ऐसे नाना भेद वाद सकळ ॥ विचारितां अज्ञान मूळ ॥ ४ ॥ अज्ञान तें मिथ्या जाणा ॥ शरण एकाजनार्दना ॥ ५ ॥

॥ ९१२ ॥ प्रकाश भासे सर्पाकार ॥ सर्प नसोनी जेवीं दोर ॥ १ ॥ कृष्ण वर्ण रक्त श्वेत ॥ स्फटिकीं जेवीं भासत ॥ २ ॥ ऐशी त्रिगुणाची मिळणी ॥ शरण एकाजनार्दनीं ॥ ३ ॥

॥ ९१३ ॥ आकाशापासोनी वायु झाला ॥ तो गगना वेगळा नाहीं गेला ॥ १ ॥ अग्नीपासुनी जळाचा अंशू ॥ जळापासुनी पृथ्वी प्रकाशू

॥ २ ॥ तैसें कार्य आणि कारण ॥ परस्परें अभिन्न जाण ॥ ३ ॥ जेवीं तंतु आणि पटू ॥ दोन्ही दिसती एकवटू ॥ ४ ॥ साखरेचे नारळ केले ॥ परी साखरत्वा नाहीं मुकले ॥ ५ ॥ जेवींका पृथ्वी मृत्तिका ॥ मृत्तिकेचें भांडें देखा ॥ ६ ॥ ऐसें कार्य कारण विशेष ॥ एकाजनार्दनीं निज दास ॥ ७ ॥

॥ ९१४ ॥ दर्पणामाजी आपण ॥ जीवरूपें शिव जाण ॥ १ ॥ जेणें स्वरूपें आपण ॥ तद्रूप बिंब दिसे जाण ॥ २ ॥ अग्नि राखें झाकोळिला ॥ तरी अग्निपणें संचला ॥ ३ ॥ जीव शिव दोन्ही होका एक ॥ तरी एक मलीन एक चोख ॥ ४ ॥ थिल्लरीं प्रतिबिंब भासे ॥ बिंबा अंगीं काय संचिता वसे ॥ ५ ॥ निर्वाळुनी पहातां वेगीं ॥ बिंब प्रतिबिंब वाउगी ॥ ॥ ६ ॥ ऐसें भुलूं नये मन ॥ शरण एकाजनार्दन ॥ ७ ॥

॥ ९१५ ॥ देहशत्रु वसती दूर देशीं ॥ येतां बहु दिवस लागती तयांसी ॥ १ ॥ बाह्य शत्रूंचें अल्प दुःख ॥ मनशत्रूचें वर्म अशेष ॥ २ ॥ आसनीं शयनीं एकांतीं ॥ जपीं अथवा ध्यानस्थितीं ॥ ३ ॥ ऐशिया मनातें न जिंकितां ॥ देवपण नये हातां ॥ ४ ॥ देवपणाचे भुलले हावे ॥ एकाजनार्दनीं नेणती देवें ॥ ५ ॥

॥ ९१६ ॥ साधक सर्वदा पुसती ॥ कोण बाधा चित्तवृत्ती ॥ १ ॥ एकचि गुण जैं पुरता जोडे ॥ तैं एकविधा वृत्ति वाढे ॥ २ ॥ एकचि न जोडे गुणावस्था ॥ यालागीं नोहे एकविधता ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं पूर्ण ॥ चित्त चैतन्य संपूर्ण ॥ ४ ॥

॥ ९१७ ॥ देह सांडावा ना मांडावा ॥ येणें परमार्थुची साधावा ॥ ॥ १ ॥ जेणें देहीं वाढे भावो ॥ देहीं दिसतसे देवो ॥ २ ॥ ऐसें देहीं भजन घडे ॥ त्रिगुणात्मक स्वयें उडे ॥ ३ ॥ त्रिगुणात्मक देहो वावो ॥ एकाजनार्दनीं धरा भावो ॥ ४ ॥

॥ ९१८ ॥ काळें काळ वायां जातू ॥ तेणें होये आयुष्य अंतू ॥ १ ॥ जाणोनियां रक्षी कोण ॥ सांडी देहाचा अभिमान ॥ २ ॥ अभिमान सांडोनी झडकरी ॥ एकाजनार्दनीं दास्य करी ॥ ३ ॥

॥ ९१९ ॥ भावें करितां माझी भक्ती ॥ विषयवासना जळोनी जाती

॥ १ ॥ चालतां माझे भक्तिपंथीं ॥ सकळ साधनें जळोनी जाती ॥ २ ॥ माझीया निज भक्ता ॥ न बाधेचि संसारव्यथा ॥ ३ ॥ प्रल्हादा गांजितां जगजेठी ॥ मी प्रगटलों कोरडे काष्ठीं ॥ ४ ॥ द्रौपदी गांजितां तात्काळीं ॥ कौरवांचीं तोंडे केलीं काळीं ॥ ५ ॥ गोकुळीं गांजितां सुरपती ॥ गोवर्धन धरिला हातीं ॥ ६ ॥ अर्जुन प्रतिज्ञेचे वेळीं ॥ म्यां लपविला हेळी ॥ ७ ॥ अंबऋषीचे गर्भवास ॥ म्यां सोशिले सावकाश ॥ ८ ॥ भक्तचरणींची माती ॥ एकाजनार्दनीं वंदिती ॥ ९ ॥

॥ ९२० ॥ सम साम्य सर्वां भूतीं ॥ ज्यांसी घडे भगवद्भक्ती ॥ १ ॥ जालीया सद्गुरुकृपा ॥ सर्व मार्ग होय सोपा ॥ २ ॥ हृदयीं ठसतांची भावो ॥ प्रगटे देवाधिदेवो ॥ ३ ॥ भक्ता भावार्थें विकला ॥ एकाजनार्दनीं देखिला ॥ ४ ॥

॥ ९२१ ॥ मस्तकीं केश चिकटले होती ॥ जैं ते निघती आपुले हातीं ॥ १ ॥ मिळती जैशा माय बहिणी ॥ हातीं घेउनी तेल फणी ॥ ॥ २ ॥ ऐसा त्रिगुणाचा ठावो ॥ एकाजनार्दनीं पहावो ॥ ३ ॥

॥ ९२२ ॥ सर्पें धांवोनी धरिल्या तोंडीं ॥ सर्वांगा घालितसे वेढी ॥ ॥ १ ॥ सर्प बाधेची सांकडी ॥ निवारी मंत्रवादी गारुडी ॥ २ ॥ रिघतां सद्गुरूसी शरण ॥ जैसें निरसे जन्म मरण ॥ ३ ॥ संसारसर्प मिथ्या देहीं ॥ एकाजनार्दनीं सदा ध्याई ॥ ४ ॥

॥ ९२३ ॥ एका पाठीं एका पुढा ॥ आहे मरणाचा हुडा ॥ १ ॥ आज मेले उद्यां मरती ॥ मागें रहाती तेही रडती ॥ २ ॥ मरण जाणोनीयां पाही ॥ उगेच बोलती प्रवाहीं ॥ ३ ॥ ऐसी भुली पडली देखा ॥ एकाजनार्दनीं भुलले ऐका ॥ ४ ॥

॥ ९२४ ॥ देह भोगीतसे मुख्य गोडी ॥ स्त्री भोगतो आवडी ॥ १ ॥ स्त्री हातीं धरितां देख ॥ वाढे प्रपंचाचें दुःख ॥ २ ॥ जें जें आणी तें तें थोडें ॥ धन धान्य आवडे कुडें ॥ ३ ॥ ऐसा भुलला संसारा ॥ लक्ष चौऱ्यांशी वेरझारा ॥ ४ ॥ सोडविता नाहीं कोणी ॥ एकाजनार्दनावांचुनी ॥ ५ ॥

॥ ९२५ ॥ व्याही जांवयाच्या कोडी ॥ पोषितसे अति आवडी ॥

॥ १ ॥ देह सुखाचीया चाडा ॥ अवघे मेळविले बोढा ॥ २ ॥ देहीं वाढवी अतिप्रीती ॥ पुत्र दारा माझे ह्मणती ॥ ३ ॥ जैसा जोंधळा कणा चढे ॥ कणभारें क्षितीं पडे ॥ ४ ॥ वृक्षा फळें येती अपारें ॥ वृक्ष लवे फळभारें ॥ ॥ ५ ॥ ऐसा भुलला स्वजनासी ॥ एकाजनार्दनीं सायासी ॥ ६ ॥

॥ ९२६ ॥ मनुष्यदेहीं व्हावें ब्रह्मज्ञान ॥ घेतो पुढिलें आमंत्रण ॥ ॥ १ ॥ पुढें जन्माचा विसार ॥ घेतो अतिमानें तो पामर ॥ २ ॥ चौऱ्यांशी लक्ष योनींभ्रती ॥ कोटी कोटी फेरे होती ॥ ३ ॥ ऐसा मनुष्यदेह पावन ॥ तो वेंची विषया कारण ॥ ४ ॥ होतां विषयीं वासना ॥ नाठवीची एका-जनार्दना ॥ ५ ॥

॥ ९२७ ॥ देहो जैं पासूनी जाला ॥ तैं पासुनी मृत्यु लागला ॥ १ ॥ साप बेडुकातें गिळी ॥ बेडूक मुखें माशी कवळी ॥ २ ॥ ऐसा काळ गिळितो जना ॥ न कळेची बुद्धिहीना ॥ ३ ॥ मरण जाणती बापुडीं ॥ धरती प्रपंचीं आवडी ॥ ४ ॥ ऐसे पामर आत्मघाती ॥ यासी महा होय फजिती ॥ ५ ॥ असो जनीं जनार्दन ॥ एकाजनार्दनीं शरण ॥ ६ ॥

॥ ९२८ ॥ घरीं धन धान्य पुरून ॥ सदा मागे जो कोरान्न ॥ १ ॥ द्रव्य असोनी नाहीं ह्मणे ॥ केविलवाणें ह्मणे मी दीन ॥ २ ॥ असोनी द्रव्याचिया राशी ॥ भिक्षा मागे अहर्निशीं ॥ ३ ॥ ऐसा संचय करून ॥ सवेंची पावला मरण ॥ ४ ॥ वांया गेला नरदेही ॥ एका-जनार्दनीं पाही ॥ ५ ॥

॥ ९२९ ॥ कवडी कवडी घाली खांचे ॥ नित्य नूतन भिक्षा वाचे ॥ ॥ १ ॥ अतितासी दान ॥ हें तों स्वप्नीं नाहीं जाण ॥ २ ॥ पर्वकाळ विधी ॥ न कळे अभाग्यासी कधीं ॥ ३ ॥ ठेउनी चित्त धनावरी ॥ सवेंची फिरे घरोघरीं ॥ ४ ॥ जन्मा येवोनी अघोर ॥ एकाजनार्दनीं भोगिती पामर ॥ ५ ॥

॥ ९३० ॥ थोर गर्भीची यातना ॥ आठवितां दुःख मना ॥ १ ॥ नऊ मासवरी ॥ पचे विष्ठेचे दाथरीं ॥ २ ॥ जन्म होतांची जननी ॥ सुख मानी अनुदिनीं ॥ ३ ॥ बाळ वाढतसे सायासें ॥ तों तों माउली संतोषे ॥ ४ ॥ तारुण्याच्या येतां भरा ॥ मातेसी करी पाणउतारा ॥ ५ ॥

पावला सर्वे ज्ञातारपण ॥ नाकीं तोंडीं लाळ जाण ॥ ६ ॥ नाठवेची रामनाम ॥ एकाजनार्दनीं तो अधम ॥ ७ ॥

॥ ९३१ ॥ कैंचें ध्येय ध्याता ध्यान ॥ अवघें विषयावरी मन ॥ १ ॥ तेथें कैंचें कर्माचरण ॥ सदा विषयींच मन ॥ २ ॥ कैंचा दोष कैंचा गुण ॥ अवघें विषयींच मन ॥ ३ ॥ कैंचा बोध कैंचा भेद ॥ सदा विषयीं तो धुंद ॥ ॥ ४ ॥ ऐसा भुलोनी विषयीं ॥ एकाजनार्दनीं बुडे पाही ॥ ५ ॥

॥ ९३२ ॥ स्नान संध्या शौचाचार ॥ स्वधर्म नावडे साचार ॥ १ ॥ कनकफळ नाम गोमटें ॥ बाहेर आंत दिसे कांटे ॥ २ ॥ शरीर श्वेत निर्नासिक ॥ तोंडाळ ओढाळ पतिनिंदक ॥ ३ ॥ ऐशी आचारहीन बापुडी ॥ एकाजनार्दनीं न धरी गोडी ॥ ४ ॥

॥ ९३३ ॥ शिमगीयाचे सणीं ॥ रामकृष्ण न ह्मणे कोणी ॥ १ ॥ महा शब्द उच्चारण ॥ कैसे भुलले अज्ञान ॥ २ ॥ गजरें शब्द करी ॥ एकाजनार्दनीं ह्मणा हरी ॥ ३ ॥

॥ ९३४ ॥ आडके कमळिणीकोशीं ॥ भ्रमरू जैसा आमोदासी ॥ १ ॥ तैसा विषया लोधला ॥ रामनामें विवंचला ॥ २ ॥ कोरडें काष्ठ भेदोनी जाये ॥ तो कमळदळीं गुंतला राहे ॥ ३ ॥ ऐसा विषयीक सायासी ॥ एकाजनार्दनीं धरी मानसीं ॥ ४ ॥

॥ ९३५ ॥ भिक्षेलागीं पाणिपात्र ॥ सांठवण उदरमात्र ॥ १ ॥ सायंकाळीं प्रातःकाळासी ॥ भिक्षासंग्रह नसावा निश्चयेंसी ॥ २ ॥ संग्रह यत्नाचिया चाडा ॥ मोहोळ बांधिती अवघा कडा ॥ ३ ॥ मोहोळ झाडितां खासी ॥ नाश होतो मासीयांसी ॥ ४ ॥ सर्व मायिक पदार्थ ॥ एकाजनार्दनीं परमार्थ ॥ ५ ॥

॥ ९३६ ॥ स्वप्नामाजीं अनिरुद्धें देखिलीसे उखा ॥ तयालागीं घेउनी गेली चित्ररेखा ॥ १ ॥ तया सोडवण्या हरी ॥ धांव घेतसे झडकरी ॥ २ ॥ पाहे स्वप्नाचेनी कांतें ॥ अनिरुद्धा केलेंसे निरुतें ॥ ३ ॥ स्वप्नेंची देखे सारा ॥ एकाजनार्दनीं पसारा ॥ ४ ॥

॥ ९३७ ॥ समूळ कामनेतें दंडावें ॥ मग शिरादिक मुंडावें ॥ १ ॥ अंतरीं अनिवार कामना ॥ विरक्ति तो दाखवी जना ॥ २ ॥ नाम गर्जतां हे होटीं ॥ एकाजनार्दनीं काम पळे नेहटीं ॥ ३ ॥

॥ ९३८ ॥ पांडवांचे गृहीं जाण ॥ असंख्य जेविले ब्राह्मण ॥ धर्माचें विस्मित मन ॥ संख्ये लागीं ॥ १ ॥ तें कळलें वैकुंठा ॥ निर्मिली तेव्हां घंटा ॥ तेव्हां ते गर्जे देखा ॥ संख्यानाद ॥ २ ॥ तेथें व्यासदेवाचा सुत ॥ शुकदेव अवधूत ॥ ब्राह्मण शेष व्हावें प्राप्त ॥ ह्मणोनी येता जाहला ॥ ३ ॥ रात्रसमयीं सुखी येकीं ॥ शीत घातलें मुखीं ॥ घंटानाद सकळीकीं ॥ ऐकिला कानीं ॥ ४ ॥ कृष्ण पाहे ध्यानीं ॥ शुकदेव आणिला धुंडोनी ॥ पूजा नमस्कार करुनी ॥ गेलासे वना ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं जाण ॥ धर्में केला प्रश्न ॥ तोचि सखा श्रीकृष्ण ॥ सांगतसे ॥ ६ ॥

॥ ९३९ ॥ कोण पार नेई भवनदींतुनी ॥ सद्गुरूवांचूनि तुह्मालागीं ॥ १ ॥ अनंत उपाय जरी तुह्मीं केले ॥ पार पावावलें नव जाय ॥ ॥ २ ॥ नाना तीर्थयात्रा घडल्या तुह्मासी ॥ परि संतोषासी न पावाल ॥ ॥ ३ ॥ व्रतें तपें यज्ञें दानें चित्तशुद्धी ॥ परि निजपदीं स्थिर नोहे ॥ ४ ॥ विवेकवैराग्यबळें सद्गुरुभेटी ॥ आन आटाआटी नलगे कांहीं ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं गुरुचरण धरी ॥ तेथें स्थिर करी मन नरा ॥ ६ ॥

---

## भक्तीचें महात्म्य.

॥ ९४० ॥ भक्तपणा सान नव्हे रे भाई ॥ भक्ताचे पाय देवाचे हृदयीं ॥ १ ॥ भक्त तोचि देव भक्त तोचि देव ॥ जाणती हा भाव अनुभवी ॥ २ ॥ दान सर्वस्वें उदार बळी ॥ त्याचें द्वार राखे सदा वनमाळी ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं मिति नाहीं भावा ॥ देवचि करितो भक्ताची सेवा ॥ ४ ॥

॥ ९४१ ॥ भक्तीचे उदरीं जन्मलें ज्ञान ॥ भक्तीनें ज्ञानासी दिधलें महिमान ॥ १ ॥ भक्ति तें मूळ ज्ञान तें फळ ॥ वैराग्य केवळ तेथींचें फूल ॥ २ ॥ फूल फळ दोन्ही येर येरां पाठीं ॥ ज्ञान वैराग्य तेविं भक्तीचे पोटीं ॥ ३ ॥ भक्तिविण ज्ञान गिवसिती वेडे ॥ मूळ नाहीं तेथें फळ केविं जोडे ॥ ४ ॥ भक्तियुक्त ज्ञान तेथें नाहीं पतन ॥ भक्ति माता तया करितसे जतन ॥ ५ ॥ शुद्ध भक्ति भाव तेथें तिष्ठे देव ॥ ज्ञानासी तो ठाव सुखवस्तीसी ॥ ६ ॥ शुद्ध भाव तेथें भक्तियुक्त ज्ञान ॥ तयाचेनी अंगें समाधि समाधान ॥ ७ ॥ एकाजनार्दनीं शुद्ध भक्ति क्रिया ॥ ब्रह्मज्ञान साच्या लागतसे पाया ॥ ८ ॥

॥ ९४२ ॥ भक्ति असो मुक्ति घाला रे बाहेरी ॥ बहुतां चाळविलें चाळयाची थोरी ॥ १ ॥ भक्ति ते राहो मुक्ति ते जावो ॥ मुक्तीमाजीं भावो नाहीं नाहीं ॥ २ ॥ मुक्ति चाळा लाउनी सेखीं वोसंडी ॥ नेणे ऐसे किती केले पाखांडी ॥ ३ ॥ मुक्तिचेनी योगें वामदेव शुक ॥ त्यांचाही विकल्प मानिताती लोक ॥ ४ ॥ नामसंकीर्तन भक्ति मुक्तीसी धाक ॥ संवादें दोघेही राहो माझी भाक ॥ ५ ॥ उपजोनीया पोटीं भक्तीतें ग्रासी ॥ मातृहत्यारी मुक्ति कवण पोसी ॥ ६ ॥ एकाजनार्दनीं सेवितां चरणरज ॥ मुक्ति सेवा करी सांडुनियां लाज ॥ ७ ॥

॥ ९४३ ॥ उंचा उंचपण नीचा नीचपण ॥ तें नाहीं कारण विठ्ठल भेटी ॥ १ ॥ उंच नीच याति असो भलते जाती ॥ विठ्ठल ह्मणतां मुक्ति जड जीवा ॥ २ ॥ उभारुनी बाह्या कटीं कर उभा ॥ एकाजनार्दनीं शोभा विटेवरी ॥ ३ ॥

॥ ९४४ ॥ शास्त्रज्ञ पंडित हो कां वेदवक्ते ॥ परी हरिभजनीं रत वंद्य सदा ॥ १ ॥ भक्तीच कारण तेणें सरतेपण ॥ वाउगाची शीण जाणिवेचा ॥ २ ॥ मी एक जाणता पैल तो नेणता ॥ ऐसा विकल्प भावितां पतन जोडे ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं विकल्प त्यजोनी ॥ विठ्ठल चरणीं मिठी घाली ॥ ४ ॥

॥ ९४५ ॥ लहानाहुनी लहान न धरी अभिमान ॥ तेणें हो कारण सर्व बापा ॥ १ ॥ उंचपणें पहातां वेळूचिये परी ॥ लोहाळा अंतरीं नम्र होये ॥ ॥ २ ॥ भक्ति करतां मुक्ति संताचे संगतीं ॥ मग मनीं विश्रांति हरि जोडे ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं संतासी शरण ॥ धरूनियां कान नाचूं द्वारीं ॥ ४ ॥

॥ ९४६ ॥ भावाचेनी भक्ति थोर ॥ भावें तुटे वेरझार ॥ १ ॥ भावें अंकित देव भक्ताचा ॥ वेद शास्त्र बोले वाचा ॥ २ ॥ भावें गुरु शिष्य दोन्ही ॥ भावयुक्त सर्वगुणीं ॥ ३ ॥ भावें चाले भक्तिपंथ ॥ भावें पुरे मनोरथ ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं भाव ॥ भावें दिसे देहीं देव ॥ ५ ॥

॥ ९४७ ॥ पीक पिकलें प्रेमाचें ॥ सांठविलें गगन टांचें ॥ १ ॥ भूमि शोधोनी पेरिजे बीज ॥ सद्गुरुकृपें उगवलें सहज ॥ २ ॥ कामक्रोधाच्या उपटोनी पेंडी ॥ कल्पनेंच्या काशा काढी ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं निज भाव ॥ विश्वंभरित पिकला देव ॥ ४ ॥

## भवाचें महात्म्य.

॥ ९४८ ॥ भाव भजनातें निपजवी ॥ भक्त देवातें उपजवी ॥ १ ॥ आतां भजनीं देव केला ॥ भक्त वडिल देव धाकुला ॥ २ ॥ सेवा करणें हा संकल्प ॥ भक्त देवाचाही बाप ॥ ३ ॥ भक्त कळवळा देवाचा ॥ देव झाला सा भक्ताचा ॥ ४ ॥ देव भक्ताचे पोटीं ॥ झाला ह्मणोनी आवड मोठी ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं नवलाव ॥ कैसा भक्तचि झाला देव ॥ ६ ॥

॥ ९४९ ॥ असोनी सबराभरी ॥ बाह्य आणि अंतरीं ॥ संपुष्टा माझारीं ॥ ह्मणती देव ॥ १ ॥ कल्पनेचा देव ऐसा जया भाव ॥ तो न करी निर्वाहो आह्मा लागीं ॥ २ ॥ सुक्षेत्रीं पुण्य अनुक्षेत्रीं पाप ॥ न चले हा संताप कल्पनेचा ॥ ३ ॥ काशी हो पंढरि तीर्थयात्रा करी ॥ सर्वत्र नरहरि तोचि भाव ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं सर्व सिद्धि असे ॥ नाथिलेंची पिसें मतवाद्या ॥ ५ ॥

॥ ९५० ॥ श्रीगुरुपाईं ठेवी तूं विश्वास ॥ दासाचा तूं दास होय साच्या ॥ १ ॥ परब्रह्म राम वसिष्ठ शरण ॥ कृष्णें संदीपन गुरु केला ॥ ॥ २ ॥ वाल्मीका उपदेशी नारद तो मुनी ॥ वंद्य त्रिभुवनीं जाला वाल्हा ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं गुरु मज भेटला ॥ मोकळा दाविला मार्ग तेणें ॥ ४ ॥

॥ ९५१ ॥ गुरुवचनी मन लगावे ॥ नख शिख सुख पावे ॥ १ ॥ हरि निज नित्य गति आवे ॥ मोही भोवरलाल ॥ २ ॥ बोधसुबात चलावे ॥ की प्रीतम प्रीत बधावे ॥ ३ ॥ अंगसंगनी संग लगावे ॥ की सुखदुःख बुझावे ॥ ४ ॥ सुखदुःखातीत परमानंद ॥ एकाजनार्दनीं पावे ॥ ५ ॥

॥ ९५२ ॥ स्वामीसी तो पुरे एक भाव गांठीं ॥ वाउगा श्रम नेहटी वांया जाय ॥ १ ॥ भावासाठीं देव अंकीत अंकिला ॥ राहिला उगला बळीचे द्वारीं ॥ २ ॥ अर्जुनाचे रथीं सारथि होउनी ॥ राहे मोक्षदानी भावासाठीं ॥ ३ ॥ विदुराचे घरीं आवडीनें भक्षी ॥ कण्या साक्षेपेंसी खातो देव ॥ ४ ॥ पोहे सुदाम्याचे खाउनी तुष्टला ॥ एकाजनार्दनीं दिला सुवर्ण गांव ॥ ५ ॥

॥ ९५३ ॥ देवासी तो पुरे एक प्रेमभाव ॥ पूजा अर्चा वाव सर्व जाणा ॥ १ ॥ मनापासुनीयां करितां कीर्तन ॥ आनंदें नर्तन गातां गीत ॥ ॥ २ ॥ रामकृष्ण हरि उच्चार सर्वदा ॥ कळीकाळ बाधा तेणें नोहे ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं हाची पैं विश्वास ॥ सर्वभावें दास होईन त्याचा ॥ ४ ॥

॥ ९५४ ॥ सप्रेमें करितां भजन ॥ तेणें घडती कोटी यज्ञ ॥ १ ॥ प्रेमसार प्रेमसार ॥ वांया भार कुंथेचा ॥ २ ॥ प्रेमेंवीण न भेटे देवो ॥ अवघा वावो पसारा ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं प्रेमसार ॥ तुटे वेरझार येणें जाणें ॥ ४ ॥

॥ ९५५ ॥ जो विनटला श्रीहरिचरणीं ॥ त्यासी भवबंधनीं श्रम नाहीं ॥ १ ॥ देव उभा मागें पुढें ॥ वारी सांकडें भवाचें ॥ २ ॥ नामस्मरणीं रत सदा ॥ तो गोविंदा आवडे ॥ ३ ॥ त्याचे तुळणे दुजा नाहीं ॥ एका पाही जनार्दनीं ॥ ४ ॥

॥ ९५६ ॥ झालीया गुरुकृपा सुगम ॥ सर्वत्र ठसावें परब्रह्म ॥ १ ॥ तेथें नाहीं जन्ममरण ॥ भवबंधन असेना ॥ २ ॥ ऐसा धरितां विश्वास ॥ काय उणें मग तयास ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं भाव ॥ स्वयें आपणची होय देव ॥ ४ ॥

॥ ९५७ ॥ हातीं सांपडतां वर्म ॥ वाउगा श्रम कोण करी ॥ १ ॥ पायाळची जवळी असतां ॥ धन सर्वथा बहु जोडे ॥ २ ॥ अंजन ते गुरुकृपा ॥ पुण्यपापा कोण लेख ॥ ३ ॥ शरण एकाजनार्दनीं ॥ दुजेपणीं एकला दिसे ॥ ४ ॥

॥ ९५८ ॥ माझें मुख मज दाखविलें डोळां ॥ नव्हे दृष्टीवेगळा काय करूं ॥ धृ० ॥ जें जें पाहूं जाय तें तें राम होय ॥ दाखविली सोय गुरुनाथें ॥ १ ॥ भक्तिचेनी योगें ज्ञान आकळलें ॥ विज्ञान होउनि ठेलें स्वस्वरूप ॥ २ ॥ द्वैत होतें तें अद्वैत झालें ॥ नाहीं उरलें ऐसें ह्मणावया ॥ ३ ॥ अवघाचि होऊनि स्फुंद नाहीं आंगीं ॥ कृष्णार्पण वेगीं सर्व गत ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं मग्न पैं झाला ॥ देहीं देह गेला भाव माझा ॥ ५ ॥

॥ ९५९ ॥ देवा भक्ता ऐक्य सद्गुरु बोधी ॥ देव होऊनि देवा

भजीजे आधीं ॥ १ ॥ भक्तीचि कारण भक्तीची कारण ॥ प्राप्तीचें साधन हेंचि जाण ॥ २ ॥ सर्व भूतीं देवो निःसीम ज्याचा भावो ॥ प्राप्ति तयाची पाहो आशा करी ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं एकविधा प्रीती ॥ देवोचि विकला भावा कवण मागे मुक्ती ॥ ४ ॥

॥ ९६० ॥ देवासी झांकावया माया पावे ॥ तिसी खाऊनियां नागवा धांवे ॥ १ ॥ देव पिसा झाला देव पिसा झाला ॥ देव पिसा झाला भक्तीलागीं ॥ २ ॥ अवघा खाऊनियां उगला न राहे ॥ आपुलें एकपण आपण स्वयें ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं एकलें केलें ॥ आपुले पिशातें भक्ति लाविलें ॥ ४

॥ ९६१ ॥ साधु देखोनी ह्मणे हा सत्य देवो ॥ सर्वेचि निदैवो ह्मणोनियां वाळी ॥ १ ॥ क्षण एक भावो क्षण एक अभावो ॥ गुणाचा स्वभावो जिंकवेना ॥ २ ॥ क्षण एक वंदी क्षण एक निंदी ॥ निश्चयाची बुद्धि दृढ नाहीं ॥ ३ ॥ एकाजनार्दन भक्त कीं मुक्त ॥ प्रपंचीं निश्चित सर्वेचि ह्मणती ॥ ४ ॥

॥ ९६२ ॥ विकल्पें देहातें घातले खाण ॥ मूळ मूर्ति जाण घेऊनि गेला ॥ १ ॥ देव चोरें नेला देव चोरें नेला ॥ भक्त परतला माग नेघे ॥ २ ॥ तृष्णाजळीं करितां अंघोळी ॥ देवाची संभळी उलंडली ॥ ३ ॥ देव बुडाला देव बुडाला ॥ भक्त उडाला निज भावें ॥ ४ ॥ क्रोधाचा देहीं उठिला भडका ॥ देवपूजा देखा अहळली ॥ ५ ॥ देव जळाले देव जळाले ॥ भक्त पळाले मरणमार्गीं ॥ ६ ॥ मोहाचे घरीं ममता वसली ॥ देव विसरली जीवें भावें ॥ ७ ॥ देव हारपला देव हारपला ॥ भक्त थोंटावला नाहीं ह्मणोनी ॥ ८ ॥ न जळे न बुडे न वंचे न फुटे ॥ एकाजनार्दनीं भेटे अखंड देव ॥ ९ ॥ देव तो नित्य देव तो नित्य ॥ ऐसे निज भजनें नित्य भक्त मुक्त ॥ १० ॥

॥ ९६३ ॥ हरिभक्तीचें सुख जे नर नेणती ॥ त्यांसि भक्तिपदप्राप्ति केंवी होय ॥ १ ॥ भक्तिचि कारण भक्तिचि कारण ॥ संसारतारण श्रीराम भजन ॥ धृ० ॥ एकाजनार्दनीं कीर्तन गजर ॥ भावें तोषिले येती हरि-हर ॥ २ ॥

---

## भावभक्तिज्ञान किंवा आत्मप्राप्ती.

॥ ९६४ ॥ भक्तीच्या पोटा मुक्ति पैं आली ॥ भक्तीनें मुक्तीतें वाढवीलें ॥ १ ॥ भक्ति ते माता मुक्ति ते दुहिता ॥ जाणोनि तत्त्वतां भजन करी ॥ २ ॥ भक्ति सोडोनि मुक्ति वांछिती वेडी ॥ गूळ सोडोनि कैसी जे गोडी ॥ ३ ॥ संतोषोनि भक्ति ज्यासी दे मुक्ती ॥ तोचि लाभे येर व्यर्थ कां शिणती ॥ ४ ॥ एकाजनार्दना एक भाव खरा ॥ भक्ति मुक्ति दाटूनी आलिया घरा ॥ ५ ॥

॥ ९६५ ॥ भाव तोचि देव भाव तोचि देव ॥ ये अर्थीं संदेह धरूं नका ॥ १ ॥ भावें भक्ति फळे भावें देव मिळे ॥ निज भावें सोहाळे स्वानंदाचे ॥ २ ॥ एकाजनार्दनीं भावाच्या आवडी ॥ मनोरथ कोडीं पुरती तेणें ॥ ३ ॥ भावचि कारण भावचि कारण ॥ या परतें साधन नाहीं नाहीं ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं भावचि कारण ॥ सच्चिदानंदावरील दावी खूण ॥ ५ ॥

॥ ९६६ ॥ वेद जाणुं गेला पुढें मौनावला ॥ तें गुह्य तुजला प्राप्त कैंचें ॥१॥ पूर्व सुकृताचा पूर्ण अभ्यासाचा ॥ दास सद्गुरूचा तोचि जाणे ॥२॥ जाणणें नेणणें हरीचे ठिकाणीं ॥ एकाजनार्दनीं हरि बोला ॥ ३ ॥

॥ ९६७ ॥ भावचि थोर कीं देवचि थोर ॥ दोहींचा निर्धार करूनि पाहा ॥ १ ॥ जंव जंव भाव तंव तंव देव ॥ भावचि नाहीं तेथें देवचि वाव ॥ २ ॥ एकाजनार्दनीं जंव जंव भाव ॥ लटकें असेल तरी हृदयीं पहाहो ॥ ३ ॥

॥ ९६८ ॥ सर्व भूतीं भगवद्भाव ॥ तंव तो भावचि झाला देव ॥ १ ॥ आह्मा ग्रासूं आला काळ ॥ तंव तो काळच झाला कृपाळ ॥ २ ॥ एकाजनार्दनीं शरण ॥ आह्मा कैचें जन्ममरण ॥ ३ ॥

॥ ९६९ ॥ देहबुद्धि साधन तुझें तुज बंधन ॥ वासनेची शेंडी वाढवूं नको ॥ १ ॥ वाऱ्यावरी भाव तेथें कैंचा देव ॥ स्थानमान लक्षितां अधिकचि संदेह ॥ २ ॥ दर्पणींचें प्रतिबिंब पाहतां दिसे साच ॥ हातीं धरूं जातां देखणें अहाच ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं एकचि बुद्धी ॥ जैसा भाव तैसी होतसे सिद्धी ॥ ४ ॥

॥ ९७० ॥ प्राण्या राम भजावा रे ॥ आवडीनें हरिगुण गावा रे ॥ धृ० ॥ तान मान राग ज्ञान कळेना ॥ धरीं निज भावा रे ॥ १ ॥ काळ वेळ तेहि कळेना ॥ परी हरि गावा रे ॥ २ ॥ एकाजनार्दनीं गावा ॥ गर्व त्यजावा रे ॥ ३ ॥

॥ ९७१ ॥ बा रे जन्मोनी केलेंस काय ॥ धृ० ॥ घडी घडी पल पल वय हें जातें ॥ व्यर्थ श्रमविली माय ॥ १ ॥ कैसा तूं आलास कोठून एथें ॥ मनीं शोधुनी तूं पाहे ॥ २ ॥ एकाजनार्दनीं शरण तूं जाई ॥ लाग सदा गुरूचे पायीं ॥ ३ ॥

॥ ९७२ ॥ रिकामाची राम न ह्मणे तोंडी ॥ पायांमाजी डोई घाली मुरकुंडी ॥ १ ॥ द्या हा आळसरीती आळस ॥ आळसें कळस वाहियेला ॥ २ ॥ आळसेंचि कांहीं न करी काम ॥ पडपडल्या तरी न ह्मणे राम ॥ ३ ॥ आळसाचा कैसा नये उबगू ॥ रामनामेंवीण झाला निःसंगु ॥ ४ ॥ आळसाचा गर्भ उदरीं पोषी ॥ रामनारायण न ह्मणे मुखीं ॥ ५ ॥ आळसाचा जैं होय निजोडा ॥ एकाजनार्दन सांपडे फुडा ॥ ६ ॥

॥ ९७३ ॥ राम न ह्मणे आवडी ॥ वाचा भलतेची वडबडी ॥ १ ॥ जिव्हा नामाची वाचक ॥ आळसें भोगीताती नरक ॥ २ ॥ विनोद टवाळयाच्या गोष्टी ॥ वाचें रामनाम तुटी ॥ ३ ॥ असत्याची पैं वांकडी ॥ अखंड वाचेसी रोकडी ॥ ४ ॥ आरालिया करिती निंदा ॥ परि न ह्मणती हरिगोविंदा ॥ ५ ॥ निंदेपरतें नाहीं पाप ॥ सत्य जाणा माझे बाप ॥ ६ ॥ गर्जतां नामाचे पवाडे ॥ कळीकाळ पायां पडे ॥ ७ ॥ एका-जनार्दनीं नाम ॥ सहज चेतन निजधाम ॥ ८ ॥

॥ ९७४ ॥ भोळे चतुर केलिया होय ॥ परि चतुर जाले ते भोळे न होय ॥ १ ॥ या लागी भोळीव ते शुद्ध ॥ जाणीवेनें पहा अविद्येचा बोध ॥ २ ॥ भोळीयाचें सदा एकविध मन ॥ चतुराचे ठायीं घोळभोळ ॥ ३ ॥ जाणोनी जो ज्ञान होय जो भोळा ॥ एकाजनार्दनीं तो एक आगळा ॥ ४ ॥

॥ ९७५ ॥ इंद्रिय देवाचीं सुटली बांदवडी ॥ स्वानंदें उभविली गुढी सरली असुर धाडी ॥ १ ॥ रामराज्य झालें रामराज्य झालें ॥ रामराज्य झालें

सद्गुरुचेनि बोले ॥ २ ॥ अहं रावणु रामें मारिला प्रचंडू ॥ धरी मारी देहीं सरला इंद्रिय दंडू ॥ ३ ॥ त्रिकुटशिखरीं पिटले रामराज्य धेंडे ॥ क्रोधादि असुर गेले करुनी काळीं तोंडें ॥ ४ ॥ विषयाचे करभार कामिनी करिती अंतू ॥ रामसामराज्यें विराला मन्मथू ॥ ५ ॥ रामनाम तेथें कळिकाळ कांपती ॥ रामनामें सम अधमोत्तमा मुक्ती ॥ ६ ॥ शरणागत निज स्थापिले निजपदीं ॥ रामनामें जड तरती भवाब्धी ॥ ७ ॥ एकाजनार्दनीं रामनाम जपे ॥ रामराज्य झालें सद्गुरुकृपें ॥ ८ ॥

॥ ९७६ ॥ प्रपंचीं मोडली दीठी ॥ ऐसी सांगेन गोष्टी ॥ आनंदाची सृष्टी ॥ करीन आतां ॥ १ ॥ नवल कैसें देख ॥ एकपणेंविण सुख ॥ अनुभवी कौतुक ॥ अनुभवीया ॥ २ ॥ आदि मध्य अवसानही ॥ नाहीं जया कांहीं ॥ आपी आपणही ॥ विलसत ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं ॥ सहज मिळणी ॥ तया सुखा लावणी ॥ तोची जाणे ॥ ४ ॥

॥ ९७७ ॥ आहांच वाहांच किती सांगाल गोष्टी ॥ सहजी उठाउठी भेटी करा ॥ १ ॥ अनुप्राणाच्या बुडी ज्ञान कैची वाढी ॥ भेटी होय रोकडी ऐसें करा ॥ २ ॥ क्षणाचा परि कळो न व्हावे या वेळा ॥ सहजाचा सोहळा दावा वेगीं ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं कृपेचा सागर ॥ अनुमाना केर काढीयेला ॥ ४ ॥

॥ ९७८ ॥ देह तंव बापुडें अचेतन मढें ॥ तें मी ह्मणोनी पुढें मानीतोसी ॥ १ ॥ मरण मज आहे करूं कैसें काय ॥ आज रामराया घालीतोसी ॥ २ ॥ तुज जन्म ना नाश नित्य ना अविनाश ॥ देहबुद्धि अहंपाश लावियेला ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं मुळीं नाहीं दीठी ॥ स्वप्नींचें भय तें पाठी जागृती लागे ॥ ४ ॥

॥ ९७९ ॥ देह बुद्धि कैसेनि जाय ॥ भावें धरी सद्गुरुचे पाय ॥ १ ॥ ऐसा करिल तो बोधू ॥ देहीं फेडील देह बंधू ॥ २ ॥ तुझें हारपलें तुज माजी ॥ तो दावील निजनिजीं ॥ ३ ॥ एकाजनार्दनाचे भेटी ॥ देहविदेहाचि खुंटेल गती ॥ ४ ॥

॥ ९८० ॥ देखत देखत काळ फोडोनी खाय ॥ काय झाले ह्मणोनी पुसता हे ॥ १ ॥ काय सांगों तुझी नवल परी ॥ जनें भुलविलें विषयव्यापारीं ॥ २ ॥ मुखें बोले तत्काळ मरण ॥ विषया कारणें बैसलें धरणें ॥

॥ ३ ॥ मुळीं आगींटे जळत आहे ॥ शाखा शिंपील्या वृद्धि कैंवी होय ॥ ॥ ४ ॥ अंतरीं भरला विषय स्वार्थ ॥ माळामुद्रावरी नव्हे परमार्थ ॥ ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं रिघाल्या शरण ॥ आयुष्य सार्थक चुके जन्म मरण ॥ ६ ॥

॥ ९८१ ॥ नाहीं वर्णव्यक्ति कैंचे स्वरूप ॥ एकी एकपण नांदें तें आयुप ॥ १ ॥ ठाय सांगों साची कैसी गोडी ॥ अनुभवेंविण न कळे फुडी ॥ २ ॥ वर्णव्यक्ति आपण झाला ॥ अरूपरूप रूपा आला ॥ ३ ॥ सकळ होउनी सकळीं आहे ॥ भूतमात्रीं व्यापक आहे ॥ ४ ॥ अनुभव कैसा पुसों ह्मणा ॥ सद्गुरूवांचुनी न कळे जाणा ॥ ५ ॥ एकाजनार्दना शरण या पां ॥ अनुभव गोडी तत्काळ घ्या पां ॥ ६ ॥

॥ ९८२ ॥ रिकामा कां फेडीसी वेळ ॥ आयुष्य वेचलें पैल आला काळ ॥ १ ॥ सावधान होईं सावधान होईं ॥ आपुलें हित कांहीं तरी पाहीं ॥ २ ॥ प्रपंच वेढितां लोटलें मनू ॥ तूं काय अधिक तयाहुनी ॥ ॥ ३ ॥ जें सबाह्यांतरीं तयासी चुकी ॥ या विषयांचेनि सुखें होसील दुःखी ॥ ४ ॥ आपुल्या हितास लावी तूं मनास ॥ नाहीं तरी तूं चोरीं नेलास ॥ ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं धरी विश्वास ॥ तैंच तुझा चुकेल गर्भवास ॥ ६ ॥

॥ ९८३ ॥ मनाचि लगबग मोडली नाहीं ॥ तेणें उपदेशें काज काई ॥ १ ॥ त्याचे आह्मीं सेवूं चरण ॥ ज्याचेनि बोधें होय समाधान ॥ धृ० ॥ तत्वातें मेळवितो एक गुरू ॥ येर तो जाणा लोकाचारू ॥ २ ॥ मन सुखावलें कर्णीं आनंदू ॥ एकाजनार्दनीं झाला बोधू ॥ ३ ॥

॥ ९८४ ॥ अग्नि आणि द्विज दोन मुखें देवा ॥ संतोष केशवा उभय मुखें ॥ १ ॥ अग्निमुखाहुनि द्विज मुख थोर ॥ वेदांचा उच्चार जया मुखें ॥ २ ॥ एकाजनार्दनीं दुतोंडें चैतन्य ॥ भूदेवनारायण पूजूं आह्मी ॥ ३ ॥

॥ ९८५ ॥ नरदेहाचेनी आयुष्यें ॥ मिथ्या व्यवसाय करिती कैसे ॥ अमृत सांडोनी जैसें ॥ कांजी प्याले ॥ धृ० ॥ विषयो अभिलाषालागीं ॥ पतंग जेवीं रिघे आगीं ॥ आयुष्य वेचलें वेगीं ॥ शुद्धि नाहीं ॥ १ ॥ कांरे अखंड दुश्चिता ॥ जागे आपुलिया हिता ॥ नाहीं तरी सर्वथा ॥ नाडलासी ॥ ॥ २ ॥ माप लागलें शरीरीं ॥ काळ मोवितो मापारी ॥ सळे व्हावया दुरी ॥

उरी उरली नाहीं ॥ ३ ॥ वेचितां लक्ष कोडी ॥ नरदेह आयुष्याची न मिळे एक घडी ॥ तेंही आयुष्य वेचिलें वोढी ॥ विषयांचें ॥ ४ ॥ पांघरूण जाळुनी ॥ केलें असे तापणें ॥ शीतनिवारण ॥ नव्हेंची शेखी ॥ ५ ॥ आयुष्याचे तातडी ॥ करा काढा काढी ॥ नाहीं तरी पडिलासी आडीं ॥ अंधकूपीं ॥ ६ ॥ एकाजनार्दनीं ॥ भाव नाहीं नरा ॥ आयुष्याचा मातेरा ॥ करुनी ठेला ॥ ७ ॥

॥ ९८६ ॥ सावधान गा ॥ तुझे तुज मोकळ बहुत जाण ॥ असतांची होतांसी कां नेण ॥ विषयलोभू तो तुज बंधन गा ॥ १ ॥ मन बुद्धि अहंकार चित्त ॥ तुझ्या वृत्तीचा साक्षिभूत ॥ मुख्य अन्तर्यामीं भगवंतू ॥ तो धर्माधर्म जाणें समस्तू ॥ २ ॥ तुझ्या हृदयीं जो जो भावो गा ॥ त्यासि निजसाक्षी निज देवो गा ॥ एकाजनार्दनीं ऐका भावो ॥ तें हें समूळ अवघेंचि वावो ॥ ३ ॥

॥ ९८७ ॥ भक्ति ह्मणे संसक्ती ॥ सांडी भवभाव आसक्ती ॥ पहातां निजभावें विरक्ती ॥ सर्वभूतीं भगवंतू ॥ धृ० ॥ भावो लागला भगवंतीं ॥ हरिरूप त्रिजगती ॥ पहातां कर्माकर्मगती ॥ आत्मस्थिति अखंड ॥ १ ॥ करितां देहींचे कर्माचरण ॥ कर्मास बाह्य दे हीन ॥ विदेहा अवसान ॥ गमनागमन खुंटलें ॥ २ ॥ एकाजनार्दनीं आपण ॥ अनन्यभावें पैं शरण ॥ तैं जन्मा आलें मरण ॥ ब्रह्म परिपूर्ण निजभावें ॥ ३ ॥

॥ ९८८ ॥ सराब पिंडा पिवते मस्त ॥ फेरिस्ते करेग शस्त ॥ धृ० ॥ धनीकी जिणे रजा तोडी ॥ पावमें जोडेगा बेडी ॥ १ ॥ मर्दोंका खुराकता जोरी ॥ बदफैल वो गुन्हेगारी ॥ २ ॥ एकाजनार्दनका बंदा ॥ बदफैली छोड कहे खुदा ॥ ३ ॥

॥ ९८९ ॥ खुदा तरस आसिल छोडे ॥ वो क्यौ ज्या बांदी लोडे ॥ १ ॥ कितेब ग्यानें बांदि आले ॥ कहते वो मुछां भुले ॥ २ ॥ कितेब ग्यानें बांदी आले ॥ असिल क्या काम पोंगडी पाले ॥ ३ ॥ आपणी कितेब साच धरो ॥ पोंगडी बेचवांधा करो ॥ ४ ॥ दिल ग्यानेथी वांदि भावो ॥ उसकी सहज ती कितेब ल्यावे ॥ ५ ॥ कितेब ल्याने अयौं फर्माया ॥ बांदि बगदो जख गया ॥ ६ ॥ घरकी आवरती छोडे ॥ बांदि लेकर आपिलिदे ॥ ७ ॥ येकाजनार्दनका बंदा ॥ बांदि आले सोहतव बंदा ॥ ८ ॥

॥ ९९० ॥ पातशाहरो सोना कलीया ॥ सुखी होकर भीनादिया

॥ धृ० ॥ दुनीयाकी ही मात छोडे ॥ अल्ला किया वो न तोडे ॥ १ ॥ आकाटी अंगुळी मीना जोडे ॥ वन्या अदमी वो क्यौं तोडे ॥ २ ॥ दुनीया म्याने गरक हुये ॥ तुटा बालभी ना लावे ॥ ३ ॥ आपने दौसा अगळा माने ॥ सची दुनिया वोही राने ॥ ४ ॥ एकाजनार्दनका बंदा ॥ खलक म्यानें भरा खुदा ॥ ५ ॥

॥ ९९१ ॥ दीपाची काजळी ॥ उपजोनी दीपमेळी ॥ सेखीं प्रकाशा झाकोळी ॥ दीपपणाच्या या ॥ १ ॥ तैसी तुझी कल्पना ॥ तुजलागी बंधना ॥ विदेहा देहपणा ॥ आरोपित बा ॥ धृ० ॥ कल्पना काजळी तोडी ॥ प्रकाशा प्रबळ वाढी ॥ निज तेजें सुरवाडी ॥ सुखीया होय बा ॥ २ ॥ स्नेह जंव जंव जळे ॥ तंव तंव प्रसवें काजळें ॥ ठेविजे तेथें काळें ॥ करुनी ठाके ॥ ३ ॥ तें स्नेहसूत्र तोडी ॥ संत कापुरीं आवडी ॥ देहभावाची राखोडी ॥ नुरेल तुज बा ॥ ४ ॥ संत कापुरीं ज्योती घडे ॥ तेथें ऐक्यें प्रकाशु वाढे ॥ सरिसेंनी पाडें ॥ समता होय ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं ॥ गुरु शिष्य अभिधानी ॥ नामारूपातीतु जनीं ॥ होउनी ठेलें बा ॥ ६ ॥

॥ ९९२ ॥ शरण जारे सद्गुरुला ॥ पुस पुसल्या विचारा ॥ धृ० ॥ भवावर जातें तूंच गाइलें ॥ समुळ दळुन टाकिलें ॥ मागें स्वरूप तें उरलें ॥ सय परिसा ॥ १ ॥ कोणत्या जात्यानें दळीलें ॥ जातें सगुण होतें कीं निर्गुण होतें ॥ जेव्हां दळुन टाकिलें ॥ तेव्हां जातें कोठें राहिलें ॥ सांग आह्माला ॥ २ ॥ दळावया कोण बैसली ॥ कोणता खुंटा धरिला हातीं ॥ फेरे किती फिरले दळणासी ॥ विचार करा ॥ ३ ॥ नाथ ह्मणे येव्हढी खुण ॥ सांगावी बा निवडुन ॥ नाहीं तरी पुर्वजाला आण ॥ सांग आह्माला ॥ ४ ॥

॥ ९९३ ॥ दर्पणींचें निज मुख ॥ मुखेंची देखिजे मुख ॥ आपणीया सन्मुख ॥ आपण होय बा ॥ धृ० ॥ डोळेनी आरसा भासे ॥ डोळेनी डोळा दिसे ॥ देखणें देखीजें तैसें ॥ देखणेंपणें बा ॥ १ ॥ आरिसा देखतां दिठी ॥ डोळया डोळें भेटी ॥ देखणें देखीजे दिठी ॥ देखतेंपणें बा ॥ २ ॥ आरिसा आरिसा जातां पाहे ॥ मुख ही घेउनी जाये ॥ तरी मुखें मुख दिसताहें ॥ देखिलेंपणें बा ॥ ३ ॥ उगउनीया रवी ॥ आपण्या आपण दावी ॥ एकाजनार्दनु यापरी ॥ अनुभवी ॥ ४ ॥

॥ ९९४ ॥ किती तरी मुख पाहसी दर्पणांत ॥ पळ पळ आयुष्य जातें तेल मीठ सर्पणांत ॥ १ ॥ अन्न अन्न करितां पूर्वज गेले ॥ किती आठविसी तर्पणांत ॥ २ ॥ एकाजनार्दनीं तिन्ही लोक जाणें ॥ देवपूजा अर्चनांत ॥ ३ ॥

॥ ९९५ ॥ पंढरीसी जाय ॥ धन्य ह्याचीं बापमाय ॥ १ ॥ पोटीं जन्मला तो हिरा ॥ दास विठोबाचा खरा ॥ २ ॥ आमचें बोलणें एकांडी ॥ दिली काळाला झोकांडी ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं भला ॥ चाकर हुजराथी लागला ॥ ४ ॥

॥ ९९६ ॥ गुरुबचन जतना राखो ॥ आपणा आनंद सोही चाखो ॥ १ ॥ गुरुबचन० ॥ बेद शास्त्र पडे अभिमान उठे ॥ गुरुकृपा अभिमान तुटे ॥ २ ॥ गुरु० ॥ कर्म क्रिया करवीत दुःखी ॥ गुरुकृपा मोही सुखी ॥ ३ ॥ गुरुबचन० ॥ एकाजनार्दनीं गुरूका नाम ॥ और साधन कछु नहीं काम ॥ ४ ॥

॥ ९९७ ॥ संगें दोष हो दोष हो ॥ न पाविजे पद अविनाश हो ॥ धृ० ॥ संग बाधी ईश्वरास ॥ रत झाला भिल्लटीस ॥ रावण मुकला प्राणास ॥ वाली जिवें घेतला ॥ १ ॥ संगें लुब्धला तो मनीं ॥ आला गोरक्षक धांवोनी ॥ देखुनी प्रेमला सुंदर राणी ॥ तन्मय होउनी ठेला ॥ २ ॥ संगें भरतासी जन्म ॥ प्राप्त झालें पूर्व कर्म ॥ विसरुनी भगवंताचें वर्म ॥ वनीं हिंडों लागला ॥ ३ ॥ आतां सत्संगें करोन ॥ वृत्ति धरा समाधान ॥ एका जनार्दना वांचून ॥ कोण करील निःसंग ॥ ४ ॥

॥ ९९८ ॥ देखसी चाखसी तें नकळे ॥ नोळखे भेणें झाले आंधळे ॥ जेणें कळे नकळे ॥ पुढिलांचे खोळे पहातोसी ॥ १ ॥ जो चाळिता तो तुजपाशीं ॥ आहा पाहा काय सांगों जासी ॥ एकाजनार्दनीं परतल्या दृष्टी ॥ तंव तूं पहासी अखंड रे भेटी ॥ २ ॥

॥ ९९९ ॥ संसाराचे व्यर्थे तोडावी जी बेडी ॥ मना विवेकाची घाली हातकडी ॥ १ ॥ जेथें पाहें तेथें विवेक मोकळा ॥ विवेक डोळां लाधलासे ॥ २ ॥ विचारुनी घेई विषयाचा ग्रास ॥ विवेकें करी सर्वांठायीं वास ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं मोकळा ऐसा ॥ वासनेच्या तेणें निवटीलें घांसा ॥ ४ ॥

॥ १००० ॥ बंदे निमाज किधर करणी ॥ जिधर देखो तिधर धणी ॥ १ ॥ खुदा माना पश्चिमेकडे ॥ और जागा उजाड खेडे ॥ २ ॥ पंचतत्त्व खुदाके हुवे ॥ और तत्त्व क्या चोर लेगये ॥ ३ ॥ एकाजनार्दनका बंदा ॥ गाल बालको भरया खुदा ॥ ४ ॥

॥ १००१ ॥ अंतरीं मईल बाहेरीं चोखाळ ॥ कैसा तो निर्मळ होय बापा ॥ १ ॥ अंतरीं द्विभेद बाहेरीं अभेद ॥ कैसा त्या निजबोध होय बापा ॥ २ ॥ अंतरीं कापट्य बाहेरीं निष्कापट्य ॥ कैसें त्या निजपद होय बापा ॥ ३ ॥ अंतरीं अनेक बाहेर दावी एक ॥ जनार्दनीं एक एका कैसा ॥ ४ ॥

॥ १००२ ॥ सांडी मांडी दोनी सांडी ॥ सिद्ध आहे तेंचि मांडी ॥ १ ॥ जीव शिव करणें कार्यीं ॥ सिद्ध तेंचि ह्मणती नाहीं ॥ २ ॥ सिद्ध तें तंव परतें असे ॥ कर्मीं वाढविती अतिसें ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं विधी ॥ तेंचि होय साध्य सिद्धी ॥ ४ ॥

॥ १००३ ॥ डोळे उघडुनियां पाहे ॥ पैल देव दिसताहे ॥ १ ॥ कैसें केलें बा दर्शन ॥ देव देखताहे कवण ॥ २ ॥ पैल देव हा मी भक्त ॥ दोन्ही कवणास देखत ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं राहे ॥ पहातें पाहणें देवचि आहे ॥ ४ ॥

॥ १००४ ॥ भगवद्भावो सर्वां भूतीं ॥ हेंचि ज्ञान हेंचि भक्ती ॥ विवेक विरक्ती ॥ याचि नांवें ॥ १ ॥ हें सांडुनी विषयध्यान ॥ तेंचि मुख्यत्वें अज्ञान ॥ जीवीं जीवा बंधन ॥ येणेंचि दृढ ॥ २ ॥ आठव तो परब्रह्म ॥ नाठव तो भवभ्रम ॥ दोहींचें निजवर्म ॥ जाण बापा ॥ ३ ॥ आठव विसर चित्तीं ॥ जेणें जाणिजेती ॥ तेचि एक निश्चिती ॥ निजरूप ॥ ४ ॥ स्मरण तेचि निजमुक्ती ॥ विस्मरण तेचि अधोगती ॥ ऐसें पुराणें गर्जती ॥ बाह्या उभारुनी ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं ॥ सहज निजबोधनीं ॥ सबाह्याभ्यंतरीं पूर्ण ॥ परमानंद ॥ ६ ॥

॥ १००५ ॥ अरे कृष्णा अरे कान्हा मनींच्या मुनिजनमोहना ॥ तुझिया गुणासी गोपिका वेधल्या जाणा ॥ धृ० ॥ संत आला घरा ह्मणुनी काय बोलून शिणवावा ॥ गोड ऊंस झाला तरि काय मुळासकट खावा ॥ प्रीतिचा सोइरा झाला तरि काय बहुत दिवस राहावा ॥ गांवचा प्रभु झाला

ह्मणून काय गांवचि बुडवावा ॥ १ ॥ अंगा आली नवती ह्मणून काय भल-तेंच बोलावें ॥ फुका हिरा मिळाला ह्मणून काय तखिल जोडावें ॥ भगवीं वस्त्रें केलीं तरी काय जगचि भोंदावें ॥ व्याज बट्टा देतों तरि काय मुदलच बुडवावें ॥ २ ॥ देव अंगा आला ह्मणून काय विस्तुच कवळावा ॥ आडका हातीं झाला ह्मणून काय भलत्यानें घ्यावा ॥ शीतळ चंदन झाला ह्मणून काय उगाळुनी प्यावा ॥ वडिल रागा आले ह्मणून काय जीवच मारावा ॥ ३ ॥ सुंदर स्त्री झाली ह्मणून काय बळेंच भोगावी ॥ इष्ट मित्र झाला ह्मणून काय बाईल मागावी ॥ सोन्याची सुरी झाली ह्मणून काय उरींच खोवावी ॥ मखमल झाली पैजार ह्मणून काय शिरींच बांधावी ॥ ४ ॥ सद्गुरु सोइरा केला ह्मणून काय आचार बुडवावा ॥ नित्य भेटेल देव ह्मणून काय जनास सांगावा ॥ चांगला दीप झाला ह्मणून काय वळचणीस ठेवावा ॥ एका जनार्दन ह्मणे देव गुप्त ओळखावा ॥ ५ ॥

॥ १००६ ॥ बंदे हुशार होईरे दीलमे समज रहो ॥ कलवात बादी मतकर यारो सुनता बादी देती ॥ आपना दाम खरचकर यारो हातमे चवरी आती ॥ १ ॥ चाहाडी चुगली मतकर मतकर यारो सुनो हामारा माना ॥ राजाजीको झुठकी तो मुलखा दे परलेना ॥ २ ॥ जुवाबाजी मत-खेल यारो सुनो हामाऱ्या बाता ॥ लत्ते कपडे सबही छीनकर सीरपर मारे जुता ॥ ३ ॥ एका जर्नादनका बंदा अकल सीकावे कीता ॥ सीकना होय तो सीकले भाई नही तो ज्या गु खाता ॥ ४ ॥

॥ १००७ ॥ एक एक ह्मणती सकळ लोक ॥ पाहतां एका एक हारपलें ॥ १ ॥ एकाविण एक गणीत नाहीं देख ॥ तें नित्य वोळख निजीं आत्मीया रे ॥ २ ॥ त्वंपद तत्पद असिपद नाहीं ॥ ठाईच्या ठाईं निवोनि पाही ॥ ३ ॥ सच्चिद आनंद तिन्ही नाममाया ॥ सूक्ष्म कारण तेथें भुलूं नको वांया ॥ ४ ॥ अहं तें मीपण सोहं तें तूंपण ॥ अहं सोहं सांडोनि पाहे निज कानन ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं सांडी एकपण ॥ सहज चैतन्य तेथें नाहीं जन्ममरण ॥ ६ ॥

॥ १००८ ॥ परेहुनी कैसें पश्यंती वोळलें ॥ मध्यमीं घणावलें सोहं बीज ॥ १ ॥ वैखरीयेसी कैसें प्रगट पैं जालें ॥ न वचे ते बोल एकविध ॥ २ ॥ साक्षात्कारें कैसें निजध्यासा आलें ॥ मननासी फावलें श्रवणद्वारें ॥ ३ ॥ सुखासुख तेथें झालीसे आटणी ॥ एकाजनार्दनीं निज मुद्रा ॥ ४ ॥

॥ १००९ ॥ वेदवचनें सुतक पावे ॥ ब्रह्म ह्मणतां ब्रह्म नव्हे ॥ १ ॥ वेद न कळेचि साचार ॥ देह बुद्धि अविचार ॥ २ ॥ सकळ ब्रह्म पैं अद्वैत ॥ वेद परिसोनी नातुटे द्वैत ॥ ३ ॥ श्रुति सांगती परमार्था ॥ हिंसा न करावी सर्वथा ॥ ४ ॥ संकल्प नाशी तो संन्यासी ॥ तेथें तों कल्पना कायसी ॥ ५ ॥ वेद बोले सर्वांठाई ॥ एका वांचुनी दुजें नाहीं ॥ ६ ॥ एकाजनार्दनीं बोधू ॥ नाहीं तंव न कळे वेदू ॥ ७ ॥

॥ १०१० ॥ वेष घेउनी नुसता कां ॥ उगेच जगावरी रुसता कां ॥ भोग देखोनी घुसता कां ॥ आह्मी भलें म्हणोनी पुसता कां ॥ १ ॥ थिता बाईल कां सांडिली ॥ आशा परवधू कां धुंडिली ॥ धृ० ॥ शुभ्र सांडोनी भगवीं कां गुंडिलीं ॥ ऐसी भंडी कांहो मांडिली ॥ २ ॥ तुह्मा प्रपंचावर एके घाई रुसवेना ॥ अहं ज्ञातेपण कोण्हा पुसवेना ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं मन जिंकवेना ॥ मेल्या कुतऱ्यासारखें कां बसवेना ॥ ४ ॥

॥ १०११ ॥ कासियासी तपा धांवा ॥ जवळी असतां शेजे गांवा ॥ १ ॥ राम जवळीं चुकले ॥ जपतपें भांबावले ॥ २ ॥ तीर्थी नाहीं क्षेत्रीं नाहीं ॥ जवळीं असतां भ्रांति पाही ॥ ३ ॥ असतां सबाह्याभ्यंतरीं ॥ नाहीं ह्मणोनी दैन्य करी ॥ ४ ॥ जयालगी सैरा हिंडे ॥ तोचि तया मागें पुढें ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं योग ॥ रामचि होय सर्वांग ॥ ६ ॥

॥ १०१२ ॥ जिव्हा रस चाखी अवलोकी नेत्र ॥ प्रेरक पवित्र आत्माराम ॥ १ ॥ बोलतसे मुख त्वचे कळे स्पर्श ॥ प्रेरक परेश आत्माराम ॥ २ ॥ सुखदुःख ज्ञान होतसे पैं चित्ता ॥ प्रेरक पंढरिनाथावीण नाहीं ॥ ३ ॥ घ्राणा परिमळ ऐकती श्रवण ॥ प्रेरक नारायण सर्व साक्षी ॥ ४ ॥ हस्तें घेणें देणें चरणीं गमन ॥ प्रेरक ईशान आत्माराम ॥ ५ ॥ ज्याच्या सत्ताबळें हाले वृक्षपान ॥ प्रेरक भगवान सर्वांचा तो ॥ ६ ॥ एकाजनार्दनीं पाय हे धरावे ॥ ध्यान हें करावें हृदयीं साचें ॥ ७ ॥

॥ १०१३ ॥ निःशेष कांहीं नेणिजे ॥ तें शुद्ध ज्ञान ह्मणिजे ॥ मग सर्व जेणें जाणिजे ॥ तें अज्ञान कैसें वा ॥ १ ॥ ज्ञान तें कवण ॥ अज्ञान तें कवण ॥ दोहींचें लक्षण ॥ पाहाते पहाजी ॥ धृ० ॥ ज्ञानाचें जें ज्ञातेपण ॥ तया नांवचि अज्ञान ॥ अज्ञानाचें जें ज्ञान ॥ तया नांव शुद्ध ज्ञान ॥ २ ॥ ज्ञान तें अज्ञाना आलें ॥ अज्ञान तें ज्ञाना गेलें ॥ एकाजनार्दनीं झालें ॥ वागुलाचीं दोनी मुलें ॥ ३ ॥

॥ १०१४ ॥ तुझें तुझ्या ठाईं ॥ तुजचि शुद्धि नाहीं ॥ मी मी ह्मणसी काई ॥ न कळे तुज ॥ १ ॥ मीपण ठेवितां ठायीं ॥ तूंचि ब्रह्म पाही ॥ इतर साधन कांहीं ॥ नलगे येथें ॥ २ ॥ मीपण तत्त्वतां ॥ साच जेथें अहंता ॥ एकाजनार्दनीं तेचि ज्ञाता ॥ ते निजात्मता ॥ ३ ॥

॥ १०१५ ॥ सोनियाचा देव सोनियाचें देऊळ ॥ सोनियाचा भक्त पूजी सोनियाच्या कमळें ॥ १ ॥ नामची पैं भिन्न रूप तें अभिन्न ॥ जनीं जनार्दन तोचि पाहे ॥ २ ॥ मृत्तिकेचा घट मृत्तिकेची वेळणी ॥ मृत्तिकेचें आळें तेथें मृत्तिकेची माथणी ॥ ३ ॥ भिन्न भिन्नाकारीं मृत्तिका दिसते साकार ॥ एकाजनार्दनीं निज निर्विकार ॥ ४ ॥

॥ १०१६ ॥ सावध पाहतां तुह्मी ज्ञानाचें अज्ञान ॥ मानु तोचि ह्मणे महंता महाधन ॥ १ ॥ ज्ञानाचें अज्ञान कवण ज्ञाता फेडी ॥ अनुतापाची जंव जीवीं नाहीं आवडी ॥ २ ॥ नश्वर देह ह्मणोनी ज्ञानेंचि निंदिजे ॥ तोचि देह घेऊनि ज्ञातेपणें फुंजे ॥ ३ ॥ सच्चिदानंद आणि माया या नांवें ॥ याहुनी परती स्थिति तें ज्ञान जाणावें ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं अनुतापाची गोडी ॥ ज्ञानाज्ञानाची तोडोनी सांडिली बेडी ॥ ५ ॥

॥ १०१७ ॥ कलत्र पुत्र बाधा अभिमानाची ॥ तेही त्यजिल्या शेखीं त्यागी ह्मणे निजाची ॥ १ ॥ अभिमान कैसेनी सरे ॥ हीं कृपा कीजे माहेरें दातारा ॥ २ ॥ देहीं देहातीत प्रतिपादिजे ज्ञान ॥ तेणेंचि ज्ञानें देहीं येतुसे अभिमान ॥ ३ ॥ जें जें होय रूप तें तें अहंकारू ॥ त्यागी भोगी होय दिगंबरू ॥ ४ ॥ ब्रह्मज्ञानें ह्मणती अभिमानाची तुटी ॥ सोहं सोहं ह्मणोनी तेथेंही लागे पाठीं ॥ ५ ॥ द्वैत नाहीं जगीं मीच एकला एकू ॥ येणें स्फुरणें आला अभिमान घातकू ॥ ६ ॥ अतिसूक्ष्म अभिमान कवणा न पडे ठाईं ॥ देहातीत ज्ञानी ह्मणती जो विदेही ॥ ७ ॥ एकाजनार्दनीं जगद्गुरु न्याहाळी ॥ गौखुरे वंदितां अभिमानाची धुळी ॥ ८ ॥

॥ १०१८ ॥ ब्रह्मस्थितीचें हें वर्म ॥ तुज दावितों सुगम ॥ १ ॥ सर्वांभूतीं भगवद्भाव ॥ अभेदत्वें आपणचि देव ॥ २ ॥ संसार ब्रह्मस्फूर्ती ॥ सांडोनियां अहंकृती ॥ ३ ॥ शरण एकाजनार्दन ॥ कृपें पावला परिपूर्ण ॥ ४ ॥

॥ १०१९ ॥ मनासी खोंचिलें मायेसी मोकलिलें ॥ तें शस्त्र आपुलें

सज्ज करी ॥ १ ॥ यापरी सैरा होय कारणीं ॥ माया ममता दोन्ही मारूनीयां ॥ २ ॥ जागृती स्वप्न निवटिलें पाहे ॥ सुषुप्ती सळीयेली सुखाचे घायें ॥ ३॥ एकाजनार्दनीं मांडीयलें खळें ॥ धुरेंचि जिंकिलीं अंगीचेनी बळें ॥ ४ ॥

॥ १०२० ॥ स्मरण स्वयाती नलगे ती जपमाळ हातीं ॥ नाठवितां चित्तीं स्मरण होय ॥ तैसा देहीं देवो परिसोनी भावो ॥ नाठव तोचि आठव होत असे ॥ धृ० ॥ अखंड अगाधपण विस्मरणीं स्मरण ॥ नाठवितां आठवण होत असे ॥ वस्तु वस्तुपणें जडोनी गेली अंगीं ॥ आठऊं तों विसरू वेगीं जाला वावो ॥ १ ॥ अगाध डोहीं गगन बुडालें दिसे ॥ परि न बुडतांचि असे गगनीं गगन ॥ तैसा देहीं देव असतांची संचला ॥ ह्मणती हारपला लाज नाहीं ॥ २ ॥ मृगजळाची व्यक्ति जळपणाची प्रतीती ॥ भासत असतां स्थिति मिथ्या जैसी ॥ एकाजनार्दनीं एकपणें निर्वाहो ॥ असतांचि देह वावो देहपणें ॥ ३ ॥

॥ १०२१ ॥ वांझेचें बाळक काळें ग्रासीयेलें ॥ तैसें मिथ्या देह कळिकाळें नाशिलें ॥ १ ॥ नेणा नवलाव जाणा ब्रह्मभाव ॥ दोहींचा संभव समूळ मिथ्या ॥ २ ॥ जळगार पाषाण तैसें जीवपण ॥ साकार देह तैसा ब्रह्मपूर्ण ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं एकत्व पाही ॥ देह विदेह समूळ तेथें नाहीं ॥ ४ ॥

॥ १०२२ ॥ दोरा अंगीं जैसा नसतां सर्प दिसे ॥ मिथ्या देह तैसा वस्तूवरि आभासे ॥ १ ॥ देह मी नव्हें देह मी नव्हें ॥ देह मी नव्हें माझेनी अनुभवें ॥ २ ॥ घटीं वर्तुळ आकाश परि तें महदाकाश ॥ विकारवंत देह चैतन्य विलास ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं दो नांवीं एक ॥ देह जाला मेला समूळ मिथ्या देख ॥ ४ ॥

॥ १०२३ ॥ राहातें एक जातें दोनपण ॥ तेथेंचि नाहीं पां देखणें ॥ १ ॥ एकचि एक बोलतां रे साचें ॥ एक नाहीं तेथें अनेक कैचें ॥ २ ॥ अनेकीं एका निर्धारितां पाही ॥ मूळीं मन ठेवुनीयां ठाईं ॥ ३ ॥ राहतें जातें दोन्हीही वाव ॥ एकाजनार्दनीं एकचि भाव ॥ ४ ॥

॥ १०२४ ॥ नित्यनैमित्तिक कर्मे आचरावीं ॥ तींहीं ते पावावी चित्तशुद्धी ॥ २ ॥ चित्त स्थिर होण्या करी उपासना ॥ भजे नारायणा एका

भावें ॥ १ ॥ विवेक वैराग्य प्राप्ति तत्प्रसादें ॥ चित्ता लागे वेध सद्गुरूचा ॥ ३ ॥ सद्गुरु कृपेनें पूर्ण बोध होय ॥ नित्य त्यांचे पाय हृदयीं धरी ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं ठेवूनियां मन ॥ मनाचें उन्मन पावलासे ॥ ५ ॥

॥ १०२५ ॥ तुज सगुण जरीं ध्यावों तरी तूं परिमित होशी ॥ तुज निर्गुण जरी ध्यावों तरी तूं लक्षा न रिघसी ॥ साचची वेदपुरुषा न कळसी श्रुतिसी अभ्यासी ॥ तो तूं नभाचाही साक्षी शब्दीं कैंवि आतुडसी ॥ १ ॥ जय राम राम रामा सच्चिदानंद रामा ॥ भवसिंधु तारका ऐके मेघश्यामा ॥ अनंत कोटी ब्रह्मांडाधीशा अनुपम्य तव महिमा ॥ अहं सोहं दोनी श्वासुनी हेंचि मागतसे तुह्मां ॥ २ ॥ आतां अष्टांग योग शरीर दंडूनि वायुसी झुंझ घेऊं ॥ तेथें बहुसाल अंतराय तयाचा येतसे भेऊ ॥ आतां कर्मचि जरी आचरूं दृढ धरूनियां बाहू ॥ तेथें विधि निषेधाचा मोठा अंगीं वाजतसे घावो ॥ ३ ॥ आतां तीर्थयात्रेसी जाऊं तरी तूं तीर्था दूरीं राहे ॥ पर्वकाळ विचारितां नित्य काळ वांया जाये ॥ हातीं जपमाळ घेऊनि अनुपम्य गुण पाहे ॥ तेथें पापिणी निद्रा घाला घालूनियां जाये ॥ ४ ॥ आतां गृह शिखा सूत्र त्यजुनी संन्यास करूं ॥ तरी न नासे संकल्प तयाचा धाक थोरू ॥ ध्यानीं मन निश्चळ न राहे यासी मी काय बा करूं ॥ तरी तो वेषचि पालटे न पालटे अहंकारू ॥ ५ ॥ जनीं जनार्दन प्रत्यक्ष डोळां कां न दिसे यासी ॥ ममता अहंकृति योगी बुडविती साधन आश्रमासी ॥ एकाजनार्दनीं सिद्धसाधन कां न करसी ॥ सांडीं मांडीं नलगे मग तूं अवघा रामचि होसी ॥ ६ ॥

॥ १०२६ ॥ दादा वरले माळीं दिसते ॥ दोनी डोळे वटारिते ॥ ते बा बहुत भेडसाविते ॥ जवळीं गेल्या गिळूं पहाते ॥ १ ॥ ते बा बहु दुःखदायक ॥ तेणें शिणविले सिद्ध साधक ॥ ते बा विशाळ भयानक ॥ वेगीं गोवी तिन्ही लोक ॥ २ ॥ तेणें मुंगीचा मार्ग घेतिला ॥ मुळींहुनी शेंडा चढला ॥ शेंड्या पासुनी खालता आला ॥ तो तेथूनी निसटोनी गेला ॥ ३ ॥ ते बा अचोज चोजवेना ॥ जवळीं आहे परी दिसेना ॥ ते बा झोंबिनली कळेना ॥ झाडितां परी झडेना ॥ ४ ॥ तनु मनु धनें शरण ॥ एकनिष्ठ जयाचें मन ॥ एकाजनार्दना शरण ॥ त्यासी सहजचि समाधान ॥ ४ ॥

॥ १०२७ ॥ माझें माझें ह्मणोनी करितोसी कष्ट ॥ उडाला तो हंस राहिलें फलकट ॥ १ ॥ तनाचे बुजवणें तैशी देहस्थिती ॥ चिता अग्नि उजळोनी मिळे मातीसी माती ॥ २ ॥ स्वजन स्वगोत्र सारे करती विचार ॥ काढा काढा ह्मणतीं जाला भूमिभार ॥ ३ ॥ देहाचीं जनकें केवळ माता पिता ॥ गेला गेला ह्मणती तोंचि देह असतां ॥ ४ ॥ अष्टही प्रहर भोगी देह गेह वित्त ॥ सेजेची भार्या पळे ह्मणे भूत भूत ॥ ५ ॥ या परी जाणोनी सांडी देहाची खंती ॥ एकाजनार्दनीं राहिला विदेहस्थिती ॥ ६ ॥

॥ १०२८ ॥ इहलोकीं बरा तो परलोकीं वंद्य ॥ त्यासी भेदत्व निंद्य उरलें नाहीं ॥ १ ॥ परस्त्री देखतां नपुंसक वागे ॥ परधन पाहतां अंधापरी निघे ॥ २ ॥ वाद वेवादा नोहे साची मती ॥ हृदयीं भगवद्भक्ति सदा वाहे ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं ऐसे विरळे प्राणी ॥ कोटी माजी जनीं एक देखों ॥ ४ ॥

॥ १०२९ ॥ एक एक योनी कोटी कोटी फेरा ॥ नर देह थारा अवचटा ॥ १ ॥ मांडिलासे खेळ मांडिलासे खेळ ॥ मांडिलासे खेळ नरदेहीं ॥ २ ॥ स्त्री पुत्र नातु बाहुले असती ॥ नाचवितो पति त्रैलोक्याचा ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं मांडियेला खेळ ॥ त्रैलोक्य सकळ बाहुलें साचें ॥ ४ ॥

॥ १०३० ॥ क्षणभंगुर देह ॥ याचा मानिती संदेह ॥ १ ॥ उदका वरील तरंग ॥ तैसें दिसे सर्व जग ॥ २ ॥ पाहतां मृगजळा ॥ जळ नोहेची निर्मळा ॥ ३ ॥ साउली अभ्राची ॥ वायां जाय जैसी ॥ ४ ॥ करितां लवणपुतळा ॥ विरे जैसा मिळतां जळा ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं तैसें ॥ दिसतां देह नासे जैसें ॥ ६ ॥

॥ १०३१ ॥ भोगितां काम भोगाचे सोहळे ॥ परी अंतकाळीं कळे वर्म साचें ॥ १ ॥ चालतां देह भोगातें भोगिती ॥ अंतकाळीं होती दैन्यवाणे ॥ २ ॥ भुलला पामर धरुनी भोग आशा ॥ पुढें यमपाश कळेचिना ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं न कळेची वर्म ॥ कोण भवकर्म सोडवील ॥ ४ ॥

॥ १०३२ ॥ एक शुद्ध ब्रह्मज्ञानाचें भांडार ॥ एक तें अंतर मळीन सदा ॥ १ ॥ दोघांमाजी वसे परमात्मा एक ॥ परी बुद्धीचा तो देख

पालटची ॥ २ ॥ एकाजनार्दनीं गुरूसी शरण ॥ काया वाचा मन ठेवा पायीं ॥ ३ ॥

॥ १०३३ ॥ जो जो कोणी मनीं ध्याये ॥ तो मीची होउनीयां राहे ॥ १ ॥ ऐसा अनुभव बहुतां ॥ अर्जुनादि सर्वथा उद्धवा ॥ २ ॥ एक एक सांगतां गोष्टी ॥ कल्प कोटी न सरेची ॥ ३ ॥ शरण येतां जीवेंभावें ॥ एकाजनार्दनीं भावें हरीसी ॥ ४ ॥

॥ १०३४ ॥ ह्मणती नरदेह पावन ॥ परी अत्यंत निंद्य जाण ॥ १ ॥ योनिद्वारें ज्याचें जनन ॥ सवेंची मरण लागलेंसे ॥ २ ॥ जंव जन्मलेंचि नाहीं ॥ तंव तें मरण लागलें पाही ॥ ३ ॥ गर्भाच्याही ठायीं भेवो ॥ मरण भावो न चुकेची ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं नाहीं मरण ॥ तेथें नाहीं जनन येणें जाणें ॥ ५ ॥

॥ १०३५ ॥ जैसा गळीं लागला मासा ॥ तैसा फांसा यमाचा ॥ १ ॥ जाणते परी वेडे होती ॥ फेरे घेती चौऱ्यांशीं ॥ २ ॥ परी नेघे राम-नाम ॥ सदा काम विषयाचें ॥ ३ ॥ ह्मणे जनार्दनीं एका ॥ यासी सुटका कैसेनी ॥ ४ ॥

॥ १०३६ ॥ मन मनासी होय प्रसन्न ॥ तेव्हां वृत्ति होय निरभिमान ॥ १ ॥ पावोनी गुरुकृपेची गोडी ॥ मना मन उभवी गुढी ॥ २ ॥ साधकें संपूर्ण ॥ मन आवरावें जाण ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं शरण ॥ मनें होय समाधान ॥ ४ ॥

॥ १०३७ ॥ समूळ मुळीं पाहतां पाहाण्या उपरम ॥ भोग्य भोक्ता तेथें सहज परब्रह्म ॥ १ ॥ भोगूं मी काय त्यागूं मी काय ॥ त्याग भोग दोन्ही चैतन्य माय ॥ २ ॥ भोग भोगितां भोग त्यागितां त्याग ॥ दोहींचें निखळ अधिष्ठान अंग ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं एकपण त्यागी ॥ ब्रह्मरूप जग आदळे अंगीं ॥ ४ ॥

॥ १०३८ ॥ मृगजळाचे डोहीं निःशेष जळ नाहीं ॥ यापरी माया समूळ मिथ्या पाही ॥ १ ॥ माया नाहीं माया नाहीं ॥ जगची ब्रह्मरूप पाही ॥ २ ॥ दोराचें सर्पत्व जीताची मेलें ॥ मायेची बद्धता तुजची तुझेनी बोलें ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं पाहतां चैतन्यघन ॥ बद्धता मुक्तता समूळ मिथ्या जाण ॥ ४ ॥

॥ १०३९ ॥ देहबुद्धि सांडी कल्पना दंडी ॥ वासनेची शेंडी वाढवूं नको ॥ १ ॥ तूंतें तूंचि पाही तूतें तूंचि पाही ॥ पाहूनियां राही जेथींच्या तेथें ॥ २ ॥ तूंतें तूंचि पाही जेथें देहो नाहीं ॥ मीपणें कां वांया गुंतलासी ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं मीपण तूंपण ॥ नाहीं नाहीं मज तुझीच आण ॥ ४ ॥

॥ १०४० ॥ एक ते एक एकासी कळेना ॥ उगेची कल्पना घेती वेडे ॥ १ ॥ एकावांचुनी नाहीं एक सर्वां ठायीं ॥ एकचि हृदयीं पुरे बापा ॥ २ ॥ एकातें आवडी धरितां प्रेमें पोटीं ॥ दुजा ठाव सृष्टीं कोठें असे ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं एकाची आवडी ॥ एकपणें गोडी एक जाणे ॥ ४ ॥

॥ १०४१ ॥ एक दोन ऐसे करती विचार ॥ एकाचें अंतर एका न कळे ॥ १ ॥ दोन ऐसें एक सर्वां ठाई वसे ॥ योगीया न दिसे एक दोन ॥ २ ॥ जयासाठीं सर्व करती आटाआटी ॥ एक दोन सृष्टीं भरलेंसे ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं एक दोन वेळा ॥ जनार्दन कळातीत जाणे ॥ ४ ॥

॥ १०४२ ॥ एक दोन तीन विचार करती ॥ परी न कळे गति त्रिवर्गांतें ॥ १ ॥ त्रिरूप सर्व हा मायेचा पसर ॥ त्रिवर्ग साचार भरलें जग ॥ २ ॥ त्रिगुणात्मक देह त्रिगुण भार वाहे ॥ त्रिमूर्ति सर्व होय कार्य कर्ता ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं त्रिगुणां वेगळा ॥ आहे तो निराळा विटेवरी ॥ ४ ॥

॥ १०४३ ॥ चार देह चार अवस्था समाधी ॥ कासया उपाधी करसी बापा ॥ १ ॥ चार वेद जाण चार युगें प्रमाण ॥ पांचवें विवरण न करी बापा ॥ २ ॥ जनार्दनाचा एका चतुर्थ शोधोनी ॥ पांचवे ते स्थानीं लीन झाला ॥ ३ ॥

॥ १०४४ ॥ पंचक पसारा पांचांचा ॥ खेळ बहुरूप्याचा पांचांपासोनी ॥ १ ॥ पृथ्वी आप तेज वायु आकाश जाण ॥ पंचप्राण मन पांचांमाजीं ॥ २ ॥ इंद्रियपंचक ज्ञान तें पंचक ॥ कर्म तें पंचक जाणे बापा ॥ ३ ॥ धर्म तो पंचक स्नान तें पंचक ॥ ध्यान तें पंचक जाणे बापा ॥ एकाजनार्दनीं पंचका वेगळा ॥ पाहे उघडा डोळा विटेवरी ॥ ४ ॥

॥ १०४५ ॥ सहा ते भागले वेवादती सदा ॥ सहांची आपदा होती जगीं ॥ १ ॥ सहांचे संगाती घडतसे कर्म ॥ सहा तो अधर्म करीताती

॥ २ ॥ सहांचे संगातीं नोहे योगप्राप्ती ॥ होतसे फजिती सहायोगें ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं सहांच्या वेगळा ॥ सातवा आठवा मजवेळा ॥ ४ ॥

॥ १०४६ ॥ सातवा तो सर्वां ठायीं वसे ॥ शंकरादिक ध्याती तया अपेक्षे ॥ १ ॥ तो सातवा हृदयीं आठवा ॥ आठवितां तुटे जन्म मरण ठेवा ॥ २ ॥ सातवा हृदयीं ध्यावा जनीं वनीं पहावा ॥ पाहुनीयां ध्यावा मनामाजीं ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं सातवा वसे मनीं ॥ धन्य तो जनीं पुरुष जाणा ॥ ४ ॥

॥ १०४७ ॥ आठवा आठवा वेळोवेळ आठवा ॥ श्रीकृष्ण आठवा वेळों वेळां ॥ १ ॥ कलीमाजीं सोपें आठवा आठवण ॥ पावन तो जन्म आठव्यानें ॥ २ ॥ आठवा नामें तारी पांडवां सहकारी ॥ दुराचारियां मारी आठवा तो ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं आठव्याची आठवण ॥ हृदयीं सांठवण करा वेगीं ॥ ४ ॥

॥ १०४८ ॥ नववा बैसे स्थिर रूप ॥ तया नाम बौद्धरूप ॥ १ ॥ संत तया द्वारीं ॥ तिष्ठताती निरंतरीं ॥ २ ॥ पुंडलीकासाठीं उभा ॥ धन्य धन्य विठ्ठल शोभा ॥ ३ ॥ शोभे चंद्रभागातीर ॥ गरुड हनुमंत समोर ॥ ४ ॥ ऐसा विठ्ठल मनीं ध्याऊं ॥ एकाजनार्दनीं त्याला पाहूं ॥ ५ ॥

॥ १०४९ ॥ योग्याचें ध्यान बैसलेंसे मौन ॥ तो हा निधान विटेवरी ॥ १ ॥ विठ्ठल सांवळा पाहूं चला डोळां ॥ धरुनी बाळलीळा कटीं कर ॥ २ ॥ संतांचा समुदाव आरत्रांची दाटी ॥ नामघोष सृष्टीं न समाय ॥ ३ ॥ आषढी कार्तिकी आनंद सोहळा ॥ येती नरनारी बाळा पाहा-वया ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं पुरला मनोरथ ॥ विठ्ठल पहातां चित्त गुंत-लेंसे ॥ ५ ॥

॥ १०५० ॥ वाट पिकली संतांची ॥ अवघें स्वरूप मुद्दलची ॥ १ ॥ उकल करा लवडसवडीं ॥ मुद्दल देव घडोघडीं ॥ २ ॥ द्वैताची दाटणी सोडी ॥ वासनेची वासना फेडी ॥ ३ ॥ आळ करितां सरळ सात ॥ मन पडेल विचारांत ॥ ४ ॥ अखिल गुरुनामाचे ॥ स्थापिले सुरंग भक्तीचे ॥ ५ ॥ अंगळु मंगळु नंद भाषा ॥ द्वैत दळणीं वटील घसा ॥ ६ ॥ आंत बाहेर एकचि

सुत ॥ मुद्दल देतां सुखी होत ॥ ७ ॥ एकाजनार्दनीं एकची भेटी ॥ सरिसीं साठीं संसारा ॥ ८ ॥

॥ १०५१ ॥ ध्येय ध्यातेविण ध्यान ॥ ज्ञेय ज्ञातेविण ज्ञान ॥ १ ॥ ऐसें जनार्दनाचें ध्यान ॥ साधनाचें निज साधन ॥ २ ॥ साध्य साधनें विण साधनें ॥ दृश्य द्रष्टत्वेंविण देखणें ॥ ३ ॥ बोल बोलणेंविण बोलणें ॥ एकाएकीं जनार्दनें ॥ ४ ॥

॥ १०५२ ॥ तुह्मा सांगतों मी एकबेक ॥ ज्याचें स्वरूपीं नाहीं आणीक ॥ तें आपण एक एक ॥ ऐसें ह्मणत नाहीं देख ॥ १ ॥ तेंरे तेंरे तेंरे तें ॥ धृ० ॥ एकबेकापासुनी सकळिक ॥ जाले ह्मणती परम मूर्ख ॥ नाहीं तुझें तुज ठाउक ॥ तेथें जाणते नेणते भेक रे ॥ २ ॥ एकबेकासी लाविती खोडी ॥ तेथोनी माया जाली वेडी ॥ कापसाची नाथिली पासोडी ॥ ऐसें जाणे जग तोची गडीरे ॥ ३ ॥ एकबेक तो सागर एक ॥ त्याच्या लहऱ्या तरंग लोकीं लोक ॥ तैसें जालें जग सकळिक ॥ तेथें जन्म मरण मिथ्या देख रे ॥ ४ ॥ एकबेक तो निजानंदू ॥ तेथें सुख दुःख मिथ्या बाधू ॥ एकबेक जाला शुद्धरे ॥ ५ ॥

॥ १०५३ ॥ नाशीवंत सकळीक ॥ शाश्वत माझा नायक ॥ १ ॥ बरवें मजला कळलें ॥ पूर्व पुण्य तें फळलें ॥ २ ॥ प्रपंच अवघा दुःखरूप ॥ सुखरूप आत्मस्वरूप ॥ ३ ॥ स्वरूपीं रमल्या भय नाहीं ॥ एकाजनार्दनाचे पायीं ॥ ४ ॥

॥ १०५४ ॥ जनार्दन पायां धरुनीया राहे ॥ संसार तो काय करील तुझें ॥ १ ॥ स्वरूपाचें ज्ञान नोहे अनायासें ॥ ज्याचें श्रुती पिसें लागलेंसे ॥ ॥ २ ॥ जाणीव नेणीव सांडोनिया मागें ॥ शरण रिघे वेगें एकाजनार्दनीं ॥ ३ ॥

॥ १०५५ ॥ सागरींची लहरी ॥ मी एक ह्मणे सागरीं ॥ तैसा तुझा तूंची तुजवरी ॥ एकदेशीं ॥ १ ॥ शुद्ध आणि शबल ॥ तूंचि एक सकळ ॥ औटहात केवळ ॥ ते तंव कल्पना तुझी ॥ २ ॥ डोळे झांकून किती ॥ पहासी आंतौते ॥ बाहेर न करी ते ॥ वोस पाडू ॥ ३ ॥ सदाह्य संमतू ॥ असतां वाडें कोडें ॥ एकदेशी थोडें ॥ कल्पनेसाठीं ॥ ४ ॥ लेंकुराचे खेळणीं ॥

दिवसा ह्मणती जाली रजनी ॥ उठती लटिके निजोनी ॥ आतां उदयो जाला ॥ ५ ॥ तेथें अखंड प्रकाश पाहो ॥ उदयो अस्तु दोन्ही वावो ॥ तैसा भावो आणि अभावो ॥ एकाजनार्दन चरणीं ॥ ६ ॥

॥ १०५६ ॥ जरी न बनेची गुरुवचनीं ॥ तरी बैसोनी सहजासनीं ॥ हेंची एक निर्वाणीं ॥ साधिजे सुख ॥ १ ॥ सकळीं सकळपणें ॥ अखंडरूप पहाणें ॥ साध्य तेंचि साधनें ॥ करुनी घेई ॥ २ ॥ जया संत चरणीं नाहीं भावो ॥ त्यासी लडिवाळ संदेहो ॥ तेथें साधनामाजीं देवो ॥ दिसे कैसा ॥ ॥ ३ ॥ हेतु मातु अनुमाना ॥ आकळी दृढ एक मना ॥ अधिकचि कल्पना ॥ वाढविली ॥ ४ ॥ जाणीव नेणीवहें वाड ॥ कल्पनेचें समूळ झाड ॥ तुझें तुजचि आड ॥ उभे ठाकती ॥ ५ ॥ नाना हेतु विवंचना ॥ सांडुनीयां कल्पना ॥ एकाजनार्दना ॥ शरण रिघे ॥ ६ ॥

॥ १०५७ ॥ परब्रह्मप्राप्तीलागीं ॥ कर्मे आचरावीं वेगीं ॥ १ ॥ चित्त शुद्ध तेणें होय ॥ भेटी सद्गुरूचे पाय ॥ २ ॥ कर्म नित्य नैमित्तिक ॥ प्रायश्चित्त जाण एक ॥ ३ ॥ उपासन तें चवथें ॥ आचरावें शुद्ध चित्तें ॥ ४ ॥ तेणें होय चित्त स्थिर ॥ ज्ञानालागीं अधिकार ॥ ५ ॥ होय भेटी सद्गुरूची ज्ञानप्राप्ति तैंचि साची ॥ ६ ॥ प्राप्त झाल्या ब्रह्मज्ञान ॥ आपण जग ब्रह्म परिपूर्ण ॥ ७ ॥ एकाजनार्दनीं भेटला ॥ ब्रह्मरूप स्वयें झाला ॥ ८ ॥

॥ १०५८ ॥ अष्टदिशीं व्यापक नारायण ॥ तेथें नाहीं पूर्वपश्चिमेचें भान ॥ १ ॥ पहा कर्माची राहाटी उफराटी ॥ सर्व व्यापक संकल्प ह्मणती उठाउठी ॥ २ ॥ एको विष्णु ह्मणतां भेद उरला नाहीं ॥ भेदभावें पहाती सर्वांठायीं ॥ ३ ॥ भेदाभेद टाकुनी देई वेगें ॥ एकाजनार्दनीं शरण रिगे ॥ ४ ॥

॥ १०५९ ॥ जंव देहातें देखती तंव माझें ह्मणती ॥ निमालिया रांडा पोरें रडती ॥ १ ॥ पहा कैसा अनुभव लौकिकाचा ॥ देह निमाला कीं न कळे साचा ॥ २ ॥ जीव आत्मा न मरे कोणे काळीं ॥ निमाला देह चतुष्टयाची होळी ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं देहा देखती मरण ॥ गेला आला नाहीं तो तैसाचि जाण ॥ ४ ॥

॥ १०६० ॥ हेची वेदोक्ति निजसार ॥ आत्मा अविनाश साचार ॥

॥ १ ॥ नाहा जन्ममरणाचा धाक ॥ बोले शुद्ध बुद्ध ऐक वेद ॥ २ ॥ श्रुति शास्त्र तेही वदती ॥ आत्मा अविनाशी ह्मणती ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं नाहीं मरण ॥ मग कैचें देहींचें स्फुरण ॥ ४ ॥

॥ १०६१ ॥ तोंडीं घासु डोईं टोला ॥ ऐसा भजनार्थ झाला ॥ १ ॥ तो सर्वस्वीं नागवला ॥ वैरी आपणचि आपुला ॥ २ ॥ एकाजनार्दनीं मात ॥ भजा भजा सद्गुरुनाथ ॥ ३ ॥

॥ १०६२ ॥ गुरु परमात्मा परेशू ॥ ऐसा ज्याचा दृढ विश्वासू ॥ १ ॥ देव तयाचा अंकिला ॥ स्वयें त्याचे घरीं संचला ॥ २ ॥ एकाजनार्दनीं गुरु-देव ॥ येथें नाहीं बा संशय ॥ ३ ॥

॥ १०६३ ॥ तुझ्या निजदेहा सांगातें ॥ कर्मसाक्षी पंच महाभूतें ॥ इंद्रियाधिष्ठात्रीं दैवतें ॥ देवें ठेविलीं देखती कर्मातें ॥ धृ० ॥ वेगीं होईं तूं निज सावधान ॥ तुझें तुज मोकळ बहुत जन ॥ जाणत असतां कां होतोसी नेण ॥ विषयलोभ तुज बंधन ॥ १ ॥ मन बुद्धि अहंकार चित्त ॥ तुझ्या वृत्तीचीं साक्षीभूत ॥ मुख्य अंतर्यामीं भगवंत ॥ तो धर्माधर्म जाणें समस्त ॥ २ ॥ तुझ्या हृदयीं जो जो भावो ॥ त्यासी निज साक्षी निज देवो ॥ एकाजनार्दनीं ऐक्यभावो ॥ तें हें समूळ अवघेंचि वावो ॥ ३ ॥

॥ १०६४ ॥ तुझें मी मी ह्मणते कोण ॥ त्या मीपणाचें नाहीं ज्ञान ॥ धृ० ॥ वांया शिणसी कां साधनवरी ॥ तुझें ज्ञान तें तुज माझारी ॥ १ ॥ वेद शास्त्र समाधान उंची ॥ तेही जाणिवेचें ज्ञान तूंचि ॥ २ ॥ जें जें साधनीं साधिजे साध्य ॥ तें तुजमाजी स्वतः सिद्ध ॥ ३ ॥ नाना उपायीं जें सुख उठी ॥ तें निज सुख तुझ्या पोटीं ॥ ४ ॥ माझ्या मीपणाचें निज ज्ञान ॥ एकाजनार्दनीं समाधान ॥ ५ ॥

॥ १०६५ ॥ मी अज्ञान ह्मणे तें ज्ञानदृष्टी ॥ तुझी नेणीवचि जाणिवा उठी ॥ धृ० ॥ मिथ्या विकल्प वाढविशी उभा ॥ तुझें अज्ञान तें ज्ञान शोभा ॥ १ ॥ वस्तु नेणवे मज माझा भ्रम ॥ हें जाणणें तेंचि शुद्ध ब्रह्म ॥ २ ॥ तुझें नेणिवेचें वचन ॥ त्यातें प्रकाशित तुझें ज्ञान ॥ ३ ॥ जें तूं ह्मणविशी जाणीव नेणीव ॥ तें तुझिया ज्ञानाचें गौरव ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं समा-धान ॥ ज्ञान अज्ञान चैतन्यघन ॥ ५ ॥

॥ १०६६ ॥ ज्ञानें वृत्तीसी स्फुरण ॥ तें वृत्ति ह्मणे मी अज्ञान ॥ धृ० ॥ पहा हो नवल कैशी लीळा ॥ सूर्यो दीपेंविण आंधळा ॥ १ ॥ साधन प्रकाशी ज्ञान ॥ ज्ञानालागीं शोधिती साधन ॥ २ ॥ एकाजनार्दनीं शुद्ध ज्ञान ॥ तें साध्यचि होय साधन ॥ ३ ॥

॥ १०६७ ॥ जो ज्ञान अज्ञानाचा द्रष्टा ॥ तो मी अज्ञान ह्मणवी करंटा ॥ धृ० ॥ कैसें असतेंनि डोळां अंध ॥ देहलोभें मुक्तचि बद्ध ॥ १ ॥ इंद्रियें कमें निपजतें ज्ञान ॥ तेंचि मानिती कर्मबंधन ॥ २ ॥ एकाजनार्दनाचा पायीं ॥ देहीं असतांच नित्य विदेहीं ॥ ३ ॥

॥ १०६८ ॥ ह्मणशी विषयाच्या गोड गोष्टी ॥ वस्तु विषयाचे पाठीं पोटीं ॥ धृ० ॥ तेथील तेथें सावध पाहे ॥ तुझा विषयो तें वस्तु आहे ॥ १ ॥ तुझ्या विषयाचें गोडपण ॥ ते गोडीचि चैतन्यघन ॥ २ ॥ एकाजनार्दनीं पाहतां ॥ विषयीं विषयो चिद्रूपता ॥ ३ ॥

॥ १०६९ ॥ जाण असता ह्मणविसी नेण ॥ शेखी नेणते नेणें तो जाण ॥ धृ० ॥ शिव शिव कळे कळे कळे न कळे ॥ जेणें कळे तें कळणें न कळे ॥ १ ॥ मुख्य जाण तें तुझें तुज पाशीं ॥ तें जाणीव करितां नेणु होसी ॥ २ ॥ एकाजनार्दनीं निखळ जन ॥ जन भाविते भावनाहीन ॥ ३ ॥

॥ १०७० ॥ जाणते जाणों जातां ॥ तेथें जाणपण नये हाता ॥ धृ० ॥ कैसें जाणावें जाणते ॥ एक अनेक नाहीं तेथें ॥ १ ॥ वस्तु वस्तुत्वें संपूर्ण ॥ तेथें एक ह्मणावया ह्मणते कोण ॥ २ ॥ एकाजनार्दनीं नित्य एक ॥ तेथें नुरेचि एक अनेक ॥ ३ ॥

॥ १०७१ ॥ सांगेन तें एक पाहाजी तुह्मी या मनातें करूनि साक्ष ॥ काम क्रोध देहीं गेलें कीं नाहीं जन धन अभिमान लक्ष ॥ असूया तिरस्कार जवळीच असतां रान केवी होय प्रत्यक्ष ॥ धृ० ॥ मनाचा मोकळा होऊनियां गाढा लावी आपुलीया मोहरा ॥ स्वरूपेंसी भेटी साचें नाहीं तंव जाऊं नेदी त्यासी सेरा ॥ १ ॥ हित तेंचि पुसतां लाजवी अभिमानू उणीव येईल ज्ञातेपण ॥ ज्ञातेपणाचा अभिमान धरितां नरदेहासी नागवण ॥ चौऱ्याशी लक्ष योनी गर्भवास तेथें तुज शिकवील कवण ॥ २ ॥ नरदेहा ऐसें लाधलें निधान तंव सांडी सांडी अभिमान ॥ स्वरूपाची भक्ति साचार नाहीं केवि होय समाधान ॥ एकाएकपणें साचार भजतां देहींच देखसी जनार्दन ॥ ३ ॥

॥ १०७२ ॥ सिद्ध सन्मुख परि भासेना ॥ जगीं विंबला तोचि दिसेना ॥ १ ॥ सिद्ध सन्मुख सोयिरया ॥ कैसा असतुचि न येसी प्रत्यया ॥ २ ॥ डोळा रिघतो परि खुपेना ॥ कठिण प्रवेशे परि गुंफेना ॥ ३ ॥ देखणें दृष्टीचें गाळीव ॥ व्योम वाचेसी नलगे थांव ॥ ४ ॥ सकळ देहीं तो प्रवेशू ॥ विदेह त्याचा वासू ॥ ५ ॥ एका सद्गुरु पायातळीं मिळे ॥ निजसूक्ष्म जनार्दनीं मिळे ॥ ६ ॥

॥ १०७३ ॥ काम क्रोध लोभ दंभ मदमत्सर ॥ षड्वैरि तत्पर हेंचि तेथें ॥ धृ० ॥ क्षुधा तृषा मोहो शोक जरा मरण ॥ षड्डूर्मी ते पूर्ण देहीं हेचि ॥ १ ॥ आशा मनशा कल्पना इच्छा तृष्णा वासना ॥ हे अठरा गुण जाणा देहामाजी ॥ २ ॥ एकाजनार्दनीं सजुनी अठरा ॥ तोचि संसारामाजी शुद्ध ॥ ३ ॥

॥ १०७४ ॥ रविकिरणें रवि मिळों पाहती ॥ पैं प्रकाश गिवसीत वाती ॥ धृ० ॥ तैसे जन ऐक्य जनार्दनीं ॥ परि मिळणी या करिती शिराणी ॥ १ ॥ घटु वोसरे दाटला खेवा ॥ ह्मणे वसुमती मिळेल केव्हां ॥ २ ॥ तोय तरंगतो यालागीं बापा ॥ तृषे पिडिलें स्मरे आपा ॥ ३ ॥ पट्टव्याकुळ तंतुवा लागीं ॥ गुळ इच्छित गोडी आंगीं ॥ ४ ॥ एकाजनार्दन ह्मणे कर्मा ॥ स्वयें ब्रह्मचि मुकलें ब्रह्मा ॥ ५ ॥

॥ १०७५ ॥ तरुविस्तार गिवसीत मुळा ॥ नदी तटाग स्मरते जळा ॥ धृ० ॥ मनासी भोंकिलें मायेसी खोंचिलें ॥ तें शस्त्र आपुलें सज्ज करीं ॥ १ ॥ यापरी सैरा होईकां रणीं ॥ माया ममता दोन्ही मारूनिया ॥ २ ॥ जागृति स्वप्न निवटिले पाहीं ॥ सुषुप्ती सळियली सुखाची घाई ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं मांडिले सळे ॥ धुरचि जिंतिली अंगीचेनि बळें ॥ ४ ॥

॥ १०७६ ॥ ध्यान धरितां ध्येय होईजे पैं आंगें ॥ जळीं लवण विरे जेवीं सर्वांगें ॥ धृ० ॥ कीटक भिंगुरटी झाली ते कैसी ॥ देहीच पालटु पाहे भ्रमे आकाशीं ॥ १ ॥ चंदन सन्निध चंदन पैं झालीं झाडें ॥ संतसंगती स्वयें साधुत्व जोडे ॥ २ ॥ एकाजनार्दनीं एकपणें पाहतां ॥ सरसी साठीं कैं ध्येय ध्यान ध्याता ॥ ३ ॥

॥ १०७७ ॥ चित्त प्रक्षाळे ऐसें जळीं नाहीं जळ ॥ तीर्थी वासना तरी वासना समळ ॥ धृ० ॥ जळची ओंवळें तेथें कैसें करूं सोंवळें ॥ वरी वरी प्रक्षाळें मन जैसें तैसें मैळें ॥ १ ॥ प्राण प्रक्षाळुनी प्रायश्चित्त मांडी ॥ जीवाचे

जीवनीं मन ममतेस मुंडी ॥ २ ॥ एकाजनार्दनीं सहज सिद्धी ॥ सकळ सोंवळें जैं जाय देहबुद्धी ॥ ३ ॥

॥ १०७८ ॥ विषयाचेनि अभिलाषें ॥ सबळ भेद भासे ॥ विषय लेखु तेथें ॥ मुक्ति कैंवी वसे ॥ धृ० ॥ विषयतृष्णा सांडी ॥ मग तूं आसन मांडी ॥ वैराग्याची गोडी ॥ गुरुसी पुसे ॥ १ ॥ स्त्रीपुरुष भावना ॥ भेदअसे मना ॥ तेथें ब्रह्मज्ञाना ॥ गमन कैचें ॥ २ ॥ तिळभरी रज डोळा परि शरिरासी दे दुःख ॥ अणुमात्र विषय तो संसारदायक ॥ ३ ॥ शुद्ध भाग्य तें वैराग्य आवडे ॥ अति विषयें विषयांध नररूप किडे ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं निज-ज्ञानशक्ती ॥ निर्विषय मन होय भूतीं अभेद भक्ती ॥ ५ ॥

॥ १०७९ ॥ भाव भावित भाव भावित भाव भावित निज भावना ॥ निजबोध झालीया कैंचि भवभावना ॥ १ ॥ भक्ति भावित शक्ति बोधित शोधित निज सत्वें ॥ सत्वीं तत्व आकळुनि पावती परतत्वें ॥ २ ॥ माया मोहित काया कामित क्षोभित निज क्रोधा ॥ एकाजनार्दनीं एकपणें आणित निज बोधा ॥ ३ ॥

॥ १०८० ॥ रविबिंब आभासु भासला घटें ॥ घट भंगे निजबिंब न फुटे ॥ १ ॥ बंधुचि तव वावो मोक्षाकें पस्तावो ॥ उभयाचा अभावो उभय पदीं ॥ २ ॥ स्वप्नींचिये भाजे स्वप्नीं भुंजे ॥ प्रबोध जालिया स्वयें उभयासीं लाजे ॥ ३ ॥ दोराचिया सापा जिणें तैसें मरणें ॥ बद्ध मोक्ष तेविं निज निज-पणें ॥ ४ ॥ मृगजळीं नाहाला तो सोंवळा चांग ॥ मान न्हाये साचें ओंवळें आंग ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं एकनिष्ठ भावा ॥ बंध मोक्ष मृगजळींचा हेलावा ॥ ६ ॥

॥ १०८१ ॥ निजीं निजाचा वाढे निर्वाहो ॥ जनीं विजनीं अखंड भावो ॥ १ ॥ वायुसी अभेदें निश्चळत्व ॥ नभें दिधलें सा अलिप्तत्व ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं निज भक्ती ॥ तैं अलभ्य लाभु होय प्राप्ती ॥ ३ ॥ भूतें महा भूतें प्रसन्न होती ॥ तेणें अभंग भंगेना ब्रह्म स्थिती ॥ ४ ॥

॥ १०८२ ॥ आपुलें आपुलेपण आपुलेंच ठायीं तयासी वाढ कैसी ॥ माझें ह्मणसी तें तुजहुनी वेगळें मा दर्पणीचें धन कै बांधसी ॥ धृ० ॥ सहज स्थिति कां सांडिसी बापा नाथीलेंच घेऊनि माथां ॥ ज्यालागीं सिणसी तें

नव्हेती तुझीं मा तेणेंचि पावतोसी व्यथा ॥ १ ॥ तूं झालासी ना होसी ॥ न निमतां निमालों ह्मणसी ॥ हें तंव अवघेंचि आहाच बाळासी बागुल आला बोलसी ॥ २ ॥ मागा गेलें तें नेणो काय झाले आतां तरी न संडी ठावो ॥ भानुदास कुळी आजी सहजचि दिवाळी एका एकजनार्दनीं भावो ॥ ३ ॥

॥ १०८३ ॥ देहाचेनि बळें छाया कर्म चळे ॥ ते छाये नातळे देह जैसे ॥ १ ॥ कर्माचा कर्ता तो कर्मीं अलिप्त ॥ देहाचे छाये न बैसे देह स्थित ॥ धृ० ॥ रसातें सेवि ते रसना अलिप्त ॥ चवी नेणती ते हात होती लिप्त ॥ २ ॥ एकाजनार्दनीं कर्माची मागी ॥ सहजीं सहजपणें न लगेचि अंगीं ॥ ३ ॥

॥ १०८४ ॥ निज तत्वीं राही कां गुरु वचनाचे ठायीं ॥ इतर बुद्धि ते नाडतोसी काई ॥ १ ॥ परबुद्धि ते कुडी परबुद्धि ते कुडी ॥ साधन मीशें लावी देहबुद्धि रोकडी ॥ धृ० ॥ जंव जंव पुसों जासी तंव तंव भांबावसी ॥ क्षीर तूप सांडोनी कांजी कां पितोसी ॥ २ ॥ एकाजनार्दनीं एकनिष्ठ भावें ॥ साध्य साधन सिद्ध तूंचि अवघें ॥ ३ ॥

॥ १०८५ ॥ बाळीं ग्रहाचार मांडिला ॥ तो सवेंचि मोडुनी गेला ॥ १ ॥ तैसें असावें संसारीं ॥ जंववरी प्राचीनाची दोरी ॥ धृ० ॥ पक्षी अंगणासी आले ॥ चारा घेउनी सवेंचि गेले ॥ २ ॥ वाटसर वस्तीस आला ॥ प्रातःकाळीं उठोनी गेला ॥ ३ ॥ मार्गीं बहुसाळ भेटलें ॥ परि मन नाहीं गुंतलें ॥ ४ ॥ विनवी एकाजनार्दना ॥ ऐसें असतां संकट कोणा ॥ ५ ॥

॥ १०८६ ॥ वांझेचिया पुत्रा जैसें आलिंगन ॥ तैसें देहामाजी साध्य आणि साधन ॥ १ ॥ देहचि तंव वाव देहचि तंव वाव ॥ देहामाजी देव दिसेल कैसा ॥ धृ० ॥ अधउर्द्ध बंध देती नानाविध ॥ दोराचिया सर्पा बांधिजे सुबद्ध ॥ २ ॥ एकाजनार्दनीं देहचि नाहीं ॥ नसतेंचि भावितां लाभेल काई ॥ ३ ॥

॥ १०८७ ॥ मी तरी तूं जाण तूं तरी मी आपण ॥ एक एकेवीण आन नाहीं ॥ धृ० ॥ मजहीं आनंद तुजहीं आनंद ॥ सुख दुःख आनंद आनंदरूपें ॥ १ ॥ तूं ह्मणजे कोण कैचा मी आपण ॥ एक एकेविण एक कैचें ॥ २ ॥ मी तूं दोघे एक दोघे तरी अनेक ॥ जगीं दोघे कवतीक पाहा-

तसों ॥ ३ ॥ तूं ह्मणसी मी एक परतूनियां देख ॥ तेथें हें सुखदुःख कवण ठाई ॥ ४ ॥ मीपणापरी अनुभवी कोठें उरी ॥ एकाजनार्दनीं नवल हें निर्धारी ॥ ५ ॥

॥ १०८८ ॥ गुरुकृपा अरणी मंथारे भाई ॥ चिन्मात्र अग्नि मंथनांत पाही ॥ धृ० ॥ होम करूं पहातां अग्नि निर्धूम ॥ वेदविधि झाले कर्माकर्म ॥ १ ॥ मोह ममता तील अज्य उबाली ॥ काम क्रोधकी होईग होळी ॥ २ ॥ बिन काष्ठो भलअग्नी जगाया ॥ ब्रह्मी ब्रह्ममंत्र होमीये काया ॥ ३ ॥ विश्वीं विश्वाकार विश्वतोमुख ॥ जें जें ज्याहां अर्पे ते ताहां यज्ञ पुरुख ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं नीज यज्ञ अर्पे ॥ कर्ता कर्म क्रिया तामों समर्पे ॥ ५ ॥

॥ १०८९ ॥ जेणें प्रकाशें तरणी न बोलवे वेदवाणी ॥ सद्विद्या विवेक तटस्थ झालीं दोन्ही ॥ धृ० ॥ वेदा अगोचर ध्याना जे कुंवाडें ॥ तें ब्रह्म सांपडे सद्गुरुचरणीं ॥ १ ॥ काळासी नाकळे कर्मीं जें न मिळे ॥ सर्वीं असोनियां सर्वांतें नातळे तें मिळे सद्गुरु वचनीं ॥ २ ॥ जीवीं जीवपण नातळे शीवपण तें वोविळें ॥ सच्चिदानंद या नांवा वेगळें सद्गुरुचेनि बोलें ॥ ३ ॥ ब्रह्मीं ब्रह्मपण ॥ जीव शीवा नागवण ॥ लीन होतां सद्गुरु चरणीं ॥ ४ ॥ गुरु ब्रह्म दो नामीं ॥ एकचि वस्तु जाणावी ॥ एकाजनार्दनीं पावावी ॥ सहजची पदवी ॥ ५ ॥

॥ १०९० ॥ पाहूं जातां नारायणा ॥ पाहतां मुकीजे निज आपणा ॥ धृ० ॥ ऐसा भेटीचा नवलावो ॥ पाहतां नुरे भक्त देवो ॥ १ ॥ पाहतां नादळेचि दुजें ॥ तेंचि होईजे सहजे ॥ २ ॥ एकाजनार्दन भेटी ॥ जन्म मरणा होय तुटी ॥ ३ ॥

॥ १०९१ ॥ द्वंद्व बाधा जेणें कळे ॥ तें कळणें कळल्या द्वंद्व टळे ॥ धृ० ॥ जें द्वंद्वीं निर्द्वंद्व आहे ॥ तें जाणतें जाणुनी सुखें राहे ॥ १ ॥ जेणें सुखदुःखाचा स्फुरे उल्लेख ॥ तेणेंचि स्फुरणें स्फुरे निज सुख ॥ २ ॥ एकाजनार्दनीं द्वंद्वभावना ॥ द्वंद्वा सबाह्य देखे जनार्दना ॥ ३ ॥

॥ १०९२ ॥ संसार जाणुनी थोकडा भला रोकडा जागा होई ॥ येतां जातां स्वयें येकडा भला ठकडा होउनी राही ॥ १ ॥ आनंद रे भज परमानंद रे ॥ धृ० ॥ धरीं ठायींची वृत्ति मोकळी पायींचि शृंखळा तोडी ॥

गळा वाळें धोंडी बांधली ते वासना परती सांडी ॥ २ ॥ एकाजनार्दनीं एकला दुजेपणा कैसा मुकला ॥ एका एकपणें निर्वाहो संसार तेणें जिंकिला ॥ ३ ॥

॥ १०९३ ॥ जन्मोजन्मींचीं मापें मोविसी ॥ दृश्य दळ दळु प्रपंच कां न सारिसी ॥ धृ० ॥ जीवा जातया भ्रमतया ॥ आत्मा कां नेणसी परस तया ॥ १ ॥ दृश्य होऊनि कां रुतलेंसी ॥ ठीक अद्वैतीं कां न राहसी ॥ २ ॥ सोन्यासकट स्वरूपाची रासी ॥ एकी एकपणें कां न राहसी ॥ ३ ॥

॥ १०९४ ॥ येऊनियां नरदेहा भुलतोसी कां ह्या ॥ हित तें लवलाह्या विचारी बा ॥ धृ० ॥ दृष्टी जेणें देखे रसना जेणें चाखे ॥ तेंचि तें ठाउकें करूनि घेई ॥ १ ॥ सोय धरी जीवाचिया मुळा ॥ देखोनियां मृगजळा भुलों नको ॥ २ ॥ सांडी आहाच वाहाच गोष्टी ॥ पाहे पा सोलीव दृष्टी ॥ ३ ॥ तरी तुज पाठीं पोटीं तेंचि आहे ॥ तरी हें तूंचि पाहे माझ्या बापा ॥ ४ ॥ अचेत चेतवितें कोण आहे येथें ॥ हें काय तुझें तुज न कळतें रया ॥ ५ ॥ मनाचें व्यापक बुद्धीचें द्योतक ॥ देखणें तें देख होऊनि ठेला ॥ ६ ॥ ह्मणो जाय एक तंव ह्मणते होय अनेक ॥ बोलताचि देख द्वैत दिसे ॥ ७ ॥ एकाजनार्दनीं बोलामाजी मौनी ॥ आदि मध्य अवसानीं आपण स्वयें ॥ ८ ॥

॥ १०९५ ॥ स्वप्नामाजीं स्वप्न स्वप्नीं जन्ममरण ॥ स्वप्नीं जागेपण स्वप्ना सरिसें ॥ १ ॥ स्वप्नींचेनी ज्ञानें स्वप्न मिथ्या झालें ॥ निजीं जागविलें निजीं पाहें ॥ २ ॥ निज कीं स्वप्न बहुत कीं आपण ॥ प्रतिबिंबा दर्पण स्वभाव सिद्धी ॥ ३ ॥ आरिसा पाहता गगन थोटावलें नयन ॥ तैसें व्हावें आपण सहजीं निज ॥ ४ ॥ स्वप्ना स्वप्न व्यालें कीं स्वप्नीं स्वप्न वेंलिगलें ॥ स्वप्नीं स्वप्न ठेलें निज पाहतां ॥ ५ ॥ एकाजनार्दनें निज जागविलें ॥ सहज निज गिळुनी निज होऊनि ठेलें ॥ ६ ॥

॥ १०९६ ॥ शस्त्रा परिस तिख विखाचेंही विख ॥ अमृत पियुख तेंचि जाणा ॥ धृ० ॥ तें पहाहो तुह्मी कवणे कायी ॥ आपआपणिया घाला कां ठाईं ॥ १ ॥ पाहातां पाहातां पाहणें ठेलें ॥ न पाहतां कैसें तन्मय झालें ॥ २ ॥ पितामहाचा पिता भानुदास जाणा ॥ एकाजनार्दनीं लाधल्या खुणा ॥ ३ ॥

॥ १०९७ ॥ आधीं आपणच आहे कोण ॥ नर कीं नार विचारून ॥ ॥ १ ॥ नाहीं नारी नर बाळा ॥ तूं ह्या त्रिगुणा वेगळा ॥ २ ॥ आकार उकार मकार ॥ तीन्ही मिळुनी ओंकार ॥ ३ ॥ बैस ओंकाराच्या माथा ॥ ध्यान करी गुरुपुता ॥ ४ ॥ स्थिर करूनियां मन ॥ ह्मणे एकाजनार्दन ॥ ५ ॥

॥ १०९८ ॥ बाह्या आफळोनी हात जो चुरी ॥ संसारीं उरी उरों नेदी ॥ १ ॥ ऐसीयासी देव न दे भेटी ॥ ऐसें ह्मणतां होटीं कुष्ठ लागे ॥ ॥ २ ॥ साच भाव मनीं विवंची ॥ रीघतां प्रपंचीं सुख कैचें ॥ ३ ॥ वैराग्य कैसा पूर्ण नहाला ॥ अनुतापें कैसा संतापला ॥ ४ ॥ अभिमानाचे वचनें वाटा ॥ तयासी दिवटा देव होय ॥ ५ ॥ लौकीकाची जेणें सांडिली लाज ॥ तयाचें काज पैं झालें ॥ ६ ॥ वित्तावरुनी ज्याचें उठिलें चित्त ॥ त्याचें जीवित्व सफळ देखा ॥ ७ ॥ अंतरीं ज्याचा शुद्धचि भावो ॥ तयासी देवो सिद्धचि असे ॥ ८ ॥ संत देखोनियां उल्हास कैसा ॥ मेघालागीं मयूर जैसा ॥ ९ ॥ एकाजनार्दनीं यालागीं पिसा ॥ अवलोकी दिशा भेटीलागीं ॥ १० ॥

॥ १०९९ ॥ नेणपणें मज होता भावो ॥ जाणपणें पाहो नाडियेलें ॥ धृ० ॥ माझी जाणीव फेडा जाणीव फेडा ॥ जाणपणें वेड लावियेलें ॥ १ ॥ नेणपणें मी सकळां मानीं ॥ जाणपणें कोणा दृष्टीही नाणीं ॥ २ ॥ जाणीव नेणीव नेणों कांहीं ॥ एकाजनार्दना लागलों पायीं ॥ ३ ॥

॥ ११०० ॥ उपजलेंनि देह दिवसें होत काळाचिया ऐसें ॥ बाळ तारुण्य वार्धक्य वयसें पालटित ॥ पेटलिये मुमुरी करितोसि पेरणी ॥ पीक पीकेल हानी असम साहस ॥ १ ॥ वेगीं उगवी वासना पाश ॥ सांडी जन धन मोह ममता सोस ॥ अरे हे देहबुद्धि मावळे अवघेंचि विवळे ॥ नाहीं तरी देखत आंधळे कैसे झालेति रया ॥ २ ॥ नीच नवी सांठवण करितां रितेचि जाण ॥ विषय भरितां नागवण उघड देखा ॥ आगी लागल्या घरीं ठेवितोसि ठेवा ॥ तया निर्दैवा लाभ कैचा ॥ ३ ॥ देहबुद्धिची प्रतिष्ठा करूनी ह्मणसी मी बरवंटा ॥ पाहे कृमि भस्म विष्ठा याचें अवसान ॥ भजे सद्गुरुचरणा वेगीं मुरडी वासना ॥ एकाजनार्दना शरण रिघे ॥ ४ ॥

॥ ११०१ ॥ कृपा करोनि सांगा गोठी ॥ तत्काळ मोडे प्रपंच दिठी ॥ १ ॥ तयाची आह्मी धरिली कास ॥ झालों दास जीवेंभावें ॥ धृ० ॥ माझें मरण मज दाविलें ॥ जीव घेऊनिया जिणें पाल्हाविलें ॥ २ ॥ जें बोले वचनीं तें दावी नयनीं ॥ एकाजनार्दनीं बोध ऐसा ॥ ३ ॥

॥ ११०२ ॥ दृढ लागे वैराग्य बहु वात ॥ तव प्रपंच पात सब गल ज्यात ॥ नव पल्लवी विरक्त आरक्त ॥ बोध सुगंध मलयानिल झळकत ॥ ॥ १ ॥ भली आईहो चैतन्यरूप वसंत ॥ ताहां जीववृक्ष फलपुष्पयुक्त ॥ धृ० ॥ शुद्ध सुमनी परागप्रेम महकत ॥ कृष्ण भ्रमर गुंजारवें भ्रमत ॥ भक्त मयुर आनंदसें नाचत ॥ हरि गुणींके कारवें नित्य गर्जत ॥ २ ॥ चित्त चैतन्य अमोघ गंध युक्त ॥ मोक्ष फळें फळ ताहां झुलत ॥ मुमुक्षु पंथीं पंथ वाकु विसंवत ॥ समाधिसुखें नित्य सोवत ॥ ३ ॥ मृदु मंजुळ अद्भुत वाणी ॥ शुक बोलति अति मधुर ध्वनी ॥ वेद कोकिळ भैरहे मौनी ॥ महा वसंतु एकाजनार्दनीं ॥ ४ ॥

॥ ११०३ ॥ माघमासीं माधव पुजे बहुत फळ ॥ ऋतु बसंत माधवी सफळ फळ ॥ फळाशा मेल्ही तिहां खेल ॥ खेल हरी सबही रूप मिले मेला मेल ॥ १ ॥ फाग ऋतु रावो माधवी आईयेहो आज ॥ तहां माधव रमत रमाराज ॥ प्रेम सप्रेम गोपी विसऱ्या लाज ॥ हरी रंग संग नाहीं और काज ॥ धृ० ॥ पंचभूत मेल्हीं पांचो गुण रंग ॥ हरीरंगीं रंग भयो अंति सुरंग ॥ हरि रंग लागे मेरो सुध अंग ॥ फाग खेलते बिसरे देहीं देह संग ॥ २ ॥ च्युत वृक्ष मुहरे अच्युत फळी ॥ वेद कोकिळ कुंजे चतुर डाळी ॥ शुक बोलत बचन सुखा कुळीं ॥ श्रद्धा बसंत सुख पाये सकळी ॥ ३ ॥ शोभा शोभित निरंजन वन ॥ श्रद्धा बसंती शुद्ध सुमन ॥ फाग खेलत जनी-जनार्दन ॥ एका एक भयो चरणरेण ॥ ४ ॥

॥ ११०४ ॥ आंवसे राती अंधारी ॥ प्रभा आंतु आणि बाहेरी ॥ १ ॥ मना पाहलेंरे मना पाहलेंरे ॥ बुद्धि बोध इंद्रिया सम जाहलेंरे ॥ धृ० ॥ नयनीं पाहतां न दिसे बिंब ॥ अवघा प्रकाश स्वयंभ ॥ २ ॥ एका जनार्दनीं पालटू ॥ जनीं वनीं लखलखाटू ॥ ३ ॥

॥ ११०५ ॥ माझें मीपण मज भेटऊं नेणे ॥ ऐशिया गुरूसी गुरुत्व

बोले कोणे ॥ १ ॥ जप तप ध्यान मनाचें विंदान ॥ निजात्मदर्शन विरुळा दावीबा ॥ धृ० ॥ तटस्थ काष्टीं विधींते नव्हे समाधी ॥ मन मूर्छितसे जाणतिये संधी ॥ २ ॥ मनाचे साक्षीसी मन मनासंयोगें ॥ एका जनार्दनीं समाधि पाया लागे ॥ ३ ॥

॥ ११०६ ॥ उपजोनी गोत्रीं झालों विश्वामित्र ॥ ह्मणोनि अमित्र पारुषली ॥ १ ॥ आह्मी विश्वामित्र आह्मी विश्वामित्र ॥ आह्मी विश्वामित्र जेथें तेथें ॥ धृ० ॥ विश्वेसी अमैत्रि आचरतां दिसे ॥ विश्वामित्र तया ह्मणावें कैसें ॥ २ ॥ परते आप करिते सूत्र ॥ यालागीं आह्मी झालों विश्वामित्र ॥ ३ ॥ विश्वामित्रें सृष्टि केली नवी ॥ आह्मा ते आघवी चैतन्यचि रे ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं पडले मित्र ॥ ह्मणोनि विश्वामित्र साच झालों ॥ ५ ॥

॥ ११०७ ॥ देंठीं जें फळ वाढे पिकोनियां तें झडे ॥ मागुतें पै न चढे देंठा जेवीं ॥ १ ॥ यापरी मागिल मोहो सांडुनीयां पाहो ॥ नाथिलाचि संदेहो धरूं नको ॥ धृ० ॥ विवूनिया दुहिता दिधली अनावरा ॥ पितयाच्या गोत्रा न मिळे जैशी ॥ २ ॥ एकाजनार्दनीं मिनला तो एकू ॥ मागील अवलोकू पारुषला ॥ ३ ॥

॥ ११०८ ॥ मी तें मी तूं तें काई ॥ तूंपणा ठायीं ठाव नाहीं ॥ १ ॥ मीपण मज आलें मूळ ॥ तूंपणें तुळतुळ करित ठेलें ॥ धृ० ॥ मीपण एकी तूंपण फुंकी ॥ न कळे तरी पाहे विवेकीं ॥ २ ॥ पितामहाचा पिता सुभानु मीपणा मुळीं ॥ एकाजनार्दनीं तूंपणा होळी ॥ ३ ॥

॥ ११०९ ॥ जाणतें जाण नेणतें नेण ॥ नेणतें नेण तो जाण सुजाण ॥ १ ॥ जाणते काई नेणते काई ॥ जाणते नेणते हीं दोन्ही नाहीं ॥ धृ० ॥ नेणत्याच्या ठाया जाणतें आलें ॥ जाणता नेणतें घेऊनिया गेलें ॥ २ ॥ जाणतें नेणते ये दोन्ही वाव ॥ एकाजनार्दनीं एकची भाव ॥ ३ ॥

॥ १११० ॥ सूर्योचि अवनी मा सूर्योचि आकाश ॥ त्याहीवरी कैसा उगवला चंडांश ॥ १ ॥ दीपाचें टवळें मा दीपाचिया वाती ॥ त्याही वरी कवणें प्रकाशिली ज्योती ॥ धृ० ॥ चंद्रचि रात्रीं मा चंद्रचि चकोरें ॥ सातें ही निवविजे कवणे निज चंद्रें ॥ २ ॥ एकाजनार्दन नामें सच्चिदानंद ॥ स्वरूपीं भेटल्या कवण पैं आनंद ॥ ३ ॥

॥ ११११ ॥ कळीं काळें आह्मासी दिधली पाठी ॥ आलों जगजेठी रंगासी ॥ १ ॥ हरीचे दास झालों ॥ रंगा आलों नाचावया ॥ धृ० ॥ यमदूत आह्मी तारिले पाहीं ॥ आलों या ठायीं हरिरंगा ॥ २ ॥ मुखरी झाला जनार्दनीं एका ॥ तेणें आह्मा देखा चाळविलें ॥ ३ ॥

॥ १११२ ॥ ज्यावरि रचलें तें आपुलिया ऐसें करी ॥ माझारी तूं गुंततोसी बापा ॥ डोळे झांकुनिया तूं रात्री करिसी तरी ॥ पुढें होईल खावयासिरे बापा ॥ १ ॥ जोडिलें तें तुह्मी खारे बापा ॥ पुढिलासि न करी धंदा ॥ याही वरी जरी नायकसी तरी ॥ मागें येतिल आपदा रेया ॥ धृ० ॥ बहुत खेपा करूनी मुद्दल जोडिलें ॥ वाढी झालें असम साहस ॥ तुझें तुजवीण नवेंचची ओनामा तेणें ॥ जोडें होसी कासाविसरे बापा ॥ २॥ कवंटा घातलें तें ह्मणशील खोटें परी ॥ खरें बांधले पालवी ॥ तेंहीं न वेंची आतां अनुभविसी ॥ तरी अधिकें पाडिली गोवीरे बापा ॥ ३ ॥ आतां करावें तें एक करी येर ॥ लावी मागिलांची वारी ॥ ऐसें करितां वाढी मोडेल ॥ मा मुद्दला होईल सरोभरी बापा ॥ ४ ॥ ऋणवै देखसी खंगला ॥ तरी संकल्प घाली मुद्दला ॥ जनार्दन कृपाहेंना तैसें ॥ मा एकाएकीं होसी एकलारे बापा ॥ ५ ॥

॥ १११३ ॥ करण्या काय करूं ह्मणसी ॥ महाशून्यीं काय धरिसी ॥ करणें धरणें नाहीं सिद्ध स्वरूपासी ॥ १ ॥ करणें धरणें नाहीं तें तूं तत्व पाही ॥ सहजीं सहज तेथें लक्ष्य लक्षण काई ॥ धृ० ॥ जपीं जपो अद्वैत ॥ तंव ते शब्दातीत ॥ षडाक्षरीं अक्षर नलभे पैं निश्चित ॥ २ ॥ बैसोनि आसनीं ध्येय ध्यावे ध्यानी ॥ ध्याता ध्येय ध्यान ॥ मिथ्या झालीं तिन्ही ॥ ३ ॥ ब्रह्म हमस्मी हेहि भावना क्षुद्र ॥ नसतां शाखेवरी ॥ ह्मणती आहे चंद्र ॥ ४ ॥ सच्चिद आनंद माया त्रिगुण ॥ अतद्व्यावृत्तीनें ॥ केली असे खूण ॥ ५ ॥ अभिन्न ब्रह्म दृष्टि सुखिया मी स्वानंदू ॥ येणेंचि स्फुरणें ॥ तुझा प्रगट दिसे भेदू ॥ ६ ॥ एकाजनार्दन एकपण विरे ॥ ब्रह्मीं ब्रह्म ह्मणती ॥ स्फूर्तिही नुरे ॥ ७ ॥

॥ १११४ ॥ देहाची साउली देहीं दिसो लागली ॥ वेगळी करूं ह्मणतां सज्ञानासि भुली ॥ १ ॥ देहीं जैसी छाया ब्रह्मीं तैसी माया ॥ असोनि ज्याची तया स्पर्शों न शके ॥ धृ० ॥ आसनीं भोजनीं सरसी छाया शयनीं ॥ प्रीति आलिंगितां मिथ्या आलिंगनीं ॥ २ ॥ मिथ्या

मायाग्रास ह्मणती योगबळें ॥ स्वच्छाया खोंचोनी मारावी सावळें ॥ ३ ॥ बंध तोडोनी साचें झालों पैं मुक्त ॥ मृगजळीं बुडता काढिला वंध्यापुत्र ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं माया की वावो ॥ बंध मोक्ष तेथें आपलाची अभावो ॥ ५ ॥

॥ १११५ ॥ सरिसी छाया असे परि ज्याची त्या न बाधी ॥ सज्ञानासी तैसी देहीं देहबुद्धी ॥ १ ॥ छाया तैसा पाहो स्वदेहाचा नाठवो ॥ सत्य जाणा तोचि साचार अनुभवो ॥ धृ० ॥ जिकडे जाय तिकडे छाया लागे मागें ॥ असलेपणें चिंता ज्याची त्या न रिगे ॥ २ ॥ छाया कोठें असे कवणे ठायीं वसे ॥ सरिसीचि असतां ज्याची तो न पुसे ॥ ३ ॥ जन्मापासुनी छाया सरिसीच वाढे ॥ माझी माझी ह्मणोनी ममता तुटी पुढें ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं यापरी देहभावा ॥ सहज चैतन्याच्या वस्ति आला गांवा ॥ ५ ॥

॥ १११६ ॥ देह बुद्धि खुंटली ॥ तैंचि माया तुटली ॥ देहाची स्थिति ॥ तें दैवाधीन ठेली ॥ १ ॥ दैवाचेनि बळे ॥ देहींचें कर्म चळे ॥ स्वसुखाचे सोहळे ॥ विदेह भावें ॥ धृ० ॥ भोगी कां त्यागी ॥ अथवा हो योगी ॥ देहींचें देहपण ॥ नलगे त्याच्या अंगीं ॥ २ ॥ एकाजनार्दनीं एकपणाच्या तुटी ॥ सहज चैतन्यासी मीनला उठाउठी ॥ ३ ॥

॥ १११७ ॥ साधनाचीं मापें घेऊनियां हातीं ॥ पारखिची गति कवण जाणे ॥ १ ॥ घळघळीत राम आपुलेनि मापें ॥ खोटेनि संकल्पें घेववेना बा ॥ धृ० ॥ सद्गुरुचेनि कसें खरें होय नाणें ॥ न मावितांचि कैसें अमुपची घेणें ॥ २ ॥ एकाजनार्दनीं खरेंनि साटी ॥ घळघळीता रामाचे बैसले पाठीं ॥ ३ ॥

॥ १११८ ॥ आरिशाचें देह आरिसेंनि नेलें ॥ द्रष्टा दृश्य दर्शन अवघें मिथ्या जालें ॥ १ ॥ यापरि सहजी सहज मी जाण ॥ दृश्य द्रष्टा मिथ्या देखते दर्शन ॥ धृ० ॥ एकाजनार्दनीं देहीं देह नाहीं ॥ दृश्य द्रष्टा दर्शन समूळ मिथ्या पाहीं ॥ २ ॥

॥ १११९ ॥ नभीं निळीमा भासे ॥ परि तेथेंचि ते नसे ॥ स्वरूपीं देह तैसे ॥ नसतेचि आभासे ॥ १ ॥ देहोचि नाहीं मा मरेल काई ॥ जिणें मरणें दोन्ही ॥ समूळ मिथ्या पाही ॥ धृ० ॥ मुक्तिकेचें रूप कसितां नये कसा ॥ देहीं देहभाव समूळ मिथ्या तैसा ॥ २ ॥ एकाजनार्दनीं अनादि सिद्ध एक ॥ बंध मोक्ष दोन्ही वांझेचें बाळक ॥ ३ ॥

॥ ११२० ॥ मीपण कळे बुडी ॥ तूंपणातें जोडी ॥ मीतूंपणें चाढी ॥ प्रपंचाचि बा ॥ १ ॥ मीपण नेणतां ॥ ज्ञान नये हाता ॥ साधनाची सत्ता ॥ न चले तेथें बा ॥ धृ० ॥ मीपण नोळखे ॥ जगचि तया पारखे ॥ यालागीं सुख दुःखें ॥ शिणती जन ॥ २ ॥ सद्गुरु चरणीं ॥ मीपणा मिळणीं ॥ ब्रह्मीं ब्रह्मपूर्ण ॥ एकाजनार्दनीं ॥ ३ ॥

॥ ११२१ ॥ शाखेवरुनी चंद्र लक्षिजे दिठी ॥ ते शाखा तोडावया करी जो आटाआटी ॥ १ ॥ फांटा भरिलें जन फांटा भरिलें जन ॥ लक्षिते लक्षण दुरी ठेले ॥ धृ० ॥ निजरूप पहावया दर्पण दावी दिठी ॥ प्रतिबिंब देखोनी क्षोभे भांडो उठी ॥ २ ॥ व्हावया निज सिद्धि देवो सांगे बुद्धी ॥ तें सुख सांडोनी आवडे उपाधी ॥ ३ ॥ एकीं एकपणीं परमार्थ गोडू ॥ द्वैत हातीं धरितां बहुत झाला नाडू ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं भावार्थ सिद्धी ॥ भावो नाहीं तैं विकल्पें भरली बुद्धी ॥ ५ ॥

॥ ११२२ ॥ मृगजळ पाहतां रवि दिसे कर्ता ॥ परि केलेंपण सर्वथा रवि नेणें ॥ १ ॥ कर्म ज्याचेंनि चळे ॥ तो कर्मातें नातळे ॥ अचेतन लोहो चुंबक दृष्टि खेळे ॥ धृ० ॥ प्राण्याचेनि बळें देहींचें कर्म चळे ॥ तेणें कर्में न मैळे कर्म जैसा ॥ २ ॥ सूर्याचेनि उजियेडे ॥ सूर्यकांति अग्निपडे ॥ दहन दाहक कर्म सूर्या अंगीं न घडे ॥ ३ ॥ कुमुदें विकासती ॥ सोमकांत द्रवती ॥ सागरीं भरितें भरे ॥ अलिप्त चंद्राकृती ॥ ४ ॥ दोराचा सापू ॥ जेंवी नेणे साचार सर्पू ॥ एकाजनार्दनीं ॥ मिथ्या कर्म जल्पू ॥ ५ ॥

॥ ११२३ ॥ पैल पैल पैल हातो ॥ ऐला पैला तें कोण पाहतो ॥ १ ॥ दृष्टि डोळ्या माझारी वाहे ॥ धृ० ॥ बुद्धि देखणी ज्याचेनि चांग ॥ तो देखतो दृष्टीचें आंग ॥ २ ॥ एकाजनार्दनीं सहज पाहे ॥ दृश्य द्रष्टा तेथेंही न राहे ॥ ३ ॥

॥ ११२४ ॥ निज निज निज आहे ॥ नीज सांडोनि निज तें पाहे ॥ १ ॥ निज तें कवण काई ॥ निजी निजोनि नावेक पाही ॥ धृ० ॥ निजे निजविलें आकाशा ॥ तेथें खुंटली दिवसु निशा ॥ २ ॥ एकाजनार्दनीं गुह्य गुज ॥ तेथें वोळलें सहज निज ॥ ३ ॥

॥ ११२५ ॥ शिव शिव शिव शिव शिव ॥ शिव पाहतां नुरे जीव

॥ १ ॥ जिवेवीण घेतला जिऊ ॥ मज आधी निमाला जिऊ ॥ धृ० ॥ जीवाचे जीवन शिऊ ॥ शिवाचें आयुष्य शिऊ ॥ २ ॥ एकाजनार्दनीं सहज भावो ॥ जीव शीव ये दोन्ही वावो ॥ ३ ॥

॥ ११२६ ॥ पायींचा महिमा पायींचें जाणें ॥ पायां लागोनि वाहाण पायीं होणें ॥ १ ॥ फिटलें बिरडें तुटला वादू ॥ यालागीं साधुनी दृढ करी साधू ॥ धृ० ॥ मन फाडुनीयां केला वानवडू ॥ पदोपदीं सुरवाडु संतचरणीं ॥ २ ॥ एका जनार्दन बाणला पायीं ॥ सकळा जन्मा झालों येणें उतराई ॥ ३ ॥

॥ ११२७ ॥ हरी निज नित्य गती आवे ॥ मोही भावेरी लाल ॥ गुरु बचनीन मनु लगावे ॥ १ ॥ नख सिख मुख सुख पावे ॥ बोध सुवांत चलावे ॥ कीं प्रीतम प्रीत बधावे ॥ धृ० ॥ अंग संग निःसंग लगावे ॥ कीं सुख दुःख बुझावे ॥ सुख दुःखातीत परमानंद ॥ एका जनार्दनीं पावे ॥ २ ॥

॥ ११२८ ॥ मानस घेऊनि गोविलें माते ॥ टकमकीं तें पाहों आह्मी ॥ १ ॥ येणें मांडिली अनादि बोलों तोही नेदी ॥ विचारितां बुद्धि हारपली ॥ धृ० ॥ जुनाट ठेवा लिंगदेह गांठी ॥ सोडोनि घेवोनि घातली मिठी ॥ २ ॥ मी तूं हें दोन्ही नेली ॥ अक्रिया ऐशियानें केली ॥ ३ ॥ जिणें जीवित नेलें आमुचें ॥ घेउनी न देणें हें व्रत याचें ॥ ४ ॥ देव देखत हाचि अनादी ॥ सर्वस्वें ठकणें याची प्रसिद्धी ॥ ५ ॥ अनादि वरी याचें जिणें ॥ हातीं धरि त्यासी अनादि करणें ॥ ६ ॥ एकाजनार्दनीं लाविला मागू ॥ आपण्या देवोनि तोडिला लागू ॥ ७ ॥

॥ ११२९ ॥ अंग तेंही फळ बीज तेंही फळ ॥ सर्वांगें सफळ ऊंस जैसा ॥ १ ॥ मुळींचि फळ लागलें देखा ॥ मुळीं लागुनी सफळ एका ॥ धृ० ॥ न फळता कैसा नव्हेचि निर्फळ ॥ सर्वांगीं जैसा चंदन सफळ ॥ २ ॥ एकाजनार्दनीं एकचि फळ ॥ एकपणें कैसें झालें सफळ ॥ ३ ॥

॥ ११३० ॥ वारिता घरींचा गेला जागरणा ॥ लागलों दैवत आलासे अंगणा ॥ १ ॥ गोविंदा ह्मणे आनंदकंदा ॥ परमानंदा पाव वेगीं ॥ धृ० ॥ झाडणी भारणी न चले जाणा ॥ सबाह्य अंतरीं देखे नारायणा ॥ २ ॥ गुणिया भारिता शंकला मानसीं ॥ तेंचि भूत कैसें लागलें त्यासी ॥ ३ ॥

दोघेही बोधले दोघेही बोधले ॥ वोसणता बोले रामनाम ॥ ४ ॥ गुणिया फुंदे भरितें प्रेमाचें ॥ झडपला तो आनंदें नाचे ॥ ५ ॥ झडपला तो बोध सुखाडे ॥ गुणिया तेथें मुर्च्छित पडे ॥ ६ ॥ एक तो गाय एक तो नाचे ॥ श्रुतिही सोलुनी अर्थु तो वेंचे ॥ ७ ॥ जागरणिचें दैवत दारुण ॥ दोघाही लागला एकाजनार्दन ॥ ८ ॥

॥ ११३१ ॥ देह दिखत चाले कवतुकें ॥ आपणियां माजी आपण तोखें ॥ १ ॥ कवण जाणें कवण पडिलें गोंधळीं ॥ न संटे उकळी अनुभवाची ॥ धृ० ॥ मन हरवोनि हरखत पोटीं ॥ शून्याही परती पडली मिठी ॥ २ ॥ निरंजनींचें लेईला अंजन ॥ जिकडे पाहे तिकडे एकाजनार्दन ॥ ३ ॥

॥ ११३२ ॥ नयनींचेनि तेजें जो पोळला चंडाशू ॥ नभ निमालें नाहीं अवकाशू ॥ १ ॥ रात्री हरपली पहावी कोठें ॥ दिवस रूसोनी गेला मागुता न भेटे ॥ धृ० ॥ अंगींचेनि तेजें डोळाचि चवी ॥ पाहों गेलों तों बुडाला रवी ॥ २ ॥ एकाजनार्दनीं विरालें पाहणें ॥ रात्री दिवसु दोन्हीं घेतला प्राणें ॥ ३ ॥

॥ ११३३ ॥ रविबिंब पिळुनी रोविली भूमी ॥ पाहों गेलों तंव नाहीं आह्मी तुह्मी ॥ १ ॥ अवघेपणें झाला तेथें ॥ चराचर झालें आपैतें ॥ धृ० ॥ चालों जातां चालणें खुंटे ॥ पाहों जाय तें तेथेंचि भेटे ॥ २ ॥ एकाजनार्दनीं एकला भेटी ॥ स्वप्रभा एकपणेंही घोटी ॥ ३ ॥

॥ ११३४ ॥ वोवुनीयां गुणीं भूत भौतिक मणी ॥ मध्य नायकु एका ठेला जनार्दनीं ॥ १ ॥ यावरि माळा घालुनी गळा ॥ जनार्दनीं लीळा खेळतुसे ॥ धृ० ॥ पितामहाचा पिता सुभानु उगवला ॥ एकाजनार्दनीं जपतां सामावला ॥ २ ॥

॥ ११३५ ॥ जन जन म्हणोनि धरिली आस ॥ पाहतां वास जनार्दन ॥ १ ॥ नवल एक सांगूं मी काई ॥ बाप तोचि कैसा झाला आई ॥ धृ० ॥ पारा फोडोनियां केला दारवंटा ॥ जीत माय बाप आली माझ्या पोटा ॥ २ ॥ पोटा तो आला कीं आल्यांत पोट ॥ आकाशीं भरिले जेंवी रिते घट ॥ ३ ॥ शब्दासी कळितां नाकळे होडा ॥ खावरी नाचवी बोलाचा धेंडा ॥ ४ ॥ श्रुतीसी गणितां नयेचि अंका ॥ तो ठसा ठसावला जनार्दनीं एका ॥ ५ ॥

॥ ११३६ ॥ किती कडसाल तुह्मी विवेकी ॥ आपल्या आपण झाली शिनळकी ॥ १ ॥ काय सांगों याचें कर्म अचाट ॥ ऐकतां मनाचें उतटताहे वोट ॥ धृ० ॥ सर्वांगीं शिनळु पाहतां अनंगू ॥ एकलेपणें तो अमुला चांगू ॥ २ ॥ डोळा घाली तेथें वाढवी पोट ॥ अव्यक्ति व्यक्ति हा प्रसवे प्रगट ॥ ३ ॥ यावरि रातला नारायण भोगें ॥ एकलाचि जाला घरवातें दोघे ॥ ४ ॥ सोलिव पाहतां एक ना दोन्ही ॥ यापरी राहिला एकाजनार्दनीं ॥ ५ ॥

॥ ११३७ ॥ भरणा फोडोनी पान्हा जो भरिला ॥ अंगाचा वोटीया दोहणार भला ॥ १ ॥ करेंवीण कैसा दोहे खरखरा ॥ थान नाहीं परी लागल्या धारा ॥ धृ० ॥ संकल्पाचे तेथें विराले डेरे ॥ सुभरे वोढली पान्हा न धरे ॥ २ ॥ मेळविणीविण घातला पान्हा ॥ एकाजनार्दनु वांसरूं तान्हा ॥ ३ ॥

॥ ११३८ ॥ ऐका शकुन ऐका अपशकुन ॥ आह्मा परिपूर्ण दोही माजी ॥ १ ॥ डावलु तें काई डावलु तें काई ॥ वेंगडी पडते विचाराच्या पायीं ॥ धृ० ॥ वाम सव्य अधः ऊर्ध्व एक ॥ डावलणें तेथें झालें निःशेष ॥ २ ॥ एकाजनार्दनीं देह बुद्धि डावली ॥ परतोनि पाहे तंव रिघाली राउळी ॥ ३ ॥

॥ ११३९ ॥ देखसी घटु तो ह्मणसी रिता ॥ परिपूर्ण भरलें न देखे सर्वथा ॥ १ ॥ भरलेंचि रिते ॥ भरिलेंचि रिते कां मानितोसी ॥ धृ० ॥ भरिलेंचि भरितां अधिक भरे ॥ पात्र विरे परी तळी न खिरे ॥ २ ॥ भरलें भरितां नुभरे पाहीं ॥ ठायींच्या ठायीं भरतसे ॥ ३ ॥ अमृतकिरणीं जैसें अमृत असे गुप्त ॥ तैसा देहीं पूर्ण दिसे देहवंत ॥ ४ ॥ भरलेंनि रिता नव्हे एका एकु ॥ जनार्दन होउनी ठेला तिन्ही लोकु ॥ ५ ॥

॥ ११४० ॥ निज हित शिकवितां येतो अभिमान ॥ तैं झालों सज्ञान सन्मानासी ॥ १ ॥ मी तंव चरणरज मी तंव चरणरज ॥ माझें हित मज शिकवी जो जी ॥ धृ० ॥ नवें नको करूं राग नको धरूं ॥ जुनाट विचारूं विसरों नको ॥ २ ॥ पवन प्राशुनी सर्प निराहार असती ॥ ऐसेनि साधनें केवी घडे मुक्ती ॥ ३ ॥ सांडी मांडी सदा करितुसे मन ॥ तैंचि तूं स्वरूपीं

करूनि घाली लीन ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं निजतत्त्व ध्यायीं ॥ देहीं असतां तूं होशी विदेही ॥ ५ ॥

॥ ११४१ ॥ ठायीं बैसतां साधन सरलें ॥ स्वादमात्रें तेथें मन तृप्त झालें ॥ १ ॥ साधन नाहीं साधन नाहीं ॥ तंव तंव भोजना रुचि आली पाही ॥ धृ० ॥ साधनें वीण भोजन सुटी ॥ ब्रह्मादिकां परीस देतसे पुष्टी ॥ २ ॥ एका एकपणें साधन नाहीं ॥ पुष्टी तुष्टी झाली जनार्दन पायीं ॥ ३ ॥

॥ ११४२ ॥ साधन असे तंव भोजन मिळे ॥ भोजन साध्यकाळीं साधन गेलें ॥ १ ॥ साधन सरलें साधन सरलें ॥ सिद्ध भोजन कैसें स्वादासी आलें ॥ धृ० ॥ साधनेंवीण गिळे जो ग्रासू ॥ संकल्पेसी क्षुधे झाला नाशू ॥ २ ॥ एकाजनार्दनीं तृप्त अभयकर ॥ धालेपणाचे हे देताति ढेंकर ॥ ३ ॥

॥ ११४३ ॥ वारा चाले मागे न दिसे मार्गू ॥ कर्म वासनें तेंवी लागू ॥ १ ॥ यापरी एकीं मिनला एका ॥ विस्मित लोका बाईयानो ॥ धृ० ॥ जनी निरंजन उफराटी भेटी ॥ एकाजनार्दनीं निमाली गोठी ॥ २ ॥

॥ ११४४ ॥ रवि बिंब सोलोनि सुदलें डोळा ॥ मुळीचिया मूळा लागला एका ॥ १ ॥ एकाकी एका ह्मणतील बाईया ॥ मुळीं लागला माया सांडियेला ॥ धृ० ॥ जनीं स्वजनीं सांडिला त्यजोनी ॥ एकाजनार्दनीं मूळ भूत ॥ २ ॥

॥ ११४५ ॥ माया ममत्वें वाढवी लोकां ॥ मायेसी एका वाढवितो ॥ १ ॥ जो जो जो परिवंदें जननी ॥ एकाजनार्दनीं निज घे तूं ॥ धृ० ॥ माया ह्मणे माझा मज होईल तान्हा ॥ एकाजनार्दना माजी खेळे ॥ २ ॥

॥ ११४६ ॥ सुत होतें सासी घालुनी वळण ॥ वळुनी माणुसपण गुणी केलें ॥ १ ॥ सुताचे सुती लागला एका ॥ जनार्दनीं देखा चाळविला ॥ धृ० ॥ उगाळूनियां गुण अगुणाचा झाला ॥ तार न तुटतां सुती लागला ॥२॥ प्रेम देऊनियां केली चाळवणी ॥ धरा धरा एका मीनला जनार्दनीं ॥ ३ ॥

॥ ११४७ ॥ सिद्ध होतासी तो साधना आलासी ॥ मुक्तता सांडोनि बद्ध कां झालासी ॥ १ ॥ साध्यची साधन साध्यची साधन ॥ इतर करणी तुझी तुजलागीं बंधन ॥ धृ० ॥ प्रारब्ध विंदाण विषय भोगूं जाण ॥ स्वरूपीं

होउनी मन गाहूं नको ॥ २ ॥ लेंकुराच्या खेळी दिवस्रु तैशीं निशा ॥ सुखदुःखाचा भावो देखसी तूं तैसा ॥ ३ ॥ दोरा अंगीं सापु जितूं तैसा मेला ॥ आपला भ्रमूं जरी आपणा ग्रासुनी गेला ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं साध्यचि साधना ॥ सांडी मांडी करी संकल्प कल्पना ॥ ५ ॥

॥ ११४८ ॥ वांझेचि सुने प्रसुति झाली ॥ आपुली नाती कैसी आपण व्याली ॥ १ ॥ लटिकियाचें बाळ लटिकें खेळविती ॥ लटिकें चाळविती तें हें देहरे ॥ धृ० ॥ स्वप्नीचें धन चित्रिच्या ब्राह्मणा ॥ जाति कर्मालागीं वाटिती पैं जाणा ॥ २ ॥ जन्म नाहीं त्याचें श्राद्ध आचरती ॥ देहामाजी साधन तें जाण भ्रांती ॥ ३ ॥ मूळ नाहीं तेथें फळ कैचें लाभें ॥ गाय नसतां केवि खुंटाचि दुभे ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं देहचि लटिकें ॥ लटिक्याचे संगतीं तुज नव्हें निकें ॥ ५ ॥

॥ ११४९ ॥ नव नाडी देह बाहत्तरि कोठें ॥ शोधितां तुज मोठे कष्ट होती ॥ १ ॥ देहोचि तंव नाहीं शोधिसी कांई ॥ मृगजळाच्या डोहीं मोट लावी ॥ धृ० ॥ येत जात कर्मीं वर्तत भासे ॥ स्वप्नीचा भ्रमूं स्वप्नीच दिसे ॥ २ ॥ त्रिबंध षड् चक्रें कल्पित कल्पना ॥ वोडंबरीची हें शृंगारली सेना ॥ ३ ॥ स्वप्नीचा वैरी जाग्रती मारा ॥ करूं जाय तो जागतां निद्-सुरा ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं एकपण नाहीं ॥ देह विदेह तेथें शोधिसी ते कांई ॥ ५ ॥

॥ ११५० ॥ तुझेनि बोलें देवा जोडिली प्रतिष्ठा ॥ त्या बोला उफराटा विसरलासी ॥ १ ॥ नवल कैसें चोज तुझें नकळे तुज ॥ अभिमानाचे भोज ऐसें आहे ॥ धृ० ॥ तुझेनि बोलें बहुता लाविलें वोजें ॥ त्या बोला मुकिजे ऐसें जालें ॥ २ ॥ + + + ॥ यालागीं एकाजनार्दनीं वेडा ॥ ३ ॥

॥ ११५१ ॥ मिथ्या माया ह्मणोनी निर्वेचिती जेथें ॥ तेणेंचि ज्ञातेपणें माया नांदे तेथें ॥ १ ॥ मायेचा निरासू कैसारे आलया ॥ + + + ॥ धृ० ॥ विरजा होमीं माया जाळिली जगजेठी ॥ पूज्य परमहंस ह्मणोनी सरसी उठी ॥ २ ॥ मिथ्या द्वैतमाय वेदांत भेमी ॥ तेथेंही माया पावें ब्रह्माहमस्मी ॥ ३ ॥ निरसुनी अज्ञान स्वानंदें मी सुखी ॥

सुखाचेनी तोषे मायेची वोळखी ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं नाना युक्ति माया ॥ जनाचें चरण रज जालिया न बाधी माया ॥ ५ ॥

॥ ११५२ ॥ गाण्याचें कीर्तन गाणिवें नेलें ॥ जाणाचें ज्ञान जाणीवें खादलें ॥ १ ॥ भावार्थ अवघड भारी ॥ तो नकळे जाणिवे वरी ॥ धृ० ॥ पंडिताचा बोधू विध्वंसी वादू ॥ तापशाचें तप निर्दाळी क्रोधू ॥ २ ॥ योगियाचा योग नाडीला सिद्धी ॥ अभिमान नाडी तो सज्ञान बुद्धी ॥ ३ ॥ कर्मीं कर्म भ्रम नाडी वर्णाश्रम ॥ समासी विषम विकल्प करी ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं भगवत् कृपा पूर्ण ॥ निरभिमान भावो वाढवी संपूर्ण ॥ ५ ॥

॥ ११५३ ॥ जायाचा तोंडरू जायाची गरसोळी ॥ सावत्र नवरी उजवली ॥ १ ॥ जायाची साडी जायाची चोळी ॥ जायाचा नोवरा बैसला मुळीं ॥ धृ० ॥ जायाचें घर जायाचा वर ॥ जाई जगा अवघा संसार ॥ २ ॥ जायाचा वऱ्हाड केल्या बोळवणा ॥ एकाजनार्दनीं दिधला आंदणा ॥ ३ ॥

॥ ११५४ ॥ वारेनि जिणें वारेनि मरणें ॥ वारा धरी ते चतुर शाहणे ॥ १ ॥ वारया वरी संसार देखा ॥ तेणें चाळविलें अवघ्या लोका ॥ धृ० ॥ वारयाचा जीव जिवंत धरणें ॥ यापरि जीजे त्या नांव जिणें ॥ २ ॥ एकाजनार्दनीं भरला वारा ॥ सांडणें केलें अवघ्या संसारा ॥ ३ ॥

॥ ११५५ ॥ संसार नगरीं भरला हटू ॥ एका एकटु आला तेथें ॥ १ ॥ माझें स्वरूप पाहागा स्वरूप पाहागा ॥ दावितो जगा परि दृष्टि नये ॥ धृ० ॥ अति सुक्ष्मपणें नयेचि दृष्टी ॥ विवेक राहटी विषयांच्या ॥ २ ॥ या परि विकरा नव्हेचि जनीं ॥ एकाजनार्दनीं वस्तु ठेवी ॥ ३ ॥

॥ ११५६ ॥ मखर मंदले घोंगटे हाटी ॥ मुदलासाठीं मांडियले ॥ १ ॥ तुह्मी जवळी पहागा जवळी पहागा ॥ होईल चांगा तो हात घालूं ॥ धृ० ॥ ऐऱ्हा पैऱ्हा कांहीं डालवाया ॥ जवळीचा जवळी लागतो पाया ॥ २ ॥ कौलाची पेठ नाहीं हिरणी ॥ घालणी कोणी घालीना ॥ ३ ॥ लांब रुंद सलंब मेजे ॥ माझें तुझें ह्मणो नका ॥ ४ ॥ अवघे पेठ एकचि मोलें ॥ बारा सोळा आयुष्य गेलें ॥ ५ ॥ दुजेपणें दलाल ठकील तुह्मां ॥ मुद्दलचि आह्मां द्यावें स्वामी ॥ ६ ॥ विलंबु करितां उडगेल हटू ॥ शेखी आटु जीवितासी ॥ ७ ॥ वासनेसहित विकरा झाला ॥ तुटी लाभूं नाहीं मुद्दली मुद्दला ॥ ८ ॥ एकाजनार्दनीं सरिसी साटी ॥ घेणें देणें नाहीं फुकटा फुकटी ॥ ९ ॥

॥ ११५७ ॥ बुद्धिबळाचा दोही भारी ॥ नामरूपातें नेणति सारी ॥ गाति गमन त्या नाहीं निर्धारी ॥ जग चाळोनि जगा बाहेरी ॥ धृ० ॥ राजा प्रधान पशु प्यादा उठी ॥ त्यासी पूर्व कर्म नाहीं गांठी ॥ हें खेळवी त्याची कामाठी ॥ मिथ्या मिमांसक कर्म गोठी ॥ १ ॥ चौसष्टी पगाचीं बंडें ॥ खेळवितां रचि वाडें कोडें ॥ तेथें नेमस्तु स्थिति मागें पुढें ॥ तें ज्ञान नेणती तें तंव जडे ॥ २ ॥ सोकटिया नाहीं आपपर ॥ खेळवितां रची दोन्ही भार ॥ गतिगमन त्याचा निर्धार ॥ चाळितां चाळी साचार ॥ ३ ॥ अचेतना नाहीं जीव भावो ॥ त्यासी मारिलें मारिलें ह्मणती पहा हो ॥ ४ ॥ हा खेळ त्याचा निर्वाहो ॥ जिणें मरणें दोन्ही वावो ॥ ५ ॥ सारी निमाल्या पाटीं कोण धर्मात्मा चढे वैकुंठीं ॥ कोण पडे नरक संकटीं ॥ मिथ्या संसार तो ज्ञान-दृष्टी ॥ ६ ॥ हारी जैंत नेणती सारी मिथ्या बंध मोक्ष संसारी ॥ एकाजनार्दन यापरी देही वर्तता देहा बाहेरी ॥ ७ ॥

॥ ११५८ ॥ कोहं कोहं कोहं कोहं कोहं पाहता ॥ हा थिता दुरी दुरावे ॥ निबिड वासना बंधू ॥ तुज कैसेनि पावे ॥ १ ॥ जंववरी स्थिरू हंसू ॥ तंव पाहो तुझी वास्तु ॥ वासना जाहल्या भंगू ॥ सहजी समरस ॥ धृ० ॥ सोहं सोहं सोहं सोहं सोहं ॥ भोंवितां तुजचि सारिखा झाला ॥ अवशेष अहंकारे मी आत्मा ऐसा केला ॥ २ ॥ स्थिरू स्थिरू स्थिरू स्थिरू स्थिरू राही ॥ कोहं कोहं सांडुनी पाही ॥ एकाजनार्दनीं एकपण तेंही नाहीं ॥ ३ ॥

॥ ११५९ ॥ महाभूत भौतिक कांहींरे ॥ तें तंव येथें नाहींरे ॥ १ ॥ येथें स्थिरू राहीरे ॥ माझिया बापा राहीरे ॥ धृ० ॥ माया दृष्टि लाविल कहिंरे ॥ वोवाळिन देही देहींरे ॥ २ ॥ एकाजनार्दनाच्या पायींरे ॥ देह विदेह नाहींरे ॥ ३ ॥

॥ ११६० ॥ कृष्णारूपीं क्षोभे माया ॥ धरी बांधो कान्हा ॥ १ ॥ अविमाया क्षोभू धरी ॥ येहले कान्हा वोहले कान्हा ॥ धरी बांधो हरी ॥ धृ० ॥ देह संगीं जेवी छाया ॥ कृष्णापुढें धांवे माया ॥ २ ॥ एकाजनार्दनीं काया ॥ मिथ्या रूपें वळी माया ॥ ३ ॥

॥ ११६१ ॥ अधऊर्ध्व सम साधिलों ॥ सुख मना पश्चिमे वाट ॥ षट्पुरी सहज मोकळी ॥ ऊर्ध्व दंडिलों ॥ मार्गू चिन्हें नीट ॥ सप्तधातु महा कर्दमू ॥ स्वयें सोस्वला ॥ पंथू पवनें सपाट ॥ महा तेज विजूं तळपत ॥

उपरोपरी चाले कडकडाट ॥ १ ॥ योग पंथें झाली जोगिणी ॥ अनुहतलो वाजे टाळी ॥ धृ० ॥ मेरु गिरि तळी तळवटी ॥ सप्त रंचिलों अवघड वाट ॥ अबोधें पवन बांधला ॥ विना लंब हो चित राहे घनदाट ॥ निगम नेति वृत्ति नहि सरे ॥ गुरुवचनें अगम्यागमन नेटे ॥ दसवोद्वारीं कडि विकडी ॥ प्रवेशलीं भली उलटी गोल्हाटीं ॥ २ ॥ सहस्रदळीं दळामाजी स्वानंदें ॥ निस वरुषे मेघू ॥ परमामृते मृत निस्रत निज आवडी ॥ भले चाल्यो बोध शरीर ॥ धातु सम सचली ॥ सगुळी हो भरिया अमोघ ॥ ऊर्ध्वमुखें मधु पिवती ॥ महा योगिणी ॥ विगत भवरोग ॥ ३ ॥ नाद बिंदु कळा ज्योती ॥ सम समरसें ॥ बैठी हो पिये ॥ काळ वेळ जन्म निधन ॥ सत्कर्मलों फुटाणे खायी ॥ जराजर्जर कर्मटी ॥ ऊठ न्हाटो हो ॥ देहभया विदेही ॥ एका-जनार्दन योगें ॥ योग सिद्धि हो ॥ सहज चैतन्य नाहीं ॥ ४ ॥

॥ ११६२ ॥ पति चैतन्या सरिसी ॥ सति नव्हेचि निज सत्वेसी ॥ पाठी मेल्या प्रेतालागी ॥ मढें धरूनि निघताहे आगी ॥ १ ॥ सति नेणेंचि सद्रूप ॥ मढें धरूनि मरति अमूप ॥ धृ० ॥ जरि देहेचि पति होय ॥ तरी तें शरीर तैसेंचि आहे ॥ गेला गेला ह्मणती काये ॥ ते वस्तूची न धरी सोय ॥ २ ॥ भ्रतार निमाला मध्यरातीं ॥ देहा मढें मिरवी सती ॥ पति गेला हातोहातीं ॥ आगीं रिघे मळ्यामती ॥ ३ ॥ प्रेत धरूनि आगीं रिघती ॥ त्या सत्या प्रेतभूता होती ॥ डांक अंगीं अवतरती ॥ नाना पतीचा मानू मागती ॥ ४ ॥ पति चैतन्य धरुनी हाती ॥ देहो सांडी महासती ॥ एकाजनार्दनाचिये युक्ती ॥ जन्म मरण नाहीं पुढती ॥ ५ ॥

---

## सत्समागम.

॥ ११६३ ॥ ब्रह्म सर्वगत सदा सम ॥ जेथें आनु नाहीं विषम ॥ ऐसें जाणती ते दुर्गम ॥ ते भेटती तैं भाग्य परम ॥ १ ॥ ऐसें कैसियानें भेटती साधू ॥ ज्यांचा अतर्क्य तर्कवेना बोधू ॥ ज्यांसी निजानंदीं आनंदू ॥ ज्यांचा परमानंदीं उद्बोधू ॥ २ ॥ पवना घालवेल पालाण ॥ पाई चाल-वेल गगन ॥ भूत भविष्य कळेल वर्तमान ॥ परि त्या साधूचें न कळे महि-मान ॥ ३ ॥ चंद्रामृत सुखें सेववेल ॥ अस्तु जातां रवि धरवेल ॥ बाह्य सागर हेळा तरवेल ॥ परि त्या साधूची भेटी नव्हेल ॥ ४ ॥ जप तप कर-

वेल अनुष्ठान ॥ ध्येय ध्याता धरवेल निजध्यान ॥ ज्ञेय ज्ञाता विवर्जित ज्ञान ॥ ज्ञान ध्यानाचें फळ साधुजन ॥ ५ ॥ निज वृत्तीचा करवेल निरोधू ॥ जीवा शिवाचा भोगवेल आनंदू ॥ एकाजनार्दनीं निजसाधू ॥ ज्यांच्या स्मरणें चुकती भवबंधू ॥ ६ ॥

॥ ११६४ ॥ जन्म कोट्यांनीं हरिसेवा जोडे ॥ नवविधा भजन सांग घडे ॥ तंव वैराग्य तें पाहे पुढें ॥ पूर्व प्राचीन फळ रोकडें ॥ १ ॥ ऐसें तैंच मिळती ते साधू ॥ ज्यांचा संग करी उद्बोधू ॥ ज्यांचा स्पर्श करी अल्हादू ॥ ज्याचा महिमा न कळे आनंदू ॥ २ ॥ घडे कामकर्म परित्याग ॥ झडे समूळ विषयांचा संग ॥ सर्व कामना नुरे मुसमार्ग ॥ तैं आतुडे मानवा संत संग ॥ ३ ॥ शुद्ध सत्वगुण देहीं पाहे ॥ दंभ अहंकार मानापमान जाय ॥ काम क्रोध लोभ सांडी सोय ॥ तैं भूत भावना हीं होय ॥ ४ ॥ जैं जनार्दनीं शुद्ध भाव ॥ स्वकर्मासी विश्रांति ठाव ॥ ऐक्य दुजें दोन्ही होती वाव ॥ देह बुद्धीच भासे देव ॥ ५ ॥ जैं संत दया होय बापा ॥ तैंचि विश्रांति त्रिविध तापा ॥ तैंच मिळणी होय स्वरूपा ॥ पूर्ण एकाजनार्दनीं कृपा ॥ ६ ॥

॥ ११६५ ॥ ज्ञान ध्यान जप तप तें साधन ॥ ते हे संत निधान सखे माझे ॥ १ ॥ संतापायीं आधीं जावें वो शरण ॥ संसार बोळवण होय तेणें ॥ २ ॥ तयाचें हें मूळ संताचे ते पाय ॥ आणिक उपाय नाहीं नाहीं ॥ ३ ॥ द्वैत अद्वैताचा न सरेचि कोंभ ॥ तो हाचि स्वयंभ संतसंग ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं परब्रह्म नाम ॥ द्वैतक्रिया कर्म तेथें नाहीं ॥ ५ ॥

॥ ११६६ ॥ ज्ञान होय आधीं संता शरण जातां ॥ मग वोळखितां कळे रूप ॥ १ ॥ नामाचें जें मूळ रूपाचें रूपस ॥ पंढरी निवास हृदयीं धरी ॥ २ ॥ प्रपंचीं परमार्थीं तारक हें नाम ॥ ब्रह्मानंद प्रेम सर्व वसे ॥ ३ ॥ सच्चिदानंद खूण एकाजनार्दन ॥ स्वयंब्रह्म जाण नाम असे ॥ ४ ॥

॥ ११६७ ॥ देवाचे ते आप्त जाणावे ते संत ॥ त्यांचे चरणीं रत व्हावें सदा ॥ १ ॥ श्रीहरीची भेटी सहजची होय ॥ श्रमलिया जाय क्षण मात्रें ॥ २ ॥ पापाचे पर्वत भस्म नामाग्नींत ॥ अभक्ता न कळे हित नाम न घेती ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं संतांचिया कृपें ॥ नाम होय सोपें कृपें त्यांच्या ॥ ४ ॥

॥ ११६८ ॥ संत दयाळ दयाळ ॥ अंतरीं होताती प्रेमळ ॥ १ ॥ शरण आलियासी पाठीं ॥ पाहताती कृपादृष्टी ॥ २ ॥ देऊनिया रसायणा ॥ तारिताती भवार्णव जाणा ॥ ३ ॥ संतासीं शरण जावें ॥ एकाजर्दनीं त्यासी गावें ॥ ४ ॥

॥ ११६९ ॥ आशापाश सोडोनी देई ॥ संतासी तूं शरण जाई ॥ चौऱ्यांशीचें भय नाहीं ॥ प्राणिया तुज ॥ १ ॥ आवडी धरी संतसंग ॥ कामक्रोधा होय भंग ॥ षड्वैरीया मार्ग ॥ मोकळाची असे ॥ २ ॥ संतसंग धरितां चित्तीं ॥ उपाधि ते सर्व तुटती ॥ भावें होय मोक्षप्राप्ती ॥ क्षणमात्रें ॥ ३ ॥ नाहीं आणिक साधन ॥ संतसंगतीवांचुन ॥ शरण एकाजनार्दन ॥ संतसंग धरी ॥ ४ ॥

॥ ११७० ॥ पळभरी संतसंगती ॥ कोटि युगें तया विश्रांती ॥ ऐसें बोलतसे श्रुती ॥ पाहे पां जना ॥ १ ॥ वेदशास्त्र पुराण ॥ महिमा संताचाचि जाण ॥ शुकादिक रंगुन ॥ रंगले रंगीं ॥ २ ॥ अर्जुना उपदेशिलें ॥ उद्धवातें बोधिलें ॥ व्यासादिक रंगले ॥ हृदयीं सदा ॥ ३ ॥ तें दृढ हृदयीं धरी ॥ आणिक नको पडूं फेरी ॥ एकाजनार्दना धरी ॥ हृदयामाजीं ॥ ४ ॥

॥ ११७१ ॥ संगती बा वनाचे रातले सर्वभावें ॥ चंदन होउनी सवें ठेलों मी वो ॥ १ ॥ वेधिला जीव माझा संत चरणीं ॥ आन दुजें मना नाठवेंचि स्वप्नीं ॥ २ ॥ जाग्रती स्वप्न सुषुप्तीचा ठाव ॥ अवघा देखे देवाधिदेव ॥ ३ ॥ पहातां पहातां मन नाहींसें झालें ॥ एकाजनार्दनीं केलें मज ऐसें ॥ ४ ॥

॥ ११७२ ॥ ऐसी प्राप्ति कैं लाहीन ॥ संतसंगतीं राहीन ॥ साचे संगतीं मी ध्याईन ॥ नाम गाईन अहर्निशीं ॥ १ ॥ भावें धरलिया संतसंग॥ सकळ संगां होय भंग ॥ नाभ्यासियां आकळे योग ॥ पळे भवरोग आपभयें ॥ २ ॥ सेविलिया संतचरणतीर्थां ॥ तीर्थें पायवणी वोढविती माथां ॥ सुरनर असुर वंदिती तत्वतां ॥ ब्रह्म सायुज्यता घर रिघे ॥ ३ ॥ संतचरण रज मस्तकीं पडे ॥ देह संदेह समूळ उडे ॥ उघडलीं मुक्तीचीं कवाडें ॥ कोंदाटे पुढें परब्रह्म ॥ ४ ॥ दृढ धरलिया सत्संगती ॥ अलभ्य लाभ आतुडे हातीं ॥ चारी पुरुषार्थ चारी मुक्ती ॥ पाया लागती निजदास्य

॥ ५ ॥ जैं कृपा करिती संतजन ॥ जन विजन होय जनार्दन ॥ एका-जनार्दनीं शरण ॥ ब्रह्म परिपूर्ण तो लाहे ॥ ६ ॥

॥ ११७३ ॥ संत जाती हरिकीर्तना ॥ त्यांच्या वाहीन मोजे वाहाणा ॥ १ ॥ हेंचि भवसिंधूचें तारूं ॥ तेणें उतरूं पैलपारू ॥ २ ॥ जन्मोजन्मींचें भेषज ॥ ते हे संत चरण रज ॥ ३ ॥ संत चरणींच्या पादुका ॥ जाहला जनार्दन एका ॥ ४ ॥

॥ ११७४ ॥ धन्य आज दिन संतदरुशनाचा ॥ अनंत जन्मांचा शिण गेला ॥ १ ॥ मज वाटे त्यासी आलिंगन द्यावें ॥ कदा न सोडावे चरण त्याचे ॥ २ ॥ त्रिविध तापांची जाहली बोळवण ॥ देखिल्या चरण वैष्णवाचे ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं घडो त्याचा संग ॥ न व्हावा वियोग माझ्या चित्ता ॥ ४ ॥

॥ ११७५ ॥ अनुपम्य सुख संताचिया पायीं ॥ राहीन तये ठायीं अखंडित ॥ १ ॥ अखंडित गोडी सेवीन आवडी ॥ ब्रह्मादिकां जोडी ऐशी नाहीं ॥ २ ॥ सर्व पर्वकाळ आले तया ठायां ॥ विश्रांति घ्यावया इच्छिताती ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं सुखाचें माहेर ॥ भवसिंधु पार तारक हें ॥ ४ ॥

॥ ११७६ ॥ संतचरणीं सेवा घडे ॥ भाग्य पाहा हो केव्हडें ॥ १ ॥ व्यर्थ शिणती बापुडे ॥ योग याग करुनी गाढे ॥ २ ॥ संतचरणीं जे विन्मुख ॥ स्वप्नीं न देखती सुख ॥ ३ ॥ संतचरणीं नाहीं थारा ॥ भरले तपांच्या डोंगरा ॥ ४ ॥ नाम न ह्मणती कोडें ॥ धूम्रपान करती तोंडें ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं साचें ॥ मन नाहीं तंव सुख कैंचे ॥ ६ ॥

॥ ११७७ ॥ पाजी प्रेम पान्हा लाऊनियां सोई ॥ पुन्हां तो नगोवी येरझारीं ॥ १ ॥ येरझार द्वारीं घातलासे चिरा ॥ ठेविलेंसे स्थिरा चरणाजवळी ॥ २ ॥ एकाजनार्दनीं केलोंसे मोकळा ॥ संतपायीं लळा लाऊनियां ॥ ३ ॥

॥ ११७८ ॥ छळणें करुनी बोलतां ॥ तात्काळ जाली समाधि अवस्था ॥ सद्भावें विटतां संतां ॥ न कळे तत्वतां काय देती ॥ १ ॥ जाणा जाणते सकळ ॥ ज्यांसी निज प्राप्तीची कळवळ ॥ तिहीं सांडोनी स्थळ ॥ संतजन वंदावे ॥ २ ॥ एकाजनार्दनाचें तान्हें ॥ भुकाळ परि मागूं नेणें ॥ कुर्वाळुनीयां स्तनें ॥ जनार्दनें लाविलें ॥ ३ ॥

॥ ११७९ ॥ नरदेहींचा हाचि मुख्यार्थ ॥ संतसंग करी परमार्थ ॥ १ ॥ आणिक नाहीं यां साधन ॥ मुखीं हरि हरि स्मरण ॥ २ ॥ सोडी द्रव्य दारा आशा ॥ संत संगें दशा पाववी ॥ ३ ॥ जरी पोखलें शरीर ॥ तरी तें केव्हांही जाणार ॥ ४ ॥ जनार्दनाचा एका ह्मणे ॥ संतापायीं ठाव देणें ॥ ५ ॥

॥ ११८० ॥ पाया शोधोनियां बांधिताती घर ॥ ऐसें दुस्तर या नरदेहीं ॥ ॥ १ ॥ ह्मणती पुत्र माझे नातू हें कलत्र ॥ मिळती सर्व गोत्र तयेठायीं ॥ २॥ संपत्ति देखोनी गिवसिती तयासी ॥ माझें माझें ह्मणती रांडापोरें ॥ ३ ॥ चाले बरवा धंदा ॥ बहिणी ह्मणती माझा दादा ॥ आलीया दरिद्रबाधा पळुनी जाती ॥ ४ ॥ जनार्दनाचा एका करितसे विनंती ॥ संतसंग चित्तीं जिवीं धरा ॥ ५ ॥

॥ ११८१ ॥ संपत्ति देखोनी ह्मणती माझें माझें ॥ वागवितो ओझें खरा ऐसा ॥ १ ॥ क्षणिक आयुष्य क्षणिक संपत्ती ॥ नकळे तयाप्रति अंध जैसा ॥ २ ॥ जाणार जाणार सर्व हें जाणार ॥ हरिनाम सार जपे सदा ॥ ३ ॥ जनार्दनाचा एका सांगतसे मातू ॥ धरीरे सांगातू वैष्णवांचा ॥ ४ ॥

॥ ११८२ ॥ मती लागो संतचरणीं ॥ तेणें उन्मनी साधती ॥ १ ॥ तुच्छ वाटे स्वर्गलोक ॥ जैसा रंक इंद्रासी ॥ २ ॥ अंधार तो जैसा पळे ॥ किरण उजाळे देखतां ॥ ३ ॥ एकाजनार्दना शरण ॥ मनचि जालें कृष्णार्पण ॥ ४ ॥

॥ ११८३ ॥ येउनी नरदेहीं वायां जाय ॥ नेणें संतसंग कांहीं उपाय ॥ १ ॥ कली वाढलासे अधम ॥ ब्राह्मण सांडिती आपुलें कर्म ॥ २ ॥ शुद्धयाती असोनी चित्त ॥ सदा नीचाश्रय करित ॥ ३ ॥ देवपूजा नेणें कर्म ॥ न घडे स्नानसंध्या धर्म ॥ ४ ॥ ऐसा कलीचा महिमा ॥ कोणी करी कर्माकर्मा ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं शरण ॥ घडो संतसेवा जाण ॥ ६ ॥

॥ ११८४ ॥ ज्यांसी नाहीं संतसंग ॥ ते अभंग दुःख भोगिती ॥ १ ॥ तैसा नको विचार देवा ॥ देई सेवा संतसंग ॥ २ ॥ अखंड नाम वाचें कीर्ती ॥ संत संग विश्रांति मज देई ॥ ३ ॥ मागणें हेंचि तें द्यावें ॥ आणिक मागणें जीवीं नाहीं ॥ ४ ॥ ह्मणे जनार्दनाचा एका ॥ सुलभ सोपा उपाय ॥ ५ ॥

॥ ११८५ ॥ अर्धक्षण घडतां संताची संगती ॥ तेणें होय शांति महत्पापा ॥ १ ॥ संत संग देई संत संग देई ॥ आणिक प्रवाहीं घालूं नको ॥ २ ॥ संसार मज न करणें सर्वथा ॥ परमार्थ पुरता हातीं देई ॥ ३ ॥ जनार्दनाचा एका करुणा वचनीं ॥ करी विनवणी पायापाशीं ॥ ४ ॥

॥ ११८६ ॥ जेथें मुख्यत्वें करावी भक्ती ॥ तेथें घडावी संताची संगती ॥ हेंचि मागणें तुह्माप्रती ॥ द्यावें निश्चितीं मज देवा ॥ १ ॥ पुरवा पुरवा माझा हेत ॥ दुजें मागणें नाहीं निश्चित ॥ धृ० ॥ आयुष्य अंतवरी नामस्मरण ॥ गीता भागवताचें श्रवण ॥ विष्णु शिवमूर्तीचें ध्यान ॥ हेंचि देणें सर्वथा ॥ २ ॥ ऐकोनी ऐसें वचन ॥ जनार्दन तुष्टला प्रेमें करुन ॥ एकाजनार्दनीं पाय धरुन ॥ सप्रेमें आलिंगिला ॥ ३ ॥

॥ ११८७ ॥ देह हा काळाचा जाणार शेवटीं ॥ याची धरुनी मिठी गोडी काय ॥ १ ॥ जाणार जाणार हें जाणार विश्व ॥ वाउगाचि सोस करसी काय ॥ २ ॥ प्रपंच काबाड एरंडाचे परी ॥ रस स्वाद तरी कांहीं नाहीं ॥ ३ ॥ नाशिवंतासाठीं रडतोसी वाया ॥ जनार्दनीं शरण रिघे तूं पाया ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं भेटी होतां संतांची ॥ मग जन्ममरणाची चिंता नाहीं ॥ ५ ॥

---

# पुंडलिकाच्या भक्तीचें माहात्म्य.

॥ ११८८ ॥ ॐकारसह मकार आदि अंत नाहीं जया ॥ तें पुंडलिकें भुलवोनी आणिलें या ठायां ॥ १ ॥ भुललें वो माय पुंडलिका प्रीतीं ॥ उभाची राहो परि खेद न करी चित्तीं ॥ २ ॥ अठरा पुराणांसी वाड शास्त्रें वेवादती ॥ तो सांवळा श्रीकृष्ण उभा विटे पुंडलिकाचे भक्ती ॥ ३ ॥ वेद वेदांतरें मत मतांतरें न कळे श्रुति पैं वेवादती ॥ तो एकाजनार्दनाचे हृदयीं सांवळा घेउनी बुंथी ॥ ४ ॥

॥ ११८९ ॥ सांवळें कोंवळें ढवळें ना पिवळें ॥ रंगे रंगा वेगळें पंढरी गे माय ॥ १ ॥ चांदणें जैसें शोभतें नभीं ॥ तैसा कट धरुनी नभीं चंद्र गे माय ॥ २ ॥ विटेवरी नीट जघनीं कर ॥ उभा देखे परात्पर गे माय ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं पाहतां तयासी ॥ मन चकोर तृप्त जालें गे माय ॥ ४ ॥

॥ ११९० ॥ परात्पर परिपूर्ण सच्चिदानंदघन ॥ सर्वां अधिष्ठान दैवताच गे माय ॥ १ ॥ तें लाधलें लाधलें पुंडलिकाचे प्रीती ॥ येत पंढरीप्रति अनायासें गे माय ॥ २ ॥ जगडंबर पसारा लपवोनी सारा गे माये ॥ धरियेला थारा पुंडलिकाचेनी प्रेमें गे माय ॥ ३ ॥ ओहं मान कळे कांहीं सोहं देती ग्वाही गे माय ॥ कोहमाची तुटली बुंथी ॥ एकाजनार्दनीं प्रीति गे माय ॥ ४ ॥

॥ ११९१ ॥ त्वंपद तत्पद असिपद या वेगळा दिसे ॥ खोळ बुंथी घेउनी विटेवरी उभा असे गे माय ॥ १ ॥ वेडावला पुंडलिकें उभा केला ॥ तेथोनी कोठें न जाय गे माय ॥ २ ॥ भक्ता अभयकर देतुसे अवलीला ॥ मेळवोनी मेळा वैष्णवांचा गे माय ॥ ३ ॥ पुंडलिकें मोहिला उभा उगाचि केला ॥ एकाजनार्दनीं ठसावला रूपेंविण गे माय ॥ ४ ॥

॥ ११९२ ॥ स्थूळ ना सूक्ष्म कारण ना महाकारण ॥ या परता वेगळाचि जाण आहे गे माय ॥ १ ॥ पुंडलिकाचे प्रेमें मौनस्थ उभा ॥ कोणा न बोले उगला उभा ठेला गे माय ॥ २ ॥ निंद्य वंद्य जगीं यावें भेटीलागीं ॥ दरुशनें उद्धार वेगीं तया गे माय ॥ ३ ॥ ऐसा लाघवी खेळ खेळोनी निराळा ॥ एकाजनार्दनीं डोळा देखिला गे माय ॥ ४ ॥

॥ ११९३ ॥ अभक्त सभक्त दोघांसी सारखा दिसे ॥ लवणीं जैसें न दिसे दुजेपण गे माय ॥ १ ॥ ऐसा परात्पर सोइरा पुंडलिकाचे पाठीं ॥ मौन्य वाक्पुटीं धरुनी गे माय ॥ २ ॥ पुण्यपाप सर्व देखतसे दृष्टी ॥ चालवी सर्व सृष्टि गे माय ॥ ३ ॥ ऐसा वेषधारी उभा भीवरे तीरीं ॥ एकाजनार्दनीं अंतरीं दृढ ठसावे माय ॥ ४ ॥

॥ ११९४ ॥ गाई गोपांसमवेत गोकुळीहुनी आला ॥ पाहुनी भक्ति भुलला वैष्णवाला ॥ १ ॥ मुगुटमणी धन्य पुंडलिका निका ॥ तयालागीं देखा उभा गे माय ॥ २ ॥ युगें अठ्ठावीस जालीं परि न बैसे खालीं ॥ मर्यादा धरली प्रेमाची गे माय ॥ ३ ॥ ऐसा व्यापक जगाचा जीवन ॥ एकाजनार्दनीं शरण गे माय ॥ ४ ॥

॥ ११९५ ॥ त्रिपुटी विरहित कर कटीं उभा ॥ त्रैलोक्याची शोभा शोभे गे माय ॥ १ ॥ परे परता वैखरीये आरुता ॥ पश्यंती निर्धारितां न कळे गे माय ॥ २ ॥ मध्यमा मध्यमीं उभा तो स्वयंभ ॥ अद्वयानंद कोंभ

कर्दळीचा गे माय ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं आहे तैसा भला ॥ हृदयीं सामावला माझ्या गे माय ॥ ४ ॥

॥ ११९६ ॥ सहा चार अठरा बारा जें वर्णिती ॥ चौदांची तों गति कुंठित गे माय ॥ १ ॥ पांचांसी न कळे सात पैं भांडती ॥ आठांची तो गति कुंठित जाली गे माय ॥ २ ॥ नवम मौनावले दशम स्थिरावले ॥ एकादशें धरिलें हृदयीं गे माय ॥ ३ ॥ द्वादशा पोटीं त्रयोदशा होटीं ॥ एकाजनार्दनाचे दृष्टि उभा गे माय ॥ ४ ॥

॥ ११९७ ॥ पंधरा भागले सोळांसी न कळे ॥ सतरा वेडावले न कळे माय ॥ १ ॥ एकुणविस भले विसांते पुसती ॥ तयांसी तों गति न कळे गे माय ॥ २ ॥ एकविस वेगळे विसीं मुराले ॥ तयांचें तयां न कळे माय ॥ ३ ॥ तेविस चोविस वर्ते जगाकारीं ॥ एकाजनार्दनीं पंचविसावा हृदयीं गे माय ॥ ४ ॥

॥ ११९८ ॥ पंचविसावा श्रीविठ्ठलू ॥ चोविसां वेगळा तयाचा खेळू गे माय ॥ १ ॥ तो पुंडलिकाकारणें येथवरी आला ॥ उभा उगा ठेला विटेवरी गे माय ॥ २ ॥ जनीं जनार्दन करावया उद्धारण ॥ एकाजनार्दनीं समचरण साजिरे गे माय ॥ ३ ॥

---

## सत्समागम.

॥ ११९९ ॥ आशा मनीषा तृष्णा बांधिती दावणी ॥ सोडवी चक्रपाणी संत संगें ॥ १ ॥ काम क्रोध लोभ याचा हा पसार ॥ पाडिती विसर तुझा देवा ॥ २ ॥ मोह ममता भ्रांति ढकलिती कूपीं ॥ दावी पैं सोपी वाट आह्मां ॥ ३ ॥ जनार्दनाचा एका विनवी सर्वांतें ॥ भजा एकचित्तें विठोबासी ॥ ४ ॥

॥ १२०० ॥ हरि प्राप्तीसी उपाय ॥ धरावे संताचे ते पाय ॥ १ ॥ तेणें साधती साधनें ॥ तुटतीं भवाचीं बंधनें ॥ २ ॥ संताविण प्राप्ति नाहीं ॥ ऐसी वेद देती ग्वाही ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं संत ॥ पूर्ण करिती मनोरथ ॥ ४ ॥

॥ १२०१ ॥ पुंडलिक संत भला ॥ तेणें उद्धार जगाचा केला ॥ १ ॥ तयाचे वंदावे चरण ॥ काया वाचा मनें करुन ॥ २ ॥ उपाधि संग तुटती व्याधी ॥ एकाजनार्दनीं समाधी ॥ ३ ॥

॥ १२०२ ॥ सहस्र मुखांचा वर्णितां भागला ॥ तें सुख तुजला प्राप्त कैचें ॥ १ ॥ संतांचे संगती सुख तें अपार ॥ नाहीं पारावार सुखाभंग ॥ २ ॥ एकाजनार्दनीं सुखाचीच राशी ॥ उभा हृषीकेशी विटेवरी ॥ ३ ॥

॥ १२०३ ॥ वेदोक्त पठण करितां चढे मान ॥ तेणें होय पतन कर्मभूमीं ॥ १ ॥ सोपें तें साधन संतासीं शरण ॥ तेणें चुके बंधन जड जीवां ॥ २ ॥ अभ्यासाचा सोस वाउगाची द्वेष ॥ न करी सायास नाम जपे ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं सायासाचे भरी ॥ नको पडूं फेरी चौऱ्यायशीच्या ॥ ४ ॥

॥ १२०४ ॥ आयुष्य भविष्य हें तंव कवणा हातीं ॥ वायाची वाहाती कुंथाकुंथी ॥ १ ॥ आयुष्याचा अंत आलिया जवळी ॥ कोण तयावेळीं सांभाळीत ॥ २ ॥ गुंतुनी संसारीं पडती आघोरीं ॥ न चुकेची फेरी येतां जातां ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं संतकृपेविण ॥ कोण वारी शीण जन्ममृत्यू ॥ ४ ॥

॥ १२०५ ॥ करूं करूं ह्मणतां गेले वायाविण ॥ संसार तो शीण केला वेगीं ॥ १ ॥ अधमा न कळे अधमा न कळे ॥ झांकोनियां डोळे घाणा नेती ॥ २ ॥ यमदूत नेती तयांसी तातडीं ॥ मारिती वरी कोडी यमदंडें ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं चुकवी या यातना ॥ संताच्या चरणा शरण रिघे ॥ ४ ॥

॥ १२०६ ॥ देहाची ममता न धरी साचार ॥ करी कांरे विचार पैल थडी ॥ १ ॥ भरिला भरिला सागर भरिला ॥ उतरी कांरे वहिला संतसंगें ॥ २ ॥ नामाची सांगडी बांधित निर्धारें ॥ तेणें पैलपार तरसी देखा ॥ ३ ॥ सांगड नामाची धरी प्रेम भावें ॥ संतां शरण जावें एकविधा ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं शरण गेलिया ॥ कळिकाळ पाया वंदी यम ॥ ५ ॥

॥ १२०७ ॥ पायावरी ठेवितां भाळ ॥ कर्म सकळ सुफळ ॥ १ ॥ ऐसा छंद जया मनीं ॥ धन्य जननी तयाची ॥ २ ॥ लोटांगण संतापुढा ॥ घाली उघडा होउनी ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं भेटी ॥ जन्ममरणा होय तुटी ॥ ४ ॥

॥ १२०८ ॥ तापलिया तापत्रयें संता शरण जावें ॥ जीवें भावें धरावें

चरण त्याचे ॥ १ ॥ करूनि विनवणी वंदूं पायवणी ॥ घालूं लोटांगणीं मस्तक हें ॥ २ ॥ उपासना मार्ग सांगती ते खूण ॥ देती मंत्र निर्वाण विठ्ठल हरी ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं संतासी शरण ॥ रात्र आणि दिन चिंतूं त्यासी ॥ ४ ॥

॥ १२०९ ॥ मस्तक माझें संतपायीं ॥ ठेवुनी होऊं उतरायी ॥ १ ॥ वारंवार क्षणक्षणा ॥ नामघोष करिती जाणा ॥ २ ॥ देउनी अभयदान॥ करिती पतित पावन ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं पाही ॥ संतपायीं ठेवी डोई ॥ ४ ॥

॥ १२१० ॥ आजि दिवस धन्य झाला ॥ संत समागम पावला ॥ १ ॥ बरवा फळला शकुन ॥ अवघा निवारला शीण ॥ २ ॥ सुस्नात झालों ॥ संतसागरीं नाहालों ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं भावें ॥ संतचरणीं लीन व्हावें ॥ ४ ॥

॥ १२११ ॥ सोनियाचा दिवस आजी झाला ॥ संत समागम पावला ॥ १ ॥ तेणें फिटलें अवघें कोडें ॥ झालें परब्रह्म उघडें ॥ २ ॥ एकाजनार्दनीं सेवा ॥ करीन मी त्यांची भावा ॥ ३ ॥

॥ १२१२ ॥ आजी उत्तम सुदिन ॥ झालें दर्शन संतांचें ॥ १ ॥ पाप ताप दैन्य गेलें ॥ संत पाउलें पहातां ॥ २ ॥ अवघा यत्न फळा आला ॥ अवघा झाला आनंद ॥ ३ ॥ अवघें कर्म सुकर्म झालें ॥ अवघे भेटले संतजन ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं बरा ॥ संत समागम खरा ॥ ५ ॥

॥ १२१३ ॥ घटिका पळ नवचे वांया ॥ संत पाया सांडोनी ॥ १ ॥ मनोरथ पुरले मनींचे ॥ झालें देहाचें सार्थक ॥ २ ॥ जन्मा आलियाचें काज ॥ संतसंग घडला निज ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं मिठी ॥ संतसंग जडला पोटीं ॥ ४ ॥

॥ १२१४ ॥ संतसंगतीनें झालें माझें काज ॥ अंतरीं तें निज प्रगटलें ॥ १ ॥ बरवा झाला समागम ॥ अवघा निवारला श्रम ॥ २ ॥ दैन्य दरिद्र दूर गेलें ॥ संत पाउलें देखतां ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं सेवा ॥ करीन मी आपुल्या भावा ॥ ४ ॥

॥ १२१५ ॥ जाणते संत जाणते संत ॥ जाणते संत अंतरींचे ॥ १ ॥

जे जें इच्छा देती फळ ॥ काळ वेळ चुकवोनी ॥ २ ॥ मनोरथ पुरले वो माझें ॥ एकाजनार्दनीं वोझें ॥ ३ ॥

॥ १२१६ ॥ अपार महिमा संतांचा ॥ काय बोलूं मी वाचा ॥ १ ॥ मागें तरले पुढें तरती ॥ जड जीवा उद्धरती ॥ २ ॥ नाममात्रा रसायन ॥ देउनी तारिती संतजन ॥ ३ ॥ ऐसा संता शरण जाऊं ॥ एकाजनार्दनीं ध्याऊं ॥ ४ ॥

॥ १२१७ ॥ उघड बोलती संत ॥ जैसा हेत पुरविती ॥ १ ॥ मनींचें जाणती ते सदां ॥ होऊं नेदी विषय बाधा ॥ २ ॥ अज्ञान सज्ञान ॥ तारिती कृपें करुन ॥ ३ ॥ संतापायीं ज्याचा भाव ॥ तेथें प्रगटेची देव ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं बरा ॥ द्यावा मज तेथें थारा ॥ ५ ॥

॥ १२१८ ॥ आलिंगन संतपाया ॥ पावली काया विश्रांती ॥ १ ॥ सुखें सुख अपार झालें ॥ संत पाउलें देखतां ॥ २ ॥ अवघा श्रम फळा आला ॥ काळ गेला देशधडी ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं संत ॥ मज ते भेटोत अखंडित ॥ ४ ॥

॥ १२१९ ॥ अखंडित संतसंग ॥ तेथें काय सुखा उणें मग ॥ १ ॥ माझे आलें अनुभवा ॥ संतसेवा घडावी ॥ २ ॥ हेंचि मागे आणिक नाहीं ॥ संतसंग देई सर्व काळ ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं मन ॥ संतपायीं मी ठेवीन ॥ ४ ॥

॥ १२२० ॥ संतमहिमा वदतां वाचे ॥ नोहे साचा उपरम ॥ १ ॥ वेद शास्त्रें देती ग्वाही ॥ संतमहिमा न कळे कांहीं ॥ २ ॥ पुराणासी वाड ॥ श्रुति ह्मणती न कळे कोड ॥ ३ ॥ योग याग वोवाळणी ॥ शरण एकाजनार्दनीं ॥ ४ ॥

॥ १२२१ ॥ संतनाम गाय संतनाम गाय ॥ संतनाम गाय कामधेनू ॥ १ ॥ सदा सर्वकाळ दुभे भक्तालागीं ॥ उणें पडतां अंगीं धांव घाली ॥ २ ॥ नाम सुख स्तना लागला पान्हावे ॥ अभक्ता न साहे धांवे पाठीं ॥ ३ ॥ जनीं जनार्दन दुहिला आवडी ॥ उभविली गुढी एकनाथें ॥ ४ ॥

॥ १२२२ ॥ भांबावला देव संतामागें धांवे ॥ उघडाचि प्रभवे पंढ॰

रीये ॥ १ ॥ युगें अठ्ठाविस पुंडलिकासाठीं ॥ उभा जगजेठी विटेवरी ॥ २ ॥ यावें तया द्यावें क्षेमालिंगन ॥ पुसावा तो शीणभाग त्यासी ॥ ३ ॥ कुरवाळुनी करें धरी हनुवटी ॥ ह्मणे मजसी भेटी तुमची झाली ॥ ४ ॥ लाघव तयासी दावी आपुलें बळें ॥ पुरवावे ळळे सर्व त्याचे ॥ ५ ॥ जैशी ज्याची भावना आपण पुरवी ॥ एकाजनार्दनीं गोवी आपणाकडे ॥ ६ ॥

॥ १२२३ ॥ जयाचें चित्त संताच्या चरणा ॥ तेणें नारायणा जिंकियेलें ॥ १ ॥ भावें देव मिळे भावें देव मिळे ॥ संत चरणीं लोळे सर्व काळ ॥ २ ॥ संताची आवडी ह्मणोनी अवतार धरी ॥ योग क्षेम भारी चालवी त्याचा ॥ ३ ॥ संतचरणीं सेवा आदर उपचार ॥ एकाजनार्दनीं साचार करीतसे ॥ ४ ॥

॥ १२२४ ॥ संत आमुचे देव संत आमुचे भाव ॥ आमुचें गौरव संत सर्व ॥ १ ॥ वेदशास्त्र पुराण मंत्रादि साधन ॥ संत सेवा ध्यान आह्मा धन्य ॥ २ ॥ योग याग व्रत साधन पसर ॥ संताठायीं आदर हेंचि बरें ॥ ३ ॥ जनीं जनार्दन संत सेवा जाण ॥ एकाजनार्दन तोचि धन्य ॥ ४ ॥

॥ १२२५ ॥ संताचिये पायीं मज पैं विश्रांती ॥ नाहीं माया भ्रांति तयेठायीं ॥ १ ॥ सांगतों तें मनीं धरावें वचन ॥ संतासी शरण जावें सुखें ॥ २ ॥ संत तुष्टलिया देवा आनंद होय ॥ मागें मागें धांवे तयापाठीं ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं माहेर सुखाचें ॥ घेतलिया वाचें संतनाम ॥ ४ ॥

॥ १२२६ ॥ जन्मजन्मांतरींचें सुकृत जोडलें ॥ संतचरण पावले तेणें भाग्यें ॥ १ ॥ हा माझा विश्वास संतचरण सेवा ॥ दुजा नाहीं हेवा प्रपंचाचा ॥ २ ॥ मागणें तें नाहीं आणिक तयासी ॥ संत हे सेवेसी झिजवी अंग ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं सेवेसी मन ॥ रात्रंदिवस ध्यान लागो त्याचें ॥ ४ ॥

॥ १२२७ ॥ भाग्याचा उदय झाला ॥ संतसंग मज घडला ॥ १ ॥ तेणें आनंदाचे पूर ॥ लोटताती निरंतर ॥ २ ॥ प्रेम सप्रेम भरतें ॥ अंगीं उतार चढतें ॥ ३ ॥ आली आनंद लहरी ॥ एकाजनार्दनीं निर्धारी ॥ ४ ॥

॥ १२२८ ॥ जनीं जनार्दन मुख्य हाचि भाव ॥ संत तेचि देव वृत्ति ऐसी ॥ १ ॥ समाधि साधन माझे संतजन ॥ विश्रांतीचें स्थान संतपायीं

॥ २ ॥ योग याग धारणा पंचाग्नि साधन ॥ तें हें माझें ध्यान संतापायीं ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं तयाचा सांगात ॥ घडो मज निश्चित सर्वकाळ ॥ ४ ॥

॥ १२२९ ॥ संत भलते याती असो ॥ परि विठ्ठल मनीं वसो ॥ १ ॥ तया घालीन लोळणी ॥ घेईन मी पायवणी ॥ २ ॥ ज्ञाती कळासी संबंध ॥ मज नाहीं भेदाभेद ॥ ३ ॥ भलते ज्ञातीचा ॥ विठ्ठल उच्चारी वाचा ॥ ४ ॥ तेणें पावन देहचारी ॥ एकाजनार्दनीं निर्धारी ॥ ५ ॥

॥ १२३० ॥ असोनी उत्तम न करी भजन ॥ संत सेवा दान धर्म नेणें ॥ १ ॥ काय त्याचें कुळ चांडाळ चांडाळ ॥ मानी तो विटाळ यमधर्म ॥ २ ॥ सदां सर्वकाळ संताची करी निंदा ॥ पापाची आपदा भोगी नर्क ॥ ३ ॥ स्वमुखें आपण सांगे जनार्दन ॥ एकाजनार्दन पूजन करी सुखें ॥ ४ ॥

॥ १२३१ ॥ उद्धवा स्वमुखें सांगे श्रीकृष्ण ॥ संतसेवा जाण सर्व श्रेष्ठ ॥ १ ॥ हाचि योग जाण उद्धवा स्वीकारी ॥ आणिक न करी भरोवरी साधन तें ॥ २ ॥ तयाची संगती उद्धवा धरावी ॥ सेवा ते करावी कायावाचा ॥ ३ ॥ मज तयाचा वेध उद्धवा प्रसिद्ध ॥ तूं सर्वभावें सद्गद नाम घेई ॥ ४ ॥ जयाची आवडी मजसी उद्धवा ॥ जाई तया ठाया प्रेम भरित ॥ ५ ॥ उच्च नीच कांहीं न ह्मणे उद्धवा ॥ एकाजनार्दनीं तया शरण जावें ॥ ६ ॥

॥ १२३२ ॥ उद्धव बोले कृष्णा प्रती ॥ ऐकोनी संताची कीर्ती ॥ धन्य वैष्णव होती ॥ कली माजी ॥ १ ॥ तुह्मा जयाचा निज छंद ॥ मानीतसा परमानंद ॥ अखंड तयाचा वेध ॥ तुमचे मनीं ॥ २ ॥ ऐशियाची संगती ॥ मज घडो अहोरातीं ॥ नये पुनरावृत्ती ॥ पुनः जन्मासी ॥ ३ ॥ हर्षें देव सांगे आपण ॥ उद्धवा तयाचें मज ध्यान ॥ एकाजनार्दना शरण ॥ ते मज आवडती ॥ ४ ॥

॥ १२३३ ॥ मज तयांची आवड ॥ पुरवणें लागे त्यांचें कोड ॥ गर्भवास सांकड ॥ तयालागीं उद्धवा ॥ १ ॥ घेउनी अवतार ॥ करी दुष्टांचा संहार ॥ माझा हा बडीवार ॥ तयांचेनी उद्धवा ॥ २ ॥ माझें जप तप अनुष्ठान ॥ देवपूजा मंत्र पठन ॥ नाना नेमादि साधन ॥ संत माझे उद्धवा

॥ ३ ॥ मज आणिलें नाम रूपा ॥ त्यांची मजवर कृपा ॥ दाविला हो सोपा ॥ मार्ग मज उद्धवा ॥ ४ ॥ माझा योगयाग सर्व ॥ संत माझें वैभव ॥ वैकुंठादि राणीव ॥ तयाचेनी मज उद्धवा ॥ ५ ॥ ऐसे वरिष्ठ पावन ॥ पुनीत केलें मज लागुन ॥ एकाजनार्दनीं शरण ॥ तयांसीच उद्धवा ॥ ६ ॥

॥ १२३४ ॥ ऐसे ह्मणशील कोण ॥ ज्यांचें गाता नामाभिधान ॥ देवाधिदेव आपण ॥ स्वमुखें सांगे उद्धवा ॥ १ ॥ नारद पराशर पुंडरिक ॥ व्यास शुक वाल्मीकादिक ॥ ध्रुव उपमन्यु भीष्मादिक ॥ वंद्य जाण उद्धवा ॥ २ ॥ वसिष्ठवामदेवविश्वामित्र ॥ अत्रिदत्तात्रेय पवित्र ॥ ऐसें पुण्यश्लोक सर्वत्र ॥ ते मज वंद्य उद्धवा ॥ ३ ॥ रघु दिलीप हरिश्चंद्र ॥ शिबीराज बली थोर ॥ जयाचा अंकित मी निर्धार ॥ हें तूं जाणें उद्धवा ॥ ४ ॥ पांडव माझे पंचप्राण ॥ कायावाचा वेंचिलें मन ॥ मज निर्धारितां पूर्ण ॥ जीव वेंचिला उद्धवा ॥ ५ ॥ निवृत्ति ज्ञानेश्वर सोपान ॥ मुक्ताबाई ज्ञानकळा आपण ॥ इहीं अवतार धरून ॥ जग तारिलें उद्धवा ॥ ६ ॥ गोरा सांवता जगमित्र ॥ चोखा रोहिदास कबीर ॥ हे माझे प्राण मित्र ॥ आहेत जाण उद्धवा ॥ ७ ॥ दामानामा जनाबाई ॥ राजाई आणि गोणाई ॥ येशि आणि साकराई ॥ जिवलग माझे उद्धवा ॥ ८ ॥ कान्हुपात्रा जनजसवंत ॥ हनुमंतादि समस्त ॥ पाठक कान्हा आनंदभरित ॥ तयाचेनी उद्धवा ॥ ९ ॥ परिसाभागवत सूरदास ॥ वत्सरा आणि कूर्मदास ॥ एकाजनार्दनीं निजदास ॥ संताचा मी उद्धवा ॥ १० ॥

॥ १२३५ ॥ ऐकरे उद्धवा तुज सांगतों गुज ॥ संतचरणरज वंदी तूं सहज ॥ तेणें कार्य कारण होईल तुज ॥ अंतर दृष्टि करुनी परीस निज ॥ १ ॥ घाली लोटांगण वंदी चरण ॥ काया वाचा मनें धरुनी जीवीं ॥ धृ० ॥ आलिया संतजन आलिंगन देई ॥ पूजा ती बरवी समर्पावी ॥ ज्ञान ध्यान त्याचें करावें जीवीं ॥ हेतु सर्व भावीं मनीं धरी उद्धवा ॥ २ ॥ कायिक वाचिक मानसिक भाव ॥ अर्पी तेथें जीव देहभाव ॥ एकाजनार्दनीं तयाचें वैभव ॥ सांगितलें तुज उद्धवा ॥ ३ ॥

॥ १२३६ ॥ उद्धवा तूं धरी संतसमागम ॥ तेणें तुटे भव श्रमरे उद्धवा ॥ १ ॥ सांगतसे गुज मनीं धरीरे उद्धवा ॥ आणिक श्रम वांया न करी रे

उद्धवा ॥ २ ॥ योगयाग तप व्रत कसवटी ॥ न करी आन गोष्टी रे उद्धवा ॥ ३ ॥ कीर्तन भजन सर्व भावें करी ॥ जाई संतद्वारीं शरणांगत रे उद्धवा ॥ ४ ॥ मनींचें निजगुज सांगितलें तुज ॥ एकाजनार्दनीं निज साधे रे उद्धवा ॥ ५ ॥

॥ १२३७ ॥ मीही संतचरण वंदीतसें माथां ॥ वेदादि साम्यता थोडी तेथें ॥ १ ॥ पुराणासी वाड पडेल सांकडें ॥ शास्त्राचें तें कोडें उगवेल ॥ २ ॥ अहंब्रह्म ऐशा श्रुति वेवादती ॥ नेति त्या ह्मणती तटस्थ ठेल्या ॥ ३ ॥ उपासना मार्ग परंपरा आला ॥ तो बोध तुला सांगितला ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं संताचा सांगात ॥ न चुकों देऊं हित आपुलें तूं ॥ ५ ॥

॥ १२३८ ॥ न्याय मीमांसा सांख्य पातंजली ॥ व्याकरण वेदांत बोली सर्व एक ॥ १ ॥ ते माझे सोईरे जीवलग जीवाचे ॥ जे अधिकारें साचे संतजन ॥ २ ॥ एकाजनार्दनीं मन तयाठायीं ॥ होऊनियां पायीं उतराई ॥ ३ ॥

॥ १२३९ ॥ अमृता उणें आणिती संतजन ॥ नाम अमृत खूण पाजिताती ॥ १ ॥ नाशिवंत यासी अमृत उपकार ॥ अनाशिवंता नामामृतसार ॥ २ ॥ नाशिवंत देह नाशिवंत जीव ॥ नाशिवंत ठाव जगडंबर ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं संताचिये दृष्टी ॥ नाशिवंत सृष्टि सजीव होती ॥ ४ ॥

॥ १२४० ॥ मनाची नखी नलगे जया ठायां ॥ तेणें उणी पाया भेटवी संत ॥ १ ॥ संत उदार उदार ॥ नामामृतें भरले सागर ॥ २ ॥ एकाजनार्दनीं संत ॥ कोण जाणें त्यांचा अंत ॥ ३ ॥

॥ १२४१ ॥ जयाच्या चरणा मिठी घाली भावें ॥ धन्य ते जाणावे सदैव संत ॥ १ ॥ प्रेमाचे सागर भक्तीचे उद्धी ॥ तोडिती उपाधि नाममात्रें ॥ २ ॥ जडजीवा तारक सत्य सत्य वाचे ॥ आणिक तें नवचे उपमे त्यांच्या ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं कृपाळु संतजन ॥ तेणें मज पावन केलें जगीं ॥ ४ ॥

॥ १२४२ ॥ जाणती हे हतवटी ॥ संत पोटीं दयाळू ॥ १ ॥ न ह्मणती अधम जन ॥ करिती कृपेनें पोषण ॥ २ ॥ शुचि अशुचि न ह्मणे कांहीं ॥ एकरूप वर्ते देहीं ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं मज ॥ तारियेलें तेणें सहज ॥ ४ ॥

॥ १२४३ ॥ संताअंकीं देव वसे ॥ देवाअंकीं संत बैसे ॥ १ ॥ ऐसी परस्परें मिळणी ॥ समुद्र तरंग तैसे दोन्ही ॥ २ ॥ हेम अलंकारवत॥ तैसे देव भक्त भासत ॥ ३ ॥ पुष्पीं तो परिमळ असे ॥ एकाजनार्दनीं देव दिसे ॥ ४ ॥

॥ १२४४ ॥ वाउगाचि सोस न करी सायास ॥ भजे श्रीसंतास एका भावें ॥ १ ॥ जाणोनी नेणता कां होसी रे मूर्ख ॥ सुखाचें निजसुख विटेवरी ॥ २ ॥ एकाजनार्दनीं धरुनी विश्वास ॥ होई कां रे दास संतचरणीं ॥ ३ ॥

---

## नामाचा महिमा.

॥ १२४५ ॥ आंबे केळीं द्राक्ष घडू ॥ रामनामापुढें अवघें कडू ॥ १ ॥ नाम गोड नाम गोड ॥ हरि ह्मणतां पुरे कोड ॥ २ ॥ गूळ साखर कायसी निकी ॥ अमृताची चवी झाली फिकी ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं पडली मिठी ॥ चवी घेतली ती कधींच नुठी ॥ ४ ॥

॥ १२४६ ॥ देठींचें फळ देठीं पिंके ॥ न तोडितां जो चवी चाखे ॥ १ ॥ गोड साखरसें साखरसें ॥ रामनामरसें चवी आलें ॥ २ ॥ न तोडी न फोडी सगळेंचि सेवी ॥ ब्रह्मादिकां तो वांकुल्या दावी ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं घेतली गोडी ॥ जीव गेला तरी चवी न सोडी ॥ ४ ॥

॥ १२४७ ॥ अखंड वाचें नाम ॥ तया न बाधी क्रोधकाम ॥ १ ॥ रामनाम वदतां वाचें ॥ ब्रह्मसुख तेथें नाचें ॥ २ ॥ रामनामें वाजे टाळी ॥ महा दोषा होय होळी ॥ ३ ॥ दो अक्षरांसाठीं ॥ ब्रह्मा लागे पाठोपाठीं ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं नाम ॥ सहज चैतन्य निष्काम ॥ ५ ॥

॥ १२४८ ॥ अनंत नामाचा हा काला ॥ पुराणें ह्मणती पाहूं चला ॥ १ ॥ हरिनामाचा कवळु घेतां ॥ तेणें धालों पैं सर्वथा ॥ २ ॥ एका कवळासाठीं ॥ गणिका बैसविली वैकुंठीं ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं कवळ ॥ सेवूं जाणती ते प्रेमळ ॥ ४ ॥

॥ १२४९ ॥ आपुलें कल्याण इच्छिणें जयासी ॥ तेणें या नामासी विसंबूं नये ॥ १ ॥ करिल परिपूर्ण मनींचे हेत ॥ ठेविलिया चित्त नामापाशीं ॥ २ ॥ भुक्ति आणि मुक्ति वोळंगती सिद्धी ॥ होईल कीं वृद्धि

आत्मनिष्ठे ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं जपतां हें नाम ॥ पुरविल काम जो जो हेतू ॥ ४ ॥

॥ १२५० ॥ रामनामाचेनी बळें ॥ ब्रह्म सर्वत्रैक मिळे ॥ १ ॥ रामनामाची ही ख्याती ॥ कर्माकर्माची निवृत्ती ॥ २ ॥ कृष्णाविष्णु हरि गोविंद ॥ ह्मणतां प्रगटे परमानंद ॥ ३ ॥ जों जों उच्चारी नाम ॥ तों तों प्रगटे मेघश्याम ॥ ४ ॥ व्रत तप यज्ञ दान ॥ रामनामासी साधन ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं कीर्ती ॥ सहज चैतन्य विश्रांती ॥ ६ ॥

॥ १२५१ ॥ जयजय रामनाम दो अक्षरीं ॥ सहस्र नामावरी ब्रीद गाजे ॥ १ ॥ उफराटे अक्षरीं वाल्मिक वैखरी ॥ सहस्र नामावरी उच्चारिलें ॥ २ ॥ पुंसा पढवितां नाम दो अक्षरीं ॥ सहस्र नामावरी सिद्ध झालें ॥ ३ ॥ अहं महिषासुर भेदिला जिव्हारीं ॥ नामें दो अक्षरीं निर्दाळिला ॥ ४ ॥ सद्गुरु नारदें उफराटें केलें ॥ बोधिलें वाल्मिकासी ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं रामनाम घोष ॥ त्रैलोकींचे दोष सरते जाले ॥ ६ ॥

॥ १२५२ ॥ स्नानाचा परिकळा ॥ स्वर वर्ण अडथळा ॥ सकळ मंत्रीं साचा पाही ॥ आसनीं भोजनीं शयनीं गमना गमनीं ॥ राम ह्मणतां दोष नाहीं ॥ १ ॥ श्रीराम जयराम ॥ श्रीराम जयराम ॥ जपतां हें दो अक्षरीं नाम ॥ धृ० ॥ संसारातें दळसी ॥ कळिकाळातें कढसी ॥ निरसेल कर्माकर्म ॥ २ ॥ योगयाग तपें तपताती बापुडीं ॥ जन धन शिणताती वेडीं ॥ निःशंक निर्लज्ज हरिनाम गातां ॥ पाय वाट वैकुंठ चढे ॥ ३ ॥ गूढ गुह्य जपसी वाचे श्रीराम ॥ ते नामें जयाचा भावो ॥ तेणें नामें भुलला वैकुंठ सांडुनी ॥ कीर्तनीं नाचतो देवो ॥ ४ ॥ रामनामें वाचा गर्जत उठी ॥ अमर येती त्याच्या भेटी ॥ तीर्थांचे समुदाय अंघ्रिरेणु वांछिती ॥ श्रुति ऐकों ठाती गोठी ॥ ५ ॥ सकळ साधनांमाजी वरिष्ठ हें भावें ॥ जपा रामनाम ॥ एकाजनार्दनीं संतोषला तो ॥ पुरवील निष्काम ॥ ६ ॥

॥ १२५३ ॥ गाऊं नाचूं प्रेमानंदें ॥ रामनामाचेनि छंदें ॥ १ ॥ ह्मणा श्रीराम जयराम ॥ भवसिंधु तारक नाम ॥ २ ॥ रामनामाची आवडी ॥ काळ गेला देशोधडी ॥ ३ ॥ आवडीनें नाम घोका ॥ ह्मणे जनार्दन एका ॥ ४ ॥

॥ १२५४ ॥ रामनाम उच्चार होटी ॥ संसारासी होय तुटी ॥ १ ॥ संसार तो समूळ जाय ॥ राम उच्चारुनी पाहे ॥ २ ॥ मागें अनुभवा आलें ॥ गजेंद्रादि उद्धरिले ॥ ३ ॥ शिव ध्यातो मानसीं ॥ रामनाम अहर्निशीं ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं राम ॥ पूर्ण परब्रह्म निष्काम ॥ ५ ॥

॥ १२५५ ॥ संसार तो गज ॥ राम पंचानन सहज ॥ १ ॥ शब्द ऐकतां तांतडी ॥ गज जैसा प्राण सोडी ॥ २ ॥ धाकें पळे महाभूत ॥ राम ह्मणो नित्यानित्य ॥ ३ ॥ नलगे जपमाळ ॥ राम वदे सर्वकाळ ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं राम ॥ अखंड जपे हृदयधाम ॥ ५ ॥

॥ १२५६ ॥ रामनामें तारिले ॥ पशु पक्षी उद्धरिले ॥ १ ॥ ऐसा रामनाम बोध ॥ घेई कांरे तूं शुद्ध ॥ २ ॥ तारिले तारिले ॥ रामनामें उद्धरिले ॥ ३ ॥ शुकादिक योगी जाले ॥ रामनामें ते रंगले ॥ ४ ॥ ब्रह्मज्ञानी महामुनी ॥ रामनाम जपती वाणीं ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं राम ॥ मना करी तूं विश्राम ॥ ६ ॥

॥ १२५७ ॥ सुख रामनामें अपार ॥ शंकर जाणें तो विचार ॥ १ ॥ गणिका जाणें रामनाम ॥ गजेंद्र उद्धरिला राम ॥ २ ॥ शिळा मुक्त केली ॥ रामनामें पदा गेली ॥ ३ ॥ तारिले वानर ॥ रामनामें ते साचार ॥ ४ ॥ रामनामें ऐसी ख्याती ॥ एकाजनार्दनीं प्रतीति ॥ ५ ॥

॥ १२५८ ॥ रामनाम पावन ॥ यापरतें थोर कोण ॥ १ ॥ जड शिळा ते सागरीं ॥ नामें तरल्या निर्धारीं ॥ २ ॥ राम जप सदा ॥ नोहे काळाची ती बाधा ॥ ३ ॥ नाम घेतां निशीदिनीं ॥ एका शरण जनार्दनीं ॥ ४ ॥

॥ १२५९ ॥ ध्यानीं बैसोनी शंकर ॥ जपे रामनाम सागर ॥ १ ॥ पार्वती पुसे आवडी ॥ काय जपतां तांतडी ॥ २ ॥ मंत्र तो मज सांगा ॥ ऐसी बोलतसे दुर्गा ॥ ३ ॥ एकांतीं नेऊन ॥ उपदेशी राम अभिधान ॥ ४ ॥ तेंचि मच्छिंद्रा लाधलें ॥ पुढें परंपरा चालिलें ॥ ५ ॥ तोचि बोध जनार्दनीं ॥ एका लागतसे चरणीं ॥ ६ ॥

॥ १२६० ॥ सर्वांमाजी सार नाम विठोबाचें ॥ सर्वसाधनांचें घर जें कां ॥ १ ॥ सहा चार अठरा वर्णिताती कीर्ती ॥ नामें मोक्षप्राप्ति अर्थ

क्षणीं ॥ २ ॥ शुकादिकीं नाम साधिलेंसे दृढ ॥ प्रपंच काबाड निरसिलें ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं जनीं ब्रह्म नाम ॥ तेणें नेमधर्म सर्व होय ॥ ४ ॥

॥ १२६१ ॥ चांडाळादि ब्राह्मण सर्व नारीनर ॥ सर्वांसी आधार नाम सत्य ॥ १ ॥ नामाविण गती नसेची आणिक ॥ वैकुंठनायक सुलभ देखा ॥ २ ॥ नाम विठोबाचें घ्यावें निशींदिनीं ॥ चौऱ्याशीची खाणी तेव्हां चुके ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं पूर्णता एकपणीं ॥ नाम घ्या निशींदिनीं सर्वकाळ ॥ ४ ॥

॥ १२६२ ॥ अकार उकार मकार नामचि ठेविलें ॥ शिवातेंही केलें निराकार ॥ १ ॥ जीव शिव दोन्ही विराले ज्यामाजीं ॥ तें नाम सहजीं विठ्ठल होय ॥ २ ॥ नामाविण नाहीं आणिकासी ठाव ॥ दुजा नाहीं भाव जिवां सर्वां ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं नाम घनदाट ॥ भूवैकुंठ पेठ पंढरी देखा ॥ ४ ॥

॥ १२६३ ॥ व्यापक तें नाम अनंत ब्रह्मांडीं ॥ मना सोस सांडी कल्पनेचा ॥ १ ॥ कल्पना विरहित नाम तूंचि गाये ॥ सर्व सुख पाहे विठ्ठलपायीं ॥ २ ॥ ठसावेल मूर्ति पाहतां अनुभव ॥ पांचांचा मग ठाव कैंचा तेथें ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं संपूर्ण अवघा ॥ भीमातीरीं थडवा उभा असे ॥ ४ ॥

॥ १२६४ ॥ ऐक्य तें जालिया मीतूंपण नाहीं ॥ गौरव हा कांहीं नाहीं नामीं ॥ १ ॥ नाहीं चतुर्दल तुर्या ही उन्मनी ॥ स्वयंभ ती खाणी उभी असे ॥ २ ॥ चित्त जडलिया तेथें काय उणें ॥ लज्जित साधनें होतीं देखा ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं नाहीं मीतूं पण ॥ व्यापक तें जाण सर्वांठायीं ॥ ४ ॥

॥ १२६५ ॥ व्यापक विठ्ठलनाम तेव्हांचि होईल ॥ जेव्हां तें जाईल मीतूंपण ॥ १ ॥ आपुलें तें नाम जेव्हां वोळखिल ॥ व्यापक साधेल विठ्ठल तेणें ॥ २ ॥ आपुले वोळखी आपणचि सांपडे ॥ सर्वत्रीहीं जोडे विठ्ठलनाम ॥ ३ ॥ नामाविण जन पशूच्या समान ॥ एकाजनार्दनीं जाण नाम जप ॥ ४ ॥

॥ १२६६ ॥ संता वांचोनियां नाम नये हातां ॥ साधनें साधितां कोटि जाणा ॥ १ ॥ जैसें कांतेविण करणें संसार ॥ साधन विचार व्यर्थ

ठेला ॥ २ ॥ संत समागम धरालिया वांचुनी ॥ संसार सांडणी नोहे बापा ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं संतासी शरण ॥ रिघालिया जाण देव जोडे ॥ ४ ॥

॥ १२६७ ॥ वेदाभ्यास नको सायास ज्योतिष ॥ नामाचा तो लेश तेथें नाहीं ॥ १ ॥ बहुत व्युत्पत्ति सांगसी पुराण ॥ व्यर्थ तेंचि स्मरण नाम नाहीं ॥ २ ॥ अनंत हें नाम जया पासूनियां जालें ॥ तें वर्म चुकलें संतसेवा ॥ ३ ॥ संतासी शरण गेलिया वांचुनी ॥ एकाजनार्दनीं न कळे नाम ॥ ४ ॥

॥ १२६८ ॥ नामामृत गोडी वैष्णव जाणती ॥ येर चरफडती काग जैसे ॥ १ ॥ प्राकृत हे जन भुलले विषया ॥ नामाविण वांया जाती देखा ॥ २ ॥ नामें साधे मुक्ति नामें साधे भुक्ती ॥ नामेंचि विरक्ति होत आहे ॥ ३ ॥ नाम तेंचि जालें वर्ण रूपातीत ॥ अनाम सतत उभें असे ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं पूर्ण नाम बोध ॥ विठ्ठलनामीं छंद सदा असो ॥ ५ ॥

॥ १२६९ ॥ नांदतसे नाम आकाशपाताळीं ॥ सर्व भूमंडळीं व्याप्त असे ॥ १ ॥ पाताळ भेदोनी व्याप्त ठेलें पुढें ॥ नाहीं त्यासी आड कोठें कांहीं ॥ २ ॥ चौऱ्याशी भोगिती दुर्मती पामर ॥ संतासी साचार शरण न जाती ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं नाम अविनाश ॥ संतसंगें दोष सर्व जाती ॥ ४ ॥

॥ १२७० ॥ नाम हें पावन नाम हें पावन ॥ दुजा ठाव आन नाहीं येथें ॥ १ ॥ देखणाही झाला देखणाही झाला ॥ देखणाही झाला अंधत्वेंसी ॥ २ ॥ द्वैत अद्वैत गेलें नेणणें हरपलें ॥ जाणणें तें गेलें जाणते ठायीं ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं नाम तें अनाम ॥ सर्वोत्तम नाम सर्वांठायीं ॥ ४ ॥

॥ १२७१ ॥ अविनाश नाम स्वयंभ संचलें ॥ तें उभें चांगलें विटेवरी ॥ १ ॥ वर्णितां वेदासी न कळेचि पार ॥ तें उभें साचार विटेवरी ॥ २ ॥ मौन्यरूप श्रुति राहिल्या तटस्थ ॥ तो आहे मूर्तिमंत विटेवरी ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं नाम अविनाश ॥ गातां जाती दोष जन्मांतरींचें ॥ ४ ॥

॥ १२७२ ॥ जड जीवातें उद्धरी ॥ ऐसी नामामाजीं थोरी ॥ १ ॥ तेंचि नाम वाचें गाता ॥ हरे जन्ममरण व्यथा ॥ २ ॥ नामें पाषाण तारिलें ॥ गजेंद्रातें उद्धरिलें ॥ ३ ॥ ऐसा नामाचा निजछंद ॥ एकाजनार्दनीं परमानंद ॥ ४ ॥

॥ १२७३ ॥ सहा शास्त्रें चारी वेद ॥ नामा पासोनी प्रसिद्ध ॥ १ ॥ तें नाम गाऊं सदा ॥ राम कृष्ण गोविंदा ॥ २ ॥ कर्म धर्म पडतां न्यून ॥ तें सांग हरि चिंतनें ॥ ३ ॥ योगयाग तप तीर्थ ॥ नामेंविण अवघें व्यर्थ ॥ ४ ॥ गणिका मोक्ष पदा नेली ॥ रामनामें उद्धरली ॥ ५ ॥ तारिले जड जीव ॥ एकाजनार्दनीं दृढभाव ॥ ६ ॥

॥ १२७४ ॥ रामनाम ज्याचे मुखीं ॥ तो नर धन्य तिहीं लोकीं ॥ १ ॥ रामनाम वदतां वाचें ॥ ब्रह्मसुख तेथें नाचें ॥ २ ॥ रामनामें वाजे टाळी ॥ महा दोषा होय होळी ॥ ३ ॥ रामनाम सदा गर्जे ॥ कळिकाळ भय पाविजे ॥ ४ ॥ ऐसा रामनामीं भाव ॥ तया संसारची वाव ॥ ५ ॥ आवडीनें नाम गाय ॥ एकाजनार्दनीं वंदी पाय ॥ ६ ॥

॥ १२७५ ॥ तुमचें नाम आठवितां ॥ धणी न पुरे पंढरिनाथा ॥ १ ॥ सुख अनुपम्य कल्पकोडी ॥ युगा ऐशी एक घडी ॥ २ ॥ निजध्यास जडतां नामीं ॥ सुखें सुख दुणावे प्रेमीं ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं नाम ॥ श्रेष्ठ धामाचें हें धाम ॥ ४ ॥

॥ १२७६ ॥ जेणें नाम धरिलें कंठीं ॥ धांवे साच्या पाठींपोटीं ॥ १ ॥ नाम गातां जनीं वनीं ॥ आपण उभा तेथें जाउनी ॥ २ ॥ नामासाठीं मागें धांवे ॥ इच्छिलें तेणें पुरवावें ॥ ३ ॥ यातीकुळ तयाचें ॥ न पाहे कांहीं साचें ॥ ४ ॥ वर्णाची तों चाड नाहीं ॥ नाम गातां उभा पाही ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं भोळा ॥ नामासाठीं अंकित झाला ॥ ६ ॥

॥ १२७७ ॥ न धरी लौकिकाची लाज ॥ तेणें सहज नाम गावें ॥ १ ॥ अनायासें देव हातां ॥ साधन सर्वथा दुजें नाहीं ॥ २ ॥ साधन ते खटपट ॥ नाम वरिष्ठ नित्य गावें ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं सोपा ॥ विठ्ठलनाम मंत्र जपा ॥ ४ ॥

॥ १२७८ ॥ रामनाम वदे वाचें ॥ धन्य मुख तयाचें ॥ लोटांगणीं साचे ॥ हरिहर पैं येती ॥ १ ॥ नाम चांगलें चांगलें ॥ जड जीव उद्धरले ॥ वैकुंठवासी केले ॥ कुडे कपटीयांसी ॥ २ ॥ अजामेळादि पातकी ॥ नामें तारिले महा दोषी ॥ यवनादी सुखी ॥ नामें केले ॥ ३ ॥ हास्य विनोदें नाम ॥ घेतां पावे सर्वोत्तम ॥ मा दृढ धरलिया प्रेम ॥ देवचि होय ॥ ४ ॥

एकाजनार्दनीं अनुभव ॥ कलिमार्जी तारक सर्व ॥ नामावांचुनी अन्य भाव॥ नाहीं नाहीं ॥ ५ ॥

॥ १२७९ ॥ साधावया स्वरूपसिद्धी ॥ सिद्ध साधका समाधी ॥ बैसोनी ध्यानस्थ बुद्धी ॥ परि तो हरि न सांपडे ॥ १ ॥ धन्य धन्य वैष्णव संग ॥ खेळे तेथें पांडुरंग ॥ कीर्तनीं नाचतसे स्वयंभ ॥ सदाकाळ सर्वदा ॥ २ ॥ घेतां नाम धांवे विठ्ठल ॥ नको तप नको मोल ॥ न लगती कष्ट बहुसाल ॥ तो कृपाळु दीनाचा ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं शरण ॥ भक्तीस तुष्ट नारायण ॥ त्याचे करितां चिंतन ॥ आपोआप येतसे ॥ ४ ॥

॥ १२८० ॥ मुखें गावें नाम ॥ तेणें पुरे सर्व काम ॥ १ ॥ सर्व साधनांचें सार ॥ तेणें पावे पैलपार ॥ २ ॥ नामें बहुत तारिले ॥ महा दोषी उद्धरिले ॥ ३ ॥ रामनाम बहु श्रेष्ठ ॥ घेतां न लगती कष्ट ॥ ४ ॥ नाम नित्य ज्याचे मुखीं ॥ तो जाणावा सर्व सुखी ॥ ५ ॥ रामनाम हेंचि सार॥ सत्य जाणा हा निर्धार ॥ ६ ॥ रामनाम निरसी ताप ॥ पापें जाती आपेआप ॥ ७ ॥ रामनाम जो उच्चारी ॥ सुख पावे तो संसारीं ॥ ८ ॥ एकाजनार्दनीं नाम ॥ पाववि तें परम धाम ॥ ९ ॥

॥ १२८१ ॥ आनंदें करोनि संसारीं असावें ॥ नाम आठवावें श्रीरामाचें ॥ १ ॥ नामाचियां योगें संसार तो चांग ॥ येरव्हीं तें अंग व्यर्थ जाय ॥ २ ॥ ऋषि मुनि सिद्ध संत महानुभाव ॥ रामनामें भव सुखें केला ॥ ३ ॥ नामें होय सुख नामें निरसे दुःख ॥ रामनाम एक हृदयीं धरा ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं नामाचा आठव ॥ सुखदुःख भाव दुराविला ॥ ५ ॥

॥ १२८२ ॥ नाम तें ब्रह्म नाम तें ब्रह्म ॥ नामापाशीं नाहीं कर्मविकर्म ॥ १ ॥ अबद्ध पढतां वेद बाधी निषिद्ध ॥ अबद्ध नाम पढतां प्राणी होती शुद्ध ॥ २ ॥ अबद्ध मंत्र जपतां पातक चळे ॥ अबद्ध नाम जपतां जडमूढ उद्धरले ॥ ३ ॥ स्वधर्म कर्म करी पडे व्यंग ॥ विष्णु स्मरणें तें समूळ होय सांग ॥ ४ ॥ मनापाशीं नाहीं विधिविधान ॥ आसनीं शयनीं भोजनीं नाम पावन ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं नाम निकटीं ॥ ब्रह्मानंदीं भरली सृष्टी ॥ ६ ॥

॥ १२८३ ॥ रामनामें नाम रूपा निरास ॥ कृष्ण कर्म स्मरतां कर्माचा ग्रास ॥ १ ॥ नामें जिव्हा गर्जतां अहर्निशीं ॥ भव भय तें बापुडें

परदेशी ॥ २ ॥ रामनाम जपतां जीवीं ॥ जीव पावे ब्रह्म पदवी ॥ ३ ॥ जीव ह्मणतां तोचि परब्रह्म ॥ नामें निरसिलें कर्माकर्म ॥ ४ ॥ रामनामाचीं जीं अक्षरें ॥ तीं तंव क्षराक्षरातीत सारें ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं चमत्कार ॥ नाम तें चैतन्य निर्धार ॥ ६ ॥

॥ १२८४ ॥ नाम जपे सर्वकाळ ॥ त्यासी भयाभीत काळ ॥ १ ॥ लीन ज्याची वृत्ती ॥ त्याच्या दासी चारी मुक्ती ॥ २ ॥ रामनामीं जिव्हा रंगें ॥ तोचि परब्रह्म अंगें ॥ ३ ॥ ह्मणे एकाजनार्दनीं ॥ राम दिसे जनीं वनीं ॥ ४ ॥

॥ १२८५ ॥ हरिनाम भजन कल्लोळ जेथें सदा ॥ नोहे तेथें बाधा-विषयाची ॥ १ ॥ वेद शास्त्र देती ग्वाही ॥ पुराणें तींही बोलतीं ॥ २ ॥ नाम स्मरणें निरसे भेद ॥ तुटे समूळ कंद संसार ॥ ३ ॥ निरसे भोग दुखः व्याधी ॥ तुटे उपाधि शरीर ॥ ४ ॥ जनार्दनाचा एका ह्मणे ॥ नाम गाणें सतत ॥ ५ ॥

॥ १२८६ ॥ जाग्रती स्वप्न आणि सुषुप्ती ॥ तिही अवस्थांत हरि ह्मणतां मुक्ती ॥ १ ॥ ऐसें वेदशास्त्रें गर्जती ॥ विवादती पुराणें ॥ २ ॥ नाम निरंतर मुखीं सदा ॥ नोहे बाधा भौतिक ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं शरण ॥ भुक्तिमुक्तीचें नाहीं कारण ॥ ४ ॥

॥ १२८७ ॥ उत्तम स्त्री देखोनी दृष्टी ॥ मूर्ख कैसा लाळ घोटी ॥ १ ॥ तैसा विनटे रामनामा ॥ तेणें चुकशी कर्माकर्मा ॥ २ ॥ मूषक देखोनी मार्जार ॥ तैसे उभे यमकिंकर ॥ ३ ॥ मीन तळमळी जैसा ॥ विषयीक प्राणी तैसा ॥ ४ ॥ एका शरण जनार्दनीं ॥ दुजा छंद नाहीं मनीं ॥ ५ ॥

॥ १२८८ ॥ मानवा रामनामीं भजे ॥ तेणें तुझें कार्य होय सहजें ॥ १ ॥ अनुभव घेई अनुभव घेई ॥ अनुभव घेई रामनामीं ॥ २ ॥ शंकरादि तरले वाल्मीकादि उद्धरले ॥ तें तूं वहिलें घेई रामनाम ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं नामाच्या परिपाठीं ॥ दोष पातकें पळती कोटी ॥ ४ ॥

॥ १२८९ ॥ कोटी जन्मांची येरझारी ॥ तें तों हरी रामनाम ॥ १ ॥ तें तूं वाचें सुगम वदे रामनाम ॥ आणीक नको श्रम करूं वाया ॥ २ ॥ श्रम केलीया पडसी सांकडी ॥ जन्म मरण वेडी तोडी नाम ॥ ३ ॥ संतसमागम भावें करी भक्ति ॥ एकाजनार्दनीं वस्ति नामीं करी ॥ ४ ॥

॥ १२९० ॥ अष्टादश पुराणें सांगती वडीवार ॥ नाम साराचें सार कलीयुगीं ॥ १ ॥ तारिले पातकी विश्वासघातकी ॥ मुक्त झाले लोकीं तिहीं सत्य ॥ २ ॥ सर्वांत सार नाम जपूनिका ॥ जनार्दनाचा एका घोकितसे ॥ ३ ॥

॥ १२९१ ॥ महा पुरीं जैसें वहातें उदक ॥ मध्य ती तारक नौका जैसी ॥ १ ॥ तैसें प्राणियासी नाम हें तारक ॥ भवसिंधु धाक नुरे नामें ॥ २ ॥ तये नावे संगें ब्राह्मण तरती ॥ केवीं तें बुडती अनामिक ॥ ३ ॥ नाना काष्ठ जात पडे हुताशनी ॥ जाती ते होउनी एकरूप ॥ ४ ॥ तेथें निवडेना धुरें रुई कीं चंदन ॥ तैसा भेद वर्ण नाहीं नामीं ॥ ५ ॥ पूर्वी न वोळखे तेंचि पैं मरण ॥ एकाजनार्दनीं स्मरण रामनाम ॥ ६ ॥

॥ १२९२ ॥ जगासी तारक हरि हा उच्चार ॥ सर्व वेरझार खुंटे जेणें ॥ १ ॥ पाहतां ब्रह्मांडीं व्यापक तो हरी ॥ सबाह्य अभ्यंतरीं भरलासे ॥ २ ॥ एकाजनार्दनीं रिता ठाव कोठें ॥ पुंडलीक पेठें उभा नीट ॥ ३ ॥

॥ १२९३ ॥ रामनाम वसे ज्याचें मुखीं नित्य ॥ त्याचेनि पवीत उद्धरण ॥ १ ॥ राम राम मंत्र जपे नित्य काळ ॥ त्यासी कळीकाळ हात जोडी ॥ २ ॥ रामनामीं ज्याची जडली चित्तवृत्ती ॥ वृत्तीची निवृत्ति झाली त्यासी ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं जपे रामनाम ॥ तेणें पूर्ण काम स्वयें झाला ॥ ४ ॥

॥ १२९४ ॥ राम राम ह्मणतां वाचें ॥ रामरूप होय साचें ॥ १ ॥ रामें तारिली शबरी ॥ नित्य राम ती उच्चारी ॥ २ ॥ रामें तारिली गणिका ॥ केला अजामेळ सखा ॥ ३ ॥ शिळा तारिल्या सागरीं ॥ राम अहल्या उद्धरी ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं ॥ राम भरला जनीं वनीं ॥ ५ ॥

॥ १२९५ ॥ विठ्ठलनाम घेती वाहाती टाळीया ॥ ब्रह्मादिक येऊनिया वंदिती पायां ॥ १ ॥ धन्य धन्य हरि भक्त जगीं ॥ वहातताती टाळी नाचताती रंगीं ॥ २ ॥ प्रेम भरित सदां करिती कीर्तन ॥ एकाजनार्दनीं वंदूं तयांचें चरण ॥ ३ ॥

॥ १२९६ ॥ वाचें सदा रामनाम ॥ तया न बाधी क्रोध काम ॥ १ ॥ हेंचि एक सत्य सार ॥ वाया नको वेरझार ॥ २ ॥ संसार वांया न ह्मणे

सार ॥ करी परमार्थ विचार ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं रामनाम ॥ वाचें वदे तूं निष्काम ॥ ४ ॥

॥ १२९७ ॥ वेरझार खुंटे नाम वदतां वाचें ॥ आणिक सायासाचें न करी कोड ॥ १ ॥ तुटे रे बंधन नोहेचि पतन ॥ वाचें जनार्दन जप करी ॥ २ ॥ एकाजनार्दनीं वाचें जपे नाम ॥ आणिक दुर्गम साधन नको ॥ ३ ॥

॥ १२९८ ॥ सकळ साधनांचें फळ ॥ रामनामचि केवळ ॥ १ ॥ जप तप अनुष्ठान ॥ अंतीं नामचि प्रमाण ॥ २ ॥ नाना मंत्र यंत्रावळी ॥ सोडवीना अंतकाळीं ॥ ३ ॥ महा पातकी पतित ॥ नामें तरले असंख्यात ॥ ४ ॥ नाम साराचें हें सार ॥ एकाजनार्दनीं निर्धार ॥ ५ ॥

॥ १२९९ ॥ सर्वस्व हरुनी ह्मणसी बळीसी ॥ म्यां बांधिले विचारिसी कोण कोण ॥ १ ॥ द्वारीं द्वारपाळ झालासी अंकीत ॥ सांग बुद्धीमंत ऐसा कोण ॥ २ ॥ ऐसें नाथिलेंची आपणा गोंवीसी ॥ एकाजनार्दनीं बोल आह्मां कां ठेविसी ॥ ३ ॥

॥ १३०० ॥ शम दम साधन ॥ नामावांचून न करी जाण ॥ १ ॥ नाम गावें नाम गावें ॥ वेळो वेळां नाम गावें ॥ २ ॥ नामावांचुनी साधन नाहीं ॥ ऐसीं वेदशास्त्रें देती ग्वाही ॥ ३ ॥ मज भरंवसा नामाचा ॥ एकाजनार्दनीं ह्मणे वाचा ॥ ४ ॥

॥ १३०१ ॥ अष्टांग साधन न करी वाउगें ॥ धूम्रपान वेगें कासया करसी ॥ १ ॥ मनीं हरि धरी मनीं हरि धरी ॥ वाउगा तूं फेरी पडों नको ॥ २ ॥ साधन फुकट वाउगे ते कष्ट ॥ धरी हरि वरिष्ठ मनामाजी ॥ ३ ॥ साधन साधिता शिणताती मुनी ॥ तो हरि कीर्तनीं नाचतसे ॥ ४ ॥ नलगे सायास करावें तें कांहीं ॥ एकाजनार्दनीं पायीं बुडी दिली ॥ ५ ॥

॥ १३०२ ॥ श्रीराम श्रीराम वाचें ह्मणता ॥ तेणें सायुज्यता हाता लागे ॥ १ ॥ श्रीराम श्रीराम ध्यान जयासी ॥ तोचि तपराशी पावन जाला ॥ २ ॥ श्रीराम श्रीराम वदे ज्याची वाणी ॥ धन्य धन्य जनीं पावन तो ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं श्रीराम ध्यात ॥ निरंतर चित्त रामनामीं ॥ ४ ॥

॥ १३०३ ॥ राम राम ध्वनी जयाचे मुखासी ॥ धन्य तो पुण्यराशी पावन झाला ॥ १ ॥ सदोदीत नाम जपें श्रीरामाचें ॥ अनंता जन्मांचे

दोष जाती ॥ २ ॥ राम राम वदे सदा सर्वकाळ ॥ काळाचा तो काळ रामनामें ॥ ३ ॥ राम वदे ध्यानीं राम वदे मनीं ॥ एकाजनार्दनीं राम वदे ॥ ४ ॥

॥ १३०४ ॥ सदोदीत गाय श्रीराम गुण ॥ धन्य तो पावन नर देहीं ॥ १ ॥ नर देहीं आलीया रामनाम गावें ॥ तरीच जन्मा यावें गुरु-पुत्रा ॥ २ ॥ नरदेह उत्तम लागलासे हातीं ॥ रामनामें विश्रांती देहीं याची ॥ ३ ॥ कन्या पुत्र माझे न करी सायास ॥ रामनामें उदास वृत्ति करी ॥ ४ ॥ वृत्ती करी सदा समाधान ॥ राम राम चिंतन निशीदिनीं ॥ ॥ ५ ॥ निशीदिनीं ध्यान एकाजनार्दनीं ॥ काया वाचा मनीं राम-नाम ॥ ६ ॥

॥ १३०५ ॥ रामनामें तृप्त जे नर झाले ॥ पुनरावृत्ति न आले संसारासी ॥ १ ॥ जाणार जाणार सर्व हें जाणार ॥ रामनाम साचार जप करी ॥ २ ॥ अभ्राची छाया मृगजळाचें जळ ॥ तैसा हा देह केवळ मिथ्या असे ॥ ३ ॥ मिथ्याचें सत्य मानिती गव्हार ॥ रामनामीं विसर पडोनी ठेला ॥ ४ ॥ विसरुनी राम करीशी प्रपंच धंदा ॥ भुललासी मतिमंदा नाशिवंता ॥ ५ ॥ नाशिवंतासाठीं रडतोसी कां ह्या ॥ एकाजनार्दनीं पाया शरण रिघे ॥ ६ ॥

॥ १३०६ ॥ नामाच्या उच्चारें प्रल्हाद तारिला ॥ अजामेळ गणिकेचा उद्धार केला ॥ १ ॥ तें नाम सोपें हो श्रीरामाचें ॥ निरंतर वाचें जप करी ॥ २ ॥ करी सर्वभावें रामनाम बोभाट ॥ कळिकाळाचे थाट पुढें पळती ॥ ३ ॥ पळतील पातकें नाम उच्चारितां ॥ एकाजनार्दनीं ह्मणतां राम-नाम ॥ ४ ॥

॥ १३०७ ॥ रामनाम जपे शिव तो स्मशानीं ॥ वाल्मीक तो मुनि नाम जपे ॥ १ ॥ गणिका तारिली रामनाम घेतां ॥ पातकी तत्वतां उद्धरिले ॥ २ ॥ रामनाम सुख शिव जाणे तत्वतां ॥ येरासी महत्वता न कळे नाम ॥ ३ ॥ साधनाचें सार नाम मुखीं गातां ॥ राम राम ह्मणतां कार्यसिद्धी ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं रामनाम जप ॥ वैकुंठींचा सोपा मार्ग तुह्मा ॥ ५ ॥

॥ १३०८ ॥ वैकुंठा जावया नलगे ते सायास ॥ रामनामें पाश दृढ

तुटती ॥ १ ॥ तारिले वान्नर वनचरें रामें ॥ गोपिका त्या कामें मुक्त केल्या ॥ २ ॥ गोपाळ संवगडे नामेंचि तारिले ॥ जडजीव उद्धरिले कलियुगीं ॥ ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं सांगावें तें किती ॥ रामनामें मति नलगे यांची ॥ ४ ॥

॥ १३०९ ॥ श्रीराम जयराम वदतां वाचें ॥ पातकें जाती कोटी जन्मांची ॥ १ ॥ जय जय राम जय जय राम ॥ तुमचें नाम गाये शंकर उमा ॥ २ ॥ नाम थोर तिहीं लोकीं साचें ॥ उफराटें वदतां पातक नासलें वाल्याचें ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं नाम साराचें सार ॥ नामस्मरणें तुटे भव-बंध येरझार ॥ ४ ॥

॥ १३१० ॥ अवघे ते दैवाचे ॥ विठ्ठल विठ्ठल वदती वाचे ॥ १ ॥ अवघा धंदा दुजा नाहीं ॥ वाचें विठ्ठल रखुमाई ॥ २ ॥ अवघा संसार करिती ॥ वाचें अवघे विठ्ठल ह्मणती ॥ ३ ॥ अवघीं कर्में घडलीं तया ॥ अवघे विठ्ठलची पाया ॥ ४ ॥ अवघा एकाजनार्दन ॥ अवघा जनीं जनार्दन ॥ ५ ॥

॥ १३११ ॥ नित्य काळ वाचें जया नामछंद ॥ तयासी गोविंद मागें पुढें ॥ १ ॥ घात अघात निवारित ॥ छाया पीतांबरीं करित ॥ २ ॥ ऐसा भक्ताचा अंकित ॥ राहे उभाची तिष्ठत ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं वेध ॥ वेधा-माजीं परमानंद ॥ ४ ॥

॥ १३१२ ॥ दाता तोचि ह्मणावा ॥ नामावांचोनी नेणें जीवा ॥ १ ॥ थोर तोचि ह्मणावा ॥ नेणें भूतांचा तो हेवा ॥ २ ॥ लहान तोचि ह्मणावा ॥ काया वाचा भजे देवा ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं ह्मणे ॥ देवा-वांचुनी कांहीं नेणें ॥ ४ ॥

॥ १३१३ ॥ रामनामीं भाव न धरिती कोणी ॥ नाना मंत्र तंत्र घेती जनीं ॥ सकुडी कुंटणी वैकुंठासी नेली ॥ अवचटें राम वदली ॥ १ ॥ रामनाम न मानिती जनीं ॥ सैर समाधि हरि कीर्तनीं ॥ २ ॥ वारितां नाम प्ऱ्हाद स्मरे ॥ त्याचे चुकविले नाना घात ॥ कोरडीये काष्ठीं नर मृग जाला ॥ भक्ता साह्य जगन्नाथ ॥ ३ ॥ अभिलाषें नाम अजामेळ स्मरे ॥ तो सोडिला यमकिंकरीं ॥ मागील किल्मिष निःशेष जाळिलें ॥ ऐशी नामाची ही थोरी ॥ ४ ॥ उफराटे अक्षरीं रामु नारदमुनी ॥ वाल्मि-कासी उपदेशी ॥ नष्ट वाटपाडा पुनीत झाला ॥ या महा कवि ह्मणविती

त्यासी ॥ ५ ॥ रामनाम कीर्तनीं कैसें सुख आहे ॥ हें शिवची जाणें साचें ॥ दोंचि अक्षरीं काशी मुक्त केली ॥ तारक ब्रह्म हें साचें ॥ ६ ॥ लाजेच्या संकटीं द्रौपदी नाम स्मरे ॥ देवो वर्षला तिसी अंबरें ॥ वैरियाचे शिरीं पाउल आणिला ॥ नामें भक्तकाज सरे ॥ ७ ॥ नामाचेनी बळें पाप पुढें पळे ॥ कर्माकर्म तेथें जळे ॥ एकाजनार्दनीं नाममात्रें ॥ निजीं निज सुखाचे सोहळे ॥ ८ ॥

॥ १३१४ ॥ गातों एका ध्यातों एका ॥ अंतरबाहीं पहातों एका ॥ १ ॥ अगुणीं एका सगुणीं एका ॥ गुणातीत पहातों एका ॥ २ ॥ जनीं एका वनीं एका ॥ निरंजनीं देखों एका ॥ ३ ॥ संतजना पढिये एका ॥ जनार्दना कडीये एका ॥ ४ ॥

॥ १३१५ ॥ गाणें बाणें मूर्तीकडे ॥ राम अध ऊर्ध्व मागें पुढें ॥ १ ॥ मुखीं उच्चारितां नाम ॥ जिव्हेमाजीं वसे राम ॥ २ ॥ श्रुति मृदंग टाळ घोळ ॥ ते नाद राम सकळ ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं नित्य गात ॥ श्रोता वक्ता जनार्दन तेथें ॥ ४ ॥

॥ १३१६ ॥ दोषी यमदूतीं नेतां बांधोनी ॥ तंव अवचिता नाम पडिलें कानीं ॥ १ ॥ तुटलें बंधन खुंटलें पतन ॥ नाम जनार्दन ऐकतांची ॥ २ ॥ तुटोनि बंधन पडतां तळीं ॥ वरचेवर झेली वनमाळी ॥ ३ ॥ दूतीं अति दृढ नाम धरितां मनीं ॥ यमदूता देवदूत घालिती विमानीं ॥ ४ ॥ दोषी आणि दूता नामाच्या परिपाठीं ॥ भावबळें देव स्थापी वैकुंठीं ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं नामोच्चारासाठीं ॥ यमदूता यमें नोहे भेटी ॥ ६ ॥

॥ १३१७ ॥ चित्रगुप्त ह्मणती करावें काई ॥ यमदूताविण न चले कांहीं ॥ १ ॥ नामें नागविलें नामें नागविलें ॥ यम ह्मणे माझें सामर्थ्य नचले ॥ २ ॥ यम चित्रगुप्त नाम विवंचीत ॥ नाम विवंचितां जाले मुक्त ॥ ३ ॥ यमें यमदूता आल्हादें भेटी ॥ अवघे चतुर्भुज चाले वैकुंठीं ॥ ४ ॥ जनामाजीं थोर धाकुटें नाम ॥ यमें यमदूत झाले आत्माराम ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं नामाचा गुण ॥ यमेसीं यमलोक जाला परब्रह्म पूर्ण ॥ ६ ॥

॥ १३१८ ॥ राम ह्मणोनि दीन येती काकुलती ॥ त्यांच्या यातनेचे दोष सांगावे किती ॥ १ ॥ काय सांचलें नाठवे पाप ॥ नामें निष्पाप महा

दोषी ॥ २ ॥ चित्रगुप्त जंव पाहे वही ॥ कोरडें पान रेघही नाहीं ॥ ३ ॥ खोडी ना मोडी समूळ उडे ॥ एकाजनार्दनीं नामें पाप झडे ॥ ४ ॥

---

## नाममहिमा.

॥ १३१९ ॥ देवाचें हें गुज सकळ मंत्रमय ॥ जें कां निजध्येय शंकराचें ॥ १ ॥ तें हें रामनाम सेवितां सर्वभावें ॥ रामरूप व्हावें निश्चयेंसी ॥ २ ॥ नष्ट अजामेळाचें पतित्व गेलें ॥ दिव्य रूप झालें वाल्मीकाचें ॥ ३ ॥ शरीर संपत्ति बळें अर्पुनी सकळ ॥ झाला द्वारपाळ एकाजनार्दनीं ॥ ४ ॥

॥ १३२० ॥ कृष्णाविण दुजें नेणती काया वाचा ॥ झाला पांडवांचा सहाकारी ॥ १ ॥ वारिलें संकट भक्ताचा अंकीत ॥ धांवेची त्वरीत नाम घेतां ॥ २ ॥ भोजनाची आस न धरी मानसीं ॥ धांवतो त्वरेसी नाम घेतां ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं नामाची आवडी ॥ घालितसे उडी वैकुंठाहुनी ॥ ४ ॥

॥ १३२१ ॥ अवचट दैवयोगें नाम येत मुखा ॥ त्रैलोक्याचा सखा प्राणी होय ॥ १ ॥ आवडी आदरें उच्चारी जो नाम ॥ वैकुंठ निजधाम तया सुख ॥ २ ॥ एकाजनार्दनीं नामाची ही थोरी ॥ होतसे बोहरी कली पापा ॥ ३ ॥

॥ १३२२ ॥ वैखरी वाचा वदे रामकृष्ण ॥ धन्य वंश संपूर्ण जगीं त्याचा ॥ १ ॥ आठवी नित्य नाम सदा वाचें ॥ कळी काळ त्याचे चरण चुरी ॥ २ ॥ शिव विष्णु ब्रह्मा इंद्रादिक देव ॥ करिती गौरव त्याचा बहू ॥ ३ ॥ जनार्दनाचा एका सांगतसे उपाव ॥ धरा नामीं भाव दृढ जनीं ॥ ४ ॥

॥ १३२३ ॥ अनुभवें नाम गातां ती गणिका ॥ मोक्षपद देखा प्राप्त जालें ॥ १ ॥ उलट्या अक्षरीं वाला तो तरला ॥ उद्धार तो केला चोखियाचा ॥ २ ॥ यातीसी संबंध नाहीं नामस्मरणीं ॥ जपोत पैं कोणी आदरें नाम ॥ ३ ॥ जनार्दनीं एका सांगतसे खूण ॥ श्रीरामनाम पूर्ण सोडूं नये ॥ ४ ॥

॥ १३२४ ॥ श्रीराम श्रीराम सदां ज्याचे वाचा ॥ त्या प्राणीयासी

साचा दंडवत ॥ १ ॥ घेईन पायवणी वंदीन मस्तकीं ॥ देईन हस्तकीं क्षेम त्यासी ॥ २ ॥ तयाचा भार वाहे अंकितपणें ॥ नोहेची उत्तीर्ण जन्मोजन्मीं ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं श्रीराम वाचे ॥ वदतां पातक नासे कोटी जन्मांचें ॥ ४ ॥

॥ १३२५ ॥ नारदु ब्रह्मचारी ॥ रामनामें नाचे निर्धारीं ॥ १ ॥ ब्रह्मवीणा घेउनी खांदीं ॥ रामनाम मुखीं समाधिस्थ ॥ २ ॥ एकाजनार्दनीं नाम ॥ श्रीरामें पाविजे निजधाम ॥ ३ ॥

॥ १३२६ ॥ सदा सर्वकाळ नाम मुखीं गाये ॥ आणिक तें नये दुजा हेत ॥ १ ॥ धन्य त्याची माय पावन तें कुळ ॥ धन्य तो निर्मळ वंश त्याचा ॥ २ ॥ जन्म जन्मांतरींचें सुकृत पदरीं ॥ वाचे तो उच्चारी रामकृष्ण ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं सदा जपें नाम ॥ तो देह उत्तम इह लोकीं ॥ ४ ॥

॥ १३२७ ॥ प्राणी गुंतले संसारश्रमा ॥ न कळे महिमा नामाचा ॥ १ ॥ नामें तरले पातकी ॥ मुक्त जाले तिहीं लोकीं ॥ २ ॥ व्यास शुकादिक पावन ॥ नामेंची पावले बहुमान ॥ ३ ॥ वाल्हा कोळी अजामेळ ॥ गणिकादि महा चांडाळ ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं नाम पावन ॥ पातकी उद्धरिले परिपूर्ण ॥ ५ ॥

॥ १३२८ ॥ उंच नीच नाहीं नामाचीया पुढें ॥ जातीचें तें गाढें नाहीं काम ॥ १ ॥ अनामिकाहुनी असोत चांडाळ ॥ परि नामाचा उच्चार मुखीं वसे ॥ २ ॥ यवनादि नीच असोत भलते ॥ परि नाम सर्वदा तें मुखीं वसो ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं नाम वसो मुखीं ॥ तेणें तो तिहीं लोकीं सरता होय ॥ ४ ॥

॥ १३२९ ॥ नाम मुखीं गातां विषयाची वार्ता ॥ नोहेची सर्वथा गातीयासी ॥ १ ॥ नाम तें पावन नाम तें पावन ॥ नामा वांचुनी जाण श्रेष्ठ कोण ॥ २ ॥ एकाजनार्दनीं नाम तें पावन ॥ त्रिभुवनीं मंडण नाम सत्य ॥ ३ ॥

॥ १३३० ॥ सकळ साधनांचें सार ॥ जनार्दन इतका उच्चार ॥ १ ॥ येणें घडे सर्व कर्म ॥ नको भेदाभेद वर्म ॥ २ ॥ सांडा द्वैताचा भाव ॥ तेणें सर्व दिसे वाव ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं भाव ॥ भाव तेथें वसे देव ॥ ४ ॥

॥ १३३१ ॥ सकळ पापांपासोनी मुक्त ॥ वाचें उच्चारीत रामहरी ॥ १ ॥ ऐसा महिमा वेद सांगे ॥ नका आड मार्गें जाऊं कोण्ही ॥ २ ॥ भावें करितां भगवद्भक्ती ॥ मोक्षप्राप्ति तात्काळ ॥ ३ ॥ स्वानंदें भगवद्भजन ॥ एका वंदी त्याचे चरण ॥ ४ ॥

॥ १३३२ ॥ सागरीं वर्षला घन ॥ वृथा जाय तें जीवन ॥ १ ॥ योगीयासी शीण तैसा ॥ आदि आभासा अवसानीं ॥ २ ॥ अनुभवुनी पहातां योग ॥ नोहे व्यंग मग कांहीं ॥ ३ ॥ ह्मणे जनार्दनीं एका ॥ योग निका रामनाम ॥ ४ ॥

॥ १३३३ ॥ जेथें हरिनामाचा गजर ॥ कर्म पळतसे दूर ॥ १ ॥ नाम निर्दाळी पापातें ॥ वदती शास्त्रें ऐशीं मतें ॥ २ ॥ पापाचे पर्वत ॥ नाम निर्दाळी सत्य ॥ ३ ॥ नाम जप जनार्दन ॥ एकाजनार्दनीं पावन ॥ ४ ॥

॥ १३३४ ॥ प्रेमयुक्त नाम अधर घेतां ॥ तेथें नाहीं सुखदुःख वार्ता ॥ १ ॥ नामीं धरुनी आवडी ॥ उच्चारावें घडोघडीं ॥ २ ॥ योग याग तप साधन ॥ नाम उच्चारितां संपूर्ण ॥ ३ ॥ ऐसा नामीं निजध्यास ॥ एकाजनार्दनीं त्याचा दास ॥ ४ ॥

॥ १३३५ ॥ नामधारकाचा ॥ दास होईन मी साचा ॥ १ ॥ आणीक नको थोरपण ॥ वाचें वदों त्याचे गुण ॥ २ ॥ नामीं सदा वसों हेत ॥ हेंचि मागणें मागत ॥ ३ ॥ हेंची द्यावें कृपादान ॥ एकाजनार्दनीं शरण ॥ ४ ॥

॥ १३३६ ॥ नामधारक होका भलता ॥ त्याचे चरणीं ठेवीन माथा ॥ १ ॥ न ह्मणे उत्तम अधम ॥ मुखीं जपतां रामनाम ॥ २ ॥ याति कुळाचें कारण ॥ नाहीं नाहीं नामाविण ॥ ३ ॥ नाम जपे तोची श्रेष्ठ ॥ एकाजनार्दनीं वरिष्ठ ॥ ४ ॥

॥ १३३७ ॥ असोनी उत्तम कुळीं ॥ नाम नाहीं ज्याचे कुळीं ॥ १ ॥ जन्मुनी अधम कुळीं ॥ सदा जपे नामावळी ॥ २ ॥ कुळासी तों नाहीं काज ॥ नाम वदतांची निज ॥ ३ ॥ नाम पावन हें जनीं ॥ शरण एकाजनार्दनीं ॥ ४ ॥

॥ १३३८ ॥ नाम पावन तिही लोकीं ॥ मुक्त झाले महापातकी ॥ १ ॥

नाम श्रेष्ठाचें हें श्रेष्ठ ॥ नाम जपे तो वरिष्ठ ॥ २ ॥ नाम जपे नीळकंठ ॥ वंदिताती श्रेष्ठ श्रेष्ठ ॥ ३ ॥ नाम जपे हनुमंत ॥ तेणें अंगीं शक्तिवंत ॥ ४॥ नाम जपे पुंडलीक ॥ उभा वैकुंठनायक ॥ ५ ॥ नाम ध्यानीं मनीं देखा ॥ जपे जनार्दनीं एका ॥ ६ ॥

॥ १३३९ ॥ नामें तारिले तारिले ॥ महापातकी उद्धरिले ॥ १ ॥ तें हें सोपें रामनाम ॥ जपतां निवारे क्रोध काम ॥ २ ॥ नामें पावन जाले क्षिती ॥ ऐसें पुराणें गर्जती ॥ ३ ॥ नाम साराचें हें सार ॥ एकाजनार्दनीं निर्धार ॥ ४ ॥

॥ १३४० ॥ अबद्ध पढतां वेद बाधी निषेध ॥ नाम पढतां अबद्ध श्रोते होती श्रुद्ध ॥ १ ॥ नाम तेंची ब्रह्म नाम तेंची ब्रह्म ॥ नामापासी नाहीं कर्माकर्म ॥ धृ० ॥ स्वधर्म करितां जें होय व्यंग ॥ अच्युतनामें तें समूळ होय सांग ॥ २ ॥ अबद्ध मंत्र जपतां जापक चळलें ॥ अबद्ध नाम जपतां जडमूढ तरले ॥ ३ ॥ नामापासी नाहीं विधि विधान ॥ आसनीं शयनीं भोजनीं नाम पावन ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं निज नाम नेटी ॥ ब्रह्मी ब्रह्मरूप सरसी सम साटी ॥ ५ ॥

॥ १३४१ ॥ रामरसा चाखोरे मजकु विषय न भावे ॥ लागीं ब्रह्म खुमारी ॥ रामनाम प्यारे भरभर पिवही ॥ त्वं पद मिती विसारी ॥ धृ० ॥ पंचतत्व भटी वीवेक महुवा ॥ वैराग्य आग निजगाई ॥ १ ॥ अतिमदें माता कबहु उतरे ॥ नृसगीत विवोदीहो ॥ वासना वास छुटी तुटी पडे ॥ लाज गई समाधी हो ॥ २ ॥ धर्माधर्म दुई निज पय छोडे ॥ वृत्य शून्य गमागमहो ॥ आराम निगम खाये फुटाणे ॥ करते कर्म निःकर्महो ॥ ३ ॥ मृत्यु पर न मारे जरे जरा खाइ ॥ देहीं देहे विदेही हो ॥ एकाजनार्दनीं ऐक्य समरसें ॥ सहजी सहज सिद्धि पायीहो ॥ ४ ॥

॥ १३४२ ॥ रामनाम जपतो ह्मणुनी आचरला दोष ॥ श्रवण मनन भक्ति पडियेली ओस ॥ १ ॥ रामनामाचेनि बळें कराल अधर्म ॥ देवाचेनि तुमचें शुद्ध नव्हें कर्म ॥ २ ॥ निताप मांडवी शुळावरी वाहिला ॥ इतुकिया दोषासाठीं यम दासीपुत्र केला ॥ ३ ॥ सत्यव्रत आचरला धर्म एकभाव नीट ॥ असत्य वचनासाठीं झडला अंगुष्ट ॥ ४ ॥ दुर्वासाचें पाप अंबऋषीस

दिधला शाप ॥ देवाचेनि चक्रें दिधला संताप ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं संत सोईनें चाले ॥ सद्गुरूचें कृपें सबाह्य शुद्ध झालें ॥ ६ ॥

॥ १३४३ ॥ तैसें विनटो रामनामा ॥ पहिलेंपण कैचें आह्मां ॥ १ ॥ गंगा मिळाली सागरीं ॥ ते परतेना ब्रह्मगिरी ॥ २ ॥ लोह परिसेसी झगटे ॥ तेथें काळीमा कैंची भेटे ॥ ३ ॥ नीच रतली रायासी ॥ तिला कोण ह्मणेल दासी ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं ह्मणे ॥ चहु देहा सुटल्या गांठी ॥ ५ ॥

॥ १३४४ ॥ तुह्मी कां राम स्मरा नाहो ॥ धृ० ॥ चरणीं अहिल्या पावन केली ॥ सती गौतम ललना ॥ तुह्मी० ॥ १ ॥ स्मरतां शंकर शीतळ झाला ॥ करितां विषपानाला ॥ २ ॥ एकाजनार्दनीं तारिल निश्चय ॥ त्रिंबक या दीनाला ॥ ३ ॥

॥ १३४५ ॥ नाम न ह्मणे तो आवडी ॥ वाचे भलतेंचि बडबडी ॥ ॥ १ ॥ जिव्हा नामाची वाचक ॥ आळसें भोगीत तो नर्क ॥ २ ॥ व्यर्थ टवाळ्याच्या गोष्टी ॥ वाचे रामनाम नुठी ॥ ३ ॥ आस त्याची पैं वांकुडी ॥ अखंड वाचेसी रोकडी ॥ ४ ॥ आरालियां करी निंदा ॥ पण न ह्मणे तो गोविंदा ॥ ५ ॥ निंदे परतें नाहीं पाप ॥ सत्य जाणा माझे बाप ॥ ६ ॥ गर्जती नामाचे पवाडे ॥ कळीकाळ पायां पडे ॥ ७ ॥ एकाजनार्दनीं नाम ॥ तया न बाधी क्रोध ॥ ८ ॥

॥ १३४६ ॥ रामनामाची हे ख्याती ॥ कर्मा कर्माची निवृत्ती ॥ १ ॥ रामनामाचेनि बळें ॥ ब्रह्म सर्वत्रैक मिळे ॥ २ ॥ जंव जंव उच्चारीजे नाम ॥ तंव तंव प्रगटे मेघःश्याम ॥ ३ ॥ कृष्ण विष्णु हरि गोविंद ॥ ह्मणतां प्रगटे परमानंद ॥ ४ ॥ व्रत तप यज्ञ दान ॥ नाम नामासी साधन ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं कीर्ती ॥ सहज चैतन्याची स्थिती ॥ ६ ॥

॥ १३४७ ॥ मन धांवे विषयावरी ॥ राम ह्मणतां हे वैखरी ॥ १ ॥ कैसें होता हें स्मरण ॥ स्मरण नाहीं विस्मरण ॥ २ ॥ नामरूपा नाहीं मेळ ॥ नुसता वाचेचा गोंधळ ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं छंद ॥ बोलामाजी तो गोविंद ॥ ४ ॥

॥ १३४८ ॥ राम मिठा लगा ॥ सब सुख हम त्यागा ॥ धृ० ॥ हम

तो भये राजारामके शिपाई ॥ दिल घोडा डागा ॥ १ ॥ घर बैठे हम करते चाकरी ॥ कबहुन हुवा नागा ॥ २ ॥ एकाजनार्दन यंवकर बोले ॥ मुख मागत मागा ॥ ३ ॥

॥ १३४९ ॥ षड्साची नावडे चवी ॥ रामनाम सावकाश सेवी ॥ १ ॥ मठ मिठी पडली तोंडीं ॥ रामनामाची घेतली गोडी ॥ २ ॥ नाम किर्तीचा केला उधळा ॥ अवधानाची साखर घाला ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं उडी ॥ एकपणाची घेतली गोडी ॥ ४ ॥

॥ १३५० ॥ हरी जागरू आला वैष्णव समूह मीनला ॥ सकळीकी मिळोनि थोर उत्साह केला ॥ भक्तीचेनि बळें घातली असे कास ॥ कळीकाळासी वास ॥ तेथें पाहवेना ॥ १ ॥ रंगीं नाचती बागडे हरिदास सवंगडे ॥ वैष्णव गाढे सरसावले ॥ धृ० ॥ एकताळी दुताळी वाहाती ॥ धुमाळी गाताती रसाळी रामनामें ॥ नामाचेंनि बळें अभिनव ज्याची चर्या ॥ त्याचेनि तेजें सूर्य काय हरपला ॥ २ ॥ यापरी वैष्णव गाती एकाजनार्दन ॥ हरिपदीं समान अवघेंचि केलें ॥ एकाकी पाहतां न दिसे भाव भिन्न ॥ जिंतुनि अभिमान विश्व सुखी केलें ॥ ३ ॥

॥ १३५१ ॥ प्रल्हाद नारद पराशर पुंडलीक ॥ व्यास अंबऋषि आत्मनिष्ठ शुक ॥ १ ॥ हे महा भागवत निज भावें स्मरत ॥ समाधान चित्त ॥ सहज पावे ॥ धृ० ॥ शौनक भीष्म देवो ॥ अर्जुन ज्ञानबाहो ॥ बकदाल्भ्य रुक्मांगदा ॥ भगवद्भजनीं भावो ॥ २ ॥ वसिष्ठ ज्ञानयुक्त ॥ बिभीषणादि भक्त ॥ एकाजनार्दन भक्त ॥ नाम स्मरत ॥ ३ ॥

॥ १३५२ ॥ मी तूं सोडूनि गांठी ॥ नांदविसी सकळ सृष्टी ॥ तरंग जैसा सागरापोटीं ॥ तैसा मी तुजमाजी उठी ॥ १ ॥ राम राम ह्मणते कवण ॥ रामीं तूंच होसी रामपण ॥ एकाजनार्दना शरण ॥ एका एकी होय परिपूर्ण ॥ २ ॥

॥ १३५३ ॥ आह्मा येणें नाहीं जाणें नाहीं ॥ साचा त्याच बोली ॥ कर्म धर्म नीति थोर थोर ॥ जीवा वेद वाद अति परात्पर ॥ १ ॥ तेथें विधि निषेध दोन्ही ॥ आम्ही न देखो नायको कानीं ॥ धृ० ॥ जयाचें चरण करितां स्मरण ॥ बाधूं न शके मानापमान ॥ गुरुनामें हरे कामहो ॥ येथें

पाहिजे आपुला भावो ॥ एकाजनार्दन चिदानंदघन ॥ अनुभवा अनुभवहो ॥ २ ॥

॥ १३५४ ॥ भावें पाहतां नारायण ॥ नरनारायण आपेआपण ॥ १ ॥ देखिलें माये देखणी देखते ॥ नरनारायण नांदे स्वयें समस्ते ॥ धृ० ॥ बद्रिकाश्रमीं घाला घालूं आला काम ॥ काम क्रोध लोभ हरिनामें निःकाम ॥ २ ॥ नरनारायण जन आणि वन ॥ एकाजनार्दना अवघें चैतन्यघन ॥ ३ ॥

॥ १३५५ ॥ श्वानाचा परी काळा स्वरवर्ण आडताळा सकळा मंत्रींसाचा पाहीं ॥ आसनीं भोजनीं शयनीं गमनागमनीं राम ह्मणतां दोष नाहीं ॥ १ ॥ श्रीराम राम श्रीराम राम जपतां हे द्वेअक्षर नाम ॥ संसारातें दळीसी कळी काळातें कळीसी निरसेल कर्माकर्म ॥ धृ० ॥ योग याग तपें तपताती बापुडें जनधनें शिणताती वेडें ॥ निःशंक निर्लज्ज हरिनाम गातां पाय वाटा वैकुंठ चढे ॥ २ ॥ रामनामें वाचा गर्जत उठी ॥ अमर येतां त्याचे भेटी ॥ तिर्थाचे समुदाय अंघ्रिरेणु वांछिती ॥ श्रुति एकोठाति गोष्टी ॥ ३ ॥ गुढ गुह्य जाप्य शिवाचें श्रीराम ते नामीं जयाचा भावो ॥ तेणें नामें भुलला वैकुंठ सांडोनी किर्तनीं नाचतो देवो ॥ ४ ॥ सकळीका साधनामाजी हें नाम भावें जपा राम राम ॥ एकाजनार्दनीं किर्तनीं तोषला पुरविला निष्काम काम ॥ ५ ॥

॥ १३५६ ॥ नामें भक्ति नामें मुक्ती ॥ नामें परम गति गणिका पाई ॥ १ ॥ नामें जप नामें तप ॥ नामें निष्पाप अजामेळ ॥ धृ० ॥ नामें प्रल्हाद तार्‍यो गज उद्धर्‍यो ॥ नामें भवबंध कांठीं डार्‍यो ॥ २ ॥ रामनामें आचार नामें विचार ॥ नामें परात्पर परमगती ॥ ३ ॥ नामें अंबऋषि घटो जन्मवासी ॥ नाम अहर्निशी शंभु जपे ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं नामें निष्पाप ॥ भवभय नाहींरे ताप ॥ ५ ॥

॥ १३५७ ॥ रामनामें वाजे टाळी ॥ रामु चाळकु करतळी ॥ १ ॥ ऐसी वाजतां शुद्ध टाळी ॥ राम सांपडे करतळी ॥ धृ० ॥ टाळी गजरें गर्जे गगन ॥ हरुषें ओळला आनंदघन ॥ २ ॥ एकाजनार्दनु गाय गजरी ॥ तें फळ देखो हातावरी ॥ ३ ॥

॥ १३५८ ॥ निवारी भव जन्म नारायण नाम ॥ तेंचि तूं सप्रेम उच्चा-

रीकां ॥ १ ॥ हस्त पादादिक करितु कां काम ॥ वाचा काय करी ह्मणे राम राम ॥ २ ॥ नरहरी हरी शिव राम राम ॥ अच्युतानंत गोविंद पुरुषोत्तम ॥ ३ ॥ नारायण नाम श्रेष्ठ पैं साचे ॥ दोष अजामेळाचे तेणें क्षाळीले ॥ ४ ॥ तृणभार कोडी इंगळी जाळी ॥ पातकाची होळी नामें ऐके ॥ ५ ॥ नामेंविण वाया जातसे क्षण ॥ आली नागवण कां नेणसी ॥ ६ ॥ कुंटणीं अवचटें ह्मणीतला राम ॥ वैकुंठ निजधाम तिसी पैं झाले ॥ ७ ॥ हरी नामस्मरणीं सकळा अधिकारू ॥ ब्रह्म क्षेत्रीं शुद्र स्त्रियाजन ॥ ८ ॥ द्रौपदी सांकडी राम ह्मणे आवडी ॥ नेसतीं लुगडीं देव झाला ॥ ९ ॥ शस्त्र अग्नि देख प्रल्हादासी देख ॥ नव्हेची बाधक रामनामें ॥ १० ॥ तेंचि नामीं तूं धरिसील भावो ॥ जेथींचा तेथें देव प्रगट होय ॥ ११ ॥ ध्रुव केवळ बाळ तें झालें अढळ ॥ लाहोनीया बळ हरीनामाचें ॥ १२ ॥ तेंचि नाम तूं ह्मणसील आवडी ॥ घरींचा घरीं जोडी परब्रह्म जोडे ॥ १३ ॥ नित्य नामस्मरण भावें करितां जाण ॥ जनीं जनार्दन प्रगट दिसे ॥ १४ ॥ एकाजनार्दनीं निज नाम छंदू ॥ देहींच गोविंदु विदेह करील ॥ १५ ॥

---

## कीर्तन महात्म्य.

॥ १३५९ ॥ नित्य नवा कीर्तनीं कैसा वोढवला रंग ॥ श्रोता आणि वक्ता स्वयें जाला श्रीरंग ॥ १ ॥ आल्हादें वैष्णव करती नामाचा घोष ॥ हरिनाम गर्जतां गगनीं नमाये हरुष ॥ २ ॥ पदोपदीं किर्तनीं निवताहे जनीं मन ॥ आवडी भुकेली तिणें गिळिलें गगन ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं गातां हरीचें नाम ॥ निमालीं इंद्रियें विषय विसरलीं काम ॥ ४ ॥

॥ १३६० ॥ जें पदीं निरूपण तेंचि हृदयीं ध्यान ॥ तेथें सहजीं स्थिर राहे मन ॥ कीर्तनासी तोषोनी कळिकाळ तुष्टला ॥ समाधीसी समाधान रे ॥ १ ॥ कीर्तनें सिद्धी कीर्तनें सिद्धी ॥ कीर्तनें समानबुद्धी ॥ कीर्तनीं विनटले नारद प्रल्हाद ॥ द्वंद्वामाजीं समाधीरे ॥ २ ॥ कीर्तनीं सद्भाव अखंड अहर्निशीं ॥ पाप न रिघे साच्या देशीं ॥ निजनामें निष्पाप अंतर देखोनी ॥ देव तिष्ठे तयापाशीं रे ॥ ३ ॥ हरिनाम कीर्तनें अभिमान सरे ॥ आणीक श्रेष्ठ आहे काज ॥ सद्भावें कीर्तनीं गातां पैं नाचतां ॥ लोकेपणा सांडी लाजरे ॥ ४ ॥ कलीमाजी कीर्तन श्रेष्ठ पैं साधन ॥ साच नमानी ज्याचें मन ॥ नामासी विन्मुख जन्म त्यासी दुःख ॥ त्या केवि होय समा-

धान रे ॥ ५ ॥ कीर्तनाचेनी पंथें लाजविलीं तीर्थें ॥ जप तपासी केलें मुक्त ॥ हरिनामें लाधला देवाधिदेवो ॥ वैकुंठची केलें तेथें रे ॥ ६ ॥ व्रतां तपां तीर्थां न भेटे जो पाहतां ॥ तो कीर्तनीं सांपडे देवो ॥ तनु मन प्राणें कीर्तनीं विनटले ॥ भावा विकिला वासुदेवो रे ॥ ७ ॥ एकाजनार्दनीं कीर्तन भावें ॥ श्रोता वक्ता ऐसें लाहावें ॥ गर्जत नामें निशाण लागुनी ॥ सकळिकीं वैकुंठासी जावेंरे ॥ ८ ॥

॥ १३६१ ॥ कीर्तनीं आवडी जया नरा देखा ॥ चुकतील खेपा जन्मकोटी ॥ १ ॥ कीर्तनीं समाधि कीर्तनीं समाधी ॥ तुटे आधिव्याधि कीर्तनेंची ॥ २ ॥ कीर्तनें बोध कीर्तनें सिद्धी ॥ एकाजनार्दनीं गोविंदीं कीर्तनीं ऐक्य ॥ ३ ॥

॥ १३६२ ॥ कीर्तनाची आवडी देवा ॥ वैकुंठाहूनि घाली धांवा ॥ १ ॥ नवल वैकुंठींच नसे ॥ तो कीर्तनीं नाचतसे ॥ २ ॥ भाळ्या भोळ्यांसाठीं ॥ धांवे त्याच्या पाठोपाठीं ॥ ३ ॥ आपुलें सुख तया द्यावें ॥ दुःख आपण भोगावें ॥ ४ ॥ दीनानाथ पतीतपावना ॥ एकाजनार्दनीं वचना ॥ ५ ॥

॥ १३६३ ॥ कीर्तनश्रेष्ठ कलियुगीं सेवा ॥ तरले पातकी ते देवा ॥ १ ॥ वाल्हा तारिला कीर्तनीं ॥ पावन जाला त्रिभुवनीं ॥ २ ॥ गणिका कीर्तनें तरली ॥ मोक्षधामा ती नेली ॥ ३ ॥ आजामेळ चोखामहार ॥ कीर्तनीं तरले अपार ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं कीर्तन ॥ तिन्ही लोक जाले पावन ॥ ५ ॥

॥ १३६४ ॥ हरिजागरणीं दिवस आनंदें सौरस ॥ गावया उल्हास वैष्णवासी ॥ गातां पैं नाचतां तया जाला पैं बोधू ॥ सामाजीं गोविंदु क्रीडतसे ॥ १ ॥ चला चलारे भाई हरिजागरा वेगीं ॥ वैष्णव हे रंगीं नाचताती ॥ धृ० ॥ स्वानंदें लवलाह्या उभवोनी सात्विका बाह्या ॥ आलिंगूं कान्हया अष्टभावीं ॥ दुजेपणाविण खेव पडलीसे मिठी ॥ सांगणें पुसणें गोष्टी हारपली ॥ २ ॥ यापरि वैष्णव रंगीं करिताती आल्हाद ॥ उसळला आनंद सांठवेना ॥ एकाएकीं होउनी मिनला जनार्दना ॥ तेणें सुखें मना उमजु नाहीं ॥ ३ ॥

॥ १३६५ ॥ तरले तरती भरंवसा ॥ कीर्तनमहिमा हा ऐसा ॥ १ ॥ ह्मणोनिया हरीचे दास ॥ कीर्तन करिती सावकाश ॥ २ ॥ एकाजनार्दनीं कीर्तन ॥ आनंदें होती ते पावन ॥ ३ ॥

॥ १३६६ ॥ कीर्तनाची देवा आवडी ॥ ह्मणोनी धांवे तो तातडी ॥ १ ॥ सुख कीर्तनीं अद्भुत आहे ॥ शंकरराज जाणताहे ॥ २ ॥ गोडी सेविती संतजन ॥ येरां नकळे महिमान ॥ ३ ॥ ऐसा कीर्तनसोहळा ॥ एकाजनार्दनीं पहा डोळां ॥ ४ ॥

॥ १३६७ ॥ कीर्तनें सिद्धि कीर्तनें सिद्धी ॥ कीर्तनें निरसे आधिव्याधी ॥ १ ॥ कीर्तनें काया कीर्तनें माया ॥ कीर्तनें सर्व एके ठाया ॥ २ ॥ द्वंद्व द्वैत भेद नुरेची ठाव ॥ कीर्तनीं तिष्ठे उभाची देव ॥ ३ ॥ निद्रेमाजीं वोसण देवो ॥ ह्मणे मज ठावो कीर्तनीं ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं कीर्तनासाठीं ॥ देव धांवे भक्तापाठीं ॥ ५ ॥

॥ १३६८ ॥ जेथें सर्वदा कीर्तनघोष ॥ जाती दोष पळुनी ॥ १ ॥ यमधर्म सांगे दूता ॥ तुह्मी सर्वथा जाऊं नका ॥ २ ॥ जेथें स्वयें हरि उभा ॥ कोण शोभा तुमची ॥ ३ ॥ तुह्मीं रहावें उभें पुढें ॥ आलें कोडें निवारावें ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं कीर्तन ॥ श्रेष्ठ सर्वांहुनी जाण ॥ ५ ॥

॥ १३६९ ॥ साधन नको आणिक कांहीं॥ करी लवलाही कीर्तन ॥ १ ॥ मोक्ष मुक्ति ठाके पुढें ॥ येर अवघें तें बापुडें ॥ २ ॥ भक्ति साधे नवरत्नें ॥ कीर्तनें होती ते पावन ॥ ३॥ एकाजनार्दनीं कीर्तन ॥ अहं सोहं कोहं जाती पळून ॥ ४ ॥

॥ १३७० ॥ योगी शिणती साधनीं ॥ पावन होती ते कीर्तनीं ॥ १ ॥ अष्टांग धूम्रपान ॥ तया श्रेष्ठ हें साधन ॥ २ ॥ समाधि उन्मनी ॥ कीर्तनीं पावन हे दोनी ॥ ३ ॥ चौदेहांसी अतीत ॥ कीर्तनें होती ते मुक्त ॥ ४ ॥ कर्म धर्म नलगे श्रम ॥ व्यर्थ वाउगा विश्राम ॥ ५ ॥ कीर्तन छंद निशिदिनीं ॥ एका शरण जनार्दनीं ॥ ६ ॥

॥ १३७१ ॥ या हो या चला जाऊं कीर्तना ॥ आनंद तेणें मना नाचती वैष्णव ॥ १ ॥ रामकृष्णहरि वासुदेवा ॥ गाताती प्रेम भावा आवडी आदरें ॥ २ ॥ सुख तेथें शांति विरक्ति कोण पुसे ॥ सबाह्य अभ्यंतरीं अवघा वासुदेव वसे ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं वासुदेवीं मन ॥ जन वन तेथें अवघा जनार्दन ॥ ४ ॥

॥ १३७२ ॥ धन्य भाग्याचे जन इहलोकीं ॥ कीर्तनें जाले सुखी

कृतकृत्य ॥ १ ॥ पातकी घातकी यांसी सोपा पंथ ॥ कीर्तनें सरते कलीमाजी ॥ २ ॥ योग याग व्रत तप कल्पकोडी ॥ कीर्तन श्रवण गोडी तेथें नाहीं ॥ ३ ॥ वेद शास्त्र पुराण श्रुतीचें अनुमोदन ॥ करारे कीर्तन कलीमाजी ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं आल्हादें कीर्तन ॥ करितां श्रोते वक्ते जाण पावन होती ॥ ५ ॥

॥ १३७३ ॥ नारदें केलासे प्रश्न ॥ सांगतसे जगज्जीवन ॥ कलीमाजी प्रमाण ॥ कीर्तन करावें ॥ १ ॥ महा पापीया उद्धार ॥ पावन करती हरीहर ॥ ब्रह्मादि समोर ॥ लोटांगण घालिती ॥ २ ॥ श्रुति स्मृति वाक्यार्थ ॥ कीर्तन तोची परमार्थ ॥ शास्त्राचा मथितार्थ ॥ कीर्तन पसारा ॥ ३ ॥ एका शरण जनार्दन ॥ कीर्तनें तरती विश्वजन ॥ हें प्रभूचें वचन ॥ धन्य धन्य मानावें ॥ ४ ॥

॥ १३७४ ॥ येती कीर्तना आल्हादें ॥ गाती नाचती परमानंदें ॥ सुखाचे ते दोंदें ॥ आनंदें तयासी ॥ १ ॥ धन्य धन्य कीर्तन ॥ धन्य धन्य संतजन ॥ जाले कीर्तनीं पावन ॥ परमानंद गजरीं ॥ २ ॥ हरि कृष्ण गोविंद ॥ हाची तया नित्य छंद ॥ तेणें जाय भेदाभेद ॥ कीर्तन गजरीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सार ॥ कीर्तनीं केलासे निर्धार ॥ आणिक नाहीं दुजा विचार ॥ कीर्तनावांचूनी ॥ ४ ॥

॥ १३७५ ॥ क्षीरसागर सांडोनी हरी ॥ कीर्तनीं उभा सहपरिवारीं ॥ लक्ष्मी गरुड कामारी ॥ होती तया कीर्तनीं ॥ १ ॥ आलीया विघ्न निवारी आपण ॥ शंख चक्र गदा हातीं घेऊन ॥ सुदर्शनकौस्तुभ मंडित जाण ॥ उभा असे चतुर्भुज ॥ २ ॥ गरुड तिष्ठे जोडिल्या करीं ॥ लक्ष्मीं तेथें कामारी ॥ ऋद्धि सिद्धि सहपरिवारीं ॥ तिष्ठतातीं स्वानंदें ॥ ३ ॥ कीर्तन गजरें वाहे टाळीं ॥ महादोषांची होय होळी ॥ एकाजनार्दनीं गदारोळीं ॥ नामोच्चार आनंदें ॥ ४ ॥

॥ १३७६ ॥ गरुड हनुमंतादि आपण ॥ सामोरा येत जगज्जीवन ॥ १ ॥ आवडी कीर्तनीं ऐशी ॥ लक्ष्मी तेथें प्रत्यक्ष दासी ॥ २ ॥ मोक्षादिका नव्हे वाड ॥ येरा कोण वाहे काबाड ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं भुलला ॥ उघडा कीर्तनीं रंगला ॥ ४ ॥

॥ १३७७ ॥ समाधीचें स्थान हरिकीर्तन ॥ येर अवघा वाया शीण ॥ कासया गुदाग्रीं अंगुष्ठ लाऊन ॥ खटाटोप पसारा ॥ १ ॥ राम कृष्ण हरि वासुदेवा ॥ हाची छंद असो जीवा ॥ धृ० ॥ आसन ध्यानमुद्रा लक्षण ॥ कर्मकांड क्रिया धर्म जाण ॥ वाउगी कासया भस्म लेपन ॥ कीर्तन अंतरीं नसेची ॥ २ ॥ माळा मुद्रा शृंगार भारी ॥ भाळेभोळे भोंदी निरंतरीं ॥ ऐशी कीर्तन मर्यादा नाहीं निर्धारीं ॥ निरापेक्ष हरिकीर्तन ॥ ३ ॥ श्रोता वक्ता होउनी सावधान ॥ परनिंदा परपीडा टाकून ॥ कीर्तन करावें श्रवण ॥ रामकृष्ण नामें उच्चार ॥ ४ ॥ ऐसें ऐसें ऐकतां कीर्तन ॥ समाधिसी तेथें समाधान ॥ अष्टांगादि कर जोडोन ॥ उभे सर्वदा राहाती ॥ ५ ॥ कीर्तनें होय सर्व सिद्धी ॥ तुटती भवपाश आधिव्याधी ॥ एकाजनार्दनीं नाहीं उपाधी ॥ कीर्तन श्रवण केलीया ॥ ६ ॥

॥ १३७८ ॥ काया वाचा मनें निग्रह करी ॥ कीर्तन सर्वभावें ऐके निर्धारीं ॥ अष्टांग साधन न करी ॥ सुखें करी कीर्तन ॥ १ ॥ देव तुष्टेल तुष्टेल ॥ सर्व भाव तुझा पुरवेल ॥ धृ० ॥ शांति क्षमा दया उन्मनी ॥ आशा मनीषा तृष्णा दवडोनी ॥ काम क्रोध मद लोभ बंदीखानीं ॥ घाली नेउनी निर्धारें ॥ २ ॥ सर्वांभूतीं समदृष्टी ॥ पाहे सर्व एकमय सृष्टी ॥ तरी ऐक्य कीर्तन गोष्टी ॥ परमानंदें आल्हाद ॥ ३ ॥ धरी संताचा सांगात ॥ कीर्तनीं करी शुद्ध चित्त ॥ एकाजनार्दनीं वचनार्थ ॥ राम हरि गोविंद ॥ ४ ॥

॥ १३७९ ॥ आणिक तें आम्हा न दिसे प्रमाण ॥ कीर्तनावांचून आनु नेणों ॥ १ ॥ राम कृष्ण हारि विठ्ठल उच्चार ॥ करूं हा गजर वाहूं टाळी ॥ २ ॥ आनंदें नामावळी गाऊं पैं कीर्तनीं ॥ श्रुति टाळ घोळ लाउनी गजरेंसी ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं हाची आम्हा छंद ॥ वाउगा तो धंदा न करूं कांहीं ॥ ४ ॥

॥ १३८० ॥ वाउगा पसारा नेणें तो पामर ॥ कीर्तनीं निर्धार ठेवीचिना ॥ १ ॥ सोपें हें वर्म कीर्तन हरीचें ॥ उच्चारी रे वाचें रामनाम ॥ २ ॥ एकाजनार्दनीं कीर्तन आदरें ॥ सर्वभावें निर्धारें श्रवण करी ॥ ३ ॥

॥ १३८१ ॥ नरदेहा येवोनी करावें कीर्तन ॥ वाचें नामस्मरण विठ्ठलाचें ॥ १ ॥ आणिक सायास न करी आळस ॥ सर्वकाळ सोस हाची

वाहे ॥ २ ॥ घटिका आणि पळ न वेंची वाया ॥ नामस्मरणीं काया झिजवावी ॥ ३ ॥ प्रपंच परमार्थ करी कांरे सारखा ॥ संसार पारखा करुनी सांडी ॥ ४ ॥ मायीक हें धन इष्ट मित्र सखे ॥ अंतकाळीं पारखे अवघे चोर ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं न धरी भरंवसा ॥ कोण यमपाशा चुकवील ॥ ६ ॥

॥ १३८२ ॥ देह लावी हरिकीर्तनीं ॥ येर कारणीं पडूं नको ॥ १ ॥ सोडी संसाराचा छंद ॥ कीर्तनीं गोविंद आठवी ॥ २ ॥ होई दास संत चरणीं ॥ पायवणी वंदी तूं ॥ ३ ॥ काया लावी देवाकडे ॥ येर सांकडें वारील ॥ ४ ॥ अनुमोदन सर्वां ठाईं ॥ मन देईं हरि चरणीं ॥ ५ ॥ म्हणे जनार्दनाचा एका ॥ काया वाचा भाविका सांगत ॥ ६ ॥

॥ १३८३ ॥ जों जों काळ वेंचितां कीर्तनीं ॥ तों तों सार्थक जनीं होतसे ॥ १ ॥ साधन जागा सावध जागा ॥ पुढें दगा चुकवी ॥ २ ॥ करी कीर्तनीं तूं वेग ॥ तेणें संग तुटेल ॥ ३ ॥ म्हणे जनार्दनाचा एका ॥ उपाय सोपा कलीमाजीं ॥ ४ ॥

॥ १३८४ ॥ एक कीर्तन करितां पंढरीसी ॥ सुकृताच्या राशी ब्रह्मा नेणें ॥ १ ॥ संतसमागम टाळ घोळ नाद ॥ ऐकतां गोविंद सुख पावे ॥ २ ॥ जनार्दनाचा एका करी विनवणी ॥ मस्तक चरणीं ठेवितसे ॥ ३ ॥

॥ १३८५ ॥ हरिकीर्तन नामोच्चार ॥ जे नर करिती वारंवार ॥ तया नाहीं संसार ॥ ब्रह्मादि देव वंदिती ॥ १ ॥ कीर्तन महिमा नारदू ॥ जाणतसे परमानंदू ॥ जालासे सर्वां वंदू ॥ देवां असुर मानवां ॥ २ ॥ कीर्तन महिमा परिक्षिती ॥ जाणतसे परम प्रीतीं ॥ अंतीं सायुज्यता मुक्ती ॥ पावती झाली ॥ ३ ॥ कीर्तनमहिमा जाणे शुक ॥ जाणती ते व्यासादिक ॥ वाल्मिकादि सर्व सुख ॥ कीर्तनें सरते ॥ ४ ॥ कीर्तनमहिमा जाणे प्रल्हादू ॥ तोडीयेला माया कंदू ॥ कोरडें काष्ठीं गोविंदू ॥ प्रगटला ॥ ५ ॥ कीर्तनमहिमा जाणे बळी ॥ याचक झाला वनमाळी ॥ एकाजनार्दनीं कली ॥ कीर्तनें न पीडी ॥ ६ ॥

॥ १३८६ ॥ आजी परमानंदु मानसीं ॥ संत भेटतां सुखराशी ॥ कीर्तनें तारिलें सर्वांसी ॥ विठ्ठल नामस्मरणें ॥ १ ॥ धन्य धन्य विठ्ठलमंत्र ॥ सोपा तीन अक्षरी पवित्र ॥ कळीकाळ उघडोनी नेत्र ॥ पाहूं न शके

जयासी ॥ २ ॥ एकाजनार्दनीं शुद्ध भक्ती ॥ कीर्तनें प्राप्त सर्व स्थिती ॥ जयजय राम कृष्ण ह्मणती ॥ ते तरती कलीमाजी ॥ ३ ॥

॥ १३८७ ॥ ब्रह्मादिक देव त्याचे रंगीं नाचती ॥ सनकादिक त्याचे ध्रुवपद धरिती ॥ १ ॥ त्यापुढें गीत नृत्य करिती ॥ त्यापुढें मानव केवीं ताल धरिती ॥ २ ॥ हरि हरि हरि ह्मणतां वाचे ॥ हरिरंगीं नाचे तोची धन्य ॥ ३ ॥ शास्त्राची व्युत्पत्ति प्रसन्न वागेश्वरी ॥ ती सारजा मुख्य करी नृत्य तेथें ॥ ४ ॥ शास्त्र अभिमानानें चढला ताठा ॥ मुक्ति ते फुकटा अंतरले ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं स्वहितीं तूं नाचे ॥ बोलणें अभावाचें बोलूं नको ॥ ६ ॥

॥ १३८८ ॥ हरिकीर्तनालागीं प्रल्हाद गाढा ॥ द्वंद्वांचा रगाडा तेणें केला ॥ १ ॥ कोरडीया काष्ठीं प्रगटले हरी ॥ ह्मणवोनी नृत्य करी तयापुढें ॥ २ ॥ विणा वाहतु गातु नारदु नाचे ॥ नकळे तयाचें महिमान ॥ ३ ॥ जनाभिमानें धरिली प्रतिष्ठा ॥ वंचला करंटा मुक्तीसीच ॥ ४ ॥ साच अथवा लटिकें नाच तूं रंगीं ॥ अभिमान भंगीं पैं होय ॥ ५ ॥ निरभिमानीया जवळींच देवो ॥ एकाएकीं भावो जनार्दनीं ॥ ६ ॥

॥ १३८९ ॥ महा पापराशी तरले कीर्तनीं ॥ प्रत्यक्ष पुराणीं वंद्य जाले ॥ १ ॥ वाल्हा आजामेळ तारिली गणिका ॥ त्रैलोकीं देखा सरते जाले ॥ २ ॥ कीर्तनें दोष पळती रानोरान ॥ यापरतें आन दुजें नाहीं ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं कीर्तनसार ॥ तेणें पैलपार उतरलों ॥ ४ ॥

॥ १३९० ॥ मधुपर्कादिक नावडे पूजन ॥ आवडे कीर्तन भाविकाचें ॥ १ ॥ शंख चक्रादिक नावडती मनीं ॥ वोडवितसे पाणी भाजीपाना ॥ २ ॥ लक्ष्मीसारखी नावडे ती जीवा ॥ आवडे या देवा तुळशी बुक्का ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं कीर्तनीं नाचे ॥ आणिक सुख त्याचें नये मना ॥ ४ ॥

॥ १३९१ ॥ कीर्तन ते पूजा कीर्तन ते भक्ति ॥ कीर्तनें होय मुक्ति सर्व जीवां ॥ १ ॥ पातकी चांडाळ असोत भलते ॥ कीर्तनीं सरते कलियुगीं ॥ २ ॥ कीर्तन श्रवण मनन पठण ॥ कीर्तनें पावन तिन्ही लोक ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं कीर्तनीं आवडी ॥ घालितसे उडी वैकुंठाहुनी ॥ ४ ॥

॥ १३९२ ॥ कीर्तनाचें थोर सुख ॥ यदुनायक राहे उभा ॥ १ ॥ भाळे

भोळे घेती नाम ॥ करिती आराम कीर्तन ॥ २ ॥ नाना साधनांचे वोढीं ॥ नलगे सांकडी सोसाव्या ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं सोपें बहू ॥ कीर्तनीं पाहूं देवातें ॥ ४ ॥

॥ १३९३ ॥ नसे वैकुंठीं अणुमात्र ॥ नाचतो पवित्र कीर्तनीं ॥ १ ॥ त्याचा छंद माझे मनीं ॥ अनुदिनीं कीर्तन ॥ २ ॥ नेणें कांहीं दुजें आतां ॥ कीर्तनापरता छंद नाहीं ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं वेध ॥ कीर्तनछंद गोड देवा ॥ ४ ॥

॥ १३९४ ॥ एकचि नाम वाचें ॥ श्रीरामाचें सर्वकाळ ॥ १ ॥ पर्वत उल्लंघी पापाचे ॥ नाम वाचे वदतांची ॥ २ ॥ आवडी करितां कीर्तन ॥ नासे भवाचें बंधन ॥ ३ ॥ श्रेष्ठसाधन कीर्तन ॥ तेणें तोषे जनार्दन ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं कीर्तन ॥ मना होय समाधान ॥ ५ ॥

॥ १३९५ ॥ सेवितां कथासार अमृत ॥ तेणें गाढे जाले भक्त ॥ १ ॥ मातले मरणातें मारिती ॥ धाकें पळती यमदूत ॥ २ ॥ प्रेमें नाचे कथामेळीं ॥ सुखकल्लोळीं हरिनाम ॥ ३ ॥ गर्जती नाम सदा वाचें ॥ एकाजनार्दनीं तेथें नाचे ॥ ४ ॥

॥ १३९६ ॥ ऐशी कीर्तनाची आवडी ॥ प्रायश्चित्तें जालीं देशधडी ॥ १ ॥ होती तीर्थें तीं बापुडीं ॥ मळ रोकडीं टाकिती ॥ २ ॥ ऐकोनी कीर्तनाचा गजर ॥ ठकला यमलोकींचा व्यापार ॥ ३ ॥ यमपाश टाकिती खालीं ॥ देखोनी कीर्तनाची चाली ॥ ४ ॥ ऐसा कीर्तन सोहळा ॥ एकाजनार्दनीं देखे डोळा ॥ ५ ॥

॥ १३९७ ॥ देखोनी कीर्तनाची गोडी ॥ देव धांवे लवडसवडी ॥ १ ॥ वैकुंठींहुनी आला ॥ कीर्तनीं तो सुखें धाला ॥ २ ॥ ऐसा कीर्तनाचा गजर ॥ देव नाचतसे निर्भर ॥ ३ ॥ भुलला कीर्तनीं ॥ एका शरण जनार्दनीं ॥ ४ ॥

॥ १३९८ ॥ निर्लज्ज होउनी नाचे महाद्वारीं ॥ वाचें वदे हरी सर्वकाळ ॥ ॥ १ ॥ व्रत करी सदां नामाचें पारणें ॥ अखंड तें पेणें रामकृष्ण ॥ २ ॥ पंढरीची वारी घडे सर्वकाळ ॥ कीर्तनकल्लोळ मुखीं सदा ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं भजनीं सादर ॥ सर्व येरझार खुंटे त्याची ॥ ४ ॥

॥ १३९९ ॥ नवल भजनाचा भावो ॥ स्वतां भक्तची होय देवो ॥ १ ॥

वाचें करती हरिकीर्तन ॥ उन्मनी मन निशीदिनीं ॥ २ ॥ नाहीं प्रपंचाचें भान ॥ वाचें सदां नारायण ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं मुक्त ॥ सबाह्य अभ्यंतरीं पतीत ॥ ४ ॥

॥ १४०० ॥ नेणे वेदशास्त्र पुराण पठन ॥ तेणें नामकीर्तन करावें ॥ १ ॥ कलीमाजीं सोपा मार्ग ॥ तरावया जग उत्तम हें ॥ २ ॥ नोहे यज्ञ याग योग व्रत ॥ करावें व्रत एकादशी ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं सार ॥ वाचें उच्चार हरिनाम ॥ ४ ॥

॥ १४०१ ॥ हरिनामीं ज्याची प्रीती ॥ सदां वानिती हरिनाम ॥ १ ॥ धन्य धन्य जन्म त्याचा ॥ उच्चार वाचा हरिनाम ॥ २ ॥ नेणती शीण योग यागीं ॥ घेती जगीं हरिनाम ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं हरिनाम ॥ उमेसी सांगे राम जप करी ॥ ४ ॥

॥ १४०२ ॥ दुजा छंद नोहे वाचें ॥ वदे साचें हरिनाम ॥ १ ॥ कोटी कुळें होतीं पावन ॥ नाम स्मरण करतांची ॥ २ ॥ यम न पाहे तयाकडे ॥ वाडें कोडें नमस्कारी ॥ ३ ॥ विधि शची उमारमण ॥ वंदिती चरण आवडी ॥ ४ ॥ ह्मणे जनार्दनाचा एका ॥ उपाय नेटका कलियुगीं ॥ ५ ॥

॥ १४०३ ॥ भगवंताची नाम कीर्ती ॥ अखंड वाचें जे वदती ॥ १ ॥ धन्य तेची संसारीं ॥ वाचें उच्चारी हरिनाम ॥ २ ॥ प्रपंचाचें नोहे कोड ॥ पुरे चाड हरिनामें ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं नाम गोड ॥ होय निवाड जन्माचा ॥ ४ ॥

॥ १४०४ ॥ कीर्तनासाठीं चारी मुक्ती ॥ उभ्या रावती हरिदासा ॥ १ ॥ कलियुगीं हेंची सार ॥ करावें साचार कीर्तन ॥ २ ॥ कृत त्रेत द्वापारीं ॥ कीर्तनमहिमा परोपरी ॥ ३ ॥ एका तयांसी शरण ॥ कीर्तन करिती अनुदिन ॥ ४ ॥

॥ १४०५ ॥ जन्ममरणाचें निवारेल दुःख ॥ करितां देख कीर्तन ॥ १ ॥ नारद प्रल्हाद अंबऋषी ॥ विनटले कीर्तनासी ॥ २ ॥ व्यास शुक वामदेव ॥ धरिती भाव कीर्तनीं ॥ ३ ॥ एका त्याचा दास खरा ॥ करी पसारा कीर्तन ॥ ४ ॥

॥ १४०६ ॥ कीर्तनें तोषे अधोक्षज ॥ राखी लाज भक्तांची ॥ १ ॥

धांवे द्रौपदीचे पानासाठीं ॥ भीड मोठी कीर्तनाची ॥ २ ॥ दहा गर्भवास सोसले ॥ उणें नाहीं आलें भक्ताचें ॥ ३ ॥ एका विनवी जनार्दनीं ॥ कीर्तनीं प्राणी धन्य होती ॥ ४ ॥

॥ १४०७ ॥ शामचतुर्भुज पीतांबरधारी ॥ शंख चक्र मिरवे करी ॥ १ ॥ आला पुंडलीका कारणें ॥ आवडी कीर्तनें धरुनी ॥ २ ॥ युगें अठ्ठावीस जालीं ॥ न बैसे उभा समपाउलीं ॥ ३ ॥ कीर्तनीं धरुनीया हेत ॥ उभा राहिला तिष्ठत ॥ ४ ॥ एका शरण जनार्दनीं ॥ अनुदिनीं करा कीर्तन ॥ ५ ॥

॥ १४०८ ॥ हरिकीर्तनें चित्त शुद्ध ॥ जाय भेद निरसुनी ॥ १ ॥ काम क्रोध पळती दुरी ॥ होत भोंवरी महापाप ॥ २ ॥ गजरें हरीचें कीर्तन ॥ पशु पक्षी होती पावन ॥ ३ ॥ स्त्री पुरुषां अधिकार ॥ कीर्तनसार कलियुगीं ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं उपाय ॥ तरावया भवनदीसी ॥ ५ ॥

॥ १४०९ ॥ कीर्तनीं स्वधर्म वाढे ॥ कीर्तनीं जोडे चित्तशुद्धी ॥ १ ॥ ऐसा महिमा कीर्तनाचा ॥ शुक सांगे परीक्षिती साचा ॥ २ ॥ होती पावन अधम जन ॥ करितां कीर्तन कलियुगीं ॥ ३ ॥ एका साचा दासानुदास ॥ जाती कीर्तनास आवडी जे ॥ ४ ॥

॥ १४१० ॥ कीर्तनानंदें चारी मुक्ती ॥ धांवत येती घरासी ॥ १ ॥ सोपें सार सोपें सार ॥ कीर्तन उच्चार कलियुगीं ॥ २ ॥ वाहतां टाळी कीर्तनछंदें ॥ जाती वृंदें पातक ॥ ३ ॥ एका विनटला कीर्तनीं ॥ भुक्ति-मुक्ति लागती चरणीं ॥ ४ ॥

॥ १४११ ॥ जुनाट कीर्तनमहिमा ॥ तया काय देऊं उपमा ॥ १ ॥ धन्य धन्य हरीचे दास ॥ करती आस कीर्तनीं ॥ २ ॥ मागें तरले पुढें तरती ॥ पहा प्रचीति पुराणीं ॥ ३ ॥ ह्मणोनी एका काकुलती ॥ कीर्तन करा दिनराती ॥ ४ ॥

॥ १४१२ ॥ हेंचि कलीमाजीं साधन ॥ आवडी कीर्तन हरीचें ॥ १ ॥ नघडे योग याग तप ॥ होय अनुताप कीर्तनीं ॥ २ ॥ भाव भक्ति लागे हातीं ॥ प्रेम धरिती कीर्तनीं ॥ ३ ॥ आवडी धरा हरिकीर्तनीं ॥ एका शरण जनार्दनीं ॥ ४ ॥

॥ १४१३ ॥ कीर्तनीं प्रल्हाद तरला ॥ बिभीषण मुक्त झाला ॥ १ ॥

ऐसा कीर्तनमहिमा ॥ गणिका नेली निजधामा ॥ २ ॥ तारले वानर असुर ॥ कीर्तनीं पावन चराचर ॥ ३ ॥ गाई गोपाळ संवगडे ॥ कीर्तनीं तरले वाडेकोडे ॥ ४ ॥ अजामेळ उद्धरिला ॥ कीर्तनीं आल्हाद भला ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं कीर्तन ॥ कलीकल्मष नाशी क्षण ॥ ६ ॥

॥ १४१४ ॥ सदैव आवडे ज्यां कीर्तन ॥ धन्य पावन जगीं ते ॥ १ ॥ ब्रह्मचारी गृहस्थाश्रमी ॥ कारिती कीर्तन निजधामीं ॥ २ ॥ शुद्ध अथवा अति निंद्य ॥ कीर्तनीं वंद्य सर्वथा ॥ ३ ॥ यवन मातंगादी जन ॥ कीर्तनीं पावन कलीयुगीं ॥ ४ ॥ एका शरण जीवेंभावें ॥ सदा कीर्तन करावें ॥ ५ ॥

॥ १४१५ ॥ देवासी प्रिय होय कीर्तन ॥ नाचे येऊन आनंदें ॥ १ ॥ न विचारी यातिं कुळ ॥ असोत अमंगळ भलतैसे ॥ २ ॥ करती कीर्तन अनन्य भावें ॥ ते पढीये जीवेंभावें ॥ ३ ॥ शरण एकाजनार्दनीं ॥ कुळें पावन होतीं कीर्तनीं ॥ ४ ॥

॥ १४१६ ॥ वसो कां भलते ठाईं जन ॥ परी कीर्तन करी हरीचें ॥ १ ॥ तोची सर्वांमध्यें वरिष्ठ ॥ एकनिष्ठपणें होतां कीर्तनीं ॥ २ ॥ मनीं वसो सदां कीर्तन ॥ अहर्निशीं ध्यान कीर्तनीं ॥ ३ ॥ पावन तो तीहीं लोकीं ॥ एका अवलोकी तयातें ॥ ४ ॥

॥ १४१७ ॥ अपाय उपाय न टाकी कीर्तन ॥ सदां सर्वकाळ ध्यान राम कृष्ण ॥ १ ॥ तयाचीये घरीं वसे नारायण ॥ लक्ष्मीसह आपण कार्य करी ॥ २ ॥ एकाजनार्दनीं कीर्तनासाठीं ॥ देव धांवें पाठीं त्या मागें ॥३॥

॥ १४१८ ॥ करुनी कीर्तन मागती जे द्रव्य ॥ तें जाणावें वैधव्य विधवेचें ॥ १ ॥ सर्व अळंकार शरीर शोभलें ॥ वाया परी गेलें कुंकूं हीन ॥ २ ॥ मानवानें भावें करावें कीर्तन ॥ आनंदें नर्तन वैष्णवांपुढें ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं कामनिक कीर्तन ॥ करितां पतन जन्मोजन्मीं ॥ ४ ॥

॥ १४१९ ॥ करुनी हरिकीर्तन ॥ तेथें सेविती जे अन्न ॥ १ ॥ ऐसे अभागी खळ ॥ परम चांडाळ कलीयुगीं ॥ २ ॥ हरिकथा माउली ॥ विकिताती अर्थें भुली ॥ ३ ॥ पंचमहापातक ॥ तया घडे दोष देख ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं ॥ करा कीर्तन अनुदिनीं ॥ ५ ॥

॥ १४२० ॥ कीर्तनाची मर्यादा कैसी ॥ देव सांगे उद्धवासी ॥ १ ॥

गावें नाचावें सावडें ॥ न घालावें कोडें त्या कांहीं ॥ २ ॥ मिळेल तरी खावें अन्न ॥ अथवा पर्णें तीं भक्षून ॥ ३ ॥ जाईल तरी जावो प्राण ॥ परी न संडावें कीर्तन ॥ ४ ॥ किरकीर आणूं नये पाठीं ॥ बोलूं नये भलती गोष्टी ॥ ५ ॥ स्वयें उभा राहून ॥ तेथें करी मी कीर्तन ॥ ६ ॥ घात आलीया निवारी ॥ माता जैसी बाळावरी ॥ ७ ॥ बोले उद्धवासी गुज ॥ एकाजनार्दनीं बीज ॥ ८ ॥

॥ १४२१ ॥ देवासी दुजें नावडे सर्वथा ॥ करितां हरिकथा समाधान ॥ १ ॥ येउनी नाचे कीर्तनीं सर्वदां ॥ निवारी आपदा सर्व साची ॥ २ ॥ भाविकासाठीं मोठा लोभापर ॥ नाचतो निर्भर कीर्तनांत ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं आवडे कीर्तन ॥ ह्मणोनी वैकुंठसदन नावडेची ॥ ४ ॥

॥ १४२२ ॥ नसे वैकुंठीं हरी ॥ नाचे कीर्तनीं परोपरी ॥ भक्ता बरोबरी ॥ पाठीं धांवें तयाच्या ॥ १ ॥ ह्मणोनी करावें कीर्तन ॥ तेणें तुष्टे नारायण ॥ मनोरथ करी पूर्ण ॥ इच्छिले ते सर्वदां ॥ २ ॥ आणा अनुभव मनीं ॥ करा कीर्तन अनुदिनीं ॥ एकाजनार्दनीं ॥ उभा असे कीर्तनीं ॥ ३ ॥

॥ १४२३ ॥ उद्धवा तूं करी कीर्तन ॥ अनन्यभावें माझें भजन ॥ नको आणीक साधन ॥ या परतें सर्वथा ॥ १ ॥ धरी प्रेम सदा वाचे ॥ कीर्तन रंगीं तूं नाचे ॥ मी तूं पण साचें ॥ अंगीं न धरी कांहीं ॥ २ ॥ भाळे भोळे जन ॥ गाती अनुदिनीं कीर्तन ॥ तेथें अधिष्ठान ॥ माझें जाण सर्वथा ॥ ३ ॥ नको चुकूं तया ठाईं ॥ बसें सर्वदां मीही ॥ एकाजनार्दनीं पाही ॥ कीर्तनीं वसे सर्वदां ॥ ४ ॥

॥ १४२४ ॥ भुलले ते प्राणी विसरले कीर्तना ॥ अंतीं या पतना वारी कोण ॥ १ ॥ जयांसी नावडे हरीचें कीर्तन ॥ ते जाणावे पाषाण कलीमाजीं ॥ २ ॥ मागें सांगितलें संतीं अनुभवुनी ॥ तरावया जनीं कीर्तन नौका ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं साराचें हें सार ॥ कीर्तनें भवपार मृत्युलोकीं ॥ ४ ॥

॥ १४२५ ॥ पुरुष अथवा नारी ॥ नाचती कीर्तनीं गजरीं ॥ १ ॥ तया कोण्ही जे हांसती ॥ त्यांचे पूर्वज नर्का जाती ॥ २ ॥ आपुली आपण ॥ कीर्तनीं सोडवण ॥ ३ ॥ देहीं असोनी विदेहता ॥ कीर्तनीं होय पैं तत्त्वता ॥ ४ ॥ ऐसा कीर्तनमहिमा ॥ एका जनार्दनीं उपमा ॥ ५ ॥

॥ १४२६ ॥ सर्वभावें जे जाले उदास ॥ धरूनिया आस कीर्तनीं ॥१॥ सर्वकाळ सर्व वाचे ॥ सर्व साचें कीर्तन ॥२॥ सर्वा देहीं सर्व विदेहीं ॥ सर्वी वदवी कीर्तन ॥ ३ ॥ सर्व मनीं सर्व ध्यानीं ॥ सर्वा ठिकाणीं कीर्तन ॥ ४ ॥ सर्व देशीं सर्व गांवीं ॥ एका भावीं कीर्तन ॥ ५ ॥

॥ १४२७ ॥ वेदाचीया मतें विसरुनी कीर्तन ॥ करती जे पठन शीण सांसी ॥ १ ॥ वेदाचा अर्थ नकळेची पाठका ॥ कीर्तनीं नेटका भाव सोपा ॥ २ ॥ श्रुतीचेनी मतें पाहे तो उच्चार ॥ परी सारासार विचार कीर्तनची ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं पुराणाच्या गोष्टी ॥ कीर्तन वाक्पुटीं करा सुखें ॥ ४ ॥

॥ १४२८ ॥ दीन ह्मणोनी नाचरे कीर्तनीं ॥ तेणें चक्रपाणी करी कृपा ॥ १ ॥ अनाथाचा नाथ पतीत पावन ॥ ह्मणोन कीर्तन तया गोड ॥ २ ॥ एकाजनार्दनीं गोडाचें तें गोड ॥ कीर्तन सुरवाड तिहीं लोकीं ॥ ३ ॥

॥ १४२९ ॥ मृगजळीं पहातां दिसतसे जळ ॥ परी तें कोरडेंची केवळ ॥ १ ॥ तेवीं दिसे जगदाभास ॥ अवघा मिथ्या साभिलाष ॥ २ ॥ जेथें मिथ्या द्वैत भाविक ॥ पहातां जनार्दनची एक ॥ ३ ॥ तरंग हरपलें पाणी ॥ शरण एकाजनार्दनीं ॥ ४ ॥

॥ १४३० ॥ ऐशी शांति जयासी देखा ॥ तोची सर्व भूतांचा सखा ॥ १ ॥ सर्व लोकीं आवडता ॥ जाला सरता कीर्तनीं ॥ २ ॥ नवलावो तयाचा भावो ॥ सर्वांठाईं देखे देवो ॥ ३ ॥ सर्व दृष्टीचा देखणा ॥ शरण एका जनार्दना ॥ ४ ॥

॥ १४३१ ॥ नरदेह उत्तम चांग ॥ धरा लाग कीर्तनीं ॥ १ ॥ वाया जाऊं नेदी घडी ॥ करा जोडी कीर्तन ॥ २ ॥ क्षणभंगुर हा देहो ॥ करा लाहो कीर्तनीं ॥ ३ ॥ संसार अवघा नासे ॥ खरें दिसे कीर्तन ॥ ४ ॥ ह्मणे जनार्दनीं एका ॥ उपाय निका कीर्तन ॥ ५ ॥

॥ १४३२ ॥ वायाची आयुष्य जातसें खरें ॥ उपाय तो बरें हरि एक ॥ १ ॥ अवघा वेळ अवघा काळ ॥ नका पोकळ घालवूं ॥ २ ॥ जे जे घडी जे जे वेळीं ॥ करा कल्लोळीं हरिकथा ॥ ३ ॥ शरण एकाजनार्दनीं ॥ भजा अनुदिनीं संतांसीं ॥ ४ ॥

॥ १४३३ ॥ कर्मी गुंतले उत्तमोत्तम ॥ भजनीं उद्धरिले अधमाधम

॥ १ ॥ भजनमहिमा निःसीम ॥ अधमा पदवी हे उत्तम ॥ २ ॥ एकाजनार्दनीं भजन ॥ पावन होती अधम जन ॥ ३ ॥

॥ १४३४ ॥ वमिल्या मिष्टान्ना ॥ परतोनी श्रद्धा न धरी रसना ॥ १ ॥ ऐसे आठवतां माझे गुण ॥ मिथ्या ठाईं नसे भान ॥ २ ॥ जेथें कर्माचे परिपाठी ॥ हें तों पुन्हां नये गोष्टी ॥ ३ ॥ येव्हडें कथेचें महिमान ॥ एकाजनार्दना शरण ॥ ४ ॥

॥ १४३५ ॥ गव्हांची राशी जोडिल्या हातीं ॥ सकळ पक्वान्नें तैं होती ॥ १ ॥ ऐसा नरदेह उत्तम जाण ॥ वाचें वदे नारायण ॥ २ ॥ द्रव्य जोडतां आपुले हातीं ॥ सकळ पदार्थ घरा येती ॥ ३ ॥ भावें करी संतसेवा ॥ एकाजनार्दनीं प्रिय देवा ॥ ४ ॥

॥ १४३६ ॥ सप्रेम करितां भजन ॥ नोहे भवाचें बंधन ॥ १ ॥ भक्ताचे आधीन देवो ॥ नाहीं नाहीं संदेहो ॥ २ ॥ भक्तीची एवढी गोडी ॥ वैकुंठाहुनी घाली उडी ॥ ३ ॥ भक्तामाजी देव असे ॥ देवाअंगीं भक्त दिसे ॥ ४ ॥ ऐशी परस्परें मिळणी ॥ शरण एका जनार्दनीं ॥ ५ ॥

॥ १४३७ ॥ भक्त देवातें भजती ॥ देव भक्तीं धरीं प्रीती ॥ १ ॥ ऐसा एकमेकांचा ठावो ॥ भक्ता अंगीं देव पहाहो ॥ २ ॥ अलंकार एक सुवर्ण ॥ तैसें नाहीं दुजेपण ॥ ३ ॥ एक आधीं एक पाठी ॥ एकाजनार्दनीं रहाटी ॥ ४ ॥

॥ १४३८ ॥ सर्प बिळामाजी रिगे ॥ हें तों देखती सवेगें ॥ १ ॥ तैसा योगीयाचा योग ॥ सर्पापरी भूमी व्यंग ॥ २ ॥ दावितां आचारू ॥ हांसताती लहान थोरू ॥ ३ ॥ ह्मणती येक कर्मठ ॥ येक ह्मणती योगभ्रष्ट ॥ ४ ॥ एक निंदिती वंदिती ॥ ऐशी आहे योगस्थिती ॥ ५ ॥ यापरीस उत्तम साधन ॥ एकाजनार्दनीं शरण ॥ ६ ॥

॥ १४३९ ॥ सर्वात्मक भरला देवो ॥ तेथें न ठेविती भावो ॥ १ ॥ ऐशीं भुललीं कर्मासी ॥ आचरती तीं दोषासी ॥ २ ॥ सर्वांठाईं व्यापक हरी ॥ कोण द्वेषी कोण वैरी ॥ ३ ॥ ऐसे अभागी ते हीन ॥ भोगिताती जन्मपतन ॥ ४ ॥ नको ऐसें ब्रह्मज्ञान ॥ एकाजनार्दनीं शरण ॥ ५ ॥

## पंढरी महात्म्य.

॥ १४४० ॥ पिकली पंढरी पीटिला दांडोरा ॥ केणें आलें घरा सभागीयांच्या ॥ १ ॥ चंद्रभागेतीरीं उतरलें बंदर ॥ आले सवदागर साधुसंत ॥ २ ॥ वैष्णव मिळोनी केला असे सांठा ॥ न घे तो करंटा अभागीया ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं आले गिऱ्हाईक ॥ वस्तु अमोलीक सांठविली ॥ ४ ॥

॥ १४४१ ॥ वारकरी पंढरीचा ॥ धन्य धन्य जन्म त्याचा ॥ १ ॥ जाय नेमें पंढरीसी ॥ चुकों नेदी तो वारीसी ॥ २ ॥ आषाढी कार्तिकी ॥ सदा नाम गाय मुखीं ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं करी वारी ॥ धन्य तोचि बा संसारीं ॥ ४ ॥

॥ १४४२ ॥ साधन तें सार पंढरीची वारी ॥ आन तूं न करी सायासाचें ॥ १ ॥ वेद तो घोकितां चढे अभिमान ॥ नाडेल तेणें जाण साधन तें ॥ २ ॥ शास्त्र मत वाद कासया पसार ॥ करी सारासार वारी येक ॥ ३ ॥ पुराण सांगतां मन वेडावलें ॥ निंदूं जें लागलें आणिकासी ॥ ४ ॥ ग्रंथ पहावे तरी आयुष्य क्षणीक ॥ व्यर्थ खटपट करुनी काई ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं साराचें पैं सार ॥ विठ्ठल त्रिअक्षर जपकरी ॥ ६ ॥

॥ १४४३ ॥ पंढरी ज्याचा नेम ॥ तो न करी अन्य कर्म ॥ १ ॥ सांडुनीया विठ्ठल राजा ॥ आणिक देव नाहीं दुजा ॥ २ ॥ सांडुनीया चंद्रभागा ॥ कोण जाय आणीके गंगा ॥ ३ ॥ सांडोनीया पुंडलीका ॥ कोण आहे आणिक सखा ॥ ४ ॥ सांडोनिया वेणुनाद ॥ कोण आहे थोर पद ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं भाव ॥ अवघा विठ्ठलचि देव ॥ ६ ॥

॥ १४४४ ॥ बहुजन्मांचे सायास ॥ विटे उभा हृषीकेश ॥ पाहे पुंडलीकास ॥ समचरणीं ॥ १ ॥ जाई जाई पंढरपुरा ॥ स्नान करीं तूं भींवरा ॥ जन्माचा तो फेरा ॥ तेणें चुके ॥ २ ॥ व्रत करी एकादशी ॥ जागरण अहर्निशीं ॥ संत सभेसरसी ॥ टाळी वाहे ॥ ३ ॥ आळस तूं न करी ॥ वाचें ह्मणे विठ्ठल हरी ॥ सांडोनीया थोरी ॥ नाम घे आवडी ॥ ४ ॥ जनीं वसे जनार्दन ॥ एका दृढ धरी चरण ॥ अर्पियेलें तन मन ॥ विठ्ठल वाचें ॥ ५ ॥

॥ १४४५ ॥ पंढरीये पांडुरंग ॥ भोंवता संग संताचा ॥ १ ॥ चंद्रभागा

वाळुवंट ॥ आहे नीट देव उभा ॥ २ ॥ पुंडलीक वेणुनाद ॥ होतो आनंद अखंड ॥ ३ ॥ पद्मतळें गोपाळपुर ॥ संतभार आहे तेथें ॥ ४ ॥ वैष्णवांचा गजर मोठा ॥ आषाढी चोहटा नाचती ॥ ५ ॥ जाऊं तेथें लोटांगणीं ॥ फिटेल आयणी गर्भवास ॥ ६ ॥ भोळे भाळे येती भक्त ॥ आनंदें नाचत वाळुवंटीं ॥ ७ ॥ लोटांगण घालूं चरणीं ॥ शरण एकाजनार्दनीं ॥ ८ ॥

॥ १४४६ ॥ डोळीयाची भूक हारपली ॥ पाहतां श्री विठ्ठल माउली ॥ १ ॥ पुंडलीकें बरवें केलें ॥ परब्रह्म उभें ठेलें ॥ २ ॥ अठ्ठाविस युगें झालीं ॥ अद्यापि न बैसे खालीं ॥ ३ ॥ उगा राहिला तिष्ठत ॥ आलियासी क्षेम देत ॥ ४ ॥ ऐसा कृपाळु दीनाचा ॥ एकाजनार्दनीं साचा ॥ ५ ॥

॥ १४४७ ॥ आलिंगोनी देव भक्त ॥ सरते एकरूपी होत ॥ १ ॥ तें हें पहा पंढरपुर ॥ देव भक्त तीर्थ माहेर ॥ २ ॥ आलीयासी दान ॥ नामामृतचि पान ॥ ३ ॥ जैसा ज्याचा हेत ॥ पुरवितसे रुक्मिणी कांत ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं शरण ॥ दाखवा पंढरी पावन ॥ ५ ॥

॥ १४४८ ॥ तया ठाईं अभिमान नुरे ॥ कोड अंतरींचें पुरे ॥ १ ॥ तें हें जाणा पंढरपुर ॥ उभा देव विटेवर ॥ २ ॥ आलिंगनें काया ॥ होतसे तया ठाया ॥ ३ ॥ चंद्रभागे स्नान ॥ तेणें पूर्वजां उद्धरण ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं शरण ॥ पंढरी भूवैकुंठ जाण ॥ ५ ॥

॥ १४४९ ॥ तेथें मुख्य हरिहर ॥ शोभे चंद्रभागातीर ॥ १ ॥ जाऊं चला पंढरपुरा ॥ भेटूं आपुल्या माहेरा ॥ २ ॥ आर्त सांगूं जीवींचा ॥ पुनीत ठाव हाचि साचा ॥ ३ ॥ हरिहरा होय भेटी ॥ वास तयासी वैकुंठीं ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं शरण ॥ पंढरी पुण्यठाव भींवरा जाण ॥ ५ ॥

॥ १४५० ॥ एकदां जारे तेथवरी ॥ पहा पुंडलीक हरी ॥ १ ॥ जन्मा आलीया विश्रांती ॥ निरसेल अवघी भ्रांती ॥ २ ॥ विठ्ठल पाईं ठेवा भाळ ॥ जन्म मग तुमचा सुफळ ॥ ३ ॥ पुंडलीका नमस्कार ॥ विनवणी जोडोनी कर ॥ ४ ॥ ह्मणे एकाजनार्दनीं ॥ पंढरी पुण्याची अवनी ॥ ५ ॥

॥ १४५१ ॥ संसारा आलीया जारे पंढरपुरा ॥ पांडुरंग सोयरा पहा

आधीं ॥ १ ॥ पुरती मनोरथ इच्छिले ते साचे ॥ अनंता जन्मांचे दोष जाती ॥ २ ॥ करितात स्नान भीमरथी तटीं ॥ पुंडलीक दृष्टी लक्षुनीया ॥ ३ ॥ वेणुनाद गया पिंडदान फळ ॥ गोपाळपुर सकळ देखिलीया ॥ ४ ॥ एका जनार्दनीं साराचें तें सार ॥ पंढरी माहेर सकळ जीवां ॥ ५ ॥

॥ १४५२ ॥ त्रिभुवना परती पंढरीये पेंठ ॥ उभा तो वैकुंठ विटेवरी ॥ १ ॥ पहा चला जाऊं पंढरीये ॥ नवस पुरती सये अंतरींचे ॥ २ ॥ उभा विटेवरी घेउनी बुंथी ॥ शंख चक्र गदा पद्म हातीं शोभती ॥ ३ ॥ राही रुक्मिणी उभ्या दोही दो बाहीं ॥ चामरें मयूरपिच्छ ढाळिती ठाईं ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं पाहतां रूप ॥ पाहतां पाहतां जालें मन तद्रूप ॥ ५ ॥

॥ १४५३ ॥ दक्षिण द्वारका पंढरी ॥ शोभतसे भीमातीरीं ॥ १ ॥ चला जाऊं तया ठाया ॥ वंदूं संतांचीया पाया ॥ २ ॥ नाचूं हरुषें वाळुवंटीं ॥ पुंडलीक पाहुनी दृष्टी ॥ ३ ॥ पद्मतळें पाहतां डोळा ॥ सुख सोहळा आनंद ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं विठ्ठल भेटी ॥ लाभेंलाभ दुणावे पोटीं ॥ ५ ॥

॥ १४५४ ॥ भींवरेचे तीरीं उभा ॥ धन्य शोभा विठ्ठल ॥ १ ॥ विटेवरी सम चरण ॥ तेथें मन गुंतलें ॥ २ ॥ संत जाती तया ठाया ॥ मजही गांवा त्या न्यावें ॥ ३ ॥ उपकार करा साचा ॥ दाखवा दीनाचा सोयरा ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं बाप माय ॥ वंदूं पाय तयाचे ॥ ५ ॥

॥ १४५५ ॥ उत्तम स्थळ पंढरी देखा ॥ उभा सखा विठ्ठल ॥ १ ॥ एकदां जारे तये ठाईं ॥ प्रेमा उणें मग काई ॥ २ ॥ भाग्य जोडेल सर्व हातां ॥ त्रैलोकीं सत्ता होईल ॥ ३ ॥ मोक्ष मुक्ति तुह्मापुढें ॥ दास्यत्व घडे तयासी ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं त्याचे भेटी ॥ सुखसंतोषा पडेल मिठी ॥ ५ ॥

॥ १४५६ ॥ परलोकींचा सखा उभा विटेवरी ॥ भक्त साहाकरी पांडुरंग ॥ १ ॥ चंद्रभागेतटीं शोभे वाळुवंटी ॥ देखिलासे दृष्टी पांडुरंग ॥ २ ॥ एकाजनार्दनीं भेटतां तयासी ॥ रिद्धी सिद्धि दासी होती मग ॥ ३ ॥

॥ १४५७ ॥ उतावेळपणें उभा ॥ त्रैलोक्य शोभा पंढरीये ॥ १ ॥ मना छंद घेई वाचें ॥ विठ्ठल साचें पाहूं डोळा ॥ २ ॥ गळा तुळशीच्या माळा ॥ केशर टिळा लल्लाटीं ॥ ३ ॥ चंदनाची शोभे उटी ॥ वैजयंती कंठीं मिरवत ॥ ४ ॥ दृष्टि धाय पाहतां रूप ॥ एकाजनार्दनीं स्वरूप ॥ ५ ॥

॥ १४५८ ॥ मूर्ती अनुपम्य विटेवरी साजिरी ॥ पाउलें गोजिरीं कोंवळीं तीं ॥ १ ॥ तेथें माझें मन वेडावलें भारी ॥ परत माघारीं परतेना ॥ २ ॥ वेधलासे जीव सुखा नाहीं पार ॥ माहेरा माहेर पंढरी देखा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सुखाची वस्ती ॥ भाविकां विश्रांति पंढरीराव ॥ ४ ॥

॥ १४५९ ॥ धन्य ते भाग्याचे ॥ वास करती पंढरीचे ॥ १ ॥ करती नित्य प्रदक्षणा ॥ स्नान चंद्रभागे जाणा ॥ २ ॥ पुंडलीकाची भेटी ॥ वेणुनाद पहाती दृष्टी ॥ ३ ॥ करती एकादशी ॥ जाग्रण आनंदें मानसीं ॥ ४ ॥ तया पुण्या नाहीं लेखा ॥ ह्मणे जनार्दन एका ॥ ५ ॥

॥ १४६० ॥ गोमटें नागरकटीं धरुनी कर ॥ उभा तो सुकुमार वैकुंठींचा ॥ १ ॥ रूपाचें रूपस पाहतां सावकाश ॥ धणी धाय मानस तया पाहतां ॥ २ ॥ नाठवे कल्पना मनाचीया मना ॥ बुद्धि ते चरणा विनटली ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं इंद्रियांची चाली ॥ सर्व हारपली पंढरी पाहतां ॥ ४ ॥

॥ १४६१ ॥ नागर गोमटें रूप तें गोजिरें ॥ उभें तें साजिरें भीमातटीं ॥ १ ॥ पाहतां विश्रांति देहा होय शांती ॥ अनुपम्य मूर्ति विठ्ठल देव ॥ २ ॥ भक्ताचीया काजा राहिलासे उभा ॥ कैवल्याचा गाभा बाळमूर्ती ॥ ३ ॥ आनंदाचा कंद उभा परमानंद ॥ एकाजनार्दनीं छंद मज त्याचा ॥ ४ ॥

॥ १४६२ ॥ ठेवणें अनंत जन्मांचें ॥ सांपडलें आजी साचें ॥ १ ॥ पुंडलीकें तें पोखलें ॥ जगा उपकार केले ॥ २ ॥ महा पातकी चांडाळ ॥ मुक्त होय दरुशनें खळ ॥ ३ ॥ नाहतां भींवरेचे तटीं ॥ पाप पळतें बारा वाटीं ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं निश्चय ॥ वेदादिकां हा आश्रय ॥ ५ ॥

॥ १४६३ ॥ गोमटीं गोजिरीं पाउलें साजिरीं ॥ धरियलीं गोजिरीं विटेवरी ॥ १ ॥ वेध तो तयाचा काया मनें वाचा ॥ दुजा छंद साचा नाहीं मना ॥ २ ॥ इंद्रियें धांवतां आकळती ठाईं ॥ विठोबाचे पाईं ठेवियलें ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं वेधलेंसें मन ॥ धरुनी चरण दृढ ठेलों ॥ ४ ॥

॥ १४६४ ॥ महा क्षेत्र पंढरपुर ॥ नांदे विठ्ठल साचार ॥ १ ॥ तया ठाईं सुख आहे ॥ संत जाणती तो लाहे ॥ २ ॥ विश्रांतीचें स्थान ॥ भावाभावा समान ॥ ३ ॥ दुःख दारिद्र नाहीं ॥ वाचें ह्मणतां विठाबाई ॥ ४ ॥

नोहे बाधा काळाची ॥ ऐसी मर्यादा संताची ॥ ५ ॥ जनार्दनाचा एका ह्मणे ॥ द्यावें येणें तेथींचें ॥ ६ ॥

॥ १४६५ ॥ सर्वां घटीं बिंबोनी ठेला ॥ तो हा आला पंढरीये ॥ १ ॥ सर्वां घटीं ज्याची वस्ती ॥ ते ही मूर्ति विटेवरी ॥ २ ॥ सर्वां ठाई भरुनी उरे ॥ पंढरीये पुरे मापासी ॥ ३ ॥ जनार्दनाचा एका ह्मणे ॥ धन्य येणें पंढरी ॥ ४ ॥

॥ १४६६ ॥ पंचक्रोशीचे आंत ॥ पावन तीर्थ हें समस्त ॥ १ ॥ धन्य पंढरीचा महिमा ॥ नाहीं द्यावया उपमा ॥ २ ॥ तीर्थ क्षेत्र देव ॥ ऐसा नाहीं कोठें ठाव ॥ ३ ॥ नगर प्रदक्षणा ॥ शरण एकाजनार्दना ॥ ४ ॥

॥ १४६७ ॥ पापाची वस्ती जाणा ॥ पंढरीसी नाहीं कोणा ॥ १ ॥ अवघे भाग्याचे सदैव ॥ तेथें वसे विठ्ठल देव ॥ २ ॥ माहेर भाविका ॥ देखिलीया पुंडलीका ॥ ३ ॥ जनार्दनाचा एका ह्मणे ॥ पंढरी येणें सुख वस्ती ॥ ४ ॥

॥ १४६८ ॥ नर नारी जातां पंढरीसी ॥ सुकृताची रासी ब्रह्मा नेणें ॥१॥ अभाव भावना न धरी कल्पना ॥ मस्तक चरणावरी ठेवी ॥२॥ एकाजनार्दनीं पंढरी माहेर ॥ आह्मांसी निर्धार देवें केली ॥ ३ ॥

॥ १४६९ ॥ इच्छिताती देव पंढरीचा वास ॥ न मिळे सौरस तया कांहीं ॥१॥ ऐसें श्रेष्ठ क्षेत्र उत्तमा उत्तम ॥ याहुनी सुगम आहे कोठें ॥ २ ॥ जनार्दनाचा एका ह्मणतसे भावें ॥ तीर्थ तें वंदावें पंढरी सदा ॥ ३ ॥

॥ १४७० ॥ काशीक्षेत्र श्रेष्ठ सर्वांत पवित्र ॥ परि तेथें वेंचे जीवित्व श्रेष्ठ तेव्हां ॥ १ ॥ तैसी नोहे जाणा पंढरी हे ॥ पेंठ वैकुंठा वैकुंठ जुनाट हें ॥ २ ॥ नलगे वेंचणें धन वित्त जीव ॥ मुख्य एक भाव पुरे येथें ॥ ३ ॥ दरुशनें मुक्ति प्राणियां सर्वथा ॥ चुकती नाना चळता पापांचीया ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं पंढरीसी जारे ॥ प्रेमसुख मागारे विठ्ठल देवा ॥ ५ ॥

॥ १४७१ ॥ प्रयागादि क्षेत्रें आहेत कल्पकोडी ॥ तया आहे खोडी एक एक ॥ १ ॥ मुंडन ती काया निराहार राहणें ॥ येथें न मुंडणें काया

कांहीं ॥ २ ॥ ह्मणोनी सर्व तीर्थांमाजीं उत्तम ठाव ॥ एकाजनार्दनीं जीव ठसावला ॥ ३ ॥

॥ १४७२ ॥ सप्तपुऱ्या क्षेत्र पवित्र सोपार ॥ तयामाजीं श्रेष्ठ पंढरपुर ॥ १ ॥ जारे आधीं तया ठाया ॥ जेथें वास वैकुंठराया ॥ २ ॥ पुंडलीकाचे दरुशनें ॥ तुटती प्राणीयांचीं बंधनें ॥ ३ ॥ स्नान करितां भीमेसी ॥ पूर्वज उद्धरती सरसी ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं पावन ॥ देव क्षेत्र तीर्थ उत्तम जाण ॥ ५ ॥

॥ १४७३ ॥ अवलोकितां चंद्रभागा ॥ सकळ दोष जाती भंगा ॥ १ ॥ स्नान करितां भींवरेसी ॥ तरती पातकी अपैसी ॥ २ ॥ दृष्टि पाहतां विठ्ठल देव ॥ न राहे काळाचें भेव ॥ ३ ॥ हर्षें वाहतां टाळी ॥ एकाजनार्दनीं मुक्त केली ॥ ४ ॥

॥ १४७४ ॥ दृष्टि पाहतां भीमातीर ॥ स्वर्गीं वास तया निरंतर ॥ १ ॥ ऐसा तेथींचा महिमा ॥ आणिक नाहीं दुजी उपमा ॥ २ ॥ दक्षिण द्वारका पंढरी ॥ वसे भींवरेचे तीरीं ॥ ३ ॥ जेथें वसे वैकुंठ देवो ॥ एकाजनार्दनीं गेला भेवो ॥ ४ ॥

॥ १४७५ ॥ वाचें विठ्ठल बोलावें ॥ मग पाउल टाकावें ॥ १ ॥ ऐसा ज्यांचा नेम धर्म ॥ मुखीं विठ्ठलाचें नाम ॥ २ ॥ सर्व काळ वाचें ॥ विठ्ठल नाम वदती साचे ॥ ३ ॥ कुळधर्म आमुचा ॥ ह्मणे एका जनार्दनाचा ॥ ४ ॥

॥ १४७६ ॥ आजी दिवाळी दसरा ॥ आलों विठ्ठलाचे द्वारा ॥ १ ॥ पाहुनीया देव तीर्थ ॥ आनंदें आनंद लोटत ॥ २ ॥ नाठवे कांहीं आन दुजें ॥ विठ्ठला वांचुनी मनीं माझे ॥ ३ ॥ आशा केली तें पावलों ॥ एकाजनार्दनीं धन्य जालों ॥ ४ ॥

॥ १४७७ ॥ निळा पंढरपुराचा लावण्य पुतळा ॥ देखिलासे डोळां विठ्ठलदेव ॥ १ ॥ जीव वेधला वो जीव वेधला वो ॥ पाहतां जीव वेधला वो ॥ २ ॥ एकाजनार्दनीं पाहतांचि देव ॥ वेधिला जीव परतेना भाव ॥ ३ ॥

॥ १४७८ ॥ वेधोनी नेलें आमचें मन ॥ लागलें ध्यान अंतरीं ॥ १ ॥ दृष्टी धांवे पहावया ॥ आलिंगना बाह्या उतावेळ ॥ २ ॥ चरण उत

चालतां पंथ ॥ दुजा हेत नाहीं मनासी ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं डोई पाईं ॥ दुजा भाव नाहीं इंद्रियां ॥ ४ ॥

॥ १४७९ ॥ इंद्रियें कुंठीत झालीं ॥ विठु माउली पाहातां ॥ १ ॥ वेधलें मन दुजें नेणें ॥ विसरलें पेणें तहान भुक ॥ २ ॥ मद मत्सर समूळ गेला ॥ ऐसा लागला वेध साचा ॥ ३ ॥ काम क्रोध पळाले दुरी ॥ आशा तृष्णा झडकरी लपाल्या ॥ ४ ॥ मन मनाधीन झालें ॥ एकाजनार्दनीं रूप देखिलें ॥ ५ ॥

॥ १४८० ॥ सर्व इंद्रियांचें पुरलें कोड ॥ नाम वाड ऐकतां ॥ १ ॥ हर्षें नाचतां वाळुवंटीं ॥ गेली कसवटी पळुनी ॥ २ ॥ पंचभूतें स्थिर झालीं ॥ जीव शिवा येक चाली ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं मंगळ झाला ॥ अवघा भेटला श्रीविठ्ठल ॥ ४ ॥

॥ १४८१ ॥ गोपाळपुरीं काला गोपाळ करती ॥ तेथील लाभा देव लाळ घोटिती ॥ १ ॥ ऐसा आनंद गे माय तया पंढरपुरीं ॥ धन्य भक्त दैवाचे वारकरी ॥ २ ॥ आषाढी कार्तिकी नित्य नेमें जाण ॥ जाउनी भींवरे करताती स्नान ॥ ३ ॥ घेतां दरुशन पुंडलीकाचे भेटीं ॥ एकाजनार्दनीं पुण्य न समाय सृष्टी ॥ ४ ॥

॥ १४८२ ॥ पाहतां पाहतां परतलें मन ॥ झालें समाधान चित्तीं माझे ॥ १ ॥ संताचे संगतीं लाभ येवढा झाला ॥ पंढरीये पाहिला विठ्ठल देवो ॥ २ ॥ एकाजनार्दनीं मनींच बैसला ॥ नवजे संचला दीपु जैसा ॥३॥

॥ १४८३ ॥ एकरूप मन झालेंसे दोघांचें ॥ देव आणि भक्तांचें रूप येक ॥ १ ॥ पुंडलीका कारणें समुचय उभा ॥ त्रैलोक्याची शोभा पांडुरंग ॥ २ ॥ ध्यातां चित्त निवे पाहतां ठसावे ॥ एकाजनार्दनीं सांठवे हृदयीं रूप ॥ ३ ॥

॥ १४८४ ॥ अकार तो अकारू मकार तो मकारू ॥ उकाराचा पालऊ शोभे गे माय ॥ १ ॥ आदि अंत नसे ज्या रूपा वेगळें ॥ तें कैसें वोळलें पुंडलीका गे माय ॥ २ ॥ वेद उपरमला पुराणें कुंठित ॥ शास्त्राची मति नेणत तया सुखा गे माय ॥ ३ ॥ जाणते नेणते सर्व वेडावले ॥ ठकलेचि ठेले सांगूं काय गे माय ॥ ४ ॥ या पुंडलीकें वेडाविलें चाळवुनी गोविलें ॥ एकाजनार्दनीं उभें केलें विटेवरी गे माय ॥ ५ ॥

॥ १४८५ ॥ सुंदरु बाळपणाची बुंथी घेउनी श्रीपती ॥ सनकादिकां गाती तेथें कुंठीत गे माय ॥ १ ॥ ब्रह्म वेडावलें तें वेडावलें ॥ पुंडलीकाधीन झालें गे माय ॥ २ ॥ इंद्र चंद्र गुरु उपरमोनी ज्या सुखा ॥ तो वाळुवंटीं देखा संतांसवे गे माय ॥ ३ ॥ ऐसा नटधारी मनु सर्वांचे हरी ॥ एकाजनार्दनाचे करीं उच्छिष्ट खाय ॥ ४ ॥

॥ १४८६ ॥ कोटी कंर्दप सांडा वोवाळुनी ॥ ऐसा जगदानी पंढरीये ॥ ॥ १ ॥ हेळु लोपला तेजें जें देखतां मन निवे ॥ दरुशनें भागलें हेवा करतां गे माय ॥ २ ॥ मदन मनमोहन सनकसनंदन वंद्य ॥ सर्वां ठाईं व्यापुनी उभा विटे आनंद ॥ ३ ॥ सुखाची सुखमूर्ति पुंडलीकाचे भक्ती ॥ एकाजनार्दनीं सगुण व्यक्तीसी आला ॥ ४ ॥

॥ १४८७ ॥ द्वारका समुद्रांत बुडविली ॥ परी पंढरी रक्षिली अद्यापी ॥ १ ॥ द्वारकेहुनी बहुत सुख ॥ पंढरीये अधिक एक आहे ॥ २ ॥ भीमातीरीं दिगंबर ॥ करुणाकर विठ्ठल ॥ ३ ॥ भक्तासाठीं निरंतर ॥ एकाजनार्दनीं कटीं धरिले कर ॥ ४ ॥

॥ १४८८ ॥ मच्छरूप धरुनी शंखासुर मारिला ॥ तेव्हां श्रमोनी जंघनीं कर ठेविले ॥ १ ॥ कूर्मरूप धरुनी पृथ्वी धरली पृष्ठीं ॥ तेणें श्रमोनी कर ठेविले कटीं ॥ २ ॥ हिरण्याक्ष मर्दुनी दाढेवरी धरली अवनी ॥ तेणें श्रमोनी कर धरिले जंघनीं ॥ ३ ॥ रक्षिला प्रल्हाद भक्त विदारिला क्रूर दैत्य ॥ भागला तेणें कटावर कर मिरवत ॥ ४ ॥ बळी पाताळीं घातला द्वार राखतां श्रम जाला ॥ ह्मणोनी कटावरी कर ठेउनी राहिला ॥ ५ ॥ एकविस वेळा निःक्षत्री निर्वैर धरित्री ॥ तेणें श्रमोनी कर जंघनीं धरिले ॥ ॥ ६ ॥ लंके पुढें वज्रठाण मांडिलें रावणातें भंगिलें ॥ ह्मणोनी कर जंघनीं धरियेले ॥ ७ ॥ लागला काळयवन पाठीं पळतां जाला कष्टी ॥ ह्मणोनी उभा येथें कर ठेउनी कटीं ॥८॥ लोक देखोनी उन्मत्त दारा धनीं आसक्त ॥ न बोले बौद्धरूप ठेविलें जंघनीं हात ॥ ९ ॥ पुढें म्लेंछ संहार ह्मणोनी कर कटीं ॥ एकाजनार्दनीं पाहतां चरणीं घातली मिठी ॥ १० ॥

॥ १४८९ ॥ अर्जुनाचे रथीं श्रमला जगजेठी ॥ ह्मणोनी कर ठेउनी कटीं उभा येथें ॥१॥ धरुनी गोवर्धन उभा सप्त दिन ॥ ह्मणोनी कर जंघन

ठेउनी उभा ॥ २ ॥ कंसादि मल्ल मारी जरासंध ॥ ते चरणारविंद उभे विटे ॥ ३ ॥ धर्मा घरीं उच्छिष्ट पात्र तें काढी करें ॥ ह्मणोनीं श्रमें निर्धारें ठेविले कटीं कर ॥ ४ ॥ पुंडलीक भक्त देखोनी तल्लीन झाला ॥ एकाजनार्दनीं ठेविला कटीं कर ॥ ५ ॥

॥ १४९० ॥ जेथें वाजविला वेणु शुद्ध ॥ ह्मणोनी ह्मणती वेणुनाद ॥ ॥ १ ॥ सकळीक देव आले ॥ ते भोंवतीं राहिले ॥ २ ॥ जोडलें जेथें समपद ॥ तया ह्मणती विष्णुपद ॥ ३ ॥ भोंवतालीं पदें उमटती ॥ तेथें गोपाळ नाचती ॥ ४ ॥ जेथें उभे गाईंचे भार ॥ ते अद्यापी दिसती खुर ॥ ५ ॥ गोपाळाचीं पदें समग्र ॥ ठाईं शोभत सर्वत्र ॥ ६ ॥ एकाजनार्दनीं हरि शोभले ॥ कर कटावरी कर ठेउनी भले ॥ ७ ॥

॥ १४९१ ॥ पुष्पावती चंद्रभागे ॥ करितां स्नान भंगे दोष ॥ १ ॥ पाहतां पुंडलीका नयनीं ॥ चुके जन्म नये अयनी ॥ २ ॥ घेतां विठ्ठल दरुशन ॥ होती पातकी पावन ॥ ३ ॥ करितां प्रदक्षणा ॥ पुन्हां जन्म नाहीं जाणा ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं शरण ॥ कळस पाहतां मुक्त जाण ॥ ५ ॥

॥ १४९२ ॥ सकळीक तीर्थें पाहतां डोळा ॥ निवांत नोहे हृदईं कमळा ॥ १ ॥ पाहतां तीर्थ चंद्रभागा ॥ सकळ दोष गेले भंगा ॥ २ ॥ पाहतां विठ्ठल सांवळा ॥ परब्रह्म डोळा देखियलें ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं पाहोनी ध्यान ॥ भुललें मन त्या ठाईं ॥ ४ ॥

॥ १४९३ ॥ तापत्रयें तापलिया पंढरीसी यावें ॥ दरुशनें मुक्त व्हावें हेळामात्रें ॥ १ ॥ दुःखाची विश्रांति सुखाचा आनंद ॥ पाहतां चिदानंद विठ्ठल देव ॥ २ ॥ संसारीं तापले त्रितापें आहाळले ॥ विश्रांतीये आले पंढरीसी ॥ ३ ॥ सर्वांचें माहेर भाविकांचें घर ॥ एकाजनार्दनीं निर्धार केला असे ॥ ४ ॥

॥ १४९४ ॥ पुंडलीका पुढें सर्वेश्वर ॥ उभा कटीं ठेउनी कर ॥ १ ॥ ऐसा पुंडलीका पुढें हरी ॥ तो पुजावा षोडशोपचारीं ॥ २ ॥ सभोंवता वेढा संतांचा ॥ आनंद होतो हरिदासाचा ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं देव ॥ उभा विटेवर स्वयमेव ॥ ४ ॥

॥ १४९५ ॥ शंख चक्र पद्म विराजित करीं ॥ बाप तो श्रीहरी उभा

विटे ॥ १ ॥ रुक्मिणी सत्यभामा शोभतसे राही ॥ गरुड हनुमंत उभे दोघे दो ठाई ॥ २ ॥ एकाजनार्दनीं सर्वांचें सार ॥ विठ्ठल विठ्ठल वाचें जपा निर्धार ॥ ३ ॥

॥ १४९६ ॥ पंढरीये अन्नदान ॥ तिळभरी घडतां जाण ॥ १ ॥ तेणें घडती अश्वमेध ॥ पातकापासोनी होती शुद्ध ॥ २ ॥ आठरा वर्ण याती ॥ भेद नाहीं तेथें जाती ॥ ३ ॥ अवघे रंगले चिंतनीं ॥ मुखीं नाम गाती कीर्तनीं ॥ ४ ॥ शुद्ध अशुद्धाची बाधा ॥ एकाजनार्दनीं नोहे कदा ॥ ५ ॥

॥ १४९७ ॥ मूर्ति सांवळी गोमटी ॥ अंगीं केशराची उटी ॥ १ ॥ मुगुट कुंडलें वनमाळा ॥ टिळक रेखिला पिंवळा ॥ २ ॥ कर्णीं कुंडलें मकराकार ॥ गळा शोभे वैजयंती हार ॥ ३ ॥ नेत्र आकर्ण सुकुमार ॥ एकाजनार्दनीं विटेवर ॥ ४ ॥

॥ १४९८ ॥ नित्य घडे चंद्रभागे स्नान ॥ श्री विठ्ठल दरुशन ॥ १ ॥ त्याच्या पुण्या नोहे लेखा ॥ पहा दृष्टी पुंडलीका ॥ २ ॥ उजवें घेतां राउळासी ॥ जळती पातकांच्या रासी ॥ ३ ॥ संतांसवें कीर्तन करितां ॥ आनंदें टाळी वाजवितां ॥ ४ ॥ मोक्ष जोडोनीया हात ॥ तयाची वाट तो पाहात ॥ ५ ॥ धन्य पंढरीचा संग ॥ एकाजनार्दनीं अभंग ॥ ६ ॥

॥ १४९९ ॥ राहुनी पंढरीये जाण ॥ जो ने घे विठ्ठल दरुशन ॥ १ ॥ महा पातकी चांडाळ ॥ त्याचा न व्हावा विटाळ ॥ २ ॥ जिताचि भोगी नर्क ॥ जो विठ्ठला विन्मुख ॥ ३ ॥ न करी स्नान चंद्रभागे ॥ तो कुष्टी सर्वांगें ॥ ४ ॥ नेघे पुंडलीक दरुशन ॥ एकाजनार्दनीं तया बंधन ॥ ५ ॥

॥ १५०० ॥ जें देवां दुर्लभ स्थान ॥ मनुष्यासी तें सोपें जाण ॥ १ ॥ या ब्रह्मांडा माझारी ॥ सृष्टी जाणावी पंढरी ॥ २ ॥ एकएक पाउल तत्वतां ॥ घडे अश्वमेध पुण्यता ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं ठसा ॥ विठ्ठल उभाची सरसा ॥ ४ ॥

॥ १५०१ ॥ अनंता जन्मींचें पुण्य बळ ॥ तैं देखे पंढरीनाथ ॥ १ ॥ वांया शिणताती बापुडीं ॥ काय गोडी धरुनी ॥ २ ॥ पाहतां विठ्ठलाचें मुख ॥ हरे सर्व पाप निवारे दुःख ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं विठ्ठल उभा ॥ त्रैलोक्याचा गाभा विटेवरी ॥ ४ ॥

॥ १५०२ ॥ उभा पुंडलीकापुढें ॥ कटीं कर ठेउनी रूपडें ॥ १ ॥ पहातां वेडावलें मन ॥ शिवा लागलेंसे ध्यान ॥ २ ॥ सनकादिक वेडावले ॥ ते पुंडलीकें भुलविले ॥ ३ ॥ भक्ता देखोनी भुलला ॥ एकाजनार्दनीं सांवळा ॥ ४ ॥

॥ १५०३ ॥ तारावया भोळे भक्त ॥ कृपावंत पंढरिनाथ ॥ १ ॥ करुनी मीस पुंडलीकाचें ॥ उभा उगाचि विटेवर दिसे ॥ २ ॥ ऐसा भक्तासी भुलला ॥ तारावया उभा ठेला ॥ ३ ॥ जनीं जनार्दन ॥ शरण एकाजनार्दन ॥ ४ ॥

॥ १५०४ ॥ नाभीकमळीं जन्मला ब्रह्मा ॥ तया न कळे महिमा ॥ ॥ १ ॥ पंढरी क्षेत्र हें जुनाट ॥ भूवैकुंठ पेंठ साजिरी ॥ २ ॥ भाळे भोळे येती आर्धी ॥ तुटती उपाधि तयांची ॥ ३ ॥ एकपणें रिघतां शरण ॥ एकाजनार्दनीं तुटे बंधन ॥ ४ ॥

॥ १५०५ ॥ उदंड तीर्थें पृथ्वीच्या ठाईं ॥ ऐसा महिमा नाहीं कोणें जागीं ॥ १ ॥ तया पुंडलीकें आह्मां सोपें केलें ॥ परब्रह्म उभें ठेलें विटेवरी ॥ २ ॥ भूवैकुंठ पंढरी क्षेत्र ॥ पवित्रापवित्र उत्तम हें ॥ ३ ॥ ह्मणोनी करा करा लाहो ॥ एकदां जा हो पंढरीये ॥ ४ ॥ एका आगळें अक्षर ॥ एकाजनार्दनीं निर्धार ॥ ५ ॥

॥ १५०६ ॥ बहुता काळाचें हें क्षेत्र ॥ सकळ देवांचें माहेर ॥ सकळ संतांचें निज मंदीर ॥ तें हें पंढरपुर जाणावें ॥ १ ॥ धन्य पंढरीचा महिमा ॥ नाहीं आणीक उपमा ॥ जेथें वास पुरुषोत्तमा ॥ रुक्मिणी सहित सर्वदा ॥ ॥ २ ॥ धन्य भक्त पुंडलीक ॥ सकळ संतांचा नायक ॥ एकाजनार्दनीं देख ॥ श्री विठ्ठल आवडी ॥ ३ ॥

॥ १५०७ ॥ ऐसें कृपण मनाचें ॥ तें या पंढरीसी न वचे ॥ १ ॥ पापीयासी पंढरपुर ॥ नावडे ऐसा हा निर्धार ॥ २ ॥ ब्रह्मज्ञान पाषांडीया ॥ नावडे काया वाचा जीवेंसी ॥ ३ ॥ विषयीं जो दुराचारी ॥ तया नावडे ज्ञानेश्वरी ॥ ४ ॥ अभक्तासी संत भेटी ॥ झाल्या नावडे ह्मणे चावटी ॥ ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं ह्मणे देवा ॥ तया दुरी मज ठेवा ॥ ६ ॥

॥ १५०८ ॥ विषयीं जो लंपट ॥ तया नावडे ही वाट ॥ पंढरी सुभट ॥

नावडेचि पापिष्टा ॥ १ ॥ अमृत फळें पूर्ण आलीं ॥ कागा जैसी परी झाली ॥ तैसीच हे चाली ॥ पापिष्टाची जाणावी ॥ २ ॥ धनलुब्धका नावडे धर्म ॥ मद्यपिया नावडे कर्म ॥ जारासी संत समागम ॥ नाठवेचि सर्वथा ॥ ॥ ३ ॥ स्त्रीलुब्ध परद्वारीं ॥ काय तया गीता निर्धारी ॥ एकाजनार्दनीं हरी ॥ नको संग तयाचा ॥ ४ ॥

॥ १५०९ ॥ पायावरी ठेविती भाळ ॥ ते प्रेमळ वारकरी ॥ १ ॥ जन्मोजन्मीं त्यांचा संग ॥ द्या अभंग सर्वदा ॥ २ ॥ सर्वकाळ विठ्ठल वाचें ॥ दुजें साचें नाठविती ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं त्यांचा संग ॥ घडावा सर्वांगें मजसी ॥ ४ ॥

॥ १५१० ॥ आवडीं जाती पंढरीसी ॥ अहर्निशीं ते वारकरी ॥ १ ॥ तयांचे पाईं माझें भाळ ॥ सर्वकाळ असो देवा ॥ २ ॥ हातीं टाळ मुखीं नाम ॥ नेणती सकाम दुसरें ॥ ३ ॥ एकविध तयांचें मन ॥ शरण एका-जनार्दन ॥ ४ ॥

॥ १५११ ॥ भोळे भाळे वारकरी ॥ हरी नाम गजरीं नाचती ॥ १ ॥ त्यांचा संग देई देवा ॥ नको हेवा दुजा कांहीं ॥ २ ॥ त्यांचे चरणीं राहो मन ॥ आणीक साधन दुजें नको ॥ ३ ॥ ह्मणती हरी करती वारी ॥ याहुनी थोरी कोण आहे ॥ ४ ॥ तयांजवळी मज ठेवा ॥ एकाजनार्दनीं जीवा माझिया ॥ ५ ॥

॥ १५१२ ॥ माझें मन तेथें वसो ॥ आणीक नसो दुजें कांहीं ॥ १ ॥ होईन हरीचा वारकरी ॥ करीन वारी पंढरीची ॥ २ ॥ संसाराचा विट आला ॥ आवडला संत संग ॥ ३ ॥ शरण एकाजनार्दनीं ॥ करी विनवणी येवढी ॥ ४ ॥

॥ १५१३ ॥ हरी ह्मणोनी टाकी पाय ॥ तया लाभा उणें काय ॥ १ ॥ नेमें जाती पंढरीसी ॥ आषाढी कार्तिकी वारीसी ॥ २ ॥ धनदाट पिकली पेंठ ॥ आलें चोखट गिऱ्हाईक ॥ ३ ॥ वस्तु अमोल विटेवरी ॥ एकाजनार्दन अंगीकारी ॥ ४ ॥

॥ १५१४ ॥ धन्य धन्य पंढरपुर ॥ वाहे भीवरा समोर ॥ १ ॥ ह्मणोनी नेमें वारकरी ॥ करती वारी अहर्निशीं ॥ २ ॥ पुंडलीका दंडवत ॥

पाहाती दैवत श्रीविठ्ठल ॥ ३ ॥ काला करती गोपाळपुरीं ॥ मिळोनी हरी संवगडे ॥ ४ ॥ तया हरिदासांचें रजःकण ॥ शरण एकाजनार्दन ॥ ५ ॥

॥ १५१५ ॥ घडती पुण्याचीया रासी ॥ जे पंढरीसी जाती नेमें ॥ १ ॥ घडतां चंद्रभागे स्नान ॥ आणि दरुशन पुंडलीक ॥ २ ॥ पाहातां विटेवरी जगदीश ॥ पुराण पुरुष व्यापक ॥ ३ ॥ वारकरी गाती सदा ॥ प्रेमें गोविंदा आळविती ॥ ४ ॥ तया स्थळीं मज ठेवा ॥ आठवा जनीं जनार्दन ॥ ५ ॥ शरण एकाजनार्दन ॥ करा माझी आठवण ॥ ६ ॥

॥ १५१६ ॥ उभा कर ठेउनी कटीं ॥ अवलोकी दृष्टी पुंडलीका ॥ १ ॥ न्या मज तेथवरी ॥ या वारकरी सांगातें ॥ २ ॥ पाहीन डोळेभरुनी हरी ॥ दुजी उरी ठेविना ॥ ३ ॥ मीपणाचा वोस ठाव ॥ पाहातां गांव पंढरी ॥ ४ ॥ वारकरी महाद्वारीं ॥ कान धरुनी करीं नाचती ॥ ५ ॥ शरण एकाजनार्दन ॥ ते संत पावन पतीत ॥ ६ ॥

॥ १५१७ ॥ तयाचे संगती अपार ॥ विश्रांती घर पंढरी ॥ १ ॥ ह्मणोनी वारकरी भावें ॥ जाती हावें पंढरीसी ॥ २ ॥ योगयागीं जो न सांपडे ॥ तो पुंडलीकापुढें उभा असे ॥ ३ ॥ शोभे चंद्रभागा उत्तम ॥ धन्य जन्म जाती तेथें ॥ ४ ॥ घेउनी आवडी माळ बुका ॥ वाहाती फुका विठ्ठला ॥ ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं भावें ॥ हेंचि मागणें मज द्यावें ॥ ६ ॥

॥ १५१८ ॥ गाती नाचती आनंदें वैष्णवजन ॥ ते दाखवा भुवन पंढरी ॥ १ ॥ आदरें येती वारकरी ॥ नानापरी संवगडे ॥ २ ॥ नर नारी एके ठाईं ॥ पाहाती विठ्ठल रखुमाई ॥ ३ ॥ सुख अद्भुत विश्रांती ॥ एकाजनार्दनीं धरा चित्तीं ॥ ४ ॥

॥ १५१९ ॥ ज्या सुखाकारणें योगाभ्यास ॥ शरीर दंड कायाक्लेश ॥ तें उभें आहे अपैस ॥ भीमातीरीं वाळुवंटीं ॥ १ ॥ नलगे दंडन मुंडनीं आटी ॥ योगयागाची कसवटी ॥ मोकळी राहाटी ॥ कुंथाकुंथी नाहीं येथें ॥ २ ॥ नलगे अष्टांग धूम्रपान ॥ वायु आहार पंचाग्नि साधन ॥ नग्न मौन एकांत स्थान ॥ आटाआटी न करणें ॥ ३ ॥ धरुनीयां संतसंग ॥ पाहे पाहे पांडुरंग ॥ देईल सुख अव्यंग ॥ एकाजनार्दनीं निर्धारें ॥ ४ ॥

॥ १५२० ॥ निर्धारितां सुख पंढरीस आहे ॥ ह्मणोनि उभारिती

बाह्या वेदशास्त्रें ॥ १ ॥ साधन पसारा न करी सैरावैरा ॥ जाय तूं निर्धारा पंढरीये ॥ २ ॥ एकाजनार्दनीं धरुनी विश्वास ॥ विठोबाचा दास होय वेगें ॥ ३ ॥

॥ १५२१ ॥ वेदाचा विवेक शास्त्राचा हा बोध ॥ तो हा परमानंद विठ्ठलमूर्ती ॥ १ ॥ पुराणासी वाड साधनाचें कोड ॥ तें गोडाचें गोड विठ्ठलमूर्ती ॥ २ ॥ ब्रह्मादी वंदिती शिवादी ज्या ध्याती ॥ सर्वांसी विश्रांति विठ्ठलमूर्ती ॥ ३ ॥ मुनीजनांचें ध्यान परम पावन ॥ एकाजनार्दनीं पावन विठ्ठलमूर्ती ॥ ४ ॥

॥ १५२२ ॥ आह्मांसी विश्वास एक पुरे भाव ॥ या विठ्ठलावांचोनि देव नमनों कोण्हा ॥ १ ॥ विश्रांतीचें घर संताचें माहेर ॥ करती निर्धार वेदशास्त्रें ॥ २ ॥ जनार्दनाचा एका प्रेमें तो आठवी ॥ विठ्ठल सांठवी हृदयामाजीं ॥ ३ ॥

॥ १५२३ ॥ या पंढरीचें सुख पाहतां डोळा ॥ उभा तो जिव्हाळा योगीयांचा ॥ १ ॥ ह्मणोनीयां मन वेधलें चरणीं ॥ आणिक साांगुनी बुडी दिली ॥ २ ॥ जनार्दनाचा एका धांवे लोटांगणीं ॥ करी वोवाळणी शरीराची ॥ ३ ॥

॥ १५२४ ॥ बहुतांचीं मतांतरें तीं टाकुनी ॥ विठ्ठलचरणीं बुडी दे कां ॥ १ ॥ नव्हे तुज बाधा काळाची आपदा ॥ ध्याई तूं गोविंदा प्रेमभरित ॥ २ ॥ जनार्दनाचा एका लाहून चरणीं ॥ बोलतसे वाणी करुणाभरित ॥ ३ ॥

॥ १५२५ ॥ प्रेमळ प्रेमळ अंतरीं प्रेमळ ॥ नाहीं काळ वेळ तयालागीं ॥ १ ॥ प्रेम भावें गाय विठ्ठलचि ध्याय ॥ मग सुखा उणें काय संसारीं या ॥ २ ॥ जनार्दनाचा एका रंगला चरणीं ॥ निजरंगीं रंगोनी मिळोनि गेला ॥ ३ ॥

॥ १५२६ ॥ नर देह प्रमाण शत वर्षें ह्मणती ॥ अभागी घालविती वायां जाण ॥ १ ॥ न करी भजन न जाय पंढरी ॥ अभाविक दुराचारी सदा मनीं ॥ २ ॥ जनार्दनाचा एका न पाहे त्याचें मुख ॥ नर देहीं देख पशुवत ॥ ३ ॥

॥ १५२७ ॥ अभागी तो जाण ॥ न करी विठ्ठलस्मरण ॥ १ ॥ तया व्यालीसे जननी ॥ अभागी तो पापखाणी ॥ २ ॥ न जाय पंढरपुरा ॥ मांडी वेदांत पसारा ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं ह्मणे ॥ श्वानापरी जयाचें जिणें ॥ ४ ॥

॥ १५२८ ॥ पावन क्षेत्र पंढरपुर ॥ पावन तीर चंद्रभागा ॥ १ ॥ पावन संत पुंडलीक ॥ पावन देख श्रीविठ्ठल ॥ २ ॥ पावन देह गेलीया तेथें ॥ होती जीवन्मुक्त सर्व जीव ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं पावन ॥ पावन पंढरी अधिष्ठान ॥ ४ ॥

॥ १५२९ ॥ अविनाश क्षेत्र पंढरी सर्वथा ॥ आणीक ती वार्ता नये मना ॥ १ ॥ सर्व तीर्थमार्ग विधियुक्त आहे ॥ येथें उभा पाहे पांडुरंग ॥ ॥ २ ॥ आटणी दाटणी मुंडनीं सर्वथा ॥ नाहीं पैं तत्त्वतां यया तीर्था ॥ ॥ ३ ॥ करावें तें स्नान पुंडलीका वंदन ॥ देखावे चरण विठोबाचे ॥ ४ ॥ जनार्दनाचा एका पंढरी सांडुनी ॥ न जाय आवनीं कवण तीर्थी ॥ ५ ॥

॥ १५३० ॥ सुकुमार हरीचीं पाउलें ॥ सुंदर हरीचीं पाउलें ॥ १ ॥ भीमातटीं देखिलें ॥ वोळलें तें पुंडलीका ॥ २ ॥ शेषशयनीं जीं पाउलें ॥ लक्ष्मी करीं तीं पाउलें ॥ ३ ॥ गरुडपृष्ठीं जीं पाउलें ॥ बळीयागीं तीं पाउलें ॥ ४ ॥ विटेवरी जीं पाउलें ॥ एकाजनार्दनीं तीं पाउलें ॥ ५ ॥

॥ १५३१ ॥ या पाउलासाठीं लक्ष्मी पिशी ॥ सनकादीक वेडावले मानसीं ॥ १ ॥ सुख जोडलें पुंडलीकासी ॥ विटेवरी हृषीकेशी ॥ २ ॥ ह्मणे जनार्दनाचा एका ॥ धन्य धन्य पुंडलीका ॥ ३ ॥

॥ १५३२ ॥ वर्णितां वेद मती कुंठित पैं जाली ॥ पुराणें भागलीं विवादतां ॥ १ ॥ सोपारा सुगम पुंडलीकापाठीं ॥ उभा जगजेठी विटेवरी ॥ २ ॥ लक्ष्मी ते स्वयें रुक्मिणी शोभत ॥ विंझणे वारीत सत्यभामा ॥ ३ ॥ सांडुनी रत्नकिळा गळा तुळशीमाळा ॥ चंदनाचा टिळा केशरयुक्त ॥ ४ ॥ गोपाळ गजरें आनंदें नाचती ॥ मध्यें विठ्ठलमूर्ति प्रेमें रंगे ॥ ॥ ५ ॥ मनाचें मोहन योग्याचें निजधन ॥ एकाजनार्दनीं चरण विटेवरी ॥ ६ ॥

॥ १५३३ ॥ विटेवरी दिसे स्वानंदाचा गाभा ॥ श्रीमुखाची शोभा

काय वानूं ॥ १ ॥ कटीं पीतांबर तुळशीचे हार ॥ उभा सर्वेश्वर भक्तिकाजा ॥ २ ॥ लावण्य रूपडें पाहे पुंडलीक ॥ आणीक सम्यक नये दुजा ॥ ३ ॥ पाहातां पाहातां विश्रांति पैं जाली ॥ एकाजनार्दनीं माउली संताची ते ॥ ४ ॥

॥ १५३४ ॥ जयाचे देखतां चरण ॥ तुटेल जन्म जरामरण ॥ १ ॥ तो हा चंद्रभागेच्या तिरीं ॥ कट धरूनियां करीं ॥ २ ॥ नाम घेतां आवडी ॥ तुटेल संसाराची बेडी ॥ ३ ॥ भाविकासी पावें ॥ मागें मागें त्याच्या धांवें ॥ ॥ ४ ॥ ह्मणे जनार्दनाचा एका ॥ आवडीनें नाम घोका ॥ ५ ॥

॥ १५३५ ॥ राहुनी पंढरी ॥ आणिकाची आस करी ॥ १ ॥ तो पातकी चंडाळ ॥ खळाहुनी अमंगळ ॥ २ ॥ सांडोनीयां विठ्ठल देव ॥ आणिकासी ह्मणे देव ॥ ३ ॥ सांडोनियां पुंडलिका ॥ गाय आणिकासी देखा ॥ ४ ॥ ऐसा पातकी तो खळ ॥ तयाचा न व्हावा विटाळ ॥ ५ ॥ ह्मणे जनार्दनाचा एका ॥ तया तेथें ठेऊं नका ॥ ६ ॥

॥ १५३६ ॥ ऐसें पंढरीचें स्थान ॥ याहुनी आणिक आहे कोण ॥ १ ॥ विष्णुसहित कर्पूरगौर ॥ जेथें उभे निरंतर ॥ २ ॥ पुढें भीवरा शोभती ॥ पुंडलिकाची वसती ॥ ३ ॥ ऐसें सांडोनी उत्तम स्थळ ॥ कोठें वास करूं निर्मळ ॥ ४ ॥ ह्मणे जनार्दनाचा एका ॥ प्रेमळ संत नांदती देखा ॥ ५ ॥

॥ १५३७ ॥ भाविकांचें स्थान पंढरी पावन ॥ अभाविकां जाण नावडे तें ॥ १ ॥ ह्मणोनी चिंतन विठ्ठलाचे वाचें ॥ अभाविकां साचें नावडे नाम ॥ २ ॥ वैष्णवांचा संग नावडे कीर्तन ॥ अभाविकांचा दुर्गुण हाची देखा ॥ ३ ॥ अभाविकांच्या संगें परमार्थ नावडे ॥ एकाजनार्दनीं न घडे सेवा कांहीं ॥ ४ ॥

॥ १५३८ ॥ हृदयस्थ आत्माराम नेणती ॥ मूर्ख ते फिरती तीर्थाटनीं ॥ १ ॥ काय तया भ्रांति पडलीसे जीवा ॥ देवाधिदेवा विसरती ॥ ॥ २ ॥ विश्वाचा तो आत्मा उभा विटेवरी ॥ भक्त काज कैवारी पांडुरंग ॥ ३ ॥ प्रणवा पैलीकडे वैखरीये कानडे ॥ भाग्य तें केवढें पुंडलीकाचें ॥ ४ ॥ तयाचीया लोभा गुंतूनि राहिले ॥ अठ्ठाविस युग जाले न बैसे खालीं ॥ ५ ॥ सन्मुख चंद्रभागा संताचा सोहळा ॥ एकाजनार्दनीं डोळा पाहूं चला ॥ ६ ॥

॥ १५३९ ॥ एकाचीं काजें फिटलें सांकडें ॥ उगविलीं कोडें बहुतांचीं ॥ १ ॥ तोचि हरि उभा चंद्रभागे तटीं ॥ कर ठेउनी कटीं अवलोकित ॥ २ ॥ पडतां संकट धांवतसे मागें ॥ गोपाळांचीया संगें काला करी ॥ ३ ॥ चोरुनी शिदोरी खाय वनमाळी ॥ प्रेमाचे कल्लोळीं आनंदानें ॥ ॥ ४ ॥ यज्ञ अवदानीं करी वांकुडें तोंड ॥ लोणी चोरितां भांड गौळणी ह्मणती ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं ठेवणें संताचें ॥ उभें तें साचें विटेवरी ॥ ६ ॥

॥ १५४० ॥ जयालागी करती योगी सायास ॥ तो हरि पंढरीस उभा असे ॥ १ ॥ नलगे साधन मांडणें तत्वतां ॥ नाम गीतीं गातां सोपा सर्वा ॥ २ ॥ नर अथवा नारी न ह्मणे दुराचारी ॥ दर्शनें उद्धरी जड जीवां ॥ ३ ॥ पुंडलीका भाक देउनी सावकाश ॥ पुरवितो सौरस अद्यापिवरी ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं चैतन्याचा गाभा ॥ विटेवरी उभा भक्तासाठीं ॥ ५ ॥

॥ १५४१ ॥ घेउनी मौनपणाचा वेष ॥ उभा सावकाश विटेवरी ॥ ॥ १ ॥ न बोलेची कोण्हा न बैसेची खालीं ॥ पुराणें वेडावलीं अष्टादश ॥ ॥ २ ॥ भागलीं दर्शनें शास्त्रें वेवादितां ॥ मथितार्थ पुरता न कळे तयां ॥ ॥ ३ ॥ शेष जाणूं गेला तोही मौनावला ॥ वेदादिकां अबोला पडोनी ठाके ॥ ४ ॥ संगती संताचे भुलोनीयां उभा ॥ एकाजनार्दनीं शोभा न वर्णवे ॥ ५ ॥

॥ १५४२ ॥ जीव शिव व्यापुनी राहिला वेगळा ॥ परब्रह्म पुतळा विटेवरी ॥ १ ॥ तयाचिया पायीं वेधलें मन ॥ झालें समाधान पाहतां रूप ॥ २ ॥ विश्रांति समाधि लोपोनीयां ठेली ॥ पहातां सांवळी मूर्ति देखा ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं सर्वा वेगळा ॥ तो बाळ लीळा खेळे कृष्ण ॥ ४ ॥

॥ १५४३ ॥ सुखकर मूर्ति रूप रेखेवीण ॥ उभा असे व्यापून ब्रह्मांडीं गे माय ॥ १ ॥ वेधला जीव तयाचीया गुणा ॥ क्षणभरी न विसंबे देवकी नंदना ॥ २ ॥ सकळ विश्रांति घर चंद्रभागा तीर ॥ एकाजनार्दनीं मनोहर गोमटे गे माय ॥ ३ ॥

॥ १५४४ ॥ अहर्निशीं ध्यान शंकर धरी ज्याचें ॥ तो श्रीराम वाचें कां रे नाठविसी ॥ १ ॥ राम राम ह्मणतां तुटेल बंधन ॥ होईल खंडन कर्मा

कर्मी ॥ २ ॥ राम नामें गणिकें नेली मोक्षपदां ॥ तुटती आपदा गर्भवास ॥ ३ ॥ राम नाम जप नित्य ती समाधि ॥ एकाजनार्दनीं उपाधि तुटोनी गेली ॥ ४ ॥

॥ १५४५ ॥ नीळ वर्ण घनशाम ॥ आत्माराम विटेवरी ॥ १ ॥ चला जाऊं तया गांवा ॥ उगवूं गोंवां तातडी ॥ २ ॥ भेटलीया मनोरथ ॥ पुरती अर्थ मनाचे ॥ ३ ॥ साधे साधन फुकटची ॥ एकाजनार्दनीं भाक साची ॥ ४ ॥

॥ १५४६ ॥ जयाचें पाहतां श्रीमुख ॥ हरे कोटी जन्म दुःख ॥ १ ॥ तोहा उभा विटेवरी ॥ भक्त काज ह्मणवी कैवारी ॥ २ ॥ वेदासी जो दुर्गम ॥ आह्मां कळलें तयाचें वर्म ॥ ३ ॥ ऐसा भक्त वत्सल तो एक दीनानाथ ॥ एकाजनार्दनीं तया ध्यात ॥ ४ ॥

॥ १५४७ ॥ मुख सुंदरें मंडीत साजिरा ॥ विंझणे वारिती राही रखुमाई सुंदरा ॥ १ ॥ नवल वो हरी देखिला डोळां ॥ पहातां पहातां मन विरालें अबळा ॥ २ ॥ नेणें तहान भुक लज्जा अपमान ॥ वेधिलें देवकी नंदनें गे माय ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं पाहतां मुख ॥ मुख पाहतां अवघें विसरलों दुःख ॥ ४ ॥

॥ १५४८ ॥ हरी वांचुनी ठाव रिता कोठें आहे ॥ विचारुनी पाहे मना माजीं ॥ १ ॥ सर्व तो व्यापक भरोनी उरला ॥ वाउगाचि चाळा वाहूं नको ॥ २ ॥ एकाजनार्दनीं भरुनी उरला ॥ तो म्यां देखियेला विटेवरी ॥ ३ ॥

॥ १५४९ ॥ वेद घेउनीयां गेला शंखासुर ॥ मत्स्य अवतार जयालागी ॥ १ ॥ तोचि महाराज भिवरेचे तटीं ॥ उभा जगजेठी विटेवरी ॥ २ ॥ घेउनी अवतार वेद आणियेले ॥ ब्रह्मीया स्थापिलें ब्रह्मपुरीं ॥ ३ ॥ शंखासुर वधुनी विजयी पैं झाला ॥ वर्णितां पैं धाला जनार्दन ॥ ४ ॥

॥ १५५० ॥ इंद्राचे कैवारें कांसव पैं झाला ॥ देव घुसळिती पृष्ठीं भार वाहिला ॥ १ ॥ तो हा महाराज विटे उभा नीट ॥ भक्त तारावया केली पंढरी पेठ ॥ २ ॥ एकाजनार्दनीं रत्नें चौदा काढिलीं ॥ देव सुरवर जेणें सुखी केले ॥ ३ ॥

॥ १५५१ ॥ रसातळा जातां अवनी ॥ घेतलें वराहरूप चक्रपाणी ॥ १ ॥

तोची महाराज पुंडलीका पाठीं ॥ कर ठेऊनी कटीं उभा विटे ॥ २ ॥ हिरण्याक्ष वधुनी सुखी केले देव ॥ एकाजनार्दनीं त्याचे पायीं ठाव ॥ ३ ॥

॥ १५५२ ॥ भक्त प्रल्हादाकारणें नरसिंह झाला ॥ विदारूनि दैत्य स्तंभीं उद्भव केला ॥ १ ॥ तोचि महाराज कर ठेवुनी कटीं ॥ उभा राहिला अठ्ठाविस युगें पाठीं ॥ २ ॥ एकाजनार्दनीं भक्तकाजकैवारी ॥ संहारुनी दैत्य वाढवी भक्तांची थोरी ॥ ३ ॥

॥ १५५३ ॥ बळीचे द्वारीं आपण वामन झाला ॥ इंद्राच्या कैवारें बळी पाताळीं घातिला ॥ १ ॥ तोचि महाराज उभा विटेवरी ॥ कर धरिले कटीं पाउलें दोन्ही साजिरीं ॥ २ ॥ भक्ताचिया काजा विटे उभा राहिला ॥ एकाजनार्दनीं देव डोळा पाहिला ॥ ३ ॥

॥ १५५४ ॥ मातेच्या कैवारा सहस्रार्जुन वधी ॥ एकविस वेळा पृथ्वी निक्षत्रिय शोधी ॥ १ ॥ तोची मायबाप चंद्रभागे तीरीं ॥ कर कटावरी ठेउनी उभा ॥ २ ॥ एकाजनार्दनीं ज्याची कीर्ती वर्णितां ॥ द्वैत हरपलें ममता देशधडी चिंता ॥ ३ ॥

॥ १५५५ ॥ सीतेच्या कैवारें रावण वधियला ॥ जाउनीया लंकें बिभीषण स्थापिला ॥ १ ॥ तोचि महाराज चंद्रभागे तीरीं ॥ कट दोनी धरुनी उभा विटेवरी ॥ २ ॥ एकाजनार्दनीं रामनाम कीर्त्ती ॥ त्याचें चरित्र ऐकतां समाधान वृत्ती ॥ ३ ॥

॥ १५५६ ॥ द्वापारीं अवतार आठवा ॥ कंसासुर वधियला श्रीकृष्ण साटवा ॥ १ ॥ तोचि महाराज चंद्रभागे तटीं ॥ उभा राहिलासे कर ठेउनी कटीं ॥ २ ॥ एकाजनार्दनीं चरणीं पडली मिठी ॥ आठवा आठवितां तुटे जन्मकोटी ॥ ३ ॥

॥ १५५७ ॥ पुंडलीकाकारणें वाळुवंटीं उभा ॥ भक्ताच्या कैवारें दिसतसे शोभा ॥ १ ॥ पुढें चंद्रभागा वाहे अमृतमय ॥ आषाढी कार्तिकी वैष्णवांची दाटी होय ॥ २ ॥ एकाजनार्दनीं जया वैष्णव गाती ॥ विठ्ठल नाम उच्चारितां सायुज्य मुक्ती ॥ ३ ॥

॥ १५५८ ॥ कलंकी अवतार पुढें होईल श्रीहरी ॥ लोपोनी जातां धर्म मग अवतार धरी ॥ १ ॥ दहा अवतार भक्ताकारणें घेतो ॥ भक्ताची

आवडी ह्मणोनी गर्भवासा येतो ॥ २ ॥ अंबऋषी कैवारें दहा अवतार घेतले ॥ एकाजनार्दनीं सांचें चरित्र वर्णिलें ॥ ३ ॥

॥ १५५९ ॥ कमळ नेत्र पाहतां मन माझें भुललें ॥ योगी ध्याती जया तें रूप पंढरीये आलें ॥ १ ॥ आनंदु वो परमानंदु ध्यातां ॥ समाधि उन्मनी वोवाळणी तत्वतां ॥ २ ॥ योग याग तप नलगे आचरण कांहीं ॥ सुलभ सोपारा वसे सर्वा ठाई ॥ ३ ॥ वेद शास्त्र श्रमले पुराणें भांडती ॥ शेषादिकां न कळे कुंठित मती ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं पाहतां आनंदें मन ॥ तद्रूपचि झालें जनीं सर्व जनार्दन ॥ ५ ॥

॥ १५६० ॥ जया कारणें श्रमले भांडती ॥ वेदादिकां न कळे मती ॥ तो वोळला सगुण मूर्ती ॥ पुंडलिकाकारणें ॥ १ ॥ धन्य धन्य पावन देख ॥ पुण्य भूमि पावन सुरेख ॥ तया गातां होतसे हर्ष ॥ प्रेमानंदें डुल्लती ॥ २ ॥ एकाजनार्दनीं शरण ॥ पाहतां पाहतां वेधलें मन ॥ मोक्ष मुक्ति कर जोडून ॥ उभे तिष्ठती सर्वदां ॥ ३ ॥

॥ १५६१ ॥ मोकळा मार्ग पंढरीचा ॥ नाहीं साधन करणें साचा ॥ योग अभ्यासाचा ॥ श्रमचि नको ॥ १ ॥ जाय जाय पंढरपुरा ॥ पाहे दिनांचा सोयरा ॥ पुंडलीकें थारा ॥ दिधला जया आवडी ॥ २ ॥ तेथें करितां वसती ॥ नाहीं तया पुनरावृत्ती ॥ जन्म मृत्यूची खंती ॥ न करी कांहीं ॥ ३ ॥ पावन तीर्थ महीवरी ॥ समान या नाहीं दुसरी ॥ एकाजनार्दनीं निर्धारीं ॥ प्रेमें वारी करिती ॥ ४ ॥

॥ १५६२ ॥ पुंडलीक ह्मणतां वाचें ॥ पाप जातें रे जन्माचें ॥ जीहीं देखिलें पद याचें ॥ धन्य भाग्याचे नर ते ॥ १ ॥ जाती पंढरीसी आधीं ॥ तुटे तयांची उपाधी ॥ ऋद्धि सिद्धि मांदी ॥ तिष्ठतसे सर्वदां ॥ २ ॥ भुक्ति मुक्ति धांवती मागें ॥ आह्मां अनुसरा वेगें ॥ ऐसें ह्मणोनी वेगें ॥ चरणीं मिठी घालिती ॥ ३ ॥ शरण एकाजनार्दनीं ॥ विटे उभा मोक्ष दानी ॥ लागतां तयाचे चरणीं ॥ पुनरावृत्ति न येती ॥ ४ ॥

॥ १५६३ ॥ करा करा लागपाठ ॥ धरा पंढरीची वाट ॥ पुंडलिकाची पेठ ॥ सोपी आहे सर्वांसी ॥ १ ॥ नाहीं कोठें गोंवागुंती ॥ दुजा नकोरे सांगाती ॥ एक चित्तवृत्ती ॥ दृढ करी मानसीं ॥ २ ॥ नको माझें आणि तुझें ॥ टाकी परतें करिं वोझें ॥ संत चरण रज ॥ सेवी करिं आदरें

॥ ३ ॥ तुटती भव जाळ गुंती ॥ सहज होतसे विरक्ती ॥ एकाजनार्दनीं प्रीती ॥ धरा संतचरणीं ॥ ४ ॥

॥ १५६४ ॥ ऐसे संत भार ऐसें भीमातीर ॥ ऐसा जयजयकार सांगा कोठें ॥ १ ॥ समुद्रवलयांकित तीर्थें असती पावन ॥ परी ऐसें महिमान नाहीं कोठें ॥ २ ॥ ऐसा नामघोष आनंद सोहळा ॥ न देखें आणिके स्थळां माझे नेत्रीं ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं पंढरीवांचुनी ॥ आनंद माझे मनीं नाहीं कोठें ॥ ४ ॥

॥ १५६५ ॥ प्रयागादी तीर्थें आहेत समर्थ ॥ परी पुरती मनोरथ पंढरीये ॥ १ ॥ बहुत ते साक्ष देती या स्थळासी ॥ सदां तो मानसीं शिव ध्याये ॥ २ ॥ आनंद सोहळा त्रैलोक्य अगाध ॥ पंढरीये भेदाभेद नाहीं सत्य ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं क्षेत्रवासी जन ॥ देवाते समान सत्य होती ॥ ४ ॥

॥ १५६६ ॥ भागिरथी आणि भीमरथी वदतां ॥ समान तत्वतां कलीमाजीं ॥ १ ॥ प्रातःकाळीं नामस्मरण जो गाय ॥ तीर्थीं सदां न्हाय पुण्य जोडे ॥ २ ॥ वदतां वाचें नाम घडतां एक स्नान ॥ पुनरपि न आगमन मृत्युलोकीं ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं भीमरथी वदतां ॥ प्रयागीं समता सरी न पवे ॥ ४ ॥

॥ १५६७ ॥ उत्तम तें क्षेत्र उत्तम तें स्थळ ॥ धन्य तें राऊळ पहातां डोळां ॥ १ ॥ एक एक तीर्थ घडती कोटी वेळां ॥ चंद्रभागा डोळां देखिलीया ॥ २ ॥ गंगा प्रदक्षिणा समुद्राचें स्नान ॥ परी हें महिमान नाहीं कोठें ॥ ३ ॥ वैष्णवाचा मेळ करती गदारोळ ॥ दिंडी पताका घोळ नोहे कोठें ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं साराचें हें सार ॥ पंढरी माहेर भाविकांसी ॥ ५ ॥

॥ १५६८ ॥ तीन अक्षरी जप पंढरी ह्मणे वाचा ॥ कोटी या जन्माचा शीण जाय ॥ १ ॥ युगायुगीं माहात्म्य व्यासें कथियेलें ॥ कलियुगीं केलें सोपें पुंडलीकें ॥ २ ॥ महा पापराशी त्यांची होय होळी ॥ विठ्ठलनामें टाळी वाजवितां ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं घेतां पैं दर्शन ॥ जड जीवां उद्धरण कलियुगीं ॥ ४ ॥

॥ १५६९ ॥ भाविकासी नित्य नवें हें सोपारें ॥ पंढरी उच्चार करितां वाचें ॥ १ ॥ हो कां अनामीक अथवा शुद्ध वर्ण ॥ ज्ञातीसी कारण नाहीं

देवा ॥ २ ॥ एकाजनार्दनीं भलती ज्ञाती असो ॥ परी पांडुरंग वसो हृदया-माजीं ॥ ३ ॥

॥ १५७० ॥ आले वारकरी करिती जयजयकार ॥ गरुडटके भार असंख्यात ॥ १ ॥ त्या सुखाचा पार जाणे तोचि एक ॥ भक्त पुंडलीक भाग्यवंत ॥ २ ॥ प्रेमें महाद्वारीं घालुनी लोटांगण ॥ देती आलिंगन एक-मेकां ॥ ३ ॥ नीडारले नयन पीतांबरधारी ॥ देखिले विटेवरी पांडुरंग ॥ ४ ॥ शिणली सासुरवासीं माउली तें देखे ॥ तये चित्त पोखे जीवन-कळा ॥ ५ ॥ तैसें तें श्रीमुख देखोनी निवालें ॥ आलिंगना निघाले लवड सवडीं ॥ ६ ॥ विटे सहित मिठी घातलीसे पायीं ॥ शरिरीं शुद्धि नाहीं मीपणाची ॥ ७ ॥ अनंता जन्मींचे विसरलों संताप ॥ विटोबा मायबाप देखियेला ॥ ८ ॥ एक ह्मणती स्वामि देवा दीनवत्सला ॥ कृपेचा कोंवळा पांडुरंग ॥ ९ ॥ ह्मणती कूर्मदास आर्त करुनीया ॥ तुह्मा भेटावया बोला-विलें ॥ १० ॥ माझीये हातींचा चरणीं माथा ठेवा ॥ निरोप सांगावा पंढ-रिनाथा ॥ ११ ॥ कृपेचा कोंवळा दीन दयानिधि ॥ येउनी मज आधीं सांभाळावें ॥ १२ ॥ नाहीं कर चरण न घडे दर्शन ॥ मन आहे शरण तुमचे पायीं ॥ १३ ॥ चातक जलधरा चिंतितां मानसीं ॥ चकोर चंद्रासी भावें जैसा ॥ १४ ॥ तैसी मनीं आवडी उचलली तूंतें ॥ ध्यातुसे तुमतें देवराया ॥ १५ ॥ स्मरे वत्स जैसें माउली लागुनी ॥ पिलीं ते पक्षीणी लागी जैसीं ॥ १६ ॥ तैसा मी तुमतें चिंतीं वेळोवेळां ॥ देखावया डोळां चरण स्वामी ॥ १७ ॥ गोत वित्त धन मज नाहीं आधारू ॥ तुमचा निर्धारू आहे देवा ॥ १८ ॥ करुणासिंधु ऐसें ह्मणवितां जनीं ॥ येऊन मजलागुनी सांभाळावें ॥ १९ ॥ अनाथाचा नाथ सर्वज्ञाचा रावो ॥ जाणसी निज-भावो अंतरींचा ॥ २० ॥ ऐसें कूर्मदासें विनविलें आहे ॥ अहर्निशीं पाहे वाट तुझी ॥ २१ ॥ ऐकोनी पंढरिराव झाला उत्कंठित ॥ केव्हां तो निज-भक्त आलिंगीन ॥ २२ ॥ अंतरीचे मनोरथ होती परिपूर्ण ॥ उल्हासती नयन देखलीया ॥ २३ ॥ भक्त इष्टमित्र भक्त सुखसिंधू ॥ भक्त आर्तबंधु थोर मज ॥ २४ ॥ बोलविला नामा आणि ज्ञानदेवो ॥ सांगीतला भावो तयाप्रती ॥ २५ ॥ आर्ते करुनी वाट पहातसे कूर्मा ॥ बोलाविलें आह्मां भेटीलागीं ॥ २६ ॥ जाऊं समागमें तुह्मीं आह्मीं तेथें ॥ करणें सनाथ भक्तराया ॥ २७ ॥ ह्मणोनी दोघाजणां धरुनीयां हातीं ॥ चालिले श्रीपति चरणचाली ॥ २८ ॥ ह्मणे ज्ञानदेवो अहो जी पूर्णकामा ॥ जाणा तुमचा महिमा तुह्मीं

देवा ॥ २९ ॥ करता करविता सर्व तुझी सत्ता ॥ सकळांची चाळिता चित्तवृत्ती ॥ ३० ॥ नामदेवें चरणीं ठेवियेला माथा ॥ बरवें दीनानाथा विचारिलें ॥ ३१ ॥ संताचें दर्शनें होईल संयोग ॥ निवती अष्टांगें चरण स्पर्शें ॥ ३२ ॥ विकासिले नयन स्फुरण आले बाहीं ॥ दाटलें हृदयीं करुणा भरीतें ॥ ३३ ॥ जातां मार्गीं भक्त देवाचा आवडता ॥ होता तो सांवता जीवन्मुक्त ॥ ३४ ॥ त्याचें सुख घ्यावें ह्मणोनी माव देवें ॥ कौतुक दाखवावें नामयासी ॥ ३५ ॥ तयांप्रती काय बोले केशवराज ॥ लागलीसे मज थोर तृषा ॥ ३६ ॥ नामा ज्ञानदेव राहिले बाहेरी ॥ मळीयाभीतरीं देव गेला ॥ ३७ ॥ तंव तो परमानंद बोधें नित्य तृप्त ॥ केलें विण करीत नये कामा ॥ ३८ ॥ माथा ठेवोनी हात केला सावधान ॥ दिधलें आलिंगन चहू भुजीं ॥ ३९ ॥ देखोनीयां मिठी घातली चरणीं ॥ वोसंडलें नयनीं प्रेमजळ ॥ ४० ॥ करितसे विनवणी स्वामि चक्रपाणी ॥ जनक जननी तूंचि माझी ॥ ४१ ॥ तूंची माझें सर्व वैभव गौरव ॥ हृदयींचा भाव जाणसी तूं ॥ ४२ ॥ चरणीं ठेउनी माथा विनवीतसे सांवता ॥ बैस पंढरीनाथा करीन पूजा ॥ ४३ ॥ ह्मणती देवराव कैचें पूजन तुझें ॥ राख राख माझे प्राण आतां ॥ ४४ ॥ तस्कराची मांदी लागलीसे पाठी ॥ चुकवी त्याची दृष्टि लपवी मज ॥ ४५ ॥ कोठें तुज लपवूं अगा सगुणरूपा ॥ माझ्या मायबापा पांडुरंगा ॥ ४६ ॥ ऐसा कोण रीता ठाव न दिसे मज ॥ तेथें तुझें तेज झांकोळेल ॥ ४७ ॥ बाहेर भीतरीं तुझाचि प्रकाश ॥ गगनासी अवकाश तुझे पोटीं ॥ ४८ ॥ मग कटींचें खुरपें सत्वर काढिलें ॥ हृदय फाडिलें तत्क्षणीं ॥ ४९ ॥ यावें पंढरिनाथा रिघावें भीतरीं ॥ सुखरूप निर्धारी रहावें येथें ॥ ५० ॥ बैसोनियां देव हृदयसंपुटीं ॥ करी सुख गोष्टी स्वभक्तासी ॥ ५१ ॥ एवढ्या उपकारा काय तुज द्यावें ॥ कैसें तुज व्हावें उतराई ॥ ५२ ॥ अवघा मीचि घेई अवघा मीचि होई ॥ या परतें कांहीं न दिसे मज ॥ ५३ ॥ तंव ह्मणे सांवता जीवाहुनी परता ॥ न करी तूं चिंता विठ्ठल स्वामी ॥ ५४ ॥ नामा मनीं करितसे चिंतनीं ॥ नयेची अझुनी विठ्ठल माझा ॥ ५५ ॥ वाट पाहतां बहु वाडवेळ झाला ॥ कोठें गुंतयेला स्वामि माझा ॥ ५६ ॥ माझा पांडुरंग सत्र सुखधन ॥ दाखविल कोण प्राणसखा ॥ ५७ ॥ अवस्थे भरे प्रेम असे स्फुंदत ॥ विठ्ठल विठ्ठल ह्मणतू वेळोवेळा ॥ ५८ ॥ देह जातो चांचरी भेटीलागी आर्त ॥ पाउलें उमगीत विठोबाचीं ॥ ५९ ॥ तृषाक्रांत कैसें जीवनातें गिवसी ॥ कीं बाळ

मातेसी क्षुधातुर ॥ ६० ॥ हरिणीचें पाडस चुकले हरिणीसी ॥ तैसें दाही दिशीं पाहे देखा ॥ ६१ ॥ पाझर सुटला दृष्टी वोसंडला पोटीं ॥ हृदय तें पिटी करकमळीं ॥ ६२ ॥ देह टाकी धरणी नामाचे बोभाटी ॥ ह्मणे देई भेटी प्राण जातो ॥ ६३ ॥ सांडोनी जातोसी ऐसें जरी जाणते ॥ तरी कां विसंबते तुजलागी ॥ ६४ ॥ मिठी पीतांबरीं घालुनी मुरारी ॥ येतो चरणावरी रुळत सरसा ॥ ६५ ॥ ऐसें विलपत अंतर अवस्था ॥ देखिला सांवता सुख राशी ॥ ६६ ॥ चरणीं घालुनी मिठी पुसतसे मातू ॥ माझा पंढरीनाथू केउता गेला ॥ ६७ ॥ तो विसरला देहभावा आर्तभूत मनें ॥ होउनी संधानें हरीच्या रूपा ॥ ६८ ॥ प्रेम उचंबळतु आनंदें डुल्लतू ॥ वाचेंसी जपतू रामकृष्ण ॥ ६९ ॥ देखोनी त्याची स्थिति विठ्ठल माझा आहे ॥ त्याजपाशीं पाहे पुढतोपुढती ॥ ७० ॥ त्याचें पूर्णसुख देखीयेलें मनें ॥ हर्षयुक्त चिन्हें याचे देहीं ॥ ७१ ॥ मज दुबळ्याचा ठेवा गिळीयेला तुवां ॥ सुखाचा विसावा पंढरिराव ॥ ७२ ॥ क्षणभरी दाखवी धरीन मी जीवीं ॥ जाताती वांचवी प्राण माझे ॥ ७३ ॥ वेगीं मजसि भेटे करी सुखगोष्टी ॥ ह्मणे करीन भेटी विठोबाची ॥ ७४ ॥ तेचि शकुन गांठी बांधली पालवी ॥ माझ्या माथां ठेवी अभय कर ॥ ७५ ॥ ऐकोनी पंढरिनाथ ह्मणे सांवत्यातें ॥ मज माझ्या नाम्यातें भेटी करी ॥ ७६ ॥ शिणलें बाळक होत कासाविसी ॥ दिसतें परदेशी मजविण ॥ ७७ ॥ मग ह्मणे सांवता परिसी हरिभक्ता ॥ कृपा पंढरीनाथा आली तुझी ॥ ७८ ॥ ह्मणोनी उतावेळ झाले कमळापती ॥ भेटोनी विश्रांति द्यावी मज ॥ ७९ ॥ जवळींच देखसी सावधान पाहे ॥ देती पंढरीराय आलिंगना ॥ ८० ॥ न कळे तुवां काय केल्या पुण्यराशी ॥ वाटे भजिन्नलासी सर्वभूतीं ॥ ८१ ॥ जेणें सुख पावोनी माझा पंढरीनाथ ॥ झाला वेळाईत तुजलागीं ॥ ८२ ॥ खांदीं गरुडटका घेउनी निरंतरीं ॥ चालविली वारी पंढरीची ॥ ८३ ॥ संतचरणरज वंदियेले माथां ॥ ह्मणोनी पंढरिनाथा आर्त तुझें ॥ ८४ ॥ दशमी दिंडीपुढें नाचती बागडे ॥ गाईल साबडे हरिचें नाम ॥ ८५ ॥ तेणें पंढरीनाथा वाटला आनंदु ॥ मग तो कृपासिंधु बोळला तुज ॥ ८६ ॥ काया वाचा मनें होऊन तल्लीन ॥ केलें हरिकीर्तन एकादशी ॥ ८७ ॥ तेथें तिष्ठत होता पंढरीचा रावो ॥ प्रसन्न हा देव झाला तुज ॥ ८८ ॥ अनंत जन्मीं देह करवतीं घातलें ॥ कां उग्र तप साधिलें महा तीर्थीं ॥ ८९ ॥ परोपकारीं प्राण वेंचियेला तुवां ॥ पंढरी येतां केशव धाला तेणें ॥ ९० ॥ आतां तुझें भाग्य महिमा

तो अद्भुत ॥ जाणें पैं समर्थ पंढरीराव ॥ ९१ ॥ ह्मणोनीया चरणीं ठेउनीया माथा ॥ गहींवरे सांवता भक्तराज ॥ ९२ ॥ प्रेमें आलिंगन झालें उभयतां ॥ मग झाला बोलता विष्णुदास ॥ ९३ ॥ सुखाचा सोयरा तूंचि गा तत्वता ॥ माझा प्राणदाता भक्तराज ॥ ९४ ॥ सांगीतला शकुन साच करी वहिला ॥ मज माझ्या विठ्ठला भेटी करी ॥ ९५ ॥ आतां मज धीरु न धरवे सर्वथा ॥ स्फुंदता हे अवस्था चित्त माझें ॥ ९६ ॥ कडव्याचें खुरपें काढुनीया येरें ॥ हृदय फाडिलें तये वेळीं ॥ ९७ ॥ तंव तो पांडुरंग निघाला बाहेरी ॥ नामा पाय धरी धांऊनीया ॥ ९८ ॥ येरें संबोखुनी पीतांबर आंचळें ॥ पुसिलें मुखकमळ नामीयाचें ॥ ९९ ॥ देउनी आलिंगन हांसे पंढरीनाथ ॥ पुसतसे वृत्तांत काय झालें ॥ १०० ॥ येरें तंव मिठी घातली चरणीं ॥ ह्मणे जनक जननी तूंचि देवा ॥ १ ॥ कवण्या मोहें माझे पाळीसी तूं लळे ॥ हें मज न कळे केशवराजा ॥ २ ॥ भेटोनीया मातें ह्मणे ज्ञानदेव ॥ कूर्माही पहा वो लवलाहीं ॥ ३ ॥ तरीच माझ्या मना वाटे समाधान ॥ निवती लोचन देखिलीया ॥ ४ ॥ भेटीचें पैं आर्त आहे माझे मनीं ॥ चाल वेगें करुनी करुणारसें ॥ ५ ॥ आनंदाचा मार्ग संताचे संगतीं ॥ आनंदें नाचती पांडुरंग ॥ ६ ॥ स्फुरती भुजा दंड आणि वक्षस्थळ ॥ सुखाब्धी मिळेल मना आजी ॥ ७ ॥ नामा ज्ञानदेव नवल करिती कैसें ॥ कूर्म्याचें पैं ऐसें प्रेम देवा ॥ ८ ॥ वोसरली धेनु वत्सालागी जाय ॥ तैसें पंढरीराय चालियेले ॥ ९ ॥ लवताती लोचन स्फुरताति बाहे ॥ येती माझी माय भेटीलागी ॥ ११० ॥ आला पंढरीराव कूर्मा घाली लोटांगण ॥ दिधलें आलिंगन चहुं भुजीं ॥ ११ ॥ पडियेली मिठी न सोडी सर्वथा ॥ मिनला पंढरीनाथा सद्भावेंशी ॥ १२ ॥ कूर्मा ह्मणे माझें थोर भाग्य आतां ॥ ह्मणोनी पंढरीनाथा भेटी तुझी ॥ १३ ॥ तरी आतां तुवां न जावें येथुनी ॥ जोडला चरणीं स्थिर राहे ॥ १४ ॥ देव आणि भक्त एक रूप झाले ॥ मग दोघे आले आश्रमासी ॥ १५ ॥ देव ह्मणे भक्ता कष्टी तूं झालासी ॥ तुझीये उपकारासी काय वानूं ॥ १६ ॥ भानुदासा नयनीं पूर्ण जळ दाटलें ॥ मग आलिंगिलें पांडुरंगें ॥ १७ ॥

॥ १५७१ ॥ गंगा सागरादी तीर्थें भूमीवरी ॥ परी पंढरीची सरी न पावती ॥ १ ॥ श्रेष्ठांमाजीं श्रेष्ठ तीर्थ पैं समर्थ ॥ दरुशनें मनोरथ पूर्ण होती ॥ २ ॥ ऐसी चंद्रभागा ऐसा पुंडलीक ॥ ऐसे वैष्णव देख

नाहींत कोठें ॥ ३ ॥ गाताती वैष्णव आनंदें नाचती ॥ सदोदीत कीर्ति विठ्ठलाची ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं पंढरीचा हाट ॥ भूवैकुंठपेंठ पंढरी देखा ॥ ५ ॥

॥ १५७२ ॥ सप्तपुऱ्यांमाजी पंढरी पावन ॥ नाम घोष जाण वैष्णव करती ॥ १ ॥ देव तो विठ्ठल देव तो विठ्ठल ॥ आहे सोपा बोल वाचें ह्मणतां ॥ २ ॥ आणिक कांहीं नको या परतें साधन ॥ विठ्ठल निधान टाकूनिया ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं विठ्ठलावांचुनी ॥ आन नेणें मनीं दुजें कांहीं ॥ ४ ॥

॥ १५७३ ॥ पंढरीसी जारे आधीं ॥ कृपानिधि तो पहा ॥ १ ॥ संसाराची तुटेल बेडी ॥ उबगे घडी पंढरीये ॥ २ ॥ गाताती भाळेभोळे ॥ प्रेमें सांवळे नाचत ॥ ३ ॥ कुंचे पताका गरुडटके ॥ वैष्णव निके मेळ मिळे ॥ ४ ॥ दिंडी कथा जागरण ॥ एकाजनार्दनीं ते पावन ॥ ५ ॥

॥ १५७४ ॥ देव भुलला भावासी ॥ सांडोनीया वैकुंठासी ॥ १ ॥ उघडा आला पंढरपुरा ॥ तो परात्पर सोइरा ॥ २ ॥ पाहुनीया पुंडलीका ॥ भुलला तयाच्या कौतुका ॥ ३ ॥ उभा राहिला विटेवरी ॥ एकाजनार्दनीं हरी ॥ ४ ॥

॥ १५७५ ॥ समुद्रवलयांकित पृथिवी पहातां ॥ ऐसें तीर्थ सर्वथा नाहीं कोठें ॥ १ ॥ भाविकाचें माहेर जाणा पंढरपूर ॥ विठ्ठल विटेवरी उभा असे ॥ २ ॥ एकाजनार्दनीं तयाचाचि ठसा ॥ भरुनी आकाशा उरलासे ॥ ३ ॥

॥ १५७६ ॥ परा ही पश्यंती मध्यमा वैखरी ॥ वसे तो श्रीहरी पंढरीये देखा ॥ १ ॥ चारी वाचा तया सदोदित गाती ॥ पुराणें भांडती अहोरात्र ॥ २ ॥ वेद श्रुति नेति नेति ह्मणताती ॥ तो पुंडलीकापुढें प्रीतीं उभा असे ॥ ३ ॥ सनक सनंदन जयासी पैं ध्याती ॥ तो हरी बाळमूर्ती खेळतसे ॥ ४ ॥ योगीयां ह्रदईचें ठेवणें सर्वथा ॥ एकाजनार्दनीं तत्वतां वोळखिलें ॥ ५ ॥

॥ १५७७ ॥ वेदीं सांगितलें श्रुती अनुवादलें ॥ तें ब्रह्म कोंदलें पंढरीये ॥ १ ॥ वाळुवंटीं बुंथी श्रीविठ्ठल नामें ॥ सनकादीक प्रेमें गाती जया ॥ २ ॥ एकनाथ ह्मणे तो हरि देखिला ॥ ह्रदईं सांठविला आनंद भरीत ॥ ३ ॥

॥ १५७८ ॥ अवघें आनंदाचें ॥ क्षेत्र विठ्ठल देवाचें ॥ १ ॥ अवघें हें पावन ॥ तीर्थ चंद्रभागा स्नान ॥ २ ॥ अवघे संत जन ॥ पुंडलीकासी वंदन ॥ ३ ॥ अवघा विठ्ठल देव ॥ एकाजनार्दनीं भाव ॥ ४ ॥

॥ १५७९ ॥ अवघा सुखाचा आनंद ॥ अवघा विटेवर परमानंद ॥ १ ॥ अवघें चराचर सुख ॥ अवघेंया जालीया विमुख ॥ २ ॥ अवघें डोळे भरुन पहा ॥ अवघें सुखें पूर्ण व्हा ॥ ३ ॥ अवघा अंतरीं आठवा ॥ एकाजनार्दनीं सांठवा ॥ ४ ॥

॥ १५८० ॥ अवघें परब्रह्म क्षेत्र ॥ अवघें तेथें तें पवित्र ॥ १ ॥ अवघा पर्वकाळ ॥ अवघे दैवाचे सकळ ॥ २ ॥ अवघीयां दुःख नाहीं ॥ अवघें सुखचि तया ठायीं ॥ ३ ॥ अवघे आनंद भरित ॥ एकाजनार्दनीं सदोदित ॥ ४ ॥

॥ १५८१ ॥ अवघेंची सुख तयासी जोडलें ॥ अवघे पाउलें देखतांची ॥ १ ॥ अवघें ब्रह्मरूप नाहीं कांहीं चिंता ॥ अवघाचि देखतां पांडुरंग ॥ २ ॥ अवघे ते धन्य क्षेत्रवासी दैवाचे ॥ एकाजनार्दनीं वाचें विठ्ठल वदती ॥ ३ ॥

॥ १५८२ ॥ अवघें साधनें साधिलें ॥ अवघें विठ्ठलरूप जालें ॥ १ ॥ अवघें कर्म नेणती धर्म ॥ अवघा तया परब्रह्म ॥ २ ॥ अवघी सिद्धि समाधी ॥ अवघी तुटली आधिव्याधी ॥ ३ ॥ अवघें जालें एकरूप ॥ एकाजनार्दनीं स्वरूप ॥ ४ ॥

॥ १५८३ ॥ अवघे यारे चला जाऊं ॥ विठ्ठल रखुमाई पाहूं ॥ १ ॥ अवघे ते भाग्याचे ॥ नाम घेती विठ्ठलाचें ॥ २ ॥ अवघे ब्रह्मज्ञानी ॥ शरण एकाजनार्दनीं ॥ ३ ॥

॥ १५८४ ॥ अवघें क्षेत्र पंढरी ॥ अवघा आनंद घरोघरीं ॥ १ ॥ अवघा विठ्ठलचि देव ॥ अवघा अवघीया एक भाव ॥ २ ॥ अवघे समदृष्टी पहाती ॥ अवघे विठ्ठलची गाती ॥ ३ ॥ अवघे ते दैवाचे ॥ एकाजनार्दनीं साचे ॥ ४ ॥

॥ १५८५ ॥ अवघे रंगले रंगीं ॥ अवघे सा पांडुरंगीं ॥ १ ॥ अवघा दुजा भाव नाहीं ॥ अवघे विठ्ठलची पाही ॥ २ ॥ अवघे आनंदें नाचती ॥

अवघे रंगीं त्या गाती ॥ ३ ॥ अवघे भाळेभोळे ॥ अवघे प्रेमाचे आगळे ॥ ४ ॥ अवघा जनार्दन ॥ एकाजनार्दनीं भजन ॥ ५ ॥

॥ १५८६ ॥ अवघे अवघे ते देव ॥ अवघे अवघे एक भाव ॥ १ ॥ अवघे अवघे प्रेमळ ॥ अवघे अवघे निर्मळ ॥ २ ॥ अवघे अवघे भावाचे ॥ अवघे अवघे प्रेमाचे ॥ ३ ॥ अवघा एका अवघा एका ॥ अवघा अवघा जनार्दनएका ॥ ४ ॥

॥ १५८७ ॥ सर्वां घटीं बिंबला व्यापुनी राहिला ॥ पुंडलीकें उभा केला विटेवरी ॥ १ ॥ सांवळा चतुर्भुज कांसें पीतांबर ॥ वैजयंतीमाळ शोभे-कंठीं ॥ २ ॥ कटावरी कर पाउलें साजिरीं ॥ उभा तो श्रीहरि विटेवरी ॥ ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं बिंबे तो बिंबला ॥ बिंब बिंबोनी ठेला देहा-माजीं ॥ ४ ॥

॥ १५८८ ॥ उभा विटेवरी ॥ कट धरुनीया करीं ॥ भीमा ती सा-मोरी ॥ वहात आहे ॥ १ ॥ जाऊं तया ठाया ॥ आनंदें तेणें काया ॥ वैष्ण-वांचीया पाया ॥ लोटांगणीं ॥ २ ॥ कर्माकर्म नांहीं वाद ॥ भेद भ्रम नाहीं भेद ॥ वैष्णवाचा छंद ॥ नाम गाती आनंदें ॥ ३ ॥ सुख अनुपम्य अभेदें ॥ एकाजनार्दनीं छंदें ॥ गातां नाचतां आल्हादें ॥ प्रेम जोडे ॥ ४ ॥

॥ १५८९ ॥ धर्म अर्थ काम ॥ जीहीं अर्पिला संपूर्ण ॥ १ ॥ तेची जाती या वाटा ॥ पंढरी चोहटा नाचती ॥ २ ॥ आणिकासी नोहे प्राप्ती ॥ संत गाती तो स्वादु ॥ ३ ॥ शीण आदी अवसानीं ॥ पंढरपूर न देखतां नयनीं ॥ ४ ॥ उभा विटे समचरणीं ॥ एका शरण जनार्दनीं ॥ ५ ॥

॥ १५९० ॥ पाहो पुंडलीक यारे पंढरीस ॥ देतो सकळांस मोक्ष हातीं ॥ १ ॥ नलगे तें ध्यान नलगे धारणा ॥ चंद्रभागे स्नान पुरे एक ॥ २ ॥ धरा नित्य नेम करा संतर्पण ॥ तेंचि पांडुरंग ध्यान धरा मनीं ॥ ३ ॥ एका-जनार्दनीं एकत्वें सुचिलें ॥ एकी बोधविलें एकपणें ॥ ४ ॥

॥ १५९१ ॥ तुह्मी पंढरीये जातां ॥ तरी मी पाया लागेन आतां ॥ चरणरजें झाली साम्यता ॥ तुमचें पाऊल माझे माथां ॥ १ ॥ जेथें जेथें पाऊल बैसे ॥ एका एकपणेंविण असे ॥ धृ० ॥ पंढरीचे वाटे ॥ पसरिले ते मी गोटे ॥ पाया लागेन अवचटे ॥ तेणें सुख आहे मज मोठें ॥ २ ॥ जेथें पाऊ-

लाचा माग ॥ तेथें माझें अखंड अंग ॥ चरणरज आह्मां भोग ॥ काय करसील वैकुंठ चांग ॥ ३ ॥ संत भेटतील वाडें कोडें ॥ तरी मी आहें पायापुढें ॥ हेही आठवण न घडे ॥ तरी मी वाळुवंटीचे खडे ॥ ४ ॥ यात्रा दाटेल घसणीं ॥ लागेन अवघीयां चरणीं ॥ एकाजनार्दनु कीर्तनीं ॥ आठवा आसनीं शयनीं ॥ ५ ॥

---

# कर्म.

॥ १५९२ ॥ देहबुद्धि खुंटली तेथें माया तुटली ॥ देहाची स्थिति दैवाधीन ठेली ॥ १ ॥ दैवाचेनी बळें देहींचें कर्म चळे ॥ स्वसुखाचे सोहळे विदेहभावें ॥ २ ॥ भोगी कां त्यागी अथवा हो योगी ॥ देहीं देहपण नलगे त्याच्या अंगीं ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं एकपणाच्या तटीं ॥ सहज चैतन्यासी मिनला उठाउठी ॥ ४ ॥

॥ १५९३ ॥ कर्म करसी तरि कर्मठचि होसी ॥ परि निष्कर्म नेणसी कर्मामाजीं ॥ १ ॥ ब्रह्मालागी कर्म सांडणें हें कुडें ॥ पाय खंडोनी पुढें चालूं पाहसी ॥ २ ॥ डोळ्याची न्हाळी घेवों जातां करतळीं ॥ पाहों जातां मुळीं पाहाणेंचि नाहीं ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं सर्व कर्म पाही ॥ सांडी मांडी नाहीं तये ठायीं ॥ ४ ॥

॥ १५९४ ॥ बोधभानु तया नाहीं मध्यान्ह ॥ सायंप्रातही नाहीं तेथें कैंचा अस्तमान ॥ १ ॥ कर्मचि खुंटलें करणेंचि हारपलें ॥ अस्तमान गेलें अस्तमाना ॥ २ ॥ जिकडे पाहे तिकडे उदयोचि दिसे ॥ पूर्व पश्चिम तेथें कैंचा भासे ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं नित्यप्रकाशा ॥ कर्माकर्म जालें दिवसा चंद्र जैसा ॥ ४ ॥

॥ १५९५ ॥ कर्म क्रिया जेणें कळे ॥ तोचि कर्मीं कां नाकळे ॥ १ ॥ काय करुनी कर्म सकळ ॥ हरिप्राप्तीविण निर्फळ ॥ २ ॥ कर्मीं ब्रह्म प्रतीति नाहीं ॥ तरी त्वां कर्म केलें काई ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं कर्म ॥ कर्मीं पाहे परब्रह्म ॥ ४ ॥

॥ १५९६ ॥ भाव लागला भगवंतीं ॥ हरिरूप पवित्र जगतीं ॥ पाहतां कर्माकर्म गती ॥ ब्रह्म स्थिति अखंड ॥ १ ॥ भक्ति ह्मणजे सोहंशक्ति ॥

सांडी भवभय आसक्ती ॥ पाहतां निजभाव विरक्ति ॥ सर्वांभूतीं भगवंत ॥ २ ॥ करितां कर्माचें देहाचरण ॥ कर्म सबाह्य चैतन्य ॥ देह विदेह अवसान ॥ गमनागमन खुंटलें ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं एकपण ॥ अनन्य भावें पैं शरण ॥ जन्ममरणा आलें मरण ॥ ब्रह्म परिपूर्ण पूर्णत्वें ॥ ४ ॥

॥ १५९७ ॥ पक्षी आंगणीं उतरती ॥ ते कां गुंतोनीया राहती ॥ १ ॥ तैसें असावें संसारीं ॥ जोंवरी प्राचीनाची दोरी ॥ २ ॥ वस्तीकर वस्ती आला ॥ प्रातःकाळीं उठोनीया गेला ॥ ३ ॥ शरण एकाजनार्दन ॥ ऐसें असतां भय कवण ॥ ४ ॥

॥ १५९८ ॥ कर्माच्या पोटीं भ्रम ॥ कीं भ्रमाच्या पोटीं कर्म ॥ हें दोहींचें न कळे वर्म ॥ जाणसासी ॥ १ ॥ घटीं उदक भरिलें ॥ तेणें घटाकाश नव्हे वोले ॥ कर्मीं ब्रह्म संचलें ॥ कर्मातीत ॥ २ ॥ वादवितां कर्म भ्रम ॥ न कळे परब्रह्म ॥ मीमांसक धर्म ॥ अनश्वर ॥ ३ ॥ कर्माची कर्मगती ॥ न सोडी पुनरावृत्ति ॥ निःशेष कर्म निश्चितीं ॥ ब्रह्मप्राप्ती ॥ ४ ॥ नैष्कर्मे लभ्यते सिद्धी ॥ हें कृष्णें उपदेशिलें कृपानिधी ॥ तरी कर्माची कर्मबुद्धी ॥ न सोडी आत्मा ॥ ५ ॥ कर्माचें निज कर्म ॥ केवळ परब्रह्म ॥ एकाजनार्दनीं मिथ्या ॥ कर्मश्रम ॥ ६ ॥

॥ १५९९ ॥ प्रारब्ध क्रियमाण संचिताचा भोग ॥ भोगिल्याची भोग तो न सुटे ॥ १ ॥ ज्या जैसी कल्पना त्या तैसी भावना ॥ अंतीं ते वासना जडोनी ठेली ॥ २ ॥ एकाजनार्दनीं वासना टाकुनी ॥ हरीचे भजनीं सावध होई ॥ ३ ॥

॥ १६०० ॥ कर्म केवळ देहाच्या माथा ॥ आत्मा देहीं असोनी विदेहता ॥ शेखीं ह्मणती तत्वता ॥ कर्में बांधला आत्मा ॥ १ ॥ आकाश जातीं दळे ॥ तैं कर्मीं ब्रह्म आतळे ॥ कर्म अकर्मा नातळे ॥ परब्रह्म रया ॥ २ ॥ कर्माचें न कळे वर्म ॥ तंव कैंवि फळे परब्रह्म ॥ ह्मणोनी न सोडी श्रम ॥ साधकासी ॥ ३ ॥ कर्माकर्म विवंचना ॥ नकळे पैं सज्ञाना ॥ एका शरण जनार्दना ॥ परी तुझीच कल्पना रया ॥ ४ ॥

॥ १६०१ ॥ विचारी पां धडफुडें ॥ देह तंव केवळ जड मूढें ॥ कर्मबंधन तयाकडे ॥ कैंवि लागे ॥ १ ॥ आत्मनि न रिघे कर्म ॥ कर्म केवळ श्रम ॥ थिल्लरीं जेंवि सोम ॥ चळी कांपे ॥ २ ॥ देह जगत्व नलगे देहीं ॥ अथवा

नलगे आहे त्याच्या ठाईं ॥ आतां कर्म तें मिथ्या पाही ॥ भ्रमरूप ॥ ३ ॥ भ्रमरूप वाढवितां कर्मठपण ॥ ठकले सज्ञान जन ॥ एकाजनार्दनीं कर्म भ्रमण ॥ बोळवण रया ॥ ४ ॥

॥ १६०२ ॥ कर्म करितां फलाशा वाढे ॥ तें तें फल भोगणें घडे ॥ १ ॥ कर्म करितां फळ बाधक ॥ न करितां प्राप्त नरक ॥ २ ॥ ऐशी कर्माची रहाटी ॥ सदैव देखे उफराटी ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं कर्म ॥ तेथें कैचा भवभ्रम ॥ ४ ॥

॥ १६०३ ॥ क्रोधयुक्त अंतःकरण ॥ तेणें नासे स्वधर्माचरण ॥ १ ॥ ऐसें द्वेषें बांधलें घर ॥ ते ठायीं क्रोध अनिवार ॥ २ ॥ ऐशीया स्वभावावरी ॥ नर अथवा हो कां नारी ॥ ३ ॥ स्वभाव बाधी सत्य जाण ॥ शरण एकाजनार्दन ॥ ४ ॥

॥ १६०४ ॥ स्वर्गींच्या सुखालागीं तूं आत्मा ॥ नरकींच्या जीवा सांडी पां रामा ॥ १ ॥ स्वर्गींचें सुख नरकीचें दुःख ॥ भोगाव्या आशेष कवण जाला ॥ २ ॥ पाप पुण्य दोन्ही त्वांचि प्रकाशिले ॥ भोगावया तुझे तुज योग झाले ॥ ३ ॥ सर्वत्र तूं आत्मा एक देवा ॥ स्वर्ग नर्क कवण भोगी केशवा ॥ ४ ॥ चराचर अवघें तुझेंचि अंग ॥ स्वर्ग नर्क तेथें कैचें सांग ॥ ॥ ५ ॥ स्वर्ग नर्क दोन्हीं स्वप्नीची कहाणी ॥ एकाजनार्दनीं चोज सांगे ॥ ६ ॥

॥ १६०५ ॥ फळा आंगीं फुल डोळे ॥ ब्रह्मकर्म तैसें चळे ॥ १ ॥ फळा माथा फूल जैसें ॥ ब्रह्मीं कर्म तेंवी प्रकाशे ॥ २ ॥ फूल सुकें फळ पोखें ॥ कर्म ब्रह्मचि होय देखे ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं वर्म ॥ कर्मीं देख झालें ब्रह्म ॥ ४ ॥

॥ १६०६ ॥ शताब्धी श्रवण केलें तेणें ॥ अंगा आलें जाणपण ॥ १ ॥ पुराण श्रवण लौकीक प्रतिष्ठा ॥ विचार चोहटा जाणिवेचा ॥ २ ॥ श्रवण ते लौकिकीं मनीं नाहीं विवेक ॥ बुद्धीसी परिपाक कैंवी होय ॥ ३ ॥ आह्मी स्वयंपाकी हें मिरवी लौकिकीं ॥ परि इतरा कर्मशुद्धि नाहीं ॥ ४ ॥ कर्माकर्मीं कैसा न धरिती कंटाळा ॥ मानिती विटाळा ब्राह्मणांच्या ॥ ५ ॥ मजहुनी ज्ञाता आणिक कोणी नाहीं ॥ ये जाणिवेच्या डोहीं गर्वें गेलें ॥ ६ ॥ पुढिलाचे दोष आरोपिती ॥ श्रवणाची निष्पत्ति फळा आली

॥ ७ ॥ मी एक ज्ञाता ऐसें जाणवे लौकीकीं ॥ यालागी अपेक्षीं सभेमाजी ॥ ८ ॥ नानापरीच्या युक्ति मिरवी लौकिकीं ॥ वाढवीतो मति मानालागी ॥ ९ ॥ लौकिक प्रतिष्ठा धनावरी आस्ता ॥ वरवर हरिकथा काय करी ॥ १० ॥ एकाजनार्दना शरण न रिघतां ॥ तोंवरी समाधानता केंवि होय ॥ ११ ॥

॥ १६०७ ॥ आशेपाशीं काम आशेपाशीं क्रोध ॥ आशेपाशीं भेद लागला असे ॥ १ ॥ आशेपाशीं कर्म आशेपाशीं धर्म ॥ आशेपाशीं नेम नानात्वाचा ॥ २ ॥ आशेपाशीं याति आशेपाशीं जाती ॥ आशेपाशीं वस्ती अहंकाराची ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं नैराश्य तो धन्य ॥ ज्यासी नारायण सांभाळितू ॥ ४ ॥

॥ १६०८ ॥ साखर दिसे परी गोडी न दिसे ॥ ते काय त्या वेगळी असे ॥ १ ॥ तैसा जनीं आहे जनार्दन ॥ तयातें पहावया सांडी अभिमान ॥ २ ॥ कापुरा अंगीं परिमळ गाढा ॥ पहाता उघडा केवी दिसे ॥ ३ ॥ पाठ पोट जैसें नाहींच सुवर्णा ॥ एकाजनार्दनीं यापरी जाणा ॥ ४ ॥

॥ १६०९ ॥ जन्मोनी संसारा वाढविसी अहंकारा ॥ मी माझ्या घरदारा विगुंतुनी ॥ १ ॥ अमीत स्त्रिया पुत्र सुवर्णाचें नगर ॥ तें काय रावणें घर सवें नेलें ॥ धृ० ॥ मी माझें ह्मणोनी वाढविसी किती ॥ उदकें धुतां भिंती चिखल निघे ॥ २ ॥ तेथें जळ तेही नासिले हात तेही माखिले ॥ काय तुंवा धुतलें सांग बापा ॥ ३ ॥ गंगेचिया जळामाजी जन्म जळचरा सकळा ॥ तिसी काय सा कळवळा प्रवाह खुंटे ॥ ४ ॥ मी माझें सांडोनि मिनली ते सागरा ॥ तेंवि तूं घरदारा अलिप्त होई ॥ ५ ॥ मी माझें उठी प्रपंचाचे दिठी ॥ ते दिठी उफराठी करूनि पाहे ॥ ६ ॥ जेथें मीपण वांव तेथें माझेंपणा अभाव ॥ एकाजनार्दनीं फळेल तुझा भाव ॥ ७ ॥

---

## भावनेप्रमाणें फळ.

॥ १६१० ॥ जो जो धरसील भाव तें तें देईल देव ॥ ये अर्थीं संदेह मानूं नको ॥ १ ॥ भावें भक्ति फळे भावें देव मिळे ॥ निजभावें सोहळे स्वानंदाचे ॥ २ ॥ एकाजनार्दनीं भावाच्या आवडी ॥ मनोरथ कोडी पुरवी तेथें ॥ ३ ॥

॥ १६११ ॥ हरिकथा श्रवण परिक्षीती सुजाण ऐके तें आपण अंगें होये ॥ होय न होय ऐसा संशय नाहीं पूर्णत्व परिपूर्ण राहे ॥ राहिले गेले देह ज्याचा तो नेणे देहींच विदेही होये ॥ श्रवण समाधि नीच नवा आनंद ब्रह्माहमस्मि न साहे रया ॥ १ ॥ नवविधा भक्ति नवविधा व्यक्ति ॥ अवघीया एकची माती ॥ एकाजनार्दनीं अखंडता मुक्तीची फिटे भ्रांती रया ॥ ध्रु० ॥ हरीच्या कीर्तनें शुक आणि नारद छेदिती अभिमानाचा कंदू ॥ गातां पैं नाचतां अखंड पैं उल्हास कीर्तनीं प्रेमाल्हादू ॥ हरिनाम गजर स्वानंदें हुंबरे जिंतिला मायेचा बाधू ॥ श्रोता वक्ता स्वयें सुखरूप जाला वोसंडला ब्रह्मानंदू रया ॥ २ ॥ हरीचेनी स्मरणें द्वंद्वदुःख नाहीं हे भक्ति प्रल्हादाठाईं ॥ कृतांत कोपलीया रोम ही वक्र नोहे मनीं निर्भयता निरुज देहीं ॥ अग्नि विष आप नेदी सा संताप न तुटे शस्त्राचे घाईं ॥ स्मरणाचेनी बळें परिपूर्ण जाला देह विदेह दोन्ही नाहीं रया ॥ ३ ॥ हरि चरणामृत गोड मायेसी उठी चाडलाहे लाहे जाली रमा ॥ चरणद्वय भजतां मुकली द्वंद्वभावा ह्मणोनी पढिये पुरुषोत्तमा ॥ हरिपदा लागली शिळा उद्धरली अगाध श्रीचरण महिमा ॥ चरणीं विनटोनी हरिपद पावली परी चरण न सोडी मा रया ॥ ४ ॥ शिवे शिव यजिजे हें वेदींचें वचन पृथुराया बाणलें पूर्ण ॥ पूज्यपूजक भाव सांडोनी कीं सद्भावें करी पूजन ॥ देवीदेव दाटला भक्त प्रेम आटला मुख्य हें पुजेचें विधान ॥ त्रिगुण त्रिपुटी छेदुनीया पूजेमाजी समाधान रया ॥ ५ ॥ हरिचरण रज रेणु वंदुनीया पावन जाला अक्रूर ॥ पावनपणें प्रेमें वोसंडे तेणें वंदी श्वान सूकर ॥ वृक्ष वल्ली तृणा घाली लोटांगण सद्भावें पुजी गोखूर ॥ दंडाचीये परि लोटांगण घाली हरिस्वरूप चराचर रया ॥ ६ ॥ जीव जावो जिणें परि वचन नुलंघणें सेवेचा मुख्य हा हेतू ॥ या सेवा विनटोनी सर्वस्वें भजोनी दास्य उद्भट हनुमंतू ॥ शस्त्राचेनी बळें न तुटे न बुडे न जळे देहीं असोनी देहातीतू ॥ जन्ममरण होळी कासे भासे बळी भजनें कपिनाथु रया ॥ ७ ॥ सख्यत्वें परपार पावला अर्जुन त्यासी न पुसत दे ब्रह्मज्ञान ॥ स्वर्गाची खणखण बाणाची सणसण उपदेशा तेंची स्थान ॥ युद्धाचिये संधि लाविली समाधि कल्पांतीं न मोडे जाण ॥ निज सख्य दोघां आलिंगनें पडिलें भिन्नपणें अभिन्न रया ॥ ८ ॥ बळीची दान दीक्षा कैसी जीवें देउनी सर्वस्वेंसी निजबळें बांधी देवासी ॥ अनंत अपरंपार त्रिविक्रम सधर आकळिला हृषीकेशी ॥ हृदईंचा हृदयस्थ आक-

ळिता तंव देवची होय सर्वस्वेंसी ॥ यापरि सर्वस्व देवासी अर्पुनी घरदारें नांदे देशीं रया ॥ ९ ॥ भक्ति हे अखंड अधिकाराचें तोंड खंडोनी केलें नवखंड ॥ एक एका खंडें एक एक तरला बोलणें हें वितंड ॥ अखंडता जंव साधिली नाहीं तंव मुक्त ह्मणणें हें पाषांड ॥ बद्धता मुक्तता दोन्ही नाहीं ब्रह्मत्व नुरे ब्रह्मांड रया ॥ १० ॥ सहज स्वरूप स्थिति तया नांव भक्ति नवविधा भक्ति भासती ॥ ऐशीये भक्तीप्रती अंगें रावे मुक्ति दास्य करी अहोराती ॥ दासीसी अनुसरणें हें तंव लाजिरवाणें मूर्ख ते मुक्ति मागती ॥ एकाजनार्दनीं एकविधा भक्ति तैं चारी मुक्ति मुक्त होती रया ॥ ११ ॥

॥ १६१२ ॥ हरिकथा परिसोनी जरी देखसी दोष ॥ पयपान भुजंगा तेंची परतलें विष ॥ १ ॥ हरिनाम ऐकतां जरी न वाटे सुख ॥ अंतरीं तूं देख पाप आहे ॥ २ ॥ कस्तूरीचे आळा पेरिला पलांडू ॥ सुवास लोपोनी कैसा वाढे दुर्गंधू ॥ ३ ॥ धारोष्णपय परी ज्वरिताचें मुख ॥ थुंकोनी सांडी ह्मणे कडू विख ॥ ४ ॥ पान लागलीया गूळ न ह्मणे गोडू ॥ गोडाचें गोड तें जालें कडू ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं भाव नुपजे नरा ॥ नरदेहीं आयुष्य तेंही केला मातेरा ॥ ६ ॥

॥ १६१३ ॥ एक नरदेह नेणोनी वांया गेले ॥ एक न ठके ह्मणोनि उपेक्षिले ॥ एक ते गिळीले ज्ञानगर्वें ॥ १ ॥ एक ते साधनीं ठकिले ॥ एक ते करूं करूं ह्मणतांचि गेले ॥ करणें राहिलेंसे तैसें ॥ २ ॥ यापरि अभिमान जगीं ॥ ठकवितसे अंगसंगीं ॥ नाडी लागवेगीं जाणत्यासी ॥ ३ ॥ जें जें करी साधन ॥ तेथें होय अभिमान धांवण ॥ नागवी तेथें सावा धांवा करी कोण ॥ ४ ॥ ज्ञानें व्हावी ब्रह्मप्राप्ती ॥ तें ज्ञान वेंची विषयासक्ती ॥ भांडवल नाहीं हातीं मा मुक्ति कैंची ॥ ५ ॥ स्वप्नींचे निजधनें ॥ जाग्रतीं नोहे धर्म ॥ ब्रह्माहमस्मि हेंही समाधान सोलीव भ्रम ॥ ६ ॥ अभिमानाचीया स्थिती ॥ ब्रह्मादिकां पुनरावृत्ती ॥ ऐसी वेद श्रुति निश्चयो बोले ॥ ७ ॥ एकाजनार्दनीं एकपण अनादी ॥ अहंआत्मा तेथें समूळ उपाधी ॥ ८ ॥

॥ १६१४ ॥ सचेतनीं द्वेष अचेतनीं पूजा ॥ भक्ति गरुडध्वजा केविं पावे ॥ १ ॥ व्यर्थ खटाटोप नाथिला पसारा ॥ गोविंद गव्हारा केविं कळे ॥ २ ॥ हरिदासाचेनी गुणें शिळा दैवतपणें ॥ त्या शिळा पूजोनी त्यातें द्वेषी ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं नाथिलाची दावी ॥ सजीव निर्जीवीं गोंवियेले ॥ ४ ॥

॥ १६१५ ॥ विषयाचे अभिलाषें सबळ भेदु भासे ॥ विषय लेशु तेथें मुक्ति केविं वसे ॥ १ ॥ विषयतृष्णा सांडी मग तूं साधन मांडी ॥ वैराग्याची गोडी गुरुसी पुसे ॥ २ ॥ स्त्री पुरुष भावना भेदु भासे मना ॥ तेथें ब्रह्मज्ञाना गमन कैचें ॥ ३ ॥ कणुभरित जो डोळा शरीरासी दे दुःख ॥ अणुमात्र विषय तो संसारदायक ॥ ४ ॥ शुद्धभाव तें वैराग्य आवडे ॥ अती विषय विषयाधीन ते किडे ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं निजज्ञान शक्ती ॥ निर्विषय मन ते अभेद भक्ती ॥ ६ ॥

॥ १६१६ ॥ प्रतिमाचि देवो ऐसा ज्याचा भावो ॥ तो न करी निर्वाहो आह्मालागीं ॥ १ ॥ असतां सबराभरित बाहेर जो अंतरीं ॥ तो संपुष्टामाझारीं ह्मणती देवो ॥ २ ॥ द्वारका पंढरी देवयात्रा करी ॥ सर्वत्र न धरी तोचि भावो ॥ ३ ॥ सुक्षेत्रीं पुण्य मा अन्यत्र तें पाप ॥ नवल हा संकल्प कल्पनेचा मतवाद्या ॥ ४ ॥ द्वारका पंढरी देवयात्रा करी ॥ येर काय भारी वोस पडे ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं स्वतःसिद्ध असे ॥ विस्मरणा स्मरण होत असे नाथिलें तें पिसें ॥ ६ ॥

॥ १६१७ ॥ भावीं देव कीं देवीं भाव ॥ दोहींचा उगव करुनी दावा ॥ १ ॥ भाव थोर कीं देव थोर ॥ दोहींचा निर्धार करुनी दावा ॥ २ ॥ जंव जंव भाव तंव तंव देव ॥ भाव नाहीं तेथें देवचि वाव ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं भावेंचि देव ॥ लटिकें ह्मणाल तरी हृदयीं साक्ष पहाहो ॥ ४ ॥

॥ १६१८ ॥ अभावाचें नाक लावुनीया लोभें ॥ वरदळ भक्ति तैशापरी शोभे ॥ १ ॥ नकटीचा गुण उपहास लोकां ॥ दांभिक भक्ति तैशी तुह्मी देखा ॥ २ ॥ काजळ कुंकू माथां वेणी ॥ नकटी सुंदर ह्मणेल कोणी ॥ ३ ॥ नकटीचा संग करी तोचि साजे ॥ दांभिक भजनातें देवोचि लाजे ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं भावेंविण ॥ कुसरीचें भजन तें नकटेंपण ॥ ५ ॥

॥ १६१९ ॥ शुद्ध भाव चित्तीं ॥ तरी कांहीं नलगे युक्ती ॥ १ ॥ नलगे आणिक विचार ॥ शुद्ध भाव हाचि सार ॥ २ ॥ भावाविण वांझें ॥ साधनें तीं अवघें ओझें ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं भाव ॥ पाववी अक्षय तो ठाव ॥ ४ ॥

॥ १६२० ॥ देवासी तो भाव पुरे ॥ तेणें देव सदा झुरे ॥ भक्तालागी सरे ॥ वैकुंठासी ॥ १ ॥ भाव धरावा बळकट ॥ आणीक नको कांहीं

कष्ट ॥ साधन हें श्रेष्ठ ॥ कलीमार्जी ॥ २ ॥ भावें भासे होय देव ॥ अभक्तांसी संदेह ॥ जवळी असोनी देव ॥ नाहीं ह्मणती ॥ ३ ॥ भावें देव घरीं नांदे ॥ एकाजनार्दनीं आनंदें ॥ ह्मणोनी संत वंदे ॥ तया न विसरती ॥ ४ ॥

॥ १६२१ ॥ अभाविकांचें कर्म ॥ तया न कळे कांहीं वर्म ॥ संता ह्मणती भ्रम ॥ यासी जाला ॥ १ ॥ हरुषें मुखें नाम गाय ॥ तया ह्मणती वेडा होय ॥ अभाविकांचें भय ॥ जन मनीं वाहे ॥ २ ॥ बोले जैसा कां भाट ॥ वर्म कांहीं न कळे नीट ॥ नामस्मरण स्पष्ट ॥ न घडे तया ॥ ३ ॥ ऐसीयाची संगती ॥ न घडावी निश्चिती ॥ एकाजनार्दनीं अप्रीती ॥ तयाची देवा ॥ ४ ॥

॥ १६२२ ॥ देहीं धर्म विहित करी ॥ अद्वैत भाव चित्तीं धरी ॥ सर्वभावें नमस्कारी ॥ एक आत्मा ह्मणोनीं ॥ १ ॥ तेणें तुटे रे बंधन ॥ वाचें जपे जनार्दन ॥ आणिक नकोरे साधन ॥ रामकृष्ण स्मर सुखें ॥ २ ॥ पवित्र त्याचें हें कुळ ॥ आचार त्याचा सुशीळ ॥ अखंड जे सर्वकाळ ॥ नाम जपती ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं नाम ॥ परब्रह्म तें निष्काम ॥ हरे भव श्रम ॥ जन्म जरा व्याधी ॥ ४ ॥

॥ १६२३ ॥ दुबळ्यासी धन ॥ सांपडलीया नोहे जतन ॥ अभाविकांसी नाम जाण ॥ तैशा रीतीं ॥ १ ॥ धनलोभी याचे परी ॥ जैसें चित्त धनावरी ॥ तैसें हृदयामाझारीं ॥ नाम जपे ॥ २ ॥ कामी पुरुषाचें ध्यान ॥ तया न कळे आप्तजन ॥ जैसा पारध्याधीन ॥ मृग होय ॥ ३ ॥ अभाविकांचे बोल ॥ बोल नव्हती ते फोल ॥ एकाजनार्दनीं मोल ॥ तया नाहीं वेंचत ॥ ४ ॥

॥ १६२४ ॥ दांभिकाची भक्ती ॥ वरीवरी देह स्थिती ॥ अंतरीं तों गती ॥ वेगळी बापा ॥ १ ॥ नाम गाय प्रेमभरित ॥ रडे स्फुंदे डोळे पुसीत ॥ अंतरींचा हेत ॥ वेगळा बापा ॥ २ ॥ वृंदावनाचें तें फळ ॥ कडु जैसें सर्वकाळ ॥ तैसा मनोमेळ ॥ वेगळा बापा ॥ ३ ॥ धरुनी ध्यान ॥ बक जैसा लक्षी मीन ॥ परस्त्री देखोन ॥ विव्हळ बापा ॥ ४ ॥ सांगे आत्मज्ञान स्थिती ॥ अंतरीं तों वेगळी रीती ॥ द्रव्य जोडे कैशा रीती ॥ हेंचि ध्यान बापा ॥ ५ ॥ न कळे कांहीं स्वहित ॥ सदा द्रव्य दारावर चित्त ॥ तयासी

भगवंत ॥ प्राप्त नाहीं ॥ ६ ॥ शरण एकाजनार्दन ॥ नको मज तयाचें दरुशन ॥ अभाविकांसी भाषण ॥ नको देवा ॥ ७ ॥

॥ १६२५ ॥ ब्रह्मचारी ह्मणती महंत ॥ सदा विषयावरी चित्त ॥ १ ॥ नेसोनीया कौपीन ॥ अंतरीं तों विषयध्यान ॥ २ ॥ बोले जैसा रसाळ ॥ भाव अंतरीं अमंगळ ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं सोंग ॥ तया न मिळे संतसंग ॥ ४ ॥

॥ १६२६ ॥ प्रेमें पूजी मेसाबाई ॥ सांडोनीया विठाबाई ॥ १ ॥ काय देईल ती वोंगळ ॥ सदा खाय अमंगळ ॥ २ ॥ आपुलीये इच्छेसाठीं ॥ मारी जीव लक्ष कोटी ॥ ३ ॥ तैसी नोहे विठाबाई ॥ सर्व दीनांची ती आई ॥ ४ ॥ न सांडीचि विठाबाई ॥ एकाजनार्दन पायीं ॥ ५ ॥

॥ १६२७ ॥ पूजिती खंडेराव पतर भरिती ॥ विठ्ठल विठ्ठल न ह्मणती अभागी ते ॥ १ ॥ लाउनी भंडार दिवटी घेती हातीं ॥ विठ्ठल ह्मणतां लाजती पापमती ॥ २ ॥ ऐसियासी भाव सांगावा तो कवण ॥ एकाजनार्दनीं काया वाचा शरण ॥ ३ ॥

॥ १६२८ ॥ अमंगळाचा अमंगळ वाण ॥ नये वाचें नारायण ॥ १ ॥ सदा सर्वकाळ परनिंदा करी ॥ वाचे हरिहरि न ह्मणे पापी ॥ २ ॥ कस्तूरी उत्तम परी शेजार हिंगाचा ॥ अमंगळासी साचा बोध नोहे ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं तयाची पैं गोष्टी ॥ बोलणें चावटी परमार्थ नोहे ॥ ४ ॥

॥ १६२९ ॥ केलें काय तुवां जाऊनिया तीर्था ॥ सर्वदा विषयार्था भुललासी ॥ १ ॥ मनींचीं तीं पापें नाहीं धोवियेलीं ॥ वृत्ति हे लाविली संसारींच ॥ २ ॥ तीर्थस्नानें अंग तरी शुद्ध केलें ॥ नाहीं धोवियेलें अंतरासी ॥ ३ ॥ वरी दिससी शुद्ध अंतरीं मलीन ॥ तोंवरी हें स्नान व्यर्थ होय ॥ ४ ॥ तीर्थ यात्रा योगें कीर्तिही पावली ॥ बुद्धि शुद्धि झाली नाहीं तेणें ॥ ५ ॥ शांति क्षमा दया नाहीं पैं अंतरीं ॥ वांया येरझारी कष्ट केले ॥ ॥ ६ ॥ एकाजनार्दनीं सद्गुरु पाय धरी ॥ शांतीचे जिव्हारीं पावशील ॥ ७ ॥

॥ १६३० ॥ चरणामृता देव स्वादला ॥ वटपत्रीं तो बाळ जाला ॥ १ ॥ अभिनव भक्ति नेली गोडी ॥ चुरचुरा पावो चोखी आवडी ॥ २ ॥

भक्तिरसाची लागली गोडी ॥ तोंडींचा अंगुष्ठ बाहेर न काढी ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं सांगतों भावो ॥ आपुली गोडी आपण घ्यावो ॥ ४ ॥

॥ १६३१ ॥ मी एक शुची जग अपवित्र ॥ कर्म विचित्र वोढवलें ॥ १ ॥ देखत देखत घेतसे विष ॥ अंतीं तें सुख केविं होय ॥ २ ॥ अल्प दोष ते अवघेचि टाळी ॥ मुखें ह्मणे सर्वोत्तम बळी ॥ ३ ॥ अभिलाषें अशुचि जालासे पोटीं ॥ एकाजनार्दनीं नव्हेचि भेटी ॥ ४ ॥

॥ १६३२ ॥ अहाच वाहाच झकविलें लोका ॥ ऐसीया ठका देव कैचा ॥ १ ॥ शिकवुनी जन वंचला आपण ॥ नरकीं पतन होत असे ॥ २ ॥ मी ज्ञाता ह्मणोनी फुगोनी बैसला ॥ ब्रह्मविद्येचा पसारा घातिला ॥ ३ ॥ अभ्यासी तें मिरवी लोकीं ॥ पडलीया चुकी निज पंथें ॥ ४ ॥ ज्यासी दंभ तो काय नेणे ॥ लोकीं मानवणें हेंचि पाहे ॥ ५ ॥ घरोघरीं गुरु आहेत आइते ॥ गूळ घेउनीया विकिती रायतें ॥ ६ ॥ संसारापासोनी सोडवी साचे ॥ सद्गुरु ऐसें नांव त्याचें ॥ ७ ॥ बोलाचेनि ज्ञानें पावोनी देवा ॥ भुलविलें मावा अभिमानें ॥ ८ ॥ एकाजनार्दनीं नव्हे या भेटी ॥ वोसणतां भेटी साच होय ॥ ९ ॥

॥ १६३३ ॥ देव प्रसन्न जाला माग ह्मणे वहिला ॥ भक्त घरोघरीं विचार पुसों गेला ॥ १ ॥ भाव कीं भ्रांति आळस कीं भक्ती ॥ विचारुनी व्यक्ती ठाई ठेवा ॥ २ ॥ अरे हें गुह्य गोप्य कुडें करूं नये उघडें ॥ तरी दारोदार पुसूं जाय वेडें ॥ ३ ॥ विलंब करितां पहाहो उदास जाला देवो ॥ निवालीया खंति न घाली ह्मणे घावो ॥ ४ ॥ शिकविलें नायकती वरिले तें करिती ॥ आपुलेनी कर्में आपण गुंतताती ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं वचनीं शीतळ भाव ॥ आळसेंचि देव दुऱ्हाविला ॥ ६ ॥

॥ १६३४ ॥ प्रपंचीं गुंतती ॥ बळें माझें माझें ह्मणती ॥ १ ॥ ऐसे अभागी ते खर ॥ नेणें विचार सारासार ॥ २ ॥ चिखली रुतती ॥ आणिकातें धांवा ह्मणती ॥ ३ ॥ बळें कृशान पदरीं ॥ बांधिताती दुराचारी ॥ ४ ॥ कुंथाकुंथी बळें ॥ यम मारीतसे सळें ॥ ५ ॥ शरण जनार्दना ॥ कोणा नोहेचि वासना ॥ ६ ॥ जनार्दनाचा एका ॥ बोल बोलतसे देखा ॥ ७ ॥

॥ १६३५ ॥ आडक्याकारणें जीव जात ॥ ह्मणती आह्मी उदार भक्त ॥ १ ॥ ऐसिया दांभिकांसी ॥ दुरी होय हरि त्यांसी ॥ २ ॥ गाज-

राची तुळा साची ॥ वाट पाहती विमानाची ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं खोटा भाव ॥ तयासी न भेटे देव ॥ ४ ॥

॥ १६३६ ॥ सेवेचें कारण मुख्य तो सद्भाव ॥ इतर ते वाव इंद्रिय बाधा ॥ १ ॥ साधन हेंचि साधी तोडी तूं उपाधी ॥ नको ऋद्धि सिद्धि आणिक कांहीं ॥ २ ॥ नामाचा उच्चार मुख्य हेचि भक्ति ॥ एकाजनार्दनीं विरक्ति तेणें जोडे ॥ ३ ॥

॥ १६३७ ॥ भांबावले जन ह्मणती माझें माझें ॥ वाउगेंची वोझें वहाताती ॥ १ ॥ खराचियेपरी उकरडा सेविती ॥ नोहे तयां गति अधम जाणा ॥ २ ॥ स्तंभ असोनिया चोर ह्मणती आला ॥ नसोनी प्रपंच खरा भासिला ॥ ३ ॥ मृगजळवत जाणार सर्व ॥ अभ्रींचें सावेव वांया जैसें ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं धरी कांरे सोय ॥ पुनरपि नये गर्भवासा ॥ ५ ॥

॥ १६३८ ॥ ब्राह्मणाचें तीर्थ घेतां त्रास मोठा ॥ प्रेमें पितो घोटा घटघट ॥ १ ॥ हातें मोऱ्या उपशी कष्ट करी नाना ॥ देवाच्या पूजना कंटाळतो ॥ २ ॥ गायीस देखोनी बदाबदा मारी ॥ घोड्याची चाकरी गोड वाटे ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं ऐसे झाले प्राणी ॥ जन्मोनीया जनीं व्यर्थ आले ॥ ४ ॥

॥ १६३९ ॥ पोटासाठीं लागे नीचाचिया पायां ॥ करीना भलीया नमस्कार ॥ १ ॥ स्वयंपाकीयाच्या करीतो टवाळ्या ॥ आपण खाये शिळ्या भाकरीतें ॥ २ ॥ अग्निहोत्रादिक त्याची करी निंदा ॥ आपण घेई सदां गुरगुडी ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं ऐशीयाची मात ॥ नको तयाचा संगात मज देवा ॥ ४ ॥

॥ १६४० ॥ शूद्रादिक वर्ण त्याचे पाय धुती ॥ उपदेश घेती तयाचे गा ॥ १ ॥ वेदशास्त्रालागीं अव्हेर करती ॥ आपुल्या मति पाषांडी ते ॥ २ ॥ आचार सांडोनी होती शब्दज्ञानी ॥ व्यर्थ अभिमानीं पडताती ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं ऐसीया पामरा ॥ केंवि विश्वंभरा पावसील ॥ ४ ॥

॥ १६४१ ॥ नित्य हाट पाठ आचार सपाट ॥ कारभार दाट असत्याचा ॥ १ ॥ कैचें सोंवळें कैचें ओंवळें ॥ प्रातःकाळीं शिळें भक्षिताती ॥ २ ॥ कैचें चोखटपण अंतरीं मळीन ॥ दिसे कळाहिन पापिष्ट तो ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं अवघा अनाचार ॥ दाविती आचार वरीवरी ॥ ४ ॥

॥ १६४२ ॥ तीर्थाजाती उदंडें ॥ त्याचे पाठीमागें तोंडें ॥ १ ॥ मन वासना ठेउनी घरीं ॥ तीर्था नेली भांडखोरी ॥ २ ॥ गंगेंत मारितां बुडी ॥ मन लागलें बिऱ्हाडीं ॥ ३ ॥ नमस्कार करतां देवासी ॥ मन पायपोसापाशीं ॥ ४ ॥ लवकर करी प्रदक्षिणा ॥ उशीर झालासे भोजना ॥ ५ ॥ एकाजंनार्दनीं स्थिर मन ॥ नाहीं तंव काय साधन ॥ ६ ॥

॥ १६४३ ॥ गांठीं बांधोनीया धन मिरविती भक्ती ॥ मनीं ते आसक्ती अधिक व्हावी ॥ १ ॥ चित्त वित्तावरी भक्ति लोकाचारीं ॥ देव अभ्यंतरीं कैंवी भेटे ॥ २ ॥ असे चित्त वित्ता लावी कळांतरीं ॥ अनुष्ठान करी दिवस गणी ॥ ३ ॥ जप तप विधान अवघेंचि सांडी ॥ धरणेंचि मांडी सावकाश ॥ ४ ॥ धन सांडोनी मन धरी जनार्दन ॥ एकाएकी भक्ति फळेल तेणें जाण ॥ ५ ॥

॥ १६४४ ॥ सांड रांड गमजा नको करूं बोल ॥ भक्तीविण ज्ञान गेलें किती करिसी फोल ॥ १ ॥ जन्मा आली व्यर्थ गेली भक्ति नाहीं केली ॥ माझें माझें ह्मणोनीया गुंतोनीया मेली ॥ २ ॥ टिळा टोपी घालुनी माळा ह्मणती आह्मी संत ॥ परस्त्री देखोनीया चंचळ झालें चित्त ॥ ३ ॥ जगालागीं ज्ञान सांगे ह्मणती आह्मी साधू ॥ पोटीं दया धर्म नाहीं ते जाणावे भोंदू ॥ ४ ॥ संत ह्मणतील निंदा केली निंदा नोहे भाई ॥ शरण एकाजनार्दनीं लागतसे पायीं ॥ ५ ॥

॥ १६४५ ॥ फट गाढवाच्या लेका ॥ संसार केला फुका ॥ धृ० ॥ आजा मेला काका मेला बाप मसणीं गेला ॥ देखत देखत नातु पणतु तोही तैसा झाला ॥ १ ॥ कैचा आपा कैचा बापा कैचा मामा काका ॥ कैची आई कैची ताई कैची बहीण आका ॥ २ ॥ कैचें घर कैचें दार भुललासी फुका ॥ कैची सासू कैची बाईल त्यांनीं नेला पैका ॥ ३ ॥ बारा सोळा मुलें झालीं त्याला झाले नातू ॥ द्रव्य होतें तें सरुनी गेलें कंबरेवर हातू ॥ ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं ह्मणे हा संसार खोटा ॥ हरिस्मरण करा कधीं नये तोटा ॥ ५ ॥

॥ १६४६ ॥ श्वानाचा तो धर्म करावी घसवस ॥ भलें बुरें त्यास न कळे कांहीं ॥ १ ॥ वेश्याचा धर्म द्रव्य तें हरावें ॥ भलें बुरें भोगावें न कळे कांहीं ॥ २ ॥ निंदकाचा धर्म निंदा ती करावी ॥ भलें बुरें त्या गांवीं न

कळे कांहीं ॥ ३ ॥ सज्जनांचा धर्म सर्वांभूतीं दया ॥ भेदाभेद तया न कळे कांहीं ॥ ४ ॥ संतांचा तो धर्म अंतरीं ती शांती ॥ एकाजनार्दनीं वस्ती सर्वां ठायीं ॥ ५ ॥

॥ १६४७ ॥ दुर्जनाचे संगें दुर्जन लागत ॥ नाना विटंबीत सज्जनासी ॥ १ ॥ दुर्जनाचें अन्न सेउनी दुर्वास ॥ छळिलें पांडवांस निशीमाजी ॥ २ ॥ एकाजनार्दनीं दुर्जनाचा संग ॥ तेणें होय भंग भाविकाचा ॥ ३ ॥

॥ १६४८ ॥ आदरें आवडी गाती जें नाम ॥ तया न बाधी क्रोध काम ॥ १ ॥ नाम आठवा नाम आठवा ॥ हृदयीं सांठवा रामनाम ॥ २ ॥ संत समुदाव वंदावे आवडी ॥ अंतरीची गोडी नित्य नवी ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं प्रेमाचा पुतळा ॥ विठ्ठल देखिला डोळा ॥ ४ ॥

॥ १६४९ ॥ जोडोनीया धन नाशी वेश्या घरीं ॥ अतिथी आलीया द्वारीं नाहीं ह्मणे ॥ १ ॥ वेश्या ती अमंगळ जग भुलवणी ॥ पडे निशिदिनीं तेथें श्वान ॥ २ ॥ घरीं कोणी अभ्यागत आलीया मागता ॥ धांवतो सर्वथा श्वानासम ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं ऐसा दुराचार ॥ नरक अघोर भोगितातीं ॥ ४ ॥

॥ १६५० ॥ वेश्येचिया घरा जातो उताविळा ॥ जातांची देउळा रडतसे ॥ १ ॥ काय ऐशा पामरा सांगावें गव्हारा ॥ भोगीतो अघोरा नरकवासा ॥ २ ॥ एकाजनार्दनीं नको त्याचा संग ॥ अंतरे पांडुरंग तयाचेनी ॥ ३ ॥

॥ १६५१ ॥ शतवर्षांचा कउल घेउनी ॥ आलासी योनी नरदेहा ॥ १ ॥ गर्भ जठरीं सोहं सोहं ॥ जन्मतांची ह्मणसी कोहं ॥ २ ॥ ऐसा ठकडा पापिष्ठा ॥ पुढें करिशी विषय चेष्टा ॥ ३ ॥ बाळ तारुण्य गेलें ॥ पुढें वृद्धाप्य वयही आलें ॥ ४ ॥ नाहीं घडलें कीर्तन ॥ तों पुढें आलें मरण ॥ ५ ॥ घेउनी जाती यमदूत ॥ कुंभपाकीं तुज घालीत ॥ ६ ॥ नाना यातना ते करती ॥ अग्निस्तंभा भेटविती ॥ ७ ॥ तेथें कोण सोडी तुज ॥ आतां ह्मणसी माझें माझें ॥ ८ ॥ ऐसा भुलला गव्हार ॥ चौऱ्यायशीचा फेर ॥ ९ ॥ फेरे फिरुनी नरदेहीं आला ॥ एकाजनार्दनीं वाया गेला ॥ १० ॥

॥ १६५२ ॥ सुखरूप असतां ह्मणे माझें माझें ॥ संकट देखोनीया घाली देवावरी वोझें ॥ १ ॥ पापी तो अधम मती ॥ कदां नेणें नामस्मरण गती ॥ २ ॥ नामावांचोनी गति नाहीं ॥ ऐसें वेदशास्त्रें बोलती पाही ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं ह्मणे भुलला ॥ पुनः अधम जन्मा आला ॥ ४ ॥

॥ १६५३ ॥ लेंकुरातें बाप खेळवी साचें ॥ बाईल देखतां तीपुढें नाचे ॥ १ ॥ माझा बाप माझी आई ॥ बाईल देखतां नाचतो पायीं ॥ २ ॥ धडसेनी तोंडें बोबडें बोले ॥ आवडीनें ह्मणे पाहे बाईले ॥ ३ ॥ सासु सासरा पहाती साल्या ॥ नाचतो जांवाई घेउनी मुला ॥ ४ ॥ यापरी ममता नाचवी जनू ॥ देवद्वारीं आलीया धरी अभिमानू ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं सांडोनी अभिमान ॥ संतांपुढें नाचे धरूनिया कान ॥ ६ ॥

॥ १६५४ ॥ पांचा जणांचें ॥ आणिलें जायाचें ॥ मिरवण तयाचें ॥ कोण सुख ॥ १ ॥ नवल विस्मयो कैसा ॥ देखत देखत झांसा ॥ मृगजळाची आशा ॥ केंवी लाहे ॥ २ ॥ आतां नेती मग नेती ॥ ज्याचे ते घेउनी जाती ॥ मूढजन ह्मणती ॥ माझें माझें ॥ ३ ॥ स्वप्नींचें निजभोज ॥ कोल्हार मंडपींचें चोज ॥ गंधर्वनगरीं राज्य ॥ केवीं घडे ॥ ४ ॥ ऐसें जाणोनी अरे जना ॥ भुललासी अज्ञाना ॥ मी माझी कल्पना ॥ करसी वांया ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं हरी ॥ व्यापक तो चराचरीं ॥ तोचि एक निर्धारीं ॥ वाउगे येर ॥ ६ ॥

॥ १६५५ ॥ डोळा न दिसे न्याहारी ॥ दृष्टि जाली पाठीमोरी ॥ १ ॥ अझुनी काइसा रे मोहो ॥ मिथ्या विषयाचा संदेहो ॥ २ ॥ कानीं बैसलीसे टाळी ॥ आली यमाची उथाळी ॥ ३ ॥ अंग वाळलें कांचरी ॥ चंद्रबिंब चढलें शिरीं ॥ ४ ॥ शिश्न अंगुळी सांडू मार्गें ॥ मूत्रीं चोरपान्हा लागे ॥ ५ ॥ नाना विषयीं करीन सुखी ॥ ह्मणतां स्त्री प्रत्यक्ष थुंकी ॥ ६ ॥ वेश्या धन घेउनी सांडी बोला ॥ स्त्री वार्धक्यें घाली टोला ॥ ७ ॥ अग्नी आंवचल्या पोळी ॥ पुत्र नाना स्नेहजाळी ॥ ८ ॥ लाळ सुटलीसे तोंडें ॥ तरि खेळवी नातुंडे ॥ ९ ॥ मान कापुनी विषयावरी ॥ मरण चढिलेंसे शरीरीं ॥ १० ॥ बळ मौढी स्त्री ने धन ॥ क्षीण जाल्या उदासीन ॥ ११ ॥ पाठीं बैसविली आवडी ॥ शेखीं नागउनी सोडी ॥ १२ ॥ पुरुष वार्धक्य नावडे ॥ मेल्या कान केशां रडे ॥ १३ ॥ दांत पडोनी सांगे गोष्टी ॥ नाक लागतसे हनुवटी ॥ १४ ॥ मोह ममता सांडी काम ॥ अखंड जपे रामनाम

॥ १५ ॥ रामनामें होईल हित ॥ एऱ्हीं बुडालें स्वहित ॥ १६ ॥ एकाजनार्दनीं पुरा ॥ बाळ तारुण्य न रिघे जरा ॥ १७ ॥

॥ १६५६ ॥ विषयाचें सासुरें दुश्चित बोळवण ॥ भ्रांतीचें पांघरूण बुंथी मज ॥ १ ॥ तेथें अविवेक अंबुला अहंकार सासुरा ॥ अविद्येच्या घरामाजीं नेलें ॥ २ ॥ तेथें कल्पना हे सासु सदां सासुरवासू ॥ येऊं नेदी उमासू आठवण ॥ ३ ॥ आठवणेसवें आठवण आठवत ॥ तेणें पैं फुटत हृदय माझें ॥ ४ ॥ काम क्रोध देख भावे आणि दीर ॥ आटितातो थोर स्वभाव साचे ॥ ५ ॥ मोह म्हातारा सदा द्वारीं असे ॥ धडासी वो पिसें लावितसे ॥ ६ ॥ वरी वरी सांवडा पोटींच पैं वांकुडा ॥ दंभ घाली खोडा प्रलोभाचा ॥ ७ ॥ इच्छा आणि निंदा सासुरे दासटे ॥ तें मज चिमटे घेपिताती ॥ ८ ॥ ममता वोहीणी नंदुली चिंता ॥ ती भेणें एकांता मज ठाव नाहीं ॥ ९ ॥ कामा हातीं मज नाहीं वो उगडु ॥ निष्कामासी दंडु क्रोध करी ॥ १० ॥ द्वेषाची जांचणी सदा पैं खोंचणी ॥ कोणे घरीं पापिणी बोळविलें ॥ ११ ॥ माझा भोळा भावो त्यासी नाहीं ठावो ॥ त्यापाठीं संदेहो श्वान लागे ॥ १२ ॥ त्या भेणें पळाला मागुता नाहीं आला ॥ देशधडी जाला भावो माझा ॥ १३ ॥ सखी माझी भक्ति भावासवें जाती ॥ कोणा काकुलती येऊं माये ॥ १४ ॥ आर्तीचे निढळीं ठेउनी बाहुली ॥ पहातसे वाटुली माहेराची ॥ १५ ॥ माहेराचे वाटे कोणी न भेटे ॥ माउलीये पैठें कोण करी ॥ १६ ॥ अक्रूरा प्ऱ्हादा धांवरे उद्धवा ॥ माझ्यासाठीं धांवा तुह्मी करा ॥ १७ ॥ नारदा भाइया धांवरे लवलाही ॥ लागेन तुझ्या पायीं जीवें भावें ॥ १८ ॥ सत्वर हनुमंता उडी घाली आतां ॥ मजलागी सर्वथा मूळ यावो ॥ १९ ॥ पृथु चक्रवर्ती जीवलग सांगाती ॥ तुह्मी या निश्चितीं मज मूळ ॥ २० ॥ पैल पुंडलीकाजवळीं बाप माया ॥ हर्षें नांदताहे भीमातीरीं ॥ २१ ॥ तेथींचे वारकरी त्याचे पाय धरी ॥ नेउनी घाला माहेरीं पंढरीसी ॥ २२ ॥ एकाजनार्दनीं सासुरचि केलें ॥ तेंची माहेर झालें गुरुकृपें ॥ २३ ॥

॥ १६५७ ॥ देवा तळींचें वस्त्र तें ह्मणती अपवित्र ॥ उदकें भिजविलें तें जालें पवित्र ॥ १ ॥ देवापरीस जळ केलें सबळ ॥ ज्ञान तें दुर्बळ होउनी ठेलें ॥ २ ॥ नीचाचेनी स्पर्शें देवो विटाळला ॥ पाणीये प्रक्षाळुनी सोंवळा केला ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं साच नाहीं भाव ॥ संशयची देव नाहीं केला ॥ ४ ॥

॥ १६५८ ॥ गंगोदक तें पवित्र ॥ येर कडु अपवित्र ॥ १ ॥ दोन्ही उदकें तंव सारखीं ॥ शुद्ध अशुद्ध काय पारखीं ॥ २ ॥ गंगा देवापासून जाली ॥ येर काय मध्यावर्तीं केली ॥ ३ ॥ शुद्धाशुद्ध हे वासना ॥ शरण एकाजनार्दना ॥ ४ ॥

॥ १६५९ ॥ वेदवाणी देवें केली ॥ येर काय चोरापासून जाली ॥ १ ॥ सकळ वाचा वदवी देव ॥ कां वाढावा अहंभाव ॥ २ ॥ ज्या ज्या वाणीं स्तुति केली ॥ ती ती देवासी पावली ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं मातू ॥ वाचा वाचक जगन्नाथू ॥ ४ ॥

॥ १६६० ॥ जिता मायबापा न घालिती अन्न ॥ मेल्या प्रेतावरी करिती पिंडदान ॥ १ ॥ पहा पहा संसारींचा कैसा आचारू ॥ जिता अबोला मा मेल्या उच्चारू ॥ २ ॥ जिता मायबापा न करिती नमन ॥ मेल्या मागें करिती मस्तक वपन ॥ ३ ॥ जिता मायबापा धड गोड नाहीं ॥ श्राद्धीं तळण मळण परवडी पाही ॥ ४ ॥ जिता मायबापा गालीप्रदान ॥ मेल्या त्याचेनी नांवें देती गोदान ॥ ५ ॥ जिता मायबापा नेदी प्याया पाणी ॥ मेल्या पितरांलागीं बैसती तर्पणीं ॥ ६ ॥ प्याया पाणी न घालिती सासरा जिता ॥ पिंडापाशीं येती मग दंडवता ॥ ७ ॥ एकाजनार्दनीं कृपेचें तान्हें ॥ विधि निषेध दोन्ही आतळों नेदी मनें ॥ ८ ॥

॥ १६६१ ॥ भजन चालिलें उफराटें ॥ कवण जाणे खरें खोटें ॥ १ ॥ जवळी असतां देव ॥ भक्तां उपजला संदेह ॥ २ ॥ सचेतन तुळशी तोडा ॥ वाहाती अचेतन दगडा ॥ ३ ॥ बेला केली तडातोडी ॥ लिंगा लाखोली रोकडी ॥ ४ ॥ अग्निहोत्राचा सुकाळ ॥ शमी पिंपळासी काळ ॥ ५ ॥ तिन्ही देव पिंपळांत ॥ अग्निहोत्रीं केला घात ॥ ६ ॥ मुख बांधोनी बोकड मारा ॥ ह्मणती सोमयाग करा ॥ ७ ॥ चवदा गांठींची अनंतदोरी ॥ तो प्रत्यक्ष नेला चोरीं ॥ ८ ॥ शालिग्राम शुद्ध शिळा ॥ हारपलीया उपवास सोळा ॥ ९ ॥ एकाजनार्दनीं एक भाव ॥ कुभाविकां कैंचा देव ॥ १० ॥

॥ १६६२ ॥ मागें बहुतांसी सांगितलें संतीं ॥ वांया हे फजीती संसार तो ॥ १ ॥ अंधाचे सांगाती मिळालेसे अंध ॥ सुख आणि बोध काय तेथें ॥ २ ॥ विष खाउनीया प्रचीत पाहे कोणी ॥ तैसा अधमपणीं गुंतूं नको ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं जाऊं नको वांया ॥ संसार माया लटिकी ते ॥ ४ ॥

॥ १६६३ ॥ आमिष लाउनी मीनातें गोंविती ॥ तैसी संसारस्थिति जाणे बापा ॥ १ ॥ पान लागलीया गूळ न ह्मणे गोड ॥ नामामृतीं चाड न धरती ॥ २ ॥ पहाती डोळां देखती प्रकार ॥ परी विषयाचा आदर न सांडिती ॥ ३ ॥ माझें माझें ह्मणोनी दृढ धरिताती ॥ एकाजनार्दनीं भोगिती चौऱ्यायशी ॥ ४ ॥

॥ १६६४ ॥ न सुटेचि आशा गुंते बळें पाशें ॥ दुःखाचीया सरसें ह्मणे देव ॥ १ ॥ ऐसे अमंगळ गुंतले कर्दमीं ॥ भोगिताती उर्मी जन्मदशा ॥ २ ॥ एकाजनार्दनीं संतांसी शरण ॥ गेलीया बंधन तुटे वेगीं ॥ ३ ॥

॥ १६६५ ॥ येती नरदेहा गमाविती आयुष्य ॥ प्रथम बाळदशेस भोगिताती ॥ १ ॥ वाचा नाहीं तया रडे आक्रंदोनी ॥ जननी तो स्तनीं लावी बळें ॥ २ ॥ क्षुधा लागलीया औषध पाजिती ॥ उदर दुखतां देती स्तन बळें ॥ ३ ॥ संपतां द्वादश जालासे शहाणा ॥ करुनी अंगना वेगीं देती ॥ ४ ॥ विषयाचे बळें मातलासे सर्प ॥ सदा धुस्धुस् दर्प अंगीं वसे ॥ ५ ॥ सरलीया तारुण्य आला वृद्धदशे ॥ भोगितसे क्लेश नाना व्याधी ॥ ६ ॥ रामनाम वाचें सदा आठवची नाहीं ॥ धन-दारा-पुत्र पाही माझें माझें ॥ ७ ॥ शेवटील घडी परिपूर्ण भरली ॥ माती जड झाली पापिष्टाची ॥ ८ ॥ येउनी यमदूत नेताती बांधून ॥ नानापरी ताडन करिताती ॥ ९ ॥ यातना ती सर्व भोगुनी ढकलिती ॥ पुनरपि येती गर्भवासा ॥ १० ॥ चौऱ्यायशी लक्ष योनी फिरतां फिरतां ॥ एकाजनार्दनीं तत्वतां नरदेह ॥ ११ ॥

॥ १६६६ ॥ शतवरुषांची घेउनी आला चिठ्ठी ॥ अर्धरात्रीं खादलें उठाउठीं ॥ १ ॥ केव्हां जपशील रामनाम वाचें ॥ आयुष्य सरलीया पडतील यमफांसे ॥ २ ॥ अज्ञानत्व गेलें वरुषें बारा ॥ खेळतसे विटुदांडु भोंवरा ॥ ३ ॥ उपरी तारुण्यमदाचा ताठा ॥ करी बैसोनी विषयाच्या चेष्टा ॥ ४ ॥ सवें पावला वृद्धापकाळ ॥ जाली हीन शक्ति गळती शेंबुड लाळ ॥ ५ ॥ ऐशीं पन्नास वर्षें गेलीं भरोवरी ॥ एकाजनार्दनीं पडला चौऱ्यायशींचे फेरीं ॥ ६ ॥

॥ १६६७ ॥ ऐसे वेरझारी कोटी कोटी फेरा ॥ परी त्या पामरा समजेना ॥ १ ॥ माझें माझें ह्मणोनी झोंबतसे बळें ॥ केलेंसे वाटोळें नरदेहा

॥ २ ॥ फजितीचा जन्म मरावें जन्मावें ॥ हें किती सांगावें मूढ जना ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं माझें माझें टाकुनी ॥ वैष्णव कीर्तनीं नाचे सुखें ॥ ४ ॥

॥ १६६८ ॥ पावला जनन मातेचे उदरीं ॥ संतोषली माता तयासी देखोनी ॥ १ ॥ जोजो जोजो ह्मणोनी हालविती बाळा ॥ नानापरीं गाणें गाती करिती सोहळा ॥ २ ॥ दिवसेंदिवस वाढला सरळ फोंक ॥ परी कर्म करी अचाट तया न साहावें दुःख ॥ ३ ॥ शिकवितां नायके पडे भलते व्यसनीं ॥ एकाजनार्दनीं पुन्हां पडतसे पतनीं ॥ ४ ॥

॥ १६६९ ॥ पतनाच्या भया नोळखे पामर ॥ करी वेरझार नानापरी ॥ १ ॥ नायके कीर्तन न पाहे पंढरी ॥ वैष्णवाचे द्वारीं न जाये मूढ ॥ २ ॥ नानापरीचे अर्थ दाखवी ओंगळ ॥ सदा अमंगळ बोले जना ॥ ३ ॥ हिंडे दारोदारीं ह्मणे पुराणीक ॥ पोटासाठीं देख सोंग करी ॥ ४ ॥ वाचाळ आगळा बोलों नेदी लोका ॥ एकाजनार्दनीं देखा फजीत होय ॥ ५ ॥

॥ १६७० ॥ स्त्री पुत्र दारा धन ॥ देखोनीया नाचे श्वान ॥ १ ॥ जातां बळें कीर्तनीं ॥ बका ऐसा बैसे ध्यानीं ॥ २ ॥ लक्ष ठेउनी बाहेरी ॥ वर वर डोले दुराचारी ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं ह्मणे ॥ श्वानापरी त्याचें जिणें ॥ ४ ॥

॥ १६७१ ॥ आहारे अभाग्या काय केलें ॥ फुकट नरदेह गमाविलें ॥ ॥ १ ॥ भजे भजे रामकृष्ण वासुदेवा ॥ वाउगा सांडोनी देई हेवा ॥ २ ॥ मूळ संकल्प तोडोनीया टाकी ॥ अहंकार ममता वासना उपाधि शेखीं ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं टाकुनी परता होय ॥ वाचें सदा गाय वासुदेव ॥ ४ ॥

॥ १६७२ ॥ वाउगाची शीण करिसी सर्वथा ॥ चुकसी परमार्था मूढा जाण ॥ १ ॥ किती करिसी सोस माझें माझें ह्मणोनी ॥ शेवटीं बंधनीं पडसी मूढा ॥ २ ॥ अंतकाळीं कोणी नाहींरे सांगाती ॥ होईल फजिती तुझी तुला ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं वाउगाचि धंदा ॥ त्यजूनि गोविंदा सेवी बापा ॥ ४ ॥

॥ १६७३ ॥ शहाणा हो शहाणा ह्मणविसी ॥ हरिभक्ती कांरे वरवर करिसी ॥ १ ॥ उगीच कासया करसी लफडें ॥ जग हें बोधावया बापुडें ॥ ॥ २ ॥ अंतर भक्ति न करिसी मूढा ॥ कासया लौकिकीं मिरवीसी बापु-

डा ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं धरुनी कान ॥ संतापायीं नाचे सांडुनी अभिमान ॥ ४ ॥

॥ १६७४ ॥ वाउगाची पसारा ॥ कां रे वाढविला गव्हारा ॥ १ ॥ ह्मणसी माझें माझें ॥ अंतीं कोण आहे तुझें ॥ २ ॥ भुललासी वांया ॥ गमविसी व्यर्थ काया ॥ ३ ॥ कोण हें कोणाचें ॥ एकाजनार्दनीं साचें ॥ ४ ॥

॥ १६७५ ॥ आलासी पाहुणा नरदेहीं जाणा ॥ चुकवी बंधना पासुनीया ॥ १ ॥ वाउगाची सोस न करी सायासा ॥ रामनाम सौरसा जप करी ॥ २ ॥ यज्ञ यागादिक न घडती साधनें ॥ न्यून पडतां पतन सहज जोडे ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं चुकवी वेरझार ॥ करी तूं उच्चार अखंड वाचें ॥ ४ ॥

॥ १६७६ ॥ भासतसे दोर विखाराचे परी ॥ तैसीच हे थोरी प्रपंचाची ॥ १ ॥ भुलले भुलले प्रपंचीं गुंतले ॥ वायांची उगले बोल कांहे ॥ ॥ २ ॥ श्वानाचीये परी मागें पुढें पाहे ॥ माझा ह्मणोनी बाह्या कवटाळिती ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं अवकाळीं मेघ ॥ तैसा प्रपंचीं दंभ लटिकाची ॥ ४ ॥

॥ १६७७ ॥ न कळेची मूढा सुखाची ती गोडी ॥ पायीं पडली बेडी प्रपंचाची ॥ १ ॥ पान लागलीया गूळ न ह्मणे गोड ॥ तैसे ते मूढ विसरले नाम ॥ २ ॥ शुद्ध वैराग्याचा मानिती कंटाळा ॥ पाळिती अमंगळा प्रपंचासी ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं नाहीं भाव खरा ॥ तया त्या पामरा सांगुनी काय ॥ ४ ॥

॥ १६७८ ॥ अस्थि मांसाचा हा कोथळा ॥ ऐसा देह अमंगळा ॥ १ ॥ प्राणी ह्मणती माझें माझें ॥ खर जैसें वाहे वोझें ॥ २ ॥ न कंटाळे कधीं मन ॥ जेवीं भुले सर्प जाण ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं देवा ॥ याचा विसर पाडावा ॥ ४ ॥

॥ १६७९ ॥ सांगे बहु सोप्या गोष्टी ॥ करूं नेणे तो हातवटी ॥ १ ॥ ऐसें याचें नको ज्ञान ॥ ज्ञान नोहे तें पतन ॥ २ ॥ सांगे लोकां उपदेश ॥ आपण नेणें तो सायास ॥ ३ ॥ शरण एकाजनार्दनीं ॥ त्याची अमंगळ वाणी ॥ ४ ॥

॥ १६८० ॥ प्रपंचाचा भार वाहातसे खर ॥ न कळे विचार साधनाचा ॥ १ ॥ गुंतलासे मीन गळाचीये परी ॥ अमीष देखोनी वरी गिळीतसे ॥ २ ॥ टाळी लाउनीया बैसलासे बक ॥ तैसाचि तो देख नामहीन ॥ ॥ ३ ॥ आवडी आदरें नये नाम मुखीं ॥ एकाजनार्दनीं सुखी केवीं होय ॥ ४ ॥

॥ १६८१ ॥ कल्पनेचे जळीं वासना कल्लोळीं ॥ बुडाले भवजळीं नामहीन ॥ १ ॥ तयाच्या धांवण्या कोण धांवे देव ॥ ऐसा तो उपाव नेणेचिना ॥ २ ॥ दुःखाचे डोंगर भोगिती बापुडीं ॥ कोण काढाकाढी करील त्यांची ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं संतावांचुनीया ॥ त्या अभाग्याची दया कोण करी ॥ ४ ॥

॥ १६८२ ॥ दुःखाच्या खडकीं आदळती प्राणी ॥ परी संसाराचा मनीं वीट नये ॥ १ ॥ कामाचीया लाटे कर्दमाचे पुरीं ॥ बुडे तरी हांव धरी अधिकची ॥ २ ॥ वारितां नायके भ्रमलासे कीर ॥ सांपडे सत्वर पारधीया ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं यमाचीया फांसा ॥ पडेल तो सहसा न कळे मूढा ॥ ४ ॥

॥ १६८३ ॥ पिता पुत्र नातु सर्व काळें ग्रासिलें ॥ उरले ते गेले काळमुखीं ॥ १ ॥ सायास करुनी वाढविती माझें ॥ परी काळाचें हें खाजें नेणती ते ॥ २ ॥ बाळ तरुण वृद्ध दशा ते पावती ॥ परी न ह्मणती राम राम ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं भुलला गव्हार ॥ न करी विचार स्वहिताचा ॥ ४ ॥

॥ १६८४ ॥ ज्याचें नाम स्मरतां कळीकाळ ठेंगणा ॥ तया नारायणा विसरले ॥ १ ॥ करिती पूजन आणिकाची स्तुती ॥ दैन्यवाणे होती अंतकाळीं ॥ २ ॥ एकाजनार्दनीं तयाचें बंधन ॥ कोण करील खंडन जन्मकर्मा ॥ ३ ॥

॥ १६८५ ॥ नाना कर्मांचीया लागतां पाठीं ॥ ब्रह्मचि शेवटीं होय जगा ॥ १ ॥ नोहे कर्म यथासांग ॥ वाउगा मग श्रम होय ॥ २ ॥ जाय तळा येत वरी ॥ बुडक्यापरी बुडतसे ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं शरण ॥ कर्म न करूं आह्मी जाण ॥ ४ ॥

॥ १६८६ ॥ सुखावोनी पतंग दीपावरी पडे ॥ परी शेवटीं जोडे देह अंत ॥ १ ॥ तैसे प्राणी मात्र संसारीं भुलले ॥ कष्टते उगले करितातीं ॥ २ ॥ भिलाव्याचे परी प्रपंच गोमटा ॥ परी काढी चपेटा अंतरींचा ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं भुलले पामर ॥ वायां नर्क घोर भोगितातीं ॥ ४ ॥

॥ १६८७ ॥ कर्म करतां कांहीं न कळे विचार ॥ परी द्वेषाद्वेष संचार होत असे ॥ १ ॥ राजस तामस सात्विक तें देखा ॥ उपाधीते दोखा मूळ जाणा ॥ २ ॥ यथाविधि कर्म न घडे निश्चयें ॥ उणें पडतां जाय पतनासी ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं नाम मुखीं गातां ॥ सर्व कर्मे तत्वतां घडती सांग ॥ ४ ॥

॥ १६८८ ॥ आलीया द्विजासी द्यावें अन्नदान ॥ नसतां अभ्युत्थान द्यावें त्यासी ॥ १ ॥ तेणें जोडे यज्ञ सर्व धर्म जाण ॥ विन्मुख गेलिया पतन घडतसे ॥ २ ॥ एकाजनार्दनीं घडतां नमस्कार ॥ तेणें हरिहर संतोषती ॥ ३ ॥

॥ १६८९ ॥ संसारीं तरले बोलती तें कुडें ॥ जाती ते बापुडे अधोगति ॥ १ ॥ नेणती आचार विचार स्वधर्म ॥ करतातीं कर्म मना तैसें ॥ २ ॥ न तरती भवसागरीं बुडती हव्यासें ॥ लागतसे पिसें धन आशा ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं आशा हे सांडोनी ॥ गोविंद चरणीं मिठी घाला ॥ ४ ॥

॥ १६९० ॥ सांडोनी आचार करती अनाचार ॥ ब्रह्माचा विचार न कळे ज्यांसी ॥ १ ॥ वाहाती भार वेदाचा आधार ॥ शास्त्राचा संभार सांगतातीं ॥ २ ॥ पुराण व्युत्पत्ति वाउग्या त्या कथा ॥ सांगती सर्वथा हितपर ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं अनुभवावांचुनी ॥ कोरडी ती काहाणी ब्रह्मज्ञान ॥ ४ ॥

॥ १६९१ ॥ मत्सर ज्ञानीयातें न सोडी ॥ मा इतर कायसीं बापुडीं ॥ १ ॥ शिणतातीं मत्सर वेधें ॥ भोगितातीं भोग विविधें ॥ २ ॥ निर्मत्सर भजनीं गोष्टी ॥ ऐसा कोण्ही नाहीं सृष्टी ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं मत्सर ॥ तेणें परमार्थ पळे दूर ॥ ४ ॥

॥ १६९२ ॥ पराचे ते दोष आणूं नये मनीं ॥ जयाची ते करणी साजसवें ॥ १ ॥ विषाचीया अंगीं नोहे अमृतपण ॥ मारक तें जाण विष

होय ॥ २ ॥ सर्पाचीये अंगीं शांतीचा कळवळा ॥ कोण पाहे डोळां भरुनी दृष्टी ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं जैसा ज्याचा गुण ॥ तैसें तें लक्षण बद्धक ह्मासी ॥ ४ ॥

॥ १६९३ ॥ व्याघ्रा मुखीं सांपडतां गाय ॥ तेथें धांवण्या कोण जाय ॥ १ ॥ तैसा विषय भोग साचा ॥ भोगितां सुखाचा सुख ह्मणती ॥ २ ॥ येतां यमदूतें बापुडीं ॥ कोण सोडी अधमासी ॥ ३ ॥ ह्मणोनी मारितसें हाका ॥ भुलूं नका संसारा ॥ ४ ॥ शरण एकाजनार्दनीं ॥ सोडविल धनी त्रैलोक्याचा ॥ ५ ॥

॥ १६९४ ॥ कामधेनु देउनी पालटा ॥ अजा घे जैसा करंटा ॥ १ ॥ तैसा ठकला कीर्तनीं ॥ निशिदिनीं गाय गाणीं ॥ २ ॥ दवडोनीया हिरकणी ॥ वेंची आनंदें गार मणी ॥ ३ ॥ ऐसा अभागी पामर ॥ एकाजनार्दनीं ह्मणे खर ॥ ४ ॥

॥ १६९५ ॥ गायत्री मंत्राचा मानुनी कंटाळा ॥ जाय तो वेताळा पूजावया ॥ १ ॥ देवाचें पूजन करितां वाटे दुःख ॥ आवडीं तो देख भांग घोटी ॥ २ ॥ ब्राह्मणासी पाणी देतां मानी शीण ॥ वेश्येचें धुवण वस्त्रें धुई ॥ ३ ॥ कीर्तनीं बैसतां ह्मणे निद्रा येत ॥ खेळतसे द्यूत अहोरात्रीं ॥ ४ ॥ पुराणश्रवणीं मानीत कंटाळा ॥ नटनाट्य खेळा पाहों जाय ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं ऐसा तो गव्हार ॥ चंद्र अर्क वर नर्क भोगी ॥ ६ ॥

॥ १६९६ ॥ शुद्ध ज्याचें मन ॥ तया आवडे कीर्तन ॥ १ ॥ येर ते पामर पातकी ॥ दैन्यवाणे तिहीं लोकीं ॥ २ ॥ नावडे हरीचें कीर्तन ॥ तेथें वसे नानाविघ्न ॥ ३ ॥ एका शरण जनार्दनीं ॥ करा कीर्तन अनुदिनीं ॥ ४ ॥

॥ १६९७ ॥ घटिका भरतां नलगे वेळ ॥ उभा काळ वाट पाहे ॥ १ ॥ कोणी न ये रे सांगाती ॥ वायां होतसे फजिती ॥ २ ॥ माप भरतां नाहीं गुंती ॥ वायां कुंथी फळ काय ॥ ३ ॥ शरण रिघा जनार्दनीं ॥ मोक्षदानीं उदार ॥ ४ ॥ एका विनवी जनार्दनीं ॥ अंतकाळीं कोण्ही नाहीं ॥ ५ ॥

॥ १६९८ ॥ फजीतखोराचे जीवीं ॥ लाज नाहीं सर्वथा ॥ १ ॥ सांगतां ते न धरती मनीं ॥ नायकती कानीं शिकविलें ॥ २ ॥ ह्मैसा जैसा

उन्मत्त मर्दें ॥ कामछंदें तेवीं नाचे ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं ते पामर ॥ जन्म वेरझार भोगिती ॥ ४ ॥

॥ १६९९ ॥ निर्धन पुरुषासी देखा ॥ स्त्री बोले अतिशय ऐका ॥ १ ॥ दिवसां पोरांची तडातोडी ॥ रात्रीं तुमची ओढाओढी ॥ २ ॥ नाहीं घरीं खावया अन्न ॥ संततीनें भरलें सदन ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं देवा ॥ ऐसा स्त्रीचा हेलावा ॥ ४ ॥

॥ १७०० ॥ अविश्वासी वाडेंकोडें ॥ जेथ जाय तेथें सांकडें ॥ १ ॥ अंगो-अंगीं कष्ट सदा ॥ ऐसी तयासी आपदा ॥ २ ॥ जिकडे जाय तिकडे कष्ट ॥ नोहे परमार्थीं वरिष्ठ ॥ ३ ॥ एका शरण जनार्दनीं ॥ अविश्वास त्यागा झणी ॥ ४ ॥

॥ १७०१ ॥ सकळ दोषां मुगुटमणी ॥ निंदी जनीं संता तो ॥ १ ॥ जन्मतांची नाहीं मेला ॥ व्यर्थ वांचला भू भार ॥ २ ॥ खाचियानें दुःखी धरा ॥ नाहीं थारा जन्मोजन्मीं ॥ ३ ॥ दांत खाय यमधर्म ॥ देखोनीया त्याचें कर्म ॥ ४ ॥ अभागी तो वसे जनीं ॥ एका शरण जनार्दनीं ॥ ५ ॥

॥ १७०२ ॥ गांठीं बांधोनिया धना ॥ क्षणक्षणा पाहे सातें ॥ १ ॥ न जाय तीर्थयात्रेप्रति ॥ धनाशा चित्तीं धरुनी ॥ २ ॥ बैसलासे सर्प दरीं ॥ तैशा परी धुसधुसी ॥ ३ ॥ नको धनाशा मजसी जाण ॥ शरण एका जनार्दन ॥ ४ ॥

॥ १७०३ ॥ चरणा वंदिती कां निंदिती ॥ तेहीं निजपदाप्रति जाती ॥ १ ॥ चरण वंदितां तरली शिळा ॥ शिशुपाळा निंदितां तारिलें ॥ २ ॥ एक तरले चरण पूजितां ॥ एक तरले चरण ध्यातां ॥ ३ ॥ उपेक्षी जो चरणकमळ ॥ एकाजनार्दनीं तो खळ ॥ ४ ॥

॥ १७०४ ॥ अमृत विकुनी कांजी प्याला ॥ तैसा नरदेह गमाविला ॥ १ ॥ लाहोनी उत्तम शरीर ॥ वेंचिलें तें विषयपर ॥ २ ॥ ऐशी मूर्खाची गोष्टी ॥ एकनाथ देखोनी होतसे कष्टी ॥ ३ ॥

॥ १७०५ ॥ ब्रह्म एक परिपूर्ण ॥ तेथें नाहीं दोषगुण ॥ १ ॥ पराचा देखती जे दोष ॥ तेची दोष महादोष ॥ २ ॥ ब्रह्मीं नाहीं दोष गुण ॥ पहाती ते मूर्ख जाण ॥ ३ ॥ जे गुणदोष देखती ॥ एका जनार्दनीं नाडती ॥ ४ ॥

॥ १७०६ ॥ दीपाचीया अंगसंगा ॥ कोण सुख आहे पतंगा ॥ १ ॥ दीपारूपाचेनी कोडें ॥ पतंग स्नेहांत उडी पडे ॥ २ ॥ एक निमाले देखती ॥ दुजा उडी घाली अवचितीं ॥ ३ ॥ ऐशीं भुललीं बापुडीं ॥ एकाजनार्दनीं धरुनी गोडी ॥ ४ ॥

---

## अज्ञानभक्ति.

॥ १७०७ ॥ प्रतिमेचा देव केला ॥ काय जाणे ती अबला ॥ १ ॥ नवस करिती देवासी ॥ ह्मणती पुत्र देई वो मजसी ॥ २ ॥ न कळेचि मूढा वर्म ॥ कैसें झालेंसें कर्म ॥ ३ ॥ प्रतिमा केलीसे आपण ॥ तेथें कैचें देवपण ॥ ४ ॥ देव खोटा नवस खोटा ॥ एकाजनार्दनीं रडती पोटा ॥ ५ ॥

॥ १७०८ ॥ देव दगडाचा भक्त तो मेणाचा ॥ ऐका दोहींचा विचार कैसा ॥ १ ॥ खरेपणा नाहीं देवाचे ते ठाईं ॥ भक्त अभाविक पाही दोन्ही एक ॥ २ ॥ एकाजनार्दनीं ऐसें देव भक्तपण ॥ निलाजरे जाण उभयता ॥ ३ ॥

॥ १७०९ ॥ करुनी नवस मागती ते पुत्र ॥ परी तो अपवित्र होय पुढें ॥ १ ॥ नासोनीया धर्म करी वेडे चार ॥ भोगिती अघोर पापमति ॥ २ ॥ सदां सर्वकाळ निंदावे सज्जन ॥ काया वाचा मन परद्रव्यीं ॥ ३ ॥ परनारी देखतां सुख वाटे मनीं ॥ भोगी वित्त हानि पाप जोडे ॥ ४ ॥ ऐशीया पामरा दंडतो कोण ॥ तयाचें वदन कृष्णवर्ण ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं नवसाचें फळ ॥ कुळीं झाला बाळ बुडवणा ॥ ६ ॥

॥ १७१० ॥ सांडोनीयां विठाबाई ॥ कां रे पूजितां मेसाई ॥ १ ॥ विठाबाई माझी माता ॥ चरणीं लागो इचे आतां ॥ २ ॥ अरे ज़ोगाई तुकाई ॥ इजपुढें बापुड्या काई ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं माझी आई ॥ तिही लोकीं तिची साई ॥ ४ ॥

॥ १७११ ॥ कलिमाजीं दैवतें उघड दिसती फार ॥ नारळ आणि शेंदूर यांचा भडीमार ॥ १ ॥ लटिका देव लटिका भक्त लटिके सर्व वाव ॥ सात धान्याचे धपाटे मागती काय साचा बडीवार ॥ २ ॥ तेल रांधा मागती मळीदा वरती काळ कुंकूं ॥ फजीतखोर ऐसे देव तयाचे तोंडावर

थुंकूं ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं सर्व भावें सोपा पंढरीराव ॥ तया सांडोनी कोण पुसे या देवांची कायसी माव ॥ ४ ॥

॥ १७१२ ॥ फजितींचे देव मागती घुटीरोटी ॥ आपणासाठीं जगा पीडिती काळतोंडें मोठीं ॥ १ ॥ नको तया देवा आठव मजसी ॥ विठ्ठल मानसीं आह्मी ध्याऊं ॥ २ ॥ अविचारी देव अविचारी भक्त ॥ देवाकारणें मारिती पशु घात ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं जळो ऐसा देव तो भांड ॥ विठ्ठल विठ्ठल न ह्मणे त्याचें काळें तोंड ॥ ४ ॥

॥ १७१३ ॥ आलों ऐकोनी खंडोबाची थोरी ॥ वाघा होउनी मज मागा ह्मणती वारी ॥ १ ॥ ठकलों ठकलों वाउगा सीण ॥ वारी मागतां पोट न भरे जाण ॥ २ ॥ सदा वागवी कोटंबा आणि झेंडा ॥ रांडापोरें त्यजिलीं जालों काळतोंडा ॥ ३ ॥ गेले दोनी ठाव आतां कोठें उरला वाव ॥ एकाजनार्दनीं भेटवा मज पंढरीरावो ॥ ४ ॥

॥ १७१४ ॥ देव ह्मणती मेसाबाई ॥ पूजा अर्चा करिती पाही ॥ १ ॥ नैवेद्य वहाती नारळ ॥ अवघा करिती गोंधळ ॥ २ ॥ मेंढरें बोकड मारिती ॥ सुकी रोटी तया ह्मणती ॥ ३ ॥ बळेंची आणिताती अंगा ॥ नाचताती शिमगीं सोंगा ॥ ४ ॥ सकळ देवांचा हा देव ॥ विसरती तया अहंभाव ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं ऐसा देव ॥ येथें कैचा आमुचा भाव ॥ ६ ॥

॥ १७१५ ॥ ह्मणती देव मोठे मोठे ॥ पूजिताती दगड गोटे ॥ १ ॥ कष्ट नेणती भोगिती ॥ वहा दगडातें ह्मणती ॥ २ ॥ जीत जीवा करूनि वध ॥ दगडा दाविती नैवेद्य ॥ ३ ॥ रांडा पोरें मेळ जाला ॥ एक ह्मणती देव आला ॥ ४ ॥ नाक घांसुनी गव्हार ॥ देवा ह्मणती गुन्हेगार ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं ह्मणे ॥ जन भुललें मूर्खपणें ॥ ६ ॥

॥ १७१६ ॥ येउनी नरदेहां भूतातें पूजिती ॥ परमात्मा नेणती महामूर्ख ॥ १ ॥ दगडाच्या देवा सेंदुराचा भार ॥ दाविती बडिवार पूजनाचा ॥ २ ॥ रांडा पोरें घेती नवसाचें बगाड ॥ नुगवे लिगाड तयाचेनी ॥ ३ ॥ आपण बुडती देवा बुडविती ॥ अंतकाळीं होती दैन्यवाणे ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं ऐसिया देवा ॥ जो पूजी गाढवासम होय ॥ ५ ॥

॥ १७१७ ॥ जयाचेनी तुटे भवबंधन ॥ तयासी जाण विसरती

॥ १ ॥ करती आणिकाची सेवा ॥ ऐसे ते अभागी निर्दैव ॥ २ ॥ मुळींच नाहीं देवपण ॥ तेथें करती जप ध्यान ॥ ३ ॥ विसरूनि खऱ्या देवासी ॥ भुलले आपुल्या मानसीं ॥ ४ ॥ सत्य सत्य बुडती जनीं ॥ एका शरण जनार्दनीं ॥ ५ ॥

---

## दांभिक व पोटबाबू संत.

॥ १७१८ ॥ आहारालागीं कथा ॥ करिताती पैं सर्वथा ॥ १ ॥ आहार न मिळतां जाण ॥ कथेलागीं पुसे कोण ॥ २ ॥ आहार मिळतां पोटभरी ॥ पुराण सांगे बरव्यापरी ॥ ३ ॥ आहार मिळतां संध्या स्नान ॥ आहारार्थ जपध्यान ॥ ४ ॥ आहारालागीं उपासना ॥ नीच सेवना आहारेंची ॥ ५ ॥ आहाराकारणें सर्व हेत ॥ एकाजनार्दनीं गात आहारेंची ॥ ६ ॥

॥ १७१९ ॥ आहारालागीं देव पूजा ॥ आहारें खादलेंसे निजा ॥ १ ॥ न कळेची हिताहित ॥ आहारें खादलीं पंचभूतें ॥ २ ॥ आहारालागीं कर्म धर्म ॥ भुलला वर्म आहारेंची ॥ ३ ॥ आहारालागीं मंत्र तंत्र ॥ आहारा लागीं करी अपवित्र ॥ ४ ॥ आहारालागीं जाला भांड ॥ एकाजनार्दनीं काळें तोंड ॥ ५ ॥

॥ १७२० ॥ आहारालागीं करी देवाचें भजन ॥ मिळे मिष्टान्न भोजनासी ॥ १ ॥ आहारालागीं करी तीर्थांचें भ्रमण ॥ आहारें जिंतलें मन सर्वपरी ॥ २ ॥ आहारालागीं करी तीर्थ प्रदक्षणा ॥ आहारें व्यापिलें जना एकमय ॥ ३ ॥ आहार निर्धार नाहीं जनार्दनीं ॥ एकाजनार्दनीं निराहार ॥ ४ ॥

॥ १७२१ ॥ धन कामासाठीं देख ॥ नमनी दोष महा दोषी ॥ १ ॥ कवडीये लोभें केला असे मूर्ख ॥ नाठवेची नर्क पतितासी ॥ २ ॥ कवडा एकु लाभु होतां ॥ तैं श्राद्ध करी माता पिता ॥ ३ ॥ मी उत्तम पैल हीन ॥ ही धनलोभ्या नाठवे आठवण ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं शरण ॥ काय तया ब्रह्मज्ञान ॥ ५ ॥

॥ १७२२ ॥ शाब्दिक शब्दाचा करती कंटाळा ॥ द्वेषाचा उमाळा अंगीं वसे ॥ १ ॥ शब्द ब्रह्मज्ञानें फुगविती अंग ॥ वाउगाची सोंग गर्व वाहाती

॥ २ ॥ सर्वां भूतमात्रीं शब्द तो संचला ॥ न कळे तयाला शब्दभेद ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं शब्दाचा भेद ॥ न कळे प्रसिद्ध ज्ञानीयासी ॥ ४ ॥

## दांभिक आचार.

॥ १७२३ ॥ भावाचें नाक लाविलें लोभें ॥ वरदळ भक्ति कैशापरी शोभे ॥ १ ॥ नकटीचा डुणगुण उपहास लोकां ॥ दांभीक भक्ती तैसी तुह्मी देखा ॥ २ ॥ काजळ कुंकुं माथा वेणी ॥ नकटी सुंदर ह्मणेल कोणी ॥ ३ ॥ नकटीचा संगु करी त्या न साजे ॥ दांभीक भजना त्या परीस खोटें ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं भावेंविण ॥ कुसरीचें भजन तें नकटेंच जाण ॥ ५ ॥

## शिक्षा.

॥ १७२४ ॥ गफल कुंवा गाफळ हुवा ॥ आगे० ॥ धृ० ॥ दिलमें धन जोबनकी मस्ती ॥ मगनमें खुल रहे छाती ॥ पेहेलवानसे करता कुस्ती । दिवाना भडवा ॥ १ ॥ सुरत आयनेमें देखे भाय ॥ कोय दिन काल पकड ले जाय ॥ बिलवु तुरत उडाली जाय ॥ जैसा चुवा ॥ २ ॥ पगडी तेढे पेंचकी बांकी ॥ कोय दिन शीर पडेगी ठाकी ॥ हारदम काल तमाशा सोखी ॥ चंबेली चुवा ॥ ३ ॥ करले आरक असककी बाजी ॥ तेरी जान जावेगी पाजी ॥ एकाजनार्दनकूं करले राजी ॥ मंग ले दुवा ॥ ४ ॥

॥ १७२५ ॥ देवासी जो वंदी ब्राह्मणासी निंदी ॥ तो नर आपदीं आपदा पावे ॥ १ ॥ देवासी जो निंदी ब्राह्मणासी वंदी ॥ तो नर गोविंदीं सरता झाला ॥ २ ॥ कृष्णा कंस द्वेषी नारदास मानी ॥ सायुज्य सदनीं कंस पावे ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं ब्राह्मणाची भक्ति ॥ कोटि जन्म निरुती करूं आह्मी ॥ ४ ॥

॥ १७२६ ॥ चक्रचाळक बोडके दोन्ही ॥ भिक्षा मागती विषयासंगी ॥ १ ॥ कर्म काटाची केली लुगडी ॥ काया विटंबिली बापुडी ॥ २ ॥ साही शास्त्राचें निवडिलें सार ॥ वर बोडकें आंत गरव्हार ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं एकची धुंडा ॥ साही शास्त्राचा गडबड गुंडा ॥ ४ ॥

॥ १७२७ ॥ ऐसें नव्हें निर्मळपण ॥ शुद्ध करि अंतःकरण ॥ १ ॥ राख लावि वरच्यावरी ॥ पडे विषयाचे भरी ॥ २ ॥ स्नानसंध्या द्वादश

टिळे ॥ फासा घालोनि कांपिति गळे ॥ ३ ॥ बक लाउनिया टाळी ॥ ध्यान धरुनी मच्छ गिळी ॥ ४ ॥ श्वाना आलें वृद्धपण ॥ तोंडी न सोडी वाहन ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं भाव ॥ तेथें द्वैतासी कैंचा ठाव ॥ ५ ॥

॥ १७२८ ॥ आळशाच्या घरा दुभतें आलें ॥ दोहोवेना ह्मणोन वायां गेलें ॥ १ ॥ तैसी परी झाली जना ॥ सिद्ध आहे परी न वेचे मना ॥ धृ० ॥ मुखीं फळ न गिळी आळसें ॥ पीडिलों उपवासें ह्मणतसे ॥ २ ॥ एकाजनार्दनीं सर्वांगीं असे ॥ डोळे आळसले नास्तीक दिसे ॥ ३ ॥

॥ १७२९ ॥ एकी आध अकुंचोनी स्वाधीष्ठानावरी ॥ मणी पुरी घेताति झटा ॥ चंद्र सूर्याचिया कळा ह्मणती बारा सोळा ॥ पवन केला उफराटा ॥ सतराविचें क्षीर सेउनी शरीर ॥ काळ वंचनेचा ताठा ॥ सबाह्य आत्माराम नेणती निष्काम ॥ व्यर्थ मिरविती देहचेष्टा ॥ १ ॥ ते मार्गीं चुकलीरे चुकलीरे ॥ जवळी असतां न पाहे ॥ माझा मीच कोण हे शुद्धी नाहीं ॥ मां ब्रह्म प्राप्ती कैंवी होय ॥ धृ० ॥ मीमांसक मतें कर्मे आचरतां ॥ स्नान संध्या यथाविधी ॥ करीतां अंगीं कर्म तें जाण अकर्म ॥ चुकेल तेथील बुद्धी ॥ जपतप होम वेवाद अमूप ॥ पुरश्चरणें मंत्रशुद्धी ॥ जवळिल वर्म नकळे ब्रह्म ॥ कर्मठ मुकले सायुज्यें सिद्धी ॥ २ ॥ एक शिखा यज्ञो-पवीत गळा सुत ॥ तोडुनी संन्यास घेती ॥ दोन्हीं स्नानें गेलीं तेथें तीन झालीं ॥ आगळे लावणें माती ॥ द्वादश जपतां पुढीची चिंता ॥ माथां नारायण ह्मणविती ॥ आपण नारायण किं नारायणी आपण ॥ नेणो नये शमी-रावती ॥ ३ ॥ एक माथां जटाभार लिंगें वाहती गळां ॥ पाशुपत अभिमानें ॥ शैवाचिये मति रुद्राक्ष विभूती ॥ ईश्वर कोण हे नेणें ॥ अचे-तनालागीं सचेतन देहो ॥ खोंचुनी पवाडा करणें ॥ जीउ कीं शीउ नेणति अनुभऊ ॥ वायां देहीं देवो भोगवणें ॥ ४ ॥ नानामतें मत क्षपणीक भराडे ॥ रिता अंगीं झोंबती ॥ घेउनी भेदाचें बळ ऐक्य ज्ञानासळ ॥ भूतमात्र द्वेषिती ॥ आपुलालीं मतें स्थापुनी जिवीं धरुनी ठेलें ॥ अभिमान हे मंदमति ॥ एकाजनार्दनीं कृपाकृष्ण झाला सोपा ॥ तोचि तो होउनी सेविती ॥ ५ ॥

॥ १७३० ॥ संतांलागीं नमन करितां कोणी वंदीना माथां ॥ सद्गुरु चरण नावडती आवडती स्त्रीच्या लाथा ॥ १ ॥ फट गाढवाच्या लेंका ॥ संसार

गेला फुका ॥ धृ० ॥ निज ममतेच्या कन्या झाल्या वाढविल्या घरीं ॥ आपणा देखत रे उचलोनी नेल्या चोरीं ॥ २ ॥ निज सुखाचे कुमर झाले प्रेमानंद भारी ॥ चोंची धरुनी अमृत जैसें उचलोनी नेलें घारीं ॥ ३ ॥ बारा सोळा मुलें झालीं आल्या सुना नातीं ॥ लक्षुमी तो निघुनी गेली कमरेवरी हातू ॥ ४ ॥ अंतकाळीं प्राण जातां रडती देती हाका ॥ लेंकुरवाळी बाईल ह्मणे याचें तोंड झांका ॥ ५ ॥ संसाराचें सुख मानी तोचि एक करंटा ॥ अंतकाळीं व्याकुळ झाला झाल्या बारा वाटा ॥ ६ ॥ कैंचा आपा कैंचा बापा कैंचा मामा काका ॥ कैंची विहीण कैंची बहीण कैंची ताई आका ॥ ७ ॥ एकाजनार्दन ह्मणे संसार हा खोटा ॥ सद्गुरु चरण हृदयीं धरा कदा नये तोटा ॥ ८ ॥

॥ १७३१ ॥ नाम स्मरतां हे वैखरी ॥ चित्त धांवे विषयावरी ॥ कैसें होताहे स्मरण ॥ स्मरणामाजि विस्मरण ॥ २ ॥ नामरूपा नाहीं मेळ ॥ नुस्ता वाचेचा गोंधळ ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं नाम ॥ नामीं प्रगटे आत्माराम ॥ ४ ॥

॥ १७३२ ॥ तन खाक कहते पाक ॥ भले देखो आख ॥ १ ॥ तीन कीही मात करे ॥ गण गण मारे गादरे ॥ धृ० ॥ ज्वान गुरुरी मारता धके ॥ हर सिखी खुदा न देखे ॥ २ ॥ एकाजनार्दनका बंदा ॥ याद देह रसीर खुदा ॥ ३ ॥

॥ १७३३ ॥ घरीं ग्रंथ संग्रह अर्थ काढी भाव ॥ मनीं वाहे निर्वाह विषयाचा ॥ १ ॥ तरी तो विवेक वांयाच गेला ॥ अहंभाव लागला विषयबुद्धी ॥ २ ॥ कर्म यथाविधी करुनी भूतशुद्धि ॥ विषयावरी बुद्धि दृढ झाली ॥ ३ ॥ देव दावी भक्ति दंभावरी प्रीति ॥ द्रव्यालागीं आर्ती आसावली ॥ ४ ॥ सांगे अनुभव देहावरी बुद्धी ॥ अविवेक त्रिशुद्धि जड केला ॥ ५ ॥ परपुरुषीं विवेक जनीं करी द्वेष ॥ एकाजनार्दनीं शिष्य वर जावा ॥ ६ ॥

॥ १७३४ ॥ पिता देव दुरी केला ॥ आतां ह्मणती यात्रे चला ॥ १ ॥ चाली चालताहे जेणें ॥ ते कां न कळे चाळणें ॥ २ ॥ ह्मणती देव जवळी आला ॥ तरी कां तुह्मी वेगें चला ॥ ३ ॥ चालुनीयां देवा गेला ॥ मग मागुता कैसा आला ॥ ४ ॥ देव सांडुनीयां मागें ॥ हा कैसेनि आला अंगें ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं भावो ॥ पायां चालविता देवो ॥ ६ ॥

# नित्य नैमित्तिक कर्मे.

॥ १७३५ ॥ जळ स्पर्शों जाता स्नानीं ॥ तंव चिन्मात्र भासे जीवनीं ॥ १ ॥ कैसें वाहाताहे गांग ॥ स्नानीं हरपलें अंग ॥ २ ॥ अंगत्व मुकलें अंगा ॥ स्नानीं सोंवळी जाली गंगा ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं मज्जन ॥ सकळ तीर्थें जालीं पावन ॥ ४ ॥

॥ १७३६ ॥ संध्यावंदनीं प्रणव जपावा ॥ वाच्य वाचकु प्रणव आघवा ॥ १ ॥ कैसी संध्येसी साधिली संधी ॥ देहीं हारपली देहबुद्धि ॥ २ ॥ छंदऋषि मंत्र उच्चार ॥ तीं अक्षरीं जालें अक्षर ॥ ३ ॥ जपीं जपमाळा मौनीं ॥ संध्या साधिली निज समाधानीं ॥ ४ ॥ सायंप्रातः माध्यान्हीक ॥ तिही संधीं निःसंदेह एक ॥ ५ ॥ काळें काळ तीन चुळा पाणी ॥ संध्या साधिली एकाजनार्दनीं ॥ ६ ॥

॥ १७३७ ॥ आब्रह्म भुवन एक ॥ तर्पण जाहलें ऐक्य ॥ १ ॥ कैसा होताहे ब्रह्मयज्ञ ॥ ब्रह्मदृष्टीं ब्रह्मार्पण ॥ २ ॥ सव्य अपसव्य नलगे जाण ॥ पितरापितर जनार्दन ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं तिलोदक ॥ ब्रह्मरूप तिन्ही लोक ॥ ४ ॥

॥ १७३८ ॥ देवपुजें ठेवितां भावो ॥ तो स्वयेंची जाला देवो ॥ १ ॥ आतां कैसेनी पूजूं देवा ॥ माझी मज होतसे सेवा ॥ २ ॥ अत्र गंध धूप दीप ॥ तेंही माझेंची स्वरूप ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं करी पूजा ॥ तेथें पूज्य पूजकु नाहीं दुजा ॥ ४ ॥

॥ १७३९ ॥ सकळ गोडीये जें गोड आहे ॥ तें रसनाची जाली स्वयें ॥ १ ॥ आतां चाखावें तें काय ॥ जिव्हा अमृता वाकुल्या वाय ॥ २ ॥ तया गोडपणाच्या लोभा ॥ कैशा सर्वांगीं निघती जिभा ॥ ३ ॥ एका-जनार्दनीं गोडी ॥ तया क्षण एक रसना न सोडी ॥ ४ ॥

॥ १७४० ॥ लागलें दैवत अक्षत सांगा ॥ देव देऊळ आलें अंगा ॥ १ ॥ देव देऊळ अवघाची देव ॥ देखोनीया भाव लागतसे ॥ २ ॥ जाणतां नेणतां उरी नुरे मना ॥ यालागीं शरण एकाजनार्दना ॥ ३ ॥

॥ १७४१ ॥ येणें जाणें खुंटलें क्रियाकर्म ठेलें ॥ मज माझें भेटलें

आत्मरूप ॥ १ ॥ त्यागूं तें काय भोगूं तें काय ॥ सर्व ब्रह्मरूप पाहें कोंदाटलें ॥ २ ॥ क्रियाकर्म धर्म निखळ परब्रह्म ॥ त्यागु भोगु तेथें केवळ भ्रम ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं सहजीं सहज एक ॥ एकीं एक पहातां कैचें अनेक ॥ ४ ॥

॥ १७४२ ॥ लांब लांब तुह्मीं सांगाल गोष्टी ॥ तत्वेंसी भेटी करी उठाउठीं ॥ १ ॥ मीपण जोंवरी गेलें नाहीं ॥ तोंवरी तुह्मीं केलें काई ॥ २ ॥ मीपण देहीं प्रपंचदृष्टी ॥ कोरड्या काय सांगाल गोष्टी ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं बोधाचें सत्व ॥ बोलामाजी तेणें दाखविलें तत्त्व ॥ ४ ॥

॥ १७४३ ॥ कर्म धर्म ऐसा आहे ॥ ब्रह्मीं शोधुनीया पाहे ॥ १ ॥ स्नान करावें तें कैसें ॥ संध्या आपरूप असे ॥ २ ॥ कैसा आहे ब्रह्मयज्ञ ॥ मन अर्जतातें नमन ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं भजे ॥ कर्मधर्म सहज बुझे ॥ ४ ॥

॥ १७४४ ॥ कैसा होता हे ब्रह्म यज्ञ ॥ ब्रह्मदृष्टी ब्रह्मार्पण ॥ धृ० ॥ अब्रह्म भुवनान्लोक ॥ तिळोदकें झाले एक ॥ १ ॥ आह्मां सव्य अपसव्य नलगे जाण ॥ मुख्य पितरापितर जनार्दन ॥ २ ॥ एकाजनार्दनीं तिळोदक ॥ ब्रह्मीं भूत तिन्ही लोक ॥ ३ ॥

॥ १७४५ ॥ आचमनीं अवघा देवो ॥ अंग प्रत्यांगीं न्यासिता पहावो ॥ धृ० ॥ कैसा होत आहे कर्म कलाप ॥ दुरी दवडोनी पुण्यपाप ॥ १ ॥ सूर्य चालताहे नित्य कर्म ॥ असो आदित्य परब्रह्म ॥ २ ॥ अन्न तें ब्रह्म अहं ब्रह्म ॥ भोक्ता ब्राह्मण तोही ब्रह्म ॥ ३ ॥ हरी दाता हरी भोक्ता ॥ तेथें वेगळा नुरे कर्म कर्ता ॥ ४ ॥ एक विष्णु महद्भूत ॥ भूत भौतिक तोचि समस्त ॥ ५ ॥ क्रिया कर्म अवघें ब्रह्म ॥ तेथें तद्रूप धर्माधर्म ॥ ६ ॥ एकाजनार्दनीं करी कर्म । तेंचि कर्म होय परब्रह्म ॥ ७ ॥

॥ १७४६ ॥ फळाशा फोडोनी फोडी ॥ शांती पक्क पानाची विडी ॥ १ ॥ कैसा तांबूल सुरंग ॥ रंगीं रंगला अभंग ॥ धृ० ॥ अहं जाळोनी कठीणपणा ॥ सोहं गाळीव शुद्ध चुना ॥ २ ॥ साराचें जें निज सार ॥ तोचि सेवीला खदीर ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं मुखशुद्धी ॥ कैसी बोधवी बोधली बुद्धी ॥ ४ ॥

---

# संध्या व पूजा.

॥ १७४७ ॥ विधियुक्त नोहे संध्यास्नान ॥ तेणें घडे पतन कल्प कोटी ॥ १ ॥ रेचक पूरक कुंभक त्रहाटक ॥ प्राणायाम देख न साधेची ॥ २ ॥ मूळ मंत्र न्यास विधी बीज ॥ न घडतां सहज दोष लागे ॥ ३ ॥ हृदय कवच शिखा शिरीं ॥ नेत्र अस्त्रादीक फट्कारी न साचे ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं यातायाती ॥ पुढें फजिती जन्मोजन्मीं ॥ ५ ॥

॥ १७४८ ॥ पूजा यथासांग संपूर्ण ॥ न घडे तरी संतपूजन ॥ १ ॥ करितां ऐसा संकल्प ॥ तेणें जोडे महा तप ॥ २ ॥ ध्यानीं ध्यातां संत चरण ॥ होईल मना समाधान ॥ ३ ॥ ऐसा पुजेचा सोहळा ॥ एकाजनार्दनीं पाहे डोळा ॥ ४ ॥

॥ १७४९ ॥ पूजा करूं तरी पूजे नाहीं ठाव ॥ भाव धरूं तरी देवची देवीं ॥ १ ॥ करूं तरी पूजा कवणाची सांगा ॥ देवाविण जागा रिती कोण ॥ २ ॥ एकाजनार्दनीं पूजेसी ठाव ॥ अवघा व्यापला देवाधिदेव ॥ ३ ॥

॥ १७५० ॥ पूजेचे प्रकार असती सोळा बारा ॥ तें मी दातारा नेणें कांहीं ॥ १ ॥ ह्मणवितों दास मनीं धरूनि आस ॥ धरिलीसे कास जनार्दना ॥ २ ॥ सायास संकट न करी व्रताचार ॥ गाईन निरंतर जनार्दनू ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं शरण मनें वाचें ॥ तया पूजनाचें सुख होय ॥ ४ ॥

॥ १७५१ ॥ पूजा करूं कैशी देवा ॥ वाचें आठवूं केशवा ॥ १ ॥ हेची माझी पूजा विधी ॥ सर्व टाकिली उपाधी ॥ २ ॥ घालूनि निर्मळ आसन ॥ पूजूं संताचे चरण ॥ ३ ॥ दृढ धरूं भाव साचा ॥ सदा छंद रामनामाचा ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं पूजा ॥ सर्व भावें गरुडध्वजा ॥ ५ ॥

॥ १७५२ ॥ पूजन तों एक पुरे ॥ वाचें स्मरे रामनाम ॥ १ ॥ नको गंधाक्षता तुळशी ॥ मुखीं नाम अहर्निशीं ॥ २ ॥ धूप दीप नैवेद्य तांबूल ॥ सदा वाचें राम बोल ॥ ३ ॥ आर्ति धूपार्ती अक्षता ॥ राम गाऊं निःसीमता ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं शरण ॥ सहज पूजा घडे जाण ॥ ५ ॥

॥ १७५३ ॥ सहजची पूजा पुरे ॥ श्रम वाउगाची उरे ॥ १ ॥ आठ-

वीन वेळोवेळां ॥ केशव माधव गोपाळा ॥ २ ॥ मंत्रस्नान विभूती ॥ मुखीं राम जपविती ॥ ३ ॥ नाहीं आणीक काम ॥ वाचें ह्मणे रामनाम ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं बरवी ॥ पूजा करीन देव देवीं ॥ ५ ॥

॥ १७५४ ॥ देवाचें पूजन ॥ घडतां रामस्मरण ॥ १ ॥ हेंची एक पूजासार ॥ वाया कासया पसर ॥ २ ॥ करूं बैसे देवपूजे ॥ मनीं भाव आन दुजे ॥ ३ ॥ ऐसें पूजेचें लक्षण ॥ सांगे एकाजनार्दन ॥ ४ ॥

॥ १७५५ ॥ बरवी ती पूजा ॥ जेणें पावे अधोक्षजा ॥ १ ॥ मुखीं नाम वाहे टाळी ॥ पूजा केली उत्तम हे ॥ २ ॥ तुळशीमाळा गोपिचंद ॥ पूजा छंद हाची मनीं ॥ ३ ॥ व्रत करी एकादशी ॥ जाग्रण निशीं सर्वदा ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं तुष्टे देव ॥ पूजा भाव तेणें पावे ॥ ५ ॥

॥ १७५६ ॥ देवपूजा करी आदरें ॥ अतीत आलिया न बोले सामोरें ॥ १ ॥ कासया पूजन दांभीक ॥ तेणें देवा नोहे सुख ॥ २ ॥ अतीतासी देणें पूजा ॥ तेणें संतोषें पावे पूजा ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं पूजा ॥ ऐसी न करी गरुडध्वजा ॥ ४ ॥

॥ १७५७ ॥ डोळीयानें रूप पहावें साचार ॥ मुखानें उच्चार रामनाम ॥ १ ॥ हृदईं आठव नाम तें वसावें ॥ करें पैं अर्चावे संतचरण ॥ २ ॥ पदें प्रदक्षणा करी तीर्थाटन ॥ हेंची पैं कारण पूजनाचें ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं ऐशी करी पूजा ॥ तेणें गुरुराजा तोष पावे ॥ ४ ॥

॥ १७५८ ॥ जीव शिव दोन्ही एकची आसनीं ॥ पूजी अवसानीं सर्वकाळ ॥ १ ॥ काम क्रोध याचा मानुनी विटाळ ॥ पूजन सर्वकाळ बरें होय ॥ २ ॥ परद्रव्य परस्त्री येथें आसक्त नोहे मन ॥ तेणें जनार्दन पूजा पावे ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं ममता टाकुनी ॥ संताचे चरणीं पूजन करी ॥ ४ ॥

॥ १७५९ ॥ आपुली पूजा आपण करावी ॥ ही जंव ठावी राहाटी नाहीं ॥ १ ॥ कासया ती पूजा जाणीवेचा शीण ॥ त्याहुनी अज्ञान बरा दिसे ॥ २ ॥ एकाजनार्दनीं ज्ञानाज्ञानें ॥ पूजावे श्रीचरण विठोबाचे ॥ ३ ॥

॥ १७६० ॥ नाना तें चरित्र श्रीहरीचें वाचें ॥ आठवावें साचें अघहरणा ॥ १ ॥ केशव माधव अच्युत गोपाळ ॥ गोविंद गोकुळपाळ वाचें

वदा ॥ २ ॥ वामन श्रीराम कृष्णातें आठवा ॥ हृदयीं सांठवा वेळोवेळां ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं ऐसा जया हेत ॥ तो वसे जगांत जगरूप ॥ ४ ॥

॥ १७६१ ॥ हृदयींच स्नान हृदयींच ध्यान ॥ हृदयींच भजन सर्व काळ ॥ १ ॥ हृदयींच दान हृदयींच धर्म ॥ हृदयींच नेम सर्व जोडे ॥ २ ॥ हृदयींच कथा पुराण श्रवण ॥ हृदयींच चिंतन सर्वसदां ॥ ३ ॥ हृदयींच दिसे एकाजनार्दनीं ॥ हृदयींच एकपणीं विबलासे ॥ ४ ॥

॥ १७६२ ॥ हृदयींच देव हृदयींच भक्त ॥ हृदयींच होत पूजा सर्व ॥ १ ॥ हृदयींच ध्यान हृदयीं जें मन ॥ हृदयीं तें आसन देव वसे ॥ २ ॥ हृदयीं ते भुक्ति हृदयीं ते मुक्ति ॥ हृदयीं सर्व स्थिति देव जाणों ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं हृदयींच पहाल ॥ तें सुख घ्याल हृदयामाजीं ॥ ४ ॥

---

## संधेचे अभंग.

॥ १७६३ ॥ झाली संध्या संदेह माझा गेला ॥ आत्माराम हृदयीं प्रकाशला ॥ १ ॥ गुरुकृपा निर्मळ भागिरथी ॥ शांति क्षमा यमुना सरस्वती ॥ असीपदीं एकत्र जेथें होती ॥ धृ० ॥ झाली० ॥ गुरुकृपा निर्मळ भागिरथी ॥ सद्बुद्धीचें घातलें शुद्धासन ॥ वरी दया सद्गुरुची कृपा पूर्ण ॥ शमदम अंगीं विभूति चर्चिली जाण ॥ मुखीं उच्चारी केशव नारायण ॥ २॥ बोध पुत्र निर्माण झाला जेव्हां ॥ ममता म्हातारी मरोनी गेली तेव्हां ॥ भक्ति बहिण धांउनी आली गांवा ॥ आतां संध्या करूं मीं कैसी केव्हां ॥ ३ ॥ सहज कर्में तीं झालीं कृष्णार्पण ॥ जन नव्हो तो अवघा जनार्दन ॥ ऐसें ऐकतां निवती साधूजन ॥ एकाजनार्दनीं बाणली हेचि खूण ॥ ४ ॥

---

## मानसपूजा.

॥ १७६४ ॥ आत्मा शालिग्राम देह हा संपुष्ट ॥ अष्ट भाव स्पष्ट उपकर्णी ॥ १ ॥ भक्तीचें उदक घातलें पैं तया ॥ माया देह गेहो वस्त्र दिल्हें ॥ २ ॥ सोहं चंदनाचें लावियलें बोट ॥ तत्वार्थ चोखट अक्षताचा ॥ ३ ॥ मन हें सुगंध कितींचा पैं धूप ॥ लावियेला दीप ज्ञानाग्नीनें ॥ ४ ॥ ममतेचा नैवेद्य लक्षाचि आरतीं ॥ पुजा पैं समाप्ति येणेंपरी ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं ऐसें देवतार्चन ॥ करितसे मन विज्ञानेसी ॥ ६ ॥

---

# मंत्र.

॥ १७६५ ॥ वेदामाजीं ओंकार सार ॥ शास्त्रसार तो वेदांत ॥ १ ॥ तुझें ज्ञानसार ध्यानसार ॥ नामसार सर्वांमाजीं ॥ २ ॥ मंत्रामाजीं गायत्री मंत्रसार ॥ तीर्थसार सद्गुरु चरणींचें ॥ ३ ॥ व्रतामाजी एकादशी व्रतसार ॥ द्वादशीसार धनी ॥ ४ ॥ पुजेमाजीं ब्राह्मण पुजासार ॥ कीर्तनसार कलियुगीं ॥ ५ ॥ दानामाजी अन्नदानसार ॥ वैराग्यसार तें नैराश्य ॥ ६ ॥ एकाजनार्दनीं ऐक्यतासार ॥ सर्वसार तें आत्मज्ञान ॥ ७ ॥

॥ १७६६ ॥ कर्माकर्म करी बद्ध झालों भारी ॥ शिकलों त्रिअक्षरीं शुद्ध झालों ॥ १ ॥ आह्मीं शिकलों त्रिअक्षरीं तरलों भवसागरीं ॥ विठ्ठलनामें करी उद्धरलों ॥ धृ० ॥ एकांतीं बैसोनी त्रिअक्षरीं शिकोनी ॥ सकर्मक जनीं अकर्म केलें ॥ २ ॥ त्रिअक्षरीं जप निरसी पुण्यपाप ॥ जाती गोत तेथें बुडविलें नांवरूप ॥ ३ ॥ त्रिअक्षरीचें बळ झालें जी प्रबळ ॥ तेणें धाकें चळचळ कांपती कळीकाळा ॥ ४ ॥ त्रिअक्षरींचा दरारा सुरवर येती घरा ॥ तीर्थें धांवती दारा वोळगेसी ॥ ५ ॥ त्रिअक्षरीं ज्यापासीं मुक्ति सेविती खासी ॥ रिद्धिसिद्धि तेथें सहजीं होती दासी ॥ ६ ॥ एकाजनार्दनीं त्रिअक्षरीं शिकला ॥ जपतां श्रीविठ्ठला भवचि अभव झाला ॥ ७ ॥

॥ १७६७ ॥ पंचभूतें एकसरीं लागली शरीरीं ॥ राम पंचाक्षरी नाममंत्रू ॥ १ ॥ श्रीराम जयराम नाम दो अक्षरी ॥ सहस्र नामावरी ब्रीद गाजे ॥ धृ० ॥ अहं महिषासुर झोंबला जिव्हारीं ॥ रामनामें करी निर्दाळिला ॥ २ ॥ पुंसा पढवितां मंदिरीं राम दो अक्षरी ॥ कळी काळा तो दुरी घाली गणिका ॥ ३ ॥ शिव सांगे वो गौरी राम दो अक्षरी ॥ सहस्र नामें खरीं सिद्ध झालीं ॥ ४ ॥ वेदेंभेदु केला द्विजा आप्तु झाला ॥ अंत्यजादी जनु नामें उद्धरीला ॥ ५ ॥ वेदाचें महिमान वानिती ब्राह्मण ॥ भवबंधन छेदन नाम अधीक जाण ॥ ६ ॥ न ह्मणे काळवेळ वृद्धवयसा शीळ ॥ प्रल्हादादी बाळ उद्धरलें ॥ ७ ॥ उंच नीच वर्ण नामीं नाहीं जाण ॥ स्त्रिया शुद्रजन उद्धरले ॥ ८ ॥ एकाजनार्दनीं रामनाम घोष ॥ त्रैलोक्याचे दोष निर्दाळिलें ॥ ९ ॥

॥ १७६८ ॥ यहां नहीं वहां हय येही भावना अपूर्ण ॥ ज्याहां देखों ताहां पाया ॥ मेरे राम हाय परिपूर्ण ॥ १ ॥ अहं कोहं जाये परदेश ॥

आसनीं भोजनीं शयनीं गमनीं सबाह्य पूर्ण परेश ॥ धृ० ॥ बद्धता छुटी मुक्ति भइ ज्ञानको अंगज्ञान ॥ बंध मुक्त दोहु मिथ्या ब्रह्म सनातन ॥ २ ॥ जीवही शीव शीवही जीव नही भिन्न भेद ॥ एकाजनार्दन एकरूप सहज स्वानंदकंद ॥ ३ ॥

॥ १७६९ ॥ सद्गुरुरायाचें अर्धमात्र जाण ॥ तत्वमसी म्हणून सोहं मंत्र ॥ १ ॥ हा जप जपुनी शमदम दिले ॥ जीवशिव केले एकाकार ॥ २ ॥ इडा पिंगळा सुषुम्ना चालवी ॥ सोहं मंत्र येईल जाई लया ॥ ३ ॥ त्रिवेणी संगमीं अनुहात ध्वनी ॥ आहे रे निशिदिनीं वाद्यगजर ॥ ४ ॥ कोटी सूर्यप्रभा दिसी कोंदाटली ॥ सत्रावी साधिली जीवनकळा ॥ ५ ॥ अंक समादि न मोडेची कांहीं ॥ होती भेदबुद्धि गेली लया ॥ ६ ॥ सोहं मंत्राचा व्रत नेम धरी ॥ एकाग्रता करी भाव बळें ॥ ७ ॥ तुर्या ओलांडुनी उन्मनीं पावलों ॥ सोहं शब्दीं जाहलों गुरुकृपें ॥ ८ ॥ कोटी अश्वमेध घडती सोहं मंत्रीं ॥ पापाचे पर्वत होती भस्म ॥ ९ ॥ रात्रंदिवस पाही धारणा हीं चालवी ॥ एक मंडळ होई राजयोगी ॥ १० ॥ अखंड अभंग त्रिकुटीं अनुभवीं ॥ देहीं ब्रह्म होय स्वयं गुरुपुत्रा ॥ ११ ॥ सद्गुरूची कृपा वंदी वचन सदां ॥ पावे ब्रह्मपदा सच्छिष्य तो ॥ १२ ॥ ब्रह्माविष्णुरुद्र अंश दत्तात्रय ॥ जनीं जनार्दन दावी सोहमस्मी ॥ १३ ॥ राजयोगी पूर्णयोगी जनार्दन ॥ एकनाथी म्हणून मौन्य मुद्रा ॥ १४ ॥

॥ १७७० ॥ जप जनार्दन तप जनार्दन ॥ देव जनार्दन जनींवनीं ॥ १ ॥ कर्म जनार्दन धर्म जनार्दन ॥ ब्रह्म जनार्दन जन सहित ॥ २ ॥ योग जनार्दन याग जनार्दन ॥ भोग जनार्दन अहर्निशीं ॥ ३ ॥ ध्येय जनार्दन ध्यान जनार्दन ॥ एकाजनार्दन विज्ञानेसी ॥ ४ ॥

॥ १७७१ ॥ हृदयस्थ जया नाहीं ठावा देव ॥ पूजा करती वाव सर्व भावें ॥ १ ॥ जाणावा अंतरीं मानावा हृदयीं ॥ पहावा सर्वांतरीं परमात्मा ॥ २ ॥ एकाजनार्दनीं व्यापक सर्वां ठायीं ॥ भरुनी उरला ठायीं जेथें तेथें ॥ ३ ॥

॥ १७७२ ॥ मीच देवो मीच भक्त ॥ पूजा उपचार मी समस्त ॥ १ ॥ हीच उपासना भक्ती ॥ धर्म अर्थ सर्व पुरती ॥ २ ॥ मीच गंध मीच अक्षता ॥ मीच वाहें मीच पुर्ता ॥ ३ ॥ मीच धूप मीच दीप ॥ मी

माझें देख स्वरूप ॥ ४ ॥ मीच माझी करी पूजा ॥ एकाजनार्दनीं नाहीं दुजा ॥ ५ ॥

॥ १७७३ ॥ सद्गुरुवचनें अग्नि मंथिला ॥ स्वबुद्धी आरणी प्रगट केला ॥१॥ येणें नेमें आहुति घाली यज्ञपुरुषीं ॥ सकळीं सकळा मुखीं स्वाहा स्वधा रे ॥ २ ॥ जागृति अग्नि निर्धुम पाही ॥ शेणाची शेणी ते लावणी नाहीं ॥ ३ ॥ त्रिगुणाची तिन्हीं कुंडें ॥ एकी एकपणें हवन उदंड ॥ ४ ॥ विश्वतो मुखा तिन्हीं कुंडें ॥ पूर्व मिमांसा मुंडिलीं मुंडें ॥ ५ ॥ वासनेच्या जटा वाढल्या चित्तीं ॥ वरीवरी क्षौर मासमासा करिती ॥ ६ ॥ स्रुक् स्रुवा दोन्ही अभिन्न पाही ॥ एकचि काष्ठ केलें दो ठायीं ॥ ७ ॥ यज्ञमय यजिताती देवा ॥ वेदार्थ चुकोनि मुकले देहभावा ॥ ८ ॥ सायं प्रातर आह्मा नाहीं यजन ॥ सकळीं सकळ मुखीं चाहा होतसें भजन ॥ ९ ॥ स्थूळ सूक्ष्म रूपें यज्ञपुरुषीं ॥ चरु आज्य त्याचे हवितसे मुखीं ॥ १० ॥ गुरुमुखें संकल्प सांडिला जेणें ॥ साचार दिक्षा घेतली तेणें ॥ ११ ॥ कर्मीं कर्मठता अभिमान नाहीं ॥ यज्ञ होत्र अंगीं बाणलें पाही ॥ १२ ॥ देखो वेखी येर कुंडें करिती ॥ जीविकेलागीं ते साचार वृत्ती ॥ १३ ॥ एका-जनार्दनीं दीक्षा केली ॥ ब्रह्ममुखीं या गुहेची इष्टी भली ॥ १४ ॥

---

## संन्यास.

॥ १७७४ ॥ वासनेचें वसन समूळ फाडी ॥ त्रिगुण जानवें तयावरी तोडी ॥ १ ॥ यापरी जाणोनी संन्यासु घेई ॥ गुरुवचनें सुखें विचरतु जाई ॥ २ ॥ मन दंडीजे तोचि घेई सुदंडू ॥ जीवनेंविण कमंडलु अखंडू ॥ ३ ॥ एकाक्षर जप करी ॥ क्षराक्षरातीत धारणा धरी ॥ ४ ॥ स्वानंदाचें करीं करपात्र ॥ सहजीं सहज सेवी नारायण वक्त्र ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं सहज संन्यासू ॥ सहजीं सहज तेथें नलगे आयासू ॥ ६ ॥

॥ १७७५ ॥ दीनाचें उपार्जन करी पोटासाठीं ॥ ह्मणे मज लंगोटी द्याहो कोण्ही ॥ १ ॥ घेउनी संन्यास हिंडे दारोदारीं ॥ नारायण करी पोटा-साठीं ॥ २ ॥ काम क्रोध वैरी सदोदीत पीडी ॥ वरी शेंडी बोडी करुनी काई ॥ ३ ॥ व्यर्थ विटंबना करिती जनांत ॥ संन्याशाची मात सोंग दावी ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं संन्यास साचा ॥ रामनाम वाचा उच्चार करी ॥ ५ ॥

॥ १७७१ ॥ अंगासी राख ढुंगासी लंगोटी ॥ गोसांवी हातवटी मिरविती ॥ १ ॥ अलख ह्मणोनी भिक्षा मागताती ॥ अलखाची गती न कळे मूढा ॥ २ ॥ भांगेचा सुकाळ चेले करी मूढ ॥ तया यम दृढ दंड करी ॥ ३ ॥ अलक्ष अलक्ष अलख कळेना ॥ जगीं विटंबना उगीच करती ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं नका ऐसें सोंग ॥ तेणें पांडुरंग अंतरेल ॥ ५ ॥

॥ १७७२ ॥ योग साधोनी पंचाग्नि साधिती ॥ न कळे योगाची गती फजीतखोरा ॥ १ ॥ वाउगें साधन वाउगें साधन ॥ तेणें विटंबन होत असे ॥ २ ॥ एकाजनार्दनीं योगाचा योग ॥ भजे पांडुरंग एका भावें ॥ ३ ॥

॥ १७७३ ॥ रक्ती पोटासाठीं ॥ झालों ह्मणती संन्यासी ॥ १ ॥ वर्म न कळेची मूढां ॥ होतो फजित रोकडा ॥ २ ॥ जनीं नारायण ॥ अवघा भरला जनार्दन ॥ ३ ॥ तडातोडी करुनी वर्म ॥ चुकला तो अधम ॥ ४ ॥ सर्वा ठ ग्गीं नारायण ॥ एकाजनार्दनीं भजन ॥ ५ ॥

॥ १७७४ ॥ घालुनी आसन पोटीं भाव नाहीं ॥ वांया केली पाही विटंबना ॥ १ ॥ दे सर्वां भूतीं तयासी न कळे ॥ वाउगें गबाळें पसरिलें ॥ २ ॥ अंतरीं तो हेत द्रव्य मिळेल कांहीं ॥ वरपांग दावी वेषधारी ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं ऐसीया सोंगासी ॥ काय देवा त्यासी दंड करा ॥ ४ ॥

॥ १७७५ ॥ त्यागुनीया स्त्री संन्यासी जे होती ॥ पतनातें जाती अंतकाळीं ॥ १ ॥ घेउनी संन्यास ध्यान पैं स्त्रियांचें ॥ गुंतलासे आशे वांया जाय ॥ २ ॥ नारायण नामीं नाहीं पैं आचार ॥ सर्व अनाचार स्त्रीतें लक्षी ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं संन्यास लक्षण ॥ गीतेमाजीं कृष्ण बोलियेला ॥ ४ ॥

॥ १७७६ ॥ षड्वैरीयांचा करावा आधीं नाश ॥ मग सुखें संन्यास घ्यावा जगीं ॥ १ ॥ आशा मनीषा यांचा तोडोनिया पाश ॥ मग सुखें संन्यास घ्यावा आधीं ॥ २ ॥ एकाजनार्दनीं संकल्पाचा त्याग ॥ सुखें संन्यास मग घ्यावा आधीं ॥ ३ ॥

॥ १७७७ ॥ नुपजे अनुताप ज्ञान ॥ काय घेउनी विज्ञान ॥ १ ॥ अनुतापाविण ॥ व्यर्थ संन्यासग्रहण ॥ २ ॥ संन्यास घेतलीया पाठीं ॥ काम नुपजावा पोटीं ॥ ३ ॥ ऐसें संन्यासलक्षण ॥ एकाजनार्दनीं खूण ॥ ४ ॥

॥ १७७८ ॥ संन्यासी करी गृहस्थाश्रम ॥ तेणें तया अधर्म वोडवला ॥ १ ॥ करपात्रीं भिक्षा हाचि साचा धर्म ॥ न करितां अधर्म स्वयें जोडे ॥ २ ॥ नाश करावे षड्वैरी नेमें ॥ तया संन्यास कर्में ह्मणिजेती ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं गृहस्थुची बरा ॥ फजिती बाजारां उभ्या होय ॥ ४ ॥

॥ १७७९ ॥ वेद बोलिला जो जो गुण ॥ तो तो नव्हेची पठण ॥ १ ॥ वेदें सांगितलें न करी ॥ ब्रह्म द्वेषी दुराचारी ॥ २ ॥ न करा सुरापान ॥ कन्या गो विक्रय जाण ॥ ३ ॥ ऐसी वेदाची मर्यादा ॥ न कळेची मतिमंदा ॥ ४ ॥ निज मुखें स्वयें बोलें वेदू ॥ न करावा परापवादू ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं शरण ॥ वेदाचें नोहें आचरण ॥ ६ ॥

॥ १७८० ॥ वेदविधी कांहीं न कळे पाठका ॥ गुणदोष देखा मळीन सदा ॥ १ ॥ दशग्रंथीं ज्ञान होताची जाण ॥ निंदि तो देखोन भलत्यासी ॥ २ ॥ सर्व ब्रह्मरूप ऐसें बोले वेद ॥ तेथें वादावाद उरला नाहीं ॥ ३ ॥ ओहं सोहं कोहं नाहीं ठाव ॥ उगेचि गौरव मिरवी ज्ञान ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं ब्रह्मज्ञानासाठीं ॥ हिंडताती कोटी जन्म घत ॥ ५ ॥

॥ १७८१ ॥ अहो तुह्मी संन्यासी जाला ॥ काम क्रोध जवळींचा नाहीं गेला ॥ व्यर्थ कां विनाश केला ॥ सावध होई ॥ १ ॥ संसार व्यर्थ सांडिला ॥ मुलाबाळां तुटि पाडिला ॥ नारायण नाहीं जोडिला ॥ सावध होई ॥ २ ॥ वर वर शेंडी बोडी ॥ जानवें तोडुनी धोत्रें फाडी ॥ हातीं घेउनी दंड लांकडी ॥ सावध होई ॥ ३ ॥ वर वर ह्मणसी नारायण ॥ अंतरीं विषयावरी ध्यान ॥ कासया संन्यास घेऊन ॥ सावध होई ॥ ४ ॥ आतां एक विचार ॥ धरी तूं संताचा आधार ॥ एका जनार्दनीं तत्पर ॥ सावध होई ॥ ५ ॥

॥ १७८२ ॥ अवघा वांया संसार ॥ अवघा सार विठ्ठल ॥ १ ॥ अवघे आले वांया जाती ॥ फजिती हे समजेना ॥ २ ॥ अवघे नरदेहीं चोर ॥ अवघा सार विठ्ठल ॥ ३ ॥ अवघे वांया जाते जन्म ॥ अवघें कर्म चुकेना ॥ ४ ॥ अवघा लटिका साच नव्हे ॥ अवघा वांया जात असे ॥ ५ ॥ अवघा जनीं भरला ॥ एकाजनार्दनीं उरला ॥ ६ ॥

॥ १७८३ ॥ अवघे जन्म उत्तम ॥ वाचें स्मरा रामनाम ॥ १ ॥ अवघे वदती नाम साचें ॥ धन्य धन्य ते दैवाचे ॥ २ ॥ संतसंग सदां ॥ अवघा

तया हाचि धंदा ॥ ३ ॥ अवघे वर्ण उत्तम ॥ भेदाभेद नाहीं काम ॥ ४ ॥ अवघा एकाजनार्दन ॥ भेदाभेदाचें नाहीं कारण ॥ ५ ॥

॥ १७८४ ॥ अवघे संता एकमेळ ॥ अवघा देव तो विठ्ठल ॥ १ ॥ अवघे प्रेम रसाचे ॥ अवघे विठ्ठल वदती वाचे ॥ २ ॥ अवघे एकभावी ॥ एकाजनार्दनीं सोहंभावी ॥ ३ ॥

॥ १७८५ ॥ अवघे राम राम वदा ॥ नाहीं कळिकाळाची ती बाधा ॥ १ ॥ अवघे वदता नाम ॥ नाममात्रें निष्काम ॥ २ ॥ अवघे रंगुनी रंगले ॥ अवघे नामें उद्धरिले ॥ ३ ॥ अवघीयां भरंवसा ॥ एकाजनार्दनीं ऐसा ठसा ॥ ४ ॥

॥ १७८६ ॥ अवघे दैवतां नका पाहूं ॥ आदरें आवडी विठ्ठल गाऊं ॥ १ ॥ अवघे पोटाचे भिकारी ॥ हिंडविती दारोदारी ॥ २ ॥ अवघें तें वांया जाय ॥ काय धरुनी त्याचे पाय ॥ ३ ॥ आपुल्या पोटा जें रडतें ॥ आणिकातें काय देतें ॥ ४ ॥ मागून खाती जना ॥ काय पुरविती वासना ॥ ५ ॥ ऐसीयासी देव ह्मणणें ॥ सदां आह्मां लाजिरवाणें ॥ ६ ॥ आह्मीं आणिका शरण जातां ॥ लाज लागेल सर्वथा ॥ ७ ॥ ऐसें नका येऊं देऊं मना ॥ शरण एकाजनार्दना ॥ ८ ॥

॥ १७८७ ॥ कर्म करितां ह्मणती देही ॥ तंव देहचि समूळ नाहीं ॥ १ ॥ लोक ह्मणती कर्म निष्कर्म ॥ हा ह्मणतयाचा मुख्य भ्रम ॥ २ ॥ एकाजनार्दनीं ह्मणती एक ॥ एक ह्मणणें हेंही माइक ॥ ३ ॥

---

## प्राप्ति.

॥ १७८८ ॥ वांया वांया शिणती साधकजन ॥ साधन तितुकें ज्ञानघन ॥ साध्य साधन मानिता भिन्न ॥ निजात्म पूर्ण नव्हती ॥ १ ॥ साखरे वेगळी पाहता गोडी ॥ पाहो ह्मणती ते बुद्धि कुडी ॥ साखर अवघी गोड धकुडी ॥ आत्म निरवडी जग तैसें ॥ २ ॥ साधनी साधूं आत्मयासी ॥ ऐसें ह्मणती ते परम पिसी ॥ आत्मा प्रकाशी साधनाशी ॥ तो केवी त्यासी आकळे ॥ ३ ॥ एक ते मंत्र उपदेशिती ॥ जपू करावा नेणो किती ॥ जेणें होय निजात्म प्राप्ती ॥ ते मंत्रयुक्ति न कळे ॥ ४ ॥ मंत्रीं मंत्रामाजीं अक्षर ॥ ॐ नमः इत्यादि उच्चार ॥ अक्षरीं अक्षर चिन्मात्र ॥ मंत्र साचार परब्रह्म ॥ ५ ॥

पाठका साधन वेदपठण ॥ अक्षर उच्चार स्वर वर्ण ॥ कोरडी वाची तोंड पाठण ॥ नव्हे बोळवण कामक्रोधा ॥ ६ ॥ वेदमूळ तो ॐकार ॥ तोचि परब्रह्म साचार ॥ अकार उकार मकार ॥ वेद चिन्मात्र पठणेसी ॥ ७ ॥ शास्त्रश्रवण साधन शुद्ध ॥ देहाभिमानें केलें विरुद्ध ॥ युक्ति प्रयुक्तिचे बोध ॥ अति विवाद पंडितां ॥ ८ ॥ शास्त्र तितुकें ज्ञान संपन्न ॥ जे जे युक्ति ते केवळ ज्ञान ॥ शास्त्रामाजील जाणपण ॥ तेंचि ब्रह्मपूर्ण श्रवणार्थें ॥ ९ ॥ प्रल्हादा साधन केवळ हरी ॥ हरी सर्वांगें विघ्न निवारी ॥ अनामा भक्त वच ें करी ॥ नर केसरी होऊन ठेला ॥ १० ॥ जैसा जैसा भक्ताचा पैं भावो ॥ तैसा तैसा भाळे देवो ॥ भावे वाचुनिया पाहो ॥ होय अभावो देवाचा ॥ ११ ॥ ऐसे साध्य तेंचि साधन ॥ ज्ञेय तेंचि वृत्तिज्ञान ॥ ध्येय तेंचि होय ध्यान ॥ समाधान गुरुवाक्यें ॥ १२ ॥ जें जें विषयाचें गोडपण ॥ ते ते गोडी चैतन्य घन ॥ विषयीं विषय ब्रह्मपूर्ण ॥ इंद्रिय स्फुरण चिन्मात्र ॥ १३ ॥ जेथ जो ह्मणविसी अज्ञान ॥ अज्ञाना देखणें तो ज्ञानघन ॥ आह्मी नेणों ज्ञानाज्ञान ॥ तो ब्रह्मपूर्ण सहजेंचि ॥ १४ ॥ एका पाहतां एकपण ॥ जन तोचि जनार्दन ॥ एकाजनार्दना शरण ॥ जग संपूर्ण परब्रह्म ॥ १५ ॥

॥ १७८९ ॥ सागर मंथुनी प्रभा व्याला ॥ अवघेंचि चांदणें चंद्रमा झाला ॥ १ ॥ बिंबाचें बिंब झाला स्वयंभ ॥ नाहींपणें तेथें हरपलें नभ ॥ २ ॥ आंत बाहेर न साहे बोलणें ॥ पाहों गेलों तों विरालें पाहणें ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं अभिनव कोटी ॥ तेणें बिंबेसी पडली मिठी ॥ ४ ॥

॥ १७९० ॥ आजी उत्तम सुदीन ॥ झालें संताचें दर्शन ॥ १ ॥ पाप ताप दैन्य गेलें ॥ संत पाउलें पाहतां ॥ २ ॥ अवघा यत्न फळा आला ॥ अवघा झाला आनंद ॥ ३ ॥ अवघें कर्म सुकर्म झालें ॥ अवघे भेटले संतजन ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं बरा ॥ संतसमागम खरा ॥ ५ ॥

॥ १७९१ ॥ काळानें ग्रासिलें सावधान व्हारे ॥ सोडवण करारे हरीनामें ॥ १ ॥ आयुष्य सरलिया कोण पां सांगाती ॥ पुढें हो फजिती यमदंड ॥ २ ॥ उपाय तो सोपा नामाचा गजर ॥ न करी विचार आन कांहीं ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं कांरे तूं आंधळा ॥ देखतोसी डोळां सुखदुःख ॥ ४ ॥

॥ १७९२ ॥ जयजयाजी देवाधिदेवा ॥ पंढरिरावा श्रीविठ्ठला ॥ १ ॥

येऊनिया हृदयीं वसा ॥ मागणें सहसा दुजें नाहीं ॥ २ ॥ भुक्तिमुक्ति नको कांहीं ॥ लिगाड तेंही मज आतां ॥ ३ ॥ भाळीभोळी घ्यावी सेवा ॥ हीची देवा विनवणी ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं तुमचा दास ॥ साची आस पायापें ॥ ५ ॥

॥ १७९३ ॥ सर्पं धांवोनि धरिल्या तोंडीं ॥ सर्वांगा घालितसे वेढी ॥ १ ॥ सर्पबाधेची सांकडी ॥ निवारी मंत्रवादी गारुडी ॥ २ ॥ रिघतां सद्गुरुसी शरण ॥ जैसें निरसें जन्ममरण ॥ ३ ॥ संसार सर्प मिथ्या देहीं ॥ एकाजनार्दनीं सदां ध्याई ॥ ४ ॥

॥ १७९४ ॥ कपींद्रा सुखी आहे कीं ॥ षड्गुण तरु हा राम ॥ धृ० ॥ कनक कुरंग पाठीं श्रमले ॥ प्रभु सर्वज्ञ काम ॥ १ ॥ मज विरहित त्या निद्रा कैची ॥ अखिल लोकाभिराम ॥ २ ॥ सौमित्रा दुर्वाक्यें छळिलें ॥ त्याचा हा परिणाम ॥ ३ ॥ त्र्यंबक भंगी एकाजनार्दन ॥ करिती विबुध प्रणाम ॥ ४ ॥

॥ १७९५ ॥ रामनामें जो धरी भाव ॥ तया सुलभ उपाव ॥ नामस्मरणीं जीव ॥ सदोदीत जयाचा ॥ १ ॥ तेणें साधिलें साधन ॥ अभ्यासिला हो पवन ॥ अष्टांग योग साधून ॥ लय लक्ष दिधलें ॥ २ ॥ योगयाग कसवटी ॥ अभ्यासिल्या चौसष्टी ॥ हृदयीं चिदानंद राहटी ॥ रामनामें ॥ ३ ॥ ध्यानधारणा मंत्रतंत्र ॥ अवघा श्रीराम पवित्र ॥ एकाजनार्दनीं सतत ॥ जपे वक्त्रीं ॥ ४ ॥

॥ १७९६ ॥ छाया पैं वृक्षाची बैसतां सुख ॥ तैसा संसार देख प्राणीमात्रा ॥ १ ॥ गुंडती बळें गुंडती बळें ॥ माझें माझें सळें काळतोंडें ॥ २ ॥ असतां बरवी करिती आणिक सेवा ॥ आवडलीया देवा धांवे ह्मणती ॥ ३ ॥ ऐसा काळतोंडा जनीं जाला वेडा ॥ एकाजनार्दनीं रेडा पशुजन्मीं ॥ ४ ॥

---

## ध्यान प्रकार.

॥ १७९७ ॥ अवलोकितां रामराणा ॥ धणी न पुरे मन नयना ॥ १ ॥ पहातां नयन लाधले ॥ सुरवर वानर बोधले ॥ २ ॥ भरत राम आलिंगनीं ॥ रामीं हारपले दोन्ही ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं काज ॥ एकछत्रीं रामराज्य ॥ ४ ॥

॥ १७९८ ॥ लोह परिसासी झगटे ॥ मग काळिमा कैंची भेटे ॥ १ ॥ तैसें विनटों रामनामा ॥ पहिलेंपण कैंचें आह्मां ॥ २ ॥ गंगा मिनली सागरीं ॥ ती परतेना ब्रह्मगिरीं ॥ ३ ॥ नीच रतली रायासी ॥ तिसी कोण ह्मणेल दासी ॥ ४ ॥ हरिभक्तांचे संगती ॥ अभक्तांही उपजे भक्ती ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं भेटी ॥ चौं देहांची सुटे गांठी ॥ ६ ॥

॥ १७९९ ॥ चरणरज लागुनी उद्धरली अहिल्या बाळा ॥ रामा तुझेनि प्रतापें तरली भवसागरीं शिळा ॥ १ ॥ जय जय राम रामा शामा भवभंजन नांवें ॥ तुझें रूप ध्यातां उमाशिव निवे ॥ २ ॥ रामनामें कळिकाळ कांपती सदां ॥ रामनामें गणिका नेली निजपदा ॥ ३ ॥ रामनामें उद्धरले सुरनर वानर ॥ एकाजनार्दनीं सदां समाधि स्थिर ॥ ४ ॥

॥ १८०० ॥ जया संतचरणीं नाहीं विश्वास ॥ धिक् त्यास वास यमपुरीं ॥ १ ॥ संतचरणीं. मन ठेवारे निश्चळ ॥ करुणा उतावेळ भाका. त्यासी ॥ २ ॥ घाला लोटांगण वंदूं पां चरण ॥ तेणें समाधान होईल मना ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं सत्संगावांचुनी ॥ तरला तो कोण्ही मज सांगा ॥ ४ ॥

॥ १८०१ ॥ नरदेह श्रेष्ठ परम पावन ॥ पावोन न करी संतसेवन ॥ १ ॥ ऐसिया नराप्रती जाणा ॥ यम यातना करीतसे ॥ २ ॥ अपरोक्ष ज्ञान कसवटी ॥ संताविण नये पोटीं ॥ ३ ॥ जैसा अंधारीं खद्योत ॥ तैसा संताविण नर देह प्राप्त ॥ ४ ॥ मनीं विषयाचा अभिलाष ॥ कोण सोडवी तयास ॥ ५ ॥ जनार्दनाचा एका ह्मणे ॥ संतापायीं देह ठेवणें ॥ ६ ॥

॥ १८०२ ॥ विषयप्राप्तीलागीं जाण ॥ धरी बकापरी ध्यान ॥ १ ॥ विषयीक गायन करी ॥ जैसा खर भुंके खरी ॥ २ ॥ नाहीं संतचरणीं मन ॥ सदां विषयावरी ध्यान ॥ ३ ॥ विषय लोटी परता होई ॥ एकाजनार्दन पायीं ॥ ४ ॥

॥ १८०३ ॥ पोट भरावया भांड ॥ जैसा वडबडी तोंड ॥ १ ॥ तेविं विषयालागीं जाण ॥ शास्त्र व्युत्पत्ति श्रवण ॥ २ ॥ विषयवासना धरुनी थोर ॥ दावी वरवर आचार ॥ ३ ॥ जेविं कागविष्टा देखे ॥ तेविं विषय देखोनी पोखे ॥ ४ ॥ ह्मणे जनार्दनाचा एका ॥ सुटिका नोहे तया देखा ॥ ५ ॥

॥ १८०४ ॥ मेघदर्शनें मयूर नाचती ॥ चंद्रदर्शनें चकोर सुखावती ॥ १ ॥ धेनुदर्शनें वत्सें सुखावती ॥ साधुदर्शनें जीवां आनंदवृत्ती ॥ २ ॥

सूर्यदर्शनें जीवातें सुख होय ॥ पितृदर्शनें सुपुत्रा आनंद होय ॥ ३ ॥ मातृदर्शनें कन्या सुख माने ॥ मित्रदर्शनें सुमित्रा आनंदीं ठाणें ॥ ४ ॥ या रीति सतत चिंतितां हरी ॥ एकाजनार्दनीं धन्य संसारीं ॥ ५ ॥

॥ १८०५ ॥ स्वामिदर्शनें पतिता आनंद ॥ देवदर्शनें संतोषे भक्तवृंद ॥ १ ॥ यापरी आनंद सदां मनीं हरी ॥ वांचुनी छंद दुजा नाहीं मनीं ॥ २ ॥ एकाजनार्दनीं प्रेमयुक्त छंद ॥ गीतीं गातां आवडी गोविंद ॥ ३ ॥

॥ १८०६ ॥ मागें एक पुढें एक ॥ दोनी मिळोनी विठ्ठल देख ॥ १ ॥ ऐसी होतांची मिळणी ॥ दिलें संसारासी पाणी ॥ २ ॥ एक एक पहातां दिठी ॥ होय विठ्ठलेंसी भेटी ॥ ३ ॥ एक सांडुनी दुजा नाहीं ॥ एकाजनार्दनीं ध्याई ॥ ४ ॥

॥ १८०७ ॥ दुजेपणें नको पाहूं सर्वां ठायीं ॥ एकरूप देहीं देव दिसे ॥ १ ॥ येणें सर्व काम सुगम सोपारे ॥ दुजेपणें वावरे देहबुद्धी ॥ २ ॥ मन चित्त अहंकार करणें या विचार ॥ दुजेपणें पार केवीं तरे ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं दुजेपणा सांडी ॥ विठ्ठलचि मांडी हृदयामाजीं ॥ ४ ॥

॥ १८०८ ॥ हृदयस्थ असोनी कां रे फिरसी वांया ॥ दीप आणि छाया जयापरी ॥ १ ॥ आत्मतीर्थीं सुस्नात झालिया मन ॥ आणिक साधन दुजें नाहीं ॥ २ ॥ साधन तें मन करी आपुले आधीन ॥ यापरतें कारण आन नाहीं ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं मनासी आवरी ॥ मग तूं संसारीं धन्य होसी ॥ ४ ॥

॥ १८०९ ॥ अष्टांग साधनें करिताती योगी ॥ परी मन अव्यंगी होत नाहीं ॥ १ ॥ जिंकितांचि मन साधनें साधती ॥ न जिंकितां फजिती मागें पुढें ॥ २ ॥ एकाजनार्दनीं काया वाचा मन ॥ धरूनि बंधन त्यासी करीं ॥ ३ ॥

॥ १८१० ॥ हरीचें पहातां श्रीमुख ॥ सुखावलें मन नित्य नवा हर्ष ॥ १ ॥ परम प्रिय वो श्रीहरी ॥ ध्यातां ध्यान ध्येय सर्व हरी ॥ २ ॥ एकाजनार्दनीं पहातां हरी ॥ हरिरूप दिसे चराचरीं ॥ ३ ॥

॥ १८११ ॥ अवघियासी विश्रांतिस्थान ॥ एक विठ्ठल चरण ॥ १ ॥ देह वाचा अवस्थात्रय ॥ अवघें विठ्ठलमय होय ॥ २ ॥ जागृति स्वप्न सुषुप्तीं ॥ अवघा विठ्ठलचि चित्तीं ॥ ३ ॥ जनीं वनीं विजनीं ॥ शरण एकाजनार्दनीं ॥ ४ ॥

॥ १८१२ ॥ नाभिस्थानीं ठेवा हृदयकमळीं पहावा ॥ द्विदळीं अनुभवा एकभाव ॥ १ ॥ अर्धमात्रा बिंदु पहातां मकार ॥ होउनी साचार सुखी राहे ॥ २ ॥ प्रणव ओंकारु विचार करितां ॥ बिंदूची तत्वतां सर्वगत ॥ ३ ॥ कुंडलिनी गति सहजचि राहे ॥ सहस्रदळीं पाहे आत्मरूप ॥ ४ ॥ भिन्न भिन्न नाहीं अवघेंचि स्वरूप ॥ पहातां निजरूप रूप होय ॥ ५ ॥ तेथें कैंचा विचारू कैंचां पा अनाचारू ॥ एकाजनार्दनीं साचारु सर्वांघटीं ॥ ६ ॥

॥ १८१३ ॥ मुळीं निर्विकार ब्रह्म तें निश्चळ ॥ त्यामाजीं चंचळ अहंस्फूर्ती ॥ १ ॥ तें चीज्ञप्ती कळा चिन्मात्र स्वरूप ॥ तो हरी संकल्प पुरातन ॥ २ ॥ संकल्पीं कल्पना तेंची मूळप्रकृती ॥ जन्म अव्यक्त ती माय-पोटीं ॥ ३ ॥ तेथोनी हिरण्यगर्भ तें जन्मलें ॥ तया पोटा आलें विराट पैं ॥ ४ ॥ गुण भूत देह होती माये पोटीं ॥ तत्वज्ञान पाठीं विस्तारलें ॥ ५ ॥ स्थूळापासोनिया मूळाकडे जावें ॥ सर्वसाक्षीं व्हावें स्वयं ब्रह्म ॥ ६ ॥ सद्गुरूचा तो पैं जालीया प्रसाद ॥ एकाजनार्दनीं बोध ठसावे तो ॥ ७ ॥

॥ १८१४ ॥ शुद्ध ब्रह्मज्ञानाचा धडा ॥ पंचभूतांचा खचला खडा ॥ देह चतुष्टय पुसिला वाडा ॥ धन्य धडफुडा आत्मा मी ॥ १ ॥ शुद्ध ब्रह्म ज्ञानाचा मार्ग ॥ मृत्यु पातला सरलें सर्ग ॥ पिंड ब्रह्मांडाचें दुर्ग ॥ विरोनी सर्व आत्मा मी ॥ २ ॥ ॐनमो जी जगद्गुरू ॥ सर्वां भूतीं साक्षात्कारू ॥ ब्रह्मा विष्णु महेश्वरू ॥ ॐकार तो बोळखीजे ॥ ३ ॥ अनंत ब्रह्मांडाचा टिळा ॥ लाऊनी बैसे ब्रह्मकपोला ॥ सांतही वेळा तरंग जळा ॥ वरी तेंवि ब्रह्मांड ॥ ४ ॥ ऐशा अनंत विभूती ॥ दिगंबर अंगीं चर्चिती ॥ घडीनें घडी लेप देती ॥ पुसोनी जाती क्षणक्षणा ॥ ५ ॥ तैसें नव इंद्रियां सबाह्य ॥ ब्रह्म कोंदलें अनुभव पाहे ॥ घट जळीं बुडोनी राहे ॥ ऐसा आहे दृष्टांत ॥ ६ ॥ गगन ग्रासोनी अपार ॥ तैसा मी आहें सर्वेश्वर ॥ अनंत ब्रह्मांडीं अवतार ॥ तरंग फिरे मजवरी ॥ ७ ॥ तुह्मा आह्मांमध्यें जें अव-काश ॥ तें सबाह्य ब्रह्म सावकाश ॥ अनंत ब्रह्मांडें फुटती तयास ॥ निरा भास निर्गुण ॥ ८ ॥ हें ब्रह्म हें माया ॥ कां बोट लाऊनी दाखऊं शिष्य राया ॥ आधारापासोनी सहस्रदळ काया ॥ बुडे ठाया तें ब्रह्म ॥ ९ ॥ ब्रह्म ह्मणजे भकाशे ॥ कीं ब्रह्म ह्मणजे महदाकाश ॥ कीं ब्रह्म ह्मणजे निर्गुण निराभास ॥ आदि अवकाश तें ब्रह्म ॥ १० ॥ ब्रह्म ह्मणजे तें पोकळ ॥

कीं ब्रह्म ह्मणजे आकाशाहुनी पातळ ॥ कीं ब्रह्म ह्मणजे शून्य सकळ ॥ मिथ्या मूळ तें ब्रह्म ॥ ११ ॥ सोहं नाद सर्वांसी ॥ विश्वनाथ विश्वासी ॥ अमृत फळ अंबियासी ॥ लक्ष चौऱ्याशी लोंबती ॥ १२ ॥ तैसें जनफळ जनार्दनीं लोंबे ॥ सोहं देंठ दोहींकडे झोंबे ॥ फळ दे वृक्ष लोंबे ॥ अद्वैत बिंबलें एकाजनार्दनीं ॥ १३ ॥

॥ १८१५ ॥ हें सहजचि थोरावलें ॥ पृथ्वी आप तेज झालें ॥ वायु आकाश संचलें ॥ आनंदले सकळही ॥ १ ॥ तें मोहरीयेवढें चक्र ॥ गगनीं हा निर्धार ॥ याचा पाहे पां विचार ॥ चैतन्यामाजीं ॥ २ ॥ तेथें वेदासी बोबडी ॥ अनुभवी पैलथडीं ॥ एकाजनार्दनीं गोडी ॥ नित्य घेतसे ॥ ३ ॥

॥ १८१६ ॥ आतां आह्मी सहजचि थोर ॥ ब्रह्मा विष्णु महेश्वर ॥ परब्रह्म स्वयें ॐकार ॥ परात्पर जगदात्मा ॥ १ ॥ आह्मी सहजचि स्वतः-सिद्ध ॥ जागृति सुषुप्ति साध्य ॥ तुर्या त्रिसाक्षिणीबोध ॥ अति अगाध उन्मनी ॥ २ ॥ ते उन्मनी परात्पर ॥ निर्गुण हो निराकार ॥ तुर्या तिचा आकार ॥ एकाजनार्दनीं सगुणाकार देह झाला ॥ ३ ॥

॥ १८१७ ॥ उन्मनीचा हेलावा ॥ तुर्या त्रिनयनीं दावावा ॥ त्रिगुण तुर्या सांठवावा ॥ तें कारण उन्मनी ॥ १ ॥ हातीं देऊनी बावन कस ॥ भूमंडळीं फिरवावें भलसास ॥ नाहीं लांछन हीन कसास ॥ बाळकास तेवीं तें ॥ २ ॥ एकाजनार्दनीं हा बोध ॥ उघड बोलिलों सुबोध ॥ अनुभवोनि हा बोध ॥ संतचरण धरावे ॥ ३ ॥

॥ १८१८ ॥ सत्यासत्य दोन्हीं देहींच भासत ॥ तेणेंचि नासत सर्व काम ॥ १ ॥ एकासी वंदावें एकासी निंदावें ॥ ऐसीया भावा काय सत्य तें मानावें ॥ २ ॥ देह जातो गोष्टी असत्य न बोलूं ॥ सर्वज्ञ विठ्ठलु ह्मणों आह्मी ॥ ३ ॥ सत्य असत्याची वार्ता नको देवा ॥ एकाजनार्दनीं जीवा हेंचि प्रेम ॥ ४ ॥

॥ १८१९ ॥ आसनीं भोजनीं शयनीं ॥ जो चिंती रूप मनीं ॥ १ ॥ जागृति स्वप्न आणि सुषुप्ति ॥ सदां ध्याय रूप चित्तीं ॥ २ ॥ नसे आणिके ठायीं मन ॥ एका शरण जनार्दन ॥ ३ ॥

॥ १८२० ॥ जो जो कोणी भजनीं वसे ॥ तेथें मी दिसें तैसाची ॥ १ ॥ उपासनेचा निर्वाहो ॥ सर्वांभूतीं देवाधिदेवो ॥ २ ॥ हो कां माझी प्रतिमा मूर्ति ॥ अंतर्ज्योति मी वसें ॥ ३ ॥ तेथें करितां भावें भक्ति ॥ एकाजनार्दनीं मुक्ति तयासी ॥ ४ ॥

॥ १८२१ ॥ जीऊ परमात्मा दोन्हीं ॥ ऐसे जाणते तेचि ज्ञानी ॥ १ ॥ ऐसे असोनी संपन्न ॥ सदां करिती माझें भजन ॥ २ ॥ माझ्या भजना हातीं ॥ उसंतु नाहीं दिवसरातीं ॥ ३ ॥ जन नोहे जनार्दन ॥ एकाजनार्दनीं लोटांगण ॥ ४ ॥

॥ १८२२ ॥ एका स्तुति एका निंदा ॥ करितां अंगीं आदळे बाधा ॥ १ ॥ अर्धांगीं लक्ष्मी काय वंदावी ॥ चरणींची गंगा निंदावी ॥ २ ॥ भज्य करावें भजन भजनीं ॥ निंदा स्तुति सांडोनी दोन्ही ॥ ३ ॥ तेची भक्ति निजस्थिति ॥ आवड चित्तीं भजनाची ॥ ४ ॥ वसावें सदां चरणीं मन ॥ एका शरण जनार्दन ॥ ५ ॥

॥ १८२३ ॥ स्वतःसिद्ध चरणकमळें ॥ अकृत्रिम स्वभाव युगुळें ॥ कोटिसूर्य प्रातःकाळे ॥ जेणें रंगे सुरंग ॥ १ ॥ उपमा देवो रातोत्पला ॥ तरि ते नैश्वर कळा ॥ टांचा अघटित वर्तुळा ॥ भावगम्या मिरवति ॥ २ ॥ वरिवंडु दिसताहे सांवळा ॥ तळील आरक्त कीळा ॥ नभीं इंद्रधनुष्य मेळा ॥ तैसे शोभा शोभत ॥ ३ ॥ सहज अंकुर निराळा ॥ तैशा आंगोळिया सरळा ॥ प्रभा लोपोनि शरत्काळा ॥ नखें दश चंद्र हे ॥ ४ ॥ न सांगवे गे माये॥ वाचा मौन पडे ॥ दृष्टिचे सुरवाडे॥ सुखावले ॥ ५ ॥ मन उठितां वेगीं ॥ कवळिला उगमू ॥ स्वयें पुरुषोत्तमु ॥ जाला गे माये ॥ ६ ॥ पदवंद सामुद्रिका ॥ रमा रातली चरण पियूखा ॥ पदें आरक्त कुंकुमका ॥ द्वादशार्का प्रकाशका ॥ ७ ॥ सायुज्याचा ध्वज नेटका ॥ ऊर्ध्व गती ते ऊर्ध्व रेखा ॥ स्मरणाचा अंकुश देखा ॥ भक्त सात्विका संरक्षी ॥ ॥ ८ ॥ दशोपनिषदें दशांगुळिका ॥ नित्य क्षयरोग शशांका ॥ चरणांगुष्ठ जडोनि देखा ॥ परम सुखा पावला ॥ ९ ॥ ऐसीया जाणुनि चरणार्था ॥ शिव पायवणी वंदी माथां ॥ चरणभक्ता नित्य मुक्तता ॥ परब्रह्म सायुज्यता हरिचरणीं ॥ १० ॥ कैसी घोटियाची बरव ॥ हें तंव निर्गुणीचे आवेव ॥ वान्हिया कळावयाची ठेव ॥ शोभे साजिरी ॥ ११ ॥ श्याम सागरीं

लहरी ॥ यम नेमाचिया कुसरी ॥ मनें मुरडी माघारी ॥ ते सोहं या गजरी गर्जती वांकी तैसिया ॥ १२ ॥ भवसर्गा प्रळयकाळ ॥ नावेक प्रळय घंगाळ ॥ तोडरु गर्जती केवळ ॥ सांगे सायुज्यदानि ॥ १३ ॥ सूर्यबिंबामाजी प्रभा ॥ तैसि जानुचक्रीची शोभा ॥ उरु श्यामपणें नभा ॥ व्यापुनी ठेला ॥ १४ ॥ सर्वांमाजी तोचि मध्यु ॥ शोभा शोभविताहे गोविंदु ॥ स्वानंदा आनंदु ॥ तयापायीं ॥ १५ ॥ दोंदिल जगदोदर ॥ लोक त्रिवळी सुंदर ॥ वरी सात्विकाचा मनोहर ॥ रोमरेखा ॥ १६ ॥ अनंत कटिसूत्र कटि ॥ गर्जति नाना मतें क्षुद्र घंटि ॥ जालिया स्वरूपीं भेटी ॥ अधोमुख तैसी ॥ १७ ॥ संत सहज सर्वारंभीं ॥ जैसा दक्षिणावर्त भंवरा नभीं ॥ तैसा मिरवताहे नाभीं ॥ पद्मनाभु हा ॥ १८ ॥ सावकाश सज्जना ॥ कीं विश्रामु निर्गुणां ॥ असो तें हृदय जाणा ॥ शुद्धाचें शुद्ध ॥ १९ ॥ केवळ अनुभवाची आर्ती ॥ तैसी रुळे वैजयंती ॥ चित्त लागोनि सरळ वृत्ती ॥ तेंचि आम्लान माळा ॥ २० ॥ स्वरूपीं संलग्न होउनी ॥ ठेले तैसा कौस्तुभ मणी ॥ गेले दिग्भेद लोपोनि ॥ सरळ बाहुदंडी ॥ २१ ॥ सर्व कर्तव्याची कळा ॥ न करुनी करणें त्या करकमळा ॥ मृदुपणाचा जिव्हाळा ॥ संत जाणती ॥ २२ ॥ चहुं खाणी क्रियाशक्ति ॥ तेंचि चार्‍ही भुजा शोभती ॥ पूर्ण पुरुषार्थाचीं हातीं ॥ आयुधें चारी ॥ २३ ॥ लखलखित तेजाकार ॥ निवडीत विपक्षी अहंकार ॥ तेंचि जाणा चक्र ॥ आसनासीन ॥ २४ ॥ झळफळीत गदा ॥ मोहमान करि चेंदा ॥ निःशब्दीं उठवित शब्दा ॥ तोचि शंख पैं गा ॥ २५ ॥ देखा जे उतरले प्रतीति ॥ मिनले ऐक्याचे हातीं ॥ त्यासी पूजेलागीं पहाती ॥ हृदयकमळ वो ॥ २६ ॥ सुखांचा सुखरोळ ॥ कीं साचाही कल्लोळ ॥ तैसा वदनेंदु निष्कळ ॥ तेजःपुंज ॥ २७ ॥ आनंदाचे पोगार ॥ तैसा दशन सनागर ॥ अधर जाले सधर ॥ अनन्य मिळणीं ॥ २८ ॥ निगदुनी नास्तिक ॥ अवक्र जें आस्तिक्य ॥ तेंचि मिरवे नासिक ॥ सरळ जया ॥ २९ ॥ चैतन्य विशाळ डोळे ॥ माजी चिदं तेंचि बुबुळें ॥ नित्य सकळ एके काळें ॥ देखणें सदा ॥ ३० ॥ कुंडलाच्या किर्णीं ॥ लोपोनि ठेला दिनमणी ॥ लेइला अधिष्ठान श्रवणीं ॥ तेजःपुंज ॥ ३१ ॥ पाहतां साचिया श्रवणां ॥ उरी नुरेचि मना ॥ बुद्धीचिया नयना ॥ ठक पडिले ॥ ३२ ॥ चित्त विसरलें चिंतनातें ॥ अहंकारु हरपे तेथें ॥ श्रवणेंचि सकळांतें ॥ लांचाविलें ॥ ३३ ॥ शब्दजातेंचि कान ॥

सदां असती सावधान ॥ श्रवणाचें महिमान ॥ न कळे माये ॥ ३४ ॥ सच्चिदानंद येके मेळीं ॥ तैसी ल्लाटीचि त्रिवळी ॥ बोधचंद्राचा परिमळीं ॥ चर्चित दिसे ॥ ३५ ॥ या वदनेंदूचें पीयूख ॥ सेवावया मनुष्य देख ॥ नित्य पसरुनियां मुख ॥ श्रवण चकोर जाहले ॥ ३६ ॥ झेंपावुनि सेविती सुख ॥ पसरूनि अंतिचे दोन्हि पांख ॥ तैसी भृकुटीद्वय सुरेख ॥ रोमराजीं ॥ ३७ ॥ माया अविद्येचि पांति ॥ मिथ्यापणें लवत होती ॥ तेही येउनि आत्मस्थिति ॥ तटस्थ ठेली ॥ ३८ ॥ जैशा गगनासि पारंबिया ॥ तैसे कुरळ केश तया ॥ असो किती अद्वया ॥ रूप करूं ॥ ३९ ॥ सच्चिदानंद तिन्ही ॥ नांवें आली माया घेउनी ॥ तेहि राहे जनार्दनीं ॥ आपुलेपण सांडुनियां ॥ ४० ॥ आतां सगुण निर्गुण निरुपम ॥ आह्मां अवघेंचि परब्रह्म ॥ प्रत्यक्ष मेघश्याम ॥ वोतवळला ॥ ४१ ॥ भानुदास कुळ माळे ॥ विस्मयोहि विस्मये गळे ॥ एकाजनार्दन मेळे ॥ मिळोनि ठेला ॥ ४२ ॥

॥ १८२४ ॥ साधन कांहीं नेणें मी अबला ॥ श्याम हें रूप बैसलेंसे डोळां ॥ लोपली चंद्रसूर्याची कला ॥ तो राम माझा जीवींचा जिव्हाळा ॥ १ ॥ राम हें माझें जीवींचें जीवन ॥ पाहतां मन हें जालें उन्मन ॥ ध्रु० ॥ प्रकाश दाटला दाही दिशा ॥ पुढेंही मार्ग न दिसे आकाशा ॥ खुंटली गति श्वासोछ्वासा ॥ तो राम माझा भेटेल हो कैसा ॥ २ ॥ यासी साच हो परिसा कारण ॥ एकाजनार्दनीं शरण ॥ कृपा होय परिपूर्ण ॥ तरीच साधे हें साधन ॥ ३ ॥

॥ १८२५ ॥ सुखें सांगती वैराग्यगोष्टी ॥ तेणें आवडी उठली पोटीं ॥ १ ॥ तोचि पाहों गेलों भावो ॥ वृत्ति राखताहे देवो ॥ २ ॥ शुद्ध निश्चयो जो चांग ॥ तेंचि वैराग्य पैं सांग ॥ ३ ॥ निःशेष जे निराशा ॥ तोचि वैराग्याचा ठसा ॥ ४ ॥ कामक्रोधेसी नव्हे भेटी ॥ तेंचि वैराग्य जाण सुटी ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं वैराग्य ॥ पाहों जातां हरपलें अंग ॥ ६ ॥

---

## ज्ञानप्राप्तीस वैराग्याची आवश्यकता.

॥ १८२६ ॥ तोंडभरी विवेक मनीं वाहे अभिलाख ॥ विवेक केला रंक विषयाचा ॥ १ ॥ वैराग्याविण ज्ञान बोलती तें उणें ॥ घरोघरीं पोसणे

लाविताती ॥ २ ॥ जुनाट परिपाठी सांगताहे गोष्टी ॥ विरक्तीविण पोटीं ज्ञान नेघे ॥ ३ ॥ परिसोनी ग्रंथ निरोपी ज्ञानकथा ॥ मनीं वाहे आस्था विषयांची ॥ ४ ॥ आरंभींच डाव पडियेला खोटा ॥ पचलें नाहीं पोटा रामनाम ॥ ५ ॥ धडधडीत वैराग्य वरि वाहे विवेक ॥ ज्ञानासी तो एक अधिकारी ॥ ६ ॥ वैराग्य विवेक बाणलेसे अंगीं ॥ ज्ञान तयालागीं वोसरलें ॥ ७ ॥ एकाजनार्दनीं विवेकेंशीं भेटी ॥ वैराग्याविण गोष्टी फोल होय ॥ ८ ॥

॥ १८२७ ॥ गर्भवासींचें दुःख सांगतां आटक ॥ मळ मूत्र दाथरीं जननीजठरीं अधोमुख ॥ १ ॥ शिव शिव सोहं सोहं ॥ कोहं सोहं सांडुनी पाहे निजजीवन ॥ २ ॥ गर्भवासींचें सांकडें सांगावें कवणापुढें ॥ सर्वांगीं विष्ठालेपु नाकीं तोंडीं किडे ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं भेटी तैं जन्म-मरणा तुटी ॥ जननीपयपान पुढती न करणें गोष्टी ॥ ४ ॥

॥ १८२८ ॥ शतावर्ती श्रवण अधिक पैं जालें ॥ तेणें अंगा आलें जाणतेपण ॥ १ ॥ पुराणश्रवण लौकिक प्रतिष्ठा ॥ विचारचोहटा जाणि-वेचा ॥ २ ॥ श्रवण तो लौकिक मनीं नाहीं विवेक ॥ बुद्धीसी परिपाक कैसेनी होय ॥ ३ ॥ मी एक ज्ञाता मिरवी लौकिक ॥ ह्मणोनी आक्षेपक सभेमाजीं ॥ ४ ॥ नानापरि व्यक्ति मिरवी लोकांप्रति ॥ वाढवितो महंती मानालागीं ॥ ५ ॥ मी एक स्वयंपाकी मिरवी लौकिकीं ॥ इतर कर्मासीं शुद्धि नाहीं ॥ ६ ॥ कर्माकर्मीं कांहीं न धरी कंटाळा ॥ मानीतो विटाळा ब्राह्मणाच्या ॥ ७ ॥ मजहुनी ज्ञाता आणीक तो नाहीं ॥ ऐसें जाणीवेचे डोहीं गर्वें गेला ॥ ८ ॥ नित्य पुढिलाचे गुण दोष आरोपिता ॥ श्रवणाची निष्पत्ति फळली ऐशी ॥ ९ ॥ लौकिक प्रतिष्ठा धनावरी आस्था । वरि वरी हरिकथा काय करसी ॥ १० ॥ एकाजनार्दनीं साच न रिघे मन ॥ तंववरी समाधान केविं होय ॥ ११ ॥

॥ १८२९ ॥ कनककांता नये चित्ता ॥ तोची परमार्थी पुरता ॥ १ ॥ हेंचि एक सत्यसार ॥ वांयां व्युत्पत्तीचा भार ॥ २ ॥ वाचा सत्यत्वें सोंवळी ॥ येर कविता वोवळी ॥ ३ ॥ जन तेंचि जनार्दन ॥ एकाजनार्दनीं भजन ॥ ४ ॥

॥ १८३० ॥ तुमचें नामसंकीर्तन ॥ हेंचि माझें संध्यास्नान ॥ १ ॥

तुमच्या पायाचें वंदन ॥ हेंचि माझें अनुष्ठान ॥ २ ॥ तुमच्या पायाचा साक्षेप ॥ हाचि माझा कालक्षेप ॥ ३ ॥ तुमच्या प्रेमें आली निद्रा ॥ हीच माझी ध्यानमुद्रा ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं सार ॥ ब्रह्मरूप हा संसार ॥ ५ ॥

॥ १८३१ ॥ सर्व भावें सुख असतां घेई अनुताप ॥ मग करी संकल्प भजनाचा ॥ १ ॥ ऐसा अनुताप घडतां मनासी ॥ भजन तें मुखासी येत स्वभावेंचि ॥ २ ॥ एकाजनार्दनीं अनुतापाविण ॥ भजन प्रमाण नोहे देवा ॥ ३ ॥

॥ १८३२ ॥ मुख्य ती उपासनाभक्ति ॥ ज्ञानविरक्ति तेणें जोडे ॥ १ ॥ हेंचि एक परमार्थसार ॥ आणिक विचार करूं नये ॥ २ ॥ योग याग तपतां तप ॥ न जाय संकल्प मनींचा ॥ ३ ॥ म्हणे जनार्दन एकनाथा सावध ॥ हृदयीं गोविंद आठवी सदां ॥ ४ ॥

॥ १८३३ ॥ सखीये अनुतापें वैराग्यतापें अति संतप्त ॥ नयनीं अश्रु अंगीं स्वेद रोमांच जीवीं जीव मूर्च्छित वो ॥ १ ॥ माझें मजमाजी गुरुकृपा ॥ मन तें जालें उन्मन वो ॥ देहीं देह कैसा विदेह जालें क्रिया चैतन्यघन वो ॥ २ ॥ माझें मीपण पहातां चित्तीं चित्त अचिंत वो ॥ वृत्तिनिवृत्ति तेथें चिद्रूप जाली परमानंदें तृप्त वो ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं एकत्वें जन वन समसमान एक ॥ एकपणें परिपूर्ण जाला त्रैलोक्य आनंदघन वो ॥ ४ ॥

॥ १८३४ ॥ स्थूळदेहाचा विचार ॥ हाता आलीया साचार ॥ तेथें देहअहंकार ॥ विरोन जाय ॥ १ ॥ स्थूळ ब्रह्मस्थान नेत्रीं ॥ स्थूळ भाग जागृती वैखरी ॥ हें नव्हे मी ऐसा अंतरीं ॥ बोध झाला ॥ २ ॥ मग देह मारितां तोडितां ॥ पूजीतां कां गांजीतां ॥ नसे हर्ष खेद वार्ता ॥ तया पुरुषा ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं ॥ लीन झाला संतचरणीं ॥ दर्पणामाजी बींबोनी ॥ दर्पणातीत ॥ ४ ॥

॥ १८३५ ॥ ऐसी वाढलीया सद्वासना ॥ जेथें जिराली मनाची कल्पना ॥ इंद्रियादि विषयप्राणा ॥ बोध झाला ॥ १ ॥ लिंग विष्णु स्वप्न कंठ स्थान ॥ काल्पनीक भोग जाण ॥ वाचा मध्यमा ऐसी खुण ॥ मिळोन ठेली सा पदा ॥ २ ॥ तेथें इंद्रियां उर्वसी ॥ आलीया शेजेसी ॥ जयाचीये

मानसीं ॥ काम नुठे ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं बोध ॥ अवघा झाला ब्रह्मानंद ॥ लिंगदेहाचा खेद ॥ वस्तु झाला ॥ ४ ॥

॥ १८३६ ॥ आतां कारण जें अज्ञान ॥ तेंही गेलें वोसरोन ॥ बोधाचें आसन ॥ बैसलें तेथें ॥ १ ॥ कारण रुद्रसुषुप्ती ॥ आनंदाभास हृदयप्राप्ती ॥ या समस्तांची वस्ती ॥ वस्तु झाली ॥ २ ॥ ऐसा अज्ञानपोहोट झाला ॥ ज्ञानरस पैं भरला ॥ मग सर्वांठायीं देखीला ॥ आत्मबोध ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं आत्म्याची भेटी ॥ तेथें उडाली त्रिगुण त्रिपुटी ॥ मग बोधाची रहाटी ॥ जेथें तेथें ॥ ४ ॥

॥ १८३७ ॥ महाकारण जें अज्ञान ॥ साचाही साक्षी आत्मा आपण ॥ जैसा शेजे ये अंबा मुरोन ॥ तैसा तो जाण ॥ १ ॥ ऐसी मुराली तूर्या अवस्था ॥ मग साक्षी झाला परौता ॥ तो मुरोनी वस्तुता ॥ वस्तु झाला ॥ २ ॥ ऐसी विवेकाची रावणुक ॥ विवेकें आत्मा ओळख ॥ एकाजनार्दनीं परम सुख ॥ प्राप्त झालें ॥ ३ ॥

॥ १८३८ ॥ सहज जाणावयालागीं ॥ कां शीणताती योगी ॥ सहज ते अंधाअंगीं ॥ अंग जडलें रे मना ॥ १ ॥ जनीं जनार्दन वर्तत आहे ॥ जन वन परी तो न्हे ॥ ऐसा तो पाहों नये ॥ जनासमान रे मना ॥ ध्रु० ॥ सुमनपुष्प देंठामध्यें ॥ अवघाची सुगंध ॥ गुणी गुंफीतां बद्ध ॥ न्हे रे मना ॥ २ ॥ एकाजनार्दनदेहीं ॥ असोनी तो विदेही ॥ देही विदेही ॥ एका पाहें रे मना ॥ ३ ॥

॥ १८३९ ॥ मनुष्य ब्राह्मण क्षत्री ॥ वैश्य शूद्र हे वर्ण चारी ॥ न्हें मी निर्धारी ॥ निजज्ञानें ॥ १ ॥ ब्रह्मचारी गृहस्थ ॥ संन्यासी वानप्रस्थ ॥ हे आश्रमधर्म समस्त ॥ न्हेची मी ॥ २ ॥ स्थूळ सूक्ष्म कारण ॥ महाकारणाचें ज्ञान ॥ चहूं देहांचें बंधन ॥ मज नाहीं ॥ ३ ॥ अहं सोहं दोन्ही ॥ वेगळा यांपासूनी ॥ चहूं मुद्रांचे ध्यानीं ॥ नाहीं नाहीं मी ॥ ४ ॥ या सर्वांचा जाणता ॥ विरालों पाहात पाहतां ॥ एकाजनार्दनीं तत्वता ॥ निजबोध तो मी ॥ ५ ॥

॥ १८४० ॥ वाहवा खुप बनी ॥ जोत लगी उन्मनीं ॥ १ ॥ आखेके बीच आखी ॥ वामो समाधी देखे चोखी ॥ २ ॥ नयन नयनकु देखे ॥

वामो रसनाबीन रस चाखे ॥ ३ ॥ गुरुदत्तका देना ॥ जनार्दनका बडा ठिकाणा ॥ ४ ॥

॥ १८४१ ॥ सहज समबुद्धि लाविला दोरा ॥ दोहींकडे चक्र फिरे गरगरां ॥ १ ॥ चक्र फिरे चक्र फिरे ॥ क्षणक्षणां कैसें चक्र फिरे ॥ ध्रु० ॥ अवघेची खेळूं परी येऊं नेदी आळू ॥ चक्र धरुनियां झाला चक्रपाळू ॥ २ ॥ एकाजनार्दनीं खेळ गेले करूं ॥ दुजें नाहीं मागें कोणावरी चक्र धरूं ॥ ३ ॥

॥ १८४२ ॥ कर्म तें चंचळ ब्रह्म तें निश्चळ ॥ दोहींचें निजमूळ चोजावलें ॥ १ ॥ कर्म ब्रह्म दोन्ही नाहीं रे संवादु ॥ कैसेनि गोविंदु आतुडेल ॥ २ ॥ कर्म जें करितां जयाची प्रतीति ॥ त्याची आत्मस्थिति ढळों नेणे ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं कर्म ब्रह्म एक ॥ ह्मणते नाहीं देख ह्मणावया ॥ ४ ॥

॥ १८४३ ॥ मनपवना भेटी मध्यमेचे घाटीं ॥ चित्तचैतन्या मिठी पश्यंतीघरीं ॥ १ ॥ ही सिद्धाची सिद्ध गुरुखूण । जाणे तया नमन सर्व भावें ॥ २ ॥ समाधी समबुद्धि परेपरते वेधी ॥ अनुहातनादीं तल्लिनता ॥ ३ ॥ ऊर्ध्वपंथें गमन निराळें जीवन ॥ एकनाथी अमृतपान पुरुषोत्तमीं ॥ ४ ॥

॥ १८४४ ॥ जेथें मनाची धांव पुरे ॥ बुद्धीचें जाणणें विरे ॥ चित्त हें अवचित विरे ॥ तरंगन्यायें ॥ १ ॥ इंद्रियांचा पांग मोडे ॥ तूर्येचें साक्षत्व उडे ॥ परेसहित बुडे ॥ ओंकारध्वनी ॥ २ ॥ तो निजानंद निर्गुण ॥ सर्वादि परिपूर्ण ॥ गगन हें सघन ॥ निबिड घोटे ॥ ३ ॥ पुरुषोत्तम एकनाथीं ॥ अलभ्य लाभ प्राप्ती ॥ ब्रह्मानंद जगतीं ॥ हेलावत ॥ ४ ॥

॥ १८४५ ॥ गेलिया देहाची देहअहंता ॥ मग जगही ब्रह्म स्वभावता ॥ १ ॥ तेथें साधन नलगे कांहीं ॥ जग स्वतःसिद्ध परब्रह्म पाही ॥ २ ॥ साधनें वस्तु नयेचि हाता ॥ तेथें साधन तेंचि देहअहंता ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं अनादि ॥ जेथें साधन तेंचि उपाधी ॥ ४ ॥

॥ १८४६ ॥ जंव देवयात्रेसी जावो ॥ तंव पंथचि झाला देवो ॥ १ ॥ आतां चालावें तें कैसें ॥ चालणें या रितें न दिसे ॥ २ ॥ येथुनी पाहे तेथवरीं ॥ तंव अवघाचि दिसे हरी ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं होय भेटी ॥ येण्याजाण्याच्या खुंटल्या गोष्टी ॥ ४ ॥

॥ १८४७ ॥ कामक्रोधाच्या उपडुनी पेडी ॥ तेथें कल्पना कासया काढी ॥१॥ भली भूमी शोधिली विवेकें ॥ तेथें वैराग्य राबत हरिखें ॥ २ ॥ आशातृष्णेच्या पालव्या तोडी ॥ समूळ अहंकाराचे खुंट फोडी ॥ ३ ॥ पाळी परतोनि घातली निकी ॥ एकाजनार्दनीं कवतुकीं ॥ ४ ॥

॥ १८४८ ॥ जप तप योग ज्ञान ॥ सरलें ध्येयध्यातां ध्यान ॥ १ ॥ कैचें कर्म निष्कर्म दाऊं ॥ ठोमा करुनी ब्रह्म सेवूं ॥ २ ॥ यम नियम उपाय योग ॥ तेचि झाले आमुचें अंग ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं प्रभा ॥ अवघी चैतन्याची शोभा ॥ ४ ॥

॥ १८४९ ॥ याचा बोल लटिका काल लटिका ॥ खेळ लटिका खेळतसे ॥ १ ॥ नांव लटिकें रूप लटिकें ॥ कर्म लटिकें करितसे ॥ २ ॥ दिठी लटिकी भेटी लटिकी ॥ गोष्टी लटिकी सांगतसे ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं एकु एका ॥ नांवरूप अवघा लटिका ॥ ४ ॥

---

## उद्धवास कृष्णाचा बोध.

॥ १८५० ॥ हे गतीची निजगती ॥ येणें परपुरुषाची प्राप्ती ॥ याहुनी नसे त्रिजगतीं ॥ आणिक कांहीं ॥ १ ॥ उद्धवा ययाची कारण ॥ सहज स्थिती आसन ॥ ध्वनी अंतर्गत करून ॥ ध्यान लक्षीजे ॥ २ ॥ ध्यानीं ठेविजे वृत्ती ॥ नादीं ठेविजे श्रुती ॥ मन स्वगर्भाप्रती ॥ भ्रूमध्य लक्षणें ॥ ३ ॥ ऐसे लक्षितां लक्षितां ॥ निजतेज प्रगटेल तत्वतां ॥ अणुरेणु पूर्ण भरिता ॥ दिसतील सहज ॥ ४ ॥ मुक्त मोतीये कृश मोटी ॥ तुज पाहतां दिसतील दृष्टी ॥ रौप्य तारा सदृश दृष्टी ॥ भरलीच दिसे ॥ ५ ॥ अनेक घुघुःकार तळपती ॥ कीं नक्षत्रेंचि डळमळिती ॥ कीं अतसीपुष्पें डोलती ॥ मधुरार्थ ॥ ६ ॥ कीं इंद्रनीलज्योती ॥ राघवाचे नेत्रांचे पंक्ती ॥ तेज गुंडाळे झळकती ॥ अनेकत्वें ॥ ७ ॥ क्षणक्षणा पालटोनी रूपें ॥ झळकतां विजूचि हरपे ॥ कीं ज्वाळा भासती आपआपें ॥ प्रकाशाच्या ॥ ८ ॥ चंद्र सूर्य दिसती उगवले ॥ अनेक तेज पाहसी फांकलें ॥ ऐसें जें पहिलें ॥ दृष्टीस भासे ॥ ९ ॥ तेथिचें ऐकिजे कारण ॥ प्रथम अंधःकार निबिडपण ॥ ते अष्टधा प्रकृती जाण ॥ निश्चयेंसी ॥ १० ॥ जे प्राणियां होय अवगती ॥

ते अंधःकारा पडती ॥ तया मत्स्वरूपाची प्राप्ती ॥ नव्हेचि येणे ॥ ११ ॥ सूक्ष्मपणें सुवर्ण रज तेज ॥ प्रकाश दिसेल सहज ॥ तें मूळ मायेनें गुज ॥ वोळखिजे त्वां ॥ १२ ॥ येणेंचि जीवशिव होय ॥ सूक्ष्मपणें कळोनि पाहें ॥ सर्वेंद्रिय व्यापक आहे ॥ गती तेही ॥ १३ ॥ ब्रह्मा तोचि तारारूपें ॥ विष्णू तोचि दंडकस्वरूपें ॥ अर्ध चंद्र जो रुद्ररूपें ॥ जाणिजे प्रिया ॥ १४ ॥ वर्तुळाकार तो ईश्वर ॥ ज्योती सदाशिव निर्धार ॥ अनेक आभासे सर्पाकार ॥ तो शेषशायी नारायण ॥ १५ ॥ दिसती नानातेजाचे गुंडाळे ॥ लता तरंगाकार किळे ॥ स्वरूप तें सगळें ॥ एकचि तें अनेक ॥ १६ ॥ जो कां दिसे मुक्ताकार ॥ तोचि ब्रह्मा निर्धार ॥ अनेक स्वरूपेसीं परात्पर ॥ भरूनि असे ॥ १७ ॥ तेव्हां दंडाकार दिसती ॥ तोचि विष्णू सुनिश्चिती ॥ सर्प पालनाचि स्थिती ॥ निजगती करी ॥ १८ ॥ तोचि दिसे वर्तुळाकारेसीं ॥ चक्राचक्राचे प्रदेशीं ॥ तोचि सदाशिव निश्चयेंसी ॥ वोळखें तूं ॥ १९ ॥ नाना तेजाचे गुंडाळे ॥ लता तरंगाचे किळे ॥ तोचि शेषशायी विमळे ॥ भ्रांती न करीं ॥ २० ॥ अनेक अर्धचंद्राकार ॥ तोचि जाणावा ईश्वर ॥ ज्या स्वरूपाचा पार ॥ नकळेचि कोण्हा ॥ २१ ॥ जे इंदु भास्कराचे परी भासे ॥ दृष्टी लावोनियां समरसे ॥ स्थीर करूनियां मानसें ॥ निश्चयेंसी ॥ २२ ॥ तयातें दृष्टीं खोवोनी ॥ मयूरपिच्छें सुनीळवर्णी ॥ तैसें दिसेल निजनयनीं ॥ स्वरूप एक ॥ २३ ॥ तयामध्यें खोवोनि दृष्टी ॥ तया अश्रुमध्यें होय भेटी ॥ ते येऊनियां नेत्रपुटीं ॥ होतसे स्थीर ॥ २४ ॥ सांत निजदृष्टीचा प्रवेश ॥ मग सहज उन्मनीं सौरस ॥ निजतेजांचा प्रकाश ॥ ब्रह्मस्वरूप ॥ २५ ॥ ऐसे ब्रह्मस्वरूपाची भेटी ॥ पाहतां उघडेल निजदृष्टी ॥ तों तटस्थ तेची भेटी ॥ मग कोण सांगे ॥ २६ ॥ मग तेथें ब्रह्मतेज प्रगटलें ॥ साध्य साधन खुंटलें ॥ आपआपणीयां जाहलें ॥ स्वस्वरूप ॥ २७ ॥ ऐसा मदऐश्वर्ययोग ॥ तुज सांगितला सांग ॥ हें माझें निजगुज चांग ॥ निश्चयेंसी जाणपां ॥ २८ ॥ याहोनी पाहसी तें जाण येवढें ॥ रूपाकार तें केवढें ॥ जयाचे रोमरंध्रीं घडे ॥ अनेक सृष्टी ॥ २९ ॥ उद्धवा तूं जीवाचिया जीवा ॥ हें आचरोनि प्रेमभावा ॥ हा मत्स्वरूपाचा ठेवा ॥ उघडा आहे ॥ ३० ॥ याहोनि जाणणें कांहींच नसे ॥ ते तुझीच जाण गा आण असे ॥ हें अनुभवाचे समरसें ॥ कळेल सहजीं ॥ ३१ ॥ माझा गुह्यगौप्यठेवा ॥ तुज सांगितला बा

उद्धवा ॥ स्वानंदें प्रेमभावा ॥ भोगिजे त्वां ॥ ३२ ॥ असो कोणी दैववशें ॥ श्रवण मनन निदिध्यासें ॥ ते करितां पावे मत्स्वरूपास ॥ भ्रांति न करीं ॥ ३३ ॥ कोणी अर्थाअर्थव्याजें ॥ सर्व कार्यें घडती सहजें ॥ आत्मसुख सामराज ॥ भोगिती योगिराज ॥ ३४ ॥ इति श्रीराजयोग ॥ अनुभवाचे उद्गारबोध ॥ एकाजनार्दनीं निजबोध ॥ संपूर्णमस्तु ॥ ३५ ॥

---

# मोक्षमार्ग.

॥ १८५१ ॥ अर्ध ऐकोनी स्वाधिष्ठाना वरी मणिपुरीं घेताती झटा रे ॥ चंद्रसूर्याच्या कळा बारा सोळा पवन करिती उफराहाटा रे ॥ सतरावीचें क्षीर सेवुनी शरीर काळ विवंचनेचा ताठा रे ॥ सबाह्य आत्माराम नेणती विश्राम व्यर्थ करिती देहचेष्टा रे ॥ १ ॥ ते मार्ग चुकले रे ॥ स्वहिता मुकले रे ॥ जवळींच असतां न पाहे स्वामी देहीं हेचि देहबुद्धी रे ॥ ध्रु० ॥ एक मीमांसक कर्म आचरणीं स्नान संध्या यथास्थिती ॥ दोन स्नानें जालीं तीन स्नानें जालीं अंगीं लावी विभूती ॥ पंचायतनपूजा उपवास पारणें मध्यमा नातळती ॥ आत्मज्ञानेंविण न तुटेचि बंधन गुंतले कर्माच्या पंथीं ॥ २ ॥ चाऱ्ही वेद पूर्ण आचार क्रिया नित्यनेम आचरती ॥ शिखासूत्र मंत्र त्रिकाळ पूजन व्यजन पुष्प घेती ॥ द्वादशाक्षरी जप करितां घरची चिंता नारायणा उच्चारिती ॥ आपण नारायण कीं नारायण आपण नेणोनी देह मिरविती ॥ ३ ॥ विष्णूचे उदरीं त्रिभुवन अवघें ह्मणोनी वैष्णव जाले ॥ तुळसी वृंदावन हरीचें पूजन विष्णुपदीं मिरवले ॥ हरिहरासी भेद करिताती विवाद जाणीव शाहाणीवें गेले ॥ आत्मज्ञानेंविण न तुटेचि बंधन कर्णेंविण उफणिलें ॥ ४ ॥ शिवापरतें दैवत नाहीं ह्मणोनी जंगम राहिले हाटीं ॥ शैव पशुपती रुद्राक्ष विभूती आचार्यलिंग कंठीं ॥ पाषाण पूजुनी पोवाडे करिती शस्त्र घालिताती पोटीं ॥ आत्मज्ञानेंविण न तुटेचि बंधन मरण पावले ते हटीं ॥ ५ ॥ शक्तीचे उदरीं त्रिभुवन अवघें ह्मणउनी शक्ति पूजिती ॥ अर्चन हवन कामना पूजन वांछित फळें घेती ॥ जारण मारण मोहन स्तंभन अभक्ती लाविले तंती ॥ आत्मज्ञानेंविण न तुटेचि बंधन चुकले मुक्तीच्या पंथीं ॥ ६ ॥ गोरक्षपंथा लागुनी आश्रम त्यजोनी वैराग्यवाटा ॥ षट्चक्र भेदोनी संधान

साधुनी पवन करिती उफराटा ॥ आसन ध्यान धरूनी योगी रिघाले गिरीकपाटा ॥ आत्मज्ञानेंविण न तुटेचि बंधन व्यर्थ करती देहचेष्टा ॥ ७ ॥ दरवेश काजी सयद मुल्ला पढती नित्य किताबा ॥ पांचोही बखत निमाज करती गळां घालुनी पोकळ जुंबा ॥ परमात्मादेहीं न पडे ठायीं पश्चिमे मारिती बोंबा ॥ आत्मज्ञानेंविण न तुटेचि बंधन अंतीं ह्मणती तोबा तोबा ॥ ८ ॥ भटाचार आचार मालव माथा काठी उफराटी धरिती ॥ पंचक्रोशी ध्यान पंथींचें स्मरण लक्ष चक्र उफराटें करती ॥ दरुशनें खंडिती यजन करिती वेदबाह्य आचरती ॥ आत्मज्ञानेंविण न तुटेचि बंधन विटंबिले संसारस्थिती ॥ ९ ॥ बोध करूं यालागीं क्षपणक पूजन अर्जन करिती ॥ लुंचकी कर्में वेदविरोधन वेदबाह्य आचरती ॥ जैन कर्म वस्त्र फेडोनियां नागवे ते बैसती ॥ आत्मज्ञानेंविण न तुटेचि बंधन ते चुकले निजगती रे ॥ १० ॥ सकळिकांचा वाद करिताती विवाद सकळीकां संवाद नाहीं रे ॥ अनुभवाची खूण नेणती प्राणी बुडाले अज्ञानडोहीं रे ॥ स्वकर्म आचरती मनातें आदरिती परमात्मा न पडेचि ठायीं रे ॥ एकाजनार्दनीं ह्मणे अनुभवी तो जाणे स्वयेंची ईश्वर आहे देहीं रे ॥ ११ ॥

॥ १८५२ ॥ रात्रंदिवस जप होती साठ घटिका ॥ संख्या त्याची ऐका निरनिराळी ॥ १ ॥ दिड घटिका पळें दहा निमिष दोन ॥ प्रथम तें स्थान आधारचक्र ॥ २ ॥ साडेसोळा घटिका दहा पळें लेखा ॥ निमिषें तीन देखा स्वाधिष्ठानीं ॥ ३ ॥ दहा पळें देखा घटिका साडेसोळा असती ॥ मणिपुर गणती निमिष चार ॥ ४ ॥ आणिक घटि पळें तितुकींचि पाहीं ॥ अनुहत ठायीं निमिष पांच ॥ ५ ॥ पावणेतीन घटिका दहा पळें जाणा ॥ विशुद्धींची गणना निमिष एक ॥ ६ ॥ अग्निचक्रावरी पावणेतीन घटिका ॥ दीड पळ देखा निमिष एक ॥ ७ ॥ पळें आठ घटिका अडिचाची गणती ॥ निमिष चवदा असती सहस्रदळीं ॥ ८ ॥ साहाशें ते सहस्र एकवीस होती ॥ जनार्दनप्राप्ति एका उपायें ॥ ९ ॥

॥ १८५३ ॥ परेचें जें सुख पश्यंती भोगी ॥ तोचि राजयोगी मुगुटमणी ॥ १ ॥ सिद्धाची ही खूण साधक सुख जाण ॥ सद्गुरूसी शरण रीघोनीयां ॥ २ ॥ वैखरी व्यापारी घरीं मध्यमेच्या ॥ ओंकाराच्या शिरीं वृत्ति ठेवी ॥ ३ ॥ आदिनाथ ठेवणें सिद्ध परंपरा ॥ जनार्दनीं वेव्हारा एकनाथीं ॥४॥

॥ १८५४ ॥ बुद्धि आणि मन सावध करून ॥ मग उघडीं लोचन मूळतत्त्वीं ॥ १ ॥ सद्गुरूचें दास्य करीं एका भावें ॥ काया वाचा जीवें शरण रिघा ॥ २ ॥ पंच भूतां पर प्रकृतीचा वर ॥ नामरूपविस्तार नाहीं जेथें ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं धारणा ही वळी ॥ चतुर्थ शून्यावरी चित्त यावें ॥ ४ ॥

॥ १८५५ ॥ दृश्य तो जो गिळी देखणें कवळी ॥ दृष्टी ज्याचे मेळीं समरस होय ॥ १ ॥ लक्षालक्ष भेदी निरसी उपाधी ॥ महाशून्य पदीं पैठा होय ॥ २ ॥ मन पवन गांठी संगम गोल्हाटी ॥ तूर्या औटपिठीं स्थिर करी ॥ ३ ॥ मनाचें उन्मन जनार्दनीं खूण ॥ यालागीं शरण एकनाथ ॥ ४ ॥

॥ १८५६ ॥ चंचळत्व मनाचें मोडे ॥ दृष्टीचें स्थिरत्व जोडे ॥ सहज समाधि घडे ॥ सरीस्रपेनें पाहे पां ॥ १ ॥ पवनपवनाची आटणी ॥ आसनीं दृढ दृष्टी ठेवूनी ॥ गोल्हाट भेदोनी ॥ त्रिकुटाचल मस्तकीं ॥ २ ॥ निरालंबीं विश्रांति ॥ पूर्ण एका जनार्दनस्थिति ॥ अखंड भोगिताती ॥ जनार्दनकृपें ॥ ३ ॥

॥ १८५७ ॥ सद्गुरु तोचि जाण ॥ जो अपरोक्ष सांगे ज्ञान ॥ देहत्रय निरसून ॥ परमपदीं ठेवी ॥ १ ॥ जेणें देहत्रय निरसिलें ॥ ज्ञान अग्नीमाजि जाळिलें ॥ अच्युतपद प्राप्त केलें ॥ त्यासी वेळ नाहीं ॥ २ ॥ निराकार निरामय ॥ निर्भय तें अद्वय ॥ तयामाजी लिंगदेह ॥ मरुनीयां गेलें ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं प्राप्ति ॥ जैं लिंगदेहाची होय शांति ॥ मग सायुज्यता मुक्ति ॥ पायां लागे ॥ ४ ॥

॥ १८५८ ॥ ऐसें हें वचन ऐकोन ॥ श्रोतीं केलासे प्रश्न ॥ कैसें अपरोक्ष ज्ञान ॥ सांगा मज ॥ १ ॥ हा शब्द आलोलिक ॥ श्रवणीं झालें सुख ॥ मग एकाजनार्दनाचा रंक ॥ बोलता झाला ॥ २ ॥ पंचभूतें तिन्ही गुण ॥ स्थूल सूक्ष्म कारण ॥ हें अपरोक्ष ज्ञान ॥ पंचीकरण ॥ ३ ॥ यासी जो जाणता ॥ साक्षित्वें देखता ॥ तोचि अपरोक्ष ज्ञाता ॥ जाणावा पैं ॥ ४ ॥ सोहमाचा साक्षात्कार ॥ एकाजनार्दनीं निवडोनी साचार ॥ वस्तूचें घर ॥ दाखवील ॥ ५ ॥

॥ १८५९ ॥ सोहमाची साक्षा ॥ मंत्र तोचि दीक्षा ॥ तयाची परीक्षा ॥ सांगा मज ॥ १ ॥ सोहमाचें ज्ञान निवडोनीयां खुण ॥ अनुभव मज जाण ॥ करावा जी ॥ २ ॥ ऐसें श्रोते जन ॥ विनंति करून ॥ एकाजनार्दन ॥ नमस्कारिला ॥ ३ ॥

॥ १८६० ॥ तरी सोहं नव्हे याग ॥ सोहं नव्हे त्याग ॥ आणि अष्टांग योग ॥ सोहं नोहे ॥ १ ॥ सोहं नव्हे दान ॥ सोहं नव्हे तीर्थ ॥ मंत्रादि दीक्षित ॥ सोहं नोहे ॥ २ ॥ सोहं नव्हे वारा ॥ पंचभूतांचा पसारा ॥ सोहंच्या विचारा ॥ साधु जाणती ॥ ३ ॥ एकाजनार्दनें ॥ आपण आपणासी जाणणें ॥ साक्षित्व देखणें ॥ तेंचि सोहं ॥ ४ ॥

॥ १८६१ ॥ सोहं नव्हे नाद ॥ कर्णद्वयाचा भेद ॥ लक्ष भ्रूमध्य ॥ नव्हे सोहं ॥ १ ॥ चवदा चक्रें बावन्न मातृका ॥ अकार उकार मकार ॥ यासी जाणें अर्धमात्रा ॥ तेंचि सोहं ॥ २ ॥ अधिष्ठानीं सहाशें जप ॥ स्वाधिष्ठानीं सहाशें जप ॥ तितुकें बोळखा निशेष ॥ मणीपुरीं ॥ ३ ॥ अनुहातीं सहस्र ॥ विशुद्ध अग्नी सहस्र चक्र ॥ तीन ठायीं तीन सहस्र ॥ जप होय ॥४॥ एकविस सहस्र सा शत ॥ हें अवघेंची मारुत ॥ त्यासी सोहं ह्मणत ॥ ते नाडीलें ॥ ५ ॥ एकाजनार्दन ॥ सोहं नोहे पवन ॥ पवनाचें वर्तन ॥ सोहं सत्ता ॥ ६ ॥

॥ १८६२ ॥ सोहं नव्हे प्रपंचज्ञान ॥ अंतःकरण चतुष्टय योजन ॥ इंद्रियांचें वर्तन ॥ नव्हे सोहं ॥ १ ॥ सोहं नव्हे विषयपंचक ॥ सोहं नव्हे त्रैशोधक ॥ सोहमाचा विवेक ॥ विरळाचि जाणे ॥२॥ सकार जाण माया ॥ हंकार पुरुष शिष्यमय ॥ शबल शुद्ध इये ॥ जाणावे पैं गा ॥ ३ ॥ ब्रह्मा विष्णु महेश्वर ॥ हा शबल पैं साकार ॥ शुद्ध तो हंकार ॥ ईश्वर पैं ॥ ४ ॥ स्थूळ सूक्ष्म कारण ॥ हा सकारची जाण ॥ हंकार तो महाकारण ॥ ज्ञानरूप ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं तूर्या ॥ सोहं तें दैवी माया ॥ साक्षित्वें जाण असे श्रोतीया ॥ सांगितलें ॥ ६ ॥

॥ १८६३ ॥ अभ्यासीं द्रष्टा आटला ॥ अहं सोहंचा घोट भरला ॥ साक्षित्व देखोनी विराला ॥ वस्तुमाजी ॥ १ ॥ जो जो वस्तु झाला केवळ ॥ तेंचि अंतःकरण निश्चळ ॥ त्रिगुणाची तळमळ ॥ हारपोनी गेली ॥ २ ॥

हारपलें ब्रह्मांड ॥ हारपलें पिंडांड ॥ वस्तु झाला अखंड ॥ त्यासी खंड नाहीं ॥३॥ एकाजनार्दनीं जाण ॥ द्वैत गेलें मावळोन ॥ मग वस्तुचीं परिपूर्ण ॥ भरली असे ॥ ४ ॥

॥ १८६४ ॥ या देहा अमंगळा- ॥ पासुनी आत्मा वेगळा ॥ ऐसा ज्ञानाचा डोळा ॥ प्रत्यक्ष दिसे ॥ १ ॥ ज्ञान ह्मणजे शुद्ध सत्वगुण ॥ जेथें द्वैत प्रकृतीचें अधिष्ठान ॥ जीपासाव सव्विस लक्षणें ॥ बोलिले षोडशाध्यायीं ॥ २ ॥ ते दैवीप्रकृतीचे घरीं ॥ परमात्मा राज्य करी ॥ तो जयातें अंगीकारी ॥ तो सुटला गा ॥ ३ ॥ या पुरुषाचे बेचाळीस कुळ ॥ पद पावले अढळ ॥ आत्मतत्त्वीं सकळ ॥ मिळणी आली ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं तैंचि भेटी ॥ जैं अहंभावाची सुटे गांठी ॥ तो दैवी प्रकृतीचे मुगुटीं ॥ सहजची बैसे ॥ ५ ॥

॥ १८६५ ॥ पिंडींच्या प्रळयासी सांगेन तुह्मांसी ॥ जो का या देहासी होत आहे ॥ १ ॥ पृथ्वी बोलिजे प्राणीं प्राण रंध्र ॥ परिमळ घेउनी जाये तें घर ॥२॥ मग तो नेणे सुमनाचा सुवास ॥ पृथ्वी ते अंशें जीवन मिळे ॥३॥ रसनेसी स्वाद ते जनवृंदा खाद्य ॥ जीवनाचा जो स्वाद तोचि मिळे ॥ ४ ॥ असोनियां नेत्र न देखे मंत्र ॥ नयनातें दीप्त पवन मिळे ॥ ५ ॥ नाडीचा तो त्वरीत निघोनी जाय मारुत ॥ सेवितां तो कोलीत या शुद्धी नाहीं ॥६॥ कंठाखालता काळ तो धुंडीत ॥ मेळवोनी समस्त एक करी ॥ ७ ॥ एकाजनार्दनीं मेळा जो झाला ॥ काळ घेउनी गेला लिंगदेहा ॥ ८ ॥

॥ १८६६ ॥ आतां उरलें तें मत ॥ तेथें वस्तु सदोदीत ॥ त्यासी नाहीं अंत ॥ कवणे काळीं ॥ १ ॥ महाकारण शरीर ॥ ज्याचा अभिमानी ईश्वर ॥ मूर्ध्नीं तें घर ॥ ब्रह्मांडीचें ॥ २ ॥ तेथें नाहीं काळ ॥ त्यासी नाहीं वेळ ॥ उत्तम स्थळ ॥ पवित्र असे ॥ ३ ॥ प्रभा आणि ज्योती ॥ रत्न आणि दीप्ती ॥ किरण आणि गभस्ती ॥ एकरूप ॥ ४ ॥ तैसी वस्तु आणि ईश्वर ॥ एक पैं प्रकार ॥ पृथ्वी अंबर ॥ दोन्ही एक ॥ ५ ॥ तैशा शरीरा ज्योती ॥ आदी मध्य अंतीं ॥ वस्तु ते तत्वार्थीं ॥ भरली असे ॥ ६ ॥ देह जावो अथवा राहो ॥ आह्मी वस्तुचि आहों ॥ एकाजनार्दनीं भावो ॥ दृढ जालीया ॥ ७ ॥

॥ १८६७ ॥ मृत्तिका आणि अग्न ॥ देहासी दहन ॥ वस्तु तें व्यापून ॥ घेतलीं दोनी ॥ १ ॥ अग्नीमाजी अग्निरूप ॥ मृत्तिकामाजी मृत्तिकारूप ॥ जैसें आपीं आप ॥ मिळोनी गेलें ॥ २ ॥ वस्तु नाहीं एकदेशी ॥ ते सर्वत्र समरसीं ॥ जयाचे प्रकाशीं ॥ त्रैलोक्य वर्ते ॥ ३ ॥ तैसें मेले आणि जीत ॥ हें अज्ञान भासत ॥ ते वस्तुते नांदत ॥ दोहींमाजी ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं ॥ विचारुनी ज्ञानी ॥ संशयापासोनी ॥ मुक्त जाले ॥ ५ ॥

॥ १८६८ ॥ साक्षत्वें जीत ॥ त्याचा होय अंत ॥ विचारें मुरत ॥ वस्तुमाजी ॥ १ ॥ पिंडींचे ते दोन्ही ॥ ब्रह्मांडींचे दोन्ही ॥ हे प्रळय पुराणीं ॥ बोलिलेती ॥ २ ॥ प्रळय आत्यंतिक ॥ जेथें संहारत ॥ विवेक आपणचि येत ॥ सर्वांठायीं ॥ ३ ॥ मग प्रचित सहज ॥ बरवें वाईट बोज ॥ निफजे तेथें दुजें ॥ भाव नाहीं ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं भला ॥ आपणची ईश्वर झाला ॥ तो भरुनी उरला ॥ साक्षत्वेंसी ॥ ५ ॥

॥ १८६९ ॥ छत्तिसांतील चेतना ॥ तोची पुरुष जाणा ॥ हेंची निवडुनी अर्जुना ॥ सांगितलें ॥ १ ॥ तेची दैवीप्रकृती माया ॥ तेची बोध आणि तुर्या ॥ ऐसें धनंजया ॥ सांगितलें ॥ २ ॥ तेची ॐकार अर्धमात्रा ॥ तेची महाकारण जाणा परा ॥ एकाजनार्दनीं सारा ॥ निवाडा केला ॥ ३ ॥

॥ १८७० ॥ ब्रह्मज्ञानाचा क्षण ॥ विचारी ज्याचें मन ॥ त्याचीं महत्पापें जळोन ॥ गेलीं स्वयें ॥ १ ॥ गंगादि सप्त सागर ॥ पुष्करादि तीर्थें अपार ॥ व्रतादि पवित्र ॥ पर्वकाळ जे ॥ २ ॥ वेद शास्त्र पुराण ॥ त्यासी घडलें श्रवण ॥ अश्वमेधादीक यज्ञ ॥ केले जेणें ॥ ३ ॥ मेरुसमान सुवर्ण ॥ अनर्घ्य रत्न मेळवोनी ॥ भरुनी दिधली मेदिनी ॥ ब्राह्मणासी ॥ ४ ॥ कामधेनूच्या थाटी ॥ कल्पतरु कोट्यानकोटी ॥ कौस्तुभादि सृष्टी ॥ दिधली तेणें ॥ ५ ॥ अमृतासमान ॥ तेणें दिधलें अन्न ॥ त्रैलोकींचे ब्राह्मण ॥ तृप्त केले ॥ ६ ॥ सत्य कैलास वैकुंठ ॥ सप्त पाताळादि श्रेष्ठ ॥ गरुडादि वरिष्ठ ॥ दिधलीं वहनें ॥ ७ ॥ ऐसें एक क्षणें प्राप्त ॥ ज्याचें सोहंध्यानीं चित्त ॥ तयासी सुकृत ॥ इतुकें जोडे ॥ ८ ॥ जो अहोरात्र मनीं ॥ ब्रह्मज्ञानचिंतनीं ॥ एकाजनार्दनीं ॥ तोची वंदा ॥ ९ ॥

॥ १८७१ ॥ असोनी कुळींचा हीन ॥ परी ज्यासी ब्रह्मज्ञान ॥ त्यासी

तिन्ही देवादि सुरगण ॥ वंदिताती ॥ १ ॥ त्याची मृत्युलोकीं सेवा ॥ जयासी घडे सदैवा ॥ मा ब्राह्मण भूदेवा ॥ असंख्य पुण्य जोडे ॥ २ ॥ तयासी वस्त्र अन्न ॥ जठर करीती तृप्त जाण ॥ त्यासी वैकुंठादि आंदण ॥ देव देतो ॥ ३ ॥ त्यासी जो करी शीतळ ॥ त्यासी पुण्य जोडे सकळ ॥ एकाजनार्दनीं केवळ ॥ तोचि साधु ॥ ४ ॥

॥ १८७२ ॥ लक्ष गांवें तरणी ॥ पृथ्वी व्यापी निजकिरणीं ॥ तो साक्षी अलिप्तपणीं ॥ जेथींच्या तेथें ॥ १ ॥ तैसा आत्मा देहीं ॥ ह्मणती त्यासी ज्ञान नाहीं ॥ तो व्यापुनी सर्वांठायीं ॥ साक्षत्वें असे ॥ २ ॥ सद्गुरुमुखींचा विचार ॥ जयासी झाला साक्षात्कार ॥ उदेला रानभास्कर ॥ अज्ञान-तिमिरीं ॥ ३ ॥ हिरवा पिंवळा ॥ संगें रंग जाला निळा ॥ स्फटिक यावे-गळा ॥ आत्मा तैसा ॥ ४ ॥ तैसी ज्ञानकिल्ली ॥ जयाचे हाता आली ॥ तयानें उगविलीं ॥ अज्ञानकुलुपें ॥ ५ ॥ एकाजनार्दनाचा रंक ॥ त्याचे बोधें कळला विवेक ॥ पूर्ण बोधाचा अर्क ॥ उदया आला ॥ ६ ॥

॥ १८७३ ॥ नेत्रींची बाहुली वस्तुरूप झाली ॥ पहातां सोहंमेळीं चिदा-नंद ॥ १ ॥ अर्धमात्रा स्थान नयनींचें निधान ॥ मसुरेप्रमाण महावर्ण तेथें ॥ २ ॥ सुषुम्ना कुंडलिनी कासीया सांगाती ॥ नयनींच निश्चितीं बिंदु-रूप ॥ ३ ॥ सर्वगत डोळा ती जगामाझारी ॥ जगाचीया हारी डोळिया-माजी ॥ ४ ॥ दाखवी संपूर्ण स्वामी जनार्दन ॥ एकाएकपण नाहीं जेथें ॥ ५ ॥

॥ १८७४ ॥ ब्राह्मण क्षत्रिय वैश्य शूद्र वर्ण चारी ॥ हें स्थान मान निर्धारी तो मी ॥ १ ॥ ब्रह्मचारी गृहस्थ संन्यासी वानप्रस्थ ॥ आश्रमधर्म समस्त नव्हें मी ॥ २ ॥ बावन्न मात्रा चौदा चक्रें सहा शत एकविस हजार ॥ स्थान मान पवित्र नाहीं मज ॥ ३ ॥ स्थूळ सूक्ष्म कारण महाकारणाचें ज्ञान ॥ चहूं देहांचें बंधन नाहीं मज ॥ ४ ॥ कोहं सोहं दोन्ही वेगळा यांपा-सुनी ॥ चहूं मुद्रेचे ध्यानीं नाहीं गा मी ॥ ५ ॥ या सकळांतें जाणता विरळा पैं पाहातां ॥ एकाजनार्दनीं तत्त्वता निजबोध तो मी ॥ ६ ॥

॥ १८७५ ॥ माझ्या देहाचें देहपण ॥ नागविता नारायण ॥ १ ॥ माझें मीपण पाडिलें वोस ॥ वांयां कां मज ठेविला दोष ॥ २ ॥ जेथें मीपण

जालें वाव ॥ तेथें करतेपणाचा ठाव ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं अभिमान ॥ सांडोनीयां झाला लीन ॥ ४ ॥

॥ १८७६ ॥ त्रैलोक्याचा स्वामी जनार्दन ॥ केला व्यापार त्यापासून ॥ ॥ १ ॥ मोठा लागला व्यापार ॥ रामनाम निरंतर ॥ २ ॥ सोहंकर्जखत दिधलें ॥ तें म्यां मस्तकीं वंदिलें ॥ ३ ॥ महा प्रेमाचीं लुगडीं दिधलीं ॥ निजमुक्तपणें प्राप्त जालीं ॥ ४ ॥ अनुभवाची तहसील समस्त ॥ स्वामीस करुणा पाठविली रिस्त ॥ ५ ॥ धर्मखर्डा जमा ॥ खर्चीं घातलें पूर्ण कर्मा ॥ ६ ॥ संतांसंगें वसूल बाकी ॥ भक्ताहुनी अति नेटकी ॥ ७ ॥ कैवल्यपुरीं बांधलें तोरण ॥ चैतन्यचावडीं बैसलों जाण ॥ ८ ॥ ऐसा व्यापार सिद्ध झाला ॥ एकाजनार्दनीं केला ॥ ९ ॥

॥ १८७७ ॥ जेथें सत्वाचें प्राधान्य ॥ जेथें सात्विकाचें आचरण ॥ तो परलोक साधून ॥ साधुनी गेला ॥ १ ॥ जेथें रजाचें प्राधान्य ॥ त्याचें लोभीं वसे मन ॥ ज्ञान सांगे मुख्य करून ॥ परी निष्ठा नाहीं ॥ २ ॥ जेथें प्राधान्य तामस ॥ तो द्वेषी आणि कर्कश ॥ ज्ञान सांगे अपरोक्ष ॥ परी अंतरीं कठिण ॥ ३ ॥ जेथें प्राधान्य तुर्या ॥ तेथें सत्व शांति दया ॥ विवेक वैराग्य करुनीयां ॥ सर्वांसी भजे ॥ ४ ॥ जो वस्तु झाला केवळ ॥ त्याचें अंतर केवळ ॥ भूतमात्रीं दयाळ ॥ सर्वांपरीं भजत ॥ ५ ॥ जेथें रजतम वसती ॥ तेथें द्वेष लोभ नांदती ॥ त्याचे संगें ज्ञानज्योती ॥ विझोनी जाये ॥ ६ ॥ एकाजनार्दनीं शरण ॥ जेथें शुद्ध सत्वाचें प्राधान्य ॥ तो वस्तुसी जाय मिळोन ॥ सहजीं सहज ॥ ७ ॥

॥ १८७८ ॥ ज्याशीं आत्मलाभ झाला ॥ त्याचा देह प्रारब्धें वर्तला ॥ काया वाचा मनें आपुला ॥ व्यापार करताती ॥ १ ॥ हातें हाणितलें तोंडावरी ॥ तेथें इंद्र अग्नि झुंझारी ॥ पैशून्य बोले परस्परीं ॥ अग्नीसी इंद्र ॥ २ ॥ हात नमस्कारी चरण ॥ तेथें सुसरीते झालें इंद्रिय मन ॥ हाता त्वचेंसी केलें मर्दन ॥ तो वामन वायु ॥ ३ ॥ शिश्न मुखामाजी मुतती ॥ तेथें भांडती वरुण प्रजापति ॥ तेथें नैर्ऋत्य वसती ॥ अश्विनीदेवो ॥ ४ ॥ कीं मुखीं गाळीमदान ॥ तें ऐको पैं श्रवण ॥ तेथें दिशा आणि अग्न ॥ भांडती पैं ॥ ५ ॥ कीं तापलें नेत्रींचे पाती ॥ तेजें सूर्यासूर्य भांडती ॥

ऐसें इंद्रियें वर्तती ॥ आप आपुले परी ॥ ६ ॥ ऐसा विवेक ज्यासी कळला ॥ त्याचा काम क्रोध भस्म झाला ॥ तेणें शांतीचा रोंविला ॥ ध्वजस्तंभु ॥ ७ ॥ त्याचा विवेक करुनी ॥ तो वर्ते जनीं वनीं ॥ परी आत्मसुखाचा धनी ॥ झाला तोची एक ॥ ८ ॥ एका जनार्दनें या विवेकें ॥ राज्य केलें भीष्में जनकें ॥ भिक्षुका आत्मसुखें ॥ पावलें तेणें ॥ ९ ॥

॥ १८७९ ॥ लोह तांबें सोनें ॥ रुपें माती पाषाण ॥ दवाळीं भिन्न भिन्न ॥ निर्मित होती ॥ १ ॥ वाती स्नेह भरती ॥ पदार्थ वेगळे दिसती ॥ परी तयामाजी ज्योती ॥ असे एकरूप ॥ २ ॥ तैसे अठरा वर्ण ॥ अंसजादि ब्राह्मण ॥ मेरू मशक धरून ॥ भरले जीव ॥ ३ ॥ यांचें शरीर भिन्न ॥ आत्मा एक परिपूर्ण ॥ नाम रूप जाती वर्ण ॥ नाहीं तेथें ॥ ४ ॥ आत्मा स्वयंप्रकाश ज्योति ॥ जे ज्योती ती तुर्या ह्मणती ॥ ती तुर्या ज्ञानशक्ति ॥ ईश्वराची असे ॥ ५ ॥ एका जनार्दनीं शरण ॥ उजळलें आत्मज्ञान ॥ पदार्थ जाती जळून ॥ क्षणमात्रें ॥ ६ ॥

॥ १८८० ॥ जैशी फांशाची गति पडे ॥ तैसा सोंगटीं डाव पडे ॥ त्याचें कर्तृत्व वाडें ॥ फाशाधीन ॥ १ ॥ झाला देखणा परी ॥ उगला वर्तू लागे शरीरीं ॥ तैसी शक्ति ईश्वरीं ॥ भूतें चळती ॥ २ ॥ अदृश्य गतीनें वर्तती ॥ तेथें ईश्वराची शबल शक्ति ॥ तेथें आणिकांची मति ॥ कांहीं न चाले ॥ ३ ॥ यालागीं प्राचीनाधीन ॥ ब्रह्मा विष्णु रुद्र पूर्ण ॥ यांचे कार्यभूत जाण ॥ सृष्ट्यादिक ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं जाण ॥ बाधक अदृश्य शक्ति जाण ॥ जैसें ज्याचें प्राचीन ॥ तैसे ते वर्तती ॥ ५ ॥

॥ १८८१ ॥ ऐशी मी मी करितां ॥ अज्ञानाची अहंता ॥ तेव्हां तैसी ईश्वरसत्ता ॥ वर्तू लागे ॥ १ ॥ सज्ञान अज्ञान ॥ दोघें अदृष्टाधीन ॥ साधुत्वें वर्ते सज्ञान ॥ अज्ञानी अहंकर्ता ॥ २ ॥ अदृष्टाधीन देह ॥ सांत ज्ञान मुरुनी जाय ॥ मग द्रष्टा होउनी पाहे ॥ जग ब्रह्मरूप ॥ ३ ॥ तेथें निंदा आणि स्तवन ॥ हरपले दोष गुण ॥ ऐसें एकाजनार्दन ॥ सांगतसे ॥ ४ ॥

॥ १८८२ ॥ देहाची समाधि घ्यावी तीन वेळां ॥ आपुली जीवनकळा साधावी पैं ॥ १ ॥ कर्णीं घालोनी बोटें अंगोळ्या नयन तगटे ॥

विकाश सुभटे शुभ्रवर्ण ॥ २ ॥ तयाचें हें नाम बिंब जीवदशा ॥ तेणें रूपदशा मारुनी येती ॥ ३ ॥ तितुक्यामध्यें भाव न सोडी समाधि ॥ साचे पुढें शोधी गुरुपुत्रा ॥ ४ ॥ स्वामीनें पुशिलें कैसें काय जालें ॥ आत्मरूप पाहिलें कैशापरी ॥ ५ ॥ शिष्य ह्मणे स्वामी धरितां कान डोळे ॥ एकाएकीं उमाळे आदित्याचें ॥ ६ ॥ विकसिलें निर्मळ जैसा चंद्र दिसे ॥ येणें न्यायें प्रकाशे आत्माराम ॥ ७ ॥ ह्मणे जनार्दन नव्हे एकनाथा ॥ समाधि पाहतां आळस केला ॥ ८ ॥

॥ १८८३ ॥ शिष्य ह्मणे स्वामी पुढें कैसें पहावें ॥ रिघत पैं जावें अभ्यासातें ॥ १ ॥ स्वामी ह्मणती पुन्हा समाधी देईं बापा ॥ तुझीया संकल्पा निववितों ॥ २ ॥ ऐसी जे कां तुझी भावना तुटली ॥ आह्मीं नाहीं चोरिली समाधि तुला ॥ ३ ॥ प्रथम विकाश पहातां शुभ्र वर्ण ॥ त्यापुढें चांदणें लखलखित ॥ ४ ॥ सूर्यतारांगणें प्रकाश जयाचा ॥ पुढें शोध तयाचा करीत जावा ॥ ५ ॥ बैसावें निश्चळ त्याचे अग्रीं डोळा ॥ हंसअंगींचा डोळा जेवीं बापा ॥ ६ ॥ त्यामध्यें रिघावें स्वरूप पहावें ॥ परी हे समाधि जीवें सोडूं नये ॥ ७ ॥ ह्मणे जनार्दन त्या पोटीं रिघावें ॥ एकनाथा पाहें आत्मरूप ॥ ८ ॥

॥ १८८४ ॥ मन एकाग्र प्रतीति निश्चळ मध्य रात्रीं ॥ गुरु खुण एकांतीं रिघत जाय ॥ १ ॥ हंसअंगींचा डोळा विकासुनी कमळ ॥ तयाचीये स्थळा हेरीत जाये ॥ २ ॥ चिन्मय अविनाश प्रगटती ज्योती ॥ तोचि प्राणनाथी या देहाचा ॥ ३ ॥ त्यापुढें अभ्यास दिसे निवळपणें ॥ तैसें रूप जाणें विराटाचें ॥ ४ ॥ ब्रह्मांडीं जें असे तेंची पिंडीं दिसे ॥ बोलायाचा भास नाहीं पुढें ॥ ५ ॥ त्यापुढें समाधि दुजी सांगे कोण ॥ त्या होय पतन निश्चयो वेदीं ॥ ६ ॥ ह्मणे जनार्दन एकनाथा पाहीं पाहीं ॥ हेंचि भरुनी घेई कोहं सोहं ॥ ७ ॥

॥ १८८५ ॥ चार मुद्रा आणि समाधी त्या चारी ॥ दिसती चक्राकारी स्वरूप हें ॥ १ ॥ चहुं समाधींचें पाहीं हें देखणें ॥ विकळतां तेणें सहजीं व्हावी ॥ २ ॥ जिकडे पहातां तिकडे स्वरूपचि दिसे ॥ तयामाजीं ठसे आणिक बिंब ॥ ३ ॥ मसूरप्रमाण शून्य महा तें कारण ॥ गुरुमुखें खुण

जाणावीं पैं ॥ ४ ॥ साचार स्वरूपाची मेळवणी केली ॥ परात्पर ठेली हेची ज्योती ॥ ५ ॥ त्याच वस्तुसाठीं भांडती पुराणें ॥ वेद शास्त्रें तेथें मौनावलीं ॥ ६ ॥ गुह्य हें पंचक देखोनी समाधि ॥ बोलोनीयां वेदीं निश्चयो केला ॥ ७ ॥ एकाजनार्दनीं स्वरूप उरलें पाही ॥ द्वैत गेलें पायीं सद्गुरूच्या ॥ ८ ॥

॥ १८८६ ॥ दुबार बाहुली वस्तुरूप झाली ॥ पहातां सोहंमेळीं चिदानंद ॥ १ ॥ अर्ध मात्रा स्थान नयनींच प्रमाण ॥ मसुरेसमान हा वर्ण जेथें ॥ २ ॥ सुषुम्ना कुंडलनी कासीया सांगा तिनी ॥ निश्चिती ते नयनीं बिंदुरूप ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं पाहे डोळियाभितरीं ॥ सबाह्य अभ्यंतरीं बरीच दिसे ॥ ४ ॥

---

## समाधिप्रकरण.

॥ १८८७ ॥ उदयेचे तीन द्वितीयेचे तीन ॥ अविनाश देखणें संध्याकाळीं ॥ १ ॥ संध्याकाळीं भावना टाकूनियां द्यावी ॥ तेणेंची हो ध्यावी समाधि सुखें ॥ २ ॥ एक एक चक्रें आकाशाएवढीं ॥ त्यांमध्यें चौकडी मोतीयांची ॥ ३ ॥ मणीयांची ज्योती संध्याकाळीं वाती ॥ तेलाविण दीप्ति पाजळिल्या ॥ ४ ॥ जनार्दन ह्मणे एकनाथा येई ॥ समाधी हे पायीं सद्गुरूच्या ॥ ५ ॥

॥ १८८८ ॥ रुणझुण रुणझुण बाजे तंते नादें निनाद गर्जे ॥ त्रिशून्य शून्य आसना लागा तो अनुहत सिंगी बाजे ॥ १ ॥ तुरारे तुरारे देखि चारी बधुनी ध्याजे ॥ नाद ना बिंदु कळा ना ज्योती ते परी आसन माढो ॥ २ ॥ झिरमिर झिरमिर सते अहर्निशीं बरसे धारा ॥ तेणें जळें भव शून्य गळालें डुबगया अहंकारा ॥ ३ ॥ तुटि बाळी छुटी अच्युत भय भागी ॥ अंग संग त्याग भागे अखंड समाधी लागी ॥ ४ ॥ नाद भय ले रूपी रूप अरूपा ॥ जनार्दन पुता अभिनव निजी निज स्वरूपा ॥ ५ ॥

॥ १८८९ ॥ पिंडब्रह्मांड चुला करी ऊर्ध्व मंडळी भली भटि लगाई ॥ गुरुज्ञान निज चकमक ब्रह्मअग्नि जगाई ॥ विषयपंचक इंधनबळें रसुपाका

भाई ॥ इच्छापत्र परिपूर्ण भरिगया सुखस्वाद लो रसना बीन पाई ॥ १ ॥ भगवी माई मधु पिवे देखो कर्णकुमारी ॥ शब्द बिन ध्वनि घुमघुमे अनुहात लोबाजे सहज माझारि ॥ ध्रु० ॥ पुण्यगिरी मेरूशिखरीं लागी अखंड धार ॥ शसी सुरा दोउ मुदिले मध्यमे येरझार ॥ तेणें पंथें रस उतरे भरे नवहि द्वार ॥ वंकनाळे रस पिवतें निराहारिणी बाळा जोगिणी नार ॥ २ ॥ मधुमदें मदन भुलिगया बिसरे निजकाम ॥ बिनरोधें पवन रुंधिला चित्त सहजें सम ॥ शब्दब्रह्म पशुंबरी खाये धर्माधर्म ॥ रसमद उन्मत भय गया न गणे कर्माकर्म ॥ ३ ॥ तेणें मदें मरण मरिगया जरा भई दूर ॥ काळ वेळगती गमन नहि माने शरीर ॥ एकाजनार्दनीं रस पीवे ॥ बाजे अनाहत तूर ॥ ४ ॥

॥ १८९० ॥ स्त्रीसंभोगाची वासना जैं करी ॥ तेव्हां घ्राणरंध्रीं प्राण वाहे ॥ १ ॥ संकल्प विकल्प वेढुनियां मन ॥ तेव्हां तो समान वाहातुसे ॥ २ ॥ बुद्धीसंपदेचा बहुत विलास ॥ तेव्हां सावकास उदान वाहे ॥ ३ ॥ परदारा परधन अहंकार अभिलाषी ॥ तेव्हां आपानासी वाहो सुटे ॥४॥ हरिकथाश्रवणीं आवडी अंतरीं ॥ व्यान घ्राणांतरीं वाहातुसे ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं करूनि अकर्ता ॥ पवनता तत्वता प्रकाशक ॥ ६ ॥

॥ १८९१ ॥ खेचरीचें ध्यान भ्रूमध्यें जाण ॥ भूचरी आपण नासिकाग्रीं ॥ १ ॥ चांचरी ते मुद्रा फोडुनियां ककारा ॥ भेटोनि ओंकारा सुखी होय ॥ २ ॥ तेथुनि स्थिरया होय पुण्यगीरी ॥ शिवीं अगोचरीं मिळुनि जाय ॥ ३ ॥ स्थूळ ज्ञानाची आवडी अंतरीं ॥ तेचि पैं खेंचरी मुद्रा तेथें ॥ ४ ॥ लिंगदेह झाला किंचिन्मात्र ज्ञान ॥ भूचरी ते जाण मुद्रा तेथें ॥ ५ ॥ साक्षी अगोचरी चांचरी अज्ञानी ॥ एकाजनार्दनीं सांगितल्या ॥ ६ ॥

॥ १८९२ ॥ ककारा पैलपारीं अर्धांगुळ अंतरीं ॥ अग्नीचक्र निर्धारीं वसतुसे ॥ १ ॥ तेथुनि अर्धबोट वसतसे त्रिकुट ॥ सबळ ते पेंठ ओंकाराची ॥ २ ॥ दशनादांचि ध्वनि अग्नीचक्रामाजी ॥ सुषुम्नेचें तेज त्रिकुटांत ॥ ३ ॥ श्रीहट गोल्हाट आणि पुण्यगीरी ॥ भ्रमरगुंफाचक्रीं वास ज्याचा ॥ ४ ॥ मग ब्रह्मरंध्र सर्वस्व पवित्र ॥ जेथें अनाक्षर नांदतुसे ॥ ५ ॥

ब्रह्मांडि ते सात श्रीहटापासुनि ॥ ऐसे योगीं मुनीं बोलियलें ॥ ६ ॥ अंधारापासुनि त्रिकुटापर्यंत ॥ पिंडीचा तो अर्थ सातांचाची ॥ ७ ॥ एकाजनार्दन चौदा चक्रीं जाण ॥ जनार्दनें खूण सांगितली ॥ ८ ॥

---

# एकनाथ.

॥ १८९३ ॥ कारणलिंग स्थूळ त्वंपद केवळ ॥ या तिहींचेंही मूळ महाकारण ॥ १ ॥ शबल हें त्वंपद तिहींचाही भेद ॥ शुद्ध तें त्वंपद जीवरूप ॥ २ ॥ जितुका हा आकार सबळ त्वंपदाचा ॥ शुद्ध अंश साचा जीवपद ॥ ३ ॥ माझें हें मीपण जंव पाहें शोधून ॥ तंव तें जालें लीन त्वंपदार्थी ॥ ४ ॥ तत्पद पाहतां शिवाची अहंता ॥ मीळे तो तत्वता आसिपदीं ॥ ५ ॥ आसिपद जाण जे कां ज्ञानधन ॥ तेथें जनार्दन वास करी ॥ ६ ॥ आसिपद ब्रह्मरंध्र पुण्यगीरी तत्पद ॥ मूर्धनिचा भेद त्वंपदाचा ॥ ७ ॥ एकाजनार्दनीं देहीं तीन स्थानें ॥ स्थानविरहीत पूर्ण जनार्दन ॥ ८ ॥

॥ १८९४ ॥ रविशशी एक होती दिनांतर ॥ तयाचा प्रकार सांगों तुह्मां ॥ १ ॥ प्राणापानाचेनि बारा कळीं तपन ॥ मागतसे अन्न भक्षावया ॥ २ ॥ नाहीं अन्न पान बळ तो पवन ॥ चेतवित अग्न जठरींचा ॥ ३ ॥ जठरींचा अग्नी सरस्वतींत रिघे ॥ प्राणाचे संगें स्थीर होय कंठीं ॥ ४ ॥ ऐसा तो भास्कर कंठीं होय स्थीर ॥ सासी अमृतकर निववित ॥ ५ ॥ सतराविचें जीवन अळंबुचा ओघ ॥ उतरूनियां सांग गांधारीते ॥ ६ ॥ गांधारीते चंद्र तेथें सोळा कळा ॥ वर्षोनियां जळा जिव्हेवरी ॥ ७ ॥ जिव्हेचेनि पाठें भास्कर संतुष्ट ॥ सांडोनियां कंठ जाय नाभिस्थानीं ॥ ८ ॥ व्यानाचेनि संगें चंद्र भास्कर ॥ कोठें बाहत्तर हिंडतसे ॥ ९ ॥ भास्कराचें तेज चंद्राचें जीवन ॥ सांदोसांदीं व्यान हिंडतसे ॥ १० ॥ एकाजनार्दनीं सतरावीचें पान ॥ वाचें अंतःकरण कल्पकोटी ॥ ११ ॥

॥ १८९५ ॥ नित्य निरंजन निरामय परिपूर्ण व्यापक एक ॥ सोहंबुद्धी बीन नही पाऊं मिथ्या भ्रमछेदक ॥ १ ॥ देखो संत अक्षर एक ॥ हें अविनाशक ब्रह्म तारक ॥ ध्रु० ॥ संत असंत नहीं द्वैत ॥ तहा निश्चळ

राखो चित्त ॥ २ ॥ सुनहु बचन करहु जतन एकाजनार्दना शरण ॥ ताकी कृपा भवस्वप्न नाशी पायीं येतो परम निर्वाण ॥ ३ ॥

॥ १८९६ ॥ चलते आपे आप स्वदेहे न पाऊ ॥ बोध बिंबते माई ध्यान ध्याऊं ॥ १ ॥ आनंद शाहासुं रमते हू रमते माई ॥ ध्रु० ॥ जागृति स्वप्न माई सुषुप्ती न देखुं ॥ तुरया तरुणा छोडी विषय न तोखु ॥ २ ॥ एकाजनार्दन स्वामी नित्य आनंद भोगी ॥ कर्मीं ब्रह्म देख सोही साचार योगी ॥ ३ ॥

॥ १८९७ ॥ नेणे नेणे नेणे आतां मी जाणे ॥ जाणते नेणते हे दोन्ही नेणे ॥ १ ॥ जाणते कवण नेणते कवण ॥ जाणते नेणे तो जाण ॥ ध्रु० ॥ नेणे नेणे म्हणसी तंव तंव जाण ॥ आपणा जाणुनि अवघेंचि नेणे ॥ २ ॥ एकाजनार्दनीं या दोन्ही मार्गीं ॥ काळें उजळें तें रवीचा भागी ॥ ३ ॥

॥ १८९८ ॥ जंव जंव देखसी तंव तंव काळें ॥ शेखीं देखलिया काळें उजळें ॥ १ ॥ तैसे जन जन जन जन जना ॥ जंव न देखसी जनार्दना ॥ ध्रु० ॥ उभी मृगजळीं जळ जळ ॥ तंव खंडली नाहीं झळ ॥ २ ॥ एका-जनार्दनीं तव माया ॥ जंव नये आपुलिया ठाया ॥ ३ ॥

॥ १८९९ ॥ नदी नद परती सद्धु ॥ जंव देखिला नाहीं आगाधु ॥ १ ॥ तैसें जंव जंव साधन वाहे ॥ तंव तंव बुभुक्षित राहे ॥ ध्रु० ॥ रवि चंद्राची घडे वळि ॥ जंव महा तेजें नव्हे दिवाळी ॥ २ ॥ साधना भवे बुरबुटी ॥ एकाजनार्दनीं तैं भेटी ॥ ३ ॥

॥ १९०० ॥ देवयात्रेसी जंव जंव जावों ॥ तंव पंथुचि झाला देवो ॥ १ ॥ आतां चालावें तें कैसें ॥ चालणें या रीतें न दिसे ॥ २ ॥ येथुनि पाहे तेथवरी ॥ तंव अवघाचि दिसे हरी ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं होय भेटी ॥ येणें जाणें ह्या खुंटल्या गोष्टी ॥ ४ ॥

॥ १९०१ ॥ येथें होता तो गेला परदेशीं ॥ तो मी जवळींच अह-र्निशीं ॥ १ ॥ वांयां करूं नका खेदु ॥ मी जवळीच स्वतःसिद्धु ॥ ध्रु० ॥ माझी साचार भेटी घेणें ॥ तरि अखंड मज आठवणें ॥ २ ॥ एकाजनार्द-नाची भेटी ॥ न रीघावें गिरीकपाटीं ॥ ३ ॥

॥ १९०२ ॥ सोयरिया भेटी जावो ॥ सखा सोयरा वासुदेवो ॥ १ ॥ कैसी भेटी भेटली भावा ॥ तेथें ठावो नाहीं वासुदेवा ॥ ध्रु० ॥ एकाएकीं जाहली भेटी ॥ तये भेटीस न पडे तुटी ॥ २ ॥ एकाजनार्दनीं भेटला ॥ तो भेटणेंच होऊन ठेला ॥ ३ ॥

॥ १९०३ ॥ जाणपणें वस्तु जाणों मी जाय ॥ माझी जाणीव कैसी मज आडटाय ॥ १ ॥ जाणों मी कैसें जाणों मी कैसें ॥ जाणपणें पीसें लावियलें ॥ ध्रु० ॥ जाणपणाचें पडळ जें आलें ॥ जवळीले वस्तुचें देखणें ठेलें ॥ २ ॥ एकाजनार्दनीं सुदलें अंजन ॥ पडळ भेदुनी दाविलें निधान ॥ ३ ॥

॥ १९०४ ॥ तैसा आहे जनीं जनार्दन ॥ तया पहावया सांडा अभिमान ॥ ध्रु० ॥ साखर दिसे गोडी न दिसे ॥ ते काय तयावेगळी असे ॥ १ ॥ कापुराअंगीं परिमळ गाढा ॥ पाहतां उघडा केवीं दिसे ॥ २ ॥ पाठी पोट नाहीं सुवर्णा ॥ एकाजनार्दन त्यापरि जाणा ॥ ३ ॥

॥ १९०५ ॥ मुनीजन साधिती साधनीं ॥ तो हरी कोंदला नयनीं ॥ १ ॥ नवल वर्तलें रे नवल वर्तलें रे ॥ निरखितां निरखितां मन तें आटलें रे ॥ ध्रु० ॥ स्थूळ देहीं देह धर्मा ॥ गांठी केली परब्रह्मा ॥ २ ॥ एका एकजनार्दनीं ॥ पाहतां दिसे जनीं वनीं ॥ ३ ॥

॥ १९०६ ॥ कल्पित देह कल्पित त्रिबंध ॥ कल्पित षट् चक्रमाळा ॥ कल्पित धारणा कल्पित सुषुम्ना ॥ कल्पित मेरुमंडळ ॥ १ ॥ कल्पित छांडो कल्पित छांडो ॥ निर्विकल्प रति भांडो ॥ सहजीं सहज भरपूर भईले ॥ देह विदेह दुई खाडो ॥ ध्रु० ॥ कल्पित द्विदळ कल्पित चतुर्दळ ॥ कल्पित अष्टकमळ ॥ कल्पित द्वादश कल्पित षोडश ॥ कल्पित तें सहस्र दळ ॥ २ ॥ कल्पित श्रीहट कल्पित गोल्हाट ॥ कल्पित औठ पीठ कल्पित भ्रमरगुंफा ॥ कल्पित हंसपदा ॥ कल्पित योग अचाट ॥ ३ ॥ कल्पित शिव कल्पित शक्ति ॥ कल्पित ते निजप्राप्ति ॥ जनार्दनपूता अभिन्न एका ॥ निर्विकल्प निजस्थीती ॥ ४ ॥

# मोक्षमार्ग अ० योगमार्ग.

॥ १९०७ ॥ मुद्राबंधु तो आधारु ॥ वोढियाणा जालंधरु ॥ भेदुनियां ककारु ॥ वरता चढे ॥ चक्रें चक्रातें भेदी ॥ अभेदें भेदु छेदी ॥ प्रणवाचे पैलसंधीं ॥ पैठा झाला ॥ अहं सोहं शुद्ध स्फूर्ति ॥ मावळली वृत्ति अवृत्ति ॥ प्रगटली स्वयंज्योती ॥ निजतेजें ॥ तेथें खुंटलें ध्यातां ध्यान ॥ हारपलें ज्ञानाज्ञान ॥ निजीं निजसमाधान ॥ होऊनि ठेलें बाईये ॥ १ ॥ निःशब्दीं रुणझुणु सणत्कारें गजरु ॥ तयाचें अभ्यंतर भेदुनि पाहीं ॥ गवाक्षद्वारें गहिरु शोधुनि नेलें कांहीं ॥ ओंकार शोधुनि नेलें कांहीं ॥ ओंकार शोधिला पाही अर्धमात्रा ॥ त्रिगुण गुणी त्रिपुटी ॥ मावळली तेही गोष्टी ॥ दृश्या परती दृष्टी थोरावली ॥ २ ॥ क्षीरसागरीं गाई ॥ नानापरिच्या दुहिल्या पाहीं ॥ तैसें झालें कांहीं तिये ठायीं ॥ देहीं विदेहीं हेंही नाठवे ॥ एकी एक अनेक अनेकीं दिसे एक ॥ हेंही ओळखी देख हारपली ॥ सच्चिदानंद सुख मावळला ॥ तोही तोख हरिखें हरीख देख एक झाला ॥ एकाजनार्दनी एकपणीं जनीं विजनीं ॥ मुळीच्या मुळा मिळणी ॥ मिळोनि ठेली बाईये ॥ ३ ॥

---

## एकनाथकृत

### पद १.

॥ १९०८ ॥ चक्षुदर्पणीं जग हें पहा । जगज्जिवनीं मुरुनी रहा । तुर्या कालिंदितीर्थीं नहा । पापपुण्यासी तिळांजुळी वहा ॥ १ ॥ रे बापांनो सत्य ही गुरुची खुण ॥ ध्रु० ॥ एवढें ब्रह्मांडफळ जो देंठीं । हेती आटले देखण्याचे पोटीं । पाहूं जातां पाठी ना पोटीं । मीतुंपणासी पडली तुटी ॥ रे बापां० ॥ २ ॥ तिहीं अवस्था टाकोनी मागें । अर्धचंद्राच्या चांदण्यांत जागे । जागणें ग्रासूनी तया स्थानीं जागे । गड उन्मनि झडकरी वेगें ॥ रे बापां० ॥ ३ ॥ चहुं शून्याचा निरसी जेणें । शून्य नाहीं तें अशून्यपणें । शून्यातीतचि स्वयंभ होणें । शून्य गाळूनि निरशून्यपणें ॥ रे बापां० ॥ ४ ॥ चार साहा दाहा बारा सोळा । ह्या तों आटल्या देखण्याच्या कळा । काळातीत स्वयंभ निराळा । एकाजनार्दनीं सर्वांग डोळा ॥ रे बापां० ॥ ५ ॥

॥ १९०९ ॥ प्रथम मुक्त ह्मणोनी पिटिलें धेंडें ॥ तेणें तोंडें बद्ध ह्मणसी ॥ १ ॥ पहिलें काय झालें मध्यें काय आलें ॥ तुझें तूंचि वहिलें विचारी जो बा ॥ ध्रु० ॥ प्रथम दृष्टी चंद्र देखसी सोज्वळा ॥ कवळुं आल्या तोचि ह्मणतोसी पींवळा ॥ २ ॥ एकाजनार्दनीं मुळीच्या चुकी ॥ सत्य वाचा हो लागे लटिकी ॥ ३ ॥

॥ १९१० ॥ सांडोनियां नासापुटीं वृत्ति केली उफराटी ॥ पुंजाळलें नयन पडली कोठें गांठी ॥ १ ॥ तुझी कोठें वो दृष्टी ॥ उन्मळीत नयन मोकळ्या भृकुटी ॥ ध्रु० ॥ चंदन बावनें भोग नावडे कां भोगवृद्धि ॥ ध्यान ध्येय ध्याता गेले विश्वीं झाली समाधी ॥ २ ॥ एकाजनार्दनीं निज सांगों केवी सांग वो मज ॥ माझें मीपण जाऊनी सबाह्य कोंदलें तुज ॥ ३ ॥

॥ १९११ ॥ हंसआंगीं डोळा विकासे निर्मळ ॥ त्याचेमध्यें स्थूळ पाहत जाय ॥ १ ॥ चिन्मय अविनाश प्रगटे तेथें ज्योती ॥ तोची प्राणपती देहाचा हा ॥ २ ॥ त्यापुढें आभास असे नीळवर्ण ॥ तेंचि स्वरूप जाण विराटाचें ॥ ३ ॥ समाधी ही नोव्हे दुजी कोणी सांगे ॥ तयासी पुतन निश्चयेंसी ॥ ४ ॥ जनार्दनउपदेश एका एक ओळी ॥ वटवृक्षातळीं बोध केला ॥ ५ ॥

---

# प्राप्ति.

॥ १९१२ ॥ चंद्राहुनी शीतळ ॥ रवीहुनी सोज्वळ ॥ तेणें मज केवळ ॥ वेधियेलें ॥ १ ॥ वेध कैसा मज लागला वो बाई ॥ ध्रु० ॥ अमृताहुनी स्वादु ॥ गगनाहुनी मृदु ॥ रूपेंविण आनंदु ॥ देखिला बाई ॥ २ ॥ एकाजनार्दनीं ॥ आनंदु परिपूर्ण ॥ कायावाचामनें ॥ वेधिलें वो बाई ॥ ३ ॥

॥ १९१३ ॥ ब्रह्मज्ञानासाठीं वेदशास्त्रपुराण ॥ करितां श्रवण नातुडेची ॥ १ ॥ नातुडेचि कदां गीता भागवतीं ॥ वाचितां हो पोथी जन्मवरि ॥ २ ॥ द्वारकापट्टण क्षेत्र वाराणसी ॥ करितां तीर्थाटनासी प्राप्त नोहे ॥ ३ ॥ प्राप्त नोहे गुरु मंत्र तंत्र घेतां ॥ शब्दज्ञान कथितां प्राप्त

नोहे ॥ ४ ॥ ज्यासी पुनरावृत्ति स्थिर नोहे बोध ॥ अखंडीत भेद मना-
माजीं ॥ ५ ॥ ज्याचें जन्मांतर सरुनीयां जाये ॥ तेथें स्थिर होय गुरु-
बोध ॥ ६ ॥ एकाजनार्दनीं ऐसा जो कां पुरुख ॥ कोटीमाजीं येक
ब्रह्मज्ञानी ॥ ७ ॥

॥ १९१४ ॥ माझा देहीं असतां डोळा ॥ काय जालेंरे गोपाळा ॥ १ ॥ माझा डोळा गिवसोनी दीजे ॥ मी पाऊल न सोडीं तुझें ॥ २ ॥ डोळा मुराला डोळीयांत ॥ कवण जाणे तेथील मात ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं अवलीळा ॥ पाहतां त्रैलोक्य जाहला डोळा ॥ ४ ॥

॥ १९१५ ॥ श्रवणीं ऐकोनी पहावया येणें ॥ तंव डोळेची जाले देखणे ॥ १ ॥ आतां पहावें तें काये ॥ जें पाहे तें आपणचीं आहे ॥ २ ॥ जें जें देखों जाये दीठीं ॥ तें देखणें होउनी नुठी ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं पाहे लीला ॥ पाहतां पहाणें अवलीळा ॥ ४ ॥

॥ १९१६ ॥ रतीच्या अंतीं जें होय सुख ॥ सर्वांगीं तें सर्वदा देख ॥ १ ॥ इंद्रियावीण आहे गोडी ॥ तेथींचा स्वादु कवण काढी ॥ २ ॥ आधींच करणी कैसी यक्षिणी ॥ गोडपणें कैसी देत आहे धणी ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं लागला छंदु ॥ एकपणेंविण घेतला स्वादु ॥ ४ ॥

॥ १९१७ ॥ स्वयंप्रकाशामाजीं केलें असे स्नान ॥ द्वैतार्थ त्यागून निर्मळ जाहलों ॥ १ ॥ सुविद्येचें वस्त्र गुंडाळोनी बैसलों ॥ भूतदया ल्यालों विभूती अंगीं ॥ २ ॥ चोविसापरतें येक वोळखिलें ॥ तेंचि उच्चारिलें मूळारंभीं ॥ ३ ॥ अकार हारपला उकार विसरला ॥ मकारातीत केला प्रणव तो ॥ ४ ॥ अहंकर्म सर्व सांडियेल्या चेष्टा ॥ तोचि आपोहिष्ठा केलें कर्म ॥ ५ ॥ संसारासी तीन वोंजळी घातलें पाणी ॥ आत्मत्वा लागुनी अर्घ्य दिलें ॥ ६ ॥ सोहं तो गायत्री जपतों अखंड ॥ बुद्धिज्ञान प्रचंड सर्वकाळ ॥ ७ ॥ येका भावें नमन भूतां येकपणीं ॥ एकाजनार्दनीं संध्या जाहली ॥ ८ ॥

॥ १९१८ ॥ नमस्कारी जंव अष्टांगें ॥ तंव देवचि जाला अंगें ॥ १ ॥ आतां नमन कैसें हो किजे ॥ देवपणा नयेचि दुजें ॥ २ ॥ स्तुतिस्तवन

बोलों भावो ॥ तंव वाचाचि जाली देवो ॥ ३ ॥ स्तवन करूं आतां कैसें ॥ स्तवावया दुजें नसे ॥ ४ ॥ आतां भजन कैशापरी ॥ संसारा नुरेचि उरी ॥ ५ ॥ एकाजनार्दना शरण ॥ तंव तो जाला जनार्दन ॥ ६ ॥

॥ १९१९ ॥ ताट भोक्ता आणि भोजन ॥ जो अवघाचि जाला आपण ॥ १ ॥ भली केली आरोगण ॥ सिद्ध स्वादुचि जाला आपण ॥ २ ॥ कैसी गोडी ग्रासोग्रासीं ॥ चवी लागली परमपुरुषीं ॥ ३ ॥ रस सेवितां स्वमुखें ॥ तेणें जगदुदर पोखे ॥ ४ ॥ संतृप्त जाली तृप्ती ॥ क्षुधेतृषेची जाली शांती ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं तृप्त जाला ॥ शेखीं संसारा आंचवला ॥ ६ ॥

॥ १९२० ॥ शय्याशयन आणि शेजार ॥ तें अवघेंचि जालें शरीर ॥ १ ॥ कैसें नीज घेतसे निजें ॥ नीज देखोनी समाधी लाजे ॥ २ ॥ जागृती जागे निजे ॥ स्वप्नसुषुप्तीचे निजगुजें ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं निजला ॥ तो नीजचि होउनी ठेला ॥ ४ ॥

॥ १९२१ ॥ तळीं हारपली धरा ॥ वरी ठावो नाहीं अंबरा ॥ १ ॥ ऐसा सहजींसहज निजे ॥ एका एकपणेंविण शेजे ॥ २ ॥ डावे उजवे कानीं ॥ निजे नीज कोंदली नयनीं ॥ ३ ॥ दिवसनिशी हारपली दोन्ही ॥ एका निजिजे जनार्दनीं ॥ ४ ॥

॥ १९२२ ॥ मी तूं ऐसी परी ॥ जैसे तरंग सागरीं ॥ १ ॥ दोहीं-माजीं एकजाणा ॥ कृष्ण द्वारावतीराणा ॥ २ ॥ तंतुवस्त्र दोनी येक ॥ तैसें जगासी व्यापक ॥ ३ ॥ देव भक्त ऐसी बोली ॥ भ्रांति निरसेनाशी जाली ॥ ४ ॥ सरिता सागरीं मिनल्या ॥ तैसें होय भ्रांति गेल्या ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं कृपा ॥ भ्रांति कैसी जगीं पहापां ॥ ६ ॥

॥ १९२३ ॥ संतद्वारीं कुतरा जालों ॥ प्रेमरसासी सोंकलों ॥ १ ॥ भुंकत भुंकत द्वारा आलों ॥ ज्ञानथारुळ्या बैसलों ॥ २ ॥ कुतरा भुंकत आला हिता ॥ संतीं हात ठेविला माथां ॥ ३ ॥ कुतऱ्यागळ्याची सांखळी ॥ केली संतांनीं मोकळी ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं कुतरा ॥ दांत पाडुनी केला बोथरा ॥ ५ ॥

॥ १९२४ ॥ रसने रसभोग्य रसाचा भोक्ता रसग्रासीं होय भेटी ॥ रसस्वादाचा सौरसु तोची ब्रह्मरसो कृष्णीं पडतसे गांठी ॥ १ ॥ आत्मा कान्हा भोग निधी ॥ आह्मां सकळां भोग अवधी ॥ ध्रु० ॥ श्राव्य श्रावक श्रवणा समाधान सहजीं सिद्धचि पाहे ॥ गगन गर्भे सरे गगना अलिप्त शब्दें कोंदाटलें ठाईं राहे ॥ २ ॥ दृष्टि दृश्य नसे दृश्या सबाह्य दिसे दृष्टि-वीण डोळा पाहे ॥ अरूपाचें रूप अगुणी होउनी देखदेखणें कवण आहे ॥ ३ ॥ घ्राणाचें जें घ्राण वासाचा अवकाशु ज्ञप्ती मात्र आहे शुद्ध ॥ गंधाचा गंधु सुवास जीवन दृष्टि भोग सुगंध ॥ ४ ॥ देहाचे आंतील कठिण कीं कोंवळें न कळे तेथींचा भावो ॥ आत्मारामीं वृत्ति जडोनी गेली मा सबाह्य रिता नुरेची ठावो ॥ ५ ॥ मनाचाही वेगु दिसताहे सर्वें गुप्त माजी उभा देवो ॥ ह्मणवोनी मन होतें तें उन्मन जालें पडिला कृष्ण-स्वभावो ॥ ६ ॥ काष्ठ भक्षितां दाहकु काष्ठामाजीं असे मंथिलीया काष्ठचि अग्नि ॥ एकाजनार्दनीं कृपा देहींचाचि देहीं मा भोग भोगितां राहे कृष्ण होउनी ॥ ७ ॥

॥ १९२५ ॥ दिव्यतेज झळकती रत्नकळा फांकती ॥ अग्नींत लाव-ण्यतेजप्रभा दिसती गे माये ॥ १ ॥ कानडा वो सुंदर रूपडा गे ॥ अंतरीं बाहेरीं पहातां दिसे उघडा गे ॥ २ ॥ आलिंगनालागीं मन उताविळ होये ॥ क्षेम देतां माझें मीपण जाये ॥ ३ ॥ मागेंपुढें चहूंकडे उघडें पाही ॥ पाहावयासी गेलें मजला ठक पडलें बाई ॥ ४ ॥ बाहेरी पाहूं जातां अंतरीं भासे ॥ जें जें भासे तें तें येकीं येक समरसे ॥ ५ ॥ एका-जनार्दनीं जीवींचा जिव्हाळा ॥ एकपणें पहातां न दिसे दृष्टीवेगळा ॥ ६ ॥

॥ १९२६ ॥ पाहलें रे मना पाहलें रे ॥ बुद्धिबोधें इंद्रिया सम जालें रे ॥ १ ॥ नयनीं पहातां न दिसे बिंब ॥ अवघा प्रकाश स्वयंभ ॥ २ ॥ एकाजनार्दनीं पहाट ॥ जनीं वनीं अवनीं लखलखाट ॥ ३ ॥

॥ १९२७ ॥ कवण देव कवण भक्त ॥ एक दिसे दोहीं आंत ॥ १ ॥ भक्त ध्यानीं जंव बैसला ॥ पूज्य पूजक स्वयें जाहला ॥ २ ॥ ध्यानीं हर-पलें मन ॥ सरलें ध्याता ध्येय ध्यान ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं भाव ॥ देव ह्मणण्या नुरे ठाव ॥ ४ ॥

॥ १९२८ ॥ घर सोडोनी जावें परदेशा ॥ मजसवें देव सरिसा ॥ १ ॥ कडेकपाटिं शिखरीं ॥ जिकडे पाहे तिकडे हरि ॥ २ ॥ आतां कोणीकडे जावें ॥ जिकडे पाहे तिकडे देव ॥ ३ ॥ एका बैसला निरंजनीं ॥ तंव जनार्दन जनीं वनीं ॥ ४ ॥

॥ १९२९ ॥ आतां काय पूजूं देवा ॥ माझी मज घडे सेवा ॥ १ ॥ तोडूं गेलों तुळसीपान ॥ तेथें पहातां मधुसूदन ॥ २ ॥ अन्नगंध धूप दीप ॥ तेंही माझेंचि स्वरूप ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं पूजा ॥ पूज्य पूजक नाहीं दुजा ॥ ४ ॥

॥ १९३० ॥ भूमी शोधोनी साधिलें काज ॥ गुरुवचन बीज पेरियेलें ॥ १ ॥ कैसें पिक पिकलें प्रमाचें ॥ सांठवितां गगन टांचें ॥ २ ॥ सहा चारी शिणले मापारी ॥ सकळां नव्हे अद्यापवरी ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं निजभाव ॥ देहीं पिकला अवघा देव ॥ ४ ॥

॥ १९३१ ॥ मी मी ह्मणतां माझें मीचि मी नेणें ॥ चुकलीं रविकिरणें सूर्या धुंडिती ॥ १ ॥ मजलागीं मी तों म्यां भेटावें तें कैसें ॥ दीपप्रभा पुसे दीपकातें ॥ २ ॥ सबाह्य अभ्यंतरीं गगन सावकाश ॥ पुसे घटावकाश महदाकाशा ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं एकत्व जनवन ॥ ह्मणे जनार्दन आह्मां न दिसे ॥ ४ ॥

॥ १९३२ ॥ मी मी ह्मणतां अवघें मीच मी जालों ॥ तूंपणाच्या बोला लाजुनीयां ठेलों ॥ १ ॥ मी ना कोणाचा ना माझें कोण्ही ॥ येकुविण येकु सहज निर्वाणीं ॥ २ ॥ माझें मीपण मजमाजीं निमालें ॥ येकानेक सकळ सहजीं सहज जालें ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं गणीत नवानी येकु ॥ परापरती सारुनी उगला सिद्धांकु ॥ ४ ॥

॥ १९३३ ॥ आजीचा सुदीन आह्मां जाला आनंदु ॥ सकळा स्वरूपीं स्वयें देखे गोविंदु ॥ १ ॥ पाहिला गे माय आतां सांगूं मी कैसें ॥ जेथें जेथें पाहें तेथें तेथें गोविंदु दिसे ॥ २ ॥ पाहतां पाहणें तटस्थ ठेलें ॥ सबाह्य अभ्यंतरीं पुरुषोत्तम कोंदलें ॥ ३ ॥ यापरी पाहतां हरुष होतसे मना ॥ एकाजनार्दनीं धणी न पुरे मना ॥ ४ ॥

---

# आत्मस्वरूपवर्णन.

॥ १९३४ ॥ माझा मीच कर्ता माझा मीच भोक्ता ॥ चहुं मुक्तिचा दाता मीच मीयां ॥ १ ॥ माझा मीच देव माझा मीच भक्त ॥ लौकिकी लोकांत मीच मीयां ॥ ध्रु० ॥ माझा मीच बाप माझी मीच माय ॥ + + + + + ॥ २ ॥ माझें मीच घर मीच व्यवहार ॥ अवघें चराचर मीच मीयां ॥ ३ ॥ माझा मीच भाई माझा मीच व्याही ॥ सासुरा जांवई मीच मीयां ॥ ४ ॥ माझा मीच नारी माझा मीच पुरुष ॥ मीच नपुंसक तिहीं लोकीं ॥ ५ ॥ माझा मीच शत्रु माझा मीच मित्रु ॥ एकला स्वतंत्रु मीच मीयां ॥ ६ ॥ माझा मीच ब्रह्मचारी माझा मीच गृहस्थ ॥ मीच वानप्रस्थ संन्यासीही ॥७॥ माझा मीच जीव माझा मीच शीव ॥ माझा अनुभव मीच जाणें ॥ ८ ॥ माझा मीच आचार माझा मीच विचार ॥ ब्रह्म तेंही पर मीच मीयां ॥ ९ ॥ माझा मीच गुणी माझा मीच अगुणी ॥ नाहीं गुणागुणीं मीच एक ॥ १० ॥ माझें मीच जन माझें मी जीवन ॥ एकाजनार्दन मीच मीयां ॥ ११ ॥

॥ १९३५ ॥ आरशाचें रूप तें माझेंचि स्वरूप ॥ याही वेगळा मी सच्चित्स्वरूप ॥ १ ॥ यापरी मी जाण देहाचा द्रष्टा ॥ माझेनी चालती सकळ देहींच्या चेष्टा ॥ ध्रु० ॥ दर्पणदेहींच्या कळा ॥ माझेनि चालती सकळा ॥ २ ॥ आरशाचा देह झाला अथवा मेला ॥ एकाजनार्दनीं जीवण्या मरणावेगळा ॥ ३ ॥

॥ १९३६ ॥ लीलाविग्रही भगवंत त्यासी ह्मणती नित्यमुक्त ॥ आह्मीं काय तेथें वेगळे असों ॥ जे जे अवतार हरी धरी ते ते मी अवधारी ॥ हरी नाम गजरी जगदोद्धार ॥ १ ॥ आह्मां कां संसारा न येणें करूनी हरीभक्ति ॥ रामनामकीर्ति जडजीव उद्धरणे ॥ साच असतां जरी धाक करितों आह्मीं चित्तीं ॥ भवतिभव प्राप्ति समुळ मिथ्या ॥ ध्रु० ॥ जे जे हरीलिळा विचित्र तें तें माझें चरित्र ॥ देवभक्त एकत्र भेद नाहीं ॥ विश्वरूपें सृष्टी अर्जुना दाविली दृष्टी ॥ भिन्न भेदाची गोष्टी बोलों नये ॥ २ ॥ सर्व कर्मीं ब्रह्म स्थिती प्रतिपाळ विवेदोक्ति ॥ हेंची एकी निश्चीतीं करणें आह्मां ॥ नाम तें पाषांड कर्मठता अति बंड ॥ तयांचें ठेंचावें तोंड हरीभजनें ॥ ३ ॥ जैं धर्माची वाढी मोडे अधर्माची सीग चढे ॥ तैं मज येणें

घडे संसार स्थिती ॥ सर्व भूति भगवद्भावो भक्तिचा निर्वाहो ॥ धर्माचा अन्वयो वाढवण ॥ ४ ॥ वत्सा हरणीचें चरीत्र वत्सें गोवळें स्वयें स्वतंत्र ॥ पावे पाइतणें कटीसूत्र स्वयें झाला ॥ एकाजनार्दनीं विश्वरूपें गोविंदभेदु ॥ देखे तोचि निंदु निंद्य बाधु ॥ ५ ॥

॥ १९३७ ॥ चकित चकित कछु शुद्धि न पाई ॥ ध्येय ध्याता ध्यान मोहीं मांही समाई ॥ भवभावना आपेंआप रही ॥ जिव शिव छुव्यो देह-भयो बिदेही ॥ १ ॥ माधोजीको मुखरो चिन्ही रही ॥ नयन नीरसरेवी आनंद पाआई ॥ क्रीया कर्म धर्म ये तो थकि भयी ॥ ध्रु० ॥ देखत देखत दिठी उलटी मोहि ॥ दृश्य द्रष्टा दरिसन खिनधयी ॥ एकाजनार्दनीं बिज नमायी ॥ गति मति रति चितचैतन्य भाई ॥ २ ॥

॥ १९३८ ॥ आपण आपणापासीं ॥ अखंड अहर्निसी ॥ तेथें आपण या उच्चारासी ॥ कवणु बोले ॥ १ ॥ आपण पाहतां दिठी ॥ द्वैत दुजें नुठी ॥ आपण ह्मणतां गोठी ॥ लाज नये ॥ २ ॥ आपण कैसेनी जालें ॥ आपुलें आपणा आलें ॥ विचारुनी मज बोलें ॥ विषद सांगा ॥ ३ ॥ बोलों जातां अद्वैत ॥ तंव बोलणें काढी द्वैत ॥ आपण ह्मणणें तेथ ॥ रिघे कैसें ॥ ४ ॥ परापर तिसरें ॥ विवेकु विचारें ॥ विरे तयावरी उरें ॥ आपण स्वयें ॥ ५ ॥ ह्मणों जातां एक ॥ तंव ह्मणत होय अणिक ॥ बोलतांची देख ॥ द्वैत दिसे ॥ ६ ॥ एकाजनार्दनीं ॥ बोलतांची मौनी ॥ आदि मध्य अवसानीं ॥ आपण स्वयें ॥ ७ ॥

॥ १९३९ ॥ पूर्ण आनंदाच्या ठाईं ॥ अनुभवा ठावो नाहीं ॥ तो आपेंआप देहीं ॥ भोगवितो ॥ १ ॥ नवल केलें येणें देव ॥ पालटिलीं आह्मां दैव ॥ विश्वची अवघें खेंव ॥ आळिंगवी ॥ २ ॥ विश्वा आंतु आणि बाहिरा ॥ येकु ना दुसरा ॥ सन्मुख पाठिमोरा ॥ बोलों नये ॥ ३ ॥ गुरुत्वाचा मान ॥ द्यावया निर्गुण ॥ स्वयें जनार्दन ॥ होऊनी ठेला ॥ ४ ॥ जो अमृता गोडी ये गोडी ॥ शब्द वेदातें नाकळें फुडी ॥ तो मी धिटीवा मौनाची गुढी ॥ उभऊनी सांगे ॥ ५ ॥ पितामहाचा पिता ॥ भानुदास साचें ॥ एकाजनार्दनाचें ॥ कृपाकृत्य ॥ ६ ॥

॥ १९४० ॥ दोहीं डोळां पाहतां धणी न पुरे वो मना ॥ सर्वांग-देखणा पाहे श्रीवत्सलांछना ॥ १ ॥ डोळा निवे परि पाहणें न मोडे ॥

सबाह्य अंतरीं कैसें पाहणेंचि वाडे ॥ ध्रु० ॥ मन सुमन कैसें होताहे उन्मन ॥ ध्याता ध्येय गेले तरी न मोडे पैं ध्यान ॥ २ ॥ जागृति स्वप्न सुषुप्ति जाली पैं एक ॥ तुर्या हरपे तरी अवस्था अधिक ॥ ३ ॥ निर्जी नीज कोंदे तेथें साक्षित्व न राहे ॥ द्रष्टा दृश्य नाहीं तरी दर्शन होताहे ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं एक कायावाचामन ॥ एकपणें अधिक होताहे भजन ॥ ५ ॥

॥ १९४१ ॥ श्रवणीं ऐकोनी एकाक्षरातें ॥ मन पाहों गेलों तंव झालें तें ॥ १ ॥ हरी राम राम राम राम राम ॥ आह्मां प्रवृत्ति निवृत्ति नाहीं काम ॥ ध्रु० ॥ नयन उघडोनियां जेउतें पाहे ॥ डोळां न दिसे तेंचि कैसें दीसताहे ॥ २ ॥ रसां रसवृत्ति पालटली ॥ रसां गोडी तेंचि रसना झाली ॥ ३ ॥ गातां नानापरि शब्दबोध ॥ मौन धरितांचि केलें निःशब्द ॥ ४ ॥ घेतां देतां संसार जाहली काहणी ॥ त्याची चाली चालतां होय अचरणी ॥ ५ ॥ आलिंगनीं गगन हरपलें ॥ द्वैत अद्वैत अवघें खेंवा आलें ॥ ६ ॥ दशदिशा कोंदल्या अरूपरूपा ॥ नवल सद्गुरूनें केली कृपा ॥ ७ ॥ एकाजनार्दनीं ह्मणती एकला ॥ एकपणा मुकोनि तेथें थोकला ॥ ८ ॥

॥ १९४२ ॥ चालों न शके कर्माआंत ॥ तो धांवला निष्कर्मांत ॥ १ ॥ एकाजनार्दनु धरा ॥ धरितां कांपति थरथरा ॥ ध्रु० ॥ निष्कर्माची धरुनि सीमा ॥ निर्दळिलें क्रोध कामा ॥ २ ॥ निष्कर्माचा निधडा क्षोभु ॥ जीवें मारिला सलोभ लोभु ॥ ३ ॥ रामनामाच्या परिपाठीं ॥ रण पाडिलें कोट्यानकोटी ॥ ४ ॥ जे जे धरावया जाती ॥ ते ते शरणागत होती ॥ ५ ॥ निष्कर्माचें धरितां वर्म ॥ धाकें कर्म झालें ब्रह्म ॥ ६ ॥ छेदुनियां निजबंधन ॥ मुक्त केले बंदिखान ॥ ७ ॥ एका एकपणें अगाध ॥ जिणोनि गेला शिवपद ॥ ८ ॥ प्रतापाचा अगाध महिमा ॥ जीवें मारिला अहमात्मा ॥ ९ ॥ त्वंपद तत्पद असिपद ॥ जिणोनि झाला चिदानंद ॥ १० ॥ सच्चिदानंद पदें तिन्ही ॥ वेगें गेला वोलांडुनी ॥ ११ ॥ एकाजनार्दनीं धीर ॥ जीवें निधडा एकांगवीर ॥ १२ ॥

॥ १९४३ ॥ देउळ आणि देव्हारा चिंतामणीचा खरा ॥ सिंहासनीं मूर्ति कवण पां श्रीधरा ॥ १ ॥ स्वादाचें ताट स्वादाची वाटी ॥ सामाजी

परवडी कैशी पैं गोमटी ॥ ध्रु० ॥ पांचुची मुद्रिका पांचुचें खेवणें ॥ त्याही वरी रत्न जडियेलें तें कवणें ॥ २ ॥ वाढा बुड पानें नावदेचा उंसु ॥ गाळिल्या आळिल्या सुरस कैचा रसु ॥ ३ ॥ डोळ्यांचे भूमिके डोळ्यांचें बाहुलें ॥ त्याहीवरी बोहर कैसें पां बैसलें ॥ ४ ॥ एकाजनार्दन नामें समाधिसुख ॥ साचार भेटल्या कैसा होय हरिख ॥ ५ ॥

॥ १९४४ ॥ स्मृति शास्त्र व्युत्पत्ति वेदज्ञासी भ्रांती ॥ देहांती ह्मणती विदेह मोक्षु ॥ भूतभौतिका अवघें चैतन्य पाहीं ॥ मरते कवण पुढां मोक्ष तो काई ॥ १ ॥ मरोनियां मुक्त झालासी कैसा ॥ जागृति ते गती स्वप्नींच्या माणुसा ॥ ध्रु० ॥ आपुलेनि संकल्पें देखसी स्वप्न ॥ त्यामाजी आपण देह एके ॥ स्वप्नींच्या देहा स्वप्नींच मृत्यु ॥ जागृति न येतां तो कैसा मुक्तु ॥ २ ॥ स्वप्नींचा देहो स्वप्नीं निमाला ॥ स्वप्नींच्या लोकीं संस्कार केला ॥ बरवी निष्ठा याची मुक्त पैं झाला ॥ सांग पां जागृति तो कैसा आला ॥ ३ ॥ आपुलिया भ्रांती दोरी सर्पाकार ॥ मारूनी अजगर दोर करा ॥ निर्धारूनी पाहतां सर्पची नाहीं ॥ देह विदेह दोरा मोक्ष तो काई ॥ ४ ॥ ज्ञानियाचे दृष्टी अवघेंचि ब्रह्म ॥ जग काय समवाटुनी केलें ॥ चैतन्याची कळा चैतन्याची लीळा ॥ देहब्रह्म वेगळा ह्मणशी केवीं ॥ ५ ॥ मरता देहो ह्मणशी न मर्सा आंत ॥ मरतें न मरतें दोन्ही नाहीं तेथ ॥ अखंडित वस्तु आहे सदोदित ॥ मरतें मरतें ह्मणतां झालें पैं भ्रांत ॥ ६ ॥ अभिमानाचे मुठी धरिला असे देहो ॥ गेल्या अहंभाव देह कैचा ॥ एकाजनार्दनीं सांडी अहंकार ॥ स्वदेहें मुक्त कवण दहनसंस्कार ॥ ७ ॥

॥ १९४५ ॥ जळीं जाळ पांगिल्या रवीबिंब आतुडे ॥ देहामाजी देवो तैं तुज सांपडे ॥ १ ॥ प्रतिबिंबाचा ठसा देखोनी होसी पिसा ॥ मृगजळीं पैं मासा धरूं पाहसीरे ॥ ध्रु० ॥ नेहटून आसना षट्चक्रें कल्पना ॥ गंधर्वनगरीची मनोहर रचना ॥ २ ॥ आकाशाच्या नाकीं घालुं पाहसी वेसणी ॥ सशियाच्या शिंगाची लावूनी नीशाणी ॥ ३ ॥ खद्योततेजीं लावूं पाहसी दिवा ॥ व्यर्थ आटा जीवा होत असे ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं देहबुद्धिसी देवो ॥ समुळ लटिकें तेथें काय जाऊनी पाहों ॥ ५ ॥

॥ १९४६ ॥ जळगारें आदि जळ अंतीं तेंही जळ ॥ अति यत्नें राखितां

विरोनी जाय सकळ ॥१॥ यापरी देहाचा मिथ्या आभासु ॥ वालभें वाढ-वितां प्रत्यक्ष दिसे नाशु ॥ ध्रु० ॥ पद्मिणीपत्रीं जळ भासे मुक्ताफळ ॥ अलंकारीं बाणितां आवडी होय विकळ ॥ २ ॥ सतेज विजु झळके अस्तावया वेगीं ॥ सामुद्रीकी देहो वाढे मरणालागीं ॥ ३ ॥ क्षर देह साधनें अक्षर प्राप्ती ॥ यालागीं नरदेह देव वांछिताती ॥ ४ ॥ परमार्थ-साधनीं नरदेह श्रेष्ठ ॥ येऱ्हवीं तो कनिष्ठ श्वानाहुनी बा ॥ ५ ॥ देह-बुद्धि निरसिता देवाचा देवो ॥ एकाजनार्दनीं देहीं विदेह भावो ॥ ६ ॥

॥ १९४७ ॥ माया धाया गिळुनी वाढला देखा ॥ चिन्मात्र नाम हें न साहे एका ॥ १ ॥ एकपणेंवीण एकला एका ॥ जनार्दनीं देखा वाढ-विला ॥ ध्रु० ॥ एकपणाचा तुटला भेदु ॥ बोध गिळुनीयां बुडविला वेधु ॥ २ ॥ एकाजनार्दनु ये दोन्ही वावो ॥ अभिनव भावो ठसा-वला ॥ ३ ॥

॥ १९४८ ॥ देहा न देखत चाले कवतिकें ॥ आपणियामाजी आपण तोखें ॥ १ ॥ कवण जाणे कवण पडिलें गोंधळी ॥ न संटे उखळी अनु-भवाची ॥ ध्रु० ॥ मन हारउनी हारखत पोटीं ॥ शून्या ही परती पडली मिठी ॥ २ ॥ निरंजनीचें लेईला अंजन ॥ जिकडे पाहे तिकडे एकाजना-र्दन ॥ ३ ॥

॥ १९४९ ॥ सुषुप्तीचें सुख जागृतीचा खरा ॥ यापरी देखे तो देखणा देख ॥ १ ॥ अवस्थेवीण स्वयें स्वयंभ ॥ तिहीं अवस्थीं तयाचें बिंब ॥ध्रु०॥ जागृति सुषुप्ति करणी सावध ॥ यापरी योगिया भोगी आनंद ॥ २ ॥ जागृति स्वप्न सुषुप्ति एक ॥ एकाजनार्दनीं देखणा देख ॥ ३ ॥

॥ १९५० ॥ अंधाराअंगीं प्रकाश लोळे ॥ तयातें पहातां भुलले डोळे ॥ १ ॥ अंधारामाजी प्रकाश दिसे ॥ तयातें पाहतां भुललीं डोळसें ॥ध्रु०॥ अंधारा प्रकाश जेणें प्रकाशे ॥ तयातें पाहतां जीवीं जीव नसे ॥२॥ अंधार प्रकाश पारुषें दोन्ही ॥ एकलीच प्रभा एकाजनार्दनीं ॥ ३ ॥

॥ १९५१ ॥ महाबोधें चाल केली ॥ प्रवृत्ति पडली हुलि ॥ कैसी अवधिया भुली ॥ कीं पाहतपाहतां धाडी आली ॥ १ ॥ प्रपंचा नाग-वलों ॥ संसारा आंचवलों ॥ जीव धना मुकविलों ॥ कीं माणुसपणा चुक-

विलों ॥ ध्रु० ॥ गेलें ममतेचें पोतें ॥ कीं माजी वासना घन होतें ॥ माया नागवली तेथें ॥ कीं आलें जीवा भोंवतें ॥ २ ॥ नागविलें अहंभावा ॥ कीं नेला लिंगदेह ठेवा ॥ कालवलें देह गांवा ॥ निगु नुपरेच जीवा ॥ ३ ॥ चुकली सोयरी ॥ मायाममता म्हातारी ॥ आशातृष्णा आपांपरि ॥ कामना पळाली दुरी ॥ ४ ॥ संकल्प गर्भ होता ॥ धाकेंचि सांडियेली कांता ॥ भेणें पळाली चिंता ॥ कीं समुळ विसरुनि चित्ता ॥ ५ ॥ थोर दाटली बोधमांदीं ॥ भरले अवघ्या सांदीबिदी ॥ मागील कांहीं उरों नेदी ॥ मोडल्या आश्रमसिद्धि ॥ ६ ॥ काय सांगों नवलावो ॥ अनुभवें वांचविला देवो ॥ एकाजनार्दनीं भावो ॥ देहीं तोडिला संदेहो ॥ ७ ॥

॥ १९५२ ॥ सहज तें आलें सदशक्ति डेरा माजी अक्षर गोरसु भरिला वो ॥ कैसा सिद्ध तो खांबु तेथें घुसळणिया प्रयोगु केला वो ॥ १ ॥ घुसळी निजशक्ति बाळा कैसें मथिते मथिते वेल्हाळा वो ॥ तेथ नीचनवा गोरसु अवघें नवनीत निवडितु डोळा वो ॥ ध्रु० ॥ अविकार रवी करीं गुरुवचनें दृढ धरी तेथें प्रत्यंगावृत्ती तोचि दोरु वो ॥ सोडुनि अहं सोहं गांठी रवी दोरु दृढ धरी मुष्टी वो ॥ २ ॥ दोहींकडे सम धरी समभावें मंदिरीं तेथें घुसळिती काळा ते कैशी वो ॥ अखंड खंडे लक्ष तेथें कल्पना येऊं नेदी माशी वो ॥ ३ ॥ आशा साय फेडी देहबुद्धिखोडी मोडी काम क्रोधाच्या शिंतडिया काढी वो ॥ कैसा घुमताहे डेरा तेथें अनाहत ध्वनी ते गेली वो ॥ ४ ॥ सत्वाचा फुगु धरी तो यावा सांवरी आठही भावा उसळों नेदी वो ॥ हर्षानंदातें गिळुनी तया फुंदणिया येऊं नेदी क्षोभु वो ॥ ५ ॥ गौळणी घुसळी देहबुद्धि कुशळी झणें पडो देसी तिची दृष्टी वो ॥ क्षराक्षरां परतें नवनितु एके वाटी वो ॥ ६ ॥ सर्वांगीं नवनीत सांडुनी सच्चित कैसें मथिते मथिलें मथनीं वो ॥ कैंचा जीवशीवभावो एका सहजी सहज जनार्दनीं वो ॥ ७ ॥

॥ १९५३ ॥ शून्य शून्य शून्य आहे ॥ शून्य निरसून परतें पाहें ॥ १ ॥ शून्य शून्यत्वें नाहीं ॥ निरसूनी शून्य परतें पाहीं ॥ ध्रु० ॥ लक्षें लक्षुनीयां पर पाहे ॥ लक्षालक्ष ते निज आहे रे बापा ॥ २ ॥ एकाजनार्दनीं शून्य मातु ॥ नाहीं सहजपणा आंतु रे बापा ॥ ३ ॥

॥ १९५४ ॥ भुकेलिया घरीं संताची सोय ॥ तयाचें उच्छिष्ट पडिलें

खाय ॥ १ ॥ यालागीं मी रासभ गाढा ॥ लोळतों उकरडा चरणरजीं ॥ ध्रु० ॥ तान्हेल्या कोठें न बाणें धणी ॥ धांवोनि पीतसे तयाचें पायवणीं ॥ २ ॥ हय म्हणोनि हाटिलें लाता ॥ एकाजनार्दनें केला सरता ॥३॥

॥ १९५५ ॥ गोविंदा तुझें ध्यान ॥ ध्याता ध्येय कैचें प्रमाण ॥ अखंड सहज तें पूर्ण ॥ कल्पना आणी कवण ॥ १ ॥ देखिजे तें तें ब्रह्म ॥ कल्पना करा विषम ॥ सगुणनिर्गुण एक सुगम ॥ संतासंत म्हणणें भ्रम ॥ ध्रु० ॥ मनमूर्ती तुझी तुज ॥ चारी अथवा द्वीभुज ॥ यासी तंव कल्पना बीज ॥ कल्पनेतीत तें सहज ॥ २ ॥ एकाजनार्दनें ॥ असिजे तंव एकपणें ॥ कल्पना सांडोनि पाहणें ॥ कल्पितां वेगळें होणें ॥ ३ ॥

॥ १९५६ ॥ देहबुद्धि बोढाळ प्रचंड ॥ आत्मासाक्षात्कारी घाली तोंड ॥ १ ॥ थै थै विवेक हाकित धीरें ॥ वृत्तिनें हटली साक्षात्कारें ॥ ध्रु० ॥ हांकित हांकित घालितसे उडी ॥ गुरुवचन वेताटीया झोडी ॥ २ ॥ नाना साधनांची धरूनी सोंगें ॥ द्वैतभावाची लाविती शिंगें ॥ ३ ॥ अहमात्मा म्हणोनि चौकटें ॥ तो झोडिला विदेहाचेनि साटें ॥ ४ ॥ आकळिली ऐक्याचिये वृत्ति ॥ निर्बुजली ते पहा मागुती ॥ ५ ॥ तेथें वोळखिलें आपआपणा ॥ गुण खावोन वोळली निर्गुणा ॥ ६ ॥ निजीं निजाची बैसणी मांडी ॥ विषयाचें वाळगुणें सांडी ॥ ७ ॥ एकाजनार्दनीं नवलावो ॥ देहीं हारपला देहभावो ॥ ८ ॥

॥ १९५७ ॥ देहाचे माथा कर्मतंत्र ॥ देह पवित्रा करी अपवित्र ॥ १ ॥ पाद सेख पीत सेख ॥ म्हणती अपवित्र गंगोदक ॥ ध्रु० ॥ अग्नी सर्वार्थी पावन ॥ देहदहनीं म्हणती अपावन ॥ २ ॥ आत्मा नित्यमुक्त विदेही ॥ देहकर्में बद्ध केला पाहीं ॥ ३ ॥ भूतीं भगवंत स्वतंत्र ॥ गुण दोषी म्हणती अपवित्र ॥ ४ ॥ देही देहीं बुद्धि सांगिती ॥ त्यासी परब्रह्म त्रिजगतीं ॥५॥ एकाजनार्दना कर्मतंत्र ॥ नाहीं पवित्रता अपवित्र ॥ ६ ॥

॥ १९५८ ॥ आंतु तेंही ब्रह्म बाह्य तेंही ब्रह्म ॥ ब्रह्मीं ब्रह्मरूप अवघें क्रियाकर्म ॥ १ ॥ असतां ब्रह्मस्थिति ब्रह्म नव्हे म्हणती ॥ चित्र म्हणे भिंती भेटवा मज ॥ ध्रु० ॥ मनाचें मनपण निखळज्ञान घन ॥ तेंचि मन म्हणे मी झालों अज्ञान ॥ २ ॥ इंद्रियप्रवृत्ति समुळ ज्ञान स्थिति ॥ शेखीं

इंद्रियकर्मी बद्ध झालों ह्मणती ॥ ३ ॥ सोन्याचें पेंडुकें तें तंव नव्हती दगड ॥ चैतन्यघन देहो बद्ध ह्मणती जड ॥ ४ ॥ एका एकपणें जगचि जनार्दन ॥ त्यागु भोगु सहज चैतन्य ॥ ५ ॥

॥ १९५९ ॥ सबाह्य अंतर निर्धुम अग्नि ॥ रजतम जळे इंधनें दोन्ही ॥१॥ न दिसे तेथें राख न दिसे ॥ तेथें राख गुरुराया ॥ ध्रु० ॥ कामक्रोधाची झाली होळी ॥ इंगळी पडली वासना मुळीं ॥ २ ॥ कर्मब्रह्म एक खिचडी केली ॥ अनुभवें जेवितां तृप्ति भुकेली ॥ ३ ॥ विश्व अवघें आपे आपण ॥ राखे गुरुराया सोहं सारून ॥ ४ ॥ राख राख राख सर्वथा ॥ एकाजनार्दनीं नित्य समर्था ॥ ५ ॥

॥ १९६० ॥ देखणें देखतां अवघा परमार्थ ॥ तेथें पाहतां पदार्थ परब्रह्म ॥ दृश्य देखतां स्वानंदें पडे मिठी ॥ परमानंदें सृष्टी हेलावत ॥ १ ॥ पुढें न दिसे कांहीं मागें नसे चित्त ॥ चित्त चेत्याचेस होऊनी ठेले ॥ क्रियाकर्म तेथें सहजें परब्रह्म ॥ भ्रम तो निभ्रम होऊनी ठेला ॥ २ ॥ क्रियमाणें आपण मी नाहीं ह्मणोनी वाहिली आण ॥ ऐसें ह्मणत ह्मणतां प्राण सांडियेला ॥ एकाजनार्दनीं अवघेपणें एक ॥ माया अविद्या दोन्ही परब्रह्म परिपाक ॥ ३ ॥

॥ १९६१ ॥ भक्त ध्यानीं बैसला ॥ पूज्यपूजक स्वयें जाला ॥ १ ॥ कवण देव कवण भक्त ॥ एक दिसे दोहीं आंत ॥ २ ॥ पाहतां पाहतां मुरालें मन ॥ सरलें ध्येय ध्याता ध्यान ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं भावो ॥ देव ह्मणावया नुरे ठावो ॥ ४ ॥

॥ १९६२ ॥ जन्मा भेणें मरण शरणा पैं गेलों ॥ तंव मरणापुढें जन्म आहे ॥ गा ऐसें जाणोनियां मरों विसरलों ॥ जिविताची खुंटली सोय रे या ॥ ध्रु० ॥ १ ॥ जिणें मरणें नाहीं ऐसें केलें देवा ॥ कैसेनी सुलभ सेवा ह्मणों तुझी ॥ जिण्या मरणा आड घालुनी कवाड ॥ भजनेंविण गोड सेवा केली बा ॥ २ ॥ जन्मामरणा दोन्ही युद्ध पैं जालें ॥ तेथें जन्मेंची मरण मारिलें ॥ गा निमालें नी मरणें जन्मासी नासिलें ॥ यश तें कवणासी आलेंरे या ॥ ३ ॥ देवभक्त दोहीं प्रीतीचें वैर ॥ तेथें आवडी गिळियला देवो गा ॥ एकाजनार्दनीं गिळिलेनी देवें ॥ गा भक्ताचा पुसिला ठावोरे या ॥ ४ ॥

॥ १९६३ ॥ पंडीत हो जन देव कवण्याठायीं ॥ आत्मलींग न्याहाळीता देव तोची नाहीं ॥ १ ॥ दगडाचा हा देव दगडाचें देऊळ ॥ दगड पुजीतां कैसा फिटेल संदेह ॥ २ ॥ नानावर्ण गायी एकवर्ण दुध ॥ आह्मी कैचे ब्राह्मण तुह्मी कैचे शूद्र ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं द्वैतभाव नाहीं ॥ आपेआप पाहतां तुह्मी आह्मी नाहीं ॥ ४ ॥

॥ १९६४ ॥ ध्यातों एका गातों एका ॥ आंत बाहेर पाहतों एका ॥ १ ॥ गुणी अवगुणी एका ॥ गुणातीत देखों एका ॥ २ ॥ जनीं एका वनीं एका ॥ निरंजनीं पाहों एका ॥ ३ ॥ सर्वघटीं मठीं एका ॥ जनार्दनकंठीं एका ॥ ४ ॥

॥ १९६५ ॥ नाद विठ्ठल भेद विठ्ठल ॥ शब्द विठ्ठल जाहला ॥ १ ॥ घात विठ्ठल पात विठ्ठल ॥ गात विठ्ठल वदनीं ॥ २ ॥ वर्ण विठ्ठल वक्ता विठ्ठल ॥ श्रोता विठ्ठल श्रवणीं ॥ ३ ॥ टाळ विठ्ठल माळ विठ्ठल ॥ मेळ विठ्ठल कीर्तनीं ॥ ४ ॥ राग विठ्ठल रंग विठ्ठल ॥ संग विठ्ठल वैष्णवीं ॥ ५ ॥ ध्यानीं विठ्ठल मनीं विठ्ठल ॥ एकाजनार्दनीं विठ्ठल ॥ ६ ॥

॥ १९६६ ॥ माझें आणुरेणुव्यापक अवघा हा विठ्ठल ॥ काय ह्मणावा दूर माझें येथेंची पंढरपूर ॥ १ ॥ भक्ती भीमातीर माझा भाव पुंडलीक ॥ आत्मा हा विठ्ठल धुर ॥ २ ॥ विठ्ठलस्मरणें विठ्ठल जालों ॥ नाहीं मना हुरहुर माझे ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं सद्गुरु बोधें भलते ठायीं निस्तूर ॥ माझें येथेंची पंढरपूर ॥ ४ ॥

---

## आत्मप्राप्तीविषयीं अभंग.

॥ १९६७ ॥ उदित आत्मबोधें प्रबोध पैं झाला ॥ देखों जो लागला सकळ एक ॥ १ ॥ जैं सूर्याचें द्योतक मनाचें व्यापक ॥ देखणेंचि देख होउनी ठेला ॥ ध्रु० ॥ उदो ना अस्त नाहीं जये गांवीं ॥ जगदाकारें रवी प्रगटला ॥ २ ॥ जागृती स्वप्न सुषुप्तीचें सूख ॥ अवस्था ते एक होउनी ठेली ॥ ३ ॥ शीव शीव शीव स्वयें स्वलीला ॥ सर्वांगचि डोळा होउनी ठेली ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं [illegible] मात ॥ अभिनव धातु प्रगटला ॥ ५ ॥



॥ १९६८ ॥ आंत बाहेर पाहतों एका ॥ गातों एका ध्यातों एका ॥ १ ॥ सगुणी एका अगुणी एका ॥ गुणातीत देखों एका ॥ ध्रु० ॥ जनीं एका वनीं एका ॥ निरंजनीं देखों एका ॥ २ ॥ संतजना पंढरीये एका ॥ जनार्दनीं आवडे एका ॥ ३ ॥

॥ १९६९ ॥ सद्गुरुबोधें बुद्धि राखतां तेथें त्रिपुटी झाली वावो ॥ कर्ता कार्य कर्म अभिन्न झालें मा संसारासी नाहीं ठावो ॥ १ ॥ आतां आह्मीं काय जी करावें आतां आह्मीं काय जी करावें ॥ जिकडे तिकडे अवघें सच्चिदानंद कांई ध्यावें कांई सजावें ॥ ध्रु० ॥ मुक्त झालों आह्मीं संसारासी नयों हेंही आहांच बोलणें ॥ नेहटुनी पाहतां संसाराची वावोमा कैंचें तेथें येणें जाणें ॥ २ ॥ स्थुळलिंग नव्हें चिन्मात्र मी एक हा साधकाचा शुद्ध भावो ॥ देहीं असतां देहपण नाहीं जीण्या मरण्याची अभावो ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं ऐक्य ह्मणो तंव मुळींच भिन्नत्व नाहीं ॥ गुरुशिष्य दोन्हीं नांवें हरपलीं देहीं असतांचि अविमुक्त पाहीं ॥ ४ ॥

॥ १९७० ॥ गारुडीव्यापार करी साचे ॥ परि सामर्थ्य मंत्राचें ॥ साक्षीं ऐकतां ऐसे ज्ञानाचे ॥ डोळे देखती ॥ १ ॥ खांबसूत्रि बाहुली फिरे ॥ ते सुत्रधारी नाचवी बाहेरी ॥ तो कर्ता असे नेत्रीं ॥ देखतां ज्ञानीं ॥ २ ॥ तैसा ईश्वर मायागुण ॥ उत्पत्ति स्थिति संहारुन ॥ हें मायाचे अंगीं जाण ॥ तो तंव साक्षी ॥ ३ ॥ तो साक्षी आणि अकर्ता ॥ जैसा भूतमात्रीं सविता ॥ तैसी ईश्वराची अदृश्यता ॥ सर्वांसी वर्तवी ॥ ४ ॥ तेथ भूत जे बांधलें ॥ तें अदृष्ट गति वर्तू लागलें ॥ गुरुकृपें मज कळलें ॥ मृत्यु नये ह्मणे ॥ ५ ॥

॥ १९७१ ॥ सोहं तोचि साक्षा मंत्र तोचि दीक्षा ॥ तपाची परीक्षा सांगा मज ॥ १ ॥ सोहं तोचि ज्ञान निवडूनियां खूण ॥ अनुभवज्ञान करावें जी ॥ २ ॥ ऐसे श्रोते विनंतिकरुन ॥ एकाजनार्दन नमस्कारिला ॥ ३ ॥

॥ १९७२ ॥ सोहं नव्हे योग सोहं नव्हे याग ॥ अष्टांग योग नव्हे सोहं ॥ १ ॥ सोहं नव्हे वृत्त सोहं नव्हे तीर्थ ॥ मंत्रादि दीक्षा तें सोहं नव्हे ॥ २ ॥ सोहं नव्हे वेद सोहं नव्हे बोध ॥ सोहंचा आनंद विरळा

जाणें ॥ ३ ॥ सोहं नव्हे वारा नव्हे पंचभूत पसारा ॥ ऐसिया विचारा साधु जाणें ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं आपणासी आपण ॥ साक्षित्व देखणें तेंचि सोहं ॥ ५ ॥

॥ १९७३ ॥ सोहं नव्हे पंचप्राण अंतःकरण चतुष्टय जाण ॥ इंद्रियाचें वर्तन नव्हे सोहं ॥ १ ॥ सोहं नव्हे विषयपंचकें सोहं नव्हे देहत्रय साधक ॥ सोहंचा विवेक विरळा जाणें ॥ २ ॥ साकार जाण माया हंकार पुरुषशिष्य वांयां ॥ सबळ शुद्ध इंद्रिया जाण पैंगा ॥ ३ ॥ स्थूळ सूक्ष्म कारण हा साकारची जाण ॥ हाकार तो माहा कारण ज्ञानरूप ॥ ४ ॥ ब्रह्माविष्णुमहेश्वर हा सबळ पैं साकार ॥ शुद्ध तो हारक ईश्वर पैं गा ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं भूया सोहं ते देवीमाया ॥ साक्ष हे जाण असे श्रोतियां सांगितलें ॥ ६ ॥

॥ १९७४ ॥ दृश्य दृष्टा आटला अहं सोहंका घोट प्याला ॥ साक्षित्व देखना विरळा वस्तुमारी ॥ १ ॥ जो वस्तु जाला केवळ त्याचें अंतर निर्मळ ॥ त्रिगुणाची तळमळ हारपोनी गेली ॥ २ ॥ हारपलें ब्रह्मांड हारपला पिंड ॥ वस्तु जाला अखंड त्यासी खंड नाहीं ॥ ३ ॥ एका एकजनार्दन जें द्वैत गेलें मावळून ॥ मग वस्तु परिपूर्ण भरली असे ॥ ४ ॥

॥ १९७५ ॥ देव धरुनी करी आचार ॥ देव ह्मणत अनाचार ॥ १ ॥ तरी मी काय जी करावें ॥ कैसेनि श्रीहरि भजावें ॥ २ ॥ भजनें देह करीं सोंवळें ॥ देव नातळे ह्मणे ओंवळें ॥ ३ ॥ भजना भज तुझे स्वांगें ॥ देव ह्मणे मी नेघें नेघें ॥ ४ ॥ सर्वांगें भक्तांसी मी गाढा ॥ तें ऐकतां देव पळे पुढां ॥ ५ ॥ एकाजनार्दनाचिये सिद्धी ॥ देहीं सांडा विदेह बुद्धी ॥६॥

॥ १९७६ ॥ जवळिले अवगणिती ॥ दुरीले अतिप्रीति ॥ १ ॥ नवल देवाचें पहा हो ॥ कवणा कळे अभिप्रावो ॥ २ ॥ जवळीला नुपजे भक्ति ॥ दुरीले नित्य स्मरती ॥ ३ ॥ एक द्वारका नित्य स्मरती ॥ एक क्षेत्रा येऊन वीट घेती ॥ ४ ॥ एक साधूतें वंदिती ॥ एक त्यापुढें निंदिती ॥ ५ ॥ वंदी निंदी या समान बुद्धी ॥ एकाजनार्दनीं समान बुद्धी ॥ ६ ॥

॥ १९७७ ॥ कोण मी मज कळतचि नाहीं ॥ सारासार विचारुनि पाही ॥ ध्रु० ॥ नर ह्मणों तरी नारिच भासे ॥ नारी ह्मणों तरी समुळचि

नासे ॥ १ ॥ दास ह्मणों तरी रामचि आहे ॥ राम ह्मणों तरी नाम न साहे ॥ २ ॥ देहगेह हें कर्म सांडुनी ॥ सेजे पहुडले निजसमाधानीं ॥ ३ ॥ पडे श्रीकृष्णवेणुगीत श्रवणीं ॥ वृत्ती उचलली भेटी लागोनी ॥ ४ ॥ जिवीं लागलें हरिचें हें ध्यान ॥ कांहीं केल्या न राहे मन ॥ ५ ॥ प्रेम पडीभरें येतसे स्फुंदन ॥ हरिरूपीं तों वेधलें मन ॥ ६ ॥ लाज सांडोनी जाहलें निर्लज्ज ॥ सासूसासऱ्यासीं नाहीं मज काज ॥ ७ ॥ माय माहेर अंतरलें सहज ॥ हरिरूपीं तो वेधली नीज ॥ ८ ॥ चिदाकाशींचें स्वच्छ चांदणें ॥ कृष्णप्रभाते चंद्र परिपूर्ण ॥ ९ ॥ देह ध्यातां खुले हें ध्यान ॥ एकाजनार्दनीं सहज एकपण ॥ १० ॥

॥ १९७८ ॥ निशेचिया घरा भानु वस्तीसी आला ॥ आंगीचेनि तेजें स्वयें हारपला ॥ १ ॥ बिंबेविण चोख प्रकाश पाही ॥ दिवसनिशा तेथें न चोजवे कांहीं ॥ २ ॥ गगन गिळोनी एक कळा उगविली ॥ आस्तु आस्तु देउनी अमृत वर्षली ॥ ३ ॥ पितामहाचा पिता सुभानु उगवला ॥ एकाजनार्दनीं नाहीं परी एकला ॥ ४ ॥

---

## प्राप्ती.

॥ १९७९ ॥ पाहला तो दिन हरिखाचा आह्मां ॥ सर्वांभूतीं अभिन्न सदां देखो श्रीरामा ॥ १ ॥ काय सांगूं गोविंदा तुझी आवडी ॥ जनीं-वनींनयनीं नीत नवी गोडी ॥ २ ॥ निमिष जैसें वर्ष तैसें आह्मां गोडी ॥ हरिरूप पाहतां हरीखे मनबुद्धि वेडी ॥ ३ ॥ जनवनमन अवघें जालें जनार्दन ॥ एकाएकीं पाहतां तेथें हारपलें मन ॥ ४ ॥

॥ १९८० ॥ हरीखाची गुढी बोधावा आला ॥ अहंकार गर्जतु अविवेकु मारिला ॥ १ ॥ संतोषें विवेक आपआपणीया विसरला ॥ लाजुनी महा हारूष आनंदासी गेला ॥ २ ॥ मारविला क्रोध ममता सती निघाली ॥ तुटला मत्सर शांति सुखें सुखावली ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं पाहतां सहजीं पैं सहजे ॥ स्वराज्य सांग तेथें नाहीं पैं दुजें ॥ ४ ॥

॥ १९८१ ॥ वेणु नादाचीया किळा ॥ पान्हा फुटला निराळा ॥ १ ॥ आर्तभूत जीव तिन्ही ॥ चातक निवाले जीवनीं ॥ २ ॥ स्वानुभवाचे

सरितें ॥ जेवीं जीवना दाटे भरतें ॥ ३ ॥ एकाएक गर्जे घनीं ॥ पूर आला जनार्दनीं ॥ ४ ॥

॥ १९८२ ॥ उपवास पडिले भारी ॥ ती वेदना जाणे हरी ॥ १ ॥ मज जाली नाहीं बाधा ॥ देहीं देखतां गोविंदा ॥ २ ॥ देहींचें दुःख अथवा सुख ॥ भेटों नयेचि सन्मुख ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं सुख ॥ विसरला तहानभूक ॥ ४ ॥

॥ १९८३ ॥ जेथें निरसोनीयां द्वैत ह्मणताती अद्वैत ॥ त्याहुनी अतीत स्वरूप माझें ॥ १ ॥ तें मी लक्ष्याही लक्ष्य पराचेंही पर ॥ जेथें वेदशास्त्रें लाजोनी गेलीं ॥ २ ॥ गिळोनी अज्ञान निखळ ह्मणती ज्ञान ॥ उभयांहुनी भिन्न स्वरूप माझें ॥ ३ ॥ सच्चिदानंद प्रतिपादिती वेद ॥ याहुनी अगाध स्वरूप माझें ॥ ४ ॥ निरसुनीयां कर्म ह्मणती परब्रह्म ॥ याहुनी उत्तम स्वरूप माझें ॥ ५ ॥ माया आणि ममत्व निरसूनी शुद्ध सत्व ॥ सत्वाचें निजसत्व स्वरूप माझें ॥ ६ ॥ जेथें पद आणि पिंड अभिन्न अखंड ॥ याहुनी उदंड स्वरूप माझें ॥ ७ ॥ जेथें शुद्ध आणि शबल ह्मणती केवळ ॥ याहुनी निर्मळ स्वरूप माझें ॥ ८ ॥ ब्रह्म स्फुरण स्फूर्तीचि कारण ॥ याहुनी परतें जाण स्वरूप माझें ॥ ९ ॥ एकाजनार्दनीं एकपणा अतीत ॥ चित्ताचें अचिंत्य स्वरूप माझें ॥ १० ॥

॥ १९८४ ॥ देव जाला पाठींपोटीं ॥ तया नाहीं आटाआटी ॥ १ ॥ जेथें जाय तेथें देव ॥ नाहीं भेदभाव सर्वथा ॥ २ ॥ संसारासी मारुनी लाथा ॥ केला तत्त्वतां देशोधडी ॥ ३ ॥ विषयाचें ठेंचिलें तोंड ॥ मोडिलें बंड पांचांचें ॥ ४ ॥ जनार्दनाचा एका ह्मणे ॥ देवा पाहणें पाठीं पोटीं ॥ ५ ॥

॥ १९८५ ॥ एक विठ्ठल वदतां वाचे ॥ आणिक साचें नावडती ॥ १ ॥ बैसलासे ध्यानीं मनीं ॥ विठ्ठलावांचुनी दुजें नेणें ॥ २ ॥ जावें तिकडे विठ्ठल भरला ॥ रिता ठाव नाहीं उरला ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं भावें ॥ विठ्ठल ह्मणतां पाठीं धांवे ॥ ४ ॥

॥ १९८६ ॥ जाणती हे कळा हारपोनी गेली ॥ वृत्ति मावळली तयामाजी ॥ १ ॥ पहातां पहाणें हारपोनी गेलें ॥ मी माझें सरलें तया-

माजी ॥ २ ॥ अंतर बाहेरीं पहातां शेजारीं ॥ शून्याची वोवरी ग्रासियेली ॥ ३ ॥ ग्रासियेलें तेणें चंद्रसूर्य दोन्ही ॥ एकाजनार्दनीं आनंद झाला ॥ ४ ॥

॥ १९८७ ॥ सत्वरजतम गेले निरसोनी ॥ दृश्याची लावणी कैशी झाली ॥ १ ॥ गेलिया माघारी पाहातां न दिसे ॥ स्वतः तो प्रकाशे सदोदीत ॥ २ ॥ अंतर बाहेरीं पहातां शेजारीं ॥ प्रकाशतां अंतरीं लखलख ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं प्रकाश संपूर्ण ॥ सर्व नारायण बिंबलासे ॥४॥

॥ १९८८ ॥ शून्य निरशून्य तयामाजीं बीज ॥ तया नांव गूज निजवस्तु ॥ १ ॥ जाणण्याचें मूळ अकुळाचें कुळ ॥ अलक्ष्याचें स्थळ तया ठायीं ॥ २ ॥ एकाजनार्दनीं प्रसाद लाधला ॥ जनार्दन वोळला सुखरूप ॥ ३ ॥

॥ १९८९ ॥ चित्त चैतन्या पडली गांठी न सुटे मिठी ॥ संचित कर्माची झाली आटी उफराटी दृष्टी ॥ १ ॥ कैंचा आठव दृश्याचा ॥ खुंटली वाचा उदय झाला सुखाचा ॥ २ ॥ देह विदेह वाढिलें मी तूंपणें ॥ एकाजनार्दनीं सहज एकपणें ॥ ३ ॥

॥ १९९० ॥ वेद तो कल्पिक शास्त्र तें शाब्दिक ॥ पुराण सकळिक बाष्कळची ॥ १ ॥ बाहुली तो जीव सूत्रधारी तो शिव ॥ मिथ्याचि हे भाव जग सर्व ॥ २ ॥ येथें कैचा मुक्त मुळींच नाहीं बद्ध ॥ सर्वहि अबद्ध दिसे जें कां ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं ऐसीयाची खूण ॥ जाणें तोचि धन्य गुरुपुत्र ॥ ४ ॥

॥ १९९१ ॥ आत्मत्वाचे ठाईं सर्व एकाकार ॥ नाहीं नारीनर भेद भिन्न ॥ १ ॥ वर्णाश्रमधर्मज्ञाति कुळगोत ॥ एकाकारी होत आत्मतत्त्वीं ॥ २ ॥ सदोदित पाहे सर्वां ठाईं आहे ॥ एकाजनार्दनीं सोय धरी त्याची ॥ ३ ॥

॥ १९९२ ॥ देखिलें कंदार्पाच्या बापा ॥ आम्हीं नेणो पुण्यपापा ॥ १ ॥ कैचें पाप कैचें पुण्य ॥ देह नामें पडलें शून्य ॥ २ ॥ शून्य ह्मणताती बिंदुलें ॥ तेंचि विश्वाकार झालें ॥ ३ ॥ एका शून्याचा विस्तारु ॥ जनार्दनीं जगदाकारु ॥ ४ ॥

॥ १९९३ ॥ वंदी निंदी मारी ॥ पूजा करी कोणीही ॥ १ ॥ हेंही नाहीं तेंही नाहीं ॥ दोहीं ठायीं वेगळा ॥ २ ॥ देहभोग कांहीं होय ॥ तो तो पाहे परब्रह्म ॥ ३ ॥ अवघें पावे नारायणीं ॥ एकाजनार्दनीं निवाला ॥ ४ ॥

॥ १९९४ ॥ देह पहातां दोषची दिठी ॥ वृत्ति दिसे तैं स्वरूपीं मिठी ॥ १॥ कैसेनी हरिदास भासती ॥ देहीं असे तंव दोष दिसती ॥ २ ॥ देह दिसतां न दिसे भावो ॥ वृत्ति दिसे तंव समाधान पहा हो ॥ ३ ॥ एकाजनार्दनाच्या पाई ॥ वृत्ती दिसे तैं दोष नाहीं ॥ ४ ॥

॥ १९९५ ॥ सहज सहज ऐशा करिताती गोष्टी ॥ परि सहजाची भेटी विरळा जाणे ॥ १ ॥ सहजाच्या आवडीं विद्या अविद्या तोडी ॥ जाणीव नेणीवेची राहूं नेदी बेडी ॥ २ ॥ जाणीवा जाणपण नेणिवा नेणपण ॥ दोहींच्या विंदानें सहजाचें दर्शन ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं जाणीव ना नेणीव ॥ सहज चैतन्यासी देउनी ठेला खेंव ॥ ४ ॥

॥ १९९६ ॥ राम राम ह्मणोनी सदा रडे ॥ जें जें देख साच्या पायां पडे ॥ १ ॥ देख देखत पिसें पाही ॥ आपुलें पारखें नोळखे कांहीं ॥ २ ॥ बोलामाजीं घाली मौनाची मिठी ॥ शून्याही वरील सांगतो गोष्टी ॥ ३ ॥ आपुलीया माथां आपण मारी ॥ याच्या पिसेपणा कोण आवरी ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं पिसा जाला खरा ॥ आपुल्या आपण नाशी शरीरा ॥ ५ ॥

॥ १९९७ ॥ मनाचे माथां घातिला धोंडा ॥ वासना कापुनी केला लांडा ॥ १ ॥ जनीं लांडा वनीं लांडा ॥ वासना रांडा सांडियलें ॥ २ ॥ वासना सांडोनी जालों सांड्या ॥ कामना कामिक ह्मणती गांड्या ॥ ३ ॥ कामना सांडे विषयीं लाताडें ॥ एकाजनार्दनीं तयाची चाड ॥ ४ ॥

॥ १९९८ ॥ मन रामीं रंगलें अवघें मनचि राम जालें ॥ सबाह्य अभ्यंतरीं अवघें रामरूप कोंदलें ॥ १ ॥ चित्तचि हारपलें अवघें चैतन्य जालें ॥ देखतां देखतां अवघें विश्व मावळलें ॥ पहातां पहाणें सर्वस्वें ठकविलें ॥ २ ॥ आत्मया रामाचें ध्याना लागलें कैसें ॥ क्रियाकर्मधर्म अवघे येणेंचि प्रकाशे ॥ सत्यमिथ्या प्रकृतिपुरुष रामचि अवघा भासे

॥ ३ ॥ भक्ति अथवा ज्ञान शांति आणि योगस्थिति ॥ निर्धारितां न कळे रामस्वरूपीं जडली वृत्ति ॥ एकाजनार्दनीं अवघा रामची आदि-अंतीं ॥ ४ ॥

॥ १९९९ ॥ राम हें माझें जिवीचें जीवन ॥ पाहतां मन हें जालें उन्मन ॥ ध्रु० ॥ साधन कांहीं नेणें मी अबला ॥ शाम हे वीजु वैसलेंसे डोळां ॥ १ ॥ लोपल्या चंद्रसूर्याच्या कळा ॥ तो राम माझा जीवींचा जिव्हाळा ॥ २ ॥ प्रकाश हा दाटला दाही दिशा ॥ पुढें वो मार्ग न दिसे आकाशा ॥ ३ ॥ खुंटली गति श्वासा वो उश्वासा ॥ तो राम माझा भेटेल वो कैसा ॥ ४ ॥ यासी हो साच परिसा हो कारण ॥ शरण एकाजनार्दन तेणें तेंची साधन ॥ ५ ॥

॥ २००० ॥ गुरुकृपा मै ऐसी पायी ॥ सब तीरथमो रे पास ही भाई ॥ १ ॥ ज्यांहा ज्याऊ तांहा बारानसी ॥ ज्यांहा राहू तांहा कासी बासी ॥ २ ॥ काशी छांड हम दूर गयों ॥ मोहो छांडो हम कासी रहो ॥ ३ ॥ दर्सन करो ताहां बिश्वेश्वर पायो ॥ ज्यांहा न्हाहो तांहा बिंदु-माधवो ॥ ४ ॥ एकाजनार्दन साचे शरना ॥ ज्यांहा रहो तांहा काशी-पुरना ॥ ५ ॥

॥ २००१ ॥ बहु बोलाचें नाहीं कारण ॥ मी देह भक्त आत्मा जाण ॥ १ ॥ माझा देह शरीर जाण ॥ भक्त आंत पंच प्राण ॥ २ ॥ नांदे सहज भक्त आंत ॥ मी देह भक्त देहातीत ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं भक्त ॥ देवपणा मी भक्तांकित ॥ ४ ॥

॥ २००२ ॥ गो गोरसातीत स्वानंद साखरेसी ॥ प्रेमें पेहे पाजीन सख्या सोयऱ्यांसी ॥ १ ॥ घेई घेई बाळा घोट एक ॥ म्हणी पायरव होईल कुशलीं पडे तर्क ॥ २ ॥ दृश्य न दिसे तें काळीं अवघें लावी होटीं ॥ सद्युक्तीचे शिंपीवरी गिळी तैसें घोटी ॥ ३ ॥ अंतर तृप्त जालें सबाह्य कोंदलें ॥ निज गोडीये गोडपणें चिन्मय जालें ॥ ४ ॥ सद्गुरु माउली पेहे पाजी अंगीं भरला योग ॥ तेणें देहबुद्धि समूळ केला त्याग ॥ ५ ॥ पंच-भूतांचें अंगुलें सुवर्ण हारपलें ॥ माझें माझें ह्मणत होतें त्या गुणा विसरलें ॥ ६ ॥ आर्तीची हारली भूक जालें सुख ॥ निजानंदीं पालखीं पहुडलें

स्वात्मसुख ॥ ७ ॥ पेहे पाजायाचे मिषें देतसे पुष्टि तुष्टि ॥ एका सामावला जनार्दना पोटीं ॥ ८ ॥

॥ २००३ ॥ आवडी उठिला भावो भक्तें गिळिला देवो ॥ देवें खादला देहो भजत याचा ॥ १ ॥ देवो ना भक्तु बद्ध ना मुक्तु ॥ उदो ना अस्तु अस्तु जाले ॥ ध्रु० ॥ सगुणी अगुण कर्माकर्म गुण ॥ तेंचि निर्गुण करूनि ठेलें ॥ २ ॥ एकाजनार्दनीं एकपण नुरे ॥ एकी एकपण अवघेचि मुरें ॥ ३ ॥

॥ २००४ ॥ क्षयासी क्षय व्याधि उपाधि गिळीला विधी ॥ देहीं देहबुद्धी हारपली ॥ १ ॥ मरणा मरण आलें जीणे जीवें गेलें ॥ जीवाचें खुंटलें जीवपण ॥ ध्रु० ॥ यमें यमीला यमु दमें दमिला दमु ॥ नेमें नेमिता नेमु मावळला ॥ २ ॥ एकाजनार्दनीं संसारासी शून्य ॥ जन्म मरण तेथें कैचें पाप पुण्य ॥ ३ ॥

॥ २००५ ॥ पीसेपणें झाला साचा ॥ मौन पडिलें चहु वाचां ॥ १ ॥ गणितां नयेचि आंखा ॥ अमिष पाहिलें देखा ॥ २ ॥ सळे नव्हें कवणे परी ॥ शिणले यापरी चारी ॥ ३ ॥ मापी भरितां तेखिरे ॥ मोविते त्यामाजी वीरे ॥ ४ ॥ उमाणितां मन मुरे ॥ सोहंभाव तेथें नुरे ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं आंतु ॥ न निघे झाला अनंतु ॥ ६ ॥

॥ २००६ ॥ बोलणेंचि नेणो केलें काय ॥ मन पांगुळलें नुचलती पाय ॥ १ ॥ मनेसी आस दाविली वास ॥ स्वयं सिद्ध ॥ ध्रु० ॥ आस निरास ठाई ॥ मनचि कंटाळलें संकल्प नाहीं ॥ २ ॥ मनाचे मारक दाविले दृष्टी ॥ एकाजनार्दनीं बोधाच्या गोष्टी ॥ ३ ॥

॥ २००७ ॥ ऐके गे सखये या सद्गुरूची खुण ॥ येथें जो रातला त्याचें धन्य जीवन ॥ १ ॥ या सुमनाचे सेजें निजी निजियले जाण ॥ तेथें ध्येय ध्यान खुंटलें हारपलें मन ॥ २ ॥ आणिक एकी खुण या सद्गुरूची भिन्न ॥ सर्वां घटीं खेळ त्याचा परि सर्वां अलिप्त जाण ॥ ३ ॥ पैल निरालंबी कृपा करूनि सांगे गोष्टी ॥ तात्काळ मोडे प्रपंच दृष्टी ॥ ४ ॥ तयाची म्यां धरिली कास ॥ झाली दासी जीवें भावें ॥ ५ ॥ जें बोले वचनीं तें दावी नयनीं ॥ एकाजनार्दनीं बोध ऐसा ॥ ६ ॥

॥ २००८ ॥ गुरुरायें दाखविली खुण ॥ देखण्या परता राहिलों जाण ॥ पाहणें राहिलें सरलें कारण ॥ आनंदुचि तेथें एक अनुभव कवण ॥ १ ॥ आतां मी सांगों कवणासी काय ॥ ते त्वां पुसतां वाचा कोठें राहे ॥ वाच्य वाचक वचन रितें केवी राहे ॥ अनुभव निजशब्दें आनंदुचि होये ॥ ध्रु० ॥ आत्माराम देखतां थोर होय सुख ॥ सुखासुखपण नुरेची देख ॥ उरी नुरे दोन्ही मावळली निःशेष ॥ अनुभव विराला आनंदुचि एक ॥ २ ॥ मनें मना धरियली सोय ॥ परतोनि कैसेनि मुळासी जाय ॥ मूळ डाळ एक करूनी राहे ॥ अहंभाव विसरला निजीं धरी सोय ॥ ३ ॥ आनंदु बोलतां शब्दीं नातुडे ॥ श्रवणीं ऐकतां श्रोताचि बुडे ॥ डोळा पाहतां अगाध पडे ॥ अनुभव चिंतितां मनचि बुडे ॥ ४ ॥ ऐसा हा अलभ्यलाभ लाधला जाण ॥ त्यासी मी तूं प्रकाश करणें ॥ एकाजनार्दना शरण ॥ ऐक्यें आनंदुचि पूर्ण ॥ ५ ॥

॥ २००९ ॥ उत्तम पुरुषांचें उत्तम लक्षण ॥ जेथें भेद शुन्य सकळहि ॥ १ ॥ भेद शुन्य झाला बोध स्थिरावला ॥ विवेक प्रगटला ज्ञानमय ॥ २ ॥ जिकडे पाहे तिकडे उत्तम दरुषण ॥ दया शांती पूर्ण क्षमा आंगीं ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं उत्तम हेचि प्राप्ति ॥ जेथें द्वैताद्वैत मावळलें ॥ ४ ॥

॥ २०१० ॥ येणें देहें मीपण येणें देहें तूं पण ॥ विदेहीं देहपण पारुषलें वा ॥ १ ॥ तयाही वरते न घोंटे बोला ॥ या लागीं नेला नेती ह्मणोनी ॥ ध्रु० ॥ अद्वैत सुखें मनचि जाणणें ॥ मन मुरालिया सुख कवण ह्मणे ॥ २ ॥ एकाजनार्दनु बोलाचि नांवें ॥ पाहतां अनुभवें एक नुरे ॥ ३ ॥

॥ २०११ ॥ क्षरम्यानें अक्षर अचेत चेतवे ज्ञानि ॥ दुःखकार जमाना ज्याहावो सुख देखो नयनीं ॥ १ ॥ तेरे गुण सुनकर देखणेकु आई ॥ तुजम्यानें मई गलीकर मुजमे तुज पाई ॥ ध्रु० ॥ ज्ञान रूपयो अक्षर अनुश्रृत आनंद ॥ सबरा भरीत पाया हे विश्व कहणा अबुध ॥ २ ॥ विश्व देखो वो सुता हाय न देखवो जागता ॥ एकाजनार्दनकृपा सच्चिदानंद दाता ॥ ३ ॥

॥ २०१२ ॥ आवो तो आर्ति म्यां देखिला वो नयनीं ॥ तेणें जीव्हार भेदले खडतरूनी ॥ अवस्था लागली वो आन नाहीं मनीं ॥ तोहा

पाहुनी आणागे भरंवसेनि ॥ १ ॥ त्याची सांगाकां मजलागुनी कहाणी ॥ माझिया जीवाची तूंचियो साजणी ॥ क्षणभर एकांतीं त्यासी आणा हो पाहुनी ॥ नाहींतरी जीवित्व न राहे वो निर्वाणी ॥ २ ॥ तो तूं पुससी वो काय कैसा आहे ॥ बोले बोलावे तो तैसा नव्हेगे माये ॥ आंतु बाहेरी गगन शोधुनि पाहे ॥ एकवेळ भेटी तेणें समाधान होय ॥ ३ ॥ आठीं भावीं आलंगीलें मज लागुनि ॥ वाचा पारुषली मिठी पडली मौनी ॥ ऐक्य भोगीलें द्वैत चोळी फेडुनि ॥ एका शरण सावध जनार्दनीं ॥ ४ ॥

॥ २०१३ ॥ दरुणकी चटकी बाजार माहि चेली ॥ गुरुके बचनो अशक हुई भली ॥ नजरा नजर देखे एक जागा मिली ॥ देखणे देखते सो आपेआप भुली ॥ १ ॥ एहिले वस्ताद पद ॥ ये बोहिले स्वानंद कंद ॥ द्रव्य दारा देहगेह ॥ सोडदे मायाके फंद ॥२॥ निजबोध प्याला पिवते वा हुई भाई मस्त ॥ सच्चिदानंदकंद हुवे मस्ती म्यानें दस्त ॥ चटकीनें दुनिया गवाई भाई मुफ्त ॥ एकाजनार्दन सिरपर रखे हात ॥ ३ ॥

॥ २०१४ ॥ सुरस रस फावलारे ॥ अभिनव रस फावलारे ॥ नामाति हा हरिभक्ति रसें नवरसरे ॥ ध्रु० ॥ तुझेनि रसें रस लागला अति गोड ॥ तेणें जीऊ विसरला विषय कोड ॥ १ ॥ एका एकपणें सहजीं सहज भेटे ॥ एकाजनार्दनीं सुखी सुख निकट नेटे ॥ २ ॥

॥ २०१५ ॥ सचित मेहो निसीयेच्या भरा ॥ पाहो गेलों तंव प्रकाशाच्या धारा ॥ १ ॥ वांकडी लागलीरे वांकडी लागली हो ॥ अनुभव वांकडी लागली हो ॥ ध्रु० ॥ बोल किंवा हवनीं पाहावें कैसें ॥ धरा विरालीमां पाहणें न दिसे ॥ २ ॥ अखंड वरुषतां कोंदलें आप ॥ चराचर तेणें जाहले अपरूप ॥ ३ ॥ स्वानुभवाचे उथळले आर्णव ॥ पाहों गेलों तंव जाहलें एकार्णव ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं वांकडी ऐसी ॥ अहं सोहं दोन्ही विरालीं पाउसीं ॥ ५ ॥

॥ २०१६ ॥ आपणचि नारी आपणचि नरू ॥ आपणचि संसारु नहोनी दावी ॥ १ ॥ तो एक संसारी तो एक संसारी ॥ नसोनी घरीं नांदतुसे ॥ ध्रु० ॥ न करोनी भरोवरी सर्वां सर्व करी ॥ न धरुनियां धरी धरादिकें ॥ २ ॥ नहोनियां जनजनीं जनार्दन ॥ एका एकपण अवघेचि आपण ॥ ३ ॥

॥ २०१७ ॥ मीपणें श्लाघ्यजोनी पोटीं ॥ मीपणा मी गेलों भेटी ॥ भेटतां मीपणा तुटी ॥ माझेनि मज ॥ १ ॥ मीपण न भेटे मज ॥ जीव झाला निर्लज्ज ॥ अक्षयी अधोक्षज ॥ होऊनि ठेला ॥ ध्रु० ॥ मीपण माव-ळलें देहीं ॥ देह झाले विदेही ॥ एकाजनार्दनीं देह ॥ विदेह नाहीं ॥ २ ॥

॥ २०१८ ॥ प्रसादा जाऊनी ॥ देवदर्शन घेऊं ॥ तंव देवळाभरी देवो ॥ कोंदाटला ॥ १ ॥ आतां कवण स्तवन करी ॥ कवणातें नमस्कारी ॥ सबाह्य अंतरीं ॥ देव भरला ॥ ध्रु० ॥ देउळाआंत बाहेरी ॥ आपणाही भीतरीं ॥ निजस्वरूपें श्रीहरी ॥ पूर्ण झाला ॥ २ ॥ एकाजनार्दनीं ॥ जगचि ब्रह्म पूर्ण ॥ पूज्य पूजक तेथें ॥ आपणिया आपण ॥ ३ ॥

॥ २०१९ ॥ श्रुति शब्द ताळ घालुनि मागें ॥ तया पुढें पुढें आपण रिघे ॥ १ ॥ अपछंद पाहे अपछंद पाहे ॥ मुकीयापुढें गीत गाय ॥ ध्रु० ॥ गातां गातां मुके पांगुळे ॥ सर्वांगीं तया निघती डोळे ॥ २ ॥ कान नाहीं परी कीर्तनीं तोखे ॥ अपछंदी जाला तेणें हरिखें ॥ ३ ॥ अपछंदें कैसा लागला छंद ॥ ज्यातें देखे सातें म्हणे गोविंद ॥ ४ ॥ गीत गातां जग अपमानीं ॥ अपछंदी जाला एकाजनार्दनीं ॥ ५ ॥

॥ २०२० ॥ देह न देखतां चाले कौतुकें ॥ आपणा माझारी आपण तोखे ॥ १ ॥ कवण जाणे कवण पडला गोंधळीं ॥ न संटे उकळी आनं-दाची ॥ ध्रु० ॥ मन हरवुनि हरिखें जेत पोटीं ॥ शून्याही परती पडियली मीठी ॥ २ ॥ निरंजनीचें लेईलों अंजन ॥ जिकडे पाहे तिकडे एका-जनार्दन ॥ ३ ॥

॥ २०२१ ॥ गुरु ना शिष्य शिष्य ना गुरु ॥ झुंजताती जैसे वीरू ॥ १ ॥ गुरुनें शिष्यासी जीवें मारीलें ॥ शिष्यानें गुरुसी सगळेंची गिळीलें ॥ २ ॥ गुरुपत्नी भोगी शिष्याचा राणा ॥ एकाजनार्दनीं जाणतो खुणा ॥ ३ ॥

॥ २०२२ ॥ लटिकाचि भावो लटिकाचि देवो ॥ लटिकाचि पाहावो नटतुसे ॥ १ ॥ लटिके हरीदास लटिके हरिदास ॥ लटिके हरीदास झालों आह्मी ॥ ध्रु० ॥ लटिकेंचि ज्ञान लटिकेंचि ध्यान ॥ लटिकेंचि साधन दावि-तुसे ॥ २ ॥ लटिकी मिरवी काया लटिकी निरसी माया ॥ लटिकी मुक्ति वांयां वाढविली ॥ ३ ॥ लटिकाचि आचार लटिकाचि विचार ॥ लटिका

कुळाचार चालवणें ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं लटिकाचि झाला ॥ लटिक्या नामरूपा मुकोनियां ठेला ॥ ५ ॥

॥ २०२३ ॥ अपछंदी झाला सांगों मी काय ॥ आपणापुढें आपण गाय ॥ १ ॥ अगुणाचा पाहीं अगुणाचा पाही ॥ सगुणाची सोई सांडुनियां ॥ २ ॥ देखत देखत देहाची चोरी ॥ मग काढिखाचे गुण विदारी ॥ ३ ॥ अहं सोहं दोन्ही सोडिल्या गांठी ॥ नेले ह्मणे जातां गिळील्या गोठी ॥ ४ ॥ जें जें भेटे तें तें सबाह्य चोरी ॥ जग नाडिलें कवण धांवा करी ॥ ५ ॥ गाऱ्हाणें देतां गिळीला जनु ॥ अगुणाचा जाला एकाजनार्दनु ॥६॥

॥ २०२४ ॥ मुखीं चारा घालिना स्तनपान नेदी ॥ पांसोवया दुखविती ॥ कुर्मी पाकोवांचे निरीक्षणें ॥ पोषण गर्भाधासी नव्हे तृप्ती ॥ १ ॥ डोळे माझे तान्हेले ॥ कीं जळेंचि वोळले ॥ डोळिया डोळे दुभीनले ॥ रसनेविण कैसें स्वादन देहेवीण पुष्ट झालों ॥ २ ॥ दुरीचीया दुरी दों लक्षांतरीं ॥ चकोरा कुमुदा जीव्हाळा ॥ डोळियाचे भूमिके पीयुषाचा मेघुला ॥ देखणें दृष्टी वोळला ॥ ३ ॥ दुरी ना जवळी जवळी ना दुरी ॥ इंद्रिया व्याप्त अलिप्त ॥ पितामहाचा पिता सुभानु उगवला ॥ एका एके जनार्दनें तृप्त ॥ ४ ॥

॥ २०२५ ॥ पाहात पाहतां कैसें पाहाणें देखिलें ॥ जनवन परब्रह्म जाले ॥ १ ॥ हारे जनीं देखीला जनार्दन ॥ जीवाजीव समाधान ॥ ध्रु० ॥ एकाजनार्दनीं एकाकी एकला ॥ एकानेक स्वयें तोचि झाला ॥ २ ॥

॥ २०२६ ॥ जिवलग सोयरा त्या भेटी गेलीये ॥ खेंवामाजी कैसी मीही ठेलीयें ॥ १ ॥ नवल भेटी याचें विपरीत करणें ॥ आपण नामीं ऐसें केलें वो येणें ॥ पितामहाचा पिता भानुदास देवा ॥ एकाजनार्दनीं एकपणें गोवा ॥ २ ॥

॥ २०२७ ॥ बाईलेच्या अंगा देवता आली ॥ घुमघुमो खेळ जे खेळे ॥ केश जे मोकळे मोडित डोळे ॥ घरधणी पायीं लोळे ॥ १ ॥ उं ह्मणो नये चूं ह्मणो नये ॥ बाईल ह्मणो नये आई ॥ माझे मनोरथ पुरवी वो देवते ॥ बाईले बाईलपण देई ॥ ध्रु० ॥ एकाजनार्दन वर्तता देहीं ॥ जनार्दन भेटला पाहीं ॥ जनजनार्दन एकत्वा आले ॥ देहविदेह दोन्ही नाहीं ॥ २ ॥ देहीं

नव्हे ह्मणावे ते काई ॥ एकाजनार्दनाचें एकपण ॥ वेदशास्त्रा न पडे ठायीं ॥ ३ ॥ देहीं ह्मणो तंव देहबुद्धी नाहीं ॥ देहीं वर्ततां केवी विदेही ॥ इंद्रियें कर्म करूनियां ॥ एकाजनार्दन नित्य पाही ॥ ४ ॥

॥ २०२८ ॥ देखीलें ह्मणोंतरी नव्हे तें दृष्य ॥ नाहीं ह्मणों तरी सिद्ध प्रत्येक ॥ १ ॥ यापरी याचें देखणें आहे ॥ सर्वांग देखणा होऊनियां पाहे ॥ २ ॥ एकाजनार्दनीं पाहते आटे ॥ दिसते गिळुनियां न दिसे ते भेटे ॥ ३ ॥

॥ २०२९ ॥ देहीं सबाह्य व्यापक रामु ॥ देहभरणीं फीटला भ्रमु ॥ १ ॥ आह्मा आहेचि नाहीं जाहलें ॥ असो जाव काय बोलोबोले ॥ ध्रु० ॥ दोरी सर्पाचा अभासु ॥ साप न मरतां दोर साचु ॥ २ ॥ स्वप्नीं स्वदेह बिंबला ॥ तो जागृति देहो काय झाला ॥ ३ ॥ ज्ञानदृष्टी अवघें काय ब्रह्म ॥ जग वांटुनि केलें काय सम ॥ ४ ॥ व्याप्य व्यापक ये दोन्ही ॥ नाहीं देहींची अवघा राम पाही ॥ ५ ॥ देहीं असतांची देह नाहीं ॥ देह गेलीया विदेह कांई ॥ ६ ॥ एकाजनार्दनीं एक झाले ॥ ते देहचि कैवल्या आले ॥ ७ ॥

॥ २०३० ॥ दृश्य दृष्टा दर्शन मांदिसारा ॥ राउळ पातले समाधि सेजारा ॥ १ ॥ बळीये पायबळीये पायधरा तरिली॥ चालिजे रामराय॥ध्रु०॥ पायघडिया घालुनि कैसा काय ॥ विश्वपायीं चालिजे श्रीराणेराय ॥ २ ॥ भावार्थाचा धरूनि हातें हात ॥ एकाजनार्दन आला सेजारांत ॥ ३ ॥

॥ २०३१ ॥ आजीचा दिवस आह्मा जाला आनंदु ॥ विश्वींविश्व प्रगटला आत्मा गोविंदु ॥ १ ॥ पाहिलें वो माय सांगुं मी कैसें ॥ जेथें पाहे तेथें गोविंदचि दिसे ॥ ध्रु० ॥ पाहातें पाहाणें तटस्थ ठेलें ॥ सबाह्य अंतर पुरुषोत्तम कोंदलें ॥ २ ॥ यापरी पाहतां हर्ष होतसे मना ॥ एकाजनार्दनीं धणी न पुरे मना ॥ ३ ॥

॥ २०३२ ॥ बुडालिये हांडीं येतील तांदुळ ॥ वरिलिये हांडींये मोहरिया ॥ वाचे कानीं नागुलें कीं ॥ १ ॥ नाचरे पोटा सुकाळ झाला मोठा ॥ परब्रह्माच्या पिकल्या पेंठा ॥ भक्तिचे चोहटा ॥ आनंदु ॥ ध्रु० ॥ मायबाप एक झालीं दोन्हीं ॥ स्वानंदाची उघडली खाणी ॥ चैतन्याची

आली भरणी ॥ इंद्रियाची पुरली धणी ॥ २ ॥ अहंसोहं जीवा जीवनीं बुडी ॥ चित्तीं चैतन्याची लागली गोडी ॥ एकाजनार्दनीं तृप्ती गाढी ॥ बाहेर भीतरीं नुरे सवडी ॥ ३ ॥

॥ २०३३ ॥ चला बाई वृंदावनीं रासक्रीडा पाहूं ॥ नंदाचा बाळ येणें केलें नवलाऊ ॥ १ ॥ कल्पनेची सासू इचा बहुतचि जांचु ॥ देह भाव ठेऊनी पायीं हरीरूप होसी ॥ २ ॥ एकाजनार्दनीं विश्वव्यापक हा देव ॥ एक एक पाहतां अवघें स्वप्नवत पाप ॥ ३ ॥

॥ २०३४ ॥ रघुवीर स्मरणें चित्त माझें रंगलें वो बाई ॥ आसनीं शयनीं भोजनीं त्याविण आणिक न रुचे काई ॥ १ ॥ जीवीचें जीवन माझें त्रैलोक्याचें सुख ॥ त्यासी पाहतां सर्व हरली तहानभुक ॥ ब्रह्मानंदें नाचुं लागे निरसुनी गेलें दुःख ॥ २ ॥ दिनबंधु सखा जीवलग अयोध्येचा राजा ॥ निर्वाणीं संकटीं धांवे भक्ताचिया काजा ॥ कनवाळु तोचि प्राण विसांवा माझा ॥ ३ ॥ शामवर्ण गोमटी गळां वैजयंती माळा ॥ वामांगीं घवघवीत शोभे जनकाची बाळा ॥ एकाजनार्दनीं तो म्यां राम देखिला डोळां ॥ ४ ॥

॥ २०३५ ॥ आलिया अतीता द्यावें अन्नदान ॥ याहुनी साधन आणिक नाहीं ॥ १ ॥ ज्ञातीसी कारण नाहीं पैं तत्वतां ॥ असों पैं भलता अन्न द्यावें ॥ २ ॥ अन्न परब्रह्म वेदांतीं विचार ॥ साधी हाचि निर्धार प्रेमतत्वें ॥ ३ ॥ ह्मणे जनार्दन या परतें आणिक ॥ नाहीं दुजें देख एकनाथा ॥ ४ ॥

॥ २०३६ ॥ सर्वाभूतीं भाव नको ठेवूं दूजा ॥ तेणें गरुडध्वजा समाधान ॥ १ ॥ संतांसीं नमन आलिया अन्नदान ॥ या परतें कारण आणिक नाहीं ॥ २ ॥ सर्वभावें वारी पंढरीची करी ॥ आणिक व्यापारीं गुंतूं नको ॥ ३ ॥ ह्मणे जनार्दन घेई हाची बोध ॥ सांडोनी सर्वदा द्वेषभेद ॥ ४ ॥

॥ २०३७ ॥ आपुलीच दारा जरी टेके व्यभिचारा ॥ क्रोधाचा थारा अंतरीं नये ॥ १ ॥ आपुलेंच धन तस्करें नेतां जाण ॥ जयाचें मन उद्विग्न नव्हे ॥ २ ॥ आपुलाची पुत्र वधोनी जाय शत्रु ॥ परी मोहाचा पाझरु नेत्रीं नये ॥ ३ ॥ आपुलें शरीर गांजितां परनरें ॥ परी शांतीचें घर चळों नेदी ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं जया पूर्ण बोधु ॥ तोची एक साधु जगामाजीं ॥ ५ ॥

॥ २०३८ ॥ रामराम स्मर पुरुषोत्तम रे ॥ सहज विद्या ज्ञेय ज्ञान हाही अविद्या धर्म रे ॥ १ ॥ अहंआत्मा हेंही न साही सर्व क्रिया भ्रम रे ॥ विजनवन निरंजन जनार्दन रे ॥ २ ॥ अगम्य गति ध्येय ध्यान साधन बंधन रे ॥ एकाजनार्दनीं एका स्वानंद परिपूर्ण रे ॥ ३ ॥

॥ २०३९ ॥ पांथस्थ घरासी आला ॥ प्रातःकाळीं उठोनी गेला ॥ १ ॥ तैसें असावें संसारीं ॥ जैशी प्राचीनाची दोरी ॥ २ ॥ बाळीं घराचार मांडिला ॥ तो सवेंची मोडुनि गेला ॥ ३ ॥ एका विनवी जनार्दना ॥ ऐसें करी गा माझ्या मना ॥ ४ ॥

॥ २०४० ॥ जया म्हणती नीच वर्ण ॥ स्त्री शूद्रादि हीन जन ॥ १ ॥ सर्वां भूतीं देव वसे ॥ नीचाठायीं काय नसे ॥ २ ॥ नीच कोठोनी जन्मला ॥ पंचभूतांवेगळा जाला ॥ ३ ॥ तया नाहीं कां जनन ॥ सवेंचि होत पतन ॥ ४ ॥ नीच म्हणोनी काय भुली ॥ एकाजनार्दनीं देखिली ॥ ५ ॥

॥ २०४१ ॥ कैचें सुख कैचें दुःख ॥ कैचा बंध कैचा मोक्ष ॥ १ ॥ कैचा देव कैचा भक्त ॥ कैचा शांत कैचा अशांत ॥ २ ॥ जन नोहे जनार्दन ॥ एकाजनार्दनीं भजन ॥ ३ ॥

॥ २०४२ ॥ ज्ञानीया तुम्ही म्हणाल कैसा ॥ तरी परियेसा तयाची दशा ॥ देहीं देहभाव ठसा ॥ आत्मा ऐसा पैं केला ॥ १ ॥ बाह्य अंतर ज्ञान अज्ञान ॥ ऐसें द्वैताचें देखे स्वप्न ॥ विषयभोगीं न रिघे मन ॥ नित्य सावधान होऊनी असे ॥ २ ॥ सोहं ध्यानें दृढावला ॥ निखिल परब्रह्म स्वयें झाला ॥ तेथें अहंभाव उरला ॥ तो ओळखिला ज्ञानियानें ॥ ३ ॥ मी एक आत्मा ऐसें म्हणे ॥ तरी काय असे दुजेपणें ॥ मग आत्मअहंकार सांडणें ॥ तें वेळे उरणें चिन्मात्र ॥ ४ ॥ तेथें सुख भोगणें कैसें भोगिजे ॥ करीं घेउनियां मुखीं घालिजे ॥ ऐसें न होय तेथें विसरिजे ॥ भोग भोगिजे भोक्तिया ॥ ५ ॥ यालागीं एकाजनार्दना शरण ॥ त्याची कृपा परिपूर्ण ॥ भोग भोग्य भोक्तेपण ॥ गेले जन्म मरण स्वप्नीं नाहीं ॥ ६ ॥

॥ २०४३ ॥ भगवद्भक्त अतिविरक्त योगयुक्त जीव शीवा ॥ शुद्ध बुद्ध नित्य युक्त आतुडले अनुभवा ॥ देहभाव रूप नाम विगतभाव पूर्ण

सद्भावा ॥ १ ॥ ज्ञेय ज्ञान ध्येय ध्यान अप्रमाण साधन ॥ चैतन्यघन विश्व उण खुण ते नेणें ॥ सच्चित्सुख अलौकिक सहजि सहज पावणें ॥ ध्रु० ॥ प्रणवादि वर्ण भेद हारपले चाऱ्ही वेद ॥ वेद विद चकीत बोध स्वरूप शुद्ध एकलें ॥ देह देहीं हेही नाहीं ब्रह्मीं ब्रह्म कोंदलें ॥ एकाजनार्दनीं एक जीवीं जिवन मीनलें ॥ २ ॥

॥ २०४४ ॥ आले आले हरिचे दास ॥ मुखीं रामनामघोष ॥ तोडोनियां भवपाश ॥ जीवन्मुक्त ते ॥ १ ॥ वैराग्याचें कवच अंगीं ॥ नाचताती प्रेमरंगीं ॥ ज्ञानशस्त्र ते निःसंगीं ॥ छेदिती संग ॥ २ ॥ अनुभव तीक्ष्ण शर ॥ सोडिताती निरंतर ॥ वर्मीं खोंचले ते वीर ॥ क्रोधादि असुर ॥ ३ ॥ सांडोनी देहाभिमान ॥ तेची जीवन्मुक्त जाण ॥ एकाजनार्दना शरण ॥ रामकृष्ण जपताती ॥ ४ ॥

॥ २०४५ ॥ धन्य जगीं तोचि एक हरिरंगीं नाचे ॥ राम कृष्ण वासुदेव सदा स्मरे वाचें ॥ १ ॥ सुखदुःख समान सकळ जीवांचा कृपाळ ॥ ज्ञानाचा उद्बोध भक्ति प्रेमाचा कल्लोळ ॥ २ ॥ विषयीं विरक्त जया नाहीं आपपर ॥ संतुष्ट सर्वदा स्वयें व्यापक निर्धार ॥ ३ ॥ जाणीव शहाणीव ओझें सांडोनियां दूरी ॥ आपण वस्तीकर वर्ततसे संसारीं ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं नित्य हरीचें कीर्तन ॥ आसनीं शयनीं सदा हरीचें चिंतन ॥५॥

॥ २०४६ ॥ सर्वांभूतीं दिसे देव ॥ जया ऐसा अनुभव ॥ १ ॥ तया चित्तीं देव वसे ॥ जिकडे पाहे तिकडे दिसे ॥ २ ॥ देव जन देव विजन ॥ देवीं जडलें तन मन ॥ ३ ॥ देव घरीं देव दारीं ॥ देव दिसे व्यवहारीं ॥ ४ ॥ देव काम देव धंदा ॥ देवीं पावला स्वानंदा ॥ ५ ॥ देव मागें देव पुढें ॥ दृष्टी चैतन्य उघडें ॥ ६ ॥ माता देव पिता देव ॥ देवरूप स्वयमेव ॥ ७ ॥ देव बंधु देव जाया ॥ देव रूप अवघि माया ॥ ८ ॥ देव गुणी देव निर्गुण ॥ गुणातीत देव जाण ॥ ९ ॥ देवावीण कांहीं नाहीं ॥ ऐशी ज्याचि दृष्टी पाही ॥ १० ॥ एकाजनार्दनीं देव ॥ सहज चैतन्य स्वयमेव ॥ ११ ॥

॥ २०४७ ॥ पाहों गेलों देवालागीं ॥ देवरूप झालों अंगीं ॥१॥ आतां मीतूंपणा ठाव ॥ उरला नाहीं अवघा देव ॥ २ ॥ सुवर्णाचीं जालीं लेणीं ॥

देव जाला जगपणीं ॥ ३ ॥ घटीं मृत्तिका वर्तत ॥ जगीं देव तैसा व्याप्त ॥ ४ ॥ एकानेकजनार्दन ॥ एका जडला एकपणें ॥ ५ ॥

॥ २०४८ ॥ शुचिर्भूत शुद्धमती ॥ ईश्वर मानी सर्वाभूतीं ॥ तो सर्वदां वसे तीर्थीं ॥ तीर्थ वसे त्याच्यासंगें ॥ १ ॥ तीर्थीं नसतां तीर्थवास ॥ सत्य-निष्ठा नित्य निर्दोष ॥ तीर्थीं वसतां पुण्यलेश ॥ नपावे तीर्थें निंदितां ॥ २ ॥ मत्सर निष्ठुर भूतद्वेष ॥ भजन मार्गींचा उपहास ॥ तीर्थें घेती त्याचा त्रास ॥ कीटक द्वेष सा करती ॥ ३ ॥ काम क्रोध लोभ तृषा यां ॥ स्पर्श न करी जयाची काया ॥ एकाजनार्दनीं पायां ॥ तीर्थें वंदिती तयाच्या ॥ ४ ॥

॥ २०४९ ॥ इंद्रियें नेमाचे आसनीं ॥ नित्य माधुर्य बोले वाणी ॥ अहंकार ज्याचीये ध्यानीं ॥ संचरेना सर्वथा ॥ १ ॥ तो सकळ सृष्टीचा धाता ॥ तीर्थें करिती त्याची यात्रा ॥ पादोदकालागीं पवित्रा ॥ तीर्थें माथां वोढविती ॥ २ ॥ तीर्थीं असोनी इच्छारहित ॥ यथालाभे संतोषत ॥ प्रतीग्रहा न वोढवी हात ॥ तो तीर्थरूप जाणावा ॥ ३ ॥ परधनीं अंधत्व जयाचें नयन ॥ परस्त्री पहातां नपुंसक जाण ॥ एकाजनार्दनीं शरण ॥ तो जनक तीर्थांचा ॥ ४ ॥

॥ २०५० ॥ मनें इंद्रियें निग्रह करी ॥ तो गृहीं असतां जान्हवी तीरीं ॥ तीर्थीं असोनि अनाचारी ॥ तो कीटकवासी जाणावा ॥ १ ॥ सत्यशील दृढव्रती ॥ आत्मभावना सर्वा भूतीं ॥ क्रोधकीटक नातळे चित्तीं ॥ तो सर्व तीर्थीं सेविजे ॥ २ ॥ शुद्धशील विद्यातीर्थीं ॥ साधुस्नात सत्यतीर्थीं ॥ कुलांगना लज्जातीर्थीं ॥ पवित्र होती जाणावें ॥ ३ ॥ धनाढ्य निर्दोष दानतीर्थीं ॥ पापी निष्पाप गंगातीर्थीं ॥ एकाजनार्दनीं शुद्धमनतीर्थीं ॥ होती जाणे सर्वदां ॥ ४ ॥

॥ २०५१ ॥ योगी आत्मध्यानतीर्थीं ॥ आत्मस्वरूप स्वयें होती ॥ श्रवणादिक नवही तीर्थीं ॥ भक्त होती हरिरूप ॥ १ ॥ ऐशा निरूपणाची युक्ती ॥ जाणते अथवा हो नेणती ॥ शरीर प्रक्षाळित तीर्थीं ॥ मोक्षप्राप्ति निर्धारें ॥ २ ॥ ऋषीश्वरीं महायज्ञीं ॥ तें यज्ञफळ नामस्मरणीं ॥ एकाजनार्दनीं भजनीं ॥ दृढ राहे तत्पर ॥ ३ ॥

॥ २०५२ ॥ पंचभूतांचें हें शरीर खरें ॥ निर्माण केलें तें देवें बरें ॥ १ ॥ पृथ्वी आप तेज वायु हें आकाश ॥ यांचा हा सौरस आत्माराम ॥ २ ॥ एकाजनार्दनीं पंचभूत आत्मा ॥ सर्व परमात्मा नेणती ते ॥ ३ ॥

॥ २०५३ ॥ निर्गुण निर्विकारु ॥ तोची जगीं पैं ईश्वरु ॥ १ ॥ नित्य निर्विकल्प देख ॥ सदा वाहे समाधीसुख ॥ २ ॥ ऐसें ब्रह्मज्ञान जोडे ॥ तैं गुरुकृपा तेथें घडे ॥ ३ ॥ कापूर घातलीया जळीं ॥ स्वयें नुरेची परिमळी ॥ ४ ॥ एकपणें तो एकला ॥ एकाजनार्दनीं देखिला ॥ ५ ॥

॥ २०५४ ॥ न मानी सन्मानाचें कोड ॥ नाहीं विषयाची चाड ॥ १ ॥ ऐसे मज शरण येती ॥ तयांचें उणें न पडे कल्पांतीं ॥ २ ॥ नाहीं संसाराची चाड ॥ नाहीं भीड कवणाची ॥ ३ ॥ एका त्याचा ह्मणवी दास ॥ धरूनि आस जनार्दनीं ॥ ४ ॥

॥ २०५५ ॥ सकळ प्रपंचाचें भान ॥ तें तंव मृगजळसमान ॥ १ ॥ जन्ममरणा परता ॥ त्रिगुणातें नातळता ॥ २ ॥ प्रपंचाची अलिप्त युक्ति ॥ ऐशी आहे देह-स्थिती ॥ ३ ॥ प्रपंचीं न दिसे भान ॥ एका शरण जनार्दना ॥ ४ ॥

॥ २०५६ ॥ जागा परी निजला दिसे ॥ कर्म करी स्फूरण नसे ॥ १ ॥ सकळ शरीराचा गोळा ॥ होये आळसाचा मोधळा ॥ २ ॥ संकल्प विकल्पाची ख्याति ॥ उपजेचि ना सदां चित्तीं ॥ ३ ॥ यापरी जनीं असोनी वेगळा ॥ एकाजनार्दनीं पाहे डोळां ॥ ४ ॥

॥ २०५७ ॥ कार्य कर्ता आणि कारण ॥ त्रिगुणेशीं त्रिपुटी शून्य ॥ ॥ १ ॥ अंगीं आदळतां तिन्ही गुण ॥ जया चित्तवृत्ति नोहे भिन्न ॥ २ ॥ ऐसा त्रिगुणां वेगळा ॥ एकाजनार्दनीं पाहे डोळां ॥ ३ ॥

॥ २०५८ ॥ अभेद भक्ताचें निजमंदिर ॥ तें मज निर्गुणाचें घर ॥ १ ॥ निर्गुणासी घर ठावो ॥ बोलणें हेंची दिसे वावो ॥ २ ॥ सांडुनी आकाराचें ज्ञान ॥ निराकारीं सुखसंपन्न ॥ ३ ॥ सुखें सुखासी मिळणी ॥ शरण एकाजनार्दनीं ॥ ४ ॥

॥ २०५९ ॥ धनी धाये परी तयाची भुक्ति न धाये ॥ सागरा भरीते परी ते सरिता समाये ॥ १ ॥ सर्वांगीं सुवास परीतो उगला न राहे ॥ सभोंवते तरुवर चंदन करीतोचि जाये ॥ २ ॥ वैरागरमणी पूर्ण तेजाचा होय ॥ भेटतां हरळू हिरे करितचि जाय ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं पूर्ण तेजाचा हो ॥ आपणा सारिखें दुजे करितचि जाये ॥ ४ ॥

॥ २०६० ॥ रमता जोगी झुलता रे बाबा ॥ ध्रु० ॥ कानोमे मुद्रा गलेबिच सयली ॥ पेहरे त्रिगुणकी कंथा रे बाबा ॥१॥ अनुहत सिंगी डमरु बजावत ॥ सदा मगनमो रहतारे बाबा ॥ २ ॥ प्रेमकी भिछा घरघर मागे ॥ अचल मुद्रामो सोतारे बाबा ॥ ३ ॥ एकाजनार्दन दर्शन भुका ॥ कबहु जोगी मिलतारे बाबा ॥ ४ ॥

॥ २०६१ ॥ निर्भय अचल अभंग ग्रासुनि संग साधु मही विचरती ॥ ध्रु० ॥ जागृतासि स्वप्नभ्रम कैंचा ॥ गज रथ धेनु तुरंग ॥ मृषा ते ॥१॥ ज्ञानित्वात्मेवमेमतं ॥ हे गुज सांगे श्रीरंग ॥ अनुभवी ॥ २ ॥ चिद्रपुविशुद्धभस्मोद्धूलित ॥ जाळुनी अशुभ अनंग ॥ दुर्जयात ॥ ३ ॥ सत्ता एक अनेकीं विलसे ॥ जीवनिं जेवितरंग ॥ भासति ॥ ४ ॥ दग्धपटासम त्र्यंबक होता ॥ एकाजनार्दनिसंग ॥ सुमंगला ॥ ५ ॥

॥ २०६२ ॥ आह्मी ब्रह्मपुरींचे ब्राह्मण ॥ यातिकुळ नाहीं लहान ॥ १॥ आह्मां सोंवळें वोंवळें नाहीं ॥ विटाळ न देखों कवणे ठाई ॥ २ ॥ आह्मां सोइरे जे जाहले ॥ ते याति कुळ वेगळे केले ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं बोधु ॥ यातिकुळींचा फिटला संबंधु ॥ ४ ॥

॥ २०६३ ॥ कोण ब्रह्मकर्म कळेना हें वर्म ॥ नाशिलें जीवन संध्यावेळें ॥ १ ॥ धरिलें नासिक अनुभवावांचुनी ॥ त्रिपुटीसी पाणी लावियेलें ॥ २ ॥ डोळिया वदना स्वीकारिले कान ॥ तेथें वर्म कोण नेणवे तें ॥ ३ ॥ खांद्यासही हात नाभीसी लावुनी ॥ डोळे ते झांकूनी न्यास केला ॥ ४ ॥ करी प्रदक्षिणा गुरुगुह्याविण ॥ व्यर्थ केला शीण कामा नये ॥ ५ ॥ मेळ चुकोनीयां संध्या भलते वेळे ॥ केलें अमंगळ ब्रह्म कर्म ॥ ६ ॥ फिरवितों मणी बुटबुट ते होटें ॥ आज पातें कोठें स्थान नेणें ॥ ७ ॥ नेणोनी आचार करी वेडेचार ॥ काय तो गव्हार संध्या

जाणे ॥ ८ ॥ एकाजनार्दनीं चुकविला नेम ॥ काय पशुहीन जन्मा आले ॥ ९ ॥

॥ २०६४ ॥ गुरु जनार्दनें सांगितलें गूज ॥ पूजावे ते द्विज आवडीनें ॥ १ ॥ जोडिली संपदा ब्राह्मणासी द्यावी ॥ अखंड करावी चरणसेवा ॥ २ ॥ ब्राह्मणाचे रज ज्या नरा मस्तकीं ॥ सायुज्यता मुक्ति पाया लागे ॥ ३ ॥ ब्राह्मणाचें तीर्थ जे नर सेविती ॥ हरिहर येती वंदावया ॥४॥ एकाजनार्दनीं अन्य भक्ति वाव ॥ आह्मी पूजूं भूदेव आवडीनें ॥ ५ ॥

॥ २०६५ ॥ जनार्दनें आह्मां सांगितलें गूज ॥ पूजावे हे द्विज आवडीनें ॥ १ ॥ मुखीं वेद ज्याच्या तोचि नारायण ॥ भिन्न भाव जाण भावूं नको ॥ २ ॥ भावितांही भिन्न तयासी दंडिती ॥ रौरव भोगिती कुळांसहित ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं ब्राह्मणांची पूजा ॥ चुकविल खेपा संसारींच्या ॥ ४ ॥

॥ २०६६ ॥ भजन चालिलें उफराटें ॥ कोण जाणें खरें खोटें ॥ १ ॥ अग्निहोत्राचा सुकाळ ॥ वडा पिंपळासी काळ ॥ २ ॥ तिन्ही देव पिंपळांत ॥ अग्निहोत्रीं केला घात ॥ ३ ॥ ह्मणती सोमयाग करा ॥ मुख धरूनि मेंढा मारा ॥ शेंदूर माखूनियां धोंडा ॥ चाळविती पोरें रांडा ॥४॥ एकाजनार्दनीं नेम ॥ सर्वा ठायीं पुरुषोत्तम ॥ ५ ॥

॥ २०६७ ॥ ब्राह्मणवाक्य बळें वेदु नेमी जगा ॥ येऱ्हवीं राहे उगा थोटावला ॥ १ ॥ ब्राह्मण तो ब्रह्म ब्राह्मण तो ब्रह्म ॥ जयाचेनी कर्माकर्म दाटुगें जगीं ॥ २ ॥ ब्रह्मवाक्याची राणीव तैं शास्त्राची जाणीव ॥ येऱ्हवीं नुसधें पेंव पाषाणाचें ॥ ३ ॥ ब्राह्मण वचनार्थ याग कर्म समर्थ ॥ येऱ्हवीं ते समस्त जीत ना मेली ॥ ४ ॥ जीवाचें जीवपण शिवाचें शिवपण ॥ याहुनी ब्रह्म पूर्ण ब्राह्मणवाक्य ॥ ५ ॥ पाठ नाहीं पोट नाहीं ब्रह्म तें निघोट ॥ हाही अनुभव स्पष्ट ब्राह्मणवचनें ॥ ६ ॥ ब्रह्म तें निर्मळ संसार तो मृगजळ ॥ हेंही होय विवळ ब्राह्मणवचनें ॥ ७ ॥ एकाजनार्दनीं ब्राह्मण पूर्ण बोधु ॥ जाणे तया बाधु न शके कर्माकर्म ॥ ८ ॥

॥ २०६८ ॥ शम दम तप शौच आणि क्षमा ॥ आर्जव तो प्रेमा ज्ञाना-

लागीं ॥ १ ॥ आत्मअनुभव वेदीं सत्य भाव ॥ ब्राह्मण स्वभाव कर्म ऐसें ॥ २ ॥ ब्राह्मणाच्या ठायीं गुण शुद्ध सत्व ॥ वसे ब्रह्मतत्व तया चित्तीं ॥ ३ ॥ सर्वा भूतीं दया असे तयापाशीं ॥ विटला उपाधीसी सर्व-भावें ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं ऐसे हे ब्राह्मण ॥ तयांचें चरण नित्य वंदूं ॥५॥

॥ २०६९ ॥ ब्राह्मणा स्वधर्म नित्यनैमित्तिक ॥ व्हावें उपासक वेदा-लागीं ॥ १ ॥ स्नान संध्या वंदन हेंचि नित्यकर्म ॥ तैसेंचि हें वर्म पितृतृप्ति ॥ २ ॥ ब्रह्मयज्ञ आणि अग्नीची ते पूजा ॥ तेणें अधोक्षजा पाविजेती ॥३॥ अतिथि आलीया तया अन्नदान ॥ करा तवार्पण द्रव्ययोगें ॥ ४ ॥ भूतदया गाई पशूतें पाळावें ॥ मुखीं उच्चारावें रामनाम ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं हेंचि नित्यकर्म ॥ तेणें परब्रह्म हाता चढे ॥ ६ ॥

॥ २०७० ॥ तयालागीं ज्ञानी ह्मणती नैमित्तिक ॥ पितृश्राद्धादिक जाणावें तें ॥ १ ॥ संतांचें दर्शन ज्ञानियाची भेटी ॥ उत्थापन अटाकरणें लागे ॥ २ ॥ एकादशी शिवरात्री प्रदोषादि ॥ रामजयंत्यादि नाना पर्वें ॥ ३ ॥ नैमित्तिक ऐसें तयांसी ह्मणती ॥ सा योगें पावती आत्मतत्त्वीं ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं यांतें आचराल ॥ तरीच पावाल चित्तशुद्धि ॥ ५ ॥

॥ २०७१ ॥ स्वहिताकारणें विचार न कळे ॥ संध्येचें हें मूळ आह्मी जाणों ॥१॥ अर्धबिंबीं सूर्य धरूं मध्याह्नासी ॥ अस्तु जातां त्यासी अर्घ्य देतों ॥ २ ॥ नासिकेचें अग्र सुषुम्ना विंदाण ॥ करी प्राणायाम वेगळाची ॥ ३ ॥ साही चक्र जप वर्ण दळीं संकल्प ॥ पूजा तर्पणयुक्त मंत्र सहज ॥ ४ ॥ त्रिपुटीपासोनी डोळीया वंदन ॥ रक्त श्वेत गुण पीत भासे ॥५॥ अर्घा कीं पाहे अणुरेंणु सरी ॥ गगन शून्याकारीं विखुरलें ॥ ६ ॥ विराजली संध्या बैसली जे बाळा ॥ चंद्रसूर्यकळा लाजविल्या ॥ ७ ॥ हृदयापासोनी नाभीचा नेट ॥ मनीं बळकट पुष्टी व्हावी ॥ ८ ॥ मूळबंधापासुनी दिधली आटणी ॥ हृदयीं कुंडलणी सिद्ध संघ ॥ ९ ॥ दाही दिशा करी प्रदक्षिणा वेडा ॥ गगनीं बीज सडा माजिविले ॥ १० ॥ एकाजनार्दनीं संध्या हेची रीतीं ॥ सहस्रदळीं ज्योती निजबिंदु ॥ ११ ॥

॥ २०७२ ॥ गांवढे सहस्र ब्राह्मण ॥ तृप्त केलीया भोजन ॥ पुण्य क्षेत्रींचा एकचि जाण ॥ सुकृत तितुकेंचीं जोडे ॥ १ ॥ ऐसें पुण्य क्षेत्रींचे

दश शतक ॥ तृप्त केलीया वेदपाठक ॥ पाहतां सुकृत तितुकेची जोडे ॥ २ ॥ ऐसे सहस्र वेदपाठक ॥ तृप्त केलीया पंडित एक ॥ पाहतां सुकृत तितुकेचि जोडे ॥ ३ ॥ तैसेच पंडित सहस्र एक ॥ तृप्त केलीया संन्यासी देख ॥ तरी ते सुकृत तितुकेंचि जोडे ॥ ४ ॥ तैसे सहस्र संन्यासी ॥ गणित एक परमहंसीं ॥ पहातां सुकृतासी ॥ एक तृप्त केलीया ॥ ५ ॥ परमहंसीं सहस्रगणीं ॥ तैसीच ब्रह्मज्ञानाची मांडणी ॥ जोडे सुकृत तृप्तकरणीं ॥ एकब्रह्मवेत्ता ॥६॥ उपमा देतां ब्रह्मवेत्त्यासी ॥ पहातां ब्रह्मांडीं नाहीं त्यासी ॥ तृप्त केलीया ब्रह्मवेत्यासी ॥ हरिहर तृप्त ॥ ७ ॥ ऐसे वेत्ते अपरंपार ॥ नये नामधारका बरोबर ॥ नामधारका सादर ॥ पाहे एका जनार्दनीं ॥ ८ ॥

॥ २०७३ ॥ वेदाचीया बोला कर्मातें गोंविला ॥ परी नाहीं भजला संतांलागीं ॥ १ ॥ घोकुनीयां वेद द्वैत नव जाय ॥ वाउगाची होय श्रम तया ॥ २ ॥ तया द्वैताच्या वाटां जाय तो करंटा ॥ शिण तो अव्हाटा आदि अंत ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं संतांसी शरण ॥ गेलीया पठन सर्व जोडे ॥ ४ ॥

॥ २०७४ ॥ ब्रह्म जाणे ब्राह्मणयाती ॥ त्यांची घडावी संगती ॥ ॥ १ ॥ ब्राह्मण तयासी ह्मणावें ॥ साचे पायीं लीन व्हावें ॥ २ ॥ गळां घालोनी सूत्रदोरी ॥ ह्मणवीती ब्रह्मचारी ॥ ३ ॥ परी ब्रह्म नाहीं ठावें ॥ लोकां सांगतसे भावें ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं पूर्ण ॥ ब्रह्म जाणे तो ब्राह्मण ॥ ५ ॥

॥ २०७५ ॥ नवल दंभाचें कौतुक ॥ आह्मी अग्निहोत्री ह्मणती याज्ञिक ॥ १ ॥ मंत्रतंत्राची कथा कोण ॥ मुख्य गायित्री विकिती ब्राह्मण ॥ ॥ २ ॥ आह्मी स्वधर्मनिष्ठ पावन ॥ दंभें ह्मणती आपणा जाण ॥ ३ ॥ दांभिकाची भक्ति वाव ॥ एकाजनार्दनीं नाहीं ठाव ॥ ४ ॥

॥ २०७६ ॥ अर्थ नाहीं जयापाशीं ॥ असत्य स्पर्शेना तयासी ॥ १ ॥ अर्थापाशीं असत्य जाण ॥ अर्थापाशीं दंभ पूर्ण ॥ २ ॥ अर्थापोटीं नाहीं परमार्थ ॥ अर्थापोटीं स्वार्थ घडतसे ॥ ३ ॥ अर्थ नको माझे मनीं ॥ ह्मणे एकाजनार्दनीं ॥ ४ ॥

॥ २०७७ ॥ असत्य जन्मले असत्याचे पोटीं ॥ अर्थ बळें चावटी शिकविती ॥ १ ॥ अर्थी धरुनी आस असत्य बोलणें ॥ अर्थासाठीं घेणें मंत्रयंत्र ॥ २ ॥ अर्थासाठीं प्राण त्यजिती जनीं ॥ अर्थें होत हानी प्राणिमात्रा ॥ ३॥ एकाजनार्दनीं अर्थाचा संबंध ॥ तेथें भेदाभेद सहज उठे ॥४॥

॥ २०७८ ॥ विद्या जालीया संपूर्ण ॥ पंडित पंडिता हेळसण ॥१॥ धन जालीया परिपूर्ण ॥ धनाढ्यासी हेळसण ॥ २ ॥ कळतां आत्मज्ञान स्थिति ॥ भलत्यासवें वाद घेती ॥ ३ ॥ वृश्चिका अंगीं विष थोडें ॥ तैसा वादालागीं चढे ॥ ४ ॥ भुलोनी पामर ॥ एकाजनार्दनीं बुडवी घर ॥ ५ ॥

॥ २०७९ ॥ करूनी वेदशास्त्र दांभिक पठण ॥ निर्धारितां निज अज्ञान ॥ १ ॥ करूनी वेदशास्त्र श्रवण ॥ होय शिश्नोदर परायण ॥ २ ॥ महा मोहो गिळिला ज्ञाना ॥ शरण एकाजनार्दना ॥ ३ ॥

---

## गंगागौरीचें भांडण.

॥ २०८० ॥ जगाचा जो पिता ॥ ह्मणसी ईश्वरू नियंता ॥ यासि विद्या अविद्या दोघी कांता ॥ एकी माथां अर्धांगीं ॥ १ ॥ पाहा पाहा स्वरूपकरणी ॥ माथां बैसविली राणी ॥ हे महिमा वेदीं पुराणीं ॥ गाती कीर्तनीं निरंतर ॥ २ ॥ अविद्या आणि ईश्वर ॥ इहीं मांडिला घराचार ॥ कैसी अनन्य प्रीति सधर ॥ आवडी थोर पैं देखा ॥ ३ ॥ दोघां एकची नेसणें ॥ दोघां एक सत्तेचें बैसणें ॥ एकें अंगीं दोनीपणें ॥ संपादणी करिताती ॥ ४ ॥ दोघां येकची चाखणें ॥ दोघां येकची देखणें ॥ दोघां आजू माजी असणें ॥ सावकाश सहजें ॥ ५ ॥ दोघां आवडी कैसी देख ॥ येर येराविण नेघे उदक ॥ दोघां मिळोनी एक सुख ॥ अति संतोष येरयेरां ॥ ६ ॥ जैं उभयां मेळ मिळे ॥ तैंचि शिवा शिवत्व कळे ॥ प्रियानें देखतां सगळें ॥ शिवत्वही सांडिजे ॥ ७ ॥ दोघां एकत्र बैसणें ॥ दोघां मिळोनी एक करणें ॥ दोघें वर्तती एकें प्राणें ॥ दोनी दावणें एकपणीं ॥ ८ ॥ शिवत्व लोपुनी शिवें ॥ अंगावरी वाढविलें शांभवें ॥ येरी पतिव्रता अहेवें ॥ रूपें नांवें शिव पूजी ॥ ९ ॥ दोघांपासुनी जालें जग ॥ परी

न दिसे तिसरें अंग ॥ न तुटे अनन्यमिळणी योग ॥ भिन्नही भाग दावितां ॥ १० ॥ पतीविण जे पतिव्रता ॥ अवघीच विरे पैं तत्वता ॥ जीविण असतुची नसतां ॥ होये सर्वथा गोसावी ॥ ११ ॥ शिव निःसंगु जो पैं सदा ॥ क्रिया करणेंविण नुसुधा ॥ त्याचीही सुखदुःखाची बाधा ॥ या प्रमादा भागविजे ॥ १२ ॥ यापरी तो नोवरा ॥ अविद्या गोविला घरा चारा ॥ मग त्याचि शरीरा ॥ ते अर्धांगीं बैसविली ॥ १३ ॥ गगन न देखवे दृष्टीं ॥ सवतीमत्सरू उठिला पोटीं ॥ सद्विभागें जटाजूटीं ॥ होती मुकुटीं मौळली ॥ १४ ॥ सद्विद्या गंगा मुगुटीं ॥ वैराग्याचे प्रवाह लोटी ॥ शिवाची उपरमली दृष्टी ॥ न करी गोष्टी भोगाची ॥ १५ ॥ अखंड वसे तो एकांतीं ॥ प्रकृति न साहे पार्वती ॥ सांडुनी अवघी हे प्रकृति ॥ मग अद्वैतीं राहिवासू ॥ १६ ॥ ते संधीं आला नारदमुनी ॥ देखोनी शिवु शंकला मनीं ॥ मग बैसविला तो ध्यानी ॥ ह्मणे हा ह्मणीं कळी लावा ॥ १७ ॥ गुज सांगितलें प्रियेसी ॥ वेगीं बोलावीं ऋषीसी ॥ हांसें आले नारदासी ॥ मग कळीसी उत्पादी ॥ १८ ॥ नारदू नमी पार्वतीसी ॥ सांगें शिवु कैंवि गुंतले ध्यानासी ॥ आवो तूं भोळी ऐसी कैसी ॥ तो आणिकिसी रातला ॥ १९ ॥ मी तंव कळीलावा हे पुढे ॥ माझे वचना मानिसी कुडें ॥ पैल पाहें मुकुटापुढें ॥ दिसे रूपडें सुरेख ॥२०॥ आधींच तंव ते उताविळ ॥ मग नारदें चेताविली प्रबळ ॥ मज असतां कोण गे बरळ ॥ मुकुटीं बसे मोकाट ॥२१॥ येरी ह्मणे बाई तुह्मी नेणा ॥ शिव शिवप्रिया मी अंगना ॥ मान राखो वडीलपणा ॥ कोपु मना नाणावा ॥ २२ ॥ पाप असे ज्यासी पैंगा ॥ तेणें आलिंगीजे गंगा ॥ ते तूं जडलीसी शिवा अंगा ॥ नातळें लिंगा उघटे ॥ २३ ॥ माझेनीं अंगें पाप पळें ॥ हें जाणीजें जाश्वनिळें ॥ विष निस्तरिजे माझेनी मेळें ॥ द्वेष कुटिळें सांडिपां ॥ २४ ॥ चढला कोपाचा बासटु ॥ ह्मणे गंगे तुझा बहु गे नेटु ॥ ठकारें भुलविला निळकंठु ॥ माझा विठु घालिसी ॥ २५ ॥ अगे तूं गौतमें नेलिसी ॥ निर्लज्जे मागुती आलिसी ॥ येरी म्हणे शिवें रावणासी दिल्हीसी ॥ माझेनी बापें सोडविलें ॥ २६ ॥ गंगे तूं नुसुधे उदक ॥ तुज माजी कें रमणीयेसुख ॥ येरी ह्मणे जनीं त्र्यंबक ॥ जेणें मस्तक दिधलें ॥ २७ ॥ अगे तुज रातलें भगवें ॥ आणि बोडिके आघवे ॥ जळ्याळ गांव्याळ तुजसवें ॥ तेथें कायें शिवें भोगीजे ॥ २८ ॥ गीरिजे नोळखिसी पायरी ॥ मी मस्तकीं तूं पायावरी ॥ तुझ्या अंगीं दोष भारी ॥ परी नव्हेरी भोळा

हा ॥२९॥ जैं गे जालें तुझें लग्न ॥ भर्ता घडलें वीर्यस्खलन ॥ येव्हढें आंगीं-चें लक्षण ॥ केंवी मस्तक इच्छिसी ॥ ३० ॥ गंगे तूं वाजट फलकट ॥ माथां चाहिलिसी धीट ॥ कधीं न बोलसी नीट ॥ विद्या उद्धट तुजमाजी ॥३१॥ अगे तूं शिवें शापीलिसी ॥ तैंगे शांतनूनें नेलिसी ॥ तेथें हिंवसुतें व्यालीसी ॥ केंवी आलीसी मस्तका ॥३२॥ उमे भितसों तुझीया कोपा ॥ आगीं रिघोनि मारविलें बापा ॥ नरसुरां आदूं पाहापां ॥ सुधी संतापा पैं नाहीं ॥३३॥ दक्षा मारविलें यज्ञिष्टा ॥ ब्रह्महत्या तुझा वांटा ॥ येव्हढा आंगीं दोष मोठा ॥ ह्मणें नीळकंठा आतळसी ॥ ३४ ॥ अगे तुजमाजी खळाळ ॥ तेणें तूं गर्जसी सबळ ॥ शिवें सोसिजे खळखळ ॥ माझें कपाळ उठिलें ॥ ३५ ॥ माझें लागतां खळाळ ॥ तरले सुरनर सकळ ॥ तुझेंची कठीण कपाळ ॥ उद्वेशें छळ करितेसी ॥३६॥ गंगे तुज ऐसी ओंगळ ॥ आनन न देखें मी कुश्चीळ ॥ मच्छ कच्छ विष्टा तें जळ ॥ आणि सेवाळ सर्वांगीं ॥३७॥ ऐकोनी गंगे आलें हांसें ॥ काय बोलसी बा तसें ॥ चराचर जें जें दिसे ॥ तें तें असे मजमाजी ॥३८ ॥ गंगे तूं जासी सागरापाठीं ॥ हें प्रत्यक्ष जगु देखे दिठीं ॥ पुराणीं ही त्याची गोठी ॥ गंगा सागरगामिनी ॥ ३९ ॥ उमे तुझा खोटा भावो ॥ गिरीसागर माझा देवो ॥ शिवावांचुनी पहाहो ॥ गमनागमन मज नाहीं ॥ ४० ॥ गौरी गंगेतें ह्मणे धांगडी ॥ येरी ह्मणे घर रिघालीसी आवडी ॥ बापें बेलुवाच्या मिसें लाविली गोडी ॥ तैसी फुडी मी न्हवें ॥ ४१ ॥ वर्मकर्मे चढल्या क्रोधा ॥ नारदु हांसतु गदगदां ॥ भलीया मीनलों विनोदा ॥ दोहींच्या शब्दा साक्षीतें ॥ ४२ ॥ तुज कुटीळ जाणोनी मानसीं ॥ शिवू तारकु ब्रह्म उपदेशी ॥ भावो नाहीं त्या वचनासी ॥ छळूं जासी श्रीरामा ॥ ४३ ॥ देववचनीं नाहीं भावो ॥ तंववरी न तुटे संदेहो ॥ कैसेनी राहे काम कलहो ॥ न्याय अन्यायो न कळे ॥४४॥ तूं अविद्या सदा विमुख ॥ यालागीं नेणसी निजसुख ॥ जगाचें देखसी दोख ॥ कामें सुख मानिसी ॥ ४५ ॥ आम्ही तंव शिववचनीं सन्मुख ॥ अखंड आम्हां आत्मसुख ॥ शिवावांचुनियां देख ॥ आप्त नाहीं सर्वथा ॥ ४६ ॥ तुझा जांवियासी द्वेष ॥ केलें भांडण्याचें मिष ॥ कलहो अंतीं उपजे सुख ॥ परमनिर्देश या नांव ॥ ४७ ॥ पाहेपां मुळींच्या मिळणी ॥ आम्ही तुम्ही येकी दोघी जनीं ॥ शिणलीसी मायगे बहिणी ॥ द्वेषु मनीं न धरावा ॥ ४८ ॥ जें सांगितलें सदाशिवें ॥ जीवीं धरावें निजभावें ॥ नेणें द्वेषाद्वेष ॥ निसंभवें ॥ ४९ ॥ याची वृत्ती परतोनी पाहीं ॥

देहीं प्रगटेल विदेही ॥ मग देह विदेह दोन्ही नाहीं ॥ निजतत्त्व ठाईं होऊनी ठासी ॥ ५० ॥ ऐकतां गंगेचें वचन ॥ गिरिजे चालिलें स्फुंदन ॥ धांऊनि दिधलें आलिंगन ॥ समाधान पैं झालें ॥ ५१ ॥ ते वेळीं मीनलें मनामन ॥ उपनिषदा पडिलें मौन ॥ देखणें ठेले भिन्नाभिन्न ॥ शिवचैतन्य अनुभवीं ॥ ५२ ॥ शिव तो निजरूप सकळ ॥ गंगा सच्छक्ती निर्मळ ॥ येरी अविद्या चपळ ॥ नारदु केवळ निजबोधु ॥ ५३ ॥ एकाजनार्दनीं बोधु ॥ परमानंदु प्रकटला ॥ ५४ ॥

---

## बाळक्रीडेच अभंग.

॥ २०८१ ॥ असतां बंदिशाळे ॥ देवकी डोहळे ॥ गर्भ घननीळें ॥ आथियला ॥ १ ॥ गुज पुसे भ्रतारा ॥ आनु नेणें दुसरा ॥ आवडी अवधारा ॥ जीवा होये ॥ २ ॥ मेळवुनी लेंकुरें ॥ खेळ खेळावा साकारें ॥ गोकुळीं अवतार ॥ गौळीयाघरीं ॥ ३ ॥ वर्षतां शिळाधारीं ॥ उचलावा महागिरी ॥ वेणु पोवे करीं ॥ वाजवीत ॥ ४ ॥ जळीं रिघ करावा ॥ भवसर्प नाथावा ॥ वरि बैसो बरवा ॥ भाव माझा ॥ ५ ॥ कंसादिक वीर ॥ त्यांचा करावा संहार ॥ कीजे राज्यधर ॥ उग्रसेना ॥ ६ ॥ एका यश घ्यावें ॥ त्रैलोक्य जिंकावें ॥ कनकपुर वसवावें ॥ सिंधुमाजीं ॥ ७ ॥ एकाजनार्दनीं ॥ डोहळे संपूर्ण ॥ पुरवी नारायण ॥ वासनेचे ॥ ८ ॥

॥ २०८२ ॥ देवकी निजउदरीं ॥ गर्भाची पाहे थोरी ॥ तंव सबाह्य अभ्यंतरीं ॥ व्यापक श्रीकृष्ण ॥ १ ॥ अगे हा स्वतःसिद्ध हरी ॥ स्वयंप्रकाश करी ॥ मीपणामाझारीं ॥ गर्भु वाढे ॥ २ ॥ आतां नवल कैसें परी ॥ आठवा गर्भु धरी ॥ त्याहि गर्भामाझारीं ॥ मज मी देखें ॥ ३ ॥ दाहीं इंद्रियांमाझारीं ॥ गर्भाची वाढे थोरी ॥ कर्म तदाकारी ॥ इंद्रियवृत्ति ॥ ४ ॥ चित्प्रकाशासि डोहळे ॥ सद्रूप सोहळे ॥ आनंदकल्लोळें ॥ गर्भु वाढे ॥ ५ ॥ तेथें स्वस्वरूप स्थिति ॥ सुखरूप प्रसूती ॥ आनंद त्रिजगतीं ॥ परिपूर्ण ॥ ६ ॥ एकाजनार्दनीं ॥ ज्ञानगर्भु सार ॥ चिद्रूप चराचर ॥ निखिल नांदे ॥ ७ ॥

॥ २०८३ ॥ देवकी करी चिंता ॥ कैंवी आठवा वांचे आतां ॥ ऐसी भावना भावितां ॥ जीवीं तळमळ ॥ १ ॥ तंव न दुखतांचि पोट ॥ वेळ नलगतां उद्भट ॥ कृष्ण जाला प्रगट ॥ स्वयें अयोनिया ॥ २ ॥ हरि सुनीळ सांवळें ॥

बाळ निजतेजें तेजाळें ॥ देखोनी वेल्हाळें ॥ स्वयें विस्मीत ॥ ३ ॥ ऐसें देखोनि श्रीकृष्णासी ॥ मोहें अच्छादूं जाय त्यासी ॥ तंव प्रकाशु तियेसी॥ कैसा आंवरेना ॥ ४ ॥ वेगीं वसुदेवातें म्हणे ॥ तुह्मीं गोकुळासी न्या तान्हें ॥ एकाजनार्दनें ॥ कृपा केली ॥ ५ ॥

॥ २०८४ ॥ देवकी ह्मणे वसुदेवासी ॥ वेगीं बाळक न्यावें गोकुळासी ॥ घवघवीत तेजोराशी ॥ देखे श्रीकृष्ण ॥ १ ॥ पूर्ण प्रकाश निजतेजें ॥ पाहतां न दिसे दुजें ॥ तेथें कैचें माझें तुझें ॥ लपणें छपणें ॥ २ ॥ सर सर अरजे दुरी ॥ परब्रह्म आह्मां करीं ॥ अहं कंसाचें भय भारी ॥ बाधी कवणा ॥ ३ ॥ सर्वेचि पाहे लीळा ॥ मुगुट कुंडलें वनमाळा ॥ कंठीं कौस्तुभ तेजाळा ॥ कटितटीं सूत्र ॥ ४ ॥ क्षुद्र घंटिका किंकिणी ॥ बाहुभूषणें भूषणीं ॥ चिद्रत्नें महामणी ॥ वीर कंकणें ॥ ५ ॥ कमळवदन हरी ॥ कमळनेत्रधारी ॥ लीलाकमळें करीं ॥ झेलीतसे ॥ ६ ॥ करकमळीं कमळा ॥ सेवी चरण कमळा ॥ ऐशी वसुदेव देखे डोळां ॥ दिव्य मूर्ति ॥ ७ ॥ लक्षुमी डावलूनियां जाण ॥ हृदयीं श्रीवत्सलांछन ॥ द्विजपदाचें महिमान ॥ देखे दक्षिण भागीं ॥ ८ ॥ शंखचक्रांकित ॥ आयुधें चारी ॥ पीतांबरधारी ॥ समसाम्य ॥ ९ ॥ ऐसें सगुण निर्गुण थाका ॥ पहात पहात देखा ॥ भिन्न भेदाची न रिघे रेखा ॥ कृष्णपणीं ॥ १० ॥ एकाजनार्दनीं खरें ॥ निजरूप निर्धारें ॥ अहंकंसाचें वावरे ॥ मिथ्या भय ॥ ११ ॥

॥ २०८५ ॥ देवकी वसुदेवाकडे पाहे ॥ तंव तो स्वानंदें गर्जताहे ॥ येरी धांवोनी धरी पाये ॥ उगे रहा ॥ १ ॥ जळो जळो हे तुमची बुद्धि ॥ सरली संसारशुद्धी ॥ कृष्ण लपवा त्रिशुद्धी ॥ जगप्रगट न करावा ॥ २ ॥ आतां मी करूं कैसें ॥ भ्रतारा लागलें पिसें ॥ मज मायेच्या ऐसें ॥ पुरुष ममता न धरी ॥ ३ ॥ मज मायेची बुद्धि ऐसी ॥ म्यां आच्छादिलें श्रीकृष्णासी ॥ वेगें होईन तुमची दासी ॥ अति वेगेंसीं बाळ न्यावें ॥ ४ ॥ येरू ह्मणे नवल जालें ॥ तुज कृष्णें प्रकाशिलें ॥ त्वां केवीं आच्छादिलें ॥ कृष्णरूप ॥ ५ ॥ सरसर अरजे मूढें ॥ बोलसी तितुकें कुडें ॥ कृष्णरूप वाडेंकोडें ॥ माया कैची ॥ ६ ॥ येरी ह्मणे सांडा चावटी ॥ कोरड्या काय सांगूं गोष्टी ॥ गोकुळासी उठाउठी ॥ बाळ न्यावें माझें ॥ ७ ॥ अवो कृष्णीं चिंतिसी जन्ममरण ॥ हेंचि तुझें मूर्खपण ॥ कृष्णनामें जन्ममरण ॥ समूळ निर्दाळिलें ॥ ८ ॥ सरो बहु बोलाचा बडिवारु ॥ परि

निर्धारू न धरवे धीरू ॥ यालागीं लेंकरूं ॥ गोकुळा न्यावें ॥ ९ ॥ तुह्मी न माना माझिया बोला ॥ वेणेंवीण उपजला ॥ नाहीं योनिद्वारा आला ॥ कृष्णनाथु ॥ १० ॥ आतां काय मी करूं वो ॥ वसुदेव ह्मणे नवलावो ॥ तुझ्या बोलाचा अभिप्रावो ॥ तुझा तुजची नकळे ॥ ११ ॥ चोज कैसें वीण ॥ ज्या नाहीं जन्ममरण ॥ त्यासी मारील कवण ॥ समूळ वावो ॥ ॥ १२ ॥ जेणें मीपण आभासे ॥ तेणें माझें मूर्खपण तुह्मां दिसे ॥ हें अंगींचें निजरूप पिसें ॥ नकळे तुह्मां ॥ १३ ॥ कृष्णा निजबोधुसुंदरा ॥ यासी जीवें जतन करा ॥ जाणिवेच्या अहंकारा ॥ गुंता ह्मणी ॥ १४ ॥ आतां काय मी बोलूं खुंटला शब्दु ॥ ऐसा करितां अनुवादु ॥ बोलें खुंटला शब्दु ॥ प्रगटला कृष्ण ॥ १५ ॥ प्रकृति पुरुष दोन्ही ॥ सीनलीं एकपणीं ॥ एका-जनार्दनीं ॥ बंदीं मोक्ष ॥ १६ ॥

॥ २०८६ ॥ श्रीकृष्ण न्यावा गोकुळा ॥ पायीं स्नेहाच्या शृंखला ॥ काया कपाटीं अर्गळा ॥ मोह ममतेच्या ॥ १ ॥ कृष्णीं धरितां आवडी ॥ स्वयें विराली स्नेहाची बेडी ॥ मुक्तद्वार परवडी ॥ नाहीं अर्गळा शृंखळा ॥ २ ॥ कृष्ण जंव नये हाता ॥ तंवचि बंधनकथा ॥ पावलीया कृष्ण-नाथा ॥ बंदीमोक्ष ॥ ३ ॥ ते संधि रक्षणाईतें ॥ विसरलीं रक्षणातें ॥ टकमकीत पहात ॥ स्वयें कृष्ण नेतां ॥ ४ ॥ श्रीकृष्णअंगशोभा ॥ नभत्व लोपलें नभा ॥ दिशेची मोडली प्रभा ॥ राखतें कवण ॥ ५ ॥ अंधारा-माजी सूर्य जातु ॥ श्रीकृष्णासी असे नेतु ॥ सत्वस्वभावें असे सांगतु ॥ कृष्ण कडियेला ॥ ६ ॥ अंध ते बंधन गेलें ॥ राखतें राखणें ठेलें ॥ एका-जनार्दनीं केलें ॥ नित्य मुक्त ॥ ७ ॥

॥ २०८७ ॥ तीरा आणिला श्रीकृष्ण ॥ हरिखें यमुना जाली पूर्ण ॥ चढे स्वानंदजीवन ॥ चरणवंदनार्थ ॥ १ ॥ वसुदेव ह्मणे कटकटा ॥ यमुना रोधिली वाटा ॥ कृष्ण असतां निकटा ॥ मोहें मार्ग न दिसे ॥ २ ॥ कृष्ण असतां हातीं ॥ मोहें पडली भ्रांती ॥ मोहाचिये जाती ॥ देव नाठवे बा ॥ ३ ॥ मैळी मुकी वेताळ ॥ मारको मेसको मैराळ ॥ आजी कृष्ण राखा सकळ ॥ तुह्मी कुळदेवतांनों ॥ ४ ॥ अगा वनींच्या वाघोबा ॥ पाव टेकीच्या नागोबा ॥ तुह्मीं माझिया कान्होबा ॥ जीवें जतन करा ॥ ५ ॥ हातींचा कृष्ण विसरून ॥ देव देवता होती दीन ॥ मोहममतेचें महिमान ॥

देवा ऐसें आहे ॥ ६ ॥ मोहें कृष्णाची आवडी ॥ तेथें न पडे शोक-सांकडीं ॥ एकाजनार्दनीं पावले पर थडीं ॥ यमुनेच्या ॥ ७ ॥

॥ २०८८ ॥ गोकुळीं ठेवितां श्रीकृष्णनाथ ॥ वसुदेवास माया प्राप्त ॥ तेणें पावला त्वरित ॥ देहबंदिशाळे ॥ १ ॥ तंव तुटली जडली बेडी ॥ कपाटा पडली कडी ॥ भवभयाच्या कडाडी ॥ अहंकंस पावे ॥ २ ॥ श्रीकृष्ण सांडिला मागें ॥ पंचमहाभूत लागे ॥ मिथ्या बंधन वाउगें ॥ उठी मरण भयें ॥ ३ ॥ कंस पुसे लवलाह्या ॥ काय प्रसवली तुझी जाया ॥ ह्मणोनी आणिली योगमाया ॥ वसुदेवें ॥ ४ ॥ वेगें देवकी ह्मणे ॥ कंस पुसेल जेव्हां तान्हें ॥ तेव्हां तुवां देणें ॥ हे तया हातीं ॥ ५ ॥ ते देतां देवकीजवळी ॥ गर्जे ब्रह्मांड किंकळी ॥ टाहो फुटली आरोळी ॥ दैस-निधीची ॥ ६ ॥ तेणें दचकले दुर्धर ॥ कामक्रोधादि असुर ॥ कंस पावला सत्वर ॥ धरावयासी ॥ ७ ॥ वेगीं आठवा आणवी ॥ तंव हातां आली आठवी ॥ कंस दचकला दुर्धर जीवीं ॥ नोहे जालेंची विपरीत ॥ ८ ॥ आठवा न दिसे डोळां ॥ आठवी पडली गळां ॥ कर्म न सोडी कपाळा ॥ आलें मरण मज ॥ ९ ॥ परासी मारितां जाण ॥ मारित्या मारी मरण ॥ कंस भीतसे आपण ॥ कृष्णभय करी ॥ १० ॥ आठवी उपडितां तातडीं ॥ तंव ते ब्रह्मांड कडाडी ॥ हातांतून निष्टली हडबडी ॥ कंस भयाभीतु ॥ ११ ॥ तंव ते गर्जली अंबरीं ॥ पैल गोकुळीं वाढे हरी ॥ तुजसगट बोहरी ॥ करील दैसकुळाची ॥ १२ ॥ वधितां देवकीचीं बाळें ॥ माझें पाप मज फळलें ॥ माझें निजकर्म बळें ॥ आलें मरण मज ॥ १३ ॥ भय संचलें गाढें ॥ तेणें पाऊल नचले पुढें ॥ पाहतां गोकुळाकडे ॥ मूर्छित कंस बा ॥ १४ ॥ आसनीं भोजनीं शयनीं ॥ भयें कृष्ण देखे नयनीं ॥ थोर भेदरा मनीं ॥ जनीं वनीं हरी देखे ॥ १५ ॥ कृष्णभयाचें मथित ॥ कंसपणा विसरे चित्त ॥ एकाजनार्दनीं भक्त ॥ भयें जीवन्मुक्त ॥ १६ ॥

॥ २०८९ ॥ कपटें पयपानासी ॥ मोहें मोहनरासी ॥ विषय विष-स्तनासी ॥ देवों आली ॥ १ ॥ तंव तो सावध निजसुखीं ॥ जिवासहित शोखी ॥ सायुज्याच्या समसुखीं ॥ समाधान बा ॥ २ ॥ द्वेषें कृष्णभक्ति ॥ करितां होय मुक्ति ॥ पूतनेसी प्राप्ती ॥ कवण झाली बापा ॥ ३ ॥ स्वरूपीं घडोघडीं ॥ ह्मणे बापा सोडीं ॥ कृष्णमुखीं कुडी ॥ सरती झाली बा ॥ ४ ॥ योगीया नकळे चित्तीं ॥ सिद्धा दुर्लभ प्राप्ती ॥ अंतीं कृष्णमूर्ती ॥

हृदयावरी बा ॥ ५ ॥ पाजूं आली विष ॥ तियेसी परमसुख ॥ कृष्ण-भजनीं दुःख ॥ कवणा नाहीं बा ॥ ६ ॥ भक्ता परम प्राप्ती ॥ द्वेषिया तेचि गती ॥ एकाजनार्दनीं प्रीति ॥ वैरिया चाऱ्ही मुक्ती बा ॥ ७ ॥

॥ २०९० ॥ निज पैजा समरसें ॥ गोकुळा आली द्वेषें ॥ कृष्णमुखीं विषें ॥ निर्विष जाली ॥ १ ॥ सोडीं सोडीं बा कान्हा ॥ आक्रंदे पूतना ॥ मागुती जनार्दना ॥ मी नयें येथें ॥ २ ॥ कृष्ण स्वानंदाचा कंदु ॥ कंसासी विरोधु ॥ विषयविषा पाजूं ॥ पूतना आली ॥ ३ ॥ मी ह्मणे बाळ तान्हें ॥ त्वां शोषिलें जीवें प्राणें ॥ मागुतें येणें जाणें ॥ खुंटलें बापा ॥ ४ ॥ ऐसा कैसा रे होसी ॥ मी तुझी रे मावशी ॥ परतोनि गोकुळासी ॥ मी नयें बापा ॥ ५ ॥ ऐसा कैसा बाळा ॥ माझ्या शोषिल्या जीवनकळा ॥ यशोदा वेल्हाळा ॥ वांचली कैसी बा ॥ ६ ॥ एकाजनार्दनीं ॥ द्वेषाच्या भावना ॥ सायुज्यसदना ॥ अरिवर्ग ॥ ७ ॥

॥ २०९१ ॥ अहंतृणावर्त बळी ॥ प्रवेशला गोकुळीं ॥ मोहो ममतेची राहाटोळी ॥ भवंडीतुसे ॥ १ ॥ रज उधळलें लेणें बळें ॥ झांकोळले बुद्धीचे डोळे ॥ कृष्ण आहे नाहीं हें नकळे ॥ सकळिकांसि हो ॥ २ ॥ श्रद्धा यशोदा ह्मणे ॥ माझा कृष्ण नेला कोणें ॥ नदिसे रजोगुणें ॥ माये काय करूं वो ॥ ३ ॥ कैसें निबिड दाटलें रज ॥ मीचि न देखें मज ॥ तेथें कृष्ण सोय निज ॥ कवण दावी ॥ ४ ॥ तळमळिताहे मन ॥ गेलें हातींचें निधान ॥ संता सोय सविघ्न ॥ बाधीना बा ॥ ५ ॥ बाळ सांवळें देखोनि दिठीं ॥ आला धांवोनी उठाउठीं ॥ कृष्णें घातिली मिठी ॥ अद्वैतपणें ॥ ६ ॥ वेगें नेला गगनावरी ॥ कृष्णची गगनभरी ॥ यावया जावया तिळभरी ॥ वावो नाहीं बा ॥ ७ ॥ जडला कृष्ण अंगीं ॥ कृष्णचि जाला वेगीं ॥ द्वैतभाव भंगी ॥ गेला साचा ॥ ८ ॥ संकल्प विकल्प पांख ॥ उपटिले दोन्ही देख ॥ येणें जाणें निःशेष ॥ खुंटलें साचें ॥ ९ ॥ कृष्णकरणी हे दुर्घट ॥ आली भुलविली वाट ॥ जीवनीं जेविं मीठ ॥ विरोनी जाय ॥ १० ॥ तृणा-वर्ता आवर्तु ॥ भवंडी कृष्णनाथु ॥ करणें देहाघातु ॥ करुनी ठेला ॥ ११ ॥ पहातां वेदविधी ॥ द्वैतदुष्टबुद्धी ॥ एकाजनार्दनीं ॥ बैसविला निज-पदीं ॥ १२ ॥

॥ २०९२ ॥ कंसराव चिंता करी ॥ नवल बाळकाची परी ॥ या गोकुळामाझारीं ॥ एक अरिष्ट वर्तलें ॥ १ ॥ आमुच्या सकळिकां प्रधानां ॥

माजी बळीवंत पूतना ॥ विष भरोनियां स्तना ॥ पाजूं तया पाठविली ॥२॥ तंव तो वेताळ कीं पिशाच ॥ काळभैरव कीं राक्षस ॥ यानें केला तिचा ग्रास ॥ विषासहित शोषिलें ॥ ३ ॥ जो अवतरला गोकुळीं ॥ दैत्य-दानवमर्दन बळी ॥ जिणें बाळकें शोषिलीं ॥ तेही शोषिली पूतना ॥ ४ ॥ आह्मी दुष्ट बुद्धी केली ॥ बहिण देवकी पीडिली ॥ तिचीं बाळकें वधिलीं ॥ आपलें अरिष्ट चुकवाया ॥ ५ ॥ तंव तें न चुकत पातलें ॥ विघ्न नसतांचि उगवलें ॥ आम्ही जाणतों इतुलें ॥ तरी कृष्ण आणितों बांधुनी ॥ ६ ॥ तंव माभळभट उठिला ॥ तेणें विडा मागितला ॥ निरंजन सांडवीन तान्हुला ॥ जो गोकुळीं वाढतसे ॥ ७ ॥ ऐसें वचन ऐकोनी ॥ विडा दिधला तत्क्षणीं ॥ आपुल्या आश्रमा जाउनी ॥ काय करिता जाहला ॥ ८ ॥ मग बोले स्त्रियेसी ॥ आम्ही जातों गोकुळासी ॥ बाळक जालें आहे यशोदेसी ॥ तें सांडवीन निरंजनीं ॥ ९ ॥ ऐसें बोलोनी निघाला ॥ मार्गीं जातसे एकला ॥ तंव श्रीकृष्ण हासिन्नला ॥ हा विप्र भ्रमित जालासे ॥ १० ॥ गोकुळ टाकिलें बिरारें ॥ देखे उपरिया धवलारें ॥ तेथींचीं माणसें अति नागरें ॥ लेणीं लुगडीं मिरवती ॥ ११ ॥ कृष्णवेधें वेधलीं ॥ अवघीं देवरूप जाहलीं ॥ वाचेसी सरस्वती आली ॥ तैसे मधुर बोलती ॥ १२ ॥ आला नंदाच्या मंदिरा ॥ उपमा दिसे क्षीर-सागरा ॥ तेथें गौळणी असती सुंदरा ॥ परियंदेती कृष्णातें ॥ १३ ॥ वृद्ध बहुकाळ ज्योतिषी ॥ देखोनि हारिखली मानसीं ॥ यशोदा लागली पायासी ॥ साउमेयासी ह्मणीतलें ॥ १४ ॥ पाट बैसकेचा घातला ॥ पुढें तिसरा ठेविला ॥ येरें आशीर्वाद दिधला ॥ मग कुशलता पुसिली ॥ १५ ॥ तंव त्या कृष्णातें दाविती ॥ पहाहो याची जन्मतिथी ॥ येरें उकलीती प्रीति ॥ चक्रांकिता साजिरी ॥ १६ ॥ शनि मंगळ राहु केतु ॥ दुष्टग्रह ऐसे सांगतु ॥ रोहिणी नक्षत्र अष्टमीआंतु ॥ भिन्न रात्रीं उपजला ॥ १७ ॥ पुढें विघ्न असे थोर ॥ मागें एक चुकलें गंडांतर ॥ कंसरायाचें भय फार ॥ या बाळकासी मांडेल ॥ १८ ॥ दैत्य करिती बरवाळा ॥ मेघ वर्षती शिळा ॥ गोकुळ सांडून अवघे पळा ॥ ऐसा अनर्थ होईल ॥ १९ ॥ पुत्र नव्हे हो लहाना ॥ हा तुह्मीं वोपा कां पोसना ॥ हांसिन्नला यादवराणा ॥ मग विंदाणा मांडिलें ॥ २० ॥ होता बैसकेचा पाटु ॥ तेणें घेतला उचाटु ॥ पिढियाचा खडखडाटु ॥ घरोघरीं सुटला ॥ २१ ॥ भट वाचित होतें पातडें ॥ तें तंव मुखीं आदळलें पिढें ॥ येर सुजविला तिढें ॥ मग भयाभीत

पळतु ॥ २२ ॥ रागें सांडितसे पाताडें ॥ ह्मणे गौळीये लाताडें ॥ आह्मां जोशियां केव्हडें ॥ पिढें दाना दिधलें ॥ २३ ॥ तंव त्या विशाळ काथवटी ॥ लागती महाबळभटापाठीं ॥ तिवया सिराळीं तिखटीं ॥ पाठीं रुपताती ॥ २४ ॥ तेलातुपाचीं मापें ॥ डवलें खोडवे आमुपें ॥ बडगे खुंटे भलिया कोपें ॥ पूजा बांधिती मस्तकीं ॥ २५ ॥ थोर आवेशा चढलें चाटु ॥ ह्मणती यासी सगळें घाटूं ॥ लाटणें ह्मणती भोईसी लाटूं ॥ ऐसा दुष्ट काय कीजे ॥ २६ ॥ शाळिग्राम गडबडिले ॥ देव पाट साविला आले ॥ अर्गळांचे सळ सुटले ॥ खिळखिळिले खिळविळें ॥ २७ ॥ थोर विसुरा केला डांगीं ॥ मार्ग रुंधिला चौरंगीं ॥ मुसळें कांडावयालागीं ॥ भोंवतें वेढा घातला ॥ २८ ॥ होते रवियांचे माथळे ॥ देह नवनीतें माखिले ॥ ते येऊन सर्वांगीं बैसले ॥ हिवें ऐसें मवाळ ॥ २९ ॥ नव्हे नव्हेगा आह्मी जोशी ॥ राख राख हृषीकेशी ॥ उखळामुसळांचिया राशी ॥ दाही दिशा व्यापिल्या ॥ ३० ॥ पाठीं पिढियाचे मेळ ॥ तिहीं झांकिलें रविमंडळ ॥ गजबजिले गोपाळ ॥ नव्हे गोकुळ सोपारें ॥ ३१ ॥ महाबळभटाचिया झडपणीं ॥ देखोनि पळालिया गौळणी ॥ दह्यादुधाचिया सांजवणी ॥ पिढा भरणीं फुटती ॥ ३२ ॥ देखे मांदियांचे थाट ॥ सामाजीं शिरे महाबळभट ॥ ह्मणे गोकुळींचा शेवट ॥ दैवयोगें पातलों ॥ ३३ ॥ शेतीं होतीं तिफणीं ॥ नांगर कुळवाचीं रुमणीं ॥ पाठीं लागलीया दणाणीं ॥ भटचि आमुचा स्वयंपाकी ॥ ३४ ॥ ब्राह्मण ह्मणोनि राखिला ॥ धोत्रें पातड्या मुकला ॥ मथुरेप्रांत ठाकिला ॥ नग्न हिंडे राजबिदीं ॥ ३५ ॥ देखोनि दैत्यसभा घनदाट ॥ उठाउठा आले ह्मणे पाट ॥ धापा फुटे पोट ॥ पुसे वाट घराची ॥ ३६ ॥ कंसासी सांगितला वृत्तांतु ॥ अझून कायरे निश्चितु ॥ बळिया वैकुंठींचा नाथु ॥ तो गोकुळीं वाढतसे ॥ ३७ ॥ ते वेळीं कागासुर बकासुर ॥ तृणावर्त दैत्य अघासुर ॥ मुष्टिक चाणूर वीर ॥ तिहीं विडे मागितले ॥ ३८ ॥ थोर घातकी पैजें ॥ आह्मी निर्दाळूं वोजें ॥ ये कथेसी चित्त दीजे ॥ विनवी तुह्मां संतांनो ॥ ३९ ॥ देवा भानुदास ह्मणे ॥ श्रोते कोपतील झणें ॥ पंढरीरायाचेनें ॥ हा विनोद गाईला ॥ ४० ॥

॥ २०९३ ॥ गोकुळींचा कान्हा अवतरला तान्हा ॥ प्रथम पूतना शोषीयेली ॥ १ ॥ जन्मला वोखट घालूं आला विट ॥ पिढें महाबळभट पिटविला ॥ २ ॥ वारा वाजे थोरु सुटला आवर्तु ॥ कृष्णें तृणावर्तु मर्दि-

येला ॥ ३ ॥ पाय हाणोनीयां मोडिला शकटु ॥ कृष्ण अलगटु देव-
कीचा ॥ ४ ॥ मृत्तिका खादली वारितां पैं देख ॥ उदरीं तिन्ही लोक
दाखविले ॥ ५ ॥ दहिं दूध चोरी आली बा मुरारी ॥ माया दांवें वरी बांधी-
तसे ॥ ६ ॥ नऊ लक्ष गोप न पुरती उदरा ॥ माया दामोदरा बांधीतसे
॥ ७ ॥ दावा दामोदरु बांधिला मायेनें ॥ यमलार्जुन दोन्ही उद्धरिले
॥ ८ ॥ वत्साचेनि रूपें आला पैं असुर ॥ झाडीं वत्सासुर झोडियेला ॥
॥ ९ ॥ ध्यानस्थाचे परी बैसलासे तीरीं ॥ बका दोन्ही चिरी केल्या
कृष्णें ॥ १० ॥ चेंडुवाचे मिसें नाथिला काळिया ॥ फणीरंगीं कान्हया
नृत्य करी ॥ ११ ॥ इंद्रा मान हरी गोवर्द्धन करीं ॥ धरोनी श्रीहरी
व्रज राखे ॥ १२ ॥ ताडफळांसाठीं धेनुक उठिला ॥ कृष्णें निवटिला
क्षणमात्रें ॥ १३ ॥ वणवा गिळिला राखिले गोपाळ ॥ संतोषें सकळ नाच-
ताती ॥ १४ ॥ गोपाळ वासुरें अघासुर गिळी ॥ कृष्णें दोन्ही केलीं
पहिल्या ऐसीं ॥ १५ ॥ वत्स वत्सपाळ नेले सत्यलोका ॥ अवघीं कृष्ण
देखा होउनी ठेला ॥ १६ ॥ वळितां गोधनें गोपाळाशीं खेळे ॥ पाहतां
निवती डोळे गोपिकांचे ॥ १७ ॥ शरदृतु शोभा शोभली रजनी ॥ कृष्ण
वृंदावनीं वेणू वाजे ॥ १८ ॥ वेणुनादध्वनी वेधिल्या कामिनी ॥ कृष्ण-
दीपें हरिणी दीपियेल्या ॥ १९ ॥ गोपीप्रती गोपी कृष्ण एक एकु ॥
सहस्रघटीं अर्कु नसोनी दिसे ॥ २० ॥ वेणुनादध्वनीं वेधल्या गोपिका ॥
रंगीं त्या नायिका नाचविल्या ॥ २१ ॥ अरिष्टा अरिष्ट झाला कृष्णनाथु ॥
केशिया आघातु केला तेणें ॥ २२ ॥ गोकुळीं दैत्यांसी केला आडदरा ॥
थोर कंसासुरा धाक पडे ॥ २३ ॥ गोकुळां अक्रूर पाठविला रागें ॥ ह्मणे
आणी वेगें रामकृष्णां ॥ २४ ॥ भाग्यभाव माझा कंसाचिया काजा ॥
वैकुंठींचा राजा देखेन आजी ॥ २५ ॥ गाईचे रे खूर विष्णुपदांकित ॥
पृथ्वी शोभत अक्रूर देखे ॥ २६ ॥ ध्वज वज्रांकुश कुंकुमांकित पदें ॥
अक्रूर आनंदें डोलतसे ॥ २७ ॥ तृण तरुवरा घाली लोटांगण ॥ पुढती
कृष्णचरण कैं देखेन ॥ २८ ॥ पावला गोकुळां तंव वैकुंठ थोकडें ॥
व्रज तेणें पाडें कृष्णसुखें ॥ २९ ॥ देखोनीयां कृष्ण विसरला आपणा ॥
अक्रूर श्रीकृष्णचरणीं लोळे ॥ ३० ॥ जाणोनी त्याचा भावो वेगीं
निघे देवो ॥ चला मथुरा पाहों आजी आह्मीं ॥ ३१ ॥ व्रजींच्या अंगना
करिताती रुदना ॥ मागुता कैं कान्हा देखों आतां ॥ ३२ ॥ रथारूढ हरी
पाहाती नरनारी ॥ यमुनापरतीरीं उतरले ॥ ३३ ॥ मारुनी रजक घेतलीं

लुगडीं ॥ गोपाळ आवडीं शृंगारिले ॥ ३४ ॥ पाटाव परिकर नेसले पीतांबर ॥ कासे मनोहर नाना मेचु ॥ ३५ ॥ अक्रूरें जाउनी कंसा जाणविलें ॥ मथुरेसी आले रामकृष्ण ॥ ३६ ॥ ऐसें ऐकोनी कंस दचकला मनीं ॥ सर्वरूप नयनीं कृष्ण देखे ॥ ३७ ॥ चंदन कचोळा भेटली कुब्जा ॥ वैंकुठींचा राजा चर्चियेला ॥ ३८ ॥ कुब्जा ह्मणे हरी चला माझे घरीं ॥ सुमनेंही वरी शृंगारिला ॥ ३९ ॥ हातीं धरोनी बरी ते केली साजिरी ॥ कंसभेटीवरी येईन घरां ॥ ४० ॥ माळिये सुमनें शृंगारिला हरी ॥ वैकुंठपायरी केली तया ॥ ४१ ॥ मुक्त मुमुक्षु विषयी हे लोक ॥ पाहाती कौतुक कृष्णलीला ॥ ४२ ॥ मथुरे चोहटा चालिला राजवाटा ॥ ठाकिला दारवंटा धनुर्याग ॥ ४३ ॥ तेथें अतिबळें कुवलया उन्मत्तु ॥ पेली महावतु कृष्णावरी ॥ ४४ ॥ त्यासी हाणोनियां लात उपाडिले दोन्ही दांत ॥ घायें महावता मुक्त केलें ॥ ४५ ॥ यागींचें कोदंड तें केलें दुखंड ॥ बळी ते प्रचंड रामकृष्ण ॥ ४६ ॥ घेऊनि गजदंत पावले त्वरित ॥ मारिले अमित वीर कृष्णें ॥ ४७ ॥ न धरत पैं वेगीं आला मल्ल रंगीं ॥ कंस तो तवकीं चाकाटला ॥ ४८ ॥ मालमल्लखडा करीतसे रगडा ॥ कृष्ण तो निधडा एकपणें ॥ ४९ ॥ मुष्टीक चाणूर घायें केला घातु ॥ कोपला अनंतु कंस पाहे ॥ ५० ॥ चाणूर मुष्टीक हातें निर्दाटिले ॥ दैत्य धुमसिले अनुक्रमें ॥ ५१ ॥ रणीं रणरगडा अशुद्धाचा सडा ॥ कृष्ण कंसाकडा उठावला ॥ ५२ ॥ नलगतां घायें धाकें सांडी देहो ॥ मथुरे केला रावो उग्रसेन ॥ ५३ ॥ सोडिलीं पितरें तोडिलीं बंधनें ॥ एकाजनार्दनें मुक्त केलीं ॥ ५४ ॥

---

## काल्याचे अभंग.

॥ २०९४ ॥ जो साक्षात् परब्रह्म ॥ करूं निघाला चोरीकर्म ॥ धरुनी बाळलीला संभ्रम ॥ आवडी परम नवनीताची ॥ १ ॥ सवें नवलक्ष संवगडे ॥ पशुपाळ वेडे बागडे ॥ सुदामा बोले बोबडें ॥ तें आवडे गोविंदा ॥२॥ थोगला अत्यंत वांकुडा ॥ जो निजाचा निज गडा ॥ कृष्ण गुज सांगे सापुढा ॥ होई गाढा चोरीकर्मा ॥ ३ ॥ घ्यारे सामुग्री चोखट ॥ खडे सराटे निकट ॥ माजी बांधारे बळकट ॥ शब्द कांहीं करूं नका ॥ ४ ॥ वस्त्रगाळीव मृत्तिका ॥ घेउनी प्रवेशतां शंकूं नका ॥ सकळ गृहींचा आवांका ॥

मज ठाऊक समाचार ॥ ५ ॥ गोपाळ ह्मणती चक्रपाणी ॥ चोरीकर्म ऐकिलें श्रवणीं ॥ धरी खडे सराटे मृत्तिका घेउनी ॥ न देखों कोणीही रिगाले ॥ ६ ॥ कृष्ण ह्मणे ऐका निवाडें ॥ रचिताती पात्रांचे उतरंडे ॥ पहातां न दिसती दृष्टीपुढें ॥ जैं अंधार पडे रजनीचा ॥ ७ ॥ भीतरीं प्रवेशोनी एकी कडे ॥ सव्य अपसव्य टाकावे खडे ॥ पात्रीं नाद उमटती धडाडे ॥ जाउनी रोकडें आणावें ॥ ८ ॥ शिकें लांबविलें अंतराळीं ॥ काठी टोंचुनी पाडावी दुळी ॥ धार लागेल मोकळी ॥ मिळोनी सकळीं प्राशन करा ॥ ९ ॥ साचल ऐकतील गौळणी ॥ कवाडें धरतील धांवोनी ॥ सराटे पसरा आंगणीं ॥ पाईं चुबकोनि गुंतती ॥ १० ॥ तेही चुकवोनी येती अबला ॥ तरी मृत्तिका घाला त्यांचे डोळां ॥ नेत्र चोळतील तंव तुह्मी पळा ॥ नवल कळा सांगितली ॥ ११ ॥ हांसें आलें कृष्णांतरीं ॥ मग प्रवेशले घरोघरीं ॥ कवाडें उघडोनी भीतरीं ॥ अंतरीं प्रवेशले ॥ १२ ॥ हळू हळू ठेविती पाउलें ॥ तंव गर्जती वांकियां वाळे ॥ जन ऐकतील ह्मणोनी गोपाळें ॥ कर्णीं अंगोळी घातली ॥ १३ ॥ कृष्ण नायके तंव जग बधीर ॥ कृष्ण न देखे तंव अंध जगत्रय ॥ कृष्ण न चाले तंव पांगुळ सर्वत्र ॥ चालक सर्व श्रीकृष्ण ॥ १४ ॥ सांचलें दहीं पात्रें काढिती ॥ थिजलें घृत करीं घेती ॥ कांहीं भक्षिती कांहीं खाती ॥ तोंडां माखिती निजल्याच्या ॥ १५ ॥ एकापुढें एक धांवती ॥ एक एकाचें लोणी हिरोनी घेती ॥ एकएकातें झोंबती ॥ वांटा मागती चिमटोनी ॥ १६ ॥ देखोनी नवनीताचीं भांडीं ॥ पेंधा नाचे दुपांडीं ॥ उगा पोरा ह्मणोनी धरी शेंडी ॥ गोळा तोंडीं लाविला ॥ १७ ॥ शिंकें उंच न पावे कर ॥ काठी टोंचोनी पाडिलें छिद्र ॥ कृष्ण निजमुखीं लावी धार ॥ देखोनी गोपाळ गजबजिले ॥ ॥ १८ ॥ गोपाळ ह्मणती कृष्णासी ॥ जाईं बा सकळ दूध तूं पिसी ॥ येरु ह्मणे लागा रे कोपरासी ॥ घ्यारे सावकाशीं दोहींकडे ॥ १९ ॥ तंव वांकुड्यानें केली टवाळी ॥ टांचें तुडवोनी पोरें उठविलीं ॥ तीं मातेसी बोभाइलीं ॥ तंव वत्सें सोडिलीं वडजानें ॥ २० ॥ वत्सें करिती स्तनपान ॥ बाळकें करिती रुदन ॥ गोपी उठल्या गजबजोन ॥ तंव नवनीतें वदन माखलें ॥ २१ ॥ वृद्धा सांडोनी शेजेसी ॥ उठतां देखिलें सुनेसी ॥ सासू देखतां तोंड पुसी ॥ येउनी केशीं धरियेली ॥ २२ ॥ तूंचि भक्षिसी नवनीत ॥ आणि दुसऱ्याचें नांव सांगत ॥ ऐशा सासूसुना भांडत ॥ आपण तेथोनी निघाले ॥ २३ ॥ मग पळाले सकळ ॥ दुजे गृहीं प्रवेशले गोपाळ ॥ गौळणी निद्रें व्यापिल्या सकळ ॥ टवाळी नवल मांडियेली ॥ २४ ॥

शिंकीं लांबविलीं दुरी ॥ यत्नें करिती परी न येती करीं ॥ मग वळंघोनी एकएकाच्या खांद्यावरी ॥ उतरती दहींपात्रें ॥ २५ ॥ उतरंडी दुरी लाविल्या न कळती ॥ सव्य अपसव्य खडे टाकिती ॥ पात्रीं लागतां नाद उठती ॥ तेंचि घेउनी येती हरिपाशीं ॥ २६ ॥ सुखसेजे गोपी बाळी ॥ निद्रिस्थ देखोनी अंबरें फेडिलीं ॥ तरुण देखोनी मुली ॥ टवाळी थोर मांडिली ॥ २७ ॥ तंव गजबजोनी सुंदरा ॥ एकें करें सांवरी चिरा ॥ जाउनी धरी मधलीया द्वारा ॥ सकळ चोरां कोंडिलें ॥ २८ ॥ तंव पुढें देखोनी वनमाळी ॥ ह्मणे भलारे सांपडलासी ये वेळीं ॥ तंव धरूं धांवे वेल्हाळी ॥ नयनीं गुरळी घातली ॥ २९ ॥ नेत्र चोळी व्रजकामिनी ॥ आपण तिचा हात धरुनी ॥ गोपाळांतें खुणवोनी ॥ सकळ तेथोनी पळाले ॥ ३० ॥ येरी धांवे पाठोपाठें ॥ तंव पाईं चुबकले सराटे ॥ वामकरीं धरुनी बोटें ॥ बैसे गुंतोनी धरणीवरी ॥ ३१ ॥ तंव दुसरी धांवली गोपिका ॥ तिच्या नयनीं घातली मृत्तिका ॥ नेत्र चोळीत अधोमुखा ॥ देखोनी यदुनायक हांसतसे ॥ ३२ ॥ मग चोरीकर्म सोडोनी ॥ सकळ प्रवेशले सदनीं ॥ प्रातःकाळ जालीया गौळणी ॥ गान्हाणीं सांगों आलीया ॥ ३३ ॥ यशोदे ह्मणती सकळा ॥ तुझीया पुत्राची नवल कळा ॥ कानीं न ऐकिली न देखों डोळां ॥ सुना सकळां विटंबिल्या ॥ ३४ ॥ एक ह्मणती यशोदे सुंदरे ॥ तुझी गांवची वस्ती पुरे ॥ उठवितो निजलीं पोरें ॥ फेडी चिरें करी नग्न ॥ ३५ ॥ खालीं ठेवोनी नवनीत ॥ मांजरा मुखीं चाटवीत ॥ आपण खदखदां हांसत ॥ ऐसें विटंबित नानापरी ॥ ३६ ॥ एक ह्मणे गौळणी ॥ माझें भक्षिलें क्षीर लोणी ॥ उच्छिष्ट मुखासी लावोनी ॥ आपण तेथोनी पळाला ॥ ३७ ॥ एक ह्मणे माझीं सोडिलीं वांसुरें ॥ उठविलीं निजलीं पोरें ॥ शिंकें तोडिलीं एकसरें ॥ फोडिल्या त्वरें माथणी ॥ ३८ ॥ गोपिकांसी बुझाविते सुमती ॥ ह्मणे निर्गुणासी गुण लाविती ॥ तुमचें खादलें किती निश्चितीं ॥ सांगा तितुकें देईन ॥ ३९ ॥ किती भक्षिलें रे गोविंदा ॥ तंव कृष्णापुढें आली राधा ॥ तिचे स्तन धरून हांसे गदगदां ॥ ह्मणे येवढा मुदा होता तिचा ॥ ४० ॥ हंसों आलें राधिकेसी ॥ गौळणी गेल्या घरासी ॥ यशोदा ह्मणे कृष्णासी ॥ सोडीं वेगेंसी गोधनें ॥ ४१ ॥ जो वेदासी अगोचर ॥ श्रुतीसी न कळे ज्याचा पार ॥ वर्णितां श्रमला फणीवर ॥ तो गुणगंभीर श्रीकृष्ण ॥ ४२ ॥ माथां मुगुट तेजःपुंज ॥ नयन श्रवणीं सांगे गुज ॥ ललाटीं कस्तुरी वोज ॥ तळपे तेज

तळवीया ॥ ४३ ॥ वैजयंती वनमाळा ॥ सुरंग गुंजाहार गळां ॥ कटीं मिरवे मेखळा ॥ झळके कळा कौस्तुभाची ॥ ४४ ॥ मुगुटा सुमनें वेष्टिलीं ॥ मयूरपिच्छें शिरीं खोंविलीं ॥ मग चालिले तये वेळीं ॥ जाळीं पृष्ठीवरी टाकिलीं ॥ ४५ ॥ काळी कांबळी खांद्यावरी ॥ कांसे खोंविली शृंगमोहरी ॥ जाला नंदाचा खिल्लारी ॥ हाकिलीं झडकरीं गोधनें ॥ ४६ ॥ बळिराम राजीवनयनु ॥ अलंकारमंडित शुद्धतनु ॥ चालिले गोपाळ घेउनी धेनु ॥ दोघे बाळ नंदाचे ॥ ४७ ॥ सर्वे नवलक्ष संवगडे ॥ पशुपाळ वेडे बागडे ॥ गोरज उधळले चहुंकडे ॥ पावले थडीं यमुनेच्या ॥ ४८ ॥ गाई सोडिल्या सैरावैरा ॥ भ्रमती सुखें खाती चारा ॥ वडज्या ह्मणे पेंद्या पोरा ॥ आण सत्वर पलशपत्रें ॥ ४९ ॥ मथुरेचें मीष करूनी ॥ हाटा निघालीया गौळणी ॥ माथां दहीं दूध घृत लोणी ॥ सामाजीं मुख्य राधा ॥ ५० ॥ गगन गर्जे वांक्या वाळें ॥ घनदाट चालती उताविळे ॥ मनीं इच्छिती कृष्णसोहळे ॥ तंव देखिलें वडज्यानें ॥ ५१ ॥ टाळी पिटोनी उठे वोजें ॥ ह्मणे कृष्णा आलें खाजें ॥ धांवोनी आला गोपी समाजें ॥ उभ्या थोकविल्या गौळणी ॥ ५२ ॥ तंव वडजा करी झगडा ॥ एकसरें धांवला वांकुडा ॥ पात्रें फोडिलीं कडाडा ॥ धरुनी रोकड्या आणिल्या ॥ ५३ ॥ कृष्णें राधा धरली करीं ॥ एका करें लोणी चोरी ॥ एका करें फेडी निरी ॥ एका करें कंचुकी ॥ ५४ ॥ हांसौं आलें राधिकेसी ॥ सोडी गोवळ्या सलगी कायसी ॥ भुलली कृष्णरूपा झाली पिसी ॥ लोणी पुसी कृष्णमुखा ॥ ५५ ॥ ऐसा विनोद विचित्र केला ॥ करीतसे घननीळ सांवळा ॥ द्यारे आतां सामुग्री चला ॥ अति क्षुधा लागली ॥ ५६ ॥ पाहुनी कल्पतरूची छाया ॥ घडिया घालिती बैसावया ॥ बैस ह्मणती यदुराया ॥ करूं काला आवडीं ॥ ५७ ॥ पेंधा घाली पत्रावळी ॥ वडजा सोडी मोटा जाळीं ॥ वांकुडा बैसवी गोपाळमंडळी ॥ वाढिताती पत्र शाखा ॥ ५८ ॥ नाना परीचीं पक्वान्नें ॥ षड्रस बहुत अन्नें ॥ गोडी सांगतां अनन्य ॥ पसरती पदर इंद्रादिकीं ॥ ५९ ॥ सकळां वाढिलें परिपूर्ण ॥ सकळ ह्मणती ब्रह्मार्पण ॥ संतांसी कळली खूण ॥ घालिती ग्रास कृष्णमुखीं ॥ ६० ॥ तंव जेवितां केली टवाळी ॥ कृष्णापुढें होती गूळ पोळी ॥ ती उचलोनी पत्रावळीं ॥ न राहे जवळीं दुरीं गेला ॥ ६१ ॥ वांकुल्या दावी कृष्णापुढां ॥ नेत्रीं खुणावीतसे गाढा ॥ वांकुड्यातें हाणोनी थोबाडा ॥ धरुनी रोकडा आणिला ॥ ६२ ॥ धरली वांकुड्याची शेंडी ॥ उच्छिष्ट घाली

तया तोंडीं ॥ पेंदा नाचे दुपांडीं ॥ थोंगला गडी सांपडला ॥ ६३ ॥ सरलें पुढलें पक्कान्न ॥ कृष्णें आणिलें दध्योदन ॥ मग पेंदा ह्मणे आपण ॥ कृष्णासी पैं ॥ ६४ ॥ आवड वडज्याची थोरी ॥ पेंदा ह्मणे टाका दुरीं ॥ कां टाकितां ह्मणोनी रुदन करी ॥ बुझावी श्रीहरी स्वानंदें ॥ ६५ ॥ सहज उदकाची वाटाळी ॥ अकर्मकार गोवळी ॥ हात पुसिले कांबळीं ॥ एक ढिरीसी पुसिती ॥ ६६ ॥ उठती घोंगडीया झाडोनी ॥ खेळ खेळत आले वृंदावनीं ॥ तुळशीप्रदक्षिणा करुनी ॥ खोंविल्या शिरीं मंजुरीया ॥ ६७ ॥ तंव इतक्यांत लोटला मध्याह्न ॥ अस्तमाना गेला दिनमान ॥ श्रीकृष्ण ह्मणे वचन ॥ चला जाऊं घराप्रती ॥ ६८ ॥ देहुडा उभा राहुनी ॥ गायी खुणाविल्या वेणुध्वनी ॥ टवकारल्या चारा विसरुनी ॥ आल्या मुरडोनी त्वरित ॥ ६९ ॥ गाई मेळविल्या हरी ॥ गोपाळ घालिती हुंबरी ॥ डांगा झेलिती अंबरीं ॥ पांवे मोहरीं वाजविती ॥ ७० ॥ सुदामा जाला वेत्रधारी ॥ ऐसे गोपाळ गजरीं ॥ चालिले मग झडकरीं ॥ पेंधा धरी छत्र तरूचें ॥ ७१ ॥ वडजा घेउनी अशोकडहाळी ॥ वारीतसे मुखावरील धुळी ॥ वांकुडा फोडी कौतुकें आरोळी ॥ ग्रामाजवळीं पातले ॥ ७२ ॥ रामकृष्ण आले ऐकोनी ॥ उतावेळ जाल्या गौळणी ॥ रांगोळ्या नाना परी अंगणीं ॥ घालिताती सप्रेमें ॥ ७३ ॥ नवलक्ष आरस्या करीं ॥ घेउनी उभ्या गोपिका नारी ॥ भावें वोंवाळिला श्रीहरी ॥ लोण उतरी यशोदा ॥ ७४ ॥ गाई निघाल्या गोठनीं ॥ गोपाळ गेले आज्ञा घेउनी ॥ आपण प्रवेशले निज भुवनीं ॥ सिंहासनीं बैसले ॥ ७५ ॥ ऐसा बाळक्रीडेचा सोहळा ॥ आनंद जाहला सकळां ॥ एकाजनार्दनीं देखिला ॥ श्रीबाळक्रीडा संपविली ॥ ७६ ॥

॥ २०९५ ॥ गोपाळ ह्मणती कान्हा ॥ सांभाळीं आपुल्या गोधना ॥ पळतां सैराट धांवती राना ॥ गेले ठेले सां तुह्मी जाणा ॥ १ ॥ कान्होबा पुरे पुरे तुझी गडी ॥ आह्मां गाईनें केली ओढाओढी ॥ ध्रु० ॥ तूं बैससी ठेकावरी ॥ आह्मी श्रमतों वेरझारीं ॥ २ ॥ ऐसें कैसें तुझें मुरारी ॥ आपुलीं गोधनें जतन करीं रे ॥ ३ ॥ तुझ्या नलगती आह्मां गाई ॥ तुझी संगत पुरे भाई ॥ जरी कोपेल तुझी आई ॥ तरी करील आमुचें काई रे ॥४॥ तुझीं गोधनें सैराटें ॥ दाही पळती दाही वाटें ॥ वळितां कष्ट होताती मोठे॥ ठेंचा लागुनी फुटलीं बोटें ॥ ५ ॥ पैल श्रवणीं पाहे गाये ॥ ते साद होये

तिकडे जाये ॥ उभी क्षणभरी न राहे ॥ वळितां जाती आमुचे पाय ॥ ६ ॥ पैल सांवळी डोळे सुटी ॥ देखोनी धांवे हिरवटी ॥ वळितां धाप न साहे पोटीं ॥ ती तूं सांभाळीं जगजेठी रे ॥ ७ ॥ पैल हुंगी कैसी सुजाण ॥ स्वाद घे परी न खाये तृण ॥ इसी हिंडावया थोडकें रान ॥ वळितां जाती आमुचे प्राण रे ॥ ८ ॥ पैल चोरटी रसाळ रंगी ॥ कळप सांडोनी वाढे वेगीं ॥ वळितां न वळे ती आम्हांलागीं ॥ तुझी संगति नको वेगीं रे ॥ ९ ॥ पैल सर्वांग सुकुमार मोठी ॥ चहूंकडे ती धांवत खोटी ॥ मऊ रान देखोनीयां अंग लोटी ॥ तिसी वळितां जालों हिंपुटी ॥ १० ॥ पैल लोभिष्ट हुंबरे कैशी ॥ उगी न राहे हुंबरे द्वेषी ॥ वळितां नवळे ती आम्हांसी ॥ ती तूं सांभाळीं हृषीकेशी रे ॥ ११ ॥ पैल हताळ वोढाळ मोठी एकी ॥ तेणें पाते गुड हाकी ॥ ऐशी खट्याळ नाहीं आणिकी ॥ वळितां वळसा घेती निकी ॥ १२ ॥ पैल पाय करिती भारी ॥ उभी न राहे क्षणभरी ॥ वळतां शिणलों बहु मुरारी ॥ ते तूं आपुलें जतन करी ॥ १३ ॥ पैल पोटफुगी खादाड ॥ कैसी खाउनी हागे वाड ॥ धूर्ता कधींच नव्हे धड ॥ तुझीं गोधनें न लागती गोड ॥ १४ ॥ पैल पैल मुतरी मुंजी लांडी ॥ कैशी सांचली घेत होडी ॥ धांवे जेथें गोड लागे तोंडीं ॥ वळतां पडती आमुची मुरकुंडी ॥ १५ ॥ पैल मनमोहन सुंदर ॥ कोणे काळीं नव्हे स्थिर ॥ इसी हिंडावया थोर वावर ॥ हांव धरुनी धांवती फार रे ॥ १६ ॥ ऐसीं गोधनें आमुच्या माथां ॥ घालूं पाहतोसी अनंता ॥ एकाजनार्दनीं विनवितां ॥ कृपा आली आलिंगी निज भक्तां ॥ १७ ॥

॥ २०९६ ॥ न लगो विषय गोपाच्या पाठीं ॥ न संडूं स्वात्म घोंगडें कांठीं ॥ विषयभोगें होईल तुटी ॥ कृष्ण जगजेठी अंतरे ॥ १ ॥ ह्मणवोनी हुंबली बोधाची ॥ कृष्णेंसी आमुची ॥ ध्रु० ॥ २ ॥ न टाकूं प्रेम शिदोरी कुरुधनें ॥ नेघों सायुज्य पळसपानें ॥ विषय ताटींचें मिष्टान्न ॥ तेणें न भेटे जनार्दन ॥ ३ ॥ ब्रह्म सेऊं करुनी ठोमा ॥ एकाजनार्दनीं गोविलें कामा ॥ अष्टभोग भुलवी रमा ॥ तोही आह्मां श्रीकृष्ण ॥ ४ ॥

॥ २०९७ ॥ हमामा भाई हुंबली ॥ गोपाळ वासुरें कान्होबा जाला ॥ ना ब्रह्म माया बोंबलीरे ॥ १ ॥ हमामा भाई बार कोंडे ॥ वासुरें लेंकुरें कान्होबा जाला ॥ ठकविले ब्राह्मण चहूं तोंडें ॥ २ ॥ हमामा भाई बार कोंडे ॥ कंसाचा केशीया कान्होबें मारिला ॥ हांसत आला होउनीयां

घोडारे ॥३॥ हमामा भाई खोल पाणी ॥ यमुनेमाजारीं कान्होबा पोहता ॥ कुटिल काळिया फणीरे ॥ ४ ॥ हमामा भाई तोंड वासी ॥ शिंक्याचें लोटकें कान्होबें भेदिलें ॥ लागली धार गोड कशीरे ॥ ५ ॥ हमामा भाई तोंड वासी ॥ औटवी मात्रा कान्होबें भेदिली ॥ लागली गोड कैसीरे ॥ ६ ॥ हमामा भाई चाट बोटें ॥ चोरीचें दूध गोड मोटें ॥ ७ ॥ हमामा भाई गट गोळे ॥ स्वर्गींच्या देवां लाळ गळे ॥ ८ ॥ हमामा भाई गट गोळे ॥ गोपाळ जेविती खेळीं मेळें ॥ ९ ॥ हमामा भाई मिठी मिठी ॥ आजचें भोजन गोड सुटी ॥ १० ॥ एकाजनार्दनीं तृप्त जाला ॥ ब्रह्मदेव लाळ घोटी ॥ ११ ॥

॥ २०९८ ॥ कृष्ण लाजा ते राधा राहे घरीं ॥ जीवनालागीं जात्रें जीव भारी ॥ कृष्ण दृष्टी तो माझी नुरे उरी ॥ यमुने जातां सन्मुख देखे हरि ॥१॥ कृष्ण पावला वो कृष्णपावला हो ॥ध्रु०॥ एकाएकी एकटु ॥ माझ्या संसारा झाला शेवटु ॥ मी पतिव्रता तो झोंबतो आलगटु ॥ आपपर नाहीं तूं होसी क्रियानष्टु ॥ २ ॥ दृश्य न दिसे तंव जाली दुपारु ॥ रळीया वासना फेडी हरि ॥ सुटली लिंगदेह गांठी ते अभ्यंतरीं ॥ सरसर निर्लज्जा मी परनारी वो ॥ ३ ॥ कृष्णा मागें ते माया आली जाणा ॥ पुसे यशोदा बा काय जालें कान्हा ॥ येरू स्फुंदों स्फुंदों करी रुदना ॥ भाव चेंडु तो चोरिला गोपांगना वो ॥ ४ ॥ गोपी ह्मणती हा कर्मनष्ट कुडा ॥ क्रियाप्रमाण बोला खुडा ॥ हा झोंबतसे आवडीच्या चाडा ॥ कृष्ण ह्मणे तूं माग इसी झाडा वो ॥ ५ ॥ वासना वास तें फेडी प्रमदा ॥ भाव चेंडुवातें देखे यशोदा ॥ हर्षें कृष्ण हांसे खदखदां ॥ स्वेदु रोमांचित येरी कांपत गदगदां वो ॥६ ॥ नष्ट गवळणी विजन व्यभिचारी ॥ परा रातलीया निर्लज्ज निर्धारीं ॥ दैवें आलीये मा चुकली परी ॥ कृष्णा दूषण तुह्मी लावीतसा भारी वो ॥ ७ ॥ कृष्णें लाघव तें कैसें केलें पाहे ॥ गोपी उपरमोनी पाठिमोरीं पाहे ॥ माथा वंदीतसे कान्हयाचे पाय ॥ एकाजनार्दनीं दोष नाहीं वो माय ॥ ८ ॥

॥ २०९९ ॥ शुद्ध स्फटिके आपुलें रूप देखे ॥ कृष्ण तेणें हरिखें डोलतसे ॥ १ ॥ देह विदेहा आलिंगन स्वानंदें चुंबन ॥ तये संधीं मन हारपत ॥ २ ॥ स्वस्वरूपीं भेटी थोर उल्हास पोटीं ॥ उन्मळीत दृष्टी निज रूप पाहे ॥ ३ ॥ हें जाणोनी माया धांवे लवलाहें ॥ उचलोनी कान्हया दृश्य दावी ॥ ४ ॥ माझें रूप मज देई घालितो लोळणी ॥ जननी नाना

गुणीं बुझावीत ॥ ५ ॥ माया मोहें गुणाचें खेळणें ॥ येथें कृष्ण ह्मणे जीवें भावें ॥ ६ ॥ देह घटाबाहेरीं नवचें मी मुरारी ॥ श्रद्धा उष्ण भरी तावितसे ॥ ७ ॥ विषय पंचधारा देईन बा साखर ॥ नाथिली करकर कां करिसी ॥ ८ ॥ घेईं स्तनपान वो रसु इंद्रिया गोरसु ॥ मायेसी उदासु रुसूं नको ॥ ९ ॥ इच्छा गाउलीची साय सावकाश खाय ॥ गो गोरसाची माय मज चाड नाहीं ॥ १० ॥ तो तंव ठाईंच्या ठाईं म्यां तंव कांहीं नेलें नाहीं ॥ निजरूप पाही जैसें तैसें ॥ ११ ॥ तुझी पडलीया पडसाई असतांचि जालें नाहीं ॥ नास्तिक तेंचि डोई सबळ जाले ॥१२॥ तुझीया सांगातें करणें आणि भूतें ॥ अहंकारें थितें चोरुनी नेलीं ॥ १३ ॥ दुजेपणें पहातां धरितां नये हातां ॥ निज रूप तत्वतां काढोनी देईं ॥ १४ ॥ होसी चक्रचाळ घालिसी आळ ॥ बाळलीला खेळ निर्वाणींचा ॥ १५ ॥ मज मायेवेगळा नवचे बा गोपाळा ॥ आप रूपीं खेळा खेळूं नको ॥ १६ ॥ नेणो कैशी आवडी माया ह्मणसी कुडी ॥ भली नव्हे खोडी तान्हुलीया ॥ १७ ॥ हे नायके उत्तर ह्मणे परती सर ॥ निजरूपीं साचार दावीं मज ॥ १८ ॥ यापरी कान्हया सस्वरूपीं थाया ॥ बुझावितां माया वेढोनी गेली ॥ १९ ॥ आपुलीया स्वप्रभा आपण पावे शोभा ॥ साह्य कृष्ण उभा एकपणें ॥ २० ॥ माया मोहकता गुणाची वार्ता ॥ कृष्ण कृष्णपणीं तत्वतां एकत्वेंचि ॥२१॥ एकाजनार्दनीं निजीं निजमिळणी ॥ सगुणीं निर्गुणीं कृष्ण एक ॥ २२ ॥

॥ २१०० ॥ यमुनेचे तीरीं नवल परी वो ॥ तेथें गोपाळ वत्सें स्वयें जाला हरी वो ॥ १ ॥ नवल देखा ठक तिन्ही लोकां ॥ भुली ब्रह्मादिकां पार नाहीं सुखा ॥ २ ॥ कृष्ण वत्साची ध्वनी गाई पान्हावे ॥ तेथें वोळलें निराळें विस्मयो गौळि जना ॥ ३ ॥ गोपाळांचे वचनीं सुखें सुखा भेटी ॥ तेथें वोसंडला आनंद माय कृष्णीं भेटी ॥ ४ ॥ ऐसा रचिला आनंदु देखोनी निवाडा ॥ तेथें सृष्टीकर्ता तोही जाला वेडा ॥ ५ ॥ ऐसें अचोज पैं मना नये अनुमाना ॥ अचुंबीत करणें एकाजनार्दना ॥ ६ ॥

॥ २१०१ ॥ रासक्रीडा करुनी आलीया कामिनी ॥ कृष्णीं लांचावल्या आन न रिघे मनीं ॥१॥ जें जें दृष्टी दिसे तें तें कृष्ण भासे ॥ गोपिका समरसें निस बोधु ॥ २ ॥ आसनीं शयनीं भोजनीं गमनागमनीं ॥ सर्व कर्मीं सदा कृष्णमय कामिनी ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं व्यभिचार परवडी ॥ गोपिका तारिल्या सप्रेम आवडीं ॥ ४ ॥

॥ २१०२ ॥ कृष्ण देखतांचि गेलें ज्ञान ॥ शेखीं बुडविलें महिमान ॥ १ ॥ भली नव्हे हे कृष्णगती ॥ सखे पळविले सांगाती ॥ २ ॥ मायेचा करविला बंधु ॥ शम दमादि पळविले बंधु ॥ ३ ॥ द्रष्टादृश्य आदिदर्शन ॥ तिन्ही सांडिले पुसून ॥ ४ ॥ ब्रह्मास्मि शुद्ध जाण॥ तेथील शून्य केला अभिमान ॥ ५ ॥ एकाजनार्दनाची प्राप्ति ॥ ज्ञान अज्ञान हारपती ॥ ६ ॥

॥ २१०३ ॥ तुझें श्रीमुख सुंदर ॥ कुसुम शुभ कांति नागर ॥ कांसे पीतांबर मनोहर ॥ पाहुनी भूल पडली करुणाघना ॥ १ ॥ मुरली नको वाजवूं मनमोहना ॥ ध्रु० ॥ सर परता होये माघारा ॥ देहभाव बुडाला सारा ॥ नाहीं संसारासी थारा ॥ भेद भ्रम गेला कमलनयना ॥ २ ॥ ध्वनि मंजुळ ऐकिली कानीं ॥ सर्वसुखां जाली धणी ॥ एकाजनार्दनीं ध्यानीं मनीं ॥ एकपण जगजीवना ॥ ३ ॥

॥ २१०४ ॥ सुंदर मुख साजिरें कस्तूरी मळवटीं ॥ मुरली वाजवीत उभा यमुनेचे तटीं ॥ गोपवेष शोभे खांदां कांबळी हातीं कांठीं ॥ तो नंद-नंदन देखिला जगजेठी वो ॥ १ ॥ मंजुळ मंजुळ वाजवी मुरली ॥ ऐकतां माझी चित्तवृत्ति हरली ॥ ध्रु० ॥ चार वेद जया गाताती आनंदें ॥ तो गोकुळीं गाई चारी परमानंदें ॥ श्रुति शास्त्रें वेधलीं जयाचीया छंदें ॥ तया गोवळ ह्मणती कान्हा आनंदें ॥ २ ॥ ऐशी आवडी भक्तीची देखा ॥ उच्छिष्ट खातां कांहीं न धरी शंका ॥ एकाजनार्दनीं भुलला तयाचीया सुखा ॥ वैकुंठ नावडेचि देखा ॥ ३ ॥

॥ २१०५ ॥ नानापरी समजाविते परी न राहे श्रीहरि ॥ दहीं भात कालवोनी दिला वेगीं झडकरी ॥ कडेवरी घेउनीयां फिरलें मी द्वारोद्वारीं ॥ १ ॥ राधे राधे राधे राधे घेई श्यामसुंदरा ॥ नेई आतां झडकरी आपुलीया मंदिरा ॥ ध्रु० ॥ क्षणभरी घरीं असतां करी खोडी शारंगपाणी ॥ खेळावया बाहेरी जातां आळ घेती गौळणी ॥ थापटोनी निजवितां पळोनी जातो राजद्वारा ॥ २ ॥ राधा घेउनी हरिला त्वरें जात मंदिरीं ॥ हृदयमंचकीं पहुडविला श्रीहरि ॥ एकाजनार्दनीं हरिला भोगी राधा सुंदरा ॥ ३ ॥

॥ २१०६ ॥ ऐक ऐक सखये बाई नवल मी सांगूं काई ॥ त्रैलो-क्याचा धनी तो हा यशोदेसी ह्मणतो आई ॥ १ ॥ देवकीनें वाहीला

यशोदेनें पाळिला ॥ पांडवांचा बंदीजन होउनीयां राहिला गे ॥ २ ॥ ब्रह्मांडाची सांटवण योगीयाचें निज धन ॥ चोरी केली ह्मणऊन उखळासी बंधन ॥ ३ ॥ सकळ तीर्थें जया चरणीं सुलभ हा शूलपाणी ॥ राधिकेसी ह्मणतो तुझी करीन मी वेणी फणी ॥ ४ ॥ शरण एकाजनार्दनीं कैवल्याचा मोक्षदानी ॥ गाई गोप गोपीबाळा मेळविले आपुलेपणीं ॥ ५ ॥

॥ २१०७ ॥ न माये चराचरीं त्रैलोक्य उदरीं ॥ तो यशोदेचे कडेवरी शोभतो कैसा ॥ १ ॥ गोपवेषमिषें ब्रह्मीया लाविलें पिसें ॥ तो गोप वत्स वेषें शोभतो कैसा ॥ २ ॥ एके घटिकेवरी सोळा सहस्र घरीं ॥ नोवरा श्रीहरि शोभतो कैसा ॥ ३ ॥ अनंगेंविण अंगें गोपी भोगिल्या श्रीरंगें ॥ तो कृष्ण निजांगें शोभतो कैसा ॥ ४ ॥ सच्चिदानंदघन तान्हुलें आपण ॥ एकाजनार्दन शोभतो कैसा ॥ ५ ॥

॥ २१०८ ॥ भक्ति गोकुळीं नवविधा नारी गजरे चालती भारी वो ॥ सुनीळ जळीं अति संतोषें क्रीडती यमुनातीरीं वो ॥ १ ॥ स्थिर स्थिर माधवा विचार धरी ॥ आह्मी परात्पर परनारी ॥ वासना वास अलक्ष लक्षोनी ॥ दह्यांची करिसी चोरी रे ॥ २ ॥ आकंठ मग्न सुनीळ निरीं ॥ घनसांवळा देखोनी वरी ॥ येथोनी निघतां लाज मोठी ॥ विनोद न करीरे ॥ ३ ॥ लाज सांडोनी धरा चरण ॥ तंव मी होईन प्रसन्न ॥ एका जनार्दनीं निःशंक जाल्या ॥ जीवींची जाणोनी खूण वो ॥ ४ ॥

॥ २१०९ ॥ प्रेमपान्हा मुख रामनो नाम ॥ द्वारका चाले सुदामा ॥ पूर्व प्राचीन पुण्य मोठो ॥ तिन्हे मिलगयो मेघशाम ॥ १ ॥ तान्हारोकडु ब्राह्मणरे रमानाथु ॥ गुरु ग्रहनो ह्यारोसाथ ॥ क्रिया कर्म तो थारो संघात ॥ देह गेह दारिद्रनो घात ॥ ध्रु० ॥ निज बोध महाद्वारीं प्रवेशाति ॥ दिठो सन्मुख यादवपति ॥ नयनो निर बहे स्वेद रोमांच ॥ देह गेहनीं बिसरो स्फुर्ती ॥ २ ॥ जीव सखा सुदामा हरि आयो अलिंगण ॥ सचनो विस्मयो उत्तर गयो भलपाईयो समाधान ॥ ३ ॥ प्रेमपन्हा कृष्ण भिति घनि ॥ हरि सेवितो भक्तनो भाव ॥ ग्रास मात्रे देह दारिद्य भांज्यो ॥ निज पद पाईयो जीव ॥ ४ ॥ जीव परमात्मा समरसे ॥ ते मज भेटियो कृष्ण सुदामा ॥ एकाजनार्दनीं ऐक्य भयोतो आरुढो निज धामा ॥ ५ ॥

॥ २११० ॥ कृष्णें सुदामा मोकल्योरे ॥ सुखें चालिवो निज धामा ॥ दृष्टद्रष्टा वृत्ति निवृत्ति सबाह्य रामे राम ॥ १ ॥ भलो चालियो निज बोध कृष्ण प्रेम प्रिति आनंदें ॥ गात नाचत नृत्य विनोदें ॥ पदिं डुल्लत तेणें छंदें ॥ ध्रु० ॥ निज पंथें पदि चालते ताहां खुटीयो गमागम ॥ क्रिया क्रियमाण शुन्य भयो परापरला जिये धर्म ॥ २ ॥ कृष्णकृपा परपाईयो ब्रह्मादिक वंदित रज ॥ एकाजनार्दनु नाम मात्रें वृत्ति समरसे सहज ॥ ३ ॥

॥ २१११ ॥ जवळचि कृष्ण अगोचर कैसा ॥ हेमलो पीठसा आळंकारी ॥ १ ॥ आम्रुमा वोरिया गाउ निरंतर ॥ देवा अगोचरा कृष्ण स्वामी ॥ ध्रु० ॥ चित्रपटी तंतु एक असे जैसा ॥ जाण कृष्ण तैसा चराचरीं ॥ २ ॥ नेत्रेंविण कृष्ण चराचरीं देखे ॥ श्रोत्रेंविण ऐके गुह्य सर्व ॥ ३ ॥ रसनेंविण सेवी ॥ देहाविण अनुभवी ॥ स्वस्ति त्याचा गांवीं चित्स्वरूपाची ॥ ४ ॥ चित्स्वरूप ठसा देहि केवी होय ॥ एका शरण जाय जनार्दनीं ॥ ५ ॥

॥ २११२ ॥ एक ह्मणोनी तुज जवळ आलें ॥ अभिन्नव खेळ देखोनि विस्मित जालें ॥ गगन गोधनें तूंचि देखुनि भ्याले ॥ माझें मीपण हिरोनि आपणामाजी गोळविलें ॥ १ ॥ नुगवे तयाचि गुंती करणें काय ॥ कल्पांत गेलिया तरी उघडा न होय ॥ ध्रु० ॥ एकला नव्हे तो विश्वंभरु बिंबला ॥ जंगम स्थावर होउनी असे उरला ॥ तेणें काया वाचा मनु माझा वेधिला ॥ अकळ नकळसी कान्हो कौसाल मल्ला ॥ २ ॥ एकुकीं अनेक तया जाण कवण ॥ सद्गुरु कृपा कृष्ण दिसे परिपूर्ण ॥ यालागीं एकाजनार्दनीं शरण ॥ ऐक्य भोगितां कैचें दुजेपण ॥ ३ ॥

॥ २११३ ॥ गोकुळींच्या गोपनारी ॥ तलग तलग श्यामसुंदरी ॥ राधा चंद्रावळी भारी ॥ मथुरेहाट जाती सुंदरी ॥ १ ॥ कृष्ण भेटेल ह्मणून ॥ जाती मथुरे कारणें ॥ ध्रु० ॥ गाई चारितां शार्ङ्गपाणी ॥ वाटे भेटली राधा गौळणी ॥ २ ॥ कृष्ण दान मागे तीसीं ॥ नीरी धरोनी हृषीकेशी ॥ ३ ॥ येतां देखीली यशोदा माये ॥ ह्मणे काय करीता होये ॥ ४ ॥ यशोदा ह्मणे हृषीकेशी ॥ परनारीसी झोंबसी कैसा ॥ ५ ॥ येरु रुदन करी सांगे ऐसा ॥ चेंडू लपवीला निरीये फांसा ॥ ६ ॥ राधा

ह्मणे यशोदे परियेसी ॥ चेंडू नाहीं नाहीं मजपासी ॥ ७ ॥ हा तव लटींका चक्रपाणी ॥ नीरी आसडीतां चेंडू पडे धरणी ॥ ८ ॥ यशोदा ह्मणे नकळ्या नारी ॥ वाटे बसोनी क्षेम दया हरी ॥ ९ ॥ एकाजनार्दनीं नरहरी ॥ नाम घेतां पातकें जाती दुरी ॥ १० ॥

॥ २११४ ॥ गोकुळीं एकी नारी ॥ भोगीतसे हरि ॥ ऐकोनि टेहणी करी ॥ भ्रतारु तिये ॥ १ ॥ येरी नेऊनि एकांता ॥ वश्य केलें कांता ॥ चरणावरि ठेविला माथा ॥ स्वात्मभावें ॥ २ ॥ अखंड एकी घडी ॥ कृष्ण मज न सोडी ॥ आजी म्यां हे उघडी ॥ गोष्टी केली ॥ ३ ॥ तो दाखवी पां मातें ॥ शीक लाविन त्यातें ॥ न करी हें मागुतें ॥ करिन तैसे ॥ ४ ॥ स्थिर कवण आहे येथें ॥ पहातोसि कवणातें ॥ नोळखसि मातें ॥ कवण आहे ॥ ५ ॥ येरु ह्मणे जाणतों जोडी ॥ किती लाविसी गोडी ॥ भोगिल्याविण सोडी ॥ तैसा नव्हे ॥ ६ ॥ सेजे चाल वेगीं ॥ माझा भोग भोगीं॥ बोलों नको उगी ॥ राहे आतां ॥ ७ ॥ तियेचा मनीं छंदु ॥ भ्रतारा व्हावा बोधु ॥ ह्मणोनि गोविंदु ॥ अनुसरिला ॥८॥ कृष्णखुणेच्या बोवरा ॥ निजवूनि भ्रतारा ॥ ते गेली माहेरा ॥ शोभनिये ॥ ९ ॥ पूर्ण निजाचिया भरा॥ अदृश्य पाहारा ॥ लोपित दृश्याकरा ॥ आला हरि ॥ १० ॥ तया वेगाचा पडिभरु ॥ करितां नव्हे स्थिरु ॥ नधरत अविचारु ॥ संचरला ॥ ११ ॥ तेथें धरुनि करें करु ॥ न ह्मणे नारीनरु ॥ आवडिचा पडिभरु ॥ उमज नाहीं ॥ १२ ॥ येरी ह्मणे धीटा ॥ येथें आलासी कोठा ॥ कवणासि अलगटा ॥ झोंबतोसि ॥ १३ ॥ घरोघर केलें ॥ तें तुज फावलें ॥ आजि येथें जालें॥ आन असे ॥ १४॥ येरु ह्मणे कांते ॥ भेडविसी मातें ॥ भोगील्याविण तुतें ॥ जावों नेदीं ॥ १५ ॥ हा उदित विषयभोगी ॥ घडला नाहीं अंगीं ॥ तंवचि वरि वेगीं ॥ उपाव चिंतु ॥ १६ ॥ हा बळें तंव न लोटे ॥ शस्त्रें न निवटे ॥ जड लहान न लोटे ॥ काय करूं ॥१७॥ याचेनि तेजें आगी करपे ॥ चंद्र सूर्य लेपे ॥ शून्याशून्य लोपे ॥ तया प्रभा ॥ १८ ॥ तेणें दिपलेनि दीपें ॥ ही मही हरपे ॥ आप आपरूपें ॥ पालटले ॥ १९ ॥ कृष्णा राहें स्थिरु ॥ नावेक धरीं धिरु ॥ नारि कीं हा नरु ॥ निर्धारें पाहें ॥ २० ॥ माझें पाहाणें साचार ॥ [illegible]ख्या नारीनर ॥ अवघेंचि चराचर ॥ समचि देखे ॥ २१ ॥ अनंत ब्रह्मांड कोटि ॥ सारिख्या देखे सृष्टी ॥ तुजचिलागीं दृष्टी ॥ आन कैची ॥ २२ ॥ घरोघरीं रति ॥ नारी-

नरांप्रति ॥ पुरुषीं पुरुषरति ॥ विषयो माझा ॥ २३ ॥ दादुलयाचा जीउ ॥ कीं बाईलेचि जीउलि ॥ सांग पां ईहिं बोली ॥ विषयो कोठें ॥ २४ ॥ येरु ह्मणे कळली गोष्टी ॥ आपुलीच भाज खोटी ॥ अभिन्ने राति भेटी ॥ कृष्णीं केली ॥ २५ ॥ सा देउनि अनुसरा ॥ ते गेली माहेरा ॥ मजचि दुराचारा ॥ वोपियेलें ॥ २६ ॥ यासी नचले कांहीं माझें ॥ पहातां न दिसे दुजें ॥ जिणें जीवित सहजें ॥ खुंटलें आतां ॥ २७ ॥ मज नाहीं स्त्रीलिंग ॥ नचले बालाचें अंग ॥ कैसा होईल भोग ॥ नकळे यासी ॥ २८ ॥ ऐसी विचारें ठेली युक्ती ॥ कृष्णीं लागली मति ॥ पाहत पाहतां स्थिति ॥ पालटली ॥ २९ ॥ तो प्रकाशु पुंजाळा ॥ तेजाचा उमाळा ॥ प्रपंच पोटला ॥ हरपला ॥ ३० ॥ हारुषाचिया कोटि ॥ होत हरुषीं भेटी ॥ आनंदुची सृष्टि ॥ हेलावतु ॥ ३१ ॥ तेथें नाहीं स्त्रीपुरुष ॥ पारुषले वेष ॥ सुखावरी सुख ॥ रचलें दिसे ॥ ३२ ॥ स्थिरु सांगों काय कैसें ॥ सांगावयासारखें नसे ॥ सांगतांचि पिसें ॥ ह्मणेल जग ॥ ३३ ॥ बोलों जातां कोडें ॥ बोलासि तें नातुडे ॥ शब्द मागुता मुरडे ॥ सलज्जपणें ॥ ३४ ॥ मनाचिये पोटीं ॥ होत सुखाचिया कोटि ॥ सुखें सुख घोटी ॥ स्वरूपपणें ॥ ३५ ॥ आनंदाचे खोळे ॥ आनंदुचि लोळे ॥ सोहंविद्या सोहळे ॥ होत आह्लाति ॥ ३६ ॥ अमृता पाहुणेरु ॥ अमृताचा वो गुरु ॥ स्वादासि निडारु ॥ स्वादें होतु ॥ ३७ ॥ ऐसिया कृष्णसुखा ॥ पकडल्या गोपिका ॥ धांवताती फुका ॥ सलोभपणें ॥ ३८ ॥ कृष्णसुखाची आवडी ॥ घेतलीसे कुडी ॥ ह्मणोनि प्रपंचगोडी ॥ गोपिकां नाहीं ॥ ३९ ॥ धन्य गोपांगना ॥ धन्य गोपाळ जाणा ॥ धन्य वृंदावन ॥ अवघेंचि हें ॥ ४० ॥ धन्य आमुचें कुळ ॥ धन्य हें गोकुळ ॥ यावेगळें कुळशिळ ॥ जळो जळो ॥ ४१ ॥ जळो तो आचारु ॥ जळो तो विचारु ॥ जया व्यभिचारु ॥ कृष्ण नाहीं ॥ ४२ ॥ बापु बापु गे बाईले ॥ तुवां आपुल्या ऐसें केलें ॥ कृष्णसुख दाविलें ॥ स्वानुभावें ॥ ४३ ॥ ते कांता नव्हे गुरु ॥ केला उपकारु ॥ कृष्णचि निर्धारु ॥ होउनि ठेला ॥ ४४ ॥ जन्मशतांचिया कोडी ॥ तोडोनियां बेडी ॥ सुखें उभी गुढी ॥ स्वरूपपणें ॥ ४५ ॥ तेथें सन्मुख विमुख कांहीं ॥ द्रष्टा दृश्य नाहीं ॥ कृष्णरूपीं पाहीं ॥ स्वरूप केला ॥ ४६ ॥ तो प्रकाशाचा पाटु ॥ सुटला लखलखाटु ॥ आदिमध्य शेवटु ॥ नाहीं तया ॥ ४७ ॥ एसी धरलीया कृष्णकास ॥ नसंडी आपुली भाष ॥ कळिकाळासि वास ॥ पाहों नेदी ॥ ४८ ॥ वेदा ठेवित खोडी ॥

विधिचे पाय मोडी ॥ जारपणें काढी ॥ सायुज्यता ॥ ४९ ॥ पिताम-हाचा पिता ॥ सुभानुप्रकाशा ॥ कोंदल्या दाही दिशा ॥ लखलखितां ॥ ५० ॥ एका जनार्दनीं ॥ अभिनव मिळणी ॥ व्यभिचारें गौळणी ॥ उद्धरिल्या ॥ ५१ ॥

---

## जमनाख्यान.

॥ २११५ ॥ यमुनेजळकुळीं ॥ विजन वनस्थळीं ॥ तेथें आले वनमाळी ॥ जेवटिया ॥ १ ॥ करीं घेउनियां दधिकवळ ॥ दिसताहे सोज्वळ ॥ संवादें मिनला मेळ ॥ संवगडियांचा ॥ २ ॥ ते ह्मणती ऐके कान्हा ॥ आवडी ये कीं मना ॥ तुझेनि हातें भोजना ॥ स्वादु पाहूं ॥ ३ ॥ मुखिचें शेष देसी ॥ तरी तृप्ती आह्मांसी ॥ नेघे अनुच्छिष्टासि ॥ तुझी आण बापा ॥ ४ ॥ ब्रह्मलोकीं गोवळा ॥ न्यासिकी पुंश्चळा ॥ अकुळीं कीं गोकुळकुळा ॥ कुळवाडी करूं ॥ ५ ॥ हा देवकीउदरा आला ॥ कीं जगदोद्धार जाला ॥ अचोज पैं अंबुला ॥ कळितां न कळे ॥ ६ ॥ श्रेष्ठया करिती शक्ति ॥ ते तंव त्याच्या हातीं ॥ तोचि आला गती ॥ पाहों त्याची ॥ ७ ॥ मुळींचें माहिमान ॥ केवीं देखे गाभे वन ॥ तेथें ब्रह्मेपण ॥ वेडावलें ॥८॥ ते राहोनि सभोंवते ॥ पसरुनि मुखातें ॥ लक्षिती कृष्णातें ॥ कवळामाजी ॥ ९ ॥ ते नव्हती गोपाळवेषें ॥ गगनीं पसरुनि मुखें ॥ येणें कृष्णशेषें ॥ शून्यत्वें जावो ॥ १० ॥ ते देखतां कृष्णशेष ॥ पवना लागे भूक ॥ गोपाळीं ऊर्ध्वमुख ॥ प्राणु जाला ॥११॥ मज सर्वांगीं चळबळ ॥ सदां पैं चंचळ ॥ कृष्णशेषें निश्चळ ॥ होईन आतां ॥१२॥ तें अभिनव कृष्णशेष ॥ अग्नीसी अरोचक ॥ जठरामाजी मुख ॥ पसरूं ठेला ॥ १३ ॥ मी सर्वांगें संतप्त ॥ सदा पैं अतृप्त ॥ कृष्णशेषें नित्य तृप्त ॥ निवेन केव्हां ॥ १४ ॥ तेथें आपाळाचा वनीं ॥ जिव्हे आणित पाणी ॥ कृष्णशेषें धणी ॥ होईल केव्हां ॥ १५ ॥ मी सर्वांगीं शीतळ ॥ परी ब्रह्महत्येचें मळ ॥ कृष्णशेषें निर्मळ ॥ होईन आतां ॥ १६ ॥ कठिणत्वा उबगली ॥ धरा आधर जाली ॥ दृशा होउनि ठेली ॥ गोपाळांचे ॥ १७ ॥ ऐसीं भुतें एकमेकें ॥ लांचावली कृष्णशेषें ॥ आवधिचि सन्मुखें ॥ होउनि ठेलीं ॥ १८ ॥ सर्वांगें निर्मळ ॥ अमृताचा केवळ ॥ चंद्रा येती लाळ ॥ कृष्णशेषा ॥ १९ ॥

तेथींचा कवळ एक ॥ हरील देहकलंक ॥ या आशामयंक ॥ लांचावला ॥ २० ॥ ह्मणे सूर्यो सहस्रकिरणी ॥ शोषुन घेईल धरणी ॥ उदो अस्तु खुंटणी ॥ होईल शेषें ॥ २१ ॥ त्या कीरणाआड वेगें ॥ येउनि ठेले मेघ ॥ कृष्णशेष विभाग ॥ सेवुं आह्मी ॥ २२ ॥ मागें पैं गोकुळा ॥ वरुषलों जी जळा ॥ अपराध गोपाळा ॥ समेलागीं ॥ २३ ॥ तो धरुनियां अनुराग ॥ मंद गर्जति चांग ॥ स्तविताति श्रीरंग ॥ शेषालागीं ॥ २४ ॥ तंव स्वर्गीं ह्मणती देव ॥ आह्मी जालों निर्दैव ॥ गोपाळांचें दैव ॥ आह्मां नाहीं ॥ २५ ॥ स्वर्गभोगगोडी ॥ तेचि जाली बेडी ॥ कृष्णशेष आवडी ॥ सेवूं कैसें ॥ २६ ॥ देखुनि कृष्णशेष ॥ धांविन्नला चतुर्मुख ॥ नारदवचनें भूक ॥ लागली त्यासी ॥ २७ ॥ नारद ह्मणे ताता ॥ पद न व्हावें सर्वथा ॥ गोकुळीं कृष्णनाथा ॥ शेषेंविण ॥ २८ ॥ तो येउनि यमुनाकुळा ॥ पहातुसे गोपाळा ॥ करिताति व्याहाळा ॥ दधिओदना ॥ २९ ॥ ब्रह्मा ह्मणे कर्म ॥ हें केंवि जालें ब्रह्म ॥ मज पडला भ्रम ॥ कीं नारदासी ॥ ३० ॥ या नाहीं भेदु कांटाळा ॥ न मानीति विटाळा ॥ घेती कृष्णकवळा ॥ पसरुनि मुख ॥ ३१ ॥ येथें नाहीं विधिविधान ॥ काइसें संध्यास्नान ॥ कर्मा अपोशन ॥ करुनि ठेला ॥ ३२ ॥ ईहिं त्यजिले विधिनिषेध ॥ वाळोनि सांडिले वेद ॥ न देखती भेदाभेद ॥ कवणें काळीं ॥ ३३ ॥ हे कर्मेसि विमुख ॥ कृष्णीं ये एकमुख ॥ हे करितां आह्मां देख ॥ गोवळ ह्मणती ॥ ३४ ॥ आह्मी नेमलों कर्मनेमां ॥ क्रियाकर्ते होमा ॥ न करितां मज ब्रह्मा ॥ ह्मणेल कोण ॥३५॥ यज्ञीं अग्रपुजा ॥ महीमा मानु माझा ॥ कृष्ण-शेषें तो वोजा ॥ नयेल हातां ॥ ३६ ॥ चतुर्मुखें शेष घेतां ॥ अग्रपुजा नयेल हाता ॥ ब्रह्मपणा सर्वथा ॥ नुरेल माझा ॥ ३७ ॥ नारदवचनें देख ॥ घ्यावें याचें शेष ॥ तरि आह्मांसि गोवळवेष ॥ घेणें लागे ॥ ३८ ॥ माथां शेंडी तेचि शिखा ॥ लपवुनि चौमुखां ॥ ब्रह्मसूत्रें देखा ॥ वोविला वेणु ॥ ३९ ॥ ऐसा चोरूनि कृष्णकवळु ॥ घेउं पाहे सेंडगळु ॥ तंव तो चक्र-वाळु ॥ ठकेल कैंचा ॥ ४० ॥ तो अलक्षाचें लक्ष ॥ मनबुद्धीसि साक्ष ॥ सकळकर्मीं प्रत्यक्ष ॥ देखणा तोचि ॥ ४१ ॥ तो जीवाचाही जीउ ॥ सर्व-रूपें केशउ ॥ त्यातेंही चाळऊं ॥ ब्रह्मा पाहे ॥ ४२ ॥ तो सकळलोक-स्रष्टा ॥ नेणे आपुलिया अदृष्टा ॥ कृष्णेसीं कपटा ॥ करूं आला ॥ ४३ ॥ भावो तैसी सिद्धि ॥ दैव तैसी बुद्धि ॥ भाग्यंविण निधि ॥ केंवि लाभे ॥४४॥ तो मुखें कवळ हातु ॥ शेष सेवकां देतु ॥ ब्रह्या त्या मुखातु ॥ घातु

आला ॥ ४५ ॥ तों स्वादातें आकांक्षी ॥ घाली आणिका मुखीं ॥ वांकुलिया आनेकी ॥ दाविजति ॥ ४६ ॥ हातु जाये जिकडे ॥ ब्रह्मा धांवे तिकडे ॥ दाउनि मुखाकडे ॥ आणिका देतु ॥ ४७ ॥ ब्रह्मा ह्मणे ठकडा ॥ मजचि लाविलें वेडा ॥ कवळु मुखाकडा ॥ दाउनि नेतु ॥ ४८ ॥ कृष्णकवळ न पडे तोंडीं ॥ उपडा याची शेंडी ॥ मुंडोनियां मुंडी ॥ भीके दवडा ॥ ४९ ॥ तोडा याची ती दोरी ॥ घाला आह्मांबाहेरी ॥ लटिका वेषधारी ॥ कैसेनि आला ॥ ५० ॥ ब्रह्मा पाहे तळवटीं ॥ पडिलें पृथ्वी घोंटी ॥ स्रष्टया सीतवोटी ॥ लागों नेदी ॥ ५१ ॥ तो ह्मणे अंचवों येति जळा ॥ तेथें होइन विरुळा ॥ गुरळिया गोपाळा ॥ शेष सेवूं ॥ ५२ ॥ कृष्ण ह्मणेरे गडी ॥ ऐकारे आवडी ॥ आजिच्या जेवणा गोडि ॥ पाणी नघला ॥५३॥ उदका नातळती ॥ ते माझे सांगाती ॥ गोडिये आंचवति ॥ जातु सुखें ॥ ॥ ५४ ॥ अजीच्या जेवणा ॥ झणि पडो आंचवणा ॥ अवघे ह्मणति कृष्णा ॥ भला भला ॥५५॥ हातु चाटिति चरचरी ॥ लाविति माथियावरी ॥ पुसिताति टिरी ॥ माखले हात ॥ ५६ ॥ उदका न येतिच गोवळे ॥ वारिले गोपाळें ॥ ऐकोनि कोपें खवळे ॥ ब्रह्मा थोरु ॥ ५७ ॥ ह्मणे हा तंव शेष नेदि ॥ कैसि करूं बुद्धि ॥ थोर लागली आधि ॥ विधातया ॥ ५८ ॥ हे जेवण भरले भरी ॥ वत्सें गेलीं दुरी ॥ हाकोनि नेवों पुरी ॥ सत्यलोकां ॥ ५९ ॥ चुकवुनियां डोळा ॥ घेउनि जावों गोवळा ॥ विचुंबुनि घनसांवळा ॥ शेष घडे ॥ ६० ॥ जाणुनि साचा भावो ॥ ह्मणे देवाधिदेवो ॥ वत्सें गोपाळ न्यावो ॥ एक वेळ ब्रह्मा ॥ ६१ ॥ कृष्ण गोपाळेंसि बोली ॥ वत्सें केउतिं गेलीं ॥ प्रपंचाची भुलली ॥ जेवणी आजी ॥ ६२ ॥ तंव ते खुणाविति खुणा ॥ भुली पडे कवणा ॥ वत्साचि हे तृष्णा ॥ तुजचि जाली ॥ ६३ ॥ अजिचेनि जेवणें ॥ जन्माचें पारणें ॥ आठउ आठवणें ॥ उरे नुरे ॥ ६४ ॥ अगा सेवीतां तुझें शेष ॥ थोर जालें सुख ॥ येणें जाणें देख ॥ वळत्या नाहीं ॥ ६५ ॥ एक तुझें लाडके ॥ नुठीत वळती वेषें ॥ अनन्य त्यातें देखे ॥ तुजची करितां ॥ ६६ ॥ तूं सखियाच्या सायासा ॥ धांवसि गर्भवासा ॥ वळतियाचा लांसा ॥ आह्मां नाहीं ॥ ६७ ॥ हे आठवीं वळती वेगीं ॥ आली तुझ्या आंगीं ॥ चुकवो नको वेगीं ॥ वत्सें आणी ॥ ६८ ॥ आह्मी नेघों कर्मकांठीं ॥ नलगो इंद्रियें गोच्या पाठीं ॥ वळती हे उफराटि ॥ तुजचि आली ॥ ६९ ॥ एक ह्मणती कृष्णा ॥ आह्मां नाहीं तृष्णा ॥ वत्सनिरीक्षणा ॥ स्मरे कवण

॥ ७० ॥ करणें कां न करणें ॥ घेणें अथवा देणें ॥ अवघें कृष्णपण ॥ तुजचि आलें ॥ ७१ ॥ आजिचें घडेवरि ॥ वळती केली पुरी ॥ आतां कैशा परी ॥ जावों दुरी बापा ॥ ७२ ॥ एक ह्मणती जगजेठी ॥ ऐके माझी गोष्टी ॥ मागापुढा दृष्टी ॥ अवघा कृष्ण ॥ ७३ ॥ आतां पाहातां वत्समाग ॥ कृष्णचि होय मार्ग ॥ आतां वळती वळण्याभाग ॥ वेगळे नूरे ॥ ७४ ॥ पाहणें पाहतां निकुरें ॥ वासुरें ना लेंकुरें ॥ कृष्णपणें दुसरें ॥ आभासेना ॥ ७५ ॥ एक ह्मणती आतां ॥ चढलों तुझ्या माथा ॥ वळतियेचि कथा ॥ आह्मां नाहीं ॥ ७६ ॥ कृष्णां सांडि हें लगबग ॥ जगचि तुझें आंग ॥ वत्सें वळतीं वेग ॥ बोलणें तुझें ॥ ७७ ॥ पाहातां परतोनि देहीं ॥ मींपण उरलें नाहीं ॥ जडलों तुझ्याठायीं ॥ तूंपण गिळुनि ॥ ७८ ॥ ऐसे ऐकोनि साचे बोल ॥ कृष्णा येति डोल ॥ नवेन सुखपेल ॥ पेलताति ॥ ७९ ॥ तो नित्य नवा आनंदु ॥ स्वसुखाचा स्वानंदु ॥ अनुभवें जाणती बोधु ॥ तेथिचा कैसा ॥ ८० ॥ ऐसा सखियांचा संवादु ॥ कृष्णीं आधिक बोधु ॥ वोसंडत आनंदु ॥ सृष्टीमाजी ॥ ८१ ॥ तुह्मी ऐसेचि राहा येथें ॥ अखंड पाहा मातें ॥ घेउनि मी वत्सांतें ॥ येईन वेगीं ॥ ८२ ॥ आजिचा हा काला ॥ पुरता नाहीं जाला ॥ आधिक मी भुकेला ॥ तुमच्या बोलीं ॥ ८३ ॥ तंव ते हरिखेले अवघे ॥ भलें केलें श्रीरंगें ॥ आह्मी तंव तुझेनि आंगें ॥ निष्कर्म जालों ॥ ८४ ॥ ऐसे राहोनि गोपाळां ॥ दुरी गेला सांवळा ॥ न भरुनि कृष्ण डोळां ॥ पाहात ठेली ॥ ८५ ॥ कृष्णरूपीं समस्त ॥ राहिले निवांत ॥ ब्रह्मा आला तेथ ॥ आठव नाहीं ॥ ८६ ॥ ते स्वरूप सुखप्राप्ती ॥ न देखति दृश्यव्यक्ति ॥ अवघे कृष्णतिथीं ॥ रचले तेथ ॥ ८७ ॥ ते नव्हति ब्रह्मीयाजोगे ॥ तटस्त कृष्णरंगें ॥ ह्मणोन नेले वेगें ॥ सत्यलोकां ॥ ८८ ॥ ब्रह्मा ह्मणे तेथ ॥ विचंबेल कृष्णनाथ ॥ सत्यलोकां धांवत ॥ येईल पुसों ॥ ८९ ॥ नवल पैं कौतुक ॥ दाटुनि देईल शेष ॥ वत्सें वत्सप ॥ नेईल तेव्हां ॥ ९० ॥ हें न कळेल श्रीपती ॥ पाहों लागेल सांगाति ॥ श्रमलिया एकांति ॥ घेईन भेटी ॥ ९१ ॥ तेव्हां बोळखेल चतुर्मुख ॥ संवादें वाढेल सुख ॥ घेउनि साचें शेष ॥ देईन वत्सें ॥ ९२ ॥ यापरि चतुरानन ॥ धरिताहे अभिमान ॥ ह्मणे म्यां नारायण ॥ विचंबिला ॥ ९३ ॥ तो एकला एक एक ॥ अवघें होईल देखा ॥ वैभव ब्रह्मादिकां ॥ न कळे त्याचें ॥ ९४ ॥ अभिमानें विमुख ॥ केले ब्रह्मादिक ॥ जाणतेहि लोक ॥ तेचि करिति ॥ ९५ ॥ सर्व व्यक्ति

समर्थ ॥ जाला कृष्णनाथ ॥ सादर तो वृत्तांत ॥ परिसतु श्रोते ॥ ९६ ॥ ह्मणे ब्रह्मेनि केला चाळा ॥ नेलें वत्स गोपाळां ॥ एकला मी गोकुळां ॥ कैसेनि जावों ॥ ९७ ॥ तेथ गाई हुंबरति ॥ गोपि आक्रंदति ॥ अवघिचि झोंबिति ॥ मजची लागीं ॥९८॥ नवंचत येथें राहे ॥ प्रलयचि होवो पाहे॥ माझेनि वियोगें देह ॥ सांजिति सकळे ॥ ९९ ॥ आतां जावो सत्यलोकां ॥ मागों चतुर्मुखा ॥ घेईल भुक्तशेषा ॥ देईल तेव्हां ॥ १०० ॥ ऐसें विचारितां जिवीं ॥ नवल तो लाघवी ॥ आपणची अघवी ॥ होउनि ठेला ॥ १ ॥ काळे गोरे सांवळे ॥ कांकडे कांतले ॥ जातां एके वेळे ॥ चारी वर्ण ॥ २ ॥ एक डोळा भोंगळें ॥ एक ते लाळित लोळे ॥ एकाचे घोगरे गळे ॥ दिघड दंत ॥ ३ ॥ एक ते दुनेते उरी ॥ एक ते झाले कुऱ्ही ॥ एके तें तोतरिं ॥ ह्मणति कृष्णा कृष्णा ॥ ४ ॥ एक ते वांकुडें तोंड ॥ एक ते जालिते राखोंडे ॥ बिडबिडिते नाकाडे ॥ शेंबुड एका ॥ ५ ॥ एक ते डबल पोट ॥ एक ते काबर होट ॥ आळसें चावट ॥ झाला कृष्ण ॥ ६ ॥ एक ते बोलि गडें ॥ एक धड धाकडें ॥ एक ते झाले भेडे ॥ भ्याउ ह्मणति ॥ ७ ॥ लुडि खुडि मुडी ॥ एक शाहणी वेडीं ॥ जाला पैं आवडी ॥ अवघि अंगें ॥ ८ ॥ काळि बांडि तांबडी ॥ जाला पै घोंगडी ॥ एकाच्या निखळा जाडी ॥ एक वर्णा ॥ ९ ॥ लापाणिची घोंगडी ॥ राजसें लुगडी ॥ एकें ते उघडी ॥ जैशी तैशी ॥ ११० ॥ एकाचीं आलका कांठीं ॥ एकाचि ते चित्रिव कांठीं ॥ जाला पैं वेताटी ॥ सोलिवा डोंगा ॥ ११ ॥ वेटी विशाळ पांवे ॥ वेगळ वेगळ नांवें ॥ एकलाचि आघवें ॥ होउनि ठेला ॥ १२ ॥ पाईच्या पायतणां ॥ कृष्ण जाला जाणा ॥ जालिया कुरंधना ॥ तेहि जाला ॥ १३ ॥ कटिसूत्रें कटिदोरे ॥ काळे तांबडे दोरे ॥ अळंकार साजिरे ॥ जाला कृष्ण ॥ १४ ॥ स्वादाच्या स्वादना ॥ कृष्ण झाला रसना ॥ देखावया नयना ॥ पुढें कृष्ण ॥ १५ ॥ अंग तेंहि कृष्ण ॥ भोग तोहि कृष्ण ॥ संग तोही कृष्ण ॥ संवगडियांसि ॥ १६ ॥ गोपाळांचे संकल्प ॥ कृष्ण जाला देख ॥ बुद्धीचे द्योतक ॥ तेहि कृष्ण ॥ १७ ॥ निमिष्याचें निमिष्य ॥ कृष्ण श्वासोश्वास ॥ शब्दादि रूपरस ॥ तेही श्रीकृष्ण ॥ १८ ॥ अंगीच्या रोमावळी ॥ सा जाला वनमाळी ॥ बोटावरि तेजाळीं ॥ नखें कृष्ण ॥ १९ ॥ प्राण तोही कृष्ण ॥ देहो तोही कृष्ण ॥ आत्मा तोही कृष्ण ॥ गोपाळांचा ॥ १२० ॥ कृष्ण जाला एके काळीं ॥ एक तें बाहाळीं ॥ एके तें धवळीं ॥ कपिलवर्णें ॥ २१ ॥ साजिरें गोजिरीं ॥ लातिरिं डिंबरिं ॥ एक ते बुजिरी ॥

फींपाटतें ॥ २२ ॥ एक वत्स लाडिकें ॥ शिंगेंविण बोडिकें ॥ धांवोनी हाणती थडकें ॥ तेंही झाला ॥ २३ ॥ खैरि मोरी भींगारी ॥ जाला पैं कावेरी ॥ नाना वेषधारी ॥ एकला एकु ॥ २४ ॥ आपली आपण कांठीं ॥ आपण आपणापाठी ॥ आपण आपणा थापटी ॥ आपुल्या मोहरा ॥ २५ ॥ आपण आपणाजवळी ॥ आपण आपणां खेंव कवळी ॥ आपण आपणा रांडोळी ॥ करितुसे ॥ २६ ॥ आपण पांवा वाये ॥ आपणची फडकोनि पाहे ॥ चराचर राहे ॥ कवळ मुखीं ॥ २७ ॥ आपण आपणास वंदु ॥ आपण आपणा संवादु ॥ एकला बहुविधु ॥ होउनि खेळे ॥ २८ ॥ आपण पसरे बारा वाटी ॥ आपणची एक वाटी ॥ गोवर्धनानें हटीं ॥ घेउनि आला ॥ २९ ॥ तेथें राहोनि तळवटीं ॥ गोधनें वरवटी ॥ पाहोनि पूर्णा दृष्टी ॥ हंबरला ॥ १३० ॥ ऐकोनि साचा रउ ॥ टवकारिल्या गाउ ॥ जीवाचा हा जीवु ॥ वत्सें जाणा ॥ ३१ ॥ सा पाहातां तयाकडे ॥ विषम न देखति पुढें ॥ सम बुद्धि गिरीकडे ॥ उतरलया ॥ ३२ ॥ कळप उतरले कडा ॥ धांवा धांवा पुढां ॥ गौळि चहुंकडा ॥ गजंबु करिती ॥ ३३ ॥ चरत चरत कां चबकल्या ॥ सावजेविण बुजाल्या ॥ वळावळा वहिल्या ॥ डांगा ठोकिति ॥ ३४ ॥ कृष्ण वत्स देखोनि दिठी ॥ उचलली बगाटी ॥ तृण चरे कडे लोटी ॥ करुनि आला ॥ ३५ ॥ गाई विसरल्या देख बुद्धि ॥ पश्वांहि समाधी ॥ कृष्ण कृपानिधि ॥ वत्सें जाला ॥ ३६ ॥ कृष्णदृष्टी वरी ॥ फुलाचिया परी ॥ उतरल्या सा क्षीरी ॥ वर्षत गाई ॥ ३७ ॥ तेथ तान्हाही स्रवती ॥ पारठिया दुभति ॥ वांझाहि फुटती ॥ पान्हा देखा ॥ ३८ ॥ काल्हवडी फळकरा ॥ वर्षताती क्षिरा ॥ वत्सें सारंगधरा ॥ देखोनि दिठी ॥ ३९ ॥ कृष्ण हुंकाराच्या प्रीति ॥ वृक्ष तेहि श्रवति ॥ बोलल्या वनस्पति ॥ जीवें भावें ॥ १४० ॥ गोवर्धनकडे ॥ दुधाचेनि उभडें ॥ फुटले चहुकडे ॥ पाझर क्षीरें ॥ ४१ ॥ तेथ कृष्ण वत्स ध्वनि ॥ भरतांचि गगनीं ॥ वोरस तेथोनि ॥ पैं चालिला ॥ ४२ ॥ ते निराळ लागेंवेगें ॥ वर्षताहे अंगें ॥ आल्हादु श्रीरंगें ॥ सांटवणा ॥ ४३ ॥ ऐसे सजिव निर्जीव ॥ वोळले अवघे जीव ॥ खेळताहे लाघव ॥ एकला एकु ॥ ४४ ॥ कडा पडलिया गायी ॥ तळी जालें काई ॥ गौळी आले पायीं ॥ पायवाटा ॥ ४५ ॥ तंव लेंकुरें आणि वासुरें ॥ गाई स्रवती क्षीरें ॥ देखोनि मन थावेरे ॥ गौळियांचें ॥ ४६ ॥ सदां पैं तळवटीं ॥ वत्सें देखति दिठी ॥ गोधनें कडेलोटी ॥ न्व्हति कहीं ॥ ४७ ॥ आजिचा पैं नवलावो ॥ न

कळे येथींचा भावो ॥ गाई अधिक स्नेहो ॥ वत्सावरी ॥ ४८ ॥ गौळि ह्मणती आमुचें भाग्य ॥ गोधनें वांचलीं चांग ॥ राखता श्रीरंग ॥ जाला आजी ॥ ४९ ॥ अरे हें गोपाळां पुसो गोठी ॥ तंव ते धांवोनि झोंबति कंठीं ॥ गौळियें उफराटि ॥ वेडावलीं ॥ १५० ॥ साचेनि आलिंगनें ॥ खुंटलें बोलणें ॥ पुसणें ऐकणें ॥ तेंहि ठेलें ॥ ५१ ॥ चुंबिति त्याचे पाये ॥ तंव तंव सुख होय ॥ भाग्य कैसें पाहे ॥ गौळियांचें ॥ ५२ ॥ कृष्ण वत्सें गोपाळ ॥ गौळिहि सकळ ॥ ह्मणती जाली वेळ ॥ गोकुळा चला ॥ ५३ ॥ एकी बाईलिया मोहरि ॥ पावे तह्मालोरी ॥ गोपाळ दोही हरी ॥ चालती कृष्ण ॥ ५४ ॥ पदोपदीं सुहावे ॥ धरियेले चांदिवे ॥ गगनीं दाटति थवे ॥ विमानांचे ॥ ५५ ॥ सपल्लव कुंचे ॥ ढळती मोरांचे ॥ नयन सुरवरांचे ॥ लांचावले ॥ ५६ ॥ तेथें एक झाले भाट ॥ वानिती उद्भट ॥ एक ते होउनि वाट ॥ दाविती यावें ॥ ५७ ॥ एक ते बारघाली ॥ घालिताति हुंबळी ॥ एक ते बोलति बोली ॥ उमाणी देखा ॥ ५८ ॥ कृष्णा एकु दादुला ॥ गऱ्हवार पैं जाला ॥ आपली बाईल व्याला ॥ आपण देखा ॥ ५९ ॥ तिसिही प्रसूती जाली ॥ आपुला अमुला व्याली ॥ उमाणि माझी भली ॥ सांग कृष्णा ॥ १६० ॥ कृष्ण ह्मणे राहे ॥ मजचिकडे पाहे ॥ अकरा गाई वरि पाहे ॥ उभा एकु ॥ ६१ ॥ असोनि वरि निर्धारि ॥ गाई चालती तयावरी ॥ नवल हे कुसरी ॥ दावितुसे ॥ ६२ ॥ त्याच्या माथा देख ॥ जाउनि वेंधला एक ॥ येरु तो मस्तक ॥ काढुनि जाये ॥ ६३ ॥ तंव तो कवळुनियां नभ ॥ उभा असे स्वयंभ ॥ शुद्धासि जेंवि कोंभ ॥ निडारले ॥ ६४ ॥ एक ह्मणे मी फळाहारी आहे ॥ रविसीं फळें खाये ॥ दुजा ह्मणे पाहे ॥ पवनअभ्यासी ॥ ६५ ॥ आज्ञा प्राणावरी आतां ॥ गगन पैं तत्वता ॥ ह्मणोनि गगन माथा ॥ सैंघ चाले ॥ ६६ ॥ आणिक ह्मणे राहे ॥ बाईल मजमाजी आहे ॥ एकलाचि होये ॥ दोघे जणें ॥ ६७ ॥ ते करितां बहुता सलगी ॥ आवडी वरि आलंगी ॥ जिरोनि गेली आंगीं ॥ सांचि सांच्या ॥ ६८ ॥ एक एकाते ह्मणे लिळा ॥ प्रवेशो तुझे डोळां ॥ पाहा त्यामाजी सगळा ॥ रिघोनि गेला ॥ ६९ ॥ आणिका ते ह्मणे पाहे ॥ केउता गेला काये ॥ तो ह्मणे देखण्यामाजि आहे ॥ देखणें होउनि ॥ १७० ॥ तंव दोघे ह्मणति गडी ॥ ऐका रे आवडी ॥ खेंव देवुनि गोडी ॥ स्वरूप एक ॥ ७१ ॥ कृष्णा ह्मणती देख ॥ दोघे जालों एक ॥ एक कीं अनेक ॥ निर्धारि बा ॥ ७२ ॥ एक

ह्मणति गोपाळा ॥ सूर्यो माझीया डोळां ॥ झांकिति दृष्टि सकळा ॥ झांकोळल्या ॥ ७३ ॥ दुजा ह्मणे राहे ॥ अंगचि सूर्य आहे ॥ त्याचेनि तेजें होये ॥ प्रकाशु तत्वां ॥ ७४ ॥ तिजा ह्मणे प्रकाशा ॥ कैचा वा कइवसा ॥ उदो अस्तु ठसा ॥ आह्मां नाहीं ॥ ७५ ॥ एक गाताति आखरे ॥ परेचेनि खरें ॥ तेणें नांदे होकरे ॥ रविमंडळ ॥ ७६ ॥ ऐसे निडारलें सुख ॥ महुरले पीयुख ॥ वृंदावनिं हारिख ॥ दोंदिल जाला ॥ ७७ ॥ ते देखोनि कौतुक ॥ आले सनकादिक ॥ चरणरजें देख ॥ करिती स्नानें ॥ ७८ ॥ पहातां त्याचे लिळे ॥ काळ वेळ न कळे ॥ गौळियें सकळें ॥ वेडावलीं ॥ ७९ ॥ ऐसी आपुली आपण कळा ॥ पाहातुसे सांवळा ॥ खेळ खेळत गोकुळा ॥ जवळि आला ॥ १८० ॥ एकसरे पांवे ॥ वाहाताती आघवे ॥ गोपाळ निच नवे ॥ मिरवताती ॥ ८१ ॥ एक नाचती बागडी ॥ तोंडें करूनि वांकडीं ॥ वांकुल्या दाविती गोडी ॥ सुरवरांसी ॥ ८२ ॥ पुढें गोधनाचे थाट ॥ गोपाळ घनदाट ॥ वत्सांचे चौकट ॥ चौताळती ॥ ८३ ॥ ऐसा गोपाळांचा हावा ॥ देखुनि सुहावा ॥ गोपिका घेति धांवा ॥ निःसिमभावें ॥ ८४ ॥ कृष्णालागीं उतावेळ ॥ सकाम चपळ ॥ कृष्ण दृष्टि विऱ्हळ ॥ द्रवोनि गेली ॥ ८५ ॥ दुजी ह्मणे धटे ॥ अवरी मोकाटे ॥ तंव तिसही उफराटें ॥ तैसेंचि झालें ॥ ८६ ॥ तिजी ह्मणे नवलावो ॥ लाज नाहीं पाहो ॥ तिसिही सूटला द्रवो ॥ कृष्ण दृष्टी ॥ ८७ ॥ पहातां कृष्ण कृति ॥ पाषाण पघळती ॥ सजीव द्रवती ॥ तें कठिण कैचें ॥ ८८ ॥ एकी करिती अक्षवाणि ॥ लागती चरणीं ॥ तारिले सारंगपाणी ॥ भवसागरु ॥ ८९ ॥ माया निंबलोण ॥ करिती जीव प्राणें ॥ निवताति दर्शनें ॥ कृष्ण दृष्टी ॥ १९० ॥ तेथें आपुलालिया घरा ॥ गाई आणि वांसुरा ॥ गोपाळ नेति माहेरा ॥ पूर्वीलाचि ॥ ९१ ॥ ते ह्मणति मायांतें ॥ दोहोवा करा येथें ॥ येरी हांसति चित्तें ॥ पिंजलया गाई ॥ ९२ ॥ गायी पिंजल्या तेथें ॥ दुहावें तें काइयातें ॥ नवे आलेति येथें ॥ पहिले नऱ्हा ॥ ९३ ॥ येर ह्मणति आई ॥ पहिली गोटी नाहीं ॥ दोहोनि प्रतिती पाहीं ॥ आमुची आतां ॥ ९४ ॥ त्या झकउनि ह्मणती बरें ॥ सोडारे वांसुरें ॥ वत्सांतें उत्तरें ॥ बोलाविति ॥ ९५ ॥ जिचे वत्स आले ॥ ते गायहि बोलाविती बोलें ॥ सर्वरूपें मांडिलें ॥ दोहणें कृष्णें ॥ ९६ ॥ तेथ वत्स तोहि कृष्ण ॥ दोहक तोहि कृष्ण ॥ पाहातां तोहि कृष्ण ॥ पान्हियासी ॥ ९७ ॥ तेथ दुहविया लागल्या धारा ॥ उभीया स्रवती क्षीरा ॥ ह्मणति तळीं पात्रा ॥

मांडा वेगी ॥ ९८ ॥ भरले कामाचे तकरे ॥ संकल्पाचे डेरे ॥ आशेचे साजिरे ॥ भरले कुंभ ॥ ९९ ॥ भक्तिच्या मांथणी ॥ भरल्या नवजणी ॥ भजनाच्या रांजणी ॥ भरुनि उथळे ॥ १०० ॥ भरलीं वैराग्याचीं आळीं ॥ अनुभवाचीं तळीं ॥ लोटोनि त्याच्या पाळी ॥ वाहती क्षीर ॥ २०१ ॥ गोकुळीं सांदोबिंदीं ॥ दुधें वाहती नदी ॥ वृंदावनीं क्षीराब्धी ॥ होउनि ठेला ॥ २ ॥ शेषशयनीहुनि उठिला ॥ गोकुळा श्रीकृष्ण गेला ॥ ह्मणोनि पाहों आला ॥ क्षीरसागरु ॥ ३ ॥ तो स्वानंदाचा कंदु ॥ वत्सें जाला गोविंदु ॥ क्षीर नव्हे आनंदु ॥ गोकुळीं भरला ॥ ४ ॥ ऐसा गोकुळीं संतोष ॥ कवणा नाहीं शोक ॥ आपण परम सुख ॥ प्रतिपाळिता ॥ ५ ॥ ब्रह्मा ह्मणे राहे ॥ गोकुळीं जालें काय ॥ हळुच येउनि पाहे ॥ वृंदावनीं ॥ ६ ॥ तंव कृष्ण वत्सें गोपाळ ॥ खेळती नानाखेळ ॥ पहिलेचि सकळ ॥ जैसें तैसें ॥ ७ ॥ ब्रह्मा ह्मणे माते ॥ ठकीलें कृष्णनाथें ॥ वत्सें गोपाळांतें ॥ घेउनि आला ॥ ८ ॥ कृष्णकवळ न येतां मुखां ॥ वत्सें नेलीं देखा ॥ ब्रह्मा सत्य-लोकां ॥ पाहों गेला ॥ ९ ॥ तंव ते समस्त ॥ स्वरूपीं तटस्थ ॥ निज भावें निवांत ॥ कृष्णकवळें ॥ १० ॥ कैसें केलें वर्म ॥ मजचि पडिला भ्रम ॥ कृष्ण क्रीडा निःसिम ॥ नकळे त्यासीं ॥ ११ ॥ तेथिचें तेथें असे ॥ येथेंही जैसें तैसें ॥ स्रष्टया लागलें पिसें ॥ बहुरूपाचें ॥ १२ ॥ गोकुळां येउनि पाहे ॥ परतुनि लोकां जाय ॥ दोहीं ठाईं आहे ॥ जैसें तैसें ॥ १३ ॥ येत्या जात्या कर्मा ॥ ब्रह्मा भरला भ्रमा ॥ न कळे पुरुषोत्तमा ॥ लीला तुझी ॥ १४ ॥ ब्रह्मा ह्मणे आतां ॥ चरणीं ठेवु माथा ॥ स्तवुनि कृष्णनाथा ॥ वत्सें देवों ॥ १५ ॥ तंव जितुके गोपाळवेष ॥ तितुके चतुर्मुख ॥ स्तवन करिती देख ॥ एक रचने ॥ १६ ॥ ब्रह्मा ह्मणे आतां ॥ मी काय किति स्तविता ॥ साष्टांगीं तत्वता ॥ नमन केलें ॥ १७ ॥ वंचलो जी अभिमानें ॥ कर्मी कर्मठ-पणें ॥ आतां आज्ञा देणें ॥ आणीन वत्सें ॥ १८ ॥ नेतां तव अवज्ञा ॥ आणितां कायिसी आज्ञा ॥ भला भला गा सर्वज्ञा ॥ प्रजापति ॥ १९ ॥ येथुनि जैसीं नेलीं ॥ तैसि आणी उगलीं ॥ जेथें होतिं बैसलीं ॥ तेथें ठेवि बापा ॥ १२० ॥ वत्सें आणि गोपाळां ॥ आणिलें यमुना कुळा ॥ बैस-विला जी पाळा ॥ जैसा तैसा ॥ २१ ॥ करिं शेष दहिं भातु ॥ वत्सांतें हां कितु ॥ आला कृष्णनाथु ॥ सखियांजवळी ॥ २२ ॥ ते ह्मणति कृष्ण भला ॥ वत्सें लौकर घेउनि आला ॥ उठारे करूं काला ॥ पुरता आतां ॥ २३ ॥ कृष्णें कवळ घेउनि करीं ॥ रिघाला सांभितरी ॥ ब्रह्मा तो

बाहेरी ॥ थोटावला ॥ २४ ॥ मी सप्तलोक धाता ॥ वोळखी जाली आतां ॥ तेणें बळें कृष्णनाथा ॥ शेष मागे ॥ २५ ॥ मघाचारे काला ॥ येणेंचि पैं नासला ॥ गोवळ ह्मणति चला ॥ धरूं यासी ॥ २६ ॥ याची समुळ शेंडी उपडा ॥ गळ्याची ती दोरी तोडा ॥ ह्मणा पळे पुढा ॥ संशयो पाठीं ॥ २७ ॥ कृष्णा कवळ तंव ते दिवसीं ॥ मागो बळें कां पोसिसि ॥ न दिसे हृषिकेशी ॥ तेथें पळोनि गेला ॥ २८ ॥ कृष्णकवळाचा आल्हादु ॥ सखयाचा संवादु ॥ सा सुखाचा अनुवादु ॥ रिघेल कैंचा ॥ २९ ॥ कृष्ण-शेष हातां येतां ॥ जो सरे मागुता ॥ अथवा कर्मठता ॥ धरूनि राहे ॥ २३० ॥ तो वंचला देखा ॥ आपुल्या निजसुखा ॥ मुकला परलोकां ॥ संशयबळें ॥ ३१ ॥ कृष्णेसीं जे एक ॥ कर्म त्याचें रंक ॥ ठकले ब्रह्मा-दिक ॥ पदाभिमानें ॥ ३२ ॥ कृष्ण वत्सें गोपाळ ॥ गोकुळां आले सकळ ॥ अवघे सांगति बळ ॥ श्रीकृष्णाचें ॥ ३३ ॥ आह्मी अघासुरा पोटीं ॥ रिघालों उठाउठी ॥ दैवें हा जगजेटी ॥ मागें होता ॥ ३४ ॥ आह्मांलागीं गोपाळा धाविन्नला उतावेळु ॥ कंठीं कंठ शूळ ॥ झाला तया ॥ ३५ ॥ ते गिळु पसरी दांभाडें ॥ तंव हा अधिक वाढे ॥ उघडोनि गालफुडे ॥ दुधड केला ॥ ३६ ॥ ते ऐकुनि कोड ॥ पाहों आले वाडवाड ॥ वाळोनि कर-वड ॥ काळे जाले ॥ ३७ ॥ अरे ह्मणा आजी मारला ॥ तरि वाळोनि कैसा गेला ॥ पुसती आपुल्या मुला ॥ वृद्ध वृद्ध ॥ ३८ ॥ ते ह्मणती नवल जालें ॥ याचें देह कां पां वाळलें ॥ कृष्णें लाघव केलें ॥ नकळे आह्मां ॥ ३९ ॥ ब्रह्मेनि नेलें अब्द ॥ गोपाळातें निमिषार्ध ॥ काळगणना समंध ॥ स्वरूपीं नाहीं ॥ २४० ॥ ऐसे पाहतां आलोकिक ॥ विस्मित गौळी देख ॥ चला ह्मणती एक ॥ कंसाभेणें ॥ ४१ ॥ मागे मारिलों येणें ॥ तो सुड कृष्णां घेणें ॥ अहंकंसा मारणें ॥ घडोनि अंगीं ॥ ४२ ॥ ऐसा संवाद ऐकोनि ॥ आनंद जनार्दनीं ॥ आलिंगिला धांवोनि ॥ एका एक ॥ ४३ ॥ एक जनार्दनीं एक ॥ एकपणें कौतुक ॥ वंचले ब्रह्मादिक ॥ तें सेवकां देतु ॥ २४४ ॥ इति श्रीदशमस्कंदे जमनाख्यानं संपूर्णम् ॥

---

## गोवर्धनाख्यान.

॥ २२१६ ॥ गोपाळ ह्मणती कान्हा ॥ वळती नेंदवे जाणां ॥ निज निसभोजना ॥ दुकाळ पडिला ॥ १ ॥ माया मांडिलें कचाट ॥ सुखाचें नेदि बोट ॥ धरिले असे अनसुट ॥ इंद्र पुजे ॥ २ ॥ महाइंद्र वर्षे घन ॥ गाई तृण

जीवन ॥ प्रतिवर्षीं पूजन ॥ इंद्र पूजे ॥ ३ ॥ माया नेदी सिद्धान्न ॥ न मिळे निजसाधन ॥ कोरडें खातां अन्न ॥ सत्व कैचें ॥ ४ ॥ धृ० ॥ जारे अरिष्ट कंदन ॥ अहं कंसमर्दन ॥ दिनाजनार्दन ॥ सोहं सदा ॥ ५ ॥ कोपल्या सुरपती ॥ राखतां श्रीपती ॥ विघ्नें भक्ताप्रती ॥ विमुख सदां ॥ ६ ॥ गाई तृण जीवन ॥ पुरवी गोवर्धन ॥ तेथ इंद्रपूजन ॥ कवणे हेतु ॥ ७ ॥ स्वघृत सिद्धान्न ॥ करूं पाहातां हवन ॥ जाळितां दिव्यान्न ॥ पुण्य कैचें ॥ ८ ॥ पुजूं गोवर्धन ॥ करूं दिनभोजन ॥ कृष्णें गौळी जन ॥ प्रबोधिले ॥ ९ ॥ घृत सारांश परिपूर्ण ॥ दधि दुध रांजण ॥ गोवर्धनी अन्न ॥ आगाध रचिले ॥ १० ॥ संन्यासी मुदंड ॥ सज्जनप्रचंड ॥ अन्नार्थी उदंड ॥ मीनले देखा ॥ ११ ॥ आर्तांचिया हरि ॥ जिज्ञासु कुसरी ॥ मुमुक्षु नानापरि ॥ लुलु करिती ॥ १२ ॥ तिर्थवासी कापडी ॥ अन्नालागी बापुडीं ॥ धांवोनियां साबडि ॥ उडि घालिति ॥ १३ ॥ रोडकीं बोडकीं ॥ एक तें मुडकीं ॥ एक ते आळुकी ॥ द्याद्या ह्मणति ॥ १४ ॥ तामस कुड्याचीं पानें ॥ राजस रंभापानें ॥ सायुज्यफळ संपादणें ॥ सात्विकांचीं ॥ १५ ॥ आपुला निजपात्रीं ॥ समान अधिकारी ॥ बैसविले जो हरि ॥ ठायींठायीं ॥ १६ ॥ चतुर्विधापरी ॥ वाढिते पुरुषार्थ चाऱ्ही ॥ आवडीचा प्रकारी ॥ यथा रुचि ॥ १७ ॥ तळिल्यावळिल्या अन्न ॥ वाढिले समसमान ॥ एक सर्वां पोषण ॥ करूं सरले ॥ १८ ॥ साधक भुकाळु आसोस ॥ घांसा पाठीं घांस ॥ घेताति बहुवस ॥ लाग वेगें ॥ १९ ॥ एक ते सुजाण ॥ जीवा देति जीवन ॥ चविवरि जेवण ॥ जेविति गोड्या ॥ २० ॥ एक ते सावडीं ॥ न पाहती परवडी ॥ आंगीच्या गोड्यागोडि ॥ जेविति सुखें ॥ २१ ॥ एक तें समसगट ॥ कालउनि एक वाट ॥ घेताति गटगट ॥ एके घांसे ॥ २२ ॥ सांडई मागें सांडि ॥ कुरवंडी कुरवंडी ॥ विवेकें रगडारगडी ॥ पीठ केलें ॥ २३ ॥ विषयलालसाचा लाडु ॥ मुळीच्या गोड्यागोडु ॥ तोहि फोडफोडुं ॥ गट्ट केला ॥ २४ ॥ पडिपाडे पापड ॥ शास्त्रोक्ति तडफड ॥ तेणें आला फोड ॥ जळजळेचा ॥ २५ ॥ ते घातले होते मागें ॥ वोढुनि भजन भागें ॥ विरतुनियां वेगें ॥ स्वादा आलें ॥ २६ ॥ वैराग्य कठें कढी ॥ स्वादा आलि गोडी ॥ गाया मुगवडि ॥ आरळ जाळि ॥ २७ ॥ जिरे मिरे कापुरा ॥ सुवासु तेणें खरा ॥ रसु फरफरां ॥ स्वादु घेति ॥ २८ ॥ खांडवि खांडवि खांडीं ॥ पोळि ते मागे सांडी ॥ साच मांडे मांडी ॥ सद्भावाची ॥ २९ ॥ सबाह्य अंतरीं ॥ पूर्ण पूरण पुरी ॥ कानवाटी उत्तरी ॥ कर्मठ तो ॥ ३० ॥

कडवटें कडबोळी ॥ तिखटें तोंडाळिं ॥ गीडबिडति वाटोळीं ॥ आपाक-पाकीं ॥ ३१ ॥ एके हिरवे करकरिते ॥ जारसें कचकचितें ॥ बहु चीजे बुचबुचिते ॥ नाना शाखा ॥ ३२ ॥ जारटेलीं सारटेलीं ॥ मुरडलीं मृकडलिं ॥ स्नेहें देंठीं सुठली ॥ परिपाकता ॥ ३३ ॥ फळली फळभारें ॥ समरस सांबारे ॥ वाघरुनि वाघारे ॥ निजथावरि ॥ ३४ ॥ नानापरीच्या शाखा ॥ एक चवि देका ॥ जेउनि नेटका ॥ जेवणारु ॥ ३५ ॥ सूक्ष्म सेवेच्या शेवया ॥ सतेज सोज्वळिया ॥ गोक्षीरें आळिलिया ॥ परमानंदें ॥ ३६ ॥ पोकळे सखळी ॥ चाटोलि लांबोळी ॥ सेवेमाजी आली ॥ समरसोनि॥३७॥ परमस्वादाची साखर ॥ वाढली पंचधार ॥ जेविता जेवणार ॥ सुखी होती ॥ ३८ ॥ अनुतापें सद्यस्तप्त ॥ सारांश जें घृत ॥ वाढिति अनुभव-युक्त ॥ अखंड धारा ॥ ३९ ॥ एके सलवणें सर्वांगें ॥ रंगली भक्तिरंगें ॥ लोणचि आनेगे ॥ स्वादा आलीं ॥ ४० ॥ त्रिगुणाचें त्रिकुट ॥ निर्गुण भरलें पोट ॥ तेणें तें उद्गट ॥ स्वादा आलें ॥ ४१ ॥ बोधाचा आंवळा ॥ जीवने चवि आगळा ॥ स्मरणें स्वादा आला ॥ आलेनसी ॥ ४२ ॥ उप-निषदे सोज्वला ॥ दध्योदन गोळा ॥ गट्ट केला सगळा ॥ एके घांसे ॥ ४३ ॥ एवं तृप्त अभयंकर ॥ स्वानंदें उद्गार ॥ देताति ढेंकर ॥ पूर्णतेचे ॥ ४४ ॥ यापरि ते धाले ॥ संसारा आंचवले ॥ निश्चळ बैंसले ॥ ठायी ठायीं ॥४५॥ एक अविचारिते ॥ निंदेचे रायीतें ॥ कुसुमुसुनि तेथें ॥ कपाळ पिटी ॥ ४६ ॥ नाकीं तोंडीं धुर उठि ॥ भडका सुटे पोटीं ॥ उठिले उठाउटी ॥ ठाया वरुनि ॥ ४७ ॥ कृष्ण गोवळ जाण ॥ विटाळाचें अन्न ॥ कर्मठ ब्राह्मण ॥ आह्मी नेणो ॥ ४८ ॥ एक अविवेक विवेकी ॥ ते जाले स्वयंपाकी ॥ धुप धुपिती पाकीं ॥ निजपाकाचा ॥ ४९ ॥ भेदाचि फुटकी हंडी ॥ अंधन-जव मांडी ॥ थिता अग्नि बुढि ॥ विझोनि जाये ॥ ५० ॥ एका विकल्पा विवसी ॥ आपोषनी मासी ॥ प्राणाहुति त्यासि ॥ कदा न घडे ॥ ५१ ॥ निजसार ब्राह्मणीं ॥ घेतलीच घेती धणीं ॥ खालतावरता कोण्ही ॥ जावो न शके ॥ ५२ ॥ धणिजालि प्रबळ ॥ हलवेना आळूमाळ ॥ गमनागमनी सकळ ॥ पांगुळले ॥ ५३ ॥ उच्छिष्ट काढिते ॥ धाले परमामृतें ॥ दुसरेंनि कामातें ॥ नातळति ॥ ५४ ॥ तृप्तीचेनि भोजें ॥ ठायींचीं निजिनिजे ॥ देहीं असता सहजे ॥ विदेही जाला ॥ ५५ ॥ तंव गोवर्धनावरी ॥ चतुर्भुज हरी ॥ गदादि आयुधें करीं ॥ प्रगट जाला ॥ ५६ ॥ तुह्मी पुजीला गोव-र्धन ॥ दिनासि भोजन ॥ तेणें मी जनार्दन ॥ प्रसन्न जालों ॥ ५७ ॥ तेथें

गौळि आणि गोपाळ ॥ गौळणी सकळ ॥ जयजयकारे प्रबळ ॥ लोटांगणी ॥ ५८ ॥ ह्मणत कृष्टबोध बरवा ॥ प्रकट देखिले देवा ॥ जिवाचिया जीवा ॥ परमानंदु ॥ ५९ ॥ ते देखोनि अमरेंद्र लाघव ॥ शंख करिती देव ॥ जिवा इंद्राचे वैभव ॥ गौळी नेलें ॥ ६० ॥ ते देखोनि अमरेंद्र ॥ क्षोभा चढे थोर ॥ मेघासि दुर्धर ॥ निरोप दिधला ॥ ६१ ॥ गोवळाचे वचन ॥ ऐकुनि गौळी जन ॥ केव्हडा अपमान ॥ आमुचा केला ॥ ६२ ॥ गोकुळी वरी ॥ वर्षा प्रबळधारी ॥ कैसेनि श्रीहरि ॥ राखे पाहुं ॥ ६३ ॥ इंद्रक्षोभ पाडीं ॥ महावातु झडाडी ॥ अतिगर्जे कडाडी ॥ प्रळयमेघ ॥ ६४ ॥ क्रोधविजु कडाडी ॥ कडकडी ॥ डोळां पडे झांपडी ॥ लखलखाटे ॥ ६५ ॥ भूकंप बडाडी ॥ गडबडिल्या उतरंडी ॥ उमळीजे पै झाडी ॥ निज धैर्याचा ॥ ६६ ॥ पर्जन्य मुसळधारा ॥ चंद्रा येव्हडिया गारा ॥ माणसाते वारा ॥ उडवितुसे ॥ ६७ ॥ तेथें स्त्रीया बाळें रडती ॥ गाई वत्सें आरडती ॥ धृत्वेधृत्वे पडति ॥ हुडहुडोनि ॥ ६८ ॥ गौळिये ह्मणती हरी ॥ साह्य जाला गिरी ॥ तोका अझुनि वरी ॥ उगा आहे ॥ ६९ ॥ कृष्ण बोले वचन ॥ मज तंव पडलें स्वप्न ॥ अवघे गोवर्धन ॥ उचला वेगीं ॥ ७० ॥ मिळाले सभोंवते ॥ लाउनिया माथे ॥ कृष्णें एकें हातें ॥ उचलिला ॥ ७१ ॥ सत्य कृष्णस्वप्न ॥ उचलला गोवर्धन ॥ देखोनी गौळिजन ॥ विस्मो करिती ॥ ७२ ॥ गोवर्धनातळीं ॥ रिघावे सकळी ॥ आपुलाली सामग्री घेउनि ॥ ७३ ॥ सकळ समृद्धि संभार ॥ आपलाले खिल्लार ॥ घेउनि कलत्र ॥ रिघत वेगीं ॥ ७४ ॥ माधव निजकरी ॥ गिरिवरातें धरी ॥ माधव निवारी ॥ माधवातें ॥ ७५ ॥ गोवर्धना तळवटे ॥ धाटे मोठे लाटे ॥ वोढिती नेटें पाटें ॥ निज सामुग्री ॥ ७६ ॥ सद्विद्या जननी ॥ शांत वृद्धपणीं ॥ तिचा घरीं पुत्र तिन्ही ॥ त्रिगुणात्मक ॥ ७७ ॥ एक तो निराशा ॥ दुसरा बोधा ॥ तिसरा शुद्धा ॥ स्वरूपज्ञानी ॥ ७८ ॥ तिघां एकमत ॥ कर्म त्या विपरीत ॥ ऐका निश्चित ॥ करणी त्यांची ॥ ७९ ॥ वडिल जो निराशा ॥ तो नये पैं सहसा ॥ तो सांडवि आशा ॥ निज निर्धारें ॥ ८० ॥ आल्या पैं एककरी ॥ दुजे हातीं न धरी ॥ वडिलाची ते परी ॥ ऐसी झाली ॥ ८१ ॥ ज्ञानि छांदस मोठें ॥ कोण्हाही न भेटे ॥ भेटल्या अवचटें ॥ धीरु न होये ॥ ८२ ॥ पहाता निज निर्धारे ॥ दुर्धरदुरांतरें ॥ आल्या कामाकारे ॥ कामनासी ॥ ८३ ॥ बोधे बोधुनि भावें ॥ कांठीं कांठीं धांवे ॥ गर्वाचि त्या भावे ॥ मारामारी ॥ ८४ ॥ विकल्प कांटा खाळे ॥ विक्षेपे आडखुळे ॥ अभावाचे आदळे ॥ कोरडे खडकीं ॥ ८५ ॥ श्रद्धामार्ग मोडे ॥ अधर्माचे कडे ॥ यापरि

बापुडे ॥ चालो न शके ॥ ८६ ॥ ऐसे तिघांही त्रिकुट ॥ त्रिगुण करुनि कुट ॥ संसार खटपट ॥ सांडिली तिहीं ॥ ८७ ॥ जेथें विषयांची वांकडी ॥ अति झडझडाडी ॥ द्वंद्वाचा फडाडी ॥ लागती गारा ॥ ८८ ॥ आतां निसुर तुझी कैसे ॥ उगोचि आळसी जैसे ॥ पाहत पाहातां नासे ॥ क्षणामाजी ॥ ८९ ॥ वाचे पडेल बोबडी ॥ डोळा पडे झांपडि ॥ हात वळती मुरकंडी ॥ प्रलोभ शेसें ॥ ९० ॥ निरय संनिपात ॥ भवेल पैं आवर्त ॥ मग तुझीं समस्त ॥ कराल काय ॥ ९१ ॥ अरे हा मोहाचा झेसा ॥ वोढेना सहसा ॥ वोढावया धिवसा ॥ ज्ञानाकरिं ॥ ९२ ॥ आपुलेनि निभावे ॥ विवेकाचे दावे ॥ लाउनि ओढावे ॥ निजनिर्धारिं ॥ ९३ ॥ लोभ खुंटीहूनि सोडी ॥ गळबंधन तोडी ॥ वैराग्याचे झोडि ॥ पोकवरि ॥ ९४ ॥ हा सांडुनि पहिली खोडी ॥ गोवर्धना बुढी ॥ निजात्म निर्वंडि ॥ दृढ बैसेल ॥ ९५ ॥ अशा हे वाटी ॥ सुनाट पैं मोठी ॥ जया तया पाठी ॥ धांवतुसे ॥ ९६ ॥ धनवती वोरडुनि धांवे ॥ अपसव्यापे पावे ॥ प्रयत्नदाना भवे ॥ भवतंभवति ॥ ९७ ॥ खानाच्या खौसापासीं ॥ लेखणी खोउनि शिसी ॥ धांवे अहर्निशि ॥ वोढाळाच्या ॥ ९८ ॥ साउल्या घोषंवरी ॥ अंगुळुमंगळु करी ॥ परधनाच्या भरिं ॥ गाउल लचके ॥ ९९ ॥ देखोनि प्रायश्चिती ॥ उडी घाली शास्त्रोक्ती ॥ नानापरिच्या युक्ति ॥ हुंबरु लागे ॥ १०० ॥ लक्षुनि अर्थ ॥ संध्या श्रेय देत ॥ यागाचे आंगीं रिघत ॥ ज्ञातेपणें ॥ १ ॥ अकर्म कर्म नमनी ॥ महापापा न गणीं ॥ निंदेचा वाग्बाणीं ॥ मागांसरे ॥ २ ॥ आशा हेवाटी ॥ दुर्धरपणें खोटी ॥ आवरावया सृष्टी ॥ निराशा बळी ॥ ३ ॥ अनुताप दृढमुरडीं ॥ विवेकबळे नरडी ॥ गोवर्धना बुडी ॥ दृढ बांधावी ॥ ४ ॥ क्रोधाचा हा पोळ ॥ खवळला प्रबळ ॥ आवरावया बळ ॥ नाहीं कोणा ॥ ५ ॥ हा विवेक वनखांदी ॥ सिद्धिवाफे खुरंदि ॥ तापसातें बादी ॥ मुसमुसुनि ॥ ६ ॥ धनवंतातें धडकी ॥ वेदपाठका सडकी ॥ पंडित बुकबुकी ॥ आपुल्या सत्ता ॥ ७ ॥ हा साधकातें खेंटी ॥ व्रतधाऱ्यातें आटी ॥ दुर्धर भडका उठी ॥ सत्तेपासि ॥ ८ ॥ ध्यानधारणा धडकी ॥ नेमनिष्ठा उचकी ॥ जपतपाते गुचकी ॥ गचा धरुनी ॥ ९ ॥ योग्य याग विनाशी ॥ स्वधर्म कर्मनाशी ॥ वितराग संन्यासी ॥ छळुनि सांडी ॥ ११० ॥ ग्रहस्था लागे पाठी ॥ देवपुजेपासि उठि ॥ दिगंबरातें आटी ॥ साग भोगे ॥ ११ ॥ यासी शांति सडका करी ॥ बोध्या बोधुनि धरी ॥ गोवर्धना माझारी ॥ बैसवी वेगी ॥ १२ ॥ वेवादिं श्वान दृष्टी ॥ सदा क्रूर दृष्टी ॥ लागे संता

पाठी ॥ गुरगुरीत ॥ १३ ॥ सहजें जाल्या भेटी ॥ वसउनी उठी ॥ भूकत लागे पाठी ॥ परापवादें ॥ १४ ॥ तुकडा देता दिठी ॥ पुंछ हालउनि उठी ॥ सर्वदा लुडबुडी ॥ पायापासी ॥ १५ ॥ भुक्तभागावरी ॥ पडे त्याच्या द्वारीं ॥ अखंड कुंकुं करी ॥ तयापासी ॥ १६ ॥ देता लुडबुड करी ॥ एरव्ही तो गुरगुरी ॥ वसवसी पैं भारी ॥ मानासाठीं ॥ १७ ॥ हा गोरस भांडे फोडी ॥ कांठफरा गळा वोढी ॥ करिता हडहडी ॥ अधिक भुंके ॥ १८ ॥ यासी धरावयाची विकडी ॥ बोध जाणें फुडी ॥ लावि भंवर कडी ॥ विवेकाची ॥ १९ ॥ हा उपरमे सांखळी ॥ निजबोधें आकळी ॥ गोवर्धनां तळीं ॥ खुंटुनि घालि ॥ १२० ॥ एवं गोकुळीची सकळीं ॥ गोवर्धनातळीं ॥ सामग्री आपुलाली ॥ निःशेष नेली ॥ २१ ॥ सात दिवस वरी ॥ आणि सात रात्री ॥ गोवर्धन निजकरीं ॥ कृष्णें धरिला ॥ २२ ॥ मेघ प्रळयबळी ॥ वरुषे जळकल्लोळी ॥ गोवर्धना तळीं ॥ गोकुळ नांदे ॥ २३ ॥ गाई तृण जीवन ॥ हर्षित गौळिजन ॥ पाळी जनार्दन ॥ हातावरी ॥ २४ ॥ इंद्र येउनि पाहे ॥ गोकुळ नांदताहे ॥ मेघासी ह्मणे काये ॥ केलें तुह्मी ॥ २५ ॥ मेघ ह्मणाति आतां ॥ आमुची न चले सत्ता ॥ मेघःशाम राखिता ॥ जाला अंगें ॥ २६ ॥ तें देखोनि अद्भुत ॥ इंद्र जाला गर्वहत ॥ न कळे श्रीकृष्णनाथ ॥ स्वरूप सोय ॥ २७ ॥ अनन्य होउनी शरण ॥ घालि लोटांगण ॥ वंदी कृष्णचरण निजमस्तकीं ॥ २८ ॥ यापरी स्वमेव ॥ स्वयें देवाधिदेव ॥ संरक्षाणि निर्वाह ॥ निजभक्तांचा ॥ २९ ॥ निजभक्त सांकडी ॥ अंगें घालि उडी ॥ प्रतिपाळी आवडी ॥ भाविकातें ॥ १३० ॥ एकपणाची खूण ॥ पावोनि आपण ॥ सबाह्य जनार्दन ॥ संरक्षीता ॥ ३१ ॥ एकजनार्दन ॥ प्रपंच गोवर्धन ॥ उचलोनि परिपूर्ण ॥ प्रतिपाळी ॥ ३२ ॥ इति दशमस्कंदे गोवर्धन आख्यान समाप्त ॥

॥ २११७ ॥ आमय कृष्णाचे चरित्र ॥ अगम्य अवगुणी वाचा बोलवे कवण ॥ कर्ण कुमारी स्वेच्छा विचारे पाहताती खाजिलपणे ॥ पाहुं गेले तव वेडावली ठेली कैचा जीव कैंचि कारण ॥ १ ॥ धृ० ॥ अगम्य रूप याचे विचित्र विंदाण कळितां कवणा आकळे ॥ पाहतां न दिसें स्वेच्छा विचरे ऐसे आहे तयाचे चाळे ॥ जवळची असता नास्तिक्य ॥ वाढली हेंच वर्म न कळे ॥ २ ॥ गोकुळ बुडविले जगज्वाळासी याचेनि अनाचारे ॥ अहि कौंस मारुनि प्रबळला दिसे ॥ तो केवी घेववे विचारें आतां मी तूं पण कैसें बुडविलें आमचे ॥ साचें कृष्ण परात्परे ॥ ३ ॥

आठवे प्रसवलीस तेही अगुणाचें सगुणांसी ज्याचेनि त्रासु ॥ पितामहांचा पिता हेचि लाहोनी सत्य जाला भानुदासु ॥ येका जनार्दना शरण त्याचि कृपा परिपूर्ण ॥ कृष्णीं हरपला मागमोसु ॥ ४ ॥

॥ २११८ ॥ वत्साहरणीचे संवगडे मिनले गोपाळ ॥ ते ह्मणती अकळ कृष्णकरणीं ॥ बुधमुखें ऐकिजे ॥ तुवां नवल काज जालासी पैं सहजे ॥ गोपाळ वत्से ॥ ते कवणे ठायीं होउनी आलीं मागुती ॥ केऊती गेली गेली हेचि मागी भली दावी आह्मां ॥१॥ धृ० ॥ सत्यकर गोपाळ घेउनि गेले छंद ॥ तो आनंदमय नयनि चाखो ॥ तूं एकलाचि एकट ॥ सकळीं नटला नट ॥ तोचि पैं प्रकट आह्मा दावी ॥ आह्मी जीवलग सांगाती गौप्य आह्माप्रती ॥ नव्हे नव्हे स्थिति ॥ तुझी कृष्णा ॥ २ ॥ अरे संसारा मुकाल ॥ गोत्र कुटुंबा चुकाल ॥ थोटावले टाकाल ॥ एकलेपणें ॥ तेथ वर्ण ना आश्रम ॥ कुळ नाहीं कर्म ॥ अवघेचि अकर्म व्हाल तुह्मी ॥ याही वरते पुसो पाहापा ॥ तुह्मीचि जाणा बापा ॥ शुन्य हें संकल्पा ॥ पडेल तुमच्या ॥३॥ तंव ते ह्मणती कृष्णा ॥ किती पुससी प्रश्ना ॥ तुझ्या रूपीं तृष्णा ॥ तेचि जाली ॥ पाहतां तुझी वाट ॥ मनाचें उतरतें पोट ॥ वेगीं करी प्रकट ॥ स्वरूप तुझें ॥ ऐसें बोलतां ठेलें गुज ॥ प्रकटलें कृष्णतेज ॥ तटस्थ सहज ॥ पडिलें तयासी ॥ ४ ॥ तेथ निखळ एकपणें ॥ काय पाहावें कवणें ॥ पाहात पाहातां पाहणें ॥ होउनि ठेले ॥ नाहीं कार्याकारण दोषें ॥ सहज भ्रमतसे ॥ द्रष्टा-दृश्य दशे ॥ घालोनि मागें ॥ तेथें मागें आणि पुढें ॥ पाहतां वाडेंकोडें ॥ कोंदाटले चहुंकडे ॥ कृष्णरूप ॥ ५ ॥ थायकर गोपाळ विसरले तो छंद ॥ अवघाचि गोविंद कोंदाटला ॥ तेथ विगत वेष गुणी ॥ जनार्दन जनीं एकी एकपणीं वोसंडतु ॥ तेथें संग ना सांगाती ॥ येकलाचि श्रीपती ॥ स्वानंदें त्रिजगती ॥ पूर्ण झाला ॥ ६ ॥ तें स्वरूपीं ठेउनि दृष्टी ॥ पाहतां सकळ सृष्टी ॥ कृष्णावांचून गोष्टी ॥ दुजी नाहीं ॥ तेथें जें जें कांहीं दिसे ॥ तें तें तोचि असे ॥ असे तें आभासें ॥ तेणें रूपें ॥ तेथें कायसें वत्सें गोपाळ ॥ चराचर सकळ ॥ कृष्णकृष्ण केवळ स्वविंद ॥ ७ ॥ ऐसें आह्मां आह्मां देखिलें ॥ आह्मींपण तें गेलें ॥ जाउनिया उरले ॥ तेही आह्मी ॥ आतां तुह्मी आणि आह्मी ॥ दिसते बाह्यधर्मि ॥ तयाचा विरामी अनिर्वाच्य ॥ तेथें जैसें जैसें असे ॥ काय सांगो कैसें ॥ शब्दाचें पिसें पीसेपणीं ॥ ८ ॥ ऐसे निजरूपें गोपाळ राहिले सकळ ॥ बाप समर्थ खेळ ॥ श्रीकृष्णाचा ॥

एकाएक मनें ॥ कवळुनी जनार्दनें ॥ राहिले सावधानें ॥ एक होउनी तो ॥ पितामहाचा पिता सुभानु श्रोता ॥ आल्हासत ऐकता सत्यदेहें ॥ ९ ॥

॥ २११९ ॥ गोपाळ ह्मणती हरी ॥ चंद्र वसे सूर्यावरि ॥ ग्रह नक्षत्रांचे शिरीं ॥ ध्रुवमंडळ ॥ १ ॥ ब्रह्मलोकाहि वरतें ॥ वैकुंठ कैलासाहि परतें ॥ कवण वसताहे तेथें ॥ सांग आह्मां ॥ २ ॥ धृ० ॥ अवधिया वरिल काये ॥ वेगी सांग बा जाये ॥ ह्मणोनि धरिले पाये ॥ कान्हयाचे ॥ ३ ॥ अवघेया वरिल पूर्णपण ॥ सांगता सांगावया नये जाण ॥ यालागी धरुनि मौन ॥ उगे राहा ॥ ४ ॥ तें न कळतां आह्मासी ॥ केवि मौनातें धरविसी ॥ मनें होता कासाविसी ॥ वेगी सांग बापा ॥ ५ ॥ तेथें नाहीं उणखुण ॥ सद्भावें साधे संपूर्ण ॥ सर्वांगें सावधान ॥ होउनि ऐका ॥ ६ ॥ परापरौता ॥ सप्तपाताळा खालता ॥ तो मी तुह्मा आतौता ॥ आन दुसरा नाहीं ॥ ७ ॥ सरसर बोलसी तितुकें कुडे ॥ तरि कां तुझे डोईवरि घोंगडे ॥ तें तूं अवघ्यावरी घडे कैंवि ॥ ८ ॥ देहिचे देखतां देहपण ॥ सर्वथा नकळे पूर्णपण ॥ यालागीं दोषगुण ॥ पाहो नका ॥ ९ ॥ जेवीं अळंकारीं सुवर्ण ॥ तेविं दृश्यामाजी मिची कृष्ण ॥ अकारि विकारी पूर्ण ॥ पूर्ण अविकारी ॥ १० ॥ साखरेचें वृंदावन ॥ तें कडू नव्हे गोड पूर्ण ॥ तेवि दृश्याचें देखणेंपण ॥ होय चिद्रूप ॥ ११ ॥ तेथ तळिंवरि नुरे मात ॥ सबाह्य श्रीकृष्णनाथ ॥ एका जनार्दनीं ॥ मस्तकीं ठेविला हात ॥ १२ ॥

॥ २१२० ॥ संभ्रांतवाणे परि फेडोनियां कीं ॥ नेसली शुद्ध पैं येक ॥ दुडिचा भारु माथा ॥ मथुराहि न पवता ॥ निरंजनि भेटला देख ॥ १ ॥धृ०॥ गोवळे गोवियेले ॥ येणें गोविंदें गोवियेले ॥ द्वैत दुडिभारु हिरुनियां ॥ माझे मीपण दावियेलें ॥ अवचिता देखिला विस्मय लाजत ॥ अधोदृष्टि झाले कैसे ॥ पृथ्वी न दिसे कृष्णचि दिसताहे ॥ मागां पाहातां तोचिआभासे ॥ २ ॥ पाठिमोरि ठाये सन्मुखचि कृष्ण ॥ नेत्र लाउनि राहे ॥ तंव श्रीरंग सांवळा ॥ दिसताहे डोळां ॥ ऐसें केलें कैसें पाहे ॥ ३ ॥ आतां गोरस नेईल तेवो ॥ मीं तंव द्या राजावो ॥ तंव सभोंवता कृष्णचि आहे ॥ संकल्पा माझारी ॥ तोचि येक दिसे ॥ मानस खुंटिलें पाहे ॥ ४ ॥ येणें जाणें ठेले ॥ द्वैतपाश बळें ॥ तुटले आशाचे पाश ॥ एका जनार्दन योगें उभयतां उभय गेलें ॥ कृष्णीं जालें समरस ॥ ५ ॥

॥ २१२१ ॥ आलगट कान्हा ऐकोनियां ॥ पाहों गेले दुडिच्या मिसे ॥ पाहत पाहतां टक जे पडलें ॥ डोळिया लाविले पिसें ॥ १ ॥ धृ० ॥ येणें-नवल दाखविलें ॥ गोंविंदें नवल दाखविलें ॥ मी तूंये दोन्ही नाहीं ॥ येक-पणा मुकविलें ॥ मीना तो दोन्ही नाहीं ॥ तेथें पाहणें पाहिलकाई ॥ येणेंजाणें विसरोनि गुंतलें तियेचि ठायीं ॥ २ ॥ खेंग नेदिता पडली मिठी ॥ बोलणें विसरे गोष्टी ॥ द्रष्टादृश्य हारपलें नेणो काय॥ देख देखते दिठी॥ ३ ॥ आंत बाहेर सारिखें चोख ॥ तेथें देखणें देखत देख ॥ सांगणें पुसणें हारपोनी॥ कोंदलें ठायीं एक ॥ ४ ॥ एका जनार्दनीं ऐसा ॥ एकापणाचा घालितो ठसा ॥ व्याप्य तितुकें पोटिंसुनि ॥ व्यापक जाला कैसा ॥ ५ ॥

॥ २१२२ ॥ रास क्रिडे हरि ॥ गोपिका अभ्यंतरि ॥ अनंत अनंतरूपें धरी ॥ अनेकी अनेक ॥ अवघेपणें एक ॥ न कळे तयाचि थोरी ॥ गोपि-मती एकेक ॥ दुजेपणें न पडे तर्क ॥ जीवींजिवा ॥ ठकुनि रमे हरी ॥ रमविति या रमवित ॥ कामाचा नातळे हात ॥ कृष्णप्रभा प्रकाशे अंबरीं ॥ १ ॥धृ०॥ ऐसी सुरतरास रंगे ॥ रमारमण संगें ॥ परात्पर नारीयोगे ॥ कामी कामि-का कामा ॥ रिमगुचि नाहीं मां ॥ दृश्येविण विचरतु आंगें ॥ विमुखासि समुख ॥ समुखिमुखा मुखस्व ॥ सकळि सकळ एकमुख ॥ आलिंगनी आलिं-गन चुंबनी चुंबन ॥ सुखासी चेतवि सुख ॥ मोडले इंद्रियवेष ॥ उन्मत्त मा-तला हरिख ॥ निडारले परम पीयुख ॥ कृष्ण अधरामृत गोडी ॥ योगि ये नेणति फुडी ॥ काम आवडि सेविति निःशंक ॥ २ ॥ निःशंकिका प्राप्ती ॥ गोपिका सुरतरति ॥ देखोनि देवांगना नागिव्या नाचति ॥ कामासी पडिले टंक ॥ रमा हे न लभे सुख ॥ कृष्णक्रिडा हे सभाग्यें पावती ॥ ऐसी रास मनो-रम पुरुषोत्तमें पुरती काम ॥ ब्रह्मषण्मास केली तेथें राति ॥ वेदाचे मोडले पाय ॥ विधि लाजोनि जाय ॥ चारी मुक्ती व्यभिचारु वंदिती ॥ ३ ॥ स्थळिं हा स्थळगत ॥ जळि जळें क्रिडत ॥ अनंताचा हा न कळे आंतु ॥ गोपिचा अभ्यं-तरि ॥ सबाह्य आपण हरी ॥ अद्वैत हा द्वैतें रमतु ॥ योगिया नकळे योग्य ॥ गोपिका भोगिती आंगें ॥ देवा दुर्लभ मनोरथ ॥ ४ ॥ शिव अनंगें व्यापिला ॥ तोहि मदनमुर्छित जाला ॥ कृष्णक्रिडे काम भुलला ॥ काम कामिक बाणाही॥ नव्हे कृष्णा अंगीं पैठी ॥ शेखी लाजोनि जन्मला पोटीं ॥ पुत्रत्वें लाभला अंक ॥ सेवितसे कृष्णसुख ॥ कामाचेंही हरलें दुःख ॥ रासक्रिडा निरंजनी ॥ रमवित समाधानी ॥ परमसुख एका जनार्दनीं ॥ ५ ॥

॥ २१२३ ॥ वज्राचळ कृष्णमूर्ति ॥ माल देखोनि कांपती ॥ तेथें दचकति चवकति ॥ पिलंगति शलतो शलमाला ॥ चाणूर घेउनि आला ॥ तेथें झोंबि होतसे मालमुला ॥ उरिसिरि उदरीं गळां ॥ सद्विद्या मालविद्या लाविति कळा ॥ तेणें कासाविस करिति गोपाळा ॥ कृष्ण पावला कडाडी ॥ लिंग देखाचें मस्तक फोडी ॥ अविद्या अशुद्ध वमित बुढि पाडी ॥ १ ॥ धृ० ॥ रंगी श्रीरंग मूर्ति ॥ देखोनियां श्रीपति ॥ अनंगा अनंगें व्यापिजती ॥ व्यंकट कटाक्षगुण ॥ अंजनें बापट बाण ॥ भूविक्षेपें विंधिती ॥ कृष्णकामें सा फुटती ॥ देह कंचुकी उसटती ॥ तेथें वासना बिरडीं तुटति ॥ कामिनी बापुड्या किति ॥ दादुले भूलोनि ठाती ॥ मदनमोहन कृष्णमूर्ति ॥ नरा माजी मनोरम ॥ पुरुषीं पुरुषोत्तम ॥ योगियाचें विश्रामधाम ॥ गोपाळ ह्मणति कृष्ण आमुचा सांगाति ॥ येणें मार मारिले गति विगुती ॥ कंस ह्मणे देवकी बाळ ॥ काळाचाही महाकाळ ॥ येणें थोर मांडिला हलकल्लोळ ॥ मालाचा काइसां पाडू ॥ मारिला कोवलया पीडू ॥ मारिल्या बंधुचा घेइल सुडु ॥ २ ॥ नगर नागरिक लोक ॥ ह्मणती हें बाळक ॥ इही नवल कैसे केलें देख ॥ भेदुनियां धनुर्याग ॥ बळें हे सबळ चांग ॥ कैसेनि कंसाचे आणिलें स्वर्ग ॥ वसुदेव निज पिता ॥ पाहाती देवकी माता ॥ माझा बाळ श्रीहरि रक्षिता ॥ आदरें सज्जन पाहाती ॥ आमुची हे ध्येयमूर्ति ॥ प्रेमपडे भरे थोर वोसंडति ॥ ३ ॥ शब्दज्ञानाचा निर्धारीं ॥ विराट् स्वरूप हरी ॥ व्याप्यव्यापक मुरारी ॥ अनळ अनिळ गगन ॥ महिमा तोचि जीवन ॥ प्रकृति पुरूष जयें कृष्ण ॥ अरे हा नंदा मरिगाळा ॥ मुरडोनि कंसाचा गळा ॥ हरि खेंगुटि आणिली गोकुळा ॥ उग्रसेनाचे बंद सोडी ॥ पीतरांचि बेडी तोडी ॥ स्वर्गीं देव उभविती गुढी ॥ ४ ॥ इंद्रादिक देव ह्मणती ॥ श्रीकृष्ण अवतार मूर्ती ॥ सुमनि शरधारि वर्षती ॥ मुगुट कुंडलें माळा ॥ कौस्तुभ शोभे गळा ॥ रंगी शोभत सांवळा ॥ सच्चिद आनंद बोध ॥ केवळ स्वरूप शुद्ध ॥ गोपवेषें दावितुसे छंद ॥ जया जैसा भाव ॥ तया तैसा देव ॥ एका जनार्दनीं ॥ एक पहा हो ॥ ५ ॥

॥ २१२४ ॥ रात्रीची प्रौढि नोहे सूर्याचा प्रकाश ॥ तोंवरीच भास अंधाराचा ॥ १ ॥ सूर्याचे उदयीं अंधार हा नासे ॥ तैसें ज्ञानें नासे अज्ञान सर्व ॥ २ ॥ एका जनार्दनीं सद्गुरू वांचुनी ॥ प्रकाश तो मनीं नोहे कांहीं ॥ ३ ॥

॥२१२५॥ श्रीगुरुसारखा वंद्य नाहीं त्रिभुवनीं ॥ तो कैवल्याचा धनी विटेवरी ॥ १ ॥ विटेवरी उभा आनंदें राहिला ॥ वैष्णवाचा मेळा शोभे तेथें ॥ २ ॥ आनंद भीमातीरीं पुंडलिकापाशीं ॥ नाम आनंदेसी गाऊं गीती ॥ ३ ॥ एका जनार्दनीं कैवल्याचा धनी ॥ तो नंदाचे अंगणीं खेळे लीळा ॥ ४ ॥

॥२१२६॥ श्रुती शास्त्रां दुरी । परमात्मा श्रीहरी । तो दशरथाचे घरीं । क्रिडतसे राम ॥ १ ॥ क्षण एक नमस्कारा । नातु सुरवरा । जो रिसां आणि वानरां । क्षेम देतु ॥ २ ॥ चरणीं शिळा उद्धरी । नामें गणिका तारी । तो कोळीयाचे घरीं । पाहुणा राम ॥ ३ ॥ न कळे ध्यानीं मनीं । नातुडे चिंतनीं । तो वानराचे कानीं । गोष्टी सांगे ॥ ४ ॥ शिवाचें निज ध्येय । वाल्मिकाचें गुह्य । तो भिल्लटीचीं खाय । फळें राम ॥ ५ ॥ जनार्दनीं एका। श्रीराम सखा । वानरें वचनें रे फुका । तारियेली ॥ ६ ॥

॥२१२७॥ जन मत मेरी मुई हो मायीं ॥ भक्ति जनार्दनें दाइल्या ॥१॥ भक्ति न न्हावें भक्ति जीवावे ॥ रामरस मोकूं भक्ति पिलावे ॥ धृ० ॥ प्रेमपालखीं भक्ति सुलावें ॥ नाम गुण हल्लरु गावें ॥ २ ॥ एका जनार्दनीं निज भक्ति माता ॥ भजन करावें सब जीव समता ॥ ३ ॥

॥ २१२८ ॥ बालका देखोनी संकटीं ॥ माता कार्य टाकुनी उठी ॥१॥ ऐसें दयेचे ठायीं जाण ॥ आपुलें नाणावें पारिखेपण ॥ २ ॥ महापुरीं बुडे तयातें ॥ उडी घाली कृपाळु तेथें ॥ ३ ॥ दीनाचीये लागीं ॥ जो निघे जळतीये आगीं ॥ ४ ॥ ऐसे दयेचे पाळी लळे ॥ एका जनार्दनीं चरणीं लोळे ॥ ५ ॥

॥२१२९ ॥ सहजीं सहज होती वो नांदती ॥ स्वभावें भावना अतर्क्य आली स्थिति ॥ माया मोह भरलासे चित्तीं ॥ अहं विंचवें खादलें अवचितीं ॥ १ ॥ अहं विंचवें खादलें करूं काय ॥ वेगीं मीपणा ब्रह्मांडीं भरला माय ॥ अष्टांगीं चढला तेणें तळमळी पाहे ॥ कर्म भोगी आदळी हात पाय ॥ २ ॥ जीव शिवाचीये संधि माजि होतां ॥ तो मज झोंबला मी काय करूं आतां ॥ धरी मारी तंव रिघाला आतौता ॥ कांहीं केलीया वो नुतरे सर्वथा ॥ ३ ॥ अति चिंतेच्या थोर थोर येताती तिडका ॥ वित्तहानीच्या वेगीं उठती भडाका ॥ द्वंद्वबाधेचा न साहे धडाका ॥

विषयवियोगें आदळती थडका ॥ ४ ॥ बहुमान ते थोर तळमळ ॥ कामाति कामाची नित्य जळजळ ॥ पुत्र लोभाची लागती इंगळ ॥ लोक लाजेची अंगें लागें कळ ॥ ५ ॥ नित्य निंदेची खरस येत तोंडा ॥ कर्मस्वेदाचा अंगीं चालिला लोंढा ॥ याचा उतारु नव्हे नव्हे उदंडा ॥ जेथें झोंबला तें तोडोनी सांडा ॥ ६ ॥ उत्पत्ति स्थितिये नित्य निंदा जाणा ॥ माझी मज नसावी उदरवेदना ॥ ज्याचे नामें निरसे व्यथा नाना ॥ त्या पाचारा निजगुणी जनार्दना ॥ ७ ॥ ऐसीये अनुतापें तापली रात्रंदिन ॥ भावें सद्‌गुरुजी पातला आपणा ॥ अनन्यगतीं धरितां तयाचें चरण ॥ हस्तक मस्तकीं तेणें केलें पूर्ण ॥ ८ ॥ भावें लागतां गे मज त्याचिया पाया ॥ तिन्ही कळा सोडोनी मोकळी केली काया ॥ ब्रह्माहमस्मि विंचु आणि-लागे ठायां ॥ थोर तळमळ माझी गेली विलया ॥ ९ ॥ विंचु उतरतां मी-पणा मज ठक ॥ ठाईहुनी उतरला निःशेष देख ॥ बंध मोक्ष अहं सोहं सुखदुःख ॥ वेधनेसहित उतरलें विखें विख ॥ १० ॥ एका जनार्दनीं आला गे निज गुणी ॥ विष उतरुनी तेणें केलें अगुणी ॥ स्वानंद कोंदला आनंदातें गिळुनी ॥ आनंदें आनंद कोंदला न समाय गगनीं ॥ ११ ॥

॥ २१३० ॥ गुरुवचनीं मन लगावे ॥ नखशिख सुख पावे ॥ १ ॥ हरि निज नित्य लगति आवे ॥ मोही भोवरलाल ॥ २ ॥ बोधसु बात चलावे ॥ की प्रीतमप्रीत वधावे ॥ ३ ॥ अंग संगनी संग लगावे ॥ की सुख दुःख बुझावे ॥ ४ ॥ सुखदुःखातीत परमानंद ॥ एका जनार्दनीं पावे ॥ ५ ॥

॥ २१३१ ॥ श्रीगुरु पाई ठेवी तूं विश्वास ॥ दासा तूं दास होय त्याच्या ॥ १ ॥ परब्रह्म राम वसिष्ठा शरण ॥ कृष्णें संदीपन गुरु केला ॥ २ ॥ वाल्मीका उपदेशी नारद तो मुनी ॥ वंद्य त्रिभुवनीं झाला वाल्हा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं गुरु मज भेटला ॥ मोकळा दाविला मार्ग तेणें ॥ ४ ॥

॥ २१३२ ॥ झालीया गुरुकृपा सुगम ॥ सर्वत्र ठसावें परब्रह्म ॥ १ ॥ तेथें नाहीं जन्ममरण ॥ भवबंधन असेना ॥ २ ॥ ऐसा धरितां विश्वास ॥ काय उणें मग तयास ॥ ३ ॥ एका जनार्दनीं भाव ॥ स्वयें आपणची होय देव ॥ ४ ॥

॥ २१३३ ॥ हातीं सांपडतां वर्म ॥ वाउगा श्रम कोण करी ॥ १ ॥ पायाळचि जवळी असतां ॥ धन सर्वथा बहु जोडे ॥ २ ॥ अंजन ते गुरु-

कृपा ॥ पुण्यपापा कोण लेखा ॥ ३ ॥ शरण एका जनार्दनीं ॥ दुजेपण येकला दिसे ॥ ४ ॥

---

## षट्चक्रें.

॥२१३४॥ ॐकार पैल तिरीं । अर्ध अंगुळा अंतरीं ॥ अग्निचक्र निर्धारीं वसत असे ॥ १ ॥ तेथूनी त्रिकुटी ॥ असे अर्ध बोटीं ॥ सभळतें पोटीं ॥ ओंकाराचि ॥ २ ॥ दशनादाची ध्वनी ॥ अग्निचक्रा माजी ॥ शुषुम्नाचे तेजीं ॥ त्रिकुटी ते ॥ ३ ॥ श्रीहाट गोलाट ॥ आणि पुण्यगिरी ॥ भ्रमर गुंफाचक्रीं ॥ वास ज्याचा ॥ ४ ॥ मग ब्रह्मरंध्र ॥ सर्वस्व पवित्र ॥ तेथें अनाक्षर ॥ नांदतसे ॥ ५ ॥ ब्रह्मांडीं ते साक्ष ॥ श्रीहाटा पासोनी ॥ ऐसे योगी मुनी ॥ बोलियेले ॥ ६ ॥ आधारा पासोनी ॥ त्रिकुटी परियंत ॥ पिंडींचा हा अर्थ ॥ संतांचिया ॥ ७ ॥ एका जनार्दनीं ॥ चौदा चक्रें जाण ॥ जनार्दनीं पूर्ण ॥ कृपा केली ॥ ८ ॥

॥ २१३५ ॥ जा वेगीं शरण सद्गुरुरायारे ॥ अति दुस्तर वैष्णवी मायारे ॥ ध्रु ॥ निज हित नेणुनि विषयसुखास्तव ॥ मोक्षद मान विकायारे ॥ अति दुस्तर ॥ १ ॥ गृह दारा सुत लौकिक इच्छुनी आर्जविसी किती रायारे ॥ अति दुस्तर० ॥२॥ दुर्लभ कलियुगीं सुरगण वांछिती ॥ घालविसी वय वांयारे ॥ अति दुस्तर० ॥ ३ ॥ एका जनार्दन प्रेमति लोचन ॥ त्र्यंबक आठवी पायारे ॥ अति दुस्तर० ॥ ४ ॥

॥ २१३६॥ सोहं भोळा पाहुनी डोळां मग झालों विस्मय कीं ॥ नकळे पार तयाचा माये ॥ हर्ष निर्भर सर्वही झालों त्याचे ठायीं मुरालो ॥ कीं अवचट० ॥ १ ॥ तुर्या सुंदरी दृष्टी अंगळीं तेथेंच दशमद्वारें ॥ कीं तेथें येक गे लागलें विवर ॥ ब्रंह्मरंध्री महाद्वारीं तेथेंच येक सुंदर ॥ किती जला सुटलेसे पाझर ॥ पाझर प्यालों अमर झालों ॥ उन्मनीचें घर ॥ कीं तेथें येक उगवला दिनकर ॥ माया ममता सर्वही सांडुनी ॥ साचें ठायीं मुरालों ॥ कीं अवचट ॥ २ ॥ सद्गुरुनाथें कृपा केली ॥ शीरीं ठेविला कर ॥ कीं दाखवी वस्तुचें भांडार ॥ जनार्दनीं मग्न झालों ॥ पाहुनी सारासार ॥ कीं एकचरणासी तत्पर ॥ संतसज्जना श्रीगुरुचरणा ॥ भावे शरण आलों ॥ कीं अवचट ॥ ३ ॥

॥ २१३७॥ अवचट मात्रागमनी झालों ॥ गोहसेचें पातक करुनी जातची असतां मेलों ॥ कीं ॥ धृ० ॥ सद्गुरुनाथें कृपा केली ॥ धरिला माझा

हात ॥ कीं घेऊनी चालीले एकांत ॥ कान फुंकुनी नयनी दाविलें ॥ मग झालें विस्मय ॥ कीं न कळे पार तयाचा माये ॥ पाहावयासी दृष्टी पुरेना तेथेंच वेडावलों ॥ कीं अवचट० ॥ १ ॥ वोडीच आणि मज वेड लागलें तें-हीच सांगतां नये ॥ कीं विसरले मागल्याची सये ॥ परेहुनी परिसा मंदीर तेथें ॥ वस्तु तयाची आहे ॥ कीं तयाचें सौख्य सांगतां नये ॥

॥ २१३८ ॥ पहिली माझी ओंवी ॥ त्रिकुट स्थळासी ॥ हसा जागृतीसी पीत वर्ण ॥ १ ॥ दुसरी माझी ओंवी ॥ श्रीहाट अंगुष्टीं ॥ विष्णुलिंग कटीं ॥ श्वेतवर्ण ॥२॥ तिसरी माझी ओंवी ॥ गोल्हाट कारण ॥ रुद्र रक्त वर्ण ॥ सुषुम्निचा ॥ ३ ॥ चवथी माझी ओंवी ॥ महा तें कारण ॥ ईश्वर आपण ॥ नीळ-वर्ण ॥४॥ पांचवी माझी ओंवी ॥ भ्रमरगुंफेस्थानीं ॥ सदाशिव उन्मनी ॥ कृष्ण-वर्ण ॥ ५ ॥ सहावी माझी ओंवी ॥ ब्रह्मरंध्रद्वारीं ॥ सत्रावी सुंदरी ॥ जीवन-कळा ॥ ६ ॥ सातवी माझी ओंवी ॥ सहस्रदळावरती ॥ तेथें सद्गुरु ज्योती ॥ देखियेली ॥ ७ ॥ आटवी माझी ओंवी ॥ अनुभव उल्लेख ॥ सर्वांभूतीं एक ॥ परब्रह्म ॥ ८ ॥ नववी माझी ओंवी ॥ अंतर्लक्ष स्वरूप ॥ पाहें आपेंआप ॥ पर-ब्रह्म ॥ ९ ॥ दहावी माझी ओंवी ॥ अलक्ष देवासी ॥ आपेंआपणांसी ॥ ओळ-खिलें ॥ १० ॥ ऐसी माझी ओंवी ॥ तुज पावो गुरुनाथा ॥ जन्ममरणव्यथा ॥ चुकाविली ॥ ११ ॥ सत्रावी उन्मनी ॥ दावोनीयां जाण ॥ अर्धमात्रा गमन ॥ केलें मज ॥ १२ ॥ स्थूळ ते सुक्षम ॥ कारण निरोपणीं ॥ तुर्या महाका-रणीं ॥ दाखविली ॥ १३ ॥ अर्ध ते मातृका ॥ उन्मनी ठिकाणा ॥ दसवे द्वारीं खूणा ॥ प्राप्त झाल्या ॥ १४ ॥ चर्मचक्षुहूनि ॥ ज्ञानचक्षु पाहिला ॥ विट्ठल दाविला ॥ सद्गुरूनें ॥ १५ ॥ निर्गुण सगुण ॥ पाहोनियां ठेलों ॥ जन्ममरणदुःख ॥ टाळियेलें ॥ १६ ॥ ऐशा याही खूणा ॥ आह्मांसी लाधल्या ॥ एका जनार्दनीं ॥ निश्चय केला ॥ १७ ॥

---

## अभंग.

॥ २१३९ ॥ निराळा नीराळी ॥ राहे तूं अढळ ॥ दृशाचे पाल्हाळ ॥ मागें सारी ॥ १ ॥ तेथें क्षेत्र संन्यास ॥ घेइ निश्चयाचा ॥ मेरू होई सुखाचा ॥ सहज-पणें ॥ २ ॥ धृतीचि धारणा ॥ नादा आणि मना ॥ मेळवि गगना ॥ गुरु मुखें ॥ ३ ॥ तेथें पिंडपदा ग्रास ॥ स्वरुप चिदाकास ॥ एका जनार्दनीं वास ॥ एकपणें ॥ ४ ॥

॥ २१४० ॥ उदय समाधि ॥ लागती नीवळ ॥ अवघा ब्रह्म गोळ ॥ उजाळतो ॥१॥ चक्रामध्यें चक्र ॥ येती व्योमाकार ॥ आदि मध्य हेर ॥ ज्योती साची ॥२॥ द्रीतिय समाधि ॥ लागे कैशा परी ॥ गुरु पुत्रा हेरी ॥ नयन रूपें ॥३॥ प्रथम समाधि ॥ निबीड सर्पाकार ॥ त्या मध्यें आकार ॥ चक्राचा पैं ॥४॥ झळकती दिव्य ॥ मणिरत्न खाणी ॥ अविनाश देखणी ॥ चिन्मयाची ॥५॥ उदयाची ज्योति ॥ द्रीतिय मणी ॥ हे दोन्ही देखणीं ॥ जाहालीं बापा ॥६॥ उदयेचे तिन्हीं ॥ द्रितियेचे तीन्ही ॥ अविनाश देखोनी ॥ संध्याकाळीं ॥७॥ संध्याकाळीं संदेह ॥ भावना टाकुन ॥ द्यावी तेणेंचही ध्यावें ॥ समाधि सुख ॥ ८ ॥ एक चक्र येती ॥ आभासा एव्हडी ॥ सामर्थ्यें चौकोडी ॥ मोतीयाची ॥ ९ ॥ मणी रत्न ज्योति ॥ संध्याकाळीं वाती ॥ तेलावीण दीप्ती ॥ पाजळती ॥ १० ॥ ह्मणे जनार्दन ॥ एकनाथा घेइ ॥ शोधी याच देही ॥ संधी पाहे ॥ ११ ॥

॥ २१४१ ॥ कैसें जाहालें देवदर्शन ॥ देवा पाहात आहे कोण ॥ १ ॥ डोळा उघडोनियां पाहे ॥ पैल देव दिसताहे ॥ २ ॥ पाही देव तो मी भक्त ॥ दोहींसी कोण आहे देखत ॥ ३ ॥ एका जनार्दनीं पाहे ॥ पाहातां देवचि आहे ॥ ४ ॥

॥ २१४२ ॥ न येतां तान्हुलें पाजावें तें कायी ॥ मनास खत जाहालें फेडावें कवणे ठायीं ॥ १ ॥ ऐसा वैद्य मिळता कोणी पुरता ॥ सुखरूप काढीता या मनाच्या व्यथा ॥ २ ॥ जिवाचिया डोळां पडळ पैं आलें ॥ अंजन शोधीलें केंवि तया ॥ ३ ॥ निढळींची अक्षरें चुकलीं काना मात्रा ॥ शुद्ध केंवी लिहावीं लिहिणारें ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं जाणें हातवटी ॥ सुकृत वेंचुनी करा याची भेटी ॥ ५ ॥

॥ २१४३ ॥ सत्य ही गुरूची खूण ॥ डोळे हो ॥ सत्य ही गुरूची खूण ॥ आपुलें स्वरुप घ्या ओळखून ॥ डोळे हो ॥ ध्रु० ॥ चक्षुदर्पणीं जग हें पहा ॥ जगजीवनीं मुरुनी रहा ॥ तुर्या कालिंदि तीर्थीं नहा ॥ पापपुण्या तिळांजुळी वहारे ॥ १ ॥ तिन्ही अवस्था सांडुनी मागे ॥ अर्ध चंद्राचे चांदण्यांत वागे ॥ चांदणें ग्रासुनी त्या स्थानीं जागे ॥ गंड उन्मनी झडकरी वेगेरे ॥ २ ॥ एवढें ब्रह्मांड फळा ज्या देंठीं ॥ ते आठवूं देखण्याच्या पोटीं ॥ मीतूंपणासी पडल्या तुटीरे ॥ ३ ॥ चार सहा दहा बारा साळो ॥ या तों आठ त्या

देखण्याच्या कळा ॥ कळातीत स्वयंभु निराळा ॥ एकाजनार्दनीं सर्वांग डोळारे ॥ ४ ॥

॥ २१४४ ॥ सद्गुरुवचनें जन्म तें झालें ॥ मायाजठरींहुनी वेगळें केलें ॥ अहंकाराचें उल्ब तात्काळ फोडिलें ॥ वासना समुळ नाळ खोडिलें ॥ १ ॥ जो जो जो परियंदे सहज ॥ रात्रंदिवस नित्य लागली निज ॥ धृ० ॥ पिटलें जेंगट अनुहात ध्वनी ॥ शांति क्षमा दया बोलती कामिनी ॥ आपरुणीं झाले स्वयें लक्षणी ॥ टकमकां पाहे कोहं सोहंपणीं ॥ २ ॥ उपजत पायाळू पैं झाला देख ॥ अक्षय ठेवणें लाधलें अशेख ॥ अविद्या गर्भींचें हारपलें दुःख ॥ नयन पुंजाळले अर्धोन्मिलित ॥ ३ ॥ अवलोकनलागीं जनक आचार्य आला ॥ अशेष अविद्येचा त्यागु जो केला ॥ असमायीं आनंद आनंदें न्हाला ॥ उसळल्या सिंधु पूर्वज समुद्द मिनला ॥ ४ ॥ झाली दृष्टादृष्ट बापें नेलें निरुतें ॥ पूर्ण चंद्रक्षीर त्या सागरीं भरतें ॥ यापरी आनंद कवळी नभातें ॥ सबरा भरीत कवण आंवरी तेथें ॥ ५ ॥ चिद्रत्नाच्या अंजुळी भरुनी वृत्तीच्या हातीं ॥ स्वानंदाचा मध मुखीं घालिती ॥ जनित जन्म मळणीं शेष धुती ॥ आपेंआप नवल झाली प्रतीति ॥ ६ ॥ स्वानुभव ब्रह्मसूत्र देता पैं झाला ॥ अखंड अनुस्युत मध्यें बांधला ॥ सभोंवता आपवर्गु समुह मीनला ॥ परं परमेष्ठीसुखें सुखावला ॥ ७ ॥ ज्योतीच्याही ज्योती उजळुनी आरती ॥ ओंवाळिला देखा अखंड दीप्ति ॥ मध्यमा वैखरी पर पश्यंती ॥ एका स्वरोच्चारा परतोनी गाती ॥ ८ ॥ तप्त सूक्ष्म दश वासना होती ॥ सद्युक्तीच्या वळियेल्या वाती ॥ स्वरूपीं लावियेला स्वयंभास्थिती ॥ सहजीं जागोनियां निरसली सटवीची राती ॥ ९ ॥ दहा दिस चिलस वासनें केलें ॥ इतुकेनि स्पर्शाचें भय फिटलें ॥ आकारवेनि सकळां शुद्धत्व आलें ॥ ब्रह्मरस तेथें पारणें केलें ॥ १० ॥ क्रमुनी अकराही पालक मुहुर्त ॥ स्थापुनी निर्वाळिला अक्षर अव्यक्त ॥ निरालंब पाळणा लाविला तेथ ॥ अनुभव शृंखळा आणिल्या उचित ॥ ११ ॥ माचवे शोभले पुरुषार्थ चारी ॥ निष्काम पाठिया बाणल्या त्यावरी ॥ सबाह्य विणियेली विवेकाची दोरी ॥ सामाजि पहुडला सुखनिद्रेवरी ॥ १२ ॥ सानु सानु परिये देतू उन्नत उन्मनी ॥ चिराई तूं बा कुंज निरंजनीं ॥ माझिये दृष्टी तुज लागे बा झणीं ॥ स्वयें परतली इडपीड घेउनी ॥ १३ ॥ निज निज सांडूनी अवस्था त्रया ॥ लोण करुनी नेली साक्षी आणि तुर्या ॥ आपणिया आपण होउनी तळिवरिया ॥ सहजी सहजपणें

असणें सहजया ॥ १४ ॥ मौना मौन पडले शब्द शिराणी ॥ सहज स्थिती तेथें धरियेली कानीं ॥ पितामहाचा पिता सुभानु वंशवर्णनी ॥ निज सुख घेतलें एकाजनार्दनीं ॥ १५ ॥

॥ २१४५ ॥ जाणत्या जाणता तयासी तूं जाण ॥ सद्गुरूसी खुण पुसोनियां ॥ १ ॥ देव त्या देखे तयासी तूं देखे ॥ गुरुकृपें ओळखें स्वानुभवें ॥ २ ॥ जें सकळांचें सकळ निर्मूळाचें मूळ ॥ अढळा अढळ परात्पर ॥ ३ ॥ कायावाचामनें शरण एकनाथीं ॥ अलभ्य लाभ प्राप्ती पुरुषोत्तमीं ॥ ४ ॥

॥ २१४६ ॥ मै दधी बेचन जाते मथुरा ॥ तु क्यंव ठारा नदंका छोरा ॥ १ ॥ मत खैचो मोरे लाल चुनरीया ॥ सास बुरी मेरी घर देवगीगारीं ॥ २ ॥ अहंकारका मोरा गरवा फोरा ॥ व्हामे का गोरस सबही गीरा ॥ ॥ ३ ॥ द्वैतनकी मोरी अंगीया जो फारी ॥ क्या कहुं वांहकी गत है न्यारी ॥ ४ ॥ एकाजनार्दन ज्यासो भेटा ॥ लागत पगसे कबु नहीं छुटा ॥ ५ ॥

॥ २१४७ ॥ गोधनें चारावया जातां सारंगपाणी ॥ मार्गीं भेटली राधिका गौळणी ॥ कृष्ण दान मागे नीरी आसडोनी ॥ तंव ती देखिली यशोदा जननी ॥ १ ॥ यशोदा ह्मणे लटिका हृषीकेशी ॥ पर नारीसी कैसा रे झोंबसी ॥ येरु रुदत सांगतो मातेपाशीं ॥ माझा चेंडु लपविला नीरीपाशीं ॥ २ ॥ राधिका ह्मणे वो यशोदे परीयेसी ॥ चेंडु नाहीं वो नाहीं मजपाशीं ॥ हा लटिका लबाड हृषीकेशी ॥ नीरी आसडितां चेंडु पडे धरणीसी ॥ ३ ॥ यशोदा ह्मणे चाळका तुह्मी नारी ॥ मार्गीं लक्षितां क्षणीं मुरारी ॥ एकाजनार्दनीं विनवी श्रीहरी ॥ नाम घेतां पातकें जाती दुरी ॥ ४ ॥

॥ २१४८ ॥ कृष्ण आला परिसुनि मथुरें नारी ॥ चपळा धांवती अति सुंदरी ॥ येकीं सा भोजन कवळ करी ॥ एकी त्या आलीया मार्जन शिरीं ॥ १ ॥ अरे कृष्णा अरे कान्हा मनमोहना ॥ गोपिका भाळल्या तुझिया गुणा ॥ जयजय मानस मनमोहना ॥ जीवीं जीवें गुंतल्या नंद नंदना ॥ धृ० ॥ २ ॥ कृष्ण दृष्टी पहावया प्राण पिसा ॥ येकी सा आलीया विगुंत वासा ॥ अंतर्दृष्टी पहावया जगन्निवासा ॥ देहगेह नाठवे कृष्ण मानसां ॥ ३ ॥ कृष्ण दृष्टीं पहावया वेगु कामिनी ॥ अस्ताव्यस्त इंद्रियां वाणलीं लेणीं ॥ एकी सा आलीया

कर्म सांडोनी ॥ तनु मन वेधिलें सारंगपाणी ॥ ४ ॥ एकी त्या तानवडें लेईल्या पायीं ॥ पायींचे पोल्हारे कानीं वो बाई ॥ वांक्या वाळे बांधले कंठाच्या ठायीं ॥ लाहेलाहे नेपुरें खोंविती डोईं ॥ ५ ॥ येकी त्या काजळ सुदल्या मुखीं ॥ जावड कुंकुम लाविती नाकीं ॥ तांबूल विडीया खोंविती मस्तकीं ॥ कृष्णा दृष्टीं इंद्रिया नाहीं वोळखी ॥ ६ ॥ येकी त्या आलीया चोखण शिरीं ॥ नागवें शरीर नेणे सुंदरी ॥ मोतीयाचे हार नेसल्या नारी ॥ पाटाउ विसरल्या घरच्या घरीं ॥ ७ ॥ एकी त्या अर्धांगीं लेइल्या चोळी ॥ गुढगीया बांधली मोतींया जाळी ॥ नाकींचें मुक्ताफळ खोविती भाळीं ॥ कृष्णदृष्टीं इंद्रिया कोण सांभाळी ॥ ८ ॥ येकी त्या कडीये घेतिल्या झारी ॥ बाळकें विसरल्या घरच्या घरीं ॥ दृश्यादृश्य दृष्टीं पहातां न दिसे नारी ॥ पुत्रस्नेह नाठवे देखोनी हरी ॥ ९ ॥ ऐशा रंगीं रंगल्या आल्हाद भारी ॥ आपपर नाठवे देखोनी हरी ॥ एकाजनार्दनीं वेधल्या नारी ॥ पुनरपी संसारा नुरेची उरी ॥ १० ॥

॥ २१४९ ॥ गोकुळीं गोमाई गवळणी ॥ तिच्या सुना चवघी जणी ॥ यमुने गेल्या एके दिनीं ॥ त्यांणीं कृष्ण पाहिला ॥ १ ॥ कृष्ण पाहतां मधुसूदन ॥ मोहिलें चवघींचें मन ॥ कृष्ण कृष्ण लागलें ध्यान ॥ देहभान विसरल्या ॥ धृ० ॥ २ ॥ सर्वे एक होती शेजारीण ॥ आली सदनासी धांवून ॥ गोमाईसी वर्तमान ॥ अवघें विदीत केलें ॥ ३ ॥ राखीन लपवीन आपुल्या सुना ॥ सुनेचें नख दृष्टी पडूं देईना ॥ जर कां येसील माझे सदना ॥ नासिका चुना तीन बोटें ॥ ४ ॥ कृष्ण काय ह्मणे तिसी ॥ येणें जाणें नाहीं आह्मांसी ॥ जें कां वदलीस रसनेसी ॥ तिचि प्राप्ति तुजलागीं ॥ ५ ॥ देव ब्राह्मणीचा वेष ॥ धरितां जाला जगन्निवास ॥ हा रस ऐकतां सायास ॥ मूढ जन उद्धरती ॥ ६ ॥ पांढऱ्या पातळाची कांसोटी ॥ जीर्ण चीट वेष्टिलें कंठीं ॥ हातीं घेउनी धाकुटी ॥ काठी धरुनी चालिली ॥ ७ ॥ वाऱ्यासारखी चांचरी जाये ॥ तोल सांभाळुनी उभी राहे ॥ अवसान धरुनीया पाहे ॥ गोमाईनें देखिली ॥ ८ ॥ गोमाई ह्मणे अहो ब्राह्मणी ॥ कोठें जातेस आलीस कोठोनी ॥ आशापाश नाहीं कोण्ही ॥ माझी मीच एकली ॥ ९ ॥ करून आले वाराणशीसी ॥ पुढें जाणें रामेश्वरासी ॥ आणिक जाणें बहु तीर्थांसी ॥ ऐसी गोमाई बोलली ॥ १० ॥ येवढ्या नगरा मध्यें कोणी ॥ दयाळू नाहीं तुजवांचुनी ॥ जागा देई वृंदावनीं ॥

रातचे रात करमीन ॥ ११ ॥ अस्ता गेला वासरमणी ॥ सुखें राहे वृंदावनीं ॥ आज्ञा केली इंद्रालागुनी ॥ सत्वर मेघा पाठवी॥ १२॥ वीज लवली मेघमंडळीं ॥ ढग निघाला तेच काळीं ॥ मेघानें मांडली फळी ॥ जन लोक पहातसे ॥ १३ ॥ मेघानें सोडिल्या धारा ॥ थंडगार सुटला वारा ॥ शामाई कांपतसे थरथरा ॥ गोमाईनें देखिली ॥ १४ ॥ गोमाई ह्मणे अहो साजणी ॥ आंत येई वो ब्राह्मणी ॥ मरुनी जाशील वृंदावनीं ॥ प्रायश्चित्त मजवरी येईल ॥ १५ ॥ मरूनी जाईन वृंदावनीं ॥ परी मी येईना कोणाचे सदनीं॥ देव राखील मज लागुनी ॥ ऐसी शामाई बोलिली ॥ १६ ॥ इतुका मेघ वर्षला थोर ॥ भिजलें नाहीं तुझें वस्त्र ॥ शामाई ह्मणे आह्मावर ॥ ईश्वराची बहु कृपा ॥ १७ ॥ तुह्मी शुद्ध गे ब्राह्मणी ॥ देव तुह्मीं केला ऋणी ॥ आह्मी नर देहासी येउनी ॥ प्रपंचसदनीं बुडालों ॥ १८ ॥ द्वारावाटें बोलावून ॥ नेत्रीं पाहे अवलोकून ॥ चक्रपाणी ओळखून ॥ चरणीं ठाव मज देई ॥ १९ ॥ आतां उठवेना करूं काई ॥ हातीं धरुनी उठवी गोमाई ॥ कवाड उघडोनी लवलाहीं ॥ बळें सदनीं लोटली ॥ २० ॥ बळें सदनीं लोटिलें मला ॥ मजवर बलात्कार केला ॥ मी सांगेन नंदजीला ॥ ह्मणोनी गलबला करीतसे ॥ २१ ॥ सदनीं जातां तत्क्षणीं ॥ चवघी उद्धरल्या कामिनी ॥ द्वारापाशीं येउनी ॥ हांका मारी गोमाई ॥ २२ ॥ गोमाई येउनी लागे चरणा ॥ पुनीत केल्या आमुच्या सुना ॥ नासिका लावियेला चुना ॥ पाहून पळे गोविंद ॥ २३ ॥ गोमाई उद्धरली कथा ॥ आपण होउनी श्रोतावक्ता ॥ एकाजनार्दनीं दाता ॥ सत्य वार्ता ही माझी ॥ २४ ॥

॥ २१५० ॥ गौळणी बारा सोळा ॥ होउनी येके ठाईं मेळा ॥ ह्मणती गे कृष्णाला ॥ धरूं आजी ॥ १ ॥ कवाड लावुनी ॥ बैसल्या सकळ जणी ॥ रात्र होतांची मध्यानीं ॥ आला कृष्ण ॥ २ ॥ दहीं दूध तूप लोणीं ॥ यांचीं भाजनें आणुनी ॥ रीतीं केलीं तत्क्षणीं ॥ परी तया न कळे ॥ ३ ॥ थोर लाघव दाविलें ॥ सकळां निद्रेनें व्यापिलें ॥ द्वार तें नाहीं उघडिलें ॥ जैसें तैसेंची ॥ ४ ॥ खाउनी सकळ ॥ मुखा लाविलें कवळ ॥ आपण तात्काळ ॥ पळे बाहेरी ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं ॥ ऐशी करुनी करणी ॥ यशोदेजवळी येउनी ॥ वोसंगा बैसे ॥ ६ ॥

॥ २१५१ ॥ उदय सूर्याचा जाला ॥ मिळाला गौळणींचा मेळा ॥ धांवुनी सकळा ॥ आलीया अंगणीं ॥ १ ॥ बोलती अति सक्रोधें ॥ थोर

पीडिलें बाळकें ॥ चोरी करूनियां देखे ॥ आला पळोनी ॥ २ ॥ आमुचीं फोडिलीं भाजनें ॥ दहीं दूध खादलें येणें ॥ एकाजनार्दनीं तान्हें ॥ यशोदे तुझें ॥ ३ ॥

---

## गौळणींचे अभंग.

॥ २१५२ ॥ अविद्या निशीचा लोटला पहिला पहारु ॥ रजेंसी लोपला तामस अंधकारु ॥ सत्वें शोधित शुद्ध सत्वाचा पहारू ॥ स्वबोध पहातां पातला कृष्ण विरु वो ॥ १ ॥ आला गे आला गे गोपिका ह्मणती कृष्ण ॥ जैसा निर्जीवा मिनला जीवप्राण ॥ जेवीं वृत्ति विकळ हरी साक्षात्कार देखोन ॥ तैशा गोपिका विव्हळ हरि पाहून रे ॥ ध्रु० ॥ कृष्णा चौपाशीं मिनल्या व्रजनारी ॥ कांहो निष्ठुर तूं जालासी हरि ॥ स्नेहो धरितां तयासी होसी दुरी ॥ लोभु सांडिती सापाशीं निरंतरीं वो ॥ २ ॥ थोर शिणलाती तुह्मी मजविण ॥ माझें स्वरूपीं ठेविला जीवप्राण ॥ माझे भेटीसी तंव नाहीं खंडन ॥ सबाह्य अंतरीं माझें अधिष्ठान वो ॥ ३ ॥ वचन ऐकोनि मुरडल्या मनोमुखें ॥ थोर चमकल्या संयोग वियोगाचेनी दुःखें ॥ आह्मा मारिलें शस्त्राविण वचन तिखें ॥ शेखीं हें नातें केलें संगदोषें वो ॥ ॥ ४ ॥ कृष्णीं गोपिका विगुंतल्या एके मनें ॥ माना मुरडती प्रीति प्रेमाचें रुसणें ॥ जेवीं श्रुति परतल्या नेति नेति वचनें ॥ एकाजनार्दनीं धरुनी ठेल्या मौनवा ॥ ५ ॥

॥ २१५३ ॥ कृष्णाला भुलविलें गोपीनें ॥ ध्रु० ॥ यशोदे तुझा कान्हा हा राहिना ॥ मी मारीन क्रोधानें ॥ १ ॥ नंदजी तुमचा कृष्ण लाडका ॥ हाका मारीन मोठ्यानें ॥ २ ॥ वेताटी घेउनी नावेंत बैसला ॥ वांचविलें देवानें ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं पूर्ण कृपेनें ॥ नाहीं ऐकिलें मातेनें ॥ ४ ॥

॥ २१५४ ॥ गौळणी गाऱ्हाणें सांगती यशोदेसी ॥ दहीं दूध खाउनीया पळूनी जातो हृषीकेशी ॥ १ ॥ लाडका हा कान्हा बाई ॥ तुझा तुला गोड वाटे ॥ याच्या खोडी किती सांगूं ॥ महीपत्र सिंधु आटे ॥ २ ॥ मेळवोनी गोपाळ ॥ घरामध्यें शिरे कान्हा ॥ धरूं जातां पळुनी ॥ जातो यादवाचा राणा ॥ ३ ॥ ऐसें मज याणें पिसें लावियलें सांगूं काई ॥ एका जनार्दनीं काया वाचा मनें पायीं ॥ ४ ॥

॥ २१५५ ॥ गोकुळीं चोरी करितो चक्रपाणी ॥ गवळणी येउनी सांगती गाऱ्हाणीं ॥ येणें माझें भक्षिलें दहीं दूध लोणी ॥ पळोनीया येथें आला शारंगपाणी ॥ १ ॥ आवरी आवरी यशोदे आपुला कान्हा ॥ याच्या खोडी किती सांगूं जाणा ॥ याचें लाघव नकळे चतुरानना ॥ यासी पहातां मन नुरे मीपणा वो ॥ २ ॥ एके दिवशीं मी आपुले मंदिरीं ॥ मंथन करितां देखिला पूतनारी ॥ जवळीं येवोनी रवी दंड धरी ॥ ह्मणे मी घुसळितों तूं राहे क्षणभरी वो ॥ ३ ॥ परवां आमुचे घरासी आला ॥ संगें घेउनी गोपाळांचा मेळा ॥ साचल ऐकत घरीं पाहे चाळा ॥ धरूं जातां तो पळोनीया गेला वो ॥ ४ ॥ ऐसें बहु लाघव केलें येणें ॥ किती सांगावें तुज गाऱ्हाणें ॥ एकाजनार्दनीं परब्रह्म तान्हें ॥ यासी ध्यातां खुंटलें येणें जाणें वो ॥ ५ ॥

॥ २१५६ ॥ कृष्णरूपीं भाळल्या गोपिका नारी ॥ नित्य नवा कृष्ण जीवा आवडतो भारी ॥ पवन वेगीं चालिल्या कालिंदी तीरीं ॥ चिदानंद भावें भोगावा श्रीहरि ॥ १ ॥ वाजती गाजती अनुहत टिपरी ॥ बारा सोळा मिळोनी गौळ्याच्या नारी ॥ प्रातःकाळीं जाती यमुना तीरीं॥ कृष्णप्राप्ति लागीं पूजिती गौरी ॥ २ ॥ एकमेकींतें खुणविती दृष्टी ॥ हरि रूपीं आवड जीवा लागली मोठी ॥ समयीं एकांत होईल काय भेटी ॥ मनींचें आर्त सांगूं गुज गोष्टी ॥ ३ ॥ कृष्णरूपीं वेधल्या विसरल्या अन्न पान॥ माया विलास नेघे अंजन चंदन ॥ रात्र आणि दिवस कृष्णाचें ध्यान ॥ एकाजनार्दनीं चरणीं वेधलें मन वो ॥ ४ ॥

॥ २१५७ ॥ आवरी आवरी आपुला हरि॥ दुबळ्याची केली चोरी॥ घरा जावयाची उरी ॥ कृष्णें दिधली नाहीं ॥ १ ॥ गौळणी उतावेळी ॥ आली यशोदे जवळीं ॥ आवरी आपुला वनमाळी ॥ प्रळय आह्मांसी दिधला ॥ २ ॥ कवाड भ्रांतीचें उघडिलें ॥ कुलूप मायेचें मोडिलें ॥ शिंकें अविद्येचें तोडिलें ॥ तुझीया कृष्णें ॥ ३ ॥ होती क्रोधाची अर्गळा ॥ हळुची काढिलीसे बळां ॥ होती अज्ञानाची खिळा ॥ ती ही निर्मूळ केली ॥ ४ ॥ डेरा फोडिला दंभाचा ॥ त्रिगुण तनईस ठांव कैचा ॥ प्रपंच सडा हाताकाचा ॥ केला तुझीया कृष्णें ॥ ५ ॥ अहंकार होता टोंबा ॥ तो उपडिला घुसळ खांबा ॥ तोही टाकिला स्वयंभा ॥ बाई तुझीया कृष्णें ॥ ६ ॥ संचित हें शिळें लोणी ॥ साची केलीसे धूळधाणी ॥

संकल्प विकल्प दुधाणीं ॥ तींही फोडिलीं कृष्णें ॥ ७ ॥ प्रारब्ध हें शिळें दहीं ॥ माझें खादलेंगे बाई ॥ क्रियमाण दूध तें पाहीं ॥ तेंही मुखीं वोतिलें ॥ ८ ॥ द्वेप रांधणें सगळें ॥ स्पर्श करितां हात काळे ॥ होतें कामाचें तें पाळें ॥ तेंही फोडिलें कृष्णें ॥ ९ ॥ सुचित दुश्चित घृत घागरीं ॥ भरल्या होत्या माझे घरीं ॥ त्याही टाकिल्या बाहेरी ॥ तुझीया कृष्णें ॥ १० ॥ पोर अचपळ आमुची ॥ संगती धरली या कृष्णाची ॥ मिळणी मिळालि तयाची ॥ संसाराची शुद्धि नाहीं ॥ ११ ॥ ऐशी वार्ता श्रवणीं पडे ॥ ह्मणोनी धांवोनी आलें पुढें ॥ होतें द्वैताचें लुगडें ॥ तेंही फिटोनी गेलें ॥ १२ ॥ आप आपणा विसरलें ॥ कृष्णस्वरूपीं मिळालें ॥ एकाजनार्दनीं केलें ॥ बाई नवल चोज ॥ १३ ॥

॥ २१९८ ॥ प्रथम मत्स्यावतारीं तुझें अगाध चरित्र ॥ न कळे ब्रह्मादिक वैष्णव गाती पवित्र ॥ १ ॥ उठोनी प्रातःकाळीं गौळणी घुसळण घुसळिती ॥ गाती कृष्णाचे पोवाडे हृदयीं परोपरीं ध्याती ॥ २ ॥ द्वितीय अवतारीं आपण कच्छ रूप जाला ॥ सृष्टि धरुनी पृष्ठीं सांभाळ केला ॥ ३ ॥ तृतीये अवतारीं आपण वराह रूप जाला ॥ धरणी धरुनी दाढे हिरण्याक्ष वधिला ॥ ४ ॥ चतुर्थ अवतारीं आपण नरहरि रूप ॥ रक्षुनी प्रल्हाद वधिला हिरण्यकशिपु ॥ ५ ॥ पांचवे अवतारीं आपण वामन जाला ॥ बळी घालुनी पाताळीं शेखीं द्वारपाळ जाला ॥ ६ ॥ सहावे अवतारीं आपण परशुराम जाला ॥ धरुनी परशु हातीं मेदिनी भार फेडिला ॥ ७ ॥ सातवे अवतारीं आपण दाशरथी राम ॥ वधोनी रावण कुंभकर्ण सुखी देव परम ॥ ८ ॥ आठवे अवतारीं आपण वसुदेवा घरीं ॥ वधोनी कंसा असुर मारिले भारी ॥ ९ ॥ नववे अवतारीं आपण बौद्धरूप जाला ॥ धरुनीया मौन भक्तद्वारीं राहिला ॥ १० ॥ अवतारीं दहावे आपण जालासे वारु ॥ एकाजनार्दनीं त्याचे चरणीं बडिवारु ॥ ११ ॥

॥ २१९९ ॥ मथुरेसी गोरस विकूं जातां नितंबिनी ॥ तयां माजीं देखिली राधिका गौळणी ॥ जवळीं जाउनीया धरिली तिची वेणी ॥ १ ॥ सोडी सोडी कान्हा शारंगपाणी ॥ माझीया संसारा घातिलें पाणी ॥ नांव रूप माझें बुडविलें जनीं ॥ ध्रु० ॥ २ ॥ राधा ह्मणे येथोनीया बहु चाट होसी ॥ घरीं चोरी करुनीया वाटें अडविसी ॥ ओढोनीया नेतें आतां तुज मावे पाशीं ॥ ३ ॥ धरिली पदरीं राधा न सोडीच निरी ॥ दान दे आमुचें

ह्मणे मुरारि ॥ भोंवताली हांसती व्रज सुंदरी ॥ ४ ॥ भक्तीचीया पोटीं राधा समरस जाली ॥ कृष्णरूप पाहुनीया देह भावा विसरली ॥ एकाजनार्दनीं राधा शेजे पहुडली ॥ ५ ॥

॥ २१६० ॥ उठोनी प्रातःकाळीं ह्मणे यशोदा मुरारि ॥ गोपाळ वाट पहाती उभे तुझ्या द्वारीं ॥ शिदोरी घेउनी वेगीं जाय राना ॥ १ ॥ यमुनेचे तीरीं खेळ खेळतो कान्हा ॥ नानापरी क्रीडा करी यादवांचा राणा ॥ ध्रु० ॥ मागें पुढें गोपाळ मध्यें चाले हरि ॥ सांवळा सुकुमार वाजवी मुरली ॥ पुच्छें वर करुनी गाई नाचती नाना ॥ २ ॥ मुरलीचा नाद न समाय त्रिभुवनीं ॥ किती एक नादें भुलल्या गौळणी ॥ देह गेह सांडोनी चालताती वनां ॥ ३ ॥ खग मृग गायीं व्याघ्र नसे दुजा भाव ॥ सकळीं उच्चारण एक कृष्ण नांव ॥ काया वाचा मनें शरण एकाजनार्दना ॥ ४ ॥

॥ २१६१ ॥ नंद नंदन मुरली वाला ॥ याच्या मुरलीचा वेध लागला ॥ १ ॥ प्रपंच धंदा नाठवे कांहीं ॥ मुरलीचा नाद भरला हृदयीं ॥ २ ॥ पती सुताचा विसर पडिला ॥ याच्या मुरलीचा छंद लागला ॥ ३ ॥ स्थावर जंगम विसरुनी गेले ॥ भेद भाव हरपला ॥ ४ ॥ समाधि उन्मनीं तुच्छ वाटती ॥ मुरली नाद ऐकतां मना विश्रांति ॥ ५ ॥ एका जनार्दनीं मुरलीचा नाद ॥ ऐकतां होती या सद्गद ॥ ६ ॥

॥ २१६२ ॥ माधव मुरली मनोहर रे ॥ ध्रु० ॥ श्रीवत्सलांछन हृदयीं विलासन ॥ चारितो गोधन रे ॥ १ ॥ सुरनर किन्नर नारद तुंबर ॥ गाती निरंतर रे ॥ २ ॥ एकाजनार्दनीं प्रभु मन मोहन ॥ भवभय हरणरे ॥ ३ ॥

॥ २१६३ ॥ कैशी जाऊं वृंदावनां ॥ मुरली वाजवितो कान्हा ॥ १ ॥ कासे पितांबर कस्तुरी टिळा ॥ कुंडल शोभे काना ॥ २ ॥ काय करूं मीं कवणाला सांगूं ॥ हरि नामाची सांगड आणा ॥ ३ ॥ नंदाच्या हरीनें कवतुक केलें ॥ अंतरीं जाणें खुणा ॥ ४ ॥ पैलतीरीं हरि वाजवी मुरली ॥ नदी भरली यमुना ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं ह्मणे मना ॥ देव मनोगत न कळे कोणा ॥ ६ ॥

॥ २१६४ ॥ दहीं दुध चोरुनी दे सर्वांला ॥ ऐसें मज सांगताती ॥ १ ॥ आई मज मारूं नको ॥ नाहीं नाहीं म्यां पाहिली माति ॥ २ ॥ तें न ऐ-

किलें ह्मणोनी मजवर ॥ रुसले सांगाती ॥ ३ ॥ बळीरामही जो भेटला ॥ तोही माझा पक्षपाती ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं पूर्ण कृपेनें ॥ आह्मी भजूं दिनरात्रीं ॥ ५ ॥

॥ २१६५ ॥ तुझ्या मुरलीची ध्वनि ॥ अकल्पित पडलीं कानीं ॥ विव्हळ जालें अंतःकरणीं ॥ मी घर धंदा विसरलें ॥ १ ॥ अहारे सांवळीया कशी वाजविली मुरली ॥ ध्रु० ॥ मुरली नोहे केवळ बाण ॥ तिणें हरिला माझा प्राण ॥ संसार केला दाणादाण ॥ येउनी हृदयीं संचरली ॥ २ ॥ तुझ्या मुरलीचा सुर तान ॥ मी विसरलें देहभान ॥ घर सोडोनी धरिलें रान ॥ मी वृंदावनीं गेलें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं ह्मणे गोविंदा ॥ पतित पावन परमानंदा ॥ तुझ्या नामाचा मज हा धंदा ॥ वृत्ति तंव पदीं निवर्तली ॥ ४ ॥

॥ २१६६ ॥ गौळण ह्मणती यशोदेला कोठें गे सांवळा ॥ कां रथ शृंगारिला सांगा गे मजला ॥ आक्रुर उभा असे बाई गे सदनीं ॥ १ ॥ नंदाच्या अंगणीं मिळाल्या गौळणी ॥ बोले नंदाची पट्टराणी सद्गद होउनी ॥ मथुरेसि चक्रपाणी जातो गे साजणी ॥ विव्हळ जालें मन वचन ऐकोनी ॥ २ ॥ अक्रुरा तुज कोणीं धाडिला ॥ कां घात करूं आला वधसी सकळा ॥ अक्रुर नाम तुझें तशीच करणी ॥ ३ ॥ रथीं चढलें वनमाळी आकांत गोकुळीं ॥ भूमी पडिल्या व्रज बाळा कोण त्या सांभाळी ॥ नेत्रींच्या उदकानें भिजली धरणी ॥ ४ ॥ देव बोले अक्रुरासी हांकी बा रथासी ॥ या गोपिंच्या शोकासी न पाहावे मजसी ॥ एकाजनार्दनीं रथ गेला निघोनी ॥ ५ ॥

॥ २१६७ ॥ तुझी संगति नाहीं कामाची ॥ मी सुंदरा कोंवळया मनाची ॥ मज दृष्टी होईल मग तुझी घेईन चर्या ॥ १ ॥ कसें वेड लाविलें कान्हो गोवळीया ॥ धृ० ॥ माझा वंश आहे मोठ्याचा ॥ तूं तंव यातीहीन गौळयाचा ॥ ऐक्य जालीया नांव रूपाचा ॥ ठांवचि पुसलीया ॥ २ ॥ तुझ्या अंगींची घुरट घाणी ॥ तनु काय दिसती वोंगळवाणी ॥ मुरली वाजविसी मंजुळ वाणी ॥ मन मोहन कान्हया ॥ ३ ॥ तुझ्या ठिकाणीं अवगुण मोठा ॥ चोरी करुनी भरिसी पोटा ॥ व्रज नारी सुंदरा चावटा ॥ अडविसी अवगुणीया ॥ ४ ॥ सर्व सुखाची कृष्ण संगति ॥ वेणु नादें गाई गोप वेधती ॥ एकाजनार्दनीं हरि रूपीं रमती ॥ त्या व्रज सुंदरीया ॥ ५ ॥

॥ २१६८ ॥ गौळणी सांगती गाऱ्हाणें बाइ वो साजणी ॥ यशोदे रात्रीं आला चक्रपाणी ॥ खाउनीया दहीं दुध तुप लोणी ॥ फोडिलीं माझीं दुधाणीं ॥ १ ॥ हा कोणा आवरेना ॥ धरूं जातां सांपडेना ॥ यशोदे बाळ तुझा तान्हा ॥ कोठवर सोसूं धिंगाणा ॥ ध्रु० ॥ दुसरी आली धांवुनी ॥ यानें कैशी केली वो करणी ॥ पती असतां शेजेसीं मजला नेलें अंगणीं ॥ घेउनी गोपाळ सांगाती ॥ झोंबतो माझ्या अंगासी ॥ २ ॥ तिसरी आली धांवुनी ॥ यानें विपरीत केली करणी ॥ पतीची दाढी माझी वेणी ॥ दोहींसी गांठ देउनी ॥ गांठ बाई कोणा सुटेना ॥ ३ ॥ मिळोनी अवघ्या गौळणी ॥ येती नंदाच्या अंगणीं ॥ जातों गोकुळ सोडोनी ॥ आमुच्या सुना घेउनी ॥ हें बाई आह्मांसी पाहावेना ॥ ४ ॥ ऐशीं ऐकतां गाऱ्हाणीं ॥ यशोदेनयनीं आलें पाणी ॥ जनाची किती सोसूं जाचणी ॥ कृष्णा खोड दे टाकुनी ॥ एकाजनार्दनीं ॥ चरणीं प्रेम तया आवरेना ॥ ५ ॥

॥ २१६९ ॥ यशोदेसी गौळणी सांगती गाऱ्हाणें ॥ नट नाटक कपटी आवरी आपुलें तान्हें ॥ याच्या खोडी सांगूं किती तुज कारणें ॥ सहस्रमुख लाजिला ॥ तटस्थ ठेला ॥ वेद परतला ॥ नेति नेति शब्दें ॥ १ ॥ वेड लाविलें गोविंदें ॥ परमानंद आनंदकंद ॥ तुझ्या मुकुंदें ॥ ध्रु० ॥ एके दिनीं घरासी आला शारंगपाणी ॥ दहीं दुध खाउनी रितीं केलीं दुधाणीं ॥ अज्ञान मडकें सांडिलें फोडोनी ॥ मी उठोनीया धावरी ॥ धरूं धांवें करीं ॥ पळाला दुरीं ॥ पाहे यशोदे ग ॥ २ ॥ एके दिनीं गेलें यमुना तट जीवना ॥ तंव गोप सांगातीं घेउनी आला कान्हा ॥ आडवोनी धरी पदरा न सोडी जाणा ॥ एकांतीं घातली मिठी ॥ सुखाची कोटी पाहिला दृष्टीं ॥ सुख आनंदें ॥ ३॥ याच्या खोडी सांगूं किती तुज साजणी ॥ याचें सुंदर मुख पहातां न पुरे धणी ॥ याचे गुण लिहितां न पुरे मेदिनी ॥ एकाजनार्दनीं पाहिला ॥ ध्यानीं बैसला ॥ हृदईं रेखिला ॥ प्रति अभेदें ॥ ४ ॥

॥ २१७० ॥ गोकुळीं लाघव दावितो चक्रपाणी ॥ भोंवता वेष्टित बैसल्या अवघ्या गौळणी ॥ मध्यें सुकुमार सांवळा शारंगपाणी ॥ चिमणा पितांबर पिवळा ॥ गळां वैजयंती माळा ॥ घवघवीत घनसांवळा ॥ पाहे नंदराणी ॥ १ ॥ नाचरे तूं कृष्णा ॥ मज पाहूं दे नयनीं ॥ ध्रु० ॥ नाचतो सांवळा सुंदर निमासुर वदन ॥ वाळे घोळ घागरीयाचा झणत्कार पूर्ण ॥ आकर्णनयन सुहास्यवदन पाहुनी भुले मदन ॥ हातींच्या मुद्रिका झळक-

ती ॥ क्षुद्र किंकिणी सुस्वर गाती ॥ वांकी नेपुरें ढाळ देती ॥ पहाती गौळणी ॥ २ ॥ सप्तही पाताळें नाचती हरिचीया छंदें ॥ आकाश धरणी स्वर्गीं देव नाचती आनंदें ॥ गण गंधर्व देव सर्व अक्षर हरि पदें ॥ वैकुंठ कैलास नाचती ॥ चंद्र सूर्य रसनायक दीप्ति ऋषि मंडळ धाक तोडिती ॥ अद्भुत हरि करणी ॥ ३ ॥ नाचती हरिछंदें चतुर्दश लोकपाळ ॥ शेष वासुकी नाचती सर्वही फणीपाळ ॥ परिवारेंसी नाचती पृथ्वीचे भूपाळ ॥ मेरुपर्वत भोगी नायक ॥ वनस्पति नाचती कौतुक ॥ वेद शास्त्र पुराण पावक ॥ नाचत शूळपाणी ॥ ४ ॥ नाचती गोपाळ गोपिका सुंदर मंदिरें ॥ उखळें जातीं मुसळें पाळीं आणि देव्हारे ॥ धातुमूर्ती नाचूं लागल्या एकसरें ॥ गौळणी अवघ्या विस्मित ॥ देहभाव हरपला समस्त ॥ यशोदेसी प्रेम लोटत ॥ धरिला धांवुनी ॥ ५ ॥ शिणलासी नाचतां आतां पुरे करी हरि ॥ विश्वरूप पहातां गोपि विस्मित अंतरीं ॥ यशोदेनें कृष्ण घेतला कडीयेवरी ॥ एकाजनार्दनीं भक्ति भावें ॥ अनन्य भक्ता दावी लाघव ॥ निज भक्ताचें काज सर्व ॥ करितां शिण न मानी ॥ ६ ॥

॥ २१७० ॥ सुंदर बाळका ह्मणती गोपिका यशोदे रोहिणी सन्मुखा ॥ आदि नाटका नाच व्यापका मिळाल्या आणिका ॥ सर्व चाळका सकळ पाळका सुखदाता सकळिका ॥ धिमी धिमी धिमी धिमी बाळा नाचे वहिला ह्मणती मायादिका ॥ १ ॥ कृष्णा नाचरे व्यापका ॥ ह्मणताती गोपिका ॥ धृ० ॥ दण् दण् दण् दण् मेदिनी वाजे वामचरण घातें ॥ थोंगीत थोंगीत थताक दावित अनुकार संगीत तालछंदें ॥ मन वेधे टाळी वाजे शब्दाचेनी आनंदें ॥ धिमी धिमी धिमी धीतांग थोंगीत सांवळा नाचे ॥ ॥ २ ॥ गुप्त प्रगटीत धाक दावित स्थूळ सूक्ष्म आनंदें ॥ धिगीतान धिगीतान वाजती गजरें शास्त्राचेनी विवादें ॥ घटितन घटितन शब्द बोलती तार्किक केले भेदें ॥ गरगरगरगर भवरी देत अवतार संबंधें ॥ ३ ॥ रुणु झुणु रुणु झुणु वाजती वांकी श्रुति नेति उच्चरी ॥ आत्मा हा व्यापक नाटक त्रैलोक्य पडिलें फेरी ॥ यशोदा रोहिणी वृद्ध गौळणी नाचत देह विसरी ॥ पक्षी चारा विसरले पाणी मुख पसरी अंबरीं ॥ ४ ॥ देव विमानीं पहाती गगनीं ब्रह्मा नाचे येउनी ॥ इंद्र ऐरावत नाचत जवळीं बृहस्पति तो मुनी ॥ गगन गंधर्व देव सर्व तेहतीस कोटी मिळोनी ॥ कुबेर पोटा नाचतो मोठा कृष्ण छंद घेऊनी ॥ ५ ॥ शेष वासुकी नाचत वेगीं चवदा भुवनें माथां ॥

वऱ्हाड गाढा पृथ्वी दाढा नाचवी विसरुनी चिंता ॥ तृण तरुवर पर्वत कुंजर वेधिलें अनंता ॥ सगुण निर्गुण जंगम स्थावर व्यापिलें अच्युता॥ ६ ॥ घुळ घुळ घुळ घुळ वाजती कंकण बाहु भूषित भूषण ॥ तो परात्पर त्रैलोक्य सुंदर जगाचें जीवन ॥ खुण खुण खुण खुण बोलती संत घांगुरसे हरी चरण ॥ दृष्टी देखिला सबाह्य निवाला शरण एकाजनार्दन ॥ ७ ॥

॥ २१७१ ॥ दुडीवरी दुडी गौळण साती जे निघाली ॥ गौळण गोरस ह्मणों विसरली ॥ १ ॥ गोविंदु घ्या कोणी दामोदरु घ्यागे ॥ तंव तंव हांसती मथुरेच्या गे ॥ २ ॥ दुडीया माझारीं कान्होबा जाला भारी ॥ उचंबळे गोरस सांडे बाहेरी ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं सबरस गौळणी ॥ ब्रह्मानंद न समाये मनीं ॥ ४ ॥

॥ २१७२ ॥ फणस जंबीर कर्दळी दाटा ॥ हातीं घेउनी नारंगी फाटा ॥ ॥ १ ॥ वारीयानें कुंडल हाले ॥ डोळे मोडित राधा चाले ॥ २ ॥ राधा पाहून भुलले हरि ॥ बैल दुभवी नंदा घरीं ॥ ३ ॥ हरि पाहुनी भुलली चित्तां ॥ राधा घुसळी डेरा रीता ॥ ४ ॥ कैशी आवडी मिनली दोघां ॥ एकरूप होय अंगा ॥ ५ ॥ मन मिनलेंसे मना ॥ एका भुलला जनार्दना ॥ ६ ॥

॥ २१७३ ॥ भिंगाचें भिंगुलें खाद्यावर अंगुलें ॥ नाचत तान्हुलें यशोदेचें ॥ १ ॥ येती गौळणी करती बुझावणी ॥ लागती चरणीं कान्होबाच्या ॥ २ ॥ गोविंद बाळीया वाजविती टाळिया ॥ आमुचा कान्हया देवराव ॥ ३ ॥ कडदोरा बिंदलीं वाघ नखें साजिरीं ॥ नाचत श्रीहरी यशोदेचा ॥ ४ ॥ पायीं घागरीया वांक्या साजरीया ॥ कानींच्या बाळया ढाळ देती ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं एकत्व शरण ॥ जीवें निंबलोण उतरती ॥ ६ ॥

॥ २१७४ ॥ ज्ञाति कुळ सांडिलें आह्मीं वेगीं ॥ माया माहेर त्यजिलें तुजलागीं ॥ अंग अर्पिलें अंगींचीये अंगीं ॥ शेखीं रतलासी दासी कुब्जे लागीं ॥ १ ॥ सरसर निर्गुणा तूं अगुणाचा हरि ॥ जवळीं असतां जालासी कैसा दूरी ॥ चित्त उतटे चिंतितां निरंतरीं ॥ मन मावळलें जालें दश्याकारी ॥ २ ॥ ध्रु० ॥ तुजलागीं सांडिला देह संग ॥ तुजविण विटला विषय भोग ॥ जळो तुझा उपदेश सांगसी योग ॥ आह्मां देई सप्रेम तुझा संयोग ॥ ॥ ३ ॥ एक ह्मणती गे सांडा शब्द अटी ॥ शब्दा नातुडे कोरडया ज्ञान गोष्टी ॥ आजिचा सुदीन श्रीकृष्णीं जाली भेटी ॥ हरुषें निर्भर स्वानंदें

भरली सृष्टी ॥ ४ ॥ एक ह्मणती गे सांडा शब्द ज्ञान ॥ ध्येय जोडलें काईसें आतां ध्यान ॥ भज्य भजक एक जाले भजन ॥ गेली त्रिपुटी मिथ्या मोक्ष बंधन ॥ ५ ॥ एक ह्मणती गे चला मांडु रासु ॥ क्षणे उगवेल मायामय दिवसु ॥ दैवें जोडला प्रेम राजहंसु ॥ शोधा निज तत्व सांडोनी आळसु ॥ ॥ ६ ॥ गोपी मंडळी मिळाली कृष्णापाशीं ॥ जैशा रश्मि मीनल्या रवि बिंबासी ॥ कृष्ण भोगितां नाठवे दिवस निशी ॥ एकाजनार्दनीं ऐक्यता प्रेमेंसी ॥ ७ ॥

॥ २१७५ ॥ आल्या पांच गौळणी पांच रंगाचे शृंगार करुनी ॥ ध्रु० ॥ पहिली गौळण रंग सफेत जशी चंद्राची जोत ॥ गगनीं चांदणीं लखलखित ॥ ऐका तिची मात ॥ मंथन करीत होती दारांत ॥ धरून कृष्णाचा हात ॥ ऐशा नटून आल्या पांच गौळणी ॥ १ ॥ दुसरी गौळण भाळी भोळी ॥ रंग हळदीहून पिंवळी ॥ पिंवळा पीतांबर नेसून आली ॥ आंगीं बुट्टेदार चोळी ॥ एक लहान तनु उमर कवळी ॥ जशी चांफ्याची कळी ॥ ऐशा आल्या पांच गौळणी ॥ २ ॥ तिसरी गौळण रंग काळा ॥ नेसून चंद्रकळा ॥ काळें काजळ लेऊन डोळां ॥ रंग तिचा सांवळा ॥ काळी गरसोळी लेऊन गळां ॥ आली राजस बाळा ॥ ऐशा नटु० ॥ ३ ॥ चवथी गौळण रंग लाल ॥ लाल लालही लाल ॥ कपाळीं कुंकुम चिरी लाल ॥ भांगीं भरून गुलाल ॥ मुखीं विडा रंग लाल ॥ जसें डाळिंबीचें फूल ॥ ऐशाआ० ॥ ४ ॥ पांचवी गौळण हिरवा रंग ॥ अवघ्या झाल्या दंग ॥ हिरव्या कांकणाचा पहा रंग ॥ जसें आरशींत जडलें भिंग ॥ फुगडी खेळतां कृष्णासंग ॥ एकनाथ अभंग ॥ ऐशा आल्या सा नटोनी ॥ आल्या पांच गवळणी० ॥ ५ ॥

॥ २१७६ ॥ यशोदेसी गौळणी सांगती गाऱ्हाणें ॥ नट नाटक कपटी सांभाळीं आपुलें तान्हें ॥ किती याच्या खोडी सांगूं तुजकारणें ॥ सहस्र मुख भागला ॥ निवांत ठेला ॥ नेति नेति शब्द ॥ १ ॥ वेधू लाविला गोविंदें परमा नंदें ॥ आनंद कंदें वेधू लाविला ॥ ध्रु० ॥ एके दिवशीं मी गेलें यमुनातीरीं जीवना ॥ सवें गोप संगातें घेऊनी आला कान्हा ॥ करीं धरी पदरा न सोडि तो जाणा ॥ एकांत घाली मिठी न सुटे गांठी ॥ पाहिली दृष्टी नित्य आनंदु ॥ वेधु लाविला गोविंदु ॥ २ ॥ एके दिवशीं घरासी आले शारंगपाणी ॥ दहीं दूध भक्षिलें रितीं केलीं दुधाणीं ॥ अज्ञान मडकें टाकिलें फोडोनी ॥ पाहिला हरी पाहिला हरी घराभीतरीं ॥ पळाला

दूरी बाई यशोदेचा ॥ वेधू लाविला ॥ ३ ॥ किती खोडी याच्या सांगूं मी साजणी ॥ गुण लिहितां नपुरे मेदिनी ॥ रूप सुंदर पाहातां न पुरे नयनीं ॥ एकाजनार्दनीं वेधिल्या नारी गवळण तान्ही ॥ शारंगपाणी ॥ वेधू लाविला० ॥ ४ ॥

॥ २१७७ ॥ कशी जाऊं मी वृंदावना ॥ मुरली वाजवितो कान्हा ॥ धृ० ॥ पहिले तिरीं हरी वाजवी मुरली ॥ नदी भरली यमुना ॥ १ ॥ कासे पीतांबर केशरी टीळक ॥ कुंडल शोभे काना ॥ क० ॥ २ ॥ काय करूं बाई कोणाला सांगूं ॥ नामाची सांगड आणा ॥ क० ॥ ३ ॥ नंदाच्या हरीनें कौतुक केलें ॥ जाणें अंतरींच्या खुणा ॥ क० ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं मनीं ह्मणा ॥ देवमाहात्म्य कळेना कोणा ॥ कशी जाऊं मी वृंदावना ॥ ५ ॥

॥ २१७८ ॥ वारियानें कुंडल हाले ॥ डोळे मोडीत राधा चाले ॥ धृ० ॥ राधेला पाहून भुलले हरी ॥ बैल दुहितो आपुले घरीं ॥ १ ॥ फणस जंबीर कर्दळी दाटा ॥ हातीं घेउनी नारंगी फाटा ॥ २ ॥ हरीला पाहुनी भुलली चित्ता ॥ राधा घुसळी खडबडी डेरा रिता ॥ ३ ॥ मन मिळालेंसे मना ॥ एका भुलला जनार्दना ॥ वारियानें कुं० ॥ ४ ॥

॥ २१७९ ॥ अनंत लीला रूप सांवळा तो बाळ ब्रह्मचारी ॥ पातकें लोळती चरणांवरी ॥ ध्रु० ॥ ह्मणे यशोदा बा गोविंदा नको जाऊं परद्वाराला ॥ कीं गवळण मुखरण जपली तुला ॥ होती एक गवळण घरची धनीन गेली होती बाहेरी ॥ जाऊन चढला माळ्यावरी ॥ वर पाहतो शिंकीं लोंबती हात चालविले चारी ॥ सर्व हातांनीं दहीं खाई हरी ॥ खाऊन पिऊन दिले ढेंकर शिंकीं आणिलीं बाहेरी ॥ टाकिलीं शेजारणीचे द्वारीं ॥ १ ॥ होती एक गवळण घरची धनीन ॥ पाही आल्या मंदिरीं ॥ दह्या दुधाच्या फोडिल्या हारी ॥ गेली पुसाया तियेपाशीं शेजारणीचे द्वारीं ॥ माझीं शिंकीं कांगे तुझे द्वारीं ॥ त्या रांडेनें केलें भांडण आली माझे आंगावरी ॥ दांत खाऊन गाल कुसकरी ॥ २ ॥ स्त्रीपुरुष निजले होते समया लावून चारी ॥ कृष्ण देव गेले पलंगा सामोरी ॥ दाढी वेणीची गांठ मारिली त्या दोघां समोरी ॥ आपण मग पळून आला बाहेरी ॥ डचकून उठली वेणी गुंतली झाली गौळण घाबरी ॥ आतां माझी गांठ सोडा लौकरी ॥ त्यां दोघांला गांठ सुटेना बोलविला शेजारी

त्यानें गडे ओढित आणिली द्वारीं ॥ अवघे नगरचे लोक मिळाले तमाशा पाहतीं सारीं ॥ गवळण गरगर गिरक्या मारी ॥ गवळी ह्मणे अगे गवळणी दाढी तुटली सारी ॥ कीं गवळी वरवर दाढी धरी ॥ ३ ॥ घागर घेऊन गेली पाण्याला यमुनेचे तीरीं ॥ कीं घागर फोडी डोईवरी ॥ गवळण ह्मणे यशोदा माते पाहि तुझा श्रीहरी ॥ माझे सुने मारी मंदिरीं ॥ यशोदा माता झाली जागृत लावून शुभ्र दोरी ॥ पाळणा हालविते लौकरी ॥ रांगत रांगत गेला कंसारी देव होते देव्हारीं ॥ त्याणें गडे देव गिळले सारे ॥ एकाजनार्दनीं आठवावा श्रीहरी ॥ ४ ॥

॥ २१८० ॥ गवळण ह्मणती यशोदेला ॥ कोठें गे सांवळा ॥ कां रथ शृंगारिला सांग हो मजला ॥ अक्रूर उभा असे बाई गे साजणी ॥ ॥ १ ॥ ह्या नंदाच्या आंगणीं ॥ मिळाल्या गौळणी ॥ धृ० ॥ बोले नंदाची पट्टराणी सद्गदीत होऊनी ॥ मथुरेसी चक्रपाणी जातो गे साजणी ॥ निवळ झालें मन हें वचन ऐकोनी ॥ २ ॥ अक्रूरा रे चांडाळा तुज कोणी धाडिला ॥ कां घात करूं आलासि वधिसी सर्वांला ॥ अक्रूरा तुझी नामा ऐसी न करणी ॥ ३ ॥ रथीं चढला वनमाळी आकांत गोकुळीं ॥ भूमिं पडल्या व्रजबाळी कोण त्या सांभाळी ॥ नयनींच्या उदकानें भिजली धरणी ॥ ४ ॥ देव बोले अक्रुरासी वेगें हांकी रथासीं ॥ ह्या गोपिकांच्या शोकासी न पाहवे मजसीं ॥ एकाजनार्दनीं ह्मणे रथ गेला निघोनी ॥ ह्या नंदाच्या आंगणीं ॥ ५ ॥

॥ २१८१ ॥ राधे राधे राधे राधे मुकुंदा मुरारी । वाजवितो वेणु कान्हा सांवळा श्रीहरी ॥ धृ० ॥ खांदा कांबळिया हातीं काठी । धेनु-चिया पाठीं लागे सांवळा जगजेठी ॥ १ ॥ मोरमुगुट पीतांबर कासे । श्रवण कुंडलमंजुळ असे ॥ २ ॥ एक एक गौळण एक एक गोपाळ । मधीं कृष्ण घेउनियां नाचे रासमंडळ ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं रासमंडळ रचिलें । जिकडे पाहे तिकडे अवघें ब्रह्मचि कोंदलें ॥ ४ ॥

॥ २१८२ ॥ पाण्या हो जातां तुह्मी घरीं मी एकली । कान्हा येतो घाई घाई कान्हा येतो घाई घाई ॥ १ ॥ शिव्या कांहो देतां सासुबाई । करूं मी कायी शिव्या कांहो देतां ॥ धृ० ॥ दावी पतिवेष कुसरी विशेष । करी धरी साई काई काई ॥ २ ॥ घागर घेऊनि पाणियासी जातां । वाटे

कृष्ण मजला आडवितो बाई ॥ ३ ॥ एकाजनार्दनी तुमची आण । माझा अपराध नाहीं नाहीं ॥ ४ ॥

॥ २१८३ ॥ गवळण रागें उतावळी ॥ धांवत आली यशोदेजवळी ॥ आंवरी आंवरी आपला हरी ॥ आळ आणिला आह्मां वरी ॥१॥ आंवरी आंवरी आपुला हरी ॥ येणें केली दुर्बळ भारी ॥ घरा जावयाची उरी ॥ येणें ठेविली नाहीं ॥ २ ॥ नेत्र चुकोनी अवधारा ॥ हा घर निघालासे सैरा ॥ आह्मी बापुड्या संसारा ॥ येथें नाडिलों गेलों ॥ ३ ॥ कुलुप मायेचें काढिलें ॥ कवाड भ्रांतीचें उघडिलें ॥ शिंकें अविद्येचें तोडिलें ॥ बाई तुझीया कृष्णानें ॥ ४ ॥ माये अविद्येची अर्गळ ॥ हळूच काढिली समूळ ॥ होती अज्ञानाची खिळ ॥ तिही निर्मूळ केली ॥ ५ ॥ कल्पनेची उतरंडी ॥ त्याची केली तडाफोडी ॥ माया विकाराची दुरडी ॥ तेंही वरवाळ केली ॥ ६ ॥ माया वळकर प्रपंच दोरी ॥ मन रवि फिरवी भारी ॥ आशा तृष्णाजी माझारी ॥ तेही वरवाळ केली ॥ ७ ॥ डेरा फोडिला दंभाचा ॥ त्रिगुणासी ठाव केचा ॥ सडा प्रपंच ताकाचा ॥ वृत्ति सहित घातला ॥ ८ ॥ अहंकाराचा होता हुबा ॥ तो उपडिला घुसळखांबा ॥ नेउनी टाकिलासे हांबा ॥ होता कीं नव्हतासा ॥ ९ ॥ प्रारब्ध शिळें माझें दहीं ॥ तेंही खादलेंसे बाई ॥ क्रियमाण दुध तेंही ॥ मुखीं ओतिलें कृष्णें ॥१०॥ संचित शिळें माझें लोणी ॥ त्याची केली असें धुणी ॥ संकल्प विकल्प दुधाणी ॥ तींही फोडिली कृष्णें ॥ ११ ॥ मोहोमदाचा हाळा ॥ मत्सरतेलें होता भरला ॥ तोही फोडूनी टाकिला ॥ बाई तुझीया कृष्णें ॥ १२ ॥ द्वैतरांजण सकळें ॥ सरसे नवते कळीकाळें ॥ होतें अज्ञानाचें पाळें ॥ तेंही फोडिलें कृष्णें ॥ १३ ॥ अपत्य पोरेंही आमुची ॥ संगत धरिली या कृष्णाची ॥ याच्या संगें या घराची ॥ प्रेमशांती जाहली ॥ १४ ॥ कृष्ण पाहावया आवडी ॥ धरूं गेली तयापुढी ॥ होती द्वैताची लुगडी ॥ तेही फिटून गेली ॥ १५ ॥ पाहुं गेलें आपेआप ॥ मीच झालें श्रीहरीरूप ॥ मग संसार सकळीक ॥ माझा मजची अंतरला ॥ १६ ॥ ऐसी केली येणें परि ॥ वदतां खुंटली वैखरी ॥ एकाजनार्दनी हरी ॥ नित्यगुणी गोंविला ॥१७॥

॥ २१८४ ॥ गोपी चालियो तो मथुराके हाट ॥ गो गोरसासी रिघ न दाट ॥ अगळ कान्हा रुधिले वाट ॥ दान मागतो भारी आलगटरे ॥ १ ॥ धृ० ॥ काहे वासना वास फावे ॥ हरी अह्में परघर नारिरे ॥

तोकुं लाज नाहीं निर्लज मुरारिरे ॥ विजु नही देखें दृष्टी किहा थान्हीरे ॥ मान्हो अविवेक माठी दुरळ भारी ॥ तान्हा दान देऊं वळते विकरा करीं ॥ तुदाणिन्ह वेहाट बाजारी ॥ मान्हा जीव लेणें ॥ मा ज्यांसे तुं हरिरे ॥ २ ॥ देहगेह गमन रुंध्यो बांट ॥ गो गोरस ढोल्या वरा वाट ॥ अमतो अबला गौळणी निष्कपट ॥ तूं तो निजतेजें वरा वरिष्ठ ॥ ३ ॥ नहिरे आउ आजिथी तान्हा हाट ॥ आकऱ्या कर भागे कैसो अलगट ॥ तान्हे गुणा देखीय प्रगट ॥ नाहीं पाप पुण्य माने मोठो धिठोरे ॥ ४ ॥ फिरा दिकर वातो नहि दिसे जन ॥ जन जोवतें तो दिसे निरंजन ॥ दान मागतों तो दिया समाधान ॥ साच मी लियो तो एकाजनार्दन ॥ ५ ॥

॥ २१८५ ॥ कृष्णा मागोंमाग माया आली जाणा ॥ पुसे यशोदा बा काय जालें कान्हा ॥ येरु स्फुंदस्फुंदो करी रुदना ॥ भाव चेंडु चोरिला गोपांगनावो ॥ १ ॥ गोपी ह्मणे हा कर्मनिष्ठ फुडा ॥ क्रिया प्रमाणेंसि बोलु याचा फुडा ॥ हा झोंबतुसे आवडीच्या चाडा ॥ कृष्णु ह्मणे माग ईसी झाडा वो ॥ २ ॥ वासना वास पाडिते प्रमदा ॥ भाव चेंडुवातें देखे यशोदा॥ हारिकें कृष्णु हांसतसें खदखदां ॥ खेदु रोमाचें येरुं कांपें गदगदांवो ॥ ३ ॥ नष्ट गौळिणी तुह्मी विजन व्यभीचारी ॥ कृष्णु माझा बाळ ब्रह्मचारी ॥ आपण्या विसरोनी ॥ झोंबतसा हरी ॥ परापरतल्याति निर्लज्जा निर्धारी ॥४॥ दैवें आली यमा चुकली कुपरी ॥ कृष्ण दुषण लावितात भारीगे ॥ कृष्णें लाघव कैसें केलें पाहे ॥ गोपी उपरमोनी पाठीमोरी ठाये ॥ ५ ॥ माया वंदितसे कान्हयाचें पायें ॥ एकाजनार्दनीं दासु नाहीं मायें ॥ ६ ॥

॥ २१८६ ॥ काळी घोंगडी हातीं काठीं ॥ लागला धेनुचे पाठी ॥ काळी० ॥ धृ० ॥ अरे हरी व्रज वांकुडा कीं तुजसाठीं ॥ बैसला कीं यमुनेचे तटीं ॥ काळी० ॥ १ ॥ राधा गोरटी हातीं वाटी ॥ लागली कृष्णाचे पाठीं ॥ काळी० ॥ २ ॥ एकाजनार्दनीं झाली दाटी ॥ घातली पायावर मिठी ॥ काळी० ॥ ३ ॥

---

## पद.

॥ २१८७ ॥ पानी बिचमें जोगन खडी ॥ बाता बोलती दिवानी ॥ आजि करोजी मेहरबानी ॥ देव मेरे कपडे देव० ॥ हे नंदाजीके लाल ॥

मोरे यशोदेके बाल ॥ देव मेरे० ॥ धृ० ॥ मेरी सास बडी जल्लाल ॥ उपडेगी सिरके बाल ॥ मुजे मारे गालके गाल ॥ देव० ॥ १ ॥ मेरी ननंद है जी बिजली ॥ छप्पन देश म्याने चुगली ॥ कनया छोड मेरी चोली ॥ देव० ॥ २ ॥ मेरी जाऊ सफेत रंगी ॥ उसका खासा है जो भंगी ॥ दो घडी मैं पानीमें नंगी ॥ देव मेरे० ॥ ३ ॥ मेरा सासरा है एक जात ॥ नहीं मानोंगी तेरी बात ॥ कनया छोड मेरा हात ॥ देव० ॥ ४ ॥ मेरा देवरा है शिलेदार ॥ माहुरगड किल्लेदार ॥ मेरा जान लेईगा ठार ॥ देव० ॥ ५ ॥ मेरा मरद है मरदाना ॥ उसका सिपाईका है बाना ॥ गोलीमों रंगा दिवाना ॥ देव० ॥ ६ ॥ मेरा उपरा लिया मना ॥ उपर केशरीका बाना ॥ सांवली सुरत मेघःश्यामा ॥ देव० ॥ ७ ॥ गौलन कहे कन्हया लाल ॥ मतकर कपडेके तूं हाल ॥ एकाजनार्दनीं है ख्याल ॥ देव० ॥ ८ ॥

॥ २१८८ ॥ गोकुळीं गोपिका विरहें बोलती आह्मी आंगें सर्वांग सुंदरावो ॥ मथुरे जाउनि आमुचि वासना पाहे कृष्ण भुलविला नगर नागरा वो ॥ १ ॥ ते कुब्जा तिठाईं वांकुडी कृष्ण भुलविले आवडी ॥ आगीं आघासुरापासुनि वांचविले कृष्ण गोवळासि श्नेहाळु ॥ २ ॥ देवकी आटली डोहळा कि यशोदा बाळलिला त्यासि आहाच आवडो ॥ आपुले परावे साच न ह्मणे हा गोवळु द्रुपदिसी पुरवी लुगडीं ॥ ३ ॥ यादवाचा कळवळा शत्रुघाता भेणें गुप्त राति मथुरा द्वारके घेउनि आला ॥ ब्रह्मशापें सेखी कुळचि जाळुनि अर्जुना सारथि जाला ॥ ४ ॥ वडिलपणें स्वामि उग्रसेन करुनि त्यासि सोडविले बांदवडी ॥ जीवें भावें जाला धर्माचा सेवकु आवडि उचिष्टें काढी ॥ ५ ॥ अर्जुनभक्त त्याचा मी सारथी ऐसा जगीं डांगोरा पिटिला ॥ पार्थाच्या कळवळा भीडला रणांगणि भिष्माचा पण सिद्धि नेला ॥ ६ ॥ देवकीचे गतगर्भ आणिले ते नवचविष अर्धघडिहो ॥ बभ्रुवाहनाचा युद्धिं अर्जुनाची उटवियेलिं गज घोडीं ॥ ७ ॥ गोकुळीं व्यभिचारिकी सोळा सहस्र घरिं ॥ मथुरेच्या भोगी परनारी ॥ ८ ॥ कर्कटिचें कुळ देंठीं लागलें श्रीकृष्ण बाळब्रह्मचारि ॥ आपुले परावे साच न ह्मणे हा निर्गुण कृष्ण भावेसमभाविका ॥ एकाजनार्दनीं एकपणें जगीं समान पाहे लोकां ॥ ९ ॥


महाराष्ट्र साहित्य परिषद. पुणे.

---

# खेळ.

॥ २१८९ ॥ वस्तादकी पंचात पाई ॥ दुनिया मुक्तरे भाई ॥ तबलक हुषार हुई ॥ कमखलाऊवे अखल ॥ मार चळाई ॥ १ ॥ फिरे तबकल दिवाना ॥ जहां देखे तहां रवना ॥ जहां देखे तहां सुभाना ॥ उहां नहीं बडा नन्हा ॥ खुदानें अल्लानें साईनें ॥ किया वा पन्हा ॥ ६ ॥ फाडियेमनु कपडे ॥ बोढियेहिल चबडे ॥ तजीये अशख पोंगडे ॥ खाये मिठेभिस्ती टुकडे ॥ २ ॥ एका जनार्दन जोसाही ॥ सराबाद भर पिलाई ॥ सबदु-न्या येकई लाई ॥ अल्लाबाज साहीबाज ॥ नहिवा कोई ॥ ३ ॥

॥ २१९० ॥ दुनिया कैसी पैशा जैसी ॥ बहुत संगोयो रंगी ॥ इसे छोडे उसे लोडे ॥ तोंडे अल्लाकी बदंगी ॥ मनभावे तिहांजावे ॥ पीछे लागे वेगधगी ॥ १ ॥ फकर आले फकर आले ॥ फकर आले मर्दुमान ॥ दुनिया भावे दोजक जावे ॥ बातमा नही गुमान ॥ फरक हाले भिस्ती मेवे ॥ फकिरा हाजरत पावे ॥ फकर भावेर बना ॥ हाजरत वादा छोडो धंदा ॥ फकिरा नजीक खुदा ॥ घरबार धंदा ॥ सबही गंदा जबां खोल कहोखुदा॥ एका जनार्दनका बंदा ॥ दुनिया नही पाईदा ॥ २ ॥

॥ २१९१ ॥ जनीं वनीं एक जनार्दन दाता ॥ त्यासी नमन करूं आतां रे ॥ मन उन्मन जयासी पाहतां ॥ त्याच्या चरणावरि माथारे ॥ १ ॥ टाळ मृदंग मेळवूनि मेळा ॥ गुरुवचनीं खेळ खेळारे ॥ २ ॥ भक्ति वैराग्य कुंडलें श्रवणीं ॥ ज्ञानांकुश मुगुट मणीरे ॥ सप्रेम उटी आंगीं चंदनाची ॥ सत्वाची कास निर्धारी रे ॥ ३ ॥ अष्टभावें खेळिये खेळताती ठाईं ॥ घाग-ऱ्या वाजती पायीं रे ॥ दया क्षमा दोन्ही चवऱ्या ढाळती ॥ शांति सत्रावी छाई रे ॥ ४ ॥ नाद निमाला शब्द खुंटला ॥ त्रिभुवनीं आनंद झालारे ॥ एकाजनार्दनीं शरण आला ॥ एकपण विसरलारे ॥ ५ ॥

॥ २१९२ ॥ पिंगाबाई पिंगा गे ॥ अवघा धांगडधिंगा गे ॥ १ ॥ सांडोनीयां संताची गोडिगे ॥ कासया पिंगा जोडीगे ॥ २ ॥ नको घालूं पिंगागे ॥ तुह्मीं रामरंगीं रंगारे ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं पिंगागे ॥ काया वाचा गुरुचरणीं रंगागे ॥ ४ ॥

॥ २१९३ ॥ विटी दांडु खेळसी वांया ॥ चौऱ्यायशीं वेरझारा होती पाया ॥ १ ॥ नको विटी दांडु सांडी हा छंदु ॥ आवडीं वदे राम गोविंदु

॥ २ ॥ किती वेरझारी करिसी पावाया ॥ शरण रिघे एकाजनार्दन पाया ॥ ३ ॥

॥ २१९४ ॥ अंगींचीया बळें खेळसी हुतुतु ॥ वृद्धपण आलिया तोंडावरी थुथुथु ॥ १ ॥ कासया खेळसी वांया भजे गुरुराया ॥ चुकविल डाया हुतुतु ॥ २ ॥ एकाजनार्दनीं हुतुतु नको भाई ॥ मन जिंकूनीया लागे कान्होबाचे पायीं ॥ ३ ॥

॥ २१९५ ॥ त्रिगुणात्मक मांडिला डाव ॥ सहा चार अठरा गडी वांटिले ऐका सांचें नांव ॥ १ ॥ कान्होबा खेळूं लगोरीचा खेळ ॥ तुह्मी आह्मी मिळूं एका ठायीं सहज होईल मेळ ॥ २ ॥ चौदा बारा सोळा पंचविसांचा करुनी मेळ ॥ एक एकापुढें पळती अवघा हाल कल्लोळ ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं ह्मणे कान्होबा खेळ तूं आंवरी ॥ खेळ खेळतां शिणलों आह्मी पुरे बा वेरझारी ॥ ४ ॥

॥ २१९६ ॥ मांडिला हमामा कान्होबा ॥ हमामा खेळूं भाई कान्होबा तुझे पायीं ॥ १ ॥ हमामा रे हमामा ॥ कान्होबा खेळूं हमामा ॥ धृ० ॥ २ ॥ हमामा खेळा वेगीं ॥ सांडुनी द्वैताच्या संगीं ॥ ३ ॥ हमामा खेळूं नेटें ॥ कान्होबाचें बळ मोठें ॥४॥ हमामा खेळों सोई ॥ एकाजनार्दनाचे पायीं ॥५॥

॥ २१९७ ॥ राम रावण हुंबली खेळती ॥ खेळीया हनुमान तीरे ॥ १ ॥ खेळ मांडिला खेळ मांडिला ॥ कान्होबाचे बळें खेळ मांडिला ॥ २ ॥ ॥ धृ० ॥ २ ॥ रामकृष्ण हुंबली खेळती ॥ खेळीया अर्जुन झालारे ॥ ३ ॥ अठरा अक्षौहिणी कौरव मारिले ॥ शिशुपाळ सह वक्रदंत वधिलेरे ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं खेळतां हुंबली आनंद बहु जाला ॥ खेळखेळतां अवघे निमाले मी तूं पणा ठाव नाहीं उरला ॥ ५ ॥

॥ २१९८ ॥ खेळ खेळूं सुर कवडी ॥ कान्होबा उगाची पाहे गोडी ॥ १ ॥ एकी बेकी पोरा खेळ भला ॥ बेकी सांडूनी एकी एकी बेकी धरितां शेवटीं होईल फुकी ॥ २ ॥ एक दोन तीन चार पांच सहा याच्या पडो नको डाई ॥ सहस्र लक्ष कोट गेले उगाची शीण पाही ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं ह्मणे कान्होबा वाउगा नको गोऊं ॥ जेणें करुनी संसार खेळ तुटोन लक्ष तुझे पायीं लावूं ॥ ४ ॥

## विटीदांडु.

॥ २१९९ ॥ आबक दुबक तिबक पोरा त्रिगुण खेळ मांडूं ॥ खेळे विटु दांडू खेळे विटि दांडू ॥ १ ॥ सत्व विटी घेउनी हातीं धीर धरी दांडू ॥ भावबळें टोला मारी नको भेऊं गांडु ॥ २ ॥ ब्रीद गेलें खोल लक्ष कां रे लावितोसी ॥ मूर्खापाशीं युक्ती नाहीं उडोनी गेली उशी ॥ ३ ॥ वकट लेंड मूंड नाल पुढें ह्मणे लेका ॥ भक्ति बळें खेळ खेळे जनार्दन एका ॥ ४ ॥

---

## एकीबेकी.

॥ २२०० ॥ एकी बेकी पोरा सांग झडकरी ॥ एकी ह्मणता जिंकिशी बेकी ह्मणतां हरी ॥ धृ० ॥ नव्हे काई बाई तेथें झालें एक शून्य॥ त्यासीं फांटा फुटतां मग लेखा आलें जाण ॥ येकीबेकी० ॥ १ ॥ एक दोन तीन पांच विस्तारीला जाण ॥ दहा पासुनी सहस्र वरी एक झाला पूर्ण ॥ एकीबेकी० ॥ २ ॥ एक ब्रह्म पूर्ण तेथें फाट झाली माया ॥ एकाजनार्दनीं नित्य लक्ष लावी पायां ॥ ३ ॥

---

## चेंडुफळी.

॥ २२०१ ॥ झेलारे बाईयानो झेलारे ॥ गुरुवचनें तुह्मीं झेलारे ॥धृ०॥ सहज चेंडु समान फळी ॥ खेळूं जाणे तो खेळिया बळी ॥ १ ॥ झेलारे० ॥ अभिमाना चढे तो खालता पडे ॥ हातचा चेंडु जाय मग चडफडे ॥२॥झे०॥ एकाजनार्दनीं एकचि बोली ॥ गुरुपुत्र होय तोचि झेली ॥ ३ ॥ झे० ॥

---

## फुगडी.

॥ २२०२ ॥ फुगडी घाली मीपणाची ॥ वेणी गुंफि त्रिगुणांची ॥ ॥ १ ॥ चाड नाहीं कोणाची ॥ आण सद्गुरुचरणाची ॥ २ ॥ फुगडी घाली आजगे ॥ नाचूं सहजा सहज गे एकाजनार्दनीं निजगे ॥ वंदूं संत चरणरजगे ॥ ४ ॥

---

## हुतुतु.

॥ २२०३ ॥ हुतुतु हुतुतु गड्या ॥ खेळ हुतुतु हुतुतु गड्या ॥ धृ० ॥ राम कृष्ण गोविंद हरि नारायण ॥ नित्य त्याचें भजन करारे ॥ १ ॥

हिरण्य कश्यप प्रल्हाद पुत्र खेळतां ॥ आला हात घाई रे ॥ स्तंभ फोडुनी बाहेर निघाला ॥ पिसा दीधली द्वाही रे ॥ २ ॥ राम रावण सन्मुख भिडतां ॥ बरवा खेळ मांडिलारे ॥ कुंभकर्ण इंद्रजित आखिया ॥ त्यांनीं दिधली द्वाहीरे ॥ ३ ॥ कौरव पांडव समरांगणीं ॥ खेळिया चक्रपाणीरे ॥ काम क्रोध जीवें मारा त्याणी दिधली द्वाहीरे ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं हुतुतु खेळतां ॥ समरंगणीं पाहींरे ॥ एकसें हुतुतु त्याणी बांधिलें ॥ पूर्वीं दिधली द्वाहीरे ॥ हुतुतु० ॥ ५ ॥

---

## भोंवरा.

॥ २२०४ ॥ खेळे भोंवरा ग बाई भोंवरा ॥ राधीकेचा नवरा ॥धृ०॥ माझ्या भोंवऱ्याची अरी ॥ सप्त पाताळें त्यावरि ॥ फिरे गरगरा ॥ राधिकेचा नवरा ॥ खेळे भों० ॥ १ ॥ भोंवरा बनला निर्गुणीं ॥ सावर चंद्र सूर्य दोनी ॥ जाळी शंकर गवरा ॥ राधिकेचा नवरा ॥ खेळे० ॥ २ ॥ एकाजनार्दनीं खेळिया ॥ भोंवरा खेळून पाहे चेलिया ॥ नाद देतो हरिहरा ॥ राधिकेचा नवरा ॥ खेळे भोंवरा० ॥ ३ ॥

---

## हमामा.

॥ २२०५ ॥ हमामा पोरा हमामा ॥ घुंबरी वाजे घमामा ॥ धृ० ॥ हमाम्याचे नादानीं ॥ घुंबरी वाजली रानीं ॥ १ ॥ हमाम्याची शीतळ शाई ॥ पोरा मेली तुझी आई ॥ २ ॥ काम क्रोध पोरा नाशी ॥ अहंकार तोंडवासी ॥ ३ ॥ एकाजनार्दनाशीं ॥ पोरा वहिल्या गांवा जाशी ॥ ४ ॥

---

## पिंगा.

॥ २२०६ ॥ निराकाराचा आकार झाला ॥ सांतच माझा पिंगा जन्मला ॥ निराकारासी घेऊन आला ॥ माझा पिंगा घालितो धिंगा ॥धृ०॥ पिंग्यापासून शंकर झाला ॥ ढवळ्या नंदीवर बसून आला ॥ माझ्या पिंग्यानें धक्का दिला ॥ माझा० ॥ १ ॥ पिंग्यापासून मच्छ झाला ॥ संकासुराचा प्राण घेतला ॥ चारी वेद घेउनी आला ॥ माझा० ॥ २ ॥ पिंग्यापासून कूर्म झाला ॥ पर्वत पाठीवर घेतला ॥ चौदारत्नें घेऊन आला ॥ माझा० ॥ ३ ॥ पिंग्यापासून वराह झाला हिरण्याक्षाचा प्राण घेतला ॥

पृथ्वी वरती घेऊन आला ॥ माझा० ॥ ४ ॥ पिंग्यापासून नारसिंह झाला॥ हिरण्यकश्यप दैत्य वधिला ॥ प्ऱ्हाद भक्त रक्षिला ॥ माझा० ॥ ५ ॥ पिंग्यापासून वामन झाला ॥ बलीदान मागूं आला ॥ बळी पाताळीं घातला ॥ माझा० ॥ ६ ॥ पिंग्यापासून भार्गव झाले ॥ मातेचें शिर छेदियेलें ॥ अवघे राजे नाहींसे केले ॥ मा० ॥ ७ ॥ पिंग्यापासून राम झाले ॥ पितृवचन सांभाळिलें ॥ रावण कुंभकर्ण मारिले ॥ मा० ॥ ८ ॥ पिंग्यापासून कृष्ण झाला ॥ कंसाचा प्राण घेतला ॥ गोकुळ सोडून मथुरेसी आला ॥ मा० ॥ ९ ॥ पिंग्यापासून बौद्ध झाला ॥ दिले जगन्नाथ नांव त्याला ॥ भक्तानीं दहीं भात चारला ॥ मा० ॥ १० ॥ ऐसा निराकाराचा पिंगा त्यांत माझा श्रीरंगा ॥ एकाजनार्दनीं पांडुरंगा ॥ माझा पिंगा घालितो धिंगा ॥ मा० ॥ ११ ॥

---

## खेळीया.

॥ २२०७ ॥ चिंचेच्या पानावर देऊळ रचिलें ॥ आधीं कळस मग पायारे ॥ देवा पुजूं गेलों तंव देऊळ उडालें ॥ परियेसी सद्गुरु रायारे ॥ १ ॥ खेळिया सद्गुरु रायारे ॥ धृ० ॥ दो तोंडी हरिणी पाणीयासी आली ॥ ती मुखेंविण पाणी प्यालीरे ॥ मृगजळडोहीं पाषाणाची सांगड ॥ वांझेचा पुत्र पोंहोलारे ॥ २ ॥ अंधळ्यानें देखिलें बहिऱ्यानें ऐकिलें ॥ पांगळ्यानें पाठलाग केलारे ॥ एकाजनार्दनीं येकपणें विनवी ॥ अखंड रामनाम स्मरारे ॥ ३ ॥

॥ २२०८ ॥ अनुहत टिपरी घाई खेळूं जाणें तो भाईरे ॥ खोटा खेळ खेळोनी काय स्वतः अनुभव घेईरे ॥ १ ॥ मत्स्येंद्रकुळीं एक गोरख जाला तो बहुत खेळ खेळलारे ॥ पवन साधुनी अष्टांगयोगें तेणेंचि बळें मातलारे ॥ खेचरीं भूचरी चाचरी धरुनी अगोचरीं मिळालारे ॥ गोल्हाट योग साधुनी तेणें काळ तो जिंकूनी गेलारे ॥ २ ॥ निवृत्तीचा पोर एक ज्ञाना जाण तो खेळियांमाजीं शहाणारे ॥ कवित्व केलें प्रकाश मातला प्रवृति गाळिली घाणारे ॥ असोनी मेला नसोनी गेला काळ केला आंकणारे ॥ भले भले गडी मिळविले तेणें काय सांगूं कवणा रे ॥ ३ ॥ जनार्दनाचीं सात पांच पोरें त्यांमाजीं लाडका येकारे ॥ एकही साधन न करी परि तो बळेंचि मातला फुकारे ॥ आपपर देहीं कांहींच नेणें रायासी

ह्मणे तो रंकारे ॥ भले भले गडी मेळवोनी तेणें खेळ दाविला असकारे ॥ ४ ॥ तिघां जणांचें खेळणें जालें चवथें एक उठविलेंरे ॥ अनन्यभावें सद्गुरु चरणीं गुरुसी शरण गेलेंरे ॥ भवासी न भ्यालें कळलें ह्मणोनी तिघांचि समान जालेंरे ॥ आपण जैसें पूर्ण तैसें एकाजनार्दनीं केलेंरे ॥ ५ ॥

॥ २२०९ ॥ पटपट सांवली खेळूंयारे ॥ सावध गड्यानों कां वेळु लावारे ॥ भीडु तया सोडोनी सहा गडी मारूंयारे ॥ १ ॥ निजानंदी खेळोनी मित्रतनया हारूंयारे ॥ २ ॥ अवघे गडी एकवटोनी जाउं देया रे ॥ बहु कष्टें फेरे फिरतां मन तेथें लावारे ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं खेळतां ब्रह्मरूप काया रे ॥ जेथें पाहे तेथें दिसे जनार्दन छायारे ॥ ४ ॥

॥ २२१० ॥ यारे नाचूं प्रेमानंदें ॥ राम नामाचेनी छंदें ॥ १ ॥ ह्मणा जयराम श्रीराम ॥ भवसिंधुतारक नाम ॥ २ ॥ ऐसी नामाची आवडी ॥ काळ गेला देशोधडीं ॥ ३ ॥ आवडीनें नाम घोका ॥ ह्मणे जनार्दन एका ॥ ४ ॥

॥ २२११॥ देव छिनालका छिनालका ॥ खेळ खेळाडी बांका ॥ धृ० ॥ छंद बडा सुरवरका बेटा ॥ जाके झरूके में बैठा ॥ १ ॥ बडा धरमका दाता ॥ नाहिं जात पात कुच नाता ॥ २ ॥ एकनाथका वाली ॥ उसेको न देवे गाली ॥ ३ ॥ देव छिनालका छिनालका ॥ खेळ० ॥

॥ २२१२ ॥ भोळा दादला बाई म्यां केला ॥ संसार सारा नागविला ॥ १ ॥ सौरी होऊनी गेलें सुख नाहीं झालें ॥ पुनरपि संसारीं मी हो आलें ॥ २ ॥ चार पांच साहा अठरांसी रतलें ॥ त्यांचे संगें मन चावट हो झालें ॥ ३ ॥ एकाएकीं संत संग झाला ॥ एकाजनार्दनीं संसार तुटला ॥ ४ ॥

॥ २२१३ ॥ होउनी स्वैरी लुगडें फेडी भलसासवें हांसें ॥ हंसत हंसत घर घेतलें कोण मज पुसे ॥ १ ॥ लागला मज चाळा कांहो घालतां डोळा ॥ फजितीचा वांटा आला नित्य नवा गोळा ॥ २ ॥ मागें पुढें न पाहे कांहीं ह्मणेल कोणी ॥ एकाजनार्दनीं शरण काया वाचा मनीं ॥ ३ ॥

॥ २२१४ ॥ न करी वो चाळा स्वैरीचिया बोला ॥ वेधला जीव निसंगपणें खाती नवा गोळा ॥ १ ॥ ऐसें नव्हे भलें कोणा मानवलें ॥ जग जगीं हांसती मोडिताती डोळे ॥ २ ॥ फुकटचि संग स्वैरीयेचा वरा ॥

दिवाणदारीं फजिती थोरी वहातसें बारा ॥ ३ ॥ पडलें मोकळें दुंगण आतां कैसा संग ॥ मागें पुढें फजिती झाली अठरा झाले दंग ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं स्वैरी झाली संत पाय धरा ॥ नाहीं तरी उभ्या बाजारीं फजितीचा थारा ॥ ५ ॥

॥ २२१५ ॥ तंतुपट जेवीं एकत्व दिसती ॥ तैसी भगवद्भक्ति सर्वां भूतीं ॥ ॥ १ ॥ सर्वत्रीं व्यापक विठ्ठल विसांवा ॥ ह्मणोनी त्याच्या गांवां मन धावे ॥ २ ॥ एकाजनार्दनीं व्यापक विठ्ठल ॥ तेथें नाहीं बोल आन दुजा ॥ ३ ॥

॥ २२१६ ॥ मी सुखाची कन्यका झालें वाढविली घरीं ॥ वाढविली घरीं ॥ देखतां पाहतां उचलून उचलून नेली चोरी ॥ १ ॥ सौरी झालें बाई आतां करूं तरी काई ॥ करूं तरी काई ॥ धृ० ॥ निगुणाचा पुत्र झाला जावा नणदा घरीं ॥ जावा नणदा घरीं ॥ पाहतां देखतां उचलून नेली चोरी ॥ उचलून नेली चोरी ॥ २ ॥ बारा सोळा मुलें झालीं आले सुना नातू ॥ कंबरे वरी हातू ॥ ३ ॥ कैंची बहीण कैंची माया अंतकाळीं देखा ॥ अंतकाळीं देखा ॥ निदानींचे वेळीं तुज देव मारी हाका ॥ ४ ॥ लेंकुरवाळी बाईल ह्मणे तोंड याचें झांका ॥ तोंड याचें झांका ॥ एकाजनार्दनीं दास भवीं भुलूं नका ॥ ५ ॥

॥ २२१७ ॥ सौरी झालें बाई आतां करूं गत काई ॥ करूं गत काई ॥ बसवी झालें बाई आतां भिन्न भेद नाहीं ॥ भिन्न भेद नाहीं ॥ १ ॥ कासरा लावून सासरा मारला दादला टाकून आलें ॥ आत्म लिंगपाहूनियां मगन् मस्त झालें ॥ मगन् मस्त झालें ॥२॥ बांधून बुचडा माथा उघडा विभूतीचा पट्टा ॥ आला गेला ह्मटला नाहीं धरल्या चारी वाटा ॥ ३ ॥ उभी शिंदळ घाली गोंधळ हाचि लाभ मोठा ॥ हाचि लाभ मोठा ॥ मागें पुढें पाहूं नका वेगें काम लाटा ॥ वेगें काम लाटा ॥ ४ ॥ लहान थोर ह्मटला नाहीं जाहलें मी वेडी ॥ एकाजनार्दनीं बसवी झालें परद्वारी ॥ पर० ॥ ५ ॥

॥ २२१८ ॥ सहा दादुले केले परि म्यां ऐसा नाहीं देखिला दादुला ॥ काया वाचा रमलें सासीं परि ऐसा नाहीं देखिला दादुला ॥ सौरी झालें सौरी सखे बाई झालें त्याची नवरी ॥ धृ० ॥ १ ॥ नग्न होउनी भोगिला पुरुष म्यां ऐसा नाहीं देखिला दादुला ॥ देतो गोड गोड खाया परि म्यां

ऐसा नाहीं देखिला दादुला ॥ सौरी झालें सौरी सखे गे बाई झालें त्याची नवरी ॥ २ ॥ केला संसार गोड परि म्यां ऐसा नाहीं देखिला दादुला ॥ यांचे मनाची पुरविली खोड परि म्यां ऐसा नाहीं देखिला दादुला ॥ सौरी झालें सौरी सखे बाई झालें त्याची नवरी ॥ ३ ॥ ऐसीं सौरी झालें परि म्यां ऐसा नाहीं देखिला दादुला ॥ एकाजनार्दनीं नमिलें पायीं ऐसा नाहीं देखिला दादुला ॥ सौरी झालें सौरी सखे बाई झालें त्याची नवरी ॥ ४ ॥

॥ २२१९ ॥ जातीभ्रष्ट जाली सौरी हिंडे दारोदारीं ॥ सांवलें उच-कुनी जगासी दावी डौर वाजवी करीं ॥ १ ॥ चाल सख्या रामा ॥ सुख होईल आह्मा ॥ ध्रु० ॥ २ ॥ हागरा दादल्या पादरी बायकु जांवाई देखोनी हांसे ॥ घरची सून नागवी नाचे पोटीं पोरपिसें ॥ ३ ॥ शेंबडा व्याही चिपडी विहीण दोघां प्रीत मोठी ॥ विहीण लाजून हळुच पाहे व्याही नाक चाटी ॥ ४ ॥ बाईल बाहीरख्याली दादला तिचा भोळा ॥ परपुरुष पाहुनीयां खुणाविती डोळा ॥ ५ ॥ ऐसी सौरी गमजा करी डौर छंदें नाचे ॥ एकाजनार्दन पायीं अखंड नाम वाचें ॥ ६ ॥

॥ २२२० ॥ जीव नाहि शीव नाहीं माया कवणाची ॥ काय हे भासली तव आहे मीथ्याची ॥ १ ॥ धृ० ॥ ज्ञान नाहीं ध्यान नाहीं कैची ते भक्ति ॥ देह ना विदेह तेथें कवणासी मुक्ति ॥ २ ॥ नांव नाहीं रूप नाहीं कैचा पैं भावो ॥ देव नाहीं देउळ तेथें कैंचा हा देवो ॥ ३ ॥ वर्ण नाहीं वाणी नाहीं सम शब्द कैंचा ॥ एकाजनार्दनपायीं अभिन्न साचा ॥ ४ ॥

॥ २२२१ ॥ फर्मास्तव जालें सौरी डौर उजव्या करीं ॥ मुळ पिठी गोधळ घाली उदो उदो बोले गाणीं ॥ १ ॥ चाल माझ्या रामा एकले करमेना ॥ चाल माझा हरी तूं आह्मां सोयरी ॥ फुली गाय हुली संगें वांसरूं जालें कोसें ॥ प्रकृति पुरुषा भांडण जालें खाटलें जातें रीसें ॥ २ ॥ आनकाईवर टणकाई त्यावर बैसला खुबा ॥ मीसकीन मामी फुसकन पादली मागे जांवई उभा ॥ ३ ॥ तेल फणी काजळ कुंकूं केला टाकम टिका ॥ पाटाची बाईल प्रकृति भली ॥ तिनें घरचा केला निका ॥ जाती कुळ कर्म गोत नुरे आह्मां कांहीं ॥ तनुमन शरण एकाजनार्दना पायीं ॥४॥

॥ २२२२ ॥ निरंजनीं जातां निर्गुण पंथ आमचा ॥ बोलणें हीं

वाचा एकची वा ॥ १ ॥ एक वाचेविण दुजें नसे काई ॥ वाचा तीही होई ईश्वर कृपें ॥ २ ॥ रोहिणी नक्षत्र बुधवार असें ॥ तुज तीजपासी कारण काय ॥ ३ ॥ वस्तुचें कारण लागेल हो जेव्हां ॥ मग दावीन तुह्मां सकळांसी ॥ ४ ॥ एकनाथ ह्मणे सांगितली खुणा ॥ याच्यापुढें ज्ञान सांगा तुह्मी ॥ ५ ॥

॥ २२२३ ॥ निर्गुणाचे भेटी गेले कोण कोण ॥ कैसी त्यांची खुण सांगा मज ॥ १ ॥ एकनाथ ह्मणे सांगा ह्याची खुण ॥ पाहुं तुझें ज्ञान अंतरीचें ॥ २ ॥

॥ २२२४ ॥ ॐ माझा गुरू मी त्याचा चेला ॥ सोहं मंत्र दिला मज लागीं ॥ १ ॥ सोहं मंत्र माझे कानीं हो फुंकीला ॥ मुखीं सांपडला मजलागीं ॥ २ ॥ सोहं मंत्र जपतां देह मोक्ष जाण ॥ चित्तवृति जाण पालटली ॥ ३ ॥ ह्मणे एकनाथ सांगितलें तुज ॥ ॐ गुरू तोच जाण बापा ॥ ४ ॥

॥ २२२५ ॥ भावाची मी सौरी झालें आलें संतापासीं ॥ डौर ध्वनी ध्यान उन्मनी लिंग देहातें ग्रासी ॥ १ ॥ चाल रघुराया कळली तुझी माया ॥ ध्रु० ॥ पांच माचवे तीन गातें त्यांवर निजलें होतें ॥ रमा-रमणी मिळोन गेलें खाटलें पडलें रितें ॥ २ ॥ माया सांडुनी लागलें पाठीं ध्यान तुझें मोठें ॥ भावें बेडी घालीन पायीं आतां जाशील कोठें ॥ ३ ॥ ज्ञान काजळ घालुनी डोळां नाम तुझें कंठीं ॥ निजानंदीं ऐक्य झालें शब्दां पडली तुटी ॥ ४ ॥ देवों नेणें भक्ति नेणें नाचूं नेणें कांहीं ॥ एकाजनार्दनीं ह्मणे जाणें येणें नाहीं ॥ ५ ॥

---

# शिवस्मरण.

॥ २२२६ ॥ हरि हरा भेद ॥ नका करूं अनुवाद ॥ धरितां रे भेद ॥ अधम तो जाणिजे ॥ १ ॥ वैष्णवनिका संभ्रम ॥ महादेव सर्वोत्तम ॥ द्वैताचा श्रम ॥ धरूं नको ॥ २ ॥ आदिनाथ परं परा ॥ चालत आली तो पसारा ॥ जनार्दनें निर्धारा ॥ उघडें केलें ॥ ॥ ३ ॥ गुह्य जाप्य शिवाचें ॥ उघड केलें पा साचें ॥ एकाजनार्दनीं वाचें ॥ राम नाम ॥ ४ ॥

॥ २२२७ ॥ ॐनमो जी शिवा ॥ नमो तुज महादेवा ॥ करूनी उपकारजीवां ॥ अवतार धरिला ॥ १ ॥ सोपा मंत्र राम नाम ॥ तेणें जालें सर्व काम ॥ साधनांचा श्रम ॥ गोवा उगविला ॥ २ ॥ बैसोनीयां दृढासनीं ॥ नाम जपे निशीदिनीं ॥ तयासी अवनी ॥ सोपी दिसे ॥ ३ ॥ बरवें साधन उत्तम ॥ अवघा निवारिला श्रम ॥ गातां तुमचें नाम ॥ वंद्य तिहीं लोकीं ॥ ४ ॥ जड जीव उद्धरिले ॥ कली माजीं सोपें केलें ॥ राम नाम जप वहिलें ॥ थोर साधन हें ॥ ५ ॥ अवतार धरुनी साचा ॥ उद्धार केला जड जीवांचा ॥ एकाजनार्दनीं नामाचा ॥ वाढविला महिमा ॥ ६ ॥

॥ २२२८ ॥ शिव नाम उच्चारी ॥ आळस न करी क्षणभरी ॥ महापापा होय बोहरी ॥ नाम घेतां ॥ १ ॥ शिव शिव नाम ॥ जपे कांरे उत्तम ॥ तेणें नासे भव भ्रम ॥ निःसंदेह ॥ २ ॥ दोअक्षरीं काम ॥ वाचें घेई तूं नाम ॥ आणिक तें वर्म ॥ सोपें नाहीं ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं ॥ शिव जप ध्यानीं मनीं ॥ वेद शास्त्र पुराणीं ॥ बोलियेलें ॥ ४ ॥

॥ २२२९ ॥ सोमवार व्रत येकादशी करी ॥ त्याचे चरण शिरीं वंदीन मी ॥ १ ॥ शिव विष्णु दोन्ही येकची प्रतिमा ॥ ऐसा जया प्रेमा वंदीन त्यासी ॥ २ ॥ सदां सर्व काळ शिवाचें कीर्तन ॥ आनंदें नर्तन भेद रहित ॥ ३ ॥ ऐसा जया भाव सदोदीत मनीं ॥ तयाचे चरणीं मिठी घाली ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं व्रताचा महिमा ॥ नकळेची ब्रह्मा उपरमला ॥ ५ ॥

॥ २२३० ॥ शिवरात्र व्रत करी यथा विधी ॥ भावें पूजी आधीं शिवलिंग ॥ १ ॥ चुकलें चुकलें जन्मांचें बंधन ॥ पुनरागमन नये तेणें ॥ ॥ २ ॥ एक बिल्वदळ चंदन अक्षता ॥ पूजन तत्वतां सोपें बहु ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं पूजितां साचार ॥ इच्छिलें हरि हर पूर्ण करिती ॥ ४ ॥

॥ २२३१ ॥ स्वर्ग सुख आह्मी मानूं जैसा ओक ॥ सांडुनीया सुख पंढरीचें ॥ १ ॥ पंढरी पावन चंद्रभागा स्थान ॥ आहे तो निधान विठ्ठल देव ॥ २ ॥ मध्य स्थळीं राहे पुंडलीक मुनी ॥ तयाचे दर्शनीं पातक हरे ॥ ३ ॥ दोनी कर कटीं उभा जगजेठी ॥ एकाजनार्दनीं भेटी सुख होय ॥ ४ ॥

॥ २२३२ ॥ धन्य काशी पुरी धन्य काशी पुरी ॥ जेथें वास करी विश्वनाथ ॥ १ ॥ तयाच्या दर्शनें प्राणी मुक्त होय ॥ चारी मुक्ती पायां लागताती ॥ २ ॥ भागीरथी स्नान जया लागीं घडे ॥ समूळ हें झडे पाप त्याचें ॥ ३ ॥ काळभैरवाचें दर्शन घेईल ॥ तात्काळ जाईल वैकुंठासी ॥ ४ ॥ प्रदक्षणा पंचक्रोशीची जो करी ॥ होईल अधिकारी सर्वस्वाचा ॥ ५ ॥ धुंडिराज स्वामी दृष्टि जो न्याहाळी ॥ होईल त्या होळी सर्व पापां ॥ ६ ॥ तेथें जाऊनियां करी अन्न दान ॥ तया नारायण हृदयीं वसे ॥ ७ ॥ एकाजनार्दनीं नित्य काशीवास ॥ परम सुखास पात्र झालों ॥ ८ ॥

॥ २२३३ ॥ स्वरूप सुंदर अति विशाळ ॥ नेत्रीं निघती अग्नि-ज्वाळा ॥ हृदयावरी सर्पाची माळ ॥ दुष्ट दुर्जना प्रत्यक्ष काळ ॥ १ ॥ वाचें वदे हर हर शब्द ॥ तेणें निरसे भव बंध ॥ ध्रु० ॥ माथा जटा शोभे पिंगट वर्ण ॥ मध्यें गंगा वाहे परिपूर्ण ॥ हृदयीं सदा रामध्यान ॥ तयासी पहातां निवे मन ॥ २ ॥ शिव शिव नाम हें तारक ॥ जया ध्याती ब्रह्मादिक ॥ सिद्ध साधक वानिती अनेक ॥ तया ध्यातां सुख अलोलिक ॥ ३ ॥ वामांगीं गौरी सुंदर ॥ तेजें लोपतसे दिनकर ॥ हृदयीं ध्यातां परात्पर ॥ एकाजनार्दनीं तुटे येरझार ॥ ४ ॥

॥ २२३४ ॥ एका आरोहणा नंदी ॥ एका गरुड वाहे स्कंधीं ॥ १ ॥ एका नित्य वास स्मशानीं ॥ एका क्षीरनिधि शयनीं ॥ २ ॥ एका भस्म लेपन सर्वांग ॥ एका चंदन उटी अभ्यंग ॥ ३ ॥ एका रुंडमाळा कंठीं शोभती ॥ एका रुळे वैजयंती ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं सारखे ॥ पहातां आन न दिसे पारखें ॥ ५ ॥

॥ २२३५ ॥ एक बाळब्रह्मचारी ॥ एका उदास निर्विकारी ॥ १ ॥ एका शोभे पाशुपत ॥ एका सुदर्शन झळकत ॥ २ ॥ एका करीं पद्म गदा ॥ एक परशु वाहे सदां ॥ ३ ॥ ऐसे परस्परें ते दोघे ॥ शोभताती ब्रह्मां-नंदें ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं ध्याऊं ॥ तयां चरणीं लीन होऊं ॥ ५ ॥

॥ २२३६ ॥ एका जटा मस्तकीं शोभती ॥ एका किरीट कुंडलें तळ-पतीं ॥ १ ॥ एका अर्धांगीं कमळा ॥ एका विराजे हिमबाळा ॥ २ ॥ एका गजचर्म आसन ॥ एका हृदयीं श्रीवत्सलांछन ॥ ३ ॥ एका जटाजूट

गंगा ॥ एका शोभे लक्ष्मी पैं गा ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं दोघे ॥ तयां पदीं नमन माझें ॥ ५ ॥

॥ २२३७ ॥ एका शोभे कौपीन ॥ एका पीतांबर परिधान ॥ १ ॥ एका कंठीं वैजयंती ॥ एका रुद्राक्ष शोभती ॥ २ ॥ एक उदासवृत्ति सदां ॥ एक भक्तांपाशीं तिष्ठे सदां ॥ ३ ॥ एक एका ध्यान करती ॥ एक एकातें चिंतिती ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं हरिहर ॥ तया चरणीं मज थार ॥ ५ ॥

॥ २२३८ ॥ एक ध्याती एकमेकां ॥ वेगळें अंतर नोहे देखा ॥ १ ॥ ऐसी परस्परें आवडी ॥ गूळ सांडुनी वेगळी नोहे गोडी ॥ २ ॥ एकमेकांतें वर्णिती ॥ एक एकातें वंदिती ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं साचार ॥ सर्व भावें भजा हरिहर ॥ ४ ॥

॥ २२३९ ॥ हरिचें चिंतन हराचे हृदयीं ॥ हराचें चिंतन हरीचें हृदयीं ॥ १ ॥ ऐसी परस्परें गोडी देखा ॥ काय वर्णावें तया सुखा ॥ २ ॥ सुख पहातां आनंद ॥ एकाजनार्दनीं परमानंद ॥ ३ ॥

॥ २२४० ॥ हरिहरांसि जे करिती भेद ॥ ते मतवादी जाणा निषिद्ध ॥ १ ॥ हरिहर एक तेथें नाहीं भेद ॥ कासयासी वाद मूढ जनीं ॥ २ ॥ गोडीसी साखर साखरेसी गोडी ॥ निवडितां अर्ध घडी दुजी नोहे ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं हरिहर ह्मणतां ॥ मोक्ष सायुज्जता पायां पडे ॥ ४ ॥

॥ २२४१ ॥ एका वेलांटीची आढी ॥ मूर्ख नेणती बापुडी ॥ १ ॥ हरिहर शब्द वदतां ॥ यमदूतां पडतसे चिंता ॥ २ ॥ कीर्तनीं नाचतां अभेद ॥ उभयतांसी परमानंद ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं सुख संतोष ॥ हरिहर ह्मणतां देख ॥ ४ ॥

॥ २२४२ ॥ देखोनियां हरलिंग ॥ जो न करी तया साष्टांग ॥ १ ॥ मुख्य तोचि माझा वैरी ॥ स्वमुखें ह्मणतसे हरि ॥ २ ॥ व्रत न करी शिवरात्र ॥ कासयानें होती पवित्र ॥ ३ ॥ ऐसीयासी यमपुरी ॥ एकाजनार्दनीं निर्धारीं ॥ ४ ॥

॥ २२४३ ॥ होउनी वैष्णव ॥ जो कां निंदी सदाशिव ॥ १ ॥ त्याचें न पहावें वदन ॥ मूर्खाहुनी मूर्ख पूर्ण ॥ २ ॥ भक्तीचा सोहळा ॥ शिवें दाविला सकळां ॥ ३ ॥ एका जनार्दनीं वैष्णव ॥ शिरोमणी महादेव ॥४॥

॥ २२४४ ॥ शिव शिव अक्षरें दोन ॥ जो जपे रात्रंदीन ॥ १ ॥ धन्य तयाचा संसार ॥ परमार्थाचें तेंच घर ॥ २ ॥ सदोदित वाचें ॥ जपे शिव शिव साचें ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं शिव ॥ सोपा मंत्र तो जाणीव ॥

॥ २२४५ ॥ हरिहराचें चिंतनीं ॥ अखंड वदे ज्याची वाणी ॥ १ ॥ नर नोहे नारायण ॥ सदां वाचें हरि हर जाण ॥ २ ॥ पळती यमदूताचे थाट ॥ पडती दूर जाऊनी कपाट ॥ ३ ॥ विनोदें हरिहर ह्मणतां ॥ मोक्ष प्राप्ती तया तत्वतां ॥४॥ एकाजनार्दनीं हरिहर ॥ भव सिंधु उतरी पार ॥५॥

॥ २२४६ ॥ भव सिंधूसी उतार ॥ हरिहर ह्मणतां निर्धार ॥ १ ॥ हीच घ्यारे प्रचीत ॥ सर्व पुरती मनोरथ ॥ २ ॥ संसाराचा धंदा ॥ वाचें ह्मणा हरिगोविंदा ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं नाम ॥ वाचें जप सोपा सुगम ॥४॥

॥ २२४७ ॥ दोघे सारिखे सारिखे ॥ विश्वनाथ विठ्ठल सखे ॥ १ ॥ त्रिशूळाग्रीं वाराणसी ॥ सुदर्शन पंढरीसी ॥ २ ॥ उमा रमा एकी सरी ॥ वाराणसी हे पंढरी ॥ ३ ॥ तेथें तीर्थ भागीरथी ॥ येथें जाणा भीमरथी ॥ ४ ॥ मणिकर्णिका मनोहर ॥ चंद्रभागा सरोवर ॥५॥ प्रयाग नरसिंहपुर ॥ गया तेचि गोपाळपुर ॥ ६ ॥ धुंडीराज दंडपाणी ॥ गरुड हनुमंत कर जोडोनी ॥ ७ ॥ वाराणसी भैरवादिक ॥ क्षेत्रपाळ पुंडलिक ॥ ८ ॥ संत मिळोनी करिती काला ॥ एकाजनार्दनीं आनंद झाला ॥ ९ ॥

॥ २२४८ ॥ सांबें बोधियला कृपावंत विष्णु ॥ परब्रह्म पूर्ण सांब माझा ॥ १ ॥ सांब उपदेशी उमा मछींद्रासी ॥ ब्रह्मरूप त्यासी केलें तेणें ॥२॥ मछींद्रापासुनी चौरंगी गोरक्ष ॥ एकाजनार्दनीं अलक्ष दाखविलें ॥३॥

॥ २२४९ ॥ योगियाचा मुगुट ह्मणती धूर्जटी ॥ तो हा रामनाम कंठीं जपताहे ॥ १ ॥ स्मशानीं तो राहे रामनाम गाये ॥ भोंवते उभे पाहे ऋषी सर्व ॥ २ ॥ सदां समाधिस्थ रामनामें रंगला ॥ वाचें सदा चाळा रामराम ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं श्रीरामावांचुनी ॥ दुजा छंद मनीं नाहीं त्याचे ॥ ४ ॥

॥ २२५० ॥ बहुते ठेविती यासी खोडी ॥ मज विश्वनाथीं आवडी ॥ १ ॥ कैसेनि पालट होईल भावा ॥ जिऊ घातला सदाशिवा ॥ धृ० ॥

अवघें ह्मणती हा कुरुप ॥ मज पाहतां शिव सुखरूप ॥ २ ॥ एकाजनार्दनीं निजगुज ॥ सबाह्य शिवशिव मज ॥ ३ ॥

---

# हरीपाठ.

॥ २२५१ ॥ हरीचिया दासा हरि दाही दिशा ॥ भावें जैसा तैसा हरि एक ॥ १ ॥ हरि मुखीं गातां हरपली चिंता ॥ त्या नाहीं मागुता जन्म घेणें ॥ २ ॥ जन्म घेणें लागे वासनेच्या संगें ॥ तेंचि झाली अंगें हरि रूप ॥ ३ ॥ हरि रूप झालें जाणणें हरपलें ॥ नेणणें तें गेलें हरिचे ठायीं ॥ ४ ॥ हरिरूप ध्यानीं हरिरूप मनीं ॥ एकाजनार्दनीं हरी बोला ॥ ५ ॥

॥ २२५२ ॥ हरि हरि बोला नाहीं तरि अबोला ॥ व्यर्थ गलबला करूं नका ॥ १ ॥ नको नको मान नको अभिमान ॥ सोडी मी तूं पण तोची सुखी ॥ २ ॥ सुखी जेणें व्हावें जग निववावें ॥ अज्ञानी लावावे सन्मार्गासी ॥ ३ ॥ मार्ग जया कळे भाव भक्तिबळें ॥ जगाचिये मेळें न दिसती ॥ ४ ॥ दिसती जनीं वनीं प्रत्यक्ष लोचनीं ॥ एकाजनार्दनीं ओळखिले ॥५॥

॥ २२५३ ॥ ओळखिला हरी धन्य तो संसारीं ॥ मोक्ष त्याचे घरीं सिद्धीसहित ॥ १ ॥ सिद्धि लावी पिसें कोण तया पुसे ॥ नेलें राजहंसें पाणी कायी ॥ २ ॥ काय तें करावें संदेही निर्गुण ॥ ज्ञानानें सगुण ओस केलें ॥ ३ ॥ केलें कर्म झालें तेंचि भोगा आलें ॥ उपजले मेले ऐसे किती ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं नाहीं यातायाती ॥ सुखाची विश्रांती हरीसंगें ॥५॥

॥ २२५४ ॥ जें जें दृष्टीं दिसे तें तें हरि रूप ॥ पूजा ध्यान जप त्यासी नाहीं ॥ १ ॥ वैकुंठ कैलासीं तीर्थ क्षेत्रीं देव ॥ तयावीण ठाव रिता कोठें ॥ २ ॥ वैष्णवांचें गुह्य मोक्षाचा एकांत ॥ अनंतासी अंत पाहतां नाहीं ॥ ३ ॥ आदि मध्य अंतीं अवघा हरि एक ॥ एकचि अनेक एक हरी ॥ ४ ॥ एकाकार झाले जीव तेचि दोन्ही ॥ एकाजनार्दनीं ऐसे केलें ॥ ५ ॥

॥ २२५५ ॥ नामावीण मुख सर्पाचें तें बीळ ॥ जिव्हा नव्हे काळसर्प आहे ॥ १ ॥ वाचा नव्हे लांब जळो त्याचें जिणें ॥ यातना भोगणें यमपुरीं ॥ २ ॥ हरीवीण कोणी नाहीं सोडवीता ॥ पुत्र बंधु कांता

संपत्तीचे ॥ ३ ॥ अंत काळीं कोणी सांगाती नाहीं बा ॥ साधूचे संगती हरि जोडे ॥ ४ ॥ कोटि कुळें तारी हरि अक्षरें दोनी ॥ एकाजनार्दनीं पाठ केलीं ॥ ५ ॥

॥ २२५६ ॥ धन्य माय व्याली सुकृताचें फळ ॥ फळ तें निर्फळ हरीवीण ॥ १ ॥ वेदाचेंही बीज हरि हरि अक्षरें ॥ पवित्र सोपारें हेंचि एक ॥ २ ॥ योग याग व्रत नेम धर्म दान ॥ नलगे साधन जपतां हरी ॥ ३ ॥ साधनाचें सार नाम मुखीं गातां ॥ हरि हरि ह्मणतां कार्यसिद्धि ॥ ४ ॥ नित्यमुक्त तोची एक ब्रह्मज्ञानी ॥ एकाजनार्दनीं हरि बोला ॥ ५ ॥

॥ २२५७ ॥ बहुतां सुकृतीं नरदेह लाधला ॥ भक्तिवीण गेला अधोगती ॥ १ ॥ बाप भाग्य कैसे न सरेचि कर्म ॥ न कळेंचि वर्म अरे मूढा ॥ २ ॥ अनेका जन्माचें सुकृत पदरीं ॥ त्याचे मुखीं हरि पैठा होय ॥ ३ ॥ राव रंक होकां उंच नीच याती ॥ भक्तिवीण माती मुखीं त्याच्या ॥ ४ ॥ एका जनार्दनीं हरि हरि ह्मणतां ॥ मुक्ती सायुज्यता पाठीं लागे ॥

॥ २२५८ ॥ हरि नामामृत सेवी सावकाश ॥ मोक्ष त्याचे भूस दृष्टी पुढें ॥ १ ॥ नित्य नाम घोष जयाचे मंदिरीं ॥ तेंचि काशीपुरी तीर्थ क्षेत्र ॥ २ ॥ वाराणशीतीर्थ क्षेत्रा नाश आहे ॥ अविनाशासी पाहे नाश कैंचा ॥ ३ ॥ एका तासामाजी कोटि वेळां सृष्टी ॥ होती जाती दृष्टीं पाहे तोचि ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं ऐसे किती झाले ॥ हरिनाम सेविलें तोचि एक ॥ ५ ॥

॥ २२५९ ॥ भक्तिवीण पशू कशासी वाढला ॥ सटवीनें नेला कैसा नाहीं ॥ १ ॥ काय माय गेली होती भूतापाशीं ॥ हरि नये मुखासी अरे मूढा ॥ २ ॥ पातकें करितां पुढें आहे पुसता ॥ काय उत्तर देता होशील तूं ॥ ३ ॥ अनेक यातना यम करवील ॥ कोण सोडवील तेथें तुजला ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं सांगताहे तोंडें ॥ आहा वाचा रडे बोलतांची ॥ ५ ॥

॥ २२६० ॥ स्वहिता कारणें संगती साधूची ॥ भावें भक्ति हरीची भेटी तेणें ॥ १ ॥ हरि तेथें संत संत तेथें हरि ॥ ऐसें वेद चारी बोलताती ॥ २ ॥ ब्रह्मा डोळसा तें वेदार्थ नकळे ॥ तेथें हें आंधळे व्यर्थ होती

॥ ३ ॥ वेदार्थाचा गोवा कन्या अभिलाष ॥ वेदें नाहीं ऐसें सांगितलें ॥ ४ ॥ वेदाचींहीं बीजाक्षरें हरि दोनी ॥ एकाजनार्दनीं हरि बोला ॥ ५ ॥

॥ २२६१ ॥ सत्पद तें ब्रह्म चित्पद ते माया ॥ आनंद पदीं जया ह्मणती हरि ॥ १ ॥ सत्पद निर्गुण चित्पद सगुण ॥ सगुण निर्गुण हरि पायीं ॥ २ ॥ तत्सदिति ऐसें पैल वस्तू वरी ॥ गीतेमाजीं हरि बोलीयेलें ॥ ३ ॥ हरि पदप्राप्ति भोळ्या भाविकांसी ॥ अभिमानी यांसी नरकवास ॥ ४ ॥ अस्ति भाति प्रिय ऐशीं पदें तीनी ॥ एकाजनार्दनीं तेंचि झालें ॥ ५ ॥

॥ २२६२ ॥ नाकळे तें कळे कळे तें नकळे ॥ वळे तें नावळे गुरूविणें ॥ १ ॥ निर्गुणीं पावलें सगुणीं भजतां ॥ विकल्प धरितां जिव्हा झडे ॥ २ ॥ बहुरूपी धरी संन्याशाचा वेष ॥ पाहोन तयास धन देती ॥ ३ ॥ संन्याशाला नाहीं बहुरूपीयाला ॥ सगुणीं भजला तेथें पावे ॥ ४ ॥ अद्वैताचा खेळ दिसे गुणागुणीं ॥ एकाजनार्दनीं ओळखिलें ॥ ५ ॥

॥ २२६३ ॥ ओळखिला हरि सांठविला पोटीं ॥ होतां त्याची भेटी दुःख कैंचें ॥ १ ॥ नर अथवा नारी हो कां दुराचारी ॥ मुखी गातां हरी पवित्र तो ॥ २ ॥ पवित्र तें कुळ धन्य त्याची माय ॥ हरि मुखें गाय नित्य नेमें ॥ ३ ॥ कामक्रोध लोभ जयाचें अंतरीं ॥ नाहीं अधिकारी ऐसा येथें ॥ ४ ॥ वैष्णवांचें गुह्य काढिलें निवडूनी ॥ एकाजनार्दनीं हरि बोला ॥ ५ ॥

॥ २२६४ ॥ हरि बोला देतां हरि बोला घेतां ॥ हसतां खेळतां हरि बोला ॥ १ ॥ हरि बोला गातां हरि बोला खातां ॥ सर्व कार्य करितां हरि बोला ॥ २ ॥ हरि बोला एकांतीं हरि बोला लोकांतीं ॥ देह त्यागा अंतीं हरि बोला ॥ ३ ॥ हरि बोला भांडता हरि बोला कांडतां ॥ उठतां बैसतां हरि बोला ॥ ४ ॥ हरि बोला जनीं हरि बोला विजनीं ॥ एकाजनार्दनीं हरि बोला ॥ ५ ॥

॥ २२६५ ॥ एक तीन पांच मेळा पंचविसांचा ॥ छत्तीस तत्वांचा मूळ हरि ॥ १ ॥ कल्पना अविद्या तेणें झाला जीव ॥ मायोपाधि शिव बोलिजेती ॥ २ ॥ जीव शिव दोनी हरि रूपीं तरंग ॥ सिंधु तो

अभंग नेणे हरि ॥ ३ ॥ शुक्तीवरी रजत पहाता डोळां दिसे ॥ रज्जूवरी भासे मिथ्या सर्प ॥ ४ ॥ क्षेत्र क्षेत्रज्ञातें जाणताती ज्ञानी ॥ एकाजनार्दनीं हरि बोला ॥ ५ ॥

॥ २२६६ ॥ कल्पनेपासूनी कल्पिला जो ठेवा ॥ तेणें पडे गोंवा नेणें हरि ॥ १ ॥ दिधल्या वांचूनी फळ प्राप्ति कैंची ॥ इच्छा कल्पनेची व्यर्थ बापा ॥ २ ॥ इच्छावे ते जवळी हरिचे चरण ॥ सर्व नारायण देतो तुज ॥ ३ ॥ न सुटे कल्पना अभिमानाची गांटीं ॥ घेतां जन्म कोटी हरि कैंचा ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं सांपडली खूण ॥ कल्पना अभिमान हरि झाला ॥ ५ ॥

॥ २२६७ ॥ काय पद्मिनीचे षंढासी सोहळे ॥ वांझेसी डोहळे कैंचे होती ॥ १ ॥ दिधल्या वांचूनी फळ प्राप्ति कैंची ॥ इच्छा कल्पनेची व्यर्थ कां बापा ॥ २ ॥ इच्छावे ते जवळ हरिचे चरण ॥ सर्व नारायण देतो तुज ॥ ३ ॥ न सुटे कल्पना अभिमानाची गांठीं ॥ घेतां जन्म कोटी हरि कैंचा ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं सांपडली खूण ॥ कल्पना अभिमान हरि झाला ॥ ५ ॥

॥ २२६८ ॥ काय पद्मिनीचे षंढासी सोहळे ॥ वांझेसी डोहळे कैंचे होती ॥ १ ॥ अंधापुढें दीप खरासी चंदन ॥ सर्पासी दूधपान करूं नये ॥ २ ॥ क्रोधी अविश्वासी त्यांसी बोध कैंचा ॥ व्यर्थ आपुली वाचा शिणवूं नये ॥ ३ ॥ खळाची संगति उपयोगासी नये ॥ आपणा अपाय त्याचे संगें ॥ ४ ॥ वैष्णवीं कुपथ्य टाकिलें बाळूनी ॥ एकाजनार्दनीं तेचि भले ॥ ५ ॥

॥ २२६९ ॥ न जायेचि ताठा नित्य खटाटोप ॥ मंडूकीं वटवट तैसे ते गा ॥ १ ॥ प्रेमावीण भजन नाकावीण मोंती ॥ अर्थावीण पोथी वाचुनी काय ॥ २ ॥ कुंकुवा नाहीं ठाव ह्मणे मी आहेव ॥ भावावीण देव कैसा पावे ॥ ३ ॥ अनुतापावीण भाव कैसा राहे ॥ अनुभवें पाहे शोधूनियां ॥ ४ ॥ पाहतां पाहणें गेलें तें शोधूनी ॥ एकाजनार्दनीं अनुभविलें ॥ ५ ॥

॥ २२७० ॥ परिमळ गेलीया वोस फूल देंठीं ॥ आयुष्या शेवटीं देह तैसा ॥ १ ॥ घडि घडी काळ वाट याची पाहे ॥ अझूनि किती आहे अवकाश

॥ २ ॥ हाचि अनुताप घेऊनि सावध ॥ कांहीं तरी बोध करीं मना ॥ ३ ॥ एक तास उरला खट्वांग रायासी ॥ भाग्य दशा कैसी प्राप्त झाली ॥ ४ ॥ सांपडला हरि तयाला साधनीं ॥ एकाजनार्दनीं हरि बोला ॥ ५ ॥

॥ २२७१ ॥ करारे बापानों साधन हरीचें ॥ झणी करणीचें करूं नका ॥ १ ॥ जेणें नये जन्म यमाची यातना ॥ ऐसिया साधना करा कांहीं ॥ २ ॥ साधनाचें सार मंत्रबीज हरी ॥ आत्म तत्त्व धरी तोची एक ॥ ३ ॥ कोटि कोटि यज्ञ नित्य ज्याचा नेम ॥ एक हरि नाम जपतां घडे ॥४॥ एकाजनार्दनीं न घ्यावा संशय ॥ निश्चयेंसी होय हरि रूप ॥५॥

॥ २२७२ ॥ बारा सोळा जणी हरीसी नेणती ॥ ह्मणोनि फिरती रात्रंदिवस ॥ १ ॥ सहस्र मुखांचा वर्णिता भागला ॥ हर्ष जया झाला तेणें सुखें ॥ २ ॥ वेद जाणूं गेला पुढें मौनावला ॥ तें गुह्य तुजला प्राप्त कैचें ॥ ३ ॥ पूर्व सुकृताचा पूर्ण अभ्यासाचा ॥ दास सद्गुरूचा तोचि जाणे ॥४॥ जाणते नेणते हरीचे ठिकाणीं ॥ एकाजनार्दनीं हरि बोला ॥५॥

॥ २२७३ ॥ पिंडीं देह स्थिति ब्रह्मांडीं पसारा ॥ हरी वीण सारा व्यर्थ भ्रम ॥ १ ॥ शुक याज्ञवल्क्य दत्त कपिल मुनी ॥ हरीसी जाणोनी हरिच झाले ॥ २ ॥ यारे यारे धरूं हरि नाम तारूं ॥ भवाचा सागरू भय नाहीं ॥ ३ ॥ साधु संत गेले आनंदीं राहिले ॥ हरि नामें झाले कृतकृत्य ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं मांडिलें दुकान ॥ देतो मोलाविण सर्व वस्तु ॥ ५ ॥

॥ २२७४ ॥ आवडीनें भावें हरि नाम घेशी ॥ तुझी चिंता त्यासी सर्व आहे ॥ १ ॥ नको खेद धरूं कोणत्या गोष्टीचा ॥ पति तो लक्ष्मीचा जाणतसे ॥ २ ॥ सकळ जीवांचा करितो सांभाळ ॥ तुज मोकलील ऐसें नाहीं ॥ ३ ॥ जैशी स्थिति आहे तैशा परी राहे ॥ कौतुक तूं पाहे संचिताचें ॥४॥ एकाजनार्दनीं भोग प्रारब्धाचा ॥ हरि कृपें त्याचा नाश झाला ॥५॥

॥ २२७५ ॥ दुर्बळाची कन्या समर्थानें केली ॥ अवदशा निमाली दरिद्राची ॥ १ ॥ हरि कृपा होतां भक्तां निघती दोंदें ॥ नाचती स्वानंदें हरि रंगीं ॥ २ ॥ देव भक्त दोन्ही एक रूप झाले ॥ मुळींचें संचलें जैसें तसें ॥ ३ ॥ पाजळली ज्योति कापुराची वाति ॥ ओंवाळितां आरती भेद नुरे ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं कल्पचि मुराला ॥ तोचि हरि झाला ब्रह्म रूप ॥५॥

---

## हरिपाठ.

॥ २२७६ ॥ मुद्रा ती पांचवी लाउनीयां लक्ष ॥ तो आत्मा प्रत्यक्ष हरि दिसे ॥ १ ॥ कानीं जें पेरिलें डोळां तें उगवलें ॥ व्यापकें भरिलें तोचि हरि ॥ २ ॥ कर्म उपासना ज्ञान मार्गीं झाले ॥ हरिपाठीं आले सर्व मार्ग ॥ ३ ॥ नित्य प्रेमभावें हरिपाठ गाय ॥ हरिकृपा होय तयावरी ॥ ४ ॥ झाला हरिपाठ बोलणें येथुनी ॥ एकाजनार्दनीं हरि बोला ॥ ५ ॥

॥ २२७७ ॥ हरि ह्मणा बोलतां हरि ह्मणा चालतां ॥ हरि ह्मणा खेळतां बाळपणीं ॥ १ ॥ ह्मणा हरिनाम पुरती सकळ काम ॥ हरि नामें ब्रह्म हातां चढे ॥ २ ॥ हरि ह्मणा उठतां हरि ह्मणा बैसतां ॥ हरि ह्मणा पाहतां लोक लीळा ॥ ३ ॥ हरि ह्मणा आसनीं हरि ह्मणा शयनीं ॥ हरि ह्मणा भोजनीं ग्रासोग्रासीं ॥ ४ ॥ हरि ह्मणा जागतां हरि ह्मणा निजतां ॥ हरि ह्मणा झुंजतां रणांगणीं ॥ ५ ॥ हरि ह्मणा एकटी हरि ह्मणा संकटीं ॥ हरि धरा पोटीं भाव बळें ॥ ६ ॥ हरि ह्मणा हिंडतां हरि ह्मणा भांडतां ॥ हरि ह्मणा कांडितां साळी दाळी ॥ ७ ॥ हरि ह्मणा देतां हरि ह्मणा मागतां ॥ हरि ह्मणा गातां पदोपदीं ॥ ८ ॥ हरि ह्मणा देशीं हरि ह्मणा परदेशीं ॥ हरि ह्मणा अहर्निशीं सावधान ॥ ९ ॥ हरि ह्मणा एकांतीं हरि ह्मणा लोकांतीं ॥ हरि ह्मणा अंतीं देह त्यागीं ॥ १० ॥ हरि ह्मणा धर्मतां हरि ह्मणा अर्थतां ॥ हरि ह्मणा कामतां सकाम काम ॥ ११ ॥ हरि ह्मणा स्वार्थीं हरि ह्मणा परमार्थीं ॥ हरि ब्रह्म प्राप्ति लागीं ह्मणा ॥ १२ ॥ हरि ह्मणा भावतां हरि ह्मणा अभावतां ॥ हरि ह्मणा पावतां मोक्षपद ॥ १३ ॥ हरि ह्मणा निजनिधी हरि ह्मणा आनंदीं ॥ हरि परमानंदीं आनंद तो ॥ १४ ॥ हरि ह्मणा जनीं हरि ह्मणा विजनीं ॥ एकाजनार्दनीं हरी नांदे ॥ १५ ॥ हें चौदापदें गया ॥ गायकाचा ठाया ॥ आलिसे ताराया पितरें सहित ॥ १६ ॥

---

## एकादशीमाहात्म्य.

॥ २२७८ ॥ ऐका पुण्य पवित्र कथा ॥ सावधान व्हावें श्रोतां ॥ जयाचेनी अवधानें सर्वथा ॥ कलीकल्मषें नासती ॥ १ ॥ जें आचारला अंबऋषी ॥ रुक्मांगद सूर्यवंशीं ॥ तेंचि व्रत एकादशी ॥ निजधर्मासी सांगेन

॥ २ ॥ परिसा एकादशीचा महिमा ॥ तोचि दिवस प्रिय पुरुषोत्तमा ॥ मुगुटमणी सकळ धर्मा ॥ विचित्र कर्मा सोडवण ॥३॥ तिथि त्रयाचें महिमान॥ त्रैरूपें अभिन्न जाण ॥ परिसा तियेचें लक्षण ॥ तात्विकार्थ तो ऐसा ॥ ४॥ दशमी जाणा महा विष्णु ॥ एकादशी श्रीनारायणू ॥ द्वादशी श्रीभगवानु ॥ भक्त साहाय्या कारणें ॥५॥ संक्रमणादि दान श्रेष्ठ ॥ याहुनी ग्रहणींचें वरिष्ठ ॥ ग्रहणाहुनी वरिष्ठ ॥ व्यतिपात वैधृति ॥ ६ ॥ याहुनी अनंत गुणें अधिक ॥ एकादशीचें दान विशेष ॥ दानमिषें एकाएक ॥ देवचि देख पैं लाभे ॥ ७ ॥ यालागीं एकादशीचें दान ॥ तें होय देवाची समान ॥ दानयोगें तेणें जाण ॥ देव अपैसा पैं केला ॥ ८ ॥ अर्धोदय कपिलाषष्ठी ॥ एकादशीच्या चरणांगुष्ठीं ॥ योगयागांची कोटी ॥ टाळीसाठीं न सरती ॥ ९ ॥ दशमी व्रताचा आरंभु ॥ दिंडीपुढें समारंभु ॥ मिळोनी वैष्णवांचा कदंबु ॥ गीत नृत्य उत्साह ॥ १० ॥ आली एकादशी परिसोनी ॥ उल्हास उपजे ज्याचे मनीं ॥ धन्य धन्य त्याची जननी ॥ पवित्र अवनी तेणें केली ॥ ११ ॥ अनंत व्रतांचीया राशी ॥ पाया लागती एकादशी ॥ यालागीं हरिदिनी ॥ आख्या ऐशी ॥ त्या दिवसाशी पैं आली ॥ १२ ॥ एकादशी हरीचा प्रसंग आठही प्रहरातें अष्टांग ॥ जे नर भाग्याचे सभाग्य ॥ पूजा सांग करिताती ॥१३॥ प्रातःकाळापासून ॥ तेथें प्रगटे नारायण ॥ त्यासीच ह्मणती हरिदिन व्यास वाल्मिक नारद ॥ १४ ॥ यालागीं तो हरीचा दिवस ॥ तो सत्य जाणा हृषीकेश ॥ धन्य धन्य भाग्य सौरस ॥ गीत नृत्य उत्साह ॥ १५ ॥ ऐशी हरितनु एकादशी ॥ ह्मणोनी आवडे वैष्णवांसीं ॥ नारद प्रल्हाद अंबऋषी ॥ या व्रतासी विनटले ॥ १६ ॥ बरवें करावें हरिपूजन ॥ शृंगारावें देवसदन ॥ आठही प्रहर हरिकीर्तन ॥ जाग्रण करावें उल्हासें ॥ १७ ॥ जाग्रणा एकादशी ॥ येतां होती पुण्यराशी ॥ पदोपदीं कोटी यागांसी ॥ फळसमारंभेंसी जोडती ॥ १८ ॥ जे तेथें बैसोनी सावधान ॥ परिसती हरिकीर्तन ॥ त्यांचें निरसे भवबंधन ॥ समाधान ते पावत ॥ १९ ॥ वैष्णव होउनी एकादशी ॥ अंग चोरी हरि कीर्तनासी ॥ भाग्य विन्मुख जालें त्यासी ॥ मुळ्यापासी तेणें केलें ॥ २० ॥ यालागीं एकादशीस वाडेंकोडें ॥ नामासाठीं मोक्ष जोडे ॥ तेथेंही अभिमान चढे ॥ रवरव पुढें तयासी ॥२१॥ एकादशी रंगापुढें ॥ रंगीं नाचती वेडे बागडे ॥ नाम गर्जती सावडें ॥ तें आवडे गोविंदा ॥२२॥ नामासरसी वाजे टाळी ॥ महा दोषा होय होळी ॥ सांडोनी वैकुंठ नव्हाळी ॥ तया जवळीं हरि तिष्ठे ॥ २३ ॥ जाग्रणा येउनी

एकादशीं ॥ जो हरिभक्तासी उपहासी ॥ तो जाणावा पापराशी ॥ नरक त्यासी पैं भीती ॥२४॥ देखोनी निंदकाचा भावो ॥ रवरवा पडिला संदेहो ॥ निंदेपरतें पाप पहाहो ॥ जगा माजीं पैं नाहीं ॥२५॥ जेणें निंदिली एकादशी ॥ तो जिताचि नरकवासीं ॥ कुष्ठ लाविलें मुखाशी ॥ ये मुखासी मुखरोग॥ २६॥ ज्यासीं न माने एकादशी ॥ तनू जाणावी ती राक्षसी ॥ त्याची संगती घडे ज्यासी ॥ नरकवासी तो होय ॥२७॥ जे एकादशीस भक्षिती अन्न ॥ ते श्वान-विष्ठे समान ॥ तांबुल तें रुधिरपान ॥ रजस्वले स्त्रियेचें ॥ २८ ॥ एकादशीस स्त्रीभोग ॥ तयासी लागे क्षयरोग ॥ यमयातना दुःखें अनेग ॥ व्यथा अंगीं तो पावे ॥ २९ ॥ बाह्य मिरवी एकादशी ॥ चोरुनी खाये अन्नासी ॥ उदरशूळ लागे त्यासी ॥ नातरी कुक्षीं गुल्म होती ॥ ३० ॥ एकादशीस स्नेहमार्जन ॥ बुद्धि अंध होय तेणें ॥ नेत्ररोगाशी उठणें ॥ क्षुद्र पहाणें हरि-भक्ता ॥ ३१ ॥ जो निंदी एकादशी ॥ नरका जाणें नलगे त्यासी ॥ तो स्वयेंची नरकवासी ॥ म्हणीं आतळला ॥ ३२ ॥ जेणें दूषिलें एकादशी ॥ म्हणीं त्याचें नाम घेसी ॥ रामराम म्हणतां वेगेंसी ॥ त्या पापासी प्रायश्चित्त ॥ ३३ ॥ ज्यासी निष्ठा एकादशीचें भजन ॥ त्यासी सर्वथा नाहीं पतन॥ पूर्वज उद्धरती जाण ॥ यमयातनेपासूनी ॥ ३४ ॥ गर्जती हरिनामाचा घोष ॥ त्यांचा यमदूतां पडे धाक ॥ नामें प्रायाश्चित्त शीक ॥ लागली भीक महापापा ॥ ३५ ॥ यमयातनेचे पितर ॥ वांछिताती निरंतर ॥ एकादशी हरिजागर ॥ वंशीं तत्पर हो कोणी ॥ ३६ ॥ पुत्र अथवा भ्रातृपुत्र ॥ दुहितृ अथवा दुहिता ॥ करितां एकादशी हरिजागर ॥ यमप्रहार ते चुके ॥ ३७ ॥ जो एकादशीव्रत धरी ॥ तो अतिशय पढीये हरि ॥ यालागीं देव त्याचे घरीं ॥ निरंतरीं तिष्ठत ॥ ३८ ॥ जेथें राहिले हरि वरिष्ठ ॥ तोचि आश्रम होय श्रेष्ठ ॥ब्रह्मानंदें पिकली पेंठ॥ ग्राहिक तेथें हरिभक्त ॥३९॥ ऐसें एका-दशीचें व्रत ॥ निर्विकल्प जे आचरत ॥ त्यांचे घरीं हरि तिष्ठत ॥ कांते-सहवर्तमान ॥ ४० ॥ तीर्थव्रताचें पारडें ॥ तुकितां एकादशीपुढें थोडें ॥ तेथेंही जागरण घडे ॥ भाग्य केव्हडें तयाचें ॥ ४१ ॥ द्वादशीस शीत मात्र अन्न ॥ तें होय मेरुमंदारासमान ॥ तेथेंही निर्विकल्प ब्राह्मणभोजन ॥ आयागमन तेणें चुके ॥ ४२ ॥ द्वादशीच्या अन्नदानीं ॥ देव भक्ताचा जाला ऋणी ॥ यालागी पैं चक्रपाणी ॥ भक्तवाणी नुलंघी ॥ ४३ ॥ द्वादशीचें फळ संधान ॥ अमर्याद पुण्य गहन ॥ कोटी यागाचें श्रेय जाण॥ निंबलोण करिताती ॥ ४४ ॥ द्वादशीच्या ग्रासोग्रासीं ॥ तृप्ति होय यज्ञ-

पुरुषीं ॥ तें फळ लाधलें अंबऋषी ॥ गर्भवासी देव पैं आला ॥ ४५ ॥ एवं जालीया पारणेंविधि ॥ जो आरंभी क्षीराब्धी ॥ भक्तामाजीं तो आधीं ॥ वैकुंठपीठीं राहे ॥ ४६ ॥ क्षीराब्धीचा प्राप्त काळ ॥ मिळोनी वैष्णवांचा मेळ ॥ नानापरी करिती गदारोळ ॥ तो सोहळा हरि प्रिय ॥ ४७ ॥ एकादशी देव जागरा आला ॥ क्षीरापतिलागीं ठोकों लागला ॥ जैसा बुभुक्षु दुकाळला ॥ तैसा वाट पहातसे ॥ ४८ ॥ ऐकोनी क्षीरापतीच्या गोष्टी ॥ आवडीं देव लाळ घोटी ॥ हरिख न समाय सृष्टीं ॥ उल्हास पोटीं न समाये ॥ ४९ ॥ क्षीरापति वाळुवंटीं ॥ संतवैष्णवांची दाटी ॥ देखोनि देवा आवडी मोठी ॥ येत उठाउठीं पैं तेथें ॥ ५० ॥ क्षीरापति सेवितां वैष्णव ॥ मुखामाजीं मुख घालितो देव ॥ नवल भावार्थाचा भाव ॥ अगम्य पहाहो सुरवरा ॥ ५१ ॥ सेवितां क्षीरापतिची गोडी ॥ येर येरापुढें घालिती उडी ॥ हर्षें नाचती आवडीं ॥ धरिती गोडी उल्हासें ॥ ५२ ॥ क्षीरापति घालितां वैष्णवांचे मुखीं ॥ तेणें सुखें देव होय सुखी ॥ धन्य भाग्याचे इहलोकीं ॥ व्रत ओळखी त्या जाली ॥ ५३ ॥ पडली वैष्णवाचे पायातळीं ॥ जो सेवी क्षीरापतीची रवाळी ॥ सकळ पापा होय धुळी ॥ हरीजवळीं तो पावे ॥ ५४ ॥ सेवितां वैष्णवांचें शेष ॥ कलीकल्मषा होय नाश ॥ पाया लागे मोक्षसुख ॥ स्वात्मसुख तो पावे ॥ ५५ ॥ यापरी एकादशी ॥ भक्त उद्धरती दोषपक्षीं ॥ जेथें मोक्षाचीया राशी ॥ तिथि त्रयासी जोडती ॥ ५६ ॥ धरी जरी व्रतासी दृढभाव ॥ तरी सबाह्य प्रगटे देव ॥ करूनी संसार वाव ॥ निजात्म ठाव निजपदीं ॥ ५७ ॥ व्रता तपाचें काबाड ॥ सकळ धर्माचें पुरे कोड ॥ धरलीया एकादशीची चाड ॥ सकळही फळें लाभती ॥ ५८ ॥ जो एकादशीचा व्रती ॥ त्यासी तीर्थें पैं सेविती ॥ तेणें पुण्यें भगवत्प्राप्ती ॥ क्षणमात्र न लागतां ॥५९॥ एकादशीच्या उपवासी ॥ रुक्मांगद सूर्यवंशीं ॥ नगरी नेली वैकुंठासी ॥ निज सुखासी पावला ॥ ६० ॥ तैसीच जाणावी द्वादशी ॥ प्रसन्न जाली अंबऋषी ॥ दहा गर्भवास सोशी ॥ उणें भक्तासी येवों नेदी ॥ ६१ ॥ ज्यांसी असे मोक्षाची चाड ॥ तींहीं नाना साधनें काबाड ॥ सांडोनीया दृढ ॥ व्रत एकादशी करावें ॥ ६२ ॥ एकाजनार्दन सांगे ॥ कांशिणाल योगयागें ॥ एकादशीच्या प्रसंगें ॥ देवची अंगें लाधला ॥६३॥

# एकादशी महात्म्य.

॥ २२७९ ॥ आषाढी पर्वकाळ एकादशी दीन ॥ हरीजाग्रण देवा प्रिय ॥ १ ॥ निराहारें व्रत जो करी आवडी ॥ मोक्ष परवडी त्याचे घरीं ॥ २ ॥ व्रत आचरती हरिकथा करिती ॥ नामघोष गाती आवडीनें ॥ ३ ॥ प्रदक्षणा तीर्थ आदरें सेविती ॥ पूर्वज ते जाती वैकुंठासी ॥ ४ ॥ पुंडलीकाचें दरुशन चंद्रभागे स्नान ॥ विठ्ठल दरुशनें धन्य होती ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं ऐसा ज्याचा नेम ॥ तया सर्वोत्तम नुपेक्षी तो ॥ ६ ॥

॥ २२८० ॥ एकादशी एकादशी ॥ जया छंद अहर्निशीं ॥ १ ॥ व्रत करी जो नेमानें ॥ तया वैकुंठींचें पेणें ॥ २ ॥ नामस्मरण जाग्रण ॥ वाचें गाय नारायण ॥ ३ ॥ तोचि भक्त सत्य साचा ॥ एकाजनार्दन ह्मणे वाचा ॥ ४ ॥

॥ २२८१ ॥ व्रतामाजीं व्रत एकादशी पावन ॥ दिंडी जाग्रण देवाप्रिय ॥ १ ॥ अष्टही प्रहर हरिकथा करी ॥ वाचें विठ्ठल हरी वदोनीया ॥ २ ॥ टाळ मृदंग वाजती गजरें ॥ विठ्ठल प्रेमभरें नाचतुसे ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं व्रताचा छंद ॥ तेणें परमानंद सुख पावे ॥ ४ ॥

॥ २२८२ ॥ व्रत जे करिती तया जे निंदिती ॥ त्यांचे पूर्वज जाती नर्कामधीं ॥ १ ॥ भाळे भोळे भक्त वेडेंवांकुडें गाती ॥ तया जे हांसती ते श्वानसम ॥ २ ॥ स्वमुखें देव आवडीनें सांगे ॥ तयाचीया मागें हिंडे देवो ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं भोळा देव ॥ भक्ताचा गौरव करीतुसे ॥ ४ ॥

॥ २२८३ ॥ देव ह्मणे भक्तासी आवडीं ॥ मी जालों तुमचा गडी ॥ १ ॥ सांगाल तें करीन काम ॥ मजवर ठेवा तुमचें प्रेम ॥ २ ॥ भाव मज द्यावा ॥ आणीक मज नाहीं हेवा ॥ ३ ॥ आवडीनें देव बोले ॥ भक्तांमाजीं स्वयें खेळे ॥ ४ ॥ खेळतां गोपाळीं ॥ एकाजनार्दनीं गोकुळीं ॥ ५ ॥

॥ २२८४ ॥ दशमीव्रताचा आरंभु ॥ दिंडी कीर्तन करा समारंभु ॥ तेणें तो स्वयंभु ॥ संतोष पावे ॥ १ ॥ एकादशी जाग्रण ॥ हरिपूजन नामकीर्तन ॥ द्वादशी क्षीरापती जाण ॥ वैष्णव जन सेविती ॥ २ ॥ ऐसें व्रत तीन दिन ॥ करी जो आदरें परिपूर्ण ॥ एकाजनार्दनीं बंधन ॥ तया नाहीं सर्वथा ॥ ३ ॥

॥ २२८५ ॥ क्षीरसागरींचें नावडे सुख ॥ क्षीरापती देखे देव आला ॥ १ ॥ कवळो कवळ पहा हो ॥ मुख पसरुनी धांवतो देवो ॥ २ ॥ एकादशी देव जागरा आला ॥ क्षीरापतीलागीं टोकत ठेला ॥ ३ ॥ द्वादशीं क्षीरापती ऐकोनी गोष्टी ॥ आवडीं देव देतसे मिठी ॥ ४ ॥ क्षीरापती घालितां वैष्णवामुखीं ॥ तेणें सुखें देव होतसे सुखी ॥५॥ क्षीरापती सेवितां आनंदु ॥ स्वानंदें भुलला नाचे गोविंदु ॥ ६ ॥ क्षीरापती सेवितां वैष्णवा लाहो ॥ मुखामाजीं मुख घालितो देवो ॥७॥ क्षीरापती चारा जनार्दनमुखीं ॥ एकाएकीं तेणें होतसे सुखी ॥ ८ ॥

॥ २२८६ ॥ ऐका पुण्यपावन व्रताचें महिमान ॥ आचरतां जन दोष जाती ॥ १ ॥ सर्वांमाजीं सार व्रत एकादशी ॥ रुक्मांगद सूर्यवंशीं करी नेमें ॥२॥ तिथी नेमें व्रत करीत आदरें ॥ पूजन स्मरण जागरे यथाविधी ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं पुण्यपावन व्रत ॥ आदरें आचरत रुक्मांगद ॥ ४ ॥

॥ २२८७ ॥ कांतीपुरीमाजी राजा रुक्मांगद ॥ येकनिष्ट शुद्ध पुण्य गांठीं ॥ १ ॥ सहनशील दया मूर्तिमंत अंगीं ॥ न भंगे प्रसंगीं सत्वधीर ॥ २ ॥ न्यायनीतीं राज्य पाळी ब्राह्मणासी ॥ मूर्तिमंत धर्मासी स्थापियेलें ॥ ३ ॥ दीनाचें रक्षण साधूचें पूजन ॥ संताचें वचन मान्य सदा ॥ ४ ॥एकाजनार्दनीं साधियेला नेम ॥ परी कांहीं कर्म ओढवलें ॥५॥

॥ २२८८ ॥ पुण्यवंत जीवभूमी पुण्यदेश ॥ श्रीहरीची विशेष भक्ति जेथें ॥ १ ॥ जाणोनीयां इंद्र पाठवी विमान ॥ आणवी सुमनें कांतीयेचीं ॥ २ ॥ देवाच्या पूजना सुमनें न मिळतां ॥ राय पाचारीत वनपाळा ॥ ३ ॥ सेवक ह्मणती सायंकाळीं कांहीं ॥ दिसों येत नाहीं रात्रीमाजीं ॥४॥ रात्रीं जाग्रणा बैसले रक्षक ॥ लाविला वृंतारक अग्नी काष्टीं ॥ ५ ॥ सावधान ठाईं जागती सर्वही ॥ विमान तेसमईं आलें तेथें ॥ ६ ॥ तोडिलीं सुमनें गुप्तरूपें त्यांनीं ॥ विमान तों तेथोनी न चलेची ॥ ७ ॥ एकाजनार्दनीं देवदूत कष्टी ॥ न चले त्यांची युक्ति कांहीं केल्या ॥ ८ ॥

॥ २२८९ ॥ उगवला दिन दूत ते धांवती ॥ सांगती रायाप्रती धरिलें चोरां ॥ १ ॥ उगवले कोटीभानु प्रभा तेवीं दिसे ॥ येउनीयां पुसे राजा तेथें ॥ २ ॥ इंद्रें पाठविलें न्यावया सुमनें ॥ तुह्मी पुण्यवंत जाण ह्मणोनीयां ॥ ३ ॥ धन्य ग्राम पुण्यवंत भूमीजन ॥ आह्मालागीं विघ्न कां हें

आलें ॥ ४ ॥ रहावया तुह्मां कोणतें कारण ॥ लागला धूम्र जाण व्रतारकाचा ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं यासी उपाय ॥ पतिव्रता होय येकादशी व्रती ॥ ६ ॥

॥ २२९० ॥ आणविल्या सर्व गांवींच्या युवती ॥ नुचले कल्पांतीं विमान तें ॥ १ ॥ आतां यासी काय करावा उपाय ॥ येरु ह्मणती पाहे ग्रामामाजीं ॥ २ ॥ पतिव्रता होकां भलते यातीची ॥ शुद्ध वासनेची एकनिष्ट ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं घडेल येकादशी ॥ तिचें पुण्य हातीं विमान जाये ॥ ४ ॥

॥ २२९१ ॥ रात्रीं जाग्रण नामस्मरण चित्तीं ॥ घडली जे तिथी येकादशी ॥ १ ॥ तियेचे हातीं विमानासी गती ॥ चालावया पंथीं वेळ नाहीं ॥ २ ॥ तेव्हां पाचारिल्या अन्ययाती नारी ॥ नेणत्या कुमारी होत्या त्याही ॥ ३ ॥ तिळभरी नाहीं चालावया रीग ॥ दवंडी पिटी वेगें शीघ्र राजा ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं निघालिया सर्व ॥ तों तेथें अपूर्व नवलाव ॥ ५ ॥

॥ २२९२ ॥ तरुणी रजकी नूतन यौवनी ॥ बैसली रुसुनी येकांतासी ॥ १ ॥ धुंडुनीया मातें धाडी सासुरीया ॥ तो ह्मणे मी राया ऐसा नोहें ॥ २ ॥ येरी ह्मणे मी तों कुळींची निर्दोष ॥ शुद्ध माझा वंश रजकाचा ॥ ३ ॥ ऐकिला संवाद दौंडीकरें त्याचा ॥ आणि विनोदाचा समाचार ॥४॥ एकाजनार्दनीं धाउनीयां दूत ॥ रायासी ती मात सांगताती ॥ ५ ॥

॥ २२९३ ॥ पाठवुनी दूत आणविलें तिसी ॥ विस्मयो सर्वांसी होता जाला ॥ १ ॥ साशंकीत राजा लावी ह्मणे हात ॥ विमान क्षणांत उचलिलें ॥ २ ॥ धन्य ह्मणे राजा ही माझी प्रजा ॥ रजकाची भाजा धन्य जाली ॥ ३ ॥ सांगे सकळांसी येकादशी करा ॥ हरिदिनीं जागरा निजूं नका ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं सांडोनी अभिमान ॥ तेव्हांची कारण साध्य होय ॥ ५ ॥

॥ २२९४ ॥ निर्धारें नेमेंसी करी येकादशी ॥ तृण जीवन पशूसी घेऊं नेदी ॥ १ ॥ राष्ट्रामाजी रूढी केली हरिभक्ती ॥ दया सर्वांभूतीं समानची ॥ २ ॥ हरिकीर्तनाच्या भरियेल्या रासी ॥ भेदीत आकाशीं पुण्य जाये ॥ ३ ॥ मध्यें आला कांहीं व्रता अंतराय ॥ अपाय तो पाहे मोहनींचा ॥४॥ एकाजनार्दनीं होतां स्त्रीसंग ॥ नेमा होय भंग तात्काळीक ॥ ५ ॥

॥ २२९५ ॥ भुलविला राजा लावण्याच्या तेजें ॥ नेम व्रतराज खोळं-
बिला ॥ १ ॥ राजपत्नी पुत्र नाम धर्मांगद ॥ चालवि सुबुद्ध येकादशी
॥ २ ॥ बहुदिन होतां नकळे रायासी ॥ मोहोनीये पाशीं बांधीयेला
॥ ३ ॥ पुढें आली जाणा तेव्हां हरिदिनी ॥ लोकांलागीं राणी सांगताहे
॥ ४ ॥ धेंडा पिटविला श्रीहरि जागरु ॥ करा निरंतरु निजूं नका ॥ ५ ॥
एकाजनार्दनीं नृपें ऐकिलें कानीं ॥ धिग् ह्मणोनी प्राणी जन्मा आलों ॥६॥

॥ २२९६ ॥ उतरला तळीं टाकियेली शय्या ॥ स्नान केलें तया
शीतोदकें ॥ १ ॥ बैसे घालोनीयां तृणाचें आसन ॥ सारी नित्यनेम यथा-
विधी ॥ २ ॥ नेम भंग जाला वर्जिली मोहिनी ॥ नायके तो ध्यानीं बैस-
लासे ॥३॥ एकाजनार्दनीं अनुतापावांचून ॥ न घडे नामस्मरण कालत्रई ॥४॥

॥ २२९७ ॥ अनुतापें करी नामस्मरण वाचें ॥ तंव मोहिनी येऊनी
साचे कर धरी ॥ १ ॥ आडवी मोहिनी उगवतां दिन ॥ सत्वाचें हरण करूं
पाहे ॥ २ ॥ मज दिली भाक उगवली आजी ॥ प्रतिज्ञा हे माझी खरी
जाली ॥ ३ ॥ देईं मज आज्ञा सोडि कां उदक ॥ सुकृत सम्यक् व्रताचें
तें ॥ ४ ॥ चिंतावला राजा मागे ह्मणे पालटासी ॥ इच्छिले पदार्थांसी
देईन मी ॥ ५ ॥ येरी ह्मणे तुझा कुळींचा दीपक ॥ तो देईं सम्यक् मज-
लागी ॥ ६ ॥ नाहीं चाड मज पदार्थीं अनेकां ॥ कापोनीयां देकां मस्त-
कासीं ॥ ७ ॥ एकाजनार्दनीं राजीया संकट ॥ नसुचे आणीक कांहीं
तया ॥ ८ ॥

॥ २२९८ ॥ धांवे देवा तूं निर्वाणीं ॥ तुजविण नाहीं कोण्ही
॥ १ ॥ भुली पडली विषयसुखें ॥ पात्र जालों महादुःखें ॥ २ ॥ विसरलों
हित ॥ नेणें बुडालें स्वहित ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं ॥ भुललोंसें नाहीं
कोण्ही ॥ ४ ॥

॥ २२९९ ॥ मात कळो सरे पत्नी पुत्रा वेगें ॥ पातलीसे दोघें राया-
पाशीं ॥ १ ॥ गोवियेला राजा दिसे वेडा जाला ॥ राणी बोले तिला माग
काई ॥ २ ॥ येरी ह्मणे शिर तुझीया पुत्राचें ॥ आपुलीये वाचे रायें
दिलें ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं मोहिनीचा शब्द ॥ ऐकोनी धर्मांगद काय
बोले ॥ ४ ॥

॥ २३०० ॥ पित्याचीये काजा देह हें वेंचावें ॥ तेव्हांची बरवें दिसे लोकीं ॥ १ ॥ सरसावला पुत्र ह्मणे मातेप्रति ॥ वांचवी भूपती सत्वाहातीं ॥ २ ॥ तोषला श्रीपती मज ऐसे किती ॥ पुत्र तुह्मा होती सत्वधीर ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं सत्वाचा आगळा ॥ प्रिय तों गोपाळा तोची येक ॥ ४ ॥

॥ २३०१ ॥ वोडवोनी मान आला रायापाशीं ॥ निर्भय मानसीं धर्मांगद ॥ १ ॥ घेउनीयां शस्त्र स्मरला अच्युत ॥ उभारिला हात मारावया ॥ २ ॥ अंतकाळीं केल्या देवाचें स्मरण ॥ तेव्हां नारायण धांव घाली ॥ ३ ॥ धरियेला हात माथा ठेवी कर ॥ ह्मणे माग वर मज कांहीं ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं नाम आलें मुखा ॥ पांडुरंग सखा होय त्याचा ॥ ५ ॥

॥ २३०२ ॥ आश्वासिलें भक्ता दिलें सर्वसुख ॥ बैसविले लोक विमानांत ॥ १ ॥ नारी नर पशु जीव जंतु भूतें ॥ विमानीं समस्तें बैसविलीं ॥ २ ॥ पातली मोहनी ह्मणे देवराया ॥ सांडिसी कां वाया मजलागीं ॥ ३ ॥ कोण अपराध घडलासे मज ॥ दीनानाथ साजे नाम तुह्मा ॥ ४ ॥ इंद्र आज्ञेमुळें छळीयेलें राया ॥ एकाजनार्दनीं पाया लागतसे ॥ ५ ॥

॥ २३०३ ॥ आली कृपा तिची दिधलासे वर ॥ राहे निरंतर मृत्यु लोकीं ॥ १ ॥ पुढें हरिदिनीं जे कोण्ही करिती ॥ द्वादशीसी घेती निद्रा कांहीं ॥ २ ॥ त्याचें पुण्यफळ तुजलागीं प्राप्त ॥ होकां जरी आप्त मज प्रिय ॥ ३ ॥ तया पुण्यें तुझा होईल उद्धार ॥ देउनीयां वर ठेवियेली ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं उक्ती हे भागवतीं ॥ तुह्मां सर्वांप्रती निवेदिली ॥ ५ ॥

॥ २३०४ ॥ सकळ नगरी वाहिली विमानीं ॥ वैकुंठभुवनीं पावविली ॥ १ ॥ करा येकादशी जागर कीर्तन ॥ द्वादशीभोजन द्विजपंक्ती ॥ २ ॥ दिवसा सावध हरिचें चिंतन ॥ रात्रीं जाग्रण कीर्तन सार ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं साधावें हें व्रत ॥ तेणें मोक्ष प्राप्त अर्धक्षणीं ॥ ४ ॥

---

## तीर्थमाहात्म्य.

॥ २३०५ ॥ समुद्रवलयांकित तीर्थ ॥ स्नानें करती जे पवित्र ॥ परी तेथें नसतां भाव ॥ निर्फळ वाव होतसे ॥ १ ॥ ऐसा निर्णय शास्त्रीं ॥ पुराणीं सांगतसे व्यक्ती ॥ तेचि उघड सर्वांप्रती ॥ सांगतसे परियेस ॥ २ ॥

जे शुचिर्भूत शुद्ध मती ॥ ईश्वर मानिती सर्वांभूतीं ॥ ते सर्वदां वसति तीर्थीं ॥ तीर्थें वसती त्यांच्या संगें ॥ ३ ॥ तीर्थी नसतां तीर्थवास ॥ सत्य निष्ठा नित्य निर्दोष ॥ तीर्थीं वसतां पुण्य लेश ॥ न पावे तीर्थ निंदितां ॥ ४ ॥ मत्सर निष्ठुर भूतद्वेष ॥ भजन मार्गींचा उपहास ॥ तीर्थें घेती त्यांचा त्रास ॥ कीटक द्वेष त्या करिती ॥ ५ ॥ काम क्रोध लोभ माया ॥ स्पर्श न करी जयाची काया ॥ तो तीर्थवासी जाणें राया ॥ तीर्थें पाया वंदिती ॥ ६ ॥ नित्य विष्णुस्मरण ॥ वसवी ज्याचें वदन ॥ तोचि तीर्थवासी जाण ॥ तीर्थें चरण वंदिती ॥ ७ ॥ इंद्रिय नियमाचे आसनीं ॥ नित्य माधुर्य बोलली वाणी ॥ अहंकार ज्यांचींये ज्ञानीं ॥ संतचरण सर्वथा ॥८॥ तो सकळ शिष्टांचा धात्रा ॥ तीर्थें करिती त्याची यात्रा ॥ पादोदका लागीं पवित्रा ॥ तीर्थें माथां वोढविती ॥ ९ ॥ तीर्थीं असोनी इच्छारहित ॥ प्रतिग्रहा न वोढवी हात ॥ यथा लाभें संतोषत ॥ तीर्थ रूप जाणावा ॥१०॥ परधनीं अंधत्व जयाचे नयना ॥ परस्त्री पाहतां क्लीवत्व जयाचे मना ॥ परापवादीं मूकत्व जयाचे वदना ॥ तो जनक जाणा तीर्थांचा ॥ ११ ॥ मनें इंद्रियां निग्रह करी ॥ तो गृहीं असतां जान्हवी तीरीं ॥ तीर्थीं असोनि अनाचारी ॥ तो कीटकवासी जाणावा ॥ १२ ॥ सत्यशील दृढव्रती ॥ आत्मभावना सर्वांभूती ॥ क्रोध कंटका नातळे चित्तीं ॥ तो सर्व तीर्थीं सेविजे ॥ १३ ॥ शुद्ध शीळ विद्यातीर्थीं ॥ साधु सुस्नात सत्य तीर्थीं ॥ कुलांगना लज्जा तीर्थीं ॥ पवित्र होती जाणपां ॥ १४ ॥ धनाढ्य निर्दोष दान तीर्थीं ॥ पापीनि पाप गंगा तीर्थीं ॥ क्षत्रिय राजे धारा तीर्थीं ॥ प्रक्षालिती अघातें ॥ १५ ॥ योगी आत्म ध्यान तीर्थीं ॥ आत्मस्वरूप स्वयें होती ॥ श्रवणादीक नव ही तीर्थीं ॥ भक्त होती हरिरूप ॥ १६ ॥ असो या निरोपणाच्या युक्ति ॥ जाणतें अथवा हो नेणती ॥ शरीर प्रक्षालितां तीर्थीं ॥ मोक्षप्राप्ति निर्धारें ॥ १७ ॥ ऋषीश्वरीं वेदवचनीं ॥ महा फळें कल्पी यज्ञीं ॥ तीं यज्ञफळें तीर्थ स्नानीं ॥ वेदवाणी अनुवादें ॥ १८ ॥ शरण एकाजनार्दनीं ॥ सकळ तीर्थें नाम स्मरणीं ॥ घडती संत संघटनीं ॥ तेथें संशय नाहीं ॥ १९ ॥

॥ २३०६ ॥ सकळ तीर्थें उत्तम ॥ घडती करितां नामस्मरण ॥ देवाधि उत्तम ॥ तोही धांवे सामोरा ॥ १ ॥ पहाहो वैष्णवाचे घरीं ॥ सकळ तीर्थें कामारी ॥ रिद्धी सिद्धी मोक्ष चारी ॥ दास्यत्व करिती

सर्वदां ॥ २ ॥ शरण एकाजनार्दनीं ॥ तीर्थांचा तो अधिष्ठानी ॥ नामस्मरण अनुदिनीं ॥ तया तीर्थें वंदिती ॥ ३ ॥

॥ २३०७ ॥ विधी निषेध धरितां मनीं ॥ सहजीं कार्या होय हानी ॥ १ ॥ जे जे वेळे जें जें घडे ॥ विधी निषेध सर्व जोडे ॥ २ ॥ अन्य नाहीं विचारणा ॥ कार्या कारण सर्व जाणा ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं सुण ॥ जाणते ते परिपूर्ण ॥ ४ ॥

॥ २३०८ ॥ तीर्थयात्रेसी जरीं जावें ॥ तरीं पंथची झाला देव ॥ १ ॥ आतां चालावें तें कैसे ॥ जेथें जाय तेथें देव दिसे ॥ २ ॥ येथुनी पाहें जेथवरी ॥ तंव आपची दिसे हरी ॥ ३ ॥ एकाजनार्दना भेटी ॥ येणें जाणें खुंटल्या गोष्टी ॥ ४ ॥

॥ २३०९ ॥ काया हें कैकाट सांडुनियां दूरी ॥ त्रिगुण त्रिवेणी उतरलों पैल पारीं ॥ १ ॥ यापरी झालों अविमुक्तवासी ॥ मुक्तपदी वास आइळ बहळकासी ॥ २ ॥ मनातें करविते मनकर्णीका पहाहो ॥ चैतन्य स्वरूप अखंड प्रवाहो ॥ ३ ॥ वसूविषय करभार घेतसे अहंकार ॥ त्यासी उलटुनीया केले मुक्तक्षेत्र ॥ ४ ॥ सर्व काळीं जाण नवी करणी रक्षण ॥ विश्वेश्वरा सावकाश दर्शन ॥ ५ ॥ एकादशी नव्हें सर्वत्र कासी ॥ एकाजनार्दनीं मुक्त क्षेत्रवासी ॥ ६ ॥

॥ २३१० ॥ गुरूकृपा भागीरथी ॥ यमुना निज शांती ॥ स्वानुभव सरस्वती ॥ गुप्त वाहे ॥ १ ॥ यापरी त्रिवेणी ॥ नित्य माघस्नान ॥ माधवीं दर्शन ॥ महा योग ॥ २ ॥ बोध अरुणोदयीं ॥ स्नानादी मज्जन ॥ अर्ध मात्रा अर्धबिंबी ॥ अर्घ्य दान ॥ ३ ॥ बिजाक्षरीं जपा अक्षर प्राप्ती ॥ माधविं महापूजा निवृती ॥ ४ ॥ सर्वांभूतीं भगवद्भाव संपुर्ण ॥ देवऋषीं पीतरा आब्रह्मस्तर्पण ॥ ५ ॥ व्रत्त उद्यापन वंशपात्र दान ॥ एकाजनार्दनीं पूर्ण माघस्नान ॥ ६ ॥

॥ २३११ ॥ विश्वीं विश्वनाथ आनंदवनीं ॥ चिच्छक्ति सहित पाहीं भवानी ॥ १ ॥ याविधी दरुशण नित्य ते यात्रेसी ॥ नीजभावें करिती क्षेत्रि क्षेत्रवासी ॥ २ ॥ जीव धुंडी विनायक पंचवक्त्र झाला ॥ संतोषोनी शिवें आपणा सम केला ॥ ३ ॥ रमाधव माधव दोनामीं एक ॥ ऐक्य दृष्टी पाहे

दरशनाचें सुख ॥ ४ ॥ बोध दंड पाणी अदटातें दाटितु ॥ दंडपाणी करी अभिमानाचा घातु ॥ ५ ॥ अनुभव भैरव कळी काळा त्रासी ॥ भव भयाचे भय निशेष नासी ॥ ६ ॥ पंचमुखा पासुनी षण्मुख झाला ॥ आत्मरूपें स्वामी कार्तिक केला ॥ ७ ॥ चिच्छक्ती कैसी वाहतुसें गंगा ॥ स्नानमात्रें जाय देह बुद्धी भंगा ॥ ८ ॥ मनातें उद्धरीं मनकर्णीका खरी ॥ उन्मनी मज्जन सुरवरातें तारी ॥ ९ ॥ निज शांती पुर्णतेची अन्नपुर्णा ॥ स्वानंदाची तृप्ती देतसे जाणा ॥ १० ॥ क्षेत्रीं निमालीया मुक्ती दे देवो ॥ न मरतां आह्मां मुक्तपदीं ठावो ॥ ११ ॥ देहींच असतां देहबुद्धि वावो ॥ जीवण्या मरण्याचा फिटला संदेहो ॥ १२ ॥ यापरी शोभत अविमुक्ती वासी ॥ भक्तिमुक्ति देउनी पापताप नासी ॥ १३ ॥ एकाजनार्दनीं पावला ॥ जीव शीव मिळणी अविमुक्त झाला ॥ १४ ॥

॥ २३१२ ॥ एक देसी गहु ब्रह्म गाया शिरीं ॥ बत्थ तारीवो नेदी रज राजकरी ॥ १ ॥ बाहेरी भीतरी सारीखें शुद्ध ॥ पींड पडे तेथें गदाधरपद ॥ २ ॥ पदि पिंड देउनी निरसीलें कर्म ॥ गयावर्ज नाचें हेंची जाणा वर्म ॥ ३ ॥ अनुभवाचेंनि बळें आवरोधु तोंडीला ॥ प्रतिबद्ध तोडुनी गडुची मुक्त केला ॥ ४ ॥ क्षम नाहीं तोची अक्षय वटु ॥ श्रधाश्राधकरुनी संसार शेवटु ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं पींड दान करी ॥ जीव पिंड दिधला जनार्दना- करीं ॥ ६ ॥

॥ २३१३ ॥ गंगा मज्जनी शुद्धस्नान ॥ तेथें जीवना जीवन जनार्दन ॥ १ ॥ कैंची देवोदेवी वानु ॥ आह्मां सकळा सकळु जनार्दनु ॥ २ ॥ सूर्य देवते संध्या वंदनु ॥ सर्व भानुचा भानु जनार्दनु ॥ ३ ॥ ब्रह्मकर्म होम विधान ॥ अग्नी आज्य समीधा जनार्दन ॥ द्विज पुजन अभी वंदन ॥ तोचि ब्राह्मणीं ब्राह्मण जनार्दन ॥ ४ ॥ कूळधर्मी पुजे एकी एकनाथा ॥ तें एकपण जनार्दन माथां ॥ ५ ॥ पितृतर्पण श्राद्धविधान ॥ तव पितरा पितर जनार्दन ॥ ६ ॥ एकाजनार्दनीं अनन्य शरण ॥ तेथें सद्गुरु तोही जनार्दन ॥ ७ ॥

॥ २३१४ ॥ गेला काशी विश्वेश्वरा । सेतुबंध रामेश्वरा ॥ १ ॥ तरी संशयो तुटेना । पूर्व बुद्धि पालटेना ॥ २ ॥ भागिरथी गोदावरी । केली कृष्णा आणि कावेरी ॥ ३ ॥ बद्री ओढ्या जगन्नाथ । केला स्वामी त्रिमळ

नाथ ॥ ४ ॥ धुळेश्वर मोरेश्वर । सिद्धेश्वर सोमेश्वर ॥ ५ ॥ केली पढंरी नरहरी । शंभु पाहिला शिखरीं ॥ ६ ॥ तुळजापूर मातापूर । शृंगी कोल्हापूर ॥ ७ ॥ एकाजनार्दनीं वर्म । पाहे संशय जाळुनी कर्म ॥ ८ ॥ मग संशयतुटती । पूर्व गुण पालटती ॥ ९ ॥

॥ २३१५ ॥ तीर्था गेलों ह्मणोनी सांगे । पाप केलें तें न सांगें ॥ १ ॥ दाढ्या डोयींनीं काय केलें । माण्या मन नाहीं मुंडिलें ॥ २ ॥ नाक धरुनी करिसी जप । जैसें मैंदाचें स्वरूप ॥ ३ ॥ मुद्रा लाउनी चिवडितो अंग । जैसें भोरपियाचें सोंग ॥ ४ ॥ सुसरी सदा गंगावास । सकळा जिवां करिती ग्रास ॥५॥ एका जनार्दनीं नाहीं भाव । काय करील तीर्थराव ॥६॥

॥ २३१६ ॥ मारुती जन्म ॥ मारुती जन्म सुवार्ता नामें स्वर्गीची देवांगना ॥ ब्रह्म शापें जाणा घारी जाली ॥ १ ॥ अयोध्येचा राजा दशरथ नृपति ॥ यज्ञ पुत्रप्राप्ती करविला ॥ २ ॥ शृंगीं पायस पात्र दिधलें वसिष्ठा हातीं ॥ त्वरें करीजेती तीन भाग ॥ ३ ॥ तीन भाग वसिष्ठें करूनी निश्चितीं ॥ दिधलें राणी हातीं तिघी तीस ॥ ४ ॥ कैकई रुसळी तेथें विघ्न जालें ॥ घारीनें तें नेलें निज भागा ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं घारीं पिंड नेतां ॥ पुढें जाली कथा श्रवण करा ॥ ६ ॥

॥ २३१७ ॥ ऋष्यमूक पर्वतीं अंजनी तप करी ॥ आठविला अंतरीं सदाशिव ॥ १ ॥ तपाचीया अंतीं शिव जाला प्रसन्न ॥ मागे वरदान काय इच्छा ॥ २ ॥ येरी ह्मणे तुज ऐसा व्हावा मज पुत्र ॥ ज्ञानी भक्त पवित्र उत्तम गुणी ॥ ३ ॥ ह्मणतसे शिव अंगुळी पसरुनी ॥ बैस माझे ध्यानीं सावधान ॥ ४ ॥ वायुदेव येउनी प्रसाद देईल तुजला ॥ भक्षीका वहिला अवलंबें ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं घारी नेतां पिंड ॥ वायूनें प्रचंड आसुडिला ॥ ६ ॥

॥ २३१८ ॥ घारी मुखींचा पिंड अंजनीच्या करीं ॥ पडतां निर्धारीं भक्षियेला ॥ १ ॥ नवमास होतां जाली ती प्रसूत ॥ दिव्य वायुसुत प्रगटला ॥ २ ॥ वानराचा वेष सुवर्ण कौपीन ॥ दिसती शोभायमान कुंडलें ती ॥ ३ ॥ जन्मतांची जेणें सूर्यातें धरिलें ॥ इंद्रादिकां दिले थोर मार ॥ ४ ॥ अमरपति मारी वज्र हनुवटि ॥ पडिला कपाटीं मेरुचीया ॥ ५ ॥ वायुदेव येवोनी बाळ तो उचलिला ॥ अवघाचि रोधिला प्राण तेथें ॥ ६ ॥

सकळ देव मिळोनी प्रसन्न पैं होती ॥ वरदान देती मारुतीसी ॥ ७ ॥ सर्व देव मिळोनी अंजनीशी बाळ ॥ देतां प्रातःकाळ होतां तेंव्हां ॥ ८ ॥ तिथी पूर्णिमा चैत्र मास जाण ॥ एकाजनार्दनीं रूपासी आला ॥ ९ ॥

---

## नृसिंह जन्म.

॥ २३१९ ॥ श्रीगणेशायनमः ॥ हिरण्यकशिपु असुरनाथु ॥ ब्रह्मांड देवातें द्वेषीतु ॥ त्यासी जन्मला प्रल्हादसुतु ॥ हरीभक्त सर्वस्वें ॥ १ ॥ हेंची प्रल्हादचरित्र ॥ श्रवणें करी जग पवित्र ॥ कथा अभिनव विचित्र ॥ निजचरित्र हरीचें ॥ २ ॥ परिसा प्रल्हादाची ख्याती ॥ दृढ दाविली हरीची भक्ती ॥ नामा पासी चारी मुक्ती ॥ द्वंद्वसमाप्ति हरी नामें ॥ ३ ॥ पिता दैत्य गुरूपाशीं ॥ पढो घातलें प्रल्हादासी ॥ येरु विनटला हरीनामासीं ॥ जीवभक्तीसी विकला ॥ ४ ॥ हरी स्वरूप हृदय मेळीं ॥ श्रीहरी नाम हृदयकमळीं ॥ सर्वभूतीं हरी न्याहाळी ॥ इंद्रियें सकळ हरी नांदे ॥ ५ ॥ गर्भीं असतां प्रल्हादासी ॥ इंद्रें बंदीं धरिलें कयाधुमातेसीं ॥ नारदें उपदेशीलें तयेसी ॥ हरी नामापासी निज मोक्ष ॥ ६ ॥ तोची उपदेशु तत्वता ॥ प्रल्हाद जाहला गर्भीं घेतां ॥ गुरूवचनीं विश्वासतां ॥ द्वंद्व हरिभक्ता न बाधी ॥ ७ ॥ दैत्य गुरू ह्मणती प्रल्हादासी ॥ वेगी लिहीरे ॐ नमोसिद्धासी ॥ येरू ह्मणे ॐकार आलिया हातासी ॥ मग नकारासी ठाव कैचा ॥ ८ ॥ नमन करावें सिद्धासी ॥ मग भिन्नत्व कैसे त्यासी ॥ नकारून शिणवी आह्मासी ॥ ह्मणुनी गुरूसी वंदिलें ॥ ९ ॥ गुरु ह्मणती राज सुता ॥ ऐसें बोलणें ऐकतां ॥ अवश्य कोपेल तुझा पिता ॥ अति निघाता पेटेल ॥ १० ॥ येरु ह्मणे कोप सबाह्य अंतरीं ॥ निखल नांदतो श्रीहरी ॥ कोण कोपेल कोणावरी ॥ चराचरी हरी येकु ॥ ११ ॥ गुरू ह्मणे करूं ताडण ॥ ताडण रूपें हरी संपूर्ण ॥ सद्गुरू तोडी देहाभिमान ॥ तेही ताडण सुखरूप ॥ १२ ॥ ऐकतां प्रल्हादाची कथा ॥ राजा कोपेल तत्वता ॥ लाहाणा नव्हेसीरे सर्वथा ॥ आह्मा भोंवता भोंवसी ॥ १३ ॥ जिवाचा निजजीव रायें परम प्रीतीसी ॥ पाचारूनी प्रल्हादासी ॥ जें जें शिकलासी गुरूपासी ॥ तें तें आह्मासी परि सेविजे ॥ १४ ॥ जेणें सुख होय पढतां ॥ जें तुज आवडे तत्वतां ॥ तें मज सांगावें बा आतां ॥ होय पुसतां नृपनाथु ॥ १५ ॥ हरी

द्वेषीं माझा पिता ॥ हें नाठवें प्रल्हादाच्या चित्ता ॥ सर्वमुनीं निजात्मता ॥ होय देखता सिद्ध ॥ १६ ॥ जें कां सुखरूप सर्वांशीं ॥ जेणें आनंदु प्रल्हादासी ॥ तेंचि सांगें पितयांपासी ॥ उल्हासेसी हरिभक्त ॥ १७ ॥ ज्याचे नीरसें भवश्रमु ॥ तोचि नामें पुरुषोत्तमु ॥ नित्य स्मरावें त्याचें नामु ॥ जें कर्मा कर्मू छेदक ॥ १८ ॥ नित्य ऐकतां ज्याची कथा ॥ समुळ नासे मोहो ममता ॥ सर्व भुतीं त्यातें पाहतां ॥ सुखरूपता सर्वांसी ॥ १९ ॥ सांडुनी देहींचा देहाभिमान ॥ काया वाचा सहित जाण ॥ जनीं भजावें जनार्दन ॥ समाधान सुखदाता ॥२०॥ भावें करावें हरी पूजन ॥ साष्टांगेसी अभीवंदुन ॥ नित्य नमावें साधु सज्जन ॥ अनन्य भजन हरी भक्ती ॥ २१ ॥ हेंची एक निज हितासी ॥ मज मानलें विश्वासेसी ॥ जे सुख दाता सर्वांसी ॥ हृषीकेशी निज भजनीं ॥ २२ ॥ माझीया आवडीची कथा ॥ तुवां पुसलें नृपनाथा ॥ भावें भजावें भगवंता ॥ आणिक सर्वथा नावडे ॥ २३ ॥ ऐकोनी पुत्राचें बोलणें ॥ राजा क्षोभला निज मनें ॥ दैत्य गुरूसी ह्मणे ॥ भलें पढणें पढविलें ॥ २४ ॥ माझीया बंधूचा जीव घातु ॥ समुळ करी जो भगवंतु ॥ त्याचा तुह्मीं केला भक्तु ॥ धन्य पुरुहितु मिळालेती ॥ २५ ॥ गुरू ह्मणती राजनिधी ॥ आमुची दिक्षा नव्हे विधी ॥ पराची त्रिशुद्धी ॥ स्वयें बुद्धीपैं याची ॥ २६ ॥ निशंक याचा परमार्थु ॥ नाहीं कळिकाळासी भितु ॥ आमचा न मानी वचनार्थु ॥ स्वयें बोलतु निजमत ॥ २७ ॥ राजा पुसे प्रल्हादासी ॥ हें कोठें शिकलासी ॥ येरु ह्मणे निजहितासी ॥ शरण गुरुसी रिघालों ॥ २८ ॥ हरिसी न रिघतां शरण ॥ कदां न चुके जन्म मरण ॥ तुवां सांडूनी देहाभिमान ॥ अनन्य शरण रिघावें ॥ २९ ॥ ह्मणसी हरि चुकवी मरण ॥ तरी मज मारितां तुज राखेल कोण ॥ राया न धरिसी अभिमान ॥ हरि आधीन जन्ममृत्यु ॥ ३० ॥ भक्तासी लागतां आघातु ॥ धाया सवें पावे भगवंतु ॥ भक्तावरी निधातु ॥ कर्ता समर्थु तूं नव्हेसी ॥ ३१ ॥ ऐकोनी प्रल्हादाची मातु ॥ क्रोधें जाला कृतांतु ॥ निग्रहें दुताते पाचारितु ॥ पर्वत पालक रायासी ॥ ३२ ॥ प्रल्हाद नेला पडनापासी ॥ सेवक लोटूं भीती त्रासी ॥ येरें स्मरोनी त्या हृषीकेशी ॥ उडी अपेशीं घातली ॥ ३३ ॥ पडणावरुता आणि खालुता ॥ सबाह्य देखें भगवंता ॥ पडणी पडावया पुरता ॥ ठाव रिता नुरेची ॥ ३४ ॥ नाम तारक नरहरी ॥ प्रल्हाद गर्जे राजद्वारीं ॥ राजा दचकला जिव्हारीं ॥ कैश्यापरी वांचला ॥ ३५ ॥ सेवक सांगती रायापासी ॥ पडणी पातु नव्हें प्रल्हा-

दासी ॥ विहंगम गति आहे या पासी ॥ आंग पृथ्वीसी लागेना ॥ ३६ ॥ नवल याची निःशंकता ॥ भय न मनीं पडणी पडतां ॥ ह्मणे मज नरहरी रक्षिता ॥ मृत्यु हरिभक्ता असेना ॥ ३७ ॥ राजा ह्मणे मारा वैरी ॥ दिग्गज प्रेरिलें कोपें करी ॥ गज गर्जोनी चालिले वरी ॥ दांत उरीं हाणावया ॥ ३८ ॥ प्रल्हाद सबाह्य सिंव्हवदन ॥ गज गजबजिलें देखोन ॥ किंकाळिया देत भरलें रान ॥ विस्मीत मन रायाचें ॥ ३९ ॥ प्रल्हाद ह्मणे रायासी ॥ तारिता मारिता हृषीकेशी ॥ तूं वृथा गर्व करिसी ॥ तुज हरी भक्तांसीं ॥ न मारवें ॥ ४० ॥ ऐकोनी प्रल्हादाच्या शब्दां ॥ राजा पेटला प्रबळ क्रोधा ॥ वेगी करारे याच्या वधा ॥ कोपें गदगदा कांपतू ॥ ४१ ॥ तेथें कोटी कोटी पारश्वद ॥ पाठीसी उभे हलायुध ॥ याचा करारे शिरच्छेद ॥ देह विछेदतलि घायें ॥ ४२ ॥ खर्गें वाजती खणखणा ॥ बाण सुटती सण सणा ॥ सर्वांग खिळीती संपूर्णा ॥ वज्र दण दणा वाजती ॥ ४३ ॥ अलंगाईत बाणाईत ॥ सवेग वेगेसी हाणीत ॥ शेली सांभाळीत समस्त ॥ शस्त्र घात सुटले ॥ ४४ ॥ अती तिखट शस्त्रधारा ॥ देखें हरिरूपें साचारा ॥ देहीं सबाह्य हरि सादरा ॥ तया शस्त्रधारा केवी रूपें ॥ ४५ ॥ हत्यारें आदळती हत्यारा ॥ घाय हाणी निष्ठुरा ॥ हृदय फुटोनी वाहे रुधिरा ॥ वीरां चक्कर झणाणिलें ॥ ४६ ॥ धांपा दाटले बहुत ॥ एकाचे उखळले हात ॥ प्रल्हादा नलगे शस्त्र घात ॥ विरीं दांत विचकिलें ॥ ४७ ॥ शस्त्रें हाणिती चौपासी ॥ जेवीं न रूपती आकासीं ॥ प्रल्हादाची दशा तैसी ॥ आंग घायासी आदळेना ॥ ४८ ॥ देतां हरी नामाची हाक ॥ विरीं असंत घेतिला धाक ॥ नरहरी नामें एके एक ॥ मुर्छित देख वीर पडले ॥ ४९ ॥ वीर मूर्छित पडले पाही ॥ प्रल्हाद न मरे शस्त्र घायी ॥ यासी ऱ्यां करावे काई ॥ हा समुद्र डोहीं बुडवारे ॥ ५० ॥ समुद्रामध्यें जळव्रतें ॥ क्रुर सावजें तळपती तेथें ॥ प्रल्हाद घालुनिया तेथें ॥ होडी पळविती नावाडे ॥ ५१ ॥ प्रल्हाद घातला समुद्रांत ॥ समुद्र ह्मणे जालों मी पुनित ॥ हरि भक्ताचे पाय लागत ॥ कृत कृतार्थ मी जालों ॥ ५२ ॥ पूर्व पुण्यें शोधितां चांग ॥ तेणें हरि भक्तांचा होय संग ॥ त्रिविध ताप जालें भंग ॥ सागरू सांग निवाला ॥ ५३ ॥ आपो नारायण साक्षात ॥ तो हरी नांदे प्रल्हादांत ॥ भवाब्धि न बुडवूं शके हरी भक्त ॥ जळाब्धि तेथ केवी बुडवी ॥ ५४ ॥ जाणोनी हरीचा अनन्य शरण ॥ मच्छ मगर महा मीन ॥ प्रल्हादाचे वंदिती चरण ॥ भक्त निर्विघ्न महार्णवीं ॥ ५५ ॥ समुद्र जळ अति दुर्घट ॥ तेथें प्रल्हादासी पाय-

वाट ॥ हरि भक्तासी न होती कष्ट ॥ देव दुर्घट निवारी ॥ ५६ ॥ वेगीं सांगो येती नावाडे ॥ प्रल्हाद आला साहूनीं पुढें ॥ गर्जत हरिनामाचे पवाडे ॥ ब्रीदें पढे हरीची ॥ ५७ ॥ ऐकोनी हरिनामाची ध्वनी ॥ राजा दचके सिंहासनीं ॥ प्रल्हाद आला परतोनी ॥ समुद्रामाजी न मरेची ॥ ५८ ॥ ज्याचेनी विषें ब्रह्मांड जळे ॥ तैसीं आणविलीं सर्पकुळें ॥ प्रल्हादाचें वर्म कळें ॥ लाविती बळें रगडुनिया ॥ ५९ ॥ ज्याचें सर्पा गति गमन ॥ तो प्रल्हाद सबाह्य गरुड वाहन ॥ देखुनी सर्पु नुकलिती वदन ॥ अधोगमन पळाले ॥ ६० ॥ रायासी सांगती सेवक ॥ प्रल्हादासी कळा मुख्य चेटक ॥ महा सर्पाचें बांधलें मुख ॥ कैसेनी विख चढेल ॥ ६१ ॥ यासी संकटीं मारूंजातां ॥ संकटीं स्मरे हा भगवंता ॥ तेणें यासी न बाधे व्यथा ॥ हरि रक्षिता दृढ जाला ॥ ६२ ॥ याचीया घाता उपाय एक ॥ यासी न कळता द्यावें विख ॥ तरी हा मरेल अवश्यक ॥ बळें निःशंक न मरे हा ॥ ६३ ॥ मातृहस्तें भोजन ॥ प्रल्हादासी अन्नपान ॥ ते माता करवी विष प्राशण ॥ तेणें अचूक मरण पावेल ॥ ६४ ॥ राजा जाऊनी एकांता ॥ पाचारूनी निज कांता ॥ कयाधु परम पतिव्रता ॥ पति वचनार्था सादर ॥ ६५ ॥ राजा ह्मणे मी निष्ठुर देख ॥ तुज ऐकतां वाटेल दुःख ॥ तरी आज्ञा करावी अवश्यक ॥ द्यावें विख प्रल्हादासी ॥ ६६ ॥ तुज काय प्रल्हादाची चाड ॥ कीं वैधव्याचें कोड ॥ दोहींमाजी कोण गोड ॥ मनीं सदृढ आवडे ॥ ६७ ॥ येरी ह्मणे राया सर्वज्ञा ॥ जन्मवरी केली नाहीं अवज्ञा ॥ अवश्य करीन आजची आज्ञा ॥ अशुभ प्राज्ञा कां वदतां ॥ ६८ ॥ विष कुपिका घेऊनी माता ॥ देई आज्ञा करीन आतां ॥ हें मज निजस्वार्था ॥ परम पतिव्रता कयाधु ॥ ६९ ॥ मातेनें भोजन देतां ॥ उल्हासु तुझ्या चित्ता ॥ आजी कांवो व्यथा ॥ बाधितसे ॥ ७० ॥ पुढती जेविता ॥ कैं देखेन मागुता ॥ तुझा तुज पिता ॥ विष घाली ॥ ७१ ॥ नवमास वाहिलासी ॥ कष्टीं पाळिलासी ॥ विष द्यावयासी ॥ जालें माता ॥ ७२ ॥ निजपुत्र घाता ॥ नकरवे सर्वथा ॥ तुझ्या गुणाची ममता ॥ मज बांधितसे ॥ ७३ ॥ तुज म्यां निंबलोण ॥ करावें संपूर्ण ॥ तुज आधिं मरण ॥ नयेची मज ॥ ७४ ॥ पतीचें वचन ॥ उलंघु नये जाण ॥ उलंघिता पूर्ण ॥ नरक पात ॥ ७५ ॥ पुत्रा विष देतां ॥ देऊं न शके माता ॥ काय करूं आतां ॥ पुत्र राया ॥ ७६ ॥ कीं कयाधु धांवो ॥ तैसा जाला भावो ॥ निरसुनी पावो ॥ न दिसे मज ॥ ७७ ॥ रूक्मांगद कांता ॥ पुत्र

छेदी माता ॥ एकादशी व्रता ॥ पतिचीया ॥ ७८ ॥ मोहिनी मोहिता ॥ न धरीच ममता ॥ परम पतिव्रता ॥ संध्यावेळीं ॥ ७९ ॥ नाहीं मोह ताठा ॥ निज सत्व चोहटा ॥ नगरीं वैकुंठा ॥ नेली तेणें ॥ ८० ॥ स्थीर स्थीर वो जननीये ॥ उचित तुतें नव्हे ॥ हरी भक्तांसी भय ॥ कां मानि तेसी ॥ ८१ ॥ हरीचा आंखिला ॥ तो न वचे वो गांजिला ॥ तो नव्हे पांगिला ॥ जन्ममरण ॥ ८२ ॥ हरीच्या हरिभक्ता ॥ कदां नव्हे व्यथा ॥ श्रीहरि रक्षिता ॥ सर्वदां त्यासी ॥ ८३ ॥ माते व्यास बोले पुराणीं ॥ पतिवृता चांगुणा ॥ श्रीयाळु अन्नदाना ॥ कांतीयमाजी ॥ ८४ ॥ त्याचा पाहावया भाव ॥ कैलासींचा रावो ॥ कुश्चळ रूपें पाहाहो ॥ अतीतु आला ॥ ८५ ॥ तूं इच्छा भोजन दानी ॥ मी आलोंसे दुरोनी ॥ नरमांस भोजनीं ॥ द्यावें मज ॥ ८६ ॥ तूं तंव लक्ष्मीधर ॥ देसी चोर हेर ॥ तें पाप शरीर ॥ मज भक्षुं नये ॥ ८७ ॥ मज उद्देशें येथ ॥ विकत घेसी दूत ॥ तो करीतां जीव घात ॥ पाप तुज ॥ ८८ ॥ निज मांसदान ॥ श्रीयाळ दे आपण ॥ येरु ह्मणे दात्यातें मारून ॥ मज भक्षु नये ॥ ८९ ॥ तंव बोले चांगुणा ॥ मी देईन आपणा ॥ विचार अनुमाना ॥ नका करूं ॥ ९० ॥ दात्याची जे कांता ॥ ते मागत्याची माता ॥ ते मज सर्वथा ॥ भक्षु नये ॥ ९१ ॥ तुझा येकुलता बाळु ॥ चिलाळु कोमळु ॥ तो मांस कवळु ॥ देई मज ॥ ९२ ॥ येरेवा चिलया ॥ बाहातसे चांगुणा ॥ अतित पाहुणा ॥ तुज लागीं आला ॥ ९३ ॥ तूं विवेकी बाळकु ॥ धर्माचा धारकु ॥ संसार तारकु ॥ जन्मलासी ॥ ९४ ॥ तूं येलोकीं विसावा ॥ परलोकीं निजावा ॥ परब्रह्मींचा ठेवा ॥ जोडुनी दिल्हा ॥ ९५ ॥ हें चिलया ऐकतां ॥ चरणीं ठेवी माथां ॥ ब्रह्मसायोज्यता ॥ अनायासें ॥ ९६ ॥ चतुष्टयोग साधन ॥ तें तुझें भोजन ॥ ब्रह्मसनातन ॥ तुझेनी आह्मां ॥ ९७ ॥ हें सत्य तुझी कथा ॥ जंव नेदी माता पिता ॥ मज तंव सर्वथा ॥ घेऊं नये ॥ ९८ ॥ हें ऐकोनी वचन ॥ माता पिता जाण ॥ अतितासी दान ॥ पुत्र देती ॥ ९९ ॥ मी काय रिस व्याघ्र ॥ फाडुनी खाऊं नर ॥ पचऊनी परिकार ॥ करूनी घाला ॥ १०० ॥ आसुवें न येतां ॥ पुत्र छेदी माता ॥ तो भक्षु शुद्धता ॥ सेव्य मज ॥ १ ॥ देह ममता सुत्र ॥ ते मांस अपवित्र ॥ योगीये पवित्र ॥ नातळती ॥ २ ॥ येक पुत्र लहाणा ॥ तो वधी चांगुणा ॥ शिरेंवीण जाणा ॥ पाकुकरी ॥ ३ ॥ वंचुनिया शिरा ॥ पचवी शरीरा ॥ अतीत अपवित्र ॥ ह्मणोनी नेघे ॥ ४ ॥ तंव बोले चांगुणा ॥ कोपें कायसना ॥

क्षमा योगीजना ॥ अवश्य व्हावें ॥ ५ ॥ सर्वांगा श्रेष्ठ शिर ॥ येरतें अपवित्र ॥ योगीयें साचार ॥ नातळती ॥ ६ ॥ ओवी मंगळेसी ॥ शिर-जरी कांडिसी ॥ तेणें पाकें आह्मासी ॥ तृप्त साच ॥ ७ ॥ सत्वाचें उखळ ॥ धैर्याचें मुसळ ॥ घेऊनी वेल्हाळ ॥ चिलया कांडी ॥ ८ ॥ अतित जेवो सावकास ॥ हेंची धरूनि आस ॥ करितसे उल्हास ॥ निज कांडणीं ॥ ९ ॥ आसु मावोवीय ॥ रडो हांसो नये ॥ ह्मणोनी गोरी गाय ॥ चिलया कांडी ॥ ११० ॥ जीवीं जीवा कांडणें ॥ निज भावें खंडणें ॥ अतीता कारणें ॥ अनन्य भावें ॥ ११ ॥ करूनी पुत्र घाता ॥ किं विन्मुख अतिता ॥ दोन्ही निज स्वार्था ॥ नासुं नये ॥ १२ ॥ इच्छा भोजन दान ॥ तें ब्रह्म सनातन ॥ येणें भावें मन ॥ निष्ठुर केलें ॥ १३ ॥ जीवाचा निजजीव ॥ कांडीतसे पाहे ॥ ह्मणीं माझा घावो ॥ निष्ठुर लागो ॥ १४ ॥ माया मोहाचें रडणें ॥ शुद्ध सत्वाचें हांसणें ॥ अतिता कारणें ॥ गीळीलीं दोन्ही ॥ १५ ॥ मजहुनी वेगळा ॥ केऊता जासी बाळा ॥ निजी निज कळवळा ॥ मीच जाणें ॥ १६ ॥ अतीत आधीं जेऊं ॥ मग मी देईन जीऊ ॥ साक्ष सदाशिऊ ॥ तुज मज ॥ १७ ॥ चिल्लो माझा वाणीया ॥ भरी भाव केणिया ॥ जातसे पेणिया ॥ ब्रह्म सांते ॥ १८ ॥ तुझीये संगती ॥ होईल माझी गती ॥ ह्मणोनी काकुळती ॥ येत असे ॥ १९ ॥ तूं सांडुनिया जीव ॥ होसी सदाशिव ॥ तुझा निज भाव ॥ कळला मज ॥ १२० ॥ तुज-वीण सर्वथा ॥ केवी राहूं आतां ॥ तुझ्या निजपंथा ॥ दावी मज ॥ २१ ॥ तुझीया निजपंथीं ॥ निज भावो सांगाती ॥ सहाय उमापति ॥ सदाशिव ॥ २२ ॥ शिव शिव ह्मणतां ॥ देह होये विदेही ॥ जीणें मरणें नाहीं ॥ निज भक्तासी ॥ २३ ॥ जेवी जळा वेगळीं ॥ तळमळी मासोळी ॥ तेवी तुज वेगळी ॥ पुत्र राया ॥ २४ ॥ तुजमज भेटी ॥ होईल वा वैकुंठीं ॥ जीवींच्या गुह्य गोष्टी ॥ सांगेन तुज ॥ २५ ॥ दृढ सत्व धरूनी ॥ गातसे जनीं ॥ ऐकतांची जनीं ॥ जीऊ नुरें ॥ २६ ॥ निज सत्व निकरू ॥ शिवाभरी भारू ॥ तारावया शंकरू ॥ धैर्य पाहे ॥ २७ ॥ निज धैर्य जाणा ॥ बैसोनी चांगुणा ॥ करी शिर कांडना ॥ ओवीया गाती ॥ २८ ॥ अतिता देखतां ॥ शिर पचवी माता ॥ सांडुनी ममता ॥ धैर्य बळें ॥ २९ ॥ वाढिले ताटीं बोणें ॥ येरू श्रीयाळातें ह्मणे ॥ पातीकरू होणें ॥ तुवां आजी ॥ १३० ॥ तो झाला संकोचित ॥ तंव चांगुणा बोलत ॥ राखावे जी सत्व ॥ धैर्य बळें ॥ ३१ ॥ नवमास-

वरीं ॥ म्यां वाहिला उदरीं ॥ तुह्मा चौपाहारी ॥ जड नव्हे ॥ ३२ ॥ पोटीच्या पोट सुता ॥ येवढी काय चिंता ॥ विन्मुख अतिता ॥ जाऊंने-दी ॥ ३३ ॥ अतितु तींते ह्मणे ॥ तुंवाही बैसणें ॥ येरी तत्क्षणें ॥ ताटीं बैसे ॥ ३४ ॥ तुह्मी दोघें जणें ॥ निपुत्रक पणें ॥ येथें अन्न घेणें ॥ न घडे मज ॥ ३५ ॥ येक पुत्र लहाना ॥ तो दिधला भोजना ॥ तूंची या दुष-णा ॥ लावितोसी ॥ ३६ ॥ तुझी या वचनार्था ॥ विकिले जीविता ॥ कीती सत्व आतां॥ पाहासील ॥ ३७ ॥ तुझेंची करणें ॥ तुंवाची दुषणें ॥ तैं आह्मीं उरणें॥ केवीं स्वामी ॥ ३८ ॥ पुत्रातें नाणिता ॥ ग्रासु ने घे आतां ॥ चिलयातें माता ॥ आळवितसे ॥ ३९ ॥ पुत्राते न देखतां ॥ अतीत जाईल आतां ॥ चिलो माझा वृथा ॥ होईल तेव्हां ॥ १४० ॥ ये काकुलती जाणा ॥ आळवी चांगुणा ॥ कैलासीचा राणा ॥ कृपा करी ॥ ४१ ॥ अतीत विमुख जातां ॥ सत्व नुरें आतां ॥ ऐसींया आकांता ॥ पावे वेगी॥ ४२ ॥ येईबा चिलया चिलया ॥ मी तंव तुझी माया ॥ मायेचीही माया ॥ छेदिली तूवां ॥ ४३ ॥ तूं परमार्थ दिवटा ॥ आलासी माझ्या पोटां ॥ मुक्तीचा दार-वंटा ॥ मुक्त केला ॥ ४४ ॥ तुझेनी पुत्रत्वें ॥ निवाले निश्चित ॥ संसार आह्मातें ॥ सुखरूप जाला ॥ ४५ ॥ तूं कुळभुषण ॥ कीं परब्रह्म निशाण ॥ कीं वंश उद्धारण ॥ जन्मलासी ॥ ४६ ॥ नरमांस भोजनीं ॥ निजात्मा दे-ऊनी ॥ ब्रह्म सनातनीं ॥ क्रिडतोसी ॥ ४७ ॥ तूं अतीताचा दासु ॥ कीं सुखाचा विलासु ॥ मज द्यावया उल्लासु ॥ येई वेगीं ॥ ४८ ॥ तुज लागीं अतीतु ॥ बैसला तिष्टतु ॥ तूं येईबा धांवतु ॥ पुत्र राया ॥ ४९ ॥ तंव अतिता माझारी ॥ चिलया क्रीडा करी ॥ पंच वक्रधारी ॥ अतितु जाला ॥ ५० ॥ बाहे पसरूनी ॥ आलंगी दोघाजना ॥ बाहोनी विमाना ॥ कैला-सा नेला ॥ ५१ ॥ एकाजनार्दनीं ॥ अतीत भोजनीं ॥ अती सत्व देखुनी ॥ उल्हासें शिवु ॥ ॥ ५२ ॥ इति श्रीप्रल्हाद चरित्र प्रथम अध्याय समाप्त ॥

॥ २३२० ॥ श्रीगणेशायनमः ॥ तेणें जीव शीवपणें ॥ देऊनी आपण ॥ निजसुख संपन्न ॥ करूनी स्थापी ॥ १ ॥ भाविकासी पाहो ॥ कैलासीचा रावो ॥ निजपदीं ठावो ॥ स्वयें देतु ॥ २ ॥ प्रल्हाद ह्मणे आतां ॥ तूं तंव माझी माता ॥ व्यर्थ कां ममता ॥ वाढविसी ॥ ३ ॥ विष नव्हे मारक ॥ नरहरि तारक ॥ येणें भावें दुःख ॥ सांडी माये ॥ ४ ॥ वंदूनी तिचे पाय ॥ सांग तुझें काय ॥ मोहें दुःख माय ॥ कां करितेसी ॥ ५ ॥ विषाचें

विषपण ॥ जाण नारायण ॥ भक्तातें मरण ॥ नव्हे माये ॥ ६ ॥ येऊनी तुझ्या उदरा ॥ उद्धारु संसारा ॥ हरिभक्तीचा खरा ॥ निशाण लावूं ॥७॥ भरूनी भक्ती पेटा ॥ किर्तीनें चोहटा ॥ परमार्थाच्या वाटा ॥ वाहात्या करूं ॥ ८ ॥ जन्माजन्मवरी ॥ मरणा मरण मारी ॥ तरीच तुझ्या उदरीं ॥ जन्मलों साच ॥ ९ ॥ हरिनामाचें बळ ॥ दाखवूं अढळ ॥ चंचळ निश्चळ ॥ भाव जाणें ॥ १० ॥ भगवद्भक्ताचा ॥ रक्षिता पैं साचा॥ संसार सुखाचा ॥ करूनी दावूं ॥ ११ ॥ जेणें तुझा धर्म चोख ॥ पित्यासी परम सुख ॥ तेंची अवश्यक ॥ करणें मज ॥ १२ ॥ विषाची पैं वाटी ॥ लावियेली होटीं ॥ घटघटा घोटी ॥ ब्रह्मरूपें ॥ १३ ॥ भक्ता सहाय भगवंत ॥ विष करी अमृत ॥ प्रल्हादासी तेथें ॥ मरण कैंचें ॥ १४ ॥ प्रल्हाद घेतां विख ॥ विषासी जालें सुख ॥ ह्मणे माझे दोष ॥ निशेष गेले ॥ १५ ॥ विष निघे उदरीं ॥ तंव उदरीं नांदे हरी ॥ विषा नुरेची उरी ॥ परब्रह्म जालें ॥ १६ ॥ जाऊनी दोष द्वंद्व ॥ विष जालें शुद्ध ॥ विषा परमानंद ॥ प्रल्हाद सांगे ॥१७॥ विषाचें विषपण ॥ हारपलें पूर्ण ॥ मरणासी मरण ॥ निःशेष आलें ॥ १८ ॥ प्रल्हादाचे चरण ॥ विष वंदुनियां जाण ॥ मरणासी मरण ॥ मरोनी गेलें ॥ १९ ॥ बाप सद्गुरुचा बोधु ॥ कोंदला आनंदु ॥ भक्ता परमानंदु ॥ विष भक्षणीं ॥ २० ॥ तेथें रायाचे पाळती ॥ होते गुप्तस्थिती ॥ तीहीं राया प्रती ॥ सांगितलें ॥ २१ ॥ पतीच्या वचनार्था ॥ कयाधु पतिव्रता ॥ न धरिच ममता ॥ पुत्र मोहो ॥ २२ ॥ प्रल्हादासी देख ॥ माया दिधलें विख ॥ ऐकोनीया सुख ॥ रायासी जालें ॥ २३ ॥ येरु हरिनामें गर्जतु ॥ स्वानंदें डुलतु ॥ राया सभे आंतु ॥ प्रल्हाद आला ॥ २४ ॥ जगा जें हें विख ॥ तें हरिदासासी सुख ॥ तेणें हरिखें देख ॥ नाचतुसें ॥ २५ ॥ हरीचे पवाडे ॥ गर्जे वाडे कोडें ॥ हरिभक्तांपुढें ॥ मरण कैचें ॥२६॥ हरिप्रेमें सुखें ॥ हरिभक्त लाडिके ॥ त्यासी काय दुःखें ॥ बाधिजेल ॥ २७ ॥ हरिनाम निधडे ॥ यमु काळु पाया पडे ॥ हरिभक्ता चहुकडे ॥ हरी रक्षी ॥२८॥ एका जनार्दन ॥ नाम मंत्रें एके ॥ विशेषीं सकळ दुःखें ॥ सुखें सुखरूप जाला ॥ २९ ॥ इति श्रीप्र० च० प्र० २ स० ॥

॥ २३२१॥ श्रीगणेशायनमः ॥ प्रल्हादु राज सभे आंतु ॥ निःशंक हरी नाम गर्जतु ॥ राजा जाला विस्मितु ॥ नाहीं भीतु कळी काळा ॥१॥ प्रल्हादाच्या किर्तनें ॥ तुटलीं कर्मा कर्म बंधनें॥ जप तप ध्यानें ॥ लाजीयेली ॥ २ ॥

यम लोकु पडलारे वोसु ॥ तिळा इतका न मिळे दोषु ॥ यम लोकीं घेतला त्रासु ॥ कासाविस विधी वाद ॥ ३ ॥ येथुनी जावें वैकुंठासी ॥ वैकुंठ आलें तया पासी ॥ वैकुंठीचा हृषीकेशी ॥ भक्ता पासी डुल्तु ॥ ४ ॥ सांडुनिया शेषशयन ॥ तेथें पातला नारायण ॥ देखुनी हरिनाम किर्तन ॥ त्रिनयन नाचतु ॥ ५ ॥ हरुषें करितां हरिकिर्तन ॥ चहुं वेदा पडलें मौन्य ॥ शास्त्रें बुझावलीं पूर्ण ॥ बाणली खुण मति वादा ॥ ६ ॥ दैत्यपुत्र जी सकळ ॥ जाले हरिभक्त केवळ ॥ वाजविती टाळ घोळ ॥ अति विव्हळ हरिप्रेमें ॥ ७ ॥ नयनीं आनंद अश्रुधारा ॥ रोमांचीत ते स्वेदवरा ॥ हरुषें कांपती थरथरा ॥ अभ्यंतरा हरि आला ॥ ८ ॥ हृदयीं नसंडे स्वानंदु ॥ कंठीं बाष्प आंगीं स्पंदु ॥ असुर पुत्रासी आल्हादु ॥ परमानंद दैत्यासी ॥ ९ ॥ निवडी विकल्पाचे भेद ॥ छेदी अविद्येचे कंद ॥ भक्त प्रल्हादा अगाध ॥ निजानंद किर्तनीं ॥ १० ॥ प्राण पांगुळला जेथींचा तेथें ॥ राजसभा जी तटस्थ ॥ लोकपाळ जी समस्त ॥ द्रवित चित्त ते जाले ॥ ११ ॥ अति कोपें कांपतु ॥ दांत कर करा पैं खातु ॥ यासी घालारे अग्नी आंतु ॥ धरा समस्त अति वेगें ॥ १२ ॥ नाहीं काष्टाची सामुग्री ॥ घेडें पिटिलें घरो घरीं ॥ काष्ट घेऊनी शिरीं ॥ यावें नर नारी समस्त ॥ १३ ॥ हेची आज्ञा समस्ता ॥ भ्राता पिता हो चुलता ॥ काष्ट भारे नाणिता ॥ तेही सर्वथा दंडावें ॥ १४ ॥ आह्मी पार्शदशस्त्र धारी ॥ काष्ट भार नेघों शिरीं ॥ राजदूत हाणिती तोंडावरी ॥ विंटबु भारी त्या करिती ॥ १५ ॥ अरे मी रायाचा मेव्हणा ॥ आजी आलोंसे पाहुणा ॥ दूत करिती ताडणा ॥ काष्टें आणा राज आज्ञा ॥ १६ ॥ वोहरें मिरवती जरी ॥ काष्टें वाहतीं नोवरा नोवरी ॥ वर माय वोहमाय करवली करीं ॥ काष्टभारें चालविती ॥ १७ ॥ वरबाप वोहबाप दोघे व्याही ॥ काष्टें वाहे नवाजांवाई ॥ वऱ्हाडणी त्यांही ॥ काष्टें लवलाहीं वाहती ॥ १८ ॥ कालीं आठांगुळें केलें होतें ॥ आजीं वाणें देऊं आलें येथें ॥ राजदूतीं धरूनी येथें ॥ वेगी काष्टातें वाहविती ॥ १९ ॥ गाड्या येव्हढें पोट ॥ काष्टें वाहतां होती कष्ट ॥ धापा न चालवे वाट ॥ ह्मणे हो तळपट रायाचें ॥ २० ॥ आह्मी पुरोहित राज पुजीता ॥ काष्ट भार नेघों सर्वथा ॥ मागलिया ऐसी न चले सत्ता ॥ भीड न राखता धुमसिती ॥ २१ ॥ शेटे महाजन वेव्हारे श्रेष्ट ॥ जोतिषी विद्वान ज्ञाते भट ॥ यांचे पाठीसी वाजती सोट ॥ काष्टे घडघडाट वाहविती ॥ २२ ॥

शोधितां न मिळे काष्टमुष्टी ॥ घर मोडिता काष्टा साठी ॥ खांब पाडिती मोहटी ॥ थोर अटाटी नगरांत ॥ २३ ॥ दिनें वृद्धें अशक्तता ॥ चालों न शकती सर्वथा ॥ काष्टें देऊनीयां माथां ॥ राजसत्ता चालविती ॥ २४ ॥ काष्ट वळसा होतो भारी ॥ दूत करिताती मारामारी ॥ शंख स्फुरणें घरोघरीं ॥ नर नारी कळकळती ॥ २५ ॥ पुत्र जाला हारि भक्तु ॥ रागें त्यातें मारूं पाहातु ॥ रायासी जाला सन्निपातु ॥ हा निश्चितु मरेल ॥ २६ ॥ काष्ट राशी रचिल्या सबळा ॥ अग्नी लाविला एकवेळां ॥ ज्वाला पेटलिया प्रबळा ॥ अंतराळा लागती ॥ २७ ॥ प्रल्हाद नेतां अग्नी आंतु ॥ हातीं धरूनी नये नेतां ॥ उल्हाट यंत्र होय रचिता ॥ दीर्घ कष्टता उंच पातु ॥ २८ ॥ पालडा बैसविलें प्रल्हादासी ॥ घाय हाणितीं कळेपासी ॥ कळा नुकळे बहुतांसी ॥ कुशळतेसी हाणीती ॥ २९ ॥ रायासी सांगती सेवक ॥ तुह्मा देखतां केले चेटक ॥ यंत्र कळेचें खिळिलें मुख ॥ यासी सेवक काय करिती ॥ ३० ॥ राजा ह्मणे प्रल्हादासी ॥ कां रे खिळिलें यंत्र कळेसी ॥ येरू ह्मणे तूं विवेकी नव्हेसी ॥ कोपें केलासी अविवेकु ॥ ३१ ॥ पित्यासी अग्नि देता ॥ अथवा पुत्रासी कां पिता ॥ येरासी नाहीं अधिकारता ॥ यंत्र या अर्था नुखळेचि ॥ ३२ ॥ घालावया अग्नी आंतुते ॥ मी तूतें कीं तूं मातें ॥ यालागी तूं आपुलेनी हातें ॥ यंत्र कळेते हाणावे ॥ ३३ ॥ तुझीयेनी हातें यंत्रमुख ॥ नुखळे तैं म्यां केलें चेटक ॥ राजा उठला अवश्यक ॥ जीवीं धुकधुक धाकाची ॥ ३४ ॥ मज तंव श्रीहरि रक्षिता ॥ भय नाहीं जी सर्वथा ॥ बैसला यंत्र कळेच्या माथां ॥ होय हाणिता नृपनाथु ॥ ३५ ॥ घाव हाणिता कळेसी ॥ पालडें उडालें वेगेसी ॥ प्रल्हाद लागला गगनासी ॥ ज्वाळा चौपासी कवळिती ॥ ३६ ॥ प्रल्हाद पडे अग्नि आंत ॥ अग्नी ह्मणे करीन शांत ॥ तुजची निश्चित ॥ वांचवीन ॥ ३७ ॥ प्रल्हाद ह्मणे इंद्रातें ॥ तुज सामर्थ्य कैचें येथें ॥ येरु ह्मणे दिधलें भगवंतें ॥ तोची हरि मातें रक्षील ॥ ३८ ॥ यम पातला प्रल्हादापासीं ॥ आतां विझवीन अग्निसी ॥ मी तुज राखेन अनायासीं ॥ जरी तूं देशी आज्ञा मज ॥ ३९ ॥ प्रल्हाद ह्मणे प्रेतनाथा ॥ तुज कैची सामर्थता ॥ येरु ह्मणे मज श्रीहरि दाता ॥ तोचि निजभक्ता रक्षिल ॥ ४० ॥ वायु वरुण इंद्र कुबेर ॥ प्रल्हादरक्षणीं अति तत्पर ॥ तो नव्हें देवाचा किंकर ॥ दृढ निर्धारु हरिचा ॥ ४१ ॥ प्रल्हाद पडतां अग्नी माथां ॥ ज्वाळा लागती शीतळता ॥ अग्नी भितु भगवद्भक्ता ॥ चरणीं माथा वांदितु ॥ ४२ ॥ अग्नी निज तेज

भगवंत ॥ प्रल्हाद पूर्ण भगवद्भक्त ॥ यालागीं नव्हे तो संतप्त ॥ स्वानंद युक्त प्रल्हादु ॥ ४३ ॥ अग्नी कल्लोळ ताप संताप ॥ प्रल्हादासी तें सुखरूप ॥ अवघें देखे विश्वरूप ॥ हरि सदृश तुष्टला ॥ ४४ ॥ बाप प्रल्हादाची भक्ति प्रताप ॥ अग्नी ह्मणे मी जाळोनी पाप ॥ हरले माझे त्रिविध ताप ॥ ताप संताप निमाले ॥ ४५ ॥ प्रल्हादाच्या अंग संगती ॥ अग्नीस जोडे सुख संपत्ती ॥ अगाध महिमा भगवंतभक्तीं ॥ जाली उपशांती अग्नीसी ॥ ४६ ॥ जंवजंव पुट दिजे सुगंध ॥ तंव तंव सोनें होय अग्नी शुद्ध ॥ तैसा अग्नी माजी प्रल्हाद ॥ शुद्ध निज भोगीतसे ॥ ४७ ॥ अग्नीच्या ज्वाळा अति प्रबळ ॥ लागतां पळती लोक सकळ ॥ प्रल्हादासी सुख कल्लोळ ॥ हरि केवळ तुष्टला ॥४८॥ प्रल्हाद अग्नीसी न भीई सर्वथा ॥ होय हरिनाम गर्जता ॥ अखंड हरि हरि वदतां ॥ भय हरिभक्ता असेना ॥४९॥ धरूनी आणा प्रल्हादासी ॥ सेवक ह्मणती भ्रम रायासी ॥ ज्वाळा लागल्या आकाशासी ॥ अग्नी पासी कोण रिघे ॥ ५० ॥ प्रल्हाद ह्मणे रायासी ॥ अमरत्वाचा गर्व धरिसी ॥ वेगी येऊनी मज पासी ॥ धरूनी केशीं नेईंपां ॥५१॥ ऐसें बोलतां प्रल्हादा ॥ राजा कांपतु गदगदा ॥ येरु हांसें खदखदा ॥ पावोनी वरदा भया भिसी ॥ ५२ ॥ वरदें अमर झालासी ॥ शेखी मरणासी भितोसी ॥ दृढ निश्चयो नाहीं तुज पासी ॥ कैंवी द्वेषिसी देवातें ॥ ५३ ॥ ज्याचेनि नामें दुःख छेदन ॥ समूळ निरसे जन्ममरण ॥ त्यांहीं हरीसी रिघे पा शरण ॥ द्वेषाभिमान कां करिसी ॥ ५४ ॥ राजा ह्मणे प्रल्हादासी ॥ तुज उचित येणें मज पासी ॥ येरू नुल्लंघी पितृवचनासी ॥ येऊनी चरणासी लागला ॥ ५५ ॥ राजा उदीत घावया खेंव ॥ येरु ह्मणे घे पां हरीचें नांव ॥ हरि चरणीं ठेविसी भाव ॥ मज तुज पाहो मिळती तेव्हां ॥ ५६ ॥ कोणें ठायीं तुझा हरि ॥ तो मज दाखवी झडकरी ॥ तुज आधिं त्यातें संव्हारीं ॥ मग मारीन तुज लागी ॥ ५७ ॥ जळीं स्थळीं माझा हरि ॥ तोची या तेजा भीतरीं ॥ गगन सबाह्य अंतरीं ॥ चराचरी हरि नांदे ॥ ५८ ॥ जो ह्मणवितोंसी वैरी ॥ तो हरि नांदे तुज माझारिं ॥ तुझ्या इंद्रिय व्यापारीं ॥ वर्ततु हरि निजतेजें ॥ ॥ ५९ ॥ जो मी ह्मणवितो भक्त ॥ तो हरि नांदे मजही आंत ॥ भक्ता सबाह्य भगवंत ॥ विघ्न घातु निवारकु ॥ ६० ॥ अचेतन ह्मणसी हरि ॥ तो आहे या खांबा भीतरीं ॥ राजा ह्मणें छळणें करी ॥ येरू पाचारी ह्मणे त्यासी ॥ ६१ ॥ जरी तो नये पाचारितां ॥ तरी मी दाखवीन तत्वता ॥ क्षणीं तूं राहसी दुश्चिता ॥ तो मागुता जाऊं-

नेदी ॥ ६२ ॥ भीतरीं प्रबळ बळें अति दुर्धरु ॥ आदट वीरांचा दळभारु ॥ हरि एकला एकांगवीरू ॥ मज समोरु केंवी राहे ॥ ६३ ॥ कवच टोप बाणलें शिरीं ॥ सन्निध जाला असूर भारी ॥ रागें खांबातें पाचारी ॥ तंव भीतरीं गुरगुरिला ॥ ६४ ॥ अवचट फुटली आरोळी ॥ वीर मूर्छित पडले भूतळीं ॥ काळ कांपत चळचळीं ॥ दांतखिळी कृतांता ॥ ६५ ॥ रागें गड गड गडीला ॥ खांब कड कड कडीला ॥ महा मेरू तडाडीला ॥ दचकला अंतकु ॥ ६६ ॥ निघती तेजाच्या आह्या ॥ विजा जाती करपोनियां ॥ चंद्र सूर्य भुलले ठाया ॥ होती लाह्या नक्षत्रांच्या ॥ ६७ ॥ पृथ्वी तडतडा उडत ॥ समुद्र कडकडा कढत ॥ गिरी पर्वत कडे पडत ॥ उकडत नभ तेजें ॥ ६८ ॥ रागें देताहे हुंकारा ॥ गदा युद्धें भासुरा ॥ पडले कोटी कोटी वीरा ॥ वाहे रुधिर भडभडा ॥ ६९ ॥ हिरण्यकशिपु ते काळीं ॥ सरसाऊनी बाहे आफळी ॥ पतंग जैसा दीपमेळीं ॥ हरि जवळी झेंपावे ॥ ॥ ७० ॥ उग्र तेज अति उद्भट ॥ देखोनि हाणें सुभट ॥ नखें खर्गें झाली पिठ ॥ वीर आदटें थरारिला ॥ ७१ ॥ सर्वेची हाणुं जाये घावो ॥ तो मृत्यु समयो पाहे देवो ॥ असुर साधुनियां आवो ॥ हाणों पाहो धांविन्नला ॥ ७२ ॥ मरण विसरोनी पतंगीं ॥ जेवीं आलिंगुं धांवे आगीं ॥ तेंवी वज्र घेवोनी वेगीं ॥ नरहरीच्या आंगीं आदळला ॥ ७३ ॥ रागा पेटलें पैं दोघे जणें ॥ वीरा होतसे झोंट धरणें ॥ चपेटे आदळती सत्राणें ॥ अशुद्ध धरणीं निथळत ॥ ७४ ॥ राजा चुकवुनी चपेटें ॥ सत्राणें उडताहे उद्भटें ॥ हातीं सांपडला अवचटें ॥ बळें सुभटे न सुटेची ॥ ७५ ॥ दादा रोऊनियां निकटा ॥ रागें फोडिलें कंठा ॥ अशुद्ध घेतसे घटघटा ॥ नेत्रवाटा धगधगीती ॥ ७६ ॥ अचाट क्रोधाची पैं लीळा ॥ उदर फोडिलें हेळा ॥ काढूनियां अंत्रमाळा ॥ घाली गळा गुरगुरीत ॥ ७७ ॥ प्रल्हाद ऐसें भक्तरत्न ॥ अभ्यंतरीं असेल आन ॥ यालागीं सिंहवदन ॥ उदर धांडोळितसे ॥ ७८ ॥ घरांत ना बाहेरी ॥ धरणीवरी ना निर्धारी ॥ असूर धरूनी मांडीवरी ॥ नखाग्रीं विदारिला ॥ ७९ ॥ शत्रु मारिला उठाउठी ॥ प्रळय रुद्र निवटी दृष्टी ॥ महा प्रबळ तेज उद्भटी ॥ गेली सृष्टि ब्रह्मा ह्मणे ॥ ८० ॥ दिव्य तेज नरसिंव्ह देवो ॥ विदारिला असुर रावो ॥ धाता धाकतसे पाहो ॥ अकळ प्रळयो मांडला ॥ ८१ ॥ उग्र तेजाचिया राशी ॥ आदळती आकाशीं ॥ महेश होतसे कासाविसी ॥ शांत हृषीकेशी केवी होय ॥ ८२ ॥ नरहरि करावया शांत ॥ रमा पाठविली तेथ ॥

देखोन उग्रतेज अद्भुत ॥ पडे मूर्छित जगदंबा ॥ ८३ ॥ विघ्न करी जो निर्विघ्न ॥ तो पाठविला गजवदन ॥ देखोनिया सिंहानन ॥ कंपायमान तो झाला ॥ ८४ ॥ देखोन सिंव्हवदन वितंड ॥ गणेश लपवी आपली सोंड॥ नवळवे सोंड प्रचंड ॥ धाके उलंडे गडबडी ॥ ८५ ॥ शांत करावया हृषी-केशी ॥ मग विनविलें प्रल्हादासी ॥ येरु निघाला त्वरेसी ॥ हरि प्रेमेसी नाचतु ॥ ८६ ॥ गर्जतु हरिनामाचे घोष ॥ आला नरहरि सन्मुख ॥ चरणां लागला निःशंक ॥ अत्यंत सुख हरीसी ॥ ८७ ॥ जेवी कां पिलें सिंहा पासीं ॥ देखोनी भय उपजे सर्वांसी ॥ पिलें रिघतां कासेसी ॥ निर्भयतेसी निःशंक ॥ ८८ ॥ तेवीं भयानक हरि दारुण ॥ प्रल्हादु तेथें निर्भय जाण ॥ स्नेहें चाटी सिंहवदन ॥ कृपा पूर्ण भक्तावरी ॥ ८९ ॥ सांगरे कवणाते संव्हारूं ॥ कवणाचा मी घोट भरूं ॥ कवण दुष्ट जीवें मारूं ॥ गर्जतु थोर कैवारें ॥ ९० ॥ जो जो माझ्या निज भक्तासी ॥ द्वेषी त्रासी कां उपहासी ॥ त्या दुष्टातें सगळें ग्रासी ॥ मद्भक्तासी कोण पाहे ॥ ९१ ॥ प्रल्हाद लागला पायासी ॥ शांत व्हावें हृषीकेशी ॥ निज उग्रतेज स्वयें ग्रासी ॥ सेव्य सर्वांसी हरि जाला ॥ ९२ ॥ देव करिती जयजयकार ॥ वरुषती सुमनाचे भार ॥ रमा धाविन्नली सुंदर ॥ बैसे सत्वर अर्धांगीं ॥ ९३ ॥ नरहरि ह्मणे प्रल्हादातें ॥ दृढ विश्वासें स्मरिलें माते ॥ जे जे भावें स्मरति तूतें ॥ विघ्न सातें शिवों नेदी ॥ ९४ ॥ स्मरतां प्रल्हादाचें नाम ॥ नामें होती नित्य निःकाम ॥ सबाह्य कोंदें आत्माराम ॥ परब्रह्म स्वयें होती ॥ ९५ ॥ या लागीं हरिपरिस हरि दासाचें ॥ नाम तारक होय साचें ॥ जे जे भक्त होती हरिदासाचे ॥ त्यासी कैचें भवभय ॥ ९६ ॥ भक्त लडिवाळ हरिचे ॥ सांची सेवा हरीसी रुचे ॥ भक्त जालिया भक्ताचे ॥ जन्म मरणाचें भय नासे ॥ ९७ ॥ हरिभक्ताचे जे भक्त ॥ ते जाणा नित्य मुक्त ॥ भक्त सेवा श्रीभगवंत ॥ भव भय तेथें रिघों नेदी ॥ ॥ ९८ ॥ एका जनार्दनीं नाम ॥ भक्तकाम कल्पद्रुम ॥ निवारी भव भयाचा श्रम ॥ भवभ्रम उरों नेदी ॥ ९९ ॥

॥ २३२२ ॥ शांत शांत ह्मणे प्रल्हादु ॥ सकळीका देवा जाला आल्हादु ॥ फिटला भय कंप परिमार्जती स्वेदु ॥ करीताती पुष्प वृष्टी होत परमानंदु ॥ १ ॥ जय देवा नरहरी जय अभीनव थोरी ॥ भक्ति भावा भुलला करिसी आपणासरी ॥ ध्रु० ॥ देहाभिमानी या उग्र दे

दृष्टी ॥ प्रल्हादासी तेणें होतसे पुष्टी ॥ लुंटतु तुज माजी देखे समान सृष्टी ॥ बैसविल्या निजपदीं केली आपणासी गांठी ॥ २ ॥ उजळोनी आरती आलीसे लिळा ॥ वोवाळावया हे सिंधु बाळा ॥ पाहतां न निवडेचि देव भक्त वेगळा ॥ अभिन्न ठक पडिले दिसे एकचि डोळा ॥ ३ ॥ नरहरी पाहतां दिसे प्रल्हादु ॥ प्रल्हादु पहाता दिसे गोविंदु ॥ भुललें ह्मणे रमा पडियेला दृष्टींबिंदु ॥ नेत्र लाउनि राहे तरी तोचितो बोधु ॥ ४ ॥ गजबजली रमा उघडोनी पाहे ॥ तंव ते अखंड दिसताहे ॥ पाठिमोरी होऊनि निघो जाये ॥ मुकली आप आपणा नलभे देहाचि सोये ॥ ५ ॥ दीप दीप्ती प्रभा झालीं एक ॥ आरती उजळणें ठेले निःशेष ॥ कोंदले निजतेज आनन दिसे देख ॥ दैदिप्यमान देवो स्मरणें सांडिली भाष ॥ ६ ॥ देवभक्त रमा एकचि झाली ॥ या परी त्रिपुटी ऐक्यासी आली ॥ ऐक्याचें एकपण पाहतां मिठी पडली ॥ एका जनार्दनीं सेवा फळासी आली ॥ ७ ॥

॥ २१२३ ॥ नामें गर्जत निघडा ॥ देखोनि प्रल्हाद पै पुढा ॥ दैत्य कोपला वेगाढा ॥ कोणी कडा नरहरी ॥ १ ॥ येरु हरी नामीं नेटक ॥ करीत नामाचें पै घोक ॥ बोलती निर्भय निःशंक ॥ अवघा देख हरि असे ॥ २ ॥ माझा देव नाहीं दुरी ॥ तुज मजही भीतरीं ॥ सकळ जंगमीं स्थावरीं ॥ चरा चरीं हरी असे ॥ ३ ॥ भक्त कैवारी नरहरी ॥ स्वस्थ मरगजाभीतरीं ॥ भवगजातें निवारी ॥ जो नरहरी गर्जिन्नला ॥ ४ ॥ पैल पातला उद्भट ॥ सिंहवदन निकट ॥ मारीत अद्वैताचापट ॥ भरी घोट द्वैताचा ॥ ५ ॥ अनंत एक वाट ॥ कोटी सूर्याचें निजपीठ ॥ तैसें तेज पैं उद्भट ॥ झालें प्रगट अस्माई ॥ ६ ॥ निघती तेजाच्या आह्या ॥ चंद्रसूर्य गेले वायां ॥ होत नक्षत्रांच्या लाह्या ॥ भक्त साह्या हरी आला ॥ ७ ॥ तडातड केले गिरीवर ॥ कढत सप्तही सागर ॥ उकडत चराचर ॥ अति दुस्तर हरितेज ॥ ८ ॥ अहळतसे अंपुटी ॥ कूर्म पोळला पृष्ठीं ॥ ब्रह्मा धाकताहे पोटीं ॥ गेली सृष्टी पैं वाया ॥ ९ ॥ अति उद्भट प्रकाशु ॥ ब्रह्मादिकी घेतला त्रासु ॥ थरी कांपे कैलासु ॥ महेशु दचकला ॥ १० ॥ बाण सुटती सण सणा ॥ शस्त्रें वाजती खण खणा ॥ निशाणें लागलीं दण दणा ॥ काळ कळणा मांडली ॥ ११ ॥ शिरें तोडितु तडतडा ॥ होत अशुद्धाचा सडा ॥ रुधिर वाहात भडभडा ॥ रण रगडा खवळला ॥ १२ ॥

सिंहवदन विशाळ ॥ भयंकर अति विक्राळ ॥ नेत्रींहुनी निघती ज्वाळ ॥ झरे लाळ अति कोपें ॥ १३ ॥ दैत्य अतिबळें उद्भट ॥ धरिला मारूनि चपेट ॥ रागें भरीताहे घोट ॥ वाजे कंठ घुरघुरा ॥ १४ ॥ दाढा व्यंकटा विक्राळा ॥ घोरे घुरघुरीत गळा ॥ नखें फाडुनि करवाळा ॥ अंतरमाळा पैं काढी ॥ १५ ॥ रणीं खवळला नरहरी ॥ भक्तशत्रुतें विदारी ॥ हाक फुटली अंबरीं ॥ जानुवरी धरियेला ॥ १६ ॥ प्रल्हादा ऐसें रत्न ॥ उदरीं असेल पैं आन ॥ उदर धांडोळी आपण ॥ भक्तजन कृपाळु ॥ १७ ॥ क्रोध न समाये पोटीं ॥ सृष्टीं घालू पाहे मीठी ॥ रमा पळाली उफराठी ॥ भयें पोटी कांपत ॥ १८ ॥ उग्रतेज हृषीकेशी ॥ भय सूटलें दोघासी ॥ कोण शांत करील यासी ॥ प्रल्हादासि धाडिलें ॥ १९ ॥ येरू निःशंक मानसीं ॥ सन्मुख आला देवापासी ॥ स्नेहें चाटितु तयासी ॥ निज वत्सासी जेवी धेनू ॥ २० ॥ जो जो गांजील भक्तासी ॥ त्यातें समूळ मी ग्रासी ॥ प्रल्हाद लागला पायासी ॥ निज क्षोभासी आवरी ॥ २१ ॥ ऐकोनि निजभक्त वचन ॥ शांत झाला सिंहानन ॥ एका जनार्दना शरण ॥ साह्यपूर्ण भक्ताचा ॥ २२ ॥

॥ २३२४ ॥ दिव्य रूप तुझे स्वरूप शुद्ध ॥ शस्त्रें न तुटे प्रल्हाद ॥ वाचे घेतलासे छंद ॥ ह्मणे हरी गोविंद गोविंद ॥१॥ हरी गोविंदा ह्मणतां सुख ॥ विष घेतल्या न मानी दुःख ॥ २ ॥ हरी गोविंद भरला अंगीं ॥ प्रल्हाद न पोळेची आगीं ॥ ३ ॥ हरी गोविंद जाले दिंभ ॥ स्तंभीं प्रगटला स्वयंभ ॥ ४ ॥ एका जनार्दनीं ॥ हरी गोविंद ध्यानीं मनीं ॥ ५ ॥

---

# रामलिला.

॥ २३२५ ॥ सुंदर तें ध्यान मांडीवरी घेऊनी ॥ कौसल्या जननी गीतीं गाये ॥ १ ॥ सुंदर तें ध्यान नंदाच्या अंगणीं ॥ गोपाळ गौळणी खेळताती ॥ २ ॥ सुंदर तें ध्यान चंद्रभागे तटीं ॥ पुंडलीका पाठीं उभें असे ॥ ३ ॥ सुंदर तें ध्यान एकाजनार्दनीं ॥ दत्त जनीं वनीं भरलासे ॥ ४ ॥

॥ २३२६ ॥ श्रुति शास्त्रांसी दूरी परमात्मा श्रीहरि ॥ तो दशरथाचे घरीं क्रीडत राम ॥ १ ॥ क्षण येक नमस्कारा नातुडे तो सुरवरा ॥ तो रिसांआणि

वानरां क्षेम देतो राम ॥ २ ॥ चरणीं शिळा उद्धरी नामें गणिका तारी ॥ तो गौळियाचे घरीं पाहुणा राम ॥ ३ ॥ शिवाचें निज ध्येय वाल्मीकाचें गुह्य ॥ तो भिल्लणीचीं फळें खाय राम ॥ ४ ॥ न कळे ध्यानीं मनीं नातुडे जो चिंतनीं ॥ तो वानरांच्या कानीं गोष्टि सांगे राम ॥५॥ एकाजनार्दनीं एका श्रीराम निज सखा ॥ वानरें वनचरें फुका तारियेली ॥ ६ ॥

॥ २३२७ ॥ रावण ह्मणे नवल चोज ॥ माझें कटक पारखें मज ॥ अश्व आणि नर गज ॥ रामजी स्वयें ॥ १ ॥ निशाचर वीर ॥ राम जाले साचार ॥ राम रूपें वानर ॥ सरसावले ॥ ध्रु० ॥ युद्धीं ठक पडिलें लंकानाथा ॥ जीऊचि पारिखा आतां ॥ इंद्रियांची सत्ता ॥ राम रूप जाली ॥ २ ॥ शस्त्रांचें तिखटपण ॥ राम जाला आपण ॥ शत्रुमित्र संपूर्ण ॥ रामस्वयें ॥ ३ ॥ युद्धीं पारखें अंतःकरण ॥ मन जालें उन्मन ॥ अहं तें सोहं जाण ॥ होऊनी ठेलें ॥ ४ ॥ चित्त जालें चैतन्य ॥ बुद्धि ते समाधी धन ॥ देह तो विदेहपूर्ण ॥ राम जाला ॥ ५ ॥ रामें पारखे केलें लंका गड ॥ दृढ राम जाला दुर्ग आगड ॥ न झुंजतां अवघड ॥ घेतला रामें ॥ ६ ॥ रामें घेतलें घर ॥ राम जाला कलत्र पुत्र ॥ अवयव अलंकार ॥ राम झाला ॥ ७ ॥ मी ह्मणे हा अवघड गड ॥ तंव राम जाला गडींचें दगड ॥ महामार अति गूढ ॥ राम जाला ॥ ८ ॥ आतां कायसी निज देहनिकुंभिला ॥ येथें कोण मानी मोह कुंभकर्णाचे बळा ॥ बळाच्या सबळ बळा ॥ राम जाला ॥ ९ ॥ एकाजनार्दन निजभावें युद्ध पूर्ण ॥ रावणचि आपण राम जाला ॥ १० ॥

॥ २३२८ ॥ रामें रावण रणीं ॥ निवटिला निज बोध बाणीं ॥ येरु सर्वस्व मानुनी ॥ निज सुखीं जाहला ॥ १ ॥ दहा मुखातें छेदिलें ॥ शेखीं विश्वमुख केलें ॥ रणीं रामें सुख दिधलें ॥ परम दुःख ॥ २ ॥ ध्रु० ॥ राम तो वैरी नव्हे राजा ॥ सखा जीवलग माझा ॥ दहा मुखें वीस भुजा ॥ फेडिला केरु ॥ ३ ॥ नश्वर राज्य नेलें ॥ रावण पण गेलें ॥ अक्षयी राज्य दिधलें ॥ श्रीरघुनाथें ॥ ४ ॥ माझे देह संदेह छेदिले ॥ कीं वेदामृत पाजिलें ॥ ऐसे बोलतां बोलें ॥ बोलवेना ॥ ५ ॥ राम रावणा रणीं ॥ बोधाची झोट धरणी ॥ एकाजनार्दनीं ॥ मिनले एकपणीं ॥ ६ ॥

॥ २३२९ ॥ ऐका संत सज्जन ॥ निज हित कुशल पूर्ण ॥ करुनी सर्वांगाचे कान ॥ शब्दार्थ जाणावा ॥ १ ॥ जीवामाजी घालूनि जीव ॥

परिसतां हें अर्थगौरव ॥ तैं सिद्धी पावे कार्य सर्व ॥ भवविभव निवारे ॥ २ ॥ असो आतां जानकीसी ॥ मंदोदरी अति प्रीतींसी ॥ पुसती जाली वेगेसी ॥ रामानुभव तो कैसा ॥ ३ ॥ सांगे एकाजनार्दन ॥ चित्त करा समाधान ॥ अनुभवाचें लक्षण ॥ सावधान ऐकावें ॥ ४ ॥

॥ २३३० ॥ श्रीराम व्यापकु कीं येकदेशी ॥ हें सांगावें मज पाशीं ॥ सकळ देहीं श्रीरामासी ॥ स्थिति कैसी वस्तीची ॥ १ ॥ जरी ह्मणसी परिछिन्न ॥ तरी व्यापकत्वा पडिलें खाण ॥ आत्माराम हें अभिधान ॥ न घडे जाण तयासी ॥ २ ॥ जरी त्यातें व्यापक ह्मणसी ॥ तरी तो सर्व भूत निवासी ॥ तेथें उपेक्षितां रावणासी ॥ अद्वैत भजनाशी अभाव ॥ ३ ॥ एकाजनार्दन ॥ भेद भाष्य वचन ॥ राम परमात्मा जाण ॥ सर्वगत निर्धारें ॥ ४ ॥

॥ २३३१ ॥ ब्रह्म धरुनी मुंगी वरी ॥ राम व्यापक चराचरीं ॥ तो रावणाचेही शरीरीं ॥ इंद्रिय व्यापारीं नांदत ॥ १ ॥ रामानुसंधान रावणीं ॥ भजतां होय कोण हानी ॥ हें सांगावें साजणी ॥ प्रीतिकरुनी मजलागीं ॥ २ ॥ हांसोनिया सीता सुंदरी ॥ उत्तर देती अतिकुसरीं ॥ तें परिसोनी मंदोदरी ॥ विश्रांति थोर पावेल ॥ ३ ॥ शरण एकाजनार्दन ॥ दृश्यादृश्य वचन ॥ परिसोनी समाधान ॥ देह स्थिती निरसे ॥ ४ ॥

॥ २३३२ ॥ सावध ऐके साजणी ॥ प्रवेशतां रामानुसंधानीं ॥ चित्त चित्तपणा विसरुनी ॥ राम होउनी स्वयें राहे ॥ १ ॥ द्रष्टा परिच्छिन्न होय ॥ तैं दृश्यदृश्यत्वें दिसो लाहे ॥ श्रीराम स्वयें तैसा नोहे ॥ परी तें माय सांगेन ॥ २ ॥ श्रीराम होउनी व्याप्य एक ॥ असतां राम होवावें व्यापक ॥ त्रिपुटीचा अभावो देख ॥ व्याप्य व्यापक तेथें कैचें ॥ ३ ॥ ह्मणसी सर्वांच्या अंतरीं ॥ राम असे चराचरीं ॥ तो रावणाचे शरीरीं ॥ एकाजनार्दनीं नांदत ॥ ४ ॥

॥ २३३३ ॥ राम सर्वांच्या हृदयीं आहे ॥ धरितां त्या हृदयस्थाची सोय ॥ तेथें राम रावण कोठें आहे ॥ सांग माये यथार्थ ॥ १ ॥ भोगितां हृदयस्थासी ॥ अवकाश कैचा भोक्तयासी ॥ तेथें रावण कैचा आणिसी ॥ जें तयासी भोगावें ॥ २ ॥ दृश्याचीये भेटी ॥ दृश्यपणें उठी ॥ होतां तेणेंसी

तुटी ॥ तोही शेवटीं असेना ॥ ३ ॥ आतां नाहीपणें असे ॥ असे तोचि दिसे ॥ एकाजनार्दनीं पिसें ॥ रावणाचें कायसें ॥ ४ ॥

॥ २३३४ ॥ ऐकोनी सीतेच्या उत्तरीं ॥ पूर्णावस्था मंदोदरी ॥ चढली स्वेद कंप शरीरीं ॥ आनंद लहरी दाटली ॥ १ ॥ इंद्रिय विकळता जाली ॥ चित्त चैतन्या मिठी पडली ॥ अंतरीं सुखोर्मी दाटली ॥ तेणें पडली मूर्छित ॥ २ ॥ बाप सद्गुरूच सामर्थ्य ॥ अलोकिक अतिअद्भुत ॥ वचन मात्रें शक्तिपात ॥ जाला निश्चित मंदोदरी ॥ ३ ॥ नाहीं हस्त मस्तक ॥ कृपा कवळोनी देख ॥ वचन मात्रें दिधलें सुख ॥ एकाजनार्दनीं सरेना ॥ ४ ॥

॥ २३३५ ॥ श्रीरामासी राज्याभिषेचन ॥ इंद्रादिकां चिंता गहन ॥ समस्त देव मिळोन ॥ चतुरानन विनविला ॥ १ ॥ देव ह्मणती ब्रह्मयासी ॥ तुझें आश्वासन आह्मासी ॥ श्रीराम अवतार सूर्यवंशीं ॥ तो रावणासी वधील ॥ २ ॥ सपुत्र बंधु प्रधान ॥ राम करील राक्षसकंदन ॥ तेणें देवासी बंधमोचन ॥ एकाजनार्दन होईल ॥ ३ ॥

॥ २३३६ ॥ सत्य करीं आपुलें वचन ॥ आमुचें करीं बंधमोचन ॥ आमुचें विपत्तीचें विधान ॥ सावधान अवधारी ॥ १ ॥ इंद्र बारी चंद्र कर्‍हेरी ॥ यम पाणी वाहे घरोघरीं ॥ वायु सदा झाडी ओसरी ॥ विधि तेथें करी दळा कांडा ॥ २ ॥ अश्विनी देव दोन्ही ॥ परिमळ देती स्त्रियेलागुनी ॥ विलंब अर्धक्षणीं ॥ दासी बांधोनी धुमसिती ॥ ३ ॥ मारको केली तराळी ॥ सटवी बाळांतें पाखाळी ॥ रात्रीं जागे काळी कराळी ॥ मेसको वळी शोभनीया ॥ ४ ॥ मैराळ देव कानडा ॥ करी राक्षसांच्या दाढा ॥ आरसा न दाखवी ज्या पुढां ॥ तो रोकडा बुकाली ॥ ५ ॥ विघ्न राहूं न शके ज्यापुढें ॥ तो गणेश बापुडें ॥ गाढवाचे कळप गाढे ॥ एकाजनार्दनीं वळीत ॥ ६ ॥

॥ २३३७ ॥ अग्नीस आपदा बहुवस ॥ रावणाचे असोस ॥ नानापरीचे स्पर्श दोष ॥ घेई अहर्निशीं धुपधुपीत ॥ १ ॥ उदक सेवा वरुणाहातीं ॥ विंजणे सेवा नित्य वसंतीं ॥ निरोप सांगावया बृहस्पती ॥ प्रजापती शांतिपाठा ॥ २ ॥ ऐसे आह्मीं देवसमस्त ॥ रावणाचे निसांकित ॥ लंके आलीया रघुनाथ ॥ एकाजनार्दनीं बंध मुक्त करिल ॥ ३ ॥

॥ २३३८ ॥ पक्षी जाला स्वयें जें वायु लेंकरूं ॥ साचा क्रिया पारु केला रामें ॥ १ ॥ शबरीचीं फळें उच्छिष्ट तीं खाये ॥ कैसा राम होय सर्व पर्णी ॥ २ ॥ एकाजनार्दनीं श्रीराम सखा ॥ भक्त अभक्ता निका सोडवण ॥ ३ ॥

॥ २३३९ ॥ रीघ नाहीं कोणा पाहूं आले जना ॥ फिटलें पारणें लोचनांचें ॥ १ ॥ नाचत नारद गातातीं गंधर्व ॥ तुंबर हावभाव दावितातीं ॥ २ ॥ स्तुति करी शेष न वर्णवे वेदासी ॥ स्तवन विरिंची करीतसे ॥ ३ ॥ करितातीं नारी अभ्यंग रामासी ॥ पायावरी त्यासी न्हाणितातीं ॥ ४ ॥ नीति नाहीं गुण विश्वाचा जनिता ॥ तयाचीया माथां पाणी घाली ॥ ५ ॥ घाली तेल माथां माखीतसे टाळु ॥ दीनाचा दयाळु कुर्वाळिती ॥ ६ ॥ तीर्थें वास करिती जयाचीये चरणीं ॥ पायावरी न्हाणी सासी माता ॥७॥ लाउनी पालव रामासी पूसिलें ॥ वेगीं फुंकियेलें कान दोन्ही ॥ ८ ॥ दोघीं दोहींकडे सिद्धि बुद्धि जाणा ॥ घातिलें पाळणां राम राज ॥ ९ ॥ त्यांनीं धणीवरी गाईला पाळणा ॥ एकाजनार्दना पहुडविलें ॥ १० ॥

॥ २३४० ॥ दोघे शरणांगत आले श्रीरामासी ॥ मारिलें वाळिसी एका बाणें ॥ १ ॥ बाणलीसे भक्ति अंगदाचे अंगीं ॥ श्रीरामें बोसंगीं धरियेलें ॥ २ ॥ धरियेली हातें तारा सुग्रीवानें ॥ वैराचें खंडन झालें तेव्हां ॥ ३ ॥ तेव्हां वानरांची बोलाविली सेना ॥ लंकेवरी ज्यांना पाठविलें ॥४॥ विलंब न होतां धाडी हनुमंता ॥ जाळीयेली वार्ता सीता सांगे ॥ ५ ॥ सांग लंका जळीं संन्निध उदधि ॥ लंघुनीया शुद्धि रामा सांगे ॥ ६ ॥ सांगें रामा तेव्हां बांधावा सागर ॥ आणुनी अपार पर्वतासी ॥ ७ ॥ शिला सेतु राम चरणाची ख्याती ॥ तारुनी पुढती ख्याति केली ॥ ८ ॥ बांधोनीया सेतु राम आला लंकें ॥ मारीयेलें मुख्य राक्षसांसी ॥ ९ ॥ मारी कुंभकर्ण इंद्रजित रावणा ॥ होतां लक्षुमणा शक्तिपात ॥ १० ॥ आणीयला गिरि दिव्य तो द्रोणाद्रि ॥ उठविली मांदि वानरांची ॥ ११ ॥ शिरें उडविलीं लंकापतीचीं ॥ मुख्य राक्षस साचे छेदियेले ॥ १२ ॥ लिगाड तोडिलें वैरत्व खुंटलें ॥ लंका राज्य दिलें बिभीषणा ॥ १३ ॥ तोडीयेली बेडी नवग्रहां सोडी ॥ उभविली गुढी राम राज्य ॥ १४ ॥ इंद्र चद्रं पद ब्रह्मीयाचें ॥ देउनी तयाचें सुखी केलें ॥ १५ ॥ केलें समाधान आणविली सीता ॥

अयोद्धे मागुता राम आला ॥ १६ ॥ आलासे भरत लागला चरणीं ॥ फिटलीं पारणीं लोचनांचीं ॥ १७ ॥ चिंता दुःख द्वेष पळाले बाहेरीं ॥ एकाजनार्दनीं करी राज्य सुखें ॥ १८ ॥

॥ २३४१ ॥ पोटीं भय आतां तुजला कशाचें ॥ ध्येय हें शिवाचें अवतरलें ॥ १ ॥ तरले अपार पापी मूढजन ॥ ऐकतां चिंतन देव तोषे ॥ २ ॥ तोषोनीया गुरु ह्मणे लागे पायां ॥ कौसल्याही जाया नोहे तुझी ॥ ३ ॥ तुझी भक्ति वाढ केली आली फळां ॥ तो सुख सोहळां पाहे आतां ॥ ४ ॥ आतां करूं स्तुति श्रीराम रक्षिता ॥ तारी निज भक्तां सत्ता बळें ॥ ५ ॥ बळें गेला लश्रा सागराचे पोटीं ॥ तेथें तो कपटी घात करी ॥ ६ ॥ करी विघ्न तारूं बुडविलें सागरीं ॥ एकाजनार्दनीं निर्धारी देव राखे ॥ ७ ॥

॥ २३४२ ॥ अवतरला श्रीराम परब्रह्म पुतळा ॥ सुहास्य मुख सुंदर कांसे पीतांबर पिवळा ॥ १ ॥ दशरथ नंदन राम पहातां वो मनीं ध्यातां ॥ देह बुद्धि हारपली डोळे भरी पहातां ॥ २ ॥ वसिष्ठ गुरुनीं अध्यात्माचा रस बिंबीवला ॥ ताटिका समूळ मर्दुनी याग रक्षिला ॥ ३ ॥ त्र्यंबक धनुष्य भंगुनी जनक दुहिता आणिली ॥ कैकई वरदें दशरथ निमाला श्रीराम गेले वनवासीं ॥ ४ ॥ येवोनीया वनीं रावणें केलें जानकी हरण ॥ सीता विरहें राम आलिंगी वृक्ष पाषाण ॥ ५ ॥ वाळी वधुनी सुग्रीवा दिली किष्किंधा नगरी ॥ सीता शुद्धि करुनी आला वानर केशरी ॥ ६ ॥ सेतु बंधन करुनी सुवेळीं आला श्रीराम ॥ राक्षसां सहित रावणा दिलें निजधाम ॥ ७ ॥ बिभीषण स्थापिला आणिली जनक नंदिनी ॥ सीतें सह राम बैसले पुष्पक विमानीं ॥ ८ ॥ आला श्रीराम सकळां आनंद झाला ॥ भरत भेटी समयीं राम हृदयीं गहिंवरला ॥ ९ ॥ राम लक्ष्मण भरत शत्रुघ्न बामांगीं सीता ॥ सिंहासनीं बैसविलें वोवाळिलें रघुनाथा ॥ १० ॥ झाला जय जयकार आनंदें पिटिली टाळी ॥ एकाजनार्दनीं नाचतीं आनंदें सकळीं ॥ ११ ॥

॥ २३४३ ॥ येथोनी आनंदुरे ॥ कृपासागर तो गोविंदुरे ॥ १ ॥ महाराजाचे राउळीं ॥ वाजे ब्रह्मानंद टाळी ॥ २ ॥ आनंदले भक्तजन ॥ ह्मणे धन्य रघुनंदन ॥ ३ ॥ लक्ष्मी चतुर्भुज जाली ॥ प्रसाद घेउनी बाहेर आली ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं नाम ॥ पाहतां निवे आत्माराम ॥ ५ ॥

॥ २३४४ ॥ दशरथसंतान हीन जाला ॥ पुत्रजन्य याग केला ॥ १ ॥ सांगे वसिष्ठ आचार्य ॥ धर्म शास्त्र ऐके राय ॥ २ ॥ पुसों जावेंजी डोहळीया ॥ जे जे प्रिया मागती ॥ ३ ॥ ऐका कौसल्या संभ्रम ॥ उदरीं संभवला राम ॥ ४ ॥ पुसों जातां डोहळे ॥ आनअन्य तें वर्तलें ॥ ५ ॥ जनार्दन उदरा आला ॥ एकाएकी डोळिया घाला ॥ ६ ॥

॥ २३४५ ॥ एकपणें विण प्रसवला ॥ विदेहीं जन्मला श्रीराम ॥ १ ॥ पुरवी पितामहाचा पिता ॥ तया प्रसन्न सुभानु होतां ॥ २ ॥ यालागीं सूर्यवंशीं तंव पिता ॥ जन्म जाला श्रीराम ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं श्रीराम ॥ सर्व हरतील श्रम ॥ ४ ॥

॥ २३४६ ॥ पहा ऋषी आले मागावया दान ॥ शांति करूं यज्ञ ऋषींचिया ॥ १ ॥ ऋषिलागीं पूजा सिद्धि नेऊं पैजा ॥ राक्षसांच्याफौजा मारूं बळें ॥ २ ॥ मारूं बळें आतां त्राटिका सुबाहु ॥ द्विजा लागीं देऊं सुख मोठें ॥ ३ ॥ भेटे पुढें कार्य ऋषि भार्या वनीं ॥ लाउनी चरण उद्धरावी ॥ ४ ॥ उद्धरावें तृण पशु आणि पक्षी ॥ जया जे आपेक्षी देऊं तया ॥ ५ ॥ तया ऋषि संगें जनकाचा याग ॥ एकाजनार्दनीं मग धनुष्य भंगी ॥ ६ ॥

॥ २३४७ ॥ तेथें रावणाचा गर्व परिहार ॥ पर्णिली सुंदर सीता देवी ॥ १ ॥ देवीं दुंदुभी वाजविल्या अपार ॥ तेव्हां कळों सरे भार्गवासी ॥२॥ भार्गव पातला आला गर्वराशी ॥ कोणें धनुष्यासी सोडियेलें ॥ ३ ॥ भंगियेला गर्व तोषला भार्गव ॥ एकाजर्नादनीं अपूर्व आशीर्वाद ॥ ४ ॥

॥ २३४८ ॥ आशीर्वाद देती भार्गव तो राम ॥ विजय मेघःश्याम होई सुखें ॥ १ ॥ राज्य करी बळें सर्वत्रीं आनंद ॥ नाहीं दुजा शब्द रामा तूंशी ॥ २ ॥ भानुदास ह्मणे आनंदें श्रीराम ॥ स्वरूप आत्माराम अयोध्याधीश ॥ ३ ॥

॥ २३४९ ॥ वदतां वदनीं अहर्निशीं राम ॥ उपदेश सुगम सोपा मंत्र ॥ १ ॥ दों अक्षरीं राम तेणें जोडे धाम ॥ आणिक तो श्रम वांया जाये ॥ २ ॥ सर्वांभूतीं सम दृष्टीतें पहाणें ॥ मग नाहीं येणें आन दुजें ॥ ३ ॥ दुजें येणें नाहीं एकाजनार्दनीं ॥ श्रीरामावांचुनी आन नेणे ॥ ४ ॥

॥ २३५० ॥ राम सर्वां घटीं व्यापक संचला ॥ जैसा भाव तया तैसा भेटला ॥ १ ॥ रीस आणि वान्नर राक्षसही पहाती ॥ सर्वा एकची मुक्ती राम संगें ॥ २ ॥ वैर अथवा सख्य वाचें वदे नाम ॥ मुक्ति आह्मा राम स्वयें देतो ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं वदतां निष्काम ॥ स्वर्ग सुख देत राजाराम ॥ ४ ॥

॥ २३५१ ॥ राम नामें नित्य जयासी आनंद ॥ तया ठायीं भेदाभेद नुमटती ॥ १ ॥ ऐसे जे रंगले रामनामीं नर ॥ चुकवी यम महार जन्मोजन्मीं ॥ २ ॥ धरावी वासना राम नाम जप ॥ दुजा तो संकल्प आन नाहीं ॥३॥ एकाजनार्दनीं नामा परता मंत्र ॥ दुजा नाहीं अन्यत्र कलियुगीं ॥४॥

॥ २३५२ ॥ जय जय रामचंद्रा जयरामचंद्रा ॥ हर हरि जपे त्याचे हृदयीं मुद्रा ॥ १ ॥ सोपा जप अखंड वाचेंसी वदतां ॥ काम क्रोध लोभ पळे अहं ममता ॥ २ ॥ कासया जप तप अनुष्ठान वाउगा श्रम ॥ नका गुंतूं संसारा वाचें ह्मणा राम नाम ॥ ३ ॥ वाउगी उपाधि सांडोनी भजा श्रीरामा ॥ एकाजनार्दनीं वाचें वदा आत्मारामा ॥ ४ ॥

॥ २३५३ ॥ शिवाचें हृदयीं नांदसी श्रीरामा ॥ काय वर्णूं महिमा न कळे आगमा निगमां ॥ १ ॥ वेद शास्त्रें मौनावलीं पुराणें भांबावलीं ॥ श्रुति ह्मणती नेति नेति शब्दें खुंटलीं ॥ २ ॥ वाच्य वाचक जगन्नाथ स्वयें शिवाचा आत्माराम ॥ एकाजनार्दनीं सुख तयासी गातां निष्काम ॥ ३ ॥

॥ २३५४ ॥ आत्मया रामा अगोचर रामा ॥ आनंदघन मेघ जयपूर्ण कामा ॥ १ ॥ जय जय रामाश्रीजय रामा ॥ जय जय राम जयति जय रामा ॥ ध्रु० ॥ सुंदर रामा सच्चिद् रामा ॥ रामा मनोहर रमणीय रामा ॥ २ ॥ व्याप्य तूं रामा व्यापक रामा ॥ राम राम राम तारक ब्रह्मा ॥ ३ ॥ सुलभ रामा दुर्लभ रामा ॥ योगीजन मनमोहन रामा ॥ ४ ॥ आदि तूं रामा अनादि रामा ॥ एकाजनार्दनीं विश्रामधामा ॥ ५ ॥

॥ २३५५ ॥ चरणा लागोनि उद्धरली अहल्या बाळा ॥ तुझेनि प्रतापें तरती भवसागरीं शीळा ॥ १ ॥ रामा शामा रामा भवभंजना वो ॥ तुझें नाम चिंतित उमा शिव जीवें ॥ धृ० ॥ राम नामें कांपती कळिकाळ सदां ॥

नाममात्रें नेली गणिका निजपदा ॥ २ ॥ रामें मुक्त केले नरसुर वानर ॥ एकाजनार्दन कृपा सदा समाधी स्थीर ॥ ३ ॥

॥ २३५६ ॥ संत सज्जनाची मिळाली मीळणी ॥ राम नामाची भरली भरणी ॥१॥ आह्मा राम ठेवा राम सांटोवा ॥ रामनामें जीवा निज लाभु ॥ ध्रु० ॥ नारायण नाम जुनाट पेव ॥ संवसाटी हातीं लागलें सर्व ॥ २ ॥ कीर्तनाचें तारूं लागलें ॥ रामनाम तेणें सवंग झालें ॥ ३ ॥ भक्ति नवरत्नाचें साटें आलें घरा ॥ पारखुनी त्याच्या सांठविलें सारा ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं राम ठेवा ॥ परमानंदाचा लाभ झाला जीवा ॥ ५ ॥

॥ २३५७ ॥ गोंडणी बाळा वेंचिता फळा ॥ देखिला रामरावो ठक पडिलें डोळां ॥ १ ॥ गोंडणी सोहं मागति गाती रामा ॥ आनंदें नाचती दृष्टी सूनि रामा ॥ धृ० ॥ देखोनी राम रावो कैसा जडला भावो ॥ सेवितां कंद मुळें आह्मां दिसतो देवो ॥२॥ सफळिता तरूवरीसाचा राम आभासे ॥ पाहतां जनीं वनीं अवघा देवचि दिसे ॥ ३ ॥ चारा चोखटी बोरा भरूनिया पाटि ॥ फळामाजी फळी रामे सफळ दृष्टी ॥ ४ ॥ आसनीं शयनीं आह्मां आणीक बोधु ॥ एकाजनार्दनीं गोड लाविला वेधु ॥ ५ ॥

॥ २३५८ ॥ मल्हार ॥ तेतीस कोटीदेव बांदवडी लंका बंदीखान ॥ गडलंका बंदीखान ॥ बंदि मोचन राम चिंतन देव करिती ध्यान ॥ अंतगती सीता सती चोरुनी नेली जाण ॥ अठरा पद्में वानरभार वीर चालिला दारुण ॥ राम चालिले आपण ॥ १ ॥ राम चढत रथ क्षिती डोलत ॥ त्रैलोक्य कंपायमान ॥ रथु घडघडी शेषु फडफडी कूर्म लपवी मान ॥ वराह बुडी दाढा तडतडी समुद्रा घाली पलाण मेरु कुळाचळ ॥ कांपती चळ चळ राक्षसा निदान ॥ धृ० ॥ हनुमान बळी फाळी आसाळी ॥ अखय पौळी उपटितु ॥ ब्रह्मा ब्रह्मपासीं ॥ बांधोनी त्यासी ॥ आणि लंकेसी अनर्थु॥ रावणू यासीं हाणे खर्गेसी ॥ घाव हनुमंतु हाणतु ॥ घावो पोचटु कैसा ॥ पैलुजैसा रामेसी कैसा भीडसी तूं ॥२॥ पुंसि लावूनी आंगीं हानुमान रागी दावो दावो सवेगी तेणें केला ॥ बिभीषणु तेवेळीं रावणाजवळीं बुद्धि सोज्वळी भेदला ॥ त्यासी हाणोनी लाथा दवडी सर्वथाः शरण रघुनाथा तो आला ॥ न जीणता रावण लंकादान पूर्व संकल्प घातला रामें ॥ ३ ॥

रामाची ख्याति वाणूं किति शिळा तरती सागर ॥ स्वयें बुडती आणिका बुडविती तरोनि तारिती वानरः ॥ लंका पारिं सुवेळा गीरी रामु भारी दुर्धर ॥ ॥ दाहाछत्रें लंकेवरी रावण पाहे नर वानर ॥ येकुबाण सोडी काढुनी वोढीः दाहाछत्रें पाडी रघुवीर ॥ ४ ॥ शिष्टाई करितां अंगदु धरितां मंडपु अवचिता आणिला ॥ मंडपू शिरीं देखोनी दुरी राम भारी कोपला ॥ लंका बिभीषणा दिधली जाणाः तेथील अर्थु कां आणिला ॥ स्वामी बळें उडतां बैसला माथां मजही न कळतां पै आला ॥ तेणेंची उड्डाणें आनंदें तेणें सभेसी मंडप सांडिला ॥ ५ ॥ हुड हुडां तत्काळी वानर महाबळी वीरा खंदवी करिती ॥ दांडे गुंडे पर्वत खांडे बळी अतुर्बळी हाणती ॥ खड्गें त्रीश्रूळ कोंती मुद्गल हातीं भाले कपाळी रोपीतीं ॥ पुच्छीं धरूनी वानरां भवंडिती गरगरां येरे निशाचरां उपटिती ॥ ६ ॥ सेलीं सांबळ धर कोंतेकर आढा उंच व्हाणका तोमर ॥ आळगाईत बाणाईत त्रीशुळ चक्र धनुर्धर ॥ अश्व गजपती नरपती नावाणगे वीर थोर थोर ॥ नरांतक सुरांतक रणकर्कश दुर्धर ॥ काळांतक यमांतक विकटमुखें भ्यासूर ॥ ७ ॥ नळ नीळांगद ॥ जांबुवंतु सुग्रीव महाविर तार तरळ ॥ गव गवाक्ष गंध मर्दन दुर्धरु हनुमान महावीर अजरामर ॥ सुखें नुदर्धीं मुख दुस्तर वृक्ष पर्वत हातीं न मिळे जुप्तती ॥ चालिले करिती भुभुःकार ॥ ८ ॥ वीरा वानरां रणीं झोट धरणी मागें कोण्ही नसरती ॥ निशाण दण दण खड्गे खण खण ॥ बाण सण सणा सुटती ॥ उरीं शिरींमाथां घाये देतां टणके कैसें उठती ॥ वृक्षें रथु मोडिती गज झोडिती वीर पाडितीपै क्षितीं ॥ लंकेपुढा अशुद्ध भडभडा रणनदीं वाहती ॥ ९ ॥ रावणसेना मोडिली जाणा कोपु दशाननापै आला ॥ ढोल टमक भेरी रण मोहरी धांवो निशाणा घातला ॥ निशाचर वीर आला अपार ॥ भार दुर्धर चालिला ॥ दाहाछत्रें शिरीं रावणावरी रामु सन्मुख लोटला ॥ वानर भारीसपरिवारी रामु कैसा देखीला ॥ १० ॥ शामसुंदर अति मनोहर मुर्ति चिन्मात्र चिद्गती ॥ आभाळ भाळा टिळकु पिंवळा रेखिला अति निगुती ॥ कुंडलें साकार निराकार श्रवणें विकार लोपती ॥ देखोनी वदन कोटी मदन लज्जा अनंगा ते होती ॥ चंद्र क्षीण बापुडा उपमे थोडा पूर्ण इंदु रघुपती ॥ ११ ॥ ऐसा मुख्य मयंक निष्कलंक आर्त चकोर सेविती ॥ आबाहु भावो आजानुबाहो धनुष्य मिरवें सा हातीं ॥ द्वैत दळण करी पूर्ण बाणू

शोभा सद्गती ॥ विजुकासे विसरली अस्तगती चरणीं तोडरु गर्जे घोरवीवरी कांपती ॥ १२ ॥ रामु रावण वरुषें बाण पवन पूर्ण खिळीला ॥ बाणाचा वळसा फिरतो कैसा लोह धुळारो उठिला ॥ शर पिसारा सुटला वारा रावणु आंवरा उडविला ॥ वाहादुळीपान भ्रमेजाण तेवी दशानन भ्रमला ॥ नलगता घांवो रावण पाहो युद्ध क्रोधु सांडिला ॥ कुंभकर्णबळी तियेवेळीं देउनी आरोळी उठिला ॥ १३ ॥ माहा मोह घूर्ण कुंभकर्ण अर्धचंद्रे निवटिला ॥ निकुंबळागिरी आटकभारी हानु आग्री चालिला ॥ इंद्रजीत नीकटे कोटी कपटे करी सपाटे येकला ॥ बाळ ब्रह्मचारी निराहारी तेणें इंद्रजीत मारिला ॥ तें देखोनी रावण कोपला पूर्ण राम गर्जोनी हांकिला ॥ १४ ॥ राम नाम जल्प फेडीपाप करीं निष्पाप नामें एकें ॥ रामा वेगळें जाण न विधेआन अनुसंधान नेटकें ॥ तंव गर्जीराम ध्वजीराम रामरूप आसके ॥ रामु नर रामु वानर रामु नीशाचर निमीखें ॥ पाहे लंकेकडे राम चहुंकडे मागें पुढें रामुदेखें - ॥ धनुष्य बाण रामपूर्ण आपण्या राम बोळखें ॥ १५ ॥ ऐसें युद्धदेखे परम सुख रावण हरिखें कोंदला ॥ छेदुनी दशमुख केला विश्वमुख रामसम्यकु तुष्टला ॥ नैश्वरासाठीं स्वरुपीं भेटी रामू कृपाळू होयभला ॥ राजपद नेलें स्वपद दिधलें आत्माराम प्रगटला ॥ एकाजनार्दनीं आनंदु ॥ त्रिभुवनीं देह विदेह रामु जाहला ॥ १६ ॥

॥ २३५९ ॥ राम माझा वना गेला ॥ रथ कां रे आणिला ॥१॥ अहो धरणी मायबहिणी । सांभाळा हा कोदंड पाणी ॥ २ ॥ सर्वेचिया नाराय णा । नको तपूं खडतर किरणा ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं भाव । वना गेला रामराव ॥ ४ ॥

॥ २३६० ॥ षट्गुण तरु हाराम । कपींद्रा सुखी असेकीं ॥ ध्रु० ॥ कनक कुरंगा पाठीं श्रमले प्रभु सर्वज्ञा काम ॥ मजसाठीं सबांधव राम ॥ कपींद्रा सुखी असे कीं ॥ १ ॥ मज विरहित या चिंता कैची अखिल लोक अभिराम ॥ सुमंगल सबांधव राम ॥ कपींद्रा० ॥ २ ॥ निज कांता दुष्टें हरिली हे स्मरतो मंगल धाम । केव्हांतरीं सबांधव राम ॥ कपींद्रा० ॥ ३ ॥ सौमित्रा दुर्वाक्यें छळिलें त्याचा परीणाम ॥ भोगितें सबांधव राम ॥ कपींद्रा० ॥ ४ ॥ त्र्यंबक भंगी एकजनार्दन करिती विबुध प्रणाम ॥ निरंतर सबांधव राम ॥ कपींद्रा० ॥ ५ ॥

॥ २३६१ ॥ कौशल्या यज्ञशेष सेऊनी राम जन्मला तियेच्या पोटीं ॥ वनवासासी जातां वियोग पावली दुःख शोकें हिंपुटी ॥ १ ॥ धन्यधन्य ते अहिल्या शिळा ॥ हरिच्या पावली चरण कमळा ॥ त्र्यंबक भंजनी जानकी पर्णिली केली एक पतिवृत्ता राणी ॥ रामा वेगळी रावणें चोरुनियां नेली दुःखीत अशोकवनीं ॥ २ ॥ रामें रणांगणीं राक्षस मारिले ॥ ते मरणातीत होऊनि ठेले ॥ देवांचीं बंधनें तोडिलीं रामें ॥ शेखीं अमर ते प्रळयीं निमाले ॥ ३ ॥ दशरथ पिता निमाला त्याचें कलेवर पचेतैल द्रोणीं ॥ सकुडी अयोध्या वैकुंठासी नेली ॥ अभिनव श्रीराम करणी ॥ ४ ॥ सुरांचा कैवारी कीं असुरांचा वैरी ॥ ऐसें न मानीच रामरावो ॥ वैरीयाचा बंधु बिभीषण आप्तु ॥ एकाजनार्दनीं सम भावो ॥ ५ ॥

॥ २३६२ ॥ अहि रावणें राम धरुनिया नेला थोर मांडले निर्वाण ॥ घायातळीं राम उभा करुनिया म्हणतसे करींरे स्मरण ॥ १ ॥ जगाच्या संकटीं रामातें स्मरती रामें स्मरावें कवणां ॥ देवाचें मरण भक्तें चुकविलें म्हणोनी अमर केला हनुमंतु ॥ २ ॥ न तुटे न जळे न बुडे न ढळे संसारीं असोनी अलिप्तु ॥ दुसरेंनि अवतारें रामासी जन्मु परि हनुमंत जन्मातीतु ॥ ३ ॥ देवासी जन्ममरण दिसते अविनासी ॥ एका जनार्दनें केले भक्तरे या ॥ ४ ॥

॥ २३६३ ॥ कपटें रावणहो गेला रामु ॥ तव शमला साचा कपट भावो ॥ सकळ वृत्ति रामचि देखे फिटलादेह संदेहो ॥ सबाह्य अभ्यंतरीं रामु नांदे सितेसी नाहीं तेथें ठावोरया ॥ १ ॥ रामराम राम अवघाचि राम ॥ फिटला रावणाचा भ्रम ॥ भोग्य भोग भोक्ता रामुचि झाला कैचा उठी तेथ कामुरेया ॥ धृ ॥ जनीं रामु वनीं रामु नरनारी देखे रामु ॥ तो हा रामु कीं कामु ॥ निःसिमनेमु सरला भावनेचा भ्रमु ॥ कामाचेनि काजें कपटें रामु ॥ होता फिटला तयाचा जन्मु भ्रमुरेया ॥ २ ॥ ऐसा सकळ रूपें रामु स्वरुपें आला काय कीजे त्यासी पुजा ॥ रामाचा बाणीं सीरें छेदुनि चरणीं वाहतसे वोजा ॥ रामाचा विश्वासु बाणला त्या रावणासी-रे निघती अधिक पैजा ॥ ३ ॥ हृदयीं रामु तेंचि अमृत कुपिका ॥ म्हणोनि सिरें निघती तया देखा ॥ शिरांची लाखोली रामासी वाहिली ॥ अधिकाचि येतसे हरिखा ॥ अवघाचि राम गिळीयला रावणें ॥ देहकुरवंडी

केला तया सुखारेया ॥ ४ ॥ शरणांगता दिधलें तें तंव उणें ॥ ह्मणोनि अधिक घेतलें रावणें रामाचें यश तें रावणा ॥ विजयगुढी विचारूनी पाहापामनें ॥ अरि मित्रा समता समान एकपदीं एकाएकी केलें जनार्दनें रेया ॥ ५ ॥

॥ २३६४ ॥ अंगें येऊनियां रामें नवल पै केलें भवाब्धीं बांधला सेतु ॥ अतिशयेसी जड दगड तैसे मुढ नामेंचि तारितु ॥ अविश्वासीय तेथ मार्गचि नकळे स्वेत बंधीं भवे आवर्तु रेया ॥ १ ॥ रामीं आरामु त्या संसार समु अभिमानी या तोचि पाशु ॥ अंतरीं बोध नाहीं बाहेरी ज्ञातेपण लटक्याचा न घेती त्रासु ॥ धृ० ॥ सर्वांतरीं राम ह्मणोनी बोलती ॥ परी बोला ऐसी नाहीं स्थीती ॥ चरणीं लागल्या शिळा उधरल्या हे तंव रामाची ख्याति ॥ तेंचि रामु हृदयीं नांदतां अविश्वासें नरका जाती रेया ॥ २ ॥ राम ह्मणतां गणिका उद्धरीली सरला संसार लेशु ॥ सकळ शास्त्र मंथुनि श्रुति वाखाणिता नये चित्तिचा विश्वासु ॥ वेश्ये निपटारे वाचुनिया जालो मा नुरेचि संसार पाशु राया ॥ ३ ॥ अंतरीं रामनाम सांगती कानीं ॥ परी न सांगती वेद ध्वनी ॥ वेदाचा विश्वासु कर्म प्रकृत्ति परी राम तारील निर्वाणी ॥ तोचि राम जीतां विश्वासें भजाल ॥ तरी सेवक होईल निदानी ॥ ४ ॥ सांडोनी अभिमान विश्वासें भजाल ॥ तरी स्वयेंचि व्हाल राम ॥ मातीयेचि मूर्ती द्रोण करूनिया किं लौकिका फावला भावो ॥ एका जनार्दनीं एकपणें भजतां ॥ संसारासी नुरे ठावोरेया ॥ ५ ॥

---

# रामलिला.

॥ २३६५ ॥ मंदोदरी पोटीं सितेसी व्हावी भेटी ॥ तयेसी करूं गोष्टी स्वानुभवें ॥ १ ॥ तंव दशानना मनीं ॥ वश्य व्हावी शयनीं ॥ घाडिली अशोकवनीं ॥ मंदोदरी ॥ २ ॥ तेथें दृष्टी दृष्ट मिनली ॥ विराल्या समुळी ॥ मिनल्या भिती मेळीं ॥ अहंत्यागी ॥ ३ ॥ परे सहित गोष्टी ॥ परतोनी पडली मिठी ॥ शब्द निमाला पोटीं ॥ नभातीत ॥ ४ ॥ ऐश्या निखळ सावधान ॥ बोलें वीण बोलणें ॥ परिसतु रहाणें ॥ सर्वांग श्रोते ॥ ५ ॥ तेथीची हे मातु ॥ अहाच नवट तूं ॥ जीउ हा जीवा आंतु ॥ घालुनि पहा ॥ ६ ॥ नवल

मंदोदरी संवादु वो बाईयेवो नवल मंदोदरी संवादु वो ॥ नवल मंदोदरी संवादु वो सितेसी अनुवादु राम रामरूपीं संवादु स्वानुभवाचा ॥ ७ ॥ राम सकळा देहीं रावणीं केवी नाहीं ॥ दुराग्रह तुझा ठायीं जानकीये ॥ ८ ॥ रामीं ठेवुनी रति रावणी अति भ्रिती करितां काय स्थिती उणि होय ॥ ९ ॥ येरी ह्मणे अभेदी राम राणा ॥ उरी कैची रावणा ॥ साचची मी तूं पणा ॥ ठाव नाहीं ॥ १० ॥ ऐशीये आंतुवटी ॥ रावणा कैची भेटी ॥ समूळ तुझी गोष्टी ॥ आहाच गे बाई ये ॥ ११ ॥ राम व्यापक एक देशीं सांगपा मजपासी ॥ सकळ देह त्यासी रिते कीं पूर्ण ॥ १२ ॥ सकळ देहीं आहे रावणीं केले काये ॥ हेंचि सांगे वो माये विषद करूनि ॥ १३ ॥ येरी ह्मणे रावणा वेगळें देख व्याप्य असावें एक ॥ तरी त्यासी व्यापक होईल सुखें ॥ १४ ॥ व्याप्य व्यापक दोन्ही गेली हारपोनी ॥ राम रावण मानी कवण तेथें ॥ १५ ॥ दृश्याचि ये भेटी दृष्यपणें उठी ॥ तेणेंसी झालीया तुटी ॥ तेंही नाहीं ॥ १६ ॥ नाहीं पणें असे तोचि तेथें दिसे ॥ कायसे पिसें रावणाचें बाई ये ॥ १७ ॥ तेथें अवस्था मंदोदरी स्वेद कंप शरीरीं ॥ चढली आनंद लहरी ॥ स्वानुभवाची ॥ १८ ॥ कष्टी ह्मणे माये देखीलें तुझे पाये ॥ सुख झालें काय केवी सांगो ॥ १९ ॥ ऐसें बोलतां बाष्प कंठीं ॥ मन मागुती नुहि ॥ चित्ते घेतली आटी ॥ चैतन्यासी ॥ २० ॥ दुजी बैसली सावधान निरसुनिया मन ॥ रामरूपीं नयन ॥ निडारले ॥ २१ ॥ पाहतां अस बिंब उतटताहे नाम ॥ तव त्या दोघी स्वयंभ तेचि जाहलिया ॥ २२ ॥ तेथें एका जनार्दनीं एक जालिया दोन्ही ॥ ऐसी ये अशोक वनीं शोक कैचा ॥ २३ ॥

---

## द्रौपदी चरित्र.

॥ २३६६ ॥ द्रौपदी सभेसी आणिली नग्न करा ह्मणे दुर्योधनु ॥ तंव अंगीचेनि बळें अभिमानाचेनि सळें रागे उठिला दुःशासनु ॥ तयाचि क्षणामाजी लवलाहो करून येरी सबाह्य स्मारिला नारायणु ॥ वस्त्रें वोढितां रागें देवोचि पावला वेगें उघड कैसेनि आंगे दिसेल आतां ॥ १ ॥ धर्माची सांकडी देवासीच रोकडीं कैसेनि ते उघडी दिसेल आतां ॥ पतिव्रताचें काज देवेंचि राखिली लाज द्रौपदी सहजनिज नेसविली ॥ ध्रु० ॥ देवामाजी·

वासु सा केला सुवासु तंव वस्त्रें हृषिकेशु होंचि सरला ॥ देवोचि अंगें झाला पै देवांगें उघड कैसेनि आंगे दिसेल आतां ॥ पाहतां द्रौपदीकडे कृष्ण मागें पुढें तिळभरी उघडें दिसों नेदीं ॥ नवल तियेचा भावो भावें वेढिला देवो उघड तियेचा देहो दिसेल कैचा ॥ २ ॥ अनंत वाणें परि नेसविली कुसरी येरू तो अभिमान धरी उघड करीन ॥ भावार्थाची घडी नेसली रोकडी येरू तो आसुडीं रागें वेगें ॥ तंव सत्वाचा सात्विक नेसली क्षीरोदक सा माजी निर्दोष शांती शेला ॥ तोही जंव आसुडीं तंव अखंड स्वरूप घडी दुःशासन वोढावोढी मूर्छित झाला ॥ ३ ॥ नवनाग सहस्रवळी पडिला क्षिती तळी अभिमानाची होळी झाली तेथें ॥ द्रौपदीचा अंत झाला अनंत सळावळा घात करित आला ॥ यशाचें जें सुख तेंचि झालें दुःख हरिखामाजी विख कालविलें ॥ मुळीं कपट पाश तेणें जोडिलें यश यश तें अपेश होऊनि ठेलें ॥ ४ ॥ शेला पैसांवळा वेढूनि वेल्हाळा निःशंक त्या खळा माजी उभी ॥ समर्थ ज्याचा सखा तया नाहीं शंका राया आणि रंका सरिसा पाडु ॥ ह्मणे भला दुर्योधना उपकारा नाहीं गणना निमिषें देहाभिमाना निरसिलें ॥ जो निरसी अभिमान तो गुरू जनार्दन एकाएकीं होऊन साह्य झाला ॥ ५ ॥

---

# उपमन्यु चरित्र.

॥ २३६७ ॥ होऊनी सावधान चित्ता ॥ ऐका उपमन्युची कथा ॥ एका भावें ऐकतां ॥ सायुज्यता पाविजे ॥ १ ॥ उपमन्यु मागितलें ॥ देवें तयासी दिधलें ॥ तें सांगेन वहिलें ॥ चित्त देऊनी परियेसा ॥ २ ॥ ब्राह्मणासी पुत्र झाला ॥ पित्यासी हर्ष वाटला ॥ थोर कष्टें वाढविला ॥ स्नेहो आशा धरूनी ॥ ३ ॥ बाळक तो जाणता ॥ पित्यासी उपजली चिंता ॥ एकाजनार्दनीं तत्त्वतां ॥ वचनार्थ परिसावा ॥ ४ ॥

॥ २३६८ ॥ मातेसी ह्मणे बाळ ॥ दूध पिती मुलें सकळ ॥ मजही दूध तत्काळ ॥ माते देई भोजना ॥ १ ॥ मग ते करड्या वांटुनी ॥ जननी काढी शुभ्र पाणी ॥ बारे दूध ह्मणोनी ॥ वाटीये भात कालविला ॥ २ ॥ तंव शेजारीं ब्राह्मणें श्राद्ध केलें ॥ तयाचिया घरां जेवावया नेलें ॥ बरवें

उत्तम पक्वान्न वाढिलें ॥ नानापरी भोजना ॥ ३ ॥ बाळासी वाढिली दूध क्षीरी ॥ तें जेविलें पोट भरी ॥ एकाजनार्दनीं निर्धारी ॥ गेलें आपुल्या गृहासी ॥ ४ ॥

॥ २३६९ ॥ गेला आपुल्या गृहाप्रती ॥ बाळ तो निद्रा नकरी रात्रीं ॥ क्षुधा लागलीसे बहुती ॥ मागे दूध भात जेवाया ॥ १ ॥ पुढें तीं करड्या वांटुनी ॥ तयाचें काढिलें शुभ्र पाणी ॥ येरें टाकिलें थुंकोनी ॥ ह्मणे मातें कालीचें नव्हे ॥ २ ॥ बारे या समर्थाचे घरीं ॥ देवें दिधलीं दूधक्षीरी ॥ आह्मां दुष्कृताचे घरीं ॥ तें कैचें रे बाळका ॥ ३ ॥ कोठें आहे तो श्रीहरी ॥ दाखवीं मज निर्धारीं ॥ एकाजनार्दनीं परी ॥ ध्यान लागलें हरीचें ॥ ४ ॥

॥ २३७० ॥ बरवी श्रीहरीची मूर्ति ॥ देव्हारा पूजिली होती ॥ बारे हा लक्ष्मीचा पती ॥ दूध मागें तयासी ॥ १ ॥ ऐशीं तिघें उपवास करती ॥ मातापितरें चिंतेंत पडती ॥ जन मिळाले बहुती ॥ तयासी उठऊं आदरिलें ॥ २ ॥ बाळारे तुज कारण ॥ बांधूं सहस्रगोधनें ॥ येरू ह्मणे नायकें वचन ॥ मज देईल श्रीहरी ॥ ३ ॥ माता ह्मणतां हें वचन ॥ दूध आणिलें ब्राह्मणाचे घरीहून ॥ एकाजनार्दनीं वचन ॥ असंतोषित बाळ तें ॥ ४ ॥

॥ २३७१ ॥ दूध आणिलें परगृहींहुनी ॥ संतोष नाहीं माझे मनीं ॥ श्रीहरी देईल मजलागुनी ॥ तरीच दूध घेईन ॥ १ ॥ पिता ह्मणतां हें वचन ॥ बाळा तूं अज्ञान ॥ कां वर्जिलें अन्नपान ॥ क्षुधा बहुत पीडितसे ॥ २ ॥ तंव बोले उपमन्यु ॥ भोजन न करी दुधावांचून ॥ श्रीहरी देईल मज लागून ॥ तरीच भोजन करीन ॥ ३ ॥ देवा त्वां ध्रुवा अढळपद दिलें ॥ मजलागीं निष्ठुर मन केलें ॥ एकाजनार्दनीं बोले ॥ बाळ वाचें सद्गद ॥ ४ ॥

॥ २३७२ ॥ ऐकोनी दुधाची बोली ॥ कां मनीं निष्ठुरता केली ॥ श्रीयाळ सत्वें राखिली ॥ नगरी नेली वैकुंठा ॥ १ ॥ अंबऋषीच्या बोला ॥ दाहीही अवतार नटला ॥ माझे देखोनी उणिवाला ॥ दूध कांहो नदेसी ॥ २ ॥ शरीर कर्वतीं भेदीन ॥ अष्टांगयोग साधीन ॥ भक्तिबळें तुज काढीन ॥ हुडकोनी तत्त्वतां ॥ ३ ॥ ऐकोनी तो शब्दकरुणा ॥ एकाजनार्दनीं धांवे जाणा ॥ माझीया भक्ताचीया वचना ॥ उणीवता येऊंनेदी ॥ ४ ॥

॥ २३७३ ॥ सुदर्शन घेउनी हातीं ॥ पावला तो लक्ष्मीपती ॥ देख-
तांची श्रीपती ॥ तन्मय बाळ जाला ॥ १ ॥ बाळकें धरिलें चरण ॥ देवें
दिधलें आलिंगन ॥ करें कुर्वाळुनी वदन ॥ चुंबनातें दिधलें ॥ २ ॥
देव ह्मणे बाळकातें ॥ काय अपेक्षा माग मातें ॥ बाळ बोले दूधभात ॥ मातें
देई सत्वर ॥ ३ ॥ हांसे वैकुंठींचा राणा ॥ बाळक हें अज्ञान ॥ एकाज-
नार्दनीं शरण ॥ काय मागणें मागत ॥ ४ ॥

॥ २३७४ ॥ ऐकें देवा सावधान ॥ एवढें पुरवावें जाण ॥ दुधावां-
चुनी दुसरें आन ॥ नमागें मी सर्वथा ॥ १ ॥ मातापिता उपमन्यु ॥ तिघे
गरुडावरी बैसून ॥ क्षीरसागरीं नेऊन ॥ इच्छा त्याची पुरविली ॥ २ ॥
राज्य दिधलें क्षीरसागरींचें ॥ अमर शरीर केलें त्याचें ॥ नित्यदर्शन श्रीह-
रीचें ॥ सायुज्यता दिधली ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं शरण ॥ उपमन्यु
आख्यान पावन ॥ श्रीव्यासें कथिलें जाण ॥ तेंची येथें वर्णिलें ॥ ४ ॥

---

## महालक्ष्मी.

॥ २३७५ ॥ नमो निर्गुण निराकार आदि मूळ माया तूं आकार ॥
महालक्ष्मी तूं साचार ॥ उघडे द्वार ठेउनी बैसलीस बया ॥ १ ॥ बया
दार लाव ॥ बया दार लाव ॥ ध्रु० ॥ घेउनी दहा अवतार ॥ करिसी
दुष्टांचा संव्हार ॥ आकार सारुनी निराकार ॥ काय बैसलीस बया दा०
॥ २ ॥ बैसलीस क्षीरसागरीं ॥ शेषाचे पलंगावरी ॥ जय विजय द्वारीं ॥
प्रेम दिवटे तिष्ठतीं बया दा० ॥ ३ ॥ ते वेळीं देव आले ॥ शंखासुरें
ह्मणती पीडिलें ॥ वेद चारी चोरुनि नेले ॥ ब्रह्मियाचे बया दा० ॥ ४ ॥
त्वां मत्स्य रूप धरून ॥ समुद्रांत बुडी देऊन ॥ शंखासुरास वधून ॥ वेद
घेऊन आलीस बया दा० ॥ ५ ॥ सुर असुर मिळाले ॥ समुद्र घुसळावया
गेले ॥ वासुकीचें दांवें लाविलें ॥ तेथें संकटीं पडिले बया दा० ॥ ६ ॥
तूं कूर्म रूप धरून ॥ मंदराचळ पृष्ठीं वाहून ॥ चवदारत्नें काढून ॥ इंद्र
सुखी केला बया दा० ॥ ७ ॥ वर देइ हिरण्याक्ष माजला ॥ पृथ्वी काखेस
घेऊनी पळाला ॥ चंद्र सूर्य घेउनी गेला ॥ अंधःकार पडिला बया दा०
॥ ८ ॥ त्वां वराहरूप धरून ॥ दैत्यांस क्रोधें वधून ॥ पृथ्वी दाढेवरी

धरून ॥ चंद्र सूर्य आणिले बया दा० ॥ ९ ॥ दैत्य कुळीं हिरण्यकश्यपु जन्मला ॥ तेणें तुझा भक्त गांजिला ॥ तें नपहावे तुजला ॥ त्वां उग्र रूप धरिलें बया दा० ॥ १० ॥ त्वां क्रोधें स्तंभ फोडुन ॥ नारसिंव्ह रूप धरून ॥ दैत्यासी वधून ॥ प्रल्हाद दिवटा रक्षिला ॥ बया दा० ॥ ११ ॥ दैत्य कुळीं बळी जन्मला ॥ तेणें पुण्याचा उत्कर्ष केला ॥ देखोनी इंद्र घाबरला ॥ शरण आला बया तुज ॥ बया दा० ॥ १२ ॥ तूं वामन रूप धरून ॥ बळीस पाताळीं घालून ॥ शुक्राचा एक नयन ॥ फोडिलास बया दा० ॥ १३ ॥ सहस्रार्जुनें पीडिलें ॥ देवां तेणें गांजिलें ॥ ऋषीचे याग खोळंबलें ॥ हें न पाहावे तुझेनी बया दा० ॥ १४ ॥ मग तूं परशुराम रूप धरून ॥ सहस्रअर्जुनास वधून ॥ मातेचें शिर छेदून ॥ क्षत्रीय कुळ निवटिलें बया दा० ॥ १५ ॥ शिव वरदें रावण कुंभकर्ण ॥ तेहतीसकोटी बंदी घालून ॥ नवग्रह पायरी करून ॥ राज्य करी आनंदें ॥ बया दा० ॥ १६ ॥ सीतेचेनी कैवारें ॥ रावण मारिला सहपरिवारें ॥ अठरा पद्म वानरें ॥ गोंधळ मांडिला लंकेसी ॥ बया दा० ॥ १७ ॥ कौरव पांडव मिळाले ॥ कुरुक्षेत्रीं युद्ध मांडिलें ॥ अठरा अक्षोहिणी दिवटे भले ॥ नाचती रण कल्लोळीं ॥ बया दा० ॥ १८ ॥ बौद्ध अवतार घेऊन ॥ विटे समचरण ठेऊन ॥ पुंडलीक दिवटा पाहून ॥ तयाचे द्वारीं गोंधळ मांडिला ॥ बया दा० ॥ १९ ॥ आणिक दिवटे अपार ॥ निवृत्ति ज्ञानदेव सोपान खेचर ॥ मुक्ताई जनाबाई विसोबा गोराकुंभार ॥ रोहीदास चोखा सज्जन नाचती बया दा० ॥ २० ॥ सांवता नामा दामा जाण ॥ नारा मादा गोंदा विठा कबीर कमाल पूर्ण ॥ सेना जनमित्र नरसी ब्राह्मण दिवटे तिष्ठती बया दा० ॥२१॥ आषाढीं कार्तिकीं गोंधळ मांडिला ॥ उदो उदो ऐसा शब्द जाला ॥ काम क्रोधादिकां पळ सुटला ॥ उदो शब्द ऐकोनी बया दा० ॥ २२ ॥ पुढें कलीचा प्रथम चरण ॥ दैवतें राहिलीं लपून ॥ तीर्थें सांडोनी महिमान ॥ अठरा वर्ण एक जाले बया दा० ॥ २३ ॥ म्लेंच्छें गांजिलें देव भक्तां ॥ महिमा उच्छेदिला सर्वथा ॥ न चले जप तप तत्वता ॥ एक रूप सर्व जालें बया दा० ॥ २४ ॥ मत्स्याई बया दार लाव बया ॥ कूर्माई बया दार लाव बया ॥ वराहाई बया दार लाव बया ॥ नरसाई बया दार लाव बया ॥ वामनाई बया दार लाव बया ॥ परसाई बया दार लाव बया ॥ रामाई बया दार लाव बया ॥ कृष्णाई बया दार लाव बया ॥

चौंढाई बया दार लाव बया ॥ कलंकाई बया दार लाव बया ॥ महालक्ष्मी दार लाव बया ॥ २५ ॥ उदे उदे उदे बया दार लाव ॥ २६ ॥ काम महिषासुर मातला ॥ तेणें विषयगों धळ मांडिला ॥ अज्ञान पोत पाजळला ॥ आशा संबळ लाउनी बया दा० ॥ २७ ॥ क्रोध वेताळ दारुण ॥ मातलासे मदें करून ॥ मत्सरमद साह्य होऊन ॥ भक्ति वैराग्य बुडविलें बया दा० ॥ २८ ॥ दंभ झोटिंग महाबळी ॥ अहंकार मुंज्या छळी ॥ आशा मनशा तृष्णा घेउनी गोंधळी ॥ विषयकल्लोळीं नाचतू ॥ बया दा० ॥ २९ ॥ कल्पना इच्छा वासना भूतावळी ॥ आट कोटिया मिळाली ॥ नाचती विषय कल्लोळीं ॥ भोग दिवटी घेउनी बया दा० ॥ ३० ॥ ऐसें तुज न पहावे जाण ॥ ह्मणोनी बैसलीस मौन धरून ॥ विटेवरी सम चरण ठेऊन ॥ निवांत रूपें बया दा० ॥ ३१ ॥ एकाजनार्दनीं शरण ॥ विठ्ठल नामें अंबा जाण ॥ पुंडलीक दिवटा अवलोकुन ॥ निवांत रूपें बैसली बया दार लाव ॥ ३१ ॥

---

## महालक्ष्मी.

॥ २३७६ ॥ नमो आदिमाया भगवती ॥ अनादि सिद्ध मूळप्रकृती ॥ महालक्षुमी त्रिजगतीं ॥ बया दार उघड दार उघड ॥१॥ हरिहर तुझें ध्यान करिती ॥ चंद्र सूर्य कानीं तळपती ॥ गगनीं ते तारांगणें रूळती ॥ तेवीं भांगीं भरिलें मोतीं ॥ बया० ॥२॥ बया नव खंड पृथ्वी तुझी चोळी ॥ सप्त पाताळीं पाउलें गेलीं ॥ एकवीस स्वर्ग मुकुटीं झळाळी ॥ बया० ॥ ३ ॥ अलक्ष पूर भवानी दार उघड बया ॥ माहुर लक्ष्मी दार उघड बया ॥ कोल्हापुर लक्षुमी दार उघड बया ॥ तैलंगण लक्षुमी दार उघड बया ॥ तुळजापुर लक्षुमी दार उघड बया ॥ पाताळ लक्षुमी दार उघड बया ॥ कानाड लक्षुमी दार उघड बया ॥ अष्ट भुजा लक्षुमी दार उघड बया ॥ पंढरपुर निवासिनी दार उघड बया ॥ दार उघड बया दार उघड बया दार उघड बया दार उघड बया ॥ ४ ॥ चारी पुरुषार्थ गोंधळी ॥ सनकादिक तेथें संबळी ॥ तेहतीस कोटी भूतावळी ॥ दिवट्या पाजळोनी तिष्ठती बया० ॥ ५ ॥ वेताळ फेताळ खंकाळ ॥ मारको मेसको भैराळ ॥ जागाई जोखाई क्षेत्रपाळ ॥ ह्मैशासुर दैस मातला सबळ ॥ अबबब ॥ पीडा केली अंबे बया

दार उघड ॥ ६ ॥ मच्छाई बया दार उघड कच्छाई बया दार उघड ॥ वऱ्हाई बया दार उघड ॥ नरसाई बया दार उघड ॥ वामनाई बया ॥ दार उघड ॥ परसाई बया दार उघड ॥ रामाई बया ॥ दा० ॥ कृष्णाई ब० ॥ दा० ॥ बोधाई ब० ॥ दा० ॥ कलंकाई ब० ॥ दा० ॥ महालक्ष्मी बया० ॥ उदो उदो ऐसा शब्द गाजतो ॥ कामक्रोध दैत्यावर कोरडा कडकडा वाजतो ॥ ज्ञान पोत पाजळतो ॥ बोधपरडी हीं तो घेतो ॥ प्रेमाचा पाउल पुढें ठेवितो ॥ अहं शंखासुर दैत्य बळी देतो ॥ बया दार उ० ॥ ७ ॥ हिरण्याक्ष हिरण्यकशिपु कोंबडे पिळी ॥ बळीसी घालुनी पाताळीं ॥ सहस्र अठ्यायशीं ऋषि मंडळी ॥ हनुमंत दिवटा महाबळी ॥ अठरापद्म येऊनी रण कल्लोळीं ॥ सागर बांधोनियां शिळीं ॥ करी लंकेची होळी ॥ रावण कुंभकर्णा घेसी बळी ॥ खेळसी शिरांची चेंडुफळी ॥ बया दार० ॥ ८ ॥ शरण आला तुज बिभीषण ॥ तयासी राज्यीं अक्षयी स्थापून ॥ प्रल्हाद उपमन्यु ध्रुवासी भातुकें देऊन ॥ बुजाविसी कवतुकें बया दार० ॥ ९ ॥ आणिक एक अंबे नवल परी ॥ तुझी यात्रा द्वापार युगा माझारी ॥ परोपरी निंब नारळ घेऊनि करीं ॥ हळदी कुंकुमें अर्पिती बया दार० ॥ १० ॥ वाहन तुझें सिंह केसरी ॥ मोकळे केश त्रिशूळ शंख करीं ॥ शिशुपाळ वक्रदंत दोन्ही बकरीं ॥ आहुती घेसी जगदंबे ॥ बया दार० ॥ ११ ॥ तेथून पुढें दसरा आला ॥ अठरा दिवस घट मांडिला ॥ कौरव पांडव सैन्य मेळ मिळाला ॥ तेथें शोभसी विराजमान हो दुर्गे बया बया दार० ॥ १२ ॥ जय जयाजी मूळ पीठेंद्र भवानी ॥ पांडव कुळींची कुळस्वामिनी ॥ अर्जुन रथीं स्वार होउनी ॥ वागदोर हातीं धरुनी ॥ रथ फिरविसी कवतुकें ॥ बया दार० ॥ १३ ॥ द्रौपदी वहिणीचेनी कैवारेंसी ॥ होम करुनी कुरु क्षेत्रासी ॥ तुझे साहित्यें पूर्णाहुतीसी ॥ तें तुज प्रती अर्पिलें ॥ बया दार० ॥ १४ ॥ रणवाद्य भम्भम्भम्दणदण्कड्कड् तोची गोंधळ अंबे तुज प्रती ॥ प्रथम धूप घटा प्रती भीमसुत बभ्रु अर्पिला ॥ बया दा० ॥ १५ ॥ ऐसा उत्सव मांडिला ॥ उदो उदो ऐसा शब्द झाला ॥ तेव्हां अर्जुन झडपिला ॥ संशय भूतें ते काळीं ॥ महाशक्ति कृष्णा बाई ॥ बया० ॥ १६ ॥ तें संशय भूत असे कठिण ॥ हरिहर ब्रह्मासी नाटोपे जाण ॥ चारी वेद सहा शास्त्रें अठरा पुराण ॥ अठ्यायशीसहस्र ऋषी शिणले दारुण ॥ मग त्वां बोध खंडा हातीं घेऊन ॥ शिर छेदिलें भूताचें ॥ बया दा० ॥ १७ ॥

बया त्वां रणकुंड जबडा पसरिला ॥ आहुती घेसी दोनी दळां ॥ रथ घोडे कुंजर तुला ॥ नारळें बया अर्पिलीं ॥ १८ ॥ भीष्म द्रोण कहुळे तीळ ॥ तांदुळ पायदळें ॥ आणिकही वीर भले भले ॥ निंबें कापुनी टाकिलीं ॥ बया दा० ॥ १९ ॥ रक्त वाहे भड भडां ॥ तेंची तेल घृत जळे धडधडा ॥ कौरव पतंग पडती गाढा ॥ दुर्योधन हा लक्ष्मी तुझा रेडा ॥ शेवटीं आहुती घेसी याचीच ॥ बया दा० ॥ २० ॥ शिलंगण खेळसी नानापरी ॥ कौरव कुळींची करुनी बोहरी ॥ द्वारका लपवोनि समुद्रीं ॥ यादवकुळ पाठविसी माहेरीं ॥ निज धामा कारणें ॥ बया दार० ॥ २१ ॥ पुढें जंबुद्वीपा भीतरीं ॥ अंबे तुझी न वर्णवे थोरी ॥ खेळखेळसी वैष्णवा माझारी ॥ पुंडलीक दिवटा महाभारी ॥ ओवाळिसी महामाया ॥ बया दार० ॥ २२ ॥ जगदंबा प्रसन्न झाली ॥ भक्ती कवाडें उघडलीं ॥ शंख चक्रांकित शोभली ॥ कोटी चंद्र सूर्य प्रभा वेल्हाळी ॥ एकाजनार्दनीं माउली ॥ करी कृपेची साउली ॥ भक्तजयाकारणें संपूर्ण झाली ॥ बया दार० ॥ २३ ॥

---

# श्री एकनाथ प्रश्न उत्तरे.

॥ २३७७ ॥ जारेजाजजाजारे ॥ जा वादिवादका कायसा तुझा पाडु ॥ तुज वरि बोधे दाउकबाईला घेईल मागील सुडु ॥ विवेक बंदि हो मिथ्या उपाधि विवेकें बोधलि बुद्धि ॥ जीवा जीवत्व बंधन ॥ हेहि मिथ्या ज्ञान ॥ तेहि ते विवेके छेदि इंद्रियांचें कर्म ॥ नकळे तुज वर्म ॥ विवेकें विषय सिद्धि आवोभुलि ॥ तूं झालासि वादका जिंतिलासि त्रिशुद्धि ॥ १ ॥ जारेजा ॥

चैतन्याचा यावा आणुनि देहभावा ॥ बंदि म्यां घातलें जीवा ॥ तयाचे सोडवणें थोर थोर आले न सुटे सांचिया देवा ॥ देवां दानवां दैस मानवां नसाहे माझा यावा ॥ विवेका सारिखा बंदि म्यां घातला बोधाचा काईसा केवा ॥ धृ० ॥ यारे या ययायारे या मद गर्विंत हो तुह्मी भिऊं नका पोटिं ॥ केवळ ज्ञान ते विषयीं वेंचले बोधाचि कायसी गोठी ॥ २ ॥

विषयाची उंडी लाउनिया तोंडी ॥ पाडिन तुझी मुरकुंडी ॥ हे उंडी सगळी गिळी ऐसा कोणी नाहीं ब्रह्मांडीं ॥ इंद्र पाराशर ब्रह्मादिशंकर

लोळविलें थोर धेंडी ॥ तेथ बोध तें बापुडें ॥ कायसें मज पुढें केवि राहे पडिपाडी ॥ ३ ॥

कपिल हनुमंतें भीष्म नारदें गट केलि तुझि उंडी ॥ राज्य करुनि विदेही जनक उंडी केली तेणें मुंडी ॥ शुकदेवें तुज देखता रंभे मारिलें तोंडिच्या तोंडी ॥ एवढी मज बोधाचि ख्याति यां केवि तुं चुकसि पडिपाडिं ॥ ४ ॥

कामाचा चेडा लाविन पुढा ॥ हालों नेदि मागा पुढा ॥ समूळ काम गिळी कैचा ऐसा बळी कोणी नाहीं निधडा ॥ संन्यासी वनवासी दिगंबर तापसी भेणे रिघति गिरीकडां ॥ तेथ स्वप्नदृष्टि खरकटि लंगोटि विर्याचा होतसे सडा यारेयाईयायारेया ॥ ५ ॥

तुझ्या कामाची गोष्टी समूळ खोटि परतोनि पाहे पां दृष्टि ॥ आत्मा आत्मीं मुळिंच नाहीं काम क्रिया केवि उठी ॥ विषयाचें गोडपण तेंचि ब्रह्मपूर्ण हें नकळे कामकामाटि ॥ कामाचा निज काम जाला आत्माराम चेडा उपडिला ब्रह्मदृष्टि ॥ जारेजाजजाजारेजा ॥ ६ ॥

क्रोध ह्मैसासुर करी गुरगुर लाविन तुझे पाठी ॥ जिव्हारि झोंबला कवणाहि न सुटे मारिले जगजेठी ॥ दुर्वास कपिलमुनि बळें घोळसिलें सनकादिक वैकुंठीं ॥ क्रोधापुढें बोध सदा पै दडे ॥ सांसि कोण आणि दृष्टि ॥ यारेया ॥ ७ ॥

माझी शांति गाय तुझा क्रोध खाय त्याचे तूं बळ वानिसि ॥ शांतिचेनि मंत्रें मंत्रुनिया कीं पंचाक्षरि केले ऋषि ॥ बद्रिनारायणा पुढें काम क्रोध रडे ॥ तै तुं काय जालासि काम क्रोधजित भीक्षुनें धरिलें आतां तुं कोठें छपसि ॥ जारेजा ॥ ८ ॥

ममता लाठि अत्यंत लाठि फोडिन तुझी घाटि ॥ उपडि अथवा तोडि ऐसा नाहीं जगजेठी ॥ माझें ज्ञान मोठें तुझें ज्ञान खोटें ममता टाकिले कोटयानकोटि ॥ ममते पुढें बोध बापुडें पळेल उठाउठी ॥ ९ ॥

देहि देहाची ममता माझें माझें ह्मणतां कोण नेणसि फुडें ॥ देह तर बापुडें अचेतन मढें माझें कोण ह्मणे कुडें ॥ मुळें मूळ पाहातां देहीं मि-

थ्या ममता समूळ ऊडे ॥ ममतेचें बळ पडिलें पोकळ लाठि स्वयें उपडे ॥ जारेजा ॥ १० ॥

मोहाचें खेंडे पाहातां फुडें मरण आलें रोकडे ॥ विवेकाचे बळ मोहचि प्रबळ आवरिले धडफुडे ॥ मोह विकल्पें जग मोहिले त्या पुढें बोध काय बापुडें ॥ विकल्पाचा मारा बोध केला चुरा जैत आले आह्मां गाढें ॥११॥

विकल्पानि बळे मोह सबळ सांगसि तयाचें रूप ॥ हें बोलणें फुडें समुळ कुडे न कळे मोह स्वरूप ॥ संकल्प विकल्प मनाचें रूप ॥ मन ते स्वये चिद्रूप ॥ चिद्रूपा पुढां मोहाचा रगडा खेंडे मोडिले सहित विकल्प ॥ जारेजा ॥ १२ ॥

असत्याची कढी ॥ लोभें कढे गाढिं ॥ पाजितां पाडिनंबुठि सत्य वादी परम ह्मणविता हे धर्म त्यासिहि चढली फुडी ॥ असत्याचि गांठि बांधिली पृष्टि ॥ ते गांठी कवण सोडी ॥ असत्याचे बळें जहालें सबळे बोधाचि मि दांत पाडि ॥ यारेया ॥ १३ ॥

आहे तें न देखे नाहीं तें देखे त्या नांव असत्यापाही ॥ रज्जु सर्पें खादला कोण पां मेला हें समुळ नाहीं मुळीं नाहीं ॥ असत्याची गोष्टी समुळ खोटि ॥ तेणें तूं जिंकिसि काय ॥ सत्याचेनि बळें प्रबळला जिवें न मारीना ठार ॥ जारे जा ॥ १४ ॥

दातेविण साधि प्रमदा ॥ बांदि लाविन आधोद्वारा ॥ दृष्टिच देखतां जिचें विशिख चढे ॥ भुलविले सुरनरां ॥ विखाचि लहरि चढे घरोघरीं ॥ कांपवी थोरथोरां ॥ बाधेचेनि बळें ॥ जिंतिला देख ग्यां ॥ मारिला पुरा ॥ यारे या ॥ १५ ॥

प्रमदा बाधी आधो संधि ॥ अधःपात्याते बाधि ॥ देहावेव प्रमदा नारवे आत्मतत्वि नाहीं सिद्धि ॥ प्रमदा नव्हे प्रबुद्धा ॥ हें तव वेद प्रसिद्धि ॥ बोधें वादक तळासि आणिला ॥ मारिलासि त्रिशुधि ॥ जारेजा ॥ १६ ॥

बोधा तुझे बळ कळलें सकळ ॥ गुरुत्वें तुझिये गांठिं गुरुशिष्य ग्यां धन लोभा साठीं ॥ जिंति लोक कोट्यानकोटि ॥ धन लोभावारि गुरुचें आसन शिष्य सोडी त्याच्या गांठी ॥ गुरु शिष्या माजी विकल्प नांदे बोध पळे उठाउठी ॥ यारेया ॥ १७ ॥

गुरु शिष्याचा भेद छेदि बोध ॥ धन लोभाचा छेदि कंद ॥ धन मान प्रतिष्ठा केवळ विष्टा हाही जाला प्रतिबोध ॥ गुरु तो चैतन्य शिष्य तो चैतन्यघन ॥ मुळिचे नाहीं भेदाभेद वादकाची ब्रिद सांडविल रंगीं गर्जत उभा बोध जारेजा ॥ १८ ॥

मजसीचांग अनंत येक नाग ॥ लाविन तुझें जिव्हारें ॥ जिव्हारिं झोंबलासे गळे गिळीं ॥ आंत बाहेर नुरवि नुरि यांचेनि बोले वादक जितलें विजयीं झालों चराचरिं ॥ नाग देखोनिया वादक धाके भेणें कांपे थरथरी ॥ १९ ॥

जिवत्व सांडुनि शीवत्व वादकें लपणिये केला थोरा ॥ अंग लपउनी डोळा चुकऊनि दडोनि ठेला पुरा ॥ तेथ सद्गुरु मभा शोधुनि पाहतां धाकें कापें थरथरां ॥ बसळ केवळ परदेवतोतीर्ण देहा नागविला खरा ॥ २० ॥

वेदवादाचा दाबुक वाजत होता साचें नेणें सांडियला नाद ॥ शब्द होता तो निःशब्द जाला सहजें खुंटला वाद ॥ वादकाचा सखा जिवलग देखा जिवाचे मारिला भेद ॥ साधनाच्या कोटि सरलि आटाटि विजयी जाला बोध ॥ २१ ॥

जारे जा जजारे जा जितलें बोधें ॥ वादें बोधिला अद्वैतवादें ॥ जिव शिव वदे जिणोनिया कीं आनंद कोंदे आनंदें ॥ अहं सोडोनियां सोहं भावे वादकें धरियेले पाये ॥ शरण आलों आतां मारूं नको केवळ तुझि गाय ॥ गाये गाये गाये गारुड गाये ॥ सासि मि मस्तकीं वायें ॥ बोध वाद कां दोहीं ऐक्यता जाली समाधानें सुखी होयें ॥ २२ ॥

शरण आले त्यांसि मरण नाहीं ॥ बोधें अलिंगीला अहंभावो ॥ संकल्प विकल्प जन्म जरा दुःख दरिद्र केलें वावों ॥ स्वराज्य देउनिया संपादि स्थापिला फिटला देह संदेहो ॥ एकाजनार्दनीं ऐक्यता पावोनि ब्रह्म जाला स्वयंमेवो ॥ २३ ॥

---

## उद्धवास बोध.

॥ २३७८ ॥ शाहणा तो जाणरे ॥ उद्धवा आत्मत्वें पाहेरे ॥ नेणता तो जाणरे ॥ उद्धवा देहबुद्धीस वाहेरे ॥ १ ॥ उद्धव ह्मणे कान्होबा सांगरे ॥ गोडागोडा गोष्टी स्वभावरे ॥ निज गोडा गोष्टी ऐकतां ॥ चित्त चैतन्य

फावेरे ॥ २ ॥ सज्ञान तोची रे उद्धवा ॥ ज्याची जाणीव विरे ॥ अज्ञान तोची रे उद्धवा ॥ ज्ञानगर्वें हुंबरे ॥ ३ ॥ साधु तोची रे उद्धवा ॥ जो सद्वस्तुतें दावी ॥ असाधु तोची रे उद्धवा ॥ देहीं प्रपंचीं गोवी ॥ ४ ॥ धर्मिष्ट तोची रे उद्धवा ॥ जो जन्ममरण निवारी ॥ अधर्मी तोची रे उद्धवा ॥ लोभ दंभ शरीरीं ॥ ५ ॥ सुख तें जाणरे उद्धवा ॥ जेथें मीतूंपण नुरे ॥ दुःख तें जाणरे उद्धवा ॥ कामसुखासी झुरे ॥ ६ ॥ शम तो जाणरे उद्धवा ॥ ज्याची आत्मत्वें बुद्धि ॥ दम तो जाणरे उद्धवा ॥ जो त्यागी उपाधी ॥ ७ ॥ धृतीची धारणा रे उद्धवा ॥ जिव्हा उपस्थ जिंके ॥ सोलीव करंटा तोची रे उद्धवा ॥ जिव्हा उपस्थीं आटके ॥ ८ ॥ तप तें जाण रे उद्धवा ॥ नित्य नामस्मरण ॥ अभागी तोची रे उद्धवा ॥ नामीं विन्मुखपण ॥ ९ ॥ बळिया बळिष्ठ तोची रे उद्धवा ॥ निज मनासी जिंकणें ॥ नपुंसक तोची रे उद्धवा ॥ मनामागें धांवणें ॥ १० ॥ लाभ तो जाण रे उद्धवा ॥ नित्य भगवद्भक्ति ॥ अलाभ तो जाणरे उद्धवा ॥ नित्य विषयासक्ति ॥ ११ ॥ सत्य तें जाण रे उद्धवा ॥ समब्रह्म देखणें ॥ असत्य तेंची रे उद्धवा ॥ जो देह मी ह्मणे ॥ १२ ॥ वाचा सत्य अनुवादणें ॥ ते लोकसत्य ॥ समब्रह्म नदेखणें ॥ तें असत्य निर्धूत ॥ १३ ॥ उत्तमधर्म तोची रे उद्धवा ॥ निजधर्म ज्या गांठीं ॥ अधर्म तोची रे उद्धवा ॥ धनलोभीया दृष्टीं ॥ १४ ॥ पावन यज्ञ तोची रे उद्धवा ॥ द्विजमुखीं अर्पे ॥ अधमयज्ञ तो उद्धवा ॥ लोभावरी समर्पे ॥ १५ ॥ वरिष्ठ लक्ष्मी ती जाणरे उद्धवा ॥ सर्वभावीं निरास ॥ अलक्ष्मी ते रे उद्धवा ॥ ज्यासी आशापाश ॥ १६ ॥ भाग्य तें जाण रे उद्धवा ॥ वैराग्य बाणे ॥ अभाग्य तेंची रे उद्धवा ॥ जो देहीं मी ह्मणे ॥ १७ ॥ ईश्वर तोची रे उद्धवा ॥ ज्यासी सर्व सत्ता ॥ अनीश्वर तोची रे उद्धवा ॥ ज्याचें स्त्रीअधीन जीवित ॥ १८ ॥ पवित्र तोची रे उद्धवा ॥ कर्मी ब्रह्मप्रीति ॥ अपवित्र तोची रे उद्धवा ॥ कर्मी बध्द प्राप्ति ॥ १९ ॥ पंडित तोची रे उद्धवा ॥ जो देह अहंता छेदी ॥ मूर्ख तोची रे उद्धवा ॥ देह अभिमानी बुद्धी ॥ २० ॥ संन्यासी तोची रे उद्धवा ॥ सर्व संकल्प त्यागी ॥ परग्रही तोची रे उध्दवा ॥ मोहममता अंगीं ॥ २१ ॥ स्वर्ग तो जाणरे उद्धवा ॥ नित्यसंगसंतीं ॥ नरक तो जाणरे उद्धवा ॥ नित्य अधर्मी वृत्ती ॥ २२ ॥ सखा तो जाणरे उद्धवा ॥ स्वयें सद्गुरुराव ॥ वैरी तो जाणरे उद्धवा ॥ देहीं अहंभाव ॥ २३ ॥

दरिद्री तो जाणरे उध्दवा ॥ ज्यासी लोलुप चित्तीं ॥ कृपण तोचि रे उध्दवा ॥ द्रव्य दारा आसक्ती ॥ २४ ॥ एका जनार्दनीं कवित्व ॥ चित्तीं चैतन्य गोड ॥ एकीएकही धरितां ॥ पुरे सर्वही कोड ॥ २५ ॥

---

## उद्धवास देवाचा बोध.

॥ २३७९ ॥ भावें जनार्दन बोले उद्धवासी ॥ बारे तूं परीयेसीं गुह्य गोष्टी ॥ १ ॥ गुह्य गोष्टी तुज सांगतों निभ्रांत ॥ हृदयें फुटत आनंदेसी ॥२॥ आनंदाचा रस न संडी प्रसंग ॥ होसी जीवलग ह्मणोनीयां ॥ ३ ॥ ह्मणोनी उद्धवा तूजसी बोलतां ॥ भेदाचीये वार्ता नाहीं मज ॥ ४ ॥ मज तूज कांहीं नाहीं भिन्न भेद ॥ कैवल्याचा सिद्ध तूंची एक ॥ ५ ॥ तूंची एक भक्तामाजी शिरोमणी ॥ आवडसी मनीं सर्व काळ ॥ ६ ॥ सर्व काळ तूज ध्याइं अहर्निशीं ॥ आनंद मानसीं समाधान ॥ ७ ॥ समाधी विश्रांती मंडण ज्ञानाचा ॥ नाहीं प्रपंचाचा लेश कांहीं ॥ ८ ॥ कांहीं एक कृष्णमुखीं गोष्टीलागीं ॥ उद्धव सर्वांगीं श्रवणार्थ ॥ ९ ॥ श्रवणीं सादर हरिमुख न्याहाळी ॥ सुखाचे कल्लोळीं प्रेमयुक्त ॥ १० ॥ प्रेमयुक्त पाहे सांवळें रूपडें ॥ तेज चहूंकडे फांकतसे ॥ ११ ॥ फांकतसे तेज कुंडलांचें दाटी ॥ वैजयंती कंठीं वनमाळा ॥ १२ ॥ वनमाळा मुद्रीका चिद्रत्नें मुगुटा ॥ कासेसी गोमटा पीतांबर ॥१३॥ पीतांबरधारी श्रीमुख सुंदर ॥ चरणीं तोडर गर्जतसे ॥१४॥ गर्जती नेपुरें आरूणे रंगीला ॥ टीळक रेखीला केशराचा ॥ १५ ॥ केशराचा टीळक कुंकुमाचीं पदें ॥ उद्धव स्वानंदें लोळतसे ॥ १६ ॥ लोळतां देखीला भक्त वेळाइते ॥ आलिंगन देत उध्दवासी ॥ १७ ॥ उद्धवा मज चाड नाहीं तपसाधनीं ॥ नामसंकीर्तनीं प्रीत सदा ॥ १८ ॥ सदां माझें नाम गाती जे भावेसी ॥ त्यासीं मी मानसीं नाविसंबे ॥ १९ ॥ नविसंबें भक्ता नाम जया मुखीं ॥ सरता तीहीं लोकीं होय जाणा ॥ २० ॥ जाण नामासरी नपवे ब्रह्मज्ञान ॥ तीर्थादि भ्रमण व्यर्थ पाहीं ॥ २१ ॥ पाहे पा प्रल्हादा आसनीं शयनीं ॥ नामाही वांचोनी दूजें नेणें ॥ २२ ॥ दूजें नेणें एक द्रौपदी बहीणुली ॥ हर्षें ते वेल्हाळी नाम स्मरे ॥ २३ ॥ नाम स्मरतां गजेंद्रा तुटलें बंधन ॥ पतीत पावन नाम श्रेष्ठ ॥ २४ ॥ नाम सुखानंदें भवानीशंकर ॥ जपे निरंतर नाम माझें ॥ २५ ॥ माझ्या नामरंगीं

गोपाळ गजरी ॥ घालती घूमरी आल्हादेसी ॥ २६ ॥ आल्हादें नाचती प्राण माझे ठायीं ॥ सर्वांसी मी पाहीं त्यासारीखा ॥ २७ ॥ सारिखाची होय थोरा आणि साना ॥ जैसी हे वासना जनार्दनीं ॥ २८ ॥ जनार्दना गातां धाक यमदूतां ॥ येणें जाणें वार्ता तेथें कैंची ॥ २९ ॥ कैंचा कळीकाळ पळे दशदीशा ॥ माझ्या नामासरीसा न राहेची तो ॥ ३० ॥ चित्त मनें शुद्ध गाती माझें नाम ॥ त्यांचें दासीकाम करीन सत्य ॥ ३१ ॥ सत्य बोलंगणें भक्ताचे रंगणीं ॥ वंदी पायवणी नीज भावें ॥ ३२ ॥ भावाचाही भोक्ता नावडेची कांहीं ॥ नामालागीं पाहीं अंकीत मी ॥ ३३ ॥ अंकीत मी होय श्रवणीं संतुष्ट ॥ तयासी वैकुंठ आइतेंची ॥ ३४ ॥ आइताची ठेवी जीव तयावरी ॥ निंबलोण करी वेळोवेळां ॥ ३५ ॥ वेळोवेळां त्यांचे द्वारींच तिष्ठत ॥ नाहींच पाहात मानामान ॥ ३६ ॥ मानामान सर्व सांडीलें उद्धवा ॥ भक्तिप्रेमभावा लागूनीयां ॥ ३७ ॥ लागवेग मज सप्रेम कीर्तनीं ॥ लक्ष्मी डावलोनी नामप्रेम ॥ ३८ ॥ प्रेम नाहीं मज योगी हृदय कमळीं ॥ सविता मंडळी स्थीर नव्हे ॥ ३९ ॥ नव्हें मी संतुष्ट महा यज्ञदानीं ॥ पंचाग्नीसाधनीं चाड नाहीं ॥ ४० ॥ चाड असे जेथें हरी नाम गाती ॥ त्यांच्या पुण्यामिती ब्रह्मा नेणें ॥ ४१ ॥ ब्रह्म याचा सुत नारद विख्यात ॥ स्वबोधें डुल्लत नामबळें ॥ ४२ ॥ नामबळें देखा तरला चांडाळ ॥ नेला अजामेळ मुक्तिपंथा ॥ ४३ ॥ मुक्तिपंथें नेली नाम घेतां वाणी ॥ तात्काळ कुंटणी तारीयेली ॥ ४४ ॥ तारील्या गोकुळीं गोपीका सुंदरी ॥ तयांचे शरीरीं मीच वसें ॥ ४५ ॥ वसें घरोघरीं प्राण माझे ठायीं ॥ न विसंबती पाहीं क्षण मज ॥ ४६ ॥ मज आठवीती उठतां बैसतां ॥ दळीतां कांडितां नाम माझें ॥ ४७ ॥ मज आठवीती चालतां बोलतां ॥ गाइतें दुहीता नाम माझें ॥ ४८ ॥ माझीये स्मरणीं सुखाचे शेजारीं ॥ प्रीती पडिभरी चित्त त्यांचें ॥ ४९ ॥ चित्ताचा चोरटा ज्यासी जैसा भाव ॥ त्यासी मी वासुदेव तैसा होय ॥ ५० ॥ होय ज्यासी माझे भजनीं संभ्रम ॥ त्यासी मी आत्माराम प्रीयकर ॥ ५१ ॥ प्रीयकर आत्मा ह्मणोनीयां जाण ॥ केलें नीरोपण भक्तराया ॥ ५२ ॥ भक्तासी उपाव नामींच विस्तार ॥ नाहीं आनथोर नामेवीण ॥ ५३ ॥ नाम सारासार ओंवीया चौपन्न ॥ करीती पटण नीज भावें ॥ ५४ ॥ भावें उच्चारी होय पाप धुणी ॥ एका जनार्दनीं संकीर्तन ॥ ५५ ॥

## मदलसेचा बोध.

॥ २३८० ॥ जन्मोनी आलासी कवणीये वाटे ॥ मरणा अंतीं तें अधिक पैं भेटे ॥ १ ॥ रवरव कुंभ पाक तया पुढें धाकुटें ॥ गर्भ वास नव्हे सुवास दुःख दारूण मोठें ॥ धृ ॥ परियंदे कळवळोनी सद्गुरु वचनें बा निज प्रपंच पाळणा रे दुःख दारूण तुज ॥ देहा दिप लाऊनीयां जागे जागणा सहज ॥ सोय सांगें मदलसा कामेविण हे काज ॥ रजस्वला विटाळें सचिळ प्रसिद्ध ॥ तया विटाळाचे निखळ अशुद्ध ॥ त्या माजी जन्म तुज जनक रेत संबंध ॥ मळ मुत्र मध्य भागीं जठरीं वासु अधः उर्ध्व ॥ २ ॥ मळमुत्र दाथरी आणिलें विरोधा ॥ जठराग्नी माजी उकडसी सदा ॥ अष्टांग संधीं भागीं तेणें मिळतुसें सदां ॥ वाराही न लागे तेथें थोर होती आपदा ॥ ३ ॥ जउरा माजी वासु सदा अधो मुखीं ॥ विष्ठा मुत्र जंतु तोंडीं आणि नाकीं ॥ ४ ॥ सोहं सोहं ह्मणसी दुःखें नाहीं स्वरुपें वोळखी ॥ विषय तें विष जाण मूर्ख मानिती सुखीं ॥५॥ वाचे विण देहो गर्भाचें खोळें ॥ वासना जननीये उठती डोहळे ॥ कट्वम्ले लवण राई सेविता सर्वांग पोळें ॥ नित्य नवी जाचणी हे गात्र मात्र पै हुळे ॥ ६ ॥ भजने विण कैसा होतसे दुःखी ॥ गर्भी मानिताहे पडिली चुकी ॥ न करीची दान पुण्य नाहीं भुत दया शेखीं ॥ मीं माझें वाढवितां नव्हेची स्वहितीं बोळखी ॥ ७ ॥ देह जन्में विटाळु जन्मा पैं आला ॥ उपजोनी स्वकुळां विटाळु बा केला ॥ ८ ॥ देह तंव सुतकाचा अंतीं सुतकें बांधिला ॥ तोची तो देह विटाळु प्रेती प्रगट झाला ॥ ९ ॥ देह देहीं वासना वाढवी पुढां ॥ जन्मोजन्मीं घाली हाडाचें खोडा ॥ हें तुज न कळे कैसें कटकटारे मुढा ॥ ह्मणोनी जुंपिलासि जन्म मृत्युचे वेढा ॥१०॥ लक्षालक्ष धन वेचितांची कोडी ॥ नर देहीं आयुष्य न मिळे पैं घडी ॥ तेही त्वां व्यर्थ केलें वायां विषयाचे वोढी ॥ अझुनी सोय धरी भजे गुरु चरणीं आवडी ॥११॥ आयुष्य वेगावेगीं धांवोनी जायी ॥ उदो अस्तु जया उरला नाहीं ॥ सदां स्वप्रकाश ते शरण रिघे सा पायीं ॥ भावेची उद्धरिसी देहीं करिती विदेही ॥ संत चरणीं भावे रिघालिया शरण ॥ तत्काळ चुकविती ते जन्म मरण ॥१२॥ प्रपंच पारुपेरे नाहीं दृश्य दर्शन ॥ देह देहीं हरपेल करितील परिपूर्ण ॥१३॥ निज भावें परिस तूं संतवर्तन ॥ जनीं असोनियां न देखती जन ॥ जन वन उरले नाहीं निखळ देखती

चैतन्य ॥ चालतें ब्रह्म तेगा अगम्य त्याचें महिमान ॥१४॥ जन्मां येऊनीया निरसिलें जन्म ॥ मरण मारुनिया जालें निःकाम ॥ कामना हरपोनी सदां वर्तती सम ॥ सम भावें शांत देहीं ॥ परा पर तें परम ॥ १५ ॥ भोगावरी तया नाहीं बा चाड ॥ त्यागातें न करिती मानुनिया गोड ॥ भोगीच त्यागु त्यासी स्थिती बाणली दृढ ॥ तेंची तूं गुरु करी अनन्य तारावया कोड ॥ १६ ॥ आप्त वचन ऐसें ऐकोनी कानीं निज ॥ भावें निवाला एका जनार्दनीं ॥ तोची तो सहज बोधु दिसे मनीं आणि नयनीं ॥ जागृति आणि सुषुप्ति बोध दिसताहे स्वप्नीं ॥ १७ ॥

---

# अभंग रुक्मिणी स्वयंवर.

॥ २३८१ ॥ चौघे सांगति वराच्या खुणां ॥ साही करिती विवंचना ॥ अठराही जण गुण गाती ॥ मननें वेधलेंसे मन ॥ जीवा न दिसे जीवपण ॥ दृढ लागलेंसे ध्यान ॥ कैसें कृष्ण चरणीं अवस्था लागली थोर ॥ नावडे माया माही येर ॥ वृत्ति झाली एकाकार ॥ कृष्णमय गिळोनि तिहीं आवस्थासी ॥ प्रेमें झाली परम पिशी ॥ वरावया हृषीकेशी उताविळ ॥ १ ॥ नववधु वेधियली ॥ पाहे वेधली ते बाळी ॥ अवघा श्रीकृष्ण न्याहाळी ॥ प्रेम पडितरे वेल्हाळी ॥ कैशी वोसंडली श्रवणीं झालें श्रवण ॥ वाचा पडोनि ठेलें मौन ॥ पावावया कृष्ण चरण ॥ उदित झाली ॥ जिवी जिवामाजी व्यथा ॥ वरावया कृष्णनाथा ॥ वेगें लागली अवस्था ॥ कांहीं बोलवेना ॥ चित्तीं चिंतिता अनंता ॥ देह नाटवे सर्वथा ॥ कीटकी भृंगी अवस्था ॥ तिसी झाली असे ॥ २ ॥ ऐसा ठसावला भावो ॥ तोचि द्विजवर वसुदेवो ॥ मूळ पाठविला पहावो ॥ सिद्ध द्वारकेसि ॥ निज अवस्थेची मशी देखा ॥ शुद्धसत्वाची पत्रिका ॥ इहीं अक्षरीं अक्षर देखा ॥ लिहियेलें पत्र देखोनि आल्हादु हरी ॥ श्रवणीं निवाला अंतरीं ॥ हरिखें निर्भय श्रीहरि ॥ भावें लांचावला ॥ शुद्ध देखोनि आवडी ॥ देवो उठिला कडाडी ॥ एकाजनार्दनु घाली उडी एकपणें ॥ ३ ॥

॥ २३८२ ॥ संन्नध निजाचें दळ ॥ कृष्ण बळें तें प्रबळ ॥ शस्त्रें झळकती केवळ ॥ ध्यान निर्धाराची नवल धनुष्याची मोडी ॥ अनुसंधानेशी

थोडि बाण सुटति कडाडी ॥ लक्ष न चुकती शर भेदले सर्पाछि ॥ भेदोनि अहंकार कवचासी ॥ जिवीं रुतले जिवासी ॥ कांहीं बोलवेना ॥ लिंग देहातें भेदितु ॥ भेदुनि अभेदे छेदितु ॥ वेगीं पातला अनंतु ॥ नव वधुपासी ॥ १ ॥ नवरा पातला वोहरी ॥ नवलु नवरा हरि ॥ एकाकी चराचरी ॥ पारख्याते मारामारी करित आला ॥ खवळला रणांगणीं ॥ सन्मुख न राहे कोणी ॥ आपुले पारखे दोन्ही निवटितु ॥ अनिवार प्रीति हरि जीवें घेतली नोवरी ॥ जीव मारुनिया करि ॥ कैसें पाणि ग्रहण देखतांहि चराचरीं ॥ देहामाजी चोरी करी ॥ चैतन्य चोरटा हरी ॥ कैसागे वळला ॥ ध्रु० ॥ ऐशी वर्णुनि नोवरि ॥ वेगें निघाला श्रीहरि ॥ सखे बंधु तेचि वैरी ॥ होउनी आड आले ॥ वैराचा सुळमारी ॥ माचंदनाचा कायतारि ॥ आपुले पारखे वैरि ॥ उरोनेदी तेथें पाक्षि विपक्षि दंडी ॥ खांड मिशातेही मुंडी ॥ मशी लाउनियां तोंडीं ॥ अवघे थूं थूं ह्मणती ॥ अरिमर्दनी संनधु ॥ वेगीं पातला गोविंदु ॥ येका जनार्दना नववधु ॥ माळ घाली ॥ २ ॥

॥ २३८३ ॥ अष्टभाव गुढिया उभउनि आंगें ॥ वार्तिकार वेगें सांगों आले ॥ १ ॥ सुख सांगति दूत परम अद्भुत ॥ रुक्मिणी अच्युत घेउनि आला ॥ ध्रु० ॥ काम जरासंद निजघायेंसी त्रासिला ॥ सक्रोध रुक्मियां कृष्णें विटंबिला ॥ २ ॥ अहंकार शिशुपाळ नाडिला ॥ हरि हातिची नोवरी घेउनि गेला ॥ ३ ॥ अहं दमघोष अपमानला पळे ॥ यापरि पर सैन्य त्रासिले गोपाळें ॥ ४ ॥ ऐका जनार्दनीं एकल्या धाडी ॥ परापर नोवरी श्रीकृष्ण काढी ॥ ५ ॥

---

## चिरंजीवपद.

॥ २३८४ ॥ चिरंजीव पद पावावयासी ॥ अधिकार कैसा साधकासी ॥ किंचित बोलूं निश्चय निश्चयेंशी ॥ कळावयासी साधकां ॥ १ ॥ येथें मुख्य पाहिजे अनुताप ॥ त्या अनुतापाचें कैसें रूप ॥ नित्य मरण जाणे समीप ॥ न मनी अल्प देहसुख ॥ २ ॥ ह्मणे नरदेह किमर्थ निर्मिला ॥ तो मीं विषय स्वार्थी लाविला ॥ थिता परमार्थ हातींचा गेला ॥ करी वहिला विचार हा ॥ ३ ॥ ऐसा अनुताप नित्य वाहतां ॥ तंव वैराग्य ये तयाच्या हातां ॥ त्या वैराग्याची कथा ॥ ऐक आतां सांगेन ॥ ४ ॥ तें वैराग्य

बहुता परीं ॥ आहे आहे गा अवधारी ॥ सात्विक राजस तामस त्रिप्रकारीं ॥ योगीश्वरीं बोलिजे ॥ ५ ॥ नाहीं वेदविधी आचार ॥ नेणें सत्कर्म साचार ॥ कर्म धर्मीं भ्रष्टाकार ॥ तो अपवित्र तामस ॥ ६ ॥ साग केला पूज्यते कारणें ॥ सत्संग सोडूनि पूजा घेणें ॥ शिष्य ममता धरोनी राहणें ॥ तें जाणणें राजस ॥ ७ ॥ हें वैराग्य राजस तामस ॥ तें नमनेच संतांस ॥ त्यास न भेटे कृष्ण परेश ॥ अनर्थास मूळ तें ॥ ८ ॥ आतां वैराग्य शुद्ध सात्विक ॥ जें मी जगद्वंद्य मानीं यदु नायक ॥ तें तूं सविस्तर ऐक ॥ मनीं निष्टंक बैसावया ॥ ९ ॥ भोगेच्छा विषयीक ॥ ते तो सांडीं सकळीक ॥ प्रारब्धें प्राप्त होतां देख ॥ तेथोनि निष्टंक मन काढी ॥ १० ॥ कां जे विषय पांच आहेती ॥ ते अवश्य साधकां नाडिती ॥ ह्मणोनि लागों नेदी प्रीति ॥ कवणे रीतीं ऐक पां ॥ ११ ॥ जेणें धरिला शुद्ध परमार्थ ॥ त्यासि जन मान हा अनर्थ ॥ तेणें वाढे विषय स्वार्थ ॥ ऐक नेमस्त विचार हा ॥ १२ ॥ विरागी पुरुष देखोनी ॥ त्याची स्तुति करिती जनीं ॥ एक सन्मानें करूनी ॥ पूजे लागोनि पैं नेती ॥ १३ ॥ त्याचें वैराग्य कोमळ कंटक ॥ नेट न धरीच निष्टंक ॥ देखोनि मानस्तुति अलौलिक ॥ भुलला देख पैं तेथें ॥ १४ ॥ जन स्तुति लागे मधुर ॥ ह्मणती उद्धारावया हा हरीचा अवतार ॥ आह्मां लागीं जाहला स्थिर ॥ तेणें तो धरी फार शब्द गोडी ॥ १५ ॥ हा पांच विषयांमाजीं प्रथम ॥ शब्द विषय संभ्रम ॥ मग स्पर्श विषय सुगम ॥ उपक्रम तो ऐसा ॥ १६ ॥ नाना मृदु आसनें घालिती ॥ विचित्र पर्यंक निद्रेप्रति ॥ नरनारी शश्रूषा करिती ॥ तेणें धरी प्रीति स्पर्शाची ॥ १७ ॥ रूप विषय कैसा गोंवी ॥ वस्त्रें भूषणें देती बरवीं ॥ तेणें सौंदर्य करी जिवीं ॥ देह भावीं श्लाघ्यता ॥ १८ ॥ रूप विषय ऐसा जडला ॥ रस विषय कैसा झोंबला ॥ जें जें आवडे तयाला ॥ त्या त्या पदार्थाला अर्पिती ॥ १९ ॥ ते रस गोडी करितां ॥ घडी न विसंबे धरी ममता ॥ मग गंध विषय ओढितां ॥ होय तत्त्वतां त्या कैसा ॥ २० ॥ आवडे सुमन चंदन ॥ बुका केशर विलेपन ॥ ऐसे पांचही विषय जाण ॥ जडले संपूर्ण सन्मानें ॥ २१ ॥ मग जे जे जन वंदिती ॥ तेची त्याची निंदा करिती ॥ परि अनुताप नुपजे चित्तीं ॥ ममता निश्चितीं पूजकांची ॥ २२ ॥ ह्मणाल विवेकी जो आहे ॥ त्यासी जन मान करील काय ॥ हें बोलणें मूर्खाचें पाहे ॥ तया चाड आहे मानाची ॥ २३ ॥ ज्ञात्यासी प्रारब्ध गती ॥ मान झाला तरी नेघों ह्मणती ॥

परी तेथेंचि गुंतोनि न राहती ॥ उदास होती तात्काळ ॥ २४ ॥ यापरि साधकाच्या चित्ता ॥ मानगोडी न संडे सर्वथा ॥ जरी कृपा उपजेल भगवंता ॥ तरीच मागुता होय विरक्त ॥ २५ ॥ तो विरक्त कैसा ह्मणाल ॥ जो मानलें सांडी स्थळ ॥ सत्संगीं राहे निश्चळ ॥ न करी तळमळ मानाची ॥ २६ ॥ मांडीना स्वतंत्र फड ॥ ह्मणे अंगा येईल अहंता वाड ॥ धरूनि जीविकेची चाड ॥ न बोले गोड मन धरणी ॥ २७ ॥ नावडे प्रपंच जनीं बैसणें ॥ नावडे कोणासी बोलणें ॥ नावडे योग्यता मिरवणें ॥ बरवें खाणें नावडे ॥२८॥ नावडे लौकीक परवडी ॥ नावडती लेणीं लुगडीं ॥ नावडे परान्न गोडी ॥ द्रव्य जोडी नावडे ॥ २९ ॥ नावडे स्त्रियांत बैसणें ॥ नावडे स्त्रियांचें पाहणें ॥ नावडे स्त्रियांचें रगडणें ॥ त्यांचें बोलणें नावडे ॥ ३० ॥ नको नको स्त्रियांचा सांगात ॥ नको नको स्त्रियांचा एकांत ॥ नको नको स्त्रियांचा परमार्थ ॥ करिती आघात पुरुषासी ॥ ३१ ॥ ह्मणसी गृहस्थ साधकें ॥ स्त्री सांडोनी जावें कें ॥ येच अर्थी उत्तर निकें ॥ ऐक आतां सांगेन ॥ ३२ ॥ स्वस्त्रिये वांचोनी ॥ नातळावी अन्य कामिनी ॥ कोणे स्त्रियेशीं संनिध वाणी ॥ आश्रयो झणी न द्यावा ॥ ३३ ॥ स्वस्त्रीसही कार्या पुरतें ॥ पाचारावें स्पर्शावें निरुतें ॥ परी आसक्त होउनीया तेथें ॥ सर्वथा चित्तें नसावें ॥ ३४ ॥ नरनारी शुश्रूषा करीती ॥ भक्ति ममता उपजविती ॥ परी शुद्ध जो परमार्थी ॥ तो स्त्रियांचे संगतीं न बैसे ॥ ३५ ॥ अखंड एकांतीं बैसणें ॥ प्रमदासंगें न राहणें ॥ जो निःसंग निरभिमानें ॥ त्या पैं बैसणें सर्वदां ॥ ३६ ॥ कुटुंब आहारा कारणें ॥ अकल्पित न मिळे तरी कोरान्न करणें ॥ ऐसे स्थिती जें वर्तणें ॥ तें जाणणें शुद्ध वैराग्य ॥ ३७ ॥ ऐसी स्थिति नाहीं ज्यासी ॥ तंव कृष्ण प्राप्ति कैंची त्यासी ॥ या लागीं कृष्ण भक्तासी ॥ ऐसी स्थिति असावी ॥ ३८ ॥ या स्थिती वेगळा जाण ॥ कृष्णीं मिळूं पाहे तो अज्ञान ॥ तो सकळ मूर्खाचें अधिष्ठान ॥ लटिकें तरी आण देवाची ॥ ३९ ॥ हें बोलणें माझिये मतीचें ॥ नव्हे नव्हेचि गा साचें ॥ कृष्णें सांगितलें उद्धवा हिताचें ॥ तें मी साचें बोलिलों ॥ ४० ॥ साच नमानी ज्याचें मन ॥ तो विकल्पें नपवे कृष्णचरण ॥ माझें काय जाईल जाण ॥ मी तो बोलोन उतराई ॥ ४१ ॥ साधावया वैराग्य ज्ञान ॥ मनुष्य देहीं करावा प्रयत्न ॥ सांगे एका जनार्दन ॥ आणीक यत्न असेना ॥ ४२ ॥

---

## भीष्म स्थिति.

॥ २३८५ ॥ प्रतिज्ञा करोनि देवो निःशस्त्री झाला तंव भावें भक्त प्रतापियां ॥ कृष्णा कृष्णपर्णीं भीष्मचि भरला देवपण नयेचि आया ॥ अर्जुनेसी झुंझारी कीं भावो भिंडे कृष्ण करी देवो आणिला हरी हरिखाचिये ॥ १ ॥ भक्ता सन्मुख देवो कैसेनि राहेल पाहो भावरी भावो परिजित असे ॥ अर्जुना लागीं हारी घेऊनि ठेला हरी भीष्माचा कैवारी न होऊनी झाला ॥ ध्रृ० ॥ प्रकृती परणावया सांगे परशराम तंव भीष्में घातला काम पायातळीं ॥ देवपणाचेनि नेठें युद्धां प्रवर्ततां भावें भक्त अधीक बळी ॥ देवाचें देवपण भक्तें जिणोनि नेलें प्रकृतीची केली तेथें होळी रे या ॥ २ ॥ आपला ह्मणोनि अर्जुन राखतां भीष्मासी आणिली थोरी ॥ अर्जुनाचा पढियावो अर्जुनीं उरउनी अवघाचि भीष्मावरी ॥ एका जनार्दनीं सन्मुख दुजा नुरे देवपण आले भक्ता करी रे या ॥ ३ ॥

---

## धांवा कयाधूचा.

॥ २३८६ ॥ अहारे देवा काय हें करविसी ॥ मातेच्या हस्तें बाळक मारविसी ॥ कयाधू माता करोनिया पाक ॥ आठवी आपुल्या कर्माचा विपाक ॥ क्षिरामाजी मेळविलें ताक ॥ माझिये मनीं होता हा बहु धाक ॥ १ ॥ काय म्यां केला साधूचा अपमान ॥ किंवा हरिलें ब्राह्मणाचें धन ॥ गांजीलें काय अनाथा लागुन ॥ ढकलीलें कूपीं अंधारीं नेऊन ॥ २ ॥ स्त्रीपुरुषा माजी अंतर पाडीलें ॥ बाळक आणि मातेसी विघडिलें ॥ हरणीचें काय पाडस तोडिलें ॥ मच्छासी जळा बाहेरी काढीलें ॥ ३ ॥ पतीची आज्ञा मजला मोडवेना ॥ पतिव्रता धर्म माझ्यानें सोडवेना ॥ स्नेहाचा पाश मजला तोडवेना ॥ द्यावया वीष हात वोटवेना ॥ ४ ॥ नव मास तूज म्यां उदरीं वाहीलें ॥ डोळेभरी नाहीं म्यां पाहिलें ॥ मंगल कार्य होणें तें राहिलें ॥ द्यावया वीष तान्हुलें वाहीलें ॥ ५ ॥ येरे बा सगुणा प्रल्हादा राजसा ॥ तुजला मी जेऊं घालितें पाडसा ॥ तुजविण मजला वोस दाहिदिशा ॥ निष्ठुर कैसा झालासी जगदीशा ॥ ६ ॥ कयाधू माता घेवोनीया पेला ॥ वीष हें लावी बाळाचा मुखाला ॥ प्रल्हाद आठवी श्रीहरिच्या

चरणाला ॥ अमृततुल्य वीष झालें त्याला ॥ ७ ॥ धरूनीयां हृदयीं दिधलें चुंबन ॥ कुर्वाळी हस्तें बाळाचें वदन ॥ स्नेहाचे भरें मांडिलें रूदन ॥ सद्गदित एकनाथ जनार्दन ॥ ८ ॥ अहारे दैवा० ॥

---

## धांवा.

॥ २३८७ ॥ माझा कृष्ण देखिला काय ॥ कोणी तरी सांगागे॥ध्रु०॥ हातीं घेउनीयां फूल ॥ अंगणीं रांगत आलें मूल ॥ होतें सारवित मी चूल ॥ कैसी भूल पडियेली ॥ १ ॥ माथां शोभे पिंपळपान ॥ मेघ वर्ण ऐसा जाण ॥ त्याला ह्मणती श्रीभगवान ॥ योगी ध्यान विश्रांती ॥ २ ॥ संगें घेउनी गोपाळ ॥ बाळ खेळे अळुमाळ ॥ पायीं पोल्हारे झळाळ ॥ गळां माळ वैजयंती ॥ ३ ॥ एका जनार्दनीं माय ॥ घरोघरां भ्रती जाय ॥ कृष्णा जाणावें तें काय ॥ कोणी सांगागे ॥ ४ ॥

॥ २३८८ ॥ रघुनंदन पायीं गेला ॥ रथ कांरे त्वां आणिला ॥ १ ॥ सूर्यवंशीं नारायण ॥ माझा राघव जातो वनां ॥ २ ॥ सूर्यवंशीं दिनकरा ॥ तपूं नको तूं भास्करा ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं भाव ॥ पदोपदीं राघव राव ॥ ४ ॥

॥ २३८९ ॥ कृष्णा धांवरे लवकरी ॥ संकट पडलें भारी ॥ हरि तूं आमुचा कैवारी ॥ आलें विघ्न निवारी ॥ धुं० ॥ १ ॥ पांडव असतां वनवासीं ॥ कळलें कौरवासी ॥ त्याणें पाठविलें ऋषीसी ॥ सत्व हरावयासी ॥ कृष्णा० ॥ २ ॥ साठि सहस्र संख्या अन्न ॥ दुर्वासा भोजन ॥ सत्व जातील घेऊन ॥ अंतर पडतां जाण ॥ कृष्णा० ॥ ३ ॥ रात्र जाहली दोमहर ॥ आले ऋषेश्वर ॥ भोजन मागती सत्वर ॥ कैसा करूं विचार ॥ कृष्णा० ॥ ४ ॥ आज कां निष्ठुर जाहलासी ॥ होईल बा गति कैसी ॥ अनाथ मी देवा परदेशी ॥ धांव तूं वेगेंसी ॥ कृष्णा० ॥ ५ ॥ आतां न लावी उशीर ॥ अनर्थ करील हा फार ॥ एवढा करीं उपकार ॥ दे दर्शन सत्वर ॥ कृष्णा० ॥ ६ ॥ कंठ शोषला अनंता ॥ प्राण जाईल आतां ॥ पदर पसरतें अच्युता ॥ पावें रुक्मिणी कांता ॥ कृष्णा० ॥ ७ ॥ ऐकूनि बहिणीची करुणा ॥ आला यादव राणा ॥ द्रौपदी लोळत हरि चरणा ॥ एकाजनार्दना ॥ कृष्णा० ॥ ८ ॥

---

# हिंदुस्थानी भाषेचे अभंग.

॥ २३९० ॥ हमारे राम बेदराम पुरान ॥ रामनाम सर्व शास्त्र पठण ॥ १ ॥ रामही जप रामही ध्यान ॥ रामनाम यहि परम ग्यान ॥ धृ० ॥ राम तीर्थ रामही क्षेत्र ॥ रामनामें चारो बेद पवित्र ॥ २ ॥ एका जनार्दनीं अविचल बुद्धी ॥ रामनाम यही परम समाधी ॥ ३ ॥

॥ २३९१ ॥ खीर खांड घृत मयली जावे ॥ पर. घर लंपट माखन खावे ॥ १ ॥ दधी दूधको घरमो नही तोटो ॥ चोरी को भल लागत मीठो ॥ २ ॥ सुनोहो जशोदा मायामेरी ॥ मीठो लागे करते चोरी ॥ ३ ॥ एका जनार्दन ग्यान गावे ॥ गोकुळ गोरस चोरन खावे ॥ ४ ॥

॥ २३९२ ॥ देखे जमाल चढीये गोपाल ॥ भय हलहल सबही उठे न्हाटे ॥ १ ॥ मालमाही बडा च्यानुर आती गाढा ॥ आगे आयो ठाडो हरिसो दाटे ॥ २ ॥ देखे जदुराय सदमुख धाय ॥ उठावत बाह्य गर्बसु उठे ॥ ३ ॥ लीलाबल कान्हा घयलेत प्राण ॥ मुक्तिको दान बैकुंठ पेठे ॥ ४ ॥ एका जनार्दन स्वसुख निधान ॥ समाधीको दान चरन नही छूटे ॥ ५ ॥

॥ २३९३ ॥ वेदशास्त्र परम प्रमान ॥ येक राम वोर नहीरे ज्यान ॥ १ ॥ हामरे राम बेद राम परान ॥ रामनामें सब शास्त्र पठन ॥ २ ॥ राम जप रामही ध्यान ॥ रामनाम येही परम पावन ॥ ३ ॥ राम तीरथ रामही क्षेत्र ॥ रामनाम च्यारो बेद पवित्र ॥ ४ ॥ एका जनार्दनीं अविचल बुद्धी ॥ रामनाम येही परम समाधी ॥ ५ ॥

॥ २३९४ ॥ काम क्रोध लोभ लूट न चाहे ॥ दीन देखीयो राजारामही दौरे ॥ १ ॥ आगे राम पिछेही राम ॥ रामसंगें भवभय निष्काम ॥२॥ रामसंगें मै बाट न भूले ॥ राम चलावे तैसा चाले ॥ ३ ॥ एका जनार्दनीं दीन दयाल ॥ मेरे घर आवे राम कृपाल ॥ ४ ॥

॥ २३९५ ॥ हरीबीन मुख ते चंमारकुंड ॥ भीतरीं जिव्हा सो चामखंड ॥ १ ॥ सो जीव्हा भारकाचो चाम ॥ जे नकहे हरिगोविंद नाम ॥ २ ॥ चाम भले जे पन्हइ लावे ॥ संत जे पग हाटे आवे ॥ ३ ॥ एका जनार्दन रामनाम बीन ॥ जिव्हा प्रेतमुख समशान ॥ ४ ॥

॥ २३९६ ॥ भक्तिनें घर भगवत आवे ॥ मुक्तीपासे कोउ दुरा ज्यावे ॥ १ ॥ मुक्तितो बैरी मुक्तितो बैरी ॥ मारे मारे सबका ढेलरी ॥ २ ॥ भक्तिपासाव भाई नवविधा साधी ॥ मुक्तिपासी नही संगसाधी ॥ ३ ॥ भक्तिताहा नूतन नित्य राम ॥ मुक्तिमानही रूपनानाम ॥ ४ ॥ भक्तिपंथें उछाडन झोटे ॥ मुक्तिपंथें कामक्रोध लुटे ॥ ५ ॥ एका जनार्दनीं मिठो नाम ॥ मुक्तिको कछु नही रे काम ॥ ६ ॥

॥ २३९७ ॥ राम नाम जीव्हा जपहो वेगे ॥ जम काल देखे न्हाटन लागे ॥ १ ॥ नाम कर्म नाम धर्म ॥ नाम परब्रह्म अक्षर दुई ॥ २ ॥ राम नाम कहता गीर गीर पडे ॥ गंगा काशी ताके चरण ठाडे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं अखंड नाम ॥ त्याको कहे मन राजाराम ॥ ४ ॥

॥ २३९८ ॥ खीन खीन घटत आवत मरन ॥ अबहूं न भजो तुम राम चरन ॥ १ ॥ राम भजन छोरे कवनीये काजा ॥ बहुरी बहुरी मरत नही लाजा ॥ २ ॥ जन धन कामिनी देह गेहे न पुता ॥ अंत कोइ नही आवे साता ॥ ३ ॥ एका जनार्दनीं मनको संग ॥ मरू परती लगी अभंग ॥ ४ ॥

॥ २३९९ ॥ चीन्हत चीन्हत काय अभागी ॥ हरि रूप छांडी विषय मति लागी ॥ १ ॥ गोविंद गोविंद गोविंद ध्यावो ॥ रामयाके गुन अखंड गावो ॥ २ ॥ जपे राम छोड और काम ॥ नरदेहीं आवे येहाका धरम ॥ ३ ॥ चीन्हत जनत जो अभिमान ॥ हरी गुन गावे एका जनार्दन ॥ ४ ॥

॥ २४०० ॥ सबही दीन रात करत है धंदा ॥ काहे कहत नही राम गोविंदा ॥ १ ॥ कवनही काज करता हे गरब ॥ खिन येक आवे जमकि तलब ॥ २ ॥ राम नाम छोडी परापवादी ॥ ते कारन तूं भये अपराधी ॥ ३ ॥ अमीत बेस धरी बीषय पासे ॥ ते कारन जमके दंड सोसे ॥ ४ ॥ बाद बेबाद छांडी हुं गरब ॥ राम जपत नही आवे जमकी तलब ॥ ५ ॥ एका जनार्दनीं आस ना पास ॥ हरी गुन गावे ताके दासनको दास ॥ ६ ॥

॥ २४०१ ॥ राम नाम मुखसे गावत नाचत ॥ भक्तजन देखी यन्हा जमदूत ॥ १ ॥ आयोरे भले वैष्णव गाढे ॥ रामकृष्ण गुन गावत गाढे ॥ २॥ टाळ घोळ हरी नाम कल्लोळ ॥ वैष्णवा डरपे भागे जमकाळ ॥ ३ ॥ राम कृष्ण गुन करत पवाडा ॥ त्या देखत जम हात जोर ठाडा ॥ ४ ॥ नाम

मतापें बैकुंठ चढे ॥ बैकुंठ स्वामी हात जोर खडे ॥ ५ ॥ एका जनार्दनीं अहिंनिसीं नाम ॥ सापास नहीं छुटा राजाराम ॥ ६ ॥

॥ २४०२ ॥ वैष्णवके घर बांधे राम ॥ अहर्निसी राम गर्जत नाम ॥ १ ॥ भक्तनके घर राखे राम ॥ कबहुन छोडे मेघःशाम ॥ २ ॥ रमा कहे सेवा करो तुमारी ॥ छांडा ठाकुर देव मुरारी ॥ ३ ॥ रमा सारखे पाइ-लाख ॥ राम न छोडे येक निमीख ॥ ४ ॥ रमा बदलजे रामही छोरे ॥ आपने मु आपे माटी डारे ॥ ५ ॥ मोही छोरो मुक्ती देउ तुमारो ॥ राम बीना मुक्ति लातही मारो ॥ ६ ॥ राम बीना मुक्ति कांहा करीये ॥ राम छोड मुक्ति हात न धरीये ॥ ७ ॥ एका जनार्दनीं पायो राम ॥ मुक्तिको कछु नहीरे काम ॥ ८ ॥

॥ २४०३ ॥ गुरुके कौलखेती लाई ॥ संत हमारे साती भाई ॥ १ ॥ राम राखे रामही देखे ॥ राम नामें हमारी खेती पोखे ॥ २ ॥ भक्त तरावे पासे भाई ॥ वैराग्य बीलसे भली कमाइ ॥ ३ ॥ गुरु कृपा मेहु बरषत भाई ॥ ग्यान मुद्रा बुद्धी बीज बोई ॥ ४ ॥ हरि गुन पुरान बाडी लावे ॥ गर्जत हरी नाम पक्षी उडावे ॥ ५ ॥ एका जनार्दनीं पीक भरपुर ॥ राम नाम भया बाहेर भीतर ॥ ६ ॥

॥ २४०४ ॥ पूर्व पुन्य ते नर देह पाया ॥ राम न कहते जनम ग-माया ॥ १ ॥ राम नाम तुम कहहो बेगे ॥ धन मान कछु मोल न लागे ॥ २ ॥ हात पाव भले बिचे काम ॥ खाली जीव्हा कहो राम नाम ॥ ३ ॥ राम नाम छोरे बरबर करे ॥ बांधे जम दूत ताके मारे ॥ ४ ॥ छाते मोहे-राइ जमदूत लाटे ॥ राम नाम कहे काह्या न छूटे ॥ ५ ॥ एका जनार्दनीं हरी नाम जपे ॥ काल कर्म जपताकु डरपे ॥ ६ ॥

॥ २४०५ ॥ तेरे गुन सुनीकर देखनकु मै आई ॥ तुज म्याने मीलकर मुजमे तुज पाई ॥ १ ॥ क्षर म्याने अक्षर अचेत चेतवे ज्ञानी ॥ दुःखकार जमा नहींवो सुख देखो नयनीं ॥ २ ॥ ज्ञान रुपयो अक्षर अनस्युत आ-नंद ॥ सबरा भरीत भरा है विश्व कहना आबुद ॥ ३ ॥ विश्व देख्या वो सोता है न देखे वो ज्यागता ॥ एका जनार्दनीं सच्चिदानंद दाता ॥ ४ ॥

॥ २४०६ ॥ कल्पित कल्पना शून्य करी करी सहजी सहज देवोरे ॥ सहजी आचार्य सहजी पूजा सहजी सहज भावोरे ॥ १ ॥ सहजालो सह-

जालो सहज तू कोन जानें ॥ सहजीं सहज आसन लागा तो शीव गुरु करी मानरे ॥ २ ॥ दृष्टी दृश बीन देखहुं दर्श आंग बीन होये स्पर्श ॥ रसना बीन रस चाखोरे भाई ॥ मेहो बीन नित्य बर्शे ॥ ३ ॥ सूरज बीन दीन उगवेना भाई ॥ प्रभा मनोहर भासेरे ॥ त्रिसंधी संधी काळ गगना ॥ उदो अस्त दुई नासे ॥ ४ ॥ निद्रा माजी अखंड जागे जागृती लागे नीदरे ॥ जनार्दन पुत्रा अभिन्न येका रमती सहजी सहजरे ॥ ५ ॥

॥ २४०७ ॥ गुरु कृपा अंजन पायो भाई ॥ राम बीना कछु खाली नही ॥ १ ॥ भीतरीं राम बाहेरीं राम ॥ ज्यांहा देखो तांहा पूरनकाम ॥ २ ॥ ज्यागत राम सोवत राम ॥ सपनही देखो रामही राम ॥ ३ ॥ एका जनार्दनीं भाव निको ॥ जे देखु ते राम सरीखो ॥ ४ ॥

॥ २४०८ ॥ अस्थी चर्मको पंजरडो माहे भरीय मुत्रआमेद ॥ कुश्चितरुप दुर्गंधी कामिनी भुली रमे वेद बीदरे ॥ १ ॥ शुकरडो भाइ शुकरडो नरक खोजीखोजी खांवे ॥ गुरु न चीन्हे तत्व न जाने ते नर कामिनी भावेरे ॥ २ ॥ घरबार छांडीये मुंडमुंडावे फीरत देशबीदेश ॥ आकामिनी आखंड लागी नीबंधबाधे वनसारे ॥ ३ ॥ खांदे मधुर पाके मारे जैसा होये बीखनाग ॥ या परी प्राणी भुलले पशुवत कामिनीको रती संगरे ॥ ४ ॥ जोनी जन्मे जोनी रमे शुद्धी न माने सांगे ॥ जनार्दनपूता अभिन्न येका जन अंधा कामिनीयोगें ॥ ६ ॥

॥ २४०९ ॥ आधोमुख भाई सर्पीन लागी दंश बीन चढे वीखा ॥ पढीपढी पंडी शूळीया नारी दुःख मानी सुखारे ॥ १ ॥ सर्पिनरे भाई सर्पिनरे देखी भुलावे आखे ॥ चित्तबित्त सबाह्य अंतर ॥ अहर्निसी पुरखांड खेरे ॥ २ ॥ सर्पिनी बसे बीवरा मूरुख कहे घर मेरा ॥ तीमापेटमो सर्पिन लागी डंखी ये सुरनरा ॥३॥ स्तुती नाग सुरसुनसुनकर नादे सर्पिनी डुले ॥ अहर्निसी भोग बहुबिध लावे ते पर पुरुखा भुलेरे ॥ ४ ॥ क्रोधें सर्पिण फडा चढावे द्वेषें दे फुंकारा ॥ जनार्दन पुत्ता अभिन्न येका ॥ भुले जन भगदारा ॥ ५ ॥

॥ २४१० ॥ कस्तुरी चंदन दुर करकर नरक मे घुंगरडा ॥ सिद्ध आत्म सुख छांडकर भगभोग मागे मूढा ॥ १ ॥ क्रीमीकीडा रे क्रीमीक्रीडा रे नरक नीरयो रती संगें ॥ या परी प्राणी कामिनी योगें ॥ मरमर पतन

भोगे ॥ २ ॥ दिपेनादें भगयोगें पारधी मृगा गोवे ॥ पाठ पट्टरंक कनक भूषण भग मुख आप भुलावे ॥ ३ ॥ आगन कुंड सम नरिनी वानत पिंड पुरुखा ॥ दीप पतंग माने आसक्त बळे रतीं सुख माने मुरखा ॥ ४ ॥ कामिनी संगें अखंड योगें जे नर भोग न मागे ॥ जनार्दनपूता अभिन्न येका सो निज तत्व भैला अंगे ॥ ५ ॥

॥ २४११ ॥ आगी देखी पंगत हारिखा नारी देख देख पुरुखा ॥ आंगसंग सत्वहराय रतीसुख माने मुरुखा ॥ १ ॥ परमा दीलोपरमा दीलो इसपर मादींके संग लगा ॥ पावन नरदेह बीखही बिनासे कामिनीभग मुखभागा ॥ २ ॥ वृधावृधी बाकासाकी भगमुख बाह्या खोडे ॥ नातीपूता ग्रहस्थ भैले ते पर साखल जोडे ॥ ३ ॥ आयुख घाना खेट खेटकर भला नीपाया घर ॥ बांधी आखी फिर घन लागा देश पतकरकर ॥ ४ ॥ औट हातकी अखंड प्रमदा दिवस रात नर भोगे ॥ जनार्दनपुता अभिन्न येका गुरु कृपा देहबुद्धी त्यागे ॥ ५ ॥

॥ २४१२ ॥ ध्यान धरू तो देव ना देवी नैवेद्य नही तांहा बोना ॥ पूजा करूं तो भक्त ना पाती गाऊ तो शब्द ना पवना ॥ १ ॥ निरास भाऊं निरास भाऊं शून्य मो शून्य लखाऊ ॥ घट मठ कांहा निरास भैले ते तत्व गुरुगम्य पाऊ ॥ २ ॥ दरसन करूं तो रूप ना रेखा ताहां धूप ना दिपा ॥ चंद्रसूरज दोनो नीप्रभ भैले सेऊ तो आपोंही आपा ॥ ३ ॥ फाकट ध्याऊ फुकट गाऊ नयन बिना निज ध्याऊ॥ क्षुधा खाऊ तृषा पीऊ मरेना जीवेना जीऊ ॥ ४ ॥ अहं ना सोहं जीव ना सोहं सीव ना तहा पाप ना पुन्या ॥ जनार्दनपूता अभिन्न येका निशब्द गावो बचना ॥ ५ ॥

॥ २४१३ ॥ नारद तेरी गांडाभरी औरत मागे दान ॥ आंघोल करत गाभिना हुवा पोंगडे जीणे साठ ॥ १ ॥ हा हा मूंढे हा हा मूंढे ॥ आपना नफा देख गुंडे ॥ धृ० ॥ सब देवमो ब्रह्मा बडा पढत चारो बेद ॥ सरस्वती सो ख्याल किया ब्रह्मा बेटी चोद ॥ २ ॥ पाराशरकी नुनी उठीं नावडीलागी मीटी ॥ कर्ण कुमारीसो संग किया ॥ व्यास लेकर उठी ॥ ३ ॥ एका जनार्दन कहे मूंढे नफा पर ब्रह्म सार ॥ वासना तेरी सीर मुंडाई गावे दीलगार ॥ ४ ॥

वामनाई ठेंगणाई वो ॥ परसाई रामाई वो ॥ ३ ॥ कृष्णाई वो बोधाई वो ॥ कळकाई वो ॥ गंगाई वो भागाई वो ॥ रेणुकाई वो गडबडाई वो ॥ चांगुणाई वो तुकाई वो आम्या ॥ ४ ॥ काय तुझ्या भयाचे साद पाहे ॥ सांगणें बोलणें नचले वो माये ॥ तुझ्या जीविचें सांगेन ॥ तुझ्या पुसील ते सांगेन ॥ तुझ्या मनीचें सांगेन ॥ जें सप्तपाताळी खालते तुज तुज माजी ॥ तेंच मज माजी ॥ काय धमक घेऊन बसलीसगे धमकटी ॥ तुझ्या धन्याची आस करीन ॥ थुः तुझ्या तोंडावरी ॥ थुः तुझे लोभावरी ॥ शकुन सांगेन ते ऐक ॥ काळीयाई वो आम्मा ॥ ५ ॥ मागु सा बुटगुंडा ॥ मागु सा बुरगुंडा ॥ नीट केल्या वहुत रांडा ॥ तैसी नव्हे मी कैकाये ॥ निज ज्ञान करंडा ॥ काळी आई ओ आम्मा ॥ ६ ॥ नमो कानडी भाषा ॥ केळीव शीघ्रता ॥ शकुन केळी शकुन केळीसा ॥ इवो नमो आर ॥ गीड बीड आशा बीडह्याळ्यावा ॥ गन्मोड होऊगे आम्मा ॥ ७ ॥ गंदिने धनान्ने तमिन्ने गर्वीने हाडव्याण ॥ आडव्या डामो होशातुडा ॥ काळी आई वो आम्मा ॥ ८ ॥ नमो तैलंग दिशो ॥ मच्छमच्छ भाषा ॥ सरोव मुसलछोपे आम्मा ॥ ९ ॥ मी चित उनाळू कईयाळू ॥ नईयाकु खटाखटाये ॥ काळी-आई वोआम्मा ॥ १० ॥ कैकाय कैईकाये ॥ शकुन सांगेन ते ऐक ॥ कई-काय कैकाये ॥ नकळे ब्रह्मादिको ॥ कईकाय वृत्ति खोटी ॥ कईकाय कईकाये ॥ सत्य सांगेन गोष्टी ॥ जीवशीवा पडली मिठी ॥ एकाजनार्दना-च्या कोटी ॥ काळीआई वो आम्मा ॥ ११ ॥

॥ २५१६ ॥ निर्गुण निराकार दादा माहुर माझें गांव ॥ शकुन सांगावया आले यमाई माझें नांव ॥ तये नगरीं वस्ती केली मी तरी आले एकेभावें ॥ ऐसा माझा शकुन दादा चित्त देऊनी ऐकावें ॥ १ ॥ कैकाय कैकाय दुरील माझा देश ॥ शकुन सांगावयास आलें कलियुगास ॥ ब्रह्मा-विष्णूमहेश पुसती शकुन आह्मास ॥ ऐसें निदान आह्मीं सांगितलें त्यांस ॥ २ ॥ धरित्री आकाश मज देखतां उत्पत्ती ॥ चंद्र सूर्य मज देखतां दादा होती ॥ ब्रह्माविष्णूमहेश मज देखतां उपजती ॥ जेथें आहे शिव तेथें आदिशक्ती ॥ ३ ॥ दाही अवतार मज देखतां झाले ॥ अकराहीरुद्र दादा होऊनियां गेले ॥ ऋषी मुनी गंधर्व मज देखतांचि झाले ॥ ब्रह्माविष्णुमहेश मज देखतां निमाले ॥ ४ ॥ अठ्ठावीस युगें झालीं चक्रवर्ती ॥ कौरव पांडव गेले कोणे पंथीं ॥ तुह्मी आह्मी जाऊं मागें कोणी न राहती ॥ ५ ॥ पृथ्वी-

मध्यें दादा एक विपरीत होईल ॥ बहीणभावां दोघांजणांचा विवाह लागेल ॥ पांचा वरुषांची बाळा भ्रतार मागेल ॥ सहा वरुषांची नारी गर्भिण होईल ॥ ६ ॥ आणिक एक दादा माझा ऐकावा बोल ॥ पृथ्वी-वरुता वारा थोर झुंझाट सुटेल ॥ थोरथोर दादा पर्वत उडोनि जातील ॥ अठराही जाती एके ठिकाणीं जेवतील ॥ ७ ॥ कलियुगाची दादा ऐकावी थोरी ॥ पुत्र तो होईल पित्याचा वैरी ॥ भ्रतारा सोडोनी घरोघरीं फिर-तील नारी ॥ ऐसा माझा शकुन दादा आइका निर्धारीं ॥ ८ ॥ आणिक एक दादा माझें आइका उत्तर ॥ आकार जाईल अवघा होईल निराकार ॥ जाती चंद्रसूर्य मग पडेल अंधःकार ॥ धरित्री आकाश जाईल मग कैचा दिनकर ॥ ९ ॥ आणिक एक शकुन माझा ऐकावा संतीं ॥ तुह्मीं मूळपीठीं राहणें नांव माझें आदिशक्ती ॥ अंबेचा व्यवहार आहे आहे आदिमूर्ती ॥ एकाजनार्दनीं प्रसन्न झाली आदिशक्ती ॥ १० ॥

---

# डौर.

॥ २५१७ ॥ १ ला नाद–चटपटचटपटचटपटचटपट ॥ शिखा सूत्र स-पाट ॥ वीरजा होमीला इष्ट ॥ परी अफुट तैसाची ॥ वायां केली ताडा तोडी ॥ वृथा त्यजिली सूत्र शेंडी ॥ विषय वासना संधी ॥ उपाधी गाढी ॥ श्रीपाद संन्यास घेतला काचा ॥ जिव्हा शिश्न वेंचिलें साचा ॥ विटंबु केला कायाचा ॥ यालागीं चटपट ह्मणतात ॥ १ ॥

२ रा नाद–खटपटखटपटखटपटखटपट ॥ शास्त्र परदान अलोट ॥ बांधो-नि वित्पत्ति मोट ॥ सेना सुनाट धावणी ॥ वादा तर्का लावा लावी ॥ भरला विषयांचे नाटवी ॥ वरि वरि वृंदावन दिसे बरवें ॥ परी अंतरीं कडवट गा दादांनो ॥ या लागीं खटपट ह्मणतात ॥ २ ॥

३ रा नाद–फटफटफटफटफटफटफटफट ॥ या नादाची वाट नीट ॥ ओलंघुनी औट पीठ ॥ ऊर्ध्व पाट भेदुनी ॥ मन पवन समरसेनी ॥ ब्रह्म-रंध्रीं लीन होउनी ॥ हा अभिमान वाटोनि ॥ झालेपणें फुंजती ॥ ते ओ-खटे गा डौराकार ॥ करूनि देहाचा मातेरा ॥ भरू पाहतां सुषुम्नाद्वारा ॥ परी असाध्य खरा तो मार्गु ॥ या लागीं फटफट ह्मणतात ॥ ३ ॥

४ था नाद–लटपटलटपटलटपटलटपट ॥ मिळवूनि शिष्यांचा थाट ॥ अद्वैत ज्ञानाचा बोभाट ॥ भरला हाट जीविकेचा ॥ गुरु लोभें धन मान ॥ शिष्य लोभें अति लीन ॥ दोघांशीं लटपट लागली पूर्ण ॥ कोणी कोणासी आवरेना ॥ यालागीं लटपट ह्मणतात ॥ ४ ॥

५ वा नाद–तळमळतळमळतळमळतळमळ ॥ धरणें पारणें निर्मळ ॥ तीर्थ यात्रे लागीं चपळ ॥ घेतला पळ जीविकेशी ॥ नाना वृत्ति आरंभिली ॥ नाना दैवतें पूजिलीं ॥ शेखीं काळें नरडी चेपिली ॥ दुःखें तळमळे गा दादांनो ॥ यालागीं तळमळ ह्मणतात ॥ ५ ॥

ऐसे पांच भेद नादांचे ॥ मनीं धरा विवेकाचे ॥ एका जनार्दनीं ह्मणे साचे ॥ बोला वाचे हरि नाम दादानो ॥

॥ २५१८ ॥ ऐकागा ये साधु सज्जन हो ॥ महंत महाजन हो ॥ मननशीळ मुनि जनहो ॥ यागीं सज्ञान हो सावध ऐका ॥ १ ॥ वैकुंठ राणे राज्य धर ॥ चिन्मात्रैक राजकुमर ॥ निज ज्ञानी वेव्हारी थोर ॥ ते निस सादर तेही ऐका ॥ २ ॥ विनवी जनार्दनाचा एका ॥ सेवितां तुमच्या चरण पियुखा ॥ उजळले निजात्मसुखा ॥ डौर कार नाथाचा ॥ ३ ॥ उठुनीया ब्राह्म मुहुर्तीं ॥ काय करावें निश्चीती ॥ तें ऐका तुह्मां प्रति ॥ येथ निगुती सांगेन ॥ ४ ॥ डौर नाद चुड मुख ॥ कर्म मार्गाची स्मृति ॥ श्लो० ॥ गृहित सीस्नोचोत्थाय जगां दिश उत्तरं ॥ कर्म मार्गींचि पद्धती ॥ शिश्न धरोनी डावे हातीं ॥ दुर्वा धरुनी उजवे हातीं ॥ उत्तर दीशेप्रति हागो जावें ॥ ५ ॥ ऐसे मुहुर्ति हागों लागलें ॥ ते जाणा हागवण बटीस गेलें ॥ ब्राह्म मुहुर्ति साधु भलें ॥ काय करूं लागले तें ऐका ॥ ६ ॥ ज्ञान मार्गींची स्मृति ॥ श्लो० ॥ ब्राह्मे मुहूर्ती चोत्थाय चिंतयेदात्मनेहितं ॥ आत्महीत चिंतन ॥ मज व्हावें धन धान्य ॥ मज व्हावी मान्यता मान्य ॥ भूत भविष्य वर्तमान ॥ हें ज्ञान मज व्हावें ॥ ७ ॥ मज व्हावें वस्त्र कलत्र ॥ मज व्हावें पशु पुत्र ॥ हे चिंता जे निरंतर ॥ ते नव्हे साचार आत्महीतासी ॥ ८ ॥ डौरनाद डुगु ॥ चिंता करोनी काय ॥ तिथे आयुष्य वृथा जाये ॥ जें चिंतावें तें अदृष्टीं आहे ॥ हित चिंतन पाहें अनायासें ॥ ९ ॥ तें कैसे डौर कारा वाइक बोल ॥ मी हाता पाया पर्ता ॥ मी गुणत्रया वरुता ॥ चहुंवाचेहुनी तत्वता ॥ आतित तो सर्वथा मीच

मी स्वयें ॥ १० ॥ धर्माधर्म इंद्रीयें सत्ता ॥ माझेनी चाले सर्वथा ॥ परी मी कर्म धर्मा पर्ता ॥ करूनी अकर्ता मीच मी स्वयें ॥ ११ ॥ जीव शीव ऐसी वार्ता ॥ माझें स्वरुप वस्तुता ॥ जीव शीवा नातळतां ॥ प्रकृति पुरुषा परता मीच मी स्वयें ॥ १२ ॥ देह जो कां पावता मरण ॥ त्या माजी न मरता मी आपण ॥ तेथें नाहीं मी तूं पण ॥ तें स्वरूप वस्तुता पूर्ण ॥ मीच मी स्वयें ॥ १३ ॥ ऐसें करी जो चिंतन ॥ त्याच्या मरणासीच ये मरण ॥ अंगीं नलगे जन्मबंधन ॥ एकाजनार्दनीं निज वाक्य ॥ १४ ॥

॥ २५१९ ॥ डौर नाद आनंद वर्तेल या चोंहटा ॥ धादांत वेदांत सिद्धांत ॥ बोल बोलोनी गेले बहुत ॥ आतां मी आलों भोगांत ॥ माझा वद्दनार्थ सादर ऐका ॥ १ ॥ धादांत वाइक डौर काराचे ॥वेदांत वाइक पंडीताचें ॥ सिद्धांत वाईक जोतिषाचें ॥ भोगांत वाइक माझे सादर ॥ ऐका गाये सज्ञान ज्ञाते हो ॥ २ ॥ डौर काराचे बोल ॥ विचारितां खोल ची खोल ॥ ते आशेनें केले केवळ फोल ॥ विश्वासाची बोळ गेली ते ऐका ॥ ३ ॥ दान देतो महाश्वाड ॥ ने दितो सदां द्वाड ॥ हें बोलणे अतिशयें वाड ॥ परी लुलु करी चाड जे मज दान द्यावें ॥ ४ ॥ तें लुलुनें काय केलें ॥ बोलिलें तितुकें वायां गेलें ॥ वायां जाऊनी गौरविलें ॥ डौरकारा दिधलें काळमुखेंपण ॥ ५ ॥ धरूनी प्रतिष्ठेचें बंड ॥ बोल बोलती प्रचंड ॥ आशा वाढविली उदंड ॥ तेव्हां त्याचें काळे तोंड तें ऐसें असे ॥ ६ ॥ ऐसे काळ तोंडे उदंड जगीं फिरताती ॥ ऐसी आह्मां डौरकाचि गती ॥ त्यांच्या डौराची नांद स्थिती ॥ ऐका तुह्मां प्रति सांगेन ॥ ७ ॥ डौरनाद चुडमुख ॥ डुकुघुकु ॥ कुसुमुस ॥ तळमळ ॥ खटपट ॥ लडबड ॥ भाग ॥ खळ ॥ खळबळ ॥ बडबड ॥ ऐशा नादाचिया कोटी ॥ मग शंख नादें डौर उठी ॥ हे नादाची मूळ गोठी ॥ आतां वेदांत परीपाठी सांगेन ॥ ८ ॥ झालीया वेदांत वित्पति ॥ अवश्य व्हावी ब्रह्म प्राप्ती ॥ तेथें ही गुण दोष उटति ॥ ज्ञान गर्वं स्थिती नागवि नाचे ॥ ९ ॥ डौरनाद ॥ ३ ॥ खळ ॥ खडबड ॥ २ ॥ वडवड ॥ २ ॥ वाचुनिया वेदांत ॥ पुढिलासी ह्मणती दांत ॥ आपण स्वये आदत्त ॥ गुण दोष पाहात सर्वांचे ॥ १० ॥ पंडीत पंडीता देखोनी दिठी ॥ क्रोधें गुरुगुरु करी पोटीं ॥ वरी वरी बोलती गोड गोष्टी ॥ क्षुद्रीं दृष्टी ठेउनी ॥ ११ ॥ वाग वाद बांधुनी गांठीं ॥ पत्रा-

चलंबन करीती हाटीं ॥ ज्ञान विकीती पोटा साठीं ॥ ऐशा वेदांताच्या गोष्टी ॥ पंडीत परी पाटी अन्योन्मुख झाली ॥ १२ ॥ आतां सिद्धांतपरीपाटी ॥ ज्योतिषी सांगे ज्या ज्या गोष्टी ॥ ते ते समुळ अवघी खोटी ॥ मिथ्या चावटी ते ऐका ॥ १३ ॥ रवि सोम प्रतिमा साचा अंतीं ॥ मंडळ साम्य समत्वा येती ॥ सूर्या आड चंद्राचि गती ॥ जाण निश्चीती दिनद्वया ॥ १४ ॥ ते अमावास्येचा दीवशीं ॥ जीवें जीत्या चंद्रासी ॥ नष्टत्व स्थापिती ज्योतिषी ॥ ते या लोकांसी सत्य माने ॥ १५ ॥ दिठी चंद्रासी नवाळी बहु ॥ नष्ट चंद्रासी ह्मणती कुहुं ॥ ऐसें मिथ्या बोल बोलति बहु ॥ करीती हाहा हुहु सिद्धांत वक्ते ॥ १६ ॥ अदृष्टें खावया नाहीं ज्यासी ॥ ज्योतिषी सांगे ग्रहगति त्यासी ॥ तेचि रासीच्या नांदत्यासी ॥ ह्मणती नवग्रह तुह्मांसी प्रसन्न सदां ॥ १७ ॥ ज्याची देखती अवदशा ॥ त्यासी ह्मणती दुर्ग्रह दशा ॥ जेथें देखती लक्ष्मि विलासा ॥ तेथें जन्म ग्रहदशा उंच ह्मणती ॥१८॥ एवं वेदांत सिद्धांताचिया गती ॥ मिथ्या वचनें सत्य ह्मणती ॥ तेणेंचि सभे माजी श्लाघ्य जती ॥ जीविका वृति लक्षुनी ॥ १९ ॥ एवं धादांत वेदांत सिद्धांत ॥ तीहींचा दाविला मथितार्थ ॥ माझें बोलणें भोगांत ॥ तें लोकांत रुचेना ॥ २० ॥ तरी कांहीं बोलेन चाहुटी ॥ ते सादर ऐका गोष्टी ॥ सभा देखोनीया मोठी ॥ जो तो उठी बोलावया ॥ २१ ॥ परी मज भोगांताचिया वाईका ॥ तुह्मीं सादर होउनी आइका ॥ धरूनी आपुलाला आवांका ॥ निजात्मसुखालागोनी ॥ २२ ॥ ये खेपें आले धरा गाय रायहो ॥ आले धरा आले धराल तरी दवळा धरा ॥ दवळा धरा दवळा धरा दवळा धराल तरी मासा धरा ॥ मासा धराल तरी बांदि धरा ॥ बांदिच्या कारणें जाते धरा ॥ जाते धराच्या कारणें मेढां धरा ॥ मेंढा धाराच्या कारणें बेटकुळी धरा ॥ ये अवघी धराच्या कारणें अवश्य धरावें ग्रहण ॥ ग्रहन धराल तरीं जीवें भावें धरा ॥ तेणेंची ग्रहणें अर्धोदय करा ॥ अगा सज्जन जनहो ॥ २३ ॥ आले ह्मणजे काइगा ॥ काय माळ्याचे आले धरावें ॥ किं पीक आले धरावें ॥ किं केणें आले धरावे ॥ किं नाणें आलें धरावें ॥ किं कोण आले धरावे ॥ ह्मणाल तरी ऐका गाये बोध निधी ॥ २४ ॥ उदार चक्र वति माळ्याचें आलें तें आलें नव्हें किं पीक आलें ते आले नव्हे ॥ केणे आले ते आले नव्हे ॥ नाणे तें आले नव्हे ॥ मनुष्य देहीं आयुष्य आले तें आयुष्य धरा ॥ २५ ॥ हें आले

धरितां ॥ अलभ्य लाभ ये हातां ॥ सुरनर वंदिती माथां ॥ तिर्थे तीर्था मार्गी येती ॥ २६ ॥ ऐसेंही आले आलिया वरी ॥ घालोनी प्रपंचाच्या शिळेवरी ॥ विषय चिंतेची मीठ मोहरी ॥ ठेंचा कारी भलताची ॥ २७ ॥ परी आल्याची एक फोडी तरी ॥ कोणेनेंदि परमार्था वरी ॥ या परी आलें घरो घरीं ॥ नरनारी नाशिती ॥ २८ ॥ डौरनाद डुगु ॥ त्या आल्याच्या सात कांदळी ॥ उरल्या होत्या परीक्षिती जवळी ॥ त्या अपुर्ण परमार्थ मेळी ॥ सुखाच्या सुख कल्लोळी ॥ सुखरूप झाला ॥ २९ ॥ आपण मीनला सुख कल्लोळी ॥ जग निववीलें सुख सुकाळी ॥ श्रीभागवताची पोंहे घातली ॥ हे ख्याती केली परीक्षितीनें ॥ ३० ॥ खटवांगे रजभरी आलें ॥ जन्म मरणाचें नांव पुसीलें ॥ थोड्या काळांत सार्थक भले ॥ निज रूप केलें निजांगें ॥ ३१ ॥ हें दुर्लभ आलें आलीया घरा ॥ जे घालीती देह ममतेचा पातेरा ॥ ठेंचा करीति विषये द्वारा ॥ त्याच्या कोटी वेरझारा जन्म द्वारा न सरती ॥ ३२ ॥ ह्मणाल आले धरावें कवण्या रीती ॥ विवेक वैराग्य घ्यावें हातीं ॥ सदां भगवद्भाव धरावा सर्व श्रोती ॥ एकाजनार्दनीं चित्तीं धरीतां निश्चीति आले लाभे ॥ ३३ ॥

॥ २५२० ॥ आतां धवळा धरा गा ये राय हो ॥ धवळा धरा धवळा धरा जवळा ॥ धवळा धरीतां मार्ग प्रांजळा ॥ धरितां धवळ्याची कळा ॥ आह्मीं कळिकाळा नागवों ॥ १ ॥ ज्या धवळ्यावरी आले चाले ॥ ज्या धवळ्यावरी आले मोलावले ॥ ज्या धवळ्यावरी आले सरतें झालें ॥ तो धवळा भाव बळें जिवीं धरा ॥ २ ॥ धवळा धरूं कापुस कीं धवळा राजहंस धरूं चोखट ॥ कि धवळा धरूं पारजखोट ॥ किं धवळा धरूं काश्मिरीचा स्पटिक घांट ॥ धवळ कोण सांगेन स्पष्ट सावध ऐका ॥ ३ ॥ धवळा नव्हे कापूस धवळा नव्हे राजहंस चोखट ॥ धवळा नव्हे पारजखोट ॥ धवळा नव्हे काश्मिरी स्पटिकघांट ॥ धवळा निजधर्म चोखट तिही लोकीं ॥ ४ ॥ निजधर्म जो सोज्वळा ॥ त्यासी बोलीजे शुद्ध धवळा ॥ जो भागवती वाखाणिला ॥ स्वयें रक्षीला परिक्षितीनें ॥ ५ ॥ एक धवळा धरीती खोटा ॥ एक धवळा धरीती उफराटा ॥ एक धवळा धरीती अव्हांटा ॥ एक धवळा धरीती पोटां ॥ अवघ्या धवळ्याच्या चेष्टा न कराव्या हो रायहो ॥ ६ ॥ खोटा उफराटा अव्हांटा ॥ एक धवळा धरिती पोटां ॥

या बोलिल्या खटपटा ॥ याही स्पष्टा सावधान ऐका ॥ ७ ॥ काशीचा पोहा लुटीती ॥ कां सात्विकांते नागविती ॥ तेणें द्रव्यें धर्म करीती ॥ खोटा निश्चीती या नांव राया ॥ ८ ॥ मारूनी धर्माचीया वाटा ॥ लुटोनी दिने चोहाटा ॥ वाढविती धर्माचा फांटा ॥ तो जाण खोटा धर्म राया ॥ ९ ॥ यापरी धर्म खोटा ॥ आतां ऐक धर्म उफराटा ॥ धर्मची लागे अधर्म वाटां ॥ तेही निष्ठा अवधारी राया ॥ १० ॥ कन्या विक्रयें द्रव्य प्राप्ती ॥ कां गो विक्रयें द्रव्य आर्जीती ॥ हय विक्रयें द्रव्य जोडीती ॥ तो धर्म निश्चीती अधर्म ॥ ११ ॥ तेणें अधर्में धरूनी ताठा ॥ मिरविती धर्माचीया खटपटा ॥ या नांवें धर्म उफराटा ॥ तो धर्म लावी वाटा अधर्माचिया ॥ १२ ॥ संन्यासी द्रव्य अर्जीती ॥ तेणें द्रव्यें धर्म करिती ॥ घेते देते नर्का जाती ॥ तो धर्म निश्चीती अधर्म होय ॥ १३ ॥ विवाह मुंजी कां यज्ञ करिती ॥ द्वीजा धरा दत्ते द्रव्य संकल्पीति ॥ तेचि मागतां नेदिती ॥ द्विजा निर्भत्सिति धनमान दर्पें ॥ १४ ॥ यापरी धर्म निष्ठा ॥ करोनी करीति धर्म उफराटा ॥ आतां धर्मची लागे अधर्मवाटा याही चेष्टा अवधारीया ॥ १५ ॥ लोकिकीं वाढवावया महीमान ॥ तुळा पुरुष करीति दान ॥ देह विष्टा मुत्रें परिपूर्ण ॥ धन त्या समान जोखीती ॥ १६ ॥ या परि धर्मरूप धनाचें जीर्णें ॥ जोखुनी विष्टा मुत्र प्राय करणें ॥ परी परमार्था कारणें ॥ केव्हा देणें न संभवें ॥ १७ ॥ केवळ मिरवावया प्रतिष्टा ॥ धर्म मिरविती अनेक चेष्टा ॥ तो धर्म बांधोनी वाचेऱ्या चोहोटा ॥ यापरी आऱ्हांटा घालीती धर्मु ॥ १८ ॥ काम्य फळाशा धर्म करीती ॥ जप करूनी द्विजा मजुरी देती ॥ तेही पुरती न देती यापरी धर्माची स्थिती ॥ आऱ्हांटा सुचिति निज लाभे ॥ १९ ॥ मातापिताचे श्राद्ध दिनीं ॥ दक्षणा नांवें घालुनी पाणी ॥ मागतां नेदिती ब्राह्मणी ॥ ते धर्माची निशाणी अधर्मी लागे ॥ २० ॥ खोटा आणि उफराटा ॥ धर्म सांगितला आऱ्हांटा ॥ जे जें धर्म वेंचे पोटा ॥ तेही चेष्टा आवधारी राया ॥ २१ ॥ आचाट मांडुनिया धर्म स्थिती ॥ तद्वारा द्रव्य उपार्जिती ॥ शेखी धर्मासी अंगोठा दाखविती ॥ द्रव्य लाविती उदरार्थ ॥ २२ ॥ श्रेष्ठ यजमान आला देखति ॥ तेव्हां अग्नीहोत्राचा धुवा काढीती ॥ तेचि काळीं अग्नी लाविती ॥ एऱ्हवी नांदती उंदिर तेथें ॥ २३ ॥ यजमान पाठीमोरा झाल्या देख ॥ मागें अग्नीहोत्राची होय राख ॥ यापरीस ज्ञान लोक ॥ उदरार्थ देख लाविती धर्म

॥ २४ ॥ काशीयात्रे लागी सबळ ॥ नानापरी मेळविती पुष्कळ ॥ तीर्थ लक्ष होम रुद्रीचे पोफळ ॥ घेउनी प्रबळ अर्जीती धन ॥ २५ ॥ एवं उभये देशीं धन आर्जीती ॥ तेही यजमाना देश वृद्धी देती ॥ ऐसा पोटालागी धर्म धरीती ॥ जाण गा ये निश्चीति सज्ञानहो ॥ २६ ॥ ऐसी जे धर्म चेष्टा ॥ ते धर्मी भरला सन्नीपात फांटा ॥ शुद्ध धर्मांची जे निष्टा ॥ ते कदां अनिष्टा होउ नेदी ॥ २७ ॥ शुद्ध धर्म सोज्वळा ॥ सातें भागवत ह्मणे धवळा ॥ तो चतुष्पाद धरावा सगळा ॥ त्या नांव मांजला परम धर्मु ॥ २८ ॥ यासी प्रथम पाव तो धन ॥ दुसरा पाव तो वचन ॥ तिसरा काइक जाण ॥ मानसिक धर्म संपूर्ण चतुष्पाद ॥ २९ ॥ मानसीक धर्मा पुढें ॥ धन वचन काइक बापुडे ॥ मानसीक धर्माचे बळ गाढे ॥ तोडी रोंकडे भव-बंद ॥ ३० ॥ मानसीक धर्मांची स्थिती ॥ होय ब्रह्मज्ञान प्राप्ती ॥ च्यारी मुक्ति पायां लागती ॥ ऐसी अगाध स्थिती मानसीक धर्मांची ॥ ३१ ॥ मानसीक धर्मांची स्थिती ॥ जे भवगद्भाव सर्व भूति ॥ धर्मांची स्थिती याही वरुती ॥ जाण निश्चीती असेना ॥ ३२ ॥ एकाजनार्दन ह्मणे ॥ जनीं जनार्दन मनीं पाहाणें ॥ सकळ धर्मांचे निज जिणें ॥ संसाराचें धरणें समुळ उठी ॥ ३३ ॥

॥ २५२१ ॥ आले धरीले ॥ धवळा धरीला ॥ आतां मासा धरा गा ये रायहो ॥ मासा धरावा तो कोण ॥ जळीचा मासा धरावा ॥ किं सोन्याचा मासा धरावा ॥ रूप्याचा मासा कीं दीवस मासा धरावा ॥ कोण मासा धरावा ॥ ह्मणाल तो ऐका गा ये रायहो ॥ १ ॥ जळीचा मासा तो मासा नव्हे ॥ सोन्याचा माशा तो मासा नव्हे ॥ रूप्याचा मासा तो मासा नव्हे किं दिवसमासा तो मासा नव्हे गा ये रायहो ॥ २ ॥ जो अतिशय चंचळ ॥ अत्यंत चपळ ॥ धरीतां न धरवे निश्चळ ॥ तो मनोमासा केवळ धरावाहो ॥ ३ ॥ तो चतुर्भुजाचा गळीं ॥ कां हरी भक्तिचा जळीं ॥ भगवद्भवाचा करतळीं ॥ वीवेकें महाबळी मासा धरीती ॥ ४ ॥ हा मनोमासा धरलीया पाठीं ॥ घरा वैकुंठ स्वयें ये भेटी ॥ अर्धोदये कपिला षष्टी ॥ चरणांगुष्टीं पावन ॥ ५ ॥ हा मनो मासा लागल्या हातीं ॥ जीवासी वरी परब्रह्म प्राप्ती ॥ एका जनार्दनाची स्थिती ॥ चारीमुक्ति वोळगण्या ॥ ६ ॥

॥ २५२२ ॥ आतां बांदि धरा गा रायेहो ॥ बांदी धरावी ती कोण तुरकाची बांदी धरावी ॥ कीं रेशमाची बांदी धरावी ॥ कीं पेंवाची बांदी धरावी ॥ कीं कडब्याची बांदी कीं कोण बांदी धरावी ॥ ह्मणाल तरी ऐका गा ये रायहो ॥ १ ॥ तुरकाची बांदी ते बांदी नव्हे ॥ रेशमाची बांदी ते बांदी नव्हे ॥ पेंवाची बांदी ते बांदी नव्हे ॥ कडब्याची बांदी ते बांदी नव्हे गा रायेहो ॥२॥ ज्याची त्यास हाता नेदीं ॥ ते धरावी ईच्छा बांदी ॥ जे काम क्रोध लोभ संधीं ॥ तीघे त्रिशुद्धी लागले धगड ॥ ३ ॥ घरीं क्षणभरी न राहे ॥ मना आलें त्यासवें जाये ॥ न खावें ते हाटेची खाये ॥ न रीघावें तेथें पाहें बळेची रीघे ॥ ४ ॥ इसी नैराश्याचि घाली बेडी ॥ बोधाचे चाबुक झोडी ॥ आणि निरापेक्षा दांत पाडी॥तेंच हे खाडी सांडील ॥५॥मग नैराश्या उठी ॥ तेव्हां परमानंदीं पडे मिठीं ॥ एकाजनार्दनाचीये दृष्टीं ॥ ब्रह्मानंदें सृष्टी हेलावे ॥ ६ ॥

॥ २५२३ ॥ आतां जातें धरा गाये रायहो ॥ जातें धरावें ते कोण ॥ दळितें जातें तें जातें नव्हें ॥ दिनमान जातें तें जातें नव्हें ॥ आभाळ जातें तें जातें नव्हें ॥ तारुण्य जातें ते जातें नव्हें ॥ मनुष्यदेह वृथा जातें तें जातें धरा ॥ १ ॥ मनुष्य देहीची येकी घडी ॥ नमिळे वेंचितां लक्षकोटी ॥ ते नासीलें प्रपंचाचें बोढी ॥ ते जोडीली जोडी नासिती महा मुर्खत्वें ॥ २ ॥ मनुष्य देह राखावें कवणीये रीती ॥ सदां भगद्भाव धरावा सर्व भूतीं ॥ तेणें तत्काळ ब्रह्मप्राप्ति ॥ नाश कल्पांतीं असेना दिसें ॥ ३ ॥ एकाजनार्दन ह्मणे ॥ मनुष्य देहींचेनी अनुसंधानें ॥ ब्रह्म परीपुर्ण स्वयें होणें ॥ जीणें मरणें असेना ॥ ४ ॥

॥ २५२४ ॥ आतां मेंढा धरा गा ये रायहो ॥ मेंढा धरावा तो कोण ॥ शेळीचा मेंढा धरावा तो मेंढा नव्हे ॥ किं बकरीचा मेंढा धरावा तो मेंढा नव्हे ॥ पाळीला मेंढा तो मेंढा नव्हे ॥ ओटीचा मेंढा तो मेंढा धरा गा ये रायहो ॥ १ ॥ तो काळे रात्रिचा एडका ॥ जो शिंगेविण बोडका ॥ जो अंधारी हाणे धडका ॥ तो दृढ धरा गा रायेहो ॥ २ ॥ धराल तरी मुठी मुरडुनी धरा ॥ अहिर्णीसी जतन करा ॥ तेणें वैकुंठीचें राज्य येइल घरा ॥ एकाजनार्दनीं निर्धारा ॥ वंद्य सुरनरा तो होय ॥ ३ ॥

॥ २५२५ ॥ आतां बेटकुळी धरा गा ये रायेहो ॥ बेटकुळी धरावी ती कोण ॥ नादिची बेटकुळी नव्हे ॥ विहीरीची बेटकुळी ते बेटकुळी नव्हे ॥ शेजेची बेटकुळी ते बेटकुळी धरा गा ये रायेहो ॥ १ ॥ धराल तरी वेगळी धरा ॥ ऐसें सांगतसें तुह्मां पुरा ॥ तिच्या पुटपुटेच्या झणत्कारा ॥ भाळाल गाये रायेहो ॥ २ ॥ बेटकुळी वेगळी धरीतां ॥ च्यारीमुक्ती येती हातां ॥ एकाजनार्दन हृदयीं धरीतां ॥ ब्रह्म सायोज्यता घर रिघे ॥ ३ ॥

॥ २५२६ ॥ आतां ग्रहण धरा गा ये रायहो ॥ ग्रहण धरावें तें कोण ॥ रविग्रहण कि चंद्रग्रहण ॥ अथवा धरावें ग्रहणीं ग्रहण ॥ निंद्ये पुर्ण रवि-चंद्र ग्रहण मिथ्या ॥ १ ॥ साठीसहस्र राहुची सीमा ॥ लक्ष भानु दोन लक्ष चंद्रमा ॥ मंडळ साम्य येति समा ॥ तें राहु रवि सोमा स्पर्शही नाहीं ॥ २ ॥ ज्योतिषी सांगे ग्रहण गोष्टी ॥ ते समूळ मिथ्या चावटी ॥ गुरूग्रहणाची परीपाठी ॥ ते चाली उफराठी समजेना ॥ ३ ॥ रवि राहुसी नाहीं भेटी ॥ त्याच्या सर्व ग्रासाच्या गोष्टि ॥ ज्योतिषी सांगे मुखसपिटी ॥ तेणें-ची बोंब उठी जगामाजी ॥ ४ ॥ राहुची शाम प्रतिमा ॥ तो कदां नदिसे माजी व्योमा ॥ त्यासीं प्रकाशी रवि चंद्रमा ॥ ज्योतिषी नेणें हे महिमा ॥ विपरीत प्रेमा तेणें केली ॥ ५ ॥ राहु गिळीता जे सूर्यासीं ॥ तैं सूर्य नीःशेष जाळीता त्याचिया मुखासी ॥ सुर्यें प्रकाशीलें राहुसी ॥ ह्मणोनी जगासी तो दिसे ॥ ६ ॥ रविचंद्र प्रकाशी राहुसी ॥ तेणें गिळीलें ह्मणती त्यासीं ॥ हे विपरीत सांगे ज्योतिषी ॥ तें या लोकांसी सत्य माने ॥ ७ ॥ या परी रविचंद्र ग्रहण ॥ विपरीतार्थें मिथ्या पुर्ण ॥ तैसेंचिगा ग्रहणीं ग्रहण ॥ त्याज्यमान निंद्यत्वें ॥ ८ ॥ अस्थि मांस रुधिर चर्म ॥ विष्टा मुत्र पुर्ण परम ॥ स्त्री पाहातां निंद्य धर्म ॥ परम अधर्म ग्रहणीं ग्रहण ॥ ९ ॥ रविचंद्र ग्रहणें मुक्त स्नानें ॥ करीतां देखती सकळही जन ॥ परी ग्रहणीं ग्रहणें मुक्त स्नान ॥ सहसा सज्ञान न करीती ॥ १० ॥ ग्रहणीं ग्रहणा पासूनी सुटला ॥ ऐसा न देखो दादुला ॥ जे तो सर्व ग्रासे गेला ॥ जन नागविला ग्रहणीं ग्रहणें ॥ ११ ॥ ख ग्रहण तयाचें लक्षण ॥ तुज म्यां सांगितलेंसें पुर्ण ॥ आतां तुज सांगेन मुख्य ग्रहण ॥ सर्व जाण तरावया ॥ १२ ॥ राहु रवी चंद्रमा स्पर्श होय ॥ एकाचे तें अंगुल द्वय ॥ एकाचे तें अंगुल चतुष्टय ॥ एकाचे तें पाद मात्र होय परीयेसा ॥ १३ ॥ एकाचे

तें अर्ध ग्रहण ॥ एकाचें तें त्रिकोण ॥ एकाचे तें बिंब पुर्ण ॥ एका जाण खग्रास ॥ १४ ॥ बिंब ग्रासुनि खग्रास केला ॥ तोचि कर्मा पासोनी सुटला ॥ त्याचाची भवपाश तुटला ॥ पुर्ण विनटला गुरुग्रहणीं ॥ १५ ॥ गुरुग्रहणीं जो विनटला ॥ तो ज्ञयज्ञान वांटुनी प्याला ॥ अहंमात्मा गिळुनी ठेला ॥ अंगें झाला परब्रह्म ॥ १६ ॥ एकाजनार्दन ह्मणे ॥ या परी गुरु ग्रहणें ॥ अंगें परब्रह्म होणें ॥ खत फाडणें विषयांचें ॥ १७ ॥

॥ २५२७ ॥ या परी गुरु ग्रहणीं जो खरा ॥ तेणें अकार उकार मकारा ॥ नीरसुनियां विकारा अर्ध मात्रा धरावी ॥ १ ॥ अर्ध मात्रा अर्धोदयो ॥ तेथें नाहीं उत्पति स्थिती प्रळयो ॥ ब्रह्मीं ब्रह्मत्वाचा लयो ॥ हा पुर्णान्वयो अर्धोदयाचा ॥ २ ॥ ऐका अर्धोदयाची कथा ॥ प्रपंच एक झाला होता ॥ हें समुळ मिथ्या वार्ता ॥ पुन्हां होईल मागुता ॥ हें कदां कल्पांता घडेना ॥ ३ ॥ अर्धोदयो अर्ध मात्रा ॥ हा पुण्य काल परम पवित्रा ॥ एका जनार्दनीं पुर्ण यात्रा ॥ चीद्‌चिन्मात्रा प्रबोधें ॥ ४ ॥

॥ २५२८ ॥ आतां डेरा पाहागा ये राये हो ॥ अंबेच्या रंगणीं डेरा पाहिला ॥ या डेरीयाची कथा ॥ सावधान ऐका आतां ॥ जें पाहणें पाहातें पाहातां ॥ या तिहींतें तत्वतां पाहों जाणें ॥ १ ॥ अनादि शक्ति मोहनी ॥ तिचें नांव माय राणी ॥ डेरा मांडिला तिच्या रंगणीं ॥ मायेनें करणी या परी केली ॥ २ ॥ ते कर्ण कुमारीचा हातीं ॥ आणविली औटपिट ओली माती ॥ संकल्प कुह्माळाचा हातीं ॥ डेरा अति निगुती सगुणाचा केला ॥ ३ ॥ तोंडीं घातला विस्तवो ॥ बुडी कर्म काष्टें लाविली पाहा हो ॥ बुद्धीसी ठेवीला ब्रह्मदेवो ॥ डेरा निर्वाहो मांडीला ॥ ४ ॥ संकल्प विकल्पि घातला चंद्र ॥ ग्रहणीं घातला इंदिरावर ॥ पत्यासवें लाविला इंद्र ॥ सर्वांस पाठीं लाविला महारुद्र ॥ जीव नाभींमाजी बैसविला ॥५॥ वरु ठेवीला रस विप्रति ॥ प्रजाउत्पत्ति प्रजापती ॥ यमु ठेविला अधोगती ॥ नरकोत्पति गुदद्वारीं ॥ ६ ॥ अश्वीनोदेवीं सोडीली घाणी ॥ ते येउनी बैसली घ्राणीं ॥ डेरीया स्पर्शा स्पर्श मनीं ॥ ते काय वारेनी धरीली असे ॥ ७ ॥ अन्नपाण्याचा पचनीं ॥ जठरीं ठेउनी जठराग्नी ॥ प्राणापाण भाते दोन्हीं ॥ फुंकिती अनुदिनी अहोरात्र ॥ ८ ॥ तो पंच भुतांचा चोहटा ॥

च्यारी भुतग्राम येती हाटा ॥ जन्य मरणाच्या पेंठा ॥ वसति उद्भटा कर्मा कर्म ॥ ९ ॥ रोम सुमनाच्या माळा ॥ शोभती डेरीयाच्या गळां ॥ तिहीं अवस्थांचा सोहोळा ॥ वेळो वेळां भोगीती ॥१०॥ चहुं पुरुषार्थांचें झेलें ॥ चहु मुक्तिचे ध्वज उभारीले ॥ हरी भक्तिचे फरश बांधले ॥ डेरां तारूं घातलें रामनामाचें ॥ ११ ॥ अनुहात डौराचा नाद ॥ तेथें वेदांचे वेदानुवाद ॥ सिद्धांत वेदांचे शब्द ॥ डेरा प्रसिद्ध आवतरें तेणें ॥ १२ ॥ डेरीया बाहेरी जो निघाला ॥ तोचि सत्बुद्धीया दादुला ॥ डेरीयांत जो अडकला ॥ तो पडला अधःपातीं ॥ १३ ॥ जों नामाचें तारूं धरीं ॥ तोचि निघे डेरीया बाहेरी ॥ पडीले चिंते माझारी ॥ ते अघोरीं पडतील ॥ १४ ॥ एकाजनार्दन ह्मणे ॥ ऐसी डेरीयाचीं तीं लक्षणें ॥ डौरकार झालों या कारणें ॥ डौर वाहोनी सांगणें निज हितार्थ ॥ १५ ॥

---

## कांडण.

॥ २५२९ ॥ विवेक कांडणीं कांडितें साजणी ॥ निजबोध स्मरणीं फिरतसें ॥ धृ० ॥ देह हें उखळ मन हें मुसळ ॥ कांडिले तांदुळ विवेकाचे ॥ १ ॥ एका जनार्दनीं कांडण कांडितां ॥ ब्रह्मसायुज्यता प्राप्त झाली ॥ २॥

---

## जोगीणी चक्र.

॥ २५३० ॥ नवखंडी अखंडीका ॥ नवचंडी चंडिका ॥ काळीनिर्दळिणी काळिका ॥ मोह मर्दिनी महिखा ॥ मायादिमाया ॥ उदो बोला उदो ॥ धृ० ॥ कर्म हंती सहस्राक्षी ॥ भगवति भक्त संरक्षी ॥ कामकामादि हंति ॥ कामाक्षी ॥ १ ॥ मस्तकीं मूळपिठिका ॥ श्रवणीं अर्ध वेदिका ॥ घ्राणीं सुगंधिका ॥ अतिगंधादिकां जीवन ॥ २ ॥ ललाटीं रुद्रायणी ॥ कंठीं ब्रह्मायणी ॥ उदरीं नारायणी ॥ जे सर्व प्राणी पाळका ॥ ३ ॥ नेत्रीं देखणी चित्शक्ती ॥ मुखीं आनंदि सरस्वती ॥ बाहु बळी अनंत ॥ मनीं मौनावती मनोज्ञा ॥ ४ ॥ भद्र करिती भद्रकाळी ॥ कळी निर्दळणी कंकाळी ॥ मनोमळातें क्षाळीं ॥ महामैली मातृका ॥ ५ ॥ विचित्र कर्माचा ताटा ॥ निःशेष नासी चित्र घंटा ॥ चित्तचैतन्याचा वांटा ॥

लावी निजनिष्ठा गुरुत्वें गौरी ॥ ६ ॥ सर्वांगीं सदां सुखदाती ॥ हृदयीं परमानंद स्फुर्ती ॥ एकाजनार्दनाचिये स्थिती ॥ पात्र भरिला दासा मति ॥ ७ ॥ उदो० ॥

---

# जोहार.

॥ २५३१ ॥ जोहार कीं मायबाप जोहार ॥ मी सूर्यवंशीं रामजी पाटलाचा महार ॥ त्याचे दरबारचा कारभार ॥ मज नफराचे शिरीं कीं जी मायबाप ॥ १ ॥ काय सांगूं अयोध्या पट्टन ॥ महा स्थळ मनोहर जन ॥ तेथें नांदते कोण कोण ॥ ते सकळ जन ऐका कीं० ॥ २ ॥ ते अयोध्येसी दिलीपपती प्रजा ॥ त्याचे पोटीं दशरथ राजा ॥ शुक्रावर जयाच्या फौजा ॥ चालिल्या कीं० ॥ ३ ॥ त्याचे पोटीं राम जगजेठी ॥ कांबीट मोडली पणा साठीं ॥ विमुक्त करुनी रायाच्या कोटी ॥ ती मुक्ताई आवा परणिली कीं० ॥ ४ ॥ ती मुक्ताई आवा मोठी कनवाळा ॥ तुकडा देती पाकाशिळा ॥ काम सांगते वेळोवेळां ॥ मज हरिख होतो कीं० ॥ ५ ॥ परी मी जातीचा महार ॥ धन्याचे चाकरीस तत्पर ॥ सालंबाज धन्याचे दरबारचा कारभार ॥ मीच करीत आलों कीं० ॥ ६ ॥ मग जाउनी विष्णुबा कुळकर्ण्याचे घरीं ॥ हकिकत सांगितली सारी ॥ मग देउनी शिळीपाकी न्याहारी ॥ मज बैस ह्मणितलें कीं० ॥ ७ ॥ गाढा विष्णुबा कुळकर्णी ॥ साऱ्या कारभाऱ्यांचा तो धनी ॥ चौऱ्यायशी लाखांची वांटणी ॥ तेणेंच केली कीं जी मायबाप ॥ ८ ॥ चौऱ्यायशी लाख वानभरें ॥ विष्णुबा कुळकर्ण्याचीं खिल्लारें ॥ पोशीत पाळीत बोहरें ॥ ऐसेंच कीं० ॥ ९ ॥ मग मृत्यु लोकीं उभविल्या पेंठा ॥ पूर्वी त्या निवृत्तीं दाविल्या वाटा ॥ सोडोनीया जुनाट वाटा ॥ या आड वाटा जाऊं नका कीं० ॥ १० ॥ मग मृत्यु लोकीं केलें येणें ॥ गोउनी पाडिलें मागिल्या रिणें ॥ फिटल्यावांचून समाधान ॥ होत नाहीं कीं० ॥ ११ ॥ अवघें पांच कोस शेत ॥ पाडुनी केलें तन गवत ॥ पडिकाचे पैसे देतां बोभाट ॥ होईल कीं जी मायबाप ॥ १२ ॥ सालंबाज मारितों हाका ॥ वसुल करा दिवाणाचा टका ॥ तोंवर येणें जाणें धोका ॥ न वारे कीं० ॥ १३ ॥ मग आरोळी देउनी घातली उडी ॥ एका काढिलें लबडसवडी ॥ एका उतानें

उबडी ॥ वाहावलें कीं जी मायबाप ॥ १४ ॥ एक पडिले खळाळ धारे ॥ वरते पाय खालतें शिरें ॥ त्यांचे हाल थोर थोरें ॥ देखिलें कीं० ॥ १५ ॥ मग जाऊन जनार्दन बाबाचे दरबारीं ॥ बैसोनी एकनाथ पांडे वारी ॥ मागें केली खरी खुरी ॥ त्या भरोवरी चुकविल्या कीं० ॥ १६ ॥

॥ २५३२॥ जोहार मायबाप जोहार॥ सद्गुरु जनार्दनाचा एक महार ॥ सांगतों ऐका कलियुगाचा विचार ॥ सावधपणें कीं जी मायबाप ॥ १ ॥ चार युगांमाजीं परम ॥ कलियुग हें उत्तम ॥ करावें हरिभजन सत्कर्म ॥ नाम स्मरणें असावें कीं०॥ २ ॥ नवविधा भक्ति करा ॥ तेणें चुकेल चवऱ्यांशीचा फेरा ॥ माझे वचनीं विश्वास धरा ॥ नाहीं तरी फसाल कीं० ॥ ३ ॥ द्वारीं असावें तुळशी वृंदावन ॥ करावें अतिथीचें पूजन ॥ संतासी निघावें शरण ॥ हें लक्षण भक्तीचें कीं० ॥ ४ ॥ तुळशीमाळा घालावी गळां ॥ लावावा गोपिचंदन टिळा ॥ मुखीं नाम स्मरण माळा ॥ असावी कीं० ॥ ५ ॥ व्रत करावें एकादशी ॥ जागर करावा सारे निशीं ॥ द्वादशीं क्षीरापति आवडेसी ॥ आदरें सेवावी कीं० ॥ ६ ॥ ऐशीं वैष्णवभक्तीचीं लक्षणें ॥ सांगीतलीं सर्व खुणें ॥ हें वर्म जो नेणें अधर्म साधनें ॥ करिती कीं जी मायबाप ॥ ७ ॥ अठरा वर्ण याती ॥ यांची सांगतों मति ॥ सावधान ऐका निश्चितीं ॥ रागाऊं नका कीं० ॥ ८ ॥ आह्मी ब्राह्मण ह्मणती ॥ स्नान संध्या वेद पठण न करिती ॥ अशौच कर्म जारणमारण जपती ॥ मोहन स्तंभनादिक कीं० ॥ ९ ॥ जगीं ह्मणती आह्मी साधिलें ॥ साधन तें दूर राहिलें ॥ परस्त्रीनें चित्त गोविलें ॥ कुलुलुलु कीं० ॥ १० ॥ जालो ह्मणती संन्यासी ॥ षड्वैरी हृदयीं अहर्निशीं ॥ परद्रव्य परअन्नासी ॥ रात्रंदिवस लक्षिती कीं० ॥ ११ ॥ सहांचा करावा नाश ॥ तया ह्मणिजे संन्यास ॥ नारायणीं नाहीं आस ॥ कासया नाश कावेचा कीं० ॥ १२॥ पोट भरावया फकीर जाला ॥ अल्ला अल्ला ह्मणतां जन्म गेला ॥ नसोनी दोष अंगीं लाविला ॥ हायदोष ह्मणती कीं० ॥ १३ ॥ जालो ह्मणती आह्मी जोगी ॥ राख लाविती वाउगी अंगीं ॥ भोगी ना त्यागी ना योगी ॥ वर्म नेणती जोगाचे कीं० ॥ १४ ॥ जोग साधावा उत्तम ॥ न करावें संसारिक कर्म ॥ साधावें उत्तमोत्तम ॥ वाउगा श्रम करूं नये कीं० ॥१५॥ आह्मी जंगम जालों ह्मणती ॥ शिव उपासना न करिती ॥ पोटा साठीं भिक्षा मागती ॥ शंख वाजविती भंभंभं कीं० ॥ १६ ॥ जालों ह्मणती

मानभाव ॥ अंतरीं शुद्धी नाहीं भाव ॥ वर मुंडीती मस्तकवाव ॥ गुरु शिष्य भाव दाविती कीं० ॥ १७ ॥ गुरु शिष्य ह्मणती ॥ झोळीस झोळी लाविती ॥ गडबडगुंडा जाला ह्मणती ॥ कृष्ण कृष्ण ह्मणती कीं० ॥ १८ ॥ नसोनी काळेपणा लाविती अंगीं ॥ उगेच सोंग मिरविती जगीं ॥ देवाचा द्वेष करिती वाउगीं ॥ ही फजीती बरी कीं० ॥ १९ ॥ आह्मी संत जालों ह्मणती ॥ गळा माळा गोपीचंदन लाविती ॥ दिवटी घेउनी हातीं ॥ उदव उदव करिती कीं० ॥ २० ॥ पोट भरावया कीर्तन करिती ॥ लोकां अर्थ सर्व दाविती ॥ भाळे भोळे भोंदिती ॥ आपण वर्म नेणती कीर्तनाचें कीं० ॥ २१ ॥ परद्रव्य परनारीसी ॥ स्पर्श न करावा निश्चयेसी ॥ ऐसी मर्यादा सांगती लोकांसी ॥ आपण तेंचि कर्म करिती कीं० ॥ २२ ॥ एकविध भक्ति करावी ह्मणती ॥ ना ऐकावी आणिकाची स्तुति ॥ कांई व्यथा शरीरामति ॥ मग देवऋषी पहाती कीं० ॥ २३ ॥ आणिती निंब नारळ उद सामान ॥ मेंढरें कोंबडें मारिती जाण ॥ वेताळ महिषासुर पूजन ॥ नग्न होऊन करिती कीं० ॥ २४ ॥ ह्मणती खंडेराव दैवत आमुचें ॥ तें कोपलेंवो साचें ॥ कुळधर्म सांडिले वडिलांचे ॥ ह्मणोनी दुःख पावलों कीं० ॥ २५ ॥ मग गोपीचंदन टाकिती ॥ आदरें भंडार लाविती ॥ भरित रोडगे करिती ॥ यळकोट यळकोट ह्मणती कीं० ॥ २६ ॥ ऐकोनी कीर्तन श्रवण ॥ गीता ज्ञानेश्वरी मनन ॥ आश्विन मास आलिया जाण ॥ शक्ती पूजन करिती कीं० ॥ २७ ॥ ऐशीयासी एकनिष्ठ भाव ॥ तयासी कायसें वैभव ॥ उगेच सोंगाचें गौरव ॥ वाढविती कीं० ॥ २८ ॥ एकविधा भक्ति करावी ॥ वाट आणिकाची न पहावी ॥ शुभाशुभ येतीं बरवीं ॥ ते प्रारब्धदशे प्रमाण कीं० ॥ २९ ॥ जैसें पतिव्रतेचें मन ॥ सर्व पतीच प्रमाण ॥ अपाय उपाय हे तो जाण ॥ ईश्वर प्रमाण कीं० ॥ ३० ॥ एका-शरण जनार्दन ॥ मी बोलिलों सत्य वचन ॥ अनुभउनी ही खूण ॥ या पंथें जाऊं नका कीं० ॥ ३१ ॥

॥ २५३३ ॥ जोहार मायबाप जोहार ॥ मी सूर्यवंशीं रामजी पाटलाचा गव्हार ॥ माझें नांव आत्मनाक महार ॥ माझा जालीम कारभार ॥ धन्याचे रजेनें करतों कीं जी मायबाप ॥ १ ॥ ममता आवा पाटलीण मोठी ॥ थोर नायकाची बेटी ॥ मनीची निर्मळ नोहे खोटी ॥ लक्ष लक्षापती येतीं तिचे भेटी कीं० ॥ २ ॥ मानभाव जती सती ॥ तडी तापडी अपार

मिती ॥ माझे धन्याचे घरा येती ॥ धन्यावर जप्ती करूं पाहाती कीं० ॥ ३ ॥ दोघे कारभारी जोड्याचे ॥ मोकाशी ह्मणविती सृष्टीचे ॥ ते वस्तीकर वरल्या गांवींचे ॥ खबर घ्यावया खालील गांव ठाण्याचे ॥ मज रवाना केले कीं० ॥ ४ ॥ झडुनी पडली गळां ॥ तुकडा दिला पाकाशिळा ॥ या बद्दल तुमचे स्थळां ॥ आलों कीं० ॥ ५ ॥ शिव शेटियासी जोहार ॥ जिवाजी चौगुल्यासी जोहार ॥ वैष्णव कुळकर्णी यासी जोहार ॥ तुमचा कारभार जड दिसतो कीं० ॥ ६ ॥ सारी पांढरी वोस पडली ॥ थोरथोर कुळें दूर गेलीं ॥ नवद्वारें कैसीं वाटाविली ॥ संतति आपुले पोटीं पुरती कीं० ॥ ७ ॥ हुजुर धन्यास राग जाईल फार ॥ मोठे धाडतील वरातदार ॥ वीजत घेतील करतील कहार ॥ मग वारंवार आठव होईल कीं० ॥ ८ ॥ नेऊन घालतील बंदखाणीं ॥ तेथें सोडावया नाहीं कोणी ॥ अवघे मारतील हाल हाल करूनी ॥ ही फजिती सान कीं० ॥ ९ ॥ यमाजी बाजी हुद्देदार ॥ त्याचा तो जीवा वरील मार ॥ जो घडला नाहीं हा विचार ॥ तो दरबार शुद्धी करा कीं० ॥ १० ॥ पंचवीस कुळें धरा बिगारीं ॥ गांवांतील जमीन वजवा सारी ॥ गज गिरी करा नवद्वारीं ॥ धन्याची निशाणी लावा कीं० ॥ ११ ॥ महासुर करा पेंठा च्यारी ॥ चौ महाजना सहित श्रीपाद घ्या बरी ॥ धन्याचे नांवाचा कउल शिरीं ॥ साच चढवा कीं० ॥ १२ ॥ अक्षय्य वास एकचित्त करा ॥ फळावर फिटेल सारा दोरा ॥ पहिल्या खतासी दूर करा ॥ नाहीं तरीं कानीं उवा पडेल कीं० ॥ १३ ॥ ब्रह्माजी पाटील यासी सांगा जोहार ॥ पाटलीन आवाचा डेंबा जाला फार ॥ अवघा गांवगुंडी कारभार ॥ आयाजी करिती कीं० ॥ १४ ॥ आवाजीचे साच वेसन खोटी ॥ रावती करा संदेह रोटी ॥ सहज कारभाराची आटाआटी ॥ मज नफरासी उजवे दिठि पाहुं नका कीं० ॥१५॥ कामा धामाचा उलगडा करतो ॥ आल्या गेल्यासी जबाब देतो ॥ सारे रहतीचें घर राखीतो ॥ हे कष्ट सान काय मायबाप ॥ १६ ॥ कितिकासी लाकड द्यावी ॥ शिंगशिंगुटी म्यांच पुरवावी ॥ फजीती रावनुकीची सोसावी ॥ ही गोष्ट सान कीं०मा० ॥ १७ ॥ मेखा पायबंद तोबरे माथां ॥ जीव कष्टला बिगारी वहातां ॥ चवऱ्यायशी लक्ष गांवें हिंडतां हें दुःख सान कीं० ॥ १८ ॥ कुळवाडी थोटपणाशी आले ॥ बलुते देईनासे जाले ॥ पांढर टाकुनी पळाले ॥ तरी मिराशीचें लिंगाड कीं० ॥ १९ ॥ न होईना मातीचा

पेंडुळा ॥ जनोबा खायाचा मायंदळा ॥ रजा घेउनी पूर्वस्थळा ॥ जाईन कीं० ॥ २० ॥ मिरास सर्वस्व कळली सारी ॥ हाक घेउनी जाइन गडावरीं ॥ रामजी बाबाचे दरबारीं ॥ इकिकत सारी सांगेन कीं० ॥ २१ ॥ मिरास सर्वस्व कळली ॥ पाटलीण आवा धनीन जाली ॥ दिवाणदाराचीं तोंडें मारलीं ॥ तेथें आमुचा पाड काय कीं० ॥ २२ ॥ कोणी ह्मणती देऊं लांचा ॥ मी नव्हे आज कालचा ॥ माझा वृत्तांत साचा ॥ तो वडीलासी सांगेन कीं० ॥ २३ ॥ खाली गांवीं पाटलीन आवा विवसी ॥ ती आगु नेदी साहेबासी ॥ सारे ह्मणती मोकासी ॥ आह्मांस तिज पाशीं कां धाडितां कीं० ॥ २४ ॥ पांचजणे लहान लहान पोरें ॥ ते आडकती पडती नवाद्वारें ॥ साहेबाचें नाम सारें स्वप्नीं न घेती कीं० ॥२५॥ दोघे तिघे ब्राह्मण मेळविले ॥ तेणें मुलखाची रांडोळी केली ॥ धन्याचे नांवची निशाणी ॥ उरूं दिली नाहीं कीं० ॥ २६ ॥ पाटील बोवा स्वप्नीं गुंतले ॥ कारभार टाकुनी लाजिरे झाले ॥ जोगी मोकासी होउनी गेले ॥ या पाटलीन अवाच्या भेणें कीं० ॥ २७ ॥ आणिक मेळविले दैवतें ॥ खबर सांगों आलों साहेबातें ॥ घरोघर पूजितीं भूतें ॥ त्यांचीं नांवें ऐका कीं जी मायबाप ॥ २८ ॥ वासना मांगीण मातंगीणी ॥ कामना जळीं मायराणी ॥ अभाव भांगड भुत जोगिणी ॥ त्यासी नम्र पूजिती कीं० ॥ २९ ॥ बीर नरसिंग झोटिंग वेडा ॥ वेताळाचा पूजिती खोडा ॥ शेंदुर माखोनीया धोंडा ॥ शेळी बोकुडे जीव घेती कीं० ॥ ३० ॥ मेल्या मनुष्याशी पूजिती ॥ खोड सुपल्या पाळणें बांधिती ॥ गळ टोंचोनी बगाडे घेती ॥ ही फजीती सान काय मायबाप ॥ ३१ ॥ जीव दान देउं करिती ॥ अवघीं दैवतें एकची ह्मणती ॥ मेंढरें बोकुड मारिती ॥ परतोनी आपणची खाती कीं० ॥ ३२ ॥ नैवेद्य नारळ फोडिती ॥ खोबरें एकमेकासी वांटिती ॥ नुसती नरोटी देवा पुढें ठेविती ॥ लटिके धुप देउनी चाळविती कीं० ॥ ३३ ॥ जाउनी देवऋषी आणितीं घरां ॥ खाकुण लाविती चुलीतील अंगारा ॥ उफराटे पराचा कोंबडा खैरा ॥ निंब नारळ उतारा कीं० ॥ ३४ ॥ आणिक खापराचें भदाडें ॥ तें चुन्यानें पांढरें लाउनी चहुंकडे ॥ दिवस मावळल्याचे पुढे ॥ तिकटण्यावर ठेविती कीं० ॥ ३५ ॥ दावल मलकाची पुजीती गदा ॥ वर्षाफकिर होती एकदां ॥ मग ताबुत थंडा होतां ॥ उष्टा मलीदा खातीं कीं० ॥ ३६ ॥ भेणें भेणें साहेबाला स्मरती ॥ त्याला पाट-

लीन आवाची द्वाही देती ॥ ऐशी मुलुखाची गति ॥ ती धन्यामती सांगो आलों कीं० ॥ ३७ ॥ साहेबाचे हुकुमावरून गेलों ॥ प्रवेश पाहून दंग जालों ॥ वागवेना मग आलों ॥ पायपुसा जवळ कीं० ॥ ३८ ॥ मग धन्यानें मज आत्म नायकाला ॥ भाग भागला ह्मणोनी शब्द दिला ॥ जा जा ह्मणोनी हुंकार केला ॥ येथें राहे ह्मणती कीं० ॥ ३९ ॥ ऐशी निर्धारी केली ॥ बांडी सान घोंगडी दिली ॥ दिठी देउनी सांगीतली ॥ नजरे वेगळा राहूं नको कीं० ॥ ४० ॥ जाउनी जनार्दन बाबाचे दरबारीं ॥ राहिलों एकनाथ परचारी ॥ जुगान्जुगाची चाकरी ॥ कोण्ही दूर करी नाकीं जी मायबाप ॥ ४१ ॥

॥ २५३४ ॥ जोहार मायबाप जोहार मी दामाजीचा लेंकवळा महार ॥ माझें नांव विठू साचार ॥ सारा झाड फेडिचा कारभार ॥ मी करतों कीं जी मायबाप ॥ १ ॥ मंगळवेढें ठाणें जाण ॥ दामाजीस ठेविले कारभारी नेमून ॥ गांवचा वसुल सारा करून ॥ मज नफरा पाठविलें कीं० ॥ २ ॥ जोहार जी जोहार ॥ मी लेंकवळा विठू महार ॥ दामाजीचा मजवर प्यार ॥ आहे कीं० ॥ ३ ॥ दुकाळ पडला जाणोन ॥ शिलक पेवें दामाजीनें विकून ॥ चिट्ठी पैका घेउनी जाण ॥ आलों कीं० ॥ ४ ॥ दामाजी परम स्नेहाळु ॥ त्याचा मज कळवळु ॥ चिट्ठी घेउनी उतावेळु ॥ आलों जवळ कीं० ॥ ५ ॥ आदा वसूल खतावणी ॥ जमा करा वसूल घेउनी ॥ बाकी शून्य घालुनी ॥ जाब द्यावा कीं० ॥ ६ ॥ वसूल सारा मेळवा ॥ मज लेंकवळ्या जाब द्यावा ॥ पैं बाकी न ठेवा ॥ दामाजी कडे कीं० ॥ ७ ॥ मी विठुनाक महार ॥ राहतो पंढरी निरंतर ॥ पहावया आपुलें नगर ॥ येथवर आलों कीं० ॥ ८ ॥ पैका पोंचल्याची रसद ॥ लेहून द्यावी त्वरित ॥ मी जातों जी हातन कीं० ॥ ९ ॥ ह्मणोनी केला जोहार ॥ निघाला विठुनाक महार ॥ इकडे दामाजीचा विचार ॥ ऐका कीं जी मा० ॥ १० ॥ प्यादे येउनी जाण ॥ दामाजीस धरती येऊन ॥ बेदरा नेती लगबगें करुन ॥ तों नवल जालें कीं० ॥ ११ ॥ स्नान करुनी जाण ॥ दामाजी बैसला देवतार्चन ॥ नित्य नेम वाचितां जाण ॥ रसद आंत देखिली कीं० ॥ १२ ॥ रसद पहातां ते वेळीं ॥ बादशहाची मुद्रा देखिली ॥ विठु महार सर्वे रसद पाठविली ॥ बाकी शून्य जाली कीं०

॥ १३ ॥ एका जनार्दनीं केला जोहार ॥ मोडिला अविद्येचा थार ॥ स्थापुनीया चराचर ॥ भजनीं सादर असावें कीं० ॥ १४ ॥

॥ २५३५ ॥ जोहार मायबाप जोहार ॥ मी सकळ संताचा महार ॥ सांगतों दृढविचार ॥ तो ऐकाकीं जी मायबाप ॥ १ ॥ माझा विचार नारदें ऐकिला ॥ तो पुन्हां रूपा नाहीं आला ॥ भीष्म ध्रुव प्रल्हाद आगळा ॥ या विचारें बोधिले कीं० ॥ २ ॥ उपमन्यु बिभीषण ॥ सर्वांमाजीं अर्जुन ॥ आणिकही ऋषी सांगेन ॥ सावध ऐका कीं० ॥ ३ ॥ पराशर विश्वामित्रादि जाण ॥ या विचारें पावले समाधान ॥ हरिश्चंद्र शिबी सुख संपन्न ॥ जाले कीं० ॥ ४ ॥ ऐसे विचारे चाळले ॥ ते पुनरपि नाहीं आले ॥ एका जनार्दनीं भले ॥ ऐक्यपण कीं जी मायबाप ॥ ५ ॥

॥ २५३६ ॥ घ्या जोहार घ्या जोहार ॥ मी निराकारीचा महार ॥ सतं सभेचा कारभार ॥ मीच करतों कीं जी मायबाप ॥ १ ॥ मी धन्याचा आवडता फार ॥ धन्याचा विश्वास मजवर ॥ धन्याचे चाकरीवर रुजु मी कीं० ॥ २ ॥ चारी वेदा झाडितों ॥ सहा शास्त्रांचा कर भरीतों ॥ पुराणें सर्व जमा करितों ॥ संत पेठे आणितोकीं० ॥ ३ ॥ ऐशी करितां खटपट ॥ संत सभेची सांपडेल वाट ॥ तेणें मार्ग नीट ॥ सांपडेल कीं० ॥ ४ ॥ मार्ग धरा पंढरीचा ॥ एका विनवी जनार्दनाचा ॥ राम नाम बोला वाचा ॥ सावध होऊन कीं जी मायबाप ॥ ५ ॥

॥ २५३७ ॥ जोहार मायबाप जोहार ॥ सकळ संतासी माझा जोहार ॥ मी अयोध्या नगरीचा महार ॥ रामजी बावाचे दरबारचा कीं० ॥ १ ॥ रामजी बावाचा कारभार ॥ राज्य करी अयोध्यापुर ॥ मी तेथील नफर सारासार ॥ कारभार करतों कीं० ॥ २ ॥ सकाळीं समयीं उठतों ॥ सीताबाईस जेवा मागतों ॥ झाडुनी दरबार काढतों ॥ केर बाहेर टाकितों कीं० ॥ ३ ॥ सभेसी रामजीबावा येतां ॥ मी पुढें जाउनी सांगे वार्ता ॥ एका जनार्दनीं तत्त्वता ॥ जोहार करतों मायबाप ॥ ४ ॥

॥ २५३८ ॥ जोहार मायबाप जोहार ॥ मी विठोबा पाटलाचा महार ॥ सांगतों सारासार विचार ॥ ऐका कीं जी मायबाप ॥ १ ॥ गांव तो पांचा पाटलांचा ॥ पंचवीस प्रजांचा ॥ येथें सहा जणांचा कारभार ॥ कीं जी

मायबाप ॥ २ ॥ ज्या धन्याचें हें शहर ॥ त्या धन्यासी नाहीं जोहार ॥ अवघा ओढिती कारभार ॥ ऐजीकडे कीं जी मायबाप ॥ ३ ॥ ऐजीची चाली फार ॥ सारा ओढिताती कारभार ॥ परि सहा जणांसी आधार ॥ ऐजीचाच कीं जी मायबाप ॥ ४ ॥ बाप तुह्मी धन्यासी राजी राखा ॥ नाहीं तरी शेवटीं होईल वाखा ॥ मग कोणी नाहीं सखा ॥ सोडवितां कीं जी मायबाप ॥ ५ ॥ कामाजी बाजी हुद्देदार ॥ क्रोधाजी हा सरदार ॥ यांचे वेगळाले विचार ॥ ऐका कीं जी मायबाप ॥ ६ ॥ मदाजी बाजीचें वेगळें बंड ॥ त्यासी मिळाला लोभ भावंड ॥ अवघ्यांनीं मिळोनी थोतांड ॥ रचिलें कीं जी मायबाप ॥ ७ ॥ गांव तो होता चांगला ॥ परी या सहा जणांनींच नाश केला ॥ तुह्मीही त्यांसींच मिळालां ॥ हें बरें काय कीं जी मायबाप ॥ ८ ॥ परी ते राहतील एकीकडे ॥ शेवटीं गांठ तुह्मासीच पडे ॥ मग इकडे ना तिकडे ॥ हो ना कीं जी मायबाप ॥ ९ ॥ ऐजीनें यांस कारभार दिला ॥ यांनींच गांवाचा नाश केला ॥ शेवटीं खाईल तुह्माला ॥ हें बरें कीं जी मायबाप ॥ १० ॥ गांवांतील तीन पांच थोर ॥ पंचवीस त्यांचा विस्तार ॥ घडी घडी त्यांचा समाचार ॥ घेत जावा कीं जी मायबाप ॥ ११॥ रयतेचें फार हित करावें ॥ धन्याचे कामासी रुजू असावें ॥ धनी सेवेसी तत्पर व्हावें ॥ लागतें कीं जी मायबाप ॥ १२ ॥ तुह्मांस धन्यानें दिला गांव॥ तुह्मी विसरलां त्याचें नांव ॥ तलब आलिया लपवाया ठाव ॥ मग कैंचा कीं जी मायबाप ॥ १३ ॥ तुह्मी धन्यासी करितां चोरी ॥ ऐजीकडे करितां येरझारी ॥ परी या सहा जणांसी सारी दोरी ॥ तुमचीच कीं जी मायबाप ॥ १४ ॥ परी जेव्हां होईल ठावें ॥ तेव्हां कळों येईल स्वभावें ॥ घडी घडी आपुलें हित करावें ॥ लागतें कीं जी मायबाप ॥ १५ ॥ जेव्हां तलब होईल धन्याची ॥ तेव्हां तुह्मां मुदत कैंची ॥ ह्मणोनि सहा जणांची॥ भीड धरूं नका कीं जी मायबाप ॥ १६ ॥ आतां ऐजीची आस्था सोडा ॥ धन्याची बाकी हळुहळु झाडा ॥ नाहीं तरी पायीं पडेल खोडा ॥ प्रपंचाचा कीं जी मायबाप ॥ १७ ॥ आतां असो आधी उपाधी ॥ धन्याची भेट घ्यावी आधीं ॥ ते मी सांगतों सुबुद्धी ॥ ऐका कीं जी मायबाप ॥ १८ ॥ परि मी लहानसा दिसतों महार ॥ मज वरी धन्याचा अखत्यार ॥ बहुत धन्याचा प्यार ॥ मज नफरावर कीं जी मायबाप ॥ १९ ॥ सद्भाव शांतिसी घ्यावें ॥ मज पाठीशीं तुह्मीं असावें ॥ जेथें धणी येतें घर ठावें ॥

मज नफरास कीं जी मायबाप ॥ २० ॥ श्रवणाची धरावी वाट ॥ कीर्तनाचा चढावा घाट ॥ विष्णु स्मरणाचा संघाट ॥ आहे कीं जी मायबाप ॥ २१ ॥ पुढें आहे विश्रांतीचें स्थान ॥ सज्जनांचें पादसेवन ॥ दास्यत्व अर्चन वंदन ॥ ध्यान मार्ग कीं जी मायबाप ॥ २२ ॥ तेथें जातां नलगे उशीर ॥ समीप जनार्दन दातार ॥ सख्य भक्तीचें मंदीर ॥ आहे कीं जी मायबाप ॥ २३ ॥ पुढें आहे धन्याचें घर ॥ तेथें जाऊन करावा जोहार ॥ मुखीं जपावा परात्पर ॥ जवळीचा कीं जी मायबाप ॥ २४ ॥ जेव्हां भेटी होईल धन्याची ॥ तंव नित्य दिवाळी सुखाची ॥ मग सर्व सत्ता तुमची ॥ होईल कीं जी मायबाप ॥ २५ ॥ जेथें आहेत धनी ॥ तेथें जावें लोटांगणीं ॥ मग स्वतांच होईल मिळणी ॥ आत्म सुखाची कीं जी मायबाप ॥ २६ ॥ या मार्गें गेले थोर थोर ॥ नारदादि शुकेश्वर ॥ धन्याचे दरबारीं निरंतर ॥ राहतात कीं जी मायबाप ॥ २७ ॥ जे जे या मार्गें गेले ॥ ते धन्यासी रुजू झाले ॥ जीवन्मुक्ति पावले ॥ ऐका कीं जी मायबाप ॥ २८ ॥ जोहार मायबाप जोहार ॥ गव्हाची रोटी तुपाची धार ॥ धन्यानीं पुरवावी अपार ॥ मज नफरास कीं जी मायबाप ॥ २९ ॥ महार बोलतो ह्मणोन नका जाऊं गर्वें ॥ नाहीं तरी शरीर राहील हिरवें ॥ आपुलें स्वहित होईल बरवें ॥ तें करावें कीं जी मायबाप ॥ ३० ॥ बाकी साठीं आपली मूळ भुई सोडाल ॥ पर मुलखा जरी जाल ॥ तरी बाकीचा निकाल ॥ नाहीं कीं जी मायबाप ॥ ३१ ॥ धरा भाव भक्ती कुळवाडी ॥ काढा शेतांतील पेंढी ॥ नाहीं तरी पायीं पडेल बेडी ॥ अविद्येची कीं जी मायबाप ॥ ३२ ॥ हे कायापुर नगरी ॥ ब्रह्मयानें रचिली खरी ॥ स्यां विवेकें जाणूनि बरी ॥ आत्मरूपीं अर्पिली कीं जी मायबाप ॥ ३३ ॥ एकाजनार्दनीं कुळवाडी मोठा ॥ त्याणें बाकीस मारिला फांटा ॥ अखंड कैलासींचा दारवंटा ॥ मोकळा केला कीं जी मायबाप ॥ ३४ ॥ अखंड कैलासीं राहणें ॥ गुरु जनाचें हेंच देणें ॥ सुखसमाधी असणें ॥ ऐका कीं जी मायबाप ॥ ३५ ॥

॥ २५३९ ॥ जोहार मायबाप जोहार ॥ पाटील पांडे जोहार ॥ देसाई देशमुख जोहार॥कां जी ये सरदार॥ कोंडून राखिलें कीं जी मायबाप ॥१॥ उघडा उघडा नेत्रांचीं ब्रह्म कवाडें ॥ ऐका धर्मरायाचे न्याय निवाडे ॥ जेणें चुकेल जन्ममरणाचें सांकडें ॥ इमारतीचीं लांकडें ॥ रानोमाळ होतील कीं जी मायबाप ॥ २ ॥ खडी फरज धर्मराज खरा ॥ तेणें कलुषा

मारून केला चुरा ॥ माझे धन्याचे घरा ॥ कधीं मधीं येत जाकीं जी मायबाप ॥ ३ ॥ आकाबाई सावकारीण मोठी ॥ कायापुर नगरी केली खोटी ॥ तिनें तर पाडिली भल्यांसी तुटी ॥ तेथें तुमचें काय चाले कीं जी मायबाप ॥ ४ ॥ व्याही जांवयासी ह्मणे लेकरा ॥ त्यासी वाढिताती तूप साखरा ॥ मला देखून लपतां एकसरा ॥ अंतकाळीं चाकर मीच कीं जी मायबाप ॥ ५ ॥ जांवयासी वाढी तूप लई ॥ मला ह्मणतां उरलें नाहीं ॥ घर बुडालें याचपायीं ॥ प्रत्यक्ष ग्वाही मीच कीं जी मायबाप ॥ ६ ॥ सकाळ कोणी जाऊं नका ॥ मागील बाकी ठेवूं नका ॥ नाहाक एखादा धका ॥ बैसेल कीं जी मायबाप ॥ ७ ॥ अविद्ये खिडकी वाटे गेला ॥ तो यमदूतें धरोनि नेला ॥ लक्ष चौऱ्यायशीं मारथी मारथीला ॥ आइका कीं जी मायबाप ॥ ८ ॥ झाडाल बाकी तर तुह्मी व्हाल सुखी ॥ हें सत्य तीही लोकीं ॥ झेंडा नौबद लावा कीं जी मायबाप ॥ ९ ॥ एका जनार्दनीं महार बोले ॥ नका जाऊं गर्वे ॥ मारितां अंग होईल हिरवें ॥ सांगतों बरवें कीं जी मायबाप ॥ १० ॥

॥ २५४० ॥ जोहार मायबाप जोहार ॥ मी तो एकनाथ महार ॥ लहानसा महाराचा पोर ॥ माझे बोलण्याचा विचार ॥ दुसरा नाहीं कीं जी मायबाप ॥ १ ॥ माझ्या बोला ऐकिजे ॥ मोठे मोठे उमराव राजे ॥ तुह्मीचका जीवाजी न जाणतां ॥ वेळेस संदेह धरितां कीं जी मायबाप ॥ २ ॥ चैतन्य चावडीचा पहारा ॥ कीं मी मिराशी महार ॥ जेव्हां नवता गांवाचा आवार ॥ मज ओळख नाहीं कीं जी मायबाप ॥ ३ ॥ काया पुरचा आचाट पाया ॥ यमाजी झाले बेहयां ॥ त्यापुढें पाहती पळाया ॥ मनाजी संगें मिळाले खाया ॥ परि नाहीं वाट कीं जी मायबाप ॥ ४ ॥ दहा गुरें बाहेर दिसती ॥ पांच गुरें अंतर असती ॥ इतुकीं आवरीं अवचितीं ॥ नाहीं तरी खोडां पडसी कीं जी मायबाप ॥ ५ ॥ बाराजणें फुगवितील गाल ॥ शेवटीं तुह्मीच बांधिले जाल ॥ तुमचे होतिल बेहाल ॥ तेव्हां तुह्मांस कोण सोडवील कीं जी मायबाप ॥ ६ ॥ सारे कडेचे पोहणारे ॥ दहा आणि पांच पोरें ॥ एकनाथ करितो जोहार ॥ अक्कल धरा कीं जी मायबाप ॥ ७ ॥

॥ २५४१ ॥ जोहार मायबाप जोहार ॥ माझें नांव विठनाक महार ॥ सांगतों ऐका एक विचार ॥ तो बळकट धरा कीं जी मायबाप ॥ १ ॥ गांव

पांचा पंचविस प्रजेचा ॥ तेथें कारभार सहा जणांचा ॥ तो ऐकिजे मायबाप ॥ २ ॥ ज्या धन्याचे पदरीं शेर ॥ त्यासीं नाहीं कधीं जोहार ॥ अवघा आईजीचा कारभार ॥ काम करितो कीं जी मायबाप ॥ ३ ॥ आवाजींनीं हवालीं केला गांव ॥ धन्याचें विसरला नांव ॥ तलफ आल्यावरी ठाव ॥ पळावया कैंचा कीं जी मायबाप ॥ ४ ॥ जेव्हां तलफ लागे बाकीची ॥ तेव्हां तुह्मा आह्मां सुदबुद कैंची ॥ ह्मणवूनियां सहा जणांची ॥ भीड धरूं नका कीं जीं मायबाप ॥ ५ ॥ सहा जणें राहतील एकी कडे ॥ गांठ तुह्मा आह्मासीच पडे ॥ मग कोणी इकडे तिकडे ॥ हलों न देती कीं जी मायबाप ॥ ६ ॥ करा भक्तीची कुळवाडी ॥ धरा हरीनामाची गोडी ॥ नाहीं तरी चौऱ्यांशींची बेडी ॥ पायीं पडेल कीं जी मायबाप ॥ ७ ॥ तेथील मार्ग सपाट ॥ विष्णु लोकीं वाजवा घांट ॥ मग धुडधुडा वाट ॥ धांवाल कीं जी मायबाप ॥ ८ ॥ एकाजनार्दनीं कुळवाडी मोठा ॥ तेणें बाकीस मारला फांटा ॥ उघडा केला दारवंटा ॥ कैलासींचा कीं जी मायबाप ॥ ९ ॥

॥ २५४२ ॥ जोहार मायबाप जोहार ॥ तूं कोण गांवींचा महार ॥ पुसाल जरी साचार ॥ तरी सादर परिसा कीं जी मायबाप ॥ १ ॥ माझा निराकार मुळींचा ठिकाणा ॥ भक्तांसाठीं सोडिला जाणा ॥ वस्ती करूं कायापुरीच्या खुणा ॥ सांगेन कीं जी मायबाप ॥ २ ॥ आणि जोहार जी मायबाप जोहार ॥ मी पार्वतीचे गळ्यांतील हार ॥ ईश्वराचा पूर्ण भार ॥ त्याचा करितों कारभार ॥ मज नफराचे शिरीं कीं जी मायबाप ॥ ३ ॥ अखंड द्वारीं पडिला असतों ॥ प्रेमाचा तुकडा मागून खातों ॥ धन्याला दुवा देतों कीं जी मायबाप ॥ ४ ॥ तुह्मीं मुळींचा ठाव सोडूं नका ॥ विसरल्यास पावाल धक्का ॥ अंतकाळीं कीं जी मायबाप ॥ ५ ॥ वस्ती करूं आह्मी साचे ॥ समस्त कुळवाडी नगरींचे ॥ पैसे टाका धन्याचे ॥ बाकी थकवूं नका कीं जी मायबाप ॥६॥ असामी बारा दिधली ॥ शेवटीं द्वाही विझाली ॥ एकाजनार्दनीं आज्ञा केली ॥ कीं जी मायबाप ॥ ७ ॥

॥ २५४३ ॥ जोहार पाटील बाजी ॥ चावडी चलाना कांजी ॥ ऐसें सांगत आलों आंजी ॥ बाकी नका थकवूं कीं जी मायबाप ॥ १ ॥ कोंपटा माजी तळपती गाय ॥ हाडाची बेडी पडेल पायीं ॥ तोंड चुकवित जाय ॥ मग वांचोनी काय कीजे मायबाप ॥ २ ॥ काढितां गांवचीं गुरें ॥ कां

बूजवितां गांवचीं द्वारें ॥ गस्त पाठवा वरीत्वरें ॥ कांहीं उणें पुरें करूं नका कीं जी मायबाप ॥ ३ ॥ अवंदा आली देण्याची पाळी ॥ तेव्हां तोंडेंच करतां काळीं ॥ चावडी चला हेच वेळीं ॥ शिव्या गाळी कांहीं घेऊं नका कीं जी मायबाप ॥ ४ ॥ कुळकर्णी आपुले स्वाधीन करा ॥ आड खर्चाचा ताळा धरा ॥ चित्त हरी नामीं धरा ॥ येईल मजुरा असें तत्व कीं जी मायबाप ॥ ५ ॥ विठु पाटलाचा महार ॥ एका जनार्दनीं जोहार ॥ सकळ संतांचा कारभार ॥ मज नफराचे शिरीं कीं जी मायबाप ॥ ६ ॥

॥ २५४४ ॥ जोहार मायबाप जोहार ॥ मी अविद्या नगरींचा महार ॥ साचार माझें नोहे नगर ॥ आकारास आलें कीं जी मायबाप ॥ १ ॥ म्यां सहा चाकर ठेविले ॥ ते माझे बळें वर्तती वहिले ॥ मला गांजिती बळें ॥ अन्याय नसतां कीं जी मायबाप ॥ २ ॥ तुह्मी अवघे एकत्र झालां ॥ माझें घर मोडायाचा मनसुबा केला ॥ जरी माझें अगत्य असेल धन्याला ॥ तरीच मजला ठेविल कीं जी मायबाप ॥ ३ ॥ तुह्मी अवघे संत सज्जन ॥ रूपीं मिळालां परिपूर्ण ॥ ह्मणून माझें हेळण ॥ करितां कीं जी मायबाप ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं ह्मणे देवा ॥ अविद्येचा संग मज नसावा ॥ जन्ममरणाचा ठेवा॥ चुकवा कीं जी मायबाप ॥ ५ ॥

॥ २५४५ ॥ जोहार मायबाप जोहार मी आदि पुरुषाचा महार ॥ तुह्मी चालवितां राज्य व्यवहार ॥ हिशोब तारोतार देतां कीं जी मायबाप ॥ १ ॥ या देहांत आले बरें झाले ॥ व्यर्थचि लोक पिडिले ॥ तेव्हां कोणी दिधले ॥ ते धन्या पासी आले ॥ मग सवेच मज पाठविलें कीं जी मायबाप ॥ २ ॥ मी महार असें जातीचा ॥ परी हुकुमदार चाकर साहेबाचा ॥ परी मना येईल देह गीरीचा ॥ तेव्हां बांधुन नेतील कीं जी मायबाप ॥ ३ ॥ मोठ्या मोठ्या सांडुनि द्या गोष्टी ॥ विठ्ठल चरणीं घाला मिठी ॥ नाहीं तरी एका जनार्दनीं बेबंटी ॥ ठसतील कीं जी मायबाप ॥४॥

॥ २५४६ ॥ जोहार मायबाप जोहार ॥ कायापूर शहर ॥ तेथील मी महार ॥ पाहूं आलों दरबार ॥ धण्याचा कीं जी मायबाप ॥ १ ॥ पाटील जीवाजी अवधारी ॥ जो कां ग्रामीचा सत्ता धारी ॥ परी दिवाची करितो चोरी ॥ कीं जी मायबाप ॥ २ ॥ आशा पाटलीण तोंडाळू फार ॥ उगीच फीरती दारोदार ॥ सांगे अक्षयासी व्यवहार ॥ फजीत खोर कींजी

मायबाप ॥ ३ ॥ मनाजी पंत कुळकरणी ॥ त्याचे हातीं खत लेखणी ॥ त्याची जैसी जैसी करणी ॥ तिकडे तिकडे कुळे जातात कीं जी मायबाप ॥ ४ ॥ यमाजीचा वा हुजुरचा भालदार ॥ त्याचे जीवावरील महार ॥ त्यासी नाहीं पडला व्यवहार ॥ दरबार शुद्ध करावा कीं जी मायबाप ॥ ५ ॥ मज जीवासी राहविलें ॥ मुळच्या शिवाजीस आणविलें ॥ पाटीकीचें वस्त्र दान दिलें ॥ ग्राम त्याजकडे लाविला कीं जी मायबाप ॥ ६ ॥ तेथील सांड बुद्धी वाटलीच भली ॥ गांवा मध्यें अक्षय नाणवली ॥ नीस नव्हे मी बोलती जाली ॥ खरी केली हाक देऊन कीं जी मायबाप ॥ ७ ॥ मज महाराची महारकी ॥ फिटली असे नसेकीं ॥ एका जनार्दनीं लौकिकीं ॥ दिला पोषाख यदुविरें कीं जी मायबाप ॥ ८ ॥

॥ २५४७ ॥ मी संता घरीचा महार ॥ करीतों जोहार ॥ धृ०॥ विवेक नाईक माझें नांव ॥ मी पण आलें अहंभाव ॥ पंच भुताचा वसवी गांव ॥ रस्ते च्यार ॥ १ ॥ आत्मा धनी पाटील बावा ॥ मनाजी पांड्या चालवि गांवा ॥ बुध्याजी शेट्या बळकट रावा ॥ घरांत बसली आशा अवा ॥ खेळवी पोर ॥२॥ दहा इंद्रियें नऊ वेशी राहातो ॥ दाहावे खीडकी पासीं ॥ माझा मीच मूळ मिरासी ॥ लक्ष सद्गुरू चरणा पाशीं ॥ सार विचार ॥ ३ ॥ कौल शेत वर्षाचें मूळ ॥ काम देशपांड्या खळ ॥ क्रोध देशमुख सबळ ॥ नेणें सरकार ॥ ४ ॥ हिशोब पडेल जमा सरकारी ॥ येइल यमाजीची स्वारी ॥ जीवाजी धरून कारभारी ॥ ओस पडेल नगरी सारी ॥ देतील मार ॥ ५ ॥ शेवटीं नाहीं तुमचें धड ॥ पडेल चौऱ्यासीचें कोड ॥ मी तो राहीन एकीकडे ॥ जीवाजीवर घातलें सांकडें ॥ सांगतों बारे ॥ ६ ॥ आवडी राखा मजवर हेत ॥ मीच करीन तुमचें हीत ॥ संता संगें लावा चित्त ॥ ह्मणे एका जनार्दन विवेक नाथ ॥ नाम सार ॥ ७ ॥

॥ २५४८ ॥ जोहार मायबाप जोहार ॥ तुमच्या महाराचा मी महार ॥ बहु भूकेला झालों ॥ तुमच्या उचिष्टा साठीं आलों ॥ कीं जी मायबाप ॥१॥ मी तुमच्या उचिष्टाची केली आस ॥ मी तुमच्या दासाचाही दास ॥ एका जनार्दनीं आणली पाटीं ॥ तुमच्या उचिष्टा साठीं ॥ कीं जी माय ॥२॥

॥ २५४९ ॥ जोहार जी मायबाप जोहार ॥ सुर्यवंशीं रामजी बावाचा मी महार ॥ माझें नांव आत्मा नाईक महार ॥ धन्याचे रजेनें सारा कार-

भार ॥ मीच करितो कीं जी मायबाप ॥ १ ॥ जोहार जी पाटिल बाजी ॥ दरबारासी न या कांजी ॥ सांगो आलो बाजी ॥ बाकी बहुत शेकली कीं जी मायबाप ॥ २ ॥ खोंपटा मध्यें लपतां काय ॥ हाडाचे खोडा पडतील पाय ॥ तोंड चुकवितां विजत जाय ॥ वांचून काय करावें कीं जी मायबाप ॥ ३ ॥ गांवचीं कां कोंडितां गुरें ॥ गांवचीं कां बुजीतां द्वारें ॥ झाडें फेडे सारे उणें पुरे ॥ चुके बाकीं जी मायबाप ॥ ४ ॥ ही माहीती न चले कांहीं ॥ धण्याची देतों दुराई ॥ वरते पाये खालते डोई ॥ होईल भाई नव मास कीं जी मायबाप ॥ ५ ॥ मुदत मुळींची आली ॥ फिकीर पाहिजे केली ॥ कितीक मारीत झोडीत नेली ॥ माझी बोली साच करा कीं जी मायबाप ॥ ६ ॥ शिल्लक वाहाडली फार ॥ लक्ष चौऱ्यासी वरात दार ॥ यमाजी बाजी हुजुरचा चोपदार ॥ त्याचा मार पुरे पुरे कीं जी मायबाप ॥७॥ टाकुनी द्याहो गांव ॥ केंस बोडून पालटा नांव ॥ घर टाकुनी देवळी राहाव ॥ हातीं कांठीं असो द्या कीं जी मायबाप ॥ ८ ॥ येका जनार्दनीं महार ॥ संत सभेसी केला जोहार ॥ तेणें चुकली येरझार ॥ जन्मा मरणाची कीं जी मायबाप ॥ ९ ॥

---

## जोशी.

॥ २५५० ॥ मी परात्पर जोशी ॥ होरा सांगेन संतसभेसी ॥ माझें वचन मानाल मानसीं ॥ तरी दृढनिश्चयेंसी परिसावें नाना ॥ १ ॥ ऐका ऐका राजेश्री ॥ प्रजा मोकदम कारभारी ॥ शेटे महाजन चौधरी ॥ बरवी नगरी वसविली नाना ॥ २ ॥ राहाट काटाचे दिवस आले ॥ जागे सांडोनी फेरे केले ॥ मागें कष्ट बहुत भोगिले ॥ शेवटीं फळ आलें नर देहासी नाना ॥ ३ ॥ या पंढरीस मागें बहुत आले ॥ जोशी भविष्य सांगोनि गेले ॥ सांचें तुह्मीं नाहीं ऐकिलें ॥ दगे झाले थोर थोर नाना ॥ ४ ॥ काळाचे फेरे होऊन गेले ॥ थोर नगरांचे संहार झाले ॥ साच बोले माझ्या बोलें ॥ जोडी केली आत्म युक्ति नाना ॥ ५ ॥ धेडा मांगाच्या मान्यता झाल्या ॥ उत्तम योनी भिकेस लागल्या ॥ तें ऐका मज जोशाच्या बोला ॥ उत्तम ते पडलें अधम घरीं नाना ॥ ६ ॥ नांव काय पाटिल बुवाचें ॥ पुढील भविष्य सांगेन साचें ॥ वचन ऐका मज जोशाचें ॥ तेणें तुझें समाधान

होईल नाना ॥ ७ ॥ एक बायकोची संगत घडली ॥ तेणें तुझी महिमा बुडाली ॥ जुनी भाकर सरोनी गेली ॥ गांठ पडली दरिद्राची नाना ॥ ८ ॥ तिचा संग टाकीं दादा ॥ बरवा चालेल तुझा धंदा ॥ साच मानी माझ्या शब्दा ॥ सदा सर्वदा सुखी होसी नाना ॥ ९ ॥ नांव काय आवाजीचें ॥ कल्याण होईल बयाचें ॥ पुढील भविष्य सांगेन साचें ॥ तरीं तुझें तेणें समाधान होईल बये ॥ १० ॥ बया आणिक एक सांगतों मात ॥ टाक कुबुद्धि पाहूं देहांत ॥ फार बरेपणा दोघांत ॥ स्त्री पुरुषांत बहु गोडी बये ॥ ११ ॥ विघ्न दिसतें वरले आळीं ॥ नाडूं पाहती थोर थोर बळी ॥ पूर्व पुण्यें जाहली होळी ॥ फेरे पाळी चुकेना गे बये ॥ १२ ॥ पहा लेंकरें जाहलीं आई ॥ परि तूं एकाचें सुख देखिलें नाहीं ॥ आतां येथून पुढें पाहीं ॥ सुख होईल तें ऐक बये ॥ १३ ॥ एका लेंकीची सासुर वाडी ॥ अपार सुख देशील पुढी ॥ माझें वचन नको मानूं लबाडी ॥ सत्य तुज पुढें बोलतों बये ॥ १४ ॥ कुबुद्धिची कांचोळी ॥ लेऊं नको काळी चोळी ॥ दुष्ट गत झाली सगळी ॥ ऐक नाम तुझें बये ॥ १५ ॥ विकल्प उडदांचा मेळावा ॥ द्वैत तांब्याचा पाऊड द्यावा ॥ मज जोशा कारणें बये ॥ १६ ॥ विषम बुद्धीचें नाणें ॥ ओंवाळून द्यावें मज जोशा कारणें ॥ आपुलें निःशेष बरें करणें ॥ तरी दान करी वेगेसीं बये ॥ १७ ॥ साच मानी माझ्या बोला ॥ येथूनि तुझा शनैश्वर गेला ॥ जन्म गुरूचा पालट जाला ॥ संग घडला साधु संतांचा बये ॥ १८ ॥ पूर्ण जोशी जनार्दन ॥ सूर्य वंशीं रघुनंदन ॥ तयासी अनन्य जातां शरण ॥ वंश उद्धरण तयाचा बये ॥ १९ ॥

॥ २५५१ ॥ येथून पुढें बरें होईल ॥ भक्ति सुखें दोंद वाढेल ॥ फेरा चौऱ्यायशींचा चुकेल ॥ धन मोकासी ॥ १ ॥ मी आलों रायाचा जोशी ॥ होरा ऐका दादानों ॥ धृ० ॥ मनाजी पाटील देह गांवचा ॥ विश्वास नका धरूं त्याचा ॥ घात करील नेमाचा ॥ पाडील फांशीं ॥ मी० ॥ २ ॥ वासना बायको शेजारीण ॥ झगडा करील मोठी दारुण ॥ तिच्या पायीं नागवण ॥ घर बुडविसी ॥ मी० ॥ ३ ॥ एकाजनार्दन कंगाल जोशी ॥ होरा सांगतों लोकांसी ॥ जा शरण सद्गुरूसी ॥ फेरा चुकवावा चौऱ्यायशीं ॥ मी आलों रायाचा जोशी ॥ होरा ऐका दादानों होरा ऐका दादानों ॥ ४ ॥

॥ २८८२ ॥ ऐका ऐका राजश्री ॥ धृ० ॥ आह्मी परात्पर पर जोशी ॥ सांगों आलों संत सभेसीं ॥ माझें वचन ऐकारे मानसीं ॥ दृढ भावेंशी परिसावें ॥ १ ॥ मजा सन्मुख पटवाडी ॥ शेख्ये महाजन चौधरी ॥ बरी नगरी वसविली ॥ २ ॥ या या पंढरींत जोशी आले ॥ होरा सांगोनियां गेले ॥ माझें नाहीं कोणी ऐकिलें ॥ दगे पावले थोर थोर ॥ ३ ॥ सत्य मानी माझिया बोला ॥ येथून तुझा शनैश्वर संपला ॥ जन्म गुरू पालटला ॥ संग घडला साधूचा ॥ ४ ॥ एका बायकोची संगत घडली ॥ त्यानें तुझी महंती बुडाली ॥ शिळी भाकर सरोनि गेली ॥ गांठ पडली दरिद्र्याची ॥ ५ ॥ तिचा संग सांडीरे दादा ॥ बरवा चालेल तुझा धंदा ॥ साच मानी माझिया शब्दा ॥ जेणें सर्वदा सुखी होशी ॥ ६ ॥ विवेक उडदाचा मेळ मिळवावा ॥ संदेह तेलाचा घट भरावा ॥ हृदय तांब्याचा पाऊड द्यावा ॥ ओंवाळुनी मज जोशासी ॥ ७ ॥ जोशी सांगोन जातो होरा ॥ भोळ्या भाविकां लहान थोरां ॥ एका जनार्दनीं दृढ धरा ॥ जोशी परत गेलिया वरी ॥ ८ ॥

॥ २८८३ ॥ अगा ये परम शुभ ऐक ॥ लाभ दिसतो येक ॥ नांदतें धर्माचें घर ॥ सद्विवेकाचें विरण ॥ विवरांत विश्रांती थोर ॥ अपार सुखतें ॥ १ ॥ ऐसा नर देह परम सुखाचा ॥ घे मज पिंगळ्याची वाचा ॥ मी संदेह सांगेन साचा ॥ ऐका गा राजकुमरहो ॥ २ ॥ डुगडुगडुग शंभु महादेवा ॥ काशी विश्वनाथा ॥ पंढरीच्या विठोबा ॥ कानड्या खंडेराया ॥ दिगंबरा दत्तात्रेया ॥ इतुकें बोलतां ठाया ॥ परी ते येकची यती ॥ ३ ॥ लडबड लडबड ॥ नवनाथ ॥ सोरटी सोमनाथ ॥ श्री हिंगळजा भगवती ॥ विणा पुस्तक धारिणी ॥ ये मूळ पीठींची ॥ जिचेनी वस्तु महिमा साची ॥ आदी अंत भरले स्वतंत्र ॥ ह्मणोनी कारण वाचेसी ॥ असंत बोलत आहे ॥ ४ ॥ नमो परम पुरुष ॥ जो भास ना आभास ॥ जो स्वयं प्रकाश ॥ अखिल मूर्ती ॥ ५ ॥ जो वर्ण व्यक्ति हीन ॥ दृश्यादृश्य दरुशन जाण ॥ जो आदिमायेचें आवरण ॥ अनादि सिद्ध ॥ ६ ॥ धन्य धन्य तो सद्गुरु ॥ जो साक्षात् परब्रह्म अवतारु ॥ नाम स्मरणें जगदुद्धारु ॥ करी सदां ॥७॥ आतां समस्तां नमीत स्वानंदें ॥ देहीं स्फुरलें स्वात्म सुख छंदें ॥ डुल्लतां आपुलेनी आनंदें ॥ सहजीं सहज ॥ ८ ॥ आधीं एकाग्र करुनी मन ॥ सांडी बद्ध मुक्तिचा अनुमान ॥ वृत्ती सदां समाधान ॥ स्वरूपीं असावी

॥ ९ ॥ हजार गोष्टींची येपरी ॥ मज सरोद्याचा विश्वास धरी ॥ अंतीं बोलणें वचन वरी ॥ गोड लागे ॥ १० ॥ येक खटपट ॥ येक तळमळ ॥ येक वळवळ ॥ येक कळकळ ॥ परी तो अवघाची कोल्हाळ ॥ करिताती ॥ ११ ॥ तैसा नोहे मी पिंगळा ॥ शब्दासहित बोध सकळा ॥ येका अनेकीं नोहें वेगळा ॥ शोधोनी पाहे ॥ १२ ॥ दिसे बावन्नाची कडसणी ॥ येका सूत्रें वोविले मणीं ॥ जैसें गंगेचें पाणी ॥ निर्मळ पाहे सर्वदां ॥ १३॥ पूर्व उत्तर दोन प्रत्यक्ष ॥ अक्ष होते कां नेणा ॥ १४ ॥ येक तृप्ति व्हावया॥ आणीक ग्रास घ्यावया ॥ तरी ते आन ठाया ॥ गेले न ह्मण ॥ १५ ॥ तरी त्याचे मुखें अर्थ कांहीं ॥ ज्ञात्यासी सांगतां भरला नाहीं ॥ विवेक संचुनी ठाईं ॥ ऐका गा राजेनु ॥ १६ ॥ नांव काय रायाचें ॥ मेष कीं वृषभ कीं मिथून ॥ कीं कर्क कीं सिंह कीं कन्या कीं तूळ कीं वृश्चिक कीं धन कीं मकर कीं कुंभ कीं मीन ॥ ऐका गा राज कुमर हो ॥ १७ ॥ येवो मेष तो कैसा ॥ हुरळकहुसकेथल तैसा ॥ बुद्धि मंद विवेक लेशा ॥ दैन्यवाणा सदाचा ॥ १८ ॥ आतां वृषभ बोलावा ॥ प्रकृति बुद्धि आव्हासवा॥ हानी लाभ नोहे ठावा ॥ या गर्वरासी ॥ १९ ॥ माया ईश्वर मिळोनी ॥ जैसे सुखावती दोन्ही ॥ तरंग तेंच पाणी ॥ ज्ञान प्राप्ति मिथुन जाणावा ॥ २० ॥ अहं बुद्धीचे सवर्क ॥ तोचि वोळखावा कर्क ॥ देहाभिमानीं गर्क ॥ कुवृत्ती सदाचा ॥ २१ ॥ मदगज वनांतरीं ॥ धूर्त सिंहांचीये परी ॥ मोहें महिमा विस्तरी ॥ ऐसी कन्या जाणावी ॥ २२ बुद्धी सत्वाची साम्यता ॥ प्रपंच परमार्थ ऐक्यता ॥ स्थूळ धारी देखता तो सत्वाचा वोतिलां ॥ २३ ॥ जो कुर्वाळील कृपा करी ॥ विषय शक्ति नांगी मारी ॥ फणका लागतां दुःख करी ॥ तो मळीन वृश्चिक जाणावा ॥ २४ ॥ शब्द कैसा तीक्षण ॥ हृदयीं जैसा लागे बाण ॥ मोडी भलत्याचें समाधान ॥ तोची धन वोळखावा ॥ २५ ॥ एक होटीं येक पोटीं ॥ सदा भोंवयासी घाली गांठी ॥ मळीण देखे सकळ सृष्टी ॥ तो मकर जाणावा ॥ २६ ॥ नुचंबळे पूर्ण कुंभ ॥ जो आत्म साक्षात्कार स्वयंभ ॥ तो प्रत्यक्ष जाणावा थोंब ॥ ऐशी वृत्ती जाणावी ॥ २७ ॥ सदा चंचळ चपळ स्थिति ॥ दृष्टी झेंपावे ती विवृत्ती ॥ ऐसी मीनाची गती ॥ आपुलेनी वर्ते ॥ २८ ॥ एवं स्थिती मति द्वये ॥ प्रेमळें मनीं वोळखोनी घ्यावें ॥ ऐके सत्र वृत्ती भावें ॥ नांव काय रायाचें ॥ २९ ॥ तुझीया बाळा देखों न शके काळ ॥ भुरळ

डोळ्याचा अंधळा ॥ झडपोनी जातो साला भिऊं नको घरीं येऊं देऊं नको ॥ मन मुष्टी माझीं धरी ॥ मी सांगेन तैसेच करी रे राया ॥ ३० ॥ साबण सरकी गाईचें शेण ॥ तांबड्या गुंजा मुष्टी येक दोन ॥ तांबें नाणें कालऊन ॥ तिहीं ठाई टाकी ॥ ३१ ॥ येक मती बोलून जातो ॥ जळीं राख स्थळीं राख ॥ आपुला सेजार राख ॥ पाजार राख ॥ अब्रह्मस्तंब पर्यंत रक्षरक्ष हुं फट् स्वाहा ॥ ३२ ॥ ही नंद देशीची विद्याखरी ॥ तुझ्या बाळाचें विघ्न निवारी ॥ काळ कंटक दूर करी ॥ मग नांदसील स्वानंदें ॥ ३३ ॥ आतां बाळाचें नांव सांगें स्पष्ट ॥ तुझीया पोटींची आत्मनिष्ठ ॥ जेव्हां जाली ॐप्रतिष्ठ जांवाई तो सलक्षणी साळंकृत ॥ ३४ ॥ परी तो सत्व गुणाची रासी ॥ समेमता लावी रुची ॥ निज वाक्यार्थ परम साची ॥ माहिमा इची देवगणी ॥ ३५ ॥ देवगणी असे ॥ प्रकृत गुणीं विषम शमा नसे ॥ राक्षस गणी आशेषे ॥ वोळखोनी घ्यावें ॥ ३६ ॥ आतां घर धन्याचें नांव काय ॥ केशव कीं माधव कीं गोविंद ॥ कीं विष्णु कीं प्रद्युम्नु ॥ कीं पुरुषोत्तमु ॥ कीं अधोक्ष कीं रामु ॥ देहबुद्धी संगें घटवावा उतरलें नांव घर धन्याचें ॥ ३७ ॥ जरी तो ह्मणूं काळा निळा ॥ परी तो वर्णव्यक्ती वेगळा ॥ दिठीचा चुकवोनी डोळा ॥ दिसतो सोहळा घर धन्याचा ॥ ३८ ॥ नामें वित्पत्ती बोध ॥ आपणा घेतां शोध ॥ उरला तो सोहं बोध ॥ नाम रूपें ॥ ३९ ॥ अगा बायको येक आहे ॥ उगीच आदळी हात पाय ॥ चोरुनी पर घर जाये ॥ ती मोठी जगभ्याड होइ राया ॥ ४० ॥ प्रसिद्ध जो अविवेक ॥ तोचि जाण तिचा लेंक ॥ सरळ वाढलासे फोंक ॥ महा ठकु ॥ ४१ ॥ चउथ पंचमीचे आइत वारीं ॥ येक हाळदीचा मुटकुळा करी ॥ वोवाळुनी टाकी बाहेरी ॥ तीही सांजा ॥ ४२ ॥ येक घरचा माणूस वांकडे पायाचा ॥ पिचक्या डोळ्याचा ॥ लटक्या बोलाचा ॥ त्यास ह्मणी पतकरसील तर ॥ ४३ ॥ बापुडा नारदु पाहिला ॥ घडी मध्यें गाभणा केला ॥ चंद्रासी कळंक लाविला ॥ तयाचेनी ॥ ४४ ॥ शंकराचा जाला वीर्यपात ॥ रावणाचा कराविला घात ॥ विष्णु विचकुनी दांत ॥ वृंदा वृंदा वोसणतसे ॥ ४५ ॥ ब्रह्मा धांवे सरस्वती मागें ॥ इंद्र जाला सहस्त्र भगें ॥ भस्मासुर भस्म जाला वेगें ॥ वाळी निमाला राम बाणें ॥ ४६ ॥ आतां घनवट दे कण ॥ येक तोळा दे दान ॥ दे मज नको करूं अनुमान ॥ घे मज पिंगळ्याची वाचा ॥ ४७ ॥ काय देतील कुडें ॥ रितें

अवघेंचि उघडें ॥ खोटें नाटें जटे मुटे अविवेकी ॥ ४८ ॥ अतिताची आशा हरे ॥ दासाचें तो दुणें भरे ॥ जें दिधलें तें कल्पांतीं न सरे ॥ ऐसें कांहीं देइजे ॥ ४९ ॥ आजी धन्य पावलों सभा ॥ जीवें जन्माची जाली शोभा ॥ कर जोडोनी राहीन उभा ॥ महाद्वारीं देवाचे ॥ ५० ॥ एक छत्राचें राणिव ॥ मोक्ष मोकाशी दिला गांव ॥ जग विख्यात विश्वासी नाम ॥ नाचेन आवडी गाउनी ॥ ५१ ॥ एका जनार्दनीं संताचा लडिवाळ ॥ पोटीं रिघोनी जाला बाळ ॥ कृपा केली सर्व काळ ॥ अभय वर देउनी ॥ ५२ ॥

---

## जाबचिठी.

॥ २५५४ ॥ क्षेत्रीं कुलवंत अयोध्याधीश रामचंद्र ॥ छत्रपती अनंतब्रह्मांडनिवासी ॥ यांचें पत्र कीं तुह्मी जिवाजीपंताचा दावा लेहुन कळविला ॥ तेथें लिहिलें कीं ॥ मनाजी देशमुख यानें असुरसैन्य पुंडपाळेमार मेळवोन ॥ गांवें मारतात ॥ वसाहात होउं देत नाहीं ॥ ऐसें असल्याकारणानें ॥ मेहेरवान खपा होऊन ॥ मनाजी देशमुख याजला ॥ तलब पोहोंचण्यास शुभे रवाना केलें तपसील ॥ कलम ॥ आत्मा विवेक प्रधान ॥ स्वानुभव सैन्याधिपती ॥ प्रबोध सरलष्कर ॥ इतरांवैर सनदा देउन ॥ तावडतोब रवाना केलें ॥ हे मौजे मजकुरीं पावतांच ॥ अवघे पुंडपाळेगार मारले जातील ॥ मग ब्रह्मपुरीचा मार्ग चालूं लागेल ॥ याजकरतां तुह्मी आपले कामांत ॥ हुशारी ठेऊन ॥ सरकारचे पायांजवळ ॥ जरूर यावें ॥ आपण हुजूर आल्या वर ॥ बंदमोक्षाची सनद ॥ आपणास दीली जाईल ॥ आपण निजानंदीं राहणें ॥ एकाजनार्दना शरण ॥ बहुतकायलिहिणें जाबचिटि ॥ १ ॥

॥ २५५५ ॥ सकलयुक्त प्रवीण जिवाजी पंत शेकदार ॥ तुह्मा वर बाकी निघाली ह्मणोन ॥ तुह्मास देहगांवास पाठविलें ॥ त्या देह गांवीं राहून॥ विषय शेट लोभाजी नाईकवाडी ॥ यांचेबुद्धीस लागून ॥ भव समुद्र तरावयाची भूल पडली॥ यामुळें कामाजी महाजन ॥ व मनीराम देशमुख ॥ तुह्मांवर साह्यहोऊन ॥ तुमची निज स्वार्थाची खराबी केली ॥ बुधाजी पाटील मुकदम ॥ मुफसल्ला ॥ कीर्द होऊन ॥ ह्मणों लागले कीं ॥ कानद खिड ॥

व तोंडापूर ॥ हे दोन्ही मातबर असतां ॥ श्रवण खरीब ॥ व कीर्तन रबी ॥ पिकायाची होती ॥ ती ममताईनें हातीं लागूं दिली नाहीं ॥ यासी उपाय केलापाहिजे ॥ खांवदा पासीं भागवतराव दिवाण ॥ तो गीता बाईचा पुत्र ॥ राजयोगी ॥ यासी भेटायाची तजविज ॥ वैराग्य यांचे हातें ल्यावी ॥ परम पश्चात्ताप पंत ॥ आपुले स्वाधीनच आहेत ॥ त्यांज पासीं येणें ॥ ते तुह्मांस ॥ भागवतराव दिवाणजी ॥ यांजकडे नेतील ॥ पुन्हां देह गांवास ॥ गर्भपुरास पाठविणार नाहींत ॥ त्यांनीं लिहिलें तें तूर्त हृदयीं ठेवणें ॥ मागून यमाजीची तलब होणार ॥ तलब माघारीं फिरणार नाहीं ॥ त्याजबरोबर हुजूरच्या सनदा आहेत ॥ त्यांबरहुकूम करणें ॥ गैर न करणें एकाजनार्दनीं शरण बंदगी जाब चिटी सही ॥ १ ॥

---

## जंगम.

॥ २५५६ ॥ शुद्ध भाव भगवा चिरा ॥ मूळ तंतु शिवदोरा ॥ आत्म लिंग पूजूं बरा ॥ ह्मणोनी आलों तुमचे दारां ॥ १ ॥ गुरु धर्म कोरान्न-भिक्षा ॥ परात्पर आमुची दीक्षा रे बाबानों ॥ ध्रु० ॥ देह दंड काठी हातीं ॥ आशा जाळुनि लाविली विभूती ॥ दया क्षमा आणि शांति ॥ ह्मणोनी ऐसे रिती रे ॥ २ ॥ गुरु नामाची माळ गळां ॥ गुरु दीक्षेचा सोहळा ॥ साधु संत जाणती कळां ॥ एका जनार्दनीं बोधिला रे ॥ गु० ॥ ३ ॥

---

## मानभाव.

॥ २५५७ ॥ काम क्रोध आह्मी बांधोनीया पायीं ॥ मत्सर भेद अहं-कार अव्हेरिला बाई ॥ १ ॥ मानभाव बाई ॥ आह्मा भिक्षा वाढा कांहीं ॥ ध्रु० ॥ आशा मनशा तृष्णा यांची केली पाय मोडी ॥ कल्पना आदि भ्रांती इची पाईं घातली बेडी ॥ २ ॥ महादेवाच्या सात पिढी सांगुनी देऊं ॥ सोन्या रुप्याचे देव आह्मी ठेंचोनिया खाऊं ॥ ३ ॥ भाव आणि भक्तीचा गडबडगुंडा केला ॥ एकाजनार्दन राखा पायीं मानभाव झाला ॥ ४ ॥

॥ २५५८ ॥ आतां मानभाव झालों भिक्षा वाढा बाई भिक्षा वाढा बाई ॥ धृ० ॥ मुळींचाची मानभाव वस्त्रें केलीं काळीं ॥ कोरके मागून झोळी भरली उलटी काठीं धरली ॥ १ ॥ सोन्या रुप्याचे देव आह्मी मोडुनियां खाऊं ॥ शेंद्राचे देव आह्मी दृष्टीन या पाहूं ॥ २ ॥ एका जनार्दनीं मानभाव झाला ॥ झोळी वरती झोळी ठेउनि गडबडगुंडा केला ॥ ३ ॥

## जातें.

॥ २५५९ ॥ माया जिवलग जाता बैसली कृष्ण ह्मणे गे आई ॥ समान तळी तळी वर ठेवि पहा होई ॥ दळण दळीता शिणसिल हात लावि वो आई ॥ क्षणा माजि मीच दळीन कौतुक पाही ॥ १ ॥ येईगे येईगे येईगे कान्हाई हात लावी वहिली ॥ विसाव्यानें ज्याची नुमजवि श्रींती साउली ॥ ध्रु० ॥ ब्रह्माहमास्मि ठाकिया उकटी द्वैत तळी ॥ अधिष्ठान खुंटा निश्चळ दोन्ही येकची बोली ॥ पहिले चारी निरसोनि निज नित्य न्याहाळी ॥ साहा ही वैरण वैरुनी अठराही दळी ॥ २ ॥ पंच भुतें पंच धान्यें दळियेलें जाता ॥ शशी सूर्य दोन्ही दळीले प्राणाचा सता ॥ ध्येय ध्याता ध्यान दळीले धारणा धरिता ॥ पंच विषय तेही दळीले वैराग्य आलें हाता ॥ ३ ॥ वैकुंठ कैलास दळिले गतिते एक देशी ॥ क्षीर सिंधू तोही दळिला दृश्या दृश्येसी ॥ ४ ॥ वासना मिथ्या भाजुनि वैरियेले जाता ॥ गुणा गुणातेंही दळिले पहाते पहाता ॥ ब्रह्मा विष्णु रुद्र दळीले वोवीयासे गातां॥ अकार उकार दळिले मकार सहीता ॥ ५ ॥ कर्मा कर्म कैसे दळिले जन्म मरणेसी ॥ मीपण तूंपण दोही दळिले जीव शिवेसी ॥ पुढें वैरण्या कांहीं न दिसे पहातां चौपासी ॥ माया तेही जाता दळिली दळते दळणेसी ॥ वृत्ती तीही निवृत्ति पडियेली ठका ॥ समाधी स्थान दळिले देह बुद्धीसी देखा ॥ दळिते जातें तेंही दळिले कवतुक देखा ॥ भावें लीला खेळे जनार्दन येका ॥

## जातें व दळण.

॥ २५६० ॥ ज्ञान अज्ञान दोन्ही दळीले ॥ विज्ञानासहित ॥ ध्रु० ॥ मी तूं पण क्षेत्र वैरण घातलें ॥ नवग्रहासहित ॥ १ ॥ तेहत्तीस कोटी देव

ते दळीले ॥ ब्रह्माविष्णु सहित ॥ २ ॥ दळीत दळण दळीयेलें ॥ दोन्ही तळियां सहित ॥ ३ ॥ एका जनार्दनीं दळीयलें ॥ कांहीं नाहीं उरलें ॥ ४ ॥

---

# फुलवरा.

॥ २५६१ ॥ पिंडांड ब्रह्मांड अंतरीं दैवत भिन्नाकृती वो ॥ शोधोनी पहातां अवघे चराचर व्यापक घन संभूती वो ॥ भेद भाव त्रिगुणाचा रज तम सत्वाची आरती वो ॥ ऐसें जाणोनी केली उभवणी ॥ द्वैत सारुनी ॥ परी तो मनीं एक हरि अंकिला ॥ तुज म्यां फुलवरा बांधीला ॥ १ ॥ जय जगदंबे पूर्ण कदंबे जग उद्धोधें देह तुज अर्पिला ॥ तुज म्यां फुलवरा बांधिला ॥ ध्रु० ॥ आई भवानी थोर जाणोनी तुज म्यां उपासीलें वो ॥ हातीं परडी देऊन तिनें मज भिकेसी लाविलें वो ॥ खुळा पांगुळा करुनी आपणा जवळीं बैसविले वो ॥ उदय अस्तुचे भरें ॥ फिरे गरगरे ॥ भूत बावरे मज व्यर्थ शीण वाटला ॥ २ ॥ नवस करुनी खंडोबासी मुरळी होउनी बैसलें वो ॥ आपुले जे कां सखे सज्जन ते विवंचुनी भरीं भरलें वो ॥ वारी मागतां पोट भरेना बहु श्रम पावलें वो ॥ श्वानाचीये परी ॥ वृथा गुरगुरी ॥ जाय चाचरीं ॥ परी तो हरि नाहीं देखीला ॥ ३ ॥ माझे घरीं पाहुणा भैरव येउनी बैसला वो ॥ त्रिगुणाचा त्रिशूळ घेउनी प्रपंच विस्तारिला वो ॥ जोगा बलाउनी पतर भरुनी भराड म्यां घातिला वो ॥ ऐशीं वरदळें ॥ सोशिलीं बळें ॥ जालीं निर्फळें ॥ सुखाचा लेश नाहीं देखीला ॥ ४ ॥ मुंजाबाची डांक घालुनी मेसाई आळविली वो ॥ त्रिगुणाची तिवई करुनी सावरी बैसविली वो ॥ धूप दीप नैवेद्य दाउनि पंचारती केली वो ॥ तिनें मज नाडिलें ॥ दुःख भोगिलें ॥ सुख नासलें ॥ मग म्यां ढकलून दिलें तिला ॥ ५ ॥ ऐशीं दैवतें केलीं अनंतें नवस बहु फेडिले ॥ परी ते फलकट जाले शेवटीं गळा येउनी पडिले ॥ बहु जाचिलें दुःख भोगिलें दिशीं व्यापिलें चौदिशीं व्यापिलें वो ॥ जालें मी उदास ॥ धरली कास ॥ सोडुनी आस ॥ पंढरी पाहून जीव हर्षला ॥ ६ ॥ वैकुंठींचें निधान साचे असती जे प्रियकर वो ॥ त्याची गांठ पडली तेणें दिधला अभय कर वो ॥ त्याचे संगतीं गेले भक्तीनें देखीलें भीमातीर वो ॥ परात्पर सोयरा ॥ पुंडलीक वरा ॥ दिधला थारा ॥ तेणें मज बुडतां हात दिधला ॥ ७ ॥

डोळा घालुनी अंजन घेउनी गेले मज राउळीं वो ॥ विटेवरी जगदंबा एका एकीं नयनीं देखिली वो ॥ मनोभाव वरदळ वृत्ती देहाची खुंटली वो ॥ एका जनार्दनीं भलें ॥ द्वैत हरपलें ॥ ऐक्यसंचलें ॥ जन्म मरणाचा पट फाटला ॥ ८ ॥

## जोगवा.

॥ २५६२ ॥ अनादि निर्गुण प्रगटली भवानी ॥ मोह महिषासुर मर्दना लागुनी ॥ त्रिविध तापाची करावया झाडणी ॥ भक्तालागीं तूं पावसी निर्वाणीं ॥ १ ॥ आईचा जोगवा जोगवा मागेन ॥ द्वैत सारुनी माळ मी घालीन ॥ हातीं बोधाचा झेंडा मी घेईन ॥ भेद रहित वारीसी जाईन ॥२॥ नवविध भक्तीच्या नवरात्रा ॥ करुनी पोटीं मागेन ज्ञान पुत्रा ॥ ३ ॥ धरीन सद्भाव अंतरींच्या मित्रा ॥ दंभ सासुऱ्या सांडीन कुपात्रा ॥ ३ ॥ पूर्ण बोधाची घेईन परडी ॥ आशा तृष्णेच्या पाडीन दरडी ॥ मनोविकार करीन कुर्वंडी ॥ अद्‍भुत रसाची भरीन दुरडी ॥ ४ ॥ आतां साजणी जालें मी निःसंग ॥ विकल्प नवऱ्याचा सोडियला संग ॥ काम क्रोध हे झोडियले मांग ॥ केला मोकळा मारग सुरंग ॥ ५ ॥ ऐसा जोगवा मागूनी ठेविला ॥ जाउनी नवस महाद्वारीं फेडिला ॥ एकपणें जनार्दन देखीयला ॥ जन्म मरणाचा सारा चुकविला ॥ ६ ॥

॥ २५६३ ॥ शुक्ल कृष्ण घालुनि मागें ॥ गुरुपूर्ण जोगवा मागे ॥ १ ॥ जोगवावो आनंदें ॥ जोगवा वो जोगवा जोगवा ॥ विभुता पावला मूळपिठीं ॥ निर्जिनिज दृष्टि वेगीं वोळखा ॥ ध्रु० ॥ सूत्रि वोउनिया कळा ॥ दरुशनें गळां बांधला ॥ २ ॥ निजतेज दिविकरि जोगवा संताचें घरीं ॥ ३ ॥ घा हा दिविजि प्रकाशी जाळिले निज स्नेहासि ॥ ४ ॥ दिवि प्रकाशी प्रकाशा ॥ नकळे दिवसु निशा ॥ ५ ॥ चौऱ्याऐंसीलक्ष भुतावळी ॥ खेळवी जोगव्यातळीं ॥ येकाजनार्दनीं भुतां भुतांते नाचविले निजसत्ता ॥ ६ ॥

## चोपदार.

॥ २५६४ ॥ चोपदार प्यारे ॥ हम तो चोपदार प्यारे ॥ ध्रु० ॥ देखो सरकारनका दस्त ॥ क्यौंरे भाई हुवा बदमस्त ॥ १ ॥ जब आइगी साहे-

षकी चीटी ॥ जाब देना खुन है उलटी ॥ बात बोलने लागे मीठी ॥ चीटी लेगैरे ॥ २ ॥ एकाजनार्दनका पायीं ॥ वो तो त्रैलोक्यनका सांई ॥ उनकी क्या कहूं बराई ॥ वांही सबसे न्यारा ॥ ३ ॥

॥ २५६५ ॥ चोपदार आला चोपदार आला ॥ ध्रु० ॥ माझें चोपदाराचें राहणें ॥ आकाश स्वर्ग पाहणें ॥ चतुर्मुख ब्रह्मा चकित होऊन ॥ निराकारींची वस्ती दिधली विष्णूनें ॥ १ ॥ शंख चक्र गदा घेऊन ॥ महादेवीं शून्य द्वारपाळ जाण हा ॥ हा कळिकाळ टाकीन छेदून ॥ रंडीचंडी शक्ति टाकीन भेदून ॥ चोपदार आहे मी जाण ॥ २ ॥ आह्मास नाहीं बापना माय ॥ खरी चाकरी कोठें करावी ॥ एकाजनार्दनीं दृढ धरावी ॥ ३ ॥

---

## येडका.

॥ २५६६ ॥ येडका मदन ॥ तो केवळ पंचानन ॥ ध्रु० ॥ धडक मारिली शंकरा ॥ केला ब्रह्याचा मातेरा ॥ इंद्र चंद्रा धाक दरारा ॥ लाविला जेणें ॥ १ ॥ धडक मारिली नारदा ॥ केला रावणाचा चेंदा ॥ दुर्योधना मारिली गदा ॥ घेतिला प्राण ॥ २ ॥ भस्मासुर मुकला प्राणासी ॥ तीच गति झाली वालिसी ॥ तिसरा विश्वामित्र ऋषि ॥ नाडिला ज्याणें ॥ ३ ॥ शुक्र देवानें तप करुनी ॥ येडका आणिला आकळोनी ॥ एकाजनार्दनाचे चरणीं ॥ बांधिला जेणें ॥ ४ ॥

---

## चेंडुफळी.

॥ २५६७ ॥ सहज तो चेंडु समान फळी ॥ झेलूं जाणे तो खेळिया बळी ॥ १ ॥ झेलारे भाइनो झेला ॥ सद्गुरुवचनें झेला ॥ ध्रु० ॥ अवघे गडी समान रहा ॥ येतां यात्रा सावध पहा ॥ २ ॥ सुटें सुटे तंव सरीसाची पावें ॥ लक्ष जाणें तो माघारा नव्हे ॥ ३ ॥ गडियानें गडीयाची न धरावी आस ॥ आपुलीया बळें घालावी कास ॥ ४ ॥ अभिमाना चढे तो बाहेरी पडे ॥ हातींचें जाय मग बडबडे ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं येकुची बोली ॥ भावार्थी तो वचनें झेली ॥ ६ ॥

---

## गारुडी.

॥ २५६८ ॥ आदि पुरुष निर्गुन निराकारकी यादकर ॥ मेरे गुरु परंपर दिगारकी याद कर ॥ जिने माया अजब बनाई उस वस्तादकी यादकर ॥ गैबी खजीना हमकूं दिया ॥ उसकूं साहेबकी यादकर ॥ संत महंतकी यादकर ॥ गुनी गुनवंतकी यादकर ॥ श्रीभगवतकी याद कर ॥ जोग जुगतका बांधा तोडा, शम दमका संबला सिरपर छोडा ॥ समता सोहि सुहावे तुरा ॥ गुरुगारुडी बीर पुरा ॥ नैन चीरके पैन्ही मुद्रा ॥ कान फाडके खाये निद्रा ॥ अनुहात धुनुक मुख बजाव ॥ नागसूर धनु गर्जे ॥ चल, चल, चल निरंजन चल जंगलके जिवडे ॥ खेलना होय सो खेल उलट दृष्टीसे खेल ॥ आबी करूंगा फेल तेरी मुंडी काटुंगा ॥ सापसे भुले विच्छु किडे परपंच कोटि पर मो आनकर पडे ॥ बडे बडे जनावर पाले हारे ॥ लाले जरदे उजले काले पीले ॥ भला वे भला ॥ अभिमान जिवडे झुटमुट विण चुलटे नहीं ॥ कुहुतो ब्रह्मांड काटने दोरे देखो मियां हाय हाय ॥ डंख मारा बे डंख मारा ॥ सो बडे बडेसे नहीं उतारा ॥ जगद्गुरुग्यानका लगाया मोहरा ॥ जहर उतारा ॥ मीया बाजीगारी विद्या खेल ॥ हंडीबाग बडा अलबेला ॥ हात हलावे पाय हलावे ॥ भोले भोले लोक भुलावे आवे हंडीबाग ॥ बाप बडाक्या बेटा बडा ॥ बेटे आगे बाप खडा गुरु बडा क्या चेला बडा ॥ चेले आगे गुरु खडा ॥ चेला तो प्रेममहेल पर चढा ॥ धनी बडा क्या चाकर बडा ॥ चाकर आगें धनी खडा ॥ सास बडी क्या वहु बडी ॥ वहु आगे सास खडी ॥ बिबी बडी क्या बांदी बडी ॥ बांदी आगे बिबी खडी ॥ निराधारकी लेके छडी ॥ बिबी खसमके छातीपर चढी ॥ तैं बडा क्या मै बडा ॥ मेरे आगे तैं खडा ॥ तै नहीं अमल छायही ॥ ग्यानीकुं ग्यान लगाऊं ॥ लोभेकु अंधेकु उडाऊं ॥ फूक मारुं तो जा जा जा ॥ बोधके पहाड पर जा बे जा ॥ जाहां आना नहीं ताहां जा ॥ मेरे सद्गुरु दाताकु शरन जा मेरे सरुद्गुदाताकी इत्तिसी लकरी ॥ मूल मंतर हातमों पकरी ॥ जिदर दवरा उदर दवरी ॥ फेरदेखी तो मेरी मेरे सात ॥ अबी करूंगा खबूतरका तमासा ॥ बिन पर उडता है खासा ॥ देखे तो अविद्येके खलीतेमें घुसा ॥ तो बाहेर कैसा आवेगा ॥ आव बे आव ॥ बाहेर आव ॥ जिसेनहीं गाव ना ठाव ॥ जिसे नहीं रूप रेखा ना

भाव ॥ ना कछुनहीं ॥ धीरे धीरे तेरे बी मंतर खोलूं ॥ लिंग देहकी गांठ खोलूं ॥ एकवार ऐसा खेल खेलूं ॥ सो मै बडे बडे खेल खेलेथे ॥ हातो एक एकके दो दोके तीन तीनके चार चारके पांच पांचके पचीस पचीसके छत्तीस छत्तीसका एक एकबी नहो ताहा एकाजनार्दन देख ॥ १ ॥

॥ २५६९ ॥ संकासुरानें तप करून ॥ केलें ब्रम्हाचें आराधन ॥ तेथें वेद मूर्तिमंत जाण ॥ शंकासुरास नव्हतें मरण ॥ आकाशीं जळीं काष्ठीं जाण ॥ असा वर दिधला होता महान परमेष्ठीनें ॥ १ ॥ अरेरे वेद नेले चोरून शंखासुराचा वध करून ॥ चारी वेद आला घेऊन ॥ गरगर चक्राकार भवंडी ॥ २ ॥ अघोर दैत्य मातले जाण ॥ धरा रसातळास नेऊन ॥ कूर्मरूप घेतलें विष्णूनें ॥ मेरु मंदार टाकिले घुसळून ॥ वासुकीची बराडी करून ॥ चवदा रत्नें काढिलीं कोण कोण ॥ अललल त्यांचीं नांवें भिन्न भिन्न ॥ ३ ॥ वराहरूप घेउनी ॥ क्षिती घेतली दाढेवरी ॥ महा बलाढ्य वराह हरी ॥ दैत्य दानवांचा संहार करी ॥ ४ ॥ गुरगुर धरा तारिली कीं यानें ॥ हिरण्यकश्यप मातले जाण ॥ देश बांधुन त्रिविध तापानें ॥ त्यासी नाहीं जन्म मरण घरीं दारीं मृत्यु नाहीं ह्मणून ॥ जळीं काष्ठीं पाषाणीं जाण प्ऱ्हाद पोटीं आला जाण ॥ भूभार हरावया कारण ॥ स्तभीं प्रगटला नारायण ॥ अरे! रे! रे! रे! उदर टाकिलें चिरोन ॥ ५ ॥ पांचवा अवतार जाण ब्रह्मचारी ॥ उभा राहिला बळीच्या द्वारीं ॥ दान मागे श्रीहरी ॥ बळी पाताळीं घातला द्वापारीं ॥ बाण मारून वाम नेत्र छेदिला ॥ तरतरतररा माझा गारुडी वोर पुरा ॥ ६ ॥ साहवा अवतार झाला परशुराम ॥ एकविस वेळा निक्षेत्री धरा जाण ॥ केली माझ्या स्वामीनें ॥ शीर मातेचें उडवून ॥ साच केलें पितृवचन ॥ कामधेनूसी आला घेउन ॥ पहा पहा कीर्तीनें भरलें त्रिभुवन ॥ ७ ॥ सातवा अवतार अजनंदन ॥ त्याचा पुत्र रघुपती जाण ॥ केलें अहिलेचें उद्धरण ॥ उदकावरी पाषाण तारून ॥ कुंभकर्ण इंद्रजीत जाण ॥ अततततताघेतला रावणाचा प्राण ॥ ८ ॥ आठवा वसुदेवाचा नंदन ॥ साला कंसाचे बंधन ॥ सात गर्भ वधिले त्याणें ॥ महा माया आठवी जाण ॥ यशोदेचे उदरीं घालून ॥ बंदीं उपजले आपण जाण ॥ द्वादश कळा छेदून ॥ केलें नंदाचें मोचन ॥ गोकुळीं घालावा नेऊन ॥ तेथील माया आणिली उचलून ॥ अष्ट वर्षें निवांत

जाण ॥ तुह्मी आतां सुखी राहणें ॥ कंस चाणूर मारीन ॥ शिशुपाळाचा घेईन प्राण ॥ मग ठेवीन धनुष्यबाण ॥ देवकी तुझ्या गळ्याची आण ॥ आज पासून पांच वर्षांनें ॥ एकदां भेटी देईन जाण ॥ तोंवरी स्थिर करा मन ॥ आतां करतों तुमचें ध्यान ॥ ९ ॥ नववा उभा विटेवरी ॥ काय वर्णावी त्याची थोरी ॥ मौन रूप धरून हरी ॥ दोन्ही कर कटावरी ॥ दृष्टि नासाग्रीं ठेविली सारी ॥ भक्त जनांस कृपा करी ॥ १० ॥ दहावा कलंकी होणार ॥ अश्वगमन करील सार ॥ चंद्र सूर्य बुडेल अकार ॥ मग कैंचा चराचर ॥ जनार्दन ह्मणे कोण पाहणार ॥ ११ ॥

॥ २५७० ॥ अभक्तीचा जिव्हाळा ॥ पहा किती अंगीं भरला ॥ अभक्तांशी बोलतो ॥ विंचु जैसा झोंबतो ॥ पहा ओ त त त ता ॥ बडी बडी बात करतो ॥ दांत विचकून पाठीं लागतो ॥ आल्या गेल्याशीं उत्तर करितो ॥ पालथा घालून तुला तुडवितो ॥ १ ॥ अब ब ब बा कर्म तुझें ओढवलें ॥ विषय सुखांत लंपट झालें ॥ आरश्यांत तोंड पाहिलें ॥ घर घरकी आला रगडा ॥ तोंडावर मारतो धुसडा ॥ गती मागतां दांत खाय करकरां ॥ आंगीं नाहीं भक्तिचा वारा ॥ २ ॥ अच च च चा धरवे धर पाहा दुन्नर ॥ कशी उड्या मारती हो हो हो चिप् बैठबे चिप् बैठ ॥ वादिकू वाद छातीपर बैठ ॥ दुस्मानकूं रगडा ॥ फुक मारे तो चल चल चल चल त्याचें तोंड झालें काळें ॥ गती गारूडी अवधान बोले ॥ ३ ॥ शेंडी धरून वांकवितो करकरा ॥ हा पंच भूतांचा मारा ॥ सोडी तो अवधान ॥ दांत विचकून चढतो फार ॥ यारेयारे ॥ विषय खेळ हा फार द्वाड कीरे ॥ त्याणें विश्वामित्राची मोडली खोडकी रे ॥ तुमची आमची कोण गती ॥ विश्वामित्र रंभेच्या मागें ॥ कुत्रा होऊन लागलासे हुलु लु लु अशा मोठ मोठ्यांच्या गती ॥ किमर्थ तुझा पाड किती ॥ एकनाथ ह्मणे जन भुलले ॥ नर्कवासीं प्रवेशले ॥ गारुडीयाचा खेळ केला ॥ एकाएकीं सामावला ॥ ४ ॥

॥ २५७१ ॥ बाजे घर ख्याले घर ख्याले ॥ नजर करो माबाप ॥१॥ भाव भगतसे खेल हमारा ॥ तुम देखो सावकाश ॥ २ ॥ मिठा खेल मिठा खेल लगाहै निरधार ॥ मिठा छोडकर पकरा संसार ॥ ३ ॥ एकाजनार्दनका वंदा ॥ हातमो काला साप बांधा ॥ ४ ॥

---

## गारुड लेखन.

॥ २५७२ ॥ सद्गुरु विघ्नहरु ॥ ब्रह्मालंबोधरु ॥ भावे केला प्रणिपातु ॥ भक्ति सरस्वती चैतन्य शक्ति ॥ तिचा मी जालों अंकीतु ॥ संत सज्जन जनि जनार्दन ॥ त्यासि अवधान मागतु ॥ गारुडाची गती गाईन तुह्मा प्रति परिसा सादरें वृत्तांतु ॥ १ ॥ अहं गांवगुंड वादक खरा ॥ परदोष रोध दुसरा ॥ संतसभेपासी गर्जत आले ॥ आमुचा निवाडा करा ॥ बोधातें देखोनि वादक कैसा ॥ क्रोधें कांपे थरथरां ॥ हा जीव हत्यारा येथें कां आला ॥ दांत खाय करकरा ॥ २ ॥ पंच भूतां माजी अहंगांवगुंड ॥ ब्रिदे वाहे वितंड ॥ देहबळें कैसा सबळ जाला ॥ आकळिले ब्रह्मांड ॥ जो जो भेटे त्यासि पंचभूते लावि जिंतिले वादि उदंड ॥ तयावरी बोध विडा उचलिला ठेचिन तयाचें तोंड ॥ ३ ॥

---

## गारुडी.

॥ २५७३ ॥ यारो देखोरे देखो गयबी गारुडी आया ॥ धृ० ॥ पहिला पहिला कछु नही देखे ॥ निराकार निजरूपा ॥ अलख हातमो पलख बतावे ॥ माया सगुन रूपा ॥ १ ॥ चलचलचलचल ॥ रीरीरीरीगागागागा ॥ बाबाबाबा ॥ २ ॥ सात सैली उपर विवेक समला शम दम छोडा ॥ ग्यान ध्यान सो बांधा रुमाल समला सबही जोडा ॥ ३ ॥ अनुभव नगर उपर गाजे बिद्यावेद पुराना ॥ सोहं शब्दका बाज्या बाजे नागसुर सनाना ॥ ४ ॥ येक दो ती मिळाके पांच पंचीसका बाणा ॥ बत्तीस मिलाके तेहतीस होके उसका खाना ॥ ५ ॥ क्षणका हुन्नेर क्षण मोही लाया ॥ क्षणमोक्षण जोडे ॥ ऐसा हुन्नेर कहे जनार्दन एकनाथकु थाडे ॥ ६ ॥

॥ २५७४ ॥ आरबीच गारुडी आरबीच गारुडी ॥ सात समुद्र खाया है ॥ ढो ढो ढो ढं ढोल बाजत है ॥ धीर धारकर धीर धारकर धीर मार लिया है ॥ आला ला ला बा बा बोले वेगें ॥ लेवेगे लेवेगे चीढी मेरा कोहीद सक है कहुं ॥ सवाल उसका दमडी कांच नेले लीया ॥ दर दरयान्ने ढोल दिया ॥ एका जनार्दनीं धन धन गारुडी तेरे माते पीतेकी बढाई ॥ १ ॥

---

## गोंधळ.

॥ २५७५ ॥ रंगीं नाचे क्षेत्र पाळ ॥ आग्या चैतन्य वेताळ ॥ ब्रह्मानंदाचा गोंधळ ॥ सुख सुकाळ मातविला ॥ १ ॥ सिद्धा जागरे जाग जोगी ॥ सिद्धा जागरे जाग जोगी ॥ ध्रु० ॥ अनुहाताची डंबरी ॥ बोध त्रिशुळ घेउन करीं ॥ नाचे चैतन्य चांचरी ॥ सुख साकरी भैरव ॥ २ ॥ चित्त चैतन्य योगीनी ॥ मोहो महिषा सुर मर्दनी ॥ एका जनार्दनाचें चरणीं ॥ भव भवानी नाचती ॥ ३ ॥

॥ २५७६ ॥ पिता सांगे पुत्रासी ॥ बाळा नको जाऊं पंढरीसी ॥ तेथें आहे थोर विवशी ॥ ती तुज गिळील समुळेंसी ॥ १ ॥ भूत दारुण खेंचर मोठें ॥ तें नांदे भीमातिरीं वाळवंटीं ॥ तेणें झडपिले मोठे मोठे ॥ ते बा नये घरदार वाटें ॥ २ ॥ अंबरीष रुक्मांगदा ॥ मयूरध्वजाची थोर आपदा ॥ हनुमंता झाली बाधा ॥ तोची नाचे समाधीं सदा ॥ ३ ॥ भूत लागलें सा बळीसी ॥ नेउनी घातिला पातळासी ॥ ४ ॥ भूत लागलें नारदासी ॥ तो हिंडे त्रिभुवनीं ॥ देह आशा भ्रांति सांडोनी ॥ गेला भुतामाजीं मिळोनी ॥ ५ ॥ कंसासुर आणि पूतना ॥ शिशुपाळ वक्रदंत राणा ॥ मागदादि काळयवना ॥ कौरवांची सकल सेना ॥ ६ ॥ चंद्रभागा पुष्पावती ॥ सायंकाळीं पद्मतीर्थीं ॥ करी राना मधीं वस्ती ॥ नको धरुं साची संगती ॥ ७ ॥ तुज सांगतों एक विचारूं ॥ भूतें झडपिल्या तुज काय करूं ॥ एका जनार्दनीं निर्धारू ॥ तेणें केला भूतांचा अंगीकारू ॥ ८ ॥

---

## गोंधळ.

॥ २५७७ ॥ स्वर्ग मृत्यु पाताळ साचा मंडप घातिला वो ॥ चार वेदांचा फुलवरा बांधिला वो ॥ शास्त्रें पुराणें अनुवादती तुझा गोंधळ मांडिला वो ॥ १ ॥ उदो बोला उदो बोला कृष्णा बाई माउलीचावो ॥ ध्रृ० ॥ जीव शिव संबळ घेउनी आनंदें नाचती वो ॥ अठ्यायशी सहस्र ऋषी दिवटे तिष्ठती वो ॥ तेहतीस कोटी देव चामुंडा उदो उदो ह्मणती वो ॥ २ ॥ आषाढी कार्तिकी तुझ्या गोंधळाची दाटी वो ॥ पुंडलीक दिवटा शोभे वाळवंटीं वो ॥ एकाजनार्दनीं अंबा उभी कर ठेवुनी कटीं वो ॥ ३ ॥

॥ २५७८ ॥ अष्टधातुचे देवालय रचिलें वो ॥ दिव्य तगट नवविध रत्नें जडविलें वो ॥ चित्र विचित्र सुचित्र शोभा ते आणिली वो ॥ रंगमंडप पीठीं तुजलागीं स्थापियलें वो ॥ १ ॥ पंढरपूर निवासी तुझा गोंधळ मांडीला वो ॥ सारुनी काम क्रोधा वैराग्य दिवटा घेतिला वो ॥ ध्रृ० ॥ हरीजन सर्व मिळोंनी आनंदें नाचती वो ॥ भावें पूजन अर्चन सद्भावें करती वो ॥ धूप दीप नैवेद्य चतुर्विधअर्पिती वो ॥ समर्पोनी पूजा विठ्ठल नामें गर्जती वो ॥ २ ॥ भीवरे माझारी गोंधळ मांडिला वो ॥ पुंडलीक दिवटा मध्य भागीं स्थापिला वो ॥ जेणें पाहिलें पंढरपूर न रुचे आणिक क्षेत्र झालावो ॥ एकाजनार्दनीं ऐसा ठावो स्थिर धरियेला वो ॥ ३ ॥

॥ २५७९ ॥ घरोघरीं चोरि करीतो हृषीकेशी ॥ गाऱ्हाणें सांगती येउनी येशोदेसी ॥ १ ॥ भली केली गोविंदा भली केली गोविंदा ॥ निजभक्ता लागी दाविसी लीला ॥ २ ॥ कवाड उघडोनी शिंकेवो तोडिलें ॥ दही दुध भक्षुनी ताक उलंडीलें ॥ ३ ॥ अंतर बाहेर मज व्यापिलें माया ॥ एकाजनार्दनीं ह्मणे न सोडी पायां ॥ ४ ॥

॥ २५८० ॥ सुंदरे चिद्घने माझे रंगा येई वो माते ॥ वाजविली डांक सत्वर पावे दीनानाथे ॥ १ ॥ भरिला हृदयीं चौक भोग आनंद घातला ॥ सोहं सुमन माळा घट पुर्णत्वें भरिला वो ॥ २ ॥ अहं धूप जाळोनी भावें केली धूपारति वो ॥ लाउनी त्रिगुण वाती केली चिन्मय आरती वो ॥ ३ ॥ छेदुनी भेदवचन षड्रस पक्वान्नें वो ॥ पूर्णपात्र भरून केलें आत्मनिवेदन वो ॥ ४ ॥ नाचती वैष्णव रंगीं करती जयजयकारवो ॥ भावाचें दर्शन गळां तुलसीचे हार वो ॥ ५ ॥ ऐसें स्तवन करितां अंबा आलीसे रंगणीं वो ॥ कायावाचा मनें शरण एकाजनार्दनीं वो ॥ ६ ॥

॥ २५८१ ॥ माझे कुळींची कुळस्वामिनी ॥ विठाई जगत्रय जननी ॥ येई वो पंढरपुर वासिनी ॥ ठेविले दोनी कर जघनीं उभी सखी साजणी ॥ १ ॥ येई पुंडलीक वरदायिनी ॥ विश्व जननी रंगा येईवो ॥ ध्रृ० ॥ मध्ये सिंव्हासन घातलें ॥ प्रमाण चौक हे साधिले ॥ ज्ञान कळस वर ठेविले पूर्ण भरियलें धूप दिपीले सुवासें करुनी ॥ २ ॥ सभा मंडप शोभला वरी चांदवा दिधला ॥ उदो उदो शब्द गाजला ॥ रंग माजला ॥ वेद बोलीला मूळची ध्वनी ॥ ३ ॥ शुक सनकादिक गोंधळी ॥ जीव शीव

घेउनी संबळी ॥ गाती हरीची नामावळी मातले बळी ॥ प्रेम कल्लोळीं ॥ सुखाचें सदनीं ॥ ४ ॥ ऐसा गोंधळ घातिला ॥ भला परमार्थ लुटीला ॥ एकाजनार्दनीं भला ऐक्य साधीला ॥ ठाव आपुला लाभ त्रिभुवनीं ॥ ५ ॥

॥ २५८२ ॥ निर्गुण निर्विकार मूळमाया आधार वो ॥ अलक्ष लक्षाकार चिदानंद अपरंपार वो ॥ ब्रह्म तेजाकार महाकारण आकार वो ॥ अंबऋषी कैवारें नाम संसाराचें तारूं ॥ १ ॥ उदो बोला उदो बोला वैष्णवी माउलीचा वो ॥ धृ० ॥ शिववर लाधला असुर शंकासुर मातला ॥ चतुरानन गांजिला वेद चारी घेउनी गेला वो ॥ सुरपति त्रासिला तो तुजला शरण आला वो ॥ तो त्वां सिद्धि नेला मीन रूपीं वध केला वो ॥ ॥ २ ॥ सुरा सुरांचे काळीं अवनी अहंकारें दाटली वो ॥ शेषें पृथ्वी धरली तंव ती पाताळीं चालिली वो ॥ ऐसें त्वां देखतां अंबे तुजला करुणा आली वो ॥ तैं त्वां कच्छ रूपें पृथ्वी पृष्टीवर धरिली वो ॥ ३ ॥ असुर कुळीं मागुती मिळोनी केला अवनी भारवो ॥ शेष कूर्म भागले जाणोनी घेसी तूं अवतार वो ॥ अभिनव लीला तुझी केला दुष्टांचा संहार वो ॥ तैं त्वां सूकर रूप दाढा लाउनी दिधला धीर वो ॥ ४ ॥ असुर कुळीं जन्मला भक्त प्रल्हाद बोधिला वो ॥ छंद तुझा लागला जाणोनी पितयानें गांजिला वो ॥ नामीं निर्भय झाला तैं त्वां स्तंभीं उद्भव केला वो ॥ दैस जानूवरी हिरण्यकशिपु विदारिला वो ॥ ५ ॥ भेदोनी सुरनर फळीं असुर गर्भी जाला बळी वो ॥ सुरपति शरण आला ह्मणे राखी महीतळीं वो ॥ तैं त्वां वामन रूपें पृथ्वी तीन पदें व्यापिली वो ॥ त्रिविक्रमाच्या मिषें बळी दडपी पाताळीं वो ॥ ६ ॥ भृगु ऋषींचे कुळीं माते रेणुकेचे उदरीं वो ॥ अवतार घेतला परशूराम तूं सुंदरीवो ॥ सहस्र अर्जून मारिला त्वां मातेच्या कैवारीं वो ॥ पृथ्वी एकवीस वेळां फिरुनी निक्षत्रिय संहारी वो ॥ ७ ॥ पहातां परात्पर पूर्ण रामाई अवतार वो ॥ वनवासाच्या मिषें केला दुष्टांचा संहार वो ॥ भानुकुळीं नांदसी नाम संसाराचें तारूं वो ॥ बधोनी दशकंठ राज्यीं स्थापिला किंकरू वो ॥ ८ ॥ नंद येशोदे घरीं गोंधळ गोकुळा माझारीं वो ॥ अवतार घेतिला खेळे कान्हाई सुंदरी वो ॥ बाळपणीं मारिला कंसासुर मामा वैरी वो ॥ पांडवा करुनी पुढें भार पृथ्वीचा उतरी वो ॥९॥ बोधोनी सकळ लोकां बोधने त्रिविधताप वो ॥ बौद्धरूपें नांदसी बोलेविना बोलणें एक वो ॥ साधक बाधक जेथें एकपणेंची अनेक वो ॥ बौद्धें अव-

तार तुझ्या बोधाविण बोधविसी वो ॥ १० ॥ नाम कलंकी माता वेदा दावी साक्षेपता वो ॥ भिन्नपणें भावितां भिन्ना भिन्न चढे हातावो ॥ व्यापक जे भाविती मज माजीची तत्वता वो ॥ कुटिलपणें खेळसी भुली घालुनी सकळिकां वो ॥ ११ ॥ एकचि माउली दहा अवतार खेळली वो ॥ पहातां गुरुवचनीं मज माजींच बिंबली वो ॥ हरूनि त्रिविधताप साधु जनाला उद्धरी वो ॥ एकाजनार्दनीं सहजीं सहजें ऐक्या आली वो ॥ १२ ॥

॥ २५८३ ॥ श्री जगदंबे भक्त पालके महिषा सुर मथने ॥ त्रिपुर सुंदरी जगद्वयके उठ कल्मष दहने ॥ धृ० ॥ कमलासन भव रमेसी मघवा अष्टो दिकपाल ॥ अर्यवसु आर्यमा मरुद्गण अश्वींनीचें बाळ ॥ सह परिवारे येती निर्जर साधुनिया वेळ ॥ गौतम विश्वामित्र पराशर वशिष्ट भृगु कपिल ॥ वेद स्तुतीनें स्तवन करिती बहुत मंजुळ ॥ गंधर्वादिक सिद्ध चारण गाती धरूनी ताल ॥ चाल ॥ अष्ट सिद्धि बुद्धि रिद्धि अद्रि कुमरा ॥ पतीव्रता साध्वी अहिल्यादि तारा ॥ पाजळुनी आरत्या तिष्ठती तंव द्वारा ॥ मंजुळ गीत गाती किती एक मधुरा ॥ चाल ॥ अरुणोदय जाला अंबिके ललितांबुज वदनें ॥ त्रिपुर सुंदरी० ॥ १ ॥ श्री जगदंबे० ॥ सायंकाळीं वृक्षीं द्विजगण होते ते उठले ॥ कमळीं षट्पद निशीं गुंतले तेही मुक्त जाले ॥ यात्रिक जन पंथानें सिद्धता करुनी चालीले ॥ अग्नीहोत्री देती आहुती कर्मी जे आगळे ॥ सौर उपासिती सुर्या वैष्णव विष्णु ते स्मरलें ॥ शैव अर्चिती शिव गजानन भक्त पुजनीं रतले ॥ चाल ॥ पश्चिमेसी गेला रमाबंधु गगनीं ॥ उदय करूं पाहे उदयांद्रि तरणी ॥ दर विंदलीत नयने भुवन त्रय जननी ॥ चाल ॥ दुर्गे अंबे प्रणव रुपीणी चंड मुंड मथने ॥ त्रिपुर सुंदरी० ॥ २ ॥ श्री जगदंबे ॥ चतुर्भुजीं अयुध्यें धरावीं दुष्टांच्या दमना ॥ शिष्टजना पाळावें विघ्नें नासुनिया नाना ॥ विद्यार्थ्यासी विद्यारुपें द्यावी धारणा ॥ धनार्थी याच्या लक्ष्मी रुपें प्रगटावें सदना ॥ अपुत्रीकासी पुत्र सुलक्षण द्यावें संताना ॥ संकटीं नाना रक्षिलें रक्षुनिया माना ॥ ॥ चाल ॥ श्रवण करुनी माता अति सत्वर उठली ॥ कोटी सुर्य भानु असी मुर्ती दिसली ॥ गजर दुंदुभीचे पुष्प वृष्टी सुटली ॥ चाल ॥ ईच्छीत वर सर्वांसी देतसे इच्छीत स्मित वदनें ॥ जनार्दनाच्या हृदय मंदिरामध्यें जिचीं चरणें ॥ ३ ॥ श्री जगदंबे० ॥

॥ २५८४ ॥ मोह महिषासुर मर्दिला बोध त्रिशुळ गळां ॥ काम क्रोध चंडमुंडा मारिले हेळा ॥ लिंग देह रक्त बीज सोसिला सगळा ॥ कर्माकर्म शुंभ निशुंभ निर्विटिले लिळा ॥ १ ॥ अनादि सिध्दे अभरे अविनाशाची योगिनी ॥ ब्रह्मादिका अगोचर ब्रह्मरूपें ब्रह्मणि ॥ सहज तुं शिवे शांभवे चैतन्य भवानि ॥ २ ॥ धृ० ॥ अभिनव तुझि दर्शनें बाहाणें मज ॥ उरीं शिरीं बाहु भुषणें वेष्टणरज ॥ निज तेजें दिवि उजळुनि वोवाळु तुज ॥ सच्चिद आनंद गोंधळीं सहजें नाचसी भोज ॥ ३ ॥ प्रकृतिच्या अंगीं खेळसि पर पुरुषपणें ॥ निसता आरति उजळोनि उदो उदो ह्मणे ॥ अनुहत चौंडकें वाजत तेणें येति स्फुरणें ॥ चौऱ्यांसि लक्ष भुतावळी खेळविसि प्राणें ॥ ४ ॥ दृश्य द्रष्टा दोन्ही सारुनि दर्शन देणें ॥ देखते देखणें गिळोनि तुझें स्वरुप पाहाणें ॥ स्थावर जंगमीं तूंचि तूं येकलें येकपणें ॥ जिवदान बळि दिधल्याप्रति प्रसन्न होणें ॥ ५ ॥ प्रणवपटीची त्रिपुटी भेदुनि तूं वरुति ॥ त्रिगुण गुणा गिळियेले अव्यक्त व्यक्ति ॥ स्वानंद घट भरियेला चैतन्य शक्ति ॥ एकाजनार्दनीं एकाकीं एकलेचि प्राप्ति ॥ ६ ॥

॥ २५८५ ॥ तुझि वाहिन मी दर्शनें ॥ शंख चक्रांचि दारुणें ॥ निःशब्दाचें कुलुप तोंडी ॥ दिवि देहाचें उजळणें ॥ धृ० ॥ उदो ह्मणा उदो ह्मणा ॥ एकनाथ माउलिचा ॥ तियेचेनि नांवें गोंधळ घालिन सत्वाचा ॥ ॥ १ ॥ अधिष्टानाचें रंगणि ॥ देहाविणें लोटांगणीं ॥ तुझें दर्शन करितां अससी अवघां जनीवनी ॥ २ ॥ प्रकृति सत्वाचि चोखडी ॥ आहा वानिलिसि आवडी ॥ अनुहात चेंडके ॥ रंगीं नाचसी उघडी ॥ ३ ॥ नवल दिविचा प्रकाश ॥ केला रज तमासी नाश ॥ हर्षानंदातें जाळिलें सत्वें सांडिला विन्यास ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं भेटी ॥ हेचि वारी करणें मोठीं ॥ पुनरपि यात्रा खुंटली पडली संसारासी तुटी ॥ ५ ॥

---

## सर्प.

॥ २५८६ ॥ वासुकी सर्प मोठा दारुण ॥ क्रोधें बैसला बिळीं जाऊन ॥ सहज मग तेथें गमन ॥ तमोगुणें घातलें सारवण ॥ तेथें नष्ट आला धांवून ॥ साणें मजवर झडप घातली जाण ॥ साप चावला चावला ॥ अगागागा ॥ अबाबाबा ॥ अताताता ॥ अरेरेरेरे ॥ सापचावला ॥ १ ॥

याची जात मोठी कठिण ॥ माया भुली पडली येऊन ॥ गरगर गीरकी आली दारुण ॥ माझें जडावलें मन ॥ साप चावला ॥ २ ॥ या गिरकीचें भय नाहीं ॥ मीं केले सहस्र अन्याय ॥ तोचि तडफडत हातची पात्र ॥ आतां कोण वांचवील ठाव ॥ साप चावला ॥ ३ ॥ माझा देवावर हवाला ॥ प्राण जावोनी माघारा आला ॥ एकाजनार्दनीं ह्मणे भला ॥ आजिचा दिवस गोड झाला ॥ ४ ॥

---

## विंचू.

॥ २५८७ ॥ विंचू चावला वृश्चिक चावला ॥ काम क्रोध विंचू चावला ॥ तम घाम आंगासीं आला ॥ धृ० ॥ पंच प्राण व्याकुळ जाला ॥ त्याणें माझा प्राण चालिला ॥ सर्वांगाचा दाह झाला ॥ विंचूचा० ॥ १ ॥ मनुष्य इंगळी अतिदारुण ॥ मज नांगा मारिला तिनें ॥ सर्वांगीं वेदना जाण ॥ त्या इंगळाची ॥ २ ॥ ह्या विंचवाला उतारा ॥ तमोगुण मार्गे सारा ॥ सत्वगुण लावा आंगारा ॥ विंचू इंगळी उतरे झरझरां ॥ विंचू० ॥ ३ ॥ सत्य उतारा देऊन ॥ अवघा सारिला तमो गुण ॥ किंचीत् राहिली फुणफुण ॥ शांत केली जनार्दनें ॥ ४ ॥

---

## भूत.

॥ २५८८ ॥ जबर भूत मोठेंग बाई ॥ झाली झडपण करूं गत काई ॥ १ ॥ भूत० ॥ धृ० ॥ सूप चाटूचे केले देवऋषी ॥ या भूतानें धरिली केशीं ॥ भूतमो० ॥ २ ॥ लिंबूं नारळ कोंबडा उतारा ॥ त्या भूतानें धरिला थारा ॥ भूतमो० ॥ ३ ॥ भूत लागलें नारदाला ॥ साठ पोरें झाली त्याला ॥ भूत० ॥ ४ ॥ भूत लागलें ध्रुव बाळाला ॥ उभा अरण्यांत ठेला ॥ भूतमो० ॥ ५ ॥ एका जनार्दनीं भूत ॥ सर्व ठायीं सदोदित ॥ भूतजबरगे० ॥ ६ ॥

---

## भोळी.

॥ २५८९ ॥ भोळींग मी भोळी ॥ घेऊं जाणें परंतु देऊं न जाणें ॥ धृ० ॥ शिंपीभर लोणी गाडगेंभर पाणी ॥ दिवाळी दसरा दादुला न्हाणी ॥ १ ॥

गाडगेंभर लोणी साहा हांडे पाणी ॥ शनवारी बुधवारी आपण न्हाणी ॥ ॥ २ ॥ मला जेवाया पुर्णाची पोळी ॥ नवा खणाची एकची चोळी ॥ ३ ॥ आठा दिवसा बाजारा जाते ॥ पन्नास केळीं भोजन खाते ॥ ४ ॥ दादुल्या पासीं निजु मी जाणें ॥ हळू हळू पोरें काढूं मी जाणें ॥ ५ ॥ मला जेवाया साखर पुरी ॥ दादल्या वाढी आंबिल पुरी ॥ ६ ॥ एकाजनार्दनीं भावची भोळा ॥ कृष्ण चरणीं लागला डोळा ॥ ७ ॥

---

## किल्ला.

॥ २५९० ॥ धुम धुम बार उडविला ॥ राजा पुसे प्रधानाला ॥ कां रे कशाचा आवाज झाला ॥ वेढा फौजेचा पडला ॥ कसा वांचेन जीविताला ॥ फौजेचा आकार पाहिला ॥ तोफा जडल्या या किल्याला ॥ रयतेंत फितुर झाले ॥ माझे संगतींत मिळाले ॥ मुजूमदारानें फितुरच केले ॥ आतां आश्रय कोण जाणें ॥ २ ॥ कोण वांचविल माझ्या प्राणाला ॥ प्रधान विस्मीत होऊन पडला ॥ मानकराचा पाहिला अबोला ॥ विश्वासाचा हुजऱ्या मेला ॥ कोण सामील त्या किल्याला ॥ ३ ॥ किल्याचा पहिला पाया पडला ॥ खबर नाहीं पायदळाला ॥ तोफेचा झोरे स्वार गेला ॥ निदान आश्रा नाहीं किल्याला ॥ तोंडचा दरवाजा पडला ॥ धका लागला गांड वेशीला ॥ त्यानें मार्ग मोडला ॥ अंतकाळ आला राज्याला ॥ ४ ॥ तोफा लावून चारी कोनीं ॥ चारी बुरुज गेले पडुनी ॥ धग धगीत राजाचें मन ॥ मग कशास व्हावें हैराण ॥ यम चोपदार नेईल बांधुन ॥ ५ ॥ शस्त्र आंगाला लावून ॥ तप्त भुमीवर चालवून ॥ तप्त आगळा मुखीं घालुन ॥ सुळीं दिला राजा जाण ॥ केलें कर्म झाडा देऊन ॥ गेले तसेंच उसणें देणें ॥ राज्यांतीं नरक जाण ॥ ऐसें बोलती विप्रजन ॥ शेवटीं राजा गेला निर्गुण ॥ सावध म्हणें जनार्दन झोंका झाला ॥ ६ ॥

---

## बैल.

॥ २५९१ ॥ अरुता येरे बैला ॥ कां रे वेड्या सैला ॥ १ ॥ काय बोले वेडी ॥ कोण उपाडितो पेंढी ॥ २ ॥ पेंढी उपटणार तूंचि जाला ॥ पुरता

विचार करुनी बोला ॥ ३ ॥ काय बोलतें पशु भांड ॥ देवद्वारीं काय पुजिसी आंड ॥ ४ ॥ काय बेटा बेकुब ढोर गा ॥ हा मोठा शहाणा पोरगा ॥ ५ ॥ असें ढोर नसावें घरीं ॥ आह्मां वांचून तूं भिकारी ॥ ६ ॥ सभाग्यासी काय करावयाचे बैल ॥ यात्रेला कशानें जाईल ॥ ७ ॥ आह्मी ब्राह्मण अनुष्ठानी ॥ नित्य गांजा सुरा पानी ॥ ८ ॥ आह्मी नित्य कारितों स्नान ॥ वरवर धुता अंतरीं बक ध्यान ॥ ९ ॥ तरी अधिक आमुचा महिमा ॥ शेण सारवावया नाहीं तुह्मा ॥ १० ॥ उगा राहे नाहीं तरी हाणीन रागें ॥ माझीं तिखट आहेत शिंगें ॥ ११ ॥ उठोनी वोझें तुजवर घालीन ॥ वोस रानांत नेऊन पाडीन ॥ १२ ॥ बैल तरी कवणाचा ॥ पार्वती शंकराचा ॥ १३ ॥ एकाजनार्दनीं भलें ॥ तेणें आपुलें स्वहित केलें ॥ १४ ॥

---

## कुत्रें.

॥ २५९२ ॥ येरे कुत्तू ये ॥ आह्मां विटाळ करूं नको ॥ आपली भाकर घे ॥ देरे धन्या दे ॥ विटाळ राहिला तुज खालीं ॥ आवरून आपला घे ॥ आतां हें कुत्रें मातलें ॥ मीच ह्मणुनी गुंतलें ॥ फार कूस मोठी केली ॥ जीवा तुझी खोटी झाली ॥ उपाशी मरतों पाहीं बरें ॥ अमृताचें सारें ॥ घर एक सकाळ काय खासी ॥ तूंच मुद्दल कोठें राहसी ॥ एवढें ज्ञान झालें कोठें ॥ सद्गुरूचें देणें मोठें ॥ सद्गुरु तुला आहे कांरे ॥ सर्वां घटीं तोच कींरे ॥ आह्मीं तर ह्मणतों कुत्रा तुला ॥ अविद्येनें धत्तोरा दिला ॥ ब्राह्मणाशीं अविद्या ह्मणशी ॥ देहे ब्राह्मण कैसा होशी ॥ श्रेष्ठ जन्म वेद बोलती ॥ येवढे भले तरी कां मरती ॥ हरिभक्त अमर होती ॥ तें कळे कैसें ॥ आपण व्हावें तैसें ॥ होईनासी कांरें ॥ जात गोत पाहिनाशी कींरे ॥ हें तुला ज्ञान कशानें झालें ॥ एकाजनार्दनगुरुकृपें कळों आलें ॥ १ ॥

---

## कानफाट्या.

॥ २५९३ ॥ आलख ज्यागे गोरख ज्यागे जी ॥ दुवालेना अंबर होना जी जी ॥ धृ० ॥ कानोमें कुंडल गले बिच सईलीजी ॥ तीन त्रीगुनकी

सैलीपेनी जी जी ॥ १ ॥ रमता है जोगी झुलता है बाबा ॥ रमता है जोगी झुलता जी जी ॥ २ ॥ अनुहात सिंगी डमरू बजावे जी ॥ अचल मुद्रामो सोता जी जी ॥ ३ ॥ प्रेमकी भीछा घर घर मागे जी ॥ खेंचरी मुद्रामो रमता जी जी ॥ ४ ॥ एका जनार्दन दरसनका भुकाजी ॥ कब हो ये जोगी मिलता जी जी ॥ ५ ॥

---

## कावड.

॥ २५९४ ॥ घ्यारे रामनामाची कावड भाई ॥ शिव हरहर वदा भाई ॥ १ ॥ अकार उकार मकार तिचा पाया ॥ उभारिलें त्रिगुण तनयां ॥ २ ॥ हरिहर कावड घेतां खांदीं ॥ तुटे जन्म मरण व्याधि ॥ ३ ॥ घेउनी कावडी नाचे एका ॥ एकाजनार्दनीं आवडी देखा ॥ ४ ॥

॥ २५९५ ॥ शिव नामाची कावड खांदीं ॥ आह्मीं घेतली समता बुद्धि ॥ १ ॥ हर हर हर बोळंगा रे भाई ॥ आशा मनशा तृष्णा सांडुनी पाही ॥ २ ॥ मागे बहुतीं घेतली खांदीं ॥ ते उतरले पैल पार भवनदी ॥ ३ ॥ ज्ञान देवें कावड घेतां ॥ सुख समाधान वाटे चित्तां ॥ ४ ॥ निवृत्ति सोपान चांगदेव भारी ॥ कावडीचे अधिकारी ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं त्याचा दास ॥ कावड घेतां बहु उल्हास ॥ ६ ॥

॥ २५९६ ॥ जनार्दनें कृपा केली ॥ माझे खांदीं कावड दिली ॥ १ ॥ सांगितला सोपा मंत्र ॥ वाचें वदा हरिहर ॥ २ ॥ बहुत साधनें न करितां ॥ अनायासें आलें हातां ॥ ३ ॥ पूर्ण कृपें जनार्दन ॥ एकाजनार्दनीं निज खूण ॥ ४ ॥

---

## कापडी.

॥ २५९७ ॥ बाबा हामे कापडीहो आये उत्तर देसते ॥ ब्रह्मगीरी गमन प्रणव शिखरीहो ॥ १ ॥ मनसा ममता त्यागी ॥ वासना वास सबहीयेहो एकाकी एकले संग छांडीहो ॥ निसंग छांडीहो ॥ संग छांडी-येहो ॥ २ ॥ मानस सरोवर त्रिवेणी पायीयेहो ॥ एकाजनार्दन चरण तीर्थी न्हाईयेहो ॥ तीर्थी न्हाईयेहो ॥ ३ ॥

॥ २५९८ ॥ नेत्रीं अंध हातिं ज्ञानाची काठी ॥ दुजेपणें दृश्य आह्मां-नदिसे सृष्टी ॥१॥ तुझा धर्म जागो प्रपंच भीक भंगो ॥ क्रिया कर्म धर्म आह्मां आंगीं नलागो ॥ ध्रु० ॥ असंत आंधळें मी गाढें ॥ दृश्य न दिसे मागें पुढें ॥ धर्मी दाते तुह्मी रोकडे ॥ दान चाडे मी आलों ॥ २ ॥ हरिचा धर्म जागो नरहरिचा धर्म जागो ॥ अनंत धर्म जागो ॥ अच्युत धर्म जागो ॥ हा सदां धर्म जागो ॥ नित्य निज लागो ॥ ध्रु० ॥ निजिंनिज लागावया आह्मीं भीक मागो ॥ ३ ॥ रिद्धि सिद्धि दान देणें देतां घेतां लाजिरवाणे ॥ तुज देवा देतां अल्पपणे ॥ मज घेता निंद्य जिणें ॥ देवा अक्षराचे नाणें ॥ दारोदार नाहीं जाणें ॥ ४ ॥ धर्म जागो दीन वचन ॥ ऐकुनि कळवळलें मन ॥ चित्त दिधलें चैतन्यघन ॥ एकाजनार्दनदाता ॥५॥

॥ २५९९ ॥ दिवसा देखति एका राति रातांधळे ॥ देहाचे आंधळे मजचि लागले कायसे ॥ १ ॥ देहाचे आंधळे देहाचे आंधळे देहाचे आंधळे जाले माझे डोळे ॥ ध्रु० ॥ जगा जें जें दिसें तें तें आह्मां नदिसे ॥ देहाचें आंधळे मजचि लागलें कैसे ॥ २ ॥ देहाचें देखणेंपण गेलें हारपुनी ॥ एकाजनार्दनीं आंधळा केला जनीं ॥ ३ ॥

॥ २६०० ॥ हरिहर राम नाम जपत निरासा ॥ तेकुं बांध न सके जम काल फांसा ॥ १ ॥ उधारा ब्राह्मण वासुदेवा ॥ जड जाड छुटो वासुदेवा ॥ चित्त चैतन्य पेठा वासुदेवा ॥ आनंदघन वासुदेवा ॥ ध्रु० ॥ येका जनार्दनीं जपे अहर्निशीं नाम ॥ नाम जपत भय निरस निःकाम ॥ २ ॥

॥ २६०१ ॥ विषय सेविता गा जन्म मरणाचा बाधु ॥ विवेक गुरुवाक्यें छेदिछेदी भवबंधु ॥ १ ॥ रामचंद्रा वासुदेवा हरि देह विदेह जालेंगा ॥ रामचंद्रा वासुदेवा हारि ॥ ध्रु० ॥ गुरुवाक्य भाव बळें निज बोध पैं बुद्धि ॥ तेणें बोधें पाहाता गा अखंड समाधि ॥ २ ॥ जन वन निरंजन वासुदेव समान ॥ एका जनार्दनीं चित्त चैतन्यघन ॥ ३ ॥

---

## आंधळा पांगळा

॥ २६०२ ॥ ॐ ओंकार निज वृक्ष सावरी वेंघलों प्रत्यक्ष ॥ दान मागों रामकृष्ण जनार्दना प्रत्यक्ष ॥ १ ॥ जालों मी अंध पंगु ॥ माझा

कोणी न धरिती संगु ॥ ध्रृ० ॥ चालतां वाट मार्गीं मज कांहीं दिसेना ॥ उच्चारिती नाम संत त्या मार्गें चालिलों जाणा ॥ २ ॥ पाहुनी पंढरी पेंठ अंधपणा फिटलों ॥ एकाजनार्दनीं संतपायीं लीन झालों ॥ ३ ॥

॥ २६०३ ॥ पंढरपुर पाटणीं गा महाराज सार्वभौम ॥ पांडुरंग दीनबंधु जयाचें तें नाम ॥ १ ॥ अंधळ्या जीवींचे तो जाणतो धर्म ॥ ह्मणोनी आलों गा देई माझें मज वर्म ॥२॥ ध्रृ० ॥ असोनी हात पाय डोळे जाहलों मीं अंधळा ॥ मुखीं नाम तुझें लागला वाचेसी चाळा ॥ ३ ॥ देउनी दान मातें नाम सांगे ये काळीं॥ विठोबाचें दान आलें ऐसी देईन आरोळी ॥४॥ दान पावलें संतसंगें भक्तिचें ॥ एकाजनार्दनीं अखंड नाम वाचे ॥ ५ ॥

॥ २६०४ ॥ मृत्युलोकीं एक नगर त्याचें नांव पंढरपुर ॥ येथील मोकाशी उभा असे विटेवर ॥ पुंडलीक भक्तराज शोभे चंद्रभागा तीर ॥ बोलती साधुजन जीवा वाटे हुर हुर गा ॥ १ ॥ तुह्मी संत मायबाप येवढा उपकार करा ॥ न्या मज तेथवरी दाखवा दीनांचा सोयरा ॥ ध्रृ० ॥ मज नाहीं हातपाय डोळा पडली झांपड ॥ कर्ण हे बधिर जाले वाचा बोले बोबड ॥ नाक मुख गळुं लागलें लाळ आणि शेंबुड ॥ श्वानाची परी जाली अवघे करिती हाड हाड ॥ २ ॥ साधुसंत दयावंत जे दयेचे सागर ॥ भावाचें मुख्य स्थान भक्तिचें तें माहेर ॥ तिहीं केलें कृपादान मस्तकीं ठेविला कर ॥ माया मोह निरसलीं शुद्ध जाहलें कलेवर ॥ ३ ॥ बोध दिला मज सांगतों मार्ग दाविला नीट ॥ भ्रांति हे समूळ गेली दिसूं लागली वाट ॥ नाचत प्रेमछंदें चालुं लागलों सपाट ॥ एकाजनार्दनीं पावलों पंढरी पेंठ ॥ ४ ॥

---

## नानक.

॥ २६०५ ॥ शिरमों टोपी गलमों सैली ॥ नानक कफनी डाला देख ॥ १ ॥ फेक दाम फेक ॥ फेक दाम फेक मुजे ॥ ध्रृ० ॥ निराकार नाम एक हमने लीया भेक ॥२॥ सोहं कि तो नोबद बाजे ॥ बिरळा जाने एक ॥ ३ ॥ शम दमके तो सोटे बाजे ॥ कुफर भागा देख ॥ ४ ॥ बडा नुग्रह देता नही ॥ नसकु फत्तर देख ॥ ५ ॥ बडा सुम बोले नही ॥ जुता खडा देख ॥ ६ ॥ घुसा आया कपडा जलाया ॥ आग लगी देख ॥७॥ ग्यानोबा

ग्यानका घर ॥ गलेमों शिंगीं सैली देख ॥ ८ ॥ पैठनमों तो मूसे बेद ॥ रेडा बुलावे देख ॥ ९ ॥ पैठन होकर घरकुं चले ॥ पशुकु समाद दीया देख ॥ १० ॥ ग्यानोबा विश्नुका अवतार ॥ दरवजे सुनेका पीप्पल देख ॥ ११ ॥ निवृत्ति अवतार बावा आदमका ॥ पहाडमों समाद लीया देख ॥ १२ ॥ सोपानदेव तो ब्रह्मा भया ॥ भागीरथी लाया देख ॥ १३ ॥ चांगदेव तो मिलने आया ॥ दिवाल चलाइ देख ॥ १४ ॥ और नानक नामा दरजी ॥ देवे भुलाया देख ॥ १५ ॥ और नानक कबीर हुवा ॥ दुजा कमाल देख ॥ १६ ॥ बडे नानक सावंतामाली ॥ पेट चिराया देख ॥ १७ ॥ और नानक सजन कसाई ॥ भजनकु शालीग्राम देख ॥ १८ ॥ गोराकुंभार नानक हुवा ॥ हात तोडे देख ॥ १९ ॥ नानका घर दादु पिंजारी ॥ नाम जपता एक ॥ २० ॥ एक नानक प्रल्हाद हुवा ॥ बापकु मरवाया देख ॥ २१ ॥ नानकका घर बिभीषन हुवा ॥ कुल डुबाया देख ॥ २२ ॥ और नानक इसोबा खेंचर ॥ तनमो शाम देख ॥ २३ ॥ बडे शहाने नरहरी सोनार ॥ शिरपर लिंगा देख ॥ २४ ॥ रोहिदास चांभार सब कुच जाने ॥ काठवटमो गंगा देख ॥ २५ ॥ सेना नानक पूजा करता ॥ देवने धोकटी लीया देख ॥ २६ ॥ चोखोबाने देव बटाया ॥ दीवाल पकरी देख ॥ २७ ॥ ऐसे नानक बहुत हुये ॥ अंत न लागे देख ॥ २८ ॥ ऐसे नानक नाम जपके ॥ वैकुंठ जावे देख ॥ २९ ॥ काशी गया प्रयाग गया ॥ करवत लीया देख ॥ ३० ॥ मथुरा गया द्वारका गया ॥ छापा लीया देख ॥ ३१ ॥ उनका नाम लेवे नही ॥ दोष लागे देख ॥ ३२ ॥ उसका नाम जनजप ॥ बैकुंठ जावे देख ॥ ३३ ॥ एकनाथ तो एकही जाने ॥ एका जनार्दनीं देख ॥ ३४ ॥

॥ २६०६ ॥ अलख निरंजन नानक आया ॥ नेकी करना अच्छाहै ॥ १ ॥ फेंक पैसा फेंक यारो ॥ फेंक पैसा फेंक ॥ धृ० ॥ २ ॥ काम क्रोधोकीं गर्दन मारू ॥ बोध खंडा झलकत है ॥ ३ ॥ माया झोली निर्गुन सैली माममाला जपताहै ॥ ४ ॥ शमकी टोपी दमकी कफनी ॥ त्रिगुन बिभूत चढाई है ॥ ५ ॥ जीवशिव दोनो कुंडल कानीं ॥ अनुहात टिपरी बजावत है ॥ ६ ॥ मानभाव बनकर काले कपडे ॥ छानकर पानी पीताहै ॥ ७ ॥ आतमग्यानकु चोर लुटावे ॥ वो क्या साला गद्धा है ॥ ८ ॥ गुसावी बनकर भगवे कपडे ॥ जटा बढाकर बैठा है ॥ ९ ॥ साहा चोरकु जगा

दीया ॥ उसे फंदमो रहता है ॥ १० ॥ च्यारो बेद बह्मण पढा ॥ घरघर कथा कर्ता है ॥ ११ ॥ नाम बेचकर दाम लेता ॥ उसकी करनि हराम है ॥ १२ ॥ शंख बजावत जंगम आया ॥ घरघर फेरी करता है ॥ १३ ॥ पेटखातर शिवकुं बेच्या ॥ व्हा क्या लवंढे मिलता है ॥ १४ ॥ संन्यास लेकर आशा बढाया ॥ मिठा खाना मंगता है ॥ १५ ॥ भूल गया आलख नाम यारो ॥ जमका सोटा बजता है ॥ १६ ॥ फकीर होके फिकीर करता ॥ उसका मू तो काला है ॥ १७ ॥ पैसे खातर सीर फुडावे ॥ घरघर फेरी करता है ॥ १८ ॥ मा बाप तो तीरथ काशी ॥ उसे गाली देता है ॥ १९ ॥ सहा शास्तर अठरा पुरान ॥ च्यारो बेद पढता है ॥ २० ॥ नाम अल्लाका कथा सुननेकूं ॥ व्हा मुर्गीका सोता है ॥ २१ ॥ काम कूता कसबन घरका ॥ व्हां दिनरात जागता है ॥ २२ ॥ इस दुनियामो आया बंदा ॥ अल्ला नामका सवदा है ॥ २३ ॥ एक दिन आना एक दिन जाना ॥ दो दिनका तो बजार है ॥ २४ ॥ फेक आशा फेक मनसा ॥ निंदा फेकेसो जोडी है ॥ २५ ॥ पर धन फेक परस्त्री फेक ॥ ना फेके सो दुष्टा है ॥ २६ ॥ द्वैत फेक मीपन फेक ॥ ना फेके सो चंडाल है ॥ २७ ॥ तेरे घरकु नानक आया ॥ पैसा टका कुच मंगता नही है ॥ २८ ॥ भक्ती रोटी भावका सालन ॥ अच्छा तऱ्हेसे देना है ॥ २९ ॥ बैराग्य माला पडे पुजाला ॥ नही तो माथा फत्तर है ॥ ३० ॥ प्रेम कटार लीया हातनमों ॥ लवंढी माया डरती है ॥ ३१ ॥ रामनामकी जोडी करले ॥ फेरी चौऱ्यायशी चुकती है ॥ ३२ ॥ आपने घर साधु आया ॥ उसे बोले तेढा है ॥ ३३ ॥ दिवान उनका बावा आया ॥ हात जोरके खडा है ॥ ३४ ॥ एकाजनार्दनीं साइ हमारा ॥ उनका नानक बंदा है ॥ ३५ ॥ मोक्ष निशानी लिया हातमों ॥ वैकुंठ धाम चढता है ॥ ३६ ॥

॥ २६०७ ॥ अल्ला रखेगा वैसाभी रहना ॥ मौला रखेगा वैसाभी रहना ॥ ध्रु० ॥ कोइ दिन शिरपर छतर उडावे ॥ कोइ दिन सिरपर घडा चढावे ॥ कोइ दिन तुरंग ऊपर चढावे ॥ कोइ दिन पाव सखासा चलावे ॥ अल्ला० ॥ १ ॥ कोइ दिन शक्कर दूध मलीदा ॥ कोइ दिन अल्ला मागत गदा ॥ कोइ दिन सेवक हात जोड खडे ॥ कोइ दिन नजीक न आवे घेडे ॥ अल्ला० ॥ २ ॥ कोइ दिन राजा बडा अधिकारी ॥ एक

दिन होये कंगाल भिकारी ॥ एकाजनार्दनीं करत करतारी ॥ गाफल क्यों करता मगरूरी ॥ ३ ॥

॥ २६०८ ॥ जो कोइ वसुधा दान दे आवे ॥ पूर्व जज्ञकरे करावे ॥ तीरथ तरकेकस्नान ॥ नही नही हरिनाम समान ॥ १ ॥ जो कोई जावे हीमालय गये ॥ कासी करवत लेकर मरे ॥ दस द्वारके कोंडे प्राण ॥ नही नही हरिनाम समान ॥ २ ॥ काया कष्टवे कलेवर जीवे ॥ ना कुच खावे ना कुच पीवे ॥ गगन मंडलमों जोरे ध्यान ॥ नही नही हरिनाम समान ॥ ३ ॥ आगली पिछली बात बनावे ॥ नेम धरमसें तन छपावे ॥ चारो बेद पढो पुरान ॥ नही नही हरिनाम समान ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं जद कृपा भई ॥ प्रेम भगवत हरदे धरलाई ॥ कहे निसदिन भजन भगवान ॥ नही नही हरिनाम समान ॥ ५ ॥

---

## पांगुळ.

॥ २६०९ ॥ सहज पुरपाटणींगा एका जनार्दन दाता ॥ पांगुळां पाय देतो विश्रांति समस्तां ॥ १ ॥ यालागीं नाम त्याचें दुःख निरसी मनाचें ॥ पांगुळा जीवींचे तोचि चालवी साचें ॥ ध्रु० ॥ २ ॥ जीवें जिता मी पांगुळ दिधला निज बोध ढवळा ॥ त्यावरि बैसोनी क्रीडे सर्वत्र स्वलीला ॥ ३ ॥ एका येकु परमदीन अंध पंगु अज्ञान ॥ जनार्दनें कृपा करून करवी निज सत्ता चलन ॥ ४ ॥

---

## पिंगळा.

॥ २६१० ॥ पिंगळा महाद्वारीं बोली बोलतो देखा ॥ शकुन सांगतों गा तुह्मां हा एक ऐका ॥ १ ॥ डुगडुग ऐका डुग डुग डुग ऐका ॥ ध्रु० ॥ पिंगळा बैसोनी कळसावरी ॥ तेथोनी गर्जतो नानापरीं ॥ बोल बोलतो अति कुसरी ॥ सावध ऐका ॥ २ ॥ किलबिल किलबिल ॥ चिलबिल चि-लबिल ॥ तुलमील तुलमील ॥ तुळबील तुळबील ॥ ३ ॥ तुमचे गांवींचा एक ठाणेदार ॥ गांवच्या पाटलाची एक थोरली नार ॥ तिसी रतला तो न करी विचार ॥ एकाजनार्दनीं बोले सारासार विचार ॥ ४ ॥

---

## मुंढा

॥ २६११ ॥ दिलकी गांठ खोलो ॥ यारो नाम बोलो ॥ १ ॥ ध्रृ०॥ कुइ नही आवे सात ॥ मुंढे कायकु करे बात ॥ २ ॥ जोरु लरके मायबाप॥ सब पसारे हात ॥ ३ ॥ हत्ति घोडे पालख मेना ॥ नही आवे सात ॥ ४ ॥ दो दीनका बजार यारो ॥ कायकु करता बात ॥ ५ ॥ झूटी काया झूटी माया ॥ झूटा सब दिन रात ॥ ६ ॥ एकाजनार्दन बोले भाई ॥ कोही नही आवे सात ॥ ७ ॥

॥ २६१२ ॥ पलखम्याने चारजुग ज्यावे ॥ तनका नही भाई बात ॥ १ ॥ देख मुंढे देख ॥ आपना नफा गुंडे देख ॥ ध्रृ० ॥ कृत त्रेत द्वापार कलयुग का मोठा ॥ चारजुग मुफत गमावे आया मुदलसे तोटा ॥ २ ॥ कलजुगमो राम बीना तरेणा कोइ देखो ॥ आलख आलख सब पुकारे आलख नइकुइ देखो ॥ ३ ॥ जपी तपी संन्यासी पेटखातर फिरते ॥ आसन छांड आलख पुकारे पेटसे सब मरते ॥ ४ ॥ फकीर मौला बह्मन गुंसाई सबही आलख पुकारे ॥ आलखमे लख नही केवं आलख पुकारे ॥५॥ एकाजनार्दन साच्या कहे आलख बिठल सार ॥ देख मुंढे आपना नफा करो नाम उच्चार ॥ ६ ॥

---

## पिंगळा.

॥ २६१३ ॥ या मनामागें धांवतां ॥ हीत नोहे गा सर्वथा ॥ भुलले मायेनी तत्वतां ॥ यमपंथा जातिल ॥ १ ॥ डुग डुग डुग डुग डुगुनी गेलीं चारी युग ॥ काम क्रोधाचेनी लाग वेग मनासंगें धांवती ॥ ध्रृ० ॥ जातां यमपुरीचे वाटे जीवासी घात आहेती मोठे ॥ संचित क्रियमाणाचे सांठे ॥ तयावाटे जाऊं पाहे ॥ २ ॥ जे भले सात्विकसंत ॥ आहेत निशिदिनी गुरुचे भक्त ॥ तयासी माझा नमस्कार येक ॥ गुरुसी शरण जा वेगीं॥३॥ गुरुसी गेलिया शरण ॥ काय करील जन्म मरण ॥ स्वरुपीं लागल्या अनुसंधान ॥ निज निधान प्रगट होय ॥ ४ ॥ आणिक एक ऐक शकुन मोठा॥ तुज लागला एक बायकोचा चुटका ॥ तीचा चांगुलपणा सुभटा ॥ भुलु नकोरे सर्वथां ॥ ५ ॥ आणिक एक तिची करणी ॥ विष्णुसी लाविलें वृंदेच्या स्मशानी ॥ नारदाची नारदी करूनी ॥ साठ पुत्र जन्मविले ॥६॥

या लागीं तिचा पदर नोहे बरा ॥ अंतीं दगा देईल खरा ॥ अझून तरी मनीं विचारा ॥ दान करी पीडा टळे ॥ ७ ॥ तिनें बहुतांसी दगा दिला ॥ ईश्वरा सारिखा भुलविला ॥ ब्रह्मयासी वेध लाविला ॥ रत झाला कन्येसी ॥ ८ ॥ नवाठायीं फाटका झगा ॥ तो नये तुझिया उपेगा ॥ विषय भोगितला अगा ॥ तो दान देगा मज पिंगळ्या ॥ ९ ॥ काळिमेचें काळें चिरगुट ॥ पदरीं बांधी मी तूं पणाचें मिठ ॥ त्रिवर्ग करून एकवट ॥ नीट ओवाळूनी टाकी आतां ॥ १० ॥ तेणें तुटेल तुझी पिडा ॥ तुटेल मी तूं पणाचा झगडा ॥ स्वरुपीं आनंद होईल गाढा ॥ श्रीजनार्दन प्रसादें ॥ ११ ॥ एका जनार्दना प्रबोधें ॥ प्रकट होय सोहं बोधें ॥ पिंगळा भाकितसे प्रबोधें ॥ परोपकारा कारणें ॥ १२ ॥

---

## जोगी.

॥ २६१४ ॥ आह्मी परात्पर देशी ॥ कोणी नोळखती आह्मांसी ॥ टाकुनी आलों संतापाशीं ॥ वेगीं देई निज सेवेसी ॥ १ ॥ बावा बाळसंतोष ॥ ध्रृ० ॥ दो हातांचें द्वैत दान ॥ नेघे कोरडें कोरान्न ॥ नमगे नमगे हें साधन ॥ अविट विटे परमान्न ॥ २ ॥ क्षीर सागरींची क्षीर धारी ॥ विवेक गुळाची गुळवरी ॥ परिपूर्ण देई पुरी ॥ प्रबोध लाडू तयावरी ॥ ३ ॥ जीर्ण स्वरूपाचा शेला ॥ कृपेनें दे कां मजला ॥ शुद्ध सत्वें निर्वाळला ॥ ज्ञानबोध उपार्जिला ॥ ४ ॥ नवखंडें खंडिलीं ॥ जीव शिवेंविण सेविलीं ॥ द्यावी भक्तीची कांचोळी ॥ अंगीं जीर्णत्वें बाणली ॥ ५ ॥ मोह ममता बिरडें फोडी ॥ शुद्ध सत्वाची गांठ सोडी ॥ त्रिगुणाची कसणी तोडी ॥ जुनी कांचोळी रोकडी ॥ ६ ॥ पंचतत्त्वांचें अंगुले ॥ विषय भोगिता विटलें ॥ वासना कसा जें तुटलें ॥ अंबेनें देकांवहिले ॥ ७ ॥ प्रपंच भोग गेले भंगी ॥ ते दे का अंगींची अंगी ॥ यालागी नाचतसे रंगीं ॥ रंगीं रंगलों श्रीरंगीं ॥ ८ ॥ दान देतां धन न सरे ॥ जो घे त्याचें दरिद्र विरे ॥ मग तें मागणें वोसरें ॥ ऐसें धन देका निर्धारें ॥ ९ ॥ नाहीं नाहीं ह्मणसी कां येथें ॥ आहे परिपूर्ण भरितें ॥ मी तो ज्ञानाचा क्षुधित ॥ आर्त करी कांवो समर्थ ॥ १० ॥ एकाजनार्दनीं मागे दान ॥ थीता नेलें जीवपण ॥ शेखीं वेंची शिवपण ॥ केलें निजसुख संपन्न ॥ ११ ॥ नंदानंदाचा आनंदु ॥ चिदानंदाचा निजस्वादु ॥ निजी निजांचा उद्बोधु ॥ येका जनार्दनीं प्रबोधु ॥ १२ ॥

---

## बाळसंतोष

॥ २६१५ ॥ आह्मी परात्पर भिकारी ॥ वेगें आलों संताद्वारीं ॥ द्या मज भक्तीची भाकरी ॥ ह्मणोनी नाचतों नाम गजरीं ॥ १ ॥ बाबा बाळसंतोष ॥ ध्रृ० ॥ युगें अठाविसांचा जोगी॥ विभूति चर्चित सर्वांगीं ॥ गळा अनुपम्य शैली शिंगी ॥ वाजवी सोहं शद्ब जगीं ॥ २ ॥ त्राहे त्राहे त्राही ॥ हे तो नमागें मी कांहीं ॥ एका जनार्दनाचे पायीं ॥ काया वाचा मन राही ॥ ३ ॥

॥ २६१६ ॥ बाळसंतोष बाबा बाळसंतोष ॥ धृ० ॥ आह्मीं परात्पर देशी ॥ बाळसंतोष ॥ कोणी नोळखती आह्मांसी ॥ बा० ॥ टाकून आलों संतांपाशीं ॥ बा०॥ १ ॥ जीर्ण स्वरूपाचा शेला ॥ बा० ॥ विषयभोगितां विटला ॥ बा० ॥ तो मज द्यावा दाते वहिला ॥ बा० ॥ २ ॥ ऐक्यत्वाचें बिरडें जोडी ॥ बा० ॥ त्रिगुणाची कसणी फेडी ॥ बा० ॥ जुनी कांचोळी रोकडी ॥ बा० ॥ ३ ॥ पूर्णत्वाची पुरणपोळी ॥ बा० ॥ स्नेहावरील तेल वरी ॥ बा० ॥ प्रबोध लाडू तयावरी ॥ बा० ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं मागतां दान ॥ बा० ॥ जिताचि जाणे जीवपण ॥ बा० ॥ शेखीं दिलें शिवपण ॥ बा० ॥ ५ ॥

॥ २६१७ ॥ तेरा नुर देखुंगा ॥ आपने दिलमे रखुंगा ॥ तेरा दिलदार देखुंगा ॥ आपने दिलमे रखुंगा ॥ ६ ॥ दिदार म्यानेने दिदार पाया कोईयेके नपाया ॥ भिस्त दोजख दोन्हो है जीव तो समसमाया ॥ १ ॥ अपसम्यानें आप दिखावे दिख दिखावे न्यारा ॥ देहे बिदेह दोन्हो नही ज्या हा कांता असार ॥ २ ॥ अव्वल अखेरते सतुहि तुजमे दुहि नुरा ॥ एकाजनार्दनका बंदा ज्याहां ताहा भरपूर ॥ ३ ॥

---

## बाजेगारी.

॥ २६१८ ॥ संसार बाजेगारी लेख ॥ दुरलग अंदेशाकर देख ॥ जो कुच होना सो कदा न चुके ॥ वल्ले वस्तादकी पद नामी ॥ आखरजमानी ॥ या दिनके बुरे हाल होवेंगे ॥ दुनयामें बडा बडा तमासा ॥

बडे बडे हुन्नेर लगे ॥ विद्या अविद्या बोलना एक ॥ वल्लेवर्णूके अनेक ॥ इसकाममें बडे बाजी ॥ जिसकूं अंत न पाया ॥ १ ॥ अरे देख देख देख ॥ पीर पैगंबर अवलिया ॥ सैयद सादात विषयाकु सटे ॥ वासना उठनाहाठे ॥ अरे देख देख देख ॥ दौड दौड दौड ॥ जबलग उजाला तबलग दौड ॥ अंधेरा पडेगा पीछे कछु नाचले ॥ आपसु आप वाजीनदे ॥ बुरे सददेना धंदे ॥ हरिदासके प्यारे ॥ रघुनाथके बंदे ॥ कह्या न भावे ॥ फाडफाड खावे वांदरासे रानहुवे ॥ २ ॥ तमासा देखत आलम खुष हुवे ॥ दिल वांदरा रजापाले ॥ तो मुकेचना बाहेर मले ॥ नाना विषय वासना बाहेर मेले ॥ उठे उठे बैठे लेटे लेटे ॥ कहुतो चुकाचि लेटे ॥ दिलबांदराज्या तलब ॥ बाजेगारी येही खेलतो मेरा नामकी हा है ॥ अजब बाता ॥ अव्वल मुजे नामचि न था ॥ दरम्यान मैं पैदा हुवा ॥ सलखनसुखादबैठा ॥ वाह मुथी उठानाठा ॥ ३ ॥ उसथे बैठा निरखण कामा रचैलाया ॥ सलखन उस देखती सलखन ॥ वेडे महाजन द्वारीं ॥ कहनलगे सलखनका तमासा देख ॥ वसेले मुजे नीलखनका तमासा देखना ॥ जहाहाहाहौअवेबेबे ॥ अललललअततततत ॥ वोहीहाहो ॥ जोरहै जोरहै जोरहै ॥ ढलेगा ढलेगा ढलेगा ॥ ढलेगा सो पडेगा ॥ पडेगा सो चढेगा ॥ हुशार भाई हुशार ॥ भीतरथी हुशार तो मुखी ॥ बाहेरथी हुशारी तो बहु हुशारी ॥ ४ ॥ गुरु बडा क्या चेला बडा ॥ बाप बडा क्या बेटा बडा ॥ बुढा वडा क्या जवान बडा ॥ जवान बडा कुति तकवा चावटी चढी ॥ उदभोकु भोकाने ॥ गुरु बडा क्या चेला बडा ॥ चेला बडा तो चेला बडा ॥ तो चेला भोवंडेपनामे पडा ॥ गुरुकेबडाईसे चेला बडा ॥ बाप बडा क्या बेटा बडा ॥ तो बापनाम बेटा धारे बेटि चाकरी बाप चाकरे बापके शिरपर बेटा चढे ॥ उस बदल बडेपना घडे ॥ जवान बडा या बुढा बडा जागे है मरे जाय ॥ जिवना बहुत तवाना होय ॥ बुढा बडे जवाना चढे ॥ इस बदल बडेपनामे पडे ॥ ५ ॥ नजर कर नजर कर नजर कर ॥ यारहो नजर कर नजर कर नजर करेगा सो जितेगा ॥ नजर न करेगा सो हरेगा ॥ हारया हारया देना जिता लेना ॥ हुशार भाई हुशार ॥ हुशार होकर संभाळ मै कैसी चौंधी ल्याऊंगा ॥ मैने भल्या भल्याकूं चौंधी दिया ॥ मैने बडे बडेकुं वेड लगाया ॥ देख देख तमासा मेरा ॥ मैबी भांडीकूं चौंधी दिया ॥ वो मृगीके चौंधनें ल्याया ॥ ऋषी

शृंगीकुं चौंधी दिया ॥ वो नाचनीको दुमाल ल्याया ॥ ६ ॥ वो पाराश-रकुं चौंधीदिया वो दुर्गंधाके ख्याल ल्याया ॥ येक घडी ये तप गमाया ॥ दुर्गंधासो सुगंध किया ॥ उसके जगामे व्यास निपजीया ॥ वो महादेवकु बी चौंधी दिया ॥ वो मोहोनीके दुमाल ल्याया ॥ ब्रह्माकूंबी चौंधी दिया ॥ वो अपने बेटीकूं ख्याल ल्याया ॥ मनाकर्ता याद न पाया ॥ सारस्वतकूंहे-यालहवा तुमारो विष्णुकूंबी चौंधी दिया ॥ यो वृंदाके मस्तानमें लीठाया ॥ वो नारदकुंबी चौंधी दिया ॥ वो पलखम्याने नारदी किया ॥ अंघुल करत पेट बढाया ॥ साठ बेटेका हुकुम जनाया ॥ वो तुमारे असल देवजीसि नामरूप नहीं उसे बडे देवकूंबी चौंधी दिया ॥ आधी औरत आधा मरद किया ॥ आपसो आपसो बतलाया ॥ ७ ॥ रहे रहे रहे चिपरिके रहे जा॥ अपने जगोंमे रहेजा ॥ जगा छोडकर जा ॥ न जावेगा तो येता मारमारूं ॥ मारते मारते मारले डांगोरा ॥ उपर यिळकुटेगा दात निकसकर पसरेगा॥ डांगा तुमके पेटकूं जावेगा इस बदल गुमरपना दुर कर ॥ मौजदकू याद धर ॥ धरेगा सो ऐसी धर ॥ विषयाकु मुसलम वीसर ॥ देख देख देख ॥ लदूं नको ॥ चौंधीकी जगा लदूं लदूं नको ॥ वाहा लीज्या पडूं नको॥ उस जगाली पडेगा॥ ८ ॥ तो मारगतकी शीर चढेगा ॥ तो कालका फांसा पडेगा ॥ वो तुजे कैचि पछांडेगा ॥ इस बदल विषयाकु लदूं नको ॥ हमारा दाता कुच देता नहीं ॥ इस बदल हमकु विषयाकु लदतहे ॥ वाहा बडेबडे जन राजद्वारिं बैठे है ॥ कछु देना सो आज देना का दीनहे ॥ दिल वाहा सोदेवो ॥ कुच मथी नाम बोले ॥ दिलकी गांठ खोले ॥ अखबतकु काम आवेगा ॥ उस खैरातपर हात चले चीप बैठे ॥ मुंडी हालवे कुच काम नहीं ॥ जहासो दिल देवेंगे ॥ तो निजमोजकूं पावें गे ॥ ९ ॥ सुख-शांति सुखेच्छा वेंगें ॥ भीरतिकेतिमेवेखावेगे ॥ बड्याबड्याकी बोले बडाई ॥ ऐसा कुच देवोना ॥ चीप बैठे मुंडी हलावे कुच काम नहीं ॥ ऐसा कुच देवो जो खाते पीते बेरबेर यासो कबहुनासेरे ॥ पोंगड्या ढीकु खाना पुरे॥ सबलिया जमकु बसकर ॥ ऐसा कुच देवोना ॥ ये क्या देवेगें बिचारे ॥ इतलादिया भीक मंगनेकुं गया ॥ उसथी दौलत कहांकी है लेंठीनेलिया ॥ इगानपर दुगानी गानी दुगानीपर तिगानि ॥ जिसके तिसरे घर दुगानि ॥ परति रुका येक देवेगे बिचारे ॥ तो मेरे दाते कैसे है ॥ हमारा तमाशा-देखना ॥ तो हमार कुच लेना ॥ हमकुं कुच लेना ॥ हमकूं कुच दिल देना॥

ये तो बहुत मुस्कलहै हमना ॥ देना नहीं भोजराजा दे षका नहीं ॥ विक्रम दे षक नहीं ॥ इंद्र दे सका नहीं ॥ कुबेर दे सका इतना देव तो पेटभर भरलेवे ॥ वेक्या देवेंगे विचारी ॥ १० ॥ तो मेरे दाता कैसा है दिल दर्यावमो व्हजुद भर्याव ॥ उने अपना करधर्याव ॥ उनके संत कथेमे मेरा जीतख चलता ॥ उन्हेथी मेरा जेनावाकउस खेलता ॥ उन्हेथी मेरा जीव जीवता उनकुं मंगता क्या बानात ॥ काटस क्या नजर करो नजर करो याईहो नजर करो ॥ नजर करेगा जीतेगा ॥ न नजर करेगा सो हारेगा ॥ हारया देना जीता लेना ॥ अव्वल एक एकके दोन दोके तिन तीनके चार चारके पांच पांचके पचीस गाफल कहते दस बारा पंधरा वीस बह्लेसहीं जान पांचके पच्चीस ॥ वादीका साप किया ॥ भल्या भल्याकू बडे बडेकु उन्हे ल्याई माया ॥ विन लढेया उने जगत्र भुलाया ॥ ११ ॥ गाफल कहेते मेरी माया गुरुका बोध ऐसा पाया ॥ ऐसा हमीरीझातीगाये ॥ वो क्रोध बाग कुरवाये ॥ अहंकार साप लदेनाचटेभुवा जैसा चिपका चीपडे ॥ परका खबुतरकाभी पर वो बाता सवहि दुरकर ॥ पंखबीन एक हंस कीया ॥ उडै चढै बिन सत्य लोककुं गया ॥ सनकादिककी काढी गाया ॥ मुख्य मूळ ब्रह्मा हुशार किया ॥ उन्हे हंसने बडा तमासा किया ॥ ब्रह्मासनथी मुंड मुंडाया ॥ आपे भीवा वाहा छपी खाया ॥ हुशार देखे तो नजीकचि पाया ॥ एकमो अनेक अनेकमो येक ॥ येही देखनामे हुशारीमे देख वाहा नहीं देखना दुख येही खेल खेलते समाधी सुख ॥ एकाजनार्दनीं जग समस्त इस बाजीमें भिस्त दस्त ॥ देखे फिरतो अजब बात पैगंबर कहै ॥ सदरहामत येही तमासा सिद्ध देखें ॥ जो देखे सो जुदा नहीं देखे ॥ एकाजनार्दनीं बैसक बाजेगारी एनहलक ॥ १२ ॥

॥ २६१९ ॥ हंमबी मुंडा तुमही मुंडा मुंडा तेरा बाप ॥ तेरे बापने गधी चोदी हमकू लगे पाप ॥ १ ॥ अल्ला तुही तुहीरे नबी तुही तुहीरे ॥ ध्रु० ॥ नारद तेरी गांड भरी अवरत मागे दान ॥ साठसंवत्सरपोंगडे भये होगयी दानादान ॥ अल्लातो० ॥ २ ॥ पाराशरकीनुन्नी उठी ढीवरी लागी मिठी ॥ जमुनामे संग भया व्यास लेके उठी ॥ अल्ला० ॥ ३ ॥ ढवळागिरि परवतम्याने शंभू करी तप ॥ भिल्लिणीकी गांठ पडी तपका हुवा गप ॥ अल्ला० ॥ ४ ॥ गोकुळम्याने राजकर्ता नाम गिरिवरधारी ॥ सोळाहजार लवंड्या चोदे कहता ब्रह्मचारी ॥ अल्ला० ॥ ५ ॥ कपडा फाडे

घमडा वोढे नामलिया भेस ॥ एकाजनार्दनका बांद दिलका दिलका-दरवेस ॥ आल्ला० ॥ ६ ॥

---

## भांड.

॥ २६२० ॥ माया छांड सुनोजी ॥ आच्छा भांड बनोजी ॥ ध्रु० ॥ ब्रह्म देवने बेद पढाया ॥ माय लागी मीटी ॥ सरस्त्रतीके गळे पडा उसकी गांड फाटी ॥ माया० ॥ १ ॥ विष्णुके गांड पिछे मायाका धंदा ॥ खेळ करते फसल पडी मीठी लागी वृंदा ॥ माया० ॥ २ ॥ महादेव बडा देव सब देवन का बाबा ॥ भिल्लिनीके पिछे लगा करता तोबा तोबा ॥ माया० ॥ ३ ॥ अहिल्याके देखनकुं इंद्र भुल मदे ॥ गौतमने गांड फाडी अंगपर हुवे फोदे ॥ माया० ॥ ४ ॥ सीताकी चोरी करी रावनकु धक्का ॥ हनु-मानने नंगी करके जला दियी लंका ॥ माया० ॥ ५ ॥ हनुमान तो ब्रह्म-चारी जपे राम नाम ॥ स्त्री राजमो बायका गावन करता है बेफाम ॥ माया० ॥ ६ ॥ विश्वामित्र तपको भये अनुष्ठानी ॥ मेनीकानें गांड मारी हुवी धुळधानी ॥ माया० ॥ ७ ॥ नारदने किसनसे एक औरत मांगी ॥ नारदकी नारदी भई पोंगडे जनन लागी ॥ माया० ॥ ८ ॥ सोळा सहस्र नारी काना गोकुलमे खेळे ॥ राधीकाकु छोडके रीसनीकु भुले ॥ माया० ॥ ९ ॥ जनार्दन साई मेरा सब खेळ खेळा ॥ एकनाथ भांड होकर चर-ण्होसे मीला ॥ माया छांड सुनोजी ॥ आच्छा भांड बनोजी ॥ १० ॥

---

## उदवा.

॥ २६२१ ॥ उदो ह्मणा उदो ॥ मुळचिया उदयें निज उदो ॥ तो फुडा वरि वरि उदो तो दिवटा कुडा ॥ येथें कलकलकलकल गोंधळ गाजतो परि ॥ नुसति कलकल करिस्यानें काय काम ॥ पंचविसां तत्वां माझारि ॥ आत्मा झळकतो तो ॥ ठायीं घालिन शाणेपे ॥ येथुन मोठा आनंद होईल ॥ आत्म जोतिनें दिवि उजळल तो दिवटा ॥ जळजळेचा दिवटा तो खोटा ॥ खोटा साच्या गोठि ये सभेसि सांगो ॥ नस्यानें काय काम ॥ ते आत्म ज्योति खाली एक बायको आहे ॥ तिची डसाई तुजला

गोड लागते तिचे पडसाईचें घडघुप पडलें तेथें तुले तुने देखसि ॥ मामाले काय वोळखसि ॥ तिच्या त्रिगुणांच्या तिकोना टवाळो ॥ स्नेह घालिन शांचिकटा लागला सुटेना ॥ लिंगाड बैसला तो फिटेना ॥ जडला स्नेह तो तुटेना ॥ या लागीं तिचा संगु सांडी सांडी ॥ तिचे संगे थोर थोरले नाडिलें ॥ मोठ मोठाले लिढविले ॥ ते कोण कोण ॥ ह्मणशाने पुसिले तारि मी तुले सांगेन ॥ ते बायकोचे निसंगे भरला ॥ हिरण्यकश्यपाले ताठा भरला ॥ तो नायके माझ्या बोला ॥ ह्मणे माले मरण नाहीं ॥ तव यक्षीणि शंखिणी डंखिणि मुख चामुंडा चंवडायणि हिरण्य कस्युपातें खावया लागुनि ॥ उदो ह्मणोनि शानि नाचति ॥ १ ॥ तो ह्मणे मरण नाहीं माले ॥ शेखि रागसला तो मले मारूं धावें ॥ २ ॥ तो कुडवाडितो जळि ॥ उपटितो भुतळीं ॥ खोचि शस्त्र मेळीं ॥ धडाडि ते जालि मले जाळुं धावे ॥ ३ ॥ तंव गरगरा डोळे भवंडितु ॥ करकरां दांत खातु ॥ चरचरां पोट फाडितु ॥ बरबरा आंतडें काढी स्यांको भाक चकविला ॥ आलेगे गाढले ॥ आईका गा वेदाते न हो मज दिवस्याचे अपरूप बोल ॥ संपूर्ण. आईक हो ॥ ४ ॥ याचे बायकोचे संगति मोठा ॥ सा रावणाले चढला ताठा ॥ सोगया बायिकोले सोवे खाटा ॥ मी बोभायलो लंकेच्या चोहटा ॥ माले ह्मणे तो खोटा दिवटा ॥ ५ ॥ तवकाळि कराळी कंकाळि ॥ मारको मेसाई भद्रकाळी ॥ लंके माझारि नाचति गोंधळि ॥ रावण सकुळीं भका-ण्यालें ॥ ६ ॥ वीरवा चढला रावण ॥ ह्मणें मासि झुंजले कोण ॥ तव येकचि कांडे दाही मुंडे ॥ विसा बाहुचि खांडें ॥ लंके पुढें घुसमाडिला ॥ ७ ॥ आईका गाये राहे राणेराज कुंवरहो ॥ तोचि बायकोचा फुडा ॥ आणिक येक पवाडा ॥ मोट मोठ्याले लावि वेढा ॥ पाडि झगडा देवा दान वाले ॥ ८ ॥ तेचि बाईकोनि कंसालें पाहे ॥ तान्हया बाळाचें लाविले भये ॥ बाहेर धीट आंत पाच काये ॥ पुळकी वाहे पुळपुळां ॥ ९ ॥ बाळे घालि बांदवडी ॥ देवकी वसुदेवा लेवडी ॥ यादवांले बळेंचि झोडी ॥ ब्राह्मणाचें मोडी दान पुण्यें ॥ १० ॥ तव नवकोट कात्यायनि ॥ चौसष्ट लक्ष योगिनी ॥ औटकोट चामुंडायणि ॥ धाविन्नल्या कडकडोनि ॥ कंस सरोनि गिळव्याले ॥ ११ ॥ ते मथुरेचा चोहटा ॥ वाईक मीं बोलीलों दिवटा ॥ कंसयाले ह्मणे खोटा ॥ त्या माभळ भट्टाचेनि बोले ॥ १२ ॥ तव माभळ भट्टाले पिढेदान ॥ पुतनाले प्राण शोषण ॥ अघ बग तृणा

वर्तालें विदारण ॥ काळया मर्दन तधिच केलें ॥ १३ ॥ हाखिंड पडिला वत्सासुरु ॥ केशियाला केलें चुरुं ॥ अरिष्टाले करुनि मारु ॥ येकेचि घाये घसकाविला ॥ १४ ॥ या गोवळ्याचे मेटी ॥ मारिल्या मालांच्या थाटी ॥ कुवलिया हत्तिरु उठाउठि ॥ थलडीसाटि लिढाविला ॥ १५ ॥ उपडिले चाणूराले सभेसि लिढाविले कंसाले ॥ राज्य दिधले उग्रसेनाले ॥ देवकी वसुदेवाले सोडविले ॥ १६ ॥ धर्मे वाढविला निजधर्म ॥ उद्धवाचें कडा-डिलें कर्म ॥ छेदाऱ्याले भवभ्रम ॥ जनार्दन नाम स्मराहो ॥ १७ ॥ या लागि तूं बायकोचे तिकोऱ्या टवळां ॥ स्नेह नको घालु ॥ तो जडला चिकटा ॥ लागला मळकटा ॥ बैसला खरकटा ॥ तो फिटेना ॥ १८ ॥ ह्मणिनस्यां त्या तिकोऱ्या त्रिगुण टवल्याचे चाले नको करुं ॥ याचि गोडि नको धरूं ॥ तेथे वेळां वेळां पडिभरु ॥ भुलुनस्यां आत्यादरु ॥ नको हो राया ॥ १९ ॥ त्यातिकोऱ्या टवाळ्याची काजळी ॥ लाविनस्यां कपाळी ॥ बहुताचि तोंडें जालीं काळीं ॥ तुले काय ठावे नाहीं ॥ २० ॥ इंद्र अहिल्याचा भगीं ॥ भगांकित सर्वांगीं ॥ चंद्र गुरुपत्नीसंगीं ॥ जाला जगीं कळंकीया ॥ २१ ॥ लिंगपतन ईश्वरासि ॥ नपुंसकत्व अर्जुनासि ॥ ऐसे नागले वउनि बहुतांसि ॥ नगाडिलें ॥ २२ ॥ मज दिवठ्याचि वचन गोडी ॥ खुंटे कळि-काळाचि वोढी ॥ दे स्वानंदाचि झळफळित गुदि ॥ हरिहरब्रह्मादि बुडि ॥ लपोनि जाति ॥ २३ ॥ ऐसिया पडयाची पुष्टी ॥ मी तुपणाची मावळे गोष्टी ॥ ऐसी येकीमाले दे दिठि ॥ जे मिरवता जगाचे उल्हास होये ॥ २४ ॥ ऐसिये दानाचे परवडी ॥ मास दातेचि देति रोकडि ॥ येरू काय देति बापुडीं ॥ जे लाभा बुडि सांकळलीं ॥ २५ ॥ ऐसें द्यावया दान ॥ दाता एक जनार्दन ॥ येर लंड सुंबद देयिल कोण ॥ ज्याआळुकेपण विषयांचे ॥ एका जनार्दनिं निजल्या दिवठा ॥ परब्रह्में उजळिल्या भक्ति पेठा ॥ भुक्तीमु-क्तीचा दारवंटा ॥ सायुज्य वाटा नर देहीं ॥ २६ ॥

॥ २६२२ ॥ भवानी मी तुझा भुत्या खरा ॥ धृ० ॥ अनूहात चव डंक वाजत डुगडुग ॥ होतो घोष बरा ॥ १ ॥ बोधाची परडी ज्ञानाचा संबळ ॥ अज्ञान तो पोत खरा ॥ २ ॥ एका जनार्दनीं भुत्या मी जालों ॥ तुझे पायीं मी खरा ॥ ३ ॥

॥ २६२३ ॥ अहं वाघा सोहं वाघा प्रेम नगारा वारी ॥ सावध होउनी भजनीं लागा देव करा कैवारी ॥ १ ॥ मल्लारीची वारी माझ्या

मल्लारीची वारी ॥ ध्रु० ॥ इच्छा मुरळीस पाहूं नका पडाल नरकद्वारीं ॥ बोध बुधली ज्ञान दिवटी उजळा महाद्वारीं ॥ २ ॥ आत्मनिवेदन भरित रोडगा निवतिल हारोहारी ॥ एकाजनार्दनीं धन्य खंडेराव स्वावरी कुंचा वारी ॥ ३ ॥

॥ २६२४ ॥ वारी वो वारी ॥ देईकां गा मल्हारी ॥ त्रिपुरारी हरी ॥ तुझे वारीचा मी भिकारी ॥ १ ॥ वाहन तुझें घोड्यावरी ॥ वरी बैसली झाळसा सुंदरी ॥ वाघ्या मुरळी नाचती परोपरीं ॥ आवडी ऐसी पाहीन जेजुरी ॥२॥ ज्ञान कोटंबा घेउनी आलों द्वारीं ॥ बोध भंडार लाविन परोपरीं ॥ एकाजनार्दनीं विनवी श्रीहरी ॥ बैरागी वारी देउनी प्रसन्न मल्हारी ॥ ३ ॥

॥ २६२५ ॥ डोई बोडोनी केली खोडी॥काया विटंबिली बापुडी॥१॥ ऐसें नोहे निर्मळपण ॥ शुद्ध करी कां अंतःकरण ॥ २ ॥ राख लाउनी वरच्या वरी ॥ इंद्रियें पीडिलीं भरोवरी ॥ ३ ॥ संध्या स्नान द्वादश टिळे ॥ फांसे घालुनी कापी गळे ॥ ४ ॥ बगळा लाउनीया टाळी ॥ ध्यान धरूनि मत्स्य गिळी ॥ ५ ॥ पाय घालुनी आडवा ॥ काय जपतोसी गाढवा ॥६॥ कन्येसमान घरची दासी ॥ तिशीं व्यभिचार करिसी ॥ ७ ॥ लोकांमध्यें मिरविसी थोरी ॥ घरची स्त्री परद्वारी ॥ ८ ॥ श्वान आलें बुद्धीपणा ॥ चघळोनी सांडी तो वहाणा ॥ ९ ॥ एकाजनार्दनीं निर्मळ भाव ॥ तेथें द्वेषा कैंचा ठाव ॥ १० ॥

---

## फकिर.

॥ २६२६ ॥ खरखर मुंडा आवरे फकीर ॥ पालखी निजविला मोतीया हिरा ॥ १ ॥ उळु उळु उळु गाई निजरे बाळा ॥ मोठा जटाधारी गोसावी आला ॥ २ ॥ ध्रु० ॥ येरे कोल्हया जायरे लांडग्या ॥ नको भेडसाऊं लेंकुरा दांडुग्या ॥ ३ ॥ आळविला कान्हा पाजुनी प्रेम पान्हा ॥ एकाजनार्दनीं लाविला स्तना ॥ ४ ॥

॥ २६२७ ॥ मलंग फकीर हम तो मलंग फकीर ॥ ध्रु० ॥ कीया संतनका संग ॥ खाये निज बोधनकी भंग ॥ सदा आनंदमो दंग ॥ १ ॥

लीयो संतनका दुमाल ॥ तुटा मेरा भव जंजाल ॥ एकाजनार्दनीं कंगाल ॥ ऐसे मलंग फकीरहै ॥ २ ॥

॥ २६२८ ॥ पंच तत्वका शोध करीयो ॥ मूळबंद अंकुश खोचीयो ॥ पांच पांचके पचीस पचीयो ॥ ग्यान ध्यानसो धीर मचासो ॥ १ ॥ फकीर हय भाई ॥ धृ० ॥ गलेमो सैली हातमो झोली ॥ अनुहत लंगर नामची पोली ॥ गुरुग्यान मनसे झोली ॥ आशा छांड धीर न छांडीयो ॥ २ ॥ लकडा मैने जमान पकडा ॥ काम क्रोधका तोडा झगडा ॥ पंच तत्वका मारु भोसडा ॥ अभिमानका धीर छोडा ॥३॥ दश दरवाजे कोंडकर लीयो॥ सब इंद्रियें एक धीर धरीयो ॥ गुरु चरन हमे सिरपर धरीयो ॥ एकाजनार्दनीं मन थीर करीयो ॥ ४ ॥

॥ २६२९ ॥ आशा टाकुनी फकीर जाला ॥ परीं भिक्षा मागणें जन्म गेला ॥ १ ॥ तैशी नोहे परमार्थ रहाटी ॥ शुद्ध मन करीजे पोटीं ॥ २ ॥ सर्वांभूतीं नांदे एक देव ॥ वाउगा कां वाढावा अहंभाव ॥ ३ ॥ जे जे वाणी स्तुति केली ॥ ती ती देवासी पावली ॥ ४ ॥ ऐसा धरी दृढ भाव ॥ एकाजनार्दनीं मागे ठाव ॥ ५ ॥

॥ २६३० ॥ भला संतनका संग ॥ खावे निज बोधनकी भंग ॥ सदा आनंदमों दंग ॥ ऐसे मलंग फकीरहै ॥ १ ॥ लियो संतनकी दुमाल ॥ मेरा तुटे भव जंजाल ॥ कहे जनार्दन कंगाल ॥ फकीरहो रहेहै ॥ २ ॥

॥ २६३१ ॥ हजरत मौला मौला ॥ सब दुनया पालन वाला ॥ १ ॥ सब घटमो सांइ विराजे ॥ करत हय बोलबाला ॥ २ ॥ गरीबन वाजे मै गरीब तेरा ॥ तेरे चरणकु रतवाला ॥ ३ ॥ आपना साती समजके लेना ॥ सलील वोही आल्ला ॥ ४ ॥ जीन रुपसे हय जगत पसारा ॥ वोही सल्लाल आल्ला ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं निजवद अल्ला ॥ आसल वोहि विटेवर वोही आसल आल्ला ॥ ६ ॥

॥ २६३२ ॥ देखोरे सांई देखोरे सांई ॥ बिटपर खडा रहीया भाई ॥ १ ॥ फकीर मौला सब दुनयाका नाम बीठल साचा ॥ बडे बडे भगत आवे बोलवाला बाच्या ॥ २ ॥ सीद्ध न साधन कोइ नहा जाणो जाणो बीठल सांइ ॥ एकाजनार्दन होरी पुकारे गांवो थांके पाई ॥ ३ ॥

॥ २६३३ ॥ दीलका हामने पछानावे ॥ कायकु सोंगे बतातावे ॥ १ ॥ जींदर उदर देखो भरीयो सब घटा ॥ आल्ला आल्ला करकर खावन मांगे मीठा ॥ २ ॥ एकाजनार्दन पग धरतहै ॥ कहो बीठल बीठल अल्ला ॥ ३ ॥

॥ २६३४ ॥ दिलमो याद करोरे ॥ जनमका सारथक करोरे ॥ १ ॥ सारे दीन करत पेटखातर धंदा ॥ बीठल नाम लेवत नाहीं क्यवरे तूं गधा ॥ २ ॥ जमका सोटा बाजे पीठपर कोइ आवे नही सात ॥ एकाजनार्दन नाम पुकारे करो हरीनाम बात ॥ ३ ॥

---

## सफेतकलंदर फकीर.

॥ २६३५ ॥ सफेत कलंदर फकीर ॥ बाबा सफेत कलंदर फकीर ॥ ध्रु० ॥ काम क्रोध मद मत्सर काटो ॥ उन्मनी ज्या घर बैठो ॥ मारो आसन बैठो त्रिकुटपर ॥ करनारकी जीकरी ॥ १ ॥ अंदर भगवा कियोरी बावा ॥ जोग जुगुत भरपाई ॥ अल्लाके नामपर लागन लगाई ॥ चुकी कलमपर लिखी ॥ २ ॥ ऐसी फकीरकी थोरी ॥ बाबा जातकुल सब तारी ॥ जनार्दनका एका कहतहै साधो ॥ सीताराम गुरु पीर ॥ ३ ॥

॥ २६३६ ॥ संतनके संग ॥ खावे निज बोधनकी भंग ॥ सदा आनंदमोंदंग ऐसी मलंग फकीर ॥ १ ॥ ग्यानके मैदान खडे ॥ सम दमसें आन लढे ॥ बहोतांके तखत चढे ॥ ऐसा मलंग फकीर ॥ २ ॥ किया संतनका दुमाल ॥ मेरा तुटा बहु जंजाल ॥ ऐसा एकनाथ कंगाल ॥ ऐसा मलंग फकीर ॥ ३ ॥

---

## वेणु.

॥ २६३७ ॥ अधरीं धरुनी वेणु ॥ वेणु वाजविला कोणी नेणु ॥ १ ॥ प्रातःकाळीं तो वनमाळी ॥ घेउनी जातो धेनु ॥ २ ॥ उभी मी राहें वाट मी पाहें ॥ केव्हां भेटेल मम कान्हु ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं वाजविला वेणु ॥ ऐकतां मन जालें तल्लीनुगे ॥ ४ ॥

---

# वासुदेव.

॥ २६३८ ॥ विषय सेवितां गा जन्म मरणाचा बाधु ॥ विवेक गुरु वाक्य छेदी छेदी भव बंधु ॥ १ ॥ राम कृष्ण वासुदेव हरि ब्रह्मानंदें गळतीगा ॥ रामकृष्ण वासुदेव हरि देहीं विदेही जाला गा ॥ २ ॥ विवेक गुरु वाक्य निज बोधें पैं बुद्धी ॥ तेणें बुद्धि पाहतां गा अखंड ते समाधि ॥ ३ ॥ जनीं वनीं निरंजनीं वासुदेव समान ॥ एकाजनार्दनीं चित्त चैतन्य घन ॥ ४ ॥

॥ २६३९ ॥ मी वासुदेव नामें फोडितों निस टाहो ॥ देखिले पाय आतां मागतों दान द्याहो ॥ सांवळें रूप माझ्या मानसीं निसराहो ॥ पावन संत वृंदें सादरें दृष्टी पहाहो ॥ १ ॥ राम कृष्ण वासुदेवा ॥ हरि राम कृष्ण वासुदेवा ॥ धृ० ॥ सांडोनी सर्व चिंता संत पदीं लक्ष लागो ॥ मुक्त मी सर्व संगीं सर्वदां वृत्ती जागो ॥ भाविक प्रेमळांच्या संगती चित्त लागो ॥ २ ॥ अद्वैतीच चालो अक्षयीं भक्तियोग ॥ स्वप्नींही मानसातें नातळो द्वैत ॥ संग अद्वयानंद वेधें नावडो अन्य भोग ॥ अक्रियत्वची वाहो सक्रियारूप बोध ॥ ३ ॥ पहातां विश्व मातें निज रूप दाखवी ॥ सत्कथाश्रवण कर्णीं पीयूष चाखवी ॥ रसने नाम मंत्र सर्वदा प्रेम देई ॥ तोषला देवराणा ह्मणे बारे घेई ॥ ४ ॥ हें दान पावलें सद्गुरु शांतिलिंगा ॥ हें दान पावलें आत्मया पांडुरंगा ॥ हें दान पावलें व्यापका अंतरंगा ॥ हें दान पावलें एकाजनार्दनीं दोष जाती भंगा ॥ ५ ॥

॥२६४० ॥ वासुदेव स्मरण पाप हरणाचें मूळ ॥ तीर्थाचें माहेर ब्रह्म व्यापक निश्चळ ॥ अघ नाशी मुखीं स्मरतां वाचा जाली निर्मळ ॥ त्रिविध ताप शोषुनी रूपीं स्वरूपीं सुमंगळ ॥ १ ॥ ॐनमो भगवते रामकृष्ण वासुदेवा ॥ धृ० ॥ जप तप अनुष्ठान व्यर्थ कासया करणें ॥ तीर्थ व्रत यम नेम नलगे दैवता धरणें ॥ आसन मुद्रा ज्ञान ध्यान नलगे वाराणसीं मरणें ॥ केशव माधव अच्युत वदतां होय पातक हरण ॥ २ ॥ शरीर शोषण प्राण निरोधन मनोजय हटयोग ॥ गुदपिडन कुंडलिनी कलिमलदल भंग ॥ ऊर्ध्ववायुचा श्वेतु तोडोनी करिवो वन भंग ॥ ब्रह्मरंध्रीं मिसळे परी मुमूक्षु दंग ॥ ३ ॥ मनोजय वासना तोडोनी केली बीबोडी ॥ मनपुर नगर पहातां दुर्गति मोडी ॥ काम क्रोध मद मत्सर अहंकार झोडी ॥ अखंड परमानंद

सेउनी उभवी गुढी ॥ ४ ॥ भेद भाव तोडोनीया घेतला प्रेमाचा गरळा ॥ शुद्धनाम श्रीहरीचें निजमुखीं लागला चाळा ॥ हरि स्मरणाचेनी बळें अंकित केलें कळिकाळां ॥ एकाजनार्दनीं अखंड सुख सोहळा ॥ ५ ॥

---

## गांवगुंड.

॥ २६४१ ॥ अरे अरे गांवगुंडा तुझा बहुत ऐकतों झेंडा । जें येईल तें बोलतोस तोंडा ॥ हें मज गारुड्यापुढें चालणार नाहीं ॥ तूं कोणत्या गुरुपाशीं खेळ खेळलास । का आकारानें पिवळा जोंधळा केला जरी । तरी माझी विद्या आहे पंचाक्षरी । जा जा एक फुंक मारीन तुझ्या काळजीं घालीन सुरी ॥ तुझ्या सुरीचें करीन पाणी । तीच सुरी खोंवीन टेरी बोल बोलसी जरी राहिल सुरी । गोष्ट खरी पहा पहा ॥ गारुडी बोले आह्मासी काय । जें धर्मास येईल काय । तें खाऊन चाले पाहे । एका जनार्दनाचे पायीं निवांत राहीन रे गांवगुंडा ॥ १ ॥

॥ २६४२ ॥ माझें नांव ठक ठकाई । तुह्मा सांगतों घाई घाई । हा तो माझ्या बापाचा जांवई कीजे मायबाप ॥ १ ॥ याच्या लग्नाची कुळकथा ऐका । माझ्या बापास मोजिला पैका । एक ढबू एक रुका दहा कवड्या कीजे मायबाप ॥ २ ॥ ठेंगू मेंगू दक्षणा कैंची । कान पिळ्यास टोपी अगर कुंची । उगाच बोलतो लुच्चासारिखा कीजे मायबाप ॥ ३ ॥ याच्या घरीं एक ह्मातारी । ती शेजाऱ्याचे द्वारीं । घांस कुटक्यासाठीं कीजे मायबाप ॥ ४ ॥ मग संतांची संतकृपा होतां । एका जनार्दनीं ठेविला माथा । उगीच कैसी ऐकतां भाकड कथा कीजे मायबाप ॥ ५ ॥

---

## होळी.

॥ २६४३ ॥ देह चतुष्टयाची रचोनी होळी ॥ ज्ञानाग्नि घालुनी समूळ जाळी ॥ १ ॥ आजुनी कां उगलाची ॥ बोंब पडोंदे नामाची ॥ २ ॥ मांदी मेळवा संतांची ॥ तुह्मा साची सोडवण्या ॥ ३ ॥ धांवण्या धांवती संत अंतरंग ॥ संसार शिमगा सांग निरसिती ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं मारिली बोंब ॥ जन वन स्वयंभ एक जालें ॥ ५ ॥

---

## शिमगा.

॥ २६४४ ॥ सत्व गांठीं उमगा ॥ तेणें सफळ होईल शिमगा ॥ तुह्मीं हेंच गाणें गा ॥ तुह्मीं हंसूं नका हंसूं नका ॥ धृ० ॥ १ ॥ भूत सभेचीं कारटीं ॥ विषय गौऱ्या चोरटी ॥ उतरा कुकर्माची राहटी ॥ तुह्मी हंसूं नका ॥ २ ॥ जागोजागीं थांबा ॥ अवघ्या मिळोनी मारा बोंबा ॥ न जळे एरंडाच्या कोंबा ॥ तुह्मीं हंसूं नका हंसूं० ॥ ३ ॥ गांवचा पाटिल कोळी ॥ काळोबाची पिकली पोळी ॥ तुमची पाजळूंद्या होळी ॥ तुह्मी हंसूं नका० ॥ ४ ॥ ओटींत घेऊनि गुलाल ॥ सख्या मेहुणी संगें भुलाल ॥ तिचा नवरा मोठा जलाल ॥ तुह्मी हंसूं नका हंसूं नका ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं पोस्त ॥ गाणें गातां हालमस्त ॥ नाहीं तर भडवे समस्त ॥ तुह्मीं हंसूं नका हंसूं नका ॥ ६ ॥

---

## सासुरवास.

॥ २६४५ ॥ विसराचें सासुरें दुसरी बोळवण ॥ भ्रांती पांघरूण बुंथी मज ॥ अविवेक आमुचा अहंकारू सासुरा ॥ अविद्येच्या घरा माजी नेलें ॥ तेथें कल्पना हे सासु सदां सासुबीसु ॥ घेऊं नेदी उमसु आठवण ॥१॥ माझ माहेर मानसीं सदा आठवत ॥ त्यासाक्षी वर्तत सर्व कर्मीं ॥ आठवणें सर्वे आठऊ आटत ॥ तेणेंविण फुटत हृदय माझें ॥ ध्रु० ॥ कामक्रोध द्वेष भावे आणि दीर ॥ मज आठीताती थोर स्वभाव त्यांचें ॥ माझी वोहीणी ममता नणंदुलि हे चिंता ॥ त्या भेणें एकांता ठाव नाहीं ॥ मोह हा ह्मातारा सदा द्वारीं बसे ॥ धडासी तो पिसें लावितसे ॥ २ ॥ वरीवरी सांबडा पोटिचा पैं कुडा ॥ दंभ घाली खोडा प्रलोभाच्या ॥ येणेंची साधनें तुज नेईन मी माहेरा ॥ लोभ दारोदारा हिंडवितो ॥ प्रपंचु हा सदा चाळवितो मातें ॥ त्याच्यानि सांगातें शीणले थोर ॥ ३ ॥ इच्छा आणि निंदा न सरें दासटें ॥ ते माझे चिमटें वेचिताती ॥ कामाहातीं मज नाहीं वो उमग ॥ निष्कामासि दंड क्रोध करी ॥ तेथें द्वेषाची दाटणी सदां पैं खोंचणी ॥ कोणे घरीं पापिणी बोळविलें ॥ ४ ॥ माझा भोळाबा हा भावो त्यासी नाहीं ठावो ॥ त्या पाठीसंदेहो श्वान लागे ॥ त्या भेणें पळाला मागुता नाहीं आला ॥ देश धडी केला भावो माझा ॥ माझी सखीं हे

भक्ति भावासवें जाती ॥ कवणा काकुलति येउं माये ॥ ५ ॥ आर्तिचा निढळी ठेउनीया बाहुली ॥ पाहातुसें वाटुली माहेराची ॥ माझ्या माहेराचे वाटे कोणींच न भेटे ॥ माउलिपें पैठे कोण करीं ॥ अक्रूरा प्रल्हादा धांवरे उद्धवा ॥ माझा सावा धांवा तुह्मीं किजे ॥ ६ ॥ शुक सनकादिक माझें गोत देख ॥ तुह्मीं असतां रंक ह्मणती मातें ॥ नारदा भाइ या पावें लव-लाह्या ॥ लागतसे पायां जीवें भावें ॥ मी तुमचें तान्हुलें मज कां उपेक्षीलें ॥ येणें आठवें फुटलें हृदय माझें ॥ ७ ॥ सत्वर हनुमंता उडी घाली आतां ॥ मजलागीं सर्वथा मूळ यावें ॥ खांदी वाहुनीयां माहेरी मज न्यावें ॥ हेंची जीवें भावें प्रार्थीतसें ॥ पृथु चक्रवर्ति जीवलग सांगाती ॥ तुह्मीं बा बिभिषिती मुळ यावें ॥ ८ ॥ पैल पुंडलीक पाहे जवळी बापु माये ॥ सुखें नांदताहे भीमा तिरीं ॥ आषाढी कार्तिकी नित्य नवा सोहळा ॥ वाट पाहातां डोळां नीज नये ॥ तेथींचे वारकरी तयांचे पायधरी ॥ तुह्मीं मज माहेरीं पाठ-वावें ॥ ९ ॥ माझी या माहेरा जाती देशाउरा ॥ तया ऋषेश्वरा नमन माझें ॥ वसीष्ट याज्ञवल्कि व्यास अंबऋषी ॥ माहेरी ओळखी आहे जया ॥ माझें सर्वस्व देइन पायवणी पीन ॥ जीवें ओंवाळीन भेटी लागी ॥ १० ॥ संत महंत सिद्ध वैष्णव प्रबुद्ध ॥ त्या प्रति हा शब्द सांगी जे तु ॥ तुमतें आठवितलां उकल फुटी होत ॥ उतावेिळ चित्त भेटी लागीं ॥ ते लाग-वेगीं येती माहेरा मज नेती ॥ त्यासी माझी खंती बहुत आहे ॥ ११ ॥ बाह्या पसरुनी माता माझी येइल ॥ मज क्षेम देईल विश्वरूपें ॥ नित्य तेंची निज हृदयीं घालील ॥ स्वयें आश्वासील निजबोधें ॥ अहं सोहं माझीं आसुवें पुसील ॥ अंकीं बैसवील निज पदीं ॥ १२ ॥ त्या माहेराचे भेटी सांगों विसरे गोष्टी ॥ मीपणा उफराटी मुकलिये ॥ तेथें मायपुत्रा मेळी उरी नुरे वेगळी ॥ ऐसी क्षमा कवळी पडोनी ठेली ॥ यापरी माहेरा मिळणी झाली भेटी ॥ भेटी सहीत गोष्टी लाजीलिया ॥ १३ ॥ तेथें दृश्य ना देखतें स्पर्श ना स्पर्शतें ॥ भावो ना भावितें ऐसें झालें ॥ देउ ना देउळ राव ना राउळ ॥ काळ आणि वेळ पारूषलि ठेलें ॥ सासुरें माहेर घेवोना वेव्हार ॥ एकें घायें येरझार हारपली ॥ १४ ॥ तेथें पर ना प्रकृति भाव ना भक्ति ॥ दीवसु आणि राती मावळली ॥ एकाजनार्दनीं नवल कैसें झालें ॥ सासुरें तें केलें माहीयेर ॥ एकाएकपणें निर्वीकल्प सुखें ॥ दोहीं ठायीं हरीखें नांदतुसें ॥ १५ ॥

॥ २६४६ ॥ वृद्धपणीं शांती धरा तुह्मी सासुबाई ॥ नरम गरम पाहुं नका अंतीं सुख नाहीं ॥ धृ० ॥ रात्रंदिवस विचारितां जीव दिक जाला ॥ मायलेकी राहा तुह्मी मज नेऊन घाला ॥ १ ॥ प्रपंचाचें ताक तुह्मी सांचविलें घरीं ॥ संचिताचें दुःख लोणी गमाविलें चोरी ॥ २ ॥ वासनेच्या विडाळीका कोंडूनी बाहेर ठेवा ॥ नवही द्वारें गुप्त करा ज्ञान दीप लावा ॥ ३ ॥ प्राप्त भूमी चारी तुह्मी हात करा वेगी ॥ कल्पनेची राहटी मोडा तोची धन्य योगी ॥ ४ ॥ चारी मुक्ती त्याचे माथां काळ झेंप घाली ॥ विश्वासानें जाऊं नका जीव मुक्ती झाली ॥ ५ ॥ अहेवमणी गळां तुह्मी व्यर्थ बांधियेला ॥ बारा सोळा पुत्र जाले दादला नाहीं केला ॥ ६ ॥ वांझ तुह्मी पुत्र भासे तुमचे तुह्मा साजे ॥ ईतर स्त्रीया करूं ह्मणती मरती लोक लाजे ॥ ७ ॥ क्षणीक तुह्मी वृद्ध पहा क्षणिक तरुण बोले ॥ एकाजनार्दनीं साणें शरण रूपें केलें ॥ ८ ॥

---

# सन्नामावली.

॥ २६४७ ॥ नवविधाभक्ती नवआचरती ॥ त्याची नाम कीर्ति सांगूं-आतां ॥ १ ॥ येकयेक नाम घेतां प्रातःकाळीं ॥ पापा होय होळी क्षणमात्रें ॥ २ ॥ ध्रु० ॥ श्रवणें परीक्षिती तरला भूपती ॥ सात दिवसां मुक्ति जाली तया ॥ ३ ॥ महाभागवत करुनी श्रवण ॥ सर्वांगाचे कान केले तेणें ॥ ४ ॥ श्रीशुक आपण करूनी कीर्तन ॥ उद्धरिला जाण परीक्षिती ॥ ५ ॥ हरीनाम घोष गर्जतो प्रह्राद ॥ स्वानंदें प्रबोध जाला त्यासी ॥ ६ ॥ स्तंभीं अवतार हरी प्रगटला ॥ दैत्य विदारिला तयालागीं ॥ ७ ॥ पायाचा महिमा स्वयें जाणे रमा ॥ प्रिय पुरुषोत्तमा जाली तेणें ॥ ८ ॥ हरीपदांबुज सुकुमार कोंवळें ॥ तेथें करकमळें अखंडीत ॥ ९ ॥ गायीचीया मागें श्री कृष्णपाउलें ॥ अक्रूरें घातलें दंडवत ॥ १० ॥ करुनी वंदन घाली लोटांगण ॥ स्वानंदें निमग्न जाला तेणें ॥ ११ ॥ दास्यत्व मारुती अर्चे देह स्थिती ॥ सीता शुद्धीं कीर्ति केली तेणें ॥ १२ ॥ सेव्यसेवक भाव जाणें तो मारुती ॥ स्वामी सीतापती संतोषला ॥ १३ ॥ सख्यत्व स्वजाती सोयरा श्रीपती ॥ सर्वभावें प्रीति अर्जुनासी ॥ १४ ॥ उपदेशिली गीता सुखी केलें पार्था ॥ जन्ममरण वार्ता खुंटवीली ॥ १५ ॥ आत्मनिवेदन करुनीया बळी ॥ जाला

वनमाळी द्वारपाळ ॥ १६ ॥ औट पाऊल भूमी घेऊनीया दान ॥ याचक आपण स्वयें जाला ॥ १७॥ नवविधा भक्ती नव जणें केली ॥ पूर्ण प्राप्ती जाली तयां लागीं ॥ १८ ॥ एकाजनार्दनीं आत्मनिवेदन ॥ भक्ति दुजेपण उरलें नाहीं ॥ १९ ॥

---

# भूत.

॥ २६४८ ॥ वांकडा ह्मणे कृष्णजी बापा म्यां येक देखिलें भूतरे ॥ त्याचें विष पहिलें जळुनी गेलें शेवीं राहिलें किंचितरे ॥ देहाविण छळितो तेथेंचि पीडितो त्या ठायां असे मळमूत्ररे ॥ त्यांनीं जिंकिले कोण कोणते त्यासी जींकिल कोण तोरे ॥ १ ॥ धोंगड माझें बोलणें कान्होबा धोंगड माझें बोलणें ॥ ध्रु० ॥ जुनाट जोगडा काळाचा काकडा डोंगरी राहतो भोंडारे ॥ झडपिला हावे नागवाचि धांवे पाठीसी लागला भील गोंडारे ॥ काजळ खोपा नेटका रूपा पाहूनि भुलला तोंडारे ॥ महाभ्यासूर जटाधारी वीर्याचा चालिला लोंढारे ॥ २ ॥ कुल्लाळ हाडाचा बाप चाहाडाचा अखंड घडतो मडकींरे ॥ त्यासी भूत संचार जाला हिमाचळाचे खडकींरे । भूत वैऱ्याची नोवरी पाहुनि जिवासि भरली धडकीरे ॥ कोण्हेयेकेवेळीं पाठीसी लागला भेडसाविली लेक लाडकीरे ॥ ३ ॥ नगाचेदंदी रिगाचे खांदीं हाडे हाडाचा ढेंगारे। त्यासी भूत संचार जाहला योनी जडल्या आंगारे ॥ सुत अंधाचा परांगनेचा चीर फेडितो कांगारे ॥ त्यासी येक वृक्ष पुढें भेटला डांगानें मोडिला ढांगारे ॥ ४ ॥ गंगा माजारी संग ढीवरीसी रमला तपो गवेंरे ॥ त्यासी एक पुत्र जन्मला त्यानें केलीं अठरा पर्वेरे ॥ तो एक साक्षात् वेदो नारायण बोलणें त्याचें बरवेंरे ॥ कुरंगीचें पाडस दुबकिलें अयुध्यापूर मिर-विलेंरे ॥ ५ ॥ डोळियाचे जवळीं येक द्विज जन्मला तोचि त्याचे नांव वाह-नरे ॥ बापापरीस येका तोंडानें आगळा तारका केलें हननरे ॥ ६ ॥ शैला-त्मजेच्या सवतीचा तनय तया हातीं त्याचें मरणरे ॥ दिवाआंधारीं जो-कां रमला नातवंड त्याचें गहनरे ॥७॥ लंगोटबंदन दुंगासी शेंपुट अझून जित्र काळ तोंडारे ॥ रात्रींतुन ज्याणें शेपुटी बांधोनी संकटीं आणिला धोंडारे ॥ ८ ॥ त्रिभुवनवासी तो देवऋषी बाप जया चार तोंडारे ॥ सोळा सहस्र नारी भोगून ब्रह्मचारी तूं एक ह्मणविसी लंडारे ॥ ९ ॥ वांकड्यानें

आहाणा घातला जाणा उकलीलतो विरळागतरे ॥ पदापदाचे अर्थ करी जो तो येक असे बहुश्रुतरे ॥ १० ॥ आठा कडव्याची अष्टपदी गाइली तो एक जाणा अदभुतरे ॥ एकाजनार्दनीं विनवित असे भूत नव्हे कान्होबाचें सूतरे ॥ ११ ॥

---

## नवल.

॥ २६४९ ॥ कृष्णा नवल कैसी परी ॥ तूं आत्मा येक चराचरीं ॥ तेथें द्वेषेंसी कवणा हरी ॥ कैसे मारिले दैत्य त्वां वैरी ॥ १ ॥ कान्होबा सांगपां माझें कोडें ॥ तुझें पुसतों तुझिया पुढें ॥ धृ० ॥ देहीं नखशिख अवघें येक ॥ देहा रुतती नखें तीख ॥ त्याच्या छेदनीं आह्मा सुख ॥ तैसे मारिले अधर्मी देख ॥ २ ॥ तुज भेद नाहीं नरनारी ॥ कैसे सोळा सहस्त्र तुझिया घरीं ॥ तूं ह्मणविसी बाळब्रह्मचारी ॥ शेखीं जालासी कां परद्वारी ॥ ३ ॥ हेम मृत्तिकेच्या घटश्रेणी ॥ आंत भरलें निर्मळ पाणी ॥ सांत विंबोनी अलिप्त तरणी ॥ तैशा भोगुनी बहु कामिनी ॥ ४ ॥ जग आघवें तुझियाकुशीं ॥ रसना अंकित नव्हे ह्मणविसी ॥ रसस्वाद केंवि जाणसी ॥ शेखीं चोरुनी कां दूध पिसी ॥ ५ ॥ मी भुललों भक्तिप्रेमासी ॥ चोऱ्या करितों भक्ती भावासी ॥ रसरसना ते मज अंशी ॥ रसस्वाद जाणें ज्ञानराशी ॥ ६ ॥ एकाजनार्दनीं घेतिला थाया ॥ तो संकल्पची नये आया ॥ तेथें हारपली माझी माया ॥ देहीं देहपण गेलें विलया ॥ ७ ॥

॥ २६५० ॥ लगे ढोल लगे ढोल ॥ तुझा वस्ताद खोल ॥ तरीच मर्शी बोल ॥ नाहीं तरी वांया फोल ॥ जाई जाईरे गव्हारा ॥ १ ॥ मी निराकाराचा डोंबारी ॥ तीही लोकीं माझी फेरी ॥ चारयुगांच्या खबरी ॥ तुज सांगेन रे गव्हारा ॥ २ ॥ प्रथम खेळ कैलासगिरीं ॥ वेळु रोविला निर्धारीं ॥ शंभुराजा राज्य करी ॥ त्याचें उदारत्व भारी ॥ तुज सांगेन रे गव्हारा ॥ ३ ॥ आत्मलिंग आणि पार्वती ॥ ती दिधली दशकंधराप्रती ॥ त्याच्या उदारत्वाची ख्याती ॥ नाहीं नाहीं त्रिजगतीं ॥ धन्य त्या शंभूची याद कर ॥ ४ ॥ दुसरा खेळ वैकुंठीं ॥ श्रीमंत महाराज विष्णु जगजेठी ॥ तेणें दैत्य मारिले कपटी ॥ क्षीरसागर तटीं रहिवास केला ॥ धन्य त्या विष्णूची याद कर ॥ ५ ॥ मत्स्य कच्छ वराह बरा ॥ नारसिंह वामन

परशुधरा ॥ तिसरा खेळ अयोध्या पुरा ॥ धाक दरारा शत्रूसी ॥ धन्य त्या विष्णूची यादकर ॥ ६ ॥ हरिश्चंद्र राजा पुण्यराशी ॥ राज्य देऊनी ब्राह्मणासी ॥ आपण जाउनी वाराणशीं ॥ पुत्र पत्नीसी विकिलें ॥ धन्य त्या हरिश्चंद्राची याद कर ॥ ७ ॥ दैत्यवंशीं राजे भले ॥ शिबीनें मांसदान केलें ॥ वैकुंठनाथा संतोषविलें ॥ नगर नेलें मोक्षा प्रती ॥ धन्य त्या सिबीची याद कर ॥ ८ ॥ दैत्यवंशीं राजा बळी ॥ तेणें तृप्त केला वनमाळी ॥ देह दान देउनी पाताळीं ॥ देव आपण जवळीं ठेविला ॥ धन्य त्या बळीची यादकर ॥ ९ ॥ राजा अजपाल भगीरथ ॥ दशरथवंशीं जन्मले रघुनाथ ॥ त्याच्या औदार्याची मात ॥ धन्य त्या रामाची याद कर ॥ १० ॥ त्याचा नवलावो ॥ देवा नकळे अभिप्रावो ॥ वेदां नकळे निर्वाहो ॥ अगम्य पहा हो सनकादिकां ॥ धन्य त्या रामाची यादकर ॥११॥ ऐसा गुलाबराव महाबळी ॥ तेणें भल्या भल्याशीं केली रळी ॥ खेळ मांडिला गोकुळीं ॥ कृष्ण वनमाळी खेळत ॥ धन्य त्या कृष्णाची यादकर ॥ १२ ॥ सइवा दिधला अमुकया ॥ त्यासी नाहीं पुनरावृत्ति माया ॥ आपण राहुनी साम्यया ॥ रूपारूप मेळविलें ॥ धन्य त्या कृष्णाची यादकर ॥१३॥ पुढें द्वापार युगाचा उदयो ॥ म्यां बरोबर घेतिला कामाजी गुलाबरावो ॥ तेणें ठकविले मोठे मोठे पहाहो ॥ तुजसांगेनरे गव्हारा ॥१४॥ नारदासी डोळा घातिला ॥ विश्वामित्र फारच नागविला ॥ पराशर वस्त्र टाकुनि पळाला ॥ लबाडी नव्हे माझीया बोला ॥ तूं सांगरे गव्हारा ॥ १५ ॥ ब्रह्म्याची उतरली उटी ॥ इंद्र पळाला कपाटीं ॥ चंद्रासी काळोखी मोठी ॥ अद्यापी जन दृष्टी ॥ पहाती कींरे गव्हारा ॥ १६ ॥ पुढें कलियुगामाजारीं ॥ श्री क्षेत्र अविनाश पंढरी ॥ पुंडलीक पाटलाचे द्वारीं ॥ खेळ जोडिला लवकरी मागितला ॥ धन्य त्या पुंडलीक पाटलाची यादकर ॥ १७ ॥ नगरांपे डोंबारी आले ॥ उद्दंड खेळखेळोनी गेले ॥ पुंडलीक भाग्य श्रीविठ्ठले ॥ नकळे आश्चर्य कोणतें ॥ धन्य त्या पुंडलीक पाटलाची यादकर ॥ १८ ॥ खेळखेळतां अंग हरपलें ॥ चित्त मन उन्मन झालें ॥ कान सुखें निवाले ॥ एकाजनार्दनीं ऐसें केलें ॥ धन्य त्या श्री विठ्ठल रायाची यादकर ॥ १९ ॥

## नवलाई.

॥ २६५१ ॥ आतां जालें नवलाई ॥ पुनः जन्मा येणें नाहीं ॥ १ ॥ बोधाचें कुंकू कपाळीं लाविलें ॥ भक्ती कांठीं हातीं धरिलें ॥ २ ॥ ज्ञानाचा कुर्कुला घेतला काखें ॥ प्रेमाचा खुळखुळा अनुहत वाजे ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं नवलाई जाला ॥ संतापायीं खेळावयाला आला ॥ ४ ॥

---

## बाजार.

॥२६५२॥ संसार नगरीं बाजार भरला भाई ॥ काम क्रोध लोभ याचें गिराईक पाही ॥ १ ॥ यांत सुख नाहीं त्यांत सुख नाहीं ॥ या हाटाचे सुख कोठें नाहीं ॥ २ ॥ या हाटासी थोर थोर भेले ॥ नारद शुक भीष्म उमगला ॥ ३ ॥ आणिक संतीं बाजार पाहिला ॥ व्यर्थ जाणोनि निराश भाविला ॥ ४ ॥ या बाजारीं सुख नाहीं भाई ॥ माझें माझें ह्मणून वोझें वाही ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं बाजार लटिका ॥ संत संगावाचुनी नोहे सुटका ॥ ६ ॥

---

## पोर.

॥ २६५३ ॥ ऐकरे ब्राह्मणाच्या कारठ्या ॥ वलवल करूं नको पोरठ्या ॥ बोलणें अवघें वोखट्या ॥ हित नाहीं ॥ १ ॥ आपुलें तूं हित पाहीं ॥ वेद शास्त्रीं कांहीं नाहीं ॥ पुराणें पढोनी केलें काई ॥ हित नाहीं ॥ २ ॥ काम क्रोधें शरीर भरलें ॥ ज्ञान वैराग्य हारपलें ॥ बोलसी विषयाच्या बोलें ॥ हित नाहीं ॥ ३ ॥ आपुलें हित करी कांहीं ॥ सद्गुरूसी तूं शरण जाई ॥ मी तूं पणा नुरे कांहीं ॥ हित पाहे ॥४॥ एकाजनार्दनीं पोर ॥ केला सारासार विचार ॥ पावला सद्गुरुद्वार ॥ हित जालें ॥ ५ ॥

---

## भटीन.

॥ २६५४ ॥ अगे ऐकें भटनी ॥ कां बोलसी चावटनी ॥ जन्मांतर पाळिलें ह्मणोनी ॥ उपकार फेडिसी ॥ १ ॥ काय बोललीस बोल ॥

अवघा सारा फोल ॥ अंगीं नाहीं भक्तीची ओल ॥ भटनी तुझ्या ॥ २ ॥ काम क्रोधें माजली ॥ विषयानें भुलली ॥ गुरु कृपा नाहीं जाली ॥ भटनी तुजला ॥ ३ ॥ अहंकार सोडूनी देईं ॥ सद्गुरूसी शरण जाईं ॥ भक्तिसुखें तूं राहीं ॥ हो भटनी ॥ ४ ॥ भट बोलला बोली ॥ भटनीची अहंता गेली॥ भटनी ती स्थिर झाली ॥ एकाजनार्दनाचे पायीं ॥ ५ ॥

---

## हिंदुतुर्कभांडण.

॥ २६५९ ॥ परीयेसी एक भजन विरुद्ध ॥ हिंदु तुर्काचा संवाद परीसावा ॥ १ ॥ हिंदुकु तुरुक कहे काफर ॥ तो ह्मणे विटाळ होईल परता सर ॥ दोहींसी लागली करकर ॥ वेवाद थोर मांडिला ॥ २ ॥ तूं सुनरे बह्मन मेरी बात ॥ तेरा शास्तर सब कुराफत ॥ खुदासे कहते पाव हात ॥ उनसे ज्जात नवाजे ॥ ३ ॥ ब्राह्मण ह्मणे ऐक तुर्का परम मुर्खा ॥ सर्वांभूतीं देव देखा ॥ हा सिद्ध सांडोनी आवांका ॥ शून्यवादी कां जालासी ॥ ४ ॥ तुर्क कहे सुनरे बह्मन पानबुडे ॥ बुडकक्या मारे पानकुकडे ॥ तुमारा शास्तर जो कुइ पढे ॥ वो बडे नादान ॥ ५ ॥ कमाख लोके शास्तर चलाया ॥ खुदासे कहते भीक मंगनेकुगया ॥ बलीनें पकर परदार किया ॥ लोक भुलायाहीकाकतसे ॥ ६ ॥ तुमारा शास्तर सबही ढीला ॥ अल्लापरलेते हीला ॥ क्यां मारुवलविला ॥ कुलायो बात ॥ ७ ॥ ब्रा० तुमची किताब तुह्मासी नाठवे ॥ सुलखनमो मीनपढादेवें ॥ प्रथम आबदुल अल्लाहुवे ॥ तो ह्मणे भीकभिस्तीके मेवे ॥ ही भीक तुमची या देवें ॥ उपदेशिली ॥ ८ ॥ फकर आफजल खुदाकु भावे ॥ भीक देतां घेतां भिस्त जावे ॥ भिक्षा पान परब्रह्म भावे ॥ ही दीक्षा देवें दाविली ॥ ९ ॥ तु० फकर साक्ष बोलतो ॥ फकर फजतारी खुदाने नवाजा हये॥ फकर आकारी खुदाकु ॥ फकर भावता खुदाकु ॥ फकर लाडील खुदाकु ॥ फकर आलेरव खुदाकु ॥ १० ॥ वय तंवकली ॥ हजादर हाजरते ॥ गाजीया दरगजा ॥ मुकी दर भिस्त रफेल ॥ गाफीलादर दो कुजा ॥ अल्ला ये खालकी गाफीला दरदोजखी ॥ फकीर मा तो भीक ॥ अल्ला दोष नेला ॥ ११ ॥ अल्ला वलकल तालीलतु अल्ला ॥ हरसीर मौजुद तु अल्ला ॥ खलकखालीक तु अल्ला ॥ नजरनाजीर तु अल्ला ॥ खलकखालीक तु अल्ला नजरनाजीर तु

अल्ला ॥ १२ ॥ जीव जीवा तु अल्ला ॥ मीठेमीठाइ तु अल्ला ॥ आकल आकीला तु अल्ला ॥ पोट भरावया भीक तु अल्ला ॥ दोषनेला ॥ १३ ॥ अल्ला तुपरोटीका नवला ॥ अल्ला दुधभात दे मला ॥ अल्ला वडेवडोची दे मला ॥ अल्ला क्षीर साखर दे मला ॥ १४ ॥ ब्राह्मण ॥ श्लोक ॥ भिक्षाहारी निराहारी ॥ भिक्षा नैव प्रतिग्रहः ॥ असंतोवापिसंतोपि ॥ सोमपानं दिनेदिने ॥ १ ॥ बळी खुदाचा खास बंदा ॥ त्याच्या भुलला भक्तीवादा ॥ त्यापाशीं देव तिष्ठे सदा ॥ तुह्मी कां निंदा करीतसा ॥ १५ ॥ तु० तुमारा ब्रह्मा बेटीचोद ॥ वो पढेसो झुठे बेद ॥ तुमारे शास्तरमों भेद ॥ बबुनाद लथीके ॥ १६ ॥ झुठे लथींपे केंवकेव चलावे ॥ खुदाकी चोरता चोर लेगये ॥ उसे बांदरे मदतहुवे ॥ वो शास्तरपढ मुवे ॥ गफलत खावे गुम रहो ॥ १७ ॥ ब्रा० ॥ जीस ह्मणा बीबी आई ॥ सोंग न करा तिचे ठाईं ॥ तुर्कांची नष्टाई पाही ॥ ब्राह्मणाचे ठाईं निंदिती ॥ १८ ॥ बाबाआदम हुवा जोडा ॥ ही किताबी तुह्मी पढा ॥ आपुलें शास्त्र नेणा धडफुडा ॥ आह्मासी झगडा कां करितां ॥१९॥ बाबा आदम मामा हावा व्याली ॥ त्यापासून दुनया अदमी जाली ॥ आदम नामें सांगा आपुली ॥ बोलतां भुली तुमची तुह्मा ॥ २० ॥ बाबा आदम मामा हवा जाली ॥ ती ह्मणतां तुह्मी सैतानें नेलीं ॥ सीता रावणानें चोरिली तीका बोली उपहासा ॥२१॥ तेव्हां फिरस्ती बेटें केलें ॥ जब राईल इजराईल ॥ मन काईल मसकाईल ॥ मीत काईल फतेमामा हवा घेऊन आले ॥ रामें जुत्पती बोलाविले ॥ सीता शुद्धि करावया ॥२२॥ तु० ॥ सुनरे बह्मन आकल गधडे ॥ जबा राजी जबा जोडे ॥ तुमारा शास्तर जो कुई पडे ॥ वो बडे गाफील ॥ २३ ॥ गाफील नो खुदा बंदखानी लाया ॥ उसे कंसासुर मारने आया ॥ देवकीनें खुदा छुपाया ॥ वो शास्तर भुलाया नादानें ॥ २४ ॥ छुप छुप बंद खलास किया ॥ इनो बातो पर बोध लाया ॥ खुदासें कहते जेहर पीलाया ॥ या ही लाया या सालीम ॥ २५ ॥ आप मुसे आप फजीत होते ॥ खुदासे कहते गुरे रखते ॥ वो बाता सुनसुन रोते ॥ खुदासे कहते ढोरकु ॥ २६ ॥ काफरणो अक्कल छोली ॥ खुदाकी बडाई सालीम तोडी ॥ क्या मारू थापडी ॥ जबा जोडी भी कर्ता ॥ २७ ॥ ब्रा० ॥ तुमची मुसाप बोलो कांहीं ॥ खुदा मौजुद सर्वा ठायीं ॥ तो कांहीं बंद खाणी नाहीं ॥ हा विरुद्ध वायां तुह्मी माना ॥२८॥ ज्याहां मनकी बढाई ॥ ताहां खुदा येक देशी नहीं ॥ गैबमो खुदा छपा

भाई ॥ ही फारशी पाही तुह्मी पढा ॥ २९ ॥ दील खुदा मुस्कुल धरे ॥ तो दील म्याने खुदा भरे ॥ बंदेका बंद खलास करे ॥ हेही पैगंबर बोलिजे ॥ ३० ॥ आवली आब लिया शहा मर्दाना आली ॥ आर मुल बोली ॥ गाय गज बांदरे ॥ समस्त रक्षिजे परमेश्वरें ॥ हीं तुमचीं किताबीचीं उत्तरें ॥ तुह्मी त्यां कांरेमानाना ॥ ३१ ॥ कुता कवा च्युवडी चीवडे ॥ वोही रक्षणें खुदा खडे ॥ आपुलें शास्त्र धडफुडें ॥ आह्मासी झगडे कां करितां ॥ ३२ ॥ तु० ॥ रहेर हेबत्मन जो गांढी ॥ हीं क्या ही काक तुने मांडी ॥ बंदगी करना सालीम लंडी ॥ शीरदाढी मुंढी खुदानें ॥ ३३ ॥ तुम हिंदुअस्सल बुरे ॥ फतरके पुतळे सबकरे ॥ उसका नाम खुदा धरे ॥ येक तारीकरी उस जगा ॥ ३४ ॥ उसके हुजुर पुराना पढे ॥ वोरता मर्द सब खडे ॥ उसके आगे लीडलीड पडे ॥ नन्हे बडे नादानो ॥ ३५ ॥ जीस फत्तरपर सेंदुर चढे ॥ उसके आगे वोरता बडे ॥ निंब पेहरने नंगे खडे ॥ मागे पोंगडे उनके पास ॥ ३६ ॥ तुमारा बेद सब ही ढीला ॥ तमाम बैता नामाकुला ॥ फत्तर बंदगीकरा गलबला ॥ खुदा गाफीलागफलती ॥ ३७ ॥ ब्रा० ॥ जळीं स्थळीं काष्ठीं पाषाणी देव ॥ हा तुमचे किताबींचा मुख्य भाव ॥ तुमचा तुह्मास नकळे पाहा हो ॥ पूर्ण अभाव तुर्कांचा ॥ ३८ ॥ थिजलें विघुरलें येक ॥ तैसा सगुण निर्गुण एकत्व देख ॥ तुह्मी प्रतिमेचा करता द्वेष ॥ परम मूर्ख अविवेकी ॥ ३९ ॥ जीजी नेत करी बंदा ॥ तीती पूर्ण करी खुदा ॥ तुमचे किताबीचा बांधा ॥ तुमचे बोधा कां नये ॥ ४० ॥ तुमचा अभाव तुह्मासी प्रगट केला ॥ जवळील खुदा दूर बोभाईला ॥ येकबार अल्ला येकबार अल्ला ॥ बाकि हैरान जाला ॥ नाहीं भेटला अद्यापी ॥ ४१ ॥ दुरीलासी हाक मोठी ॥ जवळल्यासी कान गोष्टी ॥ तुह्मासी नीकट नव्हे भेटी ॥ वोरडोनी उठी मुख्य मुलाना ॥ ४२ ॥ खुदा माना पश्चिमेकडे ॥ येर अवघें काय वोस पडे ॥ मौजुदह्मणा चहूंकडे हें धडपुडें तुह्मी नेणा ॥ ४३ ॥ पंच वस्तु खुदाचे जाले ॥ बाकी बस्तु काय चोरीं नेलें ॥ तुमचे शास्त्र तुह्मी भुलले ॥ देवासी केले येक देशी ॥ ४४ ॥ आह्मी ह्मणतां पूजितां फत्तरे ॥ तुह्मी कां मुडद्यावर ठेवितां चिरें ॥ दगडाचे पूजिता हाजरे ॥ पीर खरे ते माना ॥ ४५ ॥ केवळ जे कां मेलें मढें ॥ त्याचीं जतन करितां हाडें ॥ फूल गळफ फत्तरा यावरी चढे ॥ उदफुले तुह्मी वाहता ॥ ४६ ॥ तु० ॥ गंगा नाहे हुये पाक ॥ तो क्या करे जुदा जुदा पाक ॥ बीटाळ

बीटाळ मारे हाक ॥ सब रापा दोजकीं ॥ ४७ ॥ कां हो सर्वांभूती भगवद्‌भाव ॥ वल्ले येक जगा खान कोन खाव ॥ बीते बीत अंतर बताव ॥ जुदा जुदा ठाव अल्ला पदा ॥ ४८ ॥ खाना खाते उसका दाना उसपर चढे ॥ उसकी नरडी लेन दवडे ॥ आगे होके नमन जोडे ॥ दोनो राव तो खडे जमातीमो ॥ ४९ ॥ वोरत आपघर खाना खावे ॥ उसे सैपाक मेता करे करावे ॥ रात ज्याकर उसपास सोवे ॥ तब ना कहे नापाक ॥ ५० ॥ जीसकी बेटी लाड लावे ॥ उस संमधीकी घर खाना न खावे ॥ बेटी भावे खाना न भावे ॥ बडी किताब बह्मनोकी ॥ ५१ ॥ आमुचा पाक प्रेमनिष्ठा ॥ त्याचा पाक परम खोटा ॥ समंध्यामो संमधीष्ठा ॥ शास्तर झुटा तुमारा ॥ ५२ ॥ बेटी पाक बाप नापाक ॥ तुमारे शास्तर कि हुई राख ॥ हीला दोजख बह्मणकु ॥ ५३ ॥ ब्रा० ॥ तुह्मी तुरुक परम मुर्ख ॥ नेणा दोष निर्दोष ॥ प्राणी प्राणीयातें देतां दुःख ॥ भीस्ती सुख तुह्मा कैचें॥५४॥ खुदा मारी ते मुरदार देख ॥ तुह्मी मारा ते पवित्र चोख ॥ खुदापरीस तुह्मी जाले ती पाक ॥ यवन हलक दोजकी ॥ ५५ ॥ जबे करून तुह्मी सांडा कुकडे ते फडफडी तुह्मापुढें ॥ येणें तुह्मां काय सबब जोडे ॥ पढत वेडा मुलाना सालीम ॥ ५६ ॥ जबे केलीया भीस्त पावे बकरा ॥ तरी तुह्मी नीमाजा रोजे का करा ॥ आपुले जबे आपण कां नकरा ॥ भीस्ताच्या घरा जावया ॥ ५७ ॥ हजारज बेकरी येकला ॥ येक उठवितां तरी मुलाना भला ॥ भीस्ती श्रम व्यर्थ पडिला ॥ दोष घडला प्रत्यक्ष ॥ ५८ ॥ हिंदु मुसलमान दोई ॥ खुदाने पैदा किहे भाई ॥ तुर्कांची नष्टाई पाई ॥ हिंदु धरूनी मुसलमान केला ॥ ५९ ॥ हिंदु करता खुदा चुकला ॥ त्यासी हुनी थोर तुमच्या आकला ॥ हिंदुस मुसलमान केला ॥ गुन्हा लाविला देवा ॥ ६० ॥ तु० ॥ जबे करनारकु परम दोख ॥ तुरुक कहे वो साच्या देख ॥ गुणा लाया इने हेक ॥ झगडा नाहाकी करना ॥ ६१ ॥ जबे करता मुलाना बैत बोले ॥ भी उठावनकु जीभ न हाले ॥ यो खुदा बिगर किसका चेले ॥ बह्मण बोले वो सहीवात ॥ ६२ ॥ नरडी काटी भिस्ती दस्त ॥ वो जातका मगन मस्त ॥ आगलेकु करता खस्त ॥ खुदा शस्त करेगा ॥ ६३ ॥ ब्राह्मण ह्मणे अहो जी स्वामी ॥ वस्तुता येक आह्मी तुह्मी ॥ वेवाद वाढला नीति धर्मी ॥ जात परब्रह्मीं असेना ॥ ६४ ॥ तु० ॥ तुरुक कहे बात उसही ॥ खुदाकु तो जात नही ॥ वंदे खुदासे नबी जुदाई ॥

येबात सही समजो ॥ ६५ ॥ ब्राह्मण ह्मणे सर्व कर्म धर्म ज्याचा निमाला ॥ मनोधर्म तुरुकें ऐकिला ॥ आनंद परम जाला ॥ मंत्र उपदेश कहो ॥ ६६ ॥ तु० ॥ तेवेळीं केलें नमन ॥ येरें दिधलें आलिंगन ॥ दोघां झालें समाधान ॥ आनंदें संपूर्ण निमाले ॥ ६७ ॥ आह्मीं तुह्मीं केला झगडा ॥ तो परमार्थाचा बोध उघडा ॥ प्रबोधावया महा मूढा ॥ कर्म जडा उद्बोध ॥ ६८ ॥ शब्दीं मिनला शब्दार्थ ॥ दोहींसी बाणला परमार्थ ॥ परमार्थ मनोरथ ॥ जाले तृप्त दोहींसी ॥ ६९ ॥ एक वाक्य विवाद ॥ विवादीं जाला अनुवाद ॥ एकाजनार्दनीं निजबोध ॥ परमानंद दोहींसी ॥ ७० ॥

---

## शकुन.

॥ २६५६ ॥ कैकाय कैकाय तुज सांगते शकुन ॥ येणें मार्गें गेलें नाहीं आलें परतून ॥ आरता येई तुज सांगतें शकून ॥ वरल्या देशींची वस्तु एक निधान ॥ १ ॥ हिंडत कैकाय तिचा घरीं भ्रतारु ॥ सांवळा डोळस माथां दुडियांचा भारु ॥ एकु तें एक तिचें कडीये लेंकरूं ॥ भुरळ घालुनी भुलविले नारी आणि नरु ॥ २ ॥ भूर भंगी धूर धुमाळीं गेलीं चारी युगें ॥ आतां येईल तुज एक निजखूण सांगे ॥ चौऱ्यांयशी सिद्ध गेले येणें मार्गें ॥ नारद तुंबर ऋषी तेही गेले भंगें ॥ ३ ॥ ब्रह्माविष्णुरुद्र तेही काळें ग्रासिले ॥ सीतापति पुरंदर चंद्र मावळले ॥ सव्वा लक्ष घडामोड माया सूत्र खेळे ॥ परिसा पहातां पिंड ब्रह्मांड आगळें ॥ ४ ॥ बोलती कैकाय भूर होईलगा दादा ॥ लटिकाची माया मोह लावियेला धंदा ॥ लक्षामध्यें जाणें भेद विरळा एखादा ॥ यालागीं चिंतीं दिननिशीं परमानंदा ॥ ५ ॥ बोले कैकाय दादा उद्यां होईल भूर ॥ डोळिया पातें लवे ऐसा संसार ॥ मुकियानें गुळ खादला न सांगवे विचार ॥ एकादनार्दनीं तुह्मीं भजा हरिहर ॥ ६ ॥

॥ २६५७ ॥ टाळ मृदंग मोहरी ॥ नौबद वाजे नानापरी ॥ १ ॥ घणघणाणा घंटा वाजे ॥ घणघणाणा घंटा वाजे ॥ २ ॥ उपासना याचे पाईं ॥ अवघी माझी विठाबाई ॥ ३ ॥ एका जनार्दनीं भाव ॥ अवघा माझा पंढरीराव ॥ ४ ॥

॥२६५८॥ हळदोली वाटुनी वाटीला पाटा ॥ अगुणाचा नोवरा हळदुली उठा ॥ १ ॥ नागवा नवरा नागवी नवरी ॥ दोघे बैसले चराचरीं ॥ २ ॥ नागवा नवरा नवरी नेसला ॥ नागव्या नवरीनें नवरा वेढीला ॥ ३ ॥ सभामंडपीं दोघे ते दोघे ॥ एकाजनार्दनीं नाचती भोगें ॥ ४ ॥

॥ २६५९ ॥ हम तो जोगी रे बाबा संजोगी ॥ ध्रु० ॥ वहुत दीनके पुराणें बीरला बुझे कोइ लाखोमे ॥ गुरु साहेब जाणें ॥ १ ॥ जबका जोगी तबका जोगी ना ॥ जोगी जगु जगु जीवे ॥ हातमो पयाला लिया प्रेमका जोगी भरभर पीवे ॥ २ ॥ जोगीकु धुंडत जोगया कीणे लछे नही पाया ॥ एकाजनार्दन कृपासो जोगी पकरहीलाया ॥ ३ ॥

॥ २६६० ॥ अगाध तुझी लीला आकळ कैसेनी कळे ॥ ब्रह्म मुंगी धरूनी तुझें स्वरूप सांवळें ॥ १ ॥ तुज कैसें भजावें आपणा काय देखावें ॥ तुज माजी राहुन तुज कैसें सेवावें ॥ २ ॥ अगा देव तूं आह्मा ह्मणसी मानवी ॥ हेम अलंकार वेगळे निवडावे केवी ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं सबाह्य अभ्यंतरीं नांदे ॥ मिथ्या स्वप्न जात जेवि जाय तें बोधे ॥ ४ ॥

---

## ताकीदपत्र.

॥ २६६१ ॥ समस्तराजकार्यधुरंधर परगणें शरीराबाद ॥ सुंमातैन लोली प्रवाहे ॥ ताकीदपत्र दिलें कीं कायापुरास जिवाजी नामें गृहस्थ कऊल देऊन देहगांवची वस्ती रक्षावया निमित्त पाठविले आहेत ॥ हरएकविशीं साहिस करावें ॥ मनाजीराव सुभेदार बुधाजीपंत फडणीस व चित्ताजीपंत चिटणीस हे पदरीं थोर मनुष्य असतां ॥ अहंकारपंत सबनीस याचे हवालीं सर्व देहगांवचा कारभार केला ॥ त्याचे धन्याचे घरचे मुत्सद्दी घरीं बसवून ॥ नवीन मुत्सद्दी कामगार उभे केले ॥ तें हें चांगलें नव्हे ॥ विकल्पाजी महाजन व मोहाजी शेटे व कामाजी कोतवाल व क्रोधाजी नायकवाडी व द्वेषाजी जमेदार अधिकार जासूद लोभाजी पोतनीस विकारपंत जकातदार मत्सरजी मेहेऱ्या कुतर्कोजी गस्तवान् उन्मत्तजी पाटील कुबुद्धिपंत कुळकर्णी भ्रमाजी शिपाई मदाजी देशपांड्या दंभाजी देशमुख प्रपंचपंत मुजुमदार मूर्खाजी हुजरे स्वार्थाजी खिजमतगार अविवेक

पुराणीक अज्ञानमशालजी हे नवीन कामगार उभे केले ॥ व घरांतील पहिल्या दासी उभ्या केल्या ॥ त्या आशा मनशा तृष्णा कल्पना ममता माया प्रीति भुली भ्रांती इच्छा वासना भ्रमणा कुबुद्धि निंदा अहंता चिंता निद्रा मोहनी ह्या कर्मकर्त्यावादी ॥ अहंकारपंत सबनीस यानें उभ्या केल्या ॥ त्यांनीं दरोबस्त परगणा बुडविला ॥ आणि यमाजीपंत कमाविसदार यांचे घरीं एकांतस्थळ स्थापन केलें ॥ त्यावरून हें ताकीदपत्र सादर केलें ते मुत्सद्दी व कामगार त्यागावे ॥ आणि सरकार हुजुरचे मुत्सद्दी कामगार आहेत तर त्याचे हातें काम घ्यावें ॥ मुत्सद्दी तपशील ॥ शुद्धसत्वभाव वैराग्य विवेक बोध परमार्थ आनंद समाधान निर्वैर स्वानुभव धैर्य सत्य भजन पूजन हे कारभारी ॥ आणि कार्यकर्त्या सुशीला सुबुद्धि उन्मनी प्रतिष्ठा नवविधामर्यादा शांति क्षमा दया नम्रता समाधि ह्या कार्यकर्त्या हे मुत्सद्दी यांचे हातीं काम घ्यावें ॥ याजविषयीं सरकारांतून ताकीद झाली आहे ॥ तर लिहिल्याप्रमाणें वहिवाट करावी ॥ सबनीस मजकूर याचे कामगार मुत्सद्दी ॥ दरम्यान या कामांत आल्यास पारिपत्य केलें जाईल ॥ हें स्पष्ट समजावें ॥ सरकार कामगार उभे करावे याप्रमाणें वहिवाट करावी ॥ एकाजनार्दनीं शरण ॥ हे आशीर्वाद ॥ हें ताकीदपत्र ॥

---

## पत्र.

॥ २६६२ ॥ माझें पत्र धन्याला ॥ वैकुंठवासी नांदतो त्याला ॥ असा धनी माझा भला ॥ माझ्या पूर्वजांचा उद्धार केला ॥ १ ॥ भक्त संकटीं रक्षिला ॥ मजवर फार उपकार केला ॥ तडीतापडी धांवून आला ॥ पत्राचा मजकूर त्यानें पाहिला ॥ २ ॥ संकट पाहूनी मला बोध केला ॥ चार खाणी नऊ दरवाजे ॥ दश इंद्रियें हाच बोध केला ॥ ३ ॥ भुक्ति मुक्ति शक्ति मजपाशीं ठेविल्या ॥ ऐसे चारवेद वर्णी ॥ एकाजनार्दनावाणी ॥ ४ ॥

---

## हुषारी.

॥ २६६३ ॥ हुषियार बंदे हुषियार ॥ तेरा तन खबरदार ॥ तुझे खिलावन एक नार ॥ बतादेव सतरावी ॥ घर पाई है ॥ १ ॥ वडेबडे

साधूसंत ॥ उनसें कर ले एकांत ॥ बतादेव सिद्धांत ॥ आवे सद्गुरू जनार्दनके प्रतिपाल ॥ एकनाथ तुह्मारे ॥ फकीरमे रहताहें ॥ २ ॥

---

# दिवटा.

॥ २६६४ ॥ जागे जागे या वाडिया मध्यें जागे ॥ या वाडियाबाहेर जागे ॥ किती एक तळमळ करीत गेले ॥ हेंचि खिडाराचें खिडार ॥ कोण्या गृहस्थाच्या पेठांत ॥ कोणा सदैवांच्या वाड्यांत लवकरी काढा बैसावया घोडा ॥ करी या शब्दाचा आडा मोडा ॥ तरीच लेंकुराचा खेळकीं राया ॥१॥ पैल लंकेचा चोहटा ॥ तेथें मी एक बोलिलों दिवटा ॥ तो रांडेचा रावण ह्मणे हा दिवटा खोटा राक्षसावाणीच बोले तेव्हां राम अवतरला ॥ त्यानें एकचि खांडें ॥ दहाशिरांचीं मुंडें ॥ विसा भुजांचीं खांडें ॥ सा लंकेपुढें घोष मांडिले ॥ २ ॥ आणखी त्या बायकोच्या छंदें ॥ सा हिरण्यकशिपाला फुटला फांटा ॥ तो ह्मणे हा दिवटा खोटा ॥ मी ह्मणे मरण नाहीं मला ॥ तो ह्मणे जिवें मारीन तुला ॥ इतक्यामध्यें नरसोबा ह्मणे अवतरला ॥ डोळे फिरवी गरगरां ॥ दांतखाय करकरां ॥ कोंभा चकचकावला ॥ हलु गांड्याळीचे द्वारीं ॥ दे दान मज दिवट्याला ॥ नाहीं तरी नागवसी या बोलाला ॥ आणखी दान दे गांवच्या जोशाला ॥ ३ ॥ तेणें विघ्न टळेल तुझें ॥ पण पांच कणकीचा दिवा ॥ मध्यें मण पांच घृत ॥ सोळा हात पासोडा ॥ दिड तोळा सोन्याचा माकोडा ॥ ऐसें द्यावया दान एकदाता जनार्दन ॥ इतर लंडी काय देऊं जाणें ॥ ज्याला आळुकेपण विषयाचें एका जनार्दनाचा दिवटा ॥ भक्तीच्या वसविल्या पेंठा ॥ सायुज्यताची नरदेहीं ॥ ४ ॥

---

# पोर.

॥ २६६५ ॥ आरता येरे धाकुट्या मुला ॥ कशानें आलें थोरपण तुला ॥ उलीसेंच कींरे दिसतें पोर ॥ ब्रह्मीं नाहीं लहान थोर ॥ तुला ब्रह्म ठाउकें आहे ॥ सर्वां घटीं तेंचि पाहे ॥ ब्रह्मीं नाहीं भेदाभेद ॥ ऐसें बोलती चारी वेद ॥ तुझा भेद गळाला ॥ सद्गुरुनें बोध केला ॥ भेद

ह्मणजे कायरे गड्या ॥ आत्मस्वरूप पाहींरे वेड्या ॥ उलीसेंच पोर चावट मोठें ॥ थोरपण असून चहाड खोटें ॥ माझें मन काय चहाड झालें ॥ ज्ञानामुळें गर्वासि आलें ॥ गर्व जाईल कैशा परी ॥ सद्गुरूचें दास्य करी ॥ सद्गुरु कृपा तुळाच झाली ॥ भूतमात्रें भरूनि उरली ॥ तरी काय एकएक नेले ॥ अविश्वासीं बुडूनि मेले ॥ विश्वास कैसा रे केला ॥ हा तो निश्चय पुराणीं झाला ॥ सद्गुरूविना तरेना प्राणी ॥ सांगें तरला आहे कोणी ॥ भजन तरी करावें केव्हां ॥ सोहंमंत्रीं नाहीं गोंवा ॥ जावें तरी कोणे दिवशीं ॥ नेम नाहीं दिवस निशी ॥ सद्गुरूसी शरण जाईना तरी ॥ चौऱ्यांयशीचे पडशील फेरीं ॥ ह्मातारपणीं भक्ति करूं ॥ आयुष्य काय तुझें आज्ञाधारू ॥ धाकुटेपणीं भक्ति केली ॥ सद्गुरूची संगत जाहली ॥ संगतीनें कोण कोण तरले ॥ महापातकी उद्धरिले ॥ पाहिलें तें कोळ्याचें पोर ॥ अजामेळा चोखामहार ॥ ऐसे तरले कितीएक पोरा ॥ मिती नाहीं रे गव्हारा ॥ जावास जाव फार देतोस ॥ बोलूं नये तें बोलतोस ॥ उगाच रहा नाहींतर देईन दोन कांठ्या ॥ अहंकाराच्या होतील खोट्या ॥ तुझा माझा झालाकींरे वाद फार ॥ पांच पोरांनीं घेतलें घर ॥ पांच पोरें कोणाचीं ॥ आत्माराम गड्याचीं ॥ सारा खेळ साचाच कायरे ॥ खेळ खेळून निराळाचकींरे ॥ हा खेळ तुळा कशानें कळला ॥ एकाजनार्दनकृपें फळाशीं आला ॥

---

## मुलगी.

॥ २६६६ ॥ आरते येगे धाकुटे मुली ॥ हीच काग तुमची बोली ॥ घरादाराचें हित कर्ते ॥ फुटक्या मडक्याचें भोंक बुजविते ॥ अटकमटक नऊ वाटा ॥ येऊन बसे सदा दारवंटा ॥ सदा दारवंटा ते कोण ॥ तुझ्यांत गेले दोन ॥ फटक माझे सवती ॥ तुला सहाजण झोंबती ॥ पडले षड्विकारांच्या हातीं ॥ षड्विकार कशानें जाती ॥ सद्गुरुचे पाय धर चित्तीं ॥ सद्गुरु काय देईलग मला ॥ तन मन धन अर्पण करीन तुला ॥ संसार जाईल सारा ॥ उद्यां येईल काळाचा फेरा ॥ आह्मी नरनारी पतिव्रता ॥ विष्णु वर करूं सत्ता ॥ एकाजनार्दनीं केला संग ॥ योगी खेळविला पांडुरंग ॥

---

## टिटवी.

॥ २६६७ ॥ टिटवी यमाची तराळीन ॥ ध्रृ० ॥ एका गांवावर जाऊन ॥ एका नदींत विहीर पाडून ॥ तेथें टिटवी करी शयन ॥ दोन्ही पायांत खडा धरूनगा ॥ १ ॥ मरे चवगुल्याची सून ॥ पाटलाचे चौघे जण ॥ कुळकर्ण्याची लाडकी सून ॥ आतां गांवांत राहिलें कोणगा ॥ २ ॥ देशमुख देशपांडे चौधरी ॥ त्यांची गणना कोण करी ॥ शेलकी देशमुखाची पोरी ॥ आतां गांवांत नाहीं थोरीगा ॥ ३ ॥ कोणी कोणाचें कोण ॥ शेवटीं नेऊन मारीन ॥ माझे संगें येक कामीन ॥ एका जनार्दनीं थोरपणगा ॥ ४ ॥

---

## पिंगळा.

॥ २६६८ ॥ पिंगळा महाद्वारीं ॥ बोली बोलतो देखा ॥ डौर फिरवितो डुग डुग ऐका ॥ ध्रृ० ॥ वरल्या आळीला ॥ तुम्हीं सावध रहावें ॥ पाटील बुवाला ॥ मग लावून सर्वें ॥ चिठी येईलबा ॥ मग पडेल ठावें ॥ १ ॥ मधल्या आळीला ॥ एक बायको फिरे ॥ तिजला तुम्ही साधा ॥ मग पडेल पुरें ॥ नाहीं तरी पाटलोबा ॥ तिचीं पळतिल गुरें ॥ २ ॥ आणिक एकबारे ॥ सुटेल तांतडी ॥ पाटील बुवाची ॥ मग पडेल माडी ॥ तिचीं पांच पोरें ॥ लागतिल देशो धडी ॥ ३ ॥ आणिक एक ऐका ॥ कैंचें नवल झालें ॥ गांवच्या पांड्यांनीं ॥ पाटलास नागविलें ॥ साऱ्या कागदाचें शून्य एकच केलें ॥ ४ ॥ हिंडतां फिरतांना ॥ एक शकुन सांगे ॥ त्याच्या सत्तेनें ॥ ह्या आळीस वागे ॥ संतां घरचा बा एक तुकडा मागे ॥ ५ ॥ हें जरी न ऐकाल ॥ तरी दुसरा येईल ॥ सरते शेवटीं बा ॥ काळ बांधून नेईल ॥ एकाजनार्दनींबा ॥ आमचें काय जाईल ॥ ६ ॥

---

## बुलबुल.

॥ २६६९ ॥ लखो बुलबुलहै ॥ हवाजे तुमे मुबा रखो ॥ ध्रृ० ॥ झुटा तेरा जप ॥ भात रोटी गप ॥ सद्गुरुमें चप ॥ तुझे काल करेगा गप लखो बुलबुल है ॥ १ ॥ लागोसो मेलिया नाम ॥ हेजी सदाभरे काम ॥ भला

आशा बेफाम ॥ तुझे कहा मिलेगा राम ॥ लखो बुल० ॥ २ ॥ मोकूं आंगकूं लगाया राख ॥ आत्मा होवेगी नापाक ॥ भला आशामें डुबलगे ॥ एकाजनार्दनका बंदा ॥ लखो बुलबु० ॥ ३ ॥

---

## वटवाघूळ.

॥ २६७० ॥ पूर्वीं पंक्तीस केला भेद ॥ नाहीं अंतःकरण शुद्ध ॥ झालें वटवाघूळ प्रसिद्ध ॥ धृ० ॥ वट वाघूळ झालें बाई ॥ करावें काई ॥ उपाय नाहीं ॥ वटवाघूळ झालें० ॥ १ ॥ वटवाघळीचा जन्म घेऊन ॥ घेतलें उफराटें टांगून ॥ तोंडीं नरक भरला जाण ॥ वटवाघूळ० ॥ २॥ वटवाघळीची यातना मोठी ॥ भोगिल्या लक्ष चौऱ्यांशीं कोटी ॥ जन्ममरणाच्या तुटल्या गांठी ॥ वटवाघूळ झालें० ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं वटवाघूळ झालें ॥ सद्गुरुला शरण गेलें ॥ जन्ममरण चुकविलें ॥ वटवाघूळ झालें बाई ॥ ४ ॥

---

## पाखरूं.

॥ २६७१ ॥ कृष्णा एक पांखरूं आहे ॥ तें मुखावीण चारा खायरे ॥ डोळे नाहीं परि तें पाहे ॥ वाचेवीण सोय गायरे ॥ १ ॥ सख्या त्याचें नांव कान्होबा ॥ कृष्ण ह्मणती सर्वरे ॥ त्याचें वास्तव्य कोठें आहे ॥ पर नाहीं परि तें उडेरे ॥ २ ॥ तिहीं लोकीं हिंडतें ॥ त्रिभुवन त्याला थोडेंरे ॥ त्याचे नखांत आकाश बुडे ॥ तो सन्मुख चहूंकडेरे ॥ ३ ॥ अहो त्याला मायबाप दोन्ही नाहींरे ॥ एकपणेंविण पहाती ॥ जनार्दनाचे पायरे ॥ ४ ॥

---

## जगझोडी.

॥ २६७२ ॥ मी जग झोडी जग झोडी ॥ नांव ठेविलें लाडी ॥ ध्रु० ॥ पाल मांडिला वेसीपासीं ॥ आला गेला भोगितो मशीं ॥ मी जगझोडी० ॥ १ ॥ नाहीं लागत अडका रुका ॥ काम लाटा फुकाचे फुका ॥ मी जगझो० ॥ २ ॥ एकाजनार्दनीं जोडी ॥ त्याची संगत मी न सोडीं ॥ बाई मी जगझो० ॥ ३ ॥

---

## झोंप.

॥ २६७३ ॥ उठाजी मायबाप कशी लागली झोंप ॥ हुजूर जाऊनियां येवढी चुकवा खेप ॥ धृ० ॥ रात्रंदिवस तुह्मी सावध असा ॥ तुमच्या नगरीचा आह्मां नाहीं भरंवसा ॥ उजेड पडतां गळां पडेल फांसा ॥ १ ॥ तुमची नांदणूक आह्मां दिसेना बरी ॥ तुमच्या शेजारीं हो एक मूळ वाद करी ॥ २ ॥ हिंडतां देशांतरीं लक्ष चौऱ्याशीं जागा ॥ अजून आठवेना आला मूळच्या मार्गा ॥ आमच्या बोलण्याचा तुह्मां येईल राग ॥ ३ ॥ मागल्या ठेवण्याचा कांहीं ऐवज काढा ॥ त्याचे सत्तेनें आह्मीं बोलूं घडघडा ॥ एकाजनार्दनीं धरा बळकट मेढा ॥ ४ ॥

---

## मोतीं.

॥ २६७४ ॥ धुतांच मोतीं जळीं हरपलें सखोल मोठें पाणी ॥ चला पाहूं सात चार अठरा जणी ॥ धृ० ॥ प्रपंच धोंडा मृगजळ पाणी ॥ आपटीत होतें चोळी ॥ विसरलें सुख घसरलें तळीं ॥ सखे मायेनें मोतीं दडविलें भवसिंधूच्या जळीं ॥ होती गडे भ्रांती बहिण जवळी ॥ तिणेंच मजला गोष्टी बिनविल्या चित्त गेलें भुलोनी ॥ चला पा० ॥ १ ॥ अठाजणींनीं मोतीं दडविलें वर ठेविला धोंडा ॥ अशाच पहाती अवघ्या रांडा॥ बारा सोळा तळीं उतरल्या त्यांनीं धरिला दांडा ॥ ठाऊक सत्राविला झेंडा ॥ त्यामध्यें मी गर्क झालें येकलीच बाई वनीं ॥ चला पा० ॥ २ ॥ चवधीजणी सत्वर मिळोनी डोळीं अंजन घाला ॥ माझ्या मोत्याला प्रेमें न्याहाळा ॥ ज्ञान बोधाची लावून दिवटी बरवी वात उजळा ॥ माझे मोसाला सर्वकळा ॥ प्रपंच पडदा फाडून गुरु पदीं लावागे ठिकाणीं ॥ चला पा० ॥ ३ ॥ चौघीजणी मोक्ष नाइका मजला धरा हातीं ॥ उतरा सागर पैल पंथीं ॥ या मोसाच्यासाठीं मजला जाणें आहे सती ॥ ह्मणून मी येतें काकुळती ॥ एकाजनार्दनीं चिन्मय मोतीं न मिळे गुरुवांचुनी ॥ च०॥ ४ ॥

---

## मांग.

॥ २६७५ ॥ हयात मायबाप हयात ॥ गांव असतां वस पडलें॥ घर असतां जळून गेलें ॥ जोडे असतां कांटे मोडले॥ ते माझ्या जाळींत सांप-

डले ॥ हयात मायबाप हयात ॥ १ ॥ गांवचे पाटील मरून गेले ॥ त्याचे नारीनें चुडे भरिले ॥ त्याचे वाड्याचे बुरूज ढांसळले ॥ तें पोर चोरींत सांपडलें ॥ हयात मायबाप हयात ॥ २ ॥ एकाजनार्दनीं मांग ॥ पाटिल आपुले नारीला सांग ॥ सांगितलें तर काम ॥ नाहींतर उफराट्या झाडासी टांग ॥ हयात मायबाप हयात ॥ ३ ॥

## चौघडा.

॥ २६७६ ॥ पंधरा सतरांचा हो मेळा ॥ कारखाना झाला गोळा ॥ वाजविती आपुल्या कळा ॥ प्रेमबळा आनंदें ॥ १ ॥ झडतो नामाचा चौघडा ॥ झ० ॥ ध्रु० ॥ झडतो नामाचा चौघडा ॥ ब्रह्मीं ब्रह्मरूपींचा हुडा ॥ संत ऐकताती फोडा ॥ प्रेमबळा आनंदें ॥ झ० ॥ २ ॥ जनाबाई घड्याळ मोगरी ॥ घटका भरतां टोला मारी ॥ काळ व्यर्थची गेला तरी ॥ गजर करी आनंदें ॥ झ० ॥ ३ ॥ दामा नामा दोनी काळु ॥ नारा विठा दमामे फेलू ॥ चौघी सुना चारी हेलू ॥ कडकडा बोल उमटती ॥ झ० ॥ ४ ॥ गोंदा म्हादा करणी करी ॥ नामें दुमदुमली पंढरी ॥ अंबुबाई तुंतारी ॥ मंजुळ स्वर उमटती ॥ झ० ॥ ५ ॥ गोणाबाई नौबत पल्ला ॥ नाद अंबरीं कोंदला ॥ राजाई झांज मंजुळ बोला ॥ मंजुळ स्वर उमटती ॥ झ० ॥ ६ ॥ तेथें चौकाबारी दार ॥ काटवन विंजन जाळीजे सार ॥ अवघे झाडवणी महार ॥ एकाजनार्दनीं पार उतरला ॥ झ० ॥ ७ ॥

## बागुल.

॥ २६७७ ॥ अरे नकोरे येउं बागुलबावा ॥ तान्हा माझा निजला रावा ॥ हरेरे निजरे बाळा ॥ मोठा जटाधारी आला ॥ ध्रु० ॥ अरेरे नको येऊं कोल्ह्या लांडग्या ॥ हरेरे नि० ॥ १ ॥ हालवित आला पान्हा ॥ एकाजनार्दनीं लाविला थानारे ॥ हरेरे नि० ॥ मोठा जटाधारी आला ॥ २ ॥

## कुंटिण.

॥ २६७८ ॥ सद्गुरुमाय कुंटिण झाली माझी ॥ व्यभिचारा ठेविलें सयेआजी ॥ अद्वैताचा मज पांघरला शेला ॥ एकांतासी तिणें चालविलें

मला ॥ १ ॥ परपुरुषाचे शेजेवरी नेउनी घातली ॥ मागल्याची सोय सोडविती झाली ॥ २ ॥ भ्रांतिपदर काढुनी ओढिती झाली ॥ आलिंगन द्यावया सरसावली ॥ ३ ॥ वासनेचे कंचुक सोडियेले ॥ मायामय कुच हे मर्दियेले ॥ ४ ॥ जीवशिवमिठी घाली धरी आंवळून ॥ करून ऐक्यता माझें चुंबिलें वदन ॥ ५ ॥ अलक्ष पदातीत घातलें आसन ॥ देहातीत भोगिला भोग त्याणें ॥ ६ ॥ एकाजनार्दनीं भोळी नारी ॥ परपुरुष भोगि निरंतरी ॥ ७ ॥

---

## विवेकवैराग्य.

॥ २६७९ ॥ विवेक वैराग्य दोघे भांडती ॥ ज्ञान अज्ञान पाहातीरे ॥ आपुले स्वरूपीं होऊनि एकचित्त पहाती सकळ सृष्टीरे ॥ ध्रु० ॥ हुतुतुतुगडिया ॥ खेळ हुतुतुतुरे ॥ रामकृष्णगोविंद हरिनारायण ॥ निश्चितीनें भजन करारे ॥ १ ॥ हिरण्यकश्यप प्रल्हादपुत्र खेळत आले हातघाईरे ॥ बळेंच गेला फळी फोडुनी पित्यासि लाविलें डायीरे ॥ २ ॥ रामरावण रणीं भीडती तो खेळ बरवा मांडिलारे ॥ कुंभकर्ण आखया इंद्रजितासी तिघांशीं पाडिलें डायींरे ॥ ३ ॥ कौरव पांडव हुतुतु खेळती ॥ खेळिया चक्रपाणीरे ॥ विवेक हुतुतु जिवें मारिला ॥ उरूं दिल्हा नाहीं कोणीरे ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं हुतुतु खेळतां ॥ मन जडलें हरिपायींरे ॥ काम क्रोध जीवें मारिले ॥ पळून गेला साईरे ॥ ५ ॥

---

## दादला.

॥ २६८० ॥ मोडकेंसें घर तुटकेंसें छप्पर ॥ दळावया जातें नाहीं॥१॥ मला दादला नको बाई ॥ ध्रु० ॥ फाटकें लुगडें तुटकीसी चोळी गुंजभर सोनें नाहीं ॥ मला दा० ॥ २ ॥ हरभऱ्याची भाकर आंबाड्याची भाजी ॥ वरती तेलाची धार नाहीं ॥ मला दा० ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं समरस झालें तो रस येथें नाहीं ॥ मला दादला नको बाई ॥ ४ ॥

---

## माळी.

॥ २६८१ ॥ आत्माराम आपण वनमाळी ॥ ज्ञान कुदळी घेऊनि वाफे चाळी ॥ जाई जुई लाविल्या दोन्ही ओळी ॥ निज योगिनी

शिंपिती वेळोवेळीं ॥ १ ॥ पूर्व पश्चिम उत्तर दक्षिणहो ॥ या मळ्याचे सारिखे चारी कोनहो ॥ रक्षण तेथें ठेविले पांच जण हो ॥ प्राणापान व्यान उदान समानहो ॥ २ ॥ बावन पायऱ्या हे वीहीर निर्धारी ॥ सतत उपसा होतसे परोपरीहो ॥ ऐसी विहीर बोळली क्षीरसागरींहो ॥३॥ बोडवेचें चाक सत्रावी घडघडाटहो ॥ सोहं दोर लाविला खाला नीटहो ॥ शांती क्षमेची रहातसे मोटहो ॥ निज नयनाचा लाविला पाटहो ॥ ४ ॥ हातीं खुरपें घेतलें विवेकाचें ॥ समूळ मूळ खुडविलें वासनेचें ॥ अलक्ष फळ लाधलें आत्मा साचें हो ॥ एकाजनार्दनीं माळी-तेथें नाचेहो ॥ ५ ॥

---

## बायला.

॥ २६८२ ॥ बाय माझ्या बापाचा बायला झाला ॥ गोड गोड लिंबच वाटून प्याला ॥ अठरा मुलें झालीं त्याला ॥ १ ॥ बाय माझें बापानें पोट फाडिलें पोट फाडिलें ॥ माझा बाप करितो चाळे ॥ गरवार झाला तिसरे वेळे ॥ बाळ मांडीवरी खेळे ॥ बायमा० ॥ २ ॥ माझा बापही गुणेकारी ॥ साहा मुलें झालींसे उदरीं ॥ टाकूनि गेला देशावरी ॥ बाय० ॥ ३ ॥ माझा बाप अविनाश ॥ निर्गुण आला आकारास ॥ एका शरण जनार्दनास ॥ ४ ॥

---

## जातें.

॥ २६८३ ॥ सुंदर माझें जातेंग फिरे बहुत ॥ ओंव्या गाऊं कौतुकें तूं येरेबा ॥ १ ॥ जीवशिव दोन्ही खुंटे हो प्रपंचाचें नेटेहो ॥ लावुनी पांची बोटें तूं येईबा ॥ २ ॥ सासुसासरा दीर तिसरा ॥ ओंव्या गाऊं भ्रतारा तूं येरेबा ॥ ३ ॥ बारासोळागडणी अवघ्या कामिनी ॥ ओंव्या गाऊं बसुनी तूं येरेबा ॥ ४ ॥ प्रपंच दळण दळिलें पीठ भरिलें ॥ सासु पुढें ठेविलें तूं येरेबा ॥ ५ ॥ सत्वाचें आधण ठेविलें पुण्य वैरिलें ॥ पाप तें वोतून गेलें तूं येरेबा ॥ ६ ॥ एकाजनार्दनीं जातें गाइलें कीर्त राहिली ॥ थोडासा लाभ होईल तूं येरेबा ॥ ७ ॥

---

## कानोबा.

॥ २६८४ ॥ तेंरे तेंरे तें कानोबा तेंरे तेंरे तें ॥ ध्रु० ॥ पहिलें कोठेंच न्हतें कांहीं ॥ चंद्र सूर्य तारा नाहीं ॥ अवघें शून्यच होतें पाहीं ॥ कानोबा तेंरे तेंरे तेंबा ॥ १ ॥ तेथें एक ढालगज निर्माण झाली ॥ तिनें पहा एवढी ख्याती केली ॥ इंद्रादिकांस ह्मणे बाहुलीं ॥ अमरपुरी तिची घरकुली ॥ कानोबा० ॥ २ ॥ ती मूळची कर्णकुमारी ॥ तिचा बाप तो ब्रह्मचारी ॥ तो जन्मला तियेचे उदरीं ॥ ऐसी पाहतां नवलपरी ॥ कानोबा० ॥ ३ ॥ तिनें बापची दादला केला ॥ कोण वाईट ह्मणे या बोला ॥ अवघें तिच्याच बोलणें चाला ॥ तरी कैवल्य सुख तुझांला ॥ कानोबा० ॥ ४ ॥ तो तियेसी शिवला नाहीं ॥ वांझ गर्भिण झाली पाहीं ॥ व्याली पांच पंचवीस पोरें तेही ॥ ऐशी तियेची नवलपरी ॥ कानोबा० ॥ ५ ॥ ऐशी व्याली ती सकल सृष्टी ॥ न पडतां भ्रताराचे दृष्टी ॥ एकाजनार्दनीं या गोष्टी ॥ विचारा सद्गुरूच्या मुखीं ॥ कानोबा० ॥ ६ ॥

---

## गौळण.

॥ २६८५ ॥ माझें अचडें बचडें छकुडें ग राधे रूपडें ॥ पांघरुण घालिती कुंचडें ॥ धृ० ॥ हरि माझागे सांवळा ॥ पाई पैंजण वाजे खुळखुळा ॥ यानें भुलविल्या गोपी बाळा ॥ माझें० ॥ १ ॥ हरि माझागे नेणता ॥ करी त्रिभुवनाचा घोणता ॥ जो कां नांदे त्रिभुवनीं ॥ माझें० ॥२॥ ऐसे देवाजीचे गडी ॥ पेंद्या सुदाम्याची जोडी ॥ बळिभद्र त्याचा गडी ॥ माझें० ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं चक्रपाणी ॥ खेळखेळतो वृंदावनीं ॥ लुब्ध झाल्या त्या गौळणी ॥ माझें० ॥ ४ ॥

---

## पांखरूं.

॥ २६८६ ॥ राई येवढें पांखरूं दादा त्रिभुवनीं त्याचा थारा ॥ धृ० ॥ नर आणि नारी त्या बा पांखराचा चारा ॥ पिंडीं आणि ब्रह्मांडीं त्याचा अनुभव घेतां चुकेल चौऱ्याशींचा फेरा ॥ राई० ॥ १ ॥ एकवीस स्वर्गांवरती त्या बा पांखराची उंची ॥ डोळ्यांतिल बाहुलें त्या बा पांखराची

निंची ॥ सप्तही सागर पांखरूं घेऊन गेलें चुंची ॥ राई० ॥ २ ॥ पिंड आणि ब्रह्मांड मछिंद्रनाथानें दाविलें ॥ त्याच्या अनुग्रहें गोरक्षनाथानें ओळखिलें ॥ तयाच्या प्रसादें एकाजनार्दनीं गाइलें ॥ राई० ॥ ३ ॥

---

## बाहुलें.

॥ २६८७ ॥ एक तांब्याचें बाहुलें केलें ॥ पाट मांडुनी वरी ठेविलें ॥ वस्त्र अळंकारीं गुंडाळिलें ॥ मना आलें तें नाम ठेविलें ॥ या जनांस लागलें वेड ॥ १ ॥ शुद्ध पाण्यानें पाखाळिलें ॥ गंध फुलानें झांकोळिलें ॥ धूप करुनी दीपें उजळिलें ॥ अन्न पुढें ठेवुनी चाळविलें ॥ याज० २ ॥ फेरे घालूनि भोवंडिलें ॥ आड पडोनी दंडवत केलें ॥ आपपर नाहीं देखिलें ॥ एकाजनार्दनीं ओळखिलें ॥ ३ ॥

---

## वेडी.

॥ २६८८ ॥ वेडी तूं वेडी कांहींच नेणें ॥ घेऊं जाणे परी देऊं न जाणे ॥ १ ॥ असो आतां कैसें वाटतसे जिवा ॥ पुरणाची पोळी तुपेंसी सेवा ॥ २ ॥ कपाळाचे मिषें चुलीपाशीं बैसे ॥ लोणीयाचे गोळे कणकीचे दिवसे ॥ ३ ॥ दुध मांडियाची सवे लागली फार ॥ दहीं भातावरी पापडाचा चूर ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं वेडी न कहाडी ॥ खोटें नाणें टाकुनी खरें नाणें निवडी ॥ ५ ॥

---

## श्रीएकनाथ रणलेखन.

॥ २६८९ ॥ एकीकडे भेद एकीकडे बोध दोहीसी मांडले रण ॥ आपुलेनि बळें सावध व्हा पां मारील मीतूंपणा ॥ १ ॥ समत्वें चालतु अनुहाते गर्जतु कोणी न राहे सन्मुख ॥ जिंतीले म्हणोनी स्वानंदें गर्जती भेदाचें काळें मुख ॥ २ ॥ जारे जा जारे जा पळोनी भेद सांडी आपुलें ब्रीद ॥ तुजवरी एक चालोनी आला उपडील समूळ कंद ॥ ममता भाली पहिलें आली विवेकें धरीं री माझारी ॥ अवघें आहे तें मीची एकु ॥ मा रुतेल कैशापरी ॥ ३ ॥ विषयाचा मेढा वाउनीं पुढा बिंधतो संकल्प

बाण ॥ स्वानुभवाची संजुती लेऊनि तोडिले कोंदड जाण ॥ ४ ॥ अहंकार भाला क्रोधें तिखट इच्छा आणि हें देख दारुण ॥ शांतीचे वोढणें शमाचेनि घायें ॥ हाणोनि केला चुर्ण ॥ ५ ॥ प्रपंचदळा कामना सुरी आशा धार हे तिखट भारी ॥ वैष्णवांचें रज तें भातें मज हाणें तोंडावरी ॥ ६ ॥ निर्वाणीचा डावो अविद्येचा घावो वासना वज्र हें आलें ॥ सत्याचेनि अंगें साचार पाहतां मिथ्यत्वें नासोनि गेलें ॥ ७ ॥ तुझा दळी शुन्य हे बळी त्याची बोधें केली होळी ॥ अनेक सैन्य ते पळोनि गेलें घातला पायातळीं ॥ ८ ॥ लीन होऊनी भेद आला भीतरा सोहंतेचा केला थारा ॥ सद्गुरु प्रभा शोधुनि पाहतां धाकेंचि झाला पुरा ॥ ९ ॥ भेदु नाहीं नाहीं सहज तें सम आनंदें उभविली गुढी ॥ मागें पुढें एक सारिखें झालें सरल्या संसार ओढी ॥ १० ॥ शांती आतपत्र तन्मयाचें छत्र विजयीं झाला आदटु ॥ एकाजनार्दनीं एकांग विरु स्वानंदें साम्राज्य पटु ॥ ११ ॥

---

# श्रीएकनाथ अखेर लेखन.

॥ २६९० ॥ प्रथम नमन गजानना देवारे आरंभीं आरंभ विघ्न विनाशन एकदंता देई निजसेवा ॥ १ ॥ एकदंत हें नांव तव मिथ्या ॥ रूप रेखा नाहीं नमन त्यासि कांहीं ॥ एकदंत कोठें पाहे आतां ॥ २ ॥ आतां नमु ते वाग्देवता रस शब्दाच्या कुसरी ॥ वदवि वागेश्वरी ॥ वाचा वाचक तेचि तत्त्वता ॥ ३ ॥ वाचा वाचक अनादि देवो ॥ वागेश्वरि ते येकेचर काढिली ॥ तिच्या नांवा रुपा नाहीं ठावो ॥ ४ ॥ नांवें रुपें कुळि कुलदेवता रे ॥ मूळपीठ निवासिनी येकली ये ॥ कलि उदो करुनि कुळदेवतारे ॥ ५ ॥ कुळेंविणें कें कुळदेवतारे ॥ जाती कुळें विणें येकली येकली ॥ न नव्हे देव ना देवतारे ॥ ६ ॥ देवा देवता पूज्य सज्जन सज्जनी ॥ सज्जन जनीं जनार्दन ॥ त्याचे कृपेस्तव आह्मीं धन्यरे ॥ ७ ॥ धन्य धन्य तुझा भावो ॥ संतीं संतपणें देवा आदि देवो ॥ त्याचि प्राप्ति लागीं मनुष्य देहो ॥ ८ ॥ भक्ति असो मुक्ति दवडारे ॥ मुक्ति माजी भजन भाव नाहीं मुक्त ह्मणणें हाही बोल कुडारे ॥ ९ ॥ मनुष्य देहीं आल्या हेचि गतिरे ॥ निज भावें भजन भवबंधन छेदन ॥ मुक्ति साधावि ते करुनि भक्तिरे ॥ १० ॥ मुक्ति कुडी नव्हे येणें गुणें मन पवन रोधणें ॥ साधिली साधनें ॥ ते मुक्ति

कुडी केवि ह्मणणें ॥ ११ ॥ मुक्ति कुडी ऐसी पाहिरे ॥ साचें बद्धता नाहीं मां मुक्तता न काई ॥ तुझी भ्रांति तुज दोहीं ठाई ॥ १२ ॥ भ्रांति छेदक ते मुक्ति पाहीं ॥ मुक्ति तेची भ्रांति घडे कैशा रीति ॥ तुझ्या बोलण्याची शुद्धि नाहीं रे ॥ १३ ॥ शुद्ध नेणा स्वरूपाची स्थितीरे ॥ पाहतां स्वरूप स्थिती ॥ मुळीं नाहीं भ्रांति तिसी छेदक ते कैसी मुक्तिरे ॥ १४ ॥ मुक्ति जन्मे तव भक्तिचे कुसरी ॥ भक्ति मुक्ति योगें भवसिंधु तरले ती मुक्ति मिथ्या केवि ह्मणसीरे ॥ १५ ॥ ह्मणसी मुक्त जन्म तव भक्तिचे कुशी ॥ मुक्ति राहे तेथें भक्तिसी खाये ॥ मातृहंती मुक्ति कवण पोशी ॥ १६ ॥ मुक्ति लागीं तव कीजे पैं भक्तिरे ॥ भक्तिसी मुक्ती खाये ॥ ऐसें जैं होये तैं ती उछेदिली भक्ति मुक्तिरे ॥ १७ ॥ भक्ती करिसी तरी भेद न मनीं ॥ सर्व भूतीं भावो भगवद्भक्ति पाहो ॥ तैं मुक्ती वाहे घरींचें पाणी ॥ १८ ॥ घरीं करितां भावें भगवद्भक्ति ॥ तेणें भजनें संतोपला देवाधिदेवो ॥ तो भेटताहे सर्व भूतींरे ॥ १९ ॥ भूतें भगवंत ये दोन्ही एक ॥ अलंकार सोनें दोन्हीं एकपणें ॥ तैसा विश्वंभर देख ॥ २० ॥ विश्वंभर तो वैकुंठराजा ॥ मुगुट कुंडले मेखला कासे सोनसळा ॥ शंखचक्रांकित चार्‍ही भूजा ॥ २१ ॥ देव एकदेशीं नव्हे कांहींरे ॥ निर्गुण निराकार अव्यय अक्षर ॥ यासी देहादि आकार नाहींरे ॥ २२ ॥ नाहीं ह्मणसी तूं आकार कैसारे ॥ शंखासुरें चारी वेद नेले ॥ तैं कान्होबा झाला झाला मासारे ॥ २३ ॥ वेदरूपें नारायण साचें ॥ तो शंखासुरें नेला ॥ तोचि मच्छ झाला ॥ हें बोलणें माईक आहाचरे ॥ २४ ॥ हाचि नव्हे अगुणाचा हरीया हरीया ॥ ह्मणोनि बुडकुळी दिधली तेणें कमठाचें रूप धरिया ॥ २५ ॥ अगुणी कदां नव्हे रुपधारी ॥ सूर्य अंधारीं जैं बुडे ॥ तैं अगुणी सगुण घडे ॥ तुझी कल्पनाते कुमठा धरीरे ॥ २६ ॥ अकारे उठिला सोरु दाढाग्रीं अवनि हिरण्याक्ष वधुनि ॥ आमुचा कान्हो झाला धरणीधरूरे ॥ २७ ॥ धरा आदि महा भूतें पाहोये ॥ कल्पित कल्पना मायिक जाणायासी सर्वदा अलिप्त देवो ॥ २८ ॥ देवो नेणसी तरी ह्मणसीं हूं हूं प्रल्हादा कारणें मर्गज भेदिला ॥ तैं कान्हो झाला नरसिंव्ह ॥ २९ ॥ भावें प्र्‍हाद भावार्थी बहू ॥ ज्यासी जैसा भावो त्यासी तैसा देवो ॥ साचा भाव झाला नरसिंरे ॥ ३० ॥ भावें ब्राह्मणाचें बाळ मुंजारे बळीचिया दारा ॥ दान मागों गेला तैं तो वामन झाला खुजा ॥ ३१ ॥ देव खुजा तुम्ही केवी म्हणा

अनंत अपरापर त्रिविक्रमधर ॥ खोटा बोल तुमचा खुजेपणा ॥ ३२ ॥ खुजेपणें मागीतलें दाना ॥ त्रिविक्रम मापें मोजुनि पैं घेतां ॥ तेणें दासासी बांधलें जाणारे ॥ ३३ ॥ बळीसी दातेपणाचा अभिमान ॥ निज अभिमानें करी बद्धता संसारी साचा अभिमान त्यासी बंधन ॥ ३४ ॥ देवो बळीचा द्वारीं असे पाहीं ॥ वरकड ठायीं देवोचि नाहीं ॥ ऐसें माईक बोलसी काईरे ॥ ३५ ॥ बंधू करितां बळीसी छळ आपुलेनि छळें ॥ आपण छळला देव द्वारीं झाला द्वारपाळ ॥ ३६ ॥ माया मारोनी जिवविली जेणें ॥ ते जननी परशरामानीं निक्षेत्री धरा केली तेणें ॥ ३७ ॥ माया मिथ्यत्व सर्वत्र पाहवो ते कैसी मारिली पुढती जिवविली हें बोलणेंची वावो ॥ ३८ ॥ वाया निर्गुणी करितोसी श्रम सूर्यवंशीं राम यदु कृष्ण याचें चरित्र परम पावनरे ॥ ३९ ॥ राम निर्गुणत्वें चरीत्र रामनामें भुक्ति मुक्ति नामें नामें परम गति ॥ रामचरित्र यालागीं श्रेष्ठ ॥ ४० ॥ श्रेष्ठ आमुचा कृष्ण देवो तुझ्या रामाचें पवाडे कायसे कृष्णापुढें ॥ आकळा अवतारीचा आभिमावो ॥ ४१ ॥ आकळ आकारी विनोद केला शिवाचे जें ध्येय वेदार्थाचें गुह्य राम वानरासी सखा झाला ॥ ४२ ॥ सखा झाला तो गौळियासी पाही ॥ ज्याचें उचिष्ट न लभे नलभे गुराखी जेविती त्यासवें पाहीं ॥ ४३ ॥ पायीं लागतां आवळिला चरणस्पर्शें जेणें गौतमाची वधु रामें अहिल्या तारिली हेळा ॥ ४४ ॥ हेळा तारिली पूतना पाहीं ॥ पाजूं आली विख ॥ तिसी निजसुख कृष्णचरित्र सांगो मी काई ॥ ४५ ॥ काय वानिसी श्रीकृष्णदेवो देवाचिया कोडीं ॥ पडलिया बांदवडी रामें हेळा सोडविल्या पाहे ॥ ४६ ॥ पाहतां बाळ बळियाते मारी कृष्णें काळिया नाथिला ॥ वत्सासूर त्राहाटिला ॥ अघ बग बाळपणीं चिरी ॥ ४७ ॥ बाळपणीं बळियाते मारी ॥ ताटिका भेदुनी सुबाहु छेदुनि गुरु विश्वामित्र सुखी करी ॥ ४८ ॥ गुरु सुखी केला कृष्णें पाहीं त्याचा निमाला पुत्र आणुनि दिधला ॥ कृष्णा समान तव दुजा नाहीं ॥ ४९ ॥ नाहीं श्रीरामासमान कोण्ही ॥ रामनामें गणिका कळिकाळ वंदिती कृष्णनामें सांग केलें कायी ॥ ५० ॥ काय वानिसी श्रीराम थोरु ॥ सुमुखा घायीं रणीं संग्रामासी भ्याला निर्लज्जे मारिला वाळि वानरू ॥५१॥ निर्लज्जें काय सांगतां गोष्टी काळयवन येतां देखे कृष्ण पळे धाकें ठकुनि मारिले मुचकुंदा दिठी ॥ ५२ ॥ दृष्टी देखीली रामाची थोरी वसोनी वनवासी किर्ती केली कैसी ॥

थिती बाईल नेली चोरी ॥ ५३ ॥ चोरी करितां तंव सदा गोकुळीं ठकोनि गौळणी खातां दही लोणी कृष्ण मायें बांधिला उखळीं ॥ ५४ ॥ मातृभक्त कृष्ण सिरोमणी तेणें निमाले पुत्र आणुनी दिधले ॥ तेणें सुखी केली निज-जननी ॥५५॥ कृष्णें सुखी केली सखी जननी निज राज्य सांडोनी ॥ राम वनवासी झाला वनीं ॥ ५६ ॥ वनवासीं केली प्रसिद्धी होऊनिया वेडे बाइली लागी रडे ॥ दैवें हनुमंतें आणिली शुद्धि ॥ ५७ ॥ श्रुद्धि नाहीं तुह्मां गोवळाली सीताव्याजें करी सागरीं ॥ सीतां तारी रामें बांधिले सेतु बंधासी ॥ ५८ ॥ रामकिर्तीं सेतु बंदीं कायसी ब्रह्मशापें करी नळ सिळा तारी ॥ वाऊगी किर्ती रामाची ते ऐसी ॥५९॥ऐसे अमित रामदास भारी ॥ एके उड्डाणें सागरीं लंका होळी करी ॥ ऐसा कोणी आहे तुमचे घरीं ॥६०॥ घरीचा बळीया बळीभद्र सृष्टी जेष्ठ बंधु आमुच्या सेवका सम केला ॥ निर्लज्जे काय सांगाल गोष्टी ॥ ६१ ॥ कृष्णीं सेवकाचा पांगु नाहीं गोव-र्धन गिरी ॥ धरूनि निजी करीं कृष्णें गोकुळ राखीलें पाही ॥६२॥ कृष्ण-प्रताप वानरा पुसी नव्याण्णव सहस्र दुरी होता द्रोणगिरी ॥ हनुमान घेऊनि आला निमिष्येसी ॥६३॥ रामदुत ह्मणविता कैसे घुळगुसी आंगें लाबें लाबे पुसे ॥ तुमचें तोंड काळें कांपा दिसे ॥ ६४ ॥ राम न ह्मणे त्याचें तोंड काळें आह्मी रामनामांकित कळी काळा नागवो ॥ बींज नेणा हें तुह्मी गोवळ ॥ ६५ ॥ गोवळेपणाची ऐके पां कीर्ति ॥ मल्लातें मर्दुनी कुवळीया मारुनी धनुर्यागीं लाविली ख्याती ॥६६॥ धनुष्यें रगडिलें लंकानाथा त्र्यंबक भंजुनी भार्गव गांजुनी ॥ रामें प्रतापें पर्णिली सीता ॥ ६७ ॥ प्रतापें हरिली भीमकी होडा ॥ शिशुपाळ गांजुनी चौध्यादि भंजुनी रुक्मिया रणीं विटं-बिला गाढा ॥ ६८ ॥ गाढा कानाडी वोढुनि मेढा ॥ रावण कुंभकर्ण निज-बाणीं छेदिलें सिरें न समाती लंके पुढा ॥ ६९ ॥ पुढा धर्मासी देखोनी घातु टाळता लाखा जोहारी ॥ काढील विवरीं धर्मसंरक्षण कृष्णनाथु ॥ ७० ॥ कृष्णें कैसा धर्म स्थापियला ॥ कृष्णा मागें धर्म महापंथीं रिघाला ॥ रामें बिभिषण अचळ केला ॥ ७१ ॥ केला अभिनव पवाडा मोटा ॥ निद्रेमाजीं मथुरा द्वारकें आणिली ॥ कृष्ण सामर्थ्य असंत लाटा ॥ ७२ ॥ कृष्ण-सामर्थ्यें कायसा लाटा ॥ शत्रुभेणें मथुरा घेऊनी पळाला ॥ रामें अयुध्या नेली वैकुंठा ॥ ७३ ॥ कृष्णें वैकुंठ दाविलें येथें ॥ खेळे मेळे संघाती वैकुंठ भोगीती ॥ काय वानाल व्यर्थ रामातें ॥७४॥ रामें वेद वाणिलासें पाही ॥

रामनामें कासीक्षेत्र केली ॥ कृष्ण नामीं हे शक्ति तंव नाहीं॥७५॥शक्तीभेद झाला लक्ष्मण बंधु घेऊनी ॥ पुढें श्रीराम पै रडे रामसामर्थ्याची कोण गणना ॥७६॥ राम सेवकाचा ऐका महिमान ॥ सूर्योदयीं येतां सारुनि मागुता दिव्यौषधी घेऊनी आला हनुमान ॥ ७७ ॥ हनुमान तुमचा आमुची सेवा करी ॥ अर्जुनाचे ध्वजीं कृष्णें बैसविला आह्मीं देखिला कुरुक्षेत्रीं ॥ ७८ ॥ हनुमान आला ऐकोनी कृष्ण धाकें ॥ लाहे लाहे अंगें श्रीराम पै झाला ॥ नाहीं तरी धुमसीता यथा सुखें ॥ ७९ ॥ कृष्ण राम झाला हें निश्चित ॥ भीमकी माता ते झाली सीता वचन मानलें हें सत्य सत्य ॥ ८० ॥ राम-कृष्ण स्वरूप तंव एक रामदासा आणि गोपाळा ॥ पडिले आलिंगण प्रेमें वोसंडलें परम सुख ॥ ८१ ॥ सुखें गोपाळ गाती असरे आखरीं आखर ॥ झेलीती वानर हरिखें वोसंडले सुखथोर ॥ ८२ ॥ हरीखे गोपाळ नाचती पाही वेगें घालुनी वांकुली घालिती हुंबली धांवोनी लागले वानरा पायीं ॥ ८३ ॥ वानरीं मिठी घातली पायासी गोपाळ धरूनी पोटेसी ॥ उडाले वेगेसी ऐक्य आळंगीले चिदाकाशीं ॥ ८४ ॥ ऐक्या माजी नाहीं सगुण गोठी ॥ सगुण अवताराची कोटी ते निर्गुणीं नाहीं घाली पां मिठी ॥ ८५ ॥ .... .... .... .... ॥ ८६ ॥ सगुण तितुकें ही अंतवंत अंतवंत ते ठायीं नित्य ॥ सुख नाहीं निर्गुण सुख अपरमित ॥८७॥ तूप थीजले विघुरले जैसे थिजल्या विघुरल्या भिन्न भावो नाहीं ॥ थिजल्या माजी अधिक गोडी दिसे ॥ ८८ ॥ गोडी अधिक उणी कोठें नाहीं स्वादु साखरे रासी तेचि पै रजासी ॥ तैसें सम सुख सर्वां पाहीं ॥ ८९ ॥ सर्व पाहतां ते साकार दिसे साकाराचे सुख भीन्न भीन्न देख ॥ सम सुख भोग केवी दिसे ॥ ९० ॥ समसुखी सुख कोण ह्मणते सबाह्य स्वरूप सुखी सुख-रूप ॥ सुख ह्मणते नुरेची पै तेथें ॥९१॥ सुख भोग नाहीं जिये ठायीं सुखीं सुखत्व नाहीं तै तें शुन्यत्व पाहीं ॥ नुसत्या शुन्याचा उपेगु कायी ॥ ९२ ॥ शुन्य नेणें तो शुन्य विलासु ॥ शुन्याचा देखणा चिद्रूपत्वें जाणा शून्य साक्षित्वें शून्य निराशु ॥ ९३ ॥ शून्य साक्षित्वें शून्य निरासा शून्य शून्य गेलें निजसुख उरलें ॥ सुख भोग नाहीं ह्मणसी कैसा ॥९४॥ लवण जळीं रिघालें आवडी रवेपणाचें कोड ॥ ह्मणे उदक गोड रवा विराल्या कोण सांगे गोडी ॥ ९५ ॥ गोडी सांगावया सांगते नाहीं तरी साधिते साधन साधक जें जन ॥ अवघे निमोनी गेलें काई ॥९६॥ .... .... ॥ ९७ ॥

वृत्ति निमाल्या कैसे वर्त्तन वृत्तिविण जन मुग्ध मूढ जाण ॥ दशा पावले जडत्व गहन ॥ ९८ ॥ जड नव्हती ते स्वानंदघन आनंदु आवरिती अविद्येची वृत्ति ॥ वृत्ति निमाल्या सुख संपन्न ॥ ९९ ॥ सुखें सुखरूप साधक होती करितां स्वानंदाचें ध्यान स्वानंदीं ॥ निमग्न तेथील सांग साची कैसी स्थिती ॥ १०० ॥ ऐके स्वानंदाची ऐसी स्थिती विरुनी सैंधवाचा खडा जाहला सिंधु येवढा ॥ तैसे स्वयें पूर्ण होती ॥ १०१ ॥ पूर्ण प्राप्ती ज्यासी ब्रह्मपर्णीं त्यासी जन आणि वन कैसे दिसे भान ॥ ते वर्ततीं कैसे पां जनीं ॥ १०२ ॥ जनार्दन दोन्ही एक एक ते अनेक अनेकीं ॥ पैं एकाजनार्दनीं नित्य सुख ॥ १०३ ॥

---

## भाटी व मालेखडा.

॥ २६९१ ॥ जयजय श्रीकांता ॥ मथुरे चाल आतां ॥ शरण तुज अनंता ॥ त्राही लोकैक नाथा ॥ कर जोडोनी उभा ॥ अक्रुरी भक्ति शोभा ॥ सकळ जन स्वयंभा ॥ पाहेंपा रंगशोभा ॥ १ ॥ उद्भट धरा हरिखत चालतां स्वामी माझा ॥ नमो अच्युता अव्यया अधोक्षजा ॥ नमोयादवा माधवा विश्वबीजा ॥ नमो श्रीवत्सलांछना पदविराजा ॥ २ ॥ जया चालतां कांपति काळकामु ॥ जयालागी हा तिष्टत धीर धर्मु ॥ जो साधुचा पुसीतु जन्मुश्रमु ॥ तो मथुरे चालिला मेघःशामु ॥ ३ ॥ विकट तो मारूनि रजका वस्त्र नेकां ॥ गोपाळ देखा श्रृंगारी ॥ तो मथुरे आला पाहो माला ह्मणे चला ॥ गोपाळाते रंगाद्वारी ॥ उभे गज हारी ॥ परते सारी ह्मणे कृष्णु ॥ ४ ॥ तो अति बळ गाढु कुवलयापीडु ॥ मागती सुडु दैत्याचा ॥ त्या हाणतु लाता ॥ उपडीतु दांता ॥ घायें महावंता मुगवितुसे ॥ एक चकिता दृष्टी ॥ धाकति पोटीं ॥ पळती पाटी कंसाचा ॥ तो रंगा ते हटीं ॥ उभा जगजेठी ॥ पाहाती थाटी दैत्याचा ॥ ५ ॥ स्वरीत ॥ शिवाशिव श्रीरंगा ॥ आणिले मल्लरंगा ॥ जन नयन विभागा ॥ योगीया ध्यान भागा ॥ स्वरूपरूपनिषण्णा ॥ जींतले पंचबाणा ॥ चाळीत चित्त विघूर्णा ॥ भुलल्या तुज अंगना ॥ त्रिदशगण नियंता ॥ गोपवेशें तूं आतां ॥ जयजयश्री अनंता ॥ काळकाळादिशास्ता ॥ ६ ॥ उद्भट ॥ एक हाकीत टाकीत येत पाही ॥ एक मारिले सन्मुख येताची घाई ॥ एक हांवत हुंवत पडत ठायीं ॥ एकें भुलली दिशा दाही ॥ ७ ॥ पायीं धरूनि उपटिती ये

देख विरा ॥ तळी उभीया करीतु सैंध चुरा ॥ हाडे मोडीतु तोडितु माजुसिरा ॥ वेगें उठिला कृष्ण हा करी तुरा ॥ ८ ॥ विकट ॥ माला मारु देखोनी थोरु ॥ उठि चाणूरपैं कोपें ॥ त्या तोडरू पायीं काढतु ठायीं ॥ गर्जतु पाहे अतिरागें ॥ वीर धीर एक चालती कोपे ॥ पाडिती कृष्ण हाणोनी थापें ॥ घायें फेडितु त्याची पापें ॥ नेली परलोका जगादि बापें ॥ ९ ॥ वीर ॥ कृष्ण मारु करी घोरु ॥ हाहाकारु पैं उठी ॥ तो वर्णादोरु महा थोरु रणीं सोरु माजविला ॥ तो न ह्मणा बाळु ॥ काळा काळु रणवेताळु ॥ हलकल्लोळु पैंकेला ॥ तो दैत्या केरु फेडितु थोरु ॥ होय अवतारु सारंगधरू ॥ १० ॥ पळत पडत एके ॥ मारिलों ह्मणती एके ॥ शरण तुज कृपाळु ॥ राखवा आह्मी रंके ॥ कवण राहे रणीं ॥ मारिल्या वीरश्रेणी ॥ ११ ॥ उद्भट ॥ तया मारिता माल पळती पुढा ॥ अशुद्धें भुमी सैंध होतुसे सडा ॥ नदि वाहाती श्रोणिताचा भडाडा ॥ तेथें कोपला कृष्णु हा काळु गाढा ॥ १२ ॥ आदट दाटुगे वीर येताती वेगीं ॥ तया सणवटु ती न वचे कवणे आंगीं ॥ दिसे वगळला सांवळा रणरंगीं ॥ १३ ॥ विकट ॥ त्या देखोनी दिठी कांपती जेठी बाहे थापटी चाणुर ॥ तो निधड्या माला घेवोनि आला ॥ ह्मणे या मुला मारूं चला ॥ एक ह्मणती आह्मी अतिबळ बळें आह्मापुढें ये कायसीं बाळें ॥ थापा हाणोनी पाडुं डोळे ॥ लाऊं कळे नीमटुं गळे ॥ १४ ॥ एक पीलंगती ठायीं ॥ कवळीत भुई ॥ वर्मी पाहीं झोंबावया ॥ एक झोंबती पायीं ॥ रगडीतु ठायीं ॥ मारीतु पाही मालातें ॥ उरीं शिरीं एक हाणिती मुंडती॥ घोटा लवणी वर्मे चेपी ॥ माले माळ कवळुनि दडपी ॥ शेषकूर्म तेथें कांपती कापी ॥ १५ ॥ एक गर्वीत मदें झोंबती क्रोधें ॥ घायें अशुद्धें व मीताती ॥ एक हाणतातु चरणीं ॥ पाडीतु धरणीं ॥ अति विंदाणीं आणितु रणीं ॥ १६ ॥ स्वरीत ॥ करकरीत दाढा ॥ उपडीत-वीर गाढा ॥ रणभुमी रण रगडा ॥ कवण राहे पुढा ॥ अशनी शीत मुळी मारिले लक्षकोटी ॥ शरण तुज जगजेठी ॥ राख बा चरण भेटी ॥ १७ ॥ रणीं नाचती येक्षणी देती वाणें ॥ तेथें भैरव डुल्लती गाती गाणें ॥ शिरें चौडकें वेताळ वो जाणें ॥ भुतें नाचती हांसती रुधिरपानें ॥ १८ ॥ रणीं लागलें निशाण ताळ भेरी ॥ तुरे वाजती गाजती दिशा चारी ॥ तेथें गोपाळ करिती आनोपरी ॥ पावे वाईल्या मोहरी तल्लालोरी ॥ १९ ॥ विकट ॥ माला

गोपाळा होत कडका ॥ तडवे हाणुनि पाडीत भडका ॥ वेगु विंदानें लाविती सडका ॥ परस्परे ते हाणती थडका ॥ मुला माला करितां झोंबीं ॥ झोंबत आले ते रण खांबीं ॥ २० ॥ एक झोंबती गळा लाविती कळा ॥ भ्रमीत गोपाळा करितातीं ॥ ते देखोनी वेगें आला रागें मोडितु टांगे ॥ मालाचे धांवोनी चाणोर माथा हाला कोथला तळी मस्तक नेला ॥ पाणि न मागत प्राणें गेलाग ते वेळीं कंसु विव्हळ ठेला ॥ २१ ॥ वीर रुंडमुंड बाहु दंड ॥ पृथ्वी पुजीतो उदंड खडाखड करी विखंड ॥ तोडीत तोंड शुंडादंड ॥ मारी प्रचंड रण वीतंड ॥ मोडी कोदंड करी दुखंड ॥ मुगुट रगडिताती घाई ॥ वीर पाडीयेले ठायीं ॥ दुजा ऐसा सौरा नाहीं ॥ बळीया कृष्णु भीडत पाही ॥ २२ ॥ स्वरीत ॥ हरभवनाशा तोडिले शत्रुपाशा ॥ समपद जगादिशा धाडिले मुक्तवासा ॥ अनकळीतपद दाता जन्मकाळादि हंता ॥ सुररिपु समकर्ता त्राही बा कृष्णनाथा ॥ २३ ॥ उद्धट ॥ न्व्हो वाट कां भाट तुझे मुरारी ॥ आह्मां मारूं नको राख आतां हरी ॥ एक ह्मणती आह्मी तुझे गायी चारी ॥ एक मिषें घेती पडती प्रेताकारी ॥ २४ ॥ एक काकुळती तृणें धरिती तोंडी ॥ एक देखोनी घालिती मुरकुंडी ॥ एक धाकेंचि सोडिती लेणी लुगडीं ॥ वाया लागुनी हाती पै उघडी ॥ २५ ॥ कंसु पाहे उघडोनी दिठी तव कृष्ण आला तंवगा नेहटी॥ उठी उठी तंव धरिला झोटी ॥ वोढुनि आणि त्या तळवटी ॥ कंसु केशें धरिला पाहे ॥ मुक्ति दिधली येकेचि घायें ॥ गगनीं सुखर ह्मणती त्राहे ॥ अवघे करिती जयजयजयजयजय ॥ २६ ॥ उद्धट ॥ नमो परात्परतरा मेघःशामा ॥ नमो मत्छवाहारा तूं आदिकुर्मा ॥ नमो वामना नरहरी परशरामा ॥ तुंवा कुंटणी तारिली रामनामा ॥ नमो त्र्यंबकभंजना पै अगाधा ॥ नमो लंका विध्वंसना तुं बंधा ॥ नमो चाणूरमर्दना आदिवेदा नमो कंसनिकंदना नंद नंदना ॥ २७ ॥ स्वरीत ॥ विजय जय रणपाडी ॥ यादव उभविती गुडी ॥ नमीत जनकमाता तोडीतु जन्मबेडी ॥ सकळ प्रणिधाना सज्जनावन चंदना ॥ शरण तुज एका तारी बा जनार्दना ॥ २८ ॥

---

## भारींव.

॥ २६९२ ॥ देखी जवमाल चलियें गोपाळ ॥ सबही उठी न्हाटे ॥ माल माही बडा ॥ चाणूर अति गाढा ॥ अगे आये ठाडा ॥ हरींसुं डाटे ॥

दे दुराय सदमुख धाय ॥ उठावत वाहे ॥ गर्वसु उठे लिळा बळा कान्ह ॥ घायें लेत प्राण ॥ मुकतीको दान चरण नही छुटे ॥ १ ॥

॥ २६९३ ॥ चंदनकी पेढी ॥ चलत हे टेढी ॥ बाट माही ठाडी ॥ हरीमुख देखे चिन्ही जदुराय ॥ चंदन चढाय हरी बाहे बाहे मदन अति रोखें ॥ देखी हरी रूप कुबरी आरूप ॥ भयी अतिरूप ॥ हिया माही तोखे जानि तेको मन ॥ एका जनार्दनबिनोद ॥ वचनकुबी जाकु संतोखे ॥ २ ॥

॥ २६९४ ॥ राम रथ चढे ॥ गजदल भीडे ॥ अमीत रस छोडे ॥ कोणी रण पैठे ॥ रथ घडघडे ॥ रुधीर भडभडे ॥ अरि वर फोडे ॥ असुर सीर तुटे ॥ बाजे निशाण विकट गुण ॥ बाण घाये लेत प्राण ॥ मेरुगीरी फुटे देखी सदमुख छेदी दशमुख ॥ भये ते कुंसुख निजपद पैडे ॥ निशाचर तोडे ॥ देवबंदी छोडे ॥ पढत पवाडे बेदध्वनी उठे ॥ एकाजनार्दन असुर पंचानन ॥ शरण बिभिषण आचळ राजपैठे ॥ ३ ॥

॥ २६९५ ॥ देखी रघुराय सज्जन समुदाय ॥ नृत्त करी गाये ॥ अति प्रेम सुहावे ॥ घटप्रति राम ॥ जानि निह काम ॥ चिन्ही नीज धाम ॥ सगुण नही भावें ॥ देखी हरी रूप सहज स्वरूप ॥ निजी निज पावे ॥ निर्विकल्प मन चकीत नयन ॥ एकाजनार्दन समाधि सुहावे ॥४॥

॥ २६९६ ॥ नंदको लाल कान्ह गुवाल करत है ख्याल मधुर ध्वनी गावे ॥ गाहिन ताको नाद मनोहर स्वाद मुरली मंद मंद ब्रजगोपी बुलावे ॥ पतिपूतनिरास छांडी घरबास बिगत गतबास कामिनी जन आवे ॥ तारी नवयोवन कृष्ण राति प्राण एकाजनार्दन चित्तचेत भुलावे॥१॥

॥ २६९७ ॥ देखी मुकुंद पुनिमको चंद प्रभा भयी मंद शाम अति दित्पी प्रकाशे ॥ नाहा रात न दीन रवि शशीहीन काळ गती खीन्न कृष्ण रतिरास विकासे ॥ नारी प्रति हरि मदन करी दुरी नीजांगे मुरारी सन्मुख विभासे ॥ गोपी मनप्राणरतिको रमण एकाजनार्दन सबही रूप दिसे ॥ २ ॥

॥ २६९८ ॥ गृहस्थ होसी तरी विगुंतसी घराचारी ॥ नरौश्य भिक्षे सरी नये नये वा ॥ राजा होसी तरी भ्रमसी राजभारी ॥ नैरास्य० ॥२॥

ब्रह्मचर्य धरीसी तरी कर्माची भरोवरी ॥ नैरास्य० ॥ ३ ॥ योगी होसी तरी भरसी वाऱ्यावरी ॥ नैरास्य० ॥ ४ ॥ संन्यासी होसी तरी दंडू वाजे शिरीं ॥ नैरास्य० ॥ ५ ॥ एका जनार्दनीं निरपेक्ष भिक्षा ॥ हरीहर निजांगें वदती ते दीक्षा ॥ ६ ॥

॥ २६९९ ॥ राज्य भंगलिया भिक्षेमाजी स्वस्थ ॥ खंगलिया लक्ष्मी हाणोनी जाये लाथ ॥ १ ॥ गृहस्थ भंगलीया भीक्षेमाजी स्वस्थ ॥ खंगलिया० ॥ २ ॥ व्यवहार भंगलिया भीक्षेमाजी स्वस्थ ॥ खंगलिया० ॥३॥ कुळवाडी भंगलिया भिक्षेमाजी स्वस्थ ॥ खंगलिया० ॥ ४ ॥ सिद्धा सिद्धी भंगे भिक्षेमाजी स्वस्थ ॥ खंगलिया० ॥ ५ ॥ एका जनार्दनीं निर्लोभ भीकारी ॥ ते भिक्षेचे पाये लक्ष्मी वंदी शिरीं ॥ ६ ॥

॥ २७०० ॥ निजसखे हें जीवलग गोपाळ ॥ श्रुति साम्य धरिताति समताळ ॥ १ ॥ येथें नाच पा गोपाळा ॥ तेथें सोहं शब्द वाति ताळा ॥ रंगी नाचत लपत गोपबाळ ॥ नाना अवतारी तळपतु भवरी देतु ॥ तेथें निगमागम ह्मणति नेति नेति ॥ २ ॥ श्रीरंग रंगीं अति सुख ॥ एकाजनार्दनीं मीनल्या देख ॥ ३ ॥

॥ २७०१ ॥ भक्तिभाव भजन परवडी ॥ तेथें किर्तनाची घे पा गोडी ॥ १ ॥ ह्मणे कां तत्वता रामकृष्णहरी ॥ नामें नानापरी गीत नृत्य नीज प्रेम तेथें धरीं ॥ धृ राम नामें वितपत्ती तूं सांडी ॥ हरी रंगीं नाच पा आवडी ॥ २ ॥ एका जनार्दनीं नित्य किर्तन ॥ कीर्तीवंता निज समाधान ॥ ३ ॥

॥ २७०२ ॥ निज भक्ताची थोर आवडी ॥ अंगें देवो त्याची उचिष्टें काढी ॥ १ ॥ रमा ह्मणे माझा कवणगे केवा ॥ वैष्णवाची सेवा देवो करी ॥ २ ॥ लाहे लाहे देवो अलंकार फेडी ॥ निज भक्ताची धुतसे घोडी ॥ ३ ॥ दोहीकडे शस्त्रें सुटती भडभडा ॥ भुलला देवो तेथें थापटी भक्त गाढा ॥ ४ ॥ भक्त भक्त संगें देवो केवळ गोवळु ॥ बळीचा द्वारीं स्वयें झाला द्वारपाळु ॥ ५ ॥ देवासी बुद्धि नाहीं त्रिशुद्धि ॥ खादाड दुर्वास स्वयें वाहे खांदीं ॥ ६ ॥ षड्रसाचें अन्न सांडुनि पक्वान्न ॥ भक्ताचिये घरीं भाजीचें खाये पान ॥ ७ ॥ एका जनार्दनीं अखंड श्रीहरी ॥ प्रपंचु परमार्थ चालवी त्याचा हरी ॥ ८ ॥

॥ २७०३ ॥ कन्यागतु झाला ॥ द्वारकेसी चला ॥ कृष्णनाथु आला ॥ मजचि पाशी ॥ १ ॥ तोचि हा गे हरी ॥ वाजेजु अंतरीं ॥ विषय व्यापारीं ॥ न देखती ॥ धृ० ॥ प्रेम गोमतीची धार ॥ सन्निध सागर ॥ मिळती एकाकार ॥ भेदु नाहीं ॥ २ ॥ बोध गरुडटका ॥ झळकत देखा ॥ तन्मय व्यापका ॥ येकपणें ॥ ३ ॥ ह्मणाल एकलाचि आला ॥ सर्व आपण झाला ॥ या देवासी भला ॥ आतां पुरे ॥ ४ ॥ पार्श्वद भक्ता ॥ आवडी समस्त ॥ पावला समस्त ॥ निभिष्य मात्रें ॥ ५ ॥ ऐसा पर्वकाळु आतां ॥ नेघे प्रायश्चिता ॥ मायबाप असतां ॥ कृष्णनाथु ॥ ६ ॥ एकाजनार्दना शरण ॥ त्याची कृपा परिपूर्ण ॥ द्वारावती कृष्ण ॥ मजचि माजी ॥ ७ ॥

॥ २७०४ ॥ उपरमें निजि नीज ॥ पाहता कर्मी कर्म ॥ निष्कर्म जालें सकळि सकळ ॥ परब्रह्म ॥ १ ॥ थीरू थीरू हो योगी ॥ अभिनव सिद्धि ॥ मनें मनाचा निरोधु ॥ मने मन तेथें निर्मन झालें सच्चित् परमानंदु ॥ धृ० ॥ मजमाजी कैसा मीचि क्रीडत ॥ क्रीडा क्रीडन अभेद ॥ दैवयोगें निजभोग भोगिला ॥ अखंड परमानद ॥ २ ॥ एका जनार्दनीं कृपा ॥ विषमी वस्तु समान ॥ क्रियामात्र सुखी सुखरूप ॥ देहभावो तो चैतन्य घन ॥ ३ ॥

॥ २७०५ ॥ माझें मन धांवताहे जेथें ॥ तेंचि तें निज स्वरूप हो राम ॥ तें सगुण गुणातीत ॥ गुण गंभीर निजसुखें तें सुखरूप ॥ १ ॥ पहा पहा वो सखिये ॥ चैतन्य स्फुरण ॥ तेंचि मना मनपण ॥ आपेआप कैसें परतोनि पाहातां अखंड आनंद परिपूर्ण ॥ धृ० ॥ तेथें कर्म करितां विषय भोगिता ॥ स्वानंद अधिक कोंदाटे हो राम ॥ भोग्य भाग भोक्ता आपणचि जाहले ॥ द्वैती अद्वैत भेटे ॥ २ ॥ एका जनार्दनीं वाहता ॥ मन तेथें नुरेचि ॥ पाहतेपणें एका एकपणें ॥ अनादि ऐक्य ब्रह्मी ब्रह्म परिपूर्ण ॥ ३ ॥

---

## नवरोज जुल्हावा.

॥ २७०६ ॥ शुभ वरकु साथ देखकर ॥ शाहो समारंभ गणाये ॥ संकल्प जोसी ल्याईकर ॥ फाल जो दिखलाये ॥ अनुहत दमामा मेलाईकर आवाज जो किये ॥ ढोल शाहाणया नफऱ्या निनाद गर्जाय ॥ १ ॥

हावने तु एक शाहो ॥ खुरवान सोहं भावो ॥ नित्यानंद देखणें आवो ॥ साहिका सोहला गावो ॥ धृ ॥ ॐकार बीज विस्तारीकर ॥ अलक्ष रख जो दिया अल्पमान ॥ सालीम उसम्यानें ॥ छपकर गया सप्त लोक सप्त खण महाल उचाया ॥ निराळा साही बैसकर नजर जो लाया ॥ २ ॥ अविद्या हात पकडकर चित्र जो लिखाया ॥ शुद्ध सम भूमीपर विषय पिठ जो किया ॥ पंच भुत पंच रंग एक जागा कलाया ॥ देखते देखते नजरो प्रपंच दिखलाया ॥ ३ ॥ शुद्ध जल भरीकर सप्त सागर ल्याये ॥ एक भांडा क्षीरसागर शरबत कलाये ॥ शेख पलंग बाहकर आद्धार खाने आये ॥ इंद्र अद्धार लोकोकु मेघ भरी पीलाये ॥ ४ ॥ स्वप्रकाशहि लाल जलते सारीत दिवस ॥ नहि धुवां नही काजली जीवजोति प्रकाश ॥ भानु सोम दोनो दिवटे हुजुर जो पाश ॥ नक्षत्र चिराख जलतेंजनयन प्रकाश ॥ ५ ॥ वसुमति मानिली आपे परिमळ हर जो ल्याई ॥ पवन गुल दोन भारी कर फुल जो रखाई ॥ चोवा चंदन कस्तुरी और खुशबई ॥ मलियानिल हतकीळिया वखु देखकरल्याई ॥ ६ ॥ आर्ति श्रीरंगो यो रंगे पानो केसवकडे ॥ तेरी रजापर हुजुर पान ले खडे ॥ बाजे अविद्या म्यानें विषयाचे दौडे ॥ भ्रांती वोझल जो रहे पान हात न चढे ॥ ७ ॥ शुभ वाखसाथ देखकर मझे तेल जो ल्याया ॥ अखंड कर्णकुरीबने तेल जो ल्याया ॥ परापश्यंतिवैखरी सुहागीणा गाया ॥ दृश्य कंकण बांधिकर बने जीवजीव कह्या ॥ ८ ॥ कमला आपण होत प्रीत महिंदि ल्याई ॥ सुख स्वरूप बना ॥ उसे महि दिलाई ॥ अजब एक देखीया वो बहुड नागई ॥ हनो जल गणायो देखो पावो पकडे रही ॥ ९ ॥ शुभवख्ता साथ देखकर शाहो शुद्धतेजी चढे ॥ आठो भावो दवडीकर आवे पकडे ॥ अनुभव स्वानुभव फिल्ल मदोन्मत्त दोहो बाजुखडे ॥ तन्मय छत्र सुहावणा बने बार गस्त काढे ॥ १० ॥ भक्तयोगी अनुभवि बनेके खेसवर बत ॥ सायुज्य तेजी चढकर बनचले संघात ॥ बोध सनौबत खासां खांदे विवेक बेत ॥ दृश्य गलबला मारता जक्त उसके हात ॥ ११ ॥ शांती क्षमा दया उन्मनी सुहागीणा बहुत ॥ सुखासन बैसकर बने आये संघात ॥ अष्टौ महासिद्धी पातरा ज्यो सन्नज्यो होत ॥ चैतन्य बुका छीड किया ॥ सब ले महकत ॥ १२ ॥ ब्रह्मा विष्णु सदासीव शाहो बाला किया ॥ आपणा सुकाम बिना बने उचे दिया ॥ करणा

पालणा मारणा उस फरमाया ॥ शर गस्त म्यानेमर्तोबे देखो अघे चलाया ॥ १३ ॥ ज्ञान खजाना साईका उसे नही गणित ॥ देख इशारत किया ॥ तबक ल्याये मुसौ कदरसीना देखकर ॥ ज्याहा बकसीस होत ॥ असमान जेउ बरसे रत्खनि नुर बरिसत ॥ १४ ॥ यम नेम भालदार सब छडिया हात ॥ वेद नागारी चाव्हो सीफत पढत ॥ वैष्णव बंदे तेरे सोहं हंस नाचाता ॥ अध्यात्म छंदो गावने तेरी बहुतही मात ॥ १५ ॥ रज तम दारु भरीकर अतसबाजी ल्याई ॥ पहिले बति देकर ममता जाली हवाई ॥ अहंकार बाण फुटा अवाज अस्मान गई ॥ आशा तृष्णा चुचुंदरी या उसे बतिलाई ॥ १६ ॥ काम क्रोध भोई नले जलते अडति मदमत्सरका धुवा काल कर्कोट ॥ अनुभव हाति चले उन्हौपर चौपट ॥ विषई लंडी न्हासतें न दिसे वाट ॥ १७ ॥ ऐक्य दर्वाजा पकडिया आरोसके थिर ॥ भेद मो खसो उन्हामे बहुत मगरुर ॥ कल्पना कमान हातमे मारतोहे तीर ॥ प्रत्यहार मारीकर उसे किया दूर ॥ १८ ॥ समाधि पलंग उपरी शाहोदरू नि आवो ॥ विस्मयो काजी बुढा बने यख सुनावे ॥ ब्रह्मा हमस्मी वकील आरोसका आवे ॥ षड्गुण संपन्न महार रोक गण कर देवे ॥ १९ ॥ चिहानंद जरिना पेन्हकर आरोसकी बेगी ॥ वृत्तिरूप लज्जा छोडी कर शाहो गलेलेगी ॥ अनंत सुख वाहाका जाणे अनुभव योगी ॥ छोडी चुणपडी बहुताकु नहीशद्ध काकीभंगी ॥ २० ॥ आपेशा हो आपे बनी अद्वितिय येक परब्रह्म जुल्हावा गाईया नही आनेक ॥ एकाजनार्दन शाहो सबाह्य व्यापक ॥ निस नवसो देखीया सोही खालिक ॥ २१ ॥

॥ २७०७ ॥ बहिरा झालों या जगीं देवा बहिरा मी झालों ॥ धृ० ॥ नाहीं ऐकिले हरिकीर्तन ॥ नाहीं केले पुराण श्रवण ॥ नाहीं वेदशास्त्र शब्दगुण ॥ गर्भी बधिर झालों यागुणें ॥ १ ॥ नाहीं सत्कीर्ति श्रवणीं आली ॥ नाहीं संतवचनें ऐकिलीं ॥ पितृवचना पाठ दिली ॥ तीर्थव्रतें असोनि त्यागिलीं ॥ २ ॥ माया माउली पाचारितां ॥ नाहीं शब्द दिला मागुता ॥ बहिरा नरदेहीं येतां ॥ एकाजनार्दनीं स्मरेन आतां ॥ ३ ॥

---

## मुका.

॥ २७०८ ॥ मुका झालों वाचा गेली ॥ धृ० ॥ होतों पंडित महाज्ञानी ॥ दशग्रंथ षड्शास्त्रपुराणीं ॥ चारी वेद मुखोद्गत वाणी ॥ गर्वामध्यें झाली सर्वहानी ॥ १ ॥ जिव्हा लांचावली भोजना ॥ दुग्ध घृत शर्करा पक्वान्ना ॥ निंदिलें उपान्ना ॥ तेणें पावलों मुखबंधना ॥ २ ॥ साधू संतांची निंदा केली ॥ हरिभक्तांची स्तुति नाहीं केली ॥ तेणें वाचा पंगू झाली ॥ एकाजनार्दनीं कृपा लाधली ॥ ३ ॥

---

## सरोदा १ ला.

॥ २७०९ ॥ डुग डुग डुग डुगोनि जाणे ब्रह्मयुग ॥ अहो त्या अहंममतेच्या पोटीं नका कीं जी जाऊं ॥ १ ॥ अहो त्या अहंममतेच्या पोटीं ॥ संभवल्या ब्रह्मांडकोटी ॥ त्याची समूळ सांगेन गोष्टी ॥ माझें सरवद्याचें वचन ऐका कीं जी राजानों ॥ २ ॥ मी निजानंद पुरीचा रहिवासी ॥ धांवोनि आलों तुह्मां संतां पाशीं ॥ शकुन सांगावया परियेसी ॥ ऐका श्रवणेंसी सावध राजानों ॥ ३ ॥ मी जें बोलणें ते बोल ॥ तें समुद्रापरिस खोल ॥ धरी अबोलणे ते बोल ॥ इंद्रियीं बोल असूंद्या ॥ ४ ॥ आतां सांगतों एक शकुन ॥ सर्वांगाचे करूनि कान ॥ श्रोतीं व्हावें सावधान ॥ निजात्म खुण पावोनी ॥ ५ ॥ मुळींची जे स्फुरली अहंता ॥ ब्रह्मींची सांगेन समूळ वार्ता ॥ अव्यक्तीं झाली तत्वता ॥ माया नित्य तया नांव ॥ ६ ॥ अहो त्या मायेचिया कुशीं ॥ उत्पत्ति झाली त्रिगुणांसी ॥ ते वियें अकार उकार मकारांसी अर्धमात्रेंशी ओंकार ॥ ७ ॥ अकार भूमिका विक्षेपता ॥ उकारीं जाण गतायाता ॥ मकारीं संश्लिष्टता ॥ सुलीनता अर्धमात्रीं ॥ ८ ॥ अकारीं रजोगुणाची वस्ती ॥ उकारीं तैजस ह्मणती ॥ मकारीं प्राज्ञ अभिमानी बोलती ॥ प्रत्यगात्म्याची वस्ती अर्धमात्रींच ॥ ९ ॥ अकार तो ऋग्वेद जाण ॥ उकार यजुर्वेद प्रमाण ॥ मकारीं सामवेद ओळखण ॥ अथर्वण जाण अर्धमात्रीं ॥ १० ॥ ऐसा हा ॐकार विस्तार ॥ सांगितला सविस्तर ॥ जाणोनि अर्थसार ॥ सुखीं सुखरूप असावें ॥ ११ ॥ आतां सांगतों एक शकुन बरा ॥ कांहीं मज सरवद्यास दान करा ॥ दान कराल

तरी सोय धरा ॥ चौऱ्याशीं लक्ष फेरा न याल कीं जी राजानों ॥ १२ ॥ कल्पनेचें काळें चिरगुट ॥ मीपणाची बांधोनि मोट ॥ विषयवासनेची सोडोनि गांठ ॥ कांहीं दान श्रेष्ठ मजकरा ॥ १३ ॥ आकाशाची घेऊनि वाटी ॥ त्रिगुण तेल भरूनि ताटीं ॥ दान करितां उटाउठी ॥ वोखटी पीडा टळेल कीं जी राजानों ॥ १४ ॥ म्यां शकुन सांगितला जनक रायाप्रती ॥ त्याची कैसी झाली देहस्थिती ॥ देहींच असोनी विदेही प्राप्ती ॥ या शकुनाचेनि कीं जी राजानों ॥ १५ ॥ आणखी ऋषेश्वर थोरथोर ॥ वसिष्ठादि विश्वामित्र ॥ सनकादिक पाराशर ॥ याच विचारें नांदलेकीं जी राजानों ॥ १६ ॥ आणखी संत महंतादि यती ॥ याच विचारें नांदले किती ॥ अल्पही करितां त्यांची संगती ॥ नपवे जन्ममृत्यूची गती कीं राजानों ॥ १७ ॥ निवृत्ति सोपान ज्ञानदेव ॥ ते नांदले याचि वैभवें ॥ खेचर विसोबा नामदेव ॥ चांगा वटेश्वर कीं जी राजानों ॥ १८ ॥ परसा भागवत गोरा कुंभार ॥ चोखामेळा महार रोहिदास चांभार ॥ जुल्हाई कबीर करिती विचार ॥ शकुनाचे नी राजानों ॥ १९ ॥ आजि एक बायकोचा संग खोटा ॥ इनें भुलविले श्रेष्ठश्रेष्ठां ॥ थोर पाडिले आव्हाटा ॥ भुलले वाटा स्वहिताच्या कीं जी राजानों ॥ २० ॥ जो कां सृष्टिकर्ता चतुरानन ॥ इचा पदर लागतांचि जाण ॥ स्वकन्येसी देखुनी आपण ॥ तोही जाण वेडावला ॥ २१ ॥ जो कां विष्ण सृष्टिपाळिता ॥ त्याची कैशी झाली अवस्था ॥ तोही झाला लोळता ॥ वृंदेच्या श्मशानीं कीं जी राजानों ॥ २२ ॥ जो कां श्रेष्ठ ईश्वर ॥ तोही झाला मोहिनीचा किंकर ॥ या बायकोचा पदर ॥ लागतां हरिहर ब्रह्मा वेडे झाले ॥ २३ ॥ याकरितां संग नका करूं इचा ॥ बोल ऐका भज सरवद्याचा ॥ माझिया बोलाविश्वास साचा ॥ तो परब्रह्मींचा रहिवासी कीं जी राजानों ॥ २४ ॥ डाकुलता झाला चालता ॥ परंतु नये बोलावितां ॥ निर्मळ पदीं वास्तव्यता ॥ झाला डाकुलता कीं राजानों ॥ २५ ॥ एकाजनार्दनाचा एकुलता एका ॥ शकुन गांठीं बांधिले देखा ॥ तेव्हां साधिली सत्वभूमिका ॥ परमार्थ फुक हाता आला ॥ २६ ॥

---

## पागुंळ. १

॥ २७१० ॥ मृत्युलोकीं एक नगर त्याचें नांव पंढरपुर ॥ तेथिल मोकाशी तो हा उभा विटेवर ॥ पुंडलीक भक्तराज शोभे चंद्रभागा तीर ॥ बोलती साधु संत जीवा वाटे हुरहूर ॥ तुह्मी संत मायबाप येवढा उपकार करा ॥ न्या मज तेथवरी दाखवा दीनाचा सोइरा ॥ १ ॥ मज नाहीं हात पाय डोळां पडली झांपड ॥ कर्ण हे बधिर झाले वाचा बोले बोबड ॥ नाक मुख गळूं लागलें ॥ लाळ आणि शेंबुड ॥ श्वानाची परी झाली अवघे करिती हडहड ॥ तुह्मी संत० ॥ २ ॥ साधू संत माय बाप जे कां दयेचे सागर ॥ भावाचें मुख्य स्थान भक्तीचें माहेर त्यानीं मज दिलें कृपादान मस्तकीं ठेविला कर ॥ माया मोहा निरसलीं शुद्ध झालें कलेवर ॥ तुह्मी संत० ॥ ३ ॥ भाव दिला मजसंगें मार्ग दाविला नीट ॥ भ्रांतिही निरसली दिसूं लागली वाट ॥ नाचत प्रेमछंदें चालूं लागलों सपाट ॥ एकाजनार्दनीं पावलों पंढरीपेंठ ॥ तुह्मी संत ॥ ४ ॥

---

## डुगडुग्या.

॥ २७११ ॥ डुग डुग डुग डुग डुग ॥ डुगडुगोनी गेले चार युग ॥ कामक्रोधाचेनी लागवेगें ॥ या मनामागें धांवत ॥ डुग० ॥ १ ॥ हित नोहे गा सर्वथा ॥ गेलें हरपोनी पाहतां ॥ भुलले मायेनें सर्वथा ॥ यमपंथासी जाती ॥ डुग० २ ॥ जातां यमपुरीच्या वाटें ॥ जीवासी आघात आहेत मोठे ॥ संचित क्रियमाणाचे सांठे ॥ तया वाटेसी जाऊं पाहे ॥ डुग० ॥३॥ जे भले सात्विक संत ॥ आहेत निशिदिनीं गुरूचे भक्त ॥ त्यांसि माझा नमस्कार येत ॥ गुरुसी शरण जा वेगीं ॥ डुग० ॥ ४ ॥ गुरूसी गेलिया शरण ॥ काय करी जन्ममरण ॥ स्वरूपीं लागेल अनुसंधान ॥ निज निधान प्रगट होय ॥ डुग० ॥ ५ ॥ आणिक एक सांगतों शकुन मोठा ॥ तुज लागला एक्या बायकोचा चपेटा ॥ तिच्या चांगुलपणाला सुभटा ॥ भुलू नको सर्वथा ॥ डुग० ॥ ६ ॥ आणिक एक तिची करणी ॥ विष्णूस लाविलें वृंदेच्या श्मशानीं ॥ नारदाची नारदी करुनी ॥ साठ पुत्र जन्मविले डुग० ॥ ७ ॥ या लागीं तिचा पदरू नाहीं बरा ॥ अंतीं दगा देईल

सारा ॥ अजून तरी हित विचारा ॥ दान करा पीडा टळे ॥ डुग० ॥ ८ ॥ तिनें बहुतांसि दगा दिधला ॥ ईश्वरा सारिखा भुलविला ॥ ब्रह्मयासि वेध लाविला ॥ रत झाला कन्येशीं ॥ डुग० ॥ ९ ॥ नवां ठायीं फाटला झगा ॥ तो नये तुझे उपयोगा ॥ विषय भोगीत आंगा ॥ तो मज दान पिंगळिया ॥ डुग० ॥ १० ॥ काळा मीच काळीं चिरगुटें ॥ पदीं बांधून मीतूंपणाचें मीठ ॥ त्रिवर्ग करोनी रोकडें नीट ॥ ओंवाळून टाकी आतां डुग० ॥ ११ ॥ तेणें टळेल तुझी पीडा ॥ चुकेल मीतूंपणाचा झगडा ॥ स्वरूपीं होईल आनंदगाढा ॥ श्री जनार्दन प्रसादें ॥ डुग० ॥ १२ ॥ एका जनार्दनीं प्रेमबोध ॥ प्रगट होय साबाद ॥ पिंगळा भाकितसे प्रबोध ॥ परोपकार जाणें गा राया ॥ डुग० ॥ १३ ॥

---

# नीति.

॥ २७१२ ॥ नीति सांगतों ऐका एक ॥ दास सभेचा सेवक ॥ मन टाळूं नका येक ॥ कोणी एक कोणी एक ॥ ध्रु० ॥ सांडावरून जाऊं नये ॥ लांच खाऊं नये ॥ चोहोंच्यांत राहूं नये ॥ कोणीएक ॥ १ ॥ अक्रीत घेऊं नये ॥ इमान सोडूं नये ॥ बैमान होऊं नये कोणी एक ॥ २ ॥ सज्जनाशीं विटूं नये ॥ नीचासवें बाटूं नये ॥ तस्कराशीं पुसूंनये ॥ कोणी-एक ॥ ३ ॥ भक्तिमार्ग खंडूं नये ॥ कुभांड्यासीं तंडूं नये ॥ खळासंगें भांडूं नये ॥ कोणी एक ॥ ४ ॥ सत्पुरुषाशीं छळूं नये ॥ शिवेचा गुंडा ढाळूं नये ॥ केला नेम टाळूं नये ॥ कोणी एक ॥ ५ ॥ सद्गुरु सेवा सोडूं नये ॥ कुळधर्मासि मोडूं नये ॥ पापद्रव्य जोडूं नये ॥ कोणीएक ॥ ६ ॥ संपत्ति आलिया माजूं नये ॥ अभिमानानें फुगूं नये ॥ सभा देखून लाजूं नये ॥ कोणीएक ॥ ७ ॥ असत्य वाद करूं नये ॥ खोटा संग धरूं नये ॥ भोचकाशी मैत्री करूं नये ॥ कोणीएक ॥ ८ ॥ भलते भरीं पडूं नये ॥ अनाचार करूं नये ॥ कपट मनीं धरूं नये ॥ कोणी एक ॥ ९ ॥ जन्मा आलिया स्वभावें ॥ कांहीं सार्थक करावें ॥ ऐसें मनीं विचारावें ॥ कोणी एक ॥ १० ॥ एका जनार्दनीं भावें ॥ संतचरणीं लीन व्हावें ॥ सदां हरिनाम उच्चारावें कोणी एक ॥ ११ ॥

---

## छापा.

॥ २७१३ ॥ अजब है त्रिकूटका घाट ॥ जोत लगी घनदाट ॥ धुंड लेना औही बात ॥ पलख जोत लगी ॥ १ ॥ उडवत चवरंग गुलाल ॥ झमक रहे जोत हिलाल ॥ महाकारण महाल ॥ बिचमे लाल चमकत है ॥ २ ॥ चमक लगी दिनरात ॥ नहीं कछु आदि अंत ॥ समज लेना ओही बात ॥ सहज संग बतावे ॥ ३ ॥ खिजमत करले कछु काम ॥ आज मत पावोंगे राम ॥ भ्रमरगुंफामे राम ॥ रामनाम सुमरले ॥ ४ ॥ सुमरलेना नाहिं मंत्र ॥ छांडदे सब तंत्र ॥ अनुहात जंत्र ॥ धिमकट मृदंग बजावे ॥ ५ ॥ बजावे धन् धन् धन् स्वरका बीन ॥ भजन करले संगीन ॥ नयन जागे रातदीन ॥ ब्रह्मताल लगावे ॥ ६ ॥ लगावे तो है तयार ॥ करले दीनमों करार ॥ हो जा भवजल पार ॥ मेरे सद्गुरु साहेबकी ॥ ७ ॥ साहेब सद्गुरु जनार्दनके प्रतिपाळ एकनाथ तुह्मारे ॥ फकिरीमें रहता है ॥ ८ ॥

॥ २७१४ ॥ हुषियार वदे हुषियार ॥ तेरा तन खबरदार ॥ तुझे खिलावन एक नार ॥ बतादेव बतादेव सतरावी ॥ घर पाई है ॥ १ ॥ बडेबडे साधुसंत ॥ उनसे करले एकांत ॥ बतादेव सिद्धांत आदिअंतउनोंका ॥ २ ॥ बडी तो सबसी बडी ॥ जाडी तो धरतरीसें जाडी ॥ एकवीस खन्नकी माडी ॥ गगनबीचमें खडी है ॥ ३ ॥ दसवे द्वार झरोका ॥ देखले दिदार उनोका ॥ नैन दीन लगावे ॥ ४ ॥ ब्रह्मा विष्णु बडे देव ॥ अजब गुरुग्यानी महादेव ॥ पाहिये उनोंकी ठेव ॥ बैठके जग झुलाईहै ॥ ५ ॥ अलख पुरुषको धुनी ॥ तुर्या चेत रही उन्मनी ॥ नहीं आदि अंतपुरानी ॥ पत्री महाकारण रूपहै ॥ ६ ॥ अहं नाद निःशब्दमों ॥ सोस लगाईये चष्ममों ॥ चुन कहै मसूरमों ॥ झकझक झकाकतहै ॥ ७ ॥ लखलखाट हिरेकी खान ॥ चकचकाटको भान ॥ निशिदिन करत ना ध्यान ॥ ग्यान वहोत आयेगे ॥ ८ ॥ दिल रिझे तो करले धंदा ॥ एका जनार्दनका बंदा ॥ चूप सोनेसो बताईहै ॥ ९ ॥

---

## अभयदान.

॥ २७१५ ॥ चिरंजीव जिवाजी पंत ठाणेदार ॥ यांसी आत्माराम पंत कमावीसदार ॥ कसबे ब्रह्मपुरी ॥ आशीर्वाद उपरी ॥ तुह्मासी देहगांवचें ठाणें दिलें ॥ तर ठाण्यांत सावधपणें वर्तणूक करणें ॥ तेथें ममताई पाटलीण ॥ तिणें लटकेंच दंभ केलें आहे ॥ कामक्रोधादि षड्वैरी चाकर ठेवून ॥ लोभमोहाचे फांसे सिद्ध करून ठेविले आहेत ॥ ह्मणून तुह्मास सूचना मात्र लिहिली आहे ॥ विषयाचा लोभ न धरणें ॥ निजहितासी अंतर न करणें ॥ सत्य मिथ्या जाणून विचाराची वाट धरणें ॥ अविचारपणा सोडून देणें ॥ विवेक सद्भावांसी मित्रत्व विशेष असों देणें ॥ त्यांचे बुद्धीनें गांवची लावणी करणें ॥ उत्तम चारी वर्णांसी कऊल देऊन धैर्याचा नांगर धरून शेतांतील मदेखट काढून वासनेच्या पालव्या तोडून संशयाचा गाशा गोळा करून ॥ भूमिका शुद्ध करून मग भक्ति ज्ञान वैराग्य तिफणी करून सद्गुरुमुखें नीजबीज पेरणें ॥ जेथें शुद्ध सत्वाचा मेघ वर्षला ॥ तेथें सत्याचा माळा घालून ॥ कुतर्क पांखरूं उडवून देणें ॥ जागोजागीं विश्वास रक्षण ठेवून ॥ शेतांतील माल अवघाचि गोळा करून षड्गुण ऐश्वर्य बैल जुंपून ॥ अवघाच माल खळ्यांत आणून कष्मळ काढून ॥ स्वानंदाची रास करणें ॥ तेथें सिद्ध साधक मागते येतील ॥ त्यांला भक्तीचे पायलींत अवघाचि माल मोजून देऊन ॥ सह हुजूर ब्रह्मपुरीस येणें ॥ सांगितल्या गोष्टींत बाकी ठेवाल तर चौऱ्याशीं लक्ष योनी फिरणें लागेल ॥ मग पुनरपि तुह्मां वरदहस्त लादेल ॥ खरें चालावें जन्ममरणाची वाट खंडेल ॥ जनार्दन सद्गुरु कृपेचा सागर ॥ तेणें एका जनार्दनीं आनंदमय समाधान झालें॥ द्वैताचा लेश उरला नाहीं ॥ सच्चिदानंदरूप प्रत्ययास येऊन ॥ समाधान पावले ॥

---

## थट्टा.

॥ २७१६ ॥ अशी ही थट्टा ॥ भलभल्यासी लाविला बट्टा ॥ धृ० ॥ ब्रह्मदेव त्रैलोक्याला शोधी ॥ थट्टेनें हरविली बुद्धि ॥ केली नारदाची नारदी ॥ अशी ही थट्टा ॥ १ ॥ थट्टा दुर्योधनानें केली ॥ पांचाळी सभे-

माजि आणिली ॥ गदाघायें मांडी मोडिली ॥ अशी ही थट्टा ॥ भ० २ ॥ थट्टा गेली शंभोपाशीं ॥ कलंक लाविला चंद्रासी ॥ भगें पाडिलीं इंद्रासी ॥ बरी नव्हे थट्टा ॥ भलभल्यासी लाविला बट्टा ॥ ३ ॥ थट्टेनें मेला दुर्योधन॥ भस्मासुर गेला भस्म होऊन ॥ वाळीहि मुकला आपुल्या प्राणा ॥ अशी ही थट्टा ॥ भ० ॥ ४ ॥ थट्टा रावणानें केली ॥ नगरी सोन्याची बुडविली॥ थट्टा ज्याची त्यास भोंवली ॥ बरी नव्हे थट्टा ॥ भ० ॥ ५ ॥ अरण्यांत होता भृगु ऋषी ॥ थट्टा गेली त्याचेपाशीं ॥ भुलवुनी आणिला अयोध्येसीं ॥ बरी नव्हे थट्टा ॥ भ० ॥ ६ ॥ विराट राजाचा मेहुणा ॥ नाम तयाचें कीचक जाणा ॥ त्याणें घेतलें बहुतांचे प्राणा ॥ बरी नव्हे थट्टा ॥ भ० ॥ ७ ॥ थट्टेपासून चौघेजण ॥ शुक भीष्म आणि हनुमान ॥ चौथा कार्तिक स्वामी जाण ॥ त्याला नाहीं बट्टा ॥ अशी ही थट्टा ॥ भ० ॥ ८ ॥ एका जनार्दन ह्मणे सर्वांला थट्टेला भिऊन तुह्मी चाला ॥ नाहींतर नेईल नरक कुंडाला ॥ अशी ही थट्टा ॥ भ० ॥ ९ ॥

---

## रहाट.

॥ २७१७ ॥ हुंडगी निघाली बाजारा ॥ बारिक माझा जुना ॥ ध्रु० ॥ दारची गोंधन कां तोडाना ॥ मजला रहाट करून कां द्याना ॥ माझे रहाटाकडे कां पहाना ॥ १ ॥ तुमचा बैल कां माराना ॥ मजला तांत करून कां द्याना ॥ माझे तांताकडे कां पहाना ॥ २ ॥ तुमची तलवार कां मोडाना ॥ मजला चात करून कां द्याना ॥ माझ्या चाताकडे कां पहाना ॥ ३ ॥ तुमचा टाळ कां मोडाना ॥ मजला भिंगरी करून कां द्याना ॥ माझ्या भिंगरीकडे कां पहाना ॥ ४ ॥ तुमचीं वस्त्रें का फाडाना ॥ मजला पिंजून पिंजून कां द्याना ॥ माझ्या पिंजण्याकडे कां पहाना ॥ ५ ॥ पिंजून पिंजून केला पिळू ॥ नव इंद्रियां खेळू ॥ एकाजनार्दना पिळू ॥ ६ ॥

---

## दरवेश.

॥ २७१८ ॥ अल्ला तुही तुहीरे ॥ नबी तुही तुहीरे ॥ ध्रु० ॥ हमही मुंडा तुमही मुंडा मुंडा तेरा बाप ॥ तेरे बापनें गद्धा भोग्या ॥ हमकूं लागे पाप ॥ १ ॥ बगलम्यानें तबल बाजे घरमें नहीं कोई ॥ खालीं हंडी चुवा बजावे ॥ नाचन लागे डोई ॥ २ ॥ सब देवनमें ब्रह्मा बडा पढता चारी वेद ॥ सरस्वतीसें हाल हुवा जब ब्रह्मा बेटी चोद ॥ ३ ॥ ढवळागिरी पर्वतम्याने शंभू करता तप ॥ भिल्लिणीकी गांठ पडी जब तप हुवा गप ॥४॥ पाराशरकी नुनि उठी ढिवरन लगी मीठी ॥ जमनामे संग भयो जब व्यास कर उठी ॥ ५ ॥ नारद बडा जगदभारी औरत मागे दान ॥ साठ संवत्सर के लडके किये होगये दानादान ॥ ६ ॥ गोकुळम्याने राजकरतहै नाम रखा गिरिधारी ॥ सोळा सहस्र लौंड्या भोगे होये ब्रह्मचारी ॥ ७ ॥ मेरे साहेब उंच माडी कपडा धुवा नजाय ॥ हातका साबण गिरगया तो फिरफिर गोते खाय ॥ ८ ॥ कपडा फाटे चमडा तूटे होगये सब सायास ॥ एकाजनार्दनका बंदा दिलका दरवेश ॥ ९ ॥

---

## महार.

॥ २७१९ ॥ कांरे महारा बदमस्ता ॥ कांहो ब्राह्मणबावा भलतेंच बोलतां ॥ तुझे बापाचें भय काय ॥ मायबाप तुमचें आमचें एकच है ॥ ऐक ऐसें बोलूं नको ॥ निर्गुणापासून अवघे झालों ॥ निर्गुण तुला काय ठावें ॥ आत्मस्वरूपीं शोधून पहावें ॥ आत्मस्वरूप आह्मा कळेना ॥ नाहींतरी संतांशीं शरण जाना ॥ संतांशीं शरण गेल्यानें काय होतें ॥ चौऱ्याशीचा फेरा चुकतो ॥ हें ज्ञान तुला कोणापासून प्राप्त झालें ॥ एका जनार्दन प्रसादें कळूं आलें ॥

---

## महारीण.

॥ २७२० ॥ पायां पडल्यें महारीण आली ॥ ध्रु० ॥ महारिणीचे बोल ऐका ॥ गांव बसाड पाडूं नका ॥ हकनाक बसेल धक्का ॥ इतुकें तुह्मीं मती

तर्का ॥ पायां० ॥ १ ॥ ब्रह्मा विष्णु दोन्ही बाळ ॥ महाकाळाचे हे काळ ॥ मज देखतां गोपाळ ॥ ते मज महारिणीपासोनी ॥ पायां० ॥ २ ॥ एका जनार्दनीं महारीण झालें ॥ सद्गुरूला शरण गेलें ॥ त्याणें आपुलें स्वहित केलें ॥ जन्ममरण विसरलें ॥ पायां० ॥ ३ ॥ .

---

## महारीण २ री.

॥ २७२१ ॥ जोहार मायबाप जोहार धनी ॥ मी निराकाराची महारिणी ॥ माझ्या धन्याशी निद्रा लागली ह्मणुनी ॥ मी संत सभेसी आलें कीं जी मायबाप ॥ १ ॥ माझे धनी एकुलते एक होते ॥ त्यासी मजवांचुन कर्मत नव्हतें ॥ मी रात्रंदिवस फिरत असतें ॥ परी सत्ता त्याचीच कीं जी मायबाप ॥ २ ॥ मग मला मागे टाकून मी आल्ये धन्याचे मोहे करून ॥ थोर थोर टांगी धरून ॥ ओढोनि आणिले कीं जी मायबाप ॥ ३ ॥ ओढोनि आणिले कोण कोण सबळ ॥ त्यांचीं नांवें तुह्मीं ऐका सकळ ॥ विश्वामित्रासारिखे ढिसाळ ॥ ओढोनि आणिले कीं जी मायबाप ॥ ४ ॥ ऋषींमध्यें पराशर ॥ तो मजसवें गुरगुर करी फार ॥ मग म्यां करून दिवसाचा अंधकार ॥ ढिवरीशीं रतविला कीं जी मायबाप ॥ ५ ॥ ऋषींमध्यें मुनि एक नारदु ॥ तो मशीं कधीं नव्हता मरदु ॥ त्याचा द्वारकेमधीं उतरला मदु ॥ साठ पोरें व्याला कीं जी मायबाप ॥ ६ ॥ सर्वांमाजी ब्रह्मा परवड ॥ त्याणें मांडली मजसंगें होड ॥ त्याजवर घालोनी कन्येचें लिगाड तो म्यां पस्तावीं पाडिला कीं जी मायबाप ॥ ७ ॥ म्यां छळिले व्यासपुत्र शुकदेव थोर ॥ त्यानें माझी निर्भर्त्सना केली फार ॥ मग काढोन पाईची पैजार ॥ माझें तोंडावर हाणिली कीं जी मायबाप ॥ ८ ॥ अशा अशांच्या केल्या गती ॥ येचि वायां गेले नेणो किती ॥ मज नागवे उघडें करोनि जिंकू पाहती ॥ त्यांचे तोंडीं माती पडो कीं जी मायबाप ॥ ९ ॥ एकाजनार्दनीं विनंति करी ॥ जो करी पंढरीची वारी ॥ तेथें बळ न चाले निर्धारी ॥ येरवीं तरी झाडे दिले कीं जी मायबाप ॥ १० ॥

---

## महारीण ३ री.

॥ २७२२ ॥ पायां पडते महारीण आली ॥ धृ० ॥ महारीण गेली वरच्या आळीं ॥ महारिणीनें दिली हारळी ॥ जवळ आली काळाची फेरी ॥ १ ॥ माझें महारणीचें ऐका ॥ जागे असा निजूं नका ॥ काळ करीतसे खेपागा ॥ २ ॥ एका जनार्दनीं महारीण ॥ करा चंद्रभागे स्नान ॥ घ्यावें पुंडलीकदर्शन ॥ पहावे विठ्ठलचरण ॥ पायां पडतें महारीण ॥ ३ ॥

---

## कंजारीण.

॥ २७२३ ॥ हो होरी हो होरी हो ॥ लेवरे रसी ॥ हो होरी हो ॥ लेनेवाला है पर ॥ देनेवाला नहीं ॥ हो० ॥ देने वाला है पर ॥ लेनेवाला नहीं ॥ हो० ॥ नीसंग आडती ॥ केतन तोडा ॥ आपकारी पाडवा ॥ आतां सा न जोडा ॥ हो० ॥ १ ॥ तेलंगी वाडवा ॥ फाल्गुना फुलवा ॥ साधन करवा ॥ मन आशा फेडवा ॥ हो० ॥ २ ॥ फुलवा न नवरा ॥ अडतीन तंगी ॥ नीतंग कोडता ॥ तंगीन अडी ॥ हो० ॥ ३ ॥ जनार्दन पडवा ॥ कंजारीण लढवा ॥ कोकणी करवा ॥ दातारुबरवा ॥ हो० ॥ ४ ॥

---

## कोल्हाटीण.

॥ २७२४ ॥ अनादि निर्गुण पूर्णपरात्पर अभेद नमियेला ॥ काया वाचा मनें शरण गेलें मीं त्याला ॥ मूळचा संबंध ठाव तेणें मजला दाखविला ॥ ज्ञानांजन घालूनि प्रवृत्ति मार्ग खुंटविला ॥ पूर्ण बोध घोटविला ॥ १ ॥ कोल्हाटीण झालें बाई मी कोल्हाटीण झालें ॥ धृ० ॥ प्रवृत्तीचें वस्त्र फेडुनी सुखासुखी रिझलें ॥ परात्पर पर पुरुष पाहूनि सापाशीं मी गेलें ॥ अंगसंग ती करुन त्याचें सुख म्यां हरविलें । अजरामृत म्यां सेविलें कोल्हाटिण झालें ॥ २ ॥ आशा मनशा तृष्णा ह्या तिन्ही मेळविल्या रांडा ॥ भाव चोहटा करूनि येथें लावियला झेंडा ॥ करून उलट प्राणाचा क्रोध तो मारिला मेंढा ॥ मग तो अहंकार मेंगा

शांनीं या भुलविलें सोंगा ॥ को० ॥ ३ ॥ मार्गे सारून पायें मारिली उफराटी उडी ॥ भ्रांति लुगडें फेडून गेलें काया झाली उघडी ॥ दुरुनि अनुभव मिळुनी येथें मांडिली फुगडी ॥ झाली द्वैतपणाची घडी ॥ को० ॥ ४ ॥ परद्वार म्यां केलें जन्म सार्थक झालें ॥ पंचवीस दादुले हातीं म्यां धरुनी उठविले ॥ अंतरगृहसावलींत येऊनि निश्चळ बैसलें ॥ एकाजनार्दनीं एकीं एकपण मुरालें ॥ जन्मजरामरण हरलें ॥ को० ॥ ५ ॥

---

# भटीण.

॥ २७२५ ॥ मी भटीण आलें रे भटा ॥ नको करूं रिकाम्या चेष्टा ॥ काय बोलतोसि चावटा ॥ उगी कां करितोसी थट्टा ॥ मी भटीण म्यां भटणीनें तुज पाळिलें ॥ पाळिल्याचे बरेच उपकार फेडिले ॥ माझें मज आणून देतां सांत तुझें काय गेलें रे भटा ॥ मी० ॥ १ ॥ मजपासूनि वेद किरे झाले ॥ ते म्यां तुझ्या हातीं दिधले ॥ संकासुरानें चोरून नेले ॥ माझ्या भयानें ते परत आणिले रे भटा ॥ मी० ॥ २ ॥ त्याच्याच आधारानें मी बोलत आहें ॥ बहु मस्ती आली तुला मला ठाऊक आहे ॥ आपलें अंतर शोधून पाहे रे भटा ॥ मी भटीण० ॥ ३ ॥ लहानाचा थोर तुला म्यां किरे केला ॥ नवअवताराच्या हातीं भला ॥ दहावा कलंकी राहिला ॥ तोही जाइल विलया रे भटा ॥ मी भटीण० ॥ ४ ॥ एका जनार्दनीं शरण ॥ भटाचें हरपलें मीपण ॥ उगाच गेला मौन धरून ॥ चैतन्यरूप पाहिलें रे भटा ॥ मी भटीण० ॥ ५ ॥

---

# मरीआई.

॥ २७२६ ॥ कनगुली भानगुली सुप टोपली ॥ आदिमाया नमो भगवती मानवी हो काय करून ठेविलीये ॥ निवांत देखिलीये ॥ १ ॥ मरी आईचा कोरडा वाजतो ॥ सिंहेवरी कोरडा वाजतो ॥ गाड्यावरी कोरडा वाजतो ॥ धृ० ॥ चारी पुरुषार्थ प्रसंगीं घालुनी निरंजनीं पुंडलिकाचे द्वारीं बैसोनी ॥ भक्ति पुरस्करोनी ॥ निवांत देखिलीये ॥ २ ॥ मच्छे कच्छे वराहे नारसिंहे वामने परसे रामे कृष्णे बौध्ये कलंकिये ॥ ३ ॥ सीते

जान्हवीये ॥ वैष्णवकुळाचा उद्धार करोनी ॥ चौ वर्णांचे मळवट भरोनी ॥ ४ ॥ अठरा जणांची रांडोळी करोनी ॥ गादे दद दैत्यांची आहुती घेउनी ॥ बळी बगाडें तुजला देउनी ॥ ५ ॥ अनुहत ब्रह्मांडें तुझा देव्हारा ॥ ह्मणून तुला अर्पिला माय तरुवरा ॥ लिंबे घेउनी नारळें मारा ॥ ६ ॥ ऐसी पूजियेली नर तनू ॥ भक्तासीं करिसी विनवणू ॥ तैसें नव्हे रे ज्ञान अजनू ॥ प्रसन्न होउनी ये खेळी प्रपंच भानू ॥ ७ ॥ अंबा अंबिका प्रसन्न होउनी ॥ वैष्णवासीं दर्शन देउनी ॥ सांवळें रूप प्रगटोनी ॥ वैष्णवां माजी गर्जोनी ॥ सिंहनादें एका जनार्दनी भरोनी ॥ अंबा निवांत राहिली ये ॥ मरी आईचा कोरडा वाजतो ॥ गाड्यावरी कोरडा वाजतो ॥ सिंहेवरी कोरडा वाजतो ॥ ८ ॥ अझुन करसी माय ठेंगणी ॥ त्या तरुवराचीं पानें ॥ आवडी स्वयंभु कानें ॥ वाने मौन वदुखणें ॥ जनार्दनीं करोनी मन ॥ एकाजनार्दनीं अंबे तुजला पांगिले जन ॥ ९ ॥

---

## पोपट.

॥ २७२७ ॥ पढो माझ्या आत्मारामा ॥ राधाकृष्णाचें हें ध्यान ॥ पिंजऱ्यामध्यें गुंतलासी ॥ तुज सोडवील कोण ॥ पढो० ॥ धृ० ॥ चौऱ्यांशीं लक्ष योनी ॥ वनीं तूं तरी हिंडसी ॥ प्रमदा विषफळीं अति त्वरें धांव घेसी ॥ येऊनियां दोही पक्षी ॥ पाहती तुज न्यावयासीं ॥ पढो माझ्या आत्मारा० ॥ १ ॥ पिंजरा घडविला पंचभूतांचा कुसरी ॥ नवद्वारें सोळा सांधे ॥ प्रभा पडली भीतरी ॥ लाविली प्राचीनाची दोरी ॥ बांधिला निज मंदिरीं ॥ पढो मा० ॥ २ ॥ हिरवा तुझा रंग ॥ गुंजवर्ण दोनी डोळे ॥ चोंच आहे तुझी लाल ॥ बोल तुझा हा मंजुळ ॥ राघवा तूं बोल माझ्या ॥ सख्या अमोलिक बोल ॥ पढो० ॥ ३ ॥ अचल तूं माझें चंचल ॥ मोठे हिंडे तीनही ताल ॥ तुला जपला काळ बोका ॥ केव्हां घालिल गळ ॥ जरी जाशी उडोनियां ॥ पूर्व सुकृताचें फळ ॥ पढो मा० ॥ ४ ॥ सत्य गुरुदत्त दाता ॥ तारक मंत्र तुज देई ॥ तोच तुला सोडवील ॥ यम करील काई ॥ पावशील चिंतामणी ॥ एकाजनार्दनाचे पाई ॥ पढो माझ्या आत्मारामा ॥ ५ ॥

---

# हाळदुली धवलधनाश्री.

॥ २७२८ ॥ कादिली हाळदुली लखलखीत सोज्वळी ॥ जन्म ब्रह्माचळी ॥ जाले तिये ॥ १ ॥ अती सुक्ष्म सुरंग ॥ शोभवीत अंग ज्यासी होय भाग्य सासीच लागे ॥ शेष कुर्मासनी शक्ति पासूनी भुमीका शोधुनी शुद्ध केली ॥ तयावरी देख बहुले सुरेख हळदुली देखताची सुख होय मना ॥ धृ० ॥ लुटिती ती वधुवरें हळदुली स्वानंदें ॥ लाज मध्यें मध्यें परम प्रीति ॥ नोवरा मेघशामु बैसला पुरुषोत्तमु उटणें या संभ्रमु मूळ केलें ॥ कृष्णुमेचु अलंकार लेवूनी सनागर बैसली सुंदर वामांगीं ॥ वरा अंगीं भली नोवरी बिबली ह्मणती प्रकाशली पुरुषोत्तमें ॥ नोवरी शाहणी आपुला निजगुणी वश्य चक्रपाणी करूनी ठेली ॥ २ ॥ मुळके पेडविल्या आल्या बारा सोळा करवली वेल्हाळा उन्मनी चाले ॥ पदोपदीं त्याग करितसे आनेग वराचें तें अंग टाकूनी आली ॥ अणिक नव जणीं ॥ आल्या वऱ्हाडिणी जयाच्या वचनी वरु वर्ते ॥ सा हिता गुजाचिया वरा निजाचिया सदा यशाचिया काय समीपवर्ती ॥ ३ ॥ सकळा माजी वृद्ध शांती पै प्रबुद्ध तें ह्मणें हा विध ऐसा आहे ॥ सर्व स्वयंवरा कुरवंडी करा मग पाय धरा उटणें या ॥ उजळुनीयां वाती आक्षता पैं देती भीमकीये ह्मणती वेगु करी ॥ तंव भवया देऊनीया गांठी न पाहे ते दिठी सखी ह्मणे गोठी कळली मज ॥ ४ ॥ तंव शांती ह्मणे सरा सांगेन ते करा कुरवंडी या वरा ऐसी नव्हे ॥ जया दिप मेळी नाहीं धुम काजळी तो दिपु उजळी निरंजना ॥ ऐकोनी तें बोली भीमकी आनंदली मनी ह्मणे भली साधु होसी ॥ मनोगत केलें ऐसें संवादी जैं मिळे तैं दैवें सकळें वश्य जाली ॥ ५ ॥ तेजबीज रूप प्रकाश अमूप चिद्रत्नाचें दिप भीमकी लावी ॥ तें प्रकाशता प्रभा सुर्यो लोपे उभा कोंदलेंसें नभा लखलखीत ॥ तो पहाता प्रकाशु अवघा हृपिकेशु तंव तंव उल्हासु भीमकीयेसी ॥ त्या प्रकाशा वेगळी न निवडे ते बाळी निज भावें वोवाळी प्राणनाथा ॥ ६ ॥ धन्य तुझें दैव सिद्धी गेले भाव घेउनियां नांव पाय मागें ॥ येरी ह्मणें पोटी काय बोलो बोटी नांवांची हे गोठी नाहीं यासी ॥ याच्या नांवें भेदा नेणवेची वेदा नेती ह्मणोनी सदा परतला तो ॥ जेथें रूपाचा दुकाळु नामाचा विटाळु उच्चाराचा चळु केवी चळे ॥ ७ ॥ ह्मणें कळलें आतां गो इंद्रियांचा नियंता गोवळा ह्मणता

दोष नाहीं ॥ ऐसी विचारुनी बाळा न्याहारु चरण कमळा मग ह्मणें गोवळा पाय देई ॥ तंव पिटिली टाळ्या टाळी हांसीजे सकळी भीमकीया रांडोळी भली केली ॥ त्या वचना संतोषला देतुसें पाउला वर्तती आंतुला खुणा दोघे ॥ ८ ॥ कृष्ण बहु काळा उटी वेळ वेळा उटुनी सोज्वळा करूं पाहे ॥ जे कृष्ण अंगीं लागे ॥ तें मागुतें न निघे मळी लागे वेगें निघेल कैची ॥ मळी काढावियां लागी पाहे नख भागी अभिनव तें अंगीं देखीयलें ॥ सहित रवि चंद्र आणि क्षिर सागर बिंबले अरुवार नखा माजी ॥ ९ ॥ शेषाचि या बोला श्रीकृष्ण नोवरा उटणें सुंदरा करवी सासी ॥ तेथें वऱ्हाडी देव बैसलेजी सर्व अक्रुर उद्धव चवर ढाळी ॥ देव कन्या वऱ्हाडिणी भोंवसा सवासिणी हळदी लावी चरणी क्षिरात्मजा ॥ ऐसें कृष्ण नखीं देखे एकाएकी देखतां भीमकी मुर्छीत झाली ॥ १० ॥ तेथें अश्वातती गुरु ह्मणें स्थिरु स्थिरु निर्धारेसी धिरु धरी बाळे ॥ तंव बाष्प दाटे कंठी स्वेदैली गोरटी उन्मळीता दृष्टी होउनी ठेली ॥ तंव धांविन्नली धाये ह्मणें जालें कायें झणें तुज माये दिठी लागे ॥ जें दृष्टी देखिलें तें न बोलवे बोलें धायते वारिले संज्ञेने ॥ ११ ॥ कृष्ण वोहणीचें बिरडें फेडी आपुलीये चाडे सुभद्रा हें लाडे बोलतीसे ॥ मेहुणे ह्मणती जगजेठी जाणें हातवटी यमुनेचा तटीं अस्यासु केला ॥ तंव यादव ह्मणती कृष्णा उशिर कायेसणा बिरडिया केसणा पाडु आह्मा ॥ जुंझारा विराचें फेडिलें बिरडें मग ईये परणीले राजबाळे ॥ १२ ॥ कृष्ण पाहे दृष्टी तव बिरडें सुटे गांठी कांचोळी सम दृष्टी द्वैताची फेडी ॥ पाहागे नवल केलें डोळांची उगविलें ॥ बिरडें काढिलें नयन बळें ॥ कृष्ण दृष्टी पुढें फिटे संसार बिरडें मग हें केवढें नवल त्यासी ॥ व्रत तप याग करितां न टिके अंग परि भाग्य सभाग्य भीमकीचें ॥ १३ ॥ मुखां मुख सन्मुखी बैसविली भीमकी लाजे अधो मुखी होऊनी ठेली ॥ तंव तळीं कृष्णु मुख देखिलें सन्मुखु पाठिमोरी देख होऊनी ठेली ॥ तंव मागाही तें मुर्ती सन्मुख श्रीपती ह्मणे मी केउती रिघों आतां ॥ वाम सव्य दिसा पडिला कृष्ण ठसा लाज हृषीकेशा माजी नुरे ॥ १४ ॥ या परी गोरटी कृष्णी लाजे भेटी मग उघडियली दृष्टी स्वरूप बळें ॥ सुभद्रा ह्मणें चांग उटी ईचें आंग स्वलिला श्रीरंग हळदी घेती ॥ रेवती ह्मणे देवा आधि घ्यावें नांवा हळदुली मग तेव्हां उटाईसी ॥ मज नांव घेतां लाज नाहीं आतां सावधान चित्ता ऐका तुह्मी ॥ १५ ॥ नांवा हें रूपाची

गुणमयी गुणाची भिया हें कोणाची कवण जाणें ॥ माझें येथें लक्ष वधुवरासी साक्ष पुसा पां प्रत्यक्ष रुक्मिणीसी ॥ ऐकोनी तया नांवा गहिंवरू उद्धवा तटस्थ यादवा सुरनरासी ॥ कवण जाणें लिळा आकळया विकळा हासती सकळा वऱ्हाडिणी ॥ १६ ॥ या वरी श्रीरंगें हळदी घेऊनी स्वांगे उटीतु अष्टांगें रुक्मिणीचीं ॥ कृष्ण कर योगें सबाह्य निवों लागे जाणतील अंगें अनुभवीये ॥ लाभु चरण कमळा जाणें ब्रह्म बाळा त्याचीया कर तळा वैदर्भी भोगी ॥ जो ईशु ब्रह्मादिकी तो सेवकु भीमकी केलासें कवतीकी काय हळदी मीसें ॥ १७ ॥ दासाचाही दासु साचा हृषीकेशु भीमकीया उल्हासु देतु असे ॥ जया जैसा भावो तया तैसा देवो भक्तीचा निर्वाहो हाची जाणें ॥ कृष्ण चरणावरी सुरंग अक्षता भीमकीय माथा ठेवी वेगी ॥ येरी आनंदली रोमांचीत जाली कपाळा पैं आली दशा आजी ॥ १८ ॥ तंव सखीया देखोनी दिठी लाज आली पोटी तोची भेदु दृष्टी आशंकेचा ॥ तेणें चुकवोनी सम चरण न लगती अक्षता नमस्कारी माथा भाळीं न लागे ॥ तंव अभिमानली बाळी धरी अंगुष्ठावर करतळीं नमन ईये वेळीं चुकों नेदी ॥ मस्तक जंव लोटी तंव पाया पडे फुटी अभिमानें तुटी चरण कमळा ॥ १९ ॥ नमस्कारा भलें मागुतें अनविलें तंव सम चरणीं पाउलें दिसों नेदी ॥ अभिमानाचें बळ बळ तें जालें पटळ तेणें चरण कमळ अंतरलें ॥ उश्वासें निश्वासें फुंदे ते कामिनी असुवें ये लोचनीं पूर्ण आली ॥ मनी ऐसी आस नमीन सावकाश तें दैव उदास आजी जालें ॥ २० ॥ ह्मणे कटकटा धात्रया विकटा चरण लल्लाट न भेटती ॥ आजिचेनी हे कपाळ जाले निर्फळ कृष्ण चरण कमळ नातळतीच ॥ वातें केली कापें चळचळी याहुनी बेंवळी भीमकी दिसे ॥ गळती कांकणें अवस्ता भुषणें अशेषित सप्राणें मुर्च्छीत जाली ॥ २१ ॥ देखोनी तो भावो गहींवरें उद्धव एकाएकी देवो निष्ठुर जाले ॥ भीमकी आनंद मेळी न संटे उकळी उद्धव तें वेळीं वोसंडला ॥ नेत्रीं आनंदजळ वाहतसें सोज्वळ ह्मणें धन्य बाळ भीमकाची ॥ धरुनी तिची बाहे ह्मणें उठी माये नमस्कारी पाये या वरिष्ठाचे ॥ २२ ॥ सांडिली लाज अभिमान निर्विकल्प मन मस्तकीं श्रीचरण धरूनी ठेली ॥ यापरी कामिनी घाली लोटांगणी जडली कृष्ण चरणीं उठवेना ॥ तें अभिनव सुख फिटलें जन्म दुःख विसरली निःशेख देह भावा ॥ तेथें सुखें वांकुलीया बोधाच्या गुतकुलीया उसळती उकलीया काय आनंदाचा ॥ २३ ॥ अहं सोहं गांठीं

सुटल्या चरण भेटी आनंदुची सृष्टी हेलावतु ॥ सेव्य सेवक भावो नाठवे विवाहो देवी आणि देवो येक जाली ॥ सच्चिद् पाउली स्वानंदु तळवटी जाहली उठाउठी सहज निज ॥ तेथें वाच्य वाचक मौन ना जल्पक ह्मणावें तें येक तंव ह्मणतें नाहीं ॥ २४ ॥ हरी ह्मणें वेल्हाळा झणी होय वरळ करिती कोल्हाळ सोयरे या ॥ उफराटी विकडी देवासी सांकडी सावध हें फुडी केवी होये ॥ सुखाचा अंतरीं प्रवेशलें हरी तंव विसरला सुंदरी सावध करूं ॥ दोघा येक सुख लागली टकमक चेतविते देख कवणा कवण ॥२५॥ त्या सुखा वेगळी न निवडे ते बाळी सुखेसी वेल्हाळी उठविली ॥ त्या देहा जरी येणें परी देह मी न ह्मणें अवघीं कृष्णपणें रचली असे ॥ चराचर दिसें तें मज माजीच असे रचले मदलेसे ब्रह्म गोळ ॥ ऐसी कृष्ण रुक्मिणी बैसली ऐक्य होउनी तटस्थ अस्तानी काय सकळीकेसी ॥ २६ ॥ तो सोहळा देखोनी एकाजनार्दनी उल्हासु जनी वनीं सांठवेना ॥ त्या आनंदाचा लोंढा न कळे उदंडा तेणें सुखें धेंडा नाचतुसे ॥ एकाजनार्दनी बोलतांची मौनी हळदुली कैसेनी हाता आली ॥ पिता माहाचा पिता सुभानु तत्वता हळदुली हें कथा तेथुनी जाली ॥ २७ ॥

---

## धवळ धानाश्री.

॥ २७२९ ॥ हेमवंताच्या पोटीं जन्मली गोरटी तपें सा धुर्जटी वरीयेले ॥ मंडपाच्या द्वारीं आला पै नोवरा अगुणाचा ह्मातारा रूप नाहीं ॥ १ ॥ धृ० ॥ नावां येव्हढीया बाळा अति वृद्ध नोवरा कुंवारीच्या संसारा शुन्य केलें ॥ येणें जाणें ठेलें भोगणें सुटलें नारदाचेंनी बोलें ऐसी दशा ॥ काकुमारी तया दिधली हे बाळा ईचीया कपाळा कवण जाणें ॥ शकुना लागी दासी उभ्या पूर्ण कळसेसी पांच मुखें वरासी तिन्ही डोळे॥२॥ दारावरू आला मुद पैं वोवाळा साजुकासी साळा माळ गळा ॥ सासु ह्मणें कवणा दिधली दुर्बुद्धि विकल्पाचा नंदी गोमाशा लावी ॥ ३ ॥ लग्न घडी आली अंतर पाटू धरा अतिशयें नोवरा उंच देखा डोळयासी पुरे ऐसा नव्हे कानवडा अंतरपाटु पुढां काय धरूं ॥ ४ ॥ कन्या दोन वरा गोत्र पैं उच्चारा वृद्ध परात्परा सांगा वेगी ॥ बापु तो नाठवे माय मी नेणें कुळगोत्र लाहणे नाहीं आह्मां ॥ ५ ॥ बहुल्या वधुवरे संभ्रम सोहळा अक्षवाणे बाळा

करु आल्या ॥ तंव कंठीचा वासुकी दिपा फणु करी धुधुकारें नारी पळालिया ॥ ६ ॥ प्रातःकाळ जालीया काढीला भस्मारा विभुती शरीरा लावियेली ॥ अगे हा काळाचाही काळु नव्हे धारी जाणा संसारीला हाणा जांवई नव्हे ॥ ७ ॥ लग्न येरे दिसीं उटणें मांडलें धवळ आरंभीलें संभ्रमेसी ॥ धवळा माजी गाणी गाईलें राम नाम ऐकोनीया प्रेम वरासी आलें ॥ ८ ॥ राम नाम ध्वनी ऐकोनीया कानीं स्वेदु कंपु नयनीं अश्रु आले ॥ उन्मळीतां दृष्टी बाष्पु दाटे कंठीं मुर्छा पूर्ण सृष्टी विकळ पडे ॥ ९ ॥ वरा पाय खूं रक्षा पै कपाळा त्रितीय नेत्री ज्वाळा उठलिया ॥ १० ॥ नोवरा हा नव्हे संसारू विवसी देह भावें कवणासी नेदी उरों ॥ वेगी वधुवरा चौक न्हाणें करा उकलिती सुंदरा जटा भारू ॥ वराचिया माथां सोज्वळ सुंदरी येरी ह्मणे नोवरी मी महेशाची ॥ ११ ॥ गौरी ते अर्धांगीं सवती बैसे माथां ऐसी याची कांता उमा केली ॥ हा अकुळी अती वृध्दु कां केला संमंधु जिवेसी विरोधु पडिला साचें ॥ १२ ॥ जेथें वडील धारें नाहीं तेथें बोळवण काई कुवारी कवणें ठाई दिधली देखा ॥ जेथें संघात अभाव तेथें कैचा येव जावो जिण्या मरणा ठावो नुरेची ईसी ॥ १३ ॥ विवेकेसी जेथें परतलीया श्रुति गौरी याचे हातीं लावियेली ॥ माया माहेर खुंटलें संकल्पें तुटलें ममत्व मिटलें आजिचेनी ॥ १४ ॥ बहु काळा जुनाटु यासी शेषपाटु संसारा शेवटु जाला माये ॥ येका जनार्दनी प्रकृति प्राणेश्वरें मीरवती वधुवरें एकपणे ॥ १५ ॥

---

# अकलगारी भाषा.

॥ २७३० ॥ अकलगारी सुभानप्यारी ॥ बाकी अकल वो विचारी ॥ अकल बंदा अकल करते ॥ वले अकलकी अकल नही धरते ॥ १ ॥ इस बदल भी भी मरते ॥ भी भी रोवते ॥ गोरी गवारा भी भी देखते ॥ जन्ममरणका बडा घाव ॥ वो घाव काटने कुं भाव ॥ तो येरी तयारीसो अकल लेवो ॥ नादान नहो बेहुष ॥ मै अकल बेचताहुं भाई ॥ वले लेणारा नही काई ॥ पढगुण मनुम गर्क ॥ दुनिया दारेता भोग गडप ॥ मेरे अकलके ताई ॥ ग्राहक कोई नही ॥ यो क्या लेवेंगे बिचारे ॥ लेनारासो जुदा है ॥ बाजार मुस्त फाकरीदार खुदा ॥ जनधका छोडो धंदा ॥

अकल लेवो अकल बंदा ॥ दिल ज्यानसूं अकल लेवेंगे ॥ तो नजीक मौजुद पावेंगे ॥ भिस्तके मेवे खावेंगे ॥ सुख लेयी सुख सोवेंगे ॥ कुछ बस्ततो दिसती नहीं ॥ बड्या बड्या बोलोंकी बढाई ॥ देखत नजरकुं तकवा नही ॥ तो लेण्यारेने क्या लेणा भाई ॥ दिसते बस्तका सौदा करते ॥ उन्हो सौदागरोकुं चोर लेते ॥ दुनया दारभी नंगावते ॥ दिसते सौदेमो दगाखाते ॥ बातीम वस्तकी सौदागरी करो ॥ तो अकलकी अकल पर जोर धरो ॥ हरशीर सच्या खुदामाने ॥ सुभानकी सौदागरी रानो ॥ एका जनार्दनका बंदा ॥ अकल गारी करते सौदा ॥ दुनयाका उडगया धंदा ॥ सौदागरीमे पाया खुदा ॥ वो छाडकदकी करते धंदा ॥ अकल लेवो अकल बंदा ॥ १ ॥

## २.

॥ २७३१ ॥ अकल लेवो अकल लेवो अकल लेवो कहता हय तो ॥ इगानी दुगानी तिरुकेकी अकल है ॥ इगानी पर दुगानी दुगानी पर तिरुका ॥ दुगानी तिरुका यो सौदा बडे महाजन धरने ॥ यो सौदा दुनियादार भी करते ॥ इस सौदेकुं हैवान दवडते ॥ बडेबडे लडलड पडते ॥ पढेगुन इस सौदेपर सोवते ॥ सबलोक इस सौदेकुं रोंवते ॥ इसबदल दुगानी तिरुकेकी बात छोड ॥ दिलथी उसका तकवा तोड ॥ बजा अकलगारी सौदा छोड ॥ लोडेगातो यरत्वारी सों छोड ॥ मिठा होणा तो लोणा नही तो फिराव-सट देणा ॥ खुषीका सौदा करणा ॥ दुगाणी तिरुकेका सौदा करता नही तो रहणे दे ॥ च्यारी दामका सौदा हय ॥ भला गिन्हाईक अकल च्यार दाम तूं खर्च्या हय ॥ अखर तोभी च्यार दाम खर्चेगा ॥ इसबदल च्यार दामका सौदा देऊगा ॥ वस्त तो बडी मोलकी हय ॥ भले गिन्हा-ईक लगणा सौदा देखणा ॥ इसवास्ते देऊंगा ॥ च्यार दामकी अकल देख आगे उंची भोय होगी वांहा मुतणे नको बैसों उचे मुतणे बैसेगा ॥ तो तेरा मुत तुजतले घुसेगा ॥ बजातुं कुसमुसेगा ॥ कपडे गिलेकरेणा ॥ बजानि चोडता फिरेगा ॥ दोनो हात मूत भरेगा ॥ इसबदल उंचे मुतो नको ॥ मोलथी अकल फाजिल हुई ॥ याद रख दुसरी एक अकल देताहुं भाई ॥ उस अकलकुं मोल नही ॥ जो लेगा उसे बडी बडाई ॥ दोख दुःखकी तुटेल डाई ॥ खोडेमे मुतनको ॥ खोडेमे मुतेगा तो सालीम गुंतेगा ॥

रहते रहते कुंथेगा लातातले हिंकेगा ॥ बजांदिसरात थिकेगा ॥ इस बदल खोडेमे नको मुतुं ॥ छेदामकी अकल है ॥ भला गिन्हाईक ॥ भला गिन्हाईक ॥ छेदामकी है बारा दामकी है ॥ टकेकी है सोन टकेकी है ॥ सोंकी है पांच सोंकी है ॥ हजारकी है बंध्या लाखोंकी है ॥ क्रोडोकी है ॥ जो जैशी संगेगा वैसी है ॥ वले लेणारा कोई नही ॥ वैकुंठके पातशाहीतें अकल बडी है ॥ सेशशयन साहेबीते अकल बडी है ॥ वले इस सौदेका गाहक बडे मर्तबेका नही ॥ छगानी दुगानीका गाहक मीले वैसाच सौदा करणा ॥ छेगानीकी अकल देख ॥ बाट चलते बाटका घांस हात नको धरूं ॥ घांस धरेगा तो हात चिरेगा ॥ झालीम लहु भरेगा ॥ हातपर मुतणा करेगा ॥ सात देस दुःखमों फिरेगा ॥ इसबदल घांसकुं हात न धर ॥ घांसके जागाकुं धरे लावेगा हात ॥ तो सीनेपर बैसेगी लात ॥ उस्मे बिछु है अदांत ॥ उस बिछूकी अजमत ॥ लडे चढे करेगा घात ॥ इसबदल घांसके जागाकुं हात नको लाऊं ॥ उस घांसमे बडे बिछूका थारा ॥ लडता है पीर पैगंमारा ॥ उहांतूं कोण विचारा ॥ नांगी लगते हो घाबरा ॥ वो बिछु लडेगा ॥ तो ब्रह्मांडमो चढेगा ॥ मरणके फंदी पडेगा ॥ बजांतुजे कोण छोडेगा ॥ मोलथी अकल फाजिल हुवी ॥ याद रख ॥ याद रखेगा तो अकलका मगज याद रख ॥ बेहोष होगा तो दगा खावेगा ॥ एका जनार्दनका बंदा ॥ अर्दास करे अकल वंदा ॥ कर्मधर्मका खाली धंदा ॥ अकल धरे तो नजीक खुदा ॥ २ ॥

## ३.

॥ २७३२ ॥ बारा दामकी अकल हैं है बाबा ॥ मौजुद भऱ्या है ॥ हजरतके दरगा कुच कमी है ॥ बारा दामकी अकल लेवो भाई ॥ बाट चलेगा तो सांडवे परथी नको चलुं ॥ सांडवेपर चढेगा तो खो सज्यासु उलख पडेगा ॥ बजा पानीमो लिढेगा ॥ गला आटासो सडेगा ॥ संघाती साथ छोडेगा ॥ मजली जाणेकुं अडेगा ॥ कपडे धोणेका जरूर पडेगा ॥ कपडे धोणेका काम धरेगा जो ॥ बंध्या खर्च उहां सरेगा ॥ भूक लगे क्या करेगा ॥ बता भीक मंगता फिरेगा ॥ इसबदल सांडवेपर नको चढूं ॥ चढेगा तो पढेगा अकल नसून ते सालीम अडेगा ॥ ३ ॥

॥ २७३३ ॥ चोविस दामकी अकल लेवो रे भाई ॥ बाट चलते बिसांवा लेवेगा तो ॥ बाट पर बिसावा नको लेउ ॥ बाट पर बिसावा लेवेगा ॥ तो लोकोके धक्के खावेगा ॥ बिसरि बस्त भुलेसो ले ज्यावेगा ॥ बज्यातुं कीस कन्हे मगेगां ॥ किन्हे लियि बढे लगेगा ॥ इस बदल बाट पर नको रहुं ॥ बाट पर रहे गा तो तुं दगा खाये गा ॥ मोलथी अकल ज्यात हुई ॥ याद धर बाबा याद धर ॥ टकेकि अकल हय ॥ हय बाबा हय ॥ टकेकि अकल लेवो रे भाई ॥ बाट चलते रातकुं ॥ बाजारमो नको रहुं ॥ बाजार मो रहेगा तो ॥ गठडी कुत्ता ले जाये गा ॥ अंधारि रातमे काहा पावेगा ॥ गठडि गवांईकें बसोवेगा ॥ बज्या बैठा बैठा रोवे गा ॥ कुडें कें उरोवणा सुन बडे महाजन बडे राजदारी ॥ बडे बडे अकलगारी ॥ बडे बडे हिकमत गारी ॥ साल बिलंद बुट्टे ॥ आउर नव्हे बडे आकल नादानिके पोंगडे ॥ उसका रोवणा सुनो ॥ गठडि गवाई कैंव कैंव ॥ मिसला गवाई करना केउ ॥ ईनाम जागा कहणा कैंव ॥ कटोरि गवा खर्च गवाया चलना कैंव ॥ तोबा गवाना खाना कैंव ॥ यीपिकणा केव ॥ तंबालु गवांयां धोवणा केव ॥ देव पुजा गवांयि पुजना केव ॥ किताब गंवायी पढणा केव ॥ आगे पदंतिके कैंव ॥ साले समंधि जोसी भाई जवाई ॥ औरत पुछेगे गवाया कैंव गालि देगी तो करणा केव ॥ रातकु यिता दगा केव खाय ॥ औरत न मीठाईका चोघा समोसा दिया ॥ वो मै खाया ॥ ना कीसकु दिया ॥ आधेके गठडीमो छपाया ॥ उसके गंधो काला कुत्ता आया ॥ वो सालिम गठडि लेकर गया ॥ पापीका धनपर हात जाय ॥ लोभीका रखा कुत्ता खावे ॥ वैसा बाखा मुजे होवा ॥ यिता लकरना कैंव कैंव ॥ मीठाईकी गंधी देखणा ॥ उहा काले कुतन आवणा ॥ दाऊनकी गठडी हुकुम ले जाणा ॥ जो रोंनगावणा ॥ हर किसकुं उसकाले कुत्तेले ॥ सौदसादात पीर पैगंबर ॥ बडे बडे सौदागर नंगे दिगंबर नंगाय ॥ राखे ॥ नंगाय शस्त्रे नंगाय नख नंगाय ॥ जपी नंगाय ॥ अंधे मुके घुपी नंगाय ॥ बडे बडे तपी नंगाय ॥ वेदपाठक नंगाय ॥ ग्यानी नंगाय ॥ ध्यानि नंगाय ॥ उहां तुं कोण बिचारा ॥ तुज ऐसे हजारोकुं नंगाय उव्हो ॥ उस काले कुतेकुं रखणहार ॥ सांचा येक कर्तार ॥ बांक्या का कारभार ॥ हाजारे हाजार नहि चले ॥ मै रोवताहुं ॥ मेरे रोवणेकी बुनीयाद सुनो रे भाई ॥ औरतकी मिठाई का चोंघा संघात

लिया ॥ तो काले कुत्तेने दगा दिया ॥ सालि मठडिकु नंगाया ॥ चोघ नेलिया घर मेरा ॥ मोलथी आकल फाजील होयी ॥ ये क्या बिचारे मोल देवेंगे ॥ मेरी अकल पास होनिकर मै देता हुं ॥ नहितो टकेका मोल ॥ होरह्यो ॥ आकल बडे लेणार सुनोंगे ॥ तो रातभी चले अवेंगे ॥ मेरे अकल कामन जपावे गे ॥ सुख दुःख काठि छोडेंगे ॥ चलति समाधि पिवेंगे ॥ जीव मार कर जीवेंगे ॥ मोल लेकर बेचे अकल ॥ वो सालिम कम अकल ॥ कम आकली दुरकर ॥ मेरी आकल याद धर ॥ येका जनार्दनका बंदा ॥ आकल बंदा नजीक खुदा ॥ १ ॥

॥ २७३४ ॥ अकल थी मिली अकल ॥ बेचनहरेके मिठे बोल ॥ जिस आकलकु बडा मोल ॥ वो अकल खोल मै लेवुगा ॥ सोनटकेकि अकल हय ॥ बडे मोलक्यां बातां ॥ वले बडि अकल लेता गिराई किनई ॥ अकल बेचता हूं० ॥ तवकलभाई ॥ बडे बडे गिराईक ॥ लामणेके ताई ॥ आपना तनुमनु मुजा देवे ॥ बडि आकल जो कोई मेरी लेवे ॥ उससुं सवदा करते भावे ॥ खुसिका दऱ्या भऱ्या चलावे ॥ खुसिम्याने जंगतर भुलावे ॥ येकाजनार्दनकु भावे ॥ तनु मनु देकर अकल लेवे ॥ २ ॥

॥ २७३५ ॥ खुसीका दऱ्या भऱ्या चलावे ॥ वो खुसि जगतर कुणी लावे ॥ सोनटकेकी अकल लेवो रे भाई ॥ रोख लेणा तो सवदा देणा ॥ उधारो देणा तो दगा खाणा ॥ रोख देवे सो सुखि होवे ॥ उधार देवे सो रोज रोवे ॥ रोख देणारा सुखसे सोवे ॥ उधारि नावा पदपद रोवे ॥ हतकी बस्त उधारी देना ॥ बज्या उसके घर अवना ज्याना ॥ न देवे तो भुके मरना ॥ हत न चढे तो रोवत फिरना ॥ रोख हातकी देकर बस्त ॥ धनीने हात पर कीया खत ॥ उस खतका दर्द बहुत ॥ दिसरात रोवत मेरामेरा ॥ उधारि जो मर जावे ॥ तो लवन हरा क्या फत्तर लेवे ॥ बज्या मंगणेकुं पेट आवे ॥ बेटा होवे उधारीका ॥ १ ॥ उधार लेनारा नहि देता ॥ तो उसके घरका होवे कुत्ता ॥ उधारक्या बुरा बातां ॥ लेता देता दोजखी ॥ २ ॥ भाईनयो आकल सोनटका न पावे ॥ मेरे पैके फिरावे देवे ॥ दिलथी अकल मेरी काढ देना ॥ तोले रोख सोनटका लेकर जाना ॥ दिलमें बस्त घसो रखना ॥ पैसे मंगना तो दगाबाजी ॥ ३ ॥ जैसि फुडी बांध दिई ॥ वैसि सालिम कीने ल्याई ॥ बस्त दिलमें उलंड लिई ॥

पैसे मंगना बे सरमाई ॥४॥ सुनो यारां दोखदारां ॥ मेरे अकलका पसारा॥ आवरतके बोलोयो बिचारा ॥ पैसे मंगनहराम पैदा हुवा ॥ ५ ॥ फीराव बस्तके उसटि भाई ॥ खालि खालिति कुचभी नई ॥ मेरि आकल दिलमें राहि ॥ पैके मांगना नामाकुलाई ॥ ६ ॥ मोल थोडा बस्त बडी ॥ फीराव सटना आकल सडी ॥ जोके बोलो जोकां गांडी ॥ पैसे मंगता सालिम लंडी ॥ ७ ॥ टका सोनटका मेरेपास नही ॥ अडकेकी अकल लेवो रे भाई ॥ बाट चलते चुना देखे बगर ॥ मूमे सुपारी नको बाहुं ॥ ८ ॥ बिन चुनो सुपारी खावेगा ॥ तो मुहे मू फजित होवेगा ॥ देखे सोहु सलावेगा ॥ हातकी सुपारी गमावे गा ॥ बज्या रोवेगा फीकेमूं ॥ ९ ॥ मोलथी आकल बडी ॥ देखो भाई देखो ॥ भाई नन्हे बडे ॥ आदमि गिरिमें बंदगी छोडे॥ वो सालिम गधडे कम अकल ॥ १० ॥ टके सोनटकेकि अडकेकि अकल बेचता ॥ वो पोगड्याकुं फुसलावता ॥ काढणा बड्या बड्या बस्ता ॥ हज-रत दोस्ता लेवेंगा ॥ ११ ॥ बडा गाहक शिरताज देख ॥ नन्हया पोंगड्याकी मै पाव रत्नाक ॥ अकल लेवो भाई परख परख झुट सौदा वो पापि लोक ॥ १२ ॥ सबकी अकल हय ॥ हय बाबा हय ॥ सबकी अकल लेवोरे भाई ॥ तो कीसकी न बोलना बंदगोई ॥ चाहाडि लावेगा ॥ तो काला मू होवेगा ॥ बात सुन रोस आवेगा ॥ मापर गाली देवेगा ॥ बज्यातु झुरझुर रोवेगा ॥ ईस बदल चाहाडी नको करूं ॥ १३ ॥ घोडा गुहाड आदमि चाहाड ॥ उन्होका कुत्ता नहि खावे हाड ॥ कवा न छिवे पिंड पगाड ॥ वो दोजखि सालिम दाड ॥ १४ ॥ चाहाड होकर जनमे जीवना॥ उससे भली भीक मंगनां ॥ भीक मंगकर पेट भरना ॥ दीन दुनियां सुरु-खरु होना ॥ १५ ॥ चाहाडि कर करन्या मतखाना ॥ हरहुकुम दो जखमो जाना ॥ जन पोंगड्या बदल करता चाहाडि ॥ उसकी आकल गैबानि गधडी ॥ कुत्तेके दुमसु उसकी दाटी ॥ शाहारे ज्यादा किया वोकां गांडी ॥ १६ ॥ चाहाडी करकरक्या सुख पाया ॥ मुवा मुरद्यां दोजखलाया ॥ जन पोंगड्यांसु अजब खाया ॥ चाहाडका मू गुमे गया ॥ १७ ॥ मोलथी अकल फाजिल हुई ॥ अकल बंदा देखो भाई ॥ सबदेमो दगा बाजी नही॥ अकल लेवते बहुत मिठाई ॥ पांचसोंकी अकल हय, हय बाबा हय ॥ पांच-सोंकी अकल सारितो हरामि न करणा चोरी ॥ १८ ॥ चोरि करेगा तो मारते हग हग भरेगा ॥ सुलपर सडसड मरेगा ॥ मुये दो जख भरेगा ॥

दो जख पडे पडे झुरेगा ॥ १९ ॥ इस बदल चोरि न करनां ॥ चोरी कर-कर पेट भरनां ॥ उस थी चाकरी कीना करनां ॥ सद नियत सु साहेब धरनां ॥ २० ॥ दिल ज्यानसुं सेवा करना ॥ साहेबके लाई रमे मरना ॥ भिस्तके मेवे भरभर खाना ॥ अवलिया अंबियामो मिलकर रहना ॥ २१ ॥ मोलथी आकल फाजील होई ॥ आकल बंदा देखो भाई ॥ सौदेमे दगा-बाजी नहि ॥ अकल लेते बहुत मिठाई ॥ २२ ॥ येका जनार्दनका बंदा ॥ अकल लेवो अकल बंदा ॥ दुनियाका तो खाली धंदा ॥ अकल म्याने नजिक खुदा ॥ २३ ॥

॥ २७३६ ॥ हजारो की अकल हय, हय बाबा हय ॥ हाजारोकी अकल लेनां ॥ तो फेशा सुंयारि न करनां ॥ फेशा सुयारी करना तो उडगया आसिलपनां ॥ जमालत कमालत डुबावनां ॥ १ ॥ धैर्य ब्रंह्मच-र्यभि गमावनां ॥ आपसे आपण गांव लेनां ॥ दो जरवम्याने गोते खाना ॥ २ ॥ फेशासालिम न गोवनहारी ॥ वो वो जिन्हें जिनगानी आपनी प्यारी ॥ दुनिया दारसो कीया भिकारी ॥ माल सरे उपर लथडि मारी ॥ ३ ॥ माल सरे न बैसे साथ ॥ माल सरे न देवे हात ॥ माल सरे न सुने बात ॥ फेशा प्यारि सालिम कहात ॥ ४ ॥ मारसरे पर मू न देखे ॥ मूहे मूं करकर मूपर थुंके ॥ ५ ॥ मालदार सुंयारि करे ॥ उसके जोरों टोले मारे ॥ धगडके जोरो टोले मारे ॥ मालसरे शिर टोले मारे ॥ कैसा सुकरे गायारि ॥ फैशा जाण आकल जलबुरी ॥ दिस दिवे नगावण हारी ॥ फेशा जीन्हे मानी प्यारी ॥ दिन दुनियामो वोहु गुन्हेगारी ॥ ६ ॥ फेशा केंवकर नंगाति ॥ वो बात सुनो रे भाई ॥ बेव्हारेनें बेटा बुलाया ॥ जव्हार लेणें बंदर चलाया ॥ वाटमो फेशासों दोस्ति लाया ॥ आधा माल मनगुली सोंखाया ॥ ७ ॥ मनगुली फेशाको नाम ॥ तनगुलिका मिठा नाम ॥ मनगुलिसों भुला भाव ॥ बेटेकी बाप खबर पाया ॥ बेगचिटि दे मागुचलाया ॥ वापकी खबर बेटेकुं आई ॥ बंदर चलने मुस्तेद हई ॥ ८ ॥ जीव थी प्यारि फेशा भावे ॥ उसकी रजा पुछने आवे ॥ फेशाछुरी मार-लेहु दिखलावे ॥ मट्टा दे कर भिभि रोवे ॥ ९ ॥ तेरे तई रोवति तपति ॥ केंव केंव मिले तो मेरा साथी ॥ बेग मिलतो मेरा साथी ॥ पाप पड जर-कमरलेति ॥ १० ॥ बज्या जानेकी रजा देति ॥ बेग आवो बेग आवो ॥ खुब खासी बस्त मुजकुं लावो ॥ मै क्या करूंगा मामूं ॥ तो मारेगा मूहे मूं ॥

बज्या होवेगा काला मू ॥ इस बदल मै जाताहु ॥ मुजे बिसरू नको ॥ मेरा जीव तेरे पावनके चहे ॥ मुजे बिसरू नको ॥ पांव धोवते विराखत करते ॥ फराखत करते ॥ मुजे विसरे नको ॥ उसके पाव पर किया लोटा ॥ बज्यां बंदरकु चला बेटा ॥ बेगमा मु बंदरकुं आया ॥ माल मवेसि दस्त किया ॥ भानजेकुं गांव वलाया ॥ मनगुलिके नजीक आया ॥ ११ ॥ मामुके पेटमो मुंडी बाहिया ॥ इहां रहाणा मेरे ताई ॥ मेरे दोस्तकी बडी बडाई ॥ मिलकर आउगा बेगबेगाई ॥ १२ ॥ दोस्तका नांव कह मेरे पास ॥ तो मै रहुंगा याहा छे मास ॥ झुट कहुं तोले दस्त रास ॥ नांव कहणा रास्तका रास्त ॥ १३ ॥ मनगुलि सो मेरि प्यारि ॥ उसमे मुजमे बहु तयारी ॥ मेरे ताई रोंवते भाई ॥ दिसे रातु तपति विचारी ॥ १४ ॥ नांव कहां मैं रास्तका रास ॥ सुनकर मा मु करे गा रोंस ॥ तो मै होउगा दर्वेश ॥ चरम पोसी आलो दोस्त ॥ १५ ॥ भानजेकु बुरख दिया ॥ मामुनें उसे सघात लिया ॥ अवल तेरा नामजो आया ॥ तो मैं याहां छे मास रहा ॥ १६ ॥ मामु मनगुलिकुं पुछता ॥ मनगुलि मुजे सच्या कहता ॥ कीसकेतई तेरा तपताशिना ॥ उन्हे भेज्या है जर जरिना ॥ अवल उसका नाव कहना ॥ भेज्या वस्त गिन गिन लेना ॥ १७ ॥ मनगुलि जिवके प्याऱ्याकों नांव कहति ॥ सदोपिंजारा बदोखाटिक ॥ वाया बायवडा सालो मुरुख ॥ होवे आया दिड तुरुक ॥ दामनाईक वेव्हारा ॥ १८ ॥ श्रीधरभट्ट सदा श्रोत्री ॥ नरसपाटक अग्नि होत्री ॥ गोपाल पाठक चतुःशास्त्री ॥ होगा महा मंत्री वामन देवो ॥ १९ ॥ नरसिपंत परसिपंत ॥ दतोयारिदिहेजीव आनंत ॥ महावैष्णव रंगनाथ ॥ अनंतपंत जमालसी ॥ २० ॥ चंदु ठाणेदार माया मुजुमदार ॥ निगेवान तो मेरा यार ॥ होगावर खुरदार सरसमत ॥ २१ ॥ मुरग्या सिधि मुल्ला बाहादि ॥ खत बिहो गा जमालादि ॥ नहि तो होगा शादि ॥ बाजिगरोका ॥ २२ ॥ चक्रतीर्थका मालोजपि ॥ नहि तो होगा सालो तपि ॥ होगा राघो व्याघ्र पडमी ॥ रुद्रजपि कान्होबा ॥ २३ ॥ करडा काळा कोतवाल ॥ मेरा यार मुधो दलाल ॥ नहि तो कलाल मुशाफर ॥ २४ ॥ पंचांगु कोल्हाटि नेटका ॥ हा गा बहुरुपी टमका ॥ नहि तो थेरकरि सोनटका ॥ नहि तो वकडा कुलता ॥ २५ ॥ नागो दिवटा गोंधळी विठा ॥ महामायेचा नाच नाटिका ॥ होका बुरड घाटा ॥ कोरवोदामा गाढव्या ॥ २६ ॥ सेना गुहाड लखोपंत तुकोपंत दोन्हो चाहाड ॥

मालो भोडा सोनो भसोभसाड ॥ होगा काळा पहाड बडा जेठि ॥ २७ ॥ दगा कासार ठकु सोनार ॥ मेंगोमोचि मेसो चांभार ॥ जेमा जोगी भुतो कहार मैलो मांगको महार ॥ हजारो हजार नावलिया ॥ दो सेर सुतलीकुं गाठी दिया ॥ २८ ॥ ईस लडिका नाव न आया ॥ फुस लाव छोरेकु केवन काया ॥ है गे बाणि ॥ २९ ॥ मेरे ताई मुछुरी माई ॥ मेरा नांव तु याद न धरी ॥ सब ल्याया राम तु काज भिकारि ॥ ईस बदल तेरा नांव बिसरी ॥ ३० ॥ बैसा असळ नगावणि ॥ उहा तुजे कोण गणनि ॥ माल देवे प्यारा सेट ॥ माल सरे कुतेका सेंट ॥ योहि सवदा बैसाके हाट ॥ माल लेना कलिजा काट ॥ ३१ ॥ दस हजारकी अकल लेना ॥ तो बादिकुं हातन वाहाणा ॥ काजी मोतशाम नाव सुहावे ॥ पातशाहा कणे-हुर मतपावे ॥ खानवजी रासिक दे आवे ॥ वो काजी बांदिकुं हात लावे ॥ ३२ ॥ मोतशमाई हुकुम गमावे ॥ बिबिगई पिरोंके जारत ॥ काजि उव्या बडि रात ॥ साजगारकुं बह्या हात ॥ कबुल सुरत वह्यामें ॥ ३३ ॥ साज-गारकी अकल बडी ॥ उठतेच काजिके पांव पडि ॥ काजिनें वोच कळप कडि ॥ बांदि खडि कबुल ॥ ३४ ॥ तुह्मे मजला वेगे हात ॥ बिबि मेरा करेगिक हात ॥ मुजे मारिगि देख रात ॥ करेगी फजित दोन्होंकुं ॥ ३५ ॥ मुजसुं करेगी लदाई ॥ तुह्मारी उढेगी बढाई ॥ ईस काममें नफा नई ॥ माफ मेरतई करना काजि ॥ ३६ ॥ काजि सुनो मेरी आदसि ॥ आजर कर कर देउ मनुस ॥ चोरिका काम नव्हे दुरूस्त ॥ वे दुरुस्त कमाई ॥ ३७ ॥ येक रातका लेना देना ॥ खलकम्यानें फजित होनां ॥ काजि ऐसा काम न करना ॥ माफ करनां मुजै तैं ॥ ३८ ॥ पोगंडे जन बिबि उतरि ॥ तुझ्या न झमकडि प्यारि मेरी ॥ तुज मजमे पडियारि ॥ बिबि बिच्यारि क्या करती ॥ ३९ ॥ बांदि कहे मेरी सुनो बात ॥ अवल दस्त रास देवो मेरे हात ॥ बिबिने मुजे कर्ते खस्त ॥ मेरिहि मात तुम करना ॥ ४० ॥ काजि वस्तादकी शफत खात ॥ मुसाफर परख्या हात ॥ बांदिके कानमे कह्या बात ॥ बिबिसें तूं डरों नको ॥ ४१ ॥ बांदिके सोहबत ताई ॥ वस्तादकी सौगंध खाई ॥ गंधे काममे मुसाफ ल्याई ॥ कजागबाई काजिनें ॥ ४२ ॥ पलंगपर बांदि राजि ॥ बांदिने पावतले लाया काजी ॥ काजि था सो हुवा पाजी ॥ सोवत साजि बांदिवाला ॥ ४३ ॥ बांदिके सोहबत ताई आज्या ॥ बांदिके बंदमें काजि पड्या ॥ कज्या कज्याना सवहि

उड्या ॥ पढणा पड्या धुलिमे ॥ ४४ ॥ प्यारा बांदिकुं देत मठा ॥ बांदिनें काजि कीया लोटा ॥ काजिपणा हुवा खटा ॥ काजि बैठा दोजखमें ॥ ४५ ॥ बिबि बांदिमें लगि लढाई ॥ पातशाहा पास ॥ किताबम्याने बांदि आले ॥ कहणहारे मुला भुले ॥ आवरतां छांड हुवे बोंद दले ॥ वो बंदे अला खुदाके ॥ किताब म्याने यंव फरमाया ॥ बांदि बगर दोजख गया ॥ पढगुण कर गफलत खाया ॥ सोबत बंदा बांदि भया ॥ ४६ ॥ दिलम्यानथी बांदि भावे ॥ उसके हुजति किताब ल्यावे ॥ बांदिवाला कैभिस्त पावे ॥ हुकुम ज्यावे दोजखमें ॥ ४७ ॥ बांदिकु हात लगावे गा ॥ तो दिनकुं नंगावे गा ॥ दुनियामें फजित होवेगा ॥ घरमेखले लपावे गा ॥४८॥ भिहति दोजख जावेगा ॥ मोलथि अकल फाजिल हुई ॥ आकल बंदा देखो भाई ॥ सौदेमे दगाबाई नई ॥ अकल लेना भिस्त मिठाई ॥ ४९ ॥ पच्यास हजारकि अकल हाय ॥ हय बाबा हय ॥ पच्यास हजारकी अकल लेवोरे भाई ॥ पच्यास हजारकी आकल लेना ॥ तो मेरी बात दिलसुं सुना ॥ सुनकह वैसाच चलना ॥ चेलसके तो होय अघाणा ॥ ५० ॥ भिस्तके मेवे घर बैठे खाना ॥ अवल पैसे गिणगिण लेना ॥ बज्यां मुंजे अकल देना ॥ ५१ ॥ अकल उंच्याई नहीं ज्याय ॥ तो मोल लिया फैदा क्या हुवे ॥ दगाबाजीका सवदा न होय ॥ अकलदारि मैंदान गोय ॥ सरले ग्राहिक मुसलमान ॥ थोर थोर मोलाच्या वस्तु संपूर्ण ॥ घेउ आले वैश्य क्षत्रि ब्राह्मण ॥ त्याचे लक्षण अवधारा ॥ ५२ ॥ थोर थोर बुद्धि घ्यावयासी ॥ मुख्य ग्राहिक मऱ्हाटियासि ॥ त्याचि घेणावळी कैसी ॥ सावकाशी अवधारा ॥ ५३ ॥ आमोलिक बुद्धि घ्यावया येथें ॥ ग्राहिक ब्राह्मण समर्थ ॥ त्याचे घेणावळिचा अर्थ ॥ सावचित्त अवधारा ॥ ५४ ॥ जैसा चेंडु चौगाणे आंत ॥ सकताने हतोहत ॥ तैसिच सद्‌बुद्धि येथें ॥ ज्ञाते नेत सन्मार्गे ॥ ५५ ॥ अकल ऐका सावधान ॥ सत्य न मानावे स्त्रियेचें वचन ॥ आपण न व्हावें स्त्री आधीन ॥ स्त्रियेसि आपण विश्वासों नये ॥ ५६ ॥ विश्वासता स्त्रियेच्या बोला ॥ काचि बोभाये हजार काउळा ॥ राजद्वारीं बोभाट जाला ॥ स्त्रियांचें बोला विश्वासता ॥ ५७ ॥ स्त्री विश्वासाचि परवडी ॥ मायबापाचा तडका तोडी ॥ सख्या बंधुसी वैर पाडी ॥ लाउनि सुहृदाचि चाहाडी ॥ वेगळे काढी पुरुषातें ॥ ५८ ॥ मामिसें आटिति माझें मास ॥ कंठनाळीं डसों पाहाति मामेस ॥ माझेनि मुते तान्हेले भावेस ॥

देरिं निराश माझी केली ॥ ५९ ॥ जावा वोहिनी कां नेणंदा ॥ तडा तडा तोडिति मजचि सदा ॥ काय पाप म्यां केलें गोविंदा ॥ तुह्मी माझ्या शब्दा नायका ॥ ६० ॥ मी करीन आड कां विहिरी ॥ अथवा पोटिं घालिन सुरी ॥ ह्मणोनि रडे सेजेवरि ॥ लावेंच्या परि कळवळा ॥ ६१ ॥ तुह्मी जोडिता अमित वित्त ॥ हे टोणपे खाती व्यर्थ ॥ ऐसा दावोनि स्वार्थ ॥ वेगळे काढित पुरुषाते ॥ ६२ ॥ मातुस्नेह विनाशाय भार्या प्रागल्भिनी यदा ॥ बंधुस्नेह विनाशाय पुत्रो वै औरसो यदा ॥ १ ॥ पितृस्नेह विनाशाय प्रिया कार्यापकारिणी ॥ सुहृत्स्नेह विनाशाय कांता कलहकारिणी ॥ २ ॥ जे नवमास वागवीं पोटी ॥ सर्वस्वे वेचोनि वाढवी सृष्टीं ॥ त्या मायेच्या सांगोनि खोट्या गोष्टी ॥ मायपुत्रा तुटी प्रिया पाडी ॥ ६३ ॥ सांगोनि कार्य कारण ॥ देवोनि पित्याचे अवगुण ॥ पित्या पुत्रा माजी जाण ॥ यावत मरण अबोला ॥ ६४ ॥ सुहृद दवडावया दुरी ॥ मिथ्या सासी कलह करी ॥ वोखटे देउनि माझिया शिरी ॥ तुह्मी हे बाहेरी शीघ्र घाला ॥ ६५ ॥ परदेशी शिणोनि आपण ॥ जोडोनि आणोनि धन ॥ स्वये करी स्त्री आधीन ॥ मागता आपण आडका नेदी ॥ ६६ ॥ मातापिता सुहृद-जन ॥ दुन्हावोति घे निजधन ॥ होता स्त्री आधीन ॥ अधःपतने पुरुषासीं ॥ ६७ ॥ या लागी नायकावे स्त्रीचें वचन ॥ स्त्री राखावी वचनाधीन ॥ मातापिता द्विज देव पूजन ॥ दीन जन निववावे ॥ ६८ ॥ हेंचि ज्ञानाचे निज ज्ञान ॥ घरीं बैसल्या ब्रह्म समाधान ॥ एका विनवी जनार्दन ॥ स्त्री आधीन न व्हावे ॥ ६९ ॥

॥ २७३७ ॥ बांधल्या लक्षाचि बुद्धि आहे ॥ लक्षाहि न लक्ष ऐशी बुद्धि आहे ॥ लक्षाचें बुद्धिचें लक्षण ॥ परदारा आणि परधन ॥ स्वप्नी नातळे जो आपण ॥ तो धर्मात्मा संपूर्ण ॥ वस्ति स्थान धर्माचे ॥१॥ परदारा परधनाहात ॥ न लावी तो पवित्र नित्य ॥ जगामाजि तो पुनित ॥ जाण निश्चित तो धर्ममूर्ती ॥ २ ॥ परदारा आणि परधन ॥ तें अभिलाषी ज्याचें मन ॥ त्या परता पापी जाण ॥ त्रिभुवनीं अन्य असेना ॥ ३ ॥ परदारा आणि परधन ॥ येथें आसक्त ज्याचें मन ॥ त्यासि सर्वत्र पावे मरण ॥ हा राखावा ह्मणे कोण ॥ राजाहि आपण स्वयें दंडी ॥ ४ ॥ परदाऱ्याचें संरक्षण ॥ करावया ते साधु सज्जन ॥ सर्वदा ते लज्जायमान ॥

त्याचें नाम ग्रहण न करिती ॥ ५ ॥ परदाऱ्याचें काळें वदन ॥ परदारी तो निंद्य पूर्ण ॥ परदाऱ्याचें नाम जाण ॥ अवचटें सज्जन न घेती ॥ ६ ॥ परदाऱ्याचें मुख ॥ जो पाहे तो अति मूर्ख ॥ त्याचे दर्शनें महादुःख ॥ परम असुख पूर्वजां ॥ ७ ॥ आपण नरका जाय तत्वता ॥ परि पूर्वज नेले अधःपाता ॥ परदारियाच्या साह्य सांगता ॥ निरय अवस्था मित्रांसी ॥ ८ ॥ घेतलिया परधन ॥ फेडलिया होय उत्तीर्ण ॥ परी परदाऱ्याचें आलभन ॥ अकल्प पूर्ण निरय वासु ॥ ९ ॥ तेथुनि यावया वरता ॥ त्यासी नाहीं सामर्थ्यता ॥ नित्य पचे नरका ओतोता ॥ पर दारता महा पापी ॥ १० ॥ सहजे सांगावया परमार्थासि ॥ एकांतु करितां परदारेसिं ॥ तोचि विकल्प वाटे सुहृदासी ॥ परदारेसी बहु बाधु ॥ ११ ॥ नको स्त्रियांचा सांगातु ॥ नको नको स्त्रियांसी मातु ॥ नको नको स्त्रियांसी येकांतु ॥ अपघातु सर्वार्थी ॥ १२ ॥ या लागीं परदारा परधन ॥ स्वप्नीं नातळावें आपण ॥ एका विनवी जनार्दन ॥ सुख समाधान सर्वदा ॥ १३ ॥ मोलापरिस बुद्धि अधिक ॥ हें जाणती ज्ञाते लोक ॥ एका जनार्दनाचे रंक ॥ कृपापूर्वक विनवीत ॥ १४ ॥ अहो कोटीची बुद्धि आहे ॥ आहे स्वामी आहे ॥ परदारा परधन त्यागिती ॥ परि स्वदारा स्वधन आसक्ति ॥ तेणेंही त्यासी नव्हे मुक्ती ॥ नरक प्राप्ती अनिवार ॥ १५ ॥ द्रव्य दारा अनासक्ति ॥ माया मिथ्या तया प्रती ॥ तोचि परमात्मा सर्वभूतीं ॥ पावन त्रिगती त्याचेनी ॥ १६॥ कोटि बुद्धिचे महिमान ॥ स्वदारा आणि स्वधन ॥ काया वाचा नातळे मन ॥ तो स्वदेहेसी पूर्ण परब्रह्ममूर्ति ॥ १७ ॥ त्याचें ऐकावया वचन ॥ स्वयें वेद येती धांवोन ॥ त्याचें घ्यावया दर्शन ॥ तिन्ही देव आपण स्वयें येती ॥ १८ ॥ त्याचिया चरणतीर्था ॥ तीर्थें वोटाविती माथा ॥ निरपेक्षा परता ॥ ठाव तत्वता आसेनां ॥ १९ ॥ हे बुद्धि अतिशये गाढी ॥ ईपुढें तृण लक्षकोडी ॥ ज्याची धारणा नित्य चोखडी ॥ प्रतिष्ठा येवढी तों पावे ॥ २० ॥ येवढे बुद्धीचें महिमान ॥ तिचें मोल मागे कोटि धन ॥ तें विकिता जाला अज्ञान ॥ नासिक छेदन निरपेक्ष ॥ २१ ॥ द्रव्यदारा लोभ ज्यासी ॥ ते केवळ दुःखराशि ॥ तो जगाची अंदणी दासी ॥ स्वप्नीं सुख त्यासी असेनां ॥ २२ ॥ याळागीं स्त्री आणि धन ॥ आपेक्षा सांडावी मनींहून ॥ येका जनार्दना शरण ॥ समाधान जीव शीवा ॥ २३ ॥

॥ २७३८ ॥ याहुनि वस्तु अमोलिक ॥ मजपासि आहे आणिक ॥ तिसी नाहीं गा ग्राहीक ॥ वृथा दांभिक वलंगति ॥ १ ॥ आमोलिक वस्तु घ्यावया जाण ॥ राजा बोलावितो आपण ॥ ते वस्तु पुढें राजा तृण ॥ मशक कोण तो घ्यावया ॥ २ ॥ जप तप यज्ञ दान करिता ॥ ते वस्तु नये हाता ॥ वेद शास्त्र पुराण पढतां ॥ वस्तु सर्वथा लाभेना ॥ ३ ॥ न लभे आगम पुरश्चरणीं ॥ न लभे नाना मंत्र पठणी ॥ वस्तु न लभे कर्मठपणीं ॥ तिर्थाटणी लाभेना ॥ ४ ॥ छत्रे पालखी सन्मान ॥ गजांतलक्ष्मी संपूर्ण ॥ वस्तु पुढें ते केवळ तृण ॥ सांडिती थुंकोन बितसंग ॥ ५ ॥ अमोलिक वस्तुचा ग्राहिकु ॥ शोधित सत्वाचा सात्विकु ॥ धगधगित वैराग्य नष्टकु ॥ त्यावरी विवेक परमार्थ ॥ ६ ॥ वेव्हारि जो विवेक ॥ तो वस्तुत्व केवळ रंग ॥ वेव्हाऱ्याचें ज्ञान चोख ॥ ते मुख्य मशक परमार्थी ॥ ७ ॥ राजे सांडोनी राज्यासी ॥ शरण येती वस्तु पासी ॥ ते वस्तु न्यावी राजापासी ॥ तैं मुख्य त्यापासी मूर्खत्व ॥ ८ ॥ अमोलिक वस्तुची ग्राहकी ॥ करुं पाठविली पालखी ॥ तेथें बैसे तो अविवेकी ॥ मूर्ख तिहीं लोकीं तो ऐकु ॥ ९ ॥ जो कां अमोलिक वस्तुसी ॥ घेऊनी जाय राया पासी ॥ तो मूर्खत्वाची महाराशी ॥ धन मानासी अति लोभी ॥ १० ॥ वित्तेषणा पुत्रेषणा ॥ सांडुनिया लोकेषणा ॥ रंकाचे रंग होउनी जाणा ॥ सद्गुरु चरण शरण यावें ॥ ११ ॥ सद्गुरुसीं अनन्य शरण ॥ स्वयें रिघोनिया आपण ॥ घेऊनिया सद्गुरु वचन ॥ देहाभिमान सांडावा ॥ १२ ॥ जो सांडी देहाभिमान ॥ तो वस्तूचा ग्राहिक संपूर्ण ॥ वस्तु साधल्याचें लक्षण ॥ सावधान आवधारी ॥ १३ ॥ वस्तु वस्तुत्वें आलिया हातां ॥ मिथ्या कर्म कार्य कर्ता ॥ मिथ्या भोग्य भोग भोक्ता ॥ दृश्यद्रष्टता अति मिथ्या ॥ १४ ॥ मिथ्या ज्ञेय ज्ञाता ज्ञान ॥ मिथ्या ध्येय ध्याता ध्यान ॥ मिथ्या ज्यागृति सुषुप्ती स्वप्न ॥ बद्ध मुक्तपण अति मिथ्या ॥ १५ ॥ बद्ध ह्मणणें अज्ञान भ्रांति ॥ मुक्त ह्मणजे सज्ञान भ्रांती ॥ अहमात्मा हे सोलिव भ्रांती ॥ अत्पत्वीं वृत्ती असेना ॥ १६ ॥ अत्मा सच्चिदानंदघन ॥ नित्य निर्विकल्प निरंजन ॥ सगुण निर्गुणातीत पूर्ण ॥ गुणागुण अति मिथ्या ॥ १७ ॥ निर्गुणांगे भासे सगुण ॥ सगुण मिथ्यत्वे नित्य निर्गुण ॥ वस्तु वस्तुत्वें परिपूर्ण ॥ गुणागुण अति मिथ्या ॥ १८ ॥ आत्मा निर्विकार निर्विषय ॥ सदोदित चिदचिन्मात्र ॥ निर्विषयत्वाचा विचार ॥

ऐक साचार सांगेन ॥ १९ ॥ पुरुषाचा आत्मा बाईलेची आत्मी ॥ हें तंव मुख्य मुळीं नाहीं ॥ विषमत्व आत्मियाचा ठायीं ॥ अणुमात्र पाही असेना ॥ २० ॥ स्त्रीपुरुष विषय विचार ॥ देहावरी भासे साचार ॥ आत्मत्वीं विषय संचार ॥ अणुमात्र आसेना ॥ २१ ॥ इंद्रियापाशीं विषय सुख ॥ आत्मत्वींद्रिय नाहीं देख ॥ त्यास असेचना सुखदुःख ॥ परमानंद चोख नित्य तृप्तु ॥ २२ ॥ सत्-श्चित् आनंद उच्चार ॥ परी वस्तु नव्हे त्रिप्रकार ॥ ऐका तोहि विचार ॥ सत्य साचार सांगेन ॥ २३ ॥ सद तेचि चीद ॥ चिद तोचि आनंद ॥ वस्तु वस्तुत्वें अभेद ॥ सच्चिदानंद अनुवादी ॥ २४ ॥ मृदु मधुर अत्यंत शुभ्र ॥ तिहीं नावींएक साखर ॥ तेवी सच्चिदानंद नामाकार ॥ वस्तु चिन्मात्र एकत्वे ॥२५॥ या लागीं चिदानंद ॥ हा केवळ शब्द बोध ॥ वस्तु पूर्णत्वे परमानंद ॥ सदचिद शब्द साहेना ॥ २६ ॥ साखर मृदु शुभ्र चोखडी ॥ हे त्रिविध नाम परवडी ॥ चाखो जातां केवळ गोडी ॥ नाम रुपादि वोढी असेना ॥ २७ ॥ तेवी अनुभवी साचार ॥ नुरे नांमरूप गुणकर्मादर ॥ वस्तु वस्तुत्वें नाकार ॥ चिदचिन्मात्र पूर्णत्वें ॥ २८ ॥ अल्प जळीं लवण विरे ॥ ते क्षारता जळी थावरे ॥ अगाध जळी लवण मुरे ॥ विरालियाही नुरे क्षारता तेथें ॥ २९ ॥ तेवी शब्द ज्ञानाचिया स्थिति ॥ सच्चिदानंद बोलिजेती ॥ पूर्ण जालिया ब्रह्म प्राप्ती ॥ श्रुति उपरमती शब्देंसि ॥३०॥ सिंधु पडलिया सैंधवमात्र ॥ स्वयें विरुनी होय समुद्र ॥ तेवी निरभियान निर्विकार ॥ चिदचिन्मात्र परब्रह्म ॥ ३१ ॥ तेथें मी एक होतों लवणं ॥ हें सांगावया नुरे एकपण ॥ तेवी नाठवे जीव शीवपण ॥ जन्ममरण असेना ॥ ३२ ॥ अहं कोहं सोहं पण ॥ त्रिगुण त्रिपुटी निमाली पूर्ण ॥ वेद शास्त्राची उजवण ॥ जाली बोळवण कर्माची ॥ ३३ ॥ ज्ञानाज्ञानाची निमाली गोष्टी ॥ कळिकाळाची निमटली दृष्टी ॥ विषयाचें धरणें उठी ॥ पडिली तुटी संसारा ॥ ३४ ॥ अभिमानाचा गेला प्राण ॥ निराभिमाना बोळवण ॥ एका जनार्दना शरण ॥ परब्रह्म परिपूर्ण पूर्णत्वं ॥ ३५ ॥ ब्रह्म पूर्ण ते परिपूर्ण ॥ हेही कोण आठवी आठवण ॥ तुटला बोल तुटले मौन ॥ वस्तु सनातन सदोदित ॥ ३६ ॥ एका जनार्दनीं वक्ता ॥ अकल गारी अपूर्व कथा ॥ सावध ऐकुनी श्रोता ॥ निजस्वार्था साधावे ॥ ३७ ॥

## जमाखर्च.

॥ २७३९ ॥ ऐका जमाखर्चाची खंडणी ॥ नरदेह जमेसी धरुनी ॥ बाकी साल हल्लीं उगवणी ॥ शून्य घालीं संसारा ॥ १ ॥ संसार लक्षचौऱ्यांशी योनी ॥ बाकी व व्याज तेरीज मिळुनी ॥ सावधान गुरुचरणीं ॥ वसूल केला नरदेह ॥ २ ॥ नरदेह साल मजकुर ॥ रुजू साल गुदस्त पूर्व संसार ॥ सद्गुरु कृपा निर्विकार ॥ सालें भरलीं उगवलींजी ॥ ३ ॥ संचित क्रियमाण विचार ॥ पुण्य पाप स्वर्ग नरकद्वार ॥ वेद शास्त्रपुराण निर्धार ॥ स्वहित सार देखिलेंजी ॥ ४ ॥ अहंभाव बाकी ठेविली ॥ ती सद्बुद्धि नाहींशी केली ॥ विवेक विचारानें पाहिली ॥ वसूल केला नरदेह ॥ ५ ॥ मुख मुश्रीफ व्यवहार ॥ हा तंव वस्तीचा शृंगार ॥ प्रेम हुजुर सुंदराक्षर ॥ सरस्वती वर झालाकींजी ॥ ६ ॥ चातक जन्ममूर्ख ते केले ॥ सुखदुःख इच्छाएकलेनि नेलें ॥ तें गुह्य मुखीं मुश्रिफी आलें ॥ शिलक सुटली ब्रह्मादिकांची ॥ ७ ॥ स्वधर्म खर्च केला ॥ तो फलरुजू पाहिला ॥ ब्रह्मार्पण मुजरा केला ॥ फाडा ओढिला शून्याचा ॥ ८ ॥ विचार शूर नित्य नेमाचें ॥ सावधान एकचित्ताचें ॥ वर्म मुखें केलें सद्गुरूचें ॥ नांव अविद्येचें खजिलेंजी ॥ ९ ॥ विवेक आत्मवर्ग स्वामीचा ॥ वडील बंधू सत्वाजीचा ॥ झाला पाहिला प्रवृत्तीचा ॥ अंतर्यामीं हरी हरी ॥ १० ॥ ज्ञान चक्षूनें अति सुरेख ॥ नित्य स्वरूप पाहिलें अलेख ॥ देखोनि नरदेह देखणा झाला ॥ नरदेह जमेसी आला ॥ ११ ॥ अज्ञान बाकी झाडा झाला ॥ पुढें शिलकेसी चुकविला ॥ जमाखर्च स्वानंदाचा झाला ॥ जमाखर्च संसारवाहो ॥ १२ ॥ नाहीं बंधन मोक्ष संदेहो ॥ गुरुकृपा स्वानुभवो ॥ देखोनि नरदेहीं संदेहो ॥ अनुभव जमाखर्च जनार्दनीं ॥ १३ ॥

---

## नवरी.

॥ २७४० ॥ मी आईची नवरी केली ॥ खुशाल झाली ॥ ध्रु० ॥ आला विवेक ब्राह्मण ॥ त्यानें निश्चय केला जाण ॥ भाव एक साह्य होऊन कृपा केली ॥ १ ॥ बहिणी वऱ्हाडिणी आल्या चार ॥ त्यानें केला उपकार ॥ सर्व मिळोनी केला विचार ॥ तेव्हां लाधलों ॥ २ ॥ ढोलस

पाहतां आंधळे झाले ॥ बोलके ते मुकावले ॥ ऐकतां ते निवांत राहिले ॥ भुलच पडली ॥ ३ ॥ सहाजणांसी केली चोरी ॥ त्याचा पांगुळला अधिकारी ॥ आनंद झाला मजअंतरीं ॥ न बोलावें ॥ ४ ॥ चाऱ्ही वर्ण एके ठायीं ॥ ते ध्यातसे हृदयीं ॥ एका जनार्दनाचे पायीं ॥ आई लाधलों ॥ ५ ॥

---

## घाणा.

॥ २७४१ ॥ आदि भगवंतें घाणा रचिला पाहे निर्गुण ॥ तीन ताल घाण्यांत घालुनी केलें रगडण ॥ ध्रु० ॥ सप्त पाताळ एकविस स्वर्ग घाली पाण्यांत ॥ अनंत कोटी ब्रह्मांडाचा पाया केला आंत ॥ १ ॥ ऐसा घाण्या समोर फिरे पाहतां गरगरां ॥ कितीवेळ घाणा फिरला सांग सत्वरां ॥ २ ॥ अनंत रूपी धान्यामधीं घालुनियां पाया ॥ सत्य समुद्र कोठें ठेविले सांग लवलाह्या ॥ ३ ॥ कितीक रुंदी कितीक उंची त्याही घाण्याची ॥ पाखांड ह्मणसील तरीतूं पडशील फशी ॥ ४ ॥ एकनाथ पुसे त्याही घाण्याची मांत ॥ एवढा घाणा सांगुनी देसील, तरितूं होसील संत ॥ ५ ॥ ऐसा घाणा गाईयेला पाहे परिपूर्ण ॥ एका जनार्दन ह्मणे नाहीं उरला कोठें कोण ॥ ६ ॥

---

## आरत्या.

॥ २७४२ ॥ तपें तीर्थें व्रतें जया पांई मिरवलीं ॥ संत मिरवलीं ॥ मुनीवृंदें जया सुखासीं लाधलीं ॥ १ ॥ ऐशिया पाया लागी आरती करूं ॥ काया वाचा मनें चरण दृढ धरूं ॥ २ ॥ सुरासुर उभे नमना कर जोडोनी ॥ प्ऱ्हाद नारद अखंड जयाचें ध्यानीं ॥ ३ ॥ एका एकी विनटला जनार्दन पायीं ॥ आरती करितां देहींदेह भाव नाहीं ॥ ४ ॥

॥ २७४३ ॥ संत सनकादीक भक्त मिळाले आणीक ॥ स्वानंदें गर्जती पाहूं आले कौतुक ॥ १ ॥ नवल होताहे आरती देवाधिदेवा ॥ स्वर्गींहुनी सुरवर पाहूं येती केशवा ॥ २ ॥ नर नारी बाळा टक पडिलें

नयना ॥ वोळितां श्रीमुखधणी न पुरे मना ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं मंगळ आरत्या गाती ॥ मिळाले वैष्णव जयजयकारें गर्जती ॥ ४ ॥

॥ २७४४ ॥ सहस्र दीपें दीप कैसी प्रकाशली प्रभा ॥ उजळल्या दश दिशा गगना आलीसे शोभा ॥ १ ॥ काकड आरती माझ्या कृष्णस भागीया ॥ चराचर मोहरलें तुझी मूर्ती पाहाया ॥ २ ॥ कोंदलेंसे तेज प्रभा जालीसे एक ॥ निस नवा आनंद वोळितां श्रीमुख ॥ ३ ॥ आरती करितां तेज प्रकाशलें नयनीं ॥ तेणें तेजें मिनला एका एकी जनार्दनीं ॥ ४॥

॥ २७४५ ॥ चरण कमल ज्याचे अती सुकुमार ॥ ध्वज वज्रांकुश रेखा चरणीं ब्रीदाचा तोडर ॥ १ ॥ वोवाळूं आरती मदन गोपाळा ॥ शामसुंदर गळा वैजयंती माळा ॥ २ ॥ नाभी कमळीं ज्याचे ब्रह्मयाचें स्थान ॥ हृदईं पदक शोभे श्रीवत्सलांछन ॥ ३ ॥ मुख कमळ ज्याचें पाहतां सुखाच्या कोटी ॥ वेधलें मानस हारपली दृष्टी ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं देखियेलें रूप ॥ रूपचि पाहातां अवघें जालें तद्रूप ॥ ५ ॥

॥ २७४६ ॥ आरती अनंत भुजा ॥ विठु पंढरी राजा ॥ नचलती उपचार ॥ मनें सारिली पुजा ॥ १ ॥ परेसी पार नाहीं ॥ नकळे निगमा ठायी ॥ भुलला भक्ति भावा ॥ लाहो घेतिला देहीं ॥ २ ॥ अनिर्वाच्य शुद्ध बुद्ध उभा राहिला नीट ॥ एकाजनार्दनीं पायी जडली वीट ॥ ३ ॥

॥ २७४७ ॥ कृपाळु माउली उभी भीमा तटीं ॥ लागलीसे आशा जीवासी मोठी ॥ १ ॥ कई भेटेल माझा मायबाप ॥ उजळोनी दीप वोवाळीन श्रीमुख ॥ २ ॥ शून्य स्थावर व्यापुनी वेगळा राहे ॥ एकाजनार्दनींवंदीन साचे पाय ॥ ३ ॥

---

## आरती मारुतीची.

॥ २७४८ ॥ वानर रूप धारी ज्याची अंजनी माता ॥ हिंडतां वनांतरीं भेटी झाली रघुनाथा ॥ धन्य हे रामभक्त ज्यानीं मांडिली कथा ॥ १ ॥ जय देवा हनुमंता जय अंजनी सुता ॥ ओंनमो देवदेवा राया रामाच्या दूता ॥ आरती ओंवाळीन ब्रह्मचारी पविचा ॥ जय देवा० ॥ धु० ॥

सीतेच्या शोधा साठीं रामें दिधली आज्ञा ॥ उल्लंघुनी समुद्र तीर गेला लंकेच्या भुवना ॥ शोधुनी अशोक वन मुद्रा टाकिली खुणा ॥ जय देवा० ॥ २ ॥ सितेसी दंडवत दोन्ही कर जोडून वन हें विध्वंसिलें मारिला आखया दरुण ॥ परतोनी लंकेवरी तंव केलें दहन ॥ जय देवा० ॥ ३ ॥ निजबळें इंद्रजित होम करी आपण ॥ तोही विध्वंसिल लघुशंका करून ॥ देखोनी पळताती महा भूत दारुण ॥ जय देवा० ॥ ४ ॥ रामही लक्ष्मण जया पाताळीं नेलें ॥ तयांच्या सुधी साठीं जळीं प्रवेश केले अहिरावण महिरावण क्षणामाजि मर्दिले ॥ देऊनी भुःभुःकार नरलोक आटीले ॥ घेऊनी स्वामी खांदी अयोध्येसी आणिले ॥ जय देवा० ॥ ५ ॥ हनुमंता नाम तुझें किती वर्णु दातारा ॥ अससी सर्वा ठायीं हारो हारीं अंबरा ॥ स्वामीसी सोडविलें दिनानाथा माहेरा ॥ एकाजनार्दनीं मुक्त झाले संसारा ॥ जय देवा० ॥ ६ ॥

॥ २७४९ ॥ बापयाची ताहान बोलणें कारणें आला मेघुतो प्राणियां सकळा सखा सोयरा जाला ॥ गौतमी गौतमासीचकीं तारी लोक सकळा तेवी कोणा प्रती पाळकां आह्मी देखतों डोळां ॥ ध्रु० ॥ शिव शिव दत्तात्रया जगदात्मया रामा लागला वेदु तुझा मनीं अनुसरला नामा डोळीयां पारणें फेडी जो जीविनवितुसे तुह्मां आमुते विसराल ह्मणे अहो जी परब्रम्हा ॥ १ ॥ सर्वथा अनुमीन तुजे रजे तुझया पायां सर्व संग परिवर्जन हेंची बोधले रेया येरी तूं रोवरी करितां देह जाईल वायां दिगंबरा परमार्थ तुज जों तुझीया पाया ॥ २ ॥

॥ २७५० ॥ नवल होता हे आरती देवाधी देवा ॥ स्वर्गीहुनी सुरवर पाहु येताती धावा ॥ ध्रु० ॥ संत सनकादिन भक्त मिळाले आणिक ॥ स्वानंदें गर्जती पाहु आले कवतुक ॥ १ ॥ नर नारीसी ठक पडलें नयना ॥ ओवाळिता श्रीमुख ह्मणी नपुरे मना ॥ २ ॥ येका जनार्दनी मंगळ कवतुकें गाती मंगळ आरत्या गाती ॥ मिळाले वैष्णव जयजयकार गर्जती ॥ ३ ॥

॥ २७५१ ॥ अवलोकितां जन दिसे जनार्दन ॥ भिन्न भिन्न तेथें दावी अभिन्न ॥ अनेक एकत्वें दिसे परिपूर्ण ॥ टकली मनबुद्धि तेथें कैंचे गुणा गुण ॥ १ ॥ जय देव जय देव जय जनार्दना ॥ परमार्थ आरती

अभिनव भावना ॥ ध्रु० ॥ ज्योतीची ही ज्योती उजळुनियां दिप्ती ॥ तेणें तेजें केली सतेज आरती ॥ पाहतां पाहतें पण पावया स्थिती ॥ नुरेचि वेगळें पण देहभावस्फुर्ती ॥ २ ॥ उजळिते उजळण उजळायालागी ॥ वेगळें पण कैंचें नुरेचि तें भोगी ॥ अंगें अर्पीलें अंगींचें अंगी ॥ जीव शीवपण गेलें हरपोनी वेगीं ॥ ३ ॥ पाठीं ना पोटीं अवघा निघोंट ॥ सर्वांचा देखणा सर्वां वरीष्ट ॥ इष्ट ना अनिष्ट गुप्तना प्रगट ॥ अहं सोहं सगट भरला निघोंट ॥ ४ ॥ सर्वदा दिसे परी नाकळे मना ॥ जें जें दिसे तें तें दशना जाणा ॥ अभावा भावेंसी गिळीली भावना ॥ अभिनव आरती एका जनार्दना ॥ ५ ॥

॥ २७५२ ॥ जयदेवी जयदेवी जयमाय तुळशी ॥ कलियुगिं तारक तूं एकचि होसी ॥ ध्रु० ॥ प्रातःकाळीं तुझें उत्तम रूप ॥ दर्शन केलीया जाईल पाप ॥ पुजन केलीया हरती संताप ॥ प्रदक्षणा केलीया वैकुंठ प्राप्त ॥ प्रातःकाळीं तुझें रूप सुंदरी ॥ तुझे अग्रीं वेद असती चारी ॥ तुझे पत्रीं पूजा करितील मुरारी ॥ त्यासी प्राप्त मुक्ति होतील चारी ॥ २ ॥ बहुत महिमा तुझी कार्तीक मासीं ॥ राधा दामोदर असती तुज पाशीं ॥ वृंदावनावरी माये बैससी ॥ तूझा महिमा आहे सर्वत्र देशीं ॥ ३ ॥ रामाकृष्णा तूळसी नाहीं हा भेद ॥ तुळशीपाशीं असती नित्य गोविंद ॥ एका जनार्दनीं तुळशीचा छंद ॥ तुळशीपाशीं करिती नित्य आनंद ॥ ४ ॥

---

## नारायणाची आरति.

॥ २७५३ ॥ सहस्त्र फणा मणि तेजें उजळलि दीप्ती ॥ सहस्त्र मुखें शेषु स्वयें गातो आरती ॥ १ ॥ पूर्णत्वें वोवाळूं अगाध महिमा नारायणा ॥ सहस्त्र जिव्हा दुखंड शेषा ना कळती गुण ॥ धृ० ॥ अष्टधा भान साचि आठही भुजा ॥ चैतन्य चरण रमा सेवी निज निजा ॥ २ ॥ अहं सोहं चरणी वांकी अंदु गजर ॥ क्षराक्षरीं अक्षर कासे झळकत पितांबर ॥ ३ ॥ विवेक यंत्री शोधिल्या सुवर्ण कळा ॥ चिद्रानें झळकतु मध्य संधि मेखळा ॥ ४ ॥ नामीं नाभीं देउनि स्थापीला धाता ॥ तेथीचें ही पार पाहों नेणेचि वीधाता ॥ ५ ॥ वेदाही अगम्य हृदयींचें महिमान ॥ ते

हृदयीं सावकारा सदा बसती सज्जन ॥ ६ ॥ शुद्ध सत्वें साधिला उपनिषदाचें खाणी ॥ निजतेजें झळकतु कंठी कौस्तुभ मणीं ॥ ७ ॥ वैभवेंसी लक्ष्मी देवें डावलिली सदा ॥ दक्षिणांगी महिमा मिरवी श्रीवत्स पदा ॥ ८ ॥ हरिखाचा हरिख मुसावलें निज सुख ॥ सुखा सुखदायक श्रीहरीचें मुख ॥ ९ ॥ ॐकारा माजी जैशा शोभती श्रुति ॥ मुखा माजी तैशा दिसती दंतांच्या पंक्ति ॥ १० ॥ शोभे शोभवित तेंचि नासिक ॥ चिद्रुपें नयन सबाह्य देखणे देख ॥ ११ ॥ कुंडलें साकार ह्मणती मकराकार ॥ श्रवणीं मावळती स्वयें आकार विकार ॥ १२ ॥ सच्चिद आनंद लल्लाटीचि बिवळी ॥ अहं सोहं मर्दुनिया मळिवटु भाळी ॥ १३ ॥ अलक्ष पैं लक्षेना मुकुटीचें महिमान ॥ आरती प्रकटला एका एकु जनार्दन ॥ १४ ॥

---

# आरति गोपाळाची.

॥ २७५४ ॥ उचलल्या आरति उजळुनी देख ॥ अवलोकिती घनःशाम सुरेख ॥ दशनखीं प्रति बिंबलें रवि कोटी मयंक ॥ चरणारविंद युगुळा नयना आली टकमक ॥ १ ॥ वोंवाळु दीपमाळा चिदानंद गोपाळा ॥ स्वरूप मनोहर सुकुमार सांवळा ॥ जिवा जीवीं होत पारणें ठक पडियेलें डोळा ॥ धृ० ॥ हरिपदाचे निबळें गर्जति वांकी ॥ देवालय तें नाणी अवांकी ॥ तोढरु प्रळय पंगळ दैत्य दानवानोकी ॥ नेपुरे अधोमुखें चरण पीयुषा आलुकी ॥ २ ॥ सरळ उरु देखोनि पद्मनाभ ॥ उपमेसी पोकळ कर्दळी स्तंभ ॥ आटीव जंघन जानु जेवी नीळा स्वयंभ ॥ कसिला पितांबरु सोलीव विजु स्वप्रभ ॥ ३ ॥ साधक शिणले योग्यता योगी ॥ मुनिजना नाकळे हृदयाचा रंगीं ॥ मेखळा त्या लागली धरिला मध्य भागीं ॥ किंकिणी मोतिलगा माणिकुली दोहीं अंगीं ॥ ४ ॥ सखोल निर्मळ नाभी मंडळ ॥ श्रुति विभागाचें त्या माजी मूळ ॥ ह्मणोनि पद्मनाभ निगम बोलती सकळ ॥ मिरवत दोंद साने जैसें चंद्र मंडळ ॥ ५ ॥ कृष्ण उदरीं रेख ते धन्य देख ॥ रोमावळी तैसी मिरवे सुरेख ॥ त्रिवळी मिरवतसे माहेर तिहीं लोका ॥ ब्रह्मण्य देव साचे महिमा श्री वत्स अंका ॥ ६ ॥ वक्षस्थळ अति विशाळ दिसे ॥ भक्त जीवन कृपा त्या माजी वसे ॥ ते पद पद्का आलें हृदयीं धरिलें हृषिकेशें ॥ वनमाळा वैजयंति दोन्ही उतरल्या

असे ॥ ७ ॥ कोटी सूर्य ज्योति खद्योत होउनि ॥ कंठी प्रकाशतु कौस्तुभ मणी ॥ लेईला गुंजाहारु कसया मिसळुनी ॥ ध्याता ध्येय समरसत जया देखोनी नयनीं ॥ ८ ॥ सरळ बाहु देखा सांडुनी जानु ॥ या लागीं बोलिजे बाहु अजानु ॥ झळकति वीरकंकणे हिरा लोपत भानु ॥ दोहीं हातीं शंख चक्र दोही व ईयेला वेणु ॥ ९ ॥ साचार गुज जेवी सांगती कानीं ॥ या परी कुंडलें मिरवति श्रवणीं ॥ आकारु आदि अवतारु तैसी तळपती वदनीं ॥ असमाई तेज देखा मिळती स्वांशेसी मिळणी ॥ १० ॥ निमासुर वदन केवी वर्णवे वाचे ॥ समाधीचें सुख साकार साचें ॥ ११ ॥ संसृति कारणासी कारण रूपज्याचें ॥ चैतन्य मुसावलें जीवन सकळ जीवाचें ॥ अधर आरक्त श्याम शरीरीं ॥ संध्या रागु जेवी भिनला अंबरी ॥ बोलतां तेज फांके दशन हिऱ्यांच्या हारी ॥ सर्व रसा माहेर ते रसना माझारीं ॥ १२ ॥ मुनिजनांची जैशी अवक्र अरिक्तक ॥ सा परीं मिरवे सरळ नासीक ॥ सैराट हिंडतां हो पवनु पावला दुःख ॥ तो आला कृष्ण श्वासा पावावया निज सुख ॥ १३ ॥ आकर्ण चपळ दिसती नयन ॥ चित् शक्तिचें ते निज जन्म स्थान ॥ अपांगपातें देखा जनाकरित मोहन ॥ मन बुद्धि पांगुळलि नयनीं नयन देखोन ॥ १४ ॥ सुरेख धनुष्याकृति भंवई जाण ॥ वेणु वादनें तया वाईयेला गुण ॥ सुटती नयन बाण गोपी करित कामाण ॥ विसरल्या देह गेह लागलें कृष्ण ध्यान ॥ १५ ॥ अर्धचंद्र—बिंबी शिवाची पिंडी ॥ आकर्ण चंद्र रेखिले लल्लाटी ॥ अक्षता माणिकाच्या शशी शिवा माजी कंठी ॥ दोहीं कर्णी अवगतसे शोभा शोभे गोमटी ॥ १६ ॥ मस्तकीं बाणिला जडित किरिटी ॥ त्यावरी घातली बर्हीची वेठी ॥ तबक जें अनवच्छिन्न प्रभा देति गोमटी ॥ मज पाहतां सुरनयन देखोनि जडले मुगुटी ॥ १७ ॥ कृष्ण वदन देख सुख सागर ॥ त्रिभंगी ठाण तोचि रवी दोर ॥ देव्हडा चरणु तळीं जैसा कूर्म मनोहर ॥ बेणु तो मंद्रमथन मथुनी काढिलें सार ॥ १८ ॥ नादामृताचा सुटला झरा ॥ सप्तस्वराच्या लागल्या धारा ॥ नरसुर वेहावल पारुपले वेव्हारा ॥ पशुपक्षीं लाचावलीं चरों विसरलीं चारा ॥ १९ ॥ अवघेनि स्वरूपें अवघा जाण ॥ द्रष्टा दृश्य जेथें दर्शन क्षीण ॥ सर्वांगें देखणा हो समविषमी समान ॥ प्रकाशिलें विश्व अंगें जैसें सूर्य किरण॥२० ॥

2/97180



यापरी देखोनि नंदानंदना ॥ सहित संकल्पें निमणें मना ॥ हर्षाचा गोंधळीं क्रीडा होतसे नयना ॥ सगुण निर्गुण एक एका शरण जनार्दना ॥ २१ ॥

॥ २७८३ ॥ सांगेन तें एक आह्मा द्यावें ॥ निरंतर यावें जागरणा ॥ १ ॥ हरिदासाचा संग बरवा ॥ आनंदें राघवा गावों गीतीं ॥ धृ०॥ जें नलभे तप तीर्थ दानीं ॥ तो हरी कीर्तनीं तिष्टतु ॥ २ ॥ जनार्दनाचा एका म्हणे ॥ कृपा करणे जागरणा ॥ ३ ॥

॥ २७८४ ॥ वीण स्नेहें वाती उजळु आरती ॥ कृष्ण दीपे दीप्ति दीप प्रभा ॥ १ ॥ भलीरे जोवते आरती ॥ कृष्णनि मुरति मायानि स्फुरती मंद भाई ॥ धृ० ॥ अरे ते आरती ॥ सुंदर शोभा ॥ शेष निगमीं चंद्र प्रभा ॥ २ ॥ साराात्रिक मुख जोवतें हरी ॥ स्थावर जंगम देव मुरारी ॥ ३ ॥ आरती जोवते निगमी भाया ॥ कृष्ण रूपें भई तद्रूपें काया ॥ ४ ॥ भूति भवतिक सर्व दय दिप दिप्ती ॥ आरती जोवते अहं सोहं निवृति ॥ ५ ॥ परिपूर्ण आरति सहज संपज्यु ॥ ते गम जोवते त्रैपद कुडुं ॥ ६ ॥ एकाजनार्दनीं प्रभा अवछिन्न ॥ आरति प्रकश्यौ सहज चैतन्य ॥ ७ ॥

महाराष्ट्र साहित्य परिषद. पुणे.




24yr
1-28
2606

